# मराठी शब्दकोश

## पाचवा खंड

(प - ते - म)




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# मराठी शब्दकोश

## पाचवा खंड

(प - ते - म)

संपादन
प्राचार्य रामदास डांगे
•
संपादन सहयोगी

- पूर्णिमा लिखिते
  एम. ए.
- अरुण प्रभुणे ( पुणे )
  एम. ए. बी. एड. पीएच. डी.
- सुप्रिया महाजन
  एम.ए. (संस्कृत)
- संदीप तापकीर
  एम.ए (इतिहास, मराठी)
- सौ. रूपाली अवचरे
  एम.ए, एम. फिल




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ -मुंबई

◆ 'मराठी शब्दकोश' (पाचवा खंड)

❧

◆ **प्रथम आवृत्ती**
जुलै २०१२

❧

◆ **प्रकाशक**
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
रवीन्द्र नाट्य मंदिर, दुसरा मजला,
पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी आवार,
सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई - ४०००२५.

❧



❧

◆ **अक्षर जुळणी**
सौ. चेतना विकास वडके
शब्दमाधुरी, पुणे.
भ्रमणभाष : ९८९०९८४९२७

❧

◆ **मुद्रक**
व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय
पुणे ४११००१.

❧

◆ **किंमत : रुपये २८१ फक्त**

# निवेदन

'मराठी शब्दकोशा'चा प-वर्गातील वर्णांचा समावेश असलेला हा पाचवा खंड अभ्यासकांना सादर करताना आनंद होत आहे. कोशप्रकल्पाचे नव्याने सुरू केलेले काम अपेक्षित मुदतीत होत आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष श्री.मधु मंगेश कर्णिक यांनी टाकलेल्या विश्वासाला आम्ही पात्र ठरत आहोत याचे समाधान आहे.

चौथ्या खंडाच्या निवेदनात म्हटल्याप्रमाणे प-वर्गातील वर्णांच्या शब्दकोशाचे काम या प्रकाशनाच्या रूपाने पूर्ण झाले आहे. य-वर्गातील आणि श ते ज्ञ या वर्णांच्या शब्दकोशाचेही काम पुढील वर्षी हातावेगळे होईल. तसेच पुरवणी-खंडाचेही काम व्यापक दृष्टिकोनातून सुरू झाले आहे.

शब्दांच्या अर्थाच्या स्पष्टीकरणासाठी आवश्यक तेथे अनेक ग्रंथांतून 'अवतरणे' दिली आहेत. अशा ग्रंथांची निर्देशसूची त्यांच्या संक्षेपांसह चौथ्या खंडात समाविष्ट केली आहे. आवश्यकतेनुसार पुरवणी-सूची शेवटच्या खंडात दिली जाईल.

गेल्या वर्षी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने विद्यापीठांच्या साहाय्याने वऱ्हाडी, अहिराणी इत्यादी बोलींच्या कोशांचे काम सुरू केले आहे. यावर्षी मराठी व्युत्पत्तिकोशाचाही प्रकल्प सुरू होत आहे.

शब्दकोशाच्या या अवघड कार्यात अध्यक्ष पद्मश्री श्री. मधु मंगेश कर्णिक, माजी सचिव श्री. सुरेश वांदिले आणि विद्यमान सचिव श्रीमती मिनाक्षी पाटील यांच्या पाठपुराव्यामुळे आणि तत्परतेमुळे कामाची गती वाढली आहे, हे येथे नोंदलेच पाहिजे.

**- संपादक**



**प** मराठी वर्णमालेतील छत्तिसावा वर्ण आणि एकविसावे व्यंजन.

**पइक** पु. निबंध. (गो.)

**पइंडा** पु. साकव; लाकडी धक्का. (गो.)

**पक–ग** न. १. आश्रय. २. पाऊल. [सं.पद; हिं. पग]

**पकटी** स्त्री. १. मधाच्या पोळ्यातील मेणाचा सुका भाग. (को.) पहा : **पाकडी**. २. भाग; तुकडा. ३. बंदराचे एक टोक. (दादर)

**पकड** न. १. अधिकार; ताबा; नियंत्रण; प्रभुत्व; हुकमत. २. ग्रहणशक्ती.

**पक(क्क)ड** स्त्री. १. (मल्लविद्या) प्रतिपक्ष्याला कचाट्यात धरण्याचा प्रकार, डाव, पेच. २. (वक्तृत्व.) प्रतिस्पर्ध्याच्या भाषणातील त्याला अडविता येईल असा दोषयुक्त भाग; भाषणातील दोष. ३. (ल.) दुसऱ्याची छाप आपल्यावर बसू न देता, आपली छाप मात्र दुसऱ्यावर पडेल अशी युक्ती. ४. जाणूनबुजून केलेले द्व्यर्थी भाषण (करार, विनंती करताना, वचन देताना); प्रसंगानुसार पाहिजे तसा अर्थ होण्याजोगे भाषण, युक्ती; सोडवणूक; सवड; पळवाट. ५. मल्लखांबावर करण्याची कसरत, घेतलेली उडी. ६. खिळा उपटण्याचे एक हत्यार; चिमटा; सांडशी.[सं.प्रकृष्टि =पकड] (वा.) ० **धरून बोलणे** – पळवाट ठेवून सावधगिरीने अंगावर बाजू न येईल असे बोलणे.

**पक(क्क)ड** स्त्री. (संगीत) रागवाचक मुख्य स्वरसमूह.

**पकडणे** उक्रि. १. (हात इ. नी) धरणे; आटोक्यात घेणे, आणणे; झडप घालणे. २. (ल.) भाषण वगैरेमध्ये दोष काढणे. ३.कोंडीत धरणे.

**पकणे** अक्रि. वैतागणे. [हिं. पकना]

**पक(च)णे** अक्रि. पिकणे; शिजणे; तयार होणे; पचणे. [सं.पच्]

**पकला** वि. मजबूत झालेले सिमेंट. (झाडी)

**पक(ख)वा** पु. (बायकी) फुगडी, झिम्मा वगैरे खेळताना मुलींकडून तोंडातून काढला जाणारा 'पक् पक् फू:' असा आवाज. [ध्व. पक्]

**पकाई(य)त** स्त्री. दृढता; पक्केपणा; निश्चिती : 'पहाडी राजाच्या भेटी करून पकाईत करून आलो.'– पेद ४२८१.

**पकार–रा** पु. १. पावली या नाण्याचा एक संकेत. (नंदभाषा) २. (सामा.) पैसा; छदाम; द्रव्य. (प ने आरंभ होतो म्हणून ): 'जवळी नाहीं एक पकार ।' – अमृत ३६.

**पकारी** स्त्री. १. (बुद्धिबळाचा खेळ – संकेत) प्यादेमात. २. पहा : **पकार**

**पकोडा–डी** पु. स्त्री. भजे. [हिं.पकौडा]

**पकोरडी** स्त्री. शीळ घालणारा एक पक्षी.

**पक्का** वि.१. पिकलेला; प्रगल्भ; पूर्णावस्थेला आलेला. २. शिजविलेला; सिद्ध झालेला; निसर्गनिर्मित पदार्थांवर प्रक्रिया करून मानवाने तयार केलेला (माल). ३. तयार असलेला; निश्चित, नक्की झालेला (बेत, मसलत इ.). ४.भाजलेला (वीट, मडके इ.). ५. पुष्कळ दिवस टिकणारा (रंग इ.). ६. तरबेज; निष्णात; हुशार; पूर्ण; श्रेष्ठ; धूर्त; वस्ताद.७. पूर्ण, तयार केलेला; गणित करून काढलेला (त्रैराशिकातील उत्तराचे चौथे पद). पहा : **कच्चा**. ८. तळलेला (पदार्थ). पक्का शब्दाचे निरनिराळ्या शब्दांशी संयोग होताना निरनिराळे अर्थ होतात. जसे : – पक्का धोंडा (अतिशय कठीण दगड), पक्का पैसा (ढब्बू पैसा), पक्का डाग, पक्की शाई, पक्के तूप इ. [सं.पक्व]

**पक्का–कच्चा** वि. अर्धवट शिजलेला, तयार, पिकलेला, लिहिलेला (अन्न, पीक, जमाखर्च, इ.).

**पक्का तोळा** ९६ (भार) गुंजांचा तोळा. (कच्चा तोळा = एक रुपया भार = ९० गुंज).

**पक्का रस्ता** डांबरी रस्ता.

**पक्का रंग** (तिफाशी सोंगट्यांचा खेळ) एका बाजूच्या तांबड्या व एका बाजूच्या पिवळ्या रंगाच्या सोंगट्या.

**पक्व** वि. १. शिजलेला; तयार केलेला. २. पचविलेला; जिरलेला. ३. पिकलेला. ४.(ल.) प्रौढ; परिणत. ५. पहा : **पक्का** [सं.]

**पक्वान्न** न. गोड व श्रीमंती खाद्यपदार्थ (लाडू, पुरणपोळी इ.); मिष्टान्न.

**पक्वान्ने** न.अव. मुलींचा एक खेळ.

**पक्वाशय** पु. पोट; कोठा; अन्न पचविण्याची जागा. [सं.]

**पक्काशी** स्त्री. लोखंडी गज, सळई.

**पख** पु. पहा : **पंख**

**पखचन्नी** स्त्री. पोपटाची एक जात. याच्या मानेच्या वरचा भाग व पंखांचा काही भाग लालसर असतो. याला रामनगरी असेही म्हणतात.

**पखचे** क्रि. तोंड बंद होऊन जखम किंवा फोड बुजत जाणे. (गो.)

**पखड** कणसे खुडलेल्या पेंढ्यांचा ढीग.

**पखबाळी, पंखेबाळी** स्त्री. स्त्रियांचा कानातील एक दागिना.

**पखमांजर** न. घुबडाच्या जातीचा एक लहान पक्षी. (व.)

**पखर(ळ)ण, पख(खा)रडा, पखळ, पखाडा** स्त्री. पु. १.पसारा. २.अव्यवस्था; अडगळ. ३. सडा (फळे, फुले यांचा). [सं.प्रक्षरण]

**पखर(ळ)णे** उक्रि. १.विस्कळीत करणे. २. सडा टाकणे, पडणे, पसरणे; उधळणे. [सं.]

**पखवा** पु. (शिवणकाम) चोळीचे पाखे, उभार, पुढचा भाग. (कर.) [सं.पक्ष]

**पखवाज, पखाव** पु. (संगीत) एक चर्मवाद्य; मृदंग. [सं.पक्षवाद्य]

**पखवाजची–जी** वि. पखवाज वाजविणारा.

**पखशूल** पु. डाव्या बरगडीत उठणारा शूळ, तीव्र वेदना.[सं.पक्ष + शूल]

**पखाटी** स्त्री. (पाऊस, वारा यांच्यापासून संरक्षण व्हावे यासाठी खिडकीला लावण्यात येणारी).झडप. [सं.पक्ष]

**पखाल** स्त्री. १. पाणी आणण्या–नेण्यासाठी खांद्यावरून अथवा बैलाच्या पाठीवरून वाहून नेण्याची मोठी कातडी पडशी; पिशवी. २. मोट. ३. (ल.) ढेरपोट; दोंदील. [सं. पयस् + खल्ल = चामडे]

**पखालची–जी, पखाल्या** वि. १. पखाल वाहणारा. २. पखाल वाहणाऱ्या बैलाला हाकलणारा.

**पखाळ(ल)णी–णे, पखाळपूजा** पहा: **पाखळणी**

**पखाळी** वि. स्वच्छ धुतलेले : 'पखाळी होथि डोळे' – ज्ञा ६.२६५. [सं.प्रक्षालिता]

**प(पं)खी, पंखिल, पंखरू** स्त्री. पक्षी; पाखरू : 'पखियां मधें मयोरु।' - ख्रिपु १.१.१२४. [सं.पक्षी]

**पखें** पु. केस विंचरण्याची एक पद्धती; बाजूस झुपके काढणे. [सं.पक्ष]

**पखो** वि. परका.

**पखोट** न. खांदा व बाहू यांचा भाग; दंडाचा भाग. (अहि.)

**पखोटी** स्त्री. अंडे देण्यास योग्य झालेली कोंबडी. (अहि.)

**पखोल्डी** स्त्री. मुलगी. (अहि.)

**पग** न. १. पाय. २. पाऊल; पावलाची खूण. ३. (ल.) पाया; मूलाधार; मूलतत्त्व (शास्त्र, कला इ. चे). ४. बुद्धिबळाच्या किंवा सोंगट्यांच्या पटातील घर; चौकट; मोहऱ्याच्या गतीत येणारी घरांची सर्व ओळ. ५. (सोनारी) शेगडीतील विस्तवाच्या ठेवल्या जाणाऱ्या चार विटा किंवा त्यातील प्रत्येकी. [हिं.; सं.पद] (वा.) **० लावणे** – घोड्यास चाल शिकवणे. **पगी धरणे** – बोलण्यात, शब्दांत पकडणे.

**पग** पु. बाजू; कड; पक्ष. (कर.) [सं.पक्ष]

**पगडडाव** पु. सोंगट्यांचा एक खेळ.

**पगडबंद–ध** पु. पागोटी बांधण्याचा धंदा करणारा माणूस.

**पगडबंदकी** स्त्री. पगडबंदाचा धंदा; त्यावर उपजीविका करणे.

**पगडबंदी** स्त्री. १. पगडबंदकी. २. पागोटे बांधण्याची मजुरी.

**पगड** स्त्री. व्यावसायिक जात : 'सात सांवा मिळौनि । पंचवीस पगडयाती ।' – उह २१६३. [म. पगड + सं. जाति]

**पगडा** पु. १. फाशावरील एक चिन्ह, संख्या, टिंब. काही विवक्षित दान पडले असता एक नरद पटावर बसविण्याचा हक्क. २. (ल.) पाऊल; प्रवेश; शिरकाव. ३. पायंडा; प्रघात. ४. प्रावीण्य. ५. वर्चस्व; सत्ता; दाब; छाप; प्रभाव. [सं.पक्ष + कट; पद]

**पगडी** स्त्री. १. पागोटे; शिरोभूषण. २. लहान पागोटे; विशेषत: लहानांसाठी पागोट्याप्रमाणे शिवलेली, टोपी. [सं.पक्ष + पट; हिं.] (वा.) **० उतरणे** – अपमान करणे. **० घेणे** – विद्यादी गुणांनी एखाद्याहून वरचढ होणे. **० फिरविणे** – १. करार, वचन, शब्द न पाळणे; मन, मत बदलणे; अयोग्य मार्गाकडे वळणे. २. रागाने एखाद्याच्या अंगावर येणे; सामोपचार सोडून विरोध करणे. **० फेकणे** – झोकाने पागोटे चढविणे. **० फेकून जाणे**–१. पहा : **० फिरविणे** २. फेरपगडी करणे. **० बांधणे** – सन्मान करणे.

**पगडीभाई** वि. एकमेकांची पगडी एकमेकांनी घालून झालेले (मित्र) : 'हिंदुस्थानातील स्वधर्म कीं, पगडीभाई झाल्यावर पोटचे द्यावें पण पाठचे देऊं नये, त्यास रक्षावे' – भाब ५.

**पगदस्त–स्ती** वि. १. (बुद्धिबळाचा खेळ) एकदा एका घरात दिलेले बुद्धिबळ पुन्हा मागे न घेता खेळणे. (ल.) अढळ; अचल; न बदलणारा (निश्चय, वचन, माणूस). २. सावध; दूरदर्शी; सहजासहजी न फसणारा; न अडकणारा; दुसऱ्याला बोलण्यात पकडणारा.

**पगदस्ती** स्त्री. रीती; पद्धती.

**पगदंडी** स्त्री. पाऊलवाट. [हिं. पगडंडी]

**पगबदला** पु. एकमेकांची पगडी एकमेकांनी घालून झालेला भाईचारा, स्नेह.

**पगभेदी** पु. अडकित्ता. [सं. पूगी+भेद]

**पगर** पहा: **प्रदर**

**पगर** मळणीवरील भुसाची कणसे. (व.)

**पगरा** पु. जुन्या काळातील महार लोकांच्या कानातील एक दागिना.

**पगाना** पु. (विणकाम) वशारनास जोडण्याकरिता राखून ठेवली जाणारी व आसावर गुंडाळली जाणारी तार. [हिं. पगा= दोर]

**पगार** पु. (नाविक) एक प्रकारची होडी. ही कमी हलते, तसेच हिला उलांडीची जरूर नसते.

**पगार** वि. दुष्ट. – लोसाको. (व.)

**पगार** पु. वेतन; नोकरीबद्दल पैशांच्या रूपात मिळणारा मोबदला. (गो.) [पोर्तु. पागा= वेतन]

**पगारपत्रक** न. वेतनपत्रक; ज्यावर लिहिल्याप्रमाणे पगार देऊन सही घेण्यात येते अशी वही.

**प(पं)गिस्त–त** वि. १. लंगडा; पाय तुटलेला. २. (ल.) पराधीन; ओशाळा; ताबेदार; परतंत्र : 'रसनापंगिस्त नाहीं होणें। आहारू सेवणें निजबोधें।' – एभा ८.२८.

**पगी** पु. वि. जंगली श्वापदांच्या पावलांच्या खुणांवरून त्यांचा मार्ग काढणारा.

**पग्या–घा** पु. स्त्री. (सोनारी) सोन्याची लगड पाडण्यासाठी जिच्यात सोन्याचा रस ओततात ती जाड, लांबट पन्हाळ व तितकाच मागे दांडा असलेली एक लोखंडी पळी; साचा; मूस.

**पघा** पु. पहा : **पग्या** [सं. प्र + गल्]

**पघळ** वि. १. ऐसपैस; भरपूर; अवाढव्य; अघळपघळ : 'आकाश जेणें पघळ।' – सिसं १.२२. २. (ल.) विस्तृत; पाल्हाळीक (भाषण). क्रिवि. ऐसपैस; मोकळेपणाने.

**पघळणी** स्त्री. पघळण्याची क्रिया; विरघळणे; वितळणे.

**पघळणे** अक्रि. १. विरघळणे; पाघळणे; पातळ, द्रव होणे; वितळणे. २. (ल.) दयार्द्र होणे; कळवळा येणे; द्रवणे. ३. विस्तृत, मोठा, सैल होणे; पसरणे; वाढणे (घट्ट जोडा) : 'तयाही तळीं पघळे । वेल पालवु।' – ज्ञा १५.१४५. [सं.प्रगल्भ]

**पघळणे** उक्रि. (धान्य, चिरगूट इ.) जमिनीवर पसरणे; ऐसपैस मांडणे. (राजा.) [सं.प्रगलनम्]

**पचक** न. १. कुड्याच्या मुळांचे एक औषध.(गो.) २. दारूचा एक प्रकार. [सं.पाचक]

**पचकणे** अक्रि. १. तुटणे. २. फसणे. ३. समाधान नसणे. ४. मरणे. [सं. अप + चक्]

**पचकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. थुंकताना, दोरी तोडताना, झुडूप खुडताना, चिखलातून चालताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]

**पचकरणे** सक्रि. धरणे; (विशेषत: साखरेची वगैरे) बुचकुली भरणे.

**पचकवणी, पंचकपाणी** स्त्री. फार पाणी घातल्याने बेचव लागणारी कढी, सार, आमटी इ.

**पचकळ** वि. १. नि:सत्त्व; बेचव; ढप्पळ. २. (ल.) हलके; ताळतंत्र

नसलेले; असभ्य; मूर्खपणाचे (भाषण, कृत्य, माणूस.). [सं.पच्]

**पचका** पु. विचका.

**पचकी** स्त्री. दमडीच्या किमतीचे एक तांब्याचे नाणे.

**पचकाॅ** वि. नि:सत्त्व; बेचव.(गो.)

**पचडे–डी** न. स्त्री. हिरवी मेथी, दही व चणाडाळ यांची कोशिंबीर. (बे.)

**पचणी** स्त्री. जिरणी; पचणे; मानवणे; पोटाला, कोठ्याला सोसणे (औषध, अन्न इ.). [सं.पच्] (वा.) **पचणीस पडणे** – असाध्य रोगाने खितपत पडणे.

**पचणे** अक्रि. १. खाल्लेल्या अन्नाचे जठराग्नीच्या साहाय्याने शरीरपोषणासाठी आवश्यक द्रव्यात रूपांतर होणे. २. कोणतेही निंद्य कृत्य, पाप उघडकीला न येता, ते करणाऱ्याला त्यातून मिळालेल्या धनाचा निर्वेध उपभोग घेता येणे. ३. एखादा विषय पूर्णपणे समजणे. ४. भाकरी, पोळी नीट भाजली जाणे; शिजणे. ५. (ल.) एखाद्या दुखण्यात फार दिवस खितपत पडणे, रखडणे. ६. उकडून निघणे : 'सर्वनिरइं सर्वदा : पचितां नव्हीजे सुधा' – ऋव ३२८. [सं.पच्]

**पचन** न. १. जिरणी; परिपाक. पहा : **पचणे**. २. शिजणे; पिकणे; परिपक्व होणे.३. स्वत:साठी अन्न शिजवणे : 'मी अखंड सेवी पचन'– मूप्र ६८. [सं.] (वा.) **पचनी पडणे** – १. मानवणे; त्रास न होता पोटात जिरणे. २. आत्मसात होणे; लाभणे; मान्य होणे; पटणे.

**पचपच** स्त्री. चिखलातून चालताना होणारा आवाज.
पु. १. अर्थशून्य भाषण. (गो.) २. फजिती. [ध्व.]

**पचपचीत** वि. १. पाणचट; बेचव; कवकवीत (फळे,भाजी). २. (ल.) मळमळीत; फिक्का; निर्जीव; पुळपुळीत; नीरस; भेदरट (भाषण, गाणे); कमकुवत; मेणचट; उत्साहशून्य (काम).

**पचमणे** अक्रि. थांबणे; मोडणे; व्यर्थ होणे; ठार होणे; पालथा पडणे (धंदा). (को.)

**पचर** न. आंबट आंबा. (गो.)

**पचरट** वि. १. घाणेरडा; वाईट वासाचा (विशेषत: मूत्र). २. पचकळ.

**पच(चु)रणे** अक्रि. शरीरावरील नायटा, व्रण इ. पसरणे, चरणे. [सं. प्र+चर्]

**पचवना** सक्रि. लुबाडणे; चोरणे. (झाडी) [सं.पचन]

**पचविणे** सक्रि. १. जिरविणे; पचन करणे. २. शिजविणे : 'पचवूनि घाली मज आतां ।' – शिली १४.१२९. [सं.पच्=शिजविणे]

**पचंग–गी** न. स्त्री. १. पासोडी; कांबळे इ. वस्त्र मानेपासून कमरेपर्यंत पोट, पाठ झाकेल असे गुंडाळून गळ्यामागे गाठ देण्याचा प्रकार. (क्रि. घालणे, बांधणे.) २. धोतराची कास. (क्रि. कसणे, घालणे.) (वा.) **० बांधणे**– कार्याला सिद्ध, सज्ज होणे : 'ऐकोनी संज्ञा भाऊनीं । पचंग बांधिला म्हातारपणीं ।' – अफला ४.१७.

**पचंबा** पु. १. एखाद्या प्रसिद्ध शाहिराच्या समाधीपाशी दर श्रावणी सोमवारी जमून शाहिरी लोकांकडून दिली जाणारी गाण्याची हजेरी. २. (ल.) फजिती; हुर्यो; टर. (कर; वाई)

**पचाचा, पचापच** क्रिवि. पचपच होणाऱ्या आवाजाप्रमाणे.[ध्व.पच]

**पचाण** न. जोगली; मातीचा परळ. (बे.) [क.]

**पचापच** क्रिवि. बेदरकारपणे; उपहासाने; निर्दयपणे. (गो.)

**पचाल–ळ** वि. पागल. पहा : **पचकळ** [सं.अप +चल्]

**पचाळी** स्त्री. फजिती; पच्ची. (व.) [सं.अपचय]

**पचांग** न. पहा : **पचंग–गी**

**पचांगी** स्त्री. बोचके. (कु.)

**पचिजणे** क्रि. पडणे; लोळणे.

**पचिमान** वि. अंतर्धान; गुप्त. (झाडी) [सं.पच्]

**पची** पु. पाच किंवा सात दगड किंवा गोट्यांचा लहान मुलांचा एक खेळ. [सं.पंचिका]

**पचुली** स्त्री. लहान मुलाचे धोतर. (झाडी)

**पचूतरी, पचूत्री** स्त्री. १. पाच नगांचा समुच्चय. २. तेंदूची पाने वा कडब्याच्या पेंढ्या – शंभरावर दिले जाणारे पाचाचे माप. (अहि.)

**पचे ढाँग, पच्याल** अजागळ माणूस. (कु.)

**पच्ची** स्त्री. फजिती; दुर्दशा; हुर्यो; हुर्रेवडी; टर; पाणउतारा; उपहास; दडपून पूर्णपणे आपल्या कह्यात आणणे. (क्रि. करणे, उडविणे.) [सं. अपश्री=सौंदर्यनाश]

**पच्ची** स्त्री. रेशीम न दिसेल असे गुंडाळलेले जरतार.
क्रिवि. घट्ट; गच्च; सुरक्षित; पक्केपणाने. (क्रि. बांधणे, जोडणे, जुळविणे.)[सं.पच्चीगर] (वा.) **० करणे** – आपले पूर्ण वर्चस्व किंवा कौशल्य दाखवून एखाद्याला मारणे, जिंकणे अथवा एखादे काम उरकणे, पुरे करणे.

**पच्चीकाम–कारी** न. स्त्री. जडाव काम; बुरुजी काम (बडोदे); सोन्याचे किंवा चांदीचे बंद अगर खुले, घाटात नखवजा तीळ घालून रत्न बसविण्याचे काम.

**पच्चीगर, पंचीगर** पु. जडाव काम करणारा सोनार.

**पछाडणी** स्त्री. १. (मल्लविद्या) चीतपट; हापटणी. २.(वाद इ. मध्ये) पराभव; कुंठित करणे. ३. धरणे; झपाटणी (भूत इ. ची). [सं.प्रच्छाद्]

**पछाडणे** उक्रि. १. (मल्लविद्या) खाली पाडणे; चीतपट करणे; जमिनीवर आदळणे; आपटणे. २. (ल.) वादविवादात जिंकणे; पराभूत करणे; कुंठित; निरुत्तर करणे. ३. भाषणात किंवा वर्तनात पकडणे; धरणे. ४. तापाने; भुताने, त्रासाने, दैवाने झपाटणे, गाठणे, पिच्छा पुरविणे; जेरीस आणणे; (बहुश:) धरणे; पकडणे. ५. छापा घालणे; हल्ला करणे. ६.(सतरंजी, जाजम इ.) बसायला टाकणे. (खा.) [सं.प्रच्छर्दनम्]

**पछान** स्त्री. ओळख; परिचय. [हिं.पहेचान]

**पछिना** पु. घाम. (व.) [हिं.पसीना]

**पजा(झ)वा** न. विटांची भट्टी. (व.) [सं.पच्]

**पट** पु. स्त्री. १. बुद्धिबळ किंवा सोंगट्या खेळण्याचे, घरे पाडून तयार केलेले एक वस्त्र, पुठ्ठा. २. नावाचे पत्रक, यादी; फेरिस्त; विशेष गोष्टींच्या नोंदणीचे लिखाण; नियम किंवा चालीरीतींची यादी, लेख, तक्ता, कोठा ३. संक्रांतिपट (सूर्य कोणत्या राशीला केव्हा जाणार इ. लिहिलेला पट), ग्रहण पट (ग्रहणाविषयी माहिती असणारा पट), लग्नपट, मुहूर्तपट इ. अनेक कागद एकाखाली एक चिकटवून ज्यावर नाना प्रकारची चित्रे काढलेली असतात अशी गुंडाळी. ४. कापड; वस्त्र. ५. जमिनीची

अतिशय मोठी वरंघळ; उतरण. ६.पडदा. ७. बैलगाड्यांची शर्यत; शंकरपट. (व.)(क्रि.खेदणे) (व.) ८. पाट; फळी. ९.राजाची गादी; सिंहासन : 'तो निजसुखाचें साम्राज्यपटीं । बैसे उठाउठीं तत्काळ ।' - एभा १४.१०४. १०. गावचे जमाबंदी किंवा शेतसारा यांचे पत्रक. ११. उत्कृष्टता; श्रेष्ठता : 'तो पटाचा गणु केला ।' - उह ५०. १२. स्थान; ठिकाण : 'लाऊनि बैसवी पटीं । मोक्षश्रियेच्या ।' - ज्ञा ९.४६. १३. (ल.) चऱ्हाट. (गो.)

न. दोन-तीन फळ्यांच्या, घडी घालता येण्यासारख्या झडपांच्या फळ्यांपैकी एक फळी, भाग. [सं.पट्ट]

**पट** पु. द्वार; दार; दरवाजा; कबाड.

**पट** पु.१. कमरेपासून गुडघ्यापर्यंतच्या भागावर केलेला मार. २.पाय; पवित्रा.

**पट** वि. तोंड खाली असलेले; पालथे (पैसा, कवडी). (वा.) ० **काढणे** – प्रतिस्पर्ध्याचा पाय ओढून त्यास उताणा पाडणे. ० **घुसणे** – मांड्यांत घुसणे. ० **होणे** – पराभूत होणे.

**पट** स्त्री. संख्यावाचक शब्दाला हा शब्द जोडला असता त्या संख्येची तितकी आवृत्ती दर्शविली जाते.

अ. संख्यावाचक शब्दापुढे हा प्रत्यय लागल्यास त्याची विशेषणे किंवा क्रियाविशेषणे होतात. जसे : – दुप्पट, पाचपट, दसपट इ.[सं.प्रति]

**पट** पु. संयुक्त किंवा एकत्रित असलेला समूह.

**पट(टा)ई** स्त्री.पाटणी; कडीपाट; तक्तपोशी; घराचा मजला चढवताना जमीन तयार करण्यासाठी तुळयांवर एकीला एक लावून घालण्याच्या फळ्या किंवा त्यांची जोडणी. [सं.पट]

**पटकणे** सक्रि. जोराने आपटणे; आदळणे; खाली टाकणे; मारणे; फेकणे; पाडणे. [सं.प्र+ टक्]

**पटकथा** स्त्री. चित्रपट, दूरदर्शनवरील मालिका, जाहिराती यांसारख्या दृक्श्राव्य माध्यमांसाठी लिहिलेली गोष्ट.

**पटकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. १. वस्तूवरून खाली पडली असता होणाऱ्या पट या आवाजासारखा आवाज होऊन. २.अतिशय थोड्या काळात; चटकन; त्वरेने; झटकन; ताडदिशी; झटपट. [ध्व.पट]

**पटका** पु. १.डोक्याला बांधण्याचा ८ ते १५ हात लांबीचा फेटा. २. वीतभर रुंदीचे व चार-पाच हात लांबीचे कमरेला बांधण्याचे कापड; काचा; कमरपट्टा. ३.कमरबंद. (तंजा.) [सं.पट्ट-क]

**पटका** पु. पहा : १. **पटकी** २,३. मोठा नाश; गळती (साथीने माणसे व गुरे यांची, वादळाने फळांची इ.). (क्रि. लागणे.)

**पटकारी चित्रकला** विशिष्ट प्रकारच्या कापडावर चित्रे काढण्याची ओरिसातील कला.

**पटकाल** वि. फटकळ; वाईट; शोचनीय; निषेधार्ह.

**पटकावणी** स्त्री. पकडणी; झडपणी; मटकावणी.

**पटकाविणे** सक्रि.१.चटकन धरणे; वेगाने एखाद्याच्या अंगावर तुटून पडणे, झडप घालणे; झपाट्यात पकडणे; युक्तीने धरणे (पळण्याच्या बेतात असलेल्या माणसाला, दुर्मीळ व मौल्यवान पदार्थाला); एकाएकी पकडणे; धरणे; मटकावणे; झटदिशी ताब्यात घेणे. २. खाऊन टाकणे. (व.) ३. साधारणत: लवकर व अनायासे एखादी वस्तू मिळवणे. ४. (ल.) गिळंकृत करणे; खाणे (पैसा इ.). [क. पट्ट = धरणे; सं.प्रति + क्रम्]

**पटकी** स्त्री. १. साथीचा रोग. विशेषत: महामारी; मरी; वाखा; जरीमरी; कॉलरा. २. मोठ्या प्रमाणात (माणसे, जनावरे) मरणे. ३. लागोपाठ; एकामागून एक फळे किंवा घरे पडणे. (क्रि. लागणे, येणे, होणे.)

**पटकी** स्त्री. आपटण्याची क्रिया.[ध्व.पट] (वा.) ० **खाणे** – १. मोठा तडाखा बसणे; चांगली अद्दल घडणे (एखाद्या मूर्खपणाच्या कृत्याने). २. अपथ्यामुळे मोठे दुखणे होणे. ० **दाखविणे, देणे, बोलावणे, लावणे** –१. धोका देणे; फसविणे; हुलकाविणे. २. नाश होणे.

**पटकील** पु. पाटील; ग्रामाधिकारी : 'पटकील राजानक' – आगाशी शिलालेख १.१३.

**पटकुडॉ** पु. पापुद्रा. (गो.)

**पटकुळ** न. रेशीमकाठी वस्त्र : 'वरवे (दी) पटकुळादिकें वस्त्रें'- पंचो ३०.२६.

**पटकू(क)र-कुरे-कूळ** न. १. (निंदार्थी) एकेरी पन्ह्याची घोंगडी किंवा वस्त्र. २. जुनापाना, विरलेला, फाटका वस्त्राचा तुकडा.

**पटकूळ** स्त्री. एक रानटी फुलझाड; बकाळी.

**पटकोडगा** वि. १. पक्का निलाजरा, निगरगट्ट. २. आडवा केल्यावर चटकन आपोआप उठून बसणारा (बाहुला).

**पटखळणी, पटखैणी** स्त्री. धातूचा रस ओतण्याचे सोनाराचे खोबणीसारखे एक साधन. (गो.)

**पटखळणे** सक्रि. आच्छादणे; पांघरूण घालणे : 'सरजाळीं पटखळिला' – मधउ ६. [सं.पट+खल्]

**पटचीर** न. पताका; ध्वज : 'टके पटचिरे । तळपती रुचिरे ।'- आसु १३.

**पटणी** स्त्री. सरकारचा कर; धारा; फाळा: 'त्यावर सरकार पटणीची जबाबदारी असल्यामुळे त्याची स्थिती फार खराब झाली आहे.' – के १५.७.१९३८.

**पटणी** स्त्री. जाड तांदूळ.

**पटणी, पटवणी** स्त्री. १. पटविण्याची, ओवण्याची क्रिया. २. पटविण्याची, मान्यता मिळवण्याची क्रिया : 'कुस्तींत पटणी पटबाजी ।' – होला १४३.

**पटणे** अक्रि. १. स्वीकारले किंवा मानले जाणे; मान्य होणे (हुंडी). २. चालणे; निर्दोष म्हणून स्वीकृत होणे ( रुपये इ.). ३. जुळणे; मनास येणे; पसंत पडणे (नोकर, विक्रीची वस्तू). ४. खरी ठरणे; घडून येणे; अनुभवाला येणे (वार्ता, बातमी, अटकळ, भविष्य इ.). ५. खऱ्या गोष्टींशी जुळणे; मेळ बसणे (पुरावा, साक्ष यांचा). ६. चांगली विक्री होणे. ७. चांगले होणे; उत्तम प्रकारे किंवा मनाजोगे होणे. ८. (सामा.) मान्य, कबूल होणे. [सं.पट्; हिं. पटना]

**पटणे** अक्रि. गाठविले जाणे; ओवून घट्ट बसणे (रत्ने, मणी इ. तार किंवा दोरा यात). [सं.पट्]

**पटदीपिकी** (संगीत) संगीतातील एक राग. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.

**पटपट** स्त्री. घाबरणे; भीती वाटणे. (व.)

**पटपट-पटां** क्रिवि. १. एकामागून एक होणाऱ्या त्वरेच्या पटपट या

शब्दाचे अनुकरण होऊन; पाण्याचे ठिपके किंवा हलक्या आणि कठीण वस्तू पडताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. २. झंटझट; चटपट; तडकाफडकी.

**पटबंधन** न. अधिकाराची वस्त्रे सोपवणे, देणे : 'संभाजीलाही पटबंधन झाले' -मागोवा ९१.

**पटमंजिरी** पु. (संगीत) एक राग; गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.

**पटरपटर** स्त्री. विनाकारण बडबड. [हिं.]

**पटरी** स्त्री. पुतळ्या, रुद्राक्ष इ. सोन्याच्या तारेत किंवा रेशमी दोऱ्यात इकडचे तिकडे न होईल असे गाठी देऊन घट्ट ओवणे; विणणे.

**पटरीवाला** पु. (रेल्वे.) कामगारगटाचा मुख्य.

**पटल** न. आच्छादन; आवरण. [सं.]

**पटला** वि. श्रेष्ठ.

**पटलावर ठेवणे** (वि. मं.) चर्चेसाठी मांडणे.

**पटव(वि)णे** सक्रि. स्वीकारणे; मान्य करणे (पत्र, लेख, हुंडी इ.). [सं. प्रत्ययम्]

**पटवर्धन** पु. १. एक आडनाव; पटवारी, कुलकर्णी यांसारख्या हुद्द्यावरून हे पडले. २. जकात वसूल करणारा अधिकारी. (पट=कर) पहा : **पटवारी** वि. गुह्य, पाय व तोंड हे भाग पांढऱ्या रंगाचे असलेला (घोडा). [सं. पट्टवर्धन]

**पटवंती** स्त्री. पट्टराणी : 'सोळा सहस्र तीया । आणीक आठ पटवंतीया ।'- श्रीकृच १६.३६.

**पटवा, पटवाडी** पु. तलाठी; पटवारी. (झाडी)

**पटवा, पटवेकरी–कर–मार** पु. पुरणी केलेल्या किंवा जडितकाम असलेल्या नगाला पट्टी, गोफ, गोंडे लावून तयार करणारा; दागिने पटविण्याचे काम करणारा कारागीर. [सं. पट्टिकाकार]

**पटवा दोर** भाताचा मुडा इ. बांधण्याचे केळीचे सोपट. [हिं.]

**पटवारी** पु. गावकुळकर्णी; पांड्या; तलाठी: 'पाटील म्हणे रे ठोका ठोका । पटवारी वदे अनुमान कां।' – दावि ३०९. [सं. पट्ट + वाल]

**पटविणे** सक्रि. पुतळ्या, रुद्राक्ष, मोती, मणी इ. सोन्याच्या तारेत किंवा रेशमी दोऱ्यात न सरकतील असे गाठी देऊन घट्ट ओवणे. [सं.पट्]

**पटवे** न. रेशमी वस्त्र.

**पटसाळा** पहा : **पडशाळा**

**पटह** पु. पडघमसारखे एक जुने वाद्य; नगारा : 'निशान पटहो भेरी।' - शिव १०२७. [सं.]

**पटा, पटाईत, पटाधिकार–री** पहा : **पट्टा**

**पटाईत** पु. मांडलिक असा सरदार किंवा संस्थानिक.

**पटाईत** वि. १. पट्टा (हत्यार) चालविण्यात तरबेज किंवा त्याचा व्यायाम घेणारा. २. (ल.) निष्णात; निपुण; कुशल; वस्ताद. ३. अंगावर पट्टे असलेला, ढाण्या (वाघ).

**पटाटा** क्रिवि. पटापट; पटपट, अधिक जोराने किंवा त्वरेने. [ध्व.]

**पटाड** स्त्री. पहा : **पठाड**

**पटाडबंद** पु. व्यापारी. (व.)

**पटाडसिंगी** वि. मोठ्या शिंगांची (गाय, म्हैस इ.). (व.)

**पटाडा** वि. १. सखल व पसरट; चपटा व जाड; आखूड व घट्ट. २. मोठी; फताडी.(व.) ३. दूरदूर अंतर ठेवून विणलेली (खाट). [हिं.पटडा=फळा]

**पटाडा** पु. पटापटा पडण्याची क्रिया; पटका; गळती; नाश.

**पटाड्या** वि. पट्टे असणारा; जाड रेघांचा.(व.)

**पटाधिकार** पु. वंशपरंपरागत, शिष्यपरंपरागत मिळणारा वारसाहक्क; स्वामित्व. [सं.]

**पटापटी** न. ज्यावर पट्टे काढलेले आहेत असे कापड.

**पटारू** न. झूल; रेशमी वस्त्र. – लोसाको.

**पटालंबर** स्त्री. सैन्याची तुकडी; सैन्यविभाग : 'हामेशा इंग्रजी एक पटालंबर रानांत होतीच.'– मइसा १०.३५१. [इं. बटालियन]

**पटावळी** स्त्री. वंशावळ; वंशवृक्ष : 'गुजरातेतील व मारवाडांतील वाण्यांची पटावळी पाहिली तर तींत क्षत्रिय पुष्कळ आहेत असे आढळते.' - सुदेइ पृ. ३२. [सं. पट+आवली]

**पटाशी–सी** स्त्री. (सुतारी) रुंद पातीचे किंकरे; चौरशी.

**पटांगण** न. मोकळे व विस्तृत मैदान.

**पटि(ट)की** स्त्री. लहान सुंगटांचा थवा. (गो.)

**पटिसाळ–ळा** पहा : **पडशाळा**

**पठिंग** पु. खेकडा. (गो.)

**पठिंग** न. जाड, निबरट, डोंगरी गवत.

**पटिंगा** पु. जहाज; पगार. [फा.]

**पटी** स्त्री. एकामागून एक मारलेल्या उड्या.

**पटी** स्त्री. १. वस्त्र. २.चोपडी. (कु.) ३.पोथी. (गो.) ४. खिडक्यांना तावदाने बसविण्याचे लुकण.

**पटु** वि. हुशार; तरबेज; निष्णात; कुशल; तल्लख. [सं.]

**पटु** पु. भरड लोकरीचा कपडा; (इं.) ब्लँकेट.

**पटुत्व** न. चातुर्य; कौशल्य.

**पटुलक** न. खड्ग. -प्रश १७.

**पटूकर** पु. सौंदर्यप्रसाधने, सुया, मणी, सूत इ. विकणारा व्यापारी. (अहि.)

**पटे(ट्टे)करी** पु. पट्टा (तरवार) खेळणारा; बाळगणारा.

**पटेल** पु. पहा : **पाटील** [गु.]

**पटेक्षण** न. रोगाची शंका आल्यास तातडीने केलेली वरवरची तपासणी. (इं.) स्क्रिनिंग.

**पट्ट** पु. १.रेशमी वस्त्र; सुंदर रंगीत कापड. २. पाट. ३. (ल.) गादी; सिंहासन. पहा: **पट** ९: 'समर्थे स्वस्थानीं महंतासी पट्ट नाहीं दिधलें।' - सप्र १२.३६. ४. मुकुट. [सं.]
वि. श्रेष्ठ; मुख्य.

**पट्टण–न** न. शहर; राजधानी. [सं.पट्टन, पत्तन]

**पट्टण** न. (नाविक) दोन्ही रोजांना सांधणारे व दोन्ही रोजांसहित भागाचे लाकूड. हा गलबताचा पाया होय. [पट्ट=फळी]

**पट्टदेय** वि. भाड्याने देण्याजोगे.

**पट्टपूजा** स्त्री. राज्याभिषेक; अग्रपूजा: 'घरामध्यें राजा । नोहे न्हावी पट्ट पूजा ।'– तुगा २७९०.

**पट्टराणी** स्त्री. राजाबरोबर जिला राज्याभिषेक होतो ती मुख्य राणी. [सं. पट्टराज्ञी]

**पट्टवनी** वि. धूर्त. (अहि.)

**पट्टवर्धन** पु. सर्वश्रेष्ठ; सार्वभौम : 'अवघेचि मुकुट पट्टवर्धनु'- श्रीकृच २२. [सं.]

**पट्टसाहणि** पु. मुख्यमंत्री : 'सिंघणदेवाचा पट्टसाहणि' - आंबे शिला,IVI ५. [सं. पट्ट + साधनिक]

**पट्टा** पु. (कवड्या गुंफलेली) वस्त्राची माळ.

**पट्टा,पटा** पु. १. एक प्रकारची लांब, दुधारी, ५० अंगुळे लांबीची तरवार. हिला कोपऱ्यापर्यंतच्या हाताचे संरक्षण करणारी खोबळ्याची धातूची मूठ असते. २.तरवारबाजी शिकण्यासाठी किंवा खेळात वापरली जाणारी लाकडी तरवार. (क्रि. परजणे, फिरवणे इ.) ३. पट्टी; रांग; ओळ; रेघ; रेषा. ४. जमिनीची लांब पट्टी. ५. पट्टी; चिंचोळा व लांबट तुकडा (फीत, कापड, काठ, रांगोळी इ.चा); नाडी; दाल; नवार; सखलादीचा तुकडा. ६.सोने-चांदीचा किंवा साधा कमरेत घालण्याचा दागिना; तरवारीचा गळ्यात अडकवण्याचा चामडी बंद. ७. कौल; कबुलायतपत्र; लेखी पत्र (शेतीचे वगैरे खंडपत्र); गावच्या जमाबंदीचे ताळेबंदपत्रक; कराराचा कागद. ८.डोक्यावर वस्तऱ्याने काढलेला पाट. ९. शरीर, वस्त्र इ.वर काढलेले एखाद्या रंगाचे चिन्ह. १०.दोराची विशिष्ट गुंफण करून केलेले औताला बैल जोडण्याचे साधन. ११. (पगडबंद) पगडीच्या आतील पगडी घामाने खराब होऊ नये म्हणून लावलेली मेणकापडाची पट्टी. १२. (चर्मकार.) गिरणीतील चाकावरील चामडी, रुंद पट्टी. १३. (नाविक) भोयांना व काठीला बांधलेली दोरी. (हेट.) १४. अधिकार; अधिकारपत्र : 'तेवीं मी तयां। जैसे असती तैसियां। कळिकाळ नोकोनियां । घेतला पटा ।' - ज्ञा १२.८४.[सं. पट्ट; हिं. पट्टा] (वा.) ० **ओढणे, घालणे, पाडणे**- सरासरी अथवा कसेतरी करणे; ओबडधोबडपणे किंवा धसकफसक करून कामाला प्रारंभ करणे. २. (निंदार्थी)काम अर्धवट करून खोळंबत ठेवणे. ० **परजणे** - सभेत पांडित्यप्रदर्शनासाठी वादात किंवा कडक भाषणात एकसारखे व अकुंठितपणे बोलणे. ० **मारणे, देणे** - लुबाडणे; हात मारणे. **(तोंडाचा) ० सोडणे** - एकसारखी बडबड करणे. **पट्ट्याचा हात फिरविणे** - ( पट्टा पेलणे,चालविणे यावरून.) भूलथापा देणे; खोटा आविर्भाव आणणे; अवडंबर माजविणे.

**पट्टाईत-शराईत** वि. निष्णात; कुशल (चांगल्या व वाईट दोन्ही अर्थी).

**पट्टाधिकार** पु. १. दिवाण, प्रधान यांचा अधिकार, सत्ता. २. पट्ट्याचा (करारपत्राचा) अधिकार. [सं.]

**पट्टाधिकारी** पु. १. दिवाण; मुख्य प्रधान. २. महंत, मठ वगैरेच्या गादीवरील व्यक्ती. [सं.]

**पट्टाधूळ** स्त्री. १. धुळधाण; पूर्ण नाश; मोड; दुर्दशा (सैन्याची). २. संपूर्ण मोडतोड; पडझड ( इमारत, यंत्र, वस्तू यांची). ३.दुर्लौकिक; उपहास; अप्रतिष्ठा (मनुष्याची). ४. नाश; बिघाड (मसलत, मंत्र यांचा). ५. वाताहत; सत्यानाश (आयुष्य, काम यांचा).

**पट्टापट्टी** स्त्री. १. अंगावर भस्माचे पट्टे ओढण्याची क्रिया; भस्मविलेपन यावरून. २.टिळा-टोपी; चट्टीपट्टी. ३.(ल.) आडवे-उभे पट्टे; उभ्या-आडव्या पट्ट्यांनी युक्त असा प्रकार (सतरंजी इ.चा).

**पट्टाभिषिक्त** वि. ज्याला राज्याभिषेक झाला आहे असा (राजा, राणी). [सं.]

**पट्टाभिषेक** पु.(राजा किंवा राणी यांना) सिंहासनावर बसवून करायचा यथाशास्त्र राज्याभिषेक. [सं.]

**पट्टिशाळा** स्त्री. सिंहासन मंदिर 'खणिखणि दिपमाळा : विद्रुमी पट्टिशाळा'- गरा १८१. [सं. प्रतिशाला, पट्टसाला]

**पट्टी** स्त्री. १. चिंधी; चिंधोटी; चिरोटी; अरुंद व लांब तुकडा (कापड, धातू, लाकूड यांचा). २. जमिनीचा लांब, अरुंद तुकडा. ३. दोन भाग जोडणारा तुकडा; जोरपट्टी (लोखंड इ. ची); अडू. ४. सरकारने गावाकडून केलेल्या जमाबंदीची, धर्मकृत्यासाठी वगैरे जमवलेल्या वर्गणीची अथवा कर, दंड किंवा खंडणी इ. ची यादी. ५. (सामा.) कर; खंड. ६. घडी; दुमड; चुणी (पागोटे इ.ची). ७.विड्याच्या पानांची (चुना, कात, सुपारी इ. घालून केलेली) गुंडाळी. ८. गावाचा विभाग; आळी; गल्ली; पेठ. ९. (बायकी) वेणी घालताना कपाळावर दोन्ही बाजूंनी बसविलेला केशसमुदाय; केसांचा कपाळावरचा एका बाजूचा भाग. १०. वस्त्राचा बुट्टेदार काठ; पदर; किनार. ११. फुलांची माळ. पहा : **तुरा**. १२. वेदपठण करण्यासाठी किंवा भोजनाला बसलेली वैदिकांची, ब्राह्मणांची रांग. १३. शब्दाच्या चौथ्या अर्थी विनोदी, लाक्षणिक उपयोग. आवेशाने रागे भरणे, शिव्या देणे अशा अर्थी उत्तरपदी योजतात. जसे:- खडसपट्टी, खरडपट्टी, उधळपट्टी इ. १४. (सोनारी) सुमारे नऊ इंच लांब व दीड इंच जाड असा ४० ते ६० लहान-मोठी भोके असलेला लोखंडी तुकडा. धातूची तार बारीक करण्यासाठी त्यातून ओढतात. १५. खरे व उंची रेशीम. १६. जखमेवर लावण्याचा मलमासह कापडाचा तुकडा. १७. (व्यापारी) माल विकल्याबद्दल गिऱ्हाइकाला करून दिलेल्या आकड्यांची यादी. १८. रेघा ओढण्याचा, आखण्याचा लाकडी, लोखंडी, प्लॅस्टिकचा तुकडा; फूटपट्टी. १९.(बुद्धिबळ) मोहऱ्याने (विशेषत: हत्ती किंवा वजिराने) रोखलेले पग. २०. वर्गणी; फंड; फाळा; कर. २१. शेत; शेताचा लांबट तुकडा. २२. (मल्लविद्या) आपला हात जोडीदाराच्या कानावरून गालफडावर दाबून आपल्या कोपराच्या लवणीत जोडीदाराचे गाल, मान व कान धरून त्याला चीत करणे. (क्रि. देणे). २४. (संगीत) बाजाच्या पेटीचा सूर, ध्वनी.[सं.पट्ट] (वा.) ० **काढणे** - गर्व नाहीसा करणे. ० **चालणे,लागणे** - १. वर्गणी गोळा करण्याचे काम सुरू होणे. २. मार देणे. (व.) ० **देणे, भरणे** - कामावरून दूर करणे; निरोप देणे. (व.) २.टाच मारणे; पळायला लावणे; भरधाव सोडणे; चौखूर उधळणे; पिटाळणे. ० **पढविणे** - आपल्या मनाप्रमाणे दुसऱ्याने वागावे यासाठी शिकवून ठेवणे.

**पट्टी-त्ती** स्त्री. पश्चिम दिशा. (गो.)

**पट्टीचा, पट्टीतला** वि. विद्वानांच्या रांगेत बसण्यास योग्य; श्रेष्ठ; अग्रगण्य.

**पट्टीची लंगोटी** (ल.) कुणब्यावर बसवलेला सरकारी कर; जमिनीवरील सारा.

**पट्टीपछोडी–पासोडी** स्त्री. पट्टी; कर; वर्गणी.

**पट्टू** पु. एक उंची लोकरीचे कापड; तेल्याबोर रंगाचा, लोकरीचा खरबरीत धाग्यांचा कपडा. [सं. पट्ट]

**पट्टे** न. १. शालजोडी; धोतरजोडा; कांबळेजोडी इत्यादीतील एक-एक फर्द, पान. २. जोडवस्त्र; दुहेरी कापड. [सं.पट]

**पट्टेकरी–वाला** पु. गळ्यात, कमरेला पट्टा बांधणारा शिपाई; चपरासी.

**पट्टेकरी** पु. पट्टा (तरवार) खेळणारा किंवा बाळगणारा.

**पठक** वि. पढणारा. पहा : **पाठक**

**पठक परंपरा** तोंडी पठण करण्याची गुरुशिष्यपरंपरा: 'लेखनकला त्या वेळी नसतांहि आपल्या वेदांप्रमाणें तीं काव्यें पठकपरंपरेनें त्या लोकांत राहिलीं.'– नि ४०.

**पठ(ठा)डा, पठाडी, पठारा** वि. १. आखूड; ठेंगणा व मजबूत; धट्टाकट्टा; खंबीर; घटमूट. २. सपाट; पसरट; मोठ्या व रुंद पाठीचा. पहा : **फताडा** [सं.पुष्ट]

**पठडी** न. प्रघात; प्रथा; रूढी; परंपरा; मतप्रणाली; संप्रदाय.

**पठण–न** न. १. वाचन. २. पाठ म्हणणे; आवर्तन करणे.

**पठं(ठिं)गा** पु. पाठिंबा; आधार; आश्रय; पाठबळ : 'मुख्य आहे आम्हां मातेचा पठंगा । तुज पांडुरंगा कोण लेखी।' – तुगा ४०८४.
वि. पाठीराखा; मदत करणारा. [हिं.पठिंगा]

**पठाड** स्त्री. बैलाच्या पाठीवरील खोगीर आवळण्याचे साधन; पटाड.
न. रुंद व सपाट पाठ (मार देण्याच्या किंवा माराचा धाक दाखविण्याच्या वेळी म्हणतात). २. पाठ टेकण्याची जागा. [सं.पृष्ठ]

**पठाडी** वि. विस्तृत; पसरट; रुंद.

**पठाडी गोम** १. घोड्याच्या पाठीवरील केसांची गोम. हे अशुभ चिन्ह मानतात. २. (ल.) ढोबळ चूक; मोठा दोष. [सं.पृष्ठ]

**पठाण** न. १.रुंद व पसरट, जाड कौल; आढ्यावरील किंवा कुंदावरील कौल. २.रुंद पाठ. [सं.पृष्ठ]

**पठाण** पु. मुसलमानातील एक जात व तीतील एक व्यक्ती. [हिं.पठान]

**पठाण** न. गलबताच्या तळाचे चौकोनी लाकूड. पहा : **पठार**

**पठाणी** वि. अव्यवस्थित.

**पठार** न. १.डोंगरावरील सपाटी; मैदान; सडा; साधारणपणे ३००–९००मी. उंचीवरचा सपाट भूभाग. २. जहाजाचा, होडीचा तळभाग. ३. (ल.) व्यवस्था; प्रारंभ; पूर्वतयारी. (क्रि. घालणे) ४. पाठ; मागील बाजू. ५. (निंदार्थी) पाठीचा ओबडधोबड रुंद भाग, फताडी पाठ. [सं.पृष्ठ, प्रस्तर]

**पठार** स्त्री. खोगिराचा तंग; पटाड. पहा : **पठाड**

**पठारा** पु. १. तांडा; सैन्याला धान्य आणून पोचविणाऱ्या लमाण-चारणादिकांचा तांडा. २. गलबताचा एक प्रकार.

**पठाल** न. १. वखराची फास काढून तो उलटा करून त्यास बैल जुंपून ते औत जमिनीवरून फिरविणे : 'बीं पेरण्याच्या अगोदर शेतावर पठाल करतात.'– महाराष्ट्र कृषीवल ३४.८.१९३०. २. ढेकळे मोडून जमीन सपाट करण्याचे साधन.(व.)

**पठावा** पु. पाठिंबा. पहा : **पठं(ठिं)गा** (हिं.)

**पठित** वि. वाचलेले; म्हटलेले. [सं.]

**पठ्ठा, पठ्या** वि. बळकट; धट्टाकट्टा; धष्टपुष्ट; बहाद्दर; लढाऊ; पहिलवान. [सं.पृष्ठ; अर.पठ्ठा]

**पठ्ठाळॉ** पु. अनुभव; पडताळा; प्रचिती. (गो.)

**पड** न. पार; वृक्षाच्या भोवतालची दगडी बांधणावळ; ओटा; चौथरा.

**पड** पु. (बायकी) पुष्कळ कप्पे, खण असलेली पेटी, पिशवी.

**पड** पु. १. दोराचा एक पेड; अनेक पदरांचा दोर; अनेक धागे एकत्र करून पीळ घातलेले सूत. २. पिळा; पीळ. (क्रि. घालणे.) (व.)

**पड** स्त्री. १. मापी दोन शेर. (कु.) २.मापी पाऊण शेर. (गो.) [क.पडि]

**पड** पु. शिधा; अन्नसामग्री. (गो.)

**पड** स्त्री. बेकारी : 'व्यापाऱ्याचे तेजीचे आणि मजुराचे पडीचे दिवस सुरू झाले आहेत.' – गावरहाटी २५.

**पड** स्त्री. अडचण; ओढगस्ती; विपन्नावस्था.

**पड** स्त्री. १. ओझे सहन करण्याची ताकद नसल्याने किंवा कामचुकारपणाने (बैलाने) मटकन खाली बसणे. २. (ल.) नकार; नाकारणे; झिडकारणे. ३. मागे, माघार घेणे (भांडण, वादविवाद इत्यादीत); स्तब्ध, गप्प बसणे; शांत राहणे, (क्रि. खाणे, घेणे.) ४. झाडावरून आपोआप गळून पडलेले आंबे, नारळ इ. फळे. ५. पडीक किंवा बिनलागवडीची जमीन. ६.एकदम पुष्कळ माणसे आजारी पडणे. ७. (अनेक गावे वगैरे) उजाड होणे. ८. (पुष्कळ जमीन) पडीक पडणे, असणे. (क्रि. पडणे). ९.(पत्त्यांचा खेळ) अंगावर आलेला डाव, हार; नाट. (क्रि. लागणे.) १०. मेलेले जनावर : 'देशमुखांचे घरीं पड झाली असतां महारानें म्हशीचें कातडें मागूं नये.' – चसंवृ ४.५७. ११. मेलेले जनावर नेण्याचा व त्याचे चामडे घेण्याचा महाराचा हक्क. [सं.पत]

**पड** अ. हाताखालील, दुय्यम, दुसऱ्या प्रतीचा, मुख्य वस्तूच्या ऐवजी या अर्थाचा एक प्रत्यय. जसे :– चाकर–पडचाकर, जीभ–पडजीभ, कोट–पडकोट इ. [सं.प्रति]

**पडक** न. झाडावरून पडलेले पोफळ.
वि. पिकून गळलेली (सुपारी); कोवळेपणीच झाडावरून गळून पडलेले (पोफळ). (राजा.)

**पडकणे,पडकावणे** अक्रि. सवय लागणे; सोकणे; चटक, व्यसन, छंद लागणे; लालचावणे; सोकावणे; नादी लागणे; चटावणे; सवकणे; लुब्ध होणे : 'पाहतां कृष्णस्वरूपासी । ...कृष्णसुखासी पडकले ।'– एरुस्व १८.२३. [सं.प्रत्यग्र]

**पडकय** स्त्री. शेतकऱ्यांनी परस्परांना हंगामाच्या वेळी गुरे, मजूर इ. देण्याची रीत; कामाची व साधनांची देवघेव. [सं. प्रति + कृ]

**पडकर** वि. १. पडीक (जमीन). २. ओसाड (खेडे). ३. रिकामे (घर). ४. उपयोगात न आणलेली वस्तू. ५. बेकार (मनुष्य).

**पडका** वि. १. लवकर पडणारा; घोगरा (आवाज, गळा). २.मोडकी, पडीक (इमारत).

**पडके** न. गुरांच्या दाव्याची एक कानी; गुळकी. (को.)

**पडके** न. माल वाहणाऱ्या बिनतट्ट्याच्या गाडीला दोन्ही बाजूंना माल पडू नये म्हणून लावलेल्या दोन ताट्यांपैकी प्रत्येकी.

**पडकेणे** न. १. बाजारात पडून राहिलेला, शिळा, न विकला गेलेला, परत केलेला माल. २. लवकर नासणारा, वाळणारा माल.
**पडकेल** वि. कृषिसाधनांची, मजुरांची देवघेव करणारा; पडकय करणारा.
**पडकेश-स** पु.अव. डोळ्याच्या पापणीच्या खाली आतील बाजूला उगवणारे केस; डोळ्याचा एक रोग.
**पडकोट** पु. किल्ल्याच्या बाहेरचा तट.
**पडखर** पहा : **परखड**
**पड(डि)खरणे** अक्रि. ओळखणे; पारख करणे : 'आंधळेयाचा नगरीं । कवण कवणांतें पडिखरी ।' - भाए ५५४. [सं.परि+ईक्ष्]
**पडखलण** न. (बायकी) १. पायातील जोडवी निसटून जाऊ नयेत म्हणून त्यांना लागून घालावयाचे तांब्याचे वेढे. २. टोचलेल्या कानाचे भोक बुजू नये म्हणून त्यात घालण्याचे हलके तारेचे वेढे. [सं.प्रतिक्षलन]
**पडखळणे** अक्रि. १. आदळणे; एकमेकांवर पडणे : 'वीर पडखळले वीरीं । परस्परें हाणती ।'- एरुस्व ८.३८. २. उठावणी करणे : 'मिळोनि वीरांचा समुदावो । महाबाहो पडखळिला ।' - एरुस्व १०.६२. ३. आव्हान देणे : 'तेणें पडखळिला भीमधान्य ।' - उह १३६७. ४. पडताळणे : 'राएं दुसरेनि पडखळिली । तंव अशरीरी निगोनि गेली' - उह १९६. [सं.प्रति+स्खल्]
**पडखाऊ** वि. घाबरट; लगेच नमते घेणारा; दुर्बळ; भित्रा.
**पडगण** न. ताम्हन. (गो.)
**पडगहाण** न. गहाण ठेवणाऱ्याने किंवा सावकाराने आपल्याकडे गहाण ठेवलेले, दुसऱ्याकडे गहाण टाकलेले जिन्नस.
**पडगा-द्या** पु. १. लाकडी लहान काथवट, पाळे; वाडगा. २. चौघडा, संबळ वगैरेंच्या जोडीपैकी प्रत्येकी. ३. (कुंभारी धंदा) आव्यातून मडकी काढली असता साफ व गुळगुळीत करण्याचे एक साधन. [सं.प्रतिग्रह]
**पडगादी** स्त्री. गालिचा; लहान गादी.
**पडगी-घी** स्त्री. १. भांड्यांची पेंदी, बूड किंवा पेला वगैरेची बैठक. २. धातूचा रस ओतून लगड बनवण्याची मूस. ३. किनरी आवाजाचा संबळाचा भाग. ४. लाकडी पडगा; पाळे.
**पडगुली** स्त्री. लहान पडगी; लाकडाचे अगदी लहान पाळे.
**पडगे-घे** न. १. नगाऱ्याचे गंगाळ, पडगा; चौघडा, तबला, समेळ इ. सजोड चर्मवाद्यांपैकी प्रत्येक अवयव. पहा : **पडगी** ३. ३. पडाव; होडी. ४. लाकडी पडगा; पाळे.
**पडगे पाळे** (व्यापक) पडगे; काथवट; पेला.
**पडघण, पडघ(घा)णी** स्त्री. (सोनारी) धातूचा रस ओतण्याची पन्हाळी; मूस; पडघळणी. (गो.) [सं.प्रतिग्रहणी]
**पडघणी** स्त्री. ओकतीचा आडवा वासा ज्यावर ठेवतात ते लाकूड; दुबेळक्यात बसविलेले लहान लाकूड.
**पडघ(घा)म-घाव** न. एक चर्मवाद्य; सैन्यातील मोठ्या आवाजाचा नगारा; ढोल; (इं.) ड्रम.
**पडघर** न. उजाड, रिकामे, ओसाड, वस्ती करणारांनी सोडून दिलेले घर.
**पडघळणी** पहा : **पडघण**
**पडघाणी** स्त्री. कळसाची बैठक : 'उपरि सोळावा अध्यावो । तो ग्रीवेघंटेचा आवो । सप्तदशु तोचि ठावो । पडघाणिये ।' - ज्ञा १८.४०. [सं.प्रतिग्रहणी]
**पडघाणे** क्रि. आळवणे; आलापयुक्त गायन करणे : 'तेथ पडघाइलें पंचमस्वरें ।'- रुस्व ३९७. [सं.प्रतिगान]
**पडघावणे** सक्रि. १. आघात करणे. २. युद्धासाठी समोर मांडणे : 'यादवी पडघविलें असुरां ।'- उह १६७६. [सं. प्रतिघात]
**पडघीडी** स्त्री. लढाईत शिलेदारांची घोडी पडल्यास त्यांचा सरकारातून मिळणारा पैसा. -ऐको
**पडचाल्लो** वि. खटयाळ; हट्टी : 'आडचल्लो पडचाल्लो'- नाम २६३.
**पडछाया** स्त्री. १. प्रतिबिंब. २. छाया; सावली. [सं.प्रतिच्छाया]
**पडजावई** पु. जावयाचा भाऊ.(व.)
**पडजी** स्त्री. सावडं; परस्परांना सहकार्य करून काम करण्याची पद्धत. (अहि.)
**पडजीभ** स्त्री. जिभेच्या मागे असणारी दुसरी लहान जीभ; जिभेच्या मुळाशी लोंबणारी मांसाची लोळी. [सं. पतज्जिव्हा]
**पडझड** स्त्री.१. पडणे; झडणे; मोडतोड. २. पडलेले, राहिलेले सामान. ३. केरकचरा; गदळ.
**पडण** न. पतन; खाली पडणे : 'आतां तेया पडणेया आरौते । पडण चुकवावेया पुरतें'- ज्ञा ८.७०. [सं.पतन]
**पडण** न. पडाव; होडी.
**पडण** न. १.थांबण्याची; विश्रांतीची जागा; तळ; अड्डा. २. गुरांची बसण्याची किंवा रवंथ करण्याची जागा. ३. भेट, सभा इ. ची ठरावीक जागा व वेळ. ४. फळे वगैरे पाडण्याचा, उतरण्याचा, काढण्याचा हंगाम; नियमित ऋतू, काळ. ५. उतार; उतरण : 'पडणीवरून घालून घ्यावें । तो तमोगुण ।'- दास २.६.३१. [सं. पतन]
**पडण-णी** स्त्री. संकट.
**पडणी** स्त्री. १.(क.) पडणे. २. कडा. ३.(ल.) नाश पावणे; तोटा येणे (व्यापारात); (म्हातारपणात) शारीरिक ऱ्हास होणे; दुर्बळ होणे. (वा.) **पडणीस येणे** - शेत चांगले पिकणे; दाणा भरणे; दाण्याच्या भाराने कणसे वाकणे.
**पडणे** अक्रि. १. खाली येणे; गळणे; एखाद्या स्थानापासून भ्रष्ट होणे; आधार तुटून खाली येणे; वाईट अवस्थेला जाणे. २. (ल.) थांबणे; बंद होणे; पडून राहणे; सतत चाललेला धंदा, व्यवहार काही कारणामुळे बंद पडणे; रहित होणे. ३. घडणे; घडून येणे; होणे; असणे. ४. प्रवृत्त होणे; करू लागणे; सुरू करणे. ५. जोराचा हल्ला करणे; चालून जाणे. ६. उद्भवणे; घडणे; होणे; जाणवू-दिसू लागणे (थंडी, अंधार, उजेड, ऊन इ.). ७. कमी होणे; थंडावणे; शांत होणे (वारा). ८. कमी होणे; उतरणे (दर). ९. जमिनीवर अंग टाकणे; निजणे; आडवे होणे; लवंडणे; पहुडणे; (आळसाने) सुस्त पडणे. १०. रिकामा, बेकार, उजाड, पडीक, वापरात किंवा उपयोगात न आणलेला असा राहणे, असणे (मनुष्य, खेडे, घर, जमीन, रस्ता, वस्तू इ.). ११. (लढाईत) मरणे. १२. गुंतणे; उद्योगात शिरणे; संबंध ठेवणे. १३. आवश्यकता निर्माण होणे; भाग पडणे. १४. किंमत द्यावी लागणे. १५.होणे; घडणे; घडून येणे; उपस्थित

होणे. १६. ठरणे; शेवटी दिसणे; उघडकीस येणे. १७. पराभूत होणे. (वाद इ. त). १८. कोसळणे; गुदरणे; प्राप्त होणे (त्रास, दु:ख). १९. रूपांतर, स्थित्यंतर होणे. २०. उद्भवणे; उत्पन्न होणे; परिणाम होणे. २१. बुडणे; खचणे (दारिद्र्य, दुर्बळता, हलकेपणा, दुष्कीर्ती इ.त). २२. दाटणे; घोगरा होणे; हलका पडणे; बसणे (आवाज). २३.(पत्त्यांचा जुगारीचा खेळ) गमावणे; हरणे. २४.बाहेर येणे (तोंडातून); ओकणे. २५. (गणित) त्रैराशिकी गणितावरून काही एक फल फलित होणे. २७. सतत चालू असणारा व्यापार, फड इ. चालू राहणे. २८. कर्मधर्मसंयोगाने, योगायोगाने असणे. २९. दाखल, समाविष्ट होणे. उदा. शिलकीत, खात्यात पडणे. ३०. मानवणे. (कु.) ३१. (अकर्तृक) परस्पर जुळणे; जमणे; जम बसणे; योग्य असणे; पटणे. [सं.पत्]

**पडणे** सक्रि. अनुभवणे; मिळणे; घेणे. [सं.परि + क्री]

**पडत** स्त्री. (जकाती शब्द) जकात, कर यांची माफी; सूट (संख्या, परिमाण यांतून).

**पडतझडत** क्रिवि. १. सांडत-सांडत, टपकत टपकत (गवत, पाने, पाणी, वाळू इ. नेणे). २. धडपडत; कसेबसे; ठेचकाळत; मोठ्या कष्टाने.

**पडतन** न. पहा : **परतन**. २. अर्धा एकर जमीन.

**पडत(द)रणे** अक्रि. विस्तारणे: 'चराचराचेनि मिषें पडतरैलें । चिद्रूपा पडियासे ।'- भाए ७००. [सं. प्रस्तरण]

**पडत(ता)ळ** न. बाड; बिछाईत; सामानसुमान. [हिं.]

**पडत(ता)ळ** पु. उपचार; आदरसत्कार : 'आनंदु जाहाला सकळां । तेयांसी करिती पडताळा ।' - ख्रिपु. २.६.६५. [सं. प्रति +तल]

**पडता** वि. १. उरता (भाग, प्रदेश, अवयव). २. उतरता, ऱ्हासाचा (काळ), खालावलेली (स्थिती).

**पडता उभे** १. (प्रशंसार्थी) उत्पन्न होताच, जन्मताच उभे राहणारे, वावरू शकणारे गाय इ.कांचे वासरू. २. (ल.) यशस्वी उपाययोजना; श्रेयस्कर वागणूक. ३. अनुकूल प्रारब्ध.

**पडताळा** पु. १. अनुभव; प्रतीती. २. शंका दूर करण्यासाठी ताडून, अजमावून पाहणे; जोखणे; दुसऱ्याशी मिळवून, तुलना करून पाहणे; सिद्ध करण्यासाठी उलट-सुलट रीतीने परीक्षा घेणे; मेळ; प्रयोग; मोजमाप; गणणे. (क्रि. पाहणे, ताडून पाहणे.) ३. अनुवाद : 'म्हणोनि एक वेळ देवा । तोचि पडताळा घेयावा । विस्तरेल तरी सांगावा । साद्यंतुचि ।'- ज्ञा ५.१६७. [सं. प्रति + ताली]

**पडता(त)ळणे** अक्रि. १. प्रचिती घेणे; परीक्षा पाहणे; ताळा पाहणे; अजमावून पाहणे; तुलना करणे; मेळ पाहणे; रुजुवात करणे; लावून पाहणे; मोजणे; मापणे; तोलणे; वजन करणे (पुन्हा रुजुवात घेण्यासाठी); गणणे; मोजणे : 'भीष्म पडताळी विद्याभ्यास।'-मुआदि ३०.२६. २. (चालविण्याच्या हेतूने - हत्यार, शस्त्र इ.) पेलणे, पाजळणे, बाहेर काढणे, पकडणे, हातात घेणे, धरणे : 'पडताळूनि सुरी बैसली सेजारीं। यमफासा करीं घेऊनियां ।'- तुगा १.५४३. ३.सज्ज होणे; पोशाख वगैरे चढविणे, घालणे (जोडे, पागोटे, अंगरखा इ.). ४. ऐटीने धारण करणे; गुंडाळणे; लपेटणे; बांधणे. ५. परत देणे; फेडणे (शिव्या इ.). ६. चव घेऊन पाहणे : 'पडताळिती पाक पन्ही' - मधउ ४५. [सं. प्रति + तुल्]

**पडतिथ** स्त्री. पुण्यतिथी. (अहि.)

**पडती भावना** १. (पाऊस, ऊन, थंडी) पडू लागणे, येऊ लागणे; (पावसाला) सुरुवात होणे. २.आरंभाचे किंवा सुरुवातीचे चिन्ह, सूचक लक्षण.

**पडतोरा** पु. तळ्यात किंवा नदीत उतरण्यासाठी बांधलेला घाट. (तंजा.) [त.पडित्तोरै]

**पडथल** पु. ओझे वाहणारा बैल.

**पडथल** न. १. परके ठिकाण. २. एखाद्या कज्ज्याचा (प्रकरण, तंटा) निकाल करण्यासाठी नेमून दिलेले कोर्ट किंवा पंचायत.

**पडथळ** न. पिशाचांच्या उपद्रवाचा एका देवाने काही निर्णय सांगितला असता इतर गावच्या देवाला विचारून त्याचा पाहतात तो पडताळा; किंवा त्या देवाने सांगितल्याप्रमाणे पुजाऱ्याकडून घेतलेला लेख; पडताळा. [सं. प्रति+स्थळ]

**पडथाळा** पु. १. प्रसूतीनंतर लगेच बाळंतिणीला सासरहून किंवा माहेराहून येणारे सामान.(गो.) २. बाळंतविडा. (कु.)

**पडद** स्त्री. १. गुळाच्या ढेपीच्या साच्याला गूळ चिकटू नये म्हणून त्यात घातलेले फडके. २. पहा : **पडदा** ८.

**पडद** स्त्री. अरुंद भिंत. (झाडी) [सं.पट्ट; फा.पर्दा]

**पडदणी** स्त्री. १. स्नान करताना आडवे लावून घेण्याचे, नेसण्याचे (विशेषत: स्त्रियां वापरतात ते) लहान, अर्धे, जुने वस्त्र; स्त्रिया नाहण्याचे वेळी नेसतात ते अर्धे, फाटके वस्त्र : 'ये पां न्हाणुदे घेई पडदणी ।'- कथा १.१०.६२. २. अंतर्गृह. ३. पहा : **पडदा** [सं.परिधानी]

**पडद(त)पोशी** स्त्री. १. पडदा; गौप्य; छपवणूक. २. पहा : **पडदी**. एकांताचे स्थळ; विश्रांती घेण्याची, जागा; अंतर्गृह : 'पडदपोशीची आणि उन्हापासून त्रास न होईल अशा व्यवस्थेने बिछायत करविणे ।'- ऐरापुप्र ४.२२३.३. पडद्याची चाल; पडदानशीनपणा. [फा.पर्दा+पोशी]

**पडदळ** न. १. पहा : **पडत(ता)ळ**. २.पहा : **पडदळे**

**पडद(दा)ळे** न. तरवार अडकविण्याचा (गळ्यापासून कमरेपर्यंतचा)पट्टा: 'पाटो पडदाळे सिले टोप ओझें । हें तों झालें दुजें मरणमूळ ।' - तुगा ३०२१. [सं. पट+ तल]

**पडद(दा)ळ्या** वि. ओझे वाहणारा; ओझेल; कंठाळ्या (बैल, उंट, तट्टू इ.).

**पडदा** पु. १. आड लावलेले वस्त्र; भिंतीसारखे प्रतिबंधाकरिता मध्ये लावले जाणारे एखादे मोठे लांब-रुंद कापड; कापडी आवरण. २. आडोसा; आडबाजू; एकांत; निवांत जागा. ३. बुरखा; गोषा; जवनिका. ४. (ल.) गुप्तपणा; लाज; लज्जा; शरम; विनयाने मागे राहणे; मर्यादा : 'कोणतेंही एक पडलें अंतर धन्यास कळलें नाही, इतका पडदा आहे तोंच बरें, इतक्यानें माणूस मर्यादवंत असते.'- मराआ १६. ५. थर; पापुद्रा; कवच; साल; पदर (फळ, कांदा, भाकर, लाकूड इ. वरील). ६. डोळ्यावरील पडळ, पटल, सारा. ७. भाग (विभक्त) करणारा अवयव. जसे :- कानाचा, नाकाचा, डोळ्याचा पडदा. ८. भांड्यातील शिजविलेले अन्न ( भात इ.) ओतण्यासाठी अंथरलेले वस्त्र किंवा कापड;

पडद. ९. अंगरख्याचा पुढील (छातीवरील) भाग. १०. पेटी, पिशवी वगैरेचे कप्पे, भाग पाडणारे जाड कापड किंवा लाकडी फळी. ११. (बोलताना) मनात ठेवलेला, गुप्त राखलेला भाग. (क्रि. ठेवणे, राखणे.). १२. गुप्तता; छपवणूक; गोपन; आतबाहेर; दुजाभाव : 'आपल्यापाशीं पडदा स्वप्नींहि नाहीं.'- पया ३०९. १३. गाडीच्या तोंडाच्या पुढचा आडोसा. १४. अडथळा; आळा. १५. अंतर: 'आतां दुरून दुरून पडद्यानें शब्द बोलतां.'- प्रला. १६. नाटकाचा पट : 'अगोदर दहा पाच वर्षे तरी त्या कंपनीचे पडदे ओढायचे काम करावे लागते.'- नाकु ३.२५. १७. (बुरूडकाम) उन्हापासून रक्षण व्हावे म्हणून बारीक कामट्या सुतळीत विणून केलेला चिकाचा आडोसा. १८. (यंत्रशास्त्र) (रक्त, पाणी, हवा, वाफ) यांचे नियंत्रण करणारे साधन;(इं.) व्हॉल्व. १९. सतार, बीन इ. वाद्यांच्या दांडीवर स्वरांची जागा निश्चित करण्यासाठी बसविलेला पितळी अगर लाकडी बाकदार तुकडा. यावर तार दाबून स्वर काढला जातो.[फा.पर्दा; सं. पट, पटल] (वा.) ० **उघडणे** – एखादी गोष्ट उघड करणे. ० **उघडविणे** – लाज सोडणे, बाजूला सारणे. ० **पाडणे, ओढणे** – दृष्टीआड करणे; लपविणे; छपविणे. ० **सातव्या पडद्यात बसणे** – अत्यंत गुप्त अशा जागी जाऊन बसणे.

**पडदादा** पु. चुलत घराण्यातील पूर्वज.

**पडदानशीन** वि. पडद्याआड बसणारी, घरंदाज. (स्त्री). [फा.पर्दनशीन]

**पडदी** स्त्री. एक विटेची घातलेली भिंत (सामान्यत: विभाग करण्यासाठी); पडदा; कूड; मोकळी जागा विभागणारा लाकडी पडदा.[सं.प्रति + दिह]

**पडदोरा** पु. गळ्यातील माळ, हार इ.ना जोडलेला व गळ्याभोवती बांधायचा जाड दोरा.

**पडन** न. अश्विन शुद्ध नवमीस महारांच्या देवीजवळ रेड्याचा बळी देण्याचा विधी. (व.)

**पडनाव** न. टोपण नाव; व्यावहारिक नाव.

**पडनाळ** (नाविक) मागच्या खांद्याला बाहेरच्या बाजूला जोडलेली लाकडे. (को.)

**पडनी घालणे** स्वत:ला खाली लोटून देणे : 'तुमचीया आज्ञा पडनी घालिजैल: – लीचउ ५२१.

**पडप** न. कबाड; फळी : 'खिडकीचे पडप नीट लागले नव्हते.'– मातीची चूल ३६३.

**पडप** न. १.अतिशय लडिवाळपणा; कौतुक; लाड; एखाद्याचे गुण वाखाणण्याची हौस अगर आवड : 'आहे पंडुतनयकृत दिग्विजयाचे नृपा पडप यास ।'– मोवन ७.१०३. २. स्तुती; वाखाणलेले सद्गुण; चांगुलपणा. (क्रि. सांगणे, बोलणे.) ३. पक्षपात; एखाद्याविषयी त्याचे भले व्हावे असे वाटणारी अधिक तीव्र भावना. ४.ओढूनताणून आणलेली प्रतिष्ठा; उसना दिमाख, तोरा, कुर्रा; नस्ता डौल; अक्कड; उद्धटपणा. ५. नावीन्य; नवलाई; विलक्षणपणा. ६. थक्क करणारा सुरेखपणा; शोभा; शृंगार : 'अंग बोल माखूनि तपें । विकावया आपणपें । अंगहीन पडपें । जियापरी ।' – ज्ञा १७.२४६.७. भूषणाचे, भूषविणारे वस्त्र : 'पडप दे संध्यावधुसि अंगरागाचें ।' –एभा २५. ८. आवरण.

**पडप** स्त्री. बरोबरी.

**पडपण** न. भूषण; शोभा.

**पडपणे** अक्रि. १. उद्धट होणे. २. शृंगारणे; चमकणे. [सं. प्र + दृप]

**पडपदानि–नी** वि. १.भूषणे, वस्त्रे देणारा. २. शोभा देणारा.

**पडपळी** स्त्री. न्हाव्याला मिळणारे बलुत्याचे धान्य.

**पडपावणी, पडपणी** स्त्री. १. एखाद्या कुटुंबातील माणसांची वर्ष-सहा महिने हजामत करण्यासाठी, न्हाव्याला द्याव्या लागणाऱ्या मोबदल्यासंबंधी केलेला तोंडी करार, केलेली बोली. २. अशा कराराची रक्कम; धान्य इ. चा हक्क.

**पडपुसी** स्त्री. विचारपूस : 'मनुस्यें जेववीलीं: परि पडपुसी नाही'– पंचो१६७.२५.

**पडपेठ** स्त्री. संपूर्ण हकिगत; मूळ, उगम, वाढ इ. पूर्ण माहिती; कुळगोत इ. (क्रि. पाहाणे, लावणे, शोधणे, लागणे.)

**पडपोशी** वि. पडखाऊ; मिळमिळीत; दुर्बळ; भित्रा.

**पडम** न. जाड व सुती कापड (पिशवी, गोणपाट, पडश्या इ. करण्याच्या उपयोगाचे); दुहेरी-तिहेरी सुताने विणलेले अरुंद वस्त्र.

**पडमथ्या** वि. ढोंगी; कळूनही न कळल्यासारखे भासवणारा. (अहि.)

**पडमरूपणा** पु. भित्रेपणा; भ्याडपणा.

**पडमूत** न. घोडीवर स्वार बसल्यावर किंवा ती रस्त्याने चालली असता तिने केलेली लघवी.
वि. १. अशा तऱ्हेने लघवी करणारी (घोडी).२. नादान; अशक्त (घोडा). ३. दुर्बळ; अशक्त (माणूस).

**पडमूर** वि. निष्ठुर; बेमुर्वत.

**पडमोरी** वि. निलाजरे. (तंजा.)

**पडये** न. मेलेले जनावर. (कु.) पहा : **पड**

**पडलस** पु. शिवड्यासारखा पण अधिक काळा मासा.याचे तोंड वाटोळे असते. तोंडावर मिशा असतात. अंगावर खवले नसतात. छातीवर दोन बळकट पंख असतात.

**पडला झडला** वि. गळून पडलेला; सांडलेला; विसकटलेला; पसरलेला.

**पडली** स्त्री. १. फुलांची परडी; बांबूच्या वेताची लहान टोपली. २. जोगवा मागण्याची टोपली (बे.); परडी.

**पडले पान** खेड्यातील सर्वाधिकार (अगदी पडलेले पानही उचलण्याचा ज्याचा अधिकार आहे असा पाटील, कुलकर्णी).

**पडल्या–पडल्या** क्रिवि. १. लोळत असता; लोळता लोळता. २. आळसाने; धिमेपणाने (पडणे). ३. (ल.) विचार न करता (काही तरी गोष्टी सांगणे.) ४. (ल.) सहज (जिंकणे, करणे.)

**पडवण** न. (चर्मकार) जुना आसूड लांबवून देणे.

**पडवळ, पडोळ** स्त्री. पांढऱ्या भोपळ्याच्या वर्गातील एक वेल. यास २-३ हात लांबीची हिरवट-पांढरी, पट्टेदार फळे येतात.
न. १. या वेलीचे फळ; फळभाजी.२.पहा : **परवर–ल**[सं.पटोल, पटोलिका] (वा.) **हातापायाचे पडवळ होणे** – अशक्त व हाडकुळे होणे.

**पडवळाची वात** फुलातून फळ होण्यास सुरुवात झाल्याबरोबर बारीक लांब दिसणारे फळ. (को.)

**पड(ढ)वळकाठी** स्त्री. छत्रकाठी : 'स्याहाणौ कोडी तेजियां। पुढां डौलतांती पडवळकाठियां ।'- शिव १०३४.[सं.पटोल = वस्त्रप्रकार]

**पडवा** पु. एक प्रकारचे सुकलेले फळ. हे औषधोपयोगी असते.

**पडवा-वे** पु.न. अनायासे झालेला लाभ : 'जावोनि गोवर्धना तळीं। पर्वत उचलिला समूळी । पडवा जाहला तयेवेळीं। गाई गौळी सुखी केले।' - कथा ४.५.१५४. [क.पडु = प्राप्त होणे]

**पडवा** पु. १. रेशमी वस्त्र : 'आतां रायाची दांडी पडवा एइल'- लीचउ ६४९. २. पलंगाची नवार : 'पडवा विणिला केतकीदळीं'-रुस्व ४५६. [सं. पट]

**पडवी** स्त्री. खांबाचा तळखडा. -शर.

**पडवी** स्त्री. १. घराची मागील बाजूची अरुंद ओसरी; ओवरी. २. घराला लागून काढलेली जागा; भिंतीला लागून बांधलेली, वर छप्पर असलेली जागा; एकपाखी इमारत; आडोसा. ३. डोक्यावर घेतलेल्या ओझ्यावर आच्छादन घालण्यासाठी इरल्याला जोडलेली चुंबळ. [सं. पटकुटि]

**पडवे** न. देवडी; द्वारमंडप; ढेलज. (को.)

**पडशाळा-ला** स्त्री. १. घरापासून जवळच बांधलेले छोटेखानी घर; ओवरी. २. उतारूंसाठी बांधलेली मंदिराजवळील धर्मशाळा : 'मठ मंडपा धर्मशाळा । देवद्वारीं पडशाळा ।' - दास ४.५.२३. ३. पाठशाळा.

**पडशी** स्त्री. दुमोट करण्याच्या सोर्यांमध्ये तोंड ठेवून केलेले पडम इ.चे पोते; दोन्ही बाजूंना दोन तोंडे असून, मध्ये जोडलेली, घडी करण्यासारखी मोठी पिशवी; कंठाळ. [क. पसुबे = पडशी]

**पडशे** न. पत्रे जोडून केलेली लोखंडी कढई.

**पडसर-री** स्त्री. पाऊसकाळ.

**पडस(सा)र** वि. पडके; ओसाड; उजाड; पडीत; पडीक (खेडे, जमीन इ.).

**पडसरी** स्त्री. १. उतार असलेल्या जमिनीवरील पाणी वाहून जाण्यासाठी काढून दिलेला नाला; पाट; जलमार्ग. २. बागाईत जमीन.

**पडस(सा)ळ** स्त्री. १. देवीनंतर अंगावर उठणारे फोड, पुरळ. २. पिकाची कापणी झाल्यावर सडाशी अगर पिकाच्या कापलेल्या बुडख्याशी उगवणारे कोंब; कापणीनंतरची फूट.

**पडसाई** स्त्री. १. छाया; काळोख; सावळेपण: 'अंधार कोंडोनि घरीं। घरा पडसाई न करी ।'- अमृ ७.२१. २. सावली; पडछाया : 'दीपामागें पडसाई । तैश्या डोळ्यामागें भोंवई ।'- भाराबाल ६.५०.

**पडसाद-शब्द** पु. प्रतिध्वनी. [सं. प्रतिशब्द]

**पडसावणे, पडशेणे** अक्रि. नाक गळणे; पडसे येणे; सर्दी होणे.

**पडसावली** स्त्री. पडछाया; प्रतिबिंब.

**पडसाळ** स्त्री. पडवी; ओटी : 'पडसाळेंत एक वर्षाच्या वयाची हंसी होती तिला तिनें त्या घरांत आणिलें ।'- मपु ६.१८. (१८७५.)

**पडसाक्ष** स्त्री. १. पुराव्याला बळकटी देणारा दुसरा पुरावा. २. पहा : **पडसाक्षी**

**पडसाक्षी** पु. १. पुराव्याला बळकटी देणारा साक्षीदार. २. साक्षीदाराचा साक्षी; दुसऱ्याच्या विश्वासूपणाबद्दल शपथपूर्वक खात्री देणारा.

**पडसूत्र-दोरा** न.पु. मंगळसूत्र, गळसरी इ. ओवून गाठ दिल्यावर शिल्लक राहणारी दोऱ्याची टोके.

**पडसे** न. थंडी; सर्दी; सर्दीमुळे नाकातून पाणी गळणे. [सं. प्रतिश्याय]

**पडळ** न. १. डोळ्यावरील सारा, पटल, पडदा; मोतीबिंदू: 'जितुकें अभिमानाचें बळ । तितुकें निजदृष्टी पडळ ।'- एरुस्व १६.१०८. २. आवरण; आच्छादन. [सं. पटल]

**पडळ-ळी** स्त्री. (गांधीलमाश्यांचा) थवा, जमाव, समुदाय.

**पड(डा)ळ** स्त्री. १. मोकळी जागा. २. शेतात, बागेत बांधलेली पडवी; झोपडी. [सं.पट +आलय]

**पडळे** न. अभ्र; ढग; मेघ : 'आला श्रावणमास जाण पडळें गर्जे कसें अंबरीं ।' - अकक २ बसव द्वादशमास ८.

**पडाई** स्त्री. शरणागती.

**पडाडा** मारण्याचा आवाज. [ध्व.]

**पडाण** न. १. भजनात चाल व ताल बदलण्याचा टप्पा. २. पाटाचे पाणी बदलण्याचा, अडविण्याचा बांध. (कु.)

**पडार-ळ** न. एक प्रकारचे गवत. (व.)

**पडाव** पु. १. (सैन्याचा, कळपवाल्या टोळीचा, देवघेव करणाऱ्या लोकांचा, यात्रेकरूंचा इ.) तळ, मुक्काम. २. तळ देण्याची, मुक्काम करण्याची, उतरण्याची जागा; शिबिर; छावणी; डेरा; कंपू; वस्ती.[सं. पटकुटी]

**पडा(डां)व** पु.न. पाचपासून वीस खंडीपर्यंत वजन वाहून नेणारी नाव; होडी; मचवा. [क.पडगु; सं.प्लव]

**पडासणे** सक्रि. उलगडा करणे.

**पडि** पाऊणशेराचे माप.

**पडिकर** वि. सुंदर; डोळस : 'कां पुढांसूनि पडिकरा । अक्षमु चाले।' - ज्ञा १७.४२.

**पडिकर** पु. दंड; काठी. [सं.प्रति + कृ]

**पडिकार** पु. उपाय : 'नाना पडिकाराचेनि सळें । काढी आपलेचि डोळे । तें वानवसां आंधळें । जैसे ठाके ।'- ज्ञा १७.१०२. [सं. प्रतिकार]

**पडिखर** वि. पारखी; जाणकार : 'परे तुं प्रमै पडीखर ।' - मूप्र ९००. [सं. पढिकर]

**पडिखरणे** सक्रि. वाट दाखवणे; मार्गदर्शन करणे : 'आंधळेयाचां नगरी : कवण कवणानें पडिखरी' - उगी ५५४. [सं.प्ररि+ ईक्ष]

**पडिघ(घा-गा)णे, पडिघाइणे** सक्रि. १. विरोध करणे; धरणे; दाबणे: 'ययापरी मतमुक्तकीं । तेथ पडिघायिलें आणिकीं । म्हणती हां हो विवेकी । तरी तुम्ही भले ।'- ज्ञा १३.५१. २. प्राप्त होणे; पुढे येणे : 'तैसेंचि नाना रोग । पडिघाती पुढां आंग । आरोग्याचे उपेग । करूनि घाली ।'- ज्ञा १३.५८७. [सं.प्रतिग्रहण]

**पडिघा-गा** पु. तस्त; पिकदाणी: 'मीचि होईन सागळा । करूं सुईन गुरुळां । सांडिती तो नेपाळा । पडिघा मीचि ।' - ज्ञा १३.४१८. [सं. पतत्ग्रह]

**पडिघातणे, पढिघावणे** सक्रि. आदळणे; ताडन करणे. [सं.प्रतिघात]

**पडिघारे** न. भेटीच्या वेळचे औपचारिक बोलणे : 'हुणुक पडिघारें म्हणितलें'- कला १५ [सं. प्रतिग्रह]

**पडिपाड** पु. १. साम्यता; सारखेपणा; बरोबरी; तुलना (क्रि. येणे): 'सूर्यासी खद्योत रणांगणीं । भिडों शके झोटधरणी । तरी तुज मजलागोनी । पडिपाड रणीं घडेना ।'- एरुस्व ११.३१. २. पराक्रम; प्रताप; सामर्थ्य : 'नवल काळसर्पाचा पडिपाडू। विषप्राय विषय केला गोडू ।' - एभा १९.१२२. ३. व्याप्ती. [सं.प्रति+म.पाड]

**पडिपाडी** क्रिवि. मोठ्या युक्तीने : 'परी नि:शेष पीडी ना सोडी । ऐसे पडिपाडीं राखत ।' - एभा २०.२१८.

**पडि(डी)भर–भार** पु. १. अधिकता; अतिशयपणा: 'ना तरि गुणाचेनि परिवारें । आर्तिचेनि पडिभरें । हे कीर्ति चि स्वयंवरें । आली तुज ।'- ज्ञा २.१९३. २. भर तीव्रता; बहर; प्रकर्ष : 'आर्तीचेनि पडिभरें'- ज्ञा २.१९३ : 'त्याचे गांवीं निद्रेचा पडिभरू ।' - दावि ४०९. ३. आसक्ती : 'अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ।' - तुगा. ४. बडेजाव : 'सर्वेचि विषयाचा पडिभरू ।' - नागा १४०८. ५. सोबती : 'परि ठाकिलियाहि सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु । तिये गंगेचिये ऐसा पडिभरु । प्रेमभावा ।' - ज्ञागा १४०८. ६. आधार : 'कीं हे मोक्षाचे मुख्य पडीभरू ।'- दास १.७.६.
वि. श्रेष्ठ. [सं.प्रति+भार]

**पडिभार–वार** पु. पडप. पहा : **बडिवार**

**पडिभा(या)सणे** अक्रि. १. भासणे : 'परि लटिकेपणाची नवाई । पडिभासे गा ।'- ज्ञा १५.२३९. २. शोभणे : 'तैसा कटिप्रदेश गंभीरु । पडिभासे देवाचा ।'-ज्ञाप्र ४३३. [सं.प्रतिभास्]

**पडिमठे** न. स्वरांचा चढउतार; आरोह-अवरोह: 'हातीं घेउनि आधाटी : एकी गाति स्वरिचीं पडिमठीं'- शिव २५६.

**पडियंत** स्त्री. प्रतिष्ठा.

**पडिवादा** पहा : **पडसाद**

**पडिसणे** अक्रि. सहन करणे : 'तेवि पडिसे सांतचेनि सीरें : दृष्टजात'- ज्ञाप्र १००. [सं. परि+सह]

**पडिहासणे** अक्रि. वाटणे; भासणे : 'पवनें स्पर्शिलें नीर । पडिहासे तरंगाकार ।' - ज्ञा २.१६७. [सं.प्रति+भास्]

**पडी** स्त्री. पड; माघार: 'मिळोन जाऊन मिळवावें । पडी घेऊन उलथावें ।'- दास १५.६.१६. (वा.) ० **पडणे** – १.(पडलेल्यात पडणे) नाहीसा होणे; विसरला जाणे; उपयोगातून जाणे; बाजूला पडणे. २. अडथळ्यांनी अडविला जाणे.

**पडीक–त** वि. १. पड; बिनलागवडीची (जमीन). २. उपयोगात नसलेली, न लावलेली (वस्तू).

**पडीतचाराव** पु. १.पडजमिनीवर गुरांना चारणे. २. अशा चराईबद्दल वसूल केलेला पैसा, कर.

**पडीपाड** पु. साम्य.

**पडुलि** स्त्री. पहा: **पडळ–ळी**

**पडे** न. नैसर्गिकपणे मेलेल्या जनावराचे प्रेत; पड.

**पडेगोसावी** वि. नेहमी धुनीजवळ पडून राहणारा.

**पडेदार** न. अंगण.- लोसाको.

**पडेबळ** न. आवेश; जोर : 'जैसी सती पडेबळें घाली उडी : अग्निआंत' - रुस्व २१५७. [सं.प्रतिबल]

**पडोशी–सी** पु. शेजारी. [सं. प्रतिवेश; हिं.पडोसी]

**पडोस** क्रिवि. शेजारचा; आसपासचा; आसमंतातील. [सं.प्रति+वस्]

**पडोसरी** स्त्री. मागील बाजूची ओसरी किंवा पडवी (घराची).

**पडोसा** पु. १. जवळपणा; शेजार. २. (ल.) जुळतेपणा; सारखेपणा. ३. पडताळा. ४. उपमा; दृष्टांत.(तंजा.) [हिं.पडोस]

**पड्डे** न. परसू; परडे.(बे.)

**पड्या** वि. मठ्ठ; सुस्त; मंद; आळशी; कामाचा कंटाळा व तिटकारा असलेले (जनावर इ.).

**पड्याल** क्रिवि. पलीकडे; पलीकडच्या बाजूला; दुसऱ्या बाजूस.

**पड्याळ** न. दर्भ; नदीकाठी उगवणारे गवत.(व.)

**पढण** न. झिजून गेलेल्या किंवा बोथट झालेल्या हत्याराला नवीन पोलाद घालण्याची क्रिया. (क्रि. करणे, घालणे.)

**पढणे** उक्रि. १. वाचणे. २. एखाद्या ग्रंथात स्पष्ट उल्लेख केलेला, झालेला असणे. ३. म्हणणे; पठण करणे : 'रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ।' - तुगा ४२२९. ४. शिकणे; घोकंपट्टी करणे; शास्त्रादी विद्या पठण करणे : 'पढला गुरुपाशीं तें प्रकटीं शत्रु क्रोधें कढला ।'- मोरामायण पंचशती ३७०. [सं.पठ्]

**पढतमूर्ख** वि. शिकलेला असूनही व्यवहारज्ञान नसलेला; सुशिक्षित मूर्ख; शिकल्यावर कार्याकार्याचा विचार न करता मूर्खासारखा वागणारा.

**पढता** वि. पढीक : 'वारी वो पढतेयां पुंसां । कोप कलहंसांसीं ।' -शिव ८३६.

**पढ(ढि)यंता–ती–ते** वि. बोलका; पढीक: 'तंव भणे कमलावती । सांडौनि सत्यभामा पढयंती ।'- शिव १८१.

**पढविणे** सक्रि. शिकवणे : 'ठकवी किती दिवस असे दारिद्र्यचि कपट तीस तें पढवी ।' - मो अनु ३.४

**पढळ** न. टाळ; टाळाची वाटी; टाळाच्या दोन भागांपैकी एक. [सं.पटल]

**पढं(डं)गी** गलबताचा एक प्रकार.

**पढिकर** पु. १. साहाय्यक. २. रोग बरे करणारा वैद्य. ३. डोळस वाटाड्या : 'नाना पढिकराचेनि सळें । काढी आपुले डोळे । तें वोणवां चाले आंधळें । जैसे ठाके ।'- ज्ञा १७.१०१. [सं.प्ररि+ईक्ष्]

**पढियंता, पढिया– आ** वि. प्रिय; आवडता; लाडका; प्रेमाचा : 'देवयानी शुक्रतनया । प्राणापरीस पढियंती पितया ।'- मुआदि १७.३६. [सं.प्रति + भास्]

**पढियार** पु. भाट; स्तुतिपाठक.

**पढियावो** पु. १. आवड; प्रेम: 'संतांचा पढियावो कैशापरि लाहो । नामाचा आठवो कैसा राहे ।'- तुगा १६१८. २. शिक्षण : 'माझा पढियावो । गोसावी बोलती तो अवघाचि वावो ।'- भाए ८१.

**पढियासणे** अक्रि. १. आवडणे; प्रिय असणे : 'तेवी कथा अंत:करणी । मजे पढियासली ।'- शिव ३५. २. भासणे : 'तैसे तरंग पढियासले मज ।' - वछा ३६.

**पढीक** वि. विद्वान; शिकलेला; पढलेला; बहुश्रुत.
**पढो** पु. नगारा: 'ढवंस पढो भेरी ।'– शिव ५२५. [सं.पटह]
**पढ्यान्, पढ्यान खोकला** वि. काम न करणारा; आळशी. (ना.)
**पण** पु. १.वचन; नियम; प्रतिज्ञा. २. पैज; होड. (क्रि. करणे, घालणे.) ३. (द्यूतात पत्त्यांच्या खेळात लावलेली रक्कम, पैजेची वस्तू. [सं.] (वा.) ० **भोगणे** – निश्चिती, खात्री असणे; पैज लावायला तयार असणे.
**पण** उअ. १. परंतु; अद्यापि; तथापि. २.देखील; सुद्धा; त्याचप्रमाणे; तथा; तसेच. उदा. काम संपले पण ! ३. की, ना याप्रमाणे वाक्याला जोर, खात्री देण्यासाठी योजतात. जसे : – मी पण आलो-गेलो इ. ४. ही या अर्थी योजतात. उदा. शपथा पण वाहिल्या, पण खरे नाही बोलिला इ. ५. कोणत्याही दोहोंपैकी वाटेल तो. जसे :- मला फिरायला घोडापण चालेल, गाडीपण चालेल. इ. [सं.पुन:]
**पण–णा** प्र.भाववाचक नाम तयार करण्यासाठी नामाला व विशेषणाला लावण्याचा प्रत्यय. शब्दाच्या अंती 'आ' असेल तर त्याचा 'ए' होतो. जसे :-पिवळा-पिवळेपण इ. ही सर्व पणान्त नामे नपुसकलिंगी होत.
**पण** पु. यौवनावस्था; ज्वानी; वय. पणात, वयात येणे असा सामान्यपणे वापर.
**पण** न. ऐंशी गुंजा भार वजनाचे नाणे. [सं.]
**पणक** पु. पैसा. [सं.पण]
**पणकेसर** न. एक दागिना : 'पणकेसरें गळसरी भोवरिया । अणेकें भूषणें दिधलीं तेया ।' –ख्रिपु १.१६.१४४. [सं.पर्ण + केसरी]
**पणगी** वि. कोजागिरी (पौर्णिमा). – लोसाको.
**पणज** न. पावसाळ्यात उगवलेले गवत.
**पणजा** पु. आजोबांचे वडील. [सं.प्रार्यक]
**पणजे,पणंज** न. पोकळ दाणा किंवा कणीस; करपलेले किंवा न भरलेले धान्याचे कणीस; ओंबी. (को.)
**पणजोळ, पणंज्वळ, पणजवळ** न. आई वा वडिलांचे आजोळ.
**पणत–ती, पणतोली** स्त्री. नातीची मुलगी. [सं.प्रणप्तृ]
**पणत–ती, पणतोली** स्त्री. दिवा लावण्याचे मातीचे पात्र; मातीचा दिवा.
**पणतुंड–तोंड, पणतवंड, पतवंड** न. पणतू; नातीचे-नातवाचे मूल.
**पणतू, पणतुर** पु. नातवाचा किंवा नातीचा मुलगा. [सं.प्रणप्तृ]
**पणन** न. खरेदी-विक्री; व्यापार. [सं.]
**पणपणे** क्रि. १. वेली,झुडूप इ. मूळ धरून जोराने वाढीस लागणे. २. (ल.) चांगला पाया, आधार मिळणे; उत्कर्ष पावणे; भराभराट होणे; संपत्तिमान होणे. [हिं.पनपना]
**पणफरस्थाने** न. अव. (ज्यो.) केंद्रापासून दुसरी म्हणजे २,५,८,११ ही स्थाने.
**पणव** न. एक प्रकारचे वाद्य : 'पणव शृंगे मोहरी काहळा ।'–कृमुरा ४०.११. [सं.]
**पणस** पु. फणसाचे झाड व त्याचे फळ : 'शरचितदेहें जिंकी फळ भीष्म मनुष्यदेव पणसाचे ।'– मोभीष्म ११.११८. पहा : **फणस**
**पणंद** न. पहा : **पणंज**
**पणा** प्र. पहा : **पण** हा प्रत्यय लागून बनलेली नामे पुलिंगी असतात. उदा. लहानपणा, मोठेपणा इ. पहा : **पण**
**पणास(सि)णे** सक्रि. रचणे. पहा : **पन्नासणे २**
**पणित** वि. वचन; दिलेला शब्द; कबूल केलेला सौदा. [सं.पण]
**पणीत** न. सोनाराचे एक हत्यार.
**पणेरी** पहा : **पन्हेरी**
**पण्य** वि. विकण्याचा, विकण्यासाठी बाजारात मांडलेला (माल); विकण्यास योग्य; विक्रीचा; बाजारी. [सं.]
**पण्यांगना** स्त्री. वेश्या; देहविक्री करणारी स्त्री. [सं.पण्य + अंगना]
**पण्हरे** न.पु. हिणकस सोने : 'आंगाचेनि गोरेपणें । हे पण्हरेयांवरी पढवी आंकणें ।' – शिव ८०७. पहा : **पंधरे**
**पत** स्त्री. १.नावलौकिक; इमानीपणा, विश्वासूपणा ह्याबद्दलची कीर्ती (विशेषत: व्यापारी लोकांत); अब्रू, सचोटी याविषयी दुसऱ्याचा विश्वास. २. वजन. [सं.प्रति + इ = प्रत्यय – प्रतीति]
**पतक** न. पु. १. घोडेस्वारांचा, राऊतांचा समुदाय; स्वतंत्र सरदाराच्या हुकमतीत सुमारे शंभर घोडे असलेले पथक. २. पतकीचा हुद्दा, धंदा. [सं.पत्ति, पत्तिक.]
**पतक(का)र, पतकरा** पु. १. मान्यता; स्वीकार; अंगीकार. २. जबाबदारी. [सं.प्रतिकर,पतकर]
**पतक(का)रणे** सक्रि. १. संमत, मान्य असणे; कबूल करणे. २. हाती घेणे; अंगीकारणे; अंगावर शिरावर घेणे (काम इ.). ३.आवडणे; पटणे; परवडणे. [सं. पथ + कृ]
**पतकी–क्या** पु. १.पथकावरील मुख्य अधिकारी : 'एकएकाबरोबर ऐसे पतके किती ।'– ऐपो १०७. २. जकातीवरील अधिकारी.
**पतग** पु. पक्षी : 'दे आपुली तनु तरी पतग प्रमाण ।'– आशिवि २६.
**पतघाण** स्त्री. १. नापत; बेअब्रू. २. (व्यापारात) नुकसान; तोटा.
**पतन** न. पडणे; नाश; अधोगती. [सं.]
**पतन किरण** (शाप.) वर पडणारा किरण; आपात किरण.(इं.) इन्सिडेंट रे.
**पतन कोन** किरण पडण्याची दिशा; रोख.
**पतना–नी** स्त्री. प्रारब्ध; केल्या कामाचे फळ. (अहि.)
**पतनीय** वि. पडण्याच्या बेतात असलेला; पडण्यास योग्य. [सं.]
**पतपात, पतपातेरा, पतपासोडी** स्त्री.पु.स्त्री. सचोटी : 'सावकारांतही पतपात भारी जहाली.'–भाब १९. पहा : **पत**
**पतपेढी–संस्था** स्त्री. लोकांनी संयुक्त भांडवलावर काढलेले सावकारी दुकान; कर्ज देणारी संस्था.
**पतर** न. लाकडाचे, भोपळ्याचे भिक्षापात्र (गोसावी इ.चे).
**पतरी** वि. पत्र्यापासून बनविलेली; कमी जाडीची, पातळ पत्र्याची (वस्तू). (अहि.)
**पतवा** पु. (सोनारी) दोन बाजूंवर वेगळ्या देवताप्रतिमांचा उठाव असलेला ठसा. पुतळी वगैरेंवर दोन्ही बाजूंनी दोन वेगवेगळ्या मूर्ती उठवितात, त्याला हा उपयोगी पडतो.
**पतवार** न. सुकाणू. (काशी) [हिं.]
**पतवाळ** स्त्री. (कु.) पहा : **पत्रावळ**

**पतळी** स्त्री. छत्री. पहा : **पातळी**

**पतंग** पु. १. दिव्यावर झडप घालणारा एक प्रकारचा कीटक. २. कागदाची वावडी; तुक्कल. ३.सूर्य. [सं.]

**पतंग** पु. १. एक झाड. याच्या लाकडाचा रंग तांबडा असतो. त्यापासून गुलाल तयार करतात. २. या झाडापासून होणारा रंग : 'गुलाल आणि अनिवार पतंग ।'- ऐपो २१३. [सं.पत्रांग]

**पतंग फुगडी** पहा : **दंडफुगडी**

**पतंगी** वि. पतंगाच्या लाकडापासून केलेला (रंग).

**पतंगी** स्त्री. पाण्यात उडी टाकण्याचा एक प्रकार.

**पताक** पु. एक रुपयाचे नाणे. (गो.) [पोर्तु.]

**पताक–का** स्त्री. १. लहान निशाण; ध्वज; बावटा. २.चिन्ह; निशाणी; ध्वजचिन्ह. ३.पताकहस्त : 'पताकाचिया वोडवना ।' – उगी ४५५. [सं. पडागा > पट:]

**पताकहस्त** पु. (नृत्य.) हाताची बोटे सरळ पसरून अंगठा किंचित आखडण्याची नृत्यातील क्रिया.

**पताड** स्त्री. १. गलबतात साठवण राहावी म्हणून त्याच्या काठावर काठ्या, कांबट्या, आंथऱ्या बांधून गलबताचा उंच केलेला काठ. २. बैलांच्या खोगिराचा तंग; पठार.

**पताडे** न. १. (म्हैस इ. जनावराचे) पसरट शिंग. २. पहा : **पातडे**

**पतारो** पु. झाडाखाली पडलेली सुकलेली पाने; पाचोळा.

**पति–ती** पु. १. नवरा. २. धनी; मालक; स्वामी. [सं.]

**पति–आश्रय** लग्नानंतर स्त्रीला विवाहिता म्हणून मिळणारे कायदेशीर स्थान व हक्क.

**पतिकर** पहा : **पडिभर**

**पतित** वि. १. पडलेला. २. नैतिक अध:पतन झालेला; दुर्गुणी; नीच; दुराचरणी; पापी. ३. जातिभ्रष्ट; जात गेलेला; धर्मभ्रष्ट. [सं.पत्] न. प्रेत : 'कां ते पतितातें उठविती ।' –लीचउ १३४.

**पतितपरावर्तन** न. धर्मभ्रष्ट झालेल्याला पूर्वीच्या धर्मात परत घेणे.

**पतितपावन** वि. पतितांचा, पाप्यांचा उद्धार करणारा. [सं.]

**पतियणे** क्रि. विश्वास ठेवणे : 'न पत्याल यां बोलां : भणौनि दावितु असे'– ऋव ३६५. [सं. प्रति + ई]

**पतिर** (कु.) पहा : **पतर**

**पतिलाड** पु. सुरतक्रीडा; शृंगारिक विलास.

**पतिवत्नी, पतिवंता** स्त्री. सवाष्ण; सभर्तृका स्त्री; बायको : 'पतिवंतेनें टिळाचि लाविला । कुंकवाचा ।' – सिसं ४.१८२.

**पतिव्रता** स्त्री. १. साध्वी; सती; अव्यभिचारी, पवित्र स्त्री. २. पतीच्या आज्ञेत वागणारी, पतीला देव मानून व त्याची अखंड सेवा करणारी स्त्री. [सं.]

**पतिंगा** पु. १. मोठे वल्हे. (को.) २. वल्ह्याचा दांडा. ३. उथळ पाण्यात लांब काठी जमिनीस टेकवून नाव चालवतात ती काठी; ताज.

**पतिंवरा** स्त्री. लग्नास योग्य झालेली मुलगी; उपवर कन्या. [सं.]

**पतीचा कोळंबा** हळवा कोळंबा; भर पावसात तयार होणारे तांदळाचे पीक. [सं.]

**पतेती** स्त्री. पारशी लोकांचा नव्या वर्षाचा पहिला दिवस.

**पतेमारी** स्त्री. एक जलद जाणारे गलबत. पहा : **फतेमारी** [फ्रें.पात्तिमार– गो. पातमार; पत्ता = बातमी + मारणेपासून मारी]

**पत्करणे** पहा : **पतकरणे**

**पत्तन** न. नगर; शहर. [सं.]

**पत्तर** न. भिक्षापात्र. पहा : **पतर** ० पत्तरपूजा स्त्री.भैरोबाच्या भक्तांकडून केली जाणारी पत्तराची पूजा.

**पत्तरवडी** पहा : **पत्रवडी**

**पत्ता** पु. १. शोध; माग; बातमी; खबर; माहिती; वर्तमान. (क्रि. लावणे, सांगणे, लागणे.) २.थांग; मुद्दा; दिशा; माणसाचा ठावठिकाणा; शोधण्याची खूण. ३. राहण्याचे स्थळ व त्याचे टिपण. [सं.पत्र]

**पत्ता** पु. १. फत्ता किंवा फत्या. (तोफेच्या गोळ्याचा कपरा.) २.जामगी.

**पत्ता** पु. १.तंबाखूचे हिरवे, न चुरलेले पान. २. (खेळ) गंजिफातील, पत्यातील एक पान. ३.(वाद्य) लाकडाचे नक्षीदार, चपटे तुकडे. [सं.पत्र; हिं.पत्ता] (वा.) ० **जळणे** – योग्य प्रसंगी पत्ते, गंजिफा यातील पान न टाकल्यामुळे ते निरुपयोगी होणे.

**पत्तादोरा** पु. धागादोरा.

**पत्तायंत्र** न. पाकिटांवर क्रमाने पत्ते छापण्याचे यंत्र.

**पत्ति–त्ती** पु. १. सैन्याची एक लहान तुकडी (एक हत्ती, एक रथ, तीन घोडेस्वार व पाच पायदळ शिपाई यांचा समावेश असलेली). २. पदाती; पायदळ : 'हय सूत मथुनि झाले ते यदुकुरुवंशनलिनरवि पत्ती ।'– मोभीष्म ६.६४. [सं.]

**पत्ती** स्त्री. १. भांगेचे पान. २. पहा : **पत्री** २. ३. कोळशातील बारीक चपटे तुकडे. ४. कापूस वेचताना कापसाला चिकटलेली वाकलेली पाने, कचरा. (अहि) ५. चहाची पाने. ६. केळीच्या बागेतून कापून काढण्याची किंवा कापलेली पाने. (अहि.)

**पत्तेवार** वि. आवश्यक माहिती, पत्ता वगैरे असलेला (पत्र, सूचनांचा कागद).

क्रिवि. आवश्यक सूचना, माहिती वगैरेसह.

**पत्त्यार** भरवसा.(तंजा.)

**पत्थर** पु. १. दगड; पाषाण; फत्तर. २. (ल.) मंदबुद्धी; ढ; मठ्ठ. [सं.प्रस्तर]

**पत्थरपूजा** स्त्री. १. दगड मारणे; चोपणे. २. शिव्या देणे; भोसडणे.

**पत्नी** स्त्री. लग्नाची बायको; भार्या; जाया. [सं.]

**पत्र** न. १. चिठ्ठी; लिहिलेला कागद; लेखी मजकूर; दस्तऐवज. २. झाडाचे पान. ३. फुलाची पाकळी; पटल. ४. पुस्तकाचे, पोथीचे पान. ५. धातूचा पातळ पत्रा. ६. वर्ख. ७. चिठ्ठीचपाटी, हुंडी, लेख, कागद इ. अर्थाने समासात वापरतात. जसे :- करार – गहाण– जामीन – भलावण – लावणी – वकील – शिफारस पत्र इ. ८.दाखला; परवाना : 'अहंतादिभावां आपुलियां । झाडा देऊनि आघवेयां । पत्र घेती ज्ञानिये जया । मूळघरासी ।' – ज्ञा १५.२७९. ९. (कायदा) सनद; लेख. १०. चिलखताची छातीवर येणारी पट्टी. ११. शुद्धिपत्र. १२. निशाण; ध्वज. [सं.]

**पत्रक** न. पु. १. पुस्तकाचे पान; लिहिलेले पान. २. जमाखर्चाचा खर्डा;

उतारा. ३. यादी; तक्ता; जंत्री; कोष्टक; टाचण. ४. सूचनापत्र; नोटीस; हस्तपत्रक; लहानसे चोपडे.

**पत्रकार** पु. वर्तमानपत्राशी संबंधित; संपादकीय विभागातील व्यक्ती; बातमीदार; वार्ताहर.

**पत्रकारिता** स्त्री. तत्कालीन घटनांच्या बातम्या व माहिती मिळवून आणि ती संपादित करून वर्तमानपत्रे, नियतकालिके, लघुचित्रपट, आकाशवाणी आणि दूरदर्शन इ. माध्यमांच्या द्वारे प्रसारित करण्याचा व्यवसाय.

**पत्रतालिका** स्त्री. वाचनालयात संदर्भासाठी ठेवलेली सूची; (इं.) कार्ड्स.

**पत्रदर्शनी** क्रिवि. पत्र पाहताक्षणी पत्रात लिहिल्याप्रमाणे. (या शब्दाचा वापर फक्त पत्रातच.)

**पत्रमुद्रा** स्त्री. कागदी चलन; कागदी नोट.

**पत्रवडी** स्त्री. अळू वगैरेच्या पानांची (तळलेली) वडी.

**पत्रवल्ली–पत्रवेली, पत्रावली** स्त्री. १.(शृंगार.) अंगावर गोंदून काढलेली नक्षी; चित्रे; वेलपत्ती. २. चंदनाच्या उटीने शरीरावर काढलेली पानांची नक्षी : 'रमाकुचतटीं लिही न बहुवार पत्रावळी।' – केका ७. ३. वेलबुट्टीदार पडदा. ४. वेलबुटीदार गंध. [सं. पत्र+वल्ली]

**पत्रवेल** स्त्री. विड्याच्या पानाची वेल : 'पत्रवेलीचें पान । वाऱ्यानें हाले सणसणा ।'–ख्रिपु १.५.२३.

**पत्रा** पु. १. एखाद्या धातूचा तक्ता; पातळ पान; तकट. पहा : **पत्र** ५. २. सुका पाचोळा. (गो.) [सं.पत्र]

**पत्राज–स** स्त्री. (निंदार्थी) मिजास; डौल; दिमाख; मोठेपणाचा आव. [फा.]

**पत्राजी–सी** वि. पत्रास मिरविणारा; मिजासी; डौली; गर्विष्ठ.

**पत्रावळ** स्त्री. १. झाडांची पाने चोयांनी टाचून केलेले ताट; पत्राळ (व.); (क.) पतवाळ. २. ठिगळ लावलेली वस्तू; ठिगळ. [सं.पत्रावली] (वा.) ० **साधणे**– जेवायला वाढणे. (व.) ० **होऊन बसणे** – निरुपयोगी, महत्त्वहीन ठरणे. **भर पत्रावळीत राख घालणे; भर पत्रावळीवरून उठविणे; भरली पत्रावळ ओढणे, हिसकणे**– एखाद्याच्या चांगल्या निर्वाहसाधनांचा नाश करणे; पोटावर पाय आणणे.

**पत्रिका** स्त्री. १. जन्मवेळी असणाऱ्या तिथी, वार, नक्षत्र, योग, करण वगैरे गोष्टींच्या नोंदीचा कागद. २. यावरून काढलेले शुभाशुभ फल ज्यात दिले आहे असे जन्मटिपण; संपूर्ण आयुष्याचे भविष्य; कुंडली. ३. लग्न, मुंज वगैरेचा मुहूर्त लिहिलेला कागद. (पत्रिकापूजनाच्या वेळी हा लागतो.) ४. चिठ्ठी; पत्र; लेखी संदेश : 'कृष्णासी नाहीं विषय गोडी। म्यां पत्रिका लिहिली कुडी ।'– एरुस्व ५.४४. ५. (समासात) पत्र; लेख; मजकूर या अर्थी. जसे :– निमंत्रण – कुंकुमपत्रिका इ. ६. निमंत्रणपत्र.

**पत्री** स्त्री. १. जायपत्री. २. देवाला वाहण्यासाठी आणलेली अनेक झाडांची पाने. ३. (ल.) तंबाखूचे पान, पत्ता. ४. पादत्राणाच्या तळाला मारण्याचा लोखंडी तुकडा; बैलाच्या पायाची नाल; लोखंडी पत्रा. (व.) ५. पहा: **पत्ती**. ६. (सामा.) लहान पत्रा; पत्र्याचा तुकडा.

**पत्री बीड** बिडाचा एक प्रकार; घडकाम करताना उडणारे पापुद्रे. यांचा उपयोग शोभेच्या दारूत पांढरा प्रकाश उत्पन्न करण्याकडे केला जातो.

**पत्रोडा** पु. आंबोळीसारखे भजे. (बे.)

**पत्र्या हरताळ** सोनेरी रंगाचा हरताळ.

**पथ** पु. १. रस्ता; मार्ग; वाट. २. रीत; चाल; दंडक; पद्धत : 'म्हणसी ऐसा जगीं न पथ वाहे ।'– मोआदि ३४.५५. पहा : **पंथ** [सं.पथ् = चालणे]

**पथक** न. १. घोडेस्वारांची तुकडी. पहा : **पतक**. २. विशिष्ट कारणाने जमा केलेल्या लोकांचा समूह. उदा. चौकशीपथक.

**पथकर** पु. रस्त्यावरून प्रवास करण्यासाठीचा कर; (इं.) टोल.

**पथदर्शक** वि. १. मोठ्या बोटींना बंदरात येण्याजाण्याचा मार्ग दाखवणारी (लहान नाव). २. मोटारीच्या तांड्याला मार्ग दाखवणारी सर्वांत पुढे असणारी (मोटार). ३. रस्ता कुठे जातो ते दाखवणारी (पाटी).

**पथनाट्य** न. रस्त्यावर मुख्यत: प्रचाराच्या हेतूने केलेले लहानसे नाटक.

**पथराळ** वि. असमतोल; चढ उताराची (जमीन); दगडाळ.

**पथळे लष्कर** सरंजामी सरदार व शिलेदार, शिपाई वगैरे लोकांची नेमणूक नोंदण्याचे सदर.

**पथाडी–ड्या निवडुंग** नागफणी निवडुंग; फड्या निवडुंग.

**पथारी** स्त्री. १. बसण्याची बैठक (चटई, सतरंजी इ.). २. सहज पसरून निजण्याचा लहान बिछाना; अंथरूण. ३.(ल.) जवळच्या सामानाचा पसारा; मांड. ४. पसरलेले सामान. [सं.प्रस्तर;प्रा. पथ्थर]

**पथारीवाला** पु. रस्त्याच्या कडेला (फूटपाथवर) लहानसे दुकान मांडून विक्री करणारा.

**पथिक** वि. वाटसरू; प्रवासी; पांथस्थ. [सं.]

**पथिकाश्रम** पु. १. प्रवाशांच्या मुक्कामाची जागा. २. आजाऱ्याच्या शुश्रूषेची व्यवस्था.

**पथुरली** स्त्री. (गंगथडी) लहान पथारी.

**पथ्य** न. १.दुखणेकऱ्याला हितकारक असे नियमित खाद्य; युक्ताहार; रोग्याचे खाणे; बाळंतिणीचे अन्न. २. रोग्याने काय खावे, काय वर्जावे यासंबंधीचे नियम; शास्त्र.
वि. १. हितकारक; फायदेशीर : 'राया ! भलतेंचि वदसि, पथ्य हित स्वगुरुवच न आइकसी ।'– मोभीष्म ४.७. [सं.]

**पथ्यकर, पथ्यकारक** वि. १. पथ्य; योग्य; मानवणारे; फायदेशीर; हितकारक. २.पथ्याचे; रोग्याला योग्य (अन्न, आहार इ.).

**पथ्यपाणी** न. आजारी माणसाच्या शुश्रूषेची, पथ्याची व्यवस्था.

**पद** न. (फ.ज्यो.) पाद; तीन – तीन राशींचा गट.

**पद** न. १. पाऊल; पाय. २. पावलाचा ठसा; पादुका. ३. अधिकार; हुद्दा. ४. विभक्त्यन्त, सप्रत्यय, सबंध शब्द. ५. काव्यातील एक प्रकार; पद्य; गाणे. ६.वर्तुळाचा एकचतुर्थांश भाग. ७. जागा; स्थळ; ठिकाण. ८. और्ध्वदेहिक क्रियेच्या वेळी ब्राह्मणाला योग्यतेप्रमाणे दान करण्याच्या वस्तू (छत्री, जोडा, भांडे इ.). ९. (गणित) मालेतील कोणतीही विवक्षित संख्या. उदा. गुणोत्तरातील आदि – अंत्य पद. १०. अवयव; भाग. ११. वर्गमूळ; (समासात) मूळ. जसे:– घनपद = घनमूळ. १२. राज्य; सत्ता :'द्रोणहि असेंचि नमितां, होऊनि परम प्रसन्न, पद लाहो ।' – मोभीष्म १.८२. १३. अधिकार; महत्त्व; दर्जा; योग्यता : 'बोलावेया जयाचें पद । मुके जाले वेद ।'– ऋ ३१. १४. परमात्मा :

'जे गुरुशिष्याची गोठी । पदपिंडाची गांठी ।' - ज्ञा ३.२७२. १५. स्थिती: 'हें पद होतां चमत्कार । पिंडजर्नी ।'- ज्ञा ६.२९६. १६. वाहन : 'हरिगिरिशपदें दाटलीं अंतराळीं' - गरा १३०. [सं.]

**पदक** न. १.(हारामधील किंवा स्वतंत्र असा) छातीवर रुळणारा पिंपळाच्या पानासारखा एक अलंकार; बिल्ला. २.खाण्याच्या (साखरेच्या) गाठीतील प्रत्येक अवयव; भाग. ३. मुलींच्या कमरेचा एक दागिना. ४. (सामा.) बक्षीस देण्यात येणारा बिल्ला; मुद्रा; प्रशस्तिमुद्रा. [सं.]

**पदकर** वि. पु. पद गाणारा : 'मग पदकर नागदेओभट हें, नांव जालें' - लीचपू २०९ [सं.]

**पदगळ** न. पायातील साखळी : 'तोडोनि पदगळ बंधनाते ।'- रास ५.६०९.

**पदचिन्ह** न. पावलाचा ठसा. [सं.]

**पदच्छेद** पु. वाक्य, समास यांचे शब्दावयव पाडणे, त्यांतील पदे वेगळी-वेगळी करणे. [सं.]

**पदच्युत-भ्रष्ट** वि. अधिकार, स्थान यापासून दूर झालेला किंवा केलेला. [सं.]

**पददलित** वि. १. पायाखाली तुडविला गेलेला. २. दुर्लक्षित (समाजघटक). [सं.]

**पददान** न. पहा : **पद ९**

**पदन** न. १. प्रसंग; समय; वेळ :'तेचि पदन पाडिती तरि करीं' - स्मृस्थ २०२. २. योग; गाठ; सलगी.

**पदपाठ** पु. वेद म्हणण्याची एक रीत.

**पदपिंड** पु. जीव व परमात्मा यांचे ऐक्य. (वा.) ० **विसर्जित करणे** - विदेह स्थिती प्राप्त करून देणे.

**पदबंध** पु. शब्दाची विशिष्ट प्रकारची रचना. जसे :- कमलबंध, छत्रबंध.

**पदयोजना-रचना** स्त्री. श्लोकादिकांत अर्थ, रस, छंद, प्रास इ. काव्यगुणांना अनुरूप असणारी पदांची, शब्दांची जुळणी; प्रबंध.

**पदर** पु. १. वस्त्राचा, कापडाचा शेवटचा भाग; अंचल. २. वस्त्राचा नक्षीदार काठ. ३. कापड, दोर, हार यांची घडी; दुमड (एकेरी-दुहेरी); सर. ४. ऋणानुबंध; स्नेहभाव. ५. नाते; आप्तसंबंध. (क्रि. लागणे, जुळणे). ६. काही वस्तू घेण्यासाठी पसरलेले वस्त्र; वस्त्राचा भाग; ओटी; घोळ. ७. (ल.) (अ.) ताबा; मालकी; कब्जा; स्वामित्व; अधिकार; संबंध. उदा. 'हे भात तुम्ही आपल्या पदरी घ्या.' (आ) आसरा; थारा; पाखर: 'न दर स्पर्शोदे तुजवरि विद्येचा सदा वसे पदर ।'- मोशांति ७.३३. (इ) संबंध; अवलंबून असणे; स्वामित्व. (ई) स्वतःची खाजगी मिळकत; पैसा; प्राप्ती; इस्टेट; संग्रह. ८. थर; आवरण; घडी; पापुद्रा (कांदा, भाकरी इ. च्या वरचा); डोळ्याच्या बुबुळावर येणारा सारा; पडळ. ९. वयात आलेल्या मुलीने लुगड्याचा छातीवरून घ्यावयाचा भाग. परवंट नेसण्याचे सोडून अंगावरून पदर घ्यावयाचा विधी. (क्रि. घालणे, काढणे इ.). [सं.पल्लव] (वा.) ० **उतरणे, टाकणे** - विधवा होणे. ० **खरचणे, खाणे, मोडणे** - स्वतःच्या खर्चाने जगणे; स्वतः धंदा, संसार चालविणे. ० **घालणे** - झाकण घालून एखादी वस्तू उघडकीस येऊ न देणे. ० **घालणे, देणे**- दिवा मालवणे. ० **घालणे, भरणे, गमावणे, पदराला(स) खाच पडणे** - नुकसान होणे. ० **पसरणे** - नम्रपणाने, कळकळीने याचना करणे. क्षमा मागण्यासाठी ओटी पुढे पसरणे. ० **फाडून देणे** - लग्नाचा संबंध तोडणे. ० **लागणे**- वाईट जातकुळीचा संबंध येणे. ० **सारणे** - कड घेणे; बाजू सावरून घेणे; लाज राखणे : 'माया माउली कोणी नुरली । पदर साराया । धाव रे धाव यदुराया ।'- धावा (जननीजनकज). **पदरात घेणे** - १. घेणे; स्वीकार करणे; स्वाधीन करून घेणे; कबूल करणे. २. आश्रय देणे. ३. मुलीचा (लग्नासाठी) स्वीकार करणे; लग्न लावणे. **पदरी, पदरात घालणे, टाकणे** - १. मुलगी देणे. २. स्वाधीन करणे. ३. ठरलेले भरपूर देणे. **पदरात, पदरी पडणे, येणे** - मिळणे; हाती,ताब्यात येणे; सापडणे. **पदरात, पदरी बांधणे** - १. जवळ, नजीक असणे. २. माथी मारणे (आरोप, चूक इ.). **पदराला(स) गाठ बांधणे, मारणे** - आलेला अनुभव लक्षात ठेवणे. **पदरी धरणे** - चोर वगैरेंना रंगेहाथ पकडणे. **पदरी माप घालणे** - खात्री पटवून देणे; दोष, पाप, चूक, अपराध, लबाडी वगैरे पूर्णपणे दाखवून देणे, सिद्ध करणे.

**पदर** पु. रजोदर्शन; वयात येणे; ऋतुप्राप्ती. [सं.प्रदर] (वा.) ०**धरणे** - गर्भवती होणे; पाळी चुकणे.

**पदरकर, पदरकरीण** स्त्री. १. नहाण येण्याच्या पूर्वी पदर घेणारी मुलगी; पदर घेण्यालायक मुलगी. (को.) २. नुकतीच वयात आलेली मुलगी. पहा : **पदर ९**

**पदरगाठ** स्त्री.जवळचा, साठवलेला पैसा.

**पदरचा** वि. १. स्वतःचा; खुद्द आपला; आपल्या कल्पनेने योजलेला; ठरविलेला. २. स्वतःच्या तैनातीत असलेला; नोकरीस ठेवलेला. (वा.) **पदरचे घालणे** - १.मुळात नसलेला मजकूर. (ग्रंथात वा बोलण्यात) घुसडून देणे. २. कमताई पडली असता आपल्या जवळचा पैसा वगैरे घालून भरती करणे.

**पदरपेशा** वि. आश्रित: 'विप्रांस शालजोड्या पदरपेशास कडेतोडे पुष्कळ द्रव्य वाटलें.'- गापो ७७.

**पदरफेणी** स्त्री. चिरोटा. (तंजा.)

**पदरमोड** स्त्री. स्वतःच्या जवळचा पैसा खर्चणे; शिलकीतील (नफ्यातील नव्हे) पैसा खर्च करणे.

**पदरान पदर** (पदराने पदर) विवाहसंबंधामुळे जडलेला दूरचा संबंध; लांबचा आप्तसंबंध.

**पदलालित्य** न. १. पदातील किंवा पद्यातील यमक, प्रास, अनुप्रास यापासून प्राप्त होणारे सौंदर्य; वाक्यातील पदरचनेचे सौंदर्य; अर्थबोध न होताही केवळ शब्द ऐकण्याने मधुर वाटणारी विशिष्ट शब्दयोजना. २. नृत्यामध्ये पायांच्या सुंदर व आकर्षक हालचाली करून पुन्हा मूळ स्थानावर येण्याची क्रिया.

**पदवी** स्त्री. १. महाविद्यालयीन, विश्वविद्यालयीन शिक्षणातील सर्वश्रेष्ठ पात्रता. २. हुद्दा; अधिकार; अधिकाराची जागा; पद. ३. किताब; नावापुढचे मानाचे उपपद. ४. मानमरातब; कीर्ती. [सं.पद् + अव]

**पदशः** क्रिवि. क्रमाक्रमाने; पायरी पायरीने.

**पदसिद्ध** वि. विशिष्ट पदामुळे आपोआप सदस्य झालेला व अन्य पदांचे अधिकार मिळालेला.

**पदस्त** वि. प्रस्थापित :'जगा तळौटी तवंचि वेन्ही: म्हणों हे भूतधात्री : पदस्त भवारी: जवं कीजे चि ना'– ऋव ११८. [सं.पदस्थ]

**पदस्तपण** न. गांभीर्य; प्रतिष्ठितपणा : 'हळुहळु धरिलें: पदस्तपण'– शिव ११७.

**पदाति–ती** पु. १. पायदळातील सैनिक; पायी चालणारा माणूस; पायिक; पाईक. नोकर; सेवक. [सं.]

**पदार्थ** पु. १. वस्तू; जड द्रव्य; (शाप.) आकारविशिष्ट प्रकृती. २. खाण्यायोग्य वस्तू; पक्वान्न. ३. वाक्याचा, पदाचा अर्थ. ४. (तर्क.) वस्तुजाताच्या विभागाचे नाव. द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय आणि अभाव हे सात पदार्थ आहेत. ५. (न्याय.) जिला अस्तित्व किंवा अभाव आहे अशी वस्तू; अर्थ. ६. (निंदार्थी) प्राणी; ईश्वरनिर्मित वस्तू. ७. पंचमहाभूते. ८. कृत्य : 'हे तिन्ही पदार्थ आपणपेंचि केले' - पंचो १६.१०. [सं.]

**पदार्थविज्ञान** न. द्रव्य, गुण इ. पदार्थांच्या गुणधर्मांविषयीचे ज्ञान. यात पदार्थांच्या गुरुत्वादी सामान्य धर्म–ध्वनी, उष्णता, प्रकाश, लोहचुंबक व विद्युत या विषयींच्या नियमांचा समावेश आहे; भौतिकशास्त्र. (इं.)फिजिक्स.

**पदार्थानुसमय** पु. वाटणीची विशिष्ट पद्धत. काही वस्तू अनेक व्यक्तींना द्यावयाच्या असताना पहिल्या वेळी प्रत्येकाला एक–एक असे देऊन झाल्यानंतर दुसरी वस्तू, पदार्थ देणे, नंतर तिसरा,चौथा इ. असे देण्याची रीत, व्यवस्था.

**पदार्थाभाविनी** स्त्री. ज्ञानी जीवाच्या सात भूमिकांतील सहावी भूमिका.

**पदार्पण** न. १.कोणत्याही क्षेत्रातील प्रथम प्रवेश. २. कलाकाराचे मंचावरील प्रथम आगमन.

**पदावणे** सक्रि. १. मारणे. २. जबरदस्तीने वसूल करणे.

**पदावली** स्त्री. (गणित) एक किंवा अधिक क्रियाचिन्हे असलेली आकड्यांची रांग.

**पदेर** पु. पाव विकणारा. (गो.) [पोर्तु.पादीरो]

**पदो** पु. वेसकर; राखणदार. –लोसाको.

**पदोन्नती** स्त्री. बढती; वरच्या जागेवर नेमणूक.

**पद्धत** स्त्री. पत. (व.)

**पद्धत–ति–ती** स्त्री. १. चाल; रीत; आचार; नेहमीचा योग्य मार्ग; आचरण; सवय. २. धार्मिक विधी, आचार सांगणारा ग्रंथ. ३. ओळ; रांग; मालिका. ४. सुसंगत मांडणी, रचना. ५. उत्पादनातील अनेक भाग सुरळीत चालण्यासाठी ठरवलेली शिस्त. [सं.] (वा.) ० **लावणे** – संधान बांधणे; वशिला लावणे. (ना.)

**पद्म** न. १. कमळ; लाल कमळ. २. एकावर बारा पूज्ये असलेली संख्या; दहा हजार लाख किंवा शतकोटी.३.नागाच्या फणीवरील दहाचा आकडा. ४. घोड्याचे एक शुभ लक्षण. [सं.]

**पद्मकाष्ठ** न. एक औषधी लाकूड; हे थंड व शक्तिवर्धक असून हिमालयात सापडते.

**पद्मकोश (हस्त)** पु. (नृत्य.) हात उताणा करून अंगठ्यासह सर्व बोटे विरळ ठेवून तळहाताच्या बाजूला वाकडी करणे.

**पद्मबंध** पु. १. (साहित्य.) कलाकृतीतील नमुनेदार आकृतिबंध. २.उत्कृष्ट कित्ता, उदाहरण. ३. शोभिवंत नक्षीकाम. ४. कपड्याचा नमुना (डिझाइन); (इं.) पॅटर्न.

**पद्मयोग** पु. (ज्यो.) विशाखा नक्षत्रात सूर्य असता ज्या तिथीला कृत्तिका हे चंद्रनक्षत्र येते तो योग. पुष्करतीर्थावर याचे महत्त्व फार आहे. [सं.]

**पद्मराग** पु. लाल माणिक हे रत्न. [सं.]

**पद्मरेखा** स्त्री. (हस्तसामुद्रिक) तळहातावरील द्रव्यसूचक रेषा. [सं.]

**पद्मसंध** पु. घोड्याच्या खांद्यावरचा किंवा पुठ्यावरचा भोवरा. हे घोड्याचे शुभलक्षण होय.

**पद्मसुरंग** पु. (संगीत) एक राग.

**पद्महस्त–स्ती** वि. १. दैववान; यशस्वी; हाताला यश असणारा (वैद्य, पंडित) : 'धन्वंतरी परोपकारी । पद्महस्ती ।'– दास २.८.८. २. ज्याच्या हातावर पद्मचिन्ह आहे असा. हस्तसामुद्रिकातील एक शुभलक्षण.

**पद्माकर** पु. १. कमळांनी भरलेले तळे. २. कमळांचा समुदाय. [सं.]

**पद्मासन** न. (योग.) उजवा पाय डाव्या जाघेत, डावा पाय उजव्या जांघेत दोन्ही हातांचे तळवे. गुडघ्यांवर ताठ ठेवून, मान व पाठ ताठ करून बसणे; बौद्धासन.

**पद्माक्ष** न. कमळाचे बी.

**पद्मिनी** स्त्री. १. स्त्रियांच्या पद्मिनी, हस्तिनी, चित्रिणी, शंखिनी या चार प्रकारातील पहिल्या प्रकारची स्त्री; अतिउत्कृष्ट, सुंदर स्त्री. २. कमळीण; कमळांचा ताटवा. ३. नाग स्त्री. [सं.]

**पद्वी** स्त्री. बरोबरी. (झाडी) [सं.पदवि]

**पद्य** न. पु. १. काव्य; श्लोक; पद; (ज्याला पाद किंवा चरण आहे अशी; अक्षरे, मात्रा वगैरे नियम जीत असतो अशी ) छंदोबद्ध रचना; कविता. २. छंद; वृत्त.

**पन** पु. दोष; न्यूनता; बाट; खोट; उणीव. (अहि.)

**पनक** न. पन्हे.

**पनघट** पु. पाणी भरावयाची जागा; घाट; पाणवठा.

**पनपणे** क्रि. जोराने वाढणे. पहा : **पणपणे**

**पनपात्र–त्री** न.स्त्री. पंचपात्र; पाणी पिण्याचे भांडे. [सं.पानपात्र]

**पनवा** पु. मुलगा; बांडगा.

**पनवार** पु. (शेवणी फळांचे तुकडे इ. चा) देवाचा नैवेद्य. (गो.)

**पनवाळ** पु. एक वाद्य : 'ताशा मरफी पनवाळ थोर ।'– नव ११.६९.

**पनवेल–ळ** स्त्री.पु. तांदळाची एक जात.

**पनसाळ** पु. जड्याचे, जडाव करणाऱ्याचे हत्यार.

**पनस्कार** पु. एक देवकृत्य. (गो.)

**पन(ना,न्या)ळ, पन्ह(न्हा)ळ** पु. १. नळ; पाट; पाणी वाहून नेण्याचा, जाण्याचा मार्ग; चर; दगडाविटांनी बांधलेले गटार; मोरी; लाकूड, पत्रा इ. चा तयार केलेला नळ, पाट. २.(ल.) पुष्ट जनावराच्या पाठीच्या कण्याला पडलेला खोलगट चरासारखा भाग. ३.अरुंद,

खोलगट रस्ता. [सं. प्रणाल]

**पना** पु. एक झाड. याची फळे चण्यासारखी असून याचे लहान व मोठा असे दोन प्रकार आहेत.

**पनाया** पु. निखारा. (व.) – लोसाको.

**पनास** क्रिवि. आश्चर्यकारक : 'पनासाक्षरीं करिसी भरोवरी ।'–ज्ञागा १३५.

**पनाह** पु. आश्रयस्थान; आसरा. [फा.]

**पनाळी, पन्ह(न्हा)ळी** स्त्री. १.लहान नळ; नळी; अरुंद पन्हळ; पन्हेळी (गो.). २. पहा : **पनळ** १; पन्हळातून वाहणारे पाणी.[सं.प्रणालि]

**पनाळी कौल** उंच कडांचे व सपाट कौल; थापी कौल.

**पनाळी पाटली** आतील बाजूस, पन्हळ काढला आहे अशी पाटली.

**पनियार** पु. यल्लम्मादेवीचा प्रसाद.–लोसाको.

**पनीर, पने(न्हे)र** स्त्री. फाडलेल्या दुधातील पाणी काढून टाकून केलेले एक घट्ट खाद्य. [फा.पनीर]

**पनेळ, पन्हळ** पु. लहान होडी. (गो.)

**पन्नग** पु. साप; सर्प : 'सुरनरपन्नगांच्या ठायीं । हिंडता सौंदर्या विश्रांती नाहीं ।'– एरुस्व ७.३. [सं.]

**पन्नगमणी, पन्ना** पु. पाचू रत्न; पाच नावाचे रत्न. [सं.पन्नग]

**पन्नाशी** स्त्री. १. पन्नासांचा समुदाय. २. पन्नास वर्षांचे वय.

**पन्नास** वि. ५० ही संख्या. [सं.पंचाशत् ]

**पन्नास** पु. बंदोबस्त.– शर.

**पन्नासणे** १. बंदोबस्त करणे. २. सुशोभित करणे; शृंगारणे: 'आता याचे निबळें गवसलें । हें दुर्ग जैसे पन्नासिले।'– ज्ञा १.११६.[त., ते., क. पण्णु ]

**पन्नीर** न. गुलाबपाणी. (तंजा.) [क.पनि = पाण्याचा थेंब]

**पन्नीरचंबू** पु. गुलाबदाणी.

**पन्याकार** पु. अव. १.पदार्थ रुचकर होण्यासाठी त्यावर हिंग फोडणी इ. करावे लागणारे अनेक संस्कार. २. असे संस्कार केलेला पदार्थ. ३. पाहुण्यांची उत्कृष्ट सरबराई, जेवणाची व्यवस्था. ४.(ल.) तिखट-मीठ लावून, फुगवून सांगणे. ५. बढाईखोरपणा; आत्मप्रौढी. [सं.पण्य + कृ]

**पन्वती** स्त्री. साडेसाती; कटकट.

**पन्हरे** पहा : **पण्हरे**

**पन्हा** पु. (कापडाची) रुंदी. [फा. पह्ना=रुंद]

**पन्हा, पन्हाई** स्त्री. १. छाया; सावली: 'प्यार मोहबत मेहेरचा पन्हा फकिरावर असो दिला पाहिजे.'– ब्रच ३०८. २. पहा : **पनाह**. ३. ताबा : 'जीं इंग्रजांच्या पन्हाईत असतील....–' वाडसमा २.६५. [फा.पनाह्]

**पन्हावणे** सक्रि. १. जास्त लांब करणे, होणे (रबर इ.); फैलावणे; विस्तृत होणे. (व.,ना.) २. चोप, मार देणे. [फा. पन्हा]

**पन्हावन** न. वाहन. (व.)

**पन्हाळी** स्त्री. (सोनारी) मणी तयार करण्याचे एक हत्यार; मणी घोळणी.

**पन्हाळी रुपया** पन्हाळगड येथील एक विशिष्ट चलन; कोल्हापुरी टाकसाळीत पाडलेला रुपया.

**पन्ही** स्त्री. (चर्म) ढोपराला बसविलेला सागळेचा तुकडा; पान.

**पन्हे** न. कैरी, चिंच, रातांबा वगैरेंच्या रसात पाणी गूळ किंवा साखर घालून तयार केलेले पेय; पनक. (गो.) [सं.पानका]

**पन्हेरी** स्त्री. फळझाडाचा किंवा फुलझाडाचा मुळांसह व भोवतालच्या मातीसह बांधलेला गठ्ठा, रोपा (दुसरीकडे लावण्यासाठी तयार केलेला); झाडाचे कलम.

**पन्हेरी** स्त्री. १. रस्त्यावरील पाणपोई. २. आल्यागेल्याला पाणी पुरविण्याचा धंदा. [सं.पानगृह]

**पप** उद्गा. उजव्या हाताकडील बैल हाकण्यासाठी म्हटला जाणारा शब्द. पो! पो!

**पपई–यी, पप(पै) य्या** पु. उष्ण कटिबंधात आढळणारे फळझाड व त्याचे फळ. झाडाची उंची ३ ते ४ मीटर, खोडाच्या शेंड्यावर हस्ताकृती पानांचा झुबका. फळ लांबट गोलाकार किंवा गोल, आतील गर मऊ, गोड. फळात बहुधा पुष्कळ बिया असतात.

**पपनस** न. एक लिंबूवर्गीय फळझाड; उंची ४ ते ५ मीटर; पाने मोठी व हिरवी, फळ गोलाकार व पाकळ्या असलेले. साल जाड, हिरवी व फळ पिकल्यावर पिवळी.

**पपा** स्त्री. पळणे; पळ. (गो.) पहा : **पप**

**पपायरस** स्त्री. हस्तलिखिते लिहिण्यासाठी वापरली जाणारी शाई.

**पपिता** पु. एक औषधी झाड, याची बी हगवणीवर उपयोगी आहे.

**पपीऱ्या** वि. धष्टपुष्ट; गलेलठ्ठ. (व.)

**पपुया** पु. १. पोपट. २. पावशा.

**पपेट** न. कळसूत्री बाहुली. [इं.]

**पपेटी** पहा : **पतेती**

**पभूद** पहा : **प्रभूत**

**पय** पु. चुना मळण्याच्या घानीत चाकामागे बांधून फिरविले जाणारे पळ हे साधन. (अहि.)

**पय दर पय** क्रिवि. पावलोपावली; पदोपदी; एकामागून एक : 'येविसीचा तरतुदीचा प्रकार आपणास पयदरपय लिहिलाच आहे.' – पेद २०.१८४. [पय=पाय + दर =प्रत्येक +पय]

**पय** न. १. दूध. २. पाणी. [सं.]

**पयडं, पल्डं** न. कपाशीच्या काड्यांपासून तयार केलेले मोठे टोपले. (अहि.)

**पयसेरी** स्त्री. मळणीतील तनीस काढण्याचे काम.(झाडी) [सं.प्रसार, प्रसृति]

**पयस्विनी** स्त्री. १. दुभती गाय, म्हैस. २. नदी. ३. सुवासिनी मरण पावली म्हणजे तिच्या और्ध्वदेहिक कर्मात ब्राह्मणाला दान करण्याची गाय. [सं.]

**पयाळ** स्त्री. जहाज, होडी यांतील एक प्रकारचे फडताळ, कपाट.

**पये(या)ण** न. (प्र.) पह्याण; वाळलेले गवत.

**पयोधर** पु. १. स्त्रीचे स्तन. २. जनावरांची कास. ३. पाण्याने भरलेला ढग. ४. एक सुवासिक गवत. [सं.]

**पयोधि–धी** पु. समुद्र. [सं.]

**पयोवर्त -वृत्त** न.दूध व दुधाचे पदार्थ : 'मज कोण्ही पयोवर्त नेदिती' - लीचपू २६५. [सं.पयोव्रत]

**पयोव्रत** न. महिनाभर दुधाच्या आहारावर राहावयाचे व्रत. अयोग्य दान घेतले असता प्रायश्चित्त म्हणून गोठ्यात राहून वरील व्रत करायचे असते. [सं.]

**पर** पु. पंख; पीस. [फा.] (वा.) ० **फुटणे, लावून जाणे**- पहा : **पंख फुटणे. पराचा कावळा करणे** - अतिशयोक्ती करणे; फुगवून सांगणे.

**पर** स्त्री. १. परी; चाल; रीत; पद्धत(भाषण, काम इ. ची); प्रकार; गत. २. रूढी; प्रकार; टूम. [सं.प्रकार]

**पर** उअ. परंतु; तथापि; पण; तरी. [सं.; हिं]

**पर** न. १. ब्रह्म; परमेश्वर : 'पर सुखाची उर्मि ।'- ऋ १. २. वस्तू (ब्रह्म) : 'जे विचारें पर लोक । वोळखिती ।'- ज्ञा २.१२५. [सं.परम्]
वि. अद्भुत; असाधारण; अपूर्व

**पर** पु. १. शत्रू. २. अंत.
वि. १. परका; परकीय. (समासात) परदेशी इ. २. दुसरा; इतर; भिन्न; वेगळा; निराळा. ३. संबंध असलेला; अनुसरणारा; (एखाद्याला) वाहिलेला; अधीन; जोडलेला. उदा. अर्थपर. ४. नंतरचा . ५. श्रेष्ठ; उच्च; थोर.
क्रिवि. पलीकडे. [सं.पर]

**परकत, परकेल** पहा : **पडकय**

**परकपाल** न. (ज्यो.) पश्चिम गोलार्ध. [सं.]

**परक(को)र** पु. स्त्रियांचे कमरेपासून पायघोळ वस्त्र; लहान मुलींचा नेसावयाचा झगा; परकोल (व.). [सं. परिकर]

**परक(का)ळा, परकाळे** पु.न. १. अंगावर घेण्याचे उपरण्यासारखे वस्त्र; कापडातील एक प्रकार : 'कोणासी पागोटें परकाळा । कोणी मागती अष्टगोली शेला ।' - भवि ३०.४१. २. कापडाची चिंधी. ३. (ल.) (अनेकवचनी प्रयोग) दैना; नासाडी; मोडकळीची स्थिती. ४. खिरीत घालावयाचे गव्हले; मालत्या; शेवई. [फा. परकाला]

**परका-खा** वि. १. दुसरा; बाहेरचा; परकीय; अनोळखी (माणूस). २. नवीन, निराळी, वेगळी (वस्तू). [सं.पारक्य, परकीय]

**परका(खा)ई** स्त्री. १. परकेपणा. २. नवलाई; नावीन्य (वस्तूचे).

**परकाय(या)प्रवेश** पु. मंत्रादी सिद्धीने आपला देह सोडून एखाद्या देहात शिरणे; ती विद्या.

**परकार-रा** पु. १. कंपास; घेर. २. फेरा; गर्का; वळसा. [फा.पर्कार्]

**परकी, परकीय** वि. १. पहा : **परका**. २. दुसऱ्या संबंधी; दुसऱ्याचा. ३. परदेशी; विदेशीय.

**परकीया** स्त्री. १. दुसऱ्याची बायको. २. नायिकेचा एक प्रकार. [सं.]

**परकोट** पु. एका तटाच्या बाहेरचा दुसरा तट; पडकोट.

**परक्रांति-ती** स्त्री. (ज्यो.) क्रांतिवृत्ताचा वाकडेपणा.

**परखड** वि. रोखठोक; खणखणीत; खरमरीत; चणचणीत; स्पष्ट; भीडभाड न धरता केलेले (भाषण) [सं. प्रतिक्ष(क्षा)र]

**परखंडा** पु. पुढचा शेंडा तोडलेले केळीचे पान.

**परखंद-दा** न. मुंजा मुलगा, नवरा-नवरी यांना मुंज-लग्न इ. वेळी करण्याचा आहेर. (गो.)

**पर(ळ)खा(का)टी** स्त्री. कपाशीची फांदी; वाळलेली काटकी.

**परगणा** पु. १.एक देशविभाग; जिल्हा; पहा : **देश**. २. किल्ला अथवा मोठे शहर यांच्या नावावरून परगण्यास पडलेले नाव : ' वाची अक्षरें की पाहूनराव चिठ्ठ्या करी परगण्यावर ।'- ऐपो ४०८. ३. (ल.) कामाचा मोठा व्याप; पसारा; खटला; प्रपंच. [फा.]

**परगति-ती** स्त्री. स्वर्ग : 'परगति पावों पाहसि । पर पदरीं फार पाहिजे शुचिता ।'- मोआदि २४.५६.

**परगमन** न. स्वतःचा जोडीदार सोडून दुसऱ्याशी समागम करणे; व्यभिचार.

**परगुण** पु. सुगंधी द्रव्य : 'घरोघरीं परगुणें : होतसे मर्दना मादनें' - वच्छाह ३०८.

**परगुणे** न. १. मेजवानी : 'क्षीरसागरा परगुणें । कीजे क्षीरसागरचिपणें ।'- ज्ञा १५.५६५. २. पक्वान्न : 'कां पाहालेनि सुयाणें । जालया परगुणें । पढियंते पाहुणें । स्वर्गोनिया ।' - ज्ञा १४.२१६.

**परगृह-घर** न. १. दुसऱ्याचे घर. २.दुसऱ्याच्या घराचा आश्रय घेणे. ३. व्यभिचार. पहा : **परगमन**

**परग्रह** पु. बायको, मुले इ. कुटुंबाचा सदस्य : 'सकळ परग्रहो त्यजुनि... योकौनि राहें' - ज्ञाप्र ७८३. [सं.परिग्रह]

**परघरनिवारण** न. यानंतर दुसऱ्याच्या मदतीची आवश्यकता पडणार नाही अशी स्थिति (देणगी).

**परचक्र** न. १. स्वारी करणारे सैन्य. २. शत्रूची स्वारी, हल्ला, चढाई. ३. परकीय अंमल, ताबा.

**परचाया** पु. ज्वारी किंवा बाजरी यांसारख्या पिकांची वाळलेली पाने. (अहि.)

**परचुरण** न. १. नाण्याचा खुर्दा; मोड. २. मोडके-तोडके दागदागिने. ३. किरकोळ; सटरफटर वस्तू. [सं. पर + चूर्ण]

**परछंद** वि. दुसऱ्याच्या स्वाधीन, ताब्यात असलेला; दुसऱ्याच्या तंत्राने, मर्जीने चालणारा; पराधीन.

**परज** स्त्री. प्रापंचिक बुद्धी.

**परज** पु. तरवारीची, ढालीची, पट्ट्याची मूठ; खोबळा : 'वडिलार्जित परज होता तया अंत ।'- रामदासी २.१५४. [हिं. पर्ज]

**परज** वि. तयार; सिद्ध.

**परज** पु. तुरुंग; दिवाणी तुरुंग.

**परज** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर. [हिं. पर्ज]

**परजकुंवर** पु. पुष्य नक्षत्र. या नक्षत्रात भरपूर पाऊस पडतो म्हणून हे नाव. [सं. पर्जन्यकुमार]

**पर(रि)ज(जि)णे** उक्रि. १. तरवार, पट्टा फिरविणे, पेलणे; चमकावणे; मारण्यासाठी (तरवार) सिद्ध करणे. २.हत्या करणे; छेदणे : 'संसारेसीं परजी सेवटीं । मीचि तयालागि ।'- लंगी ८०८.

**परजणे** उक्रि. स्वाधीन ठेवणे: 'मनास परजी ऐसा थोर । सुर नर असुर दिसेना ।'- एभा २३.६८१. [सं.प्रजा]

**परजणे** उक्रि. परवडणे; पसंत असणे. (व.)

**परजळणे** सक्रि. प्रज्वलित करणे; पाजळणे; पेटविणे : 'जैशी अग्न

परजळली ।'- ऐपो १०. [सं.प्रज्वलन]

**परटवणे** न. परिटाकडे धुवायला टाकलेला किंवा त्याच्याकडून धुऊन आलेला कपडा; धुण्याचे किंवा धुतलेले कपडे.

**परटी** वि. परटाकडून धुऊन आलेला कपडा.

**परटीण** स्त्री. १.धोबीण. २. एक काळ्या-पांढऱ्या रंगाचा पक्षी. ह्याची शेपटी सतत हलत असते.

**परठन** स्त्री. भात पेरलेली जागा. (झाडी)

**परड-डी** पु. स्त्री. सापाची एक जात. दोन पुरुष लांब, चपळ, बिनविषारी; तथापि हा एखादे लहान मूल सहज गिळतो : 'परड सोडसे महाडुळें । शुद्ध नाग सोनसळे ।' - कथा ४.४.३१. [सं.परधि.]

**परडणे** सक्रि. टाकणे; त्याग करणे.

**परडा** पु. शिपतर. पहा : **परडी** १

**परडी** स्त्री. १. बांबूच्या काड्यांची केलेली गोल पाटी; टोपली; करंडी. २. परडीच्या आकाराचे बायकांच्या डोक्यातील फूल. ३. पत्री; पानेफुले : 'एकादसी परडीएचें वाण' - पैठण शिला आय. सी. [सं.परित.]

**परडी-डे** स्त्री. न. धान्याची कणसे खळ्यावर आणल्यानंतर धान्य पुष्कळ भरावे म्हणून बोकड, फुले इ.चा देवीला किंवा पिशाचाला देण्याचा बळी. पहा : **डवरा**

**परडूल** न. १.(निंदार्थी) लहान परडी; टोपली. २. लहान परडे; आवार; वाडगे.

**परडे** न. १. तराजूचे एक पारडे; शिंपल्याचा अर्धा भाग; शिंप : 'वांकेल ताजव्याचें भारावांचोनि काय बा परडे।'- मोद्रोण (नवनीत ३२१). २. चमच्याचे टवळे, वाटी. ३. लाकडी परळ; थाळा. ४. घराच्या मागचे अंगण; परसू; घराजवळची बाग करण्यासाठी राखलेली जागा. (वा.) ० **उतरणे, बसणे** - १. वजनात कमी भरणे. २. योग्यता कमी होणे. ० **जड होणे,चढणे** - १. वजनात जास्त भरणे. २. अभिमान चढणे.

**परडे** न. बारीक रेशीम किंवा जरतार गुंडाळण्याचे यंत्र.

**परण** पु. (संगीत) एक ताल. समेपासून ठेक्याच्या बोलाहून निराळे लावलेले त्याच लयीतील अधिक बोल : 'पखवाजवाल्यास तालाबरोबर परण व तुकडे वाजविता आले पाहिजेत.'- कलावंत खाते ३२३ (बडोदे).

**परणणे** सक्रि.विवाह करणे; वरणे; लग्न करणे - लावणे : 'परणूं पाहे राक्षसविधीं । तें मी सिद्धी जाऊं नेदी।' - एरुस्व १२.६६.[सं.परि + नी]

**परणन** न. वरणे; लग्न करणे; लग्न. [सं. परिणयन]

**परत** स्त्री. १. फेड; उलट, परत करणे; दिलेला मोबदला; प्रतिक्रिया; प्रतिकर्म. २. खजिन्यातून परत पाठविलेले खोटे नाणे. ३. माघारी वळणे; फिरणे; प्रतणे. ४. पुन्हा काळजी घेणे; लक्ष देणे. (क्रि करणे). ५. शुश्रूषा; समाचार. ६. समासात आवृत्ती किंवा फेड या अर्थाने योजतात. उदा. चौकशी, पाहणी.

क्रिवि. पुन्हा; माघारी; मागे; उलट; फिरून (देणे, करणे इ.).

**परतकूळ** न. साटेलोटे; ज्या घरी आपल्या घरची मुलगी दिली, ती जिवंत असताना त्या घरची मुलगी आपल्या घरी करण्याचा प्रकार.

**परतगोष्ट, परतजबाब-जाब** स्त्री. पु. उद्धटपणाचे, उलट उत्तर; प्रत्युत्तर.

**परतजमा** स्त्री. कर्जाऊ दिलेली रक्कम परत आली असता ती जमेच्या बाजूला लिहिणे, मांडणे.

**परतजामीन, जामीनकी** स्त्री. आपण ज्यास जामीन राहिलो आहोत, त्याच्याकडून जामीन घेण्याचा प्रकार.

**परतजिम्मा** पु. जिम्म्याला मोठा जिम्मा पाहणे.

**परतण** वि. लुगड्याच्या पोतामध्ये चौकटी वाण करण्यासाठी मध्ये पांढरे, हिरवे किंवा अन्य रंगाचे दोरे, तातू घालतात. ते काठात न जाता मध्येच परतून लुगडे विणण्याचा एक प्रकार. अशी लुगडी काहीशी अधिक महाग असतात.

**परतणी-नी** स्त्री. १. एका अंगावरून दुसऱ्या अंगावर वळणे; पालटणे; कूस बदलणे; परतण्याची क्रिया. २. परत फिरण्याची क्रिया : 'घेउणि बळाची परतनी । प्राणा करी खोंचणी । आयुष्याची तोडी तवनि । हळु हळु ।'- उगी ५२३. ३. (वस्त्राची) किनार. ४. पुनर्जन्म : 'मागुती नको परतणी, या शरीरी उरवणी' - ज्ञागा ३६६ [सं. परि+ वर्त्]

**परतणे** सक्रि. १. दुसऱ्या बाजूला अंगावर वळणे. २. दिशा, रोख बदलणे; स्थान, जागा बदलणे. ३.परत करणे - देणे; पाठविणे. ४. एखादा पदार्थ तव्यावर (घाईघाईने, अपुरा) भाजणे;, घाईने पदार्थ तयार करणे. ५. चोळणे; मिसळणे : 'पवित्रा गंगोदका । सरिसी परतिजे कस्तुरिका । तरि परिमळाचेया कवतिका । कां न लवावि ।'- उगी ३२.

अक्रि. १. मागे फिरणे, वळणे, जाणे, येणे २. (वर्तुळ, मुदत संपून) उलटणे; परत येणे (वर्ष, रास इ.). ३. संपणे; निघून जाणे (दुपार, मध्यरात्र). ४. बदल होणे; फरक पडणे (स्वभाव, बेत, निश्चय यात). ५. माघार घेणे; पाठीमागे सरणे. ६. व्यायल्यानंतर लगेच गाभण राहणे (गाय, म्हैस इ.). ७. पहिल्या स्थितीप्रत जाणे. [सं.प्रत्ययन]

**परत(ता)न** न. १. नांगराच्या एका उलट-सुलट फेरीत जितकी जमीन नांगरली जाईल तेवढी जमीन. २. जमिनीची पट्टी; एक पट्टा; चार-पाच बिघ्यांचे लहान शेत. ३. नांगराचा फेरा. ४. शेतजमीन मोजण्याचे एक परिमाण.

**परतनिशा** स्त्री. ज्याच्यासाठी स्वत: जबाबदारी पत्करायची असेल त्याच्याबद्दल अधिक खात्री करून घेणे.

**परतभाव** पु. प्रताप; सामर्थ्य.

**परतर** न. १. पैलतीर. २. परलोक.

**परतवण** न. १. पुन्हा, दुसऱ्यांदा येणे. २. लग्नानंतर नवऱ्या मुलीची माहेराहून सासरी परत पाठवणी.

**परतवेल** पहा : **परतकूळ**

**परतव्याज** न. कर्जाची फेड करताना आलेल्या जास्त रकमेवरील सावकाराने कुळाला परत केलेले व्याज.

**परत (ता)ळणे, परत(ता)ळा** पहा : **पडताळा, पडताळणे**

**परतंत्र** वि. १. दुसऱ्याच्या स्वाधीन, ताब्यात असलेला; दुसऱ्याच्या तंत्राने चालणारा. २.(ल.) शरीर : 'हा लोकु कर्मे बांधिला । जो परतंत्रा भूतला । तो नित्ययज्ञातें चुकला । म्हणोनियां ।' - ज्ञा ३.८४. ३. बेहोष; बेशुद्ध.

**परता** वि. श्रेष्ठ [सं.पर, पार]

**परता–ती–ते** वि. पलीकडचा; लांबचा; दूरचा.
क्रिवि. पलीकडे; दुसऱ्या बाजूस : 'दे प्रेमलाप रती, टाकी मी यापुढें सुधेला परती ।'– मोकृष्ण ३१.२८.
उअ. पेक्षा शिवाय : 'त्या वेदांतापरतें कांहीं । सर्वथा श्रेष्ठ नाहीं ।'– दास ५.६.३७.
उअ. खेरीज; वाचून; शिवाय : 'युद्धें जय कीं स्वर्ग श्रेष्ठ जगीं लाभ कोण या परता ।'– मोशल्य ३.३२. [स. पार]

**परता** परत; मागे; दूर : 'तेथूनि परतें पाहतां ।' – परमा ४३. [सं.प्रति]

**परता** शअ. (वाक्यालंकारार्थी) तर मग; बरे तर. उदा. जा परता, म्हणा परता.

**परतारक** वि. वंचक; फसवणारा : 'मी काइ एकाधा परतारकु ?'– स्मृस्थ ५६. [सं.प्रताडक]

**परतावाण** पु. लग्नानंतर सासरच्या चार-पाच मंडळींसह वधूवरांनी वधूपित्याच्या घरी येणे. (गो.) [सं. प्रति + आवर्तन – आगमन.]

**परताळणे** अक्रि. १. दुखणे उलटणे. २. रागाने चवताळणे.

**परती** स्त्री. औदासीन्य; उपरती; विरक्ती.

**परती** स्त्री. (विणकाम) लडीचे सूत ज्यावर गुंडाळतात ती कांडी; नळकांडी. (इं.) बॉबीन.

**परतीचे काम** दोन्ही काठांसाठी दोन व मधील पोतासाठी एक अशा तीन धोट्यांनी काम करणे. यामुळे आडवणाचे रेशीम काठात जात नाही. पहा : **परतण**

**परतून पडणे** क्रि. विरुद्ध होणे; उलटून पडणे. (कर.)

**परत्र** न. १.परलोक : 'म्हणोनि देवो गोसावी । तो धर्माधर्मु भोगवी। आणि परत्राच्या गांवीं। करी तो भोगी ।' – ज्ञा १६.३०६. २. परमेश्वरपद; परमार्थ : 'कव्हणी परत्र पाहौनि न बोले। नि:प्रपंचु।'– ऋ ४४.
क्रिवि. नाहीतर; अन्यथा; अन्यत्र.

**परत्व** न. १. दूरपणा; पलीकडे असणे. २. परकेपणा; दुजाभाव. ३.दुसरेपणा : 'म्हणोनि परत्वें ब्रह्म असे । ते आत्मत्वें परियवसे ।' –ज्ञा १७.३७७.

**परत्वे** शअ. अनुरोधाने; मुळे; अनुसरून; ने. उदा. अधिकार – जाती परत्वे.

**परथळ्या** वि. परस्थ : 'पंच ब्राह्मण वगैरेस विडे देऊन नंतर परथळ्या कोणीं असल्यास त्यास विडा देतात.'– बदलापूर ३७.

**परदरबार** न. पेशव्यांच्या बरोबरीच्या राजाला किंवा त्यांच्या वकिलाला वगैरे पेशव्यांकडून दिलेल्या नेमणुका, जवाहीर, कापड वगैरे नोंदण्याचे, हिशोबाचे सदर.

**परदेश** पु. १. स्वदेशाहून भिन्न, परकीय देश. २. तेथे केलेला प्रवास.

**परदेशी** वि. १. परका; दुसऱ्या देशातील; स्वदेश सोडून परदेशात आलेला. २. परागंदा झालेला : 'तुजविण जालों परदेशी' – नाम १५१२.
पु. उत्तर हिंदुस्थानी माणूस; पुरभय्या.

**परदेशी खुंटा** (विणकाम) ताण्याचे सूत गुंडाळण्यासाठी असलेली खुंटी.

**परदैव** न. परमेश्वर : 'धन्यें धन्यें सें गोकुळ : जेथ परदैव रांगतें बाळ' – चोखा १७५ [स.]

**परद्वार** न. व्यभिचार. पहा : **परगमन**

**परद्वारी** वि. व्यभिचारी : 'मैद भोंदु परद्वारी । भुरटेकरी चेटकी ।'– दास २.३.३१.

**परधन** न. १. दुसऱ्याचा पैसा. २. (ल.) मुलगी.

**परधान** पु. मध्यप्रदेशातील गोंडांच्या आश्रयाने राहणारी एक आदिवासींची जमात.

**परधारजिणा** वि. (निंदार्थी) दुसऱ्याच्या उपयोगी पडणारा; दुसऱ्याला फायदेशीर, उपकारक (स्त्री, मुलगा, नोकर इ.).

**परनावन** क्रि. विवाह पार पाडणे; लग्न लावून देणे; विवाहाच्या जबाबदारीतून मुक्त होणे. (अहि.)

**परनिष्ठ** वि. १. देवताविषयक गोष्टीत मग्न असलेला; परमार्थनिष्ठ. २. सत्यवादी; न्यायनिष्ठ; नि:पक्षपाती : 'राजश्री जवळ बऱ्या परनिष्ठ... सांगितले.'– पेद ६.६२. ३.स्पष्ट; खरा : 'परनिष्ठ लिहून पाठविणे.'– ऐलेसें ८८५. ४. उपकारी; दाता.

**परनिष्ठा** स्त्री. १. परमार्थचिंतन. २. लोकोपकार बुद्धी; लोकांबद्दलची कळकळ.

**परन्यास** वि. वाटेल त्यास शिव्या इ. देण्यास लावणारा (एक वातविकार).

**परपर–रा** क्रिवि. कापड फाडणे, शौचास होणे इ. प्रसंगी होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.][सं.परिपर्द]

**परपार** पु. १. पलीकडचा काठ–किनारा : 'तेथ भक्त संत सज्ञान नर । स्वयें पावविशी परपार ।'–एभा २०.५. २. (भवाच्या पलीकडचा तीर) मोक्ष : 'जेणें पाविजे परपार । तिये नांव यात्रा पवित्र ।'–एभा २१.५८.

**परपांडित्य** न. (निंदार्थी) (स्वत: त्याप्रमाणे न वागता) इतरांना उपदेश करणे.

**परपीडनरती** स्त्री. (मानस.) दुसऱ्याला मारून आपली कामेच्छा पुरी करण्याची प्रवृत्ती; (इं.) सॅडिझम.

**परपीडा** स्त्री. १. दुसऱ्याला त्रास; दु:ख देणे. २. दुसऱ्याचे दु:ख.

**परपुरुष** पु. १.परका माणूस. २. ईश्वर; परमेश्वर. ३. (बायकी) नवरा, भाऊ इ. जवळचे आप्त सोडून इतर पुरुषमाणूस.

**परपूर्वस्त्री** स्त्री. स्वैरिणी; व्यभिचारिणी स्त्री.

**परपेठ** स्त्री. १.दुसरे गाव. २. हुंडीची तिसरी प्रत. एक हुंडी गहाळ झाली असता दुसरी देतात ती पेठ व तीही गहाळ झाल्यास ती दिली जाणारी तिसरी प्रत.

**परफैसला** पु.(कायदा) पुन्हा तपासणी करून दिलेला निकाल.

**परब** पु. १. एक रत्न; चपटा हिरा. २. दोन्ही बाजूस सपाट (पैलू नसलेला) असा हिऱ्याचा पातळ तुकडा. [हिं.]

**परबत** क्रिवि. जाडजूड; दणकट : 'भट गेले : परबती भाद घेउनि आले' – लीचउ १७८. [सं.पर्वत]

**परबशाही** कागदाचा एक प्रकार.

**परबा(भा)ण–न** न. (नाविक) शिडाला जोडलेली काठी : 'गावी परबान जायां जालें।'– वाडमा १२३६. [हिं.परबान]

**परबाहिरा** क्रिवि. परभारा; बाहेरच्या बाहेर; परस्पर: 'म्हणुनी त्यजिला परबाहिरा । नव्हे सोयरा निजाचा ।'– एरुस्व ६.६३.

**परब्रह्म** न. परमेश्वराचे निरुपाधिक, निराकार असे स्वरूप. [सं.]

**परभाण** न. १.(संख्या, महत्त्व इ. मुळे असलेले) परभू (प्रभू) लोकांचे वर्चस्व; प्राबल्य. २. त्यांच्या वर्चस्वाचे स्थान.

**परभारा-रा-री-रे-रे** क्रिवि. १. एखाद्याला वगळून. २. ज्याच्याबद्दल आदर, कळकळ दाखविणे योग्य आहे असा विषय, वस्तू किंवा माणूस यांची हेळसांड करून. ३. जी गोष्ट लक्षात घेणे जरूर आहे त्याकडे दुर्लक्ष करून. ४.परस्पर; बाहेरच्या बाहेर. ५.नेहमीच्या परिपाठाव्यतिरिक्त. ६. अप्रत्यक्ष रीतीने. ७. काही प्रयत्न न करता; सहज : 'प्रतिवर्षी घरी खंडण्या चालुन येती परभारी।' -ऐपो ४०६. ८. पाठीमागे; परोक्ष. (कु.) ९. (समासात) परभारा - अंमल, खर्च, मिळकत, शिल्लक. [सं.पर+बहि:]

**परभारे** न. (जमाखर्च) वरती दिलेल्या रकमांच्या तपशिलांचे सदर.

**परभाषीकरण** न. (चित्रपट) ध्वनिपट्टीतील भाषिक बदल; (इं.) डबिंग.

**परभृत** वि. दुसऱ्याच्या जिवावर जगणारा; अवलंबून असलेला; दुसऱ्याकडून पोसला जाणारा. [सं.]

**परम** वि. १. अत्युत्तम; अत्युच्च; श्रेष्ठ; अतिशय. परमावधी दर्शविण्यासाठी समासात योजतात. जसे :- परमकठोर - निर्दय. इ. २. मुख्य; प्रमुख. क्रिवि. पुष्कळ; अतिशय; फार. [सं.]

**परमक्रांति-ती** स्त्री. (ज्यो.) परमापम; परापम; क्रांतिवृत्ताची वक्रता.

**परमणी** स्त्री. (ज्यो.) पहा : **पर्व** १,२. [सं.पर्वणी]

**परमणी** स्त्री. (विणकाम) बैलीवर पसरलेली सुते कुंच्याने साफ करण्याची क्रिया. यानंतर पाजणी, सांदणी, पोपती (वळी) ह्या क्रिया करतात.

**परमधाम** न. मोक्ष : 'कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचे मूळपीठ ।'-ज्ञा १.३०.

**परमहंस** पु. १. संन्याशांचा एक वर्ग; (सामा.) संन्यासी. २. परमेश्वर. वि. परमज्ञान प्राप्त झालेला.

**परमळिक** वि. सुवासिक. (गो.)

**परमंडळ** न. शत्रूचे ठिकाण, छावणी : 'सर्वेचि विग्रहो परमंडळीं' - शिव ४८० [सं. पर+मंडल]

**परमा** पु. मधुमेह. (व.)

**परमा-मे** पु.न. प्रमेह; गर्मी; धातुरोग; शिश्नद्वारा पू वाहणे. [सं.प्रमेह]

**परमा** स्त्री. सीमा; मर्यादा : 'तया दुःखा असावी परमा' - ज्ञाप्र ३१५. [सं. प्रमा]

**परमाठीव** वि. चांगल्या टाकीने घडलेला; दुसऱ्यांदा गुळगुळीत, साफ केलेला (दगड).

**परमाण** न. शिडाला जोडलेली काठी. पहा : **परवाण**

**परमाणु-णू** पु. (अणूपेक्षा सूक्ष्म) पृथ्वी, जल, तेज, वायू यांचा केवळ सूक्ष्म अंश (याहून पुढे सूक्ष्मतेची कल्पना राहात नाही.); अतिसूक्ष्म कण; अविभाज्य स्थितीतील पदार्थ; उन्हाच्या कवडशात दिसणाऱ्या एका प्रसरेणूचा सहावा भाग. [सं.]

**परमाणुवाद** पु. परमाणूपासून जग बनले आहे असे मत.

**परमातखाऊ** वि. परान्नपुष्ट; परभृत; दुसऱ्यावर अवलंबून राहणारा.

**परमात्मा** पु. १. विश्वाचा आत्मा; सर्वश्रेष्ठ आत्मा; जगच्चालक; सर्वव्यापी, सर्वसाक्षी परमेश्वर. २. सर्व वस्तूंना आधारभूत असणारे तत्त्व; परब्रह्म. ३.मुक्त आत्मा. [सं.]

**परमापम** पु. (ज्यो.) कक्षावृत्त व क्रांतिवृत्त यांमधील अंतर; परापम. [सं.]

**परमार** पु. १. दुसऱ्याचा उच्छेद, नाश: 'प्रतिष्ठीन परमारु । यागवरी ।' - ज्ञा १६.३६०. [सं.]
वि. दुसऱ्याला पीडा देणे.

**परमार्थ** पु. १. ईश्वरसाधनारूप पुरुषार्थ; मोक्ष; सद्गती. २. ब्रह्मज्ञान. ३.केवल सत्य; सत्यांश.
क्रिवि. सद्धेतूसाठी; धर्मार्थ. [सं.]
वि. १. खरा; अकृत्रिम. २. दैवी.

**परमार्थी** वि. १. प्रपंचापेक्षा ईश्वरसाधनरूप मार्गाकडे जास्त लक्ष असणारा; ब्रह्मप्राप्तीसाठी झटणारा. २. भावार्थी; कळकळीचा; प्रामाणिक.

**परमान्न** न. १. उत्तम पक्वान्न : 'भक्ष परमान्न पत्रशाका । ब्राह्मण वाढिंताती अनेका ।'- गुच ३८.५९. २. साखर आणि दूध घालून शिजविलेला भात (पिंडासाठी). ३. कांडलेल्या गव्हाची खीर. [सं.परम + अन्न]

**परमावधी** पु. शेवटचे टोक, स्थिती. [सं.]

**परमुख्य** वि. प्रमुख : 'तिया वासुगी परमुख्य सकळा । जाण माझे रूप ।' - उगी ६९८. [सं.प्रमुख]

**परमेचु** स्त्री. उत्कट प्रेम; आवड : 'पराहूनि परमेचूचें (चवाळं) ।' - ज्ञागा १०४३. [सं.पर+क. मेच्चु]

**परमेटा** पु. कापडातील एक प्रकार.

**परमेश्वर** पु. १. परब्रह्म; परमात्मा; जगदीश्वर; सर्वव्यापी; सर्वशक्तिमान ईश्वर. २. शंकर; विष्णू. [सं.]

**परमेश्वरी** स्त्री.(अप.) वचनचिठ्ठी; रोखा. (इं.) प्रॉमीसरी नोट.

**परमोर** पु. सुगंध. - लोसाको. (व.) [सं.परिमल]

**पररत** वि. व्यभिचारी (स्त्री, पुरुष).

**परलोक** पु. १.मृत्यूनंतर प्राप्त होणारा लोक. (स्वर्ग, नरक इ.); मृत्यूनंतरची स्थिती. २.(व्यापक) अक्षय सुखकल्याणाच्या जागा प्रत्येकी (कैलास, वैकुंठ इ.).

**परव(वा)चा-वजा** पु. १. तोंडाने म्हटलेली उजळणी; धुळाक्षराचा पाठ (सकाळ-संध्याकाळचा). २. आपल्या कर्माची रडकथा; कर्मकहाणी; घरगुती, सांसारिक गोष्टींचा पाल्हाळ. (क्रि.खंगणे, लावणे, लागणे.) [सं.पर = पुन्हा + वाचणे]

**परवचा** स्त्री. पर्वा, किंमत. - लोसाको.

**परवड-डी** स्त्री. १.खाद्यपदार्थांचे अनेक प्रकार; पक्वान्न. २. तऱ्हा; रीत; पद्धत; चाल; टूम (चमत्कारिक, तऱ्हेवाईक); विशिष्ट प्रकार. ३. अव्यवस्थितपणाचा, दुर्दशेचा प्रकार - तऱ्हा- रीत. ४. (सामा.) त्रास; दगदग; हाल. ५. अव्यवस्था; गोंधळ; धांदल: 'तारुण्यपावतां परवडी । कन्या जनकें मांडिली ।'- मुआदि २२.७. ६.यथानुक्रम मार्ग, रीत. ७. व्यवस्था; वासलात लावण्यासाठी घेतलेली वस्तू. ८. थर; रांग; ओळ (दगड, विटा यांचा). (को.) ९. परवचा; उजळणी. (क्रि. वाचणे) (कु.) १०. रडकथा; चऱ्हाट; कंटाळवाणी हकिगत. ११. आवड; आनंद : 'गोडी सहित रस निवडी । जाण परवडी तेचि येकी ।'- रंयो ७४.४६. १२. सार्वजनिक, जातिविशिष्ट जेवण. (कर.) १३. सुकाळ; समृद्धी. [सं.परिपाठी]

**परवडणे** अक्रि. फायदेशीर होणे; पटणे; पसंतीस येणे. [सं.परि + वत्]

**परवडीचे काम** पाळीपाळीने, आळीपाळीने करावयाचे काम.

**परवणी** स्त्री. (विणकाम) पहा : **परमणी**

**परवणे** अक्रि. कण्हणे; कुंथणे. [सं.परिवेदन]

**परवत** पु. देवघेव; व्यापारी देणे-घेणे; धंदा; उद्योग. (कुण.) [सं.परिवर्तन]

**परवर-ल** स्त्री. न. एक फळभाजीचा वेल, तिचे फळ. काहीशी तोंडल्यासारखी असणारी ही भाजी पथ्यकर असते.

**परवर** पु. १. परिसर; आवार : 'वैष्णवांचें द्वारीं लोळेन परिवरीं'- चोखा ९१. २. पाळणा : 'एकी परिवरीं बाळकें टाकिलीं' - श्रीकृष्च २८.२. [सं. परि+वृ]

**परवर** पु. परिवार; कुटुंब.

**परवर** वि. पोशिंदा; पालनकर्ता : 'बक्तर परवर हत्तीवर दौलतराव शिंदा।'- ऐपो २४४. [फा. पर्वर्]

**परवर** पु. १. घराची जमीन. २. (ल.) खळ्यातील रास काढून घेतल्यानंतर राहिलेले धान्य. यावर महारांचा हक्क असतो. ३. तलाव किंवा विहीर यांच्या भोवताली दगडांचा किंवा मातीचा बांधलेला बांध किंवा पाळ. ४.(बांधकाम) जमिनीतील पायाचा सपाटीचा भाग. यावर दुसरा नवा थर सुरू होतो.

**परवरदा, पर्वदा, परवरदिगार** इ. पहा : **पर्वर्दा** इ.

**परवरीस, परवस,परवरशी, परवस्ती** स्त्री. पोषण; परामर्ष; आश्रय; सांभाळ; संगोपन [ फा. पर्वरिश]

**परवल** न. खूण; चिन्ह; संकेत.

**परवशता** स्त्री. पारतंत्र्य; पराधीनता. [सं.]

**पर(रि)वस** पु. स्पर्श; धक्का : 'हात परिवसेया नेणिजे आर्पेपर ।'- उगी ३४३.

**परवंटकरीण-करी – परवंटी** स्त्री. परवंट्याची साडी नेसणारी, पाच ते दहा वर्षांची मुलगी.

**परवंटा** पु. (बायकी) साडी नेसण्याचा एक प्रकार; लहान मुलीस साडीचा पदर न काढता निऱ्या साडीच्या पदरापर्यंत काढून ती साडी पदरानेच कमरेभोवती आवळणे; लुगड्याचा पदर न काढणे : 'कंचुकी वस्त्राच्या परवंटीं। मुक्ताफळें झळकती ।'- मुसभा १४.६२.

**परवंटा** पु. वरवंटा -शर.

**परवंसवए, परवंसै** न. बेशुद्धावस्था : 'बडबडती परवंसै फिटे' - वैवसं १६,१७. [सं. परवशता]

**परवा** पु. पाण्याचा पाट.

**परवाड, पराड** स्त्री. डोंगरकड्याची जागा; डोंगरपायथ्याची उताराची जागा. (अहि.)

**परवा-व्हा** न.स्त्री. मागचा किंवा पुढच्या दिवस; थोडा मागील काळ; पुढील अल्प काळ. [सं. परश्वः]

**परवानगी** स्त्री. १. हुकूम; आज्ञा. २. अनुज्ञा; सूट; सुटका; मोकळीक. [फा.पर्वानगी]

**परवानगीबरदार** पु. मालकाला बाहेरचा कोणी आल्या-गेल्याची माहिती (वर्दी) देणारा व आत जाण्याची परवानगी आणणारा नोकर.

**परवाना** पु. १. हुकूम; परवानगी. २. दाखला; अधिकारपत्र; पास (इ.) सनद; शिक्कामोर्तब असलेले अधिकार पत्र. ३.(बायकी) नाते; एखादी माहिती वगैरेसंबंधी कथा; हकिगत. (क्रि. गाणे, सांगणे). [फा.पर्वाना]

**परवार** क्रिवि. गाय, म्हैस इ. फळण्याच्या दिवसात न फळता (राहणे). (क्रि. जाणे).(राजा.) पहा : **अभराड** (वा.) **परवारास आणणे-येणे** - एखादी गोष्ट उघडकीस आणणे-येणे; तिचा दुर्लौकिक करणे-होणे.

**परवारी** पु. गावचा महार नोकर, जागल्या, वेस राखणारा, निरोप्या, वाटाड्या, बिगारी इ. ची कामे करणारा : 'याखेरीज २ शिपायी १ मोजण्या परवारी एकूण ३.'- वाडबाबा १.२०५.

**परवेशी-सी** स्त्री. १. पहा : **परवरीस.** २. निवृत्ती वेतन; (इं.) पेन्शन.

**परव्हा** पु. मूल तान्हे असताना आई गरोदर राहिल्यास तिचे दूध प्यायल्याने मुलास होणारा रोग.

**परव्हाण-न** न. गाडी, घोडा इ. वाहन.

**परश-शु-शू** पु. कुऱ्हाड; फरस. [सं.परशु]

**परशय्या** स्त्री. व्यभिचार; परपुरुषाशी त्याच्याच घरी संग करणे. [सं.]

**परशास्त्र** न. श्रेष्ठ शास्त्र; ब्रह्मविद्या; अध्यात्म: 'आक्षेप परिहारीं निर्धारू । करितां परशास्त्र विचारू।' - ऋ २३. [सं.]

**परश्या तटु** ओझ्याचे घोडे; कंठाळीचे घोडे.

**परश्रेय, परिश्रय** पु. शौचविधी : 'गोसावी उदीयांचि परश्रेयासि... बीजें करीति'- लीचपू १६७ [सं.]

**परस** उअ.१. हून; ऊन; पेक्षा. २. विस्तार. (तंजा.) पहा : **परीस**

**परस** चाल; हल्ला. -ऐको.

**परस** पु.न. (मोजमाप) पुरुष; माणसाची उंची. पहा : **पुरुष** [सं.पुरुष]

**परस-सूं** न. घराची मागील बाजू; अंगण; परडे. [सं.पार्श्व >पर्शु] (वा.) **परसातील भाजी** – (परसातील भाजी पाहिजे तेव्हा काढता येते त्यावरून) सहजसाध्य काम; सहज जिंकता येण्यासारखा शत्रू.

**परसक** वि. ऐकणारा; श्रोता.

**परसणे** उक्रि. १. ऐकणे; परिसणे. २. समजणे. (गो.)

**परसणे** क्रि. परतणे; परत येणे; वळविणे; उलटणे. (बे.)

**परसणे** क्रि. (जेवायला) वाढणे; पानात घालणे. (व.) [सं. परिवेषण; हिं. परोसना]

**पर(रो)सणे** अक्रि. अंगावरून हात फिरविणे. (व.) [सं. परिवेषण]

**परसर** न. सरपण; सरपणासाठी तोडलेली लाकडे; बांड.

**परसविणे** उक्रि. उकळलेले पाणी घालून किंवा तूप चोपडून मडक्याचा सच्छिद्रपणा घालवून ते पक्क करणे. पहा : **निर्ढावणे**

**परसा** पु. शेकोटी; आगटी. (को.)

**परसाइ** न. जुन्या काळचे सरकारी अधिकाऱ्याची बडदास्त ठेवण्याबद्दलचे एक राजकीय वतन. (ठाणे,को.) [सं.परसणे]

**परसाकड-डे** न. स्त्री. शौच; शौचास जाणे, लागणे. क्रिवि. शौचाला; मलविसर्गार्थ. (क्रि. जाणे,बसणे.)

**परसाड** पु. परकर. (व.)

**परसुंदा** पु. (चर्म.) जोडा शिवून उरलेला दोऱ्याचा तुकडा.

**परस्त-स्थ** वि. १. परक्या गावात किंवा देशात राहणारा; परगावचा. २. तटस्थ; तिऱ्हाईत; निःपक्षपाती.

**परस्पर** वि. एकमेक; एकमेकांचा; पहिल्याचा दुसऱ्याशी जो संबंध तोच दुसऱ्याचा पहिल्याशी असा असणारा; समान गोष्टी करणारे उभयता ते अन्योन्य. [सं.]
क्रिवि. १. एकमेकांस. २. परभारा; बाहेरच्या बाहेर.

**परस्मैपद** न. (व्या.) कर्तरी प्रयोग. संस्कृत धातू ज्या दोन प्रयोगांत चालवितात त्यातील एक; दुसऱ्यास उद्देशून केलेली क्रिया.

**परस्राय** पु. शौचविधी : 'स्वामी परस्रया नीगति' – भापूजा१२. प्रामको. [सं.]

**परस्व** न. दुसऱ्याची मालमत्ता; धन: 'नातरी परस्वापहारें । जें सुख अवतरे।' – ज्ञा १८.८०७.

**परस्वाधीन** वि. परतंत्र; परवश.

**परहात** पु. हत्तीची सोंड: 'पाणियांचिया धारा सुटेति परहातें ।' – रुस्व ४३०. [सं.प्रहस्त]

**परळ** पु. मातीचे उथळ पात्र; परात; थाळी. गरीब लोक यात जेवतात.

**परळ** पु. ९-१८ मी. उंचीचा, भारतातील शुष्क प्रदेशात आढळणारा वृक्ष; साल करडी, पाने मोठी व सम्मुख, फुले सुगंधी व जांभळट, लाकूड इमारतीला उपयोगी.

**परळी** स्त्री. लहान परळ.

**परंगती** स्त्री. ब्रह्म आणि ईश्वर या पर वस्तूंची लक्षणे : 'अठरां वरुखां परंगती स्वीकरिली' – श्रीकृच १. [सं.पर+गति]

**परंतु** उअ. १. पण; किंतु. २. तरीसुद्धा; तरीही; तथापि. [सं.]

**परंजय-ल-ळ** वि. (अप.) प्रांजल सत्य; खरे; प्रामाणिक. [सं. प्रांजल]

**परंपरा** स्त्री. १. एकापुढे एक किंवा एका मागे एक अशा क्रमाने अनेक संबद्ध पदार्थांची मालिका; रांग; व्यवस्था; क्रम. २. वंशपरंपरेचे संक्षेपरूप; एका पिढीपासून दुसऱ्या पिढीकडे या क्रमाने चालत येणे. ३.विस्तार : 'आतां जयाचेनि संकल्पें । हे लोकपरंपरा होय हारपे ।' – ज्ञा ११.८२. [सं.]

**परंपरागत** वि. १. परंपरेने आलेले; पूर्वीपासून सारखे चालत आलेले. २. वंशादी परंपरेने चालत आलेली (वृत्ती, आचार).

**परंपरासंबंध** पु. परंपरेने जडलेला किंवा मध्यस्थामार्फत जमलेला संबंध.

**परंपोक** स्त्री. नापीक जमीन; लागवडीस निरुपयोगी जमीन : 'हीशेबा पडेल बरवे नीकें । लायक परंपोक कळावया ।' – पैमा १.४५. [ते.]

**परंज्ञप्ति** वि . केवळ ज्ञानस्वरूप.

**परा** उप. अंतर; आधिक्यदर्शक उपसर्ग. [सं.परा]

**परा** स्त्री. वाचेच्या चार अवस्थांपैकी पहिली; नाभिस्थानस्थित निर्विकल्प आठवरूप; श्वासाचे पहिले स्फुरण. [सं.]

**परा** पु. १. भाताचे रोप; पऱ्हा. २. मोठी पळी. (झाडी) [सं.रोप]

**परा** पु. रांग. पहा : **फरा**

**पराई-यी-ही** स्त्री. १. मानवी आयुष्याचे दोन भाग; तारुण्य आणि वार्धक्य; चढते आणि उतरते वय. २.ज्वानी: 'निरोगी आपली समसमान ऐन पराई हो । कसुन भोगावी पलंगावर सौख्य सराई हो ।' – प्रला १५३. [सं.परार्ध]

**पराई** स्त्री. परकेपणा; दुजाभाव. पहा : **पर** [सं.पर = परका]

**पराक** न. एक व्रत. महिन्यातून केवळ बारा दिवस भोजन, अन्य दिवशी उपवास असतो.

**पराकाष्ठा** स्त्री. १. परमावधी; अतिशयपणाची शेवटची हद्द, मर्यादा, सीमा. हा शब्द कोणत्याही प्रकारची अतिशयता – विशेषत: क्रियेच्या आवेशासह दर्शवितो. २. शर्यतीच्या शेवटी मर्यादादर्शक पुरलेले लाकूड; खांब.
क्रिवि. परमावधीने; अतिशयपणे. [सं.]

**पराकृत** वि. (प्र.प्राकृत); स्वाभाविक; नैसर्गिक; नेहमीचा; साधारण: 'तैसींच माझीं वचनें । पराकृतें ।' – दास १.६.१२.

**पराक्रम** पु. १. शक्ती; बळ; सामर्थ्य. २. बहादुरी; शौर्य. [सं.]

**पराक्रांत** वि. जित; जिंकलेला; हस्तगत केलेला; पादाक्रांत. [सं.]

**पराग** पु. फुलातील रजःकण; बारीक चूर्ण; बुक्का.

**परागकोश** पु. पुंकेसराच्या वरच्या टोकाला असणारा पिशवीसारखा भाग.

**परागण, परागीभवन** न. परागकोशातून परागकण बाहेर पडून वारा, पाणी आणि कीटकांमार्फत कुक्षीवर जाऊन पडण्याची क्रिया.

**परागनलिका** स्त्री. परागकणांतून निघून अंडाशयाच्या दिशेने वाढू लागणारी लहानशी नळी.

**परागंदा** वि. १. भटक्या; दुर्दशेमुळे घरदार सोडून भटकत फिरणारा. २. फरारी. (क्रि. होणे, असणे.) ३. अस्ताव्यस्त; विखुरलेले; विकीर्ण. [सं.परांगत]

**परागंदा जमीन** परागंदा झालेल्या माणसाची जमीन; हिच्यावरचा त्याचा हक्क बुडालेला असतो.

**पराङ्मुख** वि. १. तोंड, पाठ फिरविलेला; मागे फिरलेला. २. एखाद्या विषयाची, कार्याची वाट सोडलेला; त्याला विन्मुख झालेला. ३. पराभूत. ४. उपवासी. ५. आपुलकी नसलेला.

**पराचा लखोटा** पीस खोचलेला लखोटा. लखोटा नेणारा महार हे पीस पाहून पत्र लवकर पोचते करावयाचे आहे असे समजत असे त्यावरून. (ल.) तातडीचे पत्र.

**पराजय** पु. पराभव; पाडाव; मोड; अपयश. [सं.]

**पराजित** वि. पराभूत; पराजय झालेला. [सं.]

**पराटा-ठा-डा** पु. रोटीचा एक प्रकार. तव्यावर तुपात तळलेली सपिटाची घडीची लहान पोळी. हिला चिरोट्याप्रमाणे पापुद्रे असतात. [हिं.पराठा]

**परा(ऱ्हा)टी** स्त्री. १. कापसाचे झाड. (खा., व.) २.कापूस काढल्यानंतर राहिलेले कापसाच्या झाडाचे काड.

**पराठे** वि. सुलट. (गो.)

**पराड** स्त्री. एक मोठा साप. (व.)

**पराड** न. शंभर यार्डांचे अंतर.

**पराड-डी** स्त्री. पर्वतांची रांग.

**पराडा** पु. १. माळाचा उताराचा भाग. २. शिखर : 'पराडे कैवल्यगिरीचे : उचावले दिव्य तेजाचे' – सव २६०. [सं.प्रवयण]

**पराण** स्त्री. तबल्याची गत.

**पराणी** स्त्री. १. बैलाला टोचण्याची अणी; आर; हत्यार. २. (ल.) नेट; जोर. [सं.प्रवयण]

**पराण्ह** न. सूर्योदयापासून सहा-सहा घटकांचा एक अशा पाच भागांपैकी तिसरा भाग. पहा : **अपराण्ह** [सं.]

**परात** स्त्री. ताटाच्या आकाराचे धातूचे मोठे पात्र; मोठी पितळी [सं.पर + पात्र]

**परात्पर** वि. अत्यंत श्रेष्ठ; उच्च (ईश्वर).

**परात्मता** स्त्री. दुसऱ्याचा जीव आपलाच असणे ही भावना.

**परात्मा** पु. परा वाचेच्या पलीकडील आत्मा; अत्युच्च आत्मा; शिव. पहा : **शिवात्मा** [सं.]

**पराधीन** वि. परस्वाधीन; परतंत्र. [सं.]

**पराध्वनिक** वि. ध्वनीच्या गतीहून जास्त जलद जाणारा. (इं.) अल्ट्रासाऊंड.

**पराने** स्त्री. बैलांना हाकलण्याची काठी. (अहि.)

**परान्न** न. १. दुसऱ्यांचे अन्न, जेवण. २. घराबाहेरील जेवण. [सं.]

**परान्नपुष्ट** वि. दुसऱ्याच्या जिवावर जगणारा; ऐतखाऊ.

**परापम** पु. (ज्यो.) पहा : **परमक्रांति** [सं.]

**परापर-रा** क्रिवि. पहा : **परपर-रा** [ध्व.]

**परापरथडी** स्त्री. १. प्रवृत्ती व निवृत्ती हे तीर. २. सायुज्य मुक्ती; पैलतीर.

**परापवाद** पु. परनिंदा; दुसऱ्याची कुचेष्टा : 'न देखे आपुलें केलें । परापवाद स्वयें बोले ।'- एभा. २३.२७४ [सं.]

**पराव** स्त्री. सणाच्या दिवशी आश्रिताला द्यावयाचा नारळ वगैरे देणगी. [हिं.परब = सण;सं.पर्व]

**पराभव** पु. पहा : **पराजय** [सं. परा + भू]

**पराभवय्या** वि. पराभव करणारा : 'बलाढ्य शत्रु पराभवय्ये ।'- ऐपो २२६.

**पराभूत** वि. पराभव झालेला.

**परामणी** (विणकाम) पहा : **परमणी**

**परामर्श** पु. १. विचारपूस; समाचार (गरीब लोकांच्या सुखदुःखाचा, आप्तेष्टांच्या प्रकृतीचा, पाहुण्यांच्या मेजवानीचा वगैरे). (क्रि. घेणे, करणे.) २. (ल.) मदत करणे; विपत्ती दूर करणे (स्वकीय, गोरगरीब यांची). ३. (तर्क.) नियम लागू करण्याच्या उदाहरणाची जाणीव; अनुभवाने तत्त्वाची, सत्याची झालेली जाणीव; एखादी विशिष्ट कृती किंवा परिणाम पाहिल्यामुळे त्यापासून काढलेला सर्वसाधारण निष्कर्ष. ४. जाणवणे; पटणे; कळवळा. [सं.]

**पराय** स्त्री. तांदळाच्या पिकाचा चारा. (अहि.)

पराय स्त्री वयः 'ते धाकुटेचि परायेचे ।'- स्मृस्थ ७५.

**परायण** वि. १. अनुसरणारा; चिकटून राहणारा; आसक्त; तल्लीन. २.वाहिलेली; योग्य; जोगती; नेमून दिलेली. ३. संबद्ध; निगडित. ४. तत्पर; सिद्ध; उत्सुक. [सं.]

**पराया** वि. १. तिऱ्हाईत; परका. २. दुसऱ्याचा. [हिं.]

**पराया गांडीचा पलिता** तोड्याची किंवा रंजकेची बंदूक. ही पेटण्यासाठी तोड्यावर अवलंबून असते.

**परार्क** पु. सूर्य. [सं.]

**परार्थ** पु. दुसऱ्याची मालमत्ता; संपत्ती; धंदा; उद्दिष्ट इ. [सं.]

**परार्थशूर** वि. १. दुसऱ्याचे काम करण्यास तत्पर; सार्वजनिक हितासंबंधी कळकळ बाळगणारा. २. दुसऱ्याने स्वार्थत्याग करावा असे सांगणारा, पण स्वत: मात्र पैसा न खर्चणारा. ३. दुसऱ्याच्या वस्तूचा फायदा घेणारा; दुसऱ्याचे लुबाडणारा. [सं.]

**परार्ध** न. १. उत्तरार्ध. २. एकावर अठरा शून्य इतकी संख्या. ३. ब्रह्मदेवाचे अर्धे आयुष्य. ४. दशांश स्थाने. [सं.]

**परावर** वि. १. सर्व ठिकाणी असणारा. २. श्रेष्ठ-कनिष्ठ.

**परावर्त, परावर्तन** पु.न. १. पराङ्मुख होणे; मागे फिरणे; वळणे; परतणे. २. उलटविणे; रद्द करणे (शिक्षा). ३. (शाप.) परत जाणे; उलटणे. (इं.) रिफ्लेक्शन. ४. शुद्धी; मूळ पदाला परत येणे. [सं.]

**परावर्तक** पु. (शाप.) परावर्तन करणारे (भिंग इ.).

**परावर्त्य व्यवहार** (कायदा) १. अपील; दाद. २. निकाल फिरविणे. पहा : **परावर्त** २

**परावन्** न. वहाण. (व.) पहा : **परव्हाण**

**परावर्ण** न. उपरण्यासारखे पांघरण्याचे वस्त्र : 'फुटा परावर्ण करिति ।'- निपू १०.३. [सं.प्रावर्ण]

**परावा** पु. १. दुसरा; तिऱ्हाईत; परका. २. वेगळी; नवीन (वस्तू) : 'धरून परावी आस । प्रेत्न सांडी सावकाश ।' - दास २.१.१७. [सं.परकीय]

**परावृत्त** वि. १. पहा : **पराङ्मुख**. २. उलटलेले; उलटविलेले. ३. परत दिलेले; केलेले. [सं.]

**परावृत्ति-त्ती** स्त्री. १. माघारी वळणे; परत येण्याची व्यवस्था. २. उलटणे; बदलणे; फिरवणे. ३. परत देणे, मिळणे ( पैसा, संपत्ती).

**पराव्यवसायी** वि. एखाद्या क्षेत्रात भरपूर प्रशिक्षण मिळालेला आणि तज्ज्ञाच्या हाताखाली मदतनीस म्हणून काम करू शकणारा.

**पराशव पुत्र** (कायदा) रखेलीपासून झालेला पुत्र. [सं.]

**पराश्रम** पु. परकीयांचा प्रवेश : 'नबाबास आपल्या स्थळामध्यें पराश्रम होऊं न देणें' - शाछ १.११ [सं.पर + आश्रम]

**परास्कंध** पु. शनिमंडळापासून सप्तर्षीपर्यंत मर्यादा असलेला सप्तस्कंधातील सहावा स्कंध. हे सप्तस्कंध म्हणजे अवास्कध; गवस्कंध; उद्वस्कंध; सहस्कंध; विवस्कंध; परास्कंध व परिवाहकस्कंध हे होत.

**परास्त** वि. मागे परतविलेला, सारलेला; दूर केलेला : 'रडलों आम्हीं सर्वहि होऊनि धवलाश्वशरपरास्त रणीं ।' - मोभीष्म ११.१३०.[सं.]

**पराळ** न. भाताचे काड; भात्याण; पेंढा. (को.) [सं. पलाल]

**पराळ** पु. पहा : **परळ** १

**पराज्ञाधर** वि. दुरूनही अंत:करणाद्वारे विद्या देणारा : 'एकु आज्ञाधरु : एकु पराज्ञाधरु : श्रीकृष्ण ते पराज्ञाधर : म्हणौनि दुरौनि अंत:करणें विद्या देति' - लीचऊ ४५८.

**परांची** स्त्री. (स्थापत्य) माळा; पहाड; पालख. माचोळी; इमारतीचे काम करताना गवंडी, सुतार वगैरेंना घडवंचीप्रमाणे उपयोग व्हावा म्हणून करतात तो लाकडी माळा.

**परि** उअ. परंतु; पण : 'स्पष्ट बुडालों होतों, वा गेलो शरण मीं परि भवातें ।'- मोअनु ६.३१.

**परि** एक संस्कृत उपसर्ग, हा धातू आणि धातुसाधित नामे यांना लागतो. याचे काही अर्थ असे - १. जिकडे-तिकडे; सभोवार; चहूकडे. २. आणखी; खेरीज. उदा. परिपाक, परिपाठ. ३. विरुद्ध; उलट. उदा. परिच्छिन्न. ४. अतिशय; फार. उदा. परिशुद्ध, परिपूर्ण; परिपक्व इ. ५. सूक्ष्म; काटेकोर इ. ६. पूर्णपणे. [सं.]

**परिएळ** न. नैवेद्याचे ताट; तबक : 'परिएळ न्या वेगीं'- दृपा ५५.

**परिकर** पु. १. कमरेभोवती गुंडाळण्याचे एक वस्त्र. पहा : **परकर**. २. विस्तार; प्रपंचाचा पसारा : 'टाकूनि एक घर । दुजे गृहांत जातांवर । खांदीं घेऊनि परिकर । त्या घरीचा ने जसा ।' - यथादी २.११३७. ३. अंगण; भोवतालची जागा; परसू. ४. वेढा : 'म्हणौनि वेढिला भवंता । घातला असे परिकरु ।' - उह १२३३. ५. मेळावा : 'राम कि महावदेवी परिकर....'- गरा १७७. ६. आच्छादन : 'माचां घातला परिकरु'- उह २७१. ७. आधार; आश्रय : 'करावा परिकर रामनामीं' - ज्ञागा १२३. [सं.]

**परिकर** पु. १. रीत; पद्धत; चाल; तऱ्हा. २. जात; प्रकार. वि. १. चांगले; सुंदर; मूल्यवान : 'मुक्तें सांडून परिकरें । कां पदरीं बांधावी खापरें ।'- रावि २४.१२३. २. सुसंबद्ध; सिद्ध : 'हरिनाम चोख पवित्र परिकर' - सोपानहरि १२. [सं.परि + कर]

**परिकर, परिकरांकुर** पु. अलंकार जेथे विशेष्य साभिप्राय आहे, तेथे हा अलंकार होतो. उदा, 'कंपाते भीष्मार्जुन देती अचळेसि शस्त्र संपाते ।' - मोभीष्म ३.३०.

**परिकरणे** उक्रि. नेमून देणे; नियोजिणे : 'असें परिकरोनि प्रमाण । अत्रिनंदन पै गेला ।' - नव २.५५. [सं.परि + कृ]

**परिकर्म** न. १. प्रारंभीचे, अनुषंगिक काम. २. (अंकगणित) एक प्राथमिक, मूलभूत नियम. (बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्ग, वर्गमूळ, घन आणि घनफळ. असे आठ नियम आहेत.) ३. अंगावर भूषणे इ. धारण करण्याची क्रिया; प्रसाधन. ३. पूजा; सेवा. [सं.]

**परिकार** पु. सेवक; भक्त : 'परिकार एकणें ग ? एकु'- पांढर शिला ।। ३.२६. [सं.]

**परिकाळा** पु. विलंब : 'आतां परिकाळा काइसा' -उह २००७ [सं. प्रकाल]

**परिकीर्तन** न. सांगणे; निवेदिणे. २. जाहीर करणे. ३. बढाई. [सं.]

**परिक्रम, परिक्रमण** पु.न. १. प्रदक्षिणा. २. मौजेने फिरणे; भटकणे. [सं.]

**परिखा** स्त्री. किल्ला, राजवाडा यांच्या भोवतालचा खंदक; चर: 'परिखा करवा मोठी या शरतल्पासभोंवतीं खोल ।'- मोभीष्म ११.१४६. [सं.]

**परिखा** वि. परका : 'त्या दंपत्याचे सुखभेटी । परिखे देखतां लाज उठी ।' - एभा १३.५९४.

**परिगणन-ना** न. स्त्री. १. वेचणी; निवड. २. मोजणी; मोजदाद; गणती. [सं.]

**परिगुण** पु. १. सुसंधी; योग्य संयोग; प्रसंग : 'ययालागीं हें बोलणें। अनुभवामृतपणें । स्वानुभूति परिगुणें। वोगरिलें ।'- अमृ १०.२४. २. पाहुणचार. पहा : **परगुणे**

**परिगृहीत** वि. अंगीकृत; पसंत; मान्य केलेले; घेतलेले. [सं.]

**परिग्रह** पु. १. परिवार; लवाजमा; आश्रित लोक; खटला; कुटुंब : 'आणि समर्थु आपुला खोडा । शिसें वाहती जैसा होडा । तैसा भुंजौनि जो गाढा । परिग्रहो ।'- ज्ञा १८.१०६२. २. (कायदा) (अविनियुक्त, उपयोगात न आणलेल्या अशा कोणत्याही वस्तूचा) ताबा किंवा कबजा घेणे. ३. घेणे; स्वीकारणे. ४.गोळा करणे; जमविणे. ५. पसारा : तेथ देहसंबंधें परिग्रहो । उरावया ठावो मग कैंचा ।' - एभा २६.३४५. ६. दान; इनाम. ७.संग्रह. ८. सामान; गाठोडे. [सं.]

**परिग्रही** वि. १. कुटुंबवत्सल; संसारी. २.दान घेणारा. [सं.]

**परिग्राफ** पु. लेखखंड; लेख; परिच्छेद. [इं.]

**परिघ** पु. १. पहा: **परीघ**. २. (ज्यो.) सत्तावीस योगांपैकी एकोणिसावा योग.

**परिघाटणे** सक्रि. सभोवती ढवळणे; घाटणे: 'कांडणें, कुटणें परिघाटणें पाकक्रियेचीं लक्षणें ।' - मुविराट २.७५. [सं.परि + घट्टन्]

**परिचय** पु. १.ओळख; सहवास; घसट; संबंध; माहिती. २. (प्रत्यय याबद्दल चुकीने) अनुभव; अनुभविक ज्ञान; प्रतीती. (क्रि. घेणे, पाहणे, येणे, उतरणे.) [सं.परि + ची]

**परिचरणे** क्रि. श्वासोच्छ्वास चालू राहणे.

**परिचर्य-र्या** न.स्त्री. १. सेवा; चाकरी; शुश्रूषा: 'आणिकां एवढें नाहीं धैर्य । यालागीं तुझे परिचर्य ।'- एभा ४.१३६. २. ठेवा. [सं. परि + चर्]

**'परिचल भांडवल** खेळते भांडवल.

**परिचायक** (व्या.) निर्देश करणारा; दाखविणारा; व्याख्या, विवरण करणारा; परिचय करून देणारा. [सं.]

**परिचार** पु. १. प्रदक्षिणा. पहा : **परिक्रम**. २. देशाटन; परिभ्रमण. ३. प्रचार; इकडे-तिकडे हिंडणे : 'परिचारी केली आपुलीच रूढी । पोटींची ती कुडी ठावी नाहीं ।' -तुगा ३५६१. ४. व्यापार : 'निमिषोन्मेषांचे संचार । श्वासोच्छ्वासांचे परिचार ।' - एभा ३१.५१०. ५. चाल; रीत; परंपरा. पहा : **प्रचार** [सं. परिचार, प्रचार]

**परिचारक** वि. सेवक; चाकर; अनुयायी. [सं.]

**परिचारिका** स्त्री. दासी; सेविका; सखी; नर्स. [सं.]

**परिचालक** पु. अग्निबाणामध्ये उद्दहन होऊन बाण वर जाण्याची क्रिया होण्यासाठी वापरण्यात येणारे इंधन; (इं.) प्रॉपेलंट.

**परिचित** वि. १. ओळखीचा; माहितीचा (मनुष्य, गोष्ट). २. ओळखणारा; माहीत असलेला. [सं.]

**परिच्छि(छि)न्न** वि. १. अलग केलेला; तोडलेला; निराळा; निश्चित. २. मर्यादित; विभागलेला; भाग पाडलेला (प्रकरण, भाग इ. नी). क्रिवि. १. निश्चितपणे; नक्की; हमखास. २. उघडपणे; स्पष्टपणे; खडखडीत; खसखशीतपणे (सांगणे, बोलणे.) ३. (नकारार्थी) केव्हाही मुळीच नाही; कोणत्याही प्रकारे, दृष्टीने नाही: 'त्यांचा पैका परिच्छिन्न मजूरा पडणार नाहीं.' - वाडसमा १.२. [सं.]

**परिच्छिन्न (करण)** न. (नृत्य.) दोन्ही हात वक्षस्थळावर ठेवणे, डोके

सन्नत करणे व कंबर पुढे-मागे हलविणे.

**परिच्छेद** पु. १. वेगळा, भिन्न करणे; निश्चित करणे. २. विभागणी; खंड, भाग, प्रकरण, इ. पाडणे; इयत्तीकरण. ३.भिन्नपणा; वाटणी. ४. प्रकरण अध्याय; भाग; सीमा. ५. लेखखंड.(इं.) पॅरेग्राफ.

**परिच्छेदक** वि. तुकडे, भाग पाडणारा; वेगळे करणारा.

**परिजन** पु. चाकर; सेवक. पहा : **परिचारक** [सं.]

**परिणत** वि. १. परिपक्व; परिपूर्ण; पूर्णावस्था प्राप्त झालेला; प्रौढ : 'जयजय देव अद्वितीय । परिणतोपरमैकप्रिय ।'- ज्ञा १८.९. २. नम्र; वाकलेला; वाकणारा. ३.(ल.) लक्ष वेधलेला, वेधणारा; निर्दिष्ट. [सं.]

**परिणति-ती** स्त्री. १. पूर्णावस्था; पक्वता. २. वाकलेली अवस्था; विनीत स्थिति. ३. नमस्कार; प्रणाम. ४. उतरतेपणा; उतार. ५. निर्दिष्ट स्थिती. ६. (गणित) फल. (इं.) फंक्शन.

**परिण(णा)मणे** १. परिपक्व, फलद्रूप होणे : 'ऐसें स्वानुभवविश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे । तें सात्त्विक येणें नामें । बोलिजे सुख ।'-ज्ञा १८.७९३. २. पालटणे; बदलणे : 'चुकलें मत्प्राप्तीचें वर्म । तो धर्म अधर्म परिणमे ।' - एभा १४.२९९. ३. विस्तारणे : 'सोने परिणामलें सांखळें। कीं साडे पन्हरें जालें कडिवळें।'- ऋ ९३.

**परिणय, परिणयन** पु.न. लग्न; विवाह : 'शांति पतिव्रते झालें परिणयन। काम संतर्पण निष्कामता ।'- तुगा ४१५६. [सं.परि + नी]

**परिणाम** पु. १. शेवट; निकाल; अखेरी; सार; फळ; निष्पत्ती. २. (व्यापक, सामा.) सुखप्रकारक शेवट (काम, धंदा वगैरेचा); सिद्धी. ३. अडचणीतून निभावून गेलेली गोष्ट; यशस्वी निकाल; धडगत (नकारार्थी प्रयोग). (क्रि. लागणे). ४. आकार, स्थिती यांचे रूपांतर; बदल; अवस्थांतर; स्थित्यंतर. ५. अंतिम अवस्था; अखेर; चरमावस्था. ६. (ल.) ब्रह्म : 'जो निजानंदें धाला । परिणामु आयुष्या आला । पूर्णते जाहला । वल्लभु जो ।' - ज्ञा १२.१७१.७. पूर्व कारणाचा मुळातल्या वस्तूचा लोप होऊन रूपांतराने बनणारी वेगळी वस्तू. जसे :- दूध या मूळ कारणाचे झालेले दही हे रूपांतर.

**परिणाम दाह** पु. १. मरण्याच्या वेळी शरीराची होणारी आग, जाळ, भडका, दाह. २. अन्नपचन होत आल्यावर रिकाम्यापोटी उठणारी आग.

**परिणामशुद्ध** वि. ज्याचा शेवट गोड होतो ते; सुपरिणामी; सुखपर्यवसायी.

**परिणामशूल** १. अन्नपचन चांगले झाले नसता पोटात उठणारी कळ. २. अन्नपचन पुरे झाले असता पोटात होणारी आग. पहा : **परिणामदाह.** ३. मरणाच्या वेळच्या वेदना; शेवटची धडपड. ४. कोणताही असह्य रोग.

**परिणिणे** क्रि. स्वीकार करणे.

**परिणीत-ता** वि. विवाहित; लग्न झालेली (स्त्री). [सं.]

**परित** क्रिवि. सभोवती; चहूकडे. [सं.]

**परिता पु.** मोटेचे खालचे लांबोळे चाक. (व.)

**परिताप** पु. संताप.

**परितारिका** स्त्री. डोळ्यांतील पारपटलाच्या मागे असणारा अपारदर्शक पडदा.

**परितोष, परितोषण** पु.न. संतोष; समाधान; आनंद. [सं. परि + तुष्]

**परितोषक** न. देणगी; मेहनताना. पहा : **पारितोषिक**

**परित्यक्त** वि. सर्वथा सोडलेला; टाकलेला. [सं.]

**परित्यक्ता** वि. नवऱ्याने टाकून दिलेली. [सं.]

**परित्याग** पु. त्याग; सोडणे; सर्वस्वी टाकणे. [सं.]

**परित्राण** न. १. संरक्षण; रक्षण. २. नीट, दुरुस्त करणे; परिपूर्ण करणे. [सं.]

**परित्राता** वि. रक्षणकर्ता; संगोपन करणारा; राखणारा. [सं.]

**परित्वा** पु. परिभ्रमण; प्रवास (क्रि. करणे, पडणे) [सं.परीत्वा]

**परिदर्शक** पु. पाणबुडीतल्या लोकांना पाण्याच्या वरचे दिसावे म्हणून आरसे व भिंग यांचा वापर करून तयार केलेले उपकरण; (इं.) पेरिस्कोप.

**परिदान** न. १. साटेलोटे. २. फेर मोबदल्याचा व्यवहार; विनिमय. ३. परत करणे; मोबदला देणे. [सं.]

**परिदाह** पु. ताप; दुःख. [सं.]

**परिदृश्य** न. सभोवतालची सृष्टी; परिसर; परिस्थिती.
वि. कळून येण्याजोगा, लक्षात येईल असा.

**परिदेवन** न. शोक; दुःख; विलाप; पश्चात्ताप; रुदन. [सं.]

**परिधान** न. १. नेसणे; पांघरणे; वापरणे; अंगावर घेणे (वस्त्र). २. पांघण्याचे, नेसण्याचे वस्त्र : 'परिधानें तें झळकती ।'-वेवीस्व ९.९१.

**परधानय, परिधेय** वि. परिधान करण्याला नेसायला योग्य (वस्त्र).

**परिधि-धी** पु. १. श्रौताग्नीच्या कुंडाच्या दक्षिण, पश्चिम व उत्तर या तीन बाजूंना ठेवण्याच्या तीन लांबट समिधांपैकी प्रत्येक. २. भोवतालची रेघ; सभोवार; घेर(शेंडीभोवतालचा इ.); एखाद्या वस्तूभोवती वेढा. ३. वेढणारा पदार्थ, वस्तू. ४. सूर्य-चंद्राचे खळे. ५. प्राक्चक्र; नीचोच्चवृत्त. ६.दिशा. [सं.]

**परिनाळिका** स्त्री. १. नाला; पाट; गटार. २. (ल.) व्यवस्था; पद्धत; व्यवस्थित मांडणी; लावणी. ३. रूढ झालेला, योग्य मार्ग. ४. रीत; क्रम; परंपरा. ५. रडगाणे; कंटाळवाणी लांबलचक गोष्ट. (क्रि. लावणे, करणे, लागणे, पडणे, चालणे.). ६. शाळुंके वरचे तीर्थ जाण्याची पन्हाळी. [सं.प्रणालिका]

**परिनियम** पु. लिखित कायदा.

**परिनिर्वाण** न. महानिर्वाण; अवतार समाप्त होणे.

**परिनिरीक्षण** न. छाननी; चिकित्सा; बारकाईने केलेला तपास.

**परिनिष्ठ** वि. निपुण; निष्णात: 'वेदशास्त्रपरिनिष्ठ । श्रवणमनन अभ्यासयुक्त।'- एभा १९.२५. [सं.]

**परिपक्व** वि. १. पूर्ण पिकलेला; तयार झालेला; पक्का. २. (ल.) प्रौढ.[सं.]

**परिपत्रक** न. सभासदांमध्ये फिरविण्याचे पत्रक; सूचनापत्रक.

**परिपंथना** स्त्री. १.(औषधाचे) पथ्य (व.) २. तजवीज. (व.)

**परिपंथी** वि. अनुकूल : 'ते सुधारणेस परिपंथी झाल्यामुळे...'- समग्र कोल्हटकर १.३९.

**परिपाक** पु. १. पूर्णावस्था; विकास (फळे, अन्न, धान्ये, मूर्खपणा, दुष्टपणा इ. चा) : 'क्रोध ऐसा महादोखु । जयाचा देखां परिपाकु।'- ज्ञा १८.१०५८. २.(दुष्कृत्याचे ) फळ; परिणाम; शेवट : 'आचरे दोष न धरी धाक । परीपाक दुःखाचा ।'- तुगा ३१४२. ३. अन्नपचन.

४. काढ्यातील महत्त्वाची वनस्पती, द्रव्य. ५. शिजविणे : 'तुका म्हणे जैसा कुचराचा दाणा । परिपाकीं जाणा खोटा तैसा ।'- तुगा ५३८. [सं. परि + पच्]

**परिपाटक** पु. एक औषधी वनस्पती. (गो.)

**परिपाटी-ठी** स्त्री. १. क्रम; अनुक्रम; व्यवस्था; प्रघात; प्रस्थापित रीत; मार्ग; परिनाळिका. २. (अंकगणित) संख्यालेखनपद्धती. ३. विचार. वि. व्यावहारिक; रूढ : 'जरत्कारी नाम परिपाटी । कन्या असेल जयाच्या पोटीं ।' - मुआदि ९.९. [सं.परिपाटी]

**परिपाठ** पु. १. परिपाठी; चाल; रीत; रूढी. २. प्रघात; वहिवाट; पद्धत. प्रकार; चाल. (क्रि. घालणे). ४. प्रवृत्ती, बळ.

**परिपार्श्व** क्रिवि. सर्व बाजूंनी; सभोवती. पहा : **परित** [सं.]

**परिपीठिका** स्त्री. मूळ पीठिका. पहा : **पीठिका** ३ [सं.]

**परिपुष्ट** वि. १. पहा : **पुष्ट.** २.दुजोरा, पाठिंबा, बळ मिळालेला.[सं.]

**परिपूर्ण** वि. १. संपूर्ण; अगदी भरगच्च; सगळे. २. तयार; जय्यत; सिद्ध. ३. पुरा झालेला; संपविलेला. ४. तृप्त. [सं.]

**परिपूर्ति-र्ती** स्त्री. १. संपूर्णता; समाप्ती. २. पूर्ण तृप्ती; समाधान.

**परिपैसी** स्त्री. व्यापकता.- शर.

**परिप्रवासी** वि. स्थलांतर करणारा (पक्षी).

**परिप्रश्न** पु. अव. खटला सुरू होण्यापूर्वी एका पक्षाने दुसऱ्या प्रतिस्पर्धी पक्षाला विचारलेले लेखी प्रश्न. (यांची उत्तरे देणे कायद्याने बंधनकारक असते.)

**परिप्रेक्ष्य** न. १. एखाद्या गोष्टीकडे बघण्याचा दृष्टिकोन. २. लांबी, रुंदी, जाडी समप्रमाणात असणारे चित्र.

**परिप्लुतता** स्त्री. पुरेपूर भरणे. (इं.) सेच्युरेशन. [सं.परि +प्लु]

**परिबळ** वि. प्रबळ; भरपूर : 'तुं पाउस बरखसी परिबळु : वीरश्रीयेचां' - मूप्र २५९७. [सं.प्रबल]

**परिबंध** वि. सीमा; मर्यादा; आलेख.

**परिभव** पु. अनादर; पराभव. (समासात) काम-क्रोध-लोभ-पितृ-पुत्र-स्त्री-विषय परिभव. [सं.]

**परिभाष** स्त्री. टीकाग्रंथ; भाष्य : 'वैद्यक गायनविद्या नाना परिभाष ।' - स्वादि ४.५.२०. [सं.]

**परिभाषा** स्त्री. १. शास्त्रीय ग्रंथातील विशेष अर्थाचा शब्द. संज्ञा; शास्त्रीय संज्ञा. २. स्पष्टीकरणात्मक, व्याख्या; ग्रंथातील चिन्हे, खुणा इ. ३. प्रस्तावना; आरंभीचा भाग; पूर्वपीठिका. ४. (ल.) (धंदा वगैरेची) मूलतत्त्वे; सामान्य सिद्धांत; पहिले मुद्दे. ५. (वैद्यक) चिकित्सा; साध्यासाध्य विचार. ६. (व्या.) पाणिनीच्या नियमांच्या स्पष्टीकरणार्थ केलेले विवरण, विवेचन. ७.(सामा.) विवेचन; विवरण : 'हें काय एकैक ऐसैसें । नाना परिभाषावशें ।'- ज्ञा १८.११. ८. रूपकात्मक भाषा.

**परिभाषण** न. १. निंदा; निर्भर्त्सना. २.ताकीद; बजावणी. ३. करार. ४. एखाद्याला मारलेला टोमणा; कुजके बोलणे.

**परिभ्रमण** न. १. भटकणे; फिरणे. २.प्रदक्षिणा घालणे; गोल फिरणे.[सं.]

**परिमल-ळ** पु. सुवास; सुगंध. [सं.]

**परिमळणे** अक्रि. १.सुगंध सुटणे; दरवळणे. २. सुगंधी द्रव्य लावणे.

**परिमाण** न.१. माप; मान; परिमिती; संख्या. २. ज्यामुळे वस्तू इ. चे आकारमान, प्रमाण इ. निश्चित केले जाते अशी रीत, नियम. ३. लांबी; वजन, आकार, काळ इ. चे मोजमाप, त्याचे साधन. ४. मोजणी; मापन; मिती. ५. मापाचे किंवा मोजण्याचे तीन प्रकार - अणू (परमाणू), महत आणि परम महत परिमाण. ६. भूमितीविषयक मापन, मोजमाप. [सं.परि+मान]

**परिमार्गण** न. सभोवार केलेला शोध. [सं.]

**परिमार्जन** न. १. धुणे; स्वच्छ, शुद्ध करणे; प्रक्षालन; पापाबद्दल घेण्याचे प्रायश्चित्त. २. (ल.) क्रोध, शोक वगैरेंवर काही उपाय करून निरसन करणे. [सं.]

**परिमिति-ती** स्त्री. १. मोजून निश्चित केलेली संख्या. पहा : **परिमाण.** २. मोजणी; गणना. ३. मर्यादा; नक्की प्रमाण. ४. (गणित) आकृतीची मर्यादा दाखविणाऱ्या सर्व रेषांची बेरीज.

**परिमेय** वि. मोजण्यासारखे-लायक-योग्य. [सं.]

**परिमेयीकरण** न. दोन किंवा अधिक करणींचा गुणाकार. [सं.]

**परियवसणे** अक्रि. १. अनुभवास येणे : 'म्हणोनि परत्वें ब्रह्म असे । तें आत्मत्वें परियवसे ।'- ज्ञा १७.३७७. २. शेवट होणे. [सं.पर्यवसान]

**परिय(ये)सणे** उक्रि. ऐकणे; लक्ष देणे : 'परियेसी केशवा विनंति माझी।'- तुगा ९. [सं.परिश्रवण]

**परिय(या)ळ** पु. न. एक खाण्याचा पदार्थ; मांडा; (पक्वान्न) : 'मनोरथांचे परियळ । आरोगिजतु कां लक्षवेळ ।' - अमृ ६.३३.

**परियंदणे** सक्रि. झोके देणे : 'बाइला लोकरुवांतें परियंदति' - लीचपू १८०.

**परिया** पु. झोका : 'हृदयाकाशपल्लकीं । परिये देसी निजे ।' - ज्ञा १२.५. [क. परि=हालणे, वाहणे]

**परिया** पु. नाला; ओढा; पऱ्ह्या. [सं.प्रवाह]

**परिया(य)ळ** न. १. भिक्षापात्र; परळ. २. जेवणाचे पात्र; ताट : '(तुलसी) दळ घालोनिया परियाळीं ।'- कथा ४.१८.१४३.

**परिरक्षक** पु. अन्नधान्य बराच काळ टिकण्यासाठी वापरले जाणारे, मीठ, मसाल्यासारखे, सायट्रिक ॲसिडसारखे रासायनिक पदार्थ.

**परिरंभ** पु. आलिंगन : 'त्या विजयश्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो।'- मोद्रोण ३.८८. [सं.]

**परिलब्धी** स्त्री. वेतनेतर प्राप्ती (उदा. फुकट घर-गाडी इ.); (इं.) पर्क्स.

**परिलेख** पु. नकाशा : 'जलयान, पादत्राण, परिलेख वगैरे अपरिचित शब्द प्रथमत: योजून...' नि ४८८ [सं.]

**परिवट-वंटा** पु. न. १. सामानाचे गाठोडे : 'बोणेबाइयांची वाटी : परिवंटा।'- लीचपू ९४. २. नेसलेल्या वस्त्राच्या निऱ्यांची पोटावर दुमडून खोचलेली घडी : 'परिवटु दाटिला राजवल्लभा' - रूख १७२. [सं. परिवर्त]

**परिवडणे** सक्रि. १. प्रकार करणे; प्रत लावणे; वस्तू विशिष्ट पद्धतीने मांडणे. २. वर घालणे : 'आधींच द्रव्यें चुरमुरीं । वरि परिवडिजती मोहरी । जिये घेतां होती धुवारी । नाकें तोंडें ।'- ज्ञा १७.१४६. ३. कालवणे; माखणे : 'गुळें गूळ परिवडिला । मेरू सुवर्णे मढिला ।'- अमृ ७.२४९. [सं.परि + वृ]

**परिवडी** स्त्री. पद्धत; रीत; प्रकार.

**परिवर** न. माजघर; घर : 'दारीं परिवरीं । कुडीं कवाडीं मी घरीं ।' – तुगा १३९७.
**परिवर** पु. प्रकार. – शर
**परिवर** न. गुप्तस्थान. [सं.परिवार]
**परिवर्जन** न. पहा : **परित्याग** [सं.]
**परिवर्जित** वि. पहा : **परित्यक्त**
**परिवर्त, परिवर्तन** पु. न. १. सभोवती फिरणे; प्रदक्षिणा करणे. २. फेड; मोबदला. ३. आमूलाग्र बदल; मूलगामी बदल; पालट. [सं.परि + वृत्]
**परिवर्तक** न. दिष्ट धारेचे प्रत्यावर्ती धारेत किंवा प्रत्यावर्ती धारेचे दिष्ट धारेमध्ये रूपांतर करणारे विजेचे उपकरण. (इं.) जनरेटर.
**परिवर्तक** पु. विद्युत्धारेचा प्रवाह उलट फिरवण्याचे, परावर्तित करण्याचे उपकरण. (इं.) ट्रान्सफॉर्मर.
**परिवर्तनी एकादशी** स्त्री. भाद्रपद वद्य एकादशी.
**परिवलन** न. स्वतःच्या आसाभोवती फिरण्याची गती.
**परिवसणे** सक्रि. स्पर्श करणे : 'कीं परिवसलिया पोथी । वाचिली होय ।' – ज्ञा १५.३९४. [सं.परि + वस्]
**परिवहन** न. वाहतूक.
**परिवंडा** पु. सेवक; भक्त : 'परिवंडे मराठे ' – पांढर शिला ||| १.११.
**परिवंडणे** सक्रि. माखणे; लिंपणे : 'गुळें गुळ परिवंडिला'– अमृ ६३७. [सं.परि + मृद्]
**परिवंणे** क्रि. दाबणे; चुरणे : '(पाओ) परिवंति'– लीचपू २४३. [सं.परि + मृद्]
**परिवाण** न. भाषा; शब्द; बोलणे.
**परिवाण** न. जहाज : 'साघरी परिवाणें न चलती ।'– क्रिपु ३६.३४. [हिं. परबान]
**परिवार** पु. १. आश्रित; लवाजमा; घरचा, पदरचा खटला, कुटुंब; अनुयायी. २. मर्यादित केलेली जागा: 'फांकलिया इंदीवरा । परिवारु नाहीं धनुर्धरा । –ज्ञा १३.३६१. ३. विस्तार. [सं.]
**परिवारणे** सक्रि. १. वेष्टणे; वेढणे; सभोवती जमा होणे : 'असो तिहीं परिवारला' – रास १.१०९५. २. विस्तारणे.
**परिवाहस्कंध** पु. सप्तस्कंधातील शेवटचा स्कंध.
**परिवाहित** पु. (नाट्य. नृत्य.) क्रमाने एकदा उजवीकडे व एकदा डावीकडे डोके करून विस्मय, आनंद, स्मरण, विचार, मग्नता इ. गोष्टी या अभिनयाने दाखविल्या जातात.
**परिवीक्षा** स्त्री. १. उमेदवारी; उमेदवारीचा काळ; नोकरीत कायम होण्यापूर्वीचा कालावधी. २. विशिष्ट कामासाठी उमेदवार योग्य आहे का नाही हे ठरवण्यासाठी त्याच्या गुणांचे, वर्तनाचे केलेले निरीक्षण.
**परिवृत्त** वि. वेष्टलेला.
**परिवेदन** न. १. सविस्तर सांगणे; विस्तारपूर्वक कथन करणे. २. ज्येष्ठ बंधूंपूर्वी कनिष्ठ बंधूचा विवाह (होणे, करणे).
**परिवेष** पु. १. चंद्र-सूर्याभोवतालचे खळे. २. परिधी; परीघ. ३. (मानस.) व्यक्तीच्या भोवती असणारे सांस्कृतिक व सामाजिक वलय. [सं.]
**परिवेषक, परिवेष्टा** पु. वाढपी; जेवणारास वाढणारा; सेवक. [सं.]
**परिवेषण** न. १. अन्न, पदार्थ वाढणे : 'परिवेषण करितां । चतुर्विधें अन्नें ।' – रास १.१९७. २. गुंडाळणे; वेढा घालणे; वेढणे. [सं.]
**परिवेष्टक** पु. गुंडाळण्याची यंत्रणा. उदा. घड्याळातील स्प्रिंग. [सं.]
**परिवेष्टित** वि. वेढा घातलेले; गुंडाळलेले.
**परिवेष्य** वि. १. देण्यास योग्य. २. भोजनात वाढण्याजोगे.
**परिव्यय** न. उत्पादनखर्च; वस्तू तयार करण्याचा खर्च.
**परिव्राज, परिव्राजक** पु. संन्यासी. [सं.परि + व्रज् ]
**परिव्राजन** पु. संन्यास : 'जेविं भगवंतिं रंगलें मन । उक्त धर्म विसर्जुन । जाणते जे जन । परिव्राजन करिती ।' – रास १.१०६. [सं.]
**परिव्हा** सांडपाण्याची मोरी : 'परिव्हा जंतु भरिला असे' लीचउ ७९.
**परिशीलन** न. १. मनापासूनचा अभ्यास; छंद; एखाद्या विषयामागे लागणे; जबर व्यासंग. २. दीर्घ संघटन. ३. स्पर्श. ४. दळणवळण. [सं.]
**परिशिष्ट** वि. उरलेला; मागाहून केलेली भरती किंवा दिलेला जोड : (विशेषतः ग्रंथाला). [सं.]
**परिशेष** पु. १. प्रमाणाचा एक प्रकारः 'अर्थापत्ति उपमान । इतिहास परिशेषादि प्रमाण । तयासीं ही स्वतंत्र कवण । प्रमाण तो बोलेल ।' – विवेकसिंधु. २. एखादा विशिष्ट भाग, वस्तू इ.चा उल्लेख करून उर्वरित (अनुल्लेखित) भागाला मान्यता किंवा अमान्यता देणे. उदा. चौघांपैकी एकानेच यावे (म्हणजे अन्य तिघांना बंदी). ३. अवशेष; शिल्लक राहिलेली वस्तू किंवा पदार्थ : 'प्रस्तुत उपयुक्त कोशाचा उत्कंठापूर्वक आदर करून वर जो त्याचा परिशेष सांगितला तो रचून आपल्या देशबंधूस सादर करण्याचाही कालें करून प्रसंग आणतील'– नि ४५७.
**परिश्रम** पु. १. अतिशय श्रम; कष्ट; मेहनत. २. थकवा; दमणूक. [सं.]
**परिश्रय** पु. शौचविधी.
**परिश्रांत** वि. थकलेला; दमलेला.
**परिश्रो** पु. परसू. [सं.परिश्रम = कुंपण]
**परिश्लेष** पु. आलिंगन. [सं.]
**परिषत–द** स्त्री. संस्था; सभा; मंडळी. [सं.]
**परिषेक** न. (आयुर्वेद) काढ्यासारख्या पातळ पदार्थाची घडी ठेवणे किंवा अंगावर शिंपडणे.
**परिष्करण** न. निर्दोष आवृत्ती तयार करणे; अखेरचा हात फिरवणे.
**परिष्कार** पु. समर्थन; परिश्रमाने पाठपुरावा करणे; उजाळा देणे. [सं.]
**परिष्कृत** वि. समर्थन केलेले; शुद्ध केलेले; उजाळा दिलेले.
**परिष्वंग** पु. आलिंगन : 'पतिव्रतेचेनि परिष्वंगे । प्रियातें जैसें ।'– ज्ञा १८.५८६. [सं.]
**परिस** आज्ञा; परवानगी.
**परिसणा** वि. ऐकणारा: 'म्हणे परिसणे यांच्या राया। आइकें बाप धनंजया।'– ज्ञा ८.५८. [सं. परि + श्रु]
**परिसणे** पहा : **परिय(ये)सणे**
**परिसमापक** न. निरवानिरव अधिकारी; (इं.) लिक्विडेटर.
**परिसमापन** न. दिवाळे.
**परिसमूहन** न. अग्नीभोवती (ईशान्येकडून दक्षिणेकडे) पाणी फिरवणे; अग्नीभोवतालची जागा पाण्याने सारवणे: 'तेय करूनि अन्वाधान ।

प्रतिष्ठिला जो हुताशन । त्यासि करूनि करस्पर्शन । परिसमूहन करावे।'- एभा २७.३०. [सं.]

**परिसर** न. १. जवळचा भाग, प्रदेश, स्थान. २. नदीचा काठ, तीर : 'तें शैव तेज परिसरीं । गाळिती होय नेत्रद्वारें।' - कथा ७.६.५९. [सं.]

**परिसंख्या** स्त्री. इतरत्र प्रतिबंध गर्भित असलेली, करणार असल्यास एवढेच करावे (इतर करू नये) अशी मर्यादा घालून दिलेली परवानगी.

**परिसंख्या** पु. (साहित्य) एक अलंकार.

**परिसंवाद** न. एखाद्या विषयावर अनेक जाणकार विद्वानांनी नोंदवलेली मते किंवा केलेला ऊहापोह.

**परिसंस्था** स्त्री. परिसरातील परस्परांवर अवलंबून असलेले भौतिक घटक व सजीव यांचा समूह.

**परिसाहाय्यक** पु. मुख्याधिकाऱ्याचा निरोप नेणारा-आणणारा.

**परिसेविका** स्त्री. दवाखान्यातील वरिष्ठ परिचारिका; (इं.) मेट्रन.

**परिसोय** स्त्री. संबंध: 'सांडियेली तुम्ही गोत परिसोय । फोडविली डोय कर्माहातीं ।' - तुगा १३१९.

**परिस्तरण** न. यज्ञयागासाठी स्थापन केलेल्या अग्नीच्या चारीबाजूंना दर्भ टाकणे : 'इध्मा बर्हि त्रिसंधान । करोनियां परिस्तरण ।'- भाराबाल २.७०.

**परिस्थिती** स्त्री. भोवतालची स्थिती; वातावरण; प्राप्त दशा. [सं.]

**परिस्पंदन** न.१. हालचाल; क्रिया; इकडे-तिकडे हालणे-सरणे; कामे करणे. २.फुले, माळा इ. नी. केसांची शोभा वाढविणे; अलंकृत करणे. ३. माळा गुंफणे. ४. परिवार; लवाजमा.

**परिस्फुट** स्त्री. १. उघडकीला आणणे; उघडे करणे; गुप्त गोष्टींची प्रसिद्धी. २. डांगोरा; गवगवा; बोभाटा. [सं.]

वि. स्पष्ट; साफ; रोखठोक; स्वच्छ; उघड (भाषण इ.). [सं.]

**परिस्फोट** पु. १. उमलणे (कळी इ.); बाहेर पडणे, फुटणे. २. (ल.) पहा : **परिस्फुट.** ३. सूक्ष्म स्पष्टीकरण; विवरण; फोड. [सं.]

**परिहरण** न. १. खुलासा; परिस्फोट; परिहार : 'केले प्रश्नाचे परिहरण ।'- रास १.४९३. २. त्याग; वर्जन. ३.टाळणे; वगळणे. [सं.]

**परिहसणे** सक्रि. ऐकणे : 'परिहसैं भूपाळा । मि क्षेमेचा निर्वाळा।' -भाए २७३. [सं. परिश्रवण]

**परिहार** पु. १. दूर करणे; काढून टाकणे; उपाययोजना करणे; नाहीसे करणे (अडचण, त्रास, आळ इ.); निरसन. २. खुलासा; स्पष्टीकरण : 'परिहारमिषे प्रबोध । भीमकीसी करील हलायुध ।'- एरुस्व १२.१५२. ३. त्याग करणे; टाकणे; सोडणे. [सं.]

**परिहारक** वि. परिहार, उपाय करणारा. [सं.]

**परिहा(ह)रणे** सक्रि. १. त्याग करणे; टाकणे: 'आहारातें स्वीकारी त्यजावें तें परिहरी।'- ज्ञा ५.४३. २. दूर करणे; उपाय करणे. (अडचणी, त्रास).

**परिहार्य** वि. (दोष इ.) दूर करण्यास, नाहीसे करण्यास, निरसन करण्यास योग्य; नाहीसा करता, टाळता येण्याजोगा. [सं.]

**परिहास** पु. थट्टा; मस्करी; विनोद. [सं.]

**परिहित** वि. धारण केलेले; अंगावर घेतलेले (वस्त्र इ.). [सं.]

**परिहृत** वि. पळवलेले; परिहार, प्रतिकार केलेले; दूर केलेले. [सं.]

**परिहृद** न. हृदयावर असणारे संरक्षणात्मक दुपदरी आवरण.

**परिहृदरोग** आहारातील अतिस्निग्धपदार्थामुळे होणारा हृदयाचा रोग.

**परिज्ञात** वि. पूर्णपणे समजलेले, माहीत झालेले, असलेले.

**परिंद** वि. १. प्रवीण; निपुण; निष्णात. २. समर्थ; लायक; हुशार.

**परिंदा** पु. पक्षी. [फा.परन्द=पक्षी]

**परी** स्त्री. १. प्रकार; जात; मार्ग; रीत; टूम : 'कामधेनू सदनाप्रती आली। ते काष्ठप्रहारें मारून पिटली । परी केली तैसीच ।'- पांप्र २७.३२. २. हकिगत; गोष्ट : 'तंव दिसे एक नगरी । तेथें काय झाली परी ।'- शनि २८२.

शअ. प्रकाराने; रीतीने; योग्यते प्रमाणे. उदा. मी आपल्या परी काय सांगायचे ते सांगितले.

**परी** स्त्री. बरोबरी; सारखेपणा; सर : 'नव्हे मानवी बळाची परी। पांडव वांचले लाखाजोहरीं ।'- मुआदि ४१.९९.

**परी** स्त्री. १. घोड्याचे शरीर, माणसाचे तोंड व मोराप्रमाणे पंख असणारा असा कल्पित प्राणी. मोहरातील ताबुतांना अशा परी बसवितात. २. (ल.) सुंदर स्त्री; अप्सरा. [फा.]

**परी** उअ. परीस; पेक्षा: 'सर्वांपरी मी दीन दुर्बळ ।'- दावि ६०.[सं.परि]

**परी** शअ. परीस; प्रमाणे; सारखे. [सं.परि]

**परी-रि** उअ. परंतु; तथापि. [सं.पर]

**परीकाळ** पु. विलंब; उशीर. पहा: **परिकाळा**

**परीखानिमंत्रण** न. सपरिवार जेवणाचे निमंत्रण : 'तेथ संन्यासीयांसि परीखानिमंत्रण' - लीचपू ४१५ [सं.परीक्ष+ निमंत्रण]

**परी(रि)घ** पु. १. घर, आवार यांच्या भोवतालची भिंत; कुंपण; कुसू; कोट. २. लोखंडाचे, गदेसारखे हत्यार. ३. घेर; वर्तुळाची मर्यादा दाखविणारी गोल रेषा. ४. दाराचा अडसर. ५. सूर्य किंवा चंद्राभोवती पडणारे खळे. [सं.]

**परीट** पु. १. धोबी जात; तीमधील व्यक्ती. २. लांब शेपटीची राखी रंगाची चिमणी. [हिं.]

**परीटघडी** स्त्री. धोब्याकडून नुकतेच धुवून आलेले, घडी घातलेले; न वापरलेले वस्त्र.

वि. परटाकडून धुवून आलेले; घडीचे (कपडे).

**परीटधुणी** स्त्री. धोब्यांची धुणे धुण्याची जागा.

**परीटधुणे** न. परीटाकडून धुवून आलेले किंवा धुण्यास देण्याचे कपडे.

**परीटशीळ** स्त्री. धोब्याचा धुण्याचा दगड.

**परीन** वि. प्रवीण; निपुण. (व.) [सं.प्रवीण]

**परी प्रकारचा** वि. नाना तऱ्हेचा.

**परीभांड** न. घरातील सूप, टोपले वगैरे उपसाहित्य.

**परीलकर** वि. मातीची भांडी करणारा.

**परीवश** अतिशय सुंदर स्त्री.

**परीस** पु. १. स्पर्शाने लोखंडाचे सोने करणारा एक काल्पनिक दगड; स्पर्शमणी. २. (ल.) सुंदर मुलगा; श्रीमंत माणूस; यशस्वी, उत्कर्षशाली मनुष्य, वस्तू इ. [सं.स्पर्श]

**परीस** स्त्री. प्रदक्षिणा : 'श्रीचरणा लागले : पाच परीसा केलीया' – गोपप्र २८२. [सं.परि+ई]

**परी(रि)स** उअ. पहा : **परी**

**परीक्षक** वि. १. परीक्षा घेणारा; कसोटी लावून पाहणारा; तपासणी, शोध करणारा; गुणावगुण पाहणारा; बऱ्या-वाइटाचा निवाडा करणारा. २. पारखी; कस लावणारा. ३. प्रयोग करणारा; अनुभव, प्रचिती पाहणारा.

**परीक्षण** न. परीक्षा; पारख; तपासणी; पर्यालोचन; गुणदोषांची पाहणी.

**परीक्षणे** अक्रि. १.परीक्षा पाहणे; प्रयोग करून; कस लावून, गुण-दोष पाहणे, तपासणे. २. शोध, तपास, चौकशी करणे; निरखून पाहणे. ३. स्वत: अनुभवणे, अजमावणे, प्रचिती पाहणे. [सं.परि + ईक्ष्]

**परीक्षा** स्त्री. १. पारख; शोध; तपास; कसोटी; दिव्य; गुणदोष जाणण्याची कृती. २. प्रचिती; अनुभव; ३. (अनुभवाने किंवा परिचयाने आलेली) लायकी, ज्ञान, बुद्धी, कौशल्य. ४. विद्यार्थ्याचा एखाद्या विषयात किती अभ्यास झाला आहे हे पाहण्यासाठी लेखी अथवा तोंडी प्रश्न विचारण्याची कृती. [सं.]

**परीक्षानळी** स्त्री. (शाप.) प्रयोगाने परीक्षा करण्यासाठी लागणारी नळी. (इं) टेस्ट ट्युब.

**परीक्षित** वि. १. परीक्षा घेतलेले; तपासून, शोधून पाहिलेले. २. अनुभविलेले; प्रयोग करून, अनुभव घेऊन पाहिलेले. [सं.]

**परुता-ते** क्रिवि. पलीकडे; परता; शिवाय; परते : 'कां जे धर्मनाशींया परुते । समर्थ नाहीं ।'– ज्ञाप्र १६४.

**परुष** वि. १. कठोर; अवघड; जहाल (भाषण). २. निर्दय; रानटी; जंगली; असभ्य (माणूस, कृत्य). [सं.]

**परुषाम्ल** न. (रसायन) एक ज्वालाग्राही व रंगाला उपयुक्त असा पदार्थ. हा नीळ, राळ, अनिल, रेशीम, लोकर, कातडे वगैरेवर तीव्र नत्राम्लाच्या क्रियेच्या योगाने तयार करता येतो. (इं.) पिक्रिक ॲसिड.

**परू(रो)शी** पु. १. ख्रिस्ताच्या काळी यहुदी लोकांमध्ये एक पंथ होता. त्यांच्यापैकी कर्मठ, गर्विष्ठ व बाह्यशुद्धीला महत्त्व देणारा माणूस : 'तेव्हां योहानाचे शिष्य त्याजकडे येऊन म्हणाले, आम्ही व परूशी पुष्कळ उपास करतो.'– मत्त १५. २. ढोंगी. [हिब्रू. - परूशीम = वेगळे केलेले]

**परूस** न. परस. पहा : **परसू** [सं.परिसर]

**परेच्छा प्रारब्ध** एखाद्यासाठी दुसऱ्याने केलेल्या इच्छेमुळे उघडलेले दैव, नशीब.

**परे(ऱ्हे)ज** न. पथ्य. [फा. पऱ्हेझ]

**परेतराट** पु. यम.

**परेते** क्रिवि. पुरते.

**परेल** पु. घोड्याचा एक रंग.

**परेश** पु. १. परमात्मस्वरूप. २. परमेश्वर; सर्वश्रेष्ठ ईश्वर; मायानियंता; परमात्मा. [सं.पर + ईश्]

**परेशान** वि. चिंतातुर; हतबुद्ध; हैराण; त्रस्त; कष्टी. [फा; सं.परिश्रांत]

**परेशानी** स्त्री. व्याकुळता; त्रास; संकट; काळजी. [फा.]

**परेसगारी** स्त्री. व्रत; धर्मनिष्ठा; नेमिष्टपणा. [फा.पऱ्हेजगारी]

**परेळ** पु. १. पहा : **परळ.** २. लग्नातील गृहप्रवेशानंतर पुजण्याचे कुलदैवत; दैवतपात्र. (व.)

**परोज** न. एक रत्न. पहा : **पिरोज**

**परोटी** स्त्री. जेथे विस्तव ओढून भाकरी भाजली जाते तो चुलीसमोरील भाग. (अहि.)

**परोड** पु. एक प्रकारचा सर्प. ( व., घाटी) पहा : **परड**

**परोत्कर्ष** पु. दुसऱ्याचा अभ्युदय; दुसऱ्याची भरभराट.

**परोपकार** पु. १. दुसऱ्यावर केलेला उपकार; मेहेरबानी; दया; कृपा (क्रि. करणे, दाखवणे.). २. लोकोपकारबुद्धी; भूतदया; सर्वांशी ममतेने वागणे.

**परोपकारी** वि. १. परोपकार करणारा; दुसऱ्याच्या उपयोगी पडणारा.

**परोपरी** क्रवि. निरनिराळ्या प्रकारांनी, रीतींनी, तऱ्हांनी, पद्धतींनी : 'संबंधीं जनवाद पीडलो परोपरी ।'– तुगा ११३०.

**परोपरीचा** वि. निरनिराळ्या प्रकारचा, रीतींचा, पद्धतींचा, जातीचा.

**परोवरी** पु. आजूबाजूचा प्रदेश. -शर.

**परोल, प(पा)रोळे, परोय** न. थाळी. (अहि.) पहा : **परळ**

**परोळ** स्त्री. परोटी; चुलीबाहेर ओढलेला निखारा.

**परोक्ष** क्रिवि. १. एखाद्याच्या पाठीमागे; गैरहजेरीत; डोळ्याआड; असमक्ष. २. (चुकीने) समक्ष. अडाणी माणसे परोक्ष याचा समक्ष या अर्थी उपयोग करतात व असमक्ष करिता अपरोक्ष योजतात.
वि. अदृश्य; अदृष्ट; न पाहिलेले. [सं.पर + अक्ष अक्षिन]

**परोक्षज्ञान** न. न पाहिलेल्या वस्तूंचे ज्ञान. हा शब्द अप्रत्यक्ष विषयदर्शन ह्यासाठी ही योजतात.

**परोक्षभूतकाळ** पु. (व्या.) भूतकाळाचा एक प्रकार. अनद्यतन; लिट्. [सं.]

**परौतां-ते, परता** क्रिवि. पलीकडे; पर : 'यया परौतां नाहीं अध्यात्म योगु।'– दाव ६२.
उक्रि. यापेक्षा (जास्त) : 'न तपें परौता । बारां हीं मासां ।' – शिव ३१८. पहा : **परता** [पर]

**पर्क** वि. दरिद्री; कंगाल.

**पर्कार** पु. कंपास. (झाडी) [फा.; हिं.]

**पर्गरी** स्त्री. कंठी. [फा. पर्गर]

**पर्गेटरी** स्त्री. नरक; यमलोक.

**पर्चा** पु. अधिकारपत्र; हुकमाचा कागद. पहा : **पुर्जा** [फा. पुरझा]

**पर्जन्य** पु. मेघापासून पडणारे पाणी; पाऊस; वर्षाव; वृष्टी. [सं.]

**पर्जंद** पु. गुलाम. (को.) पहा : **फर्जंद**

**पर्जिणे** क्रि. जिंकणे; स्वाधीन ठेवणे.

**पर्ण** न. पान. [सं.]

**पर्णकुटी-शाला** स्त्री. १. गवत, पाने इ. ची केलेली झोपडी. २. (विनयाने किंवा निंदार्थी) लहानसे राहते घर.

**पर्णणे** पहा : **परणणे**

**पर्णद** पु. वि. दारुड्या.

**पर्णबीज** न. ज्याच्या पानाला अंकुर फुटून झाड होते असे एक झाड. उदा. चुका-चाकवत इ.

**पर्णागार** न.मद्यालय.

**पर्णाभरण** न. वृक्षांच्या पानांचे वस्त्र.

**पर्णिका** स्त्री. लहान पान.

**पर्णीक** वि. पर्णिलेली; वरिलेली; लग्न केलेली (स्त्री) : 'तूं हो तयाची पर्णीक । हें तुजचि जाण पातक । - कथा २.९.१०९.

**पर्तेल** न. शेतकऱ्यांनी आळीपाळीने एकमेकांची कामे करणे. पहा : **पडकेल**

**पर्दगी** स्त्री. पतिव्रता. [फा.]

**पर्बाण** पहा : **परबाण**

**पर्मानगी** स्त्री. १. पर्वानगी. २. भेट करून देण्याबद्दल बक्षीस : 'नानाजवळ उभे राहावयाचे प्याद्यांचे नाईक आहेत ते पर्मानगी लावितात.' - ऐलेसं ११.६०५९. [फा.पर्वानगी]

**पर्यटक** न. अव. प्रवासी, प्रेक्षणीय स्थळांना भेटी देणारे, सहल करणारे लोक.

**पर्यटन** न. प्रवास; फिरणे; हिंडणे; भटकणे; दौरा; फेरी. [सं.]

**पर्यय** पु. (कालचक्र) चौकडी (कृत, त्रेता, द्वापार, कली या चार युगांची); एका मन्वंतरात असे ७१ पर्यय असतात. सरासरी साडेतीन कोटी वर्षांचे एक मन्वंतर. [सं. परि + अय्]

**पर्यवधान** न. दक्षता; सावधगिरी.

**पर्यवसान** न. १. शेवट; अखेर; अंत. २. निकाल; परिणाम; निष्कर्ष. [सं. परि + अवसान]

**पर्यवसित, पर्यवसन्न** वि. १. संपलेले; शेवटास गेलेले; अखेरीस पोचलेले; पूर्ण झालेले, केलेले. २. निकाल लागलेले; परिणाम पावलेले. ३. साध्य झालेले; शेवटी स्थापन झालेले. [सं.]

**पर्यवेक्षक** न. अधीक्षक; तपासणी अधिकारी; तपासनीस; देखरेख करणारा. [सं.]

**पर्यंक** पु. पलंग; मंचक. [सं.]

**पर्यंकपद्धती** स्त्री. (मानस.) केवळ तर्काने अनुमान किंवा सिद्धांत काढण्याची पद्धती.

**पर्यंकपंडित** वि. (निंदार्थी) आरामशीर बसून (स्वत: कष्ट न घेता) दुसऱ्यास उपदेश करणारा.

**पर्यंत** पु. शेवट; टोक; मर्यादा; मर्यादेचा बिंदू; रेषा.
शअ. १. पावेतो; (स्थळ, काळाला उद्देशून). २. सबंध; अव्वल अखेर; सर्व होईपावेतो. जसे :- मासपर्यंत (महिनाभर) इ. ३. अमुक मर्यादा पावेतो; अखेरच्या साधनापावेतो. [सं.]

**पर्यंद** पु. १. झोका; पाळणा. २. अंगाईगीत; पाळणागाणे : 'पाळणा घालोनी बाळकासी । पर्यंद गायन अतिहर्षी ।' - गुच ११.३६. (पाठभेद)

**पर्या, पऱ्हया** पु. ओढा; नाला; ओहोळ; प्रवाह : 'जपुन टाकी पाउलें असा परद्वारीचा पर्या ।'- होला १०८. (राजा.) [सं.प्रवाह]

**पर्याप्त** वि. १. पूर्ण. २. (ल.) तृप्त; समाधान पावलेला. ३. पुरेसा; पुरता; पुरा होणारा.

**पर्याप्ति, पर्याप्त** स्त्री. १. समाधान; तृप्ती; पूर्णता. २. योग्य पुरवठा; पुरेसे असणे; समाधानकारक समृद्धी.

**पर्याय** पु. १. रीत; पद्धत; मार्ग; योजना; एखादे काम साधण्याची युक्ती; शेवटास नेण्याची रीत, योजना. २. शैली; धाटी; विशेष पद्धत; वैशिष्ट्य. ३. आवृत्ती; क्रम; एक वेळचा प्रयोग; एकदा केलेली कृती. ४. काही गौण किंवा निराळा प्रकार, रीत, चाल, उपाय, पंथ इ. ५. टप्पा; पायरी; खंड; भाग; क्रमाक्रमाने होण्याच्या क्रियेतील एक अवस्था. ६. निरनिराळे मार्ग प्रत्येकी ( काम लवकर होण्यासाठी); एकाच वेळी चालू केलेले कामाचे भाग; स्वतंत्र योजना. ७. क्षुल्लक, खोटी सबब; उडवा-उडवी. ८. समान; एकाच अर्थाचे दोन परस्पर शब्द; प्रतिशब्द. ९. व्यवस्था; पद्धतशीर मांडणी; क्रम. १०.गौण, समाविष्ट, अंतर्भूत गोष्ट, बाब; पोटविभाग. ११. गोष्ट; भावार्थ: 'माझा हा पर्याय पुसे त्यासी ।'- रामदासी २.१२७. [सं.]

**पर्यायीकरण** न. एखाद्या वस्तूला किंवा शब्दाला त्याच्याऐवजी काम भागू शकेल अशी दुसरी वस्तू किंवा शब्द बनवण्याची क्रिया. उदा. तंबोऱ्याच्या ऐवजी 'इलेक्ट्रॉनिक तंबोरा.'

**पर्यालोच, पर्यालोचन** पु.न. १. विचार : 'तैसें अधिकारपर्यालोचें । चिंतन हें यज्ञ करणें सर्वांचें । परी विष फळाशेचें । न घापे मार्जी।' - ज्ञा १६.९७. २. अवलोकन; पाहणी; सभोवार दृष्टी.[सं.परि +आलोचन]

**पर्यावरण** न. सजीवांच्या जीवनावर परिणाम करणारे अजैविक आणि जैविक घटक. [सं.]

**पर्युत्सुक** वि. अधीर. [सं.]

**पर्युदास** पु. (पंडिती) मनाई, प्रतिबंध इ. विषयी आज्ञा करणे; निराळी किंवा विरुद्ध गोष्ट कबूल करणे; एखादी गोष्ट खात्रीपूर्वक सांगणे किंवा पसंत अगर नापसंत ठरविणे; अदमास करणे; काढणे. जसे :- 'खोटे बोलूं नये' यावरून 'खरे बोलावे' असे निघते. इ. [सं.]

**पर्युषित** एक रात्र गेल्यामुळे दोषयुक्त झालेले (अन्न, पाणी इ.).
वि. शिळा; पारोसा. [सं.]

**पर्येंदणे** क्रि. झोका देणे : 'मायावती पर्येंदे आपण ।'- उह ३८६.

**पर्ल** न. १. परळ; चुलीजवळील जागा. (गो.).२. पहा : **परेळ** २ (व.)

**पर्व** न. १. जेव्हा समुद्रस्नान, दान वगैरे पुण्यकर्मे केली असता अनंतपटीने अधिक फळ मिळते असे सांगितले गेले आहे, असा अमावास्या, पौर्णिमा, ग्रहण इ. काळ प्रत्येकी; पर्वणी; पुण्यकाळ. २. चांद्रमासातील शुद्ध व कृष्ण दोन्ही पक्षातील काही दिवसांना दिलेले नाव. उदा. पौर्णिमा, षष्ठी, अष्टमी, दशमी इ. ३. सूर्य नवीन राशीमध्ये जाण्याचा काल; संक्रांत. ४. युती किंवा जुळून आलेला योग; संयोगकाळ. ५. (ल.) समृद्धीचा, उत्कर्षाचा काळ; हंगाम; ऋतू; मोठ्या सार्वजनिक आचार-रूढीचा काळ; बाहुल्य; विपुलता; बहर : 'कीं आर्यानंदाचें रसिकांची नित्य हो सभा पर्व ।' - मोसभा ७.९२. ६. १. (ल.) संधी; फायद्याची वेळ.

**पर्व** न. सांधा; वेळू, बोरू, बोट इ. कांचे पेर; कांड. २. ग्रंथाचा भाग; प्रकरण (ज्यात अनेक अध्याय वा प्रकरणे असतात त्यापैकी).

**पर्वकाल-ळ** पु. पहा : **पर्व** १ ते ५

**पर्वट** न. कंबरेस नेसलेले वस्त्र : 'पर्वटिचीं खर्गें काढिती ।'- क्रिपु २३.०६.

**पर्वणा** स्त्री. पु. बखर; हकिगत.

**पर्वणी** स्त्री. १. पहा : **पर्व** १,२. २.(ल.) दुर्मीळ सुसंधी; फार दिवसांनी

येणारा शुभकाल, संधी.

**पर्वत** पु. १. मोठा डोंगर; गिरी; अद्री; हिमालय-सह्याद्री इ. पर्वत. २. (ल.) मोठे ओझे, बोजा; असह्य भार. [सं.](वा.) **पर्वताची राई होणे** - मोठेपणा जाणे; गर्वहरण होणे; महत्त्व संपणे : 'नकळे ईश्वरी सूत्र झाली पाहा पर्वताची राई ।'- ऐपो ४०८.

**पर्वत** पु. देवघेव; व्यापार; सावकारी : 'पत्रेंविण पर्वत करूं नये ।'- दास २.२.२०. [सं.पर + वत्]

**पर्वती, पर्वतीय** वि. १. पर्वतासंबंधी; पहाडी; डोंगरी. २. पहाडी; डोंगरात राहणारा. ३.डोंगर चढणारा, उंच घाट चढण्यास योग्य (घोडा).

**पर्वफळ** न. (ल.) दगड; खडक.

**पर्वभेद** पु. (वैद्यक.) संधिवात; सांधेदुखी. [सं.]

**पर्वर्दा** स्त्री. पालन; रक्षण: 'स्वामी कृपादृष्टीने पालन करून पर्वर्दा करीत आहेत. '-मइसा ५.३२. [फा.]
वि. १. पाळलेला. २. वयात आलेला : 'त्यावर सोनाजीपंत पर्वर्दा जाले परंतु वतनावर गेले नाहीत.'- मइसा ८.३३. [फा.]

**पर्वर्दिगार** पु. पोषण करणारा; ईश्वर. पहा : **परवर** [फा.पर्वर्दगार]

**पर्वर्श,पर्वरीस, पर्वारिशी, पर्वेशी** पहा : **परवरीस**

**पर्वा** स्त्री. १. काळजी; फिकीर; चिंता. २.आदर; कळकळ; आस्था. [फा.]

**पर्वा(र्मा)न(ण)गी** स्त्री. आज्ञा. पहा : **परवानगी**

**पर्वाना** पु. आज्ञापत्र; (इं.) पास. पहा : **परवाना** [फा.]

**पर्स** स्त्री. पैसे ठेवण्याची पिशवी. [इं.]

**पर्साड** स्त्री. पळसाचे रान. (झाडी) [सं.पलाश]

**पऱ्ह(ऱ्हा)वण-वाणा** पु. न. वाहन. पहा : **परव्हाण**

**पऱ्हा-ऱ्ह्या,पऱ्ह(ऱ्हि)वा** पु. नाला; झरा; पावसाळ्यात पाणी जाण्यासाठी खणलेली चरी; खाचखळगा : 'रांधवणी चुलीपुढें । पऱ्हे उन्मादती खातवडे ।'- ज्ञा १३.५६२. [सं.प्रवाह]

**पऱ्हा** क्रिवि. पलीकडे; दूर : 'म्हणोनि थोरपण पऱ्हांचि सांडिजे।'- ज्ञा ९.३७८. [सं.परतः]

**पऱ्हाटी** स्त्री. १. कापसाचे झाड. २. कपाशीच्या झाडाची वाळलेली काठी.

**पऱ्हात** क्रिवि. उत्कृष्ट; निर्दोष.

**पऱ्हाते** क्रिवि. परते; दूर; परौते.

**पऱ्हावणे** अक्रि. परिणामकारक होणे. (व.)

**पऱ्हेज** न. पथ्य. (व.) [फा. पऱ्हज]

**पऱ्हेड** स्त्री. १. बोलाचाली; चर्चा.२. पंचाईत; खोळंबा; अडचण. (अहि.)

**पल** न. १. पहा: **पळ** १.,२. २. मांस. ३. चाळीस मासे (३८० गुंजांचे) वजन.
पु. विषुववृत्तापासून अंतर; अक्ष. [सं.]

**पलक-ख** पु.न. डोळ्याची पापणी लवण्यास लागणारा काळ; निमिष; क्षण : 'हें भुवन सुशोभित सुवन नसे कलिपवन पलख एक न्याया ।'- दत्तपदे २५. पहा : **पळ १** [फा.पलक्]

**पलखदंती** वि. लांबलचक दात असणारा.

**पलजार** वि. कोवळा; दाणे न भरलेला शाळू.

**पलज्या** स्त्री. एखाद्या स्थळाच्या अक्षाची ज्या; अक्षज्या. [सं.]

**पलट-टी** स्त्री. उलथ; कलथी; मागे उडी. (क्रि. खाणे)[सं.परिवर्त]

**पलटण-न** न. स्त्री. फौजेची तुकडी; फौज; अकराशेपर्यंत पायदळाचा समुदाय. [हिं. पलटन]

**पलटणी-नी** वि. पलटणीसंबंधी.

**पलटणे** क्रि. परतणे. [हिं.पलटना; सं. परि + अट्]

**पलटन** न. फेरी; जाऊन परत येण्याची क्रिया. (व.) पहा : **पलाटन**

**पलटवणे** क्रि. फिरविणे. वळविणे; परतविणे. (व.) [हिं. पलटाना]

**पलटा** पु. १. जंबियाचा डाव. २. (संगीत) स्वरांचा अवरोह.

**पलटी** स्त्री. १.कबुतराची गिरकी. २. उलटी, वाकडी उडी. [सं.परावृत्]

**पलतड** स्त्री. पलीकडचे तीर. पहा : **पैलथड** [सं.पर + तट]

**पलपल, पलापलाट** स्त्री. पु. १. चैन; चंगळ. २. भरभराट; उत्कर्ष; सामर्थ्याची, वर्चस्वाची स्थिती. ३. फाजील पीक; अतिशय समृद्धी. ४. सुळसुळाट; अतिशय माजणे (लुटारू, चोर, टोळ, उंदीर इ.). ५. क्षणोक्षणी; घडोघडी. [क.पल=फार, पुष्कळ]

**पलपैतृक** न. श्राद्धाच्या दिवशी स्वयंपाकात मांसाचा उपयोग करणे : 'पलपैतृक घे भ्रातुरंगना । करूं नये म्हणताती ।' - गुच १२.९४. [सं.पल = मांस + पितृ - पैतृक]

**पलभा** स्त्री. (फज्यो.) अयनांशसहित सूर्य केवळ विषुववृत्तावर असताना मध्यान्ह काळी बारा अंगुळे उंचीच्या खुंटीची पडलेली छाया; शंकूच्या छायेच्या आधाराने अक्षांश मोजण्याची एक प्राचीन पद्धत.

**पलवावाघळी** स्त्री. वाघळी नावाचा समुद्रातील एक प्रकारचा मासा. याची पाठ राठ, खरखरीत असते.

**पलंग** पु. मंचक; जमिनीपासून उंच झोपण्यासाठी चार पायावर चौकट घालून, त्यावर लाकडी किंवा प्लायवुडच्या फळ्या घालून केलेली शय्या. [सं.पर्यंक]

**पलंगडी** स्त्री. १. लहानसा पलंग. २. (तुच्छतेने) जुना, वाईट पलंग.

**पलंगपोश-स** पु. चादर; बिछान्यावर घालण्याचे वस्त्र; आच्छादन; गर्दपोस. [फा.पलंग् + पोश् ]

**पलंगफरारा** पु. मल्लखांबावरील एक प्रकारची कसरत.

**पलंगी** पु. शय्येची तजवीज, व्यवस्था करणारा सेवक. (कर.)

**पला** पु. वजनाचे एक माप :'पिंपळी मूळ पले ४.'- वैवसं ४८. [सं.]

**पलाखतीमार, पलाखतीचा मार** पु. खरपूस, खूप जोराचा मार; फरमाशी मार, ठोक.

**पलाट** क्रिवि. पलीकडे. पहा : **पल्याड**

**पलाटणे** न. (न्हाव्याचा धंदा) वस्तऱ्याची धार साफ करण्याचे चामडे; धार लावण्याची तळहाताएवढी कातड्याची पट्टी; चटपट.

**पलाटन-ण** न. १. भ्रमण; भटकणे; हिंडणे; देशाटन. २.फेरा; वळसा; गिरका; इकडे-तिकडे आसपास थोडेसे फिरणे. (क्रि. मारणे) :'शार्दूल करूं गेला पलाटण ।'- रावि २०.१३८. [सं.पर्यटन]

**पलाटी** स्त्री. कापसाची काडी: 'पेरणी टाकून पलाटिया उपडावियास गेलेत.'- पेद २१.१५. पहा: **पऱ्हाटी**

**पलाण** न. १. खोगीर (विशेषत: हत्ती, उंट यांचे); पल्याण; मूठ. २. (ल.) आच्छादन : 'दर्यास पलाण (शिवाजी) राजियांनी घातले.' – सभासद ५१. ३. घोड्यावर पहिल्यांदा घातलेले खोगीर व ते घालण्याची कृती. (क्रि. करणे.) ४. (ल.) लांबची विहीर जोडणारी जमिनीची पट्टी; विहिरीचे पाणी दुसऱ्या जमिनीस पोचावे म्हणून पाण्याचा पाट नेण्यासाठी घातलेली मातीची लांबट उंच वरवंडी; बांध. [सं.पल्ययन, पर्याण]

**पलाण** न. लांब पल्ला.

**पलाणणे** उक्रि. १.खोगीर चढविणे; घोड्यावर पलाण घालून सज्ज करणे; तयार ठेवणे. २. (ल.) हाताखाली आणणे.

**पलाणी** स्त्री. उफाडा बांधा; चांगली वाढ. – लोसाको.

**पलाद** पु. (शाप.) प्लातिन वर्गातील एक धातू. हा चांदीसारखा चकाकणारा, चिवट असून दंतरोगावरील उपचारासाठी, घड्याळाच्या कामासाठी उपयोगात येतो.

**पलायन** न. पळ; घाईने पळून जाणे; (भयाने, दुसऱ्यास न सापडावे म्हणून) युक्तीने निसटून जाणे. [सं]

**पलारक** तरवार. -ऐको.

**पलाल** न.पु. भाताचे काड; गवत; पेंढा; कडबा; बाटूक; केर: 'कृष्ण म्हणे बहु बरें, व्हा मारुत हो पलाल खळ-बळ तें ।'– मोविराट नवनीत २९७. [सं.]

**पलाश** पु. पळस; पळसाचे झाड. [सं.]

**पलासा** पु. टोमणा; टीका. (झाडी) [सं.प्रलाप]

**पलांग** पु. चित्ता. -ऐको.

**पलांटी** स्त्री. पहा : **पलाटन २**

**पलांडु** पु. कांदा : 'चिंतामणी टाकोनि रोकडा । पलांडु घेतला बळेचि ।'– रावि १२.१०३. [सं.]

**पलित** न. पिकलेपणा; केस पांढरे होणे.
वि. पिकलेला; वृद्ध. [सं.]

**पलिता–दा** स्त्री. १.हिलाल, दिवटी, मशाल यासाठी केलेली कापडाची वाटोळी गुंडाळी. २. तोफ डागण्याचा तोडा; बत्ती; जामगी; काकडा. (क्रि. लावणे, देणे, ठेवणे.) ३. बंदुकीची दारू घालून तयार केलेला काकडा. ४. (तोफा, बंदुका यांची) फैर; सरबत्ती; झड; भडिमार (क्रि. झाडणे, झडणे). [सं.प्रदीप्त; अर. फतीला]

**पलिता** पु. मोटेच्या खालचा सोंडदोर ज्या चाकावरून येतो ते फिरते चाक. (व.)

**पलिती** स्त्री. पहा : **पलिता** २ ते ४

**पलिस्त** न. (निंदार्थी) पीडा देणारा माणूस, वस्तू, धंदा, रोग, वारा, पाऊस इ.; पीडा; रोग. [फा. पिलिश्त = अपवित्र, घाण]

**पलिस्तर** न. गिलावा. [इं.प्लॅस्टर]

**पलिस्तर** न. शरीराचे कातडे भाजल्यासारखे होऊन त्यावर फोड आणणारा द्रव. [इं. ब्लिस्टर]

**पलीकडचा–ला, पलीकडील** वि. पलीकडे असलेला; दूरच्या स्थळाकाळासंबंधी; दूरचा; मागील; पूर्वगामी.

**पलीकडून** क्रिवि. दुरून; दुसऱ्या बाजूने, पूर्वीच्या, मागल्या दिवसापासून.

**पलीकडे** क्रिवि. १.(स्थळवाचक) दुसऱ्या बाजूला; दूर; बाजूला; दुसरीकडे. २.(कालवाचक) पुढे; नंतर; पूर्वी; अगोदर; मागे (विशिष्ट कालाच्या). [सं.प्रति] ० **होणे** अंग काढून घेणे.

**पले–ल्हे** पु. पदरी बाळगून असणे. (खा.)

**पलेटण** न. भटकणे. पहा : **पलाटन** [सं.पर्यटन]

**पल्याड** क्रिवि. (त्या) पार. पहा : **पलीकडे १**

**पल्याण** न. खोगीर; जीन. पहा: **पलाण**

**पल्ल** न. चुलखंड. (गो.)

**पल्लक** पु. पाळणा; झोपाळा; झुला; डोली; मेणा : हृदयाकाशपल्लकीं । परिये देसी निजे ।'– ज्ञा १२.५. पहा : **पालक–ख**

**पल्लव** पु. १. पालवी; पाने (विशेषत: अव. प्रयोग); अंकुर; कोंभ (क्रि. फुटणे, लागणे, येणे). २. नवीन पालवी फुटलेल्या डहाळीचा शेंडा; पानांनी भरलेल्या फांदीचा शेंडा; नवी फूट; पालवीचा झुबका. ३. (ल.) एखादी हकिगत सांगत असताना त्यात पदरची घातलेली भर. ४. कापडाच्या तुकड्याचा, वस्त्राचा शेवट (धोतर इ. वस्त्राचा); पदर : 'ऐकता गुरूचें वचन । गांठीं बांधी पल्लवीं शकुन ।'– गुच ९.१२. ५. पुरवणी; पुरणिका; शेपूट; जोड. [सं.]

**पल्लवग्राही –स्पर्शी** वि. वरवरचे; उथळ. [सं.]

**पल्लवसडक** स्त्री. १. पदराची दशी : 'तेथ व्यासादिकांच्या मती । तेचि मेखळा मिरवती । चोखाळणें झळकती । पल्लवसडका ।'– ज्ञा १.९. २. पदर; शेव; उत्तरीय; ओढणी; लफ्फा.

**पल्लवसाती** स्त्री. कापडाचे छत्र : 'दाटति श्रीगिरी चहुंकडी । पल्लवसातियांचा ।' – शिव १०३७. [सं.पल्लव + छत्रिका]

**पल्लवहस्त (संयुक्त हस्त)** पु. (नृत्य.) पताकहस्त मनगटात सैल करून दाखविणे.

**पल्लवित** वि. १. नवीन पालवी, पाने फुटलेले (झाड). २. विस्तृत. ३. टवटवीत (चेहरा).

**पल्ला** पु. १.तीस पायली किंवा एकशेवीस शेरांचे माप. २.(पातळ पदार्थ, तेल, सुपारी इ. जिन्नस मोजण्याचे) एकशेवीस शेरांचे, अडीच मणांचे पक्के वजन. ३. पल्लाभर धान्याचे पोते, थैला अगर गोणी. [वै. सं.पल्यम्]

**पल्ला** पु. १. (खोली, जागा इ. कांची) लांबी; विस्तार. २. अवधी; अंतर; मुदत; मजला; टप्पा (चाल, मार्ग, काळ, धंदा यामधील ). ३.(ल.) आटोका; व्याप्ती; लांबी; सामर्थ्य; अवलंबून असणाऱ्यांची मालिका.[हिं. पल्ला] (वा.) ० **करणे,बांधणे** – आधार, आश्रय, पाठबळ इ. मिळविणे; मदतनीस, साहाय्यक मिळविणे. ० **गाठणे** – १. कड पोचणे. २. अपेक्षित स्थळी जावून पोचणे. ० **घेणे**– सुबाल्या; धूम ठोकणे; पळणे. (ना.) **पल्ल्यावर असणे** – अगदी जवळ, पाठीशी असणे.

**पल्ला** पु. वस्त्राच्या जरीचा, बुट्टीदार काठ. [सं.पल्लव; गु. पल्लो]

**पल्ला** पु. कबूतर इ. पक्ष्यांचा कळप.

**पल्ला** पु. नवऱ्याने बायकोला दिलेला पैसा, किरकोळ खर्चाला दिलेला पैसा; चोळीखर्च. (ही वधूपित्याकडे ठेवण्याची चाल गुजरातमध्ये आहे.) [गु.पल्लु]

**पल्लाण** न. अवधी; अंतर. पहा : **पल्ला**
**पल्ली** स्त्री. एक क्षुद्र जंतू. पहा : **पाल** [सं.]
**पल्ली** स्त्री. लहान गाव, खेडे. [सं.]
**प(पो)ल्ली** स्त्री. धुमी; शेकोटी; आगटी. (गो.)
**पल्लेकरी** पु. पल्लाभर धान्य; धान्याची गोणी वाहून नेणारा व त्या हमालीवर उपजीविका करणारा हमाल, हेलकरी. [पल्ला + करी]
**पल्लेदार** वि. १. शोभिवंत; वेलबुट्टीदार पदराचे, काठाचे, लफ्फेदार (वस्त्र): 'पल्लेदार दोरवा पैठणी लालभडक नेसुन ।- प्रला २२७. २. लांबलचक पोच असलेली; गोळा लांब जाण्याजोगी (तोफ इ.). ३. भारदस्त, लांबलचक वाक्यरचना असणारी (भाषा) [पल्ला + अंतर, लांबी]
**पल्वल** न. डबके : 'दे पल्वलीं जीवन मेघ जैसा ।'- अकक २. [सं.]
**पल्हाटी** स्त्री. पहा : **पराटी** : 'पल्हाटीचें पुष्प सुवासहीन ।'- भवि १०.१३३.
**पल्हे** न. कापसाचे पीक : इंद्राचा हाती... तयाते पल्हें खाउनि आह'- लीचपू ३७२. [दे. पलाही]
**पल्हो** पु. चिखल; गारा : 'मातीचा पल्हो केला ।'- लीचपू ५५७.
**पव** पु. (खेळातील) फाशावरील एक या संख्येची खूण; चिन्ह. [सं.पाद]
**पव** स्त्री. १. सांध्यात बसविण्यासाठी केलेली लाकडाची खीळ. (व.) २. फणसाचा फळात असलेला देठाचा भाग, पाव; पाऊ.
**पवठी** स्त्री. बैल, गाय इ. चे शेण; शेणाचा गोळा. (अहि.)
**पवड** पु. शिरस्ता; धारा; मार्ग; पद्धती. [सं.प्र. + वर्त्]
**पवणे** अक्रि. पावणे; प्राप्त होणे; मिळणे; पोचणे: 'न पवे त्या मारी धोंडी।'- मुआदि ३४.८८. [सं.प्र + आप्]
**पव(वी)ते** न. १. जानवे; यज्ञोपवीत : 'मग गोसावी कंठीचे पवीते दीधले।'- लीच ३.९२. २. पवित्रक.
**पवबारा,पोबारा** पु. (फाशाचा खेळ) एक दान; तीन फाशांपैकी एकावर एक व दोहोवर सहा-सहा ठिपके मिळून तेरा पडणे. (वा.) ० **करणे, म्हणणे** - (या दानाने सोंगटी दूर जाते यावरून) पळ काढणे.
**पवन** पु. वायू; वारा; पंचमहाभूतांपैकी एक. [सं.]
**पवन** पु. पौंड (नाणे). (गो.) [इं.पौंड]
**पवनकुक्कुट** पु. वाऱ्याची दिशा दाखवणारे, उंचावर बसवलेले, कोंबड्याच्या आकाराचे साधन.
**पवनचक्की** स्त्री.वाऱ्याच्या जोरावर, शक्तीने चालणारी गिरणी, जाते, यंत्र. [सं.पवन + हिं. चक्की = जाते]
**पवना-न्या** पु. हरळीसारखे एक तृण; गवत. [सं.पवन्]
**पवमान** पु. १. वायू. २.एक यज्ञाग्नी; गार्हपत्य. ३. एक विशिष्ट मंत्रसमूह. [सं.]
**पवली-ळ** स्त्री. राजमार्ग : 'भक्त बांधली पवळ, देव नांदे गवळ।' - एहोरा भाग २.
**पवळ** पु. १. पल्लव; पान. २. होडगे.
**पवळणे** अक्रि. गळून जाणे. नाहीसे होणे : 'तेयांचेया हृदयातें सांडूनि पवळे । भेदु जी हा ' - ज्ञा १०.२९७.
**प(पं)वळे** न. पहा : **पोवळे** पोवळे; प्रवाळ : 'पवळेंयांचिआं दृती । जावडे कालॐनि नीगुती ।'- शिव ५९०. [सं.प्रवाळ]
**पवाड-डु** पु. १. मोठेपणा; कीर्ती; महत्त्व: 'मग नांदेन पवाडें । येकलाचि मी ।'- ज्ञा १६.३५२. २. विस्तार : 'निश्चल चंचळ आणी जड। अवघा मायेचा पवाड।'- दास १२.३.८. ३. ठाव; अवकाश : 'जयाचिये प्रतीतीचा वाखारां । पवाडु होय चराचरा ।' - ज्ञा ७.१३७. ४. इच्छा : 'जें विटे ना सरे । भोगितयाचेनि पवाडे पुरे ।'- ज्ञा ८.२६४. ५. ठिकाण. ६. कौशल्य : 'मग फेडूं यया बुद्धी । पवाडु कीजे ।' - अमृ ७.६३. ७. एक काव्यप्रकार; पोवाडा. [सं.प्रवृद्ध; प्रवाद]
**पवाड** पु. रिकामपण : 'मज अंगसेवें नाहीं पवाडु । तरि त्यागा भोगा होए अपवाडु ।'- उगी १४१.
**पवाड** स्त्री. प्रकार : 'तेय संयमाग्नीची कुंडें। इंद्रियद्रव्याचे नि पवाडें। यजिती उदंडे युक्तिघोषें ।'- ज्ञा ८.५०. पहा : **परवड**
**पवाडणे** क्रि. १. आत शिरणे; घुसणे : 'काच म्हणोन उदकांत पडे। कां सभा देखोन दर्पणीं पवाडे । ' - दास १०.६.२२. २. सामर्थ्य असणे : 'एऱ्हवीं ऐसें घडे। जो जळत घरीं सांपडे। तो मग न पवाडे। कुहा खणों।'- ज्ञा १३.५४८. ३. टिकाव धरणे : 'तेथें मज मूर्खाची मती। पवाडेल कोठे।'- दास १.४.२. ४. स्तुती करणे; नावाजणे.
**प(पं-पो)वाडा** पु. १. वीरांच्या पराक्रमांचे, विद्वानांच्या बुद्धिमत्तेचे, तसेच एखाद्याच्या कौशल्याचे काव्यात्मक वर्णन, प्रशस्ती, स्तुतिस्तोत्र. २. पराक्रम; कीर्ती : 'अनंत हे थोरी । गर्जताती पवाडे ।'- तुगा १५७८. ३. पहा : **पवाड** [सं. प्रवृद्ध; क. पाडु = गाणे]
**पवारी** स्त्री. १. एक औषधी वनस्पती. २. तिच्यापासून तयार केलेले एक सुवासिक, औषधी द्रव्य.
**पवाले** न. प्याला; एक प्रकारचे भांडे; फुलपात्र. (गु.) [सं.पव=पुनीत+आलय; गु. पावालुं]
**पवि** पु. इंद्राचे वज्र. [सं.]
**पवित्र** न. १. ब्राह्मणाचे जानवे; यज्ञोपवीत. २. पवित्रक; बोटात घालण्याची दर्भाची किंवा सोन्याची अंगठी.
वि. १. शुद्ध, निर्मळ, स्वच्छ, धार्मिक, संस्कारित, दोषरहित, सोवळे (पाणी, अन्न इ.). २. निष्पाप; पापरहित; पुण्यकारक; नीतिमान; सद्वर्तनी. ३.पुण्यकारक; पापक्षयकारक. (कर्म, वस्तू, जागा इ.). [सं.]
**पवित्र** न. वरण : 'मुगाचे पवित्र । आणि लोणकढें तूप साजूक। '- बदलापूर २१३.
**पवित्रक,पवित्री** न. स्त्री. दर्भाची किंवा त्या आकाराची सोन्याची अंगठी. [सं.पवित्र, पवित्तो = दर्भे]
**पवित्रा** पु. १. (मल्लविद्या) डावा पाय पुढे करून कुस्तीच्या तयारीने उभे रहाण्याचा प्रकार; दस्ती. (क्रि. करणे). २. वैचारिक बैठक, भूमिका.
**पवित्रारोपण** न. श्रावण पौर्णिमेला करण्याचा एक विधी. नव्या सुताचे तयार केलेले दोरे पवित्र व्हावेत म्हणून देवाच्या मूर्तीवर वाहणे आणि नंतर ते मूर्तीवरून काढून स्वत: घालण्यासाठी घेणे.
**पवित्रीकरण** न. (ख्री.) आपली कृपा दानरूपाने देण्याचे परमेश्वराचे एक कार्य.(इं.) सँक्टिफिकेशन. या कार्याने मनुष्य देवाच्या प्रतिज्ञेनुरूप सर्वस्वी नवा होतो असे ख्रिस्तानुयायी समजतात. - इफि ४.२३, २४.

**पवित्री पूर्णिमा** पोवती पौर्णिमा; पोवत्यांची पुनव; श्रावण महिन्यातील पौर्णिमा. (या दिवशी पवित्रारोपण करतात.)

**पवित्रु-त्रू** वि. सात; ७ संख्या : 'केवलाकाठी पवित्रु त्यासी । सांगोनिया दीधले ।'- भवि ४२.४५. (नंदभाषा.)

**पव्हणा** पु. पोहण्याजोगा पाण्याचा डोह.

**पव्हणारु** वि. पोहणारा : 'आला शिष्यसरितेसि थोरू । तेथें अविवेक पव्हणारू ।'- विपू १.१००.

**पव्हणी** स्त्री. नौका; होडी. [सं.प्रवहण]

**पव्हणे** अक्रि. पोहणे : 'जैसा आब्रह्म पूर्णोदकीं । पव्हे मार्कंडेय एकाकी ।' - ज्ञा ११.१८७. [सं.प्रवाहनम्]

**पव्हरी** स्त्री. उसावरील एक रोग. यामुळे उसाचे शेंडे पिवळे पडतात. (व.)

**पव्हे-व्हा** स्त्री. पाणपोई : 'आहा आहा रे भाई हें अन्नदानाचें सत्र । पव्हे घातली सर्वत्र ।'- तुगा ३३९. [सं.प्रवाह]

**पशम** न. १. लोकर. २.(संकेताने) गुह्यभागावरील केस; शेट; शष्प (क्रि. उखडणे). ३. (ल.) क:पदार्थ; क्षुद्र गोष्ट : 'कोल्हापूर मिरजेच्या किल्ल्यापुढें पशम आहे.'- ऐलेसं १२.६२९६. [फा.पश्म्]

**पशमी** वि. लोकरी; लोकरीचे (वस्त्र इ.). [फा.पश्मी]

**पशमीना** पु. लोकरीचे वस्त्र; कापड. [फा.पश्मीना]

**पशीना** पु. घाम. (व.) [सं.प्रस्विन्न, हिं. पसीना ]

**पशु-शू** पु. १. जनावर; चतुष्पाद. २. (ल.) अविचारी, मूर्ख मनुष्य. ३. निर्दय, आडदांड मनुष्य. [सं.]

**पशुवळ** वि. गुराखी; गुरे चारणारा; पाळणारा : 'माता ही दोन ठायीं पशुवळ। विकिती दुग्ध घेऊन डोई ।'- अकक २, किंसुदाम ७२.

**पशुवैद्यक** न. जनावरांचे रोग व त्यावरील उपाय यांचा पद्धतशीरपणे अभ्यास करणारी ज्ञानशाखा.

**पशेत** १.चौकशी. २. इलाज. ३.निषेध. -ऐको.

**पशेमानी** स्त्री. पस्तावा; पश्चात्ताप; दु:ख. [फा.]

**पशेरी** स्त्री. १. पाच शेराचे वजन; पासरी. २.(ल.) उपजीविका; उदरनिर्वाह.

**पश्चजल** न. भरतीने किंवा पुराने किनाऱ्यावर आलेले, पण वाहून न गेल्यामुळे साठलेले पाणी.

**पश्चप्रवासी** पु. दुचाकीच्या मागच्या सीटवर बसून जाणारा.

**पश्चात** क्रिवि. १. नंतर; मागून. २. पाठीमागे; आड. ३. पश्चिमेकडे.[सं.]

**पश्चातपाहार** पु. पहाटेची वेळ : 'विष्णु पश्चातपाहारीं प्रत्यक्ष आला' - श्रीकृच. [सं.पश्चात् + प्रहर]

**पश्चात स्वस्तिक** क्षितिजाचा पश्चिम बिंदू. [सं.]

**पश्चात्ताप** पु. एखादी गोष्ट घडून गेल्यावर, वेळ निघून गेल्यावर चुकीबद्दल वाटणारी हळहळ; पस्तावा; पस्तावणी; आपल्या हातून घडलेल्या पापांबद्दल तिरस्कार व खेद उत्पन्न होणे.

**पश्चासन** न. दुचाकीचे मागचे आसन.

**पश्चिम** स्त्री. १.सूर्यास्ताची दिशा. २.(ल.) पश्चिम दिशेचा वारा. वि. १. पश्चिमेकडील; पश्चिमेचा. २. पाठीमागचा; नंतरचा; मध्यानंतरचे; अपर; अवर; उत्तर (रात्र).३. उशिरा होणारे (धान्य). [सं.]

**पश्चिमद्वार** न. १. पश्चिमेकडील, मागील दार, फाटक. २.(ल.) गुद. ३. (संकेताने) अपानवायू.

**पश्चिमाग्रा** स्त्री. सूर्य तारा जेथे मावळतो तो क्षितिज बिंदू.

**पश्चिमास्त** न. पु. बुध, शुक्र यांचे पश्चिमेकडे (सूर्य सान्निध्यामुळे) मावळणे.

**पश्चिमी वारे** पु. अव. मध्य अक्षांशीय जास्त दाबांच्या पट्ट्यांकडून ६०° अक्षवृत्तीय कमी दाबाच्या पट्ट्यांकडे वाहणारे वारे. (या वाऱ्यांना ४०° दक्षिणेच्या पलीकडे 'गर्जणारे चाळीस' व ५०° दक्षिणेच्या पलीकडे 'खवळलेले वारे' म्हणतात.)

**पश्चिमोदय** पु. सूर्याबरोबरच्या युतीनंतर संध्याकाळी आकाशात पश्चिमेच्या बाजूला शुक्र व बुध हे तारे दिसणे.

**पश्चिमोत्तानासन** न.

**पश्मी** वि. लोकरी : 'पश्मी रुमाल एक तांबडा पाठविला आहे.'- ऐलेसं ११.५७०१. [फा.]

**पश्यतोहर** पु. १. देखत, समोर चोरी करणारा; उचल्या; दस्यू: 'कोठें जाल उभे रे मत्स्येश्वरधेनुपश्यतोहर हो ।'- मोविराट ४. ८४.३०३. २. (सामा.ल.) सोनार. [सं.पश्यत: + हर]

**पश्यंती** स्त्री. (परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी या) चार वाचांतील दुसरी वाचा; परेपासून हृदयस्थानी इषन्मात्र उमटणारी भासरूप वाणी.

**पस** नंतर. - ऐति.

**पसगैबत** क्रिवि. गैरहजेरीत; हजर नसताना; पश्चात.[फा. पस् + घैबत्]

**पसतक** पु. घोड्याच्या मागील पायातील एक रोग.- अश्वप २.२८१.

**पसपा** क्रिवि. १. अस्ताव्यस्त. २. जिकडे-तिकडे; सैरावैरा; बेपत्ता.

**पसय** पु. पसा-पसा जमविलेले धान्य; फंड. (गो.)

**पसर** पु. १. पसारा; विस्तार: 'आतां असो हा युद्धविचार । सर्व वर्णावा तरी अपार । ग्रंथा होईल पसर ।' - कथा १.७.१५९. २. पसरणे; फैलावणे; चालू राहणे. [सं.प्रसर]

**पसरकार** पु. दुकानदार. (गो.)

**पसरट-डा** वि. १. पसरलेले; विस्तारित. २. उथळ; रुंदट (भांडे इ.).

**पसरड** स्त्री. खळ्याभोवती गोलाकार लावलेल्या ज्वारीच्या पेंड्या.

**पसरडी** पु. पावसाचे पाणी काढून बाजूने लावण्यासाठी खणलेला ओहोळ. (को.)

**पसरणी** स्त्री. १. पसरण्याची क्रिया; वाढ; विस्तार. २. पांगापांग; फैलाव.

**पसरणे** उक्रि. १. विस्तार पावणे; विस्तारणे; उघडणे (तोंड, हात इ.). २. ताठ, लांब करणे; विस्तृत करणे (पाय इ.). ३. पांगापांग होणे; विस्कटणे. ४. (ल.) निजणे. ५. अंथरणे; वर घालणे. ६. अधिक प्रदेश व्यापणे; संकुचितपणा सोडणे; फैलावणे. [सं.प्रसर]

**पसरा** पु. १. दुकान. (गो.) २. पहा : **पस्टर** [सं.प्रसर]

**पस(रूं)रू** न. पशू; गुरू.( कु. गो.) [सं.पशु]

**पसवणे** उक्रि. १. प्रसूत होणे; प्रसवणे; विणे; वेत देणे (घोडी, गाढवीण यांनी) : 'घोडी सबर झाल्यापासून प्राय: अकरा महिन्यांनीं पसवते.'- मपु ३.१०८-१८७३. २. कोका, केळफूल बाहेर टाकणे (केळीने).

३. तुरे, कणसे बाहेर टाकणे (नाचणी, वरी, सावा इ. नी.); निसवणे. [सं.प्र + सू.]

**पसंबुरी** स्त्री. झाडाची पाने; पत्री : 'पसंबुरी आदिकरौनि खांडिलीया ।'– लीचउ ३३८. [क. पसुर=हिरवळ]

**पसा** पु. १. हाताचा विशिष्ट केलेला आकार (धान्य इ. घेण्यासाठी.); खोंगा; हाताची बोटे जुळवून शेवटाला थोडी वर वळवून त्यात अंगठा जुळला असता होणारा खोलगट आकार. २. ओंजळ; अंजली. ३. (ल.) पसाभर धान्य : 'मुळींच पदरीं नसता पसा।' – नवा १०.१७०. [सं.प्रसृत]

**पसाइता** स्त्री. सरकारी कामदारासाठी राखून ठेवलेली जमीन; नोकरीचा मोबदला म्हणून दिलेली जमीन. (बडोदे) [सं.प्रसाद]

**पसाघोडी** स्त्री. पैदाशीसाठी राखून ठेवलेली घोडी – पेद ५.४२.

**पसाट** न. बैलगाडीतील मागच्या बाजूची बसण्याची जागा; फसाट.

**पसाड–व** पु. मोठा परकर; घागरा. (खा.)

**पसात** न. पहिल्या पिकानंतर येणारे पीक. (अहि.)

**पसात्या** वि. शेवटचे अपत्य. (झाडी) [सं.पश्चात]

**पसाद** वि. १. उशीर झालेले. (व.) २. उशीर किंवा वेळ असलेले. [फा. पस् = मागून]

**पसामूठ** स्त्री. ओंजळभर किंवा मूठभर धान्य इ. (बलुतेदार आपला हक्क मागण्यासंदर्भात हा शब्द फार योजतात.)

**पसाय** पु. प्रसाद; कृपा; मेहेरबानी : 'आता तेणेंचि पसायें तुम्हां संतांचे मी पाये ।'– ज्ञा १५.२८. [सं.प्रसाद]

**पसायदान** न.१. प्रसाद. २. वर : 'तोषोनि मज द्यावे । पसायदान हे ।'– ज्ञा १८.१७९३.३. प्रार्थना.

**पसायेता** वि. पु. प्रसाद देणारा : 'किंबहुना होये पसायेता : भक्तीचा तो' – ज्ञाप्र ८३५. [सं.प्रसाद]

**पसार** पु. १. व्यायामासाठी फेऱ्या घालणे; शतपावली. २. इकडून तिकडे फेऱ्या घालणे (पहारेकरी, संत्री यांनी).
वि. १. गेलेला; झालेला; गत. उदा. आठ पसार = आठ वाजून (गेले). २. मान्य; बहुमताने मंजूर. (क्रि. होणे.) ३. उत्तीर्ण; पास ( क्रि. होणे). ४. निघून जाणे; पळणे. [पोर्तु. पासार= जाणे; इं. पास]

**पसार–रा** पु. दुकान. पहा : **पसरा**

**पसारा** पु. १. (वस्तू, काम इ. चा) विस्तार; व्याप; फैलाव; प्रसार. 'म्हणौनि वाचेचा चौबारा । घातलिया धर्माचा पसारा ।'– ज्ञा १६.२२३. २. जाहीर होणे; प्रसिद्धी. ३. चहूकडे पसरले जाणे; अव्यवस्थितपणे पडणे; गोंधळ. ४. पसरलेल्या, अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तू. ५. मूल आडवे आले असताना बाळंतिणीने पसरणे (क्रि. पडणे). ६. दुकानातील सामान इ. भरण्याचे एक प्रकारचे तबक, ताट. ७. बारदान; पक्की कपाशी ज्यात बांधतात ते गोणपाट. (खा.). ८. माल पसरून मांडलेले दुकान : 'पसारा घातला' – लीचपू ७८. [सं.प्रसर]

**पसारा** पु. व्यापारी; दुकानदार. [सं.प्रसारक]

**पसारा** पु. गुरांचे रात्रीच्या वेळी चरणे; गुरांना रात्रीच्या वेळी चरायला नेणे. [हिं.पसर]

**पसारी–ऱ्या** पु. १. औषधे विकणारा; भेषजी; गांधी. २. वाणी; किराणा जिनसांचा दुकानदार. [हिं.पनसारी]

**पसि** क्रिवि. पेक्षा : 'तें चैतन्यरत्नापसि उजाळें । अधीक दीसे ।'– उगी ७९६. [तुल.गु.पछी]

**पसु(सो)रडी** स्त्री. (निंदार्थी) पैसा.

**पसू** स्त्री. पहा : **पसघोडी** [सं.प्र + सू]

**पसेता** पु. अशुद्ध अफू वाळवताना त्यातून येणारा पातळ पदार्थ. [सं. प्रसव]

**पस्त** क्रिवि. पूर्णपणे; संपूर्णपणे; सर्वस्वी; निखालसपणे; निःशेष; साफ (नाश करणे, फन्ना उडविणे इ. अर्थाच्या क्रियापदाबरोबर वापर). उदा. लुटणे, नागविणे, बुचाडणे, घर धुणे इ. [फा. पस्त् = खाली]

**पस्तावणे** अक्रि. पश्चात्ताप पावणे, करणे; पस्तावा होणे; स्वतःच्या (नीती-अनीतीच्या) कृत्याबद्दल खेद होणे; मागाहून शोक करणे. [सं.पश्चात्ताप]

**पस्ताव–वा, पस्ताई, पस्तावणी** पु. स्त्री. पहा : **पश्चात्ताप**

**पस्ताळीस** वि. पंचेचाळीस.

**पस्तीस** वि. ३५ ही संख्या.

**पस्तु** पु. एक ताल. यात सात मात्रा व तीन विभाग असतात.

**पस्तु(स्तो)री** स्त्री. वाढावा; सवलत; वरताळा; कोणताही जिन्नस मोजून तितका घेतल्यानंतर वर अधिक देतात तो जिन्नस.

**पस्पा** पीछेहाट; पराभव. [फा. पस्पा = मांडी घालणे]

**पहलू** पु. १. अंग; बाजू; पैलू. २. कूस; बगल. ३. दृष्टिकोन; दिशा. ४. पद्धती. ५. युक्ती. [फा.]

**पहाट** स्त्री. १. सूर्योदयापूर्वीचा सहा घटिकांचा काळ; उषःकालापासून सूर्योदयाचा काळ; प्रातःकाळ. २. सकाळ. (व.)[सं.प्रभा – प्रभात]

**पहाड, पहाडवेल** स्त्री. एक प्रकारची वेल; गजग्याचे झाड. [सं.पाठा]

**पहाड** पु. (बांधकाम) पहा : **परांची** : 'पहाड दुहेरी असावा.'–मॅरट १२.

**पहाड** पु.१. डोंगर; लहान पर्वत; टेकाड. २.(ल.) अतिशय मोठा व उंच, खणखणीत आवाज (गाणाऱ्याचा, गवयाचा).(हिं.) [सं.पाशी]

**पहाडी** वि. १. पहाडाचा; पहाडासंबंधी; डोंगरी. २. मोठा; उंच; खणखणीत (आवाज).

**पहाडी** पु. (संगीत) एक राग. गानसमय सार्वकालिक.

**पहाडी** स्त्री. पालखी, मेणा इ. वाहाण्यासाठी ठेवलेले भोयांचे समुदाय प्रत्येकी.

**पहाडी जिल्हा** एक रागिणी. [सं.]

**पहाण(णी) खरडा, पहाणदार, पहाणी–णें, पहाण्या** इ. पहा : **पाहणीखरडा, पाहणीदार**

**पहाता** पु. १. प्रेक्षक; पाहणारा : 'तर्कित होते निज पर भट विधु कीं रवि असें पहाते ज्या ।'– मोभीष्म १.३९. २. द्रष्टा. ३. देखरेख करणारा.

**पहार, पहारय** स्त्री. एक टोक चपटे असलेली, खड्डा खणण्यायोग्य, वाटोळ्या आकाराची, लोखंडी, सुमारे मीटरभर लांबीची कांब. [सं. प्रहार]

**पहार** पु. तीन तासांचा काळ; प्रहर; याम; दिवसाचा आठवा भाग: 'जिये गांवींचा पहारु दिवोवेरी । एका अमरेंद्राचें आयुष्य न धरी ।'– ज्ञा ८.१५५. [सं.प्रहर]

**पहारा** पु. १. रखवाली; चौकी; राखण; जागल. २. चौकीदार; रखवालदार; संरक्षकांची तुकडी. ३. प्रतिबंधक इलाज. [फा. पह्रा; सं. प्रहर]

**पहारेकरी, पहारेदार** पु. पहाऱ्यावरचा शिपाई; संत्री; चौकीदार; रखवालदार.

**पहारेबंदी** स्त्री. पहारेकऱ्यांची रांग; नाकेबंदी करण्यासाठी जागजागी पहारे ठेवून केलेला बंदोबस्त.

**पहाळ** पु.एक झुपकेदार वनस्पती; रोपडे.

**पहाळ** न. मोठी रांग.

**पहाळ** स्त्री. १. वृष्टी; वर्षाव; पावसाची सर. २. डोंगरातील प्रवाह; ओढा. ३. झाडांना पाणी मिळावे म्हणून त्याच्या सभोवार खणलेला खळगा, आळे. ४. उपासामुळे पोटाला पडलेली खळी.

**पहाळी** पहा : **पहाळ** १ ते ३

**पहित** न. वरण : 'मी पहित वाढुं वीसरलियें ।'– लीचपू २.११.

**पहिरा** पु. (औंध) पहा : **पडकेल**

**पहिलटकर-रू, पहिलार-रू, पहिलटकरीण** वि. स्त्री. १.पहिल्यानेच विणारी, गाभण राहिलेली (गाय,म्हैस इ.); प्रथम गर्भिणी स्त्री. २. एकदाच बाळंतीण झालेली स्त्री.

**पहिलवान, पैलवान** पु. १. मल्ल; वीर; कुस्तीबाज; जेठी; तालीमबाज; शक्तीची कामे करणारा; शक्तिमान; कुस्त्या करणारा. याचे चोबे, जेठी, पंजाबी व वज्रमुष्टी असे चार प्रकार आहेत. २. या नावाचा एक शक्तीची कामे करणारा वर्ग, जात. यांचे गोपाळ नावाच्या लोकांशी बंधुत्व असते. ३. उकिरड्यावरील एक मोठा किडा. [फा.पहलवान्]

**पहिलवानकी** स्त्री. पहिलवानाचे काम, धंदा किंवा कौशल्य.

**पहिला** पु. घोड्याचा अवयव; वैसीक संधीचा (पोटरीच्या बाजूचा) अग्रभाग (मागील भाग). – अश्वप १.६३.

**पहिला, पहिलील** वि. १. प्रथम; प्रथमचा. २. कोवळे; नवीन. ३. पूर्वीचा. क्रिवि. पहिल्याने; आरंभी; सुरुवातीला; प्रथमत; पहिल्यांदा.[सं.प्रथम]

**पहिली गंगा** पावसाळ्यात नदीला येणारे पहिले पाणी – बदलापूर १२१.

**पहिली सुनावणी** (कायदा) निर्णय घेण्याचे विवाद्य मुद्दे ठरवण्यासाठी वकिलांनी आपापली बाजू मांडण्याची सुरुवात करण्याचा दिवस.

**पहिले वाचन** विधिमंडळासमोर हेतू मंजूर करून घेण्यासाठी केलेले कायद्याच्या मसुद्याचे पहिले वाचन.

**पहिल्या घरचा** वि. (दुसरे लग्न करणाऱ्या विधवेच्या मुलासंबंधी वापरतात.) पहिल्या, पूर्वीच्या नवऱ्यापासून झालेला मुलगा.

**पहिल्यान** क्रिवि. पहा : **पहिला**

**पहिल्यापहील, पहिले प्रथम** वि. क्रिवि. पहा : **पहिला**

**पहु** पु. पावा; बासरी. (अहि.)

**पहुची** स्त्री. १. मनगट. २. पुरुषांच्या मनगटावर बांधण्याचा एक दागिना; पोंची; पोहची. [फा.;हिं.]

**पहुड** पु. आडवे होणे; निद्रा : 'गोसावीयांसि पहुड होए'– निलीपूजावस ५.१३. [सं. प्रसुप्त]

**पहु(हौं)डणे** अक्रि. १. (विश्रांती घेण्यासाठी) कलंडणे, लवंडणे, अंग टाकणे. २. निजणे : 'तो तूं देवकीकूंसीचां सेजारी । पहौंडलासी राया मुरारी ।'– शिव १२२. [सं.प्रसुप्त]

**पहुपक** पु. रथ : 'पहुपकीं कृष्ण रावो'– मधउ २४.४८. [सं. पुष्पक]

**पहुरण** न. ओटी भरणे. [सं. प्राभरणम्]

**पहुरणी** स्त्री. १. विईपर्यंत दूध देणारी गाय, म्हैस:' परी पहुरणी जें दुहिलें । तैं तें गुरूं न दुभेचि व्यालें । का उभें होत चारिलें । पिकावया नुरे ।'– ज्ञा १७.२४८. २.ओढाळ गाय. ३. एक किडा.

**पहुरे** न. चर्मवाद्य: 'येका हाती आधाटिया पहुरे ।'– रुस्व १७७.

**पहूड** स्त्री. १.भेट; उपहार. २. संकल्पित भिक्षा. [सं.प्राभृत]

**पहेदणे** अक्रि. लालचावणे; मोहात पडणे.(व.)

**पहेली** स्त्री. उखाणा. (हिं)

**पह्य** पु. पळाटी; कपाशी. (व.) – लोसाको.

**पह्याण** न. वैरणीसाठी कापून उन्हात वाळविलेले गवत. (को.)

**पळ–ळा** पु. मोठी पळी; पळा. (व.,ना.)

**पळ** न. १. घटिकेचा साठावा अंश; तासाचा १५० वा भाग; क्षण. २.(लोणी, तूप इ.चे वजन करण्याचे) अठ्ठावीस ढबूंचे वजन. [सं.पल]

**पळ** पु. १.(भीती, पराभव वगैरेमुळे होणारी माणसांची) धावाधाव; पळत सुटावे अशी अवस्था. (क्रि. काढणे, सुटणे). २. पोबारा. ३. (ल.) पळपुटी माणसे.

स्त्री. १. धावणे; जोराने धावत सुटणे; धाव. (क्रि. घेणे) २. शर्यत; दौड; धूम (क्रि. मारणे). ३. कोणी पाठीस लागल्यामुळे होणारी तिरपीट.

**पळ** स्त्री. शेतातील पाण्याचा निचरा होण्यासाठी काढलेला पाट, नाला, जलमार्ग. (को.)

**पळका** वि. १.पळण्यात जलद; चपळ. २. पळपुटा.

**पळका** पु. विस्तवाने पोळल्यामुळे निघणारी कातडी; भाजलेल्याचा वण. [सं. प्लुकष]

**पळघडी** क्रिवि. पळभरही; क्षणभर सुद्धा : 'नको प्राणसख्या विसरूं मजला पळघडी ।'– सला १.

**पळटेळ** पहा : **पडकेल**

**पळण–णी, पळपट, पळापळ** न. स्त्री. पहा : **पळ** पु. १,२

**पळणे** अक्रि. १.पळून जाणे; धावत जाणे; धूम ठोकणे. २.(सामा.) धावणे. ३. पळवाट ठेवणे (भाषण, लेखन यात). [सं.पलायन]

**पळते पीक** १. शेवटचे पीक; शेवटचा बहर (फळझाडांचा). २.(ल.) व्यापारधंद्यातील किंवा काही वस्तूंपासून मिळालेला शेवटचा नफा, लाभ. ३. विद्यमान पण थोडेच दिवस टिकणारे सुख.

**पळप(पु)टा–ट्या** वि. १.पळ काढण्याची प्रवृत्ती, स्वभाव असलेला; पळून जाणारा. २. (ल.) भेकड; भित्रा.

**पळ(ळि)पणे** क्रि. पेटणे; जळणे: 'पळपत विरहाग्नी ।'– ऋ ६५. [सं.प्लुष्]

**पळपळीत** पहा : **पिळपिळीत**

**पळवा** पु. १. (उन्हाळ्यात, भाजी नसेल तेव्हा करण्यासाठी) वाळवून ठेवलेली पालेभाजी, हिरवी मिरची इ. (पळवा व उसरी एक नव्हे). २. झाडावरून गळालेला पालापाचोळा : 'भीम प्रतापतपनें झाले बहु शुष्क ते जसे पळवे ।'– मोविराट १.१६७. ३. पालेभाजीत पीठ घालून

परतून केलेली मोकळी भाजी. [सं. पल्लव]

**पळविणे** उक्रि. १. पळायला लावणे, भाग पाडणे; धावविणे. २.हाकून लावणे; घालवून देणे. ३. (एखादी वस्तू) हिसकून घेऊन पळून जाणे. ४. सोडविणे; सोडवणूक करणे. ५. नाहीशी करणे; दूर करणे, सारणे : 'तुमची शंका अशेष पळवाया ।'– मोआदि ११.८३. ६. पराभव करून पिटाळणे.

**पळशी** स्त्री. एक वेलीसारखे झाड. पाने पळसाच्या पानांसारखी. भारे वगैरे बांधण्यासाठी दोरीसारखा उपयोग. [सं. पलाशी]

**पळस** पु. एक वृक्ष. उंची १२ ते १५ मीटर, तीन पर्णिकांचे संयुक्त पान, फुले लालभडक असतात. [सं.पलाश]

**पळसपापडी** १. पळसाचे बी. याचा औषधात उपयोग करतात. २. पळसाची शेंग. (व.)

**पळसुला** पु. उपनयनसंस्कारात चौथ्या दिवशी करण्याचा एक विधी; मेधाजनन. ( या विधीत पळसाच्या डहाळीच्या भोवती पाणी घालायचे असते.)

**पळंज, पळिंज–जी** न. १. हलके, निरुपयोगी धान्य; न भरलेले, भुसके कणीस; धान्याचे फोलकट. २. न पोसलेले, न भरलेले, पोचर भात.(को.)

**पळंजी** स्त्री. दाणा नसलेली शेंग; पोकळ शेंग.

**पळाटी** पहा : **पऱ्हाटी**

**पळिताइ** स्त्री. कुरूपपणा. (गो.)

**पळी** स्त्री. १. पातळ कालवण, आमटी, कढी वगैरे पदार्थ वाढता येण्याच्या उपयोगाचे लाकडी किंवा धातूचे साधन; लहान पळा; डाव. २. संध्येच्या, पूजेच्या वगैरे नित्य नैमित्तिक कर्मासाठी उपयोगातील एक उपकरण. ३. चुन्याच्या घाणीच्या चाकामागून एक लोखंडी लांब दांड्याचे फिरविले जाणारे उलथने. ४. करंडी. तंजा [हिं.पली]

**पळीत** पहा : **पलित** [सं. पलित]

**पळीव** न. सापाला मारण्याचे त्रिशूळासारखे दाते असलेले हत्यार.

**पळीव** न. १. नांगराचा फाळ. (कु.) २. लहान फावडे (पाण्याचे पाट तयार करण्यासाठी लादे खणण्याच्या उपयोगाचे); मागे लाकडात बसविण्यासाठी वर्तुळाकृती व पुढे खणण्यासाठी चापट केलेले लोखंडी हत्यार.

**पळीवाढा–ढ्या** वि. पळीने वाढता येण्याजोगा (पातळ पदार्थ).

**पळू** न. पळीचे टवळे; तोंड. (को.)

**पळेणे** सक्रि. पाहणे. [सं.प्रलक्ष्]

**पळ्हे, पळे** न. १. कापसाचे झाड. २. कापसाचे शेत, लागवड. पहा : **रानकापशी**

**पक्ष** पु. १. पक्ष्याचे उडण्याचे साधन; पंख. २. चैत्रादी चांद्रमासांचा अर्धा भाग; पंधरवडा; शुक्ल (शुद्ध) व कृष्ण (वद्य) हे दोन पक्ष आहेत. ३. भाद्रपद महिन्यातील वद्य पक्षात पितरांना उद्देशून केले जाणारे श्राद्धकर्म. ४. (लढा, वादविवाद, दोघांचे काम, धर्म वगैरेतील) बाजू; भाग; तट; तड; पंथ; भेद; प्रकार. ५. मुद्दा; मत; तत्त्व; मूळ सिद्धांत. ६. पद्धत; रीत; चाल; संप्रदाय; विकल्प; कृतिप्रकार. ७. बाणाला लावलेले पीस, पंख. ८. प्रतिपादन करण्याचे तत्त्व; मत; प्रमेय. ९. अजमास, अनुमानाचा विषय; सिद्धांताचा प्रकार: 'म्हणौनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षुच्या ठायीं पक्षु ।'– ज्ञा १३.८७७. १०. जात; वर्ग. ११. वहिवाटीत घेतात तो वादीची अर्जी यासाठीचा पर्यायवाचक शब्द : 'भाषा, प्रतिज्ञा, पक्ष हे अर्जीचे पर्यायवाचक शब्द जाणावे.'– मिताक्षरा, व्यवहारमयूख १३. १२. बाजू; पार्श्वभाग; एक अंग. १३. (सामा.) मतभेद; मतभेदाचे प्रकार, पंथ प्रत्येकी. [सं.पक्ष]

**पक्षक(का)र** पु. (कायदा) न्यायाच्या कचेरीत भांडणारा वादी किंवा प्रतिवादी.

**पक्ष(क्षा)घात** पु. अर्धांगवायू; अंगाचा काही भाग चेतनाशून्य होणे.

**पक्षद्वार** न. बाजूचे, लहान दार: 'पक्षद्वारें विप्र बाहेर आला ।'– सारुह ४.५३.

**पक्षपात** पु. १.एका पक्षाकडे, बाजूकडे मनाचा ओढा; विशेष आवड. २. कैवार, बाजू घेणे; एका पक्षाची तरफ़दारी. ३. पंक्तिप्रपंच; असमदृष्टी.

**पक्षपाती** वि. १. पक्षपात करणारा. पहा : **पक्षपात**

**पक्षप्रदोष** पु. प्रत्येक पंधरवड्यातील प्रदोष.

**पक्षसंयोजन** न. (कायदा) दाव्याच्या कामात न्यायाधीशाच्या मताने हजर असलीच पाहिजे अशी व्यक्ती.

**पक्षाभास** पु. १. (कायदा) खोटी फिर्याद. २. (तर्कशास्त्र) खरे भासणारे पण दिखाऊ प्रमाण; अपसिद्धांत.

**पक्षिआ** पु. पक्ष्याप्रमाणे पंख असलेला; किन्नर : 'तुज सांघातें हा पक्षिआ कवणु ?'– श्रीकृच ५५. [सं.पक्षिन्]

**पक्षिणी** स्त्री. १. एक रात्र व दोन दिवस किंवा दोन रात्री व एक दिवस असा काळ. २. वरील मुदतीचा अशौचकाल.

**पक्षिविद्या** स्त्री. पक्ष्यांची राहणी, सवयी, संवर्धन इ. चा पद्धतशीर अभ्यास करणारे शास्त्र.

**पक्षिशकुनविद्या** स्त्री. (फ.ज्यो.) विविध पक्ष्यांच्या दर्शनावरून, आवाजावरून भविष्य वर्तवण्याची विद्या.

**पक्षी** क्रिवि. एका दृष्टीने, एका बाजूने, विचाराने; एका अर्थी; यदाकदाचित; विकल्पे करून; शक्यतर (पक्ष याची सप्तमी विभक्ती).

**पक्षी** पु. पंख, चोच असलेला उडू शकणारा, द्विपाद, विविध रंगांचा व आकारांचा प्राणी; पाखरू. [सं.]

**पक्षी** शअ. तर; त्याअर्थी : 'तथापि आपण म्हणता त्या पक्षीं हें असो.' – कर्म ४.११९. पहा : **पेक्षा**

**पक्षीप्राणी** पु. ज्याला मागे-पुढे कोणी नाही असा, एकटा, निराधार, निराश्रित मनुष्य.

**पंक** पु. (मिठाई इ. करण्यासाठी) साखर, गूळ इ. चा केलेला पाक; रांधा. (गो.) [सं.पाक]

**पंक** पु. चिखल; कर्दम. [सं.]

**पंकज** वि.न. कमळ [सं.]

**पंकोळिका** स्त्री. फुलाची पाकळी : 'तयां (अंगोळिया) रक्तपदाब्जु पंकोळिका.' – सन ८०. [सं.पक्ष्मन्]

**पंक्चर** न. (टायर इ.तील) रबरी नळीला पडलेले भोक. [इं.]

**पंक्ति–क्ती** स्त्री. १. ओळ; रांग; मालिका; माळ. २. जेवायला बसणाऱ्यांची पंगत, ओळ; भोजनाची तयारी. ३. (ल.) साहचर्य; बंधुत्व; सोबत; संगत. ४. मंडळी; संघ; गट; टोळी; मेळा; समाज. ५. दहा (१०) ही संख्या : 'पंक्ति सहस्र सुवर्ण प्रतिमासीं करूनि वेतन स्थापी ।'– मोवन ४.१७७. ६. (साहित्य.) एक छंद. याच्या चरणात दहा अक्षरे असतात. चंपकमाला, विराट इ. वृत्तात हा छंद येतो. [सं.पंक्ति]

**पंक्तिकार** वि. पंक्तीला जेवणारा : 'रसखाद पक्वान्न । पंक्तिकारु जाण मी होईन ।'– एभा १२.५४०. [सं.]

**पंक्तिदोष** पु. १. जांत, मान, वर्तन इ. तील कमीपणामुळे पंक्तीला बरोबरीने बसण्याला अयोग्य ठरलेला माणूस पंक्तीत बसल्याने तेथील सर्व माणसास लागणारा दोष. २. सगळ्या जातीला लागू होणारा दोष, कलंक. ३. ज्याच्या योगाने मनुष्य अपांक्त होतो असा अपराध, दोष.

**पंक्तिपठाण–बारगीर** पु. जेवूनखाऊन चाकरीस ठेवलेला (घोडेस्वार). वि. (याला पगाराऐवजी मालकाच्या पंक्तीला जेवण मिळते यावरून ल.) ऐदी; आळशी; भोजनभाऊ; नुसता पुख्याला हजर असणारा. [सं.पंक्ति + फा. बारगीर]

**पंक्तिपावन** वि. पंक्तिदोष नसलेला; पंक्तीस बसण्यास योग्य; रोटी व्यवहारास लायक.

**पंक्तिप्रपंच** पु. १. पंक्तीत वाढताना केलेला पक्षपात, भेदभाव. २. (ल.) पक्षपात; भेदभाव. (क्रि. करणे).

**पंक्तिबाह्य** वि. सामाजिक इ. कारणांमुळे पंक्तीत घेण्यास अयोग्य ठरलेला.

**पंक्तिभाऊ** पु. (सहभोजी) एका ताटात जेवणारा; जिवलग मित्र.

**पंक्तिभेद** पु. १. पहा : **पंक्तिप्रपंच** २. भोजनाचे वेळी ज्यांना एकाच पंक्तीत बसता येत नाही त्यांची मध्ये जागा टाकून किंवा दिशा बदलून निराळी पंगत करणे : 'पंक्तिभेद असल्यास गोळक आणि आम्ही एकत्र जेवलो तरी चिंता नाहीं.'– शास्त्रीको. ३. एकाच जातीतील लोकांची त्यांच्या राहण्या–सवरण्याच्या, चालचलणुकीच्या फरकामुळे होणारी निराळी पंगत.

**पंक्तिलाभ, पंक्तीचा लाभ** पु. सहभोजनाचा लाभ, योग.

**पंक्तिव्यवहार** पु. १. पहा : **पंक्ति** २. २. सहभोजन.

**पंक्तीतला नळा** भोजनाच्या पंक्तीत उडवण्याचा दारूचा नळा.

**पंख,पख** पु. १. ज्याच्या मदतीने पक्षी उडू शकतात असा अवयव; पक्ष्याच्या एक अवयवरूप पिसांचा समुदाय; पक्ष. २. पंखातील एक पीस. ३. पंधरवडा; महिन्यातील पंधरा दिवस; पक्ष. ४. बाजू; पक्ष. ५.वर्ग; समुदाय; संघ.[सं.पक्ष्मन्] (वा.) ० **फुटणे** – १. वयात येणे; मोठा होणे. २. उडून जाणे; पळणे. ३.लबाडी करण्यात तरबेज होणे.४.(मूल) खोडकर होणे.

**पंखचन्नी, पंख(खे)बाळी, पंखमांजर, पंखशूल** पहा : **पखचन्नी** इ.

**पंखडी,पंखाड** स्त्री.न. (निंदार्थी) पक्ष्याचा पंख.

**पंखा** पु. कानातील एक दागिना. यास झुबे असतात.

**पंखा** पु. १.वारा घेण्याचे, घालण्याचे एक साधन; विंझणा. २. चोळीचे पाखे. पहा : **पखवा** : 'पंखे झमकती तेजखाणी ।'– वेसीस्व ९.१२९. ३. एक मोठा पतंग; वावडी. ४. पगडीच्या पदराचा जरतारी तुरा (हे दोन्ही कानावर खालवर असे ताठ असतात). ५. (घिसाडी) घिसाड्याच्या भट्टीला हवा पुरविणारे यंत्र; भाता. ६. गाडीवान बसण्याची साटीजवळची धुरीवरील जागा. (कर.) ७. (पिंजारी) कापूस पिंजण्याच्या कमानीला एका बाजूला असलेली अर्धवर्तुळाकार फळी. ८.पहा : **पखबाळी**. ९. (गवंडी) भिंत इ. मध्ये कमान रचताना पंख्याच्या आकाराप्रमाणे बसविलेल्या विटा. १०. छापण्याच्या यंत्रावरील छापून आलेला एक एक कागद व्यवस्थितपणे एका जागी ठेवला जाण्याचे साधन. ११. नांगराचा फाळ. (अहि.) १२. ऊसलावणीसाठी चरे पाडणारा विशिष्ट प्रकारचा नांगर. (अहि.) [सं.पक्ष]

**पंखाडा तिकीट** रेशमाची एक जात.

**पंखी** स्त्री. पिसांपासून तयार केलेले एक प्रकारचे कापड, वस्तू.

**पंख्या** पु. उडणारी खार.

**पंगड** न. पक्ष; तट (गावातील, लोकांमधील). (गो.) [सं.पंक्ति]

**पंगत** स्त्री. पहा : **पंक्ति** १ ते ४.

**पंगती** स्त्री. पंगतीला बसण्याचा मान : 'जाति नाही त्यासि कायसी पंगती' – नागा १७३८. [सं.पंक्ति]

**पंगारा** पु. पसारा; व्याप. (व.)

**पं(प)गिस्त–त** वि. १.लंगडा; पाय तुटलेला. २. (ल.) पराधीन; ओशाळा; ताबेदार; परतंत्र: 'रसनापंगिस्त नाहीं होणें । आहारू सेवणें निजबोधें ।'– एभा ८.२८.

**पंगिस्तता** स्त्री. १. पराधीनता. २. गरज; जरूर: 'माझें भजन करितां । न पडे ज्ञानाची पंगिस्तता ।'– एभा ११.६५७.

**पंगु–गू** वि. १. पांगळा; लंगडा; पाय गेलेला; विकल. २. अपंग; एखाद्या अवयवात व्यंग दोष असलेला. ३.(ल.) दरिद्री; असहाय्य; साधनविरहित; निराधार; असमर्थ. [सं.अपांग > अपंग]

**पंगुवात** पु. एक प्रकारचा अर्धांगवायू; पक्षघात.

**पंगुवार** पु. शनिवार.

**पंगुळवेल** स्त्री. झाडावर चढणारी एक वेल.

**पंगेरा** पु. पहा : **पांगारा**

**पंगोजी** स्त्री. नारळाची खव मैद्यात घालून भज्याप्रमाणे केले जाणारे पक्वान्न.

**पंघणे** न. डुलकी; पेंग. (क्रि. घेणे, देणे, खाणे, मारणे) अक्रि. पेंगणे; डुलकी घेणे.

**पंच** पु. अव. १. वादग्रस्त बाबतीत निवाडा देणारे; लवाद; पंचायतीतील एक किंवा सर्व व्यक्ती. यात सामान्यत: पाच माणसे असतात. पंचाचे दोन प्रकार न्यायपंच (ज्युरी) आणि व्यवस्थापंच (ट्रस्टी). २. उभयपक्षांनी मान्य केलेला लवाद. [सं.पंच = पाच]

**पंच** वि. पाच ही संख्या. [सं.]

**पंचक** न. १. पाचांचा समुदाय. २. धनिष्ठा नक्षत्राच्या उत्तरार्धापासून अश्विनीच्या पूर्वार्धापर्यंतची पाच नक्षत्रे. ही मरणकाळी आल्यास निषिद्ध मानतात. ३. काही विशिष्ट संख्या. विवक्षित लग्नसंख्येत गत

चांद्रतिथींची संख्या मिळवून त्या बेरजेला नवाने भागावे व १,२,४,६ किंवा ८ बाकी आल्यास तो पंचक होय. या पंचकाला निरनिराळी नावे असून हे अशुभ मानतात. ४. मढेपंचक.

**पंचकडी** स्त्री. (कागद, पेंढ्या, रुपये इ.) पाचांचा समुदाय; पंचक.

**पंचकला** स्त्री. हत्यारातील एक प्रकार; गुरज, गुप्ती, ढाल, बंदूक व संगीन अशा पाच हत्यारांच्या समावेशाने तयार झालेले हत्यार.

**पंचकल्याण–णी** वि. १. गुडघ्यापर्यंत पांढरे पाय व तोंडावर पांढरा पट्टा असलेला (घोडा), हा शुभ असतो. – अश्वप १.९०. २. (उप.) सर्व अवयव विकृत असलेला (माणूस). ३. (उप.) भाड्याचे तट्टू, घोडा (याला दोन्ही टाचांनी, दोन्ही मुठींनी व दांडक्याने मारून किंवा तोंडाने चकचक करून चालवावे लागते म्हणून.) ४. (उप.) ज्याच्या नाकातून नेहमी शेंबूड वाहात असतो व तो वारंवार मनगटांनी काढून टिरीस पुसत असतो असा (पोर).

**पंचकवडी** पु. पाच कवड्यांचा धनी. (दरिद्री).

**पंचकाजय** स्त्री. (गो.) पहा : **पंचखाद्य**

**पंचकेणे** न. १. मसाल्यातील मिरी, मोहरी, जिरे, हिंग, दगडफूल इ. पदार्थ. २. मसाले, धान्य इ. किरकोळ किराणा.

**पंचकौळी** पु. पाच कुळांचा स्वामी, आचार्य : 'धानाइ ते पंचकौळीची राणी ।'– लीचपू ४८. [सं.पंच + कुल]

**पंचक्रोशी** स्त्री. १. चार, पाच कोसांच्या अंतरातील गावे. २. एखाद्या क्षेत्राच्या भोवतालची पाचकोस जमीन. ३.(ल.) या गावातील जोशाची वृत्ती. ४. पहा : **पंचक्रोशी यात्रा**

**पंचखाज–जें–खाद्य** न.पु.न. १. 'ख' या अक्षराने प्रारंभ होणारे खाण्यास योग्य असे. (खारीक, खोबरे, खसखस, खिसमिस व खडीसाखर) पाच पदार्थ : 'पूर्ण मोदक पंचखाजा । तूं वऱ्हाडी आधीं ।' – वेसीस्व–३. २.नारळाचा खव, गूळ, चण्याची डाळ इ. पाच जिनसांचा देवाला दाखविला जाणारा नैवेद्य (गो.) ३. तांदूळ किंवा गहू, काजळ, कुंकू, उडदाची डाळ व खोबरे यांचा भूतपिशाचांना द्यावयाचा बळी; हे पाच जिन्नस. (को.)

**पंचगति–ती** स्त्री. घोड्याच्या (चालण्याच्या) पाच गती, चाली. भरपल्ला (चैवडचाल), तुरकी (गाम), दुडकी, बाजी आणि चौकचाल या पाचचाली होत.

**पंचगव्य** न. गाईपासून काढलेले, निघालेले पाच पदार्थ. दूध, दही, तूप, गोमूत्र, शेण यांचे मिश्रण. (धार्मिक शुद्धिकार्याकडे उपयोग).

**पंचग्रही** स्त्री. एका राशीत पाच ग्रहांची युती. [सं. पंच + ग्रह]

**पंचत्व** न. १.मृत्यू; मरण; देहातील पाच तत्त्वे निरनिराळी होणे. २. पाचांचे अस्तित्व.

**पंचतत्त्वे** न. अव. पहा : **पंचमहाभूते**

**पंचद्वयी** स्त्री. १. दक्षिणा देण्याच्या रकमेचे (ती कमी करायची झाल्यास) पाच भाग करून त्यातील दोन किंवा तीन ठेवून बाकीचे वाटणे. २. अशा तऱ्हेने शेत, काम, रक्कम, वस्तू इ. ची वाटणी करणे.

**पंचधार** स्त्री. १. जेवताना तूप पडले न पडले इतके कमी वाढणे; तुपाच्या भांड्यात पाच बोटे बुडवून अन्नावर शिंपडणे. २. झाडास पाणी घालण्याची पाच धारांची झारी: 'जगजीवनाचिया आवडी । पंचधार करी वरी पडी ।'–ऋ ७३.

**पंचधारा** स्त्री. अव (विनोदाने) तिखट पदार्थ खाल्ला असता किंवा नाकात गेला असता दोन डोळे, दोन नाकपुड्या व तोंड या पाच अवयवांतून वाहणाऱ्या पाण्याच्या धारा.

**पंचधारे** न. देवावर अभिषेक करण्याचे पाच भोके असलेले पात्र.

**पंचनख–खी** वि. १. पाच नखे असलेला (मनुष्य, माकड, वाघ इ.). २.ज्याचे मांस खाण्यास योग्य मानले आहे असे पाच नखे असणारे सायाळ, घोरपड, गेंडा, कासव, ससा इ. प्राणी. ३. छातीवर, खुरावर पाच उभ्या रेषा असणारा (घोडा). हे अशुभलक्षण होय. – अश्वप १.९५. ४.ज्याच्या चार पायांपैकी कोणत्याही एका पायाला फाटा फुटल्यासारखी आकृती असते असा (घोडा). – अश्वप १.९८.

**पंचनगर** न. व्यापाऱ्यांचा प्रमुख; महाजन : 'मग पंचनगरें मागावेया जाति' – लीचऊ १७६. [सं.]

**पंचनवटे** पु.अव. १. संसार इ.चा अनेकांनी मिळून अनेक प्रकारचा केलेला नाश (राजा. कु.); (एखाद्या संस्थेत वा मंडळात झालेली) फाटाफूट; बिघाड (क्रि. करणे). २. गोंधळ; घालमेल; अडचण.

**पंचनामा** पु. पंचांच्या समोर केलेल्या तपासाचे नोंदपत्रक.

**पंचपदी** स्त्री. देवापुढे नित्यनियमाने भक्तांकडून म्हटली जाणारी पाच पदे, अभंग : 'पंचपदी राम कलिसंकीर्तन ।'– सप्र २१.३६.

**पंचपर्व** वि. कोणत्याही एका पायास फरगड्याची आकृती असणारा (घोडा) – अश्वप १.१०२.

**पंचपात्र–त्री** न. स्त्री. पाणी पिण्याचे किंवा इतर उपयोगाचे नळ्याच्या आकाराचे मोठे भांडे.

**पंच पावणे** मृत्यू पावणे; मरणे.

**पंचपाळे** न. लाकडाचे किंवा धातूचे पाच वाट्या अथवा खण असलेले पात्र. हळद, कुंकू इ. पूजासाहित्य किंवा फोडणीचे सामान ठेवण्याच्या उपयोगी येणारे पात्र.

**पंचपुडी** क्रिवि. ज्याची पाचही इंद्रिये अक्षम झाली आहेत कामातून गेली आहेत असा : 'पंचपुडी भोजा'– लीचउ ५५१. [सं.पंच+पुटी]

**पंचप्रमाणे** न. अव. शब्दप्रमाण, आप्तवाक्यप्रमाण, अनुमानप्रमाण, उपमानप्रमाण व प्रत्यक्षप्रमाण.

**पंचप्राण** पु. १. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान. २. (ल.) अतिशय आवडती, प्रियकर वस्तू : 'तो पंचप्राण धन्याचा ।'– संग्रामगीते १९. (वा.) **(एखाद्यावर) पंचप्राण ओवाळणे; पंचप्राणांची आरती करणे** – दुसऱ्यासाठी सर्वस्व, प्राणही देणे; खरी, उत्कट भक्ती किंवा प्रेम दाखविणे.

**पंचफळे न. (गो.) पहा : पंचपाळे**

**पंचबे(वे)ऊळी** स्त्री. पाच नांग्यांची इंगळी.

**पंचबेळी** स्त्री. बोंबिल, कुटे इ. विक्रीसाठी एकत्र मिसळलेले मासे.

**पंचभद्र** वि. सर्व शरीर पिवळे असून पाय आणि तोंड मात्र श्वेतवर्णी असणारा (घोडा).– अश्वप १.२१.

**पंचम** वि. पाचवा.

**पंचम, पंचमस्वन, पंचम आलाप** पु. न. (संगीत) १. स्वरमालेतील (सात स्वरांपैकी) पाचवा स्वर; प. २. एक राग. याचे तीन प्रकार आहेत. गानसमय रात्रीच्या चौथा प्रहर. ३. (ल.) खाण्याचा तंबाखू. ४. वीणा वाद्याची पहिली तार. हिच्यातून पंचम (स्वर) निघतो. ५.(ल.) दुर्लौकिक; अपकीर्ती. (क्रि. करणे.) ६. मद्रासकडील एक अस्पृश्य वर्ग. [सं. पंचम]

**पंचमघा** स्त्री.अव. १. मघा नक्षत्रात सूर्य आल्यानंतरचे पाच दिवस. २. मघापासून पुढची पाच सूर्यसंक्रमणाची नक्षत्रे.

**पंचमसाळी** पु. लिंगाईत जातीतील एक भेद. पहा : **चिलवंत**

**पंचमस्तंभ** पु. अव. युद्धकाळात शत्रूसाठी काम करणारे लोक.

**पंचमाळाप** पु. पंचम म्हणजे उच्च स्वरातील गायन : 'पंचमाळापु सुकसारिका : कोकिळांचे'- सव १५९. [सं. पंचम + आलाप]

**पंचमहाभूते** न. अव. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही पाच तत्त्वे.

**पंचमिसळ, पंचमेळ** स्त्री. पु. १.पाच डाळींचे केलेले कालवण; आमटी. २. पाच-सहा प्रकारच्या डाळी किंवा धान्ये यांचे मिश्रण. ३. (ल.) एका जातीच्या पोटभेदातील झालेल्या मिश्रविवाहाची संतती, जात; संकरजात. ४. भिन्न-भिन्न पाच जातींतील लोकांचा समाज. ५. (ल.) निरनिराळ्या जातींचा एकत्र जुळलेला समाज.

वि. १. मिश्र; भेसळीचे. २. पाच प्रकार एकत्र केलेले : 'मोहोरा पंचमेळ बरहुकूम पत्र पुरंदर.'- वाडसमा ३.८३.

**पंचमुखी** वि. १. उरावर भोवरा असून त्यात पाच डोळे असणारा (घोडा).- मसाप २.५५. २. पाच तोंडांचा (मारुती, महादेव, रुद्राक्ष).

**पंचरंगी** वि. १. पाच रंगांचे (रेशीम, नाडा इ.). २. धोतरा, अफू इ. पाच कैफी पदार्थ घालून तयार केलेला (घोटा).

**पंचरशी-सी** वि. १. पाच (किंवा अधिक) धातूंच्या रसापासून तयार केलेली (वस्तू). २. तोफांचा एक प्रकार : 'पंचरशी आणि बिडी लोखंडी ।'- ऐपो २२५.

**पंचराशिक, पंचराशी** पु. स्त्री. (गणित) बहुराशिक; दोन त्रैराशिके एकत्र करून ती थोडक्यात सोडविण्याचा प्रकार; संयुक्त प्रमाणातील चार पदांपैकी संयुक्त गुणोत्तरातील दोन पदे आणि साध्या गुणोत्तरातील एक पद ही दिली असता साध्या गुणोत्तरातील दुसरे पद काढण्याची रीत.

**पंचरुखी-रूढ** वि. साधारण; रायवळ; अनेक प्रकारचे; जंगली (लाकूड - सागवान इ. इमारतीस लागणाऱ्या पाच प्रकारच्या लाकडांशिवाय).

**पंचरूढ** १. शस्त्रसज्ज; विविध हत्यारांनिशी सज्ज. २. बिनकवायती शिपाई ( ते अनेक हत्यारे बाळगीत व जरुरीप्रमाणे त्यानिशी लढत).

**पंचवगतृ** पु. पंचमुखी शिव. 'पंचवगतृ: त्रिनेत्रु'- लीचपू ५३८. [सं. पंचवक्त्र]

**पंचलवी** (गो.) पहा : **पंचरशी**

**पंचलोह** न. तांबे, पितळ, जस्त, शिसे व लोखंड यांचे मिश्रण.

**पंचविशी** स्त्री. १. पंचवीस वर्षांचे वय; भर तारुण्याचा काळ. २. पंचवीस वस्तूंचा समूह.

**पंचविसावा** वि. आत्मा : 'तूं परम दैवत तिहीं देवा । तूं पुरुष जी पंचविसावा। दिव्य तूं प्रकृति भावा । पैलीकडील ।' - ज्ञा १०.१५०.

**पंचशीलतत्त्वे** न.अव. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाची पाच तत्त्वे. १. एकमेकांच्या प्रादेशिक अखंडत्वाचा मान ठेवणे. २. दुसऱ्याचा भूप्रदेश न बळकावणे. ३. दुसऱ्या देशाच्या अंतर्गत कारभारात ढवळाढवळ न करणे. ४. एकमेकांशी समानतेचा व्यवहार करणे. ५. शांततामय सहजीवनाचा पुरस्कार करणे.

**पंचशीले** न. अव. अष्टांगमार्गाबरोबर पाळण्याचे पाच नियम: अहिंसा, अस्तेय, इंद्रियसंयम, सत्यपालन आणि मादक पदार्थांचे सेवन न करणे.

**पंचसार** न. तूप, मध, तापविलेले दूध, पिंपळी व खडीसाखर हे पदार्थ एकत्र घुसळून तयार केलेले सार. हे विषमज्वर, हृदयरोग, श्वास, कास व क्षय यांचा नाश करण्यास उपयुक्त असते.

**पंचसूत्र-त्री** वि. १. पाच दोऱ्यांचे, धान्यांचे, रेषांचे. २. सारख्या लांबीच्या पाच सुतांमध्ये केलेले, बसविलेले (शाळुंकेसह बनविलेले शिवलिंग).

**पंचसूना** स्त्री. अव. १. कांडण, दळण, चूल पेटविणे, पाणी भरणे, सारवणे, या पाच क्रियांपासून घडणारे जीवहिंसादी दोष : 'पंचसूना किल्बिषें म्हणूनि । एथें वाखाणिती।'- यथादी ३.२३. २. ज्या ठिकाणी प्राणिहिंसा होण्याची शक्यता असते, अशी घरातील (उखळ, पाटा-वरवंटा, चूल, भरलेले घडे ठेवण्याची जागा केरसुणी ही) पाच स्थाने.- भासंको.

**पंचहत्यारी** वि. १.ढाल, तरवार, तीरकमान, बंदूक, भाला किंवा पेशकबज या पाच हत्यारांनी युक्त. २. चार पाय व तोंड या पाचांचा शस्त्राप्रमाणे उपयोग करणारा (प्राणी-सिंह, वाघ इ.). ३. (ल.) हुशार; योग्य; समर्थ; संपन्न; सिद्ध असा (माणूस). ४. (व्यंग्यार्थी) शेंदाडशिपाई; तिसमारखान.

**पंचा** पु. १. हात-सव्वा हात रुंद व पाच-सहा हात लांब असे नेसावयाचे लहान धोतर. (क्रि. नेसणे) २. हाताचा पंजा. [फा. पंज; सं. पंचह = लहान वस्त्र; त. पंजि-स्री कापूस, पांढरे कापड]

**पंचाई** पु. लोहार; घिसाडी. (व.)

**पंचाईत** स्त्री. १. अडचण; संकट. २. चौकश्या; उठाठेव; लुडबूड; गोंधळ.

**पंचागी** पु. तेलगू जातीचा पुरोहित. (तंजा.)

**पंचाग्नि-ग्नी** पु.अव. १. चारी दिशांना पेटविलेले चार व डोक्यावरील तप्त असा सूर्य मिळून पाच अग्नी. २. शरीरातील पाच अग्नी.

वि. १. पाच श्रौताग्नी धारण करणारा गृहस्थाश्रमी ब्राह्मण. २. पाच प्रकारचे अग्नी. प्रलयानल, विद्युदनल, वडवानल, शिवनेत्रानल व द्वादशादित्यानल.

**पंचाग्निसाधन** न. चारी दिशांना चार कुंडे पेटवून दिवसभर उन्हात बसणे. हा तपश्चर्येचाच भाग असून, त्यास पंचाग्निसेवन, धूम्रपान असेही म्हणतात.

**पंचादुयी-दिवी-दुवी-देवी** स्त्री. पहा : **पंचद्वयी**

**पंचादेवी** स्त्री. शेताच्या उत्पन्नाचे पाच वाटे करून ज्याचे बैल असतील त्याला तीन व दुसऱ्याला (मालकाला) दोन वाटे देण्याची रीत.

**पंचानन** पु. १. वाघ; सिंह : 'जों वरि तों जंबुक करी गर्जना। जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ।'- तुगा ३२३८. २. अत्यंत रागीट माणूस. ३. (सामा.) पाच तोंडांची किंवा बाजूंची वस्तू. ४. शंकर. [सं.]

**पंचामृत** न. १. दूध, दही, तूप, मध आणि साखर (किंवा गूळ) या पाचांचे मिश्रण. चातुर्मासातील पहिल्या महिन्यात दूध, दुसऱ्यात दही, तिसऱ्यात तूप, चौथ्यात मध व पाचव्यात साखर, पाचवा (अधिक) महिना नसल्यास चौथ्या महिन्यात मध व साखर यांनी युक्त असणारे पदार्थ न खाणे. याला पंचामृत सोडणे म्हणतात. २. शेंगदाणे, मिरच्या, चिंच, गूळ आणि खोबऱ्याचे तुकडे इ. पदार्थ एकत्र शिजवून त्यास तेलाची फोडणी देऊन केलेला पदार्थ. ३. एक पक्वान्न, मिष्टान्न. [सं.]

**पंचायतन** न. १. शिव, विष्णु, सूर्य, गणपती व देवी या पाच देवता व त्यांचा समुदाय. त्यापैकी प्रत्येकाला प्राधान्य देऊन त्या त्या देवतेचे पंचायतन मानले जाते. २. (ल.) एकच स्वभाव, मत असणारे पाच जण. ३. पंचमहाभूताचे स्थान, शरीर. [सं.]

**पंचायत समिती** ग्रामपंचायत आणि जिल्हा परिषद यांच्या मध्ये दुवा असणारी लोकप्रतिनिधींची संस्था.

**पंचायती राज** ग्रामपंचायत, पंचायत समिती आणि जिल्हापरिषद या तीन संस्थांना मिळून वापरात असणारी संज्ञा.

**पंचारणे** अक्रि. पाच वर्षांचा होणे (घोडा).

**पंचारी** (नृत्य.) तालांच्या मात्रा.

**पंचास्र** न. पंचकोणी.

वि. पंचकोणी.

**पंचाळ** पु. सोनार, सुतार, लोहार, कासार व पाथरवट या पाच जाती (हे लोक जानवे घालतात यावरून). पहा : **पंच**

**पंचाळ** स्त्री. १. (विणकाम) पाच पंचांसाठी लावलेला तागा. २. एक शिवी.

वि. फार तोंडाळ, बडबड करणारी (स्त्री).

**पंचाळणे** अक्रि. बारगळणे; बाष्कळणे; अव्यवस्थितपणे (हलक्या समाजात मिसळल्याने) भरकटणे; बाष्कळ बनणे.

**पंचाक्षरी** पु. मांत्रिक.

वि. मंत्र.

**पंचांग** न. १. तिथी, वार, योग, नक्षत्र व करण ही काळाची पाच अंगे. ती ज्यात दिलेली असतात असे पत्रक. २. जप, होम, तर्पण, अभिषेक व ब्राह्मणभोजन अशी उपासनेची असणारी पाच अंगे. ३. पाच भाग, अंगे अथवा वस्तूंचा समुदाय. ४. हात पसरून, गुडघे व डोके लववून आणि भाषणाने व दृष्टीने पूज्यबुद्धी दाखविण्याचा प्रकार. ५. (वैद्यक.) एकाचे झाडाची पाने, फळे, फुले, मुळे आणि साल हे पाच अवयव.

वि. पाच अंगे, भाग, अवयव, विषय ज्याला आहेत असा. [सं.]

**पंचांगशुद्धी** स्त्री. शुभकार्यासाठी तिथी, वार इ. पंचांगांची अनुकूलता.

**पंचांगुळे** न. अव. लहान मुलांच्या हातातील दागिना; पाच बोटात घालण्याच्या पाच अंगठ्या साखळ्यांनी जोडून मनगटास बांधण्याचा दागिना.

**पंचिका** स्त्री. १. पाचांचा समुदाय. २. ऋग्वेदातील ऐतरेय ब्राह्मणाच्या आठ भागांपैकी प्रत्येक एका पंचिकेत पाच अध्याय असतात. [सं.]

**पंची** स्त्री. विस्तृत भाषण. [सं.पंचिका]

**पंचीकरण** न. १. पाचपट करणे. २. (वेदान्त) पंचमहाभूतांपैकी प्रत्येक भूताचे दोन समान भाग करून प्रत्येकाच्या अर्ध्या भागात उर्वरित चार महाभूतांचे प्रत्येकी एक अष्टमांश भाग मिसळून प्रत्येक महाभूत पाच मात्रांचे बनवणे.

**पंची–चू, पंछी** पु.पक्षी (विशेषत: पोपट).

वि. (ल.) कुशल; चतुर : 'अहो पंछी मुशाफर तुम्ही कोठिल रहिवासी ।'– प्रला १९१. [सं.पक्षिन्; हिं. पंछि]

**पंची प्यारा** वि. प्रिय; प्रियकर : 'तो पंचीप्यारा चिरिला ।'– संग्रामगीते ७८.

**पंचोत्रा, पंचोतरा–री** १. मालाच्या किंवा इमारतीच्या किमतीवर घेण्यात येणारा पाच टक्के कर. २. दरमहा दरशेकडा पाच टक्के व्याजाचा दर. ३. शेकडा पाचप्रमाणे देण्याचा कर. ४. सरकारी कर, सारा वसूल करताना पाच टक्के अधिक वसूल करण्याचा हक्क. ५. सरकारसाठी शंभर बिघे किंवा एकर जमीन लागवडीखाली आणली असता पाटलाला सारामाफीने देण्याची पाच एकर जमीन.

**पंज** वि. १. पाच; ५ ही संख्या. २. पाच वर्षांचा (घोडा). [फा. सं.पंच]

**पंज** पु. झाळण्याच्या, डाक बसविण्याच्या कामी उपयोगी पडणारी एक पूड.

**पंज** स्त्री. पेज; पेय. (गो.)

**पंजट, पंजर(रू)ट, पंज्या** न. स्त्री. अव. अर्धवट भरलेले, पोचट किंवा रोग पडल्याने लहान झालेले धान्याचे दाणे.

**पंजडी** स्त्री. फाशावरील पाचाचे दान. (क्रि. टाकणे) [सं.पंच]

**पंजम** न. (पाचव्या प्रतीची) रेशमाची एक हलकी जात.

**पंजर** पु. १. पिंजरा : 'हिरेजडित सुंदरीं कनक पंजरीं हि वसे ।'– अन्योक्तिकलाप. २. (ल.) पिंजऱ्याप्रमाणे उरलेला नुसता हाडांचा सापळा; सांगाडा (माणूस, पशू इ. चा): 'झुर्झरों पंजर होऊन झिजे ।'– दास ३.८.२६. ३. छाती; ऊर; वक्ष:स्थळ. ४. शय्या. ५. आच्छादन: 'दांडीयेवरि पंजरु घातला' – गोप्रच २३६. [सं.]

**पंज(ध)रा** वि. पंधरा; १५ ही संख्या.

**पंजरा** पंधरा.

**पंजरी** स्त्री. सुंठ, धने, ओवा, मिरे किंवा खोबरे व साखर यांचा सुंठवडा. [सं.पंच]

**पंजा** पु. १. पाच ठिपक्यांचे गंजिफाचे, पत्त्याचे पान; फाशावरील पाच चिन्हे किंवा फाशांनी पडणारा पाचाचा डाव. २. पसरलेला, उघडलेला हात; पाच बोटे व तळहात. ३. वाघ, मांजर इ. चे पाऊल; वानराचा हात. ४. पाच पवित्र पुरुष दर्शविणारा मुसलमान लोकांचा एक लोखंडाचा केलेला हात ऊर्फ पंजतन पाक. (हजरत अली याचाही हा पंजा समजतात व तो मोहरमचे दिवसात मिरवतात.) ५. गोसाव्यांचे पंजाच्या आकाराचे एक उपकरण. ६. हातमोजा. ७. (ल.) चपेटा; थापड. ८. चामडी अंगुलित्राण. [फा.]

**पंजा** पु. पणजा; प्रपितामह.

**पंजा** पु. तुऱ्याची लावणी. हीत प्रकृतीवर पुरुषाचे वर्चस्व वर्णिलेले असते. नायक नायिकेचे आर्जव करत असतो.

**पंजादुई–वी, पंजादिवी–देवी** स्त्री. पहा : **पंचद्वयी**

**पंजाबी** वि. १. पंजाब. २. (ल.) धूर्त; लुच्चा; हुशार : 'पंजाबी फसाऊ पाणी येथिल दिसतें ।' – प्रला १९३. [फा.]

**पंजाबी ताल** सोळा मात्रा व चार विभागांचा संगीतातील एक ताल.
**पंजामंजा** पु. कलगी व तुऱ्यावरील गाणी, लावण्या.
**पंजारणे** पहा : **पंचारणे**
**पंजीकृत** वि. नोंद केलेला; नोंदणी झालेला.
**पंजीयन** न. नोंदणी; नोंद करून क्रमांक देणे.
**पंजेवाला** वि. (कलगीतुऱ्यातील) पंजा गाणारा. या उलट मंजेवाला.
**पंजो** पु. नेसण्याचा पंचा. (कु.)
**पंट** नगर.- भाषाप्रकाश.
**पंडित** पु. १. विद्वान ब्राह्मण. २. शिक्षक; पंतोजी : 'हें बहु असो पंडितु । धरूनि बाळकाचा हातु । वोळी लिही व्यक्तु । आपणची ।'- ज्ञा १३.३०७. [सं.पंड् = जाणणे]
वि.१. विद्यासंपन्न; विद्येत निष्णात; कोविद; व्यासंगी; शास्त्रज्ञ; विद्वान. २. (पत्रातील मायन्यात) मोठ्या माणसाच्या नावाच्या अगोदर किंवा पुढे लिहिला जाणारा शब्द. ३.(ल.) एखाद्या शास्त्रात किंवा कलेत निष्णात; हुशार; चतुर; कलाभिज्ञ; तज्ज्ञ.
**पंडितखाना** पु. तुरुंग; कैदखाना. - ऐको.
**पंडितंमन्य-मान्य, पंडितमानी** पु. अभिमानी; गर्विष्ठ; मिजासखोर पंडित; दांभिक व अज्ञानी इसम; विद्वत्तेचा नसता डौल दाखविणारा, अवडंबर माजविणारा मनुष्य.
वि. अंगी विद्वत्ता नसून स्वतःस मोठा विद्वान समजणारा किंवा तशी ऐट मारणारा : 'जेवीं कां निर्दैवाहातीं । कनक पडलें होय माती । तेवीं पंडितमान्यचि व्युत्पत्ती । विषयासक्ती नाशिली ।'- एभा ११.५४०.
**पंडितराव** पु.१. राजदरबारातील पंडित. २. छत्रपतींच्या अष्टप्रधानांपैकी एक.
**पंडु** पु. १. पंडुरोग; रक्तक्षय. २. पांडवांचा पिता. [सं.पांडु]
**पंडुछाया** स्त्री. पंडुरोगाची आरंभीची चिन्हे.
**पंडु(पंड्या)रोग** पु. रक्तातील तांबड्या पेशींचे प्रमाण कमी होण्याचा विकार; रक्तक्षय.
**पंड्या** पु. १. तीर्थक्षेत्रातील हिंदुस्थानी ब्राह्मणांचा एक वर्ग; एक जात, तीतील व्यक्ती. २. (उत्तर हिंदुस्थानी) उपाध्याय. [सं.पंडित]
**पंड्या, पंड्याऊस** पु. एक जातीचा ऊस. पहा : **पुंड्या**
**पंढरी पिकणे** - अत्यंत भरभराट होणे; उत्कर्ष होणे.
**पंढाय** पु. (अहि.) पहा : **पन्हाळ**
**पंत** पु. १. अष्टप्रधानातील मंत्र्यांच्या सुरुवातीला लावावयाची मानाची पदवी अगर किताब. जसे :- पंतप्रतिनिधी, पंत अमात्य. २. शास्त्राचे अध्ययन न केलेल्या पण कारकुनी इ. करणाऱ्या गृहस्थी ब्राह्मणाच्या नावापुढे लावला जाणारा शब्द; गृहस्थधर्मी ब्राह्मण (शास्त्री, भट नव्हे असा). ३. बहुमानाची पदवी. जसे :- केसोपंत, मोरोपंत इ. ४. पंतोजी; शिक्षक : 'अर्भकाचें साठीं । पंतें दातीं धरली पाटी ।'- तुगा २१८०. [सं.पंडित याचे बनारस रूप]
**पंती, पंतोली, पंतुंड, पंतू, पंतोंड, पंथी, पंथोली** स्त्री. पणती. पहा : **पणत-ती, पणतोली**
**पंतोजी** पु. १. पगारी शिक्षक; मास्तर; गुरू. २. बेशिस्त वर्तणुकीबद्दल शिक्षा देण्याचा अधिकार असलेला माणूस; धनी. (को.)
**पंथ** पु. १. पहा : **पथ** १, २. २. धार्मिक संप्रदाय, वर्ग, शाखा; ईश्वरप्राप्तीचा मार्ग. जसे :- नाथपंथ, कबीरपंथ इ. ३. (ल.) प्रवास. [सं.पथ् ] (वा.) ० **लागणे** - निकाल लागणे. **पंथास टेकणे, लागणे** - मरणोन्मुख होणे. **पंथास पोहोचणे** - मृत्यू होणे.
**पंथिकर** वि. १. भोजनास पंक्तीत बसणारा; जेवणार असणारा : 'येतुकेया पंथिकर जाणविती । जी जी परियेसईं विनंति । जाहाली भोजनाची ऐति । उसिरु आला स्वामिया ।'- ख्रिपु १.१४.२७. २. आचारी; वाढपी. [सं.पंक्तिकर]
**पंथी** वि. एखाद्या धार्मिक पंथाचा, संप्रदायाचा अनुयायी.
**पंद** पु. उपदेश; चांगली गोष्ट.
**पंदरपूर** पु. खो खो चा खेळ. (गो.)
**पंदे-धे, पंधा(दा)ड** न. १. एक प्रकारचे निबर, राठ गवत. २. एक वनस्पती. हिच्या मुळाचे पीठ करून त्यात मीठ घालून लाडू करतात. [सं.पण्यंध]
**पंद्राळे** न. पंधरवडा; पक्ष. (गो.)
**पंधरकी** स्त्री. १. पंधराचा समुदाय. २. पंधरा बिघ्यांचे परिमाण. ३. पंधरा माणसांना उचलता येईल, करता येईल असे ओझे, काम.
**पंधरवडा** पु. अर्धा महिना; पक्ष; दोन आठवडे; पंधरा दिवसांचा काळ. [सं.पंचदशावर्त]
**पंधरस** पु. देवळातील नोकरांची सेवेची पंधरा दिवसांची पाळी.
**पंधरा** वि. १५. ही संख्या.
**पंधरा मुहुर्ती संक्रांत** आर्द्रा, स्वाती, भरणी, शततारका, आश्लेषा व ज्येष्ठा या नक्षत्री येणारी संक्रांत. हा योग आला असता दुर्भिक्ष येते.
**पंधरावे, पंधरे** न. उत्तम सोने (शंभर नंबरी): 'जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेचि होये ।'- ज्ञा ६.८२.
**पंधा** पु. पदर, सर, दोरी, वस्त्र वगैरेंचे एक टोक. (अहि.)
**पंप** पु. १. कोणताही प्रवाही पदार्थ द्रवरूप किंवा वायुरूप असला, तरी त्याला खालच्या पातळीवरून उचलून वरच्या पातळीवर नेणे किंवा त्याला जोराने दाबणे यासाठी लावले जाणारे यंत्र. २. मोटार, सायकल यांच्या चाकातील रबरी नळीत हवा भरण्याचे साधन.
**पंपाल** पु. मोठे कुटुंब. (झाडी) [सं.]
**पा** पु. पाय.१
**पा, पां** उदा. १. अरे! अहो! बापा! बा! : 'मना सांग पा रावणा काय झाले?' - राम १३. २. पादपूरणार्थ किंवा चरणातील मात्रा कमी पडल्यास हा शब्द योजतात. वाक्यालंकारार्थक किंवा निश्चयार्थक अव्यय: 'तंव उजरिया केले दैवाचिआ । ते परिसा पां ।' - ऋ १०. ३. जरी; यद्यपि : 'झाला पां सर्वेश्वरू । धरिला जाणिवेचा अहंकारु। तरी तोही नेणें पारु । तया स्वरूपाचा ।' - विपू ३.१७.
**पाइ(ई) क-कु, पायक** पु. १. सेवक; चाकर. २. दूत; निरोप्या; जासूद; हरकारा : 'एकाएकींच पाइक येऊन मुजरा केला आणि अर्ज केला कीं...' - भाब ५४. ३. पायदळातील शिपाई; सैनिक : 'फिरंग ठेवी त्याला जाऊ द्या, त्याला । राखु नका तुम्ही उगारल्या पाइकाला ।' -

ऐपो २१. ४. खेड्यातील एक छोटा अधिकारी. ५. (ल.) दास; सेवक; अंकित; भक्त; सैनिक. ६. मद्रास व ओरिसा प्रांतातील लष्करी नोकरी करणारी एक जात. ७. ग्रेट ब्रिटनमध्ये आढळणारा गोड्या पाण्यातील, लांबट तोंडाचा, निमुळते- तीक्ष्ण दात असलेला मासा. [सं. पदातिक, पदिक]

**पाइकया** स्त्री. १. सेवा : 'जाण ज्ञान तेयापासिं। पाइकया असे' - ज्ञा.१३.३८३. [सं. पदातिका]

**पाइ(ई - य) की** स्त्री. सेवा; चाकरी; दास्य : 'जाण ज्ञान तयापासी। पाइकी करी।' - ज्ञा १३.३८३. २. पायकाचा हुद्दा. ३. सेवा; दूतपणा : 'दीवकी पाइकैचेनि बीकें। जगीं भणिजतु सुनीकें। तें धाडू पांतां अससी मिषें एकें। तरी हें तूं जाणसीं।' - शिव ७७.

**पाइके** न. लहान भांडे : 'तुपाचें पाइकें बाइसांचां हाती दिधले' - लीचउ १२९. [सं. पदातिका]

**पाइट** वि. वरून खाली उतरता, निमुळता, विहिरी भोवतालचा भाग. (व.)

**पाइमाइश, पैमाश** स्त्री. (जमिनीची) मोजणी.

**पाइसे** न. दूध : 'पाइसें आळिलीया सरवळेयाचीया खीरी' - ऋव ५१५. [सं. पयस्]

**पाइंड, पाईड** स्त्री. लांबीचे एकचतुर्थांश इंच प्रमाणाचे एक परिमाण.

**पाई** स्त्री. भिल्ल लोकांचे वाद्य.

**पाई** स्त्री. १. चौथा हिस्सा; पाव भाग; चतुर्थांश. २. पाव आणा; पैसा. [सं.पाद]

**पाई** स्त्री. राहुटीच्या दोऱ्यांच्या खालच्या व वरच्या रांगांमधील अंतर; तंबूच्या भोवतालचा खंदक.

**पाई** वि. क्रिवि. पायानी; चालत.

**पाई** शअ. साठी; करिता. उदा. कशापाई इ. [सं. प्रीत्यर्थ]

**पाई(इ) क** पु. नद्यांच्या डोहात असणारा एका प्रकारचा क्रूर व खादाड मासा.

**पाईण** न. पाच परतन किंवा तीस चौरस बिघे इतक्या जमिनीचे परिमाण. पहा : **पाइंड**

**पाईत** न. १ पायथा. पहा : **पायते**. २. डांग प्रदेशातील डोंगराच्या पायथ्यालगत असलेल्या सपाट जमिनीचा लागवडीखाली आणलेला तुकडा.

**पाईन** वि. पायांकडील बाजूचा; खालचा.

**पाईन** पु. शीत कटिबंधात आढळणारा सूचिपर्णी, सदापर्णी वृक्ष. उंची साधारण ६० मी. पर्यंत असते.

**पाईनघाट** पु. पायाकडील बाजूचा, खालचा घाट.

**पाईनी ग्रंथी** मेंदूतील शंक्वाकार अंत:स्रावी ग्रंथी.

**पाईर** पु. पिंपळासारखी पण जरा लांबट पाने असलेला एक वृक्ष.

**पाईरळी, पाईल, पायळा, पाळा** पु. स्त्री. लहान कोयता.

**पाईंचा** वि. पायदळातील शिपाई; सैनिक : 'किल्ले अहमदनगर येथे गडबडेमुळें शंभर माणूस पाईंचे व पंचवीस राउत नवे ठेविले आहेत.' - वाडसमा १.९. पहा : **पाइक**

**पाईंट** स्त्री. द्रव पदार्थ (विशेषत: दारू) मोजण्याचे, मापण्याचे एक इंग्रजी परिमाण : 'किंचित संगीत ब्रांडीची पाईंट तोंडास लाविली कीं...' - सं घोटाळा २. [इं. पिंट]

**पाउ - ऊ मध्ये न आढळणारे शब्द 'पाव' मध्ये पाहावेत.**

**पाउखणे** अक्रि. थांबणे; बंद होणे; वाट पाहणे : 'आतां चंदनाच्या तरुवरीं। परिमळालागीं फूलवरी। पाउखणें जियापरी। लागेना कीं। - माज्ञा १८.१७४४.

**पाउ(व)गी** पु. जुवाठ्यावरील नोकर : 'पाउगीयापासौनि फेरु घेतला' - लीचपू २८.

**पाउटी - ठी, पाउठणी** स्त्री. १. पायरी; पावठणी : 'आइकें प्राणाचा हात धरुनी। गगनाची पाउटी करुनी। मध्यचेनि दादरेहुनी। हृदया आली।' - ज्ञा ६. २७१. २. सद्दी; जोर. ३. (ल.) पुण्य; दर्जा; योग्यता : 'मग तया पुण्याची पाउटी सरे। सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे।' - ज्ञा ९.३२८. [सं. पादस्थानी = पाय + ठानी]

**पाउ(ऊ) ड - डी** पु. स्त्री. १. देवाला अर्पण केलेली वस्तू : 'वैराग्याचे नवसिअें माणिजे। महातपाचा पाउड वाइजे।' - शिव १२३. २. नजराणा; भेट; आहेर. ३. वाघ्या, वासुदेव, पांगुळ इ. भिक्षेकरी धर्मार्थ 'पाउड' या शब्दाने पैसा मागतात. गोंधळ्याला द्यावयाचा पैसा. [सं. प्रति + दान]

**पाउड** पु. १. रिकीब; पावडी: 'पाउडां पाऊँ घातिला।' - शिव ५१२. २. पायतळ : 'रागद्वेष पाउडां घातले.' - निर्वेद ११४.[सं. पाद +स्थ]

**पाउ (ऊ) डा - डे** वि. माघार घेतलेला; मागे फिरलेला; प्राहुडा. [सं. परावृत्त]

**पाउडी** स्त्री. सेवा; दानधर्म : 'उपद्रवीं सन्निपातादिकीं : पाउडी न साहे इतुकी तरि पवाडिजे तितुकी : कीजें कृपा' - रकौ ३८२. [सं. प्रभृत]

**पाउणकी** स्त्री. एक पाउणेपासून शंभर पाउणे, पाऊणशेपर्यंतचे पाढे.

**पाउणके** न. पाऊण; तीन चतुर्थांश; पाउणकी; तीन चतुर्थांशची कोणतीही पट. जसे :-१ ।।, रा, ३ इ.

**पाउतका-दक** स्त्री. पादत्राण : 'पाउदका गजदंताचिया ल्याली ।' - उह २६५. पहा : **पादुका** [सं.]

**पाउन** न.सैन्य; पाळेगण. [सं. पादकुळ]

**पाउल - पाउली** क्रिवि. पहा : **पावलोपावली**

**पाउलवा** पु. १ पावलाची खूण, ठसा. २. नाचताना केलेला ढबदार पदविक्षेप.

**पाउली** स्त्री. १. कृपा; कृपादृष्टी. २. पहा : **पावली**

**पाउवा** स्त्री. अव. खडावा; पादुका : 'पाउवा मी होईन । तियां मीचि लेववीन।' - ज्ञा १३.४१६. [सं. पादुका]

**पाउळ** न.पायदळ : 'कीं देवाचिये ओळगे आले पाउळ : वनदेवतांचे' - रुस्व ७२५. [सं. पददल्]

**पाउळ** पु. संघ; गण; पाळा.

**पाऊक** न. (बुरुडकाम) रुंदट व पातळ कामटी.

**पाऊखलक** पु. अव. पायदळ. यात कटकी, बाजेलोक, तुळवे, अडाऊ, लवे, तुबकी, कमानी, इटेकरी, आहीर, बाणकरी, गोलंदाज व गुंडकल हे लोक येतात.

**पाऊड** पु. भिक्षेकरी.

**पाऊण** वि. चतुर्थांशाने कमी असलेले; तीन चतुर्थांशाइतकी (संख्या, परिणाम). [सं. पाद+ऊन; हिं. पौने]

**पाऊण म्हातारी** (तिरस्कारार्थी) साठीला टेकलेली वृद्धा, म्हातारी.

**पाऊल** न. १. पायाचा घोट्याखालचा भाग, तळवा. २. चालताना दोन्ही पायांत, पायांच्या तळव्यांत पडणारे अंतर. ३. पायांच्या तळव्यांची उमटलेली खूण, ठसा, चिन्ह, आकृती. ४. चालण्याची ढब, गती, तऱ्हा; चाल. ५. चालण्याचा वेग. ६. पायाच्या तळव्याची लांबी. ७. (ल.) कारस्थान. ८. (ल.) कल; स्वभाव. [सं. पद] (वा.) **० उचलणे, उचलून चालणे** – घाईने, भरभर, झरझर पावले टाकून चालणे; त्वरा करणे. **० जपून टाकणे, ठेवणे** – एखादी गोष्ट अत्यंत विचारपूर्वक, काळजीपूर्वक करणे; जाणीवपूर्वक वागणे. **० पडणे, शिरणे** – (एखाद्या विषयात) गती, शिरकाव होणे. **० पुढे ठेवणे** – एखाद्या कामाची जबाबदारी स्वीकारायला तयार होणे. **० पुढे पडणे** – प्रगती होणे; (कार्य) वाढीस लागणे. **०बाहेर टाकणे** – अनीतीने वागणे : 'पोरीने पाऊल बाहेर टाकल्यापासून बापाने बाहेर टाकावयाचे सोडले आहे.' – प्रेमसंन्यास. **० मागे, माघारे घेणे, काढणे** – (एखाद्या गोष्टीपासून, कार्यापासून) परावृत्त होणे; हटणे; माघार घेणे. **० वाकडे पडणे** – १. वाईट, चुकीचे वागणे. २. व्यभिचार करणे; अनैतिकपणे,चवचालपणे वागणे. **(एखाद्याच्या) पावलावर पाऊल ठेवणे** – (एखाद्याचे) सर्व गोष्टीत अनुकरण करणे.

**पाऊलबुद्धि–द्ध–द्ध्य** स्त्री. मनाची चंचलता; छांदिष्टपणा; लहरीपणा. वि. चंचल; छंदिष्ट; लहरी.

**पाऊलमेड – ढ** स्त्री. गोठ्याच्या बाजूचा लहान खांब. (गो.)

**पाऊलवा(व)ट** स्त्री. घोडे, गाडी इ. ज्या वाटेने जाऊ शकत नाहीत, केवळ माणूस जाऊ शकतो अशी अरुंद वाट; पायवाट.

**पाऊस** पु. बाष्पयुक्त हवेचे तापमान कमी झाल्यावर जादा बाष्पाचे सूक्ष्म जलकणांत रूपांतर होऊन तयार झालेल्या जलबिंदूंचा आकार अर्ध्या मि.मी. व्यासापेक्षा जास्त झाल्यास ते खाली पडण्याची क्रिया; वर्षा. २. पर्जन्याचा वर्षाव; सर. ३. (ल.) मिळकत; प्राप्ती इ. ची समृद्धी; विपुलता; रेलचेल; पूर; चंगळ.

**पाऊसपाणी** न. पाऊस, पीक इ. कांची स्थिती; पर्जन्यमान वगैरे.

**पाऊंड,पावंडा** पु. १. समांतर, सारखी चाल; पावलात मोजके अंतर राखून चालणे; दुडकी चाल. २. पाऊल.

**पाएमळे** क्रिवि. डोक्यावर घेतलेल्या ओझ्याच्या भाराने दमून गेलेल्या स्थितीत; अतिश्रमित होऊन : 'कीं अनुभवाचां माथां। वाउणि सुखाचिया लोथा। तेणें पाएमळें दाटतां । सादु कांपे।' – ऋ ६४.

**पाक–ख** पु. पक्ष

**पाक** पु. १. अग्निसंस्काराने (अन्न इ.) शिजविणे; स्वयंपाक; भोजनासाठी अन्न तयार करण्याची क्रिया. २. फळे इ. (आढीत घालून) पिकविण्याची क्रिया. ३. पक्वता; पिकलेली स्थिती; परिपक्वता; पक्केपणा : 'केली फळें तंव वाढे वाढी। फळपाकें माळी झाड तोडी ।' – एभा १.१२४. ४. अन्नपचन होण्याची क्रिया; अन्नावर होणारा जाठररसाचा परिणाम. ५. गळू इ. पिकणे;पुळवणे. ६. पक्वान्न; शिजवून तयार केलेला खाद्यपदार्थ : 'इंद्रियरुचीसारखे । करविती पाक निके।' – ज्ञा ३.१२९. ७. (धान्याचे) पीक : 'मार्गशीर्ष मी मासां आंतू। जो धान्यपाक युक्तू आल्हादी।'– एभा १६.२२०. ८.परिणाम; पर्यवसान; फळ : 'जेव्हां द्राक्षीं दूध घातलें। तेव्हां वायां गेलें गमलें। परी फळपाकीं दुणावले। देखिजे जेवीं।' – ज्ञा १५.५९१. ९.दहा – पाच औषधे एकत्र करून केलेला काढा. १०. महाकवी इ. कांच्या वाणीच्या, काव्याच्या ठिकाणी असणारा रसोत्पादक गुणविशेष; शोभा; सौंदर्य. ११. (सल्ला, योजना इ. कांची) परिणती; सिद्धी; सफलता. १२. साखरेत पाणी घालून उकळून केलेला रस. [सं.]

**पाख – क** पु. फणसाचा चीक. (गो.)

**पाक** वि. १. स्वच्छ; शुद्ध, निर्मळ; पवित्र. २. (ल.) विशुद्ध अंत:करणाचा; निष्कपट; सचोटीचा (मनुष्य). [वैसं. फा .]

**पाककला** स्त्री. उत्तम स्वयंपाक बनवण्याची कला.

**पाककंडू** स्त्री. पोटातील अन्नाचे पचन झाल्यावर उठणारी खाज.

**पाकचंदन** पु. तांबड्या पंखाचा पोपट.

**पाकजप्रक्रिया** उष्णता किंवा ऊर्जेची निर्मिती किंवा शोषण ज्यात होते अशी प्रक्रिया. – पाको.

**पाकट** वि. १. लुच्चा; कपटी; सोदा. (कर.) २. चिकटणारा; चिकट; प्रवाही पदार्थ. (गो.)

**पाकट** स्त्री. पाठलाग; माग; शोध.

**पाकट वागळ** एक प्रकारचा मासा. शेपटीला करवतीच्या दात्यांसारखे दात, पुढे टोकदार विषारी पट्ट्या असणारा मासा. याच्या पंखाने इजा झाल्यास मनुष्य दगावतो. (अलिबाग)

**पाकटीं** स्त्री. आतील दाणे पूर्णपणे पोसण्यापूर्वीच वाळलेला भात; असल्या भातापासून निघालेले तांदळाचे अपक्व व न पोसले गेलेले दाणे.

**पाकड** पु. भाताच्या शेतात उगवणारे एक तृणधान्य. ह्याची गणना उपधान्यात केली जाते.
स्त्री. एका जातीचे गवत. (बे.)

**पा(पै)कडी** स्त्री. मोहोळातील मधमाशीची राहण्याची जागा.

**पाकणे** अक्रि. १. वाढणे; अधिक होणे. २. पिकणे (फळ इ.) : 'तिर्यी हारें गुलें आन पाकलें बोरे लावीनें तें रामाल देदें।' – भिल्ली २७. (भिल्ली)

**पा(पां)कणे** स्त्री. बुंदीच्या कळ्या, चिरोटे यांना (साखरेचा) पाक लावणे.

**पाकवचे** सक्रि. पाकाचे (फणसाच्या चिकाचे) रोगण करणे. (गो.)

**पाकवडा** पु. देवसेवकांची पंधरा दिवसांची देवाच्या सेवेची पाळी. (कु.) [सं.पक्ष = पंधरा + म. वडा प्रत्यय]

**पाकशाला–शाळा–साळ** स्त्री. स्वयंपाकघर.

**पाकसॉ** पु. वासा. (गो.)

**पाकळ** पु. एक तृणधान्य. (गो.) पहा : **पाकड**

**पा(पां)कळी** स्त्री. १. फुलातील दलांपैकी प्रत्येक. २. संत्रे, लसूण इ. कांतील प्रत्येक अलग फोड,बारीक बारीक रसदार भाग; कुडे, कांडी इ. ३. (क.) पाकोळी. [सं.पक्ष]

**पाकळी** वि. पाकळ्या असलेले (फूल इ.). [सं.पक्ष, पक्ष्मन्]

**पाकार** पु. (नाविक) कापडाचा तागा उभा फाडून केलेल्या दोन भागांपैकी प्रत्येक; शिडाचा उभा तुकडा. (गो.)

**पाकी** स्त्री. १. व्यवहारातील सरळपणा, चोखपणा, निष्कपटपणा; परस्परांबद्दलचा सलोखा; मनाचा शुद्धभाव; मित्रभाव. २. (ल.) गुह्येंद्रियावरील केस काढण्याचा वस्तरा किंवा केस काढणे. [फा.]

**पाकी** वि. साखरेच्या पाकात तयार केलेला (पदार्थ, हलवा इ.) : 'पाकी दुध्या हलवा' – गृशि १.४२०.

**पाकीट** न. १. लखोटा; लिफाफा. २. पैसे,पुस्तके, कागद इ. ठेवण्याची चामड्याची मोठी पिशवी. [इं. पॉकेट]

**पाकुपाणी** न. पंक्वान्न : 'पाकु-पाणि : दाळि: तैल्यपात्र: तक्रपात्र' – गोप्रच २२.

**पाकुले** न. वासरू (राजा).

**पाकुळका – की – ता** स्त्री. अंत:करणाच्या आठ सात्त्विक भावांपैकी प्रत्येक; दया, क्षेम इ. भावनांनी मनाला आलेला द्रव, गहिवर : 'आठवें माशीं अष्ट पाकुळका आकारल्या सत्वर.' – भज ८५.

**पाकु(को)ळणे** सक्रि.१. (फूल,प्राणी इ.) शिथिल होणे; गळाठणे; जोम नाहीसा होणे; ढिले पडणे; पेंगुळणे. २. (ल.) दयेने पाझर फुटणे; (इच्छा, वासना इ. कांनी मन, जीव इ.) आकर्षिले जाणे, पाघळणे. ३. विसकळीत होणे : 'साहतचि नाहीं कांहीं पाकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ।' – तुगा ३५१३. [सं.प्राकुल]

**पाकु(को)ळणे** अक्रि. (ताक, तेल, तूप इ.) पाकोळी नावाच्या पतंगासारख्या पांढऱ्या कीटकविशेषांनी भरून जाणे, विकृत होणे.

**पाकोडी** स्त्री. हरभऱ्याचे पीठ दह्यात भिजवून त्यात मसाल्याचे पदार्थ घालून तळलेले भजे. – गृशि १.३५८. [हिं.पकोडी]

**पाकोळी** स्त्री. १. वाघुळाची एक लहान जात. २. पाकळी; पुष्पदल. ३. आरी : 'त्याचें केलें सुनाभचक्र । सहस्र पाकोळ्या भयंकर ।'– कथा ३.१३.१६५. ४. (ल.) (संत्रे, महाळुंग इत्यादींतील) फोड; फाक. ५. चिमणीसारखा एक पक्षी. ६. एक जातीचा पतंग; फुलपाखरू. ७. ताक, तूप, तेल इ. विकृत करणारा, बारीक व पांढरा, पतंगासारखा कीटक. ८. केसात माळण्याजोगे एक फूल. (गो.)

**पाकोळी किनार** (खडीकामाचा धंदा) पाकोळ्यांच्या आकाराची वेलबुट्टी.

**पाक्या** वि. स्वयंपाकी; बबर्जी : 'कांहीं पाके आपल्या इच्छेप्रमाणें पाणी कमी किंवा अधिक प्रमाणांत आटवितात.' – गृशि २.१२.

**पा(पां)ख** पु. १. पक्ष; बाजू. २. पंधरवड्यांपैकी प्रत्येक. न. १. छपराची उतरती बाजू. २. उरोभाग आच्छादणाऱ्या चोळीच्या दोन भागांपैकी प्रत्येक : 'विद्या अविद्या पाखें दोनी । दोन्ही आच्छादिले दोहीं स्तनीं ।' – एरुस्व ७.४१. ३. पंख; पीस : 'कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवरु मिरवितसे तैसा ।'– ज्ञा १.१३९. [सं.पक्ष]

**पाखड** वि. राताड. पहा : **पाकड**

**पाखडण** न. १. सुपाने पाखडून धान्यातून काढलेला कोंडा, भूस, फोल इ. २. पाखडण्यासाठी घेतलेले धान्य. ३. धान्य इ. सुपाने पाखडण्याची क्रिया.

**पाखडणावळ, पाखडाई** स्त्री. (धान्य) पाखडण्याची मजुरी.

**पाखडणी** स्त्री. पहा : **पाखडण**

**पाखडणे** सक्रि. १. धान्य इ. तून सुपाने कोंडा, फोल, माती काढून टाकणे. २. (पक्ष्याने पंख इ.) फडफडविणे; फडफड करणे: 'हें काळनळाच्या कुंडीं । घातली लोणियाची उंडी । माशी पांखु पाखडी । तंव हें सरे ।' – १३.११०३. ३.(ल.) वगळणे; काढून टाकणे; गाळणे. [सं.प्रक्षालन] (वा.)**(एखाद्यावर) आग पाखडणे –** (एखाद्यावर) सर्वस्वी नाश होईल असे कुंभाड रचणे; दोषारोष, चहाडी करणे; रागाने अद्वातद्वा बोलणे.

**पाखडी** स्त्री. किंमत : 'यांत सुगर म्हणू नये जळो गाई बटकिचि किति पाखडी ।' – राला ८०.

**पाखडी** पहा : **पाखाडी**

**पाखडी(डीं)व** वि. सुपात घालून पाखडलेले; पाखडून स्वच्छ केलेले.

**पाखनीशी** स्त्री. शोधकता : 'पाखनीशी शोधकता' – राव्य ८.७५.

**पाखर** स्त्री. १. पक्षी आपल्या पिलांवर घालतात ते पंखांचे आच्छादन. २. (ल.) आसरा; संरक्षण; आश्रय; कृपा. (क्रि. घालणे) ३. छाया; सावली : 'ऐसी शरीराबाहेरलीकडे । अभ्यासाची पाखर पडे ।' – ज्ञा ६.२११. ४. गाय, म्हैस इ. कांच्या कासेच्या आचळाचा उजवा किंवा डावा भाग. ५. पखालीची एक बाजू, अर्ध. ६. टेकडीचा, डोंगराचा उतरणीचा भाग. ७. (घर इ. कांच्या) छपराचा उतरता भाग; पाखे. वि. कृपाळू. [सिं.; सं.पक्ष; म.पाख]

**पाखर–रा** स्त्री. १. घोडा, हत्ती वगैरेंना युद्धात शरीरसंरक्षणार्थ घातले जाणारे लोखंडी चिलखत : 'पताकांसि रथ कुंजर । रणीं पाडिले अपार । पांखरांसि असिवार । मारिले खरउष्ट्र रणामाजीं ।' – एभा ३०.११८. २. घोडा, हत्ती इ. कांवर शोभेसाठी घालावयाची झूल, झालर : 'घोडिया बाणली मोहाळी । कंगणटोप रागावळी । पाखरा झळकती तेजाळी ।' – एरुस्व ८.१५. [सं.प्रखर, प्रक्षर]

**पाखरखाद** स्त्री. पक्ष्यांनी खाऊन केलेले फळबागांचे इ. नुकसान. वि. पाखरांनी अर्धवट खाल्लेले, चोचीने फोडलेले फळ.

**पाखरणे** सक्रि. पसरणे; उभारणे; तयार करणे : 'जो कां तुम्हीं शिक्षापिला । विद्या देऊनि कुरूठा केला । तेणें हा सैन्यसिंधु पाखरिला । देखरेख ।'– ज्ञा.१.९५. [सं.प्र+कृ; सिं.पखेरणुं]

**पाखरराख्या** पु. शेताची, फळबागांची पाखरांपासून राखण करणारा.

**पाखरिया** पु. आंब्याची सुमारे दोनशे ग्रॅम वजनाची, सोनेरी रंगांची फळे येणारी जात.

**पा(पां)खरू** न. १. पक्षी. २. (ल.) सुंदर स्त्री; छानछबेली; रखेली. ३. (व्यापक) फुलपाखरू, पतंग वगैरेसारख्या कीटकांपैकी प्रत्येक. [सं. पक्षितर = लहान पक्षी.] (वा.) **पाखरासारखी वाट पाहणे** – अतिशय उत्कंठतेने व उत्सुकतेने वाट पाहणे.

**पाखल** स्त्री. १. भुकेने पोट खपाटीस लागल्यामुळे त्याला पडणारी खळी; भकाळी; भकाटी. २. आसरा; संरक्षण. (कु.) पहा : **पाखर** २,३. ३. भूक, तहान वगैरेमुळे होणारी कासाविशी. (क्रि. मारणे)

**पाखल(ळ)पूजा** स्त्री.यात्रादिकांच्या वेळी लोकांच्या गर्दीमुळे देवापाशी होणारी घाण स्वच्छ करून केली जाणारी देवाची पूजा. [सं.प्रक्षाल + पूजा]

**पाखलो** वि. (ल.) व्यवहारशून्य; आडदांड. (गो.)

**पाखलॉ** पु. युरोपियन; गौरवर्णी सोजीर : 'पणजेचे पाखले झाले भयभीत। पकाले सांखळे जिव घालति तारवांत।' – सह्याद्री १६४.

**पाखवा** पु. १. (पक्ष्याच्या) पंखामधील, पंखाखालची उबाऱ्याची जागा; पंखांची ऊब : 'अपक्षा पाखवा देउनि। जे जीव जीवची पक्षिणी।' – ऋ ५. २. पंखांचा भार : 'मोराचां पाखवां विसंवत। फणिक देखा' – वच्छाह १८६. [सं.पक्ष]

**पाखळ** स्त्री. (तोडलेल्या फळांचा, फुलांचा) अस्ताव्यस्त रीतीने पडलेला पसारा. (क्रि. पडणे). पहा : **पखरण**

**पाखळणी** स्त्री. १. देवांच्या मूर्ती इ. उजळणे, स्नान घालून स्वच्छ करणे. २. (ल.) हंगाम संपल्यानंतर शेतकरी करतात तो भोजनसमारंभ.

**पाख(खा)ळणे** सक्रि. यात्रा इ.च्या आरंभी व नंतर देवतांच्या मूर्तीला पंचामृताने स्नान घालणे; शुद्ध, स्वच्छ करणे : 'जें संसारातें उन्मूळी। संकल्पपंकु पाखाळी।' – ज्ञा १३.१७२. [सं. प्रक्षालन]

**पाखं(खां)ड** न. १. एका देवतेला पूज्यत्व देऊन इतर देवांची निंदा करणे; नास्तिक मत; वेदाभ्यासाला झुगारून बुद्धिप्रामाण्य मानणारे मत; धर्मविरोधी मत. २. (ल.) वितंडवाद : 'किंबहुना उघड। आंगीं भरूनिया पाखंड। नास्तिकपणाचें हाड। रोविलें जीवीं।' – ज्ञा १६.३१५. ३. (एखाद्या विरुद्ध रचलेले) कुभांड, तोहमत; तुफान; कपटजाल. ४. (ढोंगी, दांभिक मनुष्याचे) थोतांड; ढोंग; भोंदूपणाचे कृत्य, गोष्ट.[सं.]

**पाखं(खां) डी** वि. १. नास्तिक; धर्मलंड, वाममार्गी; जडवादी; वेदांना न मानणारा (मनुष्य, मत, पंथ). २. (ल.) पाखंड, थोतांड रचणारा; दांभिक; भोंदू.

**पाखा** पु. पहा : **पा(पां)ख** न.१,२

**पाखाडी** स्त्री १. उतरत्या छपराचे उभे वासे ठोकण्यासाठी (घराच्या) आढ्यापासून काही अंतरावर (आढ्याच्या) दोन्ही बाजूस ठेवलेल्या तुळयांपैकी प्रत्येक. कैच्यावरील आडव्या लाकडांपैकी प्रत्येक. २. चिरेबंदी अरुंद वाट; फरसबंदी रस्ता. ३. गावातील घरांची आळी. (को.) ४. घराची पडवी; छपरी. (कु.)

**पाखाणणे** अक्रि. उडणे; आक्रमणे. – शर.

**पाखार** स्त्री. शिडाच्या कापडाचा लांब तुकडा. (को.)

**पाखारी** स्त्री. पाख ठेवलेली, पिसे लावलेली काठी. (गो.)

**पाखाळ – ळा** पु. १. शुद्धता; पवित्रता; उज्ज्वलता : 'बाहेरीं कर्मे क्षाळला। भितरीं ज्ञानें उजळला। इहीं दोहीं परी आला। पाखाळा एका।' – ज्ञा १३.४६३. २. शौच. [सं. प्र+क्षल् = धुणे स्वच्छ करणे]

**पाखाळ** न. कबूतर. (बे.) [सं. पाखई–पक्षी]

**पाखाळी, पाखाळीव** स्त्री. शुद्धता; निर्मळता.
वि. धुतलेला; स्वच्छ केलेला : 'कविता भली पाखाळीं। सुरंग दिसे।' – शिव २३.

**पाखाळी कीड** वि. निर्णयान्ती वाईट, अहितकारी ठरलेले : 'एऱ्ही गोरी कीर कानां गोड। परी साचाचा पाखळीं कीड।' – ज्ञा १६.१२१.

**पा(पां)खिकुटे** वि. पंख तुटलेले : 'पांखिकुटें पाखिरुं। गगनीं नुडे तरि काइ करुं।' – ज्ञा १८.१६९१.

**पाखुडा** वि. थोडा : 'तेहि परंतु पाखुडी' – ग्रंथराज ३.६.

**पाखुदीस** क्रिवि. पंधरवडाभर : 'पाखुदीस अवस्थान जाले।' – लीचपू ५१६.

**पाखो** पु. पंख असलेला कीटक. (कु.)

**पाखोडी** स्त्री. कामकऱ्याला (विशेषत: शेतीची लागवड करणाऱ्या मनुष्याला) दर पंधरवड्याला द्यावयाचे ठरावीक धान्य, वेतन.

**पाखोवा** पु. पंख : 'जेवीं चंद्रकिरण चकोरांसी। पाखोवा जेवी पिलियासी।' – एभा ७.४६५.

**पाग** पु. १. गलबताच्या पिछाडीला बांधलेला नाडा; याला लहान होडी किंवा उंडी, उलंडी बांधून ठेवतात. (को.) २. मासे धरण्याचे मोठे जाळे. ३. एक प्रकारची होडी. ४. ओढण्याचा दोर; ओढ; ओढण. ५. बैलाच्या वेसणीला बांधलेला दोर; कासरा.
स्त्री. १. बंदराच्या बाहेर पडताना जहाजाला द्यावा लागणारा कर. २. पटका; पागोटे : 'माथा निर्मळास केशरी पाग लपेटिली आहे.' – सप्र ४.१७. ३. अंगावर घेतलेला शेला : 'सहज सुंदर ते नीळ तन। कनक पाग विराजमान।' – वेसीस्व ९.११. ४. मासेमारी.

**पाग** पु. पगार; वेतन.

**पाग** पु. पाय : 'ती रोदिही हाक्काली उठीनें मूत्र, आथ, पाग तोवे.' – भिल्ली २७. (= ती रोज सकाळी उठून तोंड, हात, पाय धुवे.) [सं. पाद]

**पागडी** स्त्री. पगडी; घरभाड्याचा कायदा होण्यापूर्वी जागा भाड्याने देण्याआधी, परत न करण्याच्या बोलीवर भाडेकरूकडून घरमालक घेत असे ती रक्कम. कधी कधी चाळीतला मेथा (कारकून, भैय्या) असली रक्कम घेत असे. [म. पगडी; गु. पाघाडी]

**पागडे** न. घुंगरू लावलेला अलंकार; पैंजण; झुमका : 'तयांचां पाइं रिरिए पितळेचे पागडे होतें.' – लीचउ ४६१. [सं. पद]

**पा(पां)गण** न. आंदण देण्याची वस्तू; आहेर. (गो.)

**पागणे** सक्रि. पागाने, जाळ्याने मासे धरणे.

**पागनीस, पाग(गा)नवीस** पु. पागेवरील अधिकारी; कारकून. [फा. पागनीस]

**पागर** पु. उंच वरवंडीची भिंत. [क; सं. प्राकार]

**पागरा** पु. १. कोवळ्या पानांचा शेंडा. २. चाबकाचे दुभंगलेले टोक.

**पागल** वि. वेडा; उल्लू; खुळचट. [सं; हिं. पागल]

**पागलखाना** पु. वेड्यांचे इस्पितळ; मनोरुग्णालय.

**पागलपणा** पु.मूर्खपणा; वेडेपणा; उल्लूपणा.

**पागलाश्रम** पहा : **पागलखाना**

**पागळी** स्त्री. १. कौलाच्या पन्हाळीतून पडणारे पाणी; पागोळी. (बे.) २. छपराचा शेवट. [सं. पंगु; सिं. पिंगुलो]

**पागा** स्त्री. दूध काढताना जनावराच्या पायात बांधण्याची दोरी; कासरा.

**पागा** स्त्री. उंदरांचा समूह. – रावाको.

**पागा** स्त्री. १. घोडशाळा; तबेला. २. एका अम्मलदाराच्या हाताखाली असलेली घोडेस्वारांची टोळी, पथक, दळ, रिसाला. यात दोन नगारजी, एक लगीदार, एक निशाणदार, एक शिंगाड्या, एक शुतरी (उंटावरील) नौबत, एक दफेदार व दहा स्वार असतात. ३. एकाच धन्याच्या

मालकीचा घोड्यांचा समुदाय, पथक. **पागेस लावणे** - १. (एखाद्याच्या) हवाली करणे. २. (एखाद्याच्या) तंत्राखाली ठेवणे. ३. (एखाद्याची) वस्तू जागच्या जागी ठेवणे. [फा. पाय्-गाह]

**पागाजुमलेदार** पु. पागेवरील एक अधिकारी. हा जाप्त्याप्रमाणे काम करून मुख्य सेनापती व प्रधान यांच्या सोबतीने काम पाहातो.

**पागाणी** स्त्री. (को.) पहा : **पागोळी**

**पागार** न. बांगडा, पेडवा इ. मासे पकडण्याचे जाळे. (कु.)

**पागार** पु. धान्याचे बी पेरण्याचे एक लाकडी अवजार; औत.

**पागार** पु. पदर : 'अश्वपति, नरपति पुण्य पागारीं। धर्मशील धर्म ऐसा धर्मविचारी।' - वसा १२.

**पागार** १. रक्षक; रक्षणकर्ता : 'जो पांडवां पागारू। वैरिआं बडिवारू।' - शिव ७३१. २.पोवळी : 'मुखी घुटिका घाली : आणि पौळी पागार उडे' - लीचपू ६६. [सं.प्रकार; क. पागर]

**पागी** वि. १. मासे पकडणारा कोळी. २. (नाविक) नावेच्या नाळीवर बसणारा. (कु.)

**पागुडे** न. पायात घालण्याचा एक अलंकार : 'अंदु पायवटें पागुडें पदकां साखळी। हीरे झळकती सातां आगां लेणे।'- धवळे उत्तरार्ध ३३.

**पागेकरी** पु. १. पागेतील देखरेख करणारा मनुष्य. २. पागेचा मालक.

**पागेचे तट्टू** न. १.(घोड्यांच्या) पागेतील तट्टू. २. (ल.) चुणचुणीत, चलाख मूल.

**पागॉल** न. वर्तुळाकार जाळे. (गो.)

**पागोटे** न. १. पुरुषांचे डोक्याला बांधण्याचे सुमारे हातभर रुंद व पन्नासपासून सव्वाशे हात लांब असे वस्त्र. २. पगडी.३. (ल.) लौकिक; पत; कीर्ती. [क. पागु; गु. पाघडी] (वा.) **० गुंडाळणे** - (एखाद्याला) लुबाडणे; भोंदणे; मुंडणे. **० घेणे** - स्वत: न फसता दुसऱ्यांस फसविणे, चकविणे; दुसऱ्याला फसवून आपला फायदा करून घेणे. **० टाकणे** - सर्वसंगपरित्याग करून संन्यासी होणे. **०पागोट्याचे पेंच सांभाळणे** - (धंदा, व्यवहार इ. कांत) स्वत:ची पत, बोज सांभाळणे; पत कमी होऊ न देणे. **० पागोट्याचे पेंच गळ्यात येणे** - केलेले कृत्य अंगलट, गळ्याशी येणे; (स्वत:च्या) दुष्कृत्याची फळे भोगणे. **० पागोट्यास फुले बांधणे** - (एखाद्याचे) आर्जव करणे; लुलुपुतु करणे; एखाद्याला गोंजारणे; फूस लावणे; खुशामत करणे. **० बगलेत बांधणे** – मारामारीला, भांडणाला सिद्ध होणे; कंबर बांधणे; बदनामी करणाऱ्या कृत्यात भाग घ्यायला तयार होणे.

**पागोट्याचा धनी** (सामा.) (व्यापार इ. कांत) पत असलेला, ऐपतदार, अब्रूदार मनुष्य.

**पागोडा** पु. १. दक्षिण हिंदुस्थानातील हिंदू देवळांना युरोपियनांनी दिलेले नाव. २. मद्रासकडील एक सोन्याचे जुने नाणे. यावर देवळाची आकृती असते. [पोर्तु. पागोद]

**पा(पां)गोरा** पु. १. रोवलेल्या खांबाला दोर इ.चा दिलेला तणावा. २. मासे पकडण्याच्या जाळ्याची दोरी. ३. पिशवी, कसा इ. कांचा बंद. ४. चाबकाची दोरी, वादी. ५. (वस्त्र, अंगरखा इ. कांचा) लांब, फडफडणारा टोकाचा भाग, पदर. ६. वृक्ष, वेल इ. कांच्या मुळांशी फुटणाऱ्या व चोहोकडे जाळ्याप्रमाणे पसरणाऱ्या तंतुरूप मुळ्यांपैकी प्रत्येक : 'मुळ्यांचे बारीक पांगोरे। तेणें पंथें उदक भरे।' - दास ९.६.४६. ७. वेली आपल्या आधारभूत वस्तूला ज्याने आवळून धरतात तो तंतू, ताणा. ८. धान्याचे पीक, गवत इ.च्या कापून राहिलेल्या खुंटांना, ठोंबांना पुन्हा फुटलेला अंकुर, फूट, पात, काडी: 'तरी महदहंकारा। लागुनियां धनुर्धरा। तृणांतीचा पांगोरा - । वरी पै गा।' - ज्ञा १५.४७८. ९. गोफण : 'तेथ शुक बैसला सोंकारा। तेणें फोडिला हरिकथापांगोरा। पापपक्ष्यांचा थारा। उडविला पुरा नि:शेष।' - एभा ३१.४४३. १०. घोस : 'नेत्र संकीर्ण मनोहरे। जैसे रत्नांचे पागोरे।' - कथा १.१.१६. ११. डोंगर, नदी वगैरेंची शाखा, फाटा. १२. (ल.) संबंध; धागा; दुवा. १३.(भाषण इत्यादीला फोडलेला) विषयांतररूप फाटा. [म. पाग= जाळ्याची दोरी+दोरा]

**पागोळी – ली** स्त्रीपु. १. इमारतीच्या पाख्यावरील पावसाचे पाणी जमिनीवर पडायला जेथून सुरुवात होते, तो इमारतीच्या छपराचा भाग; छपराची खालची धार. २. इमारतीच्या पाख्यावरून खाली जमिनीवर पडणारी पाण्याची धार; पावळी. ३. (ल.) अश्रूंची धार. (क्रि सोडणे)

**पाग्या** पु. १. रिसाल्यावरील, घोडदळावरील अधिकारी : 'तमाम पागेपतकें बेरोजगारी घेऊनि कुतके।' - ऐपो २५२. २. पहा : **पागेकरी**

**पाघळ** पु.गूळ, साखर इ. पदार्थांना सुटणारा द्रव, पाझर, ओघळ.

**पाघळणी** स्त्री. वितळण्याची, विरघळण्याची किंवा ठिबकण्याची क्रिया; गूळ, साखर इ.द्रवणे.

**पाघळणे** अक्रि. १. (ओले वस्त्र इ.तून पाणी इ.) गळणे; ठिबकणे; टपकणे. २. गूळ, साखर इ. पदार्थ हवेतील उष्णतेने द्रवणे, पाझरणे, चिघळणे. [सं. प्रगलन] (वा.) **(जीभ) पाघळणे** - बोलण्याच्या भरात भोळसटपणे न बोलावयाच्या गोष्टी बोलून जाणे.

**पाघळत येणे-जाणे** (ल.) मानखंडना, तेजोभंग होऊन खाली मान घालून जावे लागणे, जाणे.

**पाच** स्त्री. पु.हातभर उंच वाढणारे एक झुडूप. याच्या पानाला व तुऱ्यांना चांगला वास येतो. त्यापासून अत्तर काढतात. आसाम, मध्य प्रदेश इ. प्रदेशात ही झाडे आढळतात. [गु. पानडी; हिं. पाच]

**पाच** पु. स्त्री. वैडूर्य मण्याच्या जातीतील एक हिरव्या रंगाचे रत्न. यास फारशीत जमरूद म्हणतात; पाचू. [सं.]

**पाच** वि. १. अनुक्रमाने चार या संख्येनंतर येणारी संख्या. २. पंच; निवाडा करणारे : 'बहिणी म्हणे पांचामध्यें घेई आण। मग मी जाईन कळे तेथें।' - ब ४९४.३. सर्व; सगळे [सं. पंच] **पाचावर धारण बसणे** - अत्यंत विस्मित व भयभीत होणे. पूर्वी लष्करात रुपयास पाचशेर धान्य झाले म्हणजे अत्यंत दुष्काळाची स्थिति होई व ती फार भयंकर महागाई वाटे. यावरून (लक्षणेने) पंचप्राण निघून जातात की काय अशी अवस्था होणे. गर्भगळीत होणे, **पाचातून उठणे** - माणसातून उठणे; समाजाशी बेपर्वाईने वागणे; संबध न राहणे; समाजबाह्य वर्तन करणे.

**पाचक-न** वि. १. जैविक वायू तयार करण्यासाठी विटांनी तयार केलेला खड्डा. २. (फोड, गळू इ.) पिकविणारा; पूयजनक. [सं. प्र+स्खल्]

**पाचक–न** न. अन्नाचे चांगले पचन करवणारे (औषध इ.).

**पाचक –के** वि. हलके; हिणकस (सोने).

**पाचकळ** वि. चावट; वात्रट; फाजील.

**पाचकुल** न.पाच वस्तूंचा, चिंचोके इ. चा समुदाय. (कर.)

**पाचकॉ** पु. (पत्यांचा खेळ) पाच ठिपक्यांचे पान; पंजा – जी.

**पाच चार नऊ** (तिफाशी सोंगट्यांच्या खेळात) तीन फाशांवर अनुक्रमे पाच, दोन व दोन असे पडणारे दान.

**पाचट** न. १. उसाचा वाळलेला पाला. २. उसाचे चिपाड. ३. कुकडे; चातीवरील सुताची केलेली गुंडाळी. मुंडा हात व कोपर यांवर गुंडाळलेली काथ्याची दोरी वगैरेची गुंडी. ही चिवटाच्या निम्मी असते. पहा : **कोपरी** १. ४. खुंटा घट्ट बसविण्याचे साधन.(प्रां) पहा.**पाचुटे** [सं. प्रशिष्ट, अपविष्ट]

**पाचट घालणे** सक्रि. अळू, आले इ. कंद कोंब आणण्यासाठी ओल्या मातीत पुरणे. [सं. पचन]

**पाचन** न. १. अनेक औषधांचा केलेला काढा. २. (वैद्यक.) आयुर्वेदातील रेचन, शमन, क्लेदन इ. सप्तोपचारांपैकी अन्नाचे पृथक्करण, पचन करण्याचा एक उपचार. ३. शिजविणे; (खाद्यपदार्थ इ.) शिजवून खायला योग्य करण्याची क्रिया. ४. अन्न इ. पचविणे. पु. जठराग्नी. [सं. पचन]

**पाचपालव** पु. अव. १. पंचप्राण : 'ऐसें अपार तुझें केलें। एकी वाचा काय मी बोलें। परि पांचही पालव मोकलिले। मजप्रती।'– ज्ञा ११.६३. २. अंत:करणपंचक– मन, बुद्धी, चित्त, अहंकार व अंत:करण.

**पाचपालवी** स्त्री. पाचगाठी मारलेली दरिद्री माणसाची झोळी.

**पाचपावली** स्त्री. मंगलकार्यात तळहात व पाय यांना हळद व कुंकू यांचे पट्टे ओढण्याचा विधी. (व.)

**पाचपावली** स्त्री. सापाची एक जात. ही हातभरापेक्षा कमी लांबीची व बोटभर जाड असते; सापसरडी.

**पाचपावली** स्त्री. लांब अंतरावर असलेल्या देवाला केलेला नवस काही कारणाने फेडावयाचा राहिल्यास त्या देवतेच्या स्थानाच्या दिशेने काही पावले चालून जाणे (व कालांतराने परत घरी येणे) हा विधी.

**पाचपिसे** १. वेड; भ्रम; भ्रांती : 'मज तुवां केलें जी तैसें। माझे मीपण धाडूनि देशें। स्तुतिमिषें पांचपिसें। बांधलें वाचे।' – माज्ञा १८.१८. २.वर्णन.

**पाचपेच** पु. १. मल्लयुद्धात करतात ते डावघाव. २. (ल.) वाद, युद्ध इ. दुसऱ्याचा पाडाव करण्यासाठी योजले जाणारे डावपेच; गुप्त मसलत, हिकमत इ.; छक्केपंजे. [फा. पेच द्वि.]

**पाचबंदी** वि. पाचूंनी बनविलेली जमीन.

**पाचर, पाचवट** स्त्री. न. खुंटा वगैरे घट्ट बसविण्यासाठी करवतीने तिरकस कापलेली, लाकडाच्या फटीत मारण्यासाठी, भोक बुजविण्यासाठी केली जाणारी चपटी व निमुळती खुंटी; ढपली. [हिं. पाचर] (वा.) **मारणे** एखाद्या कामात विघ्न आणून ते कार्य बंद पाडणे.

**पाचव** न. गोमुख. (गो.)

**पाचवट – टे** न. पु. पाचांचा गट, समुदाय : 'यावरी आदी। पांचवटेयाची बांधी। बांधली प्रभेदीं। पंचभूतिकीं।' – ज्ञा १३.४६.

**पाचवटा** पु. पाच वाटा एकत्र होतात ती जागा.

**पाचवणे** अक्रि. दृष्ट, नजर लागणे.

**पाचवन्ही – नी** वि. पाच वर्णांचा; पाच प्रकारांचा : 'जें विरहाग्नीचें पाचवनें चीर। नेसों देत असा।' – उगी १२१.

**पाचवा** पु. १. पहा : **पाचाव** १,२. २. दृष्टीचा उतारा म्हणून गळ्यात बांधलेला मणी.

**पाचवी** स्त्री. १. स्त्रीच्या प्रसूतीच्या पाचव्या दिवशी षष्ठी देवी, जीवंतिका इ. देवतांची केली जाणारी पूजा. २. त्यावेळी पुजण्याची एक देवता. (वा.) **पाचवीला पुजणे, पुजलेला असणे** – (एखाद्याला एखादी गोष्ट, खोड इ.) जन्माची लागणे; जन्मापासून जडणे.

**पाचवेडळी–ली** स्त्री. पाच नांग्या असलेली इंगळी : 'हे उघड पांचवेडली। पंचधा आगी लागली।' – ज्ञा १३.१०६९.

**पाचवॉ** वि. हिरवा. (गो.)

**पाचसटी** सं. वि. पासष्ट : 'सातांस्या पांचसटी हा सिद्धांतु।' – इप्र १३.६.

**पाचळा** पु. लाकडे तोडण्याचे एक हत्यार. (को.)

**पाचा** पु. पोयाड; नदीला जाऊन मिळणारा ओहोळ, अरुंद खाडी इ. (कु.)

**पाचाखरी** पु. मांत्रिक; पंचाक्षरी.

**पाचार** पु. १. पाचारण; बोलावणे. २. सत्कार; सेवा : 'बहु याचक राज्यधर। यांशीं करून उचित पाचार। प्रसन्न करूं म्हणे जो नर। तो एक मूर्ख जाणावा।' – मुक्तेश्वरमूल १११. [सं. प्राचारण]

**पाचारण** न. बोलावणे; निमंत्रण. [सं. प्राचारण]

**पाचारणे** सक्रि. १. बोलावणे; हाक मारणे. २. आमंत्रण देणे; आवाहन करणे. ३. कुशल प्रश्न विचारणे; समाचार घेणे. ४. मृताच्या नातेवाइकांना भेटावयास जाणे. (कु.) ५. आठवणे; स्मरण करणे : 'ते ह्वेळीं हातीं काष्ट दंड घेतलें। कृष्णाजिनाचें ॐदुण केलें। मग मिआं हीं पाचारिलें। कां पितयाची आण।' – शिव १४२. [सं. प्राचारण]

**पाचारमणी** पु. मोठे दुखणे येऊन गेल्यावर ते पुन्हा उलटू नये म्हणून हातात बांधायचा लाकडाचा किंवा पोकळ गवताचा मंतरलेला मणी.

**पाचार होणे** १. दुखणे उलटणे. २. दृष्ट लागून अन्न नकोसे होणे.

**पाचारा** पु. (विरू.) पाचावा; पाचवा.

**पाचारिका** स्त्री. दासी; दूती; परिचारिका : 'ऐसें सांगून नृपें सर्वांला। राव सभेस्थानीं गेला। येरीकडे पाचारिकेला। पाठविलें बोलावूं।' – नव १८.५६. [सं. परिचारिका]

**पाचारी – रे** स्त्री. न. पाचर. (गो., कु.)

**पाचाव – वा** पु. (विरू.) १. दृष्ट लागून दुखणे उलटणे.२. पाचव्या दिवशी नेमाने येणारा ताप : 'ज्वर पाचाव आणि शारे।' – दास ३.६.२६. ३. पाचांना, सर्वांना कळणे; बोभाटा होणे. (मुंबई).

**पाचावा** पु. पाचुंदा. [सं. पंचवे – पाचवा]

**पाचिक** वि. हिणकस (सोने) : 'नाना पांचिकें आणि सोळें। हे सोनया तंवचि आलें। जंव परिसु आंगमेळें। एकवटीना।' – ज्ञा १८.१२५४.

**पाचित** वि. शिजविलेला; शिजवून, तळून तयार केलेला (खाद्यपदार्थ). उदा. घृतपाचित = तुपात तळलेला इ.

**पाची** स्त्री. १. पाचू : 'पाचीचा गुण घे ढाळाचें मोतीं।' – शिव २९. २. एक सुगंधी वेल.
**पाचीव** न. १. गुरांचे मूत्र. (राजा.) २. पशूंच्या मूत्राचे खत. [सं. पच]
**पाचुटे, पाचूट, पाचोट – टे** न. पहा : **पाचट**
**पाचुली** वि. पाचवा. जसे :- गोठ पाचुली =गोष्ट पाचवी. (भि.)
**पाचुंडी** स्त्री. (सोनारी) पाच रव्यांचा एकत्र केलेला मणी इ. (बे.)
**पाचुं(चों)दा** पु. कडब्याच्या पाच पेंढ्यांचा गट; पंचकडी; लाडू, पोळ्या इ. कांची पंचकडी.
**पाचुंदा** पु. बारीक काट्यांचा एक वृक्ष. याची पाने बेलाच्या पानासारखी असून फुले श्वेतकेसरयुक्त व फळे बारीक असतात. याचे लाकूड हलके असून त्याचे मणी दुखणेकऱ्याचे दुखणे उलटू (पाचाव) नये म्हणून त्याच्या हातात बांधतात. [सं. पत्तर]
**पाचू** स्त्री. रत्नविशेष; पाच.
**पाचूचा ठसा** (सोनारी) एका बाजूस देवताप्रतिमा व दुसऱ्या बाजूस वेलबुट्टी असलेला ठसा. (को.)
**पाचे–ची** कपडा; कापडाचा तुकडा.
**पाचोरा** पु. १. पाचुंदा वृक्ष. २. पहा : **पाचोळा**
**पाचोळा** पु. १. कडबा, वेळू, मका, ऊस इ. कांची शुष्क पाने; पात; (झाडावरून) गळून पडलेली शुष्क पाने; कांदा, लसूण इ.ची सुकी टरफले, सालपटे. २. मळणी केलेल्या धान्यातील बारीक कोंडा, भूस इ. ३. (ल.) धुळधाण; धुव्वा; दाणादाण : 'इंग्रजी सैन्याचा त्यानें पाचोळा करून टाकला.' – इंप १३९.
**पाचोंडा** पु. (व.) पहा : **पाचोळा**
**पाच्छाणे** अक्रि. वाढणे; प्रक्षुब्ध होणे; उलटणे. [सं. पश्चात]
**पाज – झ** स्त्री. १. डोंगरातील पाऊलवाट. (राजा.) २. जिना.(गो.) [सं. पद्या; पोर्तु. पासो=पाऊल]
**पाजणी** वि. स्वतःच्या आईने न पाजल्यामुळे दुसऱ्या मेंढीने पाजून पोसलेले (कोकरू). (जुन्नरी)
**पा(पां)जणी** स्त्री. न. कोऱ्या कापडाला, सुताला (जोंधळा, बाजरी किंवा तांदूळ यांची) लावली जाणारी खळ. (क्रि. करणे, देणे इ.)
**पा(पां)जणी – नी** स्त्री. १. पाणी पाजणे. २. शस्त्राला धार लावण्याची क्रिया. ३. पहा : **पांजणी.** ४. (ल.) खळ लावून विणण्याकरिता मागावर लावलेले सूत.
**पाजणे** क्रि. लावणे; चोपडणे; माखणे (खळ) .
**पाजणे, पाजळणे** सक्रि. १.पाजळणे; तेवणे; एकसारखे जळत ठेवणे. २.(शस्त्राला) धार लावणे; पाजळणे; परजणे. [सं. प्रज्वल]
**पाजणे** सक्रि. १. प्यायला लावणे. २. पान्हवणे; दूध काढणे. ३. (ल.) भोंदणे; मुंडणे; ठकविणे. [सं. प्राशन, पाययति = पाजतो]
**पाजवणी** पहा : **पा(पां)जणी–नी** २
**पाजवा उंदीर** शेतात आढळणारी उंदराची एक जात.
**पाजळणी** स्त्री. १. प्रदीप्त, प्रज्वलित करणे. पहा : **पा(पां)जणी**
**पाजी** वि. १. हलकट; नीच; घाणेरड्या मनाचा; खेटरखाऊ; निलाजरा; असभ्य. २. पागल; मूर्ख : 'चाकराचा आब व चुगल्खोरी या प्रकारची, व आपली त्या पाजीकरितां आम्हांवर इतराजी. ।' – मइसा ६.६.०५. ३. (ल.) अनिष्ट; वाईट : 'कल्पवृक्ष देवोनि घेतली भाजी। वसुदेव तैसा झाला राजी । समयो पाजी म्हणोनियां।' – देकृष्णजन्म ६.
**पाझडी** स्त्री. दलदल; चिखलाची वाट : 'कामक्रोधाची पाझडी। चुकौनि आला पाडी। सद्वासनेचिये।' – ज्ञा ७.१२४. [क.पच्च]
**पाझर** पु. १. (पाणी, तूप इ. द्रवपदार्थ भरलेल्या मडक्यातून त्या पदार्थाचा किंवा खडकातून पाण्याचा, डोळ्यांतून अश्रूंचा) थोडा–थोडा होणारा स्राव; झिरपण; ठिबकी; टपटप गळणे. २. झरा; ओघळ; ओहळ : 'कडे कपाट पाझर।' – दावि २४४. ३. पाघळ; चिहाळ. ४. दयार्द्रता. [सं. प्र+क्षर्=पाझरणे]
**पाझरणी** स्त्री.१. पाझरण्याची, ठिबकण्याची क्रिया; गळती. २. पाघळणी.
**पाझरणे** स्त्री.१. पहा : **पाघळणे**; (भांडे, मडके इ. तून पाणी इ. द्रव पदार्थ) गळणे; ठिबकणे; झरणे; झिरपणे;स्रवणे. २. (अंत:करण इ.) द्रवणे; कळवळणे; पिळवटणे. [सं. प्रक्षरण]
**पाझरतलाव** पु. जमिनीमध्ये पाणी मुरावे या उद्देशाने तयार केलेला तलाव.
**पाझरभर** वि. गाडीभर. (व.)
**पा(पां)झरा** पु. अश्रुधारा. पहा : **पांझर १**
**पाझरीव** वि. पाझरलेला; स्रवलेला; ठिपकलेला.
**पाझळ पाझळ** निष्कारण बडबड; कटकट; वटवट. (क्रि.लावणे)[सं.]
**पाट** पु. १. चौकोनी, लहान, लाकडी फळीला खाली आखूड पाय जोडून बसण्यासाठी केलेले आसन; बैठक. २. सिंहासन; गादी; पीठ : 'ते वेळीं विजयश्रियेच्या पाटीं। एकुचि बैसे।' – ज्ञा ७.१२. ३. श्रेष्ठपणा; मोठेपणा : 'कां बाळका एकी माये – । वांचोनि जिणें काय आहे। म्हणोनि सेविजे कीं तो होये। पाटाचा धर्मु।' – ज्ञा १८.९०८. ४. श्रेष्ठपणाचा मुख्य मान; अधिकार (क्रि. बांधणे) : 'पाटाचा हाती पडिला' – लीचपु २२६. ५. (खडीकामाचा धंदा) ठसे उमटविण्यासाठी खाली धरावयाचे फळीसारखे साधन. ६. (विणकाम) सूत उकलण्यासाठी ताणा घालण्यासाठी फळीवर खुंट्यांच्या रांगा ठोकून केलेले साधन. ७. खांबाची उंची वाढावी म्हणून त्याच्या माथ्यावर तुळईखाली बसविलेली लाकडी बैठक, चौकोनी तुकडा. ८. राजा : 'रुक्मिया पाटाचा कुमरु' – रुस्व ३७६. [सं. पीठ, पट्ट.] (वा.)**पाटी बसणे** – १. कोणत्याही धार्मिक पत्नीने पतीशेजारी उजव्या बाजूला बसणे. २. रजस्वला, विटाळशी होणे. ३. अधिकाराचे, मानाचे स्थान प्राप्त होणे, मिळविणे.
**पाट** पु. १. शेतात, बागाइतात विहिरींचे, नदीचे, तलावाचे पाणी खेळविण्यासाठी केलेली पाण्याची सारणी; लहान कालवा. २. (ल.) असल्या सारणीतून वाहणारे पाणी. ३. नदीचे पात्र. (को.)[सं पाटक]
**पाट** पु. विशिष्ट जाती–जमातीमध्ये विधवा स्त्रीने पुन्हा लग्न करण्याचा विधी. असे लग्न याला करणाऱ्या पुरुषाला पाटकरी व स्त्रीला पाटकरीण म्हणतात. पाटी बसणे असे म्हणतात. [सं. पीठ, पट्ट]
**पाट** पु.१. गोणपाट, पडम इ. विणताना जी रुंदी धरलेली असते, त्या रुंदीच्या कापडाचा लांब पट्टा, तागा : 'चादर पाट पांच, वार १५ ची.' – ऐरापुप्र ३.१९५. २. (सामा.) वस्त्र : 'मृणाळसुताचेनि पाटें विणिलें।' – शिव

७७४. ३. शेतातील, बागाइतातील पिकाचा, भाजीचा लांब पट्टा, वाफा. ४. एखाद्याची धिंड काढताना त्याच्या डोक्यावर शेंडीपासून डोक्याच्या शेवटापर्यंत वस्त्र्याने तासलेल्या पट्ट्यांसारख्या लांबट भागांपैकी प्रत्येक. हा शिक्षेचा अथवा मानखंडना करण्याचा एक प्रकार. (क्रि. काढणे). ५. गोणपाट. ६. सीमा; मर्यादा. [हिं.; सं. पट्ट]

**पाट** न. रेशीम. [सं. पट्ट]

**पाट** पु. (संगीत) मृदंगादी वाद्यांचे बोल.

**पाट** न. बैल, रेडा इत्यादिकांचे गाय, म्हैस इत्यादिकांवर उडणे. (वा.) **पाटका करणे** – १. बैल इ. जनावरास शिकवणे; शिस्त लावणे. २. वश करणे; ताब्यात आंणणे.

**पाट – ठ** स्त्री. लहान शेळी किंवा बकरी .

**पाटकरी** पु. १. पाटाच्या पाण्यावर व दुरुस्तीवर देखरेख ठेवणारा खेडेगावातील नोकर. २. पाटाच्या पाण्याचा भागीदार.

**पाटकरू** न. (तिरस्कारार्थी) पुनर्विवाहित विधवा स्त्री. पहा : **पाट** ३

**पाटकुळी** स्त्री. लहानसा पाट; पाण्याची सारणी. (राजा.) [सं. पाटक+कुल्या]

**पाटके** न. पासोडी; कांबळी. [सं. पट]

**पाटकॉ** पु. १. सण; ताग. २. गोणपाट. (गो.)

**पाटखंड** न. १. (चटणी इ. वाटण्याच्या) पाट्याचा तुकडा; फुटलेल्या पाट्याचा भाग. २. (तिरस्कारार्थी) लहान पाटा.

**पाटगादी** स्त्री. रेशमी वस्त्राचे आच्छादन घातलेले आसन : 'गोसावीयांसि पाटगादीएवरि आसन।' – गोप्रच १९६.

**पाटगे** न. १. एकेरी रुंदीचे, पाटाच्या रुंदीचे वस्त्र; कापड. २. पासोडी; पैठणी; रेशमी साडी. [सं. पट+क]

**पाटगे** न. तीन वाफे मिळून झालेले जमिनीचे, बागाइताचे क्षेत्र.

**पाटगे** न. मोहतूर. [सं. पट्ट+पाट+क]

**पाटडी** स्त्री. तुळई. [गु.]

**पाटण** न. पाठ; पठाड; पाठीचा भाग. [सं.पृष्ठ]

**पाटण** न. नगर; शहर : पट्टण : 'ते विदेहाचां पाटणीं। पुर्वी असती जाली।' – उगी ३७६. [सं.पत्तन]

**पाटण** न. १. चुलीच्या वरचा भाग. (कु.) २. फणसातील गरे आणि काटेरी त्वचा यांच्यामधला भाग; तळखंड. ३. फणसाची खरखरीत, काटेरी त्वचा. (कु.) ४. मोठे कौल. (कु.)

**पाटण** न. स्त्री. साचा; नमुना.

**पाटण – णी** स्त्री. १. तक्तपोशी; पाटण्याची क्रिया. २. कडीपाट; लाकडी छत.

**पाटणे** उक्रि. घरातील जमीन आच्छादणे.

**पाटथर – रा** पु. १. जोत्याच्या अगदी वरचा (घडीव दगडांचा) थर. २. इमारतकामाला उपयोगी, दरवाजासमोरील पायरीचा असा घडीव व गुळगुळीत दगड.

**पाटदाम** पु. पाट लावण्याच्या वेळी पाटील – कुलकर्णी वगैरे हक्कदारांना देण्याचा कर.

**पाटनी** स्त्री. कडीपाटाची लाकडे : 'येकी पाटनीयां येकी सारिखी वांटनीया :' – लीचपू ४५४. [सं. पट्ट]

**पाटपाणी** न. १. (जेवायला आलेल्या) पाहुण्याला बसायला पाट व हातपाय धुवायला पाणी देवून केली जाणारी सरबराई. (क्रि. देणे, करणे). २. पाट मांडणे इ. (भोजनाची) पूर्वतयारी.

**पाटपासोडा** पु. विवाह, मुंज इ. मंगलकार्यांत वधूवर, बटू यांना बसण्यासाठी शालजोडी, सखलाद इ. घातलेली दोन – तीन पाट जोडून मांडलेली बैठक. या बैठकीवर धान्यादिकांचे चौक भरतात.

**पाटपिढे** न. १. (व्यापक) खुर्ची, मेज, पाट इ. संसारोपयुक्त लाकडी सामान. २. पाट वगैरे आसन : 'तूं देत जा पाटपिढें बसाया।' – सारुह ७.१११.

**पाटमुखी** स्त्री. मुख्य राणी : '(श्रीकृष्णासि) आठ पाटमुखिया :' – लीचउ ४५७. [सं. पट्ट+मुख्य]

**पाटमुद्रित** न. मुद्रिततपासणीला पाने न पाडता दिलेला मजकूर.

**पाटरस** पु. आंब्याचा एकदा रस काढून झाल्यावर पुन्हा त्या कोया व साली यांच्यात पाणी घालून (पाटावर दाबून) काढला जाणारा रस.

**पाटल** वि. तांबूस, गुलाबी रंगाचा : 'जो भर्जरी सरल पाटल वर्ण चेलें।' – र ५०. [सं.]

**पाटला** पु. (जरतार धंदा) १. लहान पट्ट्यावर चालणारे, झिलई देण्याचे एक यंत्र. २. रीळ भरण्याचे यंत्र. ३. सोन्याची चीप.

**पाटलाग** पु. (गवंडी, सुतारीकाम) दाराला लागणारा कडीच्या पट्टीचा भाग अथवा पट्टीची कडी. (बे.)

**पाटलादी** स्त्री. चौरस किंवा आयताच्या आकाराचे, मातकामात वापरण्यासाठी तयार केलेले मातीचे आसन.

**पाटली** स्त्री. १. सुमारे पाव इंच रुंद अशा सोन्याच्या लांबट पट्टीचा, बांगडीच्या आकाराचा हातात घालण्याचा स्त्रियांचा एक दागिना. हिच्या तोंडाच्या दोन्ही टोकांवर पाच ते एकपर्यंत ठिपके उतरत्या त्रिकोणी आकारात खोदलेले असतात. २. जीभ खरवडून साफ करण्याचे साधन. पहा : **जिभी, जिभली.** ३. बैलगाडीच्या चाकाच्या तुंबाच्या बाहेरच्या बाजूला बसवलेले वर्तुळाकार लोखंडी कडे. ४. दोन इंचापेक्षा अधिक जाड नसलेली व जाडीच्या दुप्पट रुंदी असलेली लाकडाची फळी, तक्ता. [सं. पट्ट]

**पाटली** स्त्री. एक दुर्मीळ फुलझाड. याचे फूल फार सुकुमार व सुवासिक असते. याला पारिजातकाप्रमाणे दाट फुले येतात.

**पाटली** स्त्री. (विणकाम धंदा) किनारीचा मूळचा भाग. काठातील साधे दोरे; गादी.

**पाटलू(लो)ण** स्त्री. एक प्रकारची इंग्रजी पद्धतीची विजार; पँट

**पाटले** न. १. (जेवताना बसण्यासाठी घेतला जाणारा) लाकडी पाट. (खा.) २. शेवया करण्यासाठीचा पाट, फळी.

**पाटले** न. जम; बस्तान. (व.)

**पाटलेजला** वि. सुकलेला चिखल. (झाडी)

**पाटव** न. १. कौशल्य; पटुता; चातुर्य : 'सविवेकमति पाटव। तेंचि मंत्र विद्यागौरव।' – ज्ञा ९.२४२. २. (बुद्धीचा) तल्लखपणा; चलाखी; हुशारी; तरतरीतपणा. [सं.]

**पाटवडी** स्त्री. हरभऱ्याच्या पिठात तिखट, मीठ इ. मसाला घालून उकडून पाट वगैरेवर वर थापून केलेली वडी.

**पाटवण** न. पाटकुळी; पाण्याचा लहान पाट : 'असल्या पाटवणांत कोणतेंहि पीक बागाइतदारानें करता कामा नये.' - के २.१२.३०.

**पाटवणी** न. १. पाटाने वाहून नेलेले पाणी. २. पाटाच्या पाण्याने उत्पन्न केलेले फळ इ. (ऋषिपंचमीला असे फळ खायला चालते.)

**पाटशेवई** स्त्री. पाट, लांब फळी इ. वर केलेल्या शेवया.

**पाटस** न. चाकाच्या घेराचा धावेजवळचा लाकडी भाग. पहा : **पाटा**

**पाटसरा** पु. पडशाळा; ओवरी : 'गोसावीयांसि पाटसरेयावरि आसन असे' - लीचउ ७०. [सं. प्रतिशाला]

**पाटसरी** स्त्री. जेथे भिंत छपराला मिळते त्या ठिकाणची आतील बाजूला राहिलेली जागा; जई.

**पाटसुत** न. नवार : 'सत्वाचेनि पाटसुतें । वीणिला जो ।' - ऋ ८५.

**पाटस्थळ** न. स्त्री. पाटाच्या पाण्याने भिजणारी (लागवडीखालची) जमीन.

**पाटा** पु. १. पुरण, चटणी इ. वाटण्याचा, टाकीने घडलेला दगडाचा तुकडा. २. (ल.) सपाट जमिनीचा लांब पट्टा; पटांगण; माळरान : 'बरवें कांहीं न दिसे दृष्टीं। पाटा वाटेल सर्व सृष्टी।' - मुआदि २८.११५. ३. दहा तिफणींइतका जमिनीचा भाग. ४. एक प्रकारचे लहान जाळे. (कु.) ५. लहान होड्यांना नांगर म्हणून बांधलेला दगड; लोखंडाचा तुकडा : 'फोडूनिया नौका पाटीं। उतरीन म्हणे मार्गस्थां।' - मुवन १७.२१. ६.(सामा.) मोठा दगड; शिळा : 'उरीं लोटतां वाटलें त्यास पाटा। उठे संकटीं आठवी नीळकंठा।' - मुराबाल९१. ७. लोखंडी तुळईचा माथ्यावरील सपाट भाग. यावर कड्या ठेवता येतात किंवा बांधकामही करता येते. ८. चाकाचा परीघ लाकडाच्या ज्या तुकड्यांनी बनलेला असतो त्यांपैकी प्रत्येक. ९. पोळपाट. (व.) १०. कपाशीच्या शेतातील भेंडी, गवारी इ. पेरण्यासाठी राखून ठेवलेली एक तासभर जमीन.(व.)[सं. पट्ट]

**पाटा** पु. दुखापतीनंतर जखमेवर लावला जाणारा वनस्पतींचा लेप.

**पाटा.** पु. पायघडी घालण्याच्या उपयोगाचा वस्त्राचा अरुंद व लांब पट्टा. २. वस्त्राचा तुकडा; चिंधी : 'रणीं जुझारू धायेवटे। तरि वणियां न बंधिजाति पाटे।' - भाए २४१. [सं. पट] **पाटे मोडणे** - पायघड्या घालणे : 'मराठे लोक वगैरे याजकडे लग्न होतात, तेथे पाट मोडावे'. - मसाप २.२.१७४. **पाटा बांधणे** - निखळलेले किंवा मोडलेले हाड बरोबर जोडून दोन्ही अंगांनी फळ्या बांधून त्याच्या दाबात मोडलेला भाग घट्ट बांधणे.

**पाटा(टां)ऊ, पाटांव, पाटावू** पु. न. १. उंची व चित्रविचित्र रेशमी वस्त्र. २. पैठणी; पीतांबर. [हिं. पाट =रेशीम; सं. पट्ट.]

**पाटागर** न. पाटाचे पाणी दिले जाणारे नारळीचे आगर.

**पाटाचा** वि.१. सर्वोत्कृष्ट; मुख्य : 'तें माझें निजधाम पाहीं। पाटाचें गा।' - ज्ञा १५.३१६. २. ऐक्याचा. ३. अधिकारपत्र मिळालेला; हक्काचा: 'वसंतां वाउगें बीकु। तें सुख चौ - गुणां अधिकु। भणॐनि ते पाटाचे अंकु। मन्मथाचें।' -शिव ६२२.

**पाटापूजन** न. स्त्री. प्रसूत झाल्यानंतर पाचव्या दिवशी केले जाणारे सटवीपूजन.

**पाटाफुटा** पु. शेलापागोटे; मानाची वस्त्रे : 'जीवोद्धरणाचे पाटेफुटे : कवणा दीधले' - उगी १२२. [सं. पट द्वि.]

**पाटावरवंटा** पु. १. पाटा व त्यावर ज्याने पुरण, चटणी इ. पदार्थ वाटतात तो वर्तुळाकार लांबट, घडीव दगड. २. (ल.) (मंगळागौरी पूजन) मंगळागौरीला व अन्नपूर्णेला बसवण्यासाठी कणकेची केली जाणारी गादी - तो पाटा व कणकेचाच केला जाणारा लोड तो वरवंटा. ३. (ल.) चक्काचूर; विध्वंस; सत्यानाश. (क्रि. होणे, करणे)

**पाटांगडो** पु. मुख्य विद्यार्थी. (गो.)

**पाटिलकी, पाटिलकीचा डांग** पाटलाचे काम, अधिकार, हक्क, मान.

**पाटिली** स्त्री. १. पाटलास मिळणारे वेतन. २. पाटलाचा अधिकार, काम.

**पाटी** स्त्री. १. लहान मुलांची मुळाक्षरे लिहिण्याची फळी; धूळपाटी; दगडी (स्लेट) पाटी. २. पोथीच्या खाली व वर (आच्छादनार्थ) ठेवतात त्या फळ्यांपैकी प्रत्येक. ३. उसाच्या चरकातील लाटांच्या वर व खाली असणाऱ्या लाकडाच्या जाड फळ्यांपैकी प्रत्येक. ४. जिच्यावर शेवया करतात ती लाकडाची फळी. ५. (आट्यापाट्यांचा खेळ) क्रीडाक्षेत्रावर पाडलेल्या आडव्या जाड रेघांपैकी प्रत्येक. ६. लाकडाची जाड फळी; लहान तुळई : 'बुचकुंदांचिआं पाटियां। कल्हारांचिआं मोहटियां।' - शिव ७६६. ७. अरुंद जमिनीचा लांब पट्टा. ८. शेताचा पाडलेला लहान तुकडा; भातजमीन. (राजा.) ९. घरटाच्या वरच्या तळीच्या मध्यभागी बसविलेली लोखंडाची जाड पट्टी. हिच्या मध्यभागी असलेल्या छिद्रात खालील तळीचा खुंटा फिरतो. १०. स्त्रियांचे एक कंठभूषण. 'कंठी मिरवे मुक्तमाळती, पेट्या पाटी नाना जातीं' - अमृत ५५. ११. रीत; पद्धत; परिपाठ. १२. (उदबत्त्यांचा कारखाना) उदबत्त्या तयार करण्याचा पाट. १३. (वाद्य) तंबोऱ्याचा भोपळा इ. वर आच्छादनासाठी बसविलेली लाकडाची फळी, तबकडी. १४. दाराची एक फळी. १५. अंथरुण. (वा.) ० **उधळणे** - शाळा सुटतेवेळी धुळपाटीवरील धूळ वा विटकराचा भुजा उधळून पाटीवरील अक्षरे नाहीशी करणे.

**पाटी** स्त्री. बांबू इ. कांची केलेली मोठी टोपली; हारा. [सिं. पाटि]

**पाटी** क्रिवि. नंतर : 'पाटीं समाधिश्रियेचा अशेखा। आत्मानुभव राज्यसुखा। पट्टाभिषेकु देखा। समरसें जाहला।' - ज्ञा ९.२१८.

**पाटीगणित** न. अंकगणित.

**पाटीतले मासे** (तिरस्कारार्थी) क्षुद्र व अगतिक व्यक्ती; लाचार व दीन मनुष्य.

**पाटीदार** पु. १. पाटील : 'तेथें प्रत्येक मुखी, मतादार व पाटीदार यांनीं (सरकार स्वारीस) नजराणा करावा.' - स्वारीनियम १२६. (बडोदा, गुजराथ) २. शेतकरी. [गु.; पट्टीदार अपभ्रंश]

**पाटीर** पु. १. चंदनाचा वृक्ष, खोड. २. चंदनाच्या खोडाचे उगाळलेले गंध : 'पाटीर होममय वार्टीत घे, विनय ताटीं फळें फुल जळें।' - आविश्वा ६. [सं.]

**पाटील** पु. १. गावचा कारभार पाहणारा वतनदार अधिकारी. याच्या जवळ गावाच्या शिवारातील एकूण एक जमिनींचे पट्ट असते. हा गावची पीकपाहणी, आणेवारी, पोलीसबंदोबस्त, लवाद म्हणून न्याय करणे, पंचायत नेमून निवाडा करणे, गावचा वसूल जमा करणे, गावाचे रक्षण

करणे, गावात शांतता – सुरक्षा राखणे इ. कामे करतो. २. मराठा, कुणबी व्यक्तीस आदराने, सन्मानाने संबोधण्याची संज्ञा. [सं. पट्टकील; गु., हिं. पटेल]

**पाटीव** वि. फळ्यांनी बनवलेली तक्तपोशी; छत.

**पाटु – टू** वि. श्रेष्ठ; उच्चासनावर बसण्यास योग्य.

**पाटुगे** न. लहान वस्त्र : 'आधजुनीए पासवडीचें पाटुगें' – लीचपू २१९. [सं. पट]

**पाटुबांध** पु. पट्टाभिषेक.

**पाटुला** पु. लहान टोपली. (कु.)

**पाटे** न. जमीन सारखी करण्याचे एक हत्यार.

**पाटे** न. रुंद तोंडाची मोठी पाटी; टोपले; हारा.

**पाटेकर** पु. पट्टा, तलवार धारण करणारा : 'साबळीये पाटेकर : ते जैसे माहासंहारीचे वीर' – रुस्व १४०१. [सं. पट्ट + कर]

**पाटेकार** पु. पाटच्यावर बसविलेली देवता; कुडाळदेशकर ब्राह्मण राजवटीतील राज्याचा देव.

**पाटेफुटे** पु. अव. शेलापागोटे : 'जीवोद्धारणाचें पाटेफुटें। जि कवणा दीधले।' – भाए १२२.

**पाटेल, पाटेलकी, पाटेलपटवारी, पाटेली, पाटे(टै)लु** पहा : **पाटील**

**पाटेस** पु. छपराचे आढे; दांडा. (को.) [सं. पृष्ठवंश]

**पाटो** पु. १. लहान कंथा. २. प्रदेश.

**पाटोरी** स्त्री. पोट.

**पाटोला – ळा, पाटोळी** पु. स्त्री. १. पहा : **पाटाऊ** १ : 'नेसली क्षीरोदक पाटोळा।' – एरुस्व ७.४४. २. अंथरूण; बिछाना : 'झाडोनियां मंचक। वरी पाटोळा क्षीरोदक।' – ह १०.१२६. [सं. पटोल= वस्त्रविशेष]

**पाटोळी** स्त्री. पाटाची बायको. (कु.)

**पाटोळे** न. पाटाच्या बायकोपासून झालेले मूल.

**पाटौरा** पु. पाटी; दुरडी : 'बाहेरील सून्य पाटौरां घालुनु भीतरीं आणिजे।' – विद १९. पहा : **पाटाऊ**

**पाट्याचा अंगठा** बैलगाडीच्या चाकाच्या आऱ्याचे कुसू.

**पाठ** पु. १. वेदपठण; वेदादी ग्रंथांची आवृत्ती करणे. पंचमहायज्ञांपैकी एक यज्ञ आहे. २. (सामा.) वाचणे, पठण करणे (स्तोत्र इ.). ३. मुखोद्गत करण्यासाठी विद्यार्थ्याने गुरूपासून घेतलेला भाग; धडा. ४. पुस्तक इ. तील धडा. ५. एखाद्या ग्रंथाच्या प्रतीतील वाक्य, शब्द, अक्षरक्रम इ. विषयक भेद, फरक. ६. वहिवाट; पद्धत; परिपाठ.

वि. मुखोद्गत; ग्रंथाच्या मदतीवाचून त्यातील भाग तोंडाने म्हणून दाखविण्याइतका स्मरणात असलेला. [सं. पठ्]

**पाठ** स्त्री. १. कंबरेपासून मानेपर्यंतचा शरीराचा मागचा भाग. २. (ल.) तवा, सहाण, पाट, आरसा, तरवार इ. सारख्या वस्तूंची मागची, कार्योपयोगी बाजूच्या उलट बाजू. ३. (ल.) मदत; साहाय्य; टेका. (क्रि. देणे) : 'इंग्रजाचा अन्यायी निघावा पाठ पेशव्याची। म्हणून साहेब लोकांनी आरंभिली आगळिक दाव्याची।' – ऐपो ३९७. ४. (ल.) (पृथ्वी, समुद्र वगैरेचा) पृष्ठभाग; पृष्ठविस्तार; पातळी. ५. साल; बाह्यत्वचा; सालपट. ६. (भरतकाम) टोपी इ. च्या कपाळपट्टीचा भाग सोडून चांदव्याशी सभोवार शिवलेले कापड. ७. (भरत – शिवणकाम) कंबरेपासून मानेपर्यंतचा शरीराचा मागचा भाग झाकणारा कापडाचा तुकडा. ८. मश्रू, किनखाब इ. कांची दर्शनीय भागाव्यतिरिक्त असलेली दुसरी, मागची, आतली बाजू. ९. लहान शेळी; पाट. [सं. पृष्ठ] (वा.) **०उघडी पडणे** – पाठचे भावंड मरणे. **०उचलणे** – व्यवसाय सावरणे; गमावलेली शक्ती, मान, धन इ. पुन्हा मिळविणे. **०काढणे, चोरणे** – (एखाद्या कामात) कुचरपणा, अंगचोरपणा करणे. **०घेणे** – १. पाठोपाठ जाणे; पाठलाग करणे; पिच्छा पुरविणे. २. (एखाद्या गोष्टीबद्दल एखाद्याला) सतावणे; गळ घालणे; जेरीस आणणे; राशीस लागणे; खनपटीस बसणे. ३. (एखादे त्रासदायक काम, आजार इ. एखाद्याच्या) बोकांडी बसणे. **०झाकणे** – (एखाद्याने एखाद्याच्या) पाठीवर जन्मास येणे. **०टाकणे** – विश्रांतीसाठी आडवे होणे. **०था(थो)पटणे** – शाबासकी देणे; वाहवा करणे. **०दाखविणे, देणे** – शत्रूसमोरून कठीण प्रसंगात भीतीने पळून जाणे. **०देणे** – १. (एखाद्याचा उपदेश, विनंती इ. कांचा) अव्हेर करणे; अवमानणे; न ऐकणे : 'पितृवचनासी पाठ दिधली।' – एकनाथ. २. मुकाट्याने संकट, विपत्ती इ. सहन करणे : 'देवोनि पाठ त्याला सर्वहि मी सोशितों मुकाट्यानें।' – कृ. ना. आठल्ये. **०धरणे, पुरवणे** – पाठलाग करणे. **०निघणे, रिघणे** – (स्वत:चे) संरक्षण व्हावे म्हणून, आश्रयासाठी एखाद्याच्या मागोमाग जाणे; शरण जाणे; पाय धरणे. **०पोट सारखे होणे** – (आजार, उपासमार इ.कांनी) अत्यंत रोड होणे. **०पोटी स्वरूप करणे** – अंतर्बाह्य ज्ञानी करणे. **०फोडून निघणे, पाठीला पाय देवून येणे** – १. (एखाद्याने आपल्या) वडील भावाच्या, बहिणीच्या पाठीमागून जन्मास येणे. २. (एखाद्याच्या) नंतर अधिकारारूढ होणे (राजा, मंत्री इ.). **० भुईस लागणे** – (शारीरिक, आर्थिक इ. स्थिती) अतिशय खालावणे. २. हरणे. **० मऊ करणे, पाठीचे चकदे काढणे** – एखाद्याच्या पाठीवर मारणे; बडविणे; पिटणे. **पाठीचे धिरडे करणे** – (एखाद्यास) खूप मारून पाठ धिरड्यासारखी लाल व खरबरीत करणे. **पाठीचे साल जाणे** – १. मार मिळणे. २. नुकसान येणे; ठोकर बसणे. ३. लुबाडला, नागविला जाणे. **पाठीमागे पडणे, पाठी पडणे** – १. (एखादी गोष्ट) जुनी झाल्यामुळे प्रचारांतून कमी होत जाणे किंवा तिची तीव्रता, महत्त्व इ. कमी होत जाणे. २. (एखादे काम इ.) लांबणीवर पडणे; मुदत टळून मागे राहणे. ३. कमी प्रगती होणे; मागे राहणे; मंदगती असणे. **पाठीमागे भुंगा लावणे** – (एखाद्यास) सतत त्रास देणे. **पाठीमागे लागणे** – (एखादी गोष्ट, व्यक्ती इ.च्या) नादी लागणे. **पाठीमागे सरणे** – हार खाणे. **पाठीवर टाकणे** – (एखादे काम) लांबणीवर टाकणे; दिरंगाई करणे. **पाठीवर, पाठीला तेल लावून ठेवणे** – खरपूस मार खायला तयार असणे, होणे, (एखाद्याच्या) नंतर अधिकाररूढ होणे (राजा, मंत्री इ.) **पाठीवाटे काळीज निघणे** – पुरे पारिपत्य होणे, करणे : 'जो कोणी पंतप्रतिनिधीची अखत्यारी सुभेदारी काढूं म्हणेल त्याचें पाठीवाटें काळीज निघेल.' – मइसा ६.३५७.

**पाठीशी घेणे, घालणे** – १. अंगावर घेणे; अंगीकारणे; पतकरणे (काम इ.). २. आश्रय देणे. **पाठीस काळीज असणे** – स्वभावाने धाडसी, बेडर, साहसी असणे.

**पाठीवर** क्रिवि. १. (पिच्छा पुरविण्याकरिता, उत्तेजन देण्याकरिता, रक्षणासाठी) मागे, पाठीशी, मागोमाग (असणे). २. (जन्म इ. बाबतीत एखाद्याच्या)नंतर; पाठोपाठ.

**पाठक** पु. १. देवळात, सार्वजनिक ठिकाणी पुराण वाचणारा पढीक ब्राह्मण; पुराणिक : 'जोसी, पंडित, पुराणीक। वैद्य, वैदीक, पाठक।' – दावि ४७३. २. धर्मशास्त्रविषयक निर्णय देणारा पंडित. ३. उपाध्याय. ४. अध्यापक; गुरू. [सं.]

**पाठकांब** स्त्री. बांबूच्या पाठीची, बाहेरील बाजूची काढलेली साल, कांबटी.

**पाठकुळी – कुळीस – कोळी – कोळीस, पाठगुळी – गुळीस, पाठंगुळी, पाठंगुळीस** क्रिवि. (एखाद्याच्या) पाठीवर (क्रि. घेणे, मारणे, आणणे, बसणे).

**पाठकोरा** वि. एका बाजूस न लिहिल्याने कोरा (कागद).

**पाठगव** न. रेशमी वस्त्र. [सं. पट्ट=वस्त्र]

**पाठगा** वि. पाठीवर स्वारी, ओझे नेण्यास शिकवलेला (घोडा, बैल).

**पाठचा–ची** वि. १. (एखाद्याच्या) नंतर, पाठीवर जन्मलेला (भाऊ, बहीण इ. भावंड). २. जीव वाचविण्यासाठी आश्रयास आलेला.

**पाठचिकित्सा** स्त्री. पाठातील शुद्धाशुद्धतेची चिकित्सा.

**पाठजाळ** पु. पाठच्या भावंडाचे मरण इ. अनिष्ट गोष्टीचा शोक.

**पाठतगड** न.(सोनारी धंदा) (सोने इ. धातूच्या) पत्र्याच्या दागिन्यातील अथवा पेटी इ. सारख्या दागिन्याच्या मागील, तळचा, दृष्टीस न पडणारा भाग.

**पाठनळ** पु. अव. १. पाठीच्या कण्याच्या दोन्ही बाजूला असलेले कटिप्रदेशाचे दोन नळाकृती स्नायू. २. (ल.) बराच वेळ एकाच स्थितीत बसण्याने, वातादी विकाराने पोट फुगल्यामुळे पृष्ठवंशाच्या दोन्ही बाजूंच्या कमरेजवळ असलेल्या स्नायूंना आलेला जडपणा, ताठरपणा; त्याने होणारी पीडा.

**पाठपलाणे** न. १. विवाहप्रसंगी वरपक्षाकडून वधूच्या आईला दिल्या जाणाऱ्या खणलुगड्याच्या आहेराचे विनोदी नाव. २. पायघड्या संपून विहीण घरात शिरताना वरमातेला (वधूच्या आईने) करावयाचा खणलुगड्याचा आहेर.

**पाठपुरावा** पु. साहाय्य; मदत; पाठिंबा.

**पाठपोट** न. पणतीत बोळके उपडे घालून ते सुताने बांधून मकरसंक्रांतीच्या दिवशी स्त्रियांकडून परस्परांना दिले जाणारे वाण.
क्रिवि. दोन्ही बाजूंनी, पृष्ठांवर (लिहिलेला, वाचलेला कागद इ.).

**पाठपोटी** क्रिवि. समोरासमोर : 'सूर्य जयद्रथ पाठपोटीं। मिरवा महाराजा।' – नव १२.८९.

**पाठफळी** स्त्री. झाड तोडल्यानंतर त्याचे ओंडे सारखे व चौकोनी करण्यासाठी त्याच्या बाहेरील चारी बाजूंनी काढलेल्या ओबडधोबड फळ्यांपैकी प्रत्येक.

**पाठबळ** न. मदत; साहाय्य.

**पाठबंद** पु.बैल, घोडागाडीला जोडण्याचा पट्टा, बंद.

**पाठबी(बे)ळ** न. पहा : **पाठकांब**

**पाठमोड** स्त्री. पाठीस कळ येईल अशा तऱ्हेचे काम.

**पाठ(ठि)मोरा** वि. १. पाठ फिरविलेला; (एखाद्या वस्तू, व्यक्तीकडे) पाठ करून असलेला. २. (ल.) विमुख; पराङ्मुख; विरुद्ध; उलट झालेला; वक्रदृष्टीने पाहणारा: 'माझें अदृष्ट पाठमोरें देख।' – ह २९.१७७. ३. परत; माघारा : 'गांडीव त्यासि दे हें क्लीबा हो शीघ्र पाठिमोरा जा।' – मोकर्ण ४०.७३.
क्रिवि. पाठीकडून; पाठीच्या बाजूने.

**पाठराखणा – राखण्या – राख्या** स्त्री. पु. १. लग्नानंतर मुलगी सासरी जातेवेळी तिच्यासोबत म्हणून जाणारे माहेरचे माणूस. २. दिवाळसणासाठी जावई सासुरवाडीला जातेवेळी त्याच्याबरोबर जाणारे माणूस. ३. साहाय्यकर्ता; मदत करणारा; पाठीराखा; वाली; रक्षक.

**पाठरिगा(घा)वा** पु. साहाय्य; पाठबळ. (कु.)

**पाठरि(नि)घ्या** वि. रक्षणासाठी आश्रयाची याचना करणारा; शरण गेलेला.

**पाठलग** पु. सान्निध्यात; चिकटून (विद्या मिळवण्यासाठी शिष्याने सतत गुरूजवळ) राहणे. (प्रां.)

**पाठलाग** पु. १. (एखाद्यास पकडण्यासाठी त्याच्या) पाठोपाठ जाणे; पिच्छा पुरविणे; पाठपुरावा. २. तपास; छडा.

**पाठवटी – डी** क्रिवि. (एखादे काम आरंभले वा केले जात असताना) पाठपुराव्यासाठी, पाठबळ देण्यासाठी (असणे). (राजा.)

**पाठवण – णी, पाठवणूक** स्त्री. १. निरोप (देणे); बोळवण (करणे). २. अतिथीची, पाहुण्याची धन देऊन केलेली बोळवण. ३. हरिदास, पुराणीक वगैरेंना दिलेली बिदागी. ४. (क्र.) पाठविण्याची क्रिया.

**पाठवणी** स्त्री. जिना; दादर; सोपानमार्ग.

**पाठव(वि)णे** सक्रि. रवाना करणे; धाडणे. [सं. प्रस्थापक]

**पाठवशास** क्रिवि. पाठीमागे.

**पाठवळ** न. १. स्वारी वाहण्यासाठी शिकवून तयार केलेले जनावर. २. ओझ्याचे जनावर (विशेषत: घोडा). ३. (ल.) कोणतेही काम मुकाट्याने करणारा धट्टाकट्टा किंवा धिम्मा मनुष्य. ४. (ल.) नेहमी थट्टेचा विषय बनणारा सोशीक मनुष्य. ५. (ल.) गलेलठ्ठ स्त्री. ६. (ल.) रखेली; राख.

**पाठवळण** पहा : **पाठपलाणे**

**पाठवाड** स्त्री. मदत; पाठपुरावा.

**पाठशिंगी–गा–ग्या** वि. ज्याची शिंगे मागे, पाठीमागे वळलेली आहेत असे (जनावर).

**पाठशील** न. नारळावरील काथ्याच्या आच्छादनावरील साल, त्वचा; नारळाच्या चोडाची साल. (को.)

**पाठा** पु. १. विस्तारपूर्वक, तपशीलवार, पाल्हाळाने सांगितलेली माहिती; सविस्तर यादी. २. गजर.

**पाठाउ** वि. समर्थ; लायक; योग्य : 'कैवल्यकनकाचिया दाना। जो न

कडसी थोर साना । द्रष्ट्याचिया दर्शना । पाठाउ जो ।' – अमृ २.५.

**पाठाड–ण–र** न. (तिरस्कारार्थी) पहा : **पाठ, पठाड, पठाण, पठार**

**पाठाड** वि. पहा : **पठाडी**

**पाठाडे** न. आढ्यावर घालावयाचे मोठे कौल; ढापा.

**पाठार** न. १. पठार; मैदान. २. आश्रय; पाठबळ : 'ऐसा पवनाचेनि पाठारें । येतां धारणेचेनि पैसारें ।' – ज्ञा ६.५८. [सं. पृष्ठ]

**पाठारणे** अक्रि. (अवस्था, दशा, दिवस इ.) उलटणे; पालटणे; जाणे : 'तारूण्य पाठारूनी उतरीनिली । लावण्याची झळाळी ।' – शिव ३९६.

**पाठारा** पु. धुव्वा; दाणादाण : 'रजपूत लोक पहिल्याच सपाट्यास आमच्या सैन्याचा पाठारा उडवितील.' – इलासुंदरी २७.

**पाठारा** पु. प्रभू समाजातील एक पोटभेद व त्यातील व्यक्ती.

**पाठारी** पु. सुतार जातीतील एक पोटभेद व त्यातील व्यक्ती; पाचकळशी.

**पाठावळ – ळू** स्त्री. घराचे आढे. (को.)

**पाठा(ठे,ठ्या)ळ** न. पहा : **पाठवळ** १,२ : 'कोस पर्यंत गिल्चे यांनी पाठलाग केला, परंतु पाठाळ सक्त शीर (?) होते म्हणून तशातून (पार्वतीबाई) निभाऊन गेली.' – भाब १५४.

वि. १. मोठ्या, रुंद पाठीचे (जनावर). २. चांगल्या पाठीचा (घोडा). ३. ओझी वाहण्याच्या उपयोगाचे (जनावर).

**पाठिरा** पु. पाठ : 'जे गेले सिंहगडाला । त्याचे पाठिरे पाहिले । नाहीं पुढारे पाहिले ।' – ऐपो ३६.

**पाठिंगा – बा** पु. पाठबळ; साहाय्य; मदत.

वि. मदत, पाठबळ देणारा; पाठीराखा; साहाय्यकर्ता.

**पाठी** स्त्री. पहा : **पाठ** १,३

**पाठीराखा – ख्या** पु. रक्षणकर्ता. पहा : **पाठराखणा** ३

**पाठीलागा** वि. पाठीस लागणारा; मागोमाग येणारा; पिच्छा पुरविणारा.

**पाठुरका** वि. पाठराखा; साहाय्यकर्ता. (व.)

**पाठुं(ठों)गळी** क्रिवि. पाठीवर. पहा : **पाठकुळी**

**पाठे(ठें)** न. पहा : **पाटा ८**

**पाठोपाठ–ठी–ठीं, पाठोवाटा–टी** क्रिवि. १. लागलीच; मागोमाग. २. पाठीमागे; लागोपाठ.

**पाठोरा** पहा : **पिठोरा**

**पाठ्ठी** वि. दुभती (गाय, म्हैस).

**पाठ्य** न. (नाट्य.) पात्राने, नटाने बोलावयाचे भाषण; नक्कल.

**पाठ्यपुस्तक** न. शाळेत अभ्यासासाठी नेमलेले, क्रमिक पुस्तक.

**पाठ्याळे** न. भातजमिनीत चिखल करण्याचा बिनपासेचा कुळव.

**पाड** पु. डोंगर : 'जे तो विषयांची मोट झाडी । माजीं कामक्रोधांचीं सांकडीं । चुकावूनि आला पाडी । सद्वासनेचिया ।' – ज्ञा ७.१२७.

**पाड** न. मासे धरण्याचे जाळे. (गो.)

**पाड** वि. ओसाड; पडीत : 'तुमच्यासारख्या पापी डोळ्यांची दृष्ट लागून तर आमचा गांव असा पाड पडला.' – सह्यापा ९०. (गो.)

**पाड** क्रिवि. पलीकडे.

**पाड** पु. १. बाजारभाव; दर; निरख : 'सहाप्रमाणे पहिला पाड होता.' – ऐलेसं ९१४. २. अनुग्रह; कृपा. ३. (ल.) योग्यता; बरोबरी; साम्य; किंमत : 'त्रिभुवनसुंदर हें रुपडें । माझी कन्या त्याच्या पाडें ।' – वेसीस्व ३.६३. ४. महत्त्व : 'आमुचिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित थोकडें ।' – ज्ञा १.११२. ५. प्रमाण; मान : 'वीज चमके जेणें पाडें । तैसा गरुड झेपावें पुढें ।' – मुआदि ६.७३. ६. झाडावरील फळांचा विशेषत: आंब्यांचा कच्चेपणा जाऊन पक्के पिकण्यापूर्वीची अवस्था. ७. पिकण्याच्या अवस्थेस आलेला झाडावरील आंबा. ८. माळोचा; माची. ९. पर्वा; भीती : 'द्रोणाचा पाडु न करीं । भीष्माचें भय न धरीं ।' – ज्ञा ११.४७२. १०. अंतर; भेद : 'संसर्गें चेष्टिजे लोहें । परि लोह भ्रामक नोहे । क्षेत्र क्षेत्रज्ञां आहे । तेतुला पाडु ।'– ज्ञा १३.११२२. ११. जोड; प्रतिस्पर्धित्व. (ना.) १२. संगती; मेळ; जुळणी. १३. परिणाम. १४. रेशमी काठाचे व सुती पोताचे वस्त्र (नाशिक). १५. उपकार; कृतज्ञता. [क. पाडु=समता] (वा.)

**पाडास जाणे** – १. फळझाडांच्या पाडाचा ऋतू टळणे. २. गाय, म्हैस इ. जनावर फळण्याच्या वेळेपलीकडे जाणे; फळण्याचे टळणे.

वि. योग्य; साजेसा; अनुरूप : 'राजा बोले वसिष्ठांसी । रामा पाड हे गुणरासी ।' – वेसीस्व ९.१०९.

**पाडकुला** वि. वयाने प्रौढ असूनही शरीराने नाजूक व पुष्ट असलेला (पुरुष इ.); ताजातवाना. (राजा.)

**पाडकू** न. लहान पाडा, पाडी. (बे.); पाडकॉ (गो.).

**पाडके** वि. न. पोरके : 'पाडकीयां पोरां दुधु घालीन ।' – गोप्रच १४४.

**पाडगण** स्त्री. मोतिया वनस्पती. (बे.)

**पाडगा** पहा : **पाठगा**

**पाडगुण** पु. दुर्गुण; अवगुण. (गो.)

**पाडगे** न. १. पासोडी इ. कांचे एक पट्टे; तागा. २. (बडोदे – मराठवाडा, खालच्या जातीत रूढ) पैठणी; रेशमी साडी. ३. कापडाच्या ताग्याच्या गाठींपैकी प्रत्येक.

**पाडगे** न. गांधर्वविवाह; मोहतूर; पाट. (व.)

**पाडणी** स्त्री. पाडण्याची क्रिया.

**पाडणे** सक्रि. १. खाली येईल, पडेल असे करणे; जमीनदोस्त करणे; तोडून टाकणे (झाड इ.). २. मागे टाकणे : 'वावदळ पाडूनि ठाये । साबळु डाहारला आहे ।' – ज्ञा १७.१४३. ३. (एखादा व्यवहार, धंदा इ.) मोडणे; मोडून टाकणे; दाबून टाकणे; नाहीसा करणे. ४. घालणे; ठेवणे; टाकणे. ५. विभागणे; भाग करणे. ६. कैद करणे. ७. या धातूच्या अर्थाच्या अनेक छटा संभवतात. उदा. पाडून देणे, घेणे – (किंमत इ.) कमी करून देणे. [सं. पत्]

**पाडणे** सक्रि. काढणे; रेखाटणे : 'तुम्हीं चित्र पाडुं जाण' – लीचपू ४४३. [सं. पातय्]

**पाडथर – रा** पहा : **पाटथर**

**पाडथळ – ळी बिघा** पंधरा पांडांचा बिघा.

**पाडपडचे** अक्रि. धुळधाण होणे; ओसाड पडणे. (गो.)

**पाडव** पु. (संगीत) अवरोह. (क्रि. करणे)

**पाडव** पु. चार मेटींमधील दगड; जमीन इ. च्या सीमेची खूण म्हणून चारी बाजूंना चार सखल दगड पुरून त्यामध्ये पुरलेला एक उंच दगड. (बे.) [क. पाड = चौकट]

**पाडवकी** स्त्री. (झाडावरून नारळ इ.) पाडण्याची क्रिया. (क्रि. करणे, पाडणे.) (कु.)

**पाडवा** पु. (क.) पाडण्याची क्रिया. (क्रि. करणे, पाडणे).

**पाड(डि)वा** पु. १. चैत्रादी भारतीय महिन्याचा शुक्ल व कृष्ण पक्षातील पहिला दिवस; प्रतिपदा. २. (गौरवार्थी) वर्षप्रतिपदा. चैत्र शुद्ध अथवा कार्तिक शुद्ध प्रतिपदा : 'लोकां महोत्सवप्रद तोचि सदा त्यासि पाडवा नलगे।' – मोवन ४.३१. [गु. पडवो; हिं. पडिवा; सं. प्रतिपदा]

**पाडव्याचे साल** चैत्रशुद्ध प्रतिपदेपासून सुरू होणारे वर्ष; शालिवाहन शकाचे साल; चैत्री साल. हे साधारणपणे सामान्य व्यवहारातील वर्ष समजले जाते. याहून भिन्न म्हणजे मृगसाल, दिवाळीचे साल.

**पाडशी** स्त्री. वांझोटी गाय.

**पाडस** न. १. हरिणीचे पिल्लू. २. (ल.) (लडिवाळपणाने) लहान मूल. ३. गाईचे वासरू. [दे.]

**पाडस** पु. छपराचे मुख्य आढे. (गो.)

**पाडस – सा** वि. पहा : **पारठा**

**पाडसडणे** अक्रि. पाने पूर्ण गळून जाणे. (को.)

**पाडसडे** न. मुख्य आढ्याच्या दोन्ही बाजूंना असलेल्या छपरांच्या पाख्यांपैकी प्रत्येक.

**पाडसारु** पु. दोरखंड; जाड दोर; चऱ्हाट.

**पाडसावयलो कुंवाळो** १. आढ्यावरील कोहळा. (गो.) २. (ल.) सुरक्षित ठिकाणी असलेला जिन्नस.

**पाडसे** न. पात्र.

**पाडळ – ळी** स्त्री. एक औषधी झाड. वेलपाडळ व वृक्षपाडळ अशा याच्या दोन जाती. लहान मोत्यासारखी दिसणाऱ्या गोड फळांचे घोस येणाऱ्या या झाडांपैकी वेलापाडळीचे मूळ मात्र कडू असते; तर वृक्षपाडळीची पाने बकुळीच्या पानाप्रमाणे असतात : 'योजन सुगंध पाडळ। आळिकुळामंद बकुळ।' – दाव १५६. पहा : **पाटली**

**पाडा** पु. १. गाईच्या वासरातील नर; गोऱ्हा. २. खोंड; पोळ. ३. (बडोदे) रेडा : 'आमच्या सरकारची परवानगी घेतल्याशिवाय पाडे बांधण्यास व शिकारीस परवानगी नाही.' – विक्षिप्त ३.१७४. [गु. पाडो=रेडा] (वा.) ० **पेटविणे** – खोंडाला नांगर ओढायला शिकवणे : 'कीं न पेटवितांचि पाडा।' – सिसं ८.१९१.

**पाडा** पु. दोरखंड : 'पाडेआं तुरु विणिला' – कला १५. [सं. पट]

**पाडा** पु. १. शेतकीच्या कामाच्या सोयीसाठी शेतकऱ्यांनी आपल्या गावापासून किंचित दूर व शेतापासून जवळ बांधलेल्या झोपड्यांची वाडी; (सामा.) लहान खेडे : 'त्याला लागून भोपीवाडी म्हणून लहानसा पाडा आहे.' – बदलापूर ३२. २. शेतकऱ्याची झोपडी; खोपटे. ३. शहरातील पेठ; मोठी गल्ली; मोहल्ला; १० – १२ खोपट्यांची स्वतंत्र वस्ती. [सं. पद्रक – पडुअ – पाडा; गु. पाडो= खेडे]

**पाडा** पु. १.नारळ, सुपारी इ. फळे झाडावरून पाडण्याचा हंगाम, क्रिया : 'जेथें पूर्वी दर पाड्याला वीस – पंचवीस हजार नारळ पडत...' – सह्यापा ९५. २. केळीच्या घडांची कापणी.(अहि.)

**पाडा** पु. रोपटे; लहान रोप.

**पाडा** वि. नि:संतान; निर्वंश. (क्रि. पडणे) (गो.)

**पाडाऊ** वि. पाडाव, काबीज करणारा.

**पाडाचा** वि. पिकून झाडावरून काढण्याच्या स्थितीस आलेला.

**पाडापाड** स्त्री. १. (घर इ.) पाडण्याची सतत चाललेली क्रिया. २. लुटालूट. [पाडणे द्वि.]

**पाडाव** पु. १. पराभव; पराजय; मोड. २. लढाईत पकडलेले लोक, सैदी : 'पाटील अबदुल अली हरामी याची गाठ पडली तर आमचे व यांचे शीर कापून नेतील, त्याहून त्यांजकडे पाडाव सापडले ते उत्तम.' – भाब ६२.

वि. पराजित; पराभूत; लढाईत पकडलेला, कैद केलेला. [सं. पत्]

**पाडाव** पु. मोठी होडी; पडाव. (हेट.)

**पाडाव विकणे** (जिन्नस विकताना) बळजबरीने जास्त किंमत मागणे.

**पाडावा** पु. नारळ,सुपारी इ. झाडावरून पाडण्याचा धंदा करणारा माणूस.

**पाडि** स्त्री. किल्ला : 'म्हणौनि दडवांदडीं। तुं रीगैं कैवल्याची पाडि।' – उगी ५२६.

**पाडिप** न. भूषण; कौतुक; शोभा. पहा : **पडप**

**पाडी–डे, पाडु(डू)क** स्त्री. १. कालवड : 'तें नर असल्यास पाडा व मादी असल्यास पाडी म्हणतात.' – मपु ३.१८७३ पृ. ११३. २. पारडी (म्हशीची). [सं. पड्डिया:]

**पाडी** स्त्री.नदीतील माशाची एक जात.

**पाडी** स्त्री. १. डोंगर; टेकाड. २. डोंगर, कडेकपारे यातून डोली वाहून नेणारे भोई, डोलकर लोकांचा जमाव, समूह.

**पाडी** वि. ओसाड (विहीर). (गो.)

**पाडीव** वि. १. (झाड इ. हालवून) पाडलेले (फळ इ.). २. केलेला, बनविलेला, तयार केलेला (रस्ता, पूल, शेत इ.). ३. शत्रूस लढाईत जिंकून, पाडून मिळविलेला, हस्तगत केलेला माल.

**पाडूक** स्त्री. चोरी. (गो.)

**पाडे** १. प्रमाणे; सारखे; मानाने : 'परमाणुचेनि पाडें। रोमें लपाली ब्रह्मांडें।' – ऋ ४३. २. प्रकारे : 'देॐ सकुळ सुरशरण्यु। मी हीनु बहुतें पाडें।' – ऋ ४६. ३. पेक्षा; सरस : 'ते पाडें हिकडेच काय... गावाद ते बरेंसें गमों लागले.' – मसाप २.४.३६९.

**पाडेकरी, पाडेली** पु. झाडावरून फळे वगैरे पाडून वेचणारा, त्यात कुशल असणारा किंवा तो धंदा असणारा मनुष्य.

**पाडेखोत** पु. ठाकुरवाडीचा कारभारी : 'गांवकरी, पाटील, पाडेखोत वगैरे मंडळीस यजमान बोलावतो.' – बदलापूर १४८.

**पाडेजणे** क्रि. विस्तारणे. – शर.

**पाडेली** पहा : **पाडेकरी**

**पा(पां)डेवार** पु. १. गावकामदारी करणारा वतनदार महार : 'मिराबाईसाठीं घेतो विषप्याला। दामाजीचा जाला पाडेवार।' – तुगा ३६९१. (व.) २. सेवक; दास : 'मी कृष्णजीघरचा पाडेवार' – ज्ञागा १०५२. [सं. प्रतिहार]

**पाडेसार** वि. हीणकस; ओंगळ.

**पाडोशी** पु. शेजारी. (गु.) पहा : **पडोशी**

**पाडोसे** पु. शेजार. (व.)
**पाडॉ** वि. १. द्वाड; दुष्ट स्वभावाचा (माणूस). २. ओसाड; पडीत (प्रदेश). (गो.)
**पाढउ** पु. संग्रह.
**पाढव** पु. पढीक; विद्वान : 'चित्तज्ञ पाढव चातुर्यखाणी ।' – नव १३.८८.
**पाढा** पु. १. धडा. २. उजळणीतील दशक. ३. लांबलचक, पाल्हाळाची हकिगत. [सं. पाठ]
**पाढाऊ** पु. मार्गदर्शक; वाटाड्या; पढविणारा; बोधक : 'जी गीतारत्न – प्रासादाचा कळसु । अर्थ चिंतामणीचा । सर्व गीता दर्शनाचा । पाढाऊ जो ।' – ज्ञा १८.३०. [सं. पथ]
**पाढाळे** न. पालख्या वाहून नेण्यासाठी लागणारा भोयांचा समूह, जथ्था.
**पाणआघाडा** आघाड्याची एक जात. हा सूज, कफ, खोकला, वायू, शोष यांचा नाशक आहे.
**पाणउतार** पु. १. नदीतून चालून जाता येण्याजोगा, कमी पाणी असलेला मार्ग, २. (नदी इ.) ओसरणे, कमी होणे : 'गंगेसि भंग बहु पाण उतार होतो ।' – र २.
**पाणउतारा** पु. १. मानखंडना; तेजोभंग; अपमान; क्षुद्रपणाने लेखून (एखाद्याची) केलेली विडंबना; अवहेलना. २. (क.) पहा : **पाणउतार**
**पाणकणीस** न. गवतासारखी दिसणारी, एकदलिकित फुलझाडांपैकी, 'टायफेसी' कुलातील, दीड ते तीन मीटर उंच, बहुवर्षायू, भारतात सर्वत्र दलदलीच्या जागी वाढणारी औषधी वनस्पती.
**पाणकसर** स्त्री. पाटस्थळाच्या पाण्यावरील कर; पट्टी : 'गावची पाणकसर गेल्या वर्षापासून दीडपट वाढविण्यात आली.' – के १९.७.३०.
**पाणकळा** पु. पावसाळा.
**पाणकाठी** स्त्री. १. विहिरीतून पाणी बाहेर काढण्यासाठीचे एक साधन. (गो.) पहा : **ओकती**. २. (ल.) उठाबशी..(गो.)
**पाणकाडो–ढा** पु. शेतास पाणी काढून पैरीप्रमाणे आळीपाळीने वाटून देणारा.(कु.)
**पाणकापड** न. जखमेवर, शरीराच्या कापलेल्या भागावर बांधतात ती ओल्या वस्त्राची चिंधी.
**पाणकारनीस** पहा : **पाणझुकाव**
**पाणकावळे** न. (विशेषत: गुरांची) गर्भोदकाची पिशवी.
**पाणकांदा – कंद** पु. नदीत होणारा एक विशिष्ट कंद. यास नागदवणीच्या फुलासारखी फुले येतात.
**पाणकुकडे – कोंबडे** न. घशात किंवा जिभेच्या खालच्या बाजूस होणारा एक विकार.
**पाणकुदळ** स्त्री. एक टोक रुंद असलेली कुदळ. (बे.)
**पाणकेश** पु. अव. शेवाळ.
**पाणकोळी** पु. मासे खाणारा एक पक्षी. – प्राणिमो ५७.
**पाणकोंबडा – डी – डे** पु. स्त्री. न. १. कोंबड्यासारखा एक जलचर पक्षी. २. चंद्राभोवती पडणारे खळे.
**पाणक्या** पु. १. लोकांच्या घरी पाणी भरून त्यावर उपजीविका करणारा मनुष्य. २. (ल.) निरक्षर व धटिंगण मनुष्य. [सं. पानीयक]
**पाणखार** पु. उकडांबे इ. खारविण्यासाठी पाण्यात मीठ घालून केलेला खार.
**पाणघर** न. १. पाणी तापवून स्नान करण्यासाठी असलेली खोली. २. विहीर इ. खणताना जेथे पाणी लागते तो जमिनीतील खोल थर.
**पाणघोडा** पु. आफ्रिका खंडात मोठ्या नद्यांमध्ये, सरोवरांत आढळणारा एक अजस्र पण निरुपद्रवी प्राणी. याच्या कातड्याच्या ढाली करतात. (इं.) हिपॉपोटेमस.
**पाणघोणस** पु. पाण्यात असणारी सापाची एक बिनविषारी जात.
**पाणचक्की** स्त्री. पाण्याच्या जोराने, साहाय्याने चालणारी चक्की.
**पाणचट** वि. १. गोडवा कमी असलेला (द्रवपदार्थ); नि:सत्त्व; बेचव. २. (ल.) शुष्क; बाष्कळ; नीरस; अर्थशून्य (बोलणे, लेखन, गाणे, बोलणारा, गाणारा इ.). [सं. पानीयम् + चट]
**पाणचूल** स्त्री. न्हाणीघरातील स्नानाचे पाणी तापविण्याची चूल.
**पाणचोर – रा** पु. गारुड्याजवळील पाणी भरण्याचे सच्छिद्र पात्र : 'पाणचोऱ्याचें दार । वरिल दाटलें तें थोर ।' – तुगा २५८३.
**पाणजंजाळ** न. पाऊस, पूर वगैरेमुळे जिकडे तिकडे होणारी जलमय स्थिती : 'बहू पाणजंजाळ देखोनि डोळां ।' – राक १.३२.
**पाणजावई** पु. (थट्टेने) जावयाचा भाऊ; पडजावई.
**पाणझुकाव** पु. पाणी बाजूने टिपकवून लावण्यासाठी दरवाज्यावर केलेले झुकाऊ कारनिस, गलथा; पाणकारनिस. – राको ५९२.
**पाणझेली** स्त्री. (चेंडू, विटीदांडू इ. खेळांत) झाडावरून खाली पडताना किंवा पाण्यातून चेंडू, कोललेली विटी इ. जमिनीवर पडण्यापूर्वी झेलणे.
**पाणटका – क्का** पु. पाटस्थळ; जमिनीवरील एक लहानसा कर.
**पाणटिटवी** स्त्री. तांबडे कल्ले असलेली टिटवीची एक जात.
**पाण(णा)डी – ड्या** वि. जमिनीत कुठे व किती खोल खणले असता पाणी लागेल हे (काही आडाख्यांनी) जाणणारा.
**पाणढाळ** पु. पाणी वाहून जाण्याजोगी जमीन; छपराचे पागे वगैरेंना दिलेला, असलेला उतार; सखलपणा.
वि. असा उतार केलेली (जमीन इ.).
**पाणताव** पु. सोने, चांदी इ. तापवून पाण्यात बुडवून त्याचा कस पाहण्याची पद्धत.
**पाणतीर** पु. (युद्धशास्त्र) स्फोटक व ज्वालाग्राही पदार्थांनी भरलेले चिरुटासारखे निमुळत्या आकाराचे, स्वयंचलित, आपटल्यावर स्फोट होणारे अस्त्र. याचा व्यास दीड ते दोन फूट व लांबी सहा यार्ड असते.
**पाणतुटी** वि. जिच्यातील रसांश, द्रवांश कमी झाला आहे अशी, काहीशी पिकलेली (पालेभाजी इ.).
**पाणथरा** पहा : **पाटथर**
**पाणथरी** स्त्री. १. आंत्रपेशी; प्लीहा. २. प्लीहेचा एक विकार; पोटातील चीप; प्लीहा वाढणे.
**पाणथ(द)ळ** स्त्री. न. १. पाऊस गेल्यानंतरही जेथील ओल जात नाही व उन्हाळ्यातही खणले असता पाणी लागते अशी जमीन. २. पाटाच्या पाण्याने भिजणारी जमीन.
**पाणथा** पहा : **पाणवठा**

**पाणदिवडी** स्त्री. न. पाण्यातील सापाची निर्विष जात. (को.)

**पाणदोरी** स्त्री. विहिरीतून पाणी काढण्याची दोरी; बारीक दोर.

**पाणनेचा** पु. पाण्यात, दलदलीत उगवणारी एक वनस्पती. (इं.) हायड्रोटेरीडी.

**पाणपट – त** पहा : **पानपत**

**पाणपट्टी** स्त्री. पहा : **पाणकापड**

**पाणपिकले, पाणपीक** न. ज्या पिकाला सबंध पावसाळ्यातील पावसाची जरुरी असते असे पीक; पहिले पीक; खरीप. (को.)

**पाणपिता** वि. १. फार पाणी खाल्लेले, अतिपावसाने नासलेले (पीक, कणीस इ.). २. (ल.) पाणचट. ३. (झटकन पाणी पिण्यासारखे) तलख; चलाखीचे; तडफेचे (कृत्य, कृती इ.). ४. रोखठोक; चोख; स्पष्ट (जबाब, उत्तर).

**पाणपिशी, पाणपिसा** वि. १. अतिपावसामुळे न भरलेले, पोचट राहिलेले धान्याचे कणीस. २. सतत पाण्यात बसणारा.

**पाणपिसे** न. वेड; वेडगळपणा; भ्रमिष्टपणा.
वि. वेडगळ; खुळचट.

**पाणपेटी** स्त्री. (स्थापत्य.) पाण्यात काम करतेवेळी पाणी आत येऊ नये म्हणून कामाभोवती बसवलेली उभ्या फळ्यांची मुंढे मारून केलेली पेटी. (इं.) कॉफरडॅम.

**पाणपोई** स्त्री. १. वाटसरूंना, आल्यागेल्यांना पाणी पाजण्यासाठी केलेली सोय; पन्हेरी. २. अशा ठिकाणी आल्यागेल्यास पाणी देण्याची क्रिया.

**पाणफोल** न. १. भाताच्या फुलांवर अतिशय पाऊस पडल्यामुळे त्यामध्ये होणारा फोल, पोचटपणा. २. न भरलेले, पोचट कणीस. (राजा.)

**पाणबंद** वि. पाणी आत शिरणार नाही असा बंदोबस्त केलेली (बाटली इ.).

**पाणबुड** पु. पाणकोंबड्यासारखा एक पक्षी. (को.)

**पाणबुडा–ड्या, पाणिबुड्या–ड्यी** पु. १. मासे धरणारा कोळी : 'तरी माशालागीं भुलला । ब्राह्मण पाणबुडां रिघाला ।' – ज्ञा १६.४५१. २. पाण्याच्या तळाशी असलेल्या वस्तू वर काढण्यासाठी पाण्यात बुडी मारून बराच वेळ पाण्यात राहण्याचा सराव असणारा. ३. समुद्रात बुडी मारून मोत्ये वर काढणारा : 'ते वाक्समुद्रिचे पाणिबुडे । कीं सारासारसीमेचे गुंडे ।' – ऋ २४. ४. एक प्रकारचा पक्षी.

**पाणबुडी** स्त्री. १. पाण्यात मारलेली बुडी; सुरकांडी. (क्रि. मारणे). २.पाण्याच्या पृष्ठभागाखालून संचार करणारी युद्धोपयोगी नौका.

**पाणबुडीत** वि. पुराने, पावसाने जलमय झालेली (जमीन, शेते, इ.).

**पाणबोदाड** वि. पाणथळ; दलदलीची (जमीन, पीक). (ना.)

**पाणभर, पाणभरजमीन** स्त्री. १. नवीन खोदलेल्या विहिरीच्या पाण्याने, ओढ्याच्या, पाटाच्या पाण्याने भिजणारी शेतजमीन. २. पुराच्या पाण्याने भिजणारी जमीन. ३. असल्या जमिनीवरील सरकारी सारा.

**पाणभरणीचा – भरीत – भरिताचा** वि. १. पाटाचे पाणी मिळणारे (शेत, मळा इ.). २. पाटाच्या, विहिरीच्या पाण्याने तयार झालेले, (पीक इ.).

**पाणभऱ्या – भर्या** पु. पाणक्या.

**पाणभाकरी** स्त्री. नदीच्या, तलावाच्या पाण्याच्या पृष्ठभागावर खापऱ्या फेकण्याचा मुलांचा खेळ; भाकरीचा खेळ : 'तें गलबत वाऱ्याच्या सोसाट्यांत सांपडून मुलांच्या पाणभाकरीच्या खेळांतल्या खापरीप्रमाणें भलतीकडे गेलें.' – कोरकि ७७.

**पाणभिंत** स्त्री. काही नद्यांच्या मुखाजवळ निर्माण होणारी भरतीची उंच लाट; वान; घोडा.

**पाणमांजर** न. मांजरासारखा दिसणारा एक जलचर प्राणी.

**पाणमोट, पाणमोटली – की, पाणमोटाळी, पाण्याचा मोट** स्त्री. प्रसूतीच्या वेळी गर्भ बाहेर पडण्यापूर्वी गर्भाशयातून बाहेर पडणारी गर्भोदकाची पिशवी. (क्रि. येणे; पडणे; निघणे; फुटणे.)

**पाणरस** पहा : **पाटरस**

**पाणरहाट** पु. पाण्याच्या साहाय्याने चालणारा रहाट; पाणचक्की.

**पाणरेषा** स्त्री. हुतुतूच्या मैदानाच्या मधोमध मारलेली रेषा.

**पाणरॉ** पु. पाणसाप. (गो.)

**पाणलव्हा–लाव** पु. पक्षिविशेष; यास निबुड असेही म्हणतात. (को.).

**पाणलोट** पु. १. पाणढाळ. २.टेकडीची, डोंगराची उतरती बाजू; उतरण. ३. पाण्याचा जोराचा प्रवाह; लोंढा; झोत; धोत. ४. डोंगरमाथा; जेथे पाणी पडले असता तेथे न थांबता दोहो बाजूंस वाहून जाते अशी डोंगरमाथ्याची धार. उदा. सह्याद्रीचा पाणलोट.

**पाणवटा–ठा–डा–थ–था** पु. गावच्या लोकांचे पाणी भरणे, वस्त्रे धुणे इ.कामे करण्याचे ठिकाण.

**पाणवसा** पु. गुरांसाठी राखलेली (गावचे) पाणी, गवत इ. समुच्चयाने; पाणसा. (को.)

**पाणवळ** न. पहा : **पाणथळ १**
वि. बेचव. पहा : **पाणचट १**

**पाणवाट** स्त्री. १. सखल पृष्ठभाग; ओहोळ; पाणलोट : 'पाणी पाणवाटें जैसें । आपणचि धांवे ।' – दास ७.९.११. २. पाण्याची वाट.

**पाणवाडा** पु. पाणवठा; तलाव : 'भवपुरिचां पानवाडां' – ज्ञा १६.४०५. [सं. पण्य–वट]

**पाणवारू** पु. (प्राचीन पौराणिक कथांत रूढ) होड; नाव.

**पाणवै** स्त्री. सांडपाण्याची जागा : 'नव्हा रांजणांची पाणवै यकीचि' – गोप्रच २७९. [सं. पाक्षीय+वृत्ति]

**पाणवोळ** स्त्री. लष्करी लोकांचा, शिपायांचा समुदाय. (गो.)

**पाणशाई** स्त्री. तार स्वर काढण्यासाठी मृदंग वगैरेला लोहकीटाच्या लुकणाचा, शाईचा दिला जाणारा पातळ थर.

**पाणशेंग** स्त्री. (ल.) मासळी.

**पाणशोष** पु. पहा : **पाणसोस**

**पाणसरडे** न. पाण्यात असणारी एक निर्विष सापाची जात.

**पाणसरडे** न. रहाटाची माळ सरू नये म्हणून बसवले जाणारे प्रतिबंधक लाकूड.

**पाणसरा, पाणसरकी** पु. स्त्री. डोंगराच्या घाटातील वंशपरंपरागत जकातदार; याच्याकडे घाटदुरुस्तीचे काम असते.

**पाणस(सा)ळ** स्त्री. १. (गवंडीकाम) बांधकाम इ. समपातळीत आहे की नाही हे पाहण्याचे गवंड्याचे साधन; साधणी. २. समपातळी :

'भिंतीचे बांधकाम थराचें असेल तर भिंतीच्या प्रत्येक १८ इंच उंचीस माथा पाणसळींत आणावा व त्यावर पातळ चुन्याचा रद्दा करून घालावा.' – मॅरट १४. ३. पाणी वाहून जाईल असा उतार.

**पाणसा** पहा : **पाणवसा**

**पाणसाप** पु. गोड्या पाण्यात असणारी सर्पाची बिनविषारी जात.

**पाणसापूड** स्त्री. घर इत्यादिकांच्या छपराच्या खालच्या बाजूस वाशांच्या टोकांजवळ कामट्यांच्या, रिफांच्या, ओंबणाच्या शेवटी बांधली जाणारी जाड कामटी; सापूड.

**पाणसाबर** स्त्री. फड्या निवडुंग (मालेगाव); (प्र.) पानसाबर.

**पाणसासरा** पु. (विनोदाने) भावाचा सासरा.

**पाणसाळ** स्त्री. पाणपोई.

**पाणसाळ, पाणसाळी भात** स्त्री. न. पाटाच्या, विहिरीच्या पाण्यावर केलेले (मळा इ. तील) भाताचे पीक.

**पाणसुणी** पु. कुत्र्याच्या जातीचा एक प्राणी.

**पाणसुरुंग** पु. समुद्रातील आगबोटी इत्यादिकांचा नाश करण्यासाठी समुद्राच्या पृष्ठभागाखाली योजून ठेवण्याचे सुरुंगासारखे आधुनिक युद्धोपयोगी साधन.

**पाणसोस–शोष–सोक** पु. १. पुन्हा पुन्हा लागणारी तहान; घशाला पडणारी कोरड. २. एक विकार.

**पाणसोळा** पु. दिवडाच्या जातीचा, बांड्या रंगाचा, पाण्यात राहणारा एक निर्विष साप.

**पाणं(ण)द, पाणंध – धी** स्त्री. गावातून, शेतातून, दोन कुंपणातून जाणारी अरुंद वाट : 'धांवों आवडे पाणधीं। शून्याचिये।' – ज्ञा १६.१८८. [सं. परिपन्थिन]

**पाणारणे** अक्रि. फणस, आंबा, ऊस इ. कांचे फळ पावसाळ्याच्या पाण्याने स्वाद बिघडण्याइतके पाणचट बनणे.

**पाणि–णी** पु. हात; हस्त. (समासात उत्तरपदी विशेष उपयोग. उदा. वज्रपाणी, चक्रपाणी.) : 'सेवूनि जोडिलें कुरुकुळतिलकें परमहर्षितें पाणी।' – मोसभा १.१३. [सं. पाणि] (वा.) **पाणिप्रवाह मुखावरी करणे** – थोबाडीत मारणे.

**पाणिअे(य–ये)डा** पु. पाणवठा : 'जमुनेचा पाणिअेडा। एनें थोरु केला पवाडा।' – शिव ८६७. [सं.पानीयवंठ]

**पाणिक** पु. न. साप. [सं.पन्नग]

**पाणिग्रह, पाणिग्रहण** पु. न. विवाहविधीने स्त्रीचा स्वीकार करणे; लग्न, विवाह करणे.

**पाणिचोरा–रे** पु. न. जलतस्करिणी यंत्र. अनेक छिद्रे असलेले पाण्याचे नळकांडे : 'पाणिचोरेयाचें दार धरीत खेवो येरें दारें वाहों राहाती' – विद् ९. [सं.पानीय+घोर]

**पाणिढाळ** पु. १. ओहोटी : 'अनुरागाचा निरु ताउनी। पाणिढाळु।' – ज्ञा ७.९९. २. पाण्याचा ओघ खाली सोडून देणे : 'पाणिढाळु गिरीशें। गंगेचा केला।' – ज्ञा १८.१६८८.

**पाणितुळी–गादी** स्त्री. आत पाणी भरलेली खोळ : 'वरि मकरंदाची पाणितुळी' – रुस्व ७६१. [सं.पानीय+तुलिका]

**पाणिपद** न. तेजाचे स्थान; गांभीर्य; ढाळ : 'परि जाणतां उपहासावें। बोलांचें पाणिपद निहाळावें।' – शिव ३६५.

**पाणिपात्र** न. १. दोन्ही हात जुळवून केलेली भांड्यासारखी रचना; ओंजळ : 'भिक्षेलागी पाणिपात्र । सांठवण उदरमात्र।' –एभा ८.१११. २. पाणी प्यावयाचे भांडे.

**पाणिबारा–रे** पु. न. पाणी वाहून जाण्यासाठी काढलेला पाट : 'पाणिबारेनि बीजें केले' – स्थापो २५.

**पाणिबा(वा)ळा** न. पु. एक कर्णभूषण; पानबाळी : ' मग पद्मिनीचा पाणिबाळां । वीजितीं हळ हळ ।'– शिव ७८८. [सं.कर्ण + वलयम्]

**पाणिभात** पु. १. शिजवून मडक्यातील पाण्यात ठेवलेला भात : 'पहीलें पाणिभाताचा तुपभातु करीति' – लीचपू५८१. २. मिळमिळीत पदार्थ : 'तेयांचीं पाणिभाताचीं अंगें'– लीचपू ३२५. [सं.पानीय+भक्त]

**पाणियाड–डा–डे–ढे** पु.न. १. पाण्याचा साठा; तळे : 'सतरावियेचेनि पाणियेडें । बळियाविलें।'– ज्ञा ९.२१३. २. जलपात्र.

**पाणिलग** वि.पाण्याच्या सान्निध्याने राहणारा : ' पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें ।'– ज्ञा ६.१७७.

**पाणिवळे** न. पाण्यावरील वनस्पतीची वाढ : 'विक्षेपाचीं पाणिवळें झाडिर्ली।' – ज्ञा ६.४६९. [सं.पानीयवल्ली]

**पाणिवैद्य** पु. विषार इ. उपद्रवावर पाणी अभिमंत्रून देणारा वैद्य. (को.)

**पाणिसंबळा** वि. पु. पाण्याची मोट : 'पाणिसंबळा होय म्हणे' – गोप्रच २४८. [सं.पानीय+शंबल]

**पाणी** न. १. पारदर्शक, रंग, वास,चवरहित असा सजीवसृष्टीला अत्यावश्यक असणारा नैसर्गिक द्रवपदार्थ; उत्तम विद्राव्य. हे हायड्रोजनचे दोन अणू व ऑक्सिजनचा एक अणू यांपासून बनते. २. पंचमहाभूतांपैकी एक. ३. पाऊस. ४. अश्रू. पाणी याचे समासात पूर्वपदी 'पाण' असे रूप होऊन अनेक सामासिक शब्द होतात. उदा. पाणकोंबडा, पाणघोडा, पाणलोट इ. [सं.पानीय] (वा.) **(अंगाचे, रक्ताचे) ०करणे** – अतिशय खपणे; कष्ट करणे; फार मेहनतीने (एखादे काम, कर्तव्य इ.) करणे. **० घालणे** – १.नाश करणे; खराबी करणे; गमावून बसणे. २. (एखाद्या गोष्टीच्या) अभिवृद्धीसाठी, जोपासनेसाठी उपाय, प्रयत्न करणे. ३. (एखाद्या वस्तूचा) त्याग करणे. ४. सर्पाचे विष उतरविण्यासाठी सर्प चावलेल्या मनुष्यास मंत्रित पाणी पिण्यास देणे व अंगावर घालणे. **० जाळणे** – करडा अंमल चालविणे; क्रूरपणाची कृत्ये करणे. **० तावणे** – (एखाद्याच्या नावाने, नावावर, नावाविषयी इ. शब्दांसह प्रयोग असल्यास – एखाद्याचे) मरण, अनिष्ट इच्छिणे. **०देणे** – तर्पण करणे; तिलांजली देणे. **०पडणे** – फुकट जाणे; निरुपयोगी, खराब होणे; दर्जा, गुण, महत्त्व, उपयुक्तता इ. बाबतीत मागे पडणे. **०पाजणे** – १. (एखाद्यास) मरे मरेतो खूप मारणे; बडविणे. २.पराजित करणे; जिंकणे; चीत करणे. **०पाणी करणे** – १. (एखाद्या जनावराला किंवा माणसाला) राबवून बेदम करणे. २. (अन्न, वस्त्र, पदार्थ इ. कांची) पूर्णपणे नासाडी करणे. **०फिरणे** – व्यर्थ, फुकट जाणे. (बडोदे). (एखाद्याच्या घरी लक्ष्मी, सरस्वती, विशिष्ट व्यक्ती इ.कांनी) **०भरणे, वाहणे, घालणे** – (विशिष्ट व्यक्ती

किंवा विशिष्ट घरातील लोक) प्रचंड श्रीमंत किंवा विद्वान असणे; एखादी व्यक्ती एखाद्याला अत्यंत अनुकूल असणे. **०मागू न देणे** – एकदम, तडाक्यासरशी ठार करणे. ० **मुरणे** – (एखाद्याच्या भाषणात, वर्तनात काहीतरी संशयास्पद असा) कमीपणा, वैगुण्य, दोष, मर्मस्थान असणे.**(आत)** ० **शिरणे** – (धंदा, रोजगार, काम इ.ला) अवदशा, उतरती कळा येणे; नासाडी होणे; फसगत होणे; आतबट्ट्यात येणे. ० **सोडणे** – १. (ब्राह्मणाला दिलेल्या दानावर पाणी सोडले म्हणजे दानाची सांगता होऊन, त्यावरील आपले स्वामित्व नाहीसे होऊन, ते दान ब्राह्मणाकडे जाते या धार्मिक कल्पनेवरून पुढील अर्थ) (एखादी वस्तू) स्वेच्छेने कायमची देऊन टाकणे; (एखाद्या वस्तूचा) त्याग करणे. २. (एखाद्या वस्तूची) आशा सोडणे; ती गेली असे समजून स्वस्थ बसणे. **०होणे** – १. खराबी, नाश होणे; नाहीसे होणे. २. अत्यंत काळजीने फार भीती वाटणे. **पाण्याआधीं वळण बांधणे** – (नदी वगैरेला पूर येण्यापूर्वीच पुराच्या पाण्याचा निकाल लावण्याची व्यवस्था करणे यावरून) भावी संकटाची उपाययोजना आधीच करून ठेवणे. **पाण्यात घाम येणे** – (एखाद्याने) अतोनात संतापणे; रागाने अंगाचा भडका होणे. **पाण्यात जाणे, घालणे** – व्यर्थ होणे; फुकट जाणे. **पाण्यात पाहणे** – (एखाद्याचा) अतिशय द्वेष करणे. **पाण्याने वाती पाजळणे** – अशक्य गोष्ट शक्य करू पाहणे.**पाण्यापेक्षा, पाण्याहून पातळ करणे** – पाणउतारा करणे; फार लाजविणे. **पाण्यावर लोणी काढणे** – अतिशय कंजूषपणा करणे. (कर.) **खोल पाण्यात शिरणे** – १. आपल्या आवाक्याबाहेरचे काम अंगावर घेणे. २. (एखाद्या गोष्टीची) अनावश्यक, अति चिकित्सा करणे. ३. एखादे गूढ, गुपित उकलण्याचा प्रयत्न करणे. **गळ्याशी पाणी लागणे** – पराकाष्ठा होणे. **दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिणे** – दुसरा सांगेल तसे मुकाट्याने वागणे. **उन्हापाण्याने घर जळणे, जाळणे** – खोट्या आरोपाने, निंदेने रसातळास जाणे, नेणे; (एखाद्याचा) नाश करणे, करू पाहणे, होणे. (अकारण रूपात योजतात व हे घडणे अशक्य असे दर्शवितात.)

**पाणी** न.१. हत्यारे भट्टीत तापवून नंतर ती पाण्यात बुडवून त्यांच्या अंगी आणलेली दृढता. (क्रि. देणे, चढविणे, उतरणे.) २. (ल.) (एखाद्याच्या अंगातील) धमक; अवसान; वीर्य; शक्ती; तेज. (क्रि. चढणे, जोखणे, ताडणे इ.) ३. (मोती, रत्न, हिरा इ.चे) तेज; कांती; झळाळी. ४. चेहऱ्यावरील टवटवी; तजेला. ५. धातूचे भांडे इ.ना सोने, चांदी इ.कांचा दिला जाणारा मुलामा; झिलई. ६. शस्त्र घासून त्यांच्या धारेला आणलेली तीक्ष्णता; धार; कडकपणा (क्रि. देणे, पाजणे.) ७. अब्रू, लौकिक; कीर्ती. (क्रि. जाणे, उतरणे, चढणे.) ८. (राग, गाणे इ.कांची) नीरसता; रुक्षपणा; रसहीनता. ९. (डोळ्यांतील) चमक; तेज. [सं.पू] **०मरणे** – १. (एखाद्याचे) धैर्य गळणे; गर्भगळित होणे. २. (एखादी गोष्ट, हिशेब किंवा भाषण इ. कांत) खोटेपणा, पोकळपणा, लबाडी इ. असणे. ० **लागणे** – एखाद्याच्या संगतीने किंवा सहवासाने त्या व्यक्तीच्या ठिकाणचे गुणदोष, ढंग अंगी जडणे. [सं.पू]

**पाणीकांजी–शेणी** न. (व्यापक) पाणी काढणे, भरणे इ. घरातील कामे.

**पाणीटाळ** पु. ओहोटी. पहा : **पाणिढाळ १**

**पाणीतावणे** न.आंघोळीचे पाणी तापविण्याचे भांडे किंवा जागा. (ना.)

**पाणीदार** वि. १. अंगात पाणी, धमक, तेज असणारा (मनुष्य). २. पैलूदार, तेजस्वी (रत्न, मोती इ.) ३. तीक्ष्ण, चांगल्या धारेचे (शस्त्र).

**पाणीपट्टी** स्त्री. महानगरपालिका इ. स्थानिक संस्था नागरिकांकडून घेतात तो पाणीपुरवठ्याबद्दलचा कर.

**पाणीपण** न. पाण्याचा भाव, स्वरूप : 'कां गंगायमुनाउदक । वोघबळें वेगळिक । दावी होऊनि एक । पाणीपणें ।' – ज्ञा १८.५२.

**पाणीपिसा** वि. स्नान करणे, वस्त्रे धुणे इ. पाण्यातील कामाचे ज्याला वेड आहे असा : 'एक राखे एक शंखे । एक ते अत्यंत बोलके । पाणीपिशीं झाली उदकें । कुशमृत्तिकें विगुंतलीं ।' – एभा १४.२०९.

**पाणीवणे** अक्रि. पळणे.

**पाणीवळ** पु. पाण्यातील मळ : 'तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपांचीं पाणिवळें झाडिलीं ।' – ज्ञा ६.४७१.

**पाणे** न. पाणी पिण्याचे भांडे : 'कापुरें सहीतु घेतला वीडा । मुषी फोडी हातीं पाणे ।' – उषा २१.१५. [सं. पानीयम्]

**पाणेरा – रे** पु.न. पाणी भरलेली भांडी ठेवण्यासाठी केलेली चिरेबंदी ओटली, वरवंडी.

**पाणोटा–ठा–था** पु. १. पहा : **पाणवठा** २. २. नदीचा उतार. (बे.)

**पाणोवाणी** क्रिवि. पाठोपाठ : 'कोण जाय संगीं । पाणोपाणी तयाच्या' – तुगा ३८३२.

**पाण्यत्** न. १. पैसा; द्रव्य २. खंडणी : 'याचा त्याचा पाण्यत् वरूनि तंटा झाला ।' – ऐपो २५२. [सं. पण्य= पैसा, किंमत]

**पाण्यातील पावप्यादे** जलाचरात प्रवीण, आरमारांतील प्रबळ लोक : 'इंग्रज लोक पाण्यांतील पावप्यादे.' – इतिहास संग्रह, ऐतिहासिक चरित्र ११५.

**पाण्यापाण्याने** क्रिवि. नदीच्या काठाकाठाने.

**पाण्यावरचा बुडबुडा, पाण्याखालची रेघ** (ल.) क्षणभंगुर; अशाश्वत वस्तू : 'चिताडसी कां ? चित्र जिवाचें पाण्यावरच्या रेघांनीं ।' – वाग्वैजयंती गोविंदाग्रज.

**पाण्यास–ला आश्रय, आसरा, आधार** अतिशय तहानेल्याला उपाशीपोटी केवळ पाणी देण्याऐवजी, प्रथम दिला जाणारा अन्नाचा घास.

**पाण्हावनी** न. पाझरणारे पाणी : 'चांदिणेयाचां पाण्हावनीं : चंद्रकांत दुभती अदुभणी' – रुस्व ५६९. [सं.प्र+स्नु+पानीय]

**पात** स्त्री. न. १. पान; पाला. २. केवडा. [सं.पत्र]

**पात** न. तासणी, वाकस, कुऱ्हाड इ. चे दांडा घालण्याचे भोक, नडे.

**पात** पु.१. पतन; पडणे; खाली येणे; नि:पात. २. (ल.) नाश. ३. (ज्यो.) सतरावा योग; व्यतिपात. ३. चंद्रसूर्याचे क्रांतिसाम्य; क्षेपपात; ग्रहांच्या परिभ्रमणकक्षा पृथ्वीच्या क्रांतिवृत्ताला ज्या बिंदूत छेदतात ते बिंदू. ४. उड्डाण; उडण्याचा प्रकार : 'एका पातांतचि या हंसाला हा स्वबंधु हारवितो ।' – मोकर्ण २८.३८. ५. प्रहार. [सं.पत्=पडणे]

**पात** स्त्री. बैलाची दावण.

**पात** स्त्री. जोड जुवाची खालची बाजू; शिवाळ्याची खालची दांडी. (व. घाटी) [सं. पंक्ति]

**पात** स्त्री. १. (नाविक) परभाणाचा वरचा भाग. हा भाग पेटीच्यावर निमुळता असतो. २. वल्ह्याला पुढच्या टोकाला बांधलेली फळी; वल्ह्याचे पान, चपटा भाग. (को.) [सं. पत्र]

**पा(पां)त** स्त्री. ओळ; रांग; भाताची रोपे शेतात ज्या रांगेने लावतात किंवा कापतात ती रांग; कापणी किंवा बेणणीच्या वेळी एका माणसाने धरलेली ओळ; घर शाकारण्याचे वेळची लावावयाची कौलांची इ. रांग; धान्य मळण्यासाठी खळ्यात जुंपलेली तिवडा नावाच्या खांबाभोवती फिरणारी बैलांची रांग.(क्रि. धरणे, लागणे.)[सं. पंक्ति]

**पात, पातकाँबा** पु. कलहंस हा पक्षी. (गो.)

**पातक** न. अधर्म; पाप; दोष; अपराध; दुष्कृत्य; गुन्हा. [सं.]

**पातकारी** पु. कुळवाडी लोकांमध्ये पूर्वजांच्या नावे जेवण – वाढण्यासाठी बोलावलेला पाहुणा. (कु.)

**पातकिरला** वि. (बायकी) बारीक; पातळ; रोड; कृश; सडपातळ.

**पातकी** वि. पापी; पापचरण करणारा; दुराचारी; अपराधी.

**पात खाणे** पापाबद्दल पश्चात्ताप होणे.

**पातड–डी–डे** पु. स्त्री. न. पंचांग; भविष्य वर्तविण्यासंबंधी लिखाणाची चोपडी : 'पातड वाचे वेदमाळी' – दावि ४९०.[सं. पत्र](वा.) **पातडे वाचणे** – १. रडकथा, रडगाणे गाणे. २. धंद्याची, उद्योगाची साधनसामग्री पसरणे, उघडणे, मांडणे, बांधणे, झाकणे, असणे. ३. पुस्तकांची पोतडी.

**पातणी** स्त्री. डोळ्याची पापणी; पाते. (व.)

**पातणे** अक्रि. विश्वास टाकणे; भरवसा ठेवणे. [सं. प्रत्यय]

**पातणे** अक्रि. १. येऊन पोचणे; येणे; दाखल होणे; पावणे. २. प्राप्त होणे: 'तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडतें बरवेंपण पातलें ।'– ज्ञा १.४५. ३. घडणे; घडून येणे. [सं. प्र+आप्]

**पातन** न. एक रासायनिक क्रिया; पदार्थाची उष्णतेच्या साहाय्याने वाफ करून त्या वाफेस द्रवरूप देणे. [सं.]

**पातन(तारा)** पु. (नृत्य.) डोळ्यांची बुबुळे (तारा) खालच्या बाजूस नेणे. हा अभिनय करुणरसास युक्त असतो.

**पातन(भुवई)** स्त्री. (नृत्य.) एकावेळी एक किंवा दोन्ही भुवया खाली करणे. हास्य, असूया या भावांच्या वेळी याचा उपयोग होतो. [सं. पातन+म. भुंवई]

**पातमार** स्त्री. फत्तेमारी. (गो.) [हिं]

**पातरवडो** न. अळुवडी. (गो.)

**पातर** स्त्री. पत्नी; बायको. – लोसाको.

**पातरींग** न.(चर्म.) चपलांच्या आकाराचे मेज, माप. (क्रि. कापणे).

**पातलेपण** न. पातळपणा; श्रद्धेत, भक्तीत निर्माण झालेला कमीपणा : 'यांसि पातलेपण नाहीं : तुम्हांसि पातलेपण असे' – लीचउ १०६

**पातवड** स्त्री. पाण्याचा पाट साफसूफ करण्याची क्रिया.(कु.)[सं. पात्र]

**पातवडा** पु. खपला; पोपडा; टप्पल; पदर; पापुद्रा; पाचोळा : 'तैसा आहाचवरी कोरडा । त्वचेचा असे पातवडा ।' – ज्ञा ६.२५२. [सं. पत्रवत्]

**पातवडी – वड** स्त्री. पु. १. तळून खाण्याची पापडी (विशेषत: तांदळाच्या किंवा जोंधळ्याच्या पिठाची). २. हरभऱ्याच्या पिठाचे धिरडे; पहा: **पाटवडी**. ३. अळुवडी. [सं. पत्र+वडी]

**पातशप** पु. विटाळ. (गो.)

**पातशहा** पु. बादशहा; पादशहा.

**पातशौचे** सक्रि. दुखणे विकोपास जाणे. (गो.)

**पातसे** न. पातळ भाजी : 'वरि पातसें ठेविजे : तें जेविजे' – अली ५२. [सं. पत्र]

**पातळ** न. लुगडे; साडी. [सं. पत्रल]

**पातळ** वि. १. बारीक; जाड नव्हे असे; जाडीला कमी (फळी इ.). २. द्रवरूप; प्रवाही; द्रवयुक्त; द्रवांश अधिक असलेले (ताक इ.). ३. विरविरीत; सैल विणीचे (वस्त्र.). ४. चिकटून, घट्ट, दाट नसणारे, अंतराअंतराने असणारे, दूर दूर पसरलेले (पीक), वस्ती इ. ५. किडकिडीत; कृश; सडपातळ; रोड. ६. बेताची; थोडीशी; कमी; वरवर; दाट नसलेली (ओळख, प्रेम, माया, कृपा, स्नेह, लोभ इ.). [सं. पत्रल]

**पातळाई** स्त्री. १. दाटी नसलेली स्थिती; पातळपणा; विरळता; गर्दीचा अभाव. (सामा.) विसकळीत स्थिती; पांगापांग. २. द्रवत्व. ३.सैलपणा; विरळपणा; बारीकपणा; किडकिडीतपणा.

**पात(ळा)ळांवचे** सक्रि. पालथे टाकणे; पसरविणे. (गो.)

**पातळी** स्त्री. १. पातळपणा; विरळपणा. २. गर्दी, दाटी नसणे. ३. स्वयंपाकातील लहान भांडे. ४. धातूचे गज तोडण्याचे हत्यार; करे; लोहाराची छिन्नी; छिलणी. ५. सपाटी; एका पातळीत असून उंच – सखल नसणारी स्थिति. ६. (भूमिति.) ज्याला लांबी, रुंदी आहे असे पृष्ठ वा क्षेत्र. ७. (सुतारी) लाकूड फोडण्याचे साधन; पटाशी.(बे.)

**पातळी** स्त्री. पत्रावळ : 'पातळीं (अन्न) वाढिलें' – लीचपू ५.

**पाता** पु. १. पिणारा. २. संरक्षक; पोशिंदा. [सं. पा = रक्षण करणे]

**पाताडे** न. १. (रेडा, म्हैस इ.चे) सपाट शिंग. २. पहा : **पताडे**

**पातालिक खडक** भूकवचाच्या अंतर्गत भागात शिलारस थंड झाल्यामुळे ग्रॅनाइटसारखा तयार होणारा खडक.

**पाताळ** न. १. पृथ्वीच्या खालचा लोक; नागलोक; भूलोकाच्या खाली असणारे सात लोक प्रत्येकी. २. (ल.) फार खोलपणा सांगत असताना अतिशयोक्तीने म्हणतात.[सं. पानालम्] (वा.)**०फोडून, पाताळातून काढणे** – १. एखादी गुप्त गोष्ट उघडकीस आणणे. २. ओढून ताणून तर्क, कल्पना करणे. **पाताळी घालणे** – पूर्ण नाश करणे.

**पाताळपाणी** न. १. विहीर,तळे इ.त जमिनीखालून झऱ्याने येणारे पाणी. २. (सामा.) खोल पाणी.

**पाताळयंत्र** न. उदेल इ. तेल काढण्याचे यंत्र; तेल, अर्क, सत्त्व काढण्याचे किंवा धातूचे भस्म करण्याचे यंत्र. मातीची दोन भांडी तोंडास तोंड लावून वरून ती चांगली लिंपून जमिनीत भट्टी इ. तयार करून तीत ठेवणे. [सं.]

**पातिव्रत्य** न. पतिव्रतेचा धर्म; स्त्रीने पतीच्या मनासारखे, आज्ञेत, एकनिष्ठपणाने वागणे.

**पाती** स्त्री. १. धातूचा पातळ तुकडा; सांधकामाच्या डाकाची पट्टी; पट्टी (लोखंडी). २. फऱ्याचे आडवे पाते, यावर शीग मारणारे लाकूड फिरवितात. ३. जानवी इ. करताना त्याची तिसुती इ. गुंडाळण्याचे कांबीट. ४. लांबट आकाराचे पान किंवा पात (ऊस, नारळ इ. चे). ५. फणसाच्या गऱ्याचे सागुळाभोवती असलेले तंतू. [सं. पत्र, पट्टी]

**पाती–थी** स्त्री. १. खळ्यातील मळणीसाठी जुंपलेल्या बैलांची ओळ, रांग, पात. २.भागी; हिस्सा. ३. मार्ग. [सं. पंक्ति]

**पाती** स्त्री. घराणे; घराण्याची शाखा. उदा. धाकटी पाती, थोरली पाती. [सं.पंक्ति]

**पाती** स्त्री. पोळी : 'खीचु पातीया' – लीचपू ७०. [सं. पत्रिका]

**पाती** स्त्री. पापणी (डोळ्याची) : 'झाल्या तटस्थ सकळां नेत्रपाती वो ।' – तुगा १३५. [सं. पत्र]

**पाती** स्त्री. कापसाच्या झाडाचे फूल. [सं. पत्र]

**पाती** स्त्री. बरोबरी. [सं. पंक्ति]

**पा(णां)ती** स्त्री. वाटणी; भागी; अंश; हिस्सा; सामाईक व्यवहारांतील वाटा : 'आपुलियां मानवले या धर्ममखांत देव पात्यांते ।' – मोअश्व ६.४६. [हिं.; सं. प्राप्ति]

**पाती(थी)दार** वि. भागीदार; हिस्सेदार; वाटेकरी.

**पातीना** पु. पाणी तापविण्याचे भांडे. (व.)

**पातृली** स्त्री. लहान पातेली : 'एकी पातृली... कवीस्वरवासीं दीधली' – स्मृस्थ ८. [सं. पात्र]

**पाते** न. १. डोळ्याची पापणी. २.पान (तरवार, सुरी इ.चे). ३. (ल.) रहाटाचे आडवे लाकूड. ४. (बैलगाडी) खुटल्याच्या वर ठोकलेले समांतर असे लाकूड. पहा : **पाती** ४,५. ५.जोखडाच्या खालचा समांतर भाग, खालचे लाकूड. [सं. पत्र, पात] (वा.) **पात्यास पाते न लागणे** – थोडीसुद्धा झोप न लागणे.

**पाते(ति)जणे** उक्रि. सोपविणे; विश्वास ठेवणे; विश्वासणे : 'म्हणोनि ज्ञाना कर्मा कर्तया । पातेजों नये धनंजया ।' – ज्ञा १८.५१८. [सं. प्रत्यय]

**पातेजणे** क्रि. धार लावणे. [सं. प्रा+तिज्]

**पातेरा – रे** पु. न. १. पाला, पाचोळा; कचरा; कडबा; टरफल. २. (ल.) व्यापारातील पत; नावलौकिक. (क्रि. उडणे, जाणे.) ३. (ल.) आश्रय. ४. विश्वास (वा.) **पातेरा–रे उडणे** – पत, बोज जाणे. [सं. पत्र]

**पातेली** स्त्री. लहान पातेले. [सं. पात्र]

**पाते(त्ये)ले** न. कढी, सांबारे इ. करण्याचे धातूचे एक पात्र. पात्येले (को.); भगुणे (व.). [सं. पात्र]

**पातो(तों)डा** पु. पापोडा; पापुद्रा; पापडा. [सं. पत्र]

**पातोवळा, पातोळा** पु. तांदळाच्या पिठात काकडी, गूळ व खोबऱ्याचा कीस घालून हळदीच्या पानावर ते पीठ थापटून मोदकाप्रमाणे उकडून केलेले पक्वान्न; पातोळी. (गो.)

**पातोळी** वि. (ल.) जीभ चुरुचुरु चालविणारी (स्त्री). (गो.)

**पातोळी** स्त्री. दुखण्याचा घाला, साथ. (कु.) [सं. पान]

**पातोळे** न. गप्पीदास; बोलघेवडा माणूस. (गो.)

**पात्या** न. हळवार जमिनीत पेरतात असे भात. – बदलापूर २८३.[सं. पत्र]

**पात्र, पात्री** न. १. (सामा.) भांडे; ताट, तबक, पेला, वाटी, पातेली इ. २. एखादा पदार्थ ठेवण्यासाठी आधारभूत वस्तू. जसे :– पेला, उथळे, जलाशय, अन्नाशय, मलाशय इ. प्रतिग्राहक (दान, आशीर्वाद, शाप इ.चा.); खाण, समुद्र, निधी (गुण, दुर्गुण इ.चा). ३. नदीचा प्रवाह जेथून जातो त्या जागेची रुंदी. ४. (नाट्य.) वेष; सोंग; भूमिका. ५. अतिथी : 'या सदुदारापासुनि पात्रें वरिती गुणानुरूपार्थ ।' – मोकर्ण ११.१६. ६. पत्रावळ. (व.) ७. वेश्या; रखेली; राख. ८. मैथुनक्रीडेतील सहचर (स्त्री किंवा पुरुष).

वि. १. योग्य; लायक; युक्त. जसे :– प्रशंसापात्र. २. आधार : 'करितां आज्ञाभंग क्षोभाचें पात्र जाहले चवघे ।' – मोआदि ११.६७. [सं. पा = पालने+त्र= रक्षण करण्यास समर्थ.] (वा.) ० **नाचविणे** – उधळेपणाने राहणे. **पात्रात राख कालविणे** – जीवनाच्या किंवा निर्वाहाच्या साधनांचा नाश करणे. **पात्रावरून उठविणे** – उपजीविकेचे साधन नाहीसे करणे. **पात्री बसणे** – भोजनास बसणे. **पात्रे पुजणे** – पानावर थोडेसे नावाला वाढणे; वाढलेसे करणे.

**पात्रता** स्त्री. १. योग्यता; अपेक्षित गुणवत्ता असणे. २. वेशभूषेचा नीटनेटकेपणा : 'तथा वीटु उपजैल म्हणौनि पात्रता राखिली' – अली ६९. [सं.]

**पात्रधारी** वि. भोजन वाढणारे.

**पात्रपाट** पु. भांड्याचा आकार.

**पात्रवस्त्र** न. (व्यापक) भांडीकुंडी, कपडेलत्ते; संसारातील आवश्यक असणाऱ्या – लागणाऱ्या वस्तू.

**पात्रा** स्त्री. नर्तकी; नाचणारी; नायकीण; वेश्या; रांड. [सं. पात्र]

**पात्री, पाथरी – रा** स्त्री. शेतात उगविणारी, लांब व पानांची कड कातरल्यासारखी असणारी एक रानभाजी. [सं. पत्र]

**पात्रूट – ड** पु. दगडफोड्या; पाथरवट.

**पात्रेसमित** वि. तुकडमोड्या; पंक्तिपठाण; भोजनभाऊ; आयतोजी; फुकटखाऊ. [सं. पात्र]

**पात्स(त्सा)र** पु. विश्वास; भरवसा; प्रत्यय.(कु.) [सं. प्रत्यय]

**पा(पां)थ** स्त्री. १. ओळ; रांग; पंक्ती. (को.) २. जमाव; समुदाय. (व.) [सं. पंक्ति]

**पाथ** स्त्री. निंदण्यासाठी बायका तीन तास व मनुष्य चार तास घेतात व असे घेतलेले तास ज्याचे त्याने पूर्ण निंदले म्हणजे एक पूर्ण पाथ होते. पहा : **पात** (व.ना.) [सं. पंक्ति]

**पाथर** स्त्री. १. कपडे धुणे, स्नान करणे, बसणे, मसाल्याचे पदार्थ वाटणे इ. करिता असलेला मोठा, चपटा आणि नितळ दगड. २. घाव : 'जो आपणेयां घाए पाथर न लगत जुंझे...' – लीचउ १३५.

पु. (सामा.) दगड. [सं. प्रस्तर]

**पाथर आंबटी** जांबोत्री दगडावर पावसाळ्यात रुजणारी एक आंबट वनस्पती.

**पाथरणे** सक्रि. पसरणे; अंथरणे. [सं.प्रस्तृ]

**पाथरवट-ड, पाथरफोड-ड्या, पाथरूट-ड** पु. १. दगडफोड्या; दगडाचे घडीवकाम करणारा; शिलावट जात व तीतील व्यक्ती. २. चोचीने दगड फोडणारा एक पक्षी. [सं. प्रस्तरवृत]

**पाथरा** पु. वाळण्यासाठी पडलेली, पसरलेली ओळ, रांग (कापलेल्या पिकाची, तंबाखूच्या जुड्यांची इ.). [सं. पंक्ति]

**पाथरी** स्त्री. १. चिंचोरी; खेकड्याची एक जात. (कातकरी) २. एक रानभाजी. पहा : **पात्री**

**पाथावेळ** स्त्री. १. पुरावा. २. मालिका. (गो.) [सं.पथ]

**पाथी – ती** स्त्री. फुलांची वेणी. (कु.) [सं. पंक्ति]

**पाथेणे** क्रि. गळणे. (कु.)

**पाथेय** न. १. प्रवाससामग्री; शिदोरी; प्रवासात लागणाऱ्या वस्तू. २. और्ध्वदेहिक कर्मात करण्याचे एक विशिष्ट श्राद्ध. [सं.]

**पाद** पु. अपानवायू; गुदद्वारावाटे सुटणारा वायू. [सं. पर्दन]

**पाद** पु. १. एक चतुर्थांश; चौथा हिस्सा. २. वर्तुळाचा चतुर्थांश. ३. श्लोकाचा एक चरण. [सं.]

**पाद** पु. पाय; चालण्याचा अवयव. [सं.]

**पादअभिनय** (नृत्य.) नृत्यातील पायांच्या अवस्था. या सहा प्रकारच्या आहेत. [सं. पद्=चालणे]

**पादग्रहण** न. पायाला स्पर्श करून वंदन, नमस्कार करणे; अभिवादन.

**पादचारी** वि. पायाने चालणारा; पाईक. [सं.]

**पादछाया** स्त्री. किती वाजले हे निश्चित कळण्याकरता पायांनी मोजलेली माणसाची छाया; याहून निराळी शंकुछाया. [सं.]

**पाद(दा)डणे** सक्रि. १. ताबडणे; जोराने हाकणे; सपाटून काम करून घेणे; दमविणे. २. (वस्तूचा) खूप वापर करणे. [सं. प्रा + द्राड्]

**पादडा** पु. १. अतिश्रम; थकवा; पुष्कळ पादडल्यामुळे झालेली जर्जर अवस्था. (क्रि. निघणे) २. (एखाद्याकडून) सपाटून करून घेतलेले काम. (क्रि. काढणे, घालणे.)

**पादतनिक** घोड्याचे खूर. – भाषाप्रकाश.

**पादतलचारी** वि. पायाच्या तळव्यावर चालणारे प्राणी. अस्वले व त्यांच्यासारखे दुसरे प्राणी या वर्गात येतात. [सं.]

**पादत्राण** न. (सामा.) पायांच्या रक्षणाचे साधन; जोडा; पायतण; वहाणा.

**पाददाह, पाददाहवात** पु. पायांची आग होणारा वातरोग.

**पादप** पु. झाड; वृक्ष. (झाडे पायांनी म्हणजे मुळांनी पाणी पितात म्हणून).

**पादपाश** पु. १. पायदोरी (गुरांच्या, विशेषतः घोड्याच्या); पायाला घातलेला फास; कळावा. २. पायातील वाळा; घागऱ्यांचा वाळा.[सं.]

**पादपीठ** पु. १. बसण्याचा लाकडी पाट. २. पाय ठेवण्याचे साधन. [सं.]

**पादपूजा** स्त्री. १. आचार्यादी श्रेष्ठ व्यक्तीचा पूजाविधी; पाद्यपूजा. २. मोठ्या यज्ञात श्रेष्ठ मानल्या जाणाऱ्या व्यक्तींचा केलेला सन्मानविधी. ३.(ल.) खरडपट्टी.

**पादपूरक** वि. पद्यामध्ये वृत्ताच्या चरणातील अक्षरसंख्या पूर्ण करणारे.

**पादपूरण** न. १. वाक्याची, श्लोकाच्या चरणाची भरती; श्लोक इ. पूर्ण करणे. २. कवितेचा चरण पूर्ण करण्यासाठी योजलेला शब्द. ३. (ल.) अर्थपूरक पद इ. ४. (ल.) उणीव भरून काढणे; त्यासाठी योजलेली वस्तू.

**पादप्रमाण** पु. पायांवर डोके ठेवून वंदन करणे. [सं.]

**पादरटाण, पादश्टाण** स्त्री. पादल्यामुळे सुटलेली घाण; पादाची घाण.

**पादरधिट्टाई** स्त्री. अंगी सामर्थ्य किंवा धिटाई नसताना तोंडाने दाखविला जाणारा धीटपणाचा डौल; बढाई.

**पादरधीट** वि. बढाईखोर; फुकट फुशारकी मारणारा; ऐन वेळी घाबरणारा.

**पादरफुसका** वि. १. हलका; कवडीमोल; तिरस्करणीय; बुजरा; भित्रा (मनुष्य). २. निर्जीव; निर्बल; हलकी; निःसत्त्व, कमजोर; क्षुद्र.

**पादरा** पु. एक किडा. पहा : **पिंगूळ**

वि. १. पादण्याची सवय असणारा. २. (ल.) पादरफुसका.

**पादवंदनिक** न. एक प्रकारचे स्त्रीधन. जेव्हा वधू सासू – सासरा यांच्या पाया पडावयास जाते, त्या वेळी त्यांनी प्रीतीने दिलेले धन. – मिताक्षरा.

**पादवाणे** पवाडा; कीर्तिघोष. –ऐको.

**पादविणे** सक्रि. १. (ल.) पहा : **पादडणे** २. खेळात मार देणे; पराभव करणे.

**पादशहा – शाह** पु. सम्राट; बादशहा; मुसलमान राजा. [फा.]

**पादशाही, पादशाहत** स्त्री. साम्राज्य; बादशहाचा अंमल; बादशहाचा अधिकार, सत्ता, वैभव. [फा.]

**पादशाही** वि. १. बादशहाने दिलेला; बादशहाला शोभेसा, साजेसा; बादशहासंबंधी (मोहर, सनद, शिक्का, परवाना, रिवाज, शिरस्ता, डौल, सरंजाम इ.). २. दरबारी; बादशाही; थोर; भव्य; उमदा; थाटाचा. ३. विलक्षण; अतिशय; पराकाष्ठेचा. जसे : –पादशाही जुलूम, लबाडी.

**पादसंस्थान** न. घोड्याच्या पायाचा एक रोग. [सं.]

**पादसेवन** स्त्री. १.देवाची पूजा–अर्चा, २. नवविधा भक्तीपैकी चौथी भक्ती; (सामा.) चाकरी; सेवा.

**पादहर्ष** पु. पायाला आलेल्या मुंग्या; पायाची रवरव. [सं.]

**पादहस्तासन** न. दोन्ही पाय जुळवून, कमरेत पुढे वाकून, कपाळ गुडघ्याला लावून व हाताचे पंजे जमिनीला टेकून करण्याचे आसन.

**पादाक्रांत** वि. १. पायाखाली तुडविलेला; पायांनी आक्रमिलेला; पायाखाली घातलेला (देश, जागा). २. जिंकलेला; वश केलेला; पराक्रमाने मिळवलेला (शत्रू, देश इ.). [सं.]

**पादुका** स्त्री. १. जोडा; वहाण; (विशेषतः) लाकडी खडावा. २. देव, गुरू इ. च्या पायाचा दगडावरील ठसा; पायांची प्रतिमा. [सं. पादुः]

**पादुकाधर** वि. जोडा उचलणारा : 'पादुकाधर सेवेचा।' – दावि १८३.

**पादेफुसाट** वि. भित्रट; घाबरट. (व.)

**पादेलोण** न. एक काळ्या रंगाचे, कृत्रिम अग्निदीपक, सौम्य रेचक असे मीठ, क्षार. पहा : **बिडलवण** [सं. पर्दक + लवण]

**पादोदक** न. देवांच्या मूर्तीचे, पूज्य व्यक्तींची पावले धुतलेले पाणी; चरणाचे तीर्थ. [सं.पाद+उदर]

**पादोदर** पु. सर्प; उरग; शेष : 'तव गुणार्णवीं नचले पादोदर स्फूर्ति।' – होला ३. [सं.]

**पाद्य** न. १. पाय धुण्याचे पाणी किंवा पाण्याने पाय धुण्याची क्रिया : 'नवरा नेईल नोवरी घरां। पूजन वरा पाद्याचें।' – तुगा ३०९५. २. देवाच्या स्नानाच्या वेळी अर्पण केले जाणारे गंध, अक्षता, फुले, पाणी इ.; पूजा, सत्कार करण्यातील एक विधी. [सं.] (वा.) **पाद्याचे घालणे, करणे** – यथेच्छ लाथा मारणे.

**पाद्यपूजा** पहा : **पादपूजा**

**पाद्री** पु. १. ख्रिस्ती धर्मप्रचारक; ख्रिस्ती धर्माचा भटजी. २. लष्कर, आरमार अगर इतर सरकारी खाती यामधील ख्रिस्ती धर्माचार्य. [पोर्तु.; इं. फादर]

**पाद्री** पु. बुद्धिबळाच्या खेळातील उंट. [पोर्तु. पेड्रो]

**पाधाणी – नी** वि. अजागळ; अडाणी (बायको) : 'काय धोंगाणी पाधाणी। ताकामध्यें घाटी लोणी।' – तुगा ६२३. [सं. अपाधानी]

**पान** न. १. वनस्पतीचा मुख्य, प्रकाशसंश्लेषणाद्वारा अन्न बनवणारा, श्वसनक्रिया व बाष्पोत्सर्जन करणारा अवयव. याचा रंग मुख्यत्वे हिरवा असून हा खोडाला थेट किंवा देठाने जोडलेला असतो. पर्ण; पत्र; दल. २. (सामा.) नागवेलीचे, विड्याचे पान. ३. (ल.) विडा; खाण्यासाठी तयार केलेली पानपट्टी. ४. पुस्तकाचे पृष्ठ, पत्र. ५. कागदाचा ताव; बंद. ६. धातूच्या वर्खाचा पातळ पत्रा. ७. लहान मुलांच्या कपाळावर, स्त्री – पुरुषांच्या गळ्यात, घोड्याच्या गळ्यात अथवा कपाळावर बांधण्याचा पानाच्या आकाराचा एक दागिना; पिंपळपान. ८. धोतरजोडीपैकी एक नग; एक धोतर. ९. केतकीच्या फुलाची एक पाकळी, दल. १०. पत्त्याचे, गंजिफाचे पान. ११. शस्त्राचे, हत्याराचे पाते. १२. माहुटीचे लाकूड, फळी; छपराच्या वाशाचा शेवट, ज्यात फळी बसवतात ते लाकूड, फळी. १३. किल्ल्याच्या तटाच्या वरचा दोन जायांमधील भाग किंवा भिंत (हा पिंपळाच्या पानासारखा असतो म्हणून). १४. एक औषधी गवत. पहा : **एरका**. १५. संबळाच्या कातड्याचे तोंड. १६. तंबाखू. (गो.) १७. नांगराचे टोक, भाग. (कु.) १८. जेवणाचे पात्र; पत्रावळ. १९. (चर्मकार.) तळाच्या बाहेरच्या बाजूला बसवलेला सागळेचा तुकडा. [सं.पर्ण; गु.] (वा.) **० न हलणे** – (झाडाचे पान हलण्याला थोडा तरी वारा लागतो, त्यावाचून ते कार्य होत नाही, यावरून) कोणतेही कार्य न होणे. **०पुजणे** – पहा : **पात्रे पुजणे. (तोंडाला) ०पुसणे** – फसविणे; ठकविणे. **०लागणे** – सर्पदंश होणे; साप चावणे. **पानावर पान टाकणे, घालणे, ठेवणे** – दडपणे; दाबादाबी करणे; छपविणे. **पाचा पानांचा विडा, पट्टी देणे** – (एखाद्या कामावर नेमणूक करताना पूर्वी सरदाराला विड्याची पाच पाने व सुपारी देत असत, त्यावरून) कामावरून काढून टाकणे. **(दुसऱ्याच्या पुढले) पान ओढू नये, पुढल्या पानास माती घालू नये** – दुसऱ्याच्या पोटापाण्याचे साधन काढून घेऊ नये. **(पुढे वाढलेल्या) पानाला लात–थ मारणे** – १. सहजासहजी किंवा एखाद्याच्या कृपेमुळे मिळालेल्या फायद्याच्या गोष्टी झिडकारणे, नाकारणे. २. ऐन तारुण्याच्या किंवा उत्कर्षाच्या काळात मरणे, मरण येणे.

**पान** न. पिणे; प्राशन करणे. (समासात) मद्यपान इ. [सं. पा]

**पान** स्त्री. ओरिसामधील एक गुन्हेगार जात, व्यक्ती.

**पान** न. पाल्हाळ; लांबण. (अहि.)

**पान** न. पावशेर (शेंगा, गूळ यांच्या व्यापारात रूढ). (कर.)

**पान** न. विडा व गजरा.

**पान** न. शरीराचा अवयव.–तुगा.

**पानआवळा – ळी** पु. स्त्री. लहान, काटेरी, फळे येणारे झाड; आवळीचा एक प्रकार.

**पानई** स्त्री. पाण्याचे भांडे ठेवण्याची जागा.

**पानउवा** स्त्री. अव. झाडांची पाने खाणारे उवांसारखे किडे.

**पानक–का** न. (सामा.) आंबटसर पेय; पन्हे; लिंबू वगैरेचे सरबत.

**पानक** पु. साप; पन्नग, नाग : 'आठ अस्ताकें राषीलीं। म्हणौनी अस्टकुळ पानक।' – उषा ८५८. [सं. पन्नग]

**पानकळा** पु. पावसाळा.

**पानकाया** स्त्री. विषमय अंत:करण. – रावाको.

**पानकावशी** स्त्री. दिवसभर पाण्यात बसणारी गाय अथवा म्हैस. (व.)

**पानकांडी** स्त्री. पानपट्ट्या खोवण्यासाठी असणारी दांडी; रावा. (तंजा.)

**पानकी** पु. स्वयंपाक्याचा साहाय्यक; पाणक्या. (गो.)

**पानकी** स्त्री. एक रोग; अंगाचा दाह, मळ पातळ होणे, अंतर्बाह्य पिवळटपणा आणि डोळ्याला पांढरेपणा ही लक्षणे असणारा रोग.

**पानको** पु. गूळ घालून भाजलेला पाव. (गो.)

**पानगा** पु. पानाला पीठ लावून निखाऱ्यावर भाजलेली भाकरी; आहारोळी.

**पानगी** स्त्री. लहान पानगा.

**पानगृह** न. मद्य पिण्याची स्वतंत्र खोली.

**पानघोंगडे** न. इरले.

**पानछत्री** स्त्री. दोन काठ्यांना नवी लुगडी चुणून, बांधून ठेवणे (लग्नातील एक प्रकार). (तंजा.)

**पानझडी वने–न** न.अव. भरपूर पाऊस पडणाऱ्या भागात आढळणारी, रुंद पानांची व हिवाळ्यात पाने गळून पडणारी झाडे असणारी वने.

**पानझरा** वि. तेजस्वी; रुबाबदार. – लोसाको.

**पानझाड** न. पानापासून उगवणारी, फुटणारी वनस्पती; पानफुटी. (को.)

**पानट, पानरट** न. (निंदार्थी) झाडाचे पान, कागदाचे चिटोरे, पुस्तकाचे पान इ.

**पानडी, पानेड** न. तळे.

**पानडी** स्त्री. १. पदक. २. साजाची पेटी. ३. कपाशीच्या पानासारखी सर्व घेरभर कातरे–कातरे असलेली साजात घालावयाची पेटी. ३. बायकांचा गळ्यात घालण्याचा एक दागिना. ४. पाचू रत्न. ५. पाच अत्तर.

**पान(ना)डी – ड्या** पहा : **पाणडी**

**पानताटी** स्त्री. पत्रावळीची पाने दुमडू नयेत म्हणून त्यांच्या भोवती कांबट्या बांधल्या आहेत असा पत्रावळींचा किंवा द्रोणांचा गठ्ठा.

**पानतावन** स्त्री. पाणी तापविण्याची खोली; न्हाणी, स्नानघर. (व.)

**पानतुळी** स्त्री. पर्णशय्या; पानांची शेज : 'तंवं भणे रत्नावली। न करीं वो न करीं पानतुळीं।' – शिव ७९९.

**पानदान** न.१. विड्याची पाने वगैरे ठेवण्याचा डबा. २. पानाचे तबक. (व.)

**पानपट्टी** स्त्री. १. विड्याच्या पानात सुपारी, कात, चुना इ. घालून केलेला विडा, गुंडाळी. २. एकत्र दुमडलेली नागवेलीची पाने (पानसुपारी देण्यासाठी केलेली). ३. (घर) मोहटीचे शेवटचे लाकूड. वाशाची टोके दिसू नयेत म्हणून छपराच्या तोंडाशी मारलेली फळी.

**पानपणे** सक्रि. १. जखम भरून येणे. २. घाबरे करणे, होणे. ३. मुरगळणे; मुरडणे.

**पानपत** न. विध्वंस; सत्यानाश; संहार; कत्तल. (पानिपत येथे पेशव्यांच्या सैन्यांचा संहार झाला त्यावरून हा अर्थ.) [पानिपत अप.]

**पानपत्रावळ** स्त्री. १. पत्रावळ. २. घरात जेवायला लागणारी पाने आणणे, साठवणे, मांडणे इ. काम.

**पानपिसा** वि. अतिउत्सुक; वेडा.

**पानपु(पू)ड – डा** पु. न. विड्याची पाने ठेवण्याचा गवताचा, ताड, शिंदी यांच्या पातींचा किंवा पितळ इ. धातूचा ओंजळीच्या आकाराचा पुडा; बुरुडी डबा. [सं. पत्रपुट]

**पानपेंडा – पेंढा – भारा** पु. पत्रावळीचा भारा, गठ्ठा; खोतवेठीपैकी एक बाब. पहा : **खोतवेठ**

**पानपोई – पोय** स्त्री. एक वेल. हिचा गुरांच्या औषधाच्या कामी उपयोग होतो. हिची पाने हातावर चोळली असता हातास तांबूस रंग येतो.

**पानपोत** स्त्री. बायकांचा गळ्यातील एक दागिना; चिंचपेटी व मोत्यांचा पोत, पेंडे.

**पानफुटी** स्त्री. एक प्रकारची वनस्पती. हिच्या पानापासून रोपे होतात.

**पानफुंकणी, पानफुंकी** स्त्री. मुलींचा एक शिवाशिवीचा खेळ. (ना.)

**पानबसन–बोदाड** न.स्त्री. पाणी धरून ठेवणारी, पाणथळ जमीन. (व.)

**पानबाजी – जू** स्त्री. (गंजिफाचा खेळ) राजा व वजीर यांच्या शिवाय असलेली डावातील मोठी पाने; बंद.

**पानबाळी – ही** स्त्री. कानातील एक दागिना; मोती इ. लावलेला पानाच्या आकाराचा सोन्याचा अलंकार.

**पानबोर** न. लहान मुलाच्या कपाळावरील केसाला बांधण्याचे, सोन्याच्या कोंदणात हिरे बसविलेले एक भूषण.

**पानमळा** पु. नागवेलीच्या, विड्याच्या पानांचा मळा, शेत.

**पानयी** स्त्री. पायघडी. – लोसाको.

**पानलागी** स्त्री. ज्यामध्ये एकमेकांवर पान देणे–घेणे लागतात असा पत्त्यांचा खेळ : 'एक दुरी काढून ठेवून तिघे पानलागी खेळू लागले.'–सुदे २६.

**पानवडी** स्त्री. अळवाच्या पानांची केलेली वडी.

**पानवती** स्त्री. साक्षगंध; शालमुदी. (व.)

**पानवळ** न. हत्याराला धार काढणे. (क्रि. दिवप) (गो.)

**पानवळे** न. कालमापनाचे एक परिमाण; एक षष्ठांश क्षण : 'आठा पानावळेया पर्यंत... गोदोहनमंत्र' – अस्मृ २९. [सं. प्राण+पल]

**पानवसणी** स्त्री. ओली जमीन; पाणथळ.

**पानवेल** स्त्री. विड्याच्या पानाचा वेल; नागवेल.

**पानसडे** पहा : **पानपूड, पानदान**

**पानसर** न. (पावसापासून बचाव व्हावा म्हणून) पानांचे किंवा गवताचे केलेले एक आच्छादन; इरले; पानघोंगडे.

**पानसरा** वि. आडवा; समोर.

**पानस(सा)ळ** पहा : **पाणसाळ**

**पानसळाई** स्त्री. सोनाराचे एक हत्यार.

**पानसाखळी** स्त्री. पुस्तकातील पानवार विषयसूची, अनुक्रमणिका.

**पानसाबर** स्त्री. फड्या निवडुंग.

**पानसाळ** स्त्री. (बैलगाडी) गाडीत ठेवलेला माल पडू नये म्हणून गाडीस मागील बाजूस असलेली वा लावलेली झडप, अडसर.

**पानसुपारी** स्त्री. १. विड्याचे सर्व साहित्य; विडा. २. लोकांना बोलावून सन्मान करण्याचा समारंभ; अत्तर, गुलाब, पानसुपारी इ. देणे. ३. (ल.) बक्षिसी; पोस्त; लाच.

**पाना** वि. (शेतातील भात, धान्य इ.) एके ठिकाणी साठविल्यावर किंवा तयार झाल्यावर त्यावर पाऊस पडल्यामुळे पिवळसर पडून दबले गेलेले, कुजलेले; पाणी खाल्लेले.

**पाना** पु. बोलटास बसविलेला नट खोलण्याचे एक हत्यार; चावी.[इं. स्पॅनर]

**पानाचाँ** स्त्री. तंबाखू. (गो.)

**पानात्यय** पु. (आयुर्वेद.) अतिरिक्त मद्यप्राशनाने होणारा विकार.

**पानारी** पु. १. पत्रावळीच्या पानांचे भारे आणणारे लोक; ओझेकरी वा त्यातील एक व्यक्ती. २. विड्याची पाने विकणारा.

**पानावाजणी** न. पाणी पिणे; पान : 'हस्ती घोड्यांना पानावाजणी जाले : मग जेवणीया दीधलिया' – रुस्व २५६०. [सं. पाणिया]

**पानासणे** क्रि. रचणे; व्यवस्थित लावणे; पहा : **पन्नासणे** [सं.प्र+नि+अस्]

**पानिएडा** पु. जलाशय. पहा : **पानेड**

**पानीय** न. पाणी.

वि. पिण्यास योग्य, लायक. [सं.]

**पानेड** न. १. पांचट. २. सरोवर; जलाशय; पाणवठा.

**पानेडी** स्त्री. फांदी.

**पानेणे** अक्रि. (तांदूळ वगैरे) तयार पिकावर पाऊस पडल्यामुळे ते खराब होणे; त्यास घाण सुटणे; पाणारणे. (राजा., कु.)

**पानेवाटणी** स्त्री. लग्न ठरविण्याच्यावेळी गोताला आमंत्रण करण्याचा समारंभ; पानसुपारी : 'पानेवाटणी झाली म्हणजे लग्न निश्चित झालें.' – महाराष्ट्र शारदा पृ. ५०, जुलै १९३५. (को.)

**पानोडे** न. पारडे. (अहि.)

**पानोळी** स्त्री. पानगी; पानावर भाजलेली लहान भाकरी. (व.)

**पानोळी** स्त्री. शिंदीच्या झाडाचे पान; शिंदीची झावळी. (व., ना.) [सं.पर्ण]

**पान्ह(न्हे)णे, पान्ह(व)विणे** सक्रि. कासेतून दूध सोडणे; पान्हा फुटणे, सोडणे (वात्सल्यामुळे मातेने किंवा आंबोण इ. पाहून गाय, म्हैस इ.नी).

**पान्हवण** न. १. पान्हा सोडावा म्हणून गाय, म्हैस इ.कांच्या पुढे ठेवावयाचे आंबोण, दाणा वगैरे. २. (ल.) मन वळविण्यासाठी, वश करण्यासाठी, समजूत घालण्यासाठी दिलेले बक्षीस; लाच.

**पान्हवणकरीण** स्त्री. पान्हवण दाखविल्याशिवाय कधीही दूध न देणारी गाय, म्हैस इ.

**पान्हा** पु. १. वात्सल्यामुळे जनावराच्या कासेत दूध उतरणे; प्रेमातिशयामुळे मातेच्या स्तनांतून जोराने बाहेर येणारे दूध. २. दयेने अंत:करणाला येणारा कळवळा. [सं. प्रस्नु, प्रस्रव] (वा.) **(खाजवून) ०आणणे** – बळेच आस्था, कळवळा इ. उत्पन्न करणे.

**पान्हेरी** स्त्री. पाणपोई : 'दासें दासत्वें आगळी । पान्हेरीनें मार्ग मळी ।' – तुगा ३३८.

**पान्हेरे** न. पाणी काढण्याचे भांडे. [सं. पानीयधारकं]

**पाप** न. १. अपराध, कुकर्म; दुष्टपणा; दोष; पातक; नीतिबाह्य वर्तन. २. वाईट हेतू; कुकल्पना; कुढा भाव; दुष्टवासना. [सं. पाप] पु. स्त्री. न. १. (ल.) दुष्ट, त्रासदायक, पापी मनुष्य : 'संसप्तक थोडेसे असति न धरतील तेहि पाप तग ।' – मोकर्ण ४२.७१. २. व्याधी; पीडा; अडचण; संकट; लचांड. [सं.] (वा.) **०उभे राहणे** – आपलेच कुकर्म प्रगतीत इ. अडथळा बनणे. **०खाणे** – पश्चातापाने मन खाणे; मनास हुरहुर लागणे. **०बोंब मारून, देऊन उठणे, ज्याचे पाप त्याचे पुढे येऊन नाचणे** – पाप स्पष्टपणे भोगण्यास सिद्ध असणे किंवा नाइलाजाने तयार होणे. **पापाने पाय धुणे** – सर्वदा पापाचरण करणे.

**पाप** न. पोटीस. (गो.)
वि. १. अशुभ. २. वाईट; दोषास्पद. ३. अत्यंत; प्रचंड. ४. कष्टकारक.

**पापकळी** स्त्री. कलियुग : 'ऐसी आली पापकळी । आश्चिर्य मानिलें सकळीं ।' – दास ३.५.२२.

**पापग्रह** पु. (ज्यो.) मंगळ, शनी, राहू, केतू हे अशुभ मानलेले ग्रह; आकाशातील ग्रहांची अपशकुनकारक, दुश्चिन्हकारक युती, योग.

**पापड** पु. उडीद, मटकी वगैरे डाळींच्या पिठात हिंग इ. मसाला घालून ते भिजवून, लाटून व उन्हात वाळवून केलेली पोळीसारखी केलेली चकती.(विस्तवावर भाजून वा तेलात तळून) तोंडी लावावयास घेतात. [सं. पर्पट]

**पापडखार** पु. (पापडात घालण्याचा) एक क्षार; साजीक्षार; सज्जीखार.

**पाप(पा)डी** स्त्री. १. तांदळाच्या पिठात मसाल्याचे पदार्थ, मीठ घालून ते पीठ पाण्यात भिजवून त्याचा पातळसा थर एखाद्या पानावर किंवा पातळ पत्र्यावर घालून तो वाफेत उकडून, उन्हात वाळवून केलेली आणि मग तळलेली पातळ, कुडकुडीत पोळी; लहान पापड; फेणी. २. कढणाऱ्या उसाच्या रसाच्या वरची मळी व तिची थापटी, पापुद्रा. ३. तांदळाच्या किंवा गव्हाच्या पिठात गूळ घालून तयार केलेली आणि तळलेली थापटी; गुळपापडी. ४. सपाट दगडांची फरशी; फरसबंदी रस्ता. (राजा.) ५. (सामा.) पापुद्रा. (गो.)

**पापडी** स्त्री. तळे; जलाशय. – ग्रामको.

**पापडी** पु. पिवळ्या रंगाच्या रेशमाचा एक प्रकार.

**पापणी** स्त्री. डोळ्याच्या वर व खाली असलेले त्वचेचे सकेश आच्छादन. [सं. पक्ष्म]

**पापपिंड** पु. (स्त्री रजस्वला असतानां गर्भ राहतो, त्यावेळी मातेचे अशुद्ध रक्त वाहत असते. त्यावरून त्या काळातील) गर्भपिंड; गर्भ.

**पापभी(भे)रू** वि. पापाला भिणारा, भिऊन वागणारा. [सं.]

**पापयोनि–नी** स्त्री. १. पापजाती : 'तिये पापयोनींही किरीटी । जन्मले जे ।' – ज्ञा ९.४४३. २. गुन्हेगार जाती : 'पापयोनी शब्दानें अलीकडे सरकारदरबारांत ज्यांना गुन्हेगार जाती असें म्हणतात तशा प्रकारचा अर्थ विवक्षित असून ....' – गीर ७४८. ३. पापाचे कारण, उगमस्थान. वि. पापी; पातकी (माणूस).

**पापर–रा–री, पांपरा** स्त्री. १. लाथ; लत्ताप्रहार : 'ती तें पांपरा हाणैन ।' – पंच ५.९. २. लाच. [सं. पदप्रहार]

**पापलिष्ट –लेट** पु. एक पांढरा, तळहाताएवढा समुद्रातील मासा. (को.)

**पापक्षालन** न. प्रायश्चित घेऊन पापातून मोकळे होणे.

**पापा** पु. (बालभाषा) लहान मुलाचा मुका, चुंबन. [ध्व.]

**पापा** पु. वडिलांना हाक मारताना वापरायचा शब्द. [हिं]

**पापा** स्त्री. भाकरी; पोळी.

**पापाचा बाप** जन्मदाता बाप. (मुला – मुलींचा उत्पत्तिकारण असल्यामुळे त्यांच्या पापांची त्याच्यावर जबाबदारी येते, यावरून).

**पापापूर्व** न. अनीतीच्या कृत्यातून उत्पन्न होणारे वाईट परिणाम. पहा : **अपूर्व**

**पापु(प)दरा, पापुद्रा, पापोडा – रा** पु. १. शरीर, फळ, पोळी, भाकरी, कंद इ.वरील पातळ त्वचा, पदर; पापडी. २. जखमेवरील खपली; भिंतीचा, शेणाने सारवलेल्या भुईचा पोपडा; टरफल; कवची. [क. हाप्पळ=खपली]

**पापोच्चारणविधी** मरताना पाद्र्याला बोलावून स्वत:ची पापे कबूल करण्याचा ख्रिश्चन समाजात रूढ असणारा विधी.

**पाप्याचा पितर** (ल.) अतिशय रोड, दुर्बल, क्षीण (मनुष्य).

**पाफुडणे** अक्रि. १. पापोडा, पापुद्रा, खपली धरणे; पदर सुटणे. २. पित्त खवळणे; रागात, त्वेषात येणे.

**पाबळ** पु. १. झरा. २. ओढा; नाला; ओहोळ : 'पौषापर्यंत विपुल पाणी, पुढें पाबळांतून... झरे खणून...' – खेया ४५. ३. तीर; किनारा: 'यमुने पाबळीं । गडियां बोले वनमाळी ।' – तुगा २३०. ४. रान; वन : 'जयाचा प्रताप वनवी पाबळ' – रुस्व २४५. [सं. प्रबल]

**पाबळ–ळा–ळी–ळे** वि. १. पामर; तुच्छ; दुर्बळ : 'हां हो तयाही आणि मोहाची भेटी । हे कायसी पाबळी गोठी ।' – ज्ञा ११.६६. २. नाशवंत; नश्वर : 'असंतु हें पाबळें बोला । वाउगें काई बोलो ।' – शिव १०००. [सं. अप + बल]

**पाबोडी** न. अव. कमलबीज. [सिंधी]

**पाभ** न. एक प्रकारचे माप. (गो.)

**पाभ(भा)र, पाभारी** स्त्री.१. शेतात बी पेरण्याचे अवजार. याचे दुफणी, तिफणी, चौफणी, सहा फणी असे प्रकार आहेत. २. पेरणी. [दे.]

**पाभळ** स्त्री. भरगच्च वृष्टी किंवा वर्षाव; पुष्कळ प्रमाणात पडणे, निघणे, गळणे. (झाडावरून फुले, पाने, चाळणीतून दाणे इ.).

**पाम** पु. एक वृक्षविशेष; ताड, माड, खजूर, पोफळी यासारखा वृक्ष.

**पामनायकी** होनाचा एक प्रकार.

**पामर** वि. १. क्षुद्र; क्षुल्लक; क:पदार्थ; हलका; नीच; तेजोहीन. नीतीने नसून परिस्थितीने क्षुद्र असा (मनुष्य). २. मूर्ख. [सं.]

**पामरी, पांबरी** स्त्री. पांघरावयाचे रेशमी वस्त्र (लहान मुलांचे).

**पामा** स्त्री. खरूज; इसब; दद्रू; त्वचेचा रोग. [सं.]
**पामाल** नाश, नुकसान. - ऐको.
**पामा** पु. भुस्सा : 'मालांत पामा म्हणजे भुस्सा नसावा.' - मुंव्या ४५.
**पाय** पु. १. कमरेपासून खाली बोटापर्यंतचा शरीराचा भाग; शरीर तोलून धरण्यासाठी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्यासाठी चालण्यासाठी वापरला जाणारा अवयव. २. (शब्दशः व लक्षणेने) पाऊल; पद; चरण. ईश्वर, गुरू, पती, धनी इ.ना उद्देशून विनयाने म्हणतात : 'मला तरी हे पाय सोडून राहिल्यानें चैन का पडणार आहे ?' - कोरकि २०. ३. तंगडी. ४. (ल.) पायाच्या आकाराची व त्यासारख्या उपयोगाची कोणतीही वस्तू ; (पलंग, चौरंग, खुर्ची, टेबल, पोळपाट, खाट, बाज इ.चा) खूर. ५. डोंगराचा पायथा; खालचा, सपाटीचा भाग. ६. अक्षराचा किंवा पत्राचा खालचा भाग. ७. झाडाचे मूळ. ८. चौथा भाग; चतुर्थांश; चरण; पाद. ९. शिडीची पायरी; पावका; पायंडा. १०. (ल.) कारण; लक्षण; चिन्ह; रंग. उदा. 'मुलाचे पाय पाळण्यात दिसतात.' [सं. पाद] (वा. ) **०उचलणे** - भरभर चालणे; न रेंगाळणे. **० काढणे** - १. निघून जाणे; निसटणे; नाहीसे होणे. २. (व्यवहारातून) सहभाग काढून घेणे. **०कापणे** - घाबरणे; भिणे; भीती वाटणे; भयभीत होणे. **० घेणे** - प्रवृत्ती होणे; इच्छा होणे. **० तोडणे** - एखाद्याच्या कामात विघ्न आणणे. **० देणे** -१. पायाचा भार घालून अंग चेपणे. २. तुडविणे; उपद्रव देण्यासाठी, कुरापत काढण्यासाठी एखाद्याला पायाने ताडन करणे. ३. पाय लावणे; पायाचा स्पर्श करणे. **०धरणे** - १. पाया पडणे; शरण जाणे; विनंती करणे; आश्रयाखाली जाणे. २. संधिवात, अर्धांगवायू इ. रोगांनी पाय दुखणे. **० धुणे** - (मूत्र विसर्जनानंतर हात पाय धुण्याची चाल रूढ आहे, त्यावरून) लघवी करणे. **० धुवून - फुंकून टाकणे, ठेवणे** - मोठ्या खबरदारीने, काळजीने वागणे. **०न ठरणे** - सारखे हिंडणे; भटकत राहणे; विश्रांती न मिळणे. **०निघणे** - (मुख्यत्वे नकारार्थी उपयोग) मुक्त होणे; मोकळे होणे; बाहेर जाणे, पडणे. **०पसरणे** - १. अधिकार प्रस्थापित करणे; पूर्णपणे उपभोग घेणे; थोडी संधी मिळाल्यावर आपली सत्ता स्थापन करणे. २. मरणे (मरताना पाय लांब होतात, यावरून). ३. बाईने कोणाशीही शारीरिक संबंध ठेवायची तयारी दाखवणे. **०पसरून निजणे** - निश्चिंत, आळशीपणाने राहणे; निरुपद्रवी असणे. **०पोटी जाणे** - भयभीत होणे; अतिशय भीती वाटणे (निजलेला मनुष्य भीतीने हातपाय आखडून घेतो त्यावरून) : 'जंव भेणें पाय पोटीं गेले नाहीं।' - दावि १६०. **०फासटणे** - पायपीट करणे; पुष्कळ चालणे. **०फुटणे** - १. विस्तार पावणे; वाढणे. २. हळूच नाहीसा होणे; चोरीला जाणे (वस्तू.). ३. थंडीच्या योगाने किंवा जळवाताने पाय भेगलणे, चिरटणे. **०फोडणे** - विषय भलतीकडे नेणे; विषयांतर करणे; मुद्द्याला सोडून अघळपघळ बोलणे; फाटे फोडणे. **०भुईशी(ला) लागणे** - १. (एखाद्या कामाला) कायमपणा, निश्चितपणा येणे. २. जिवावरच्या संकटातून वाचणे. **०मोकळा करणे, होणे** - १. अडचणीतून बाहेर पडणे, काढणे. २. फेरफटका करणे; पायांचा आखडलेपणा नाहीसा करणे, होणे. **० मोडणे** - १. पायात शक्ती नसणे. २. निराशेमुळे धीर सुटणे; निराश होणे. ३. एखाद्याच्या कामात हरकत आणणे; धीर खचविणे; मोडता घालणे; काम करू न देणे. ४. एखाद्या मुलाच्या पाठीवर त्याच्या मातेस काही दिवस जाणे; गरोदर राहणे (नगर). **०येणे** - (लहान मुलास) चालता येणे. **०रोवणे** - स्थिर, कायम होणे. **०लागणे** - पहा: **पाय भुईशी लागणे. (वर)०येणे** - प्रतिबंध, अडचण होणे, येणे. **०व (ओ)रपणे** - चिंचपाण्यात पाय बुडवून ते तापलेल्या तव्यावरून ओढणे व पुन्हा चिंचपाण्यात बुडविणे याप्रमाणे पाच - दहा मिनिटे सारखे करीत राहणे. (डोळ्यांची जळजळ यासारखे विकार नाहीसे होण्यासाठीचा उपचार.) **०वळणे** - १.दुसरीकडे प्रवृत्ती होणे. २. वाताने मुरडणे; वळले जाणे. **०वाहणे** - एखाद्या ठिकाणी जाण्याचा मनाचा कल, प्रवृत्ती होणे. **० शिवणे** - पायाची शपथ वाहणे. **०शिंपणे** - (मुलाला पायावर घेऊन दूध पाजण्यापूर्वी स्वतः) पाय धुणे : 'ते माय आगोदर पाय शिंपी।' - सारु १.५३. **पायाखाली तुडविणे** - १. दुःख, क्लेश देणे; छळ करणे. २. कस्पटाप्रमाणे मानणे; मानहानी करणे. **पायाचा गू पायीं पुसणे** - कोणत्याही घाणेरड्या गोष्टीची घाण जास्त वाढू न देता तिचा बंदोबस्त करणे. **पायाजवळ येणे** - (आदरार्थी) एखाद्याकडे जाणे, येणे; शरण येणे. **पायाने जेवणे, खाणे** - अत्यंत मूर्ख, वेडा असणे. **पायाने लोटणे** - तिरस्कार, अवहेलना करणे. **पाया पडणे** - १. पायावर डोके ठेवणे; नमस्कार करणे. २. विनविणे; याचना करणे; आर्जविणे. **पायापाशी पाहणे** - जवळ असेल त्याचाच विचार करणे; आपल्याच परिस्थितीचा, आपल्या पुरताच विचार करणे. **पायापाशी येणे** - पहा: **पायाजवळ येणे. पायाला - त, पायाअढी पडणे** - (म्हातारपणामुळे) चालताना एका पायाला दुसरा पाय घासणे. **पायाला खुंट्या देणे** - एकाच जागी फार वेळ बसल्याने पाय ताठणे. **पाया लागणे** - पाया पडणे. **पायावर कुत्री - मांजरे घालणे** - अतिशय प्रार्थना व विनवण्या करून एखाद्याला काही काम करावयास उठविणे. **पायावर नक्षत्र पडणे, पायावर भोवरा असणे, पडणे** - सदोदित फिरत असणे; एकसारखे भटकणे; पायाला विसावा नसणे. **पायावर पाय ठेवणे, देणे** - एखाद्याच्या पाठोपाठ जाणे; एखाद्याचे अनुकरण करणे. **पायावर धोंडा पाडून, ओढून घेणे** - आपले नुकसान आपणच करून घेणे. **पायावर हात मारणे** - पायाची शपथ घेणे. **पायाशी पाय बांधून बसणे** - एखाद्याचा एकसारखा पिच्छा पुरवून काही मागणे. **पायास कुत्रे बांधणे** - शिव्या देत सुटणे; भरमसाट शिव्या देणे. **पायास पाय बांधणे** - एखाद्याच्या संगतीत एकसारखे राहाणे. **पायास वहाण बांधणे, बांधलेली असणे** - एकसारखे भटकत राहणे; पायपीट करणे. **पायांचा जाळ, पायाची आग, पायाचे पित्त मस्तकात जाणे** - अतिशय रागावणे; संतापणे. **पायांची बळ भागविणे** - व्यर्थ खेपा घालणे, फिरणे; निरर्थक कार्याला प्रवृत्त होणे. **एका पायावर तयार - सिद्ध असणे** - अत्यंत उत्सुक असणे. **पायउतारा-ऱ्या आणणे, येणे** - नम्र करणे, होणे; तोरा अभिमान कमी करणे, होणे. **पायतळी घालणे**- सपशेल चिरडणे; नाश करणे. **घोड्याच्या, हत्तीच्या पायाने येणे**

**आणि मुंगीच्या पायी जाणे** – (आजारपण, संकट, बिकट परिस्थिती इ.) ही येताना जलद गतीने येणे, पण जाण्यास दीर्घकाळ लागणे. **चहुं, दोहो पायांनी उतरणे** – (शिंगरू, वासरू, पाडा इ.नी) चार किंवा दोन पांढऱ्या पायासह जन्मणे. **जळता पाय जाळणे** – एखाद्या कामात, व्यवहारात, व्यापारात नुकसान होत असताही तो चालू ठेवणे.**पोटावर पाय येणे** – उदरनिर्वाहाचे साधन नाहीसे होणे. **मागला पाय पुढे घालू न देणे** – केलेली मागणी पुरवल्याशिवाय पुढे पाऊल टाकू न देणे; मुळीच हालू न देणे. **मागल्या पायी येणे** – एखादे काम करून ताबडतोब परतणे; त्याच पावली परत येणे.

**पाय** न. पाणी : 'लाकडें रोंडतां रोंडतां तियां कुवाड पायांभ् पोडी।' – भि १५. (भि.) [सं. पय; प्रा. पाय=पाणी]

**पाय** पु. लाकडी पाळे; पडगे. (खा.)

**पाय** पु. लुगड्याच्या किनारीचा एक प्रकार. (तंजा.)

**पायआंग** न. गर्भाशय. (व.)

**पायउतार–रा** पु. नदीतून पायी चालत जाण्यासारखी वाट. वि. १. पायांनी ओलांडून जाता येण्याजोगा. २. पायी चालणारा; पायदळ : 'आम्ही गाडदी लोक केवळ आम्ही पायउतारें' – भाब १००. (वा.) शिवीगाळ, भांडण करणे.

**पायउतारा–रां** क्रिवि. पायी, पायाने (क्रि. येणे, जाणे, चालणे इ.) : 'पायउतारा येइन मागे पळभर ना सोडी।' – सला २०.

**पायकडी** स्त्री. पायातील बेडी : 'तुम्ही हातकड्या, पायकड्या घातल्या.' तोबं १२६.

**पायक(ख) स्त** स्त्री. पायपीट; वणवण; एकसारखे भटकणे.

**पायकस्ता** पु. एका गावी राहून दुसऱ्या गावी शेती करणारे कूळ; ओवंडेकरी: 'दर गांवास छपरबंद व पायकस्ता देखिल करार असे.' – वाडबाबा १.२२९.

**पाय(यी)कस्ता** क्रिवि. पायी जाऊन; पायाने कष्ट करून; ओवंड्याने.

**पायका** पु. (मुद्रण.)एक प्रकारचा टाइप. हा बारा पॉइंट म्हणजे एक षष्ठांश इंच उंचीचा असतो.

**पायका** पु. पायरी. (विरू.) पहा : **पावका**

**पायकाळा** पु. (सामा.) कुणबी; नांगऱ्या; शेतमजूर. (को.)

**पायकी** स्त्री. सेवा.

**पायकोळ** वि. निरुपद्रवी.

**पायखाना** पु. शौचकूप; संडास; पायखिळॉ (गो.) [फा. पाएखाना]

**पायखुंट – टी** पु.स्त्री. जनावर पळून जाऊ नये म्हणून त्याच्या गळ्याला व पायाला मिळून बांधलेली दोरी; ओंडा; लोढणे.

**पायखोळ** पु. १. लाथ : 'कां वैद्यातें करी सळा। रसु सांडी पायखोळां। तो रोगिया जेवीं विव्हळा – । सवता होय।' – ज्ञा १७.१०१. २. पायखाना.

**पायगत** न. स्त्री. १. बिछान्याची पायाकडची बाजू; पायते. २. (डोंगर, टेकडी, शेत इ.चा) पायथा; पायतरा. ३. पलंग, खाट यांचे पायाच्या बाजूकडील गात.(वा.) **पायगत घेणे** – बाज इ. च्या पायागताच्या दोऱ्या ओढून बाज ताठ करणे; ताणणे.

**पायगम** पु. पाया; पूर्वतयारी. (व.) पहा : **पेगम**

**पायगा जहागीर** फौजेच्या सरंजामासाठी दिलेली जहागीर. [फा.पाए+गाह्=दर्जा]

**पायगीर** पु. मासे पकडण्याची एक प्रकारची टोपली.

**पायगुण** पु. (पायाचा गुण) एखाद्याचे येणे किंवा हजर असणे व त्यानंतर लगेच काही बऱ्यावाईट गोष्टी घडणे यांच्यामध्ये जोडण्यात येणारा काल्पनिक कार्यकारणसंबंध; बरे – वाईट फळ; शुभाशुभ शकुन.

**पायगुंता** पु. पहा : **पायगोवा** २.

**पायगोवा** पु. १. पायगुंता; एखाद्या जुंबाड्यात पाय अडकल्यामुळे होणारी अडचण; पायामुळे झालेली अडवणूक. २. (ल.) अडचण; अडथळा; नड; हरकत; आडकाठी; अटकाव : 'निरोपण सुपर्थी आडथळा। पायगोवा वाटे सकळा।' – मुसभा २.९५. ३. पत्ता; थांग; माग.

**पायघडी** स्त्री. लग्नात वरमाय व मानकरिणी यांना त्यांच्या जानवस घरापासून वधूमंडपात आणताना त्यांच्या मार्गावर अंथरण्याची पासोडी (मोठ्या सत्काराचे प्रतीक). हे काम परिटाकडे असते.

**पायघोळ** वि. पायापर्यंत पोचणारे (वस्त्र). क्रिवि. दोन्ही पाय झाकले जातील असे (नेसणे).

**पायचळ** पु. स्त्री. १. अशुभ, अपशकुनी पाऊल; पायगुण; कोणत्याही कार्याचा बिघाड, विकृती, संकटाची वाढ इ. होण्याचे कारण रस्त्यावरून जाणारा एखादा अपशकुनी माणूस किंवा भूत असे समजतात; पायरव. २. चाहूल; पावलांचा आवाज. [सं. पद+चलन]

**पायचा – जा** पु. १. विजारीचा पाय. २. (पर्वत, डोंगर इ. चा) पायथा.

**पायचाळा** पु. १. विनाकारण केलेली पायाची हालचाल. २. अपशकुनी पायगुण; पायचळ.

**पायचाळा** पु. १.(विणकाम) पायांच्या हालचालीमुळे हातमागाला दिलेली चालना किंवा अशा रीतीने चालणारा माग.

**पायचीत** न. (क्रिकेट) चेंडू पायाला लागून (फलंदाज) बाद होणे.

**पायचोरी** वि. धार काढताना मागील पाय वर उचलणारी (गाय, म्हैस इ.).

**पायज(जा)मा** पु. (पायापासून कमरेपर्यंत घालण्याचे पुरुषांचे शिवलेले वस्त्र;) विजार; तुमान; चोळणा; सलवार.[फा. पाएजमा, पायजामा]

**पायजिमी–जि(जी)ब** स्त्री. न. बारीक धागऱ्या असलेला पायात घालण्याचा एक दागिना; तोरडी : 'सोन्याचें पायजिब तळीं।' – राला ५६. [फा. पाएझेब]

**पायटा** पु. १. पायरी. २. विहिरीत उतरण्यासाठी केलेले कोनाडे किंवा बांधीव विहिरीत बांधकामाच्या बाहेर येतील असे पुढे बसविलेले दगड; नारळाच्या झाडावर चढताना पाय ठेवण्यासाठी पाडलेली खाच. ३. पायवाट; पाऊलवाट. ४. (ल.) वहिवाट; पायंडा; प्रघात. (क्रि. पडणे, लागणे, बसणे.) ५. चाकाच्या परिघाचा प्रत्येक तुकडा, अवयव; पाटा. ६. (मोटेच्या विहिरीच्या) थारोळ्याच्या दोन्ही बाजूचे दगड. ७. सायकलीची पाय ठेवण्याची जागा; (इं.) पॅडल, पेंडल.

**पायटांगी** स्त्री. खाली पाय सोडून बसण्याची सोय असणारी बैलगाडी; रेडू.

**पायठ(ठा)ण – णी** न. स्त्री. पायरी. पहा : **पायटा** [सं.पदस्थान]

**पायठा** पु. १. पहा : **पायटा** ५. २. सपाट जमीन भाजून तेथे नाचणी इ. पेरण्यासाठी तयार केलेले शेत. ३. ज्यावर मोटेचे सुळे, बगाडाचे खांब बसवतात ते विहिरीचे, भोके पडलेले दोन दगड. [सं. पदस्थ]

**पायडी** स्त्री. जिना; निसण; सोपान. [सं. पद]

**पाय(ळ)ण** स्त्री. दगडाच्या तटातून गेलेली अरुंद वाट; बोळ.

**पायणी** पु. शेताला पाणी देणारा मजूर, मनुष्य. (गो.)

**पायणू** वि. दलदलीच्या प्रदेशात केलेली व पायांनी तुडविलेली (भात, नाचणी इ.). (को.)

**पायत(ता)ण – न** न. १. जोडा; जूता; कुणबाऊ जोडा;(सामा.) पायात घालण्याचे साधन. २. वहाणा; चेपल्या. (को.) [सं. पादत्राण]

**पायत(थ)र–रा, पायतरता, पायथा–ते–थे** पु. न. पहा : **पायगत**

**पायतांदूळ** पु. अव. १. विवाहाच्या वेळी साधे, स्वच्छ तांदूळ दोन पाटीत, शिपतरात (ब्राह्मणेतरात) किंवा पत्रावळीवर (ब्राह्मणात) ठेवतात व त्यावर नियोजित वधूवरांना लग्नासाठी उभे करतात. या तांदळावर उपाध्यायाचा हक्क असतो, पण ते बहुधा महाराला दिले जातात. २. वधूवरांच्या मस्तकावर तांदूळ, गहू किंवा जोंधळे टाकलेले नंतर एकत्र केले जातात, अशांनाही पायतांदूळ म्हटले जाते. या तांदळावर वेसकर महाराचा हक्क असतो.

**पायते–थे** न. पहा : **पायगत**

**पायथरी** स्त्री. दुकानाच्या पुढे लाकडी किंवा दगडी तीन – चार पायऱ्या असतात, त्यातील प्रत्येक पायरी; पायटा.

**पायदळ** न. पायाने चालणारी फौज; पाइकांचे सैन्य; पदाती. [म.पाय+ सं. दल सैन्य]

**पायदळ – ळी, पायदळणी** क्रिवि. १. जाण्यायेण्याच्या वाटेवर; पायाने तुडविले जाईल असे (पडणे). २. पायाखाली.

**पायदान** न. तांग्याच्या, बैलगाडीच्या मागील बाजूस पाय टेकण्यासाठी केलेली जागा. [सं. पाद+फा. दान]

**पायदामा** पु. १. पक्षी पकडण्याचे जाळे. २. फूस लावणारा पक्षी; ससाणा. [फा. पाय्दाम्; सं. पाद+दाम=दावे]

**पाय(ये)दामी** पु. जाळ्याने पक्षी धरणारा शिकारी.

**पायदोरी** स्त्री. पहा : **पादपाश**

**पायद्दाज** न. पायपुसणे; पायपुसे.

**पायधरणी** स्त्री. पाया पडणे; अत्यंत नम्रतेची, काकुळतीची विनवणी; पराकाष्ठेचे आर्जव.

**पायधूळ** १. पायाची, पायास लागलेली धूळ. २. स्वत:बद्दल दुसऱ्याशी तुलना करताना, बोलताना (गुरू इत्यादींजवळ) नम्रतादर्शक योजावयाचा शब्द. (वा.) **(एखाद्याच्या घरी) ० झाडणे** – (एखाद्याच्या घरी) जाणे, भेट देणे; समाचार घेणे.

**पायना चुल्हा** तळपायाची टाच आणि पंजा यांतील खोलगट भाग. (अहि.)

**पायनाम** वि. सेवक; आधीन.

**पायनामा** वि. १. जर्जर; शरण. २. व्याकूळ; मऊ. ३. पायमाल.

**पायनाळ** न. तसबीर. (गो.)

**पायपाखाणा** स्त्री. वरघोडा; वरयात्रा. [सं. पादप्रक्षालन]

**पायपा(पां)टी** स्त्री. लग्नाच्यावेळी पायतांदळांनी भरलेली पाटी.

**पायपीट–पिटी** स्त्री. विनाकारण झालेले चालण्याचे श्रम; वणवण; इकडे-तिकडे धावाधाव.

**पायपुशा** वि. स्तुतिपाठक; लाळ घोटणारा.

**पायपुसणे–पायपुसे** न. पाय पुसण्यासाठी दारात ठेवली जाणारी काथ्याची जाड गादी; पायद्दाज; पाय पुसण्याचे साधन.

**पायपेटी** स्त्री. हार्मोनियमचा एक प्रकार. पायाने भाता हलविण्याची व्यवस्था असणारी हार्मोनियम (संवादिनी).

**पायपोश – स** पु. (ल.) जोडा; वहाण; चप्पल; पादत्राण. (वा.) **पायपोस जळणे, जाणे, तुटणे** – काही पर्वा, हरकत नसणे. 'एका महारुद्राची सामग्री राधाबाई कघाय लागेल ती पुण्याहून माळशिरसास पाठवील न पाठवील तरी आमचा पायपोस गेला!' – ब्रप २७३. **पायपोस मारणे** – मानहानी करणे; निर्भर्त्सना करणे. **पायपोस दाती धरणे** – अत्यंत लीन होऊन क्षमा मागणे. **पायपोसासारखे तोंड करणे** – फजिती झाल्यामुळे तोंड वाईट करणे; दुर्मुखलेले असणे. **कुणाचा पायपोस कोणाच्या पायात नसणे** – गोंधळ उडणे.

**पायपोशी** स्त्री. दर चांभाराकडून दरवर्षी एक जोडा नजराणा घेण्याचा पाटील–कुलकर्णींचा हक्क.

**पायपोशी** वि. पायपोसाच्या डौलाचे, घाटाचे बांधलेले पागोटे.

**पायपोसखाऊ** वि. खेटरखाऊ; हलकट; अत्यंत क्षुद्र; निर्लज्ज.

**पायपोसगिरी** स्त्री. जोड्यांनी मारणे; दोन पक्षातील व्यक्तींनी केलेली मारामारी.

**पायपोळ** पु. स्त्री. १. (तापलेली जमीन, खडक, वाळू इ. वरून चालल्यामुळे) पाय भाजणे. २. (ल.) मध्यान्हीची वेळ. ३. तापलेली जमीन.

**पायफळे – ळी** न. स्त्री. बस इ. वाहनांमध्ये चढताना पाय देण्यासाठी बसवलेली फळी.

**पायफोडणी** स्त्री. १. रोग्याला घरी पाहण्यासाठी आल्याबद्दल वैद्याला देण्याचे वेतन; वैद्याच्या भेटीचे शुल्क. २. पायपोळ.

**पायबंद** पु. १. अडथळा; बंदी. २. (फौजेच्या पिछाडीवर) हल्ला करून व्यत्यय आणणे : 'रायगडास वेढा पडला, आपण पायबंद लावावा म्हणजे ओढ पडेल.' – मराचिथोशा ३४. ३. संसाराचा पाश. ४. घोड्याचे मागचे पाय बांधण्याची दोरी : 'एक उपलाणी बैसले। पायबंद सोडूं विसरले।' – जै ७६.६०.

**पायबारगिरी** स्त्री. पायदळ शिपायाची नोकरी.

**पायभार** पु. पायदळ : 'अश्वरथ कुंजरा। गणित नाहीं पायभारां।' – कथा १.२.५९.

**पायमर्दी** स्त्री. भराभर ये–जा करणे, चालणे; धावाधावी करणे; एखाद्या कामावर फार खपणे. [फा. पाएमर्दी = धैर्य, निश्चय]

**पायमल्ली–म(मा–मे)ली– मेली** स्त्री. १. पायाखाली तुडविणे; सैन्य, गुरे इ.कांनी केलेली शेती इ.ची नासाडी; नासधूस; तुडवातुडव. २. शत्रूने आपला मुलूख लुटला असता, तहात त्याच्याकडून त्या

लुटीबद्दल घेण्यात येणारा दंड किंवा खंडणी. ३. (सामा.) मोबदला; भरपाई : 'सर्व आमचे कर्ज सरकारांतून कारभारी देतील तेव्हां काय पायमल्ली दहापांच लक्ष रुपये (वजा) घालणें ती घालावी.'– ऐलेसं ९.४८५४. ४. (ल.) दुर्दशा; अपमान; हेटाळणी; अवहेलना. ५. नाश; नुकसान : 'महादजी गदाधर यांनीं दरबारची जुनी राहटी राखिली नाही, याजमुळें पायमाली आहे.'– मइसा ८.२०१. [फा. पाएमाली; सं. पाद+मर्दन]

**पायमळणी** स्त्री. सारखी चाल, घसट, वहिवाट; एकसारखे चालणे; वहिवाट ठेवणे.

**पायमाल** वि. पायमल्ली केलेला, तुडविला गेलेला (माल); उद्ध्वस्त; नष्ट.

**पायमांडा-डे** पु. पहा : **पायघडी**

**पायमोड** स्त्री. १. निघालेल्या मनुष्याला जाऊ न देणे. २. अशी केलेली थांबवणूक.

**पायमोडे** न. १. उत्साहभंग; अडथळा करणारी गोष्ट; उत्साहाचा, आशांचा बीमोड; तीव्र निराशा. २. आयुष्यातील अडचणी, अडथळे, संकटे इ. वाढत्या व्यवहाराची गती कुंठित होण्याचे निमित्त. (वा.) **० घेणे** – (हाती घेतलेल्या कार्यापासून) भीतीने परावृत्त होणे.

**पायर-री** पु. स्त्री. एक वृक्षविशेष; पाईर.

**पायरव** पु. वर्दळ; वहिवाट; दळणवळण; पायंडा.

स्त्री. १. पायतळ; पायदळ; पाय ठेवण्याची जागा : 'रावण जंव भद्रीं चढे। तंव मुकुट पायरवीं पडे।'– भारा बाल ७.५. २. चाहूल. (राजा.) ३. पायवाट; रस्ता. ४. प्रवेश : 'प्रथम चाकरीत येतों म्हणून नम्रतेनें पायरव करून घेतली.'-ऐटि १.२९. ५. पायचळ ; पायगुण :'घरांत आल्याबरोबर लागलेंच करंजाचें सरबत झालें. काय हा पायरव!'– कफा ४. ७. पहा: **पैरव** [हिं. पैरव; सं. पाद + रव]

**पायरवणे** उक्रि. १. पायरवामुळे बिघडणे; दृष्ट लागणे; नजर लागून अन्न वगैरे नासणे : 'पायरवे अन्न। मग करी खेदक्षीण।'– तुगा ३२३९. (को.) २. एखाद्या हरवलेल्या वस्तूविषयी ऐकणे किंवा पाहणे. (राजा.) ३. चाहुलीने किंवा प्रत्यक्षत: आढळणे (मनुष्य).

**पायरस्ता** पु. पहा : **पायवाट** १,३

**पायरहाट** पु. पायाने पाणी लाटण्याचा रहाट.

**पायरावणी** स्त्री. पायधरणी; विनवणी. पहा : **रावण्या** : 'देवकी बैसविली सुखासनीं। लागल्या वाजंत्र्याच्या ध्वनी। विंजण वारिती दोघीजणी। पायरावणीं पदोपदीं।'– एरुस्व १६.३२.

**पायरिक** स्त्री. श्रेणी.

**पायरिका** स्त्री. खडावा. – बदलापूर ५१.

**पायरी** स्त्री. १. शिडी, जिना यावर चढताना एक एक पाऊल ठेवण्यासाठी केलेला आधार; पायठणी; पायटा; टप्पा. २. (ल.) योग्यता; दर्जा; अधिकार; मान्यता. ३. बोरू इ. ची लेखणी करताना शोभेसाठी घेतलेला उतरता तास. ४. (चर्म.) कातडयाचा एक भाग (पाय). (वा.)**०भरणे**– परमावधी होणे; पूर्णतेस जाणे. **पायरीचा धोंडा होणे, होऊन पडणे**– स्वत:च्या योग्य जागी कायम चिकटून असणे. **पायरीपायरीने चढणे**– आज थोडे, उद्या थोडे असे कार्य करीत जाणे. **पायरीवर पाय देणे, पायरीस पाय लावणे**– मर्यादा उल्लंघणे; अपमान करणे; योग्यता नसताना बरोबरीच्या नात्याने वागणे. **आपल्या पायरीवर असणे, (आपली) पायरी धरणे**– स्वत:च्या योग्य जागी असणे, राहणे; स्वत:चा दर्जा सोडून न वागणे.

**पायरी** स्त्री. कलमी आंब्यांपैकी एक उत्तम जात; परेरा नामक गृहस्थांनी या जातीची लागवड केली, यावरून हे नाव. [पोर्तु. परेरा]

**पायरीक** पु. कनिष्ठ जातीचा मनुष्य; अतिशूद्र.

**पायला** पु. शरीर मृदू, असममित असून खंडीभूत नसते असा उभयचर प्राणी.

**पायलाग** पु. १. गुरांच्या पायाला होणारा एक रोग. २. स्त्रियांना होणारी पिशाच बाधा.

**पायली** स्त्री. धान्य मोजण्याचे चार शेराचे एक माप. (बारा किंवा सोळा पायलांचा एक मण होतो. खानदेशात अठ्ठेचाळीस शेरांची एक पायली होते.) (वा.) **०भरणे**– १. (स्वत:च्या गरजा, आयुष्य, भरभराटीची स्थिती इ. चे) माप भरून घेणे; स्वार्थ साधणे; काम करून घेणे. २. एखाद्याला उतरती कळा लागणे. **पायलीचा पसा करणे, होणे**– दुसऱ्याचे धन पळवणे; कमी करून सांगणे; कमी करणे, होणे. **पायलीचे पंधरा**– अतिविपुल; पुष्कळ; फार स्वस्त; क्षुद्र.

**पायली** स्त्री. जात्याच्या वरच्या तळीला धान्य घालण्यासाठी असलेले भोक.

**पायली** स्त्री. धान्य मोजण्याचे परिमाण.

**पायली** स्त्री. १. कंदिलाची काच. (ना.) २. कागदाच्या कंदिलात फिरणारी पायलीच्या आकाराची रचना.

**पायवट** पु. पायातील तोरडी : 'पांई घातले पायवट' – नाम ४७१. [सं. पद]

**पायवटणे** अक्रि. १. रहदारीमुळे किंवा अनेक लोकांच्या येण्या-जाण्यामुळे चोळवटलेली, मळलेली असणे(वाट, रस्ता). २. नेहमीच्या जाण्या-येण्यामुळे एखादी वाट परिचित होणे, अंगवळणी पडणे. [सं.पादवर्तनम्]

**पायवणी** न. ज्या पाण्यात एखाद्या महात्म्याने पावले बुडविली आहेत किंवा धुतली आहेत असे पाणी: 'करितां तापसांची कडसणी। कवणु जवळां ठेविजैल शूलपाणी। तोहि अभिमानु सांडूनि पायवणी। माथां वाहे।'– ज्ञा ९.३७२.

**पायवा** पु. घराचा पाया. (ना.)

**पायवाट** स्त्री. १. जमिनीवरचा, खुष्कीचा मार्ग; भूमिमार्ग. २. पालखी देवालयात शिरण्यापूर्वी धोब्याकडून घालण्यात येणारा धुतलेला पायपोस. (गो.) ३. पाऊलवाट; पायरस्ता. (वा.) **०करणे**– उतरून ओलांडून जाणे : 'पायवाट केले भवाब्धी।'– दावि ३३०.

**पाय(या)स,पायवंस** न. बिछाना इ. चा पायाकडील भाग; पायगत; पायते. (राजा.) [सं.पाद+वंश=बांबू]

**पायस** न. १. खीर; विशेषत: तांदळाची खीर. २. यज्ञातील अवशिष्ट प्रसाद : 'जननी यज्ञजपायसपानें करि, दे सुखा वरा महिला।'– मोरा १.१९६. [सं.]

**पायसगर** पु. पायवाट; पाऊलवाट; पायरस्ता. (खा., व.)

**पायसर** पु. १. पायरी; पाय ठेवण्याची (जिना इ.ची) जागा, फळी. २. पादचारी.

**पायसूट** वि. चपळ; चलाख; भराभर चालणारा.
**पायसोर** पु. पायगुण. (गो.)
**पायळा** पु. लहानसा कोयता; पाळा; पाईळ.
**पायळी** स्त्री. गवत कापण्याचे खुरपे.
**पायंडा** पु. रूढी; परंपरा; शिरस्ता.
**पाया** पु. १. घर वगैरे बांधण्यापूर्वी जमीन खणून तीत दगड, चुना इ. घालून केलेला भक्कम बंदोबस्त; घराचा तळ; जमिनीतले बांधकाम. (ल.) बूड; तळ; बैठक. २. प्रारंभ; सुरुवात. ३. आधार; आसरा; आधारभूत गोष्ट. ४. (भूमापन.) ज्या रेषेला अनुलक्षून लांबी, रुंदी, चढ, उतार इ. मोजतात ती रेषा. (भूमिति.) त्रिकोणाची कोणतीही एक (विशेषत: खालची) बाजू. ५. डोंगराचा, टेकडीचा पायथा. ६. शिरस्ता.
**पायाखायला** वि. (पायाखालील) सापांची भीती, उपद्रव असलेले (अरण्य, रस्ता) (को.)
**पायाखायले** न. १. फुरसे; साप. २. सर्पदंश (को.)
**पायाखालची** वि. नेहमीची; रोजच्या सरावाची.
**पायाचा** वि. पायदळ (शिपाई) : 'पायांचे भिडतां । तोडिति जानिवसे जे ।' - शिव १०४५.
**पायाचा जड** वि. १. हळूहळू चालणारा. २. चांगले चालता न येणारा.
**पायाचा डोळा** घोटा.
**पायाचा नक्की कस** (मल्लविद्या) एक डाव. आपला पाय जोडीदाराच्या बगलेतून जोडीदाराच्या मानेवर घालून मान फिरवून मानेवर घातलेल्या पायाच्या पंजाने मानेस दाब देऊन मारणे किंवा चीत करणे.
**पायाचा नरम** वि. (बायकांप्रमाणे पाय मऊ असलेला) षंढ; नपुंसक.
**पायाचा फटकळ** वि. लाथा मारणारे; लाथाड (जनावर).
**पायाचा हुलकस** (मल्लविद्या) जोडीदाराने खाली येऊन आपला एक पाय धरला असता आपला दुसरा पाय जोडीदाराच्या बगलेतून घालून आपल्या पायाच्या पंजाने त्याच्या कोपराजवळ तट देऊन आपला दुसरा हात त्याच्या बगलेतून देऊन जोडीदाराचा हात आपल्या पायाच्या अटीने धरून तो पाय लांब करून हाताने काढलेला कस जास्त जोराने मुरगळून चीत करणे.
**पायाची मोळी** (मल्लविद्या) एक डाव. (मागे पाय बांधून गड्याला मारणे याला मोळी म्हणतात.) जोडीदाराचा एक पाय उचलून आपल्या मांडीच्या लवणीत दाबून ठेवावा. दुसऱ्या हाताने जोडीदाराचा दुसरा पाय धरून जोडीदाराच्या दोन्ही पायांना तिढा घालून मुरगळून मारणे.
**पायापुरती वहाण कापणारा** वि. कंजूष; अतिशय जपून खर्च करणारा.
**पायाब** पु. नदीचा पायउतार : 'उभयता यमुना पायाब पाहून बोराडीजवळ उतरले.' - दिमरा १.२५७. [फा. पायाब्.]
**पायाभूत** वि. (अशुद्ध समास) मूलभूत; सुरुवातीचे; प्राथमिक.
**पायामोगर** पु. पायदळ : 'पायामोगर चहुंकडे' - उह ५६६. [सं. पद्मुखर]
**पायाशुद्ध** वि. १. मजबूत पायाची (इमारत); योग्य व व्यवस्थित प्रारंभाचा (उद्योग, धंदा इ.). २. काही अपूर्णता, व्यंग नसलेले (कार्य).
**पायाळ–ळू** वि. १. पायाकडून जन्मलेला. २. योग्य; पात्र; लायक : 'ज्यासि आवडे संतसंगाचा मेळू । जो साधुवचनीं अतिभुकाळू । जो पडिलें वचन नेणें उगळू । तोचि पायाळू निजभक्ती ।' - एभा ११.७८४. ३. दर्दी; निष्णात : 'सनंग एकहाती-एकतंत्री- म्हणजे एका पायाळूच्या नजरेखाली तयार झाले तर बळकट व उपयुक्त होतील.' - गांगा २३४. ४. पायदळ. ५. दैवी शक्तीने युक्त : 'विष्णुदास नामा पायाळ भला' - नाम ६०१.
**पायांचा पारवा** (पारव्याप्रमाणे गती असलेला) जलद, भरभर किंवा पुष्कळ चालणारा मनुष्य.
**पायांतर** न. पायरी.
**पायिक** पु. पायदळातील शिपाई; पाईक : 'पायिक पडलें थोर आंदेशी ।' - दावि २३२. [सं. पदाति]
**पायी** स्त्री. १. राहुटीच्या तनाव्यावरचा हातभर लांबीचा भाग. २. पहा : **पाई** ३; राहुटीत येणारे पाणी अडवण्यासाठी तिच्याभोवती खणलेला चर. [सं. पय, पाय=पाणी; पद=पाय]
**पायी** क्रिवि. मुळे; साठी; करिता.
**पायीत** न. सोनाराची जमिनीत पुरलेली, आडवी नळी लावून केलेली शेगडी; पुरलेली बागेसरी.
**पायींत** न. पायतर. [सं. पादांत]
**पायु–यू** न. गुद; मलविसर्जनमार्ग : 'मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार । पायू हे प्रकार । पांच आणिक ।' - ज्ञा १३.१००. [सं.]
**पायेदामी** पु. जाळी टाकून पक्षी पकडणारे : रामचंद्र पायेदामी व माहादजी खापणा लावबाज पाठविले आहेत.' - पेद ८.२७. [फा. पायदामा]
**पार** पु. १. अंत; ठाव; शेवट; मर्यादा; सीमा. २. पलीकडचा काठ, किनारा. ३. नदीतून उतरून पलीकडे जाण्याची वाट; पायउतार. (को.) ४. जमिनीत शिरलेला समुद्राचा भाग. (राजा.) ५. पाण्यात बुडालेला खडक. (गो.)
**पार** पु. काचमण्यांची माळ : 'पाराची गाढी तुटली वो माय' -लोसाको.
**पार** पु. झाडोरा; वड, पिंपळ इ. वृक्षांच्या भोवताली घातलेला ओटा, कट्टा, चौथरा. या ठिकाणी गावकरी सामान्यत: जमतात. यावरून गावचा अड्डा; गावसभा. [सं. प्राकार]
**पार** पु. १. तीन तासांचा काळ; प्रहर. २. (नाविक) पहारा. [सं. प्रहर]
**पार** क्रिवि. १. पलीकडे; ओलांडून; आरपार; मधून. २. पूर्णपणे; साफ; अजिबात. [सं. पारम्]
**पारका** स्त्री. निवळी; निवळीचे बी. [सं. पारक]
**पारकिडा** पु. १. गवतात सापडणारा एक किडा; गुरांच्या पोटामध्ये भयंकर विकार उत्पन्न करणारा एक किडा; किरळ. २. घोड्याचा एक रोग.
**पारख** स्त्री. १. परीक्षा; तपासणी; चाचणी. २. नाणे, हिरा, मोती, माणिक इ. ची किंमत, दर्जा ठरवण्याचे ज्ञान. ३. किंमत, योग्यता; दर्जा.
पु. १. पोतदार; पैसा पारखून घेणारा अधिकारी. २.सावकार : 'त्याचा पारख त्याला कर्ज देईनासा झाला.' - धर्माजी ८. [सं. परीक्षा]
**पारखणावळ, पारखाई, पारखावण** स्त्री. नाणे, हिरा, मोती इ. ची परीक्षा करण्याबद्दल दिलेली मजुरी; पारखण्याची मजुरी; सराफी.
**पारखणी** स्त्री. (नाणे इ.ची) पारख करणे; परीक्षा; तपासणी.
**पारखणे** क्रि. १. परीक्षा करणे; तपासणे. २. (नाणे इ.ची) किंमत, दर्जा

इ. ठरविणे. ३. अजमास करणे. (गो.)

**पारखनीस** पु. पारख करणारा अधिकारी; पोतदार.

**पारखणे सुलाखणे** उक्रि. परीक्षा करून खात्री करून घेणे; अनुभव घेणे; सारासार विचार, न्याय करून ठरविणे.

**पारखा-का** वि. १. परका. २. नवीन; भिन्न; अपूर्व (वस्तू). ३. एखाद्या गोष्टीला अपरिचित, नवीन, परका असलेला; दुरावलेली. ४. विन्मुख. ५. शत्रू: 'कां घरिचियां उजियेडु करावा । पारखियां आंधारु पाडावा ।'- ज्ञा १२.१९८. [सं. परकीय]

**पारखी** पु. १. ज्योतिषी; भूतभविष्य सांगणारा. २. पोतदार; नाणी पारखून घेणारा माणूस, अधिकारी. ३. सराफ; निधिधारक सावकार इ. वरून पडलेले आडनाव.

वि. १. पारख करणारा; परीक्षक; तपासनीस; मर्मज्ञ. २. निवाडा करणारा.

**पारखीव** वि. पारख, परीक्षा केलेला; तपासलेला.

**पारखे** वि. परोक्ष; पाठीमागे; मागे; पश्चात. [सं. परोक्ष]

**पारग-गी** स्त्री. मजुरीची किंवा कामाला जाण्याची सकाळची किंवा दुपारची वेळ. एक पारगी = एक सांज.

**पारगीवारगी** स्त्री. १. आळीपाळी; अदलाबदल. २. खेप; वेळ. (व.)

**पारचा** पु. १. मानाचा रेशमी पोशाख; वस्त्र. २. एक रेशमी कापड : 'दहा पारचे उंच दर ७५ प्रमाणें.'- वाडबाबा २.१५३. [फा. पार्चा]

**पारचा-जा, पारजापरजा** पु. कागदाचा तुकडा; कागदपत्र; चिठोरे. पहा: **पुरजा** [फा. पाचा+पुर्झा]

**पारचित्रदर्शक** पु. कागदावरील/ काचेवरील चित्र पडद्यावर दाखवण्याचे उपकरण.

**पारचे** क्रि. गुण देणे. (गो.)

**पारज** पु. पारा : 'मृत्तिका पाषाण कां पारज प्रतिमेवरी । धरी अत्यंत भावार्थी।' - स्वादि ७.३.२५. [सं. पारद]

**पारटी** स्त्री. पद्धत; रीत; वहिवाट.

**पारठा** वि. १. व्याल्याला पुष्कळ दिवस उलटून गेल्यावरही दूध देणारी (गाय, म्हैस इ.). २. ज्याचे स्तनपान सुटलेले आहे असे (वासरू). ३. चांगले, पक्के, कसदार व मुरलेले (पारठी गाय, म्हैस इ. चे दूध). ४. पाडसा; प्रौढ; वयस्क; पोक्त; पक्व : 'तान्ही आणि पारठी। इया कामधेनूतें दिठी । सूनि जैसिया गोठी । कीजतीना ।'- ज्ञा १.१६७९. ५. पूर्ण तयार (नारळ).[सं. प्रष्ठ= प्रष्ठवाह = शेतीच्या उपयोगी झालेला तरुण बैल.] (वा.) **०पडणे**- शिलकीस पडणे; वाचणे.

**पारडी** वि. मळकट : 'एकें मोहरीं मोरी पारडीं । एके वाघी चितळी पुंडीं।' - दाव २८१.

**पारडी** न. स्त्री. म्हशीचे स्त्रीलिंगी रेडकू; रेडी. (वा.) **० गळ्यात बांधणे**- (ल. एखाद्यावर) कष्टप्रद काम सोपविणे, लादणे.

**पारडू** न. म्हशीचे रेडकू.

**पारडे** न. १. तराजूच्या दोन्ही बाजूंना असलेले वजन किंवा वस्तू ठेवण्याचे पात्र. २. ताक घुसळण्याच्या रवीची दोरी. (वा.) **०जड होणे**- तुलनेने दुसऱ्यापेक्षा, प्रतिस्पर्ध्यापेक्षा परिस्थिती सुधारणे. **०फिरणे** - परिस्थिती विपरीत होणे; सद्यस्थितीत परिवर्तन होणे. **पारड्यात घालणे**- प्रतिदिवशी वजन करून ते कमी भरत जाईल अशा तऱ्हेने अपराध्याचे हाल करणे. मनुष्याचे वजन व मारण्याची दिनसंख्या या मानानुरूप प्रतिदिवशी काही अवयव कापणे : 'पारड्यामध्यें घालणें । कां कडेलोट करणें ।'- दास ३.७.७२.

**पारडे** न. खोरे. (कुलाबा)

**पारण-णा-णी-णे** न. स्त्री. उपवास सोडणे; व्रतानंतर भोजन करणे; आदल्या दिवशी पूर्ण दिवस उपवास करून दुसऱ्या दिवशी भोजन करणे. २. मेजवानी. ३. तृप्ती. (क्रि. फिटणे) [सं.पारणम्, पारण-णा]

**पारणे** अक्रि. मानवणे; हितावह होणे (अन्न, पाणी, हवा, औषध इ.).

**पारणे** अक्रि. दूर बाजूला होणे : 'विळासु होए दाटुगा नागरु : जो नवरसाते म्हणे 'पारु' - मप्र १६६५. [सं.परण]

**पारणेत** स्त्री. (दैवज्ञ) विवाहाच्या वेळी वधूने नेसावयाची रेशमी साडी; वधूवस्त्र.

**पारतंत्र्य** न. दुसऱ्यावर अवलंबून असणे; पराधीनता. [सं.]

**पारत्रिक** वि. परलोकासंबंधीचे; पारलौकिक; दुसऱ्या जगासंबंधीचे : 'हे असतिये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासि अपभ्रंशु ।'- ज्ञा २.२०. [सं. परत्र]

**पारथा** वि. पारोसा; अंघोळ न केलेला. (ना.)

**पारथा** वि. (व.) पहा : **पारठा**

**पारदर्शक** वि. प्रकाशाला पलीकडे जाऊ देणारा, ज्यामधून दुसरा पदार्थ दिसतो असा. उदा. काच, पातळ कागद, वस्त्र. इ.

**पारदर्शन** न.१. अध्ययन. २. अमृतत्व.-पारमा.

**पारदर्शिका** स्त्री. चित्रदीप किंवा चित्रदर्शक यांमध्ये सरकवून घालण्याचे व काढण्याचे काचेवर/सेल्युलाइडवर काढलेले चित्र; (इं.) स्लाइड.

**पारध-धी** स्त्री. १. शिकार; मृगया; अरण्यातील पशू, पक्षी इ. धरणे, मारणे. २. अरण्यातील शिकार करण्याचे, केलेले प्राणी; शिकार. [सं. पापर्द्धि]

**पारधी** स्त्री. १. एक गुन्हेगार जात. यांच्यात फासेपारधी, वाघरी पारधी, गायपारधी, चित्तेपारधी, हरणशिकारी, टकारी असे बरेच पाटभेद आहेत. २. पारध करणारा; शिकारी. [सं. पापर्द्धिक]

**पारपटल** न. डोळ्याच्या उघड्या पृष्ठभागावरील गोलाकार पारदर्शक आवरण.

**पारपती** पु. ग्रामसंस्थेचा, देवस्थानचा शिपाई; पारिपत्यदार.[सं. पारिपत्य]

**पारपत्य** पु. देखरेख ठेवणारा; व्यवस्था पाहणारा. (सामा.) शिपाई; सेवक; चाकर; शिष्य इ. : 'पारपत्ये म्हणती जी संतोष द्यावया राजयाला ।'- सप्र ८.२९. [सं. परि+वृत्त]

न. १. पारिपत्य; शिक्षा; दंड; निकाल. २. धनीपणा; यजमानपणा : 'सकळांचे करावे पारपत्य । आलयाचें करावें आतिथ्य ।'- दास ४.७.२५. ३. रक्षण. [सं.परि+हत्=हल्ला करणे]

**पारपत्र** न. देशाच्या बाहेर जाण्यासाठी दिलेला परवाना; (इं.)पासपोर्ट.

**पारभासी** वि. कमी-अधिक प्रमाणात पारदर्शक.

**पारमार्थिक** वि. १. परमार्थाच्या मागे असणारा; सत्यान्वेषी; ब्रह्माच्या

शोधात गुंतलेला. २. सत्य; खरे; वास्तविक. ३. अध्यात्मविषयक; परमार्थासंबंधी.

**पारमिता** स्त्री. पूर्णत्व.

**पारय** स्त्री. पहार. (को., गो.) [सं. प्रहार]

**पारय** स्त्री. मूत्रवाहिनी. (गो.) [सं. पार]

**पारया** वि. पारोसा; अंघोळ न केलेला. (व.)

**पारयेल** स्त्री. पहाडवेल; गजग्याचे झाड. (गो.)

**पारलेखा** स्त्री. सीमा; मर्यादा : 'तुझिया धनासि नाहीं पारलेखा।'– नागा १८७१. [सं. पार]

**पारलौकिक** वि. परलोकाविषयीचे. [सं. पर+लोक]

**पारवडा** पु. खेड्याचा भाग; पेठ; मोहल्ला; पाडा. (को.) [सं. प्राकार]

**पारवा** पु. १. कबुतराची एक जात; जंगली कबुतर. २. पांढरा व काळा मिळून होणारा रंग.

वि. कबुतराच्या रंगासारखा. [सं. पारावत]

**पारवी** स्त्री. नाचणीची एक जात.

**पारवीचे** स्त्री. न. पारव्या रंगाचे कापड.

**पारशव** वि. अनुलोमज संततीचा एक वर्ग.

**पारशी–सी** पु. इराण देशातील एक लोकराष्ट्र व धर्म; त्या धर्माचा मनुष्य. [सं. पारसोक]

**पारष्णी** स्त्री. टाच : 'पारष्णी कांवरुमूला पीडूनिया।'– ज्ञा १८.१०३०. [सं.]

**पारस** पु. पहा : **परीस** [सं. स्पर्श]

**पारसडणे** अक्रि. झाडावरील पाने नाहीशी होणे; वठणे. (राजा.) [सं. पृज]

**पारसनीस, पारसनवीस** पु. १. दरबारचा फार्शी पत्रव्यवहार करणारा चिटणीस; मुनशी. २. यावरून पडलेले आडनाव. [फा. पार्सी+नवीस]

**पारहेरा** वि. सविस्तर; विस्तारपूर्वक.

**पारळा** पु. तपशील; हकिकत; इतिहास; माहिती. (क्रि. देणे) [सं. पल्लव]

**पारंगत** वि. १. पूर्ण अध्ययन केलेला; हाती घेतलेल्या कामाचा, विषयाचा ज्यास अंत लागला आहे असा. (वा.) **पारंगती मिळणे लाभ(ध)णे** – मुक्ती मिळणे; मरणे: 'कृष्णातीर्थ पुनीत रक्षतगडी पारंगती लाधला।'– भात्रै १०.३, ११५.

**पारंजी** स्त्री. राहुटी, तंबू इ. च्या खांबाच्या माथ्यावर बसवलेली लाकडी तबकडी; वाटोळा तक्ता.

**पारंडा** पु. छप्पराचे आढे व कोपरे.

**पारंपर–रा–री** क्रिवि. परंपरागत; परंपरेने: ' एकाहुनी एक थोर । मुख्य पूजा पारंपर ।'– रामदास स्फुट अभंग १९.

**पारंपरिक** वि. परंपरागत; क्रमाने येणारा.

**पारंपर्य** न. एकसारखा क्रम; परंपरा; माळका; लागोपाठ येणे. [सं.]

**पारं(र)प(पो)ळ** वि. स्वच्छंदीपणाने भटकणारा; वागणारा; स्वैराचारी; मनाप्रमाणे वागणारा. (को., गो.)

**पारंबा** पु. कणगीची दगडी बैठक. (व.)

**पारंबा–बी** पु.स्त्री. १. वड, पिंपरी इ. झाडांची फांदीपासून खाली लोंबणारी मुळे. २. आंब्याच्या बाठीच्या आतील बी; अठळी. [सं. प्रालंब]

**पारा** पु. चांदीप्रमाणे पांढरा, जड, द्रवरूप व लवकर वाफ न होणाऱ्या या धातूचा उपयोग प्रामुख्याने उष्णतामापक यंत्रात केला जातो. [सं. पारद] (वा.) ० **चढणे** – संताप होणे; क्रोधाविष्ट होणे.

**पारा** पु. कोवळा फणस. (को.)

**पारा** पु. घायपात; घायाळ नावाच्या झाडाची पाती.

**पारा** वि. पांढरे-काळे ठिपके असलेला (बैल, गाय इ. प्राणी)

**पारादोज** पु. जोडे, बूट इ. शिवणारा; मोची; चांभार : 'या खेरीज पारादोज असामी येक पाठवून देणे.'– पेद १८.१७३ [फा. पार–दोज़]

**पारायण** न. १. एखादा ग्रंथ, वेद रोज विशिष्ट अध्याय वगैरे वाचून विशिष्ट दिवसांत संपविण्याचा संकल्प करून त्या ग्रंथाचे केले जाणारे वाचन, पठण; पुराणादी ग्रंथांचे साद्यंत वाचन. २. पार जाणे; ओलांडणे; उत्तीर्ण होणे. [सं. पार+अध्ययन]

**पारावत** पु. पारवा नावाचा पक्षी.

**पारावरण, पा(प)रावर्ण** न. वस्त्राच्छादन. पहा : **प्रावरण**

**पारावार–रा** पु. १. अलीकडील व पलीकडील तीर. २. मर्यादा; अंत; शेवट (बहुधा निषेधार्थी प्रयोग). ३. समुद्र : 'मी पारावारातें आलों लंघूनि त्यामाजी।'– मोमंत्र, सुंदरकांड ११९. [सं. पार = पलीकडचा + अवार= अलीकडचा]

**पारिका–खा** वि. अलभ्य; अप्राप्य : 'जैसें कामे कवळिलिया माराकें। विरहिणी भोग होती पारिकें।'– ज्ञाप्र ७६७. [सं. परकीय]

**पारिजात, पारिजातक** पु. स्वर्गातील पाच देववृक्षांपैकी एक; प्राजक्त. यास नाजूक व मधुर सुवासाची फुले येतात. चौदा रत्नांपैकी एक मानले जाते. [सं.]

**पारिजातक** पु. मुलींचा शिवाशिवीचा खेळ.

**पारितोषिक** न. कर्तृत्वावर, प्रशंसनीय कामगिरीबद्दल खूश होऊन कौतुक, गौरव म्हणून दिलेले बक्षीस. [सं.परि+तुष्]

**पारिपत्य** न. शिक्षा; दंड; शासन. [सं.परि+पत्]

**पारिपत्यागार** पु. प्रशासक; योजक; मुत्सद्दी : 'समर्थांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे उत्तम पारिपत्यागार पाहिजेत.'– खेया ३९.

**पारिपार्श्वक** पु. (नाट्य.) कथेचा प्रस्ताव करणारी व्यक्ती; सूत्रधाराचा हस्तक (मारिष) : 'तदनंतर पारिपार्श्वक पडद्यांतून बाहेर रंगस्थलांत येतो.'– कमं १.२१. [सं.]

**पारिबर्ह** पु. लवाजमा : 'शूर ख्यात पळेना नेऊं द्या पारिबर्ह अक्रूर।' – मोकृष्ण ८६.३९. [सं.परिबर्ह]

**पारिभद्र** पु. १. कडुनिंब. २. देवदारवृक्ष. ३. मंदारवृक्ष. [सं.]

**पारिभाषिक** वि. परिभाषेसंबंधीचा; सांकेतिक; शास्त्रात वापरण्याचा.

**पारिये(य)णे** उक्रि. ऐकणे.

**पारिसणे** अक्रि. थांबणे : 'पंडितबासी म्हणितलें : पारिसा' – अस्मृ ७४. [सं. परि+श्रम्]

**पारी** स्त्री. पायरी : 'बळकट भावार्थ पाऱ्या यास। आचार भिंतीसं सद्भक्ति।' – भाए ४९७.

**पारी** स्त्री. १. केळफुलाच्या बाहेरील जाड आवरणांपैकी प्रत्येक.

२. केळफुलाच्या पोटातील फण्यावरच्या आवरणांपैकी प्रत्येक. ३. मोदकाचे,करंजी, कचोरी इ. चे सारण भरण्यासाठी केलेले आवरण. ४. आच्छादन; आवरण. ५. आंब्याची कोय; बाठ.

**पारी** स्त्री. १. धान्यावर पडणारी कीड : 'जेथ मंगळाचिया अंकुरीं। सवेंचि अमंगळाची पडे पारी। ' – ज्ञा ९.५०३. पहा : **पोरा**

**पारी** क्रिवि. प्रहरी; वेळी. उदा. दुपारच्या पारी.

**पारीख** क्रिवि. पारखे; निराळे; मोकळे : 'कर्जापासून पारीख झाला।'– ऐलेसं ८६२. [सं. परकीय]

**पारीण** वि. पारंगत; तज्ज्ञ; पंडित; माहीतगार : 'आमच्या देशीं मायेचे पारीण मानिले गेलेले हे गृहस्थ...'– देशीभाषा ८. [क.]

**पारीपळ** वि. फरार; परागंदा; पळालेला.

**पारी(रे)स** पु. सहाण; गंध उगाळण्याचा एक विशिष्ट प्रकारचा कुरुंदाचा वर्तुळाकार किंवा चौकोनी दगड. (ना., व.) [हिं. पारस]

**पारु** पु. कापडाचा लांब डेरा. (तंजा.)

**पारुका** पु. पाळी; खेप; उसाच्या गुऱ्हाळातील चालू चरकाचा दोन मांदणे रस निघेपर्यंतचा काल. [सं. प्रहर]

**पारु(खू)खणे** उक्रि. १. वाट पाहणे; थांबणे : 'ऐणें कैवल्य नाथें वीण। पारुखें ना आगमन।'– दाव २५१. २. स्थिर राहणे : 'हें असो दिठी जयावरी झळके। कीं हा पद्मकरु माथां पारुखे। तो जीवचि परि तुके। महेशेंशीं।'– ज्ञा १०.९. [सं.प्रति+ईक्ष्]

**पारुखणे** उक्रि. स्पर्श करणे. [सं. स्पर्श]

**पारुखणे** अक्रि. खिन्न होणे; रुसणे; रागावणे : 'जो यथालाभें तोखे। अलाभें न पारुखे। पाडसेंवीण न सुके। समुद्रु जैसा।'– ज्ञा १२.२१०. [सं. परुष–पारुष्य, प्र+रुक्ष्]

**पारुखणे** अक्रि. नष्ट होणे; लोपणे. 'सद्भावें भगवत्परिचर्या। करितां पारुखे कर्मक्रिया।'– एभा ३.६०४.

**पारुखणे** अक्रि. पारखा होणे; चुकणे : 'ऐसें ईश्वरकृपेवीण। काहीं न पारुखें भ्रमण।'– ज्ञाप्र २४८.

**पारुखा** पु. हेर. – ख्रिपु.

**पारु(रि)खा** पु. १. पाहुणा. २. शत्रू.

**पारुडके** न. (चर्म.) पारडाचे, म्हशीच्या रेडकाचे कातडे.

**पारुण** पहा : **पारखा**

**पारुष** न. पहा : **पारुष्य**

**पारुषण** न. माघारे फिरणे; परतणे.

**पारुषणा** वि. फिका; निस्तेज.

**पारु(रू)षणे** उक्रि. १. शिळा होणे; बेचव होणे. २. फिके पडणे; निस्तेज होणे : 'बाळ सूर्याची ही ओप। जया पाहतां पारुषे।'– मुसभा १४.४९. ३. बंद पडणे; थांबणे; खुंटणे : 'आणि विधिनिषेध आघवे। पारुषती।'– ज्ञा १.२४६. [सं.पर्युषित]

**पारुषणे** उक्रि. तुच्छ करणे. [सं. परुष, पारुष्य]

**पारुष्य** न. कठोरपणा; कठीणपणा (भाषण, वागणूक इ. तील) : 'तो मनुष्यांत अधमु जाण। पारुष्यातें अवतरण। आतां आईक खूण। अज्ञानाची।'– ज्ञा १६.२४५. [सं.]

**पारू** न. दव. (मावळ.)

**पारे(रो)ज** पु. पारा. (गो.)

**पारेरा** पु. आठवण; स्मरण : 'स्वहित घडाया जनालागीं। घडीघडी पारेरा देती योगी।'– दावि ३५०. [सं.प्र +स्मृ]

**पारेषण** न. १. पारदर्शक पदार्थातून प्रकाश पलीकडे जाण्याची क्रिया. २. प्रसारण. ३. क्षेपण.

**पारो** पु. कच्ची किंवा अर्धवट भिंत.

**पारोशी, पारोशी घोसाळी–दोडकी, पारोसे घोसाळे** गिलके; घोसाळ्याची एक जात.

**पारोसा, पारसा–सी, पारुसी** वि. १. धुणे, स्नान, घासणे इ. संस्कार ज्यावर केलेले नाहीत असे (वस्त्र, भांडे, माणूस, तोंड). २. शिळा (घरात साठलेला केर); (आधीच्या दिवशी आणलेले) पाणी, फुले इ. ३. अद्याप न झाडलेले, सारविलेले (घर, अंगण, चूल इ.). [सं.पर्युषित]

**पारोसा पिंपळ** १. पिंपळाच्या जातीतील एक वृक्ष. कोकणात यास मणेर; अष्टा, कडेपाईर असेही म्हणतात. २. (ल.) कोणालाही चिकटून न राहणारा, बेपर्वा मनुष्य; ज्याला आईबाप, मुलेबाळे नाहीत किंवा ज्याच्यावर कोणी अवलंबून नाहीत असा फटिंग मनुष्य.

**पारोळा–ळे** पु. न. पाभर किंवा मोघण ह्या औताच्या दात्याचे टोक; टोपण. पहा : **फारोळे**

**पारॉ** पु. कोवळा फणस. (को.)

**पार्चा** पु. १. मांसाचा लहान व चपटा तुकडा. २. वस्त्र, पोशाख. पहा : **पारचा** [फा.पार्चा]

**पार्ट** पु. १. नाटकातील भूमिका; वेष; सोंग. जसे :–स्त्रीपार्ट इ. २. (यंत्राचा) सुटा भाग.

**पार्टी** वि. नाटकातील भूमिका घेणारा, पार्ट करणारा; पात्र; वेषधारी. उदा. स्त्री – देव – राक्षस पार्टी.

स्त्री. १. पक्ष; बाजू. २. तुकडी; संघ; समूह. ३. आसामी; व्यक्ती.

**पार्टी** स्त्री. उपाहार; मेजवानी.

**पार्ण** पु. ज्यात पुष्कळ जुनाट झाडे असतात अशी सोडलेल्या घरांची जागा. (गो.) [सं. पर्ण]

**पार्ता–र्था** वि. पारोसा; आंघोळ न केलेला. (झाडी)

**पार्ती** स्त्री. गाभण गाय; बरेच दिवसांपासून दूध न देणारी गाय. (झाडी).

**पार्थक्य** न. पृथकपणा; भिन्नपणा; वेगळेपणा. [सं.]

**पार्थिव** पु. राजा; राजपुत्र.

न. नित्यपूजेसाठी केलेले मातीचे शिवलिंग.

वि. १. पृथ्वीसंबंधी; पृथ्वीपासून उत्पन्न झालेला; मातीचे; मृण्मय. २. (ल.) जड; नाशवंत. ३. भूगोलासंबंधी; भौगोलिक.४. (ल.) मृतदेह. [सं.]

**पार्दाव** पु. एक जुने नाणे. (गो.)

**पार्यता** स्त्री. एखाद्या गोष्टीत शिरून पसरण्याचा गुण; भिनणे.

**पार्यातक** पु. पारिजातक : 'वनोवनीं चापेयाचीं झाडें। परि नाहीं पार्यातुक।'– उगी ५१५. [सं. पारिजातक]

**पार्लमेंट** न. १. ब्रिटिश साम्राज्याचे राज्यव्यवस्थामंडळ. यात हाऊस ऑफ लॉर्ड्स व हाऊस ऑफ कॉमन्स अशी दोन कायदेमंडळे असतात. २. कायदेमंडळ; सल्लागार मंडळ; (इं.) कौन्सिल.

**पार्वण** न. १. पर्वकाळसंबंधाचे नैमित्तिक पितृश्राद्ध. २. बाप-आजा-पणजा-आई-आजी-पणजी-आईचा बाप-आईचा आजा-आईचा पणजा या प्रत्येक त्रयीस पार्वण असे म्हणतात.

**पार्श्व** वि. १. शरीराच्या एका बाजूचा; कुशीचा. २. जवळचा.[सं.पार्श्वम्]

**पार्श्वअभिनय** (नृत्य.) कुर्शीनी दाखविलेला अभिनय. नृत्यात नत, उन्नत, प्रसारित, विवर्तित व अपसृत अशी पाच पार्श्वकर्मे आहेत.

**पार्श्वक, पार्श्वानुचार** पु. १. चाकर; सेवक; देहसंरक्षक; हुजऱ्या. २. भालदार; चोपदार. [सं.]

**पार्श्वक्रांत (आकाशीचारी)** न. (नृत्य.) दोन्ही मांड्या हलवून किंचित पाय उचलून बाजूस टाकणे.

**पार्श्वगायन** न. पडद्यावरील नट-नटींची गाणी गायक-गायिकांनी म्हणणे.

**पार्श्वचित्र** न. चेहऱ्याच्या एका बाजूचे चित्र.

**पार्श्वछेदक(अंगहार)** न. (नृत्य.) हात वक्षस्थळावर निकुट्टित करणे व ऊर्ध्वजानू, आक्षिप्त व स्वस्तिक ही करणे. नंतर त्रिक फिरविणे; नंतर हात उरोमंडल करून नितंब व करिहस्त व कटिच्छिन्न ही क्रमाने करणे.

**पार्श्वजानु(करण)** न. (नृत्य.) एक पाय सरळ ठेवणे, दुसरा पाय दुमडून त्याचे पाऊल त्याच पायाच्या मांडीच्या मागच्या बाजूस लावणे, म्हणजे गुडघा बाजूस येतो.

**पार्श्वपथ** पु. फलाट.

**पार्श्वभाग** पु. १. (माणूस, इमारत इ.चे) कडेचे, बाजूकडील भाग. २. (स्थापत्य.) बाजूची उभारणी.

**पार्श्वभूमी** स्त्री. १. एखाद्याची आधीची स्थिती; एखाद्या व्यक्तीचे समाजातील स्थान, शिक्षण, अनुभव इ. २. उठाव देण्यासाठी केलेले वर्णन किंवा काढलेले चित्र. ३. समुद्र किंवा नदीकिनाऱ्यापासून दूर असणारा वस्ती नसलेला प्रदेश.

**पार्श्वमंडल** न. (नृत्य.) दोन्ही हात वर करून वाटोळे फिरवून बाजूस आणणे.

**पार्श्वमुख** न. (नृत्य.) मान पुरती, सबंध एका बाजूस वळवणे.

**पार्श्वमेंदू** पु. अग्रमेंदू व मध्यमेंदू यांना मज्जारज्जूंशी जोडणारा भाग.

**पार्श्वरेषा** स्त्री. माशांच्या पाठीवरची त्यांना संवेदनांतून ज्ञान करून देणारी रेषा.

**पार्श्वशूल** न. कुशीतील, छातीतील कळ, चमक, उसण.

**पार्श्वसंगीत** न. नाट्य अगर चित्रपट, धारावाहिक इ. तील दृश्यांच्या वेळी आजूबाजूला अगर पडद्याआड वाजवले जाणारे संगीत.

**पार्श्वसूचक** पु. नटाला संवाद बोलताना पडद्याआडून मदत करणारा;(इं.) प्रॉम्टर.

**पार्श्वस्वस्तिक** न. (नृत्य.) पार्श्वस्वस्तिक पाय करून अर्धनिकुट्टक करणे. मग हीच क्रिया त्याच क्रमाने, दुसऱ्या बाजूस वळून पुन्हा करणे व हात फिरवून मांडीच्या मागे ठेवणे. नंतर आक्षिप्त नितंब, करिहस्त व कटिछिन्न ही करणे करणे.

**पार्षद** पु. १. सेवक; चाकर; नोकरवर्ग : 'काठीकर दोघे प्रबळ। पार्षद उभे असती।'- गुच २९.११९. २. विष्णूच्या परिवारातील नंद-सुनंदादिक गण. [सं.]

**पार्ष्णिक** पु. टाच; खोट. [सं.]

**पार्सल** न. गठ्ठा; डाग; एका गावाहून दुसऱ्या गावी पोस्ट, रेल्वे, बस इ. नी माल पाठविताना सोयीसाठी त्याचा केलेला गठ्ठा. [इं.]

**पाऱ्हेरा-ळा** पु. १. सविस्तर हकिगत, इतिहास; वृत्तांत. २. कंटाळवाणी व लांबलचक गोष्ट; पाल्हाळ; चऱ्हाट.

**पाल** स्त्री. सरड्याच्या जातीचा एक सरपटणारा प्राणी. आपल्या तोंडातील विशिष्ट चिकट लाळेच्या जोरावर किड्यासारखे प्राणी विनात्रास गिळू शकते. पाल चुकचुकणे हे अशुभ चिन्ह मानतात. [क. पल्ली]

**पाल** पु. संशय; किंतु; शंका. (क्रि. पडप) (गो.)

**पाल** न. १. दोन बाजू उतरत्या ठेवून पुढील व मागील भाग उघडा राहील अशा तऱ्हेने तंबूप्रमाणे उभारलेले लांब रुंद व जाड कापड; उघड्या जागेतील दुकानांवर आच्छादनासाठी टाकलेले तरट, गोणपाट किंवा जाड कापड. २. पाच - दहा सुताडे एकत्र जोडून - बैठक, सावली इ. साठी केलेले मोठे वस्त्र; जाजमाचा एक प्रकार. ३. पहिल्या प्रकारचा लहानसा तंबू; एक राहुटी. ४.(ल.) दुकान. [सं.पटलम्] पु. १. लढाऊ गलबताचा एक प्रकार : 'इंग्रजाचे पाल आहेत त्यांजवर बेजरब घालून पाल शिकस्त केले तर...'- समारो २.२१. २. शीड; कनात, पडम. ३. कराची सूट; माफी : 'तरी आकार होईल त्यापैकीं चौथाई यार्शी पाल देणे.'- वाडबाबा २.११२. ४. मासे पकडण्याचे एक जाळे (को.). ५. रताळ्यावरील एक प्रकारची कीड. ६. झाडाची कोवळी पाने; अंकुर. (क्रि. फुटणे, निघणे, येणे, होणे.) [सं. पल्लव]

**पालक** वि. पाळलेला; पालकपुत्र; ठेवणाइत.

**पालक,पाल** वि. पालनपोषण, रक्षण करणारा.

**पालक** न. करमुक्त; करमाफ.

**पालक-ख, पालंकी** स्त्री. पु. १. भारतात सर्वत्र लागवड केली जाणारी व सर्व ऋतूंत पीक घेता येणारी एक पालेभाजी. लांब पाने, लोहाचे प्रमाण पुष्कळ. २. बडीशेपेचा पाला; शेपालक. [सं.पल्लव]

**पालक** पु. १. बाजारातील पालावर घेण्यात येणारा एक कर. २. (पालातील) दुकानदार. ३. ज्याला करमाफी आहे असा इसम, त्याचे घर किंवा गलबत.

**पालक** पु. (गुरे इ.) पाळण्याचा खर्च.

**पाल(ल्ल)क-ख** पु. पाळणा; पालकी; पालखी. [सं.पर्यङ्क]

**पालक(ख)ट-त,पालखतखंड** स्त्री. मांडी घालून बसण्याचे आसन : 'चतुर्मुखाचिये पालखती जवळि। बैसले होते।'- उगी ६६९.[सं. पल्यंक]

**पालकरी** पु. पाल उभारून त्यात आपला माल मांडणारा वाणी किंवा त्यात राहणारा मनुष्य.

**पालकांडे, पालकांडे वेल** न. स्त्री. एक प्रकारचा वेल. ह्याचे तंतू घट्ट व मजबूत असून त्याचा गठ्ठा, भारा इ. बांधण्यासाठी उपयोग करतात.

**पालकुना** पु. चांभाराच्या अरीला धार लावण्याचा, काळ्या रंगाचा दगड. हा सावंतवाडी संस्थानातील साकळी मणियारमध्ये सापडतो. सोन्याचा कस पाहण्यासाठी याचा उपयोग होतो. (कु.)

**पालकोयती** स्त्री. जहाजावरील तांडेलाचा टहाळ तोडण्याचा लहान

कोयता; सावंतवाडीकडे याचा शस्त्रासारखा उपयोग केला जातो.

**पालख–क** स्त्री. १. (परीक्षेसाठी) विस्तवात घालण्यापूर्वीचे सोने, चांदी इ. चा तुकडा कानशीने घासणे; अशा तऱ्हेने घासून केलेली खूण. (क्रि. घालणे). २. भट्टीतून बाहेर काढलेल्या गरम सोन्यावर पाणी घालणे; नवेपणा व चकाकी देणे. (क्रि. घालणे)

**पालखणे** सक्री. सोने, चांदी इ. तापवून त्याची परीक्षा करणे.

**पालखती** स्त्री. मांडी घालून बसणे; मांडी : 'तेही पालखती मोडिलीया'– लीचपू २१०.

**पालखी** स्त्री. १. राजा, प्रतिष्ठित लोक इ. च्या प्रवासासाठी माणसांनी वाहून नेण्याचे, वर धनुष्याकार दांडी असलेले एक लाकडी वाहन. डोलीसारखे एक यान; शिबिका. २.(ल.) तिरडी . [ हिं.;फा. पाल्की; सं. पर्यंकिका]

**पालखी** स्त्री. लहान मुलांचा एक खेळ.

**पालखीनशीन–पदस्थ** वि. पालखीचा मान असलेला (बडा सरदार).

**पालज** स्त्री. काकडी, खरबूज, कलिंगड, भोपळा, कोहळा, दुध्या इ. जातीच्या फळवेलींची लागवड. [फा. पालीज्, फालीज्]

**पालट** पु. १. पाळी; खेप; बारी; आलटापालट; अदलाबदल (काम, श्रम, मनुष्य इ.ची). २. बदल; भिन्नता; निराळेपणा. ३. फरक; स्थित्यंतर. ४. (जंबिया) आपल्या हातातील जंबियाने जोडीदाराच्या उजव्या पायाच्या आतील घोट्यावर मारणे. ५. बलुत्याच्या न्हाव्याने येऊन हजामत करण्याचा दिवस.

क्रिवि. मोबदला; बदला; ऐवजी : 'जेवीं कां चिंतामणीचियेसाठीं । मागें चातीलागीं खापरखुंटी । कां परीस देवोनि पालटी । काळी गोमटी वीट मागें ।'– एभा १८.५८. [गु. पालटो; हिं. पलटा; सं. पर्यस्त]

**पालटणे** उक्रि. बदल, फरक करणे, होणे; फेरबदल, अदलाबदल करणे; (दुखणे) माघारी येणे; उलटणे. [सं. परि+अस्]

**पालटणे** उक्रि. १. दुसऱ्या बाजूला वळवणे; वळणे; फिरणे. २. बदलणे; एक टाकून त्याच्या जागी दुसरे घेणे; स्वीकारणे. (मार्ग, रीत, पंथ यात). फरक करणे; बदलणे (पहारा इ.). ३. (ल.) वेगळे भिन्न करणे. ४. दुखणे उलटणे. [सं. प्रवर्तन]

**पालटवाणी** स्त्री. (अन्न, स्थल, उद्योग इ.चा) बदल; फरक; पर्याय.

**पालटवाणी–णा** क्रिवि. (हवा, अन्नपाणी, उद्योगधंदा इ.चा) फेरबदल करण्यासाठी.

**पालटवाणे** न. १. नेहमीच्या अन्नात काही फरक करून त्याला रुची आणणे; खाण्यापिण्यातील बदल. २. (ल.) नेहमीचा मार्ग, चाल, रीत, पद्धत इ. बदलणे. (क्रि. करणे)

**पालटी–टे** स्त्री.न. भात ठेवण्यासाठी चार-पाच बांबूंच्या भोवती तट्ट्या लावून केली जाणारी तात्पुरती कणिंग; कणगी; पाले. (को.)

**पालटीव** वि. पालट, बदल केलेले; बदललेले; अदलाबदल केलेले.

**पालटे** क्रिवि. बद्दल; ऐवजी : 'ज्यांचिया आवडीच्या लोभा । भगवंतू पालटें आला गर्भा ।' – एभा २.२३४.

**पालट्या** पु. (ल.) न्हावी; पालटाच्या दिवशी येऊन हजामत करणारा. (को., बा.)

**पालड** न. तराजूचे पारडे : 'पालडां घालिती : केणें तुकिती' – गोप्रच ५३ [क.पदु]

**पालणूक** स्त्री. जकातीमधील देशपांड्यांचा हक्क; करापासून माफी. पहा: **पाल** पु.४

**पालती** पु. भाव.

**पालथणे** उक्रि. पालथे, उपडे करणे, होणे; दुसऱ्या बाजूवर करणे; उलटून टाकणे; उलटणे. [सं. परि+अस्]

**पालथा** वि. ज्याचे तोंड (किंवा वरची बाजू) खाली झाले किंवा केले आहे असा; उपडा. [सं. पर्यस्त](वा.) **० घालणे**– धुंडाळणे; शोधणे. २. पराजित करणे; पराभूत करणे; एखाद्याचे सपशेल नुकसान करणे.

**पालथा तांब्या** (ल.) विटाळशी बसणे.

**पालथी सूज** प्रथम ढुंगणाजवळ येणारी व नंतर मांड्या, पाय व सर्व शरीरभर पसरणारी सूज.

**पालन** न. १. रक्षण; संगोपन; पोषण; संवर्धन; सांभाळणे. २. (व्रत, वचन, प्रतिष्ठा इ.) पाळणे, पूर्ण करणे, राखणे, पुरी पाडणे. [सं.]

**पालनपोषण** न. संरक्षण व संगोपन; सांभाळ व संवर्धन. [सं.]

**पालभारा** पु. १. झाडांच्या पाल्याचा भारा. २. हा गावात विक्रीला आणला असता त्यावर घेण्यात येणारी जकात.

**पालमत्री** स्त्री. लाकडाची थापटी.(गो.) [पोर्तु. पुलमातोरी]

**पालमांडी** स्त्री. व्यभिचारी स्त्री; वेश्या. (अहि.)

**पालमांडे** न. आरतीचे ताट : 'नागांबा उष्णोदक पालमांडें आणीत.'– पूजावसर.

**पालय** स्त्री. भाताची पालवी; कोवळे अंकुर, पाने. [सं. पल्लव]

**पालव** पु. १. झाडांच्या शेंड्याला फुटलेली कोवळी पाने व अंकुर; पालवी. झाडाची कोवळी फांदी; कोवळ्या पानांचा व अंकुरांचा झुबका, तुरा. २. (शेला, लुगडे इ.चा) पदर; डोक्यावरचा पदर. ३. (ल.) दृष्ट : 'कीं लागला पालव पापिणीचा ।' –सारुह २.९३. ४. वस्त्राच्या पदराने दूरच्या माणसाला केलेली खूण. ५. (ल.) मर्यादा; सीमा; हद्द; कड; काठ; शीव. ६. (ल.) भिंतीच्या पुढे आलेला घराच्या छपराचा भाग. ७. (ल.) गोष्ट, मनोरंजनात्मक वृत्तांत इ. सांगताना तो जास्त रंगविण्यासाठी त्यात घातलेली भर. ८. नाते; सोयरीक; विवाहसंबंध; पदर; घरोब्याचा संबंध (क्रि. मिळणे, भिडणे, लावणे). ९. कुटुंबात अनेक पुरुष जन्मल्यामुळे झालेला विस्तार; वंशविस्तार. १०. आच्छादन; आवरण; पदर : 'यज्ञोपवीत कानीं ठेवोनी । डोईस पालव घालूनी ।'– गुच ३६.१३०. ११. फडके; चिरगूट; चिंधी; वस्त्राचा लहान तुकडा. १२. (ल.) ऋतू; न्हाण; पदर. १३. (ल.) पिच्छा; नाद; आधार. १४. बैलांना मारण्याची दोन–अडीच फूट लांब व दीड–दोन इंच घेराची काठी. (अलिबाग, को.). १५. हातभर लांबीचा मासा. (को.). १६. (कासारी धंदा) भांड्यांच्या अगदी वरच्या काठाच्या करकोच्याचा पत्रा. १७. दळणाऱ्याला साहाय्य, मदत. (गो.) १८. बांबूच्या बारीक काठ्या दोऱ्यांनी विणून केलेले जाळे; कडसरी. (गो.) १९. रुंद पाटली. (गो.) २०. (ल.) दया; कळवळा. २१. (ल.) इंद्रियांचा स्वभाव.

स्त्री. १. मदत. (गो.) २. वालाच्या दोरीचे, वेलाचे शेवटले टोक. (कु.) [सं. पल्लव]

**पालवकरीण** स्त्री. नहाण आलेली व पदर घेणारी स्त्री; पदरकरीण.

**पालवट** न. पालवी; अंकुर. [सं. पल्लव]

**पालवणी** न. दुखण्यातून उठलेल्या माणसाला प्रथम स्नान घालण्यासाठी औषध, कडुनिंब इ. घालून तापवलेले पाणी.

**पालवणी** स्त्री. पहा : **पालव** ५

**पालव(वि)णे** उक्रि. १. झाडाला अंकुर फुटणे; नवीन पालवी येणे. २. वस्त्राच्या पदराने किंवा हाताने बोलावणे; खुणावणे : 'आला घेऊनियां यमुने बाहेरी। पालवितो हरी गडियांसी।'– तुगा ५३. ३. पदराने दिवा मालविणे; पदराने (माशा, धूळ इ.) उडवणे. ४. विस्तार करणे; मोकळे करणे : 'तो पालविजेल मुडा। प्रमेयबीजांचा।'– ज्ञा ६.४८९. ५. प्रकट करणे : 'न दिसणें दिसणेंनसीं मावळवी। दोहीं झांकिलें तें सैंध पालवी।' –ज्ञा १६.१५. ६. सत्कारणे; संतोषविणे : 'अन्नार्थी आल्या सत्कारून पालविला।'– प्रला २१०. ७. पदराखाली घालणे; झाकणे. ८. अभय देणे. ९. मदत करणे. १०. काबीज करणे. ११. डोलविणे; झोके देणे; लाड करणे; आळविणे: 'गुणें गोविंदें मला दाहा वेळ पलंगावर पालवा।'– प्रला ९७. [सं. पल्लव]

**पालवदार** पु. गोव्याकडील एक समाज . (को.)

**पालवफकीर** पु. प्रथम पतीचे पिशाच. (गो.)

**पालवसाती** स्त्री. कापडाची पताका; निशाण : 'झळंबति पालव-सातिया। पाखेयांचिया।'– उगी ४४१.

**पालवा** पु. १. झाडाची तोडलेली हिरवी फांदी; फोक; लहान काठी. (को.). २. (सुतारकाम) दोन लाकडांचे भाग एकत्र करणाऱ्या सांध्यांच्या प्रकारांपैकी एक. ३. एक हत्यार. ४. बोंब; दवंडी.

**पालवी** स्त्री. १. कोवळी पाने; अंकुर. २. (ल.) आजारातून उठलेल्या माणसाच्या शरीरात येणारी नवी शक्ती, जोम, तजेला इ. (क्रि. येणे, फुटणे). ३. (ल.) एखाद्याची सांपत्तिक स्थिती सुधारून झालेली भरभराट. (क्रि.येणे, फुटणे) ४. हाकेला उत्तर. ५. वहीत जमिनीतील निरुपयोगी झुडपे. (व.) ६. भाताची पाती. (कु.) ७. उपकुलदेवता. (गो.) ८. आच्छादन. ९. कृपा; प्रेम.

**पालवी** क्रिवि. खाली.

**पाल(ख)षती** शअ. जवळ; बाजूला : 'विघ्नेश्वराचीये पालषती।'– उषा ९.९५. [सं. परिपार्श्वत:]

**पालसेण** न. कडा. (गो.)

**पालसॉ** वि. तिरकस; कललेला. (गो.)

**पालंपटी** स्त्री. सवलतीने वहितीस मिळालेली शेतजमीन.

**पाला** पु. १. झाडांची पाने; पाचोळा; पानांचा समुदाय; पाने, कोवळे अंकुर इ. चे झुबके इ. २. (ल.) समूह; समुदाय : 'राक्षसांचा यज्ञांत उठे पाला।'– आराम ११.३. देवाला वाहण्याची पत्री : 'पालेआ फळा सूंक'– आंबे शिला II १.४१. [सं. पल्लव](वा.) ० **खोलणे** –बिंग बाहेर काढणे. (ना.) ० **भरवणे** – दु:ख, पीडा देणे : 'दैवें मृतपुत्र विपच्छ्मेचा तीस भरविला पाला।' – मोस्त्री ४.१३. ० **होणे**– (वाळलेल्या पाल्याप्रमाणे) शुष्क होणे; निस्तेज होणे : 'मृदुलत्व म्लानत्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला।'– मो विराट ३.७७.

**पाला पु.** कच्च्या कडाचे लोणी. (पुणे)

**पालाटणे** न. (नाभिक) धार लावण्यांचा कातडी पट्टा; लपाटणे.

**पालाण** न. आच्छादन; खोगीर : 'मुंगीवरी भार गजाचें पालाण। घालितां ते कोण कार्यसिद्धि।'– तुगा ३५२५. पहा : **पलाण.** [सं. पल्ययन;प्रा. पल्लाण; फा. पालान्] (वा.) ० **पडणे**– वर्चस्व मिळविणे : 'राज्यांची अनेक बंडें जालीं। गो ब्राह्मणावरी पालाणें पडिलीं।'– स्वादि ९.१.७५.

**पालाणणे** उक्रि. १. खोगीर चढवणे; घोड्यावर पलाण घालून सज्ज करणे; तयार ठेवणे: 'प्राणापान जिणती पैजा। तैसें वारू पालाणीं।'– एरुस्व ४.२९. २. जोडणे; सज्ज करणे; सिद्ध करणे; अंगावर घालणे : 'रत्नमणीचीं बाळ लेणीं। पालाणिलीं अरुवारें।'– मुसभा ४.१०७. ३. (ल.) तरंगायला लावणे; पसरणे : 'जळनिधिवर यांनीं शैल पालाणवावें।'– मुरा १.४४. ४. आच्छादणे. ५. बोलावणे : 'पालाणवी मग दळाप्रति शीघ्र काळें।'– माधव रामायण बाल २.९.

**पालाणापालाणी** स्त्री. तयारी; सिद्धता; सज्जता : 'मग झाली पालाणापालाणी। पारधी निघाले तीन क्षोणी।'– कालिकापुराण १४.२१९.

**पालादार, पालाभरू–री** वि. पुष्कळ पाला, पाती असलेला (कडबा वगैरेची ताटे); पाल्यांनी युक्त.

**पालापट्टी** स्त्री. शेतात पिकांची कोवळी पाने दिसू लागताच त्यावर बसवलेला कर.

**पालामोड** पु. कर्जफेडीकरिता शेतकऱ्यानें सावकाराला पुढें पिकणारें भात अगाऊच विकणें. – बदलापूर ३०२.

**पालालणे** सक्रि. ओलांडणे; उल्लंघणे.

**पालाव** पु. गव्हाचा पाला.

**पाला(ले)वन, पालिवण** न. पर्णकुटी; पाल्याची झोपडी : 'जो आपुलेनि नागरपणे। इंद्रभुवनातें पाबळें म्हणे। तो केवीं रंजे पालिवणें। भिल्लाचेनि।'– ज्ञा २.३६३. [सं. पल्लव + अयनम्]

**पालाशविधी** पु. एखाद्या माणसाचा शेवटपर्यंत शोध न लागल्यास व तो मेला असे पक्के समजल्यानंतर त्याचे प्रेत किंवा अस्थी सापडत नसल्यास त्याचा पळसाच्या पानांचा पुतळा करून त्याचे और्ध्वदेहिक करण्याची क्रिया.

**पालिजणे** सक्रि. फाकणे.

**पालित** वि. पालन, संगोपन केलेला; सांभाळलेला; पोसलेला.

**पालिध्वज** पु. माला, कमल, हंस, सिंह, वृषभ, कुंजर, चक्र इ. दहा चिन्हांनी युक्त पताका. अशा १०८ पताकांचा समुदाय. सार्वभौमत्वाचे लक्षण .

**पालिंग, पालिंगन, पालेगण** पु.न. समुदाय; सूमह : 'तंव नानावर्णे कमळवनें। विकासिलीं तैसे अर्जुनें। नेत्र देखिले पालिंगनें। आदित्यांचीं।'–ज्ञा ११.२०३.

**पाली** स्त्री. पिढी. (अहि.)

**पाली** स्त्री. शेतात उगवणारी झाडांची कोवळी रोपे. (अहि.)

**पाली** स्त्री. ज्या भाषेत गौतम बुद्धाने उपदेश केला ती भाषा;आद्य प्राकृत भाषा. [सं. प्रकट, प्रालि]

**पालुपद** न. पदातील वारंवार म्हणण्याचा भाग; ध्रुपद; आकणकडवे, पालवपद. [सं. पल्लव]

**पालुयाग** न. मासे पकडण्याचे एक प्रकारचे जाळे.

**पालु** न. फडके; वस्त्राचा तुकडा. (व.) [सं. पल्लव; हिं. पल्लू]

**पालू** स्त्री. पु. खाडीतील एक मासा. (गो.)

**पालू** स्त्री. शेपटी.

**पालूघाल्या** वि. ब्रायल्या; नेभळट; अजागळ.

**पाले** न. १: पाने, गवत इ. ची पाती, पानांचे शेंडे; पानपागोरा; पालवण. २. पहा : **पालटी–टक** ३. दुकानासाठी केलेली लहान राहुटी; पाल. ४. सुंभाचे वेटोळे. (गो.)

**पालेभाजी** स्त्री. ज्यांच्या पानांची भाजी केली जाते अशा वनस्पती.

**पालेजणे, पालेणे** अक्रि. १. पालवी फुटणे; अंकुर येणे. (कु., को.) २. (ल.) उत्कर्षाच्या किंवा भरभराटीच्या स्थितीत असणे; पालेवचे. (गो.) [सं. पल्लव]

**पालेजविणे** सक्रि. जिवंत, सचेतन करणे : 'यापरी एकातें मारवी। जीवें गेलिया जीववी। अचेतनातें पालेजवी। ये सिद्धीची पदवी ईशत्व।'– एभा १५.९२.

**पालोटी** पहा : **पालटी–टे**

**पालोवेली** स्त्री. विस्तार; पसारा; व्याप : 'पाठीं रूपपत्र पालोवेली। चक्षु लांब तें कांडें घाली। तेथें व्यामोहता भली। पाहाळीं जाय।' –माज्ञा १५.१०२.

**पालौ** पहा : **पालव**

**पालौचे** सक्रि. मालविणे. (गो.) पहा : **पालविणे**

**पाल्या** स्त्री. अव. सपीटाचा लाटून व तळून केलेला एक खाद्यपदार्थ.(व.)

**पाल्याधिकरण** न. काही कारणाने मालकी हक्क काढून घेतले असल्यास संबंधित मालमत्ता व व्यक्ती यांची देखभाल करणारे खाते.

**पाळी** स्त्री. पाल. (गो.) [सं. पल्ली]

**पाल्हकनी** पु. रापीसारख्या तीक्ष्ण अवजाराला घासून धार देण्यासाठी वापरायचा विशिष्ट प्रकारचा गुळगुळीत दगड.

**पाल्हविणे** सक्रि. पेरणे.

**पाल्हा(ल्ला)ण–न** पहा : **पालाण**

**पाल्हावणे** पहा : **पालावणे**

**पाल्हाळ** पु. १. विस्तार; वाढ; फैलाव; पसारा. २. सजावट; अलंकारयुक्त भर. ३. गोष्ट सांगणाऱ्याने गोष्टीला रंग यावा म्हणून स्वतःच्या पदरची भर घालून केलेला विस्तार. ४. दया, करुणा इ. मुळे मनाला फुटणारा पाझर. ५. कंटाळवाणे कथन, चऱ्हाट; निष्फळ बोलणे. [सं. प्र+आ+लल्]

**पाल्हाळ** न. १. पूल; सेतू. २. खोगीर.

**पाल्हाळणे** उक्रि. १. विस्तार पावणे, करणे; पसरणे : ' कां सोमकांतु सोमे पघळे । सूर्ये फांकती कमळें। एथ असे तेचि पाल्हाळे। आन नये।'– ज्ञा १८.११३. २. फोफावणे; पालवणे : 'वल्ली पाल्हाळली।'– दास १०.१०.२२.

**पाल्हाळीक** वि. लांबलचक; विस्तृत; कंटाळवाणा.

**पाल्हेणे, पाल्हेजणे** उक्रि. १. विस्तार पावणे; पाल्हाळणे : 'जैसा वर्षाकाळु गगनी। पाल्हेजे नवघनी।'– ज्ञा १५.१५२. २. पालवी फुटणे; प्रफुल्लित, टवटवीत होणे : 'हो कां जे शारदियेचे वोलें। चंद्रबिंब पाल्हेलें। कां तेजचि मूर्तिमंत बैसलें। आसनावरी।'– ज्ञा ६.२५८. ३. उत्पन्न होणे : 'संहारवातें प्रचंडें। पडती प्रळयांतींचीं सालडें। तंव कल्पादीचीं जुंबाडें। पाल्हेजती।'– ज्ञा १५.१२७. [सं.पल्लव]

**पाल्हैणे** अक्रि. १. पाझरणे; पाघळणे : 'देखौनि रूपुं सावळें। वैराग्य काम- कळां पाल्हैलें।' – शिव ३७१. २. पालवणे; विस्तारणे.

**पाव** पु. १. चौथा भाग; चतुर्थांश. २. पाय; पाऊ. ३. तीस चौरस बिघ्यांचे जमीन मोजण्याचे परिमाण. ४. (लहान मुलांच्या खेळात) नवीन गडी, भिडू. ५. (मुलांत रूढ) (विटीदांडूचा) पहिल्या दांडूचे अंतर. ६. दारू विकण्याचे एक माप; एक चतुर्थांश बाटली. (गो.) वकटचा टोला : पायाच्या बोटांवर टोला ठेवून वर उडवून तिला दांडूने मारलेला टोला. (क्रि. मारणे) [सं.पाद; पोर्तु. पाओ]

**पाव** स्त्री. १. फणस, अननस, रामफळ इ. फळांच्या आत देठाचे शिरलेले अग्र. याला गरे चिकटलेले असतात. २. आरारूट. ३. जात्याचे दोन अथवा एक डोळा आणि तोंड यामधील दांडा, भाग. ४. जात्याच्या वरच्या तळीच्या खालच्या बाजूला डोळ्याचे भोक असलेली लाकडी पट्टी. ५. जात्याची तळी. (गो.) ६. मातीची परात. (व.)

**पाव** पु. गव्हाचे पीठ आंबवून तयार केलेली पोळी, भाकरी इ. सारखा एक खाद्यविशेष; रोटी. [पोर्तु. पाओ]

**पावक** वि. स्वच्छ; पवित्र; चकचकीत. [सं.]

**पावक** पु. १. (पावन करणारा) अग्नी. २. (संगीत) एक राग. [सं.]

**पावका** पु. १. शिडीची पायरी. २. (ताड, माड इ.) झाडावर चढण्यासाठी किंवा विहिरीत उतरण्यासाठी पाडलेली खाच; खोबण. ३. (पलंग, मेज, घडवंची इ.चा) पाय, खूर : 'बाळंतिणीच्या बाजेच्या चार पावक्याशीं....'– प्रसूतिकृत्यादर्श २५. ४. लहान डबा (तेल, तूप इ. चा). [सं. पादुका]

**पावकी** स्त्री. उजळणीचा एक प्रकार; एक, दोन, तीन इ. शंभरापर्यंत जे क्रमांक त्यांच्या पावपटींची पंक्ती. जसे :– एक पाव पाव, बे पाव अर्धा इ.

**पावके** न. रहाटाचा हात.

**पावके** न. १.(लोणी, तूप इ. चा) चौथा हिस्सा, भाग. २. (लोणी, तूप इ. चा) लहान डबा. ३. एक चतुर्थांश किंवा त्याची कोणतीही पट.

**पावगर** स्त्री.पु. (विणकाम) बैलीच्या आकड्यातून ओवून गुलड्याला बांधलेली दोरी.

**पावजी** पु. मीठ पिकविणारा व्यापारी; मिठागऱ्या. (पेण)

**पावटळ** स्त्री. पाणमोटळी.

**पावटा** पु. एक द्विदल धान्य; वाल; वरणा; एक कडधान्य.[सं.प्रावट]

**पावटा** पु. १. (नृत्य, दांडपट्टा इ.मध्ये) कुशलतेने पाऊल पुढे टाकण्याचा प्रकार; पदन्यास–विक्षेप; पदार्पण; पायाचा पवित्रा. २.वर्तन, क्रम इ. ३. पाऊल. ४. प्रारंभीचा भाग; पूर्वचिन्हे (एखाद्या गोष्टीची, कामाची).

५.(सोनारी) (सोने,चांदी इ. धातूंची) तार ओढण्याचा रहाट. ६. पायउताराची जागा; होड्या लावण्यासारखी धक्क्याची जागा.

**पावटी** स्त्री. १. पाऊल; पायाचा ठसा; खूण. २. शिडीची पायरी; पायरी. ३. पायघड्या.

**पावटी** क्रिवि. वेळी; खेपेला.

**पावटेकरी** पु. पावटा नावाच्या रहाटावर (सोने, चांदी इ. ची) बारीकतार (साखळ्या वगैरे करण्यासाठी) काढून त्यावर उपजीविका करणारा इसम.

**पावट्या** स्त्री. अव. रहदारीने, पायी चालण्याने मळलेला रस्ता.

**पावठ** स्त्री. १. खेप; जाणे व येणे. २. पाळी; खेप; वेळ.(गो.)

**पावठ(ट)णी, पावठाण-णी** स्त्री. न. पु. १. (जिना, विहीर, शिडी इ. ची) पायरी, पाय ठेवण्याची जागा. २. (विणकाम) मागाची पायाने दाबण्याची पायरी; पायरी. ३. पाऊल; पायाचा ठसा; खूण; पदचिन्ह : 'लसणें सूदलें पाउठणिया ।'- मुसभा २.४३.

**पावडर** स्त्री. १. शंखजिऱ्याची त्वचेला लावण्याची सुगंधी पूड. २.भुगा; भुकटी. [इं.]

**पावडा** वि. पाय सरळ पडत नसलेला; चालताना पाऊल वाकडे पडणारा; पांगळा : 'पावडा पाय अशा समयांत पावला ।'- यथादी ३.१६.

**पावडा** पु. १.(नाविक) जहाजाच्या नांगराचा फाळ, काटा, आकडा. २.(सामा.) मोठा नांगर (पदाकृती).

**पावडी** स्त्री. लग्नात वरपक्षाला देण्याची वस्त्रप्रावरणे व आंदण वगैरे; करणेर; देकार. (व.) [क. पावड; सं.प्रावर]

**पावडी** स्त्री. १. लाकडाचा उंचसखलपणा दाखवणारे हत्यार. (कु.) २. लाकडावर कडेपासून समांतर रेषा मारण्याचे एक हत्यार; खतावणी.

**पावडी** स्त्री. खेळाचे एक साधन. साडेचार हात लांब बांबूचा तुकडा घेऊन त्याच्या एका टोकापासून दोन हाताच्या अंतरावर लहानशी फळी बसवलेली असते. अशा दोन पावड्यावर पाय ठेवून मुले फिरतात.

**पावडे** न. कुबडीसारखे हात टेकण्याचे साधन.

**पावडे** न. १. पहा : **फावडे**. २. महानुभावी पंथाचे लोक व इतर जोगी घेतात तो आकड्यासारखा वाकलेला दंड. ३. पहा: **फावडी**. ४. गूळ करताना आळलेला रस जमिनीवर ओतून घट्ट करण्यासाठी वापरले जाणारे लाकडी हत्यार.

**पावडेओढ** खोऱ्याने पैसा ओढणे; प्रचंड लूट : 'हिंदुस्थानच्या द्रव्याची जी पावडेओढ चालली आहे.'- टि २.२९६.

**पावण** पु. नव्या नवरीला माहेराहून सासरी किंवा सासरहून माहेरी पोचवणारी व्यक्ती; मुऱ्हाळी; पावता; पाठराखण; पाठराख्या.
न. १. वधूला प्रथम सासरी आणण्याचा विधी; गृहप्रवेश. (को). २. माहेराहून निघतेवेळी वधूला दिलेला खाऊ. (राजा.)

**पावणा** पु. (सारा किंवा सरकारी वेठ म्हणून गावकऱ्यांनी सरकारला दिलेला) खलाशी; नावाडी. (राजा.)

**पावणा** पु. पाव आणा; पैसा. (गो.)

**पावणा, पावणेचार, पावणारावळा** (कु.) पहा : **पाहुणा, पाहुणचार**

**पावणाकट** साडेतीन हात लांबीच्या दोरीत कडब्याच्या जितक्या पेंड्या मावतील त्याच्या पाउणपट.

**पावणी** स्त्री. लिलाव. (को., गो.)

**पावणी** स्त्री. १. प्रवासात अडथळा होऊ नये म्हणून सोबत घेतला जाणारा सरकारचा शिपाई किंवा परवाना. २. (ल.) पोचता करणे; मार्गरक्षण करून नेणे.

**पावणी** स्त्री. १. सरकारजमा होणारी रक्कम; वसुली; पट्टी : 'तुमचें मातबरीप्रमाणें बहुमान केला जाईल व पावणीचा ऐवज जमा होईल.' - वाडबाबा १.१७. २. आरमारी कर.

**पावणीदार** पु. मक्तेदार. (गो.)

**पावणे** उक्रि. १. पोचवणे; पोचती करणे; नेणे (एखादी वस्तू, मनुष्य इ.); पाठवणी करणे; नेऊन सोडणे. २. पोहोचणे; येणे; प्राप्त होणे. ३. मिळणे; प्राप्त होणे. ४. हाती लागणे; मिळणे; सापडणे. ५. प्रसन्न होणे; कृपा करणे; पूर्ण करणे; वोळणे. ६. समजणे; लक्षात येणे. ७. अवसर सापडणे; मोकळीक मिळणे; समर्थ होणे; शक्य असणे. ८. जबाबदार असणे; जबाबदारी घेणे : 'भीम म्हणे संसप्तक कौरव मज सर्व पावले जा गा !'- मोकर्ण ३९.५६. ९. हरकत नसणे; मोकळीक असणे : 'संसारांत तरा, म्हणाल मजला खोटा म्हणा पावलें ।'- मोअंबरीषाख्यान (नवनीत ३६०). [सं.प्राप्]

**पावणे आठ** वि. नपुंसक; क्लीब.

**पावणे बारा** वि. मूर्ख; बेअक्कल. (गो.)

**पावणेर** पु. १. पाहुणेर. (कु.) पहा : **पाहुणचार**. २. देवालयाकडील जेवणाचा एक समारंभ. (गो.)

**पावणोत्रा** पु. दरमहा दरशेकडा तीन चतुर्थांश ह्या दराने व्याज.

**पावत** स्त्री. आखणी. (गो.)

**पावतकी** स्त्री. १. पाय ठेवण्याची जागा. (को., चिपळूण) २. सरकी काढण्याची लाट. (क.) ३. पादुका. (सातारी)

**पावता** वि. पोचलेला; हाती आलेला; पाठवून दिलेला; पोचता; दाखल.

**पावती** स्त्री. १. एखादी वस्तू, रक्कम इ. पोचल्याबद्दलचा दाखला, पोच, लेखी कबुली, रसीद. २. पाठविलेल्या वस्तूची सुरक्षित रवानगी, पोच; पावणे; पावलेपणा.

**पावधी** स्त्री. ठरावीक मुदतीच्या बोलीने ठरावीक धन देऊन आणलेले दुभते जनावर (गाय,म्हैस इ.).

**पावधूक** स्त्री. १. दुभते जनावर ठरावीक मुदतीच्या बोलीने आणल्याबद्दल त्याच्या मालकाला देण्याचा मोबदला. २. पहा : **पावधी** [सं.पाद्+दुह्]

**पावधे** न. (तिरस्कारार्थी) पहा : **पावधी**

**पावन** वि. १. पवित्र; शुद्ध; निर्मळ. २.निर्दोष; निष्पाप. ३. पवित्र करणारा; शुद्ध करणारा; पावक.

**पावप्यादा-लोक** पु. पायदळ शिपाई : 'पावप्यादे नवे ठेवाल याणेंच बंदोबस्त होईल.'- समारो १.१६.

**पावय** स्त्री. मधुर वाणी; गोड भाषा : 'ऐकूनियां पावय अंगनेची ।'- शशिसेना १७०.

**पावरी** स्त्री. लहान पावा; मुरली; बासरी.

**पावलट, पावलटणे** पायवाट.(राजा.) पहा : **पायवटणे**

**पावला–ली** पु.स्त्री. चार आणे किमतीचे धातूचे एक नाणे.

**पावला** पहा : **पावटा**

**पावलोपावली** क्रिवि. १. पावलागणीक; पदोपदी; वेळोवेळी; वारंवार. २. चटकन. [पावला द्वि.]

**पावल्या** पु. उसाचे बियाणे लावताना तुडवून पुरली जाणारी उसाची कांडी.

**पावशा,पावशागुगूळ, पावशाधो** पु. चातक पक्षी.

**पावशी–सी** स्त्री. विळी. (ना., व., खा.)

**पावशेर** पु. वजनी किंवा मापी शेराचा चतुर्थांश.

**पावशेरी** स्त्री. खेड्यात धान्य विकणाऱ्यांनी मोकाशी किंवा इतरांना देण्याचा धान्यरूपी कर.

**पावस(सा)रा** पु. (विणकाम) १.माग चालविताना पायांनी दाबल्या जाणाऱ्या फळ्या प्रत्येकी. २. मागाखाली वही किंवा ओवी ज्यांना जोडलेली असते त्या दांड्या.

**पावसरी** स्त्री. (विणकाम) मागाच्या पावंड्याची दोरी.

**पावसॉ** वि. पावसासंबंधी; पावसाळी. (गो.)

**पावसाचा कोंडा** अत्यंत बारीक व दाट थेंबांच्या रूपाने पडणारा पाऊस.

**पावसाचा तोडगा** पाऊस पडत नाही असे वाटल्यावरून, त्यावर उपाय म्हणून केली जाणारी कृती : यात कोणीतरी एक स्त्री वस्त्र सोडून व पाला नेसून रात्रीच्या वेळी गावातील घरोघरी फिरते. त्यावेळी प्रत्येक घरातून तिच्या अंगावर पाणी टाकले जाते. अशा प्रसंगी ती स्त्री तोंडाने 'अरगुंड बुरगुंड बैल बुका । चंदनी चुका मृग राजा । पाणी दे रे बाबा पाणी दे ।' असे गाणे म्हणत असते.

**पावसाचे घर** १. पावसापासून रक्षण व्हावे म्हणून तयार केलेले आच्छादन (देश); इरले. २. सतत व जोराचा पाऊस पडणारा प्रदेश.

**पावसाचे पिल्लू** अत्यंत थोड्या प्रमाणात पडणारा पाऊस.

**पावसाळा** पु. मृग व हस्त ह्या दोन नक्षत्रांमधील पाऊस पडण्याचा काळ.

**पावसाळे** न. पावसाळी हवा; पाऊस पडेल अशी आकाशाची स्थिती. (को.)

**पाव(व्ह)ळी, पावळणी** स्त्री. १. सडा; वर्षाव; सिंचन : 'तुझ्या दारीं माझ्या रक्ताची पावळी करीन.'– निचं ८२. २. (को., कु., गो.) पहा : **पागोळी**

**पावंड** पु. पावलाचे अंतर; पाऊल; कदम (क्रि. टाकणे, घालणे). (वा.) **पावंडाखाली हाकणे, लावणे, धरणे, चालविणे** – गाडीचे बैल हळूहळू चालविणे; गाडी संथपणे हाकणे.

**पावंध** स्त्री. भात झोडतेवेळी झोडणाऱ्याच्या पायापाशी किंवा मांदीच्या आसपास पडणारे भात. (को.)

**पावा** पु. बांबूच्या नळीला अनेक छिद्रे पाडून सप्तसूर साधून केलेले वाद्य; अलगूज; वेणू; बासरी. पहा : **मुरली**[सं. प्रा + वे (प्रावय)]

**पावित्र्य** न. मानसिक व शारीरिक शुद्धता; शुचिता; पवित्रपणा.

**पावी** स्त्री. पोकळ नळी : 'यरंडाची पावी आणौनि ते विषे भरिली'– पंचो १६०२. [सं. पावा]

**पावीत** वि. पावता; पोचता; पावलेला; हाती पडलेला. (राजा.)

**पावोन** शअ. पासून : 'जळीं चंद्रिकेचिया पसरती वेली । ते वाढी चंद्रे नाहीं वाढविली । तेविं मातेंपावोनि ठेलीं । दुरी कर्में ।' – ज्ञा ९.१२३.

**पावो सरणे** सक्रि. कळून येणे; वाटू लागणे; कळणे : 'तेथ आदिलापासूनि पार्था । ऐकिजे ऐसीचि अवस्था । दुणावली हें यदुनाथा । पावों सरलें ।'– ज्ञा ६.४८७.

**पाव्हणा, पाव्हणारावळा, पाव्हणचार** इ. पहा : **पाहुणा**

**पाव्हणा** पु. १.उखळ; वाहीन. (को., राजा.). २. भाताची कणंग; तट्ट्या लावून केलेले साठवण. पहा : **पाहुणे**

**पाश** पु. १. फास; वलयाकार करून गाठ मारलेली दोरी. २. पक्षी, जनावरे इ. पकडण्याचे जाळे. ३. (ल.) (कामधंदा, परिस्थिती, हेतुसिद्धी इ. संबंधीचे) बंधन; अडथळा; गुंता. ४. सोंगट्या इ. खेळातील फासा. ५. (ल.) आपल्याला पाहिजे तसे दुसरा वागेल असे करण्याचे, वश करण्याचे साधन.[सं.] (वा.) ० **टाकणे** – १. भूल पाडणे; मोहिनी घालणे; वश करणे. २. फसवणे; ठकवणे. ३. आटोक्यात आणणे.

**पाश(शि)क** पु. पाश; फास : 'तरि एकु मी अनेकीं । गोंविजे देहपाशकीं । त्रिगुणीं लुब्धकीं । कवणेपरी ।'– ज्ञा १४.६४. [सं.]

**पाशबंद** पु. १. कैद; अटक. २. फास; दोर.

**पाशिष्ट,पाशीट** न. घराचे आढे. (राजा.) पहा : **पाष्ट**

**पाशी** पु. पश्चिम दिशेचा स्वामी; वरुण (याचे शस्त्र पाश आहे या समजुतीने).

**पा(पां)शी** स्त्री. गुरांना योग्यवेळी पाणी प्यावयास न दिल्यामुळे त्यांना होणारा रोग; फाशी; पोटफुगी. (क्रि. फुगणे)

**पाशी–सी** शअ. १. जवळ; समीप; शेजारी. २. जवळ; संग्रहित; ताब्यात; हातात (मालकी दाखवणारा). ३. स, ला या चतुर्थीच्या प्रत्ययार्थी (दान, दिशा, ठिकाण इ. दाखविणारा). [सं.पार्श्व]

**पाशुपत** पु. शिवोपासनेतील एका विशिष्ट मताप्रमाणे वागणारा; भैरवोपासक; हातात नरकपाल, गळ्यात हाडांच्या माळा, स्मशानवास, नरकपालात भिक्षा व भोजन, पशुबलिदान, मांसभक्षण इ. गोष्टी यांच्यात आहेत.

वि. १. या संप्रदायाविषयीचे. २. शिवासंबंधीचे (व्रत, दीक्षा, मत, मंत्र, अस्त्र इ.).

**पाशुपत्य–पाल्य** न. १. गुराख्याचा, धनगराचा धंदा. २. गुरे पाळणे. [सं. पशुपाल]

**पाश्चात्त्य** वि. पश्चिम खंडातील; युरोपातील (लोक, देश, वस्तू इ.). [सं. पश्चात्]

**पाश्चिमात्य** वि. (पौर्वात्य शब्दाप्रमाणेच हा चुकीचा प्रयोग आहे.) पश्चिमेकडील; युरोपीय; पाश्चात्त्य. [सं. पश्चिम, पाश्चिम]

**पाष** पु. १.पंख; पक्ष : 'तवं पाषाचा धुधुवांटू ।'– उषा १७११. २. पाख; पखवाज; पक्षवाद्य. [सं.पक्ष]

**पाषाण** पु. १. दगड; खडक; धोंडा. २. दगडाचा देव.

**पाषाणगर्दभ** पु. हनुवटीखाली सूज येऊन शक्तिपात करणारा एक रोग.

**पाषाणचुंबक** पु. एक खनिजपदार्थ.

**पाषाणभेद** पु. १. काही दगडांवर उगवणारी क्षारयुक्त उगवण. २. एक औषधी; पाथरफोड.

**पाषाणयुग** न. जगाच्या संस्कृतीचा एक काळ. या काळात भांडी, हत्यारे दगडाची करीत.

**पाषाणशास्त्र** न. खडक कसे बनतात यासंबंधीचे शास्त्र; प्रस्तरविज्ञान.

**पाषाणहृदय–यी** वि. दगडाप्रमाणे कठीण मनाचा; निर्दय; दुष्ट. [सं.]

**पाषाणा** पु. घोड्यांना होणारा एक रोग.

**पाष्ट–स** न. बैलगाडीच्या चाकाच्या लाकडी वर्तुळाकार फळीत बसवले जाणारे आरे; पास; पाष्टा.

**पाष्ट** शअ. पेक्षा.

वि. (अमुक एका गोष्टी) पेक्षा वाईट, कमी, कुचकामी.

**पाष्ट–ष्टा** न.पु. घराचे आढे; घराच्या छपराचे आडवे लाकूड; पाठाळू; अढेपाट.

**पाष्ट–ष्टा–ष्टी–ष्टे** न.पु.स्त्री. पाटापासून काढलेले (अर्धे चिवट लांबीचे) सूत; त्या सुताची गुंडी : 'बुरूड होउनि दुरड्या केल्या । कोष्टी होउनि पाष्टा विणिल्या ।'– अमृत १५.

**पाष्टा** पु. सोन्याची तार.

**पास** शअ. जवळ; समीप; पाशी. [सं.पार्श्व]

**पास** स्त्री. १. कुळवाचे लोखंडी पाते ( शेतातील जमीन साफ करण्याचे). २. कुळव. ३. नांगराला लावला जाणारा फाळ. (खा.) ४. बादला इ. करण्यासाठी करतात ती (अजमासे पंचवीस तोळे वजनाची) चांदीची लगड. ५.वखराचे पाते. (खा.)

**पास** स्त्री. १. काळजी; आस्था; विचारपूस; आपुलकी : 'मदारुलमहाम दुरंदेश आहेत, नबाबाची पास त्यांस सर्वोपरी आहे.'– मइसा ५.७९. २. दुजोरा; पाठिंबा. ३. पत; वजन. (व.) ४.एकनिष्ठता: 'पास तेथेंच फजल इलाही.'– पया ४९३. [फा. पास्]

**पास** पु. पहारा.

**पास** पु. १.पाश; फास. (गो.) २. दोरखंड. [सं. पाश]

**पास** पु. किसमिस; बेदाणा. (गो.) [पोर्तु.पासा]

**पास** पु. दाखलापत्र; परवाना; तिकीट (आगगाडी, बस, नाटक इ. चे). वि. १. मंजूर; मान्य; पसंत. २. परीक्षेत उत्तीर्ण. [इं.]

**पासक, पास्क** पु. ज्यू लोकांचा पासोव्हर किंवा ख्रिस्तींचा ईस्टर सण.

**पासको** पु. हरणटोळीसारखे करड्या रंगाचे एक जिवाणू; एक प्रकारचा लहान साप. (गो.)

**पासगाळ–ळी** स्त्री. १. आढ्यापासून पाख्यापर्यंत खाली आलेले वासे टेकून राहण्यासाठी तुळयांच्या टोकावर जाणारे आडवे लाकूड; इंद्रकट. २. वळचणीखालील भाग.

**पासचा–ला** वि. १. जवळचा; शेजारचा; निकटचा. २. मालकीचा; ताब्यातील. ३. नात्याचा; कोणत्याही संबंधाचा. [सं.पार्श्व;हिं.पास]

**पासचे** सक्रि. सांधणे; जोड देणे (धातू इ.स.). (गो.) पहा : **पासप**

**पासडी** स्त्री. वर्षप्रतिपदेच्या दिवशी नववधूला सासरहून पाठविण्यात येणारी वस्त्रे, खाऊ व इतर जिनसा. (गो.)

**पासणे, पासवणे** अक्रि. वळणे; मागे पाहणे. (बे.)

**पासप** न. (धातू इ. स दिलेला) सांधा; जोड; डाग. (गो.)

**पासपूस** स्त्री. (विरू.) पास्तपुस्त; वास्तपुस्त.

**पासबान** पु. पहारेकरी; द्वारपाल. [फा.पास् + बान्]

**पासबुक** न. बँकेतील खात्याची नोंदपुस्तिका. [इं.]

**पास(से)री** स्त्री. पाचशेरी.

**पासलणे** अक्रि. आडवे होणे; कुशीवर किंवा उताणे निजणे. [सं.पार्श्व]

**पासलपट्टी** स्त्री. पासल घेणे; लोळणे. (क्रि. करणे)

**पासला** वि. जमिनीवर आडवा पडलेला; उताणा. (वा.) ० **पडणे** – १. नसता कारभार किंवा लुडबुड करणे; मध्ये तोंड घालणे. २. कामधंदा न करता निरुद्योगीपणे पडून राहणे. ० **पाडणे** – १. (वाद, युद्ध इ. मध्ये) पराजित करणे; पाडाव करणे. २. (एखादा व्यूह, बेत, कावा इ.) हाणून पाडणे; ढासळविणे.

**पासली** स्त्री. एक वनस्पती; युरोपियन लोक हिचा कोथिंबिरीप्रमाणे उपयोग करतात.

**पासवडा** पु. बैठक; पासोडी; चादर : 'मृणाळसुताचा पासवडा घातला।'– शिव १७७.

**पासवण** स्त्री. पाश; बंधन. [सं.पाश]

**पासवणा–णे** पु. न. माघार; पाठमोरेपणा; बाजूस होणे; मागे हटणे: 'हाती हाला फुलीं । पासवणा जेवीं न घाली ।'– ज्ञा १३.४९६. [सं. पार्श्व]

**पासवणी** स्त्री. एक वृक्षविशेष : 'पिंपरी शेवगे महारूख । पासवणी आणि सेलाटक ।'– भवि २७.८२.

**पासवर्ड** पु. निश्चित केलेला, ठरावीक व्यक्तींनाच माहीत असलेला शब्द किंवा चिन्ह (हा ओळख पटवण्यासाठी, प्रवेश मिळवण्यासाठी वापरतात).

**पासवा** पु. १. नेसत्या वस्त्राचा आतला पदर; पदर. २. नदीचा फाटा.

**पासवान** पु. पहारेकरी. [अर.]

**पासंग** पु. १. तराजूच्या तोलातील विषमपणा (एक पारडे हलके व दुसरे जड असणे). २. तराजूतील विषमपणा काढून टाकण्याकरता, दोन्ही पारडी सारखी करण्याकरता एका पारड्यात घातलेले वजन किंवा काही वस्तू; धडा : 'विश्वकर्म्यानें धरूनि मुष्टी। पासंगा घातलें तेतीस कोटी । तरी न बैसे तळवटीं । हाळवटपणें अद्यापी।' – मुसभा २.७०. ३.ज्वाळेचा झोक, रोख. ४. (ल.) बरोबरी; योग्यता. [फा.पा-संग्] (वा.) **पासंगास न पुरणे, न लागणे** – फारच मोठे किंवा कमी योग्यतेचे असणे. **पासंगी आणणे** – मान देणे; किंमत देणे. (बहुधा निषेधार्थी प्रयोग).

**पासंबा** पु. केळीच्या कांद्याला फुटलेला कोंब; मोना; केळीचे पिल्लू; केळंबा.

**पासा** पु. पाश; फासा; बंधन : 'बापु मोहाचा पासा । कवणातें न बधी।'– उगी ३२९. [सं.पाश]

**पासा** पु. (जरतारधंदा) पन्नासभार चांदीची लगड.

**पासाक** वि. सताड मोकळे. (गो.)

**पासाव** शअ. १. पासून; कडून : 'आतां प्रेम तें गेलें लाजोन । पासाव

मज ।'– गीता १.२१. २. पेक्षा : 'कांहीच न व्हावया पासाव । सर्वही होणें हें बरव ।'– विपू ७.५५. ३. साठी; करिता या अर्थी प्रत्यय. (गो.) [सं. पार्श्वात्]

**पासाव** पु. प्रसाद; आश्रय : 'बाणासी दीधला पासावो ।'– उषा ६६. पहा : **पसाय** [सं.प्रसाद]

**पासावणे** उक्रि. जवळ होणे.

**पासावणे** उक्रि.पसरणे : 'खचित मंचक संख्येविणें पासाविलें मृदासनें ।'– वेसीस्व १४.४२.

**पासाळ** पु. घोड्याची पाठ; फासळी : 'सर्वेचि बैसला मागिलां पासाळी'– शिव १०१०. [सं. पार्श्व]

**पासिक** पहा : **पाशिक**

**पासिल** वि. जवळचा; निकटवर्ती : 'पासिला हाणे शस्त्रे ।' – गीता २.२३७४.

**पासीट** न. (नाविक) छप्पर. (हेट.)

**पासून** शअ. १. (परिगणना करताना) विशिष्ट काळ धरून; नंतर. २. (गती किंवा अंतर सांगताना) विशिष्ट स्थळ धरून. ३. उत्पत्तिदर्शक. जसे :– झाडापासून फुले, फळे येतात. ४. (गमनदर्शक अव्यय) कडून. जसे :– मी त्यापासून आलो. ५. वियोगदर्शक अव्यय. जसे:– तो मजपासून निघून गेला. ६. साधन – कर्तृत्वदर्शक; कडून. जसे :– हे भांडे मजपासून फुटले. ७. (गमनमार्गदर्शक अव्यय) बाजूने; जवळून. जसे :– तो आमचे गावापासून गेला. ८. सान्निध्य, संबंध इ. दर्शविणारे अव्यय. ९. (तरतमभावदर्शक अव्यय) पेक्षा : 'वज्रा पासुनी कठीणे ।'– उषा ७०३. [सं.पार्श्व]

**पासोडणे** सक्रि.वस्त्राच्छादित आसन तयार करणे; मांडणे; पसरणे : 'सोन्याच्या पाट पासोडुनी ओटी भरिती।'– वसा १०. [सं.पार्श्व]

**पासोडा** पु. पळस. (बे.)

**पासोडा** पु. १.रंगीत पासोडी. २. मोठी पासोडी ; सुताडा. ३. उंची वस्त्र : 'मंडपीं पासोडा पाटावरी घातला । तेथें एक वीरु बैसला ।'– कालिकापुराण १६.६९. ४. मुलींच्या लपंडावातील एक खेळ. पहा : **आगीन पासोडा** [सं. पक्ष्मपट]

**पासोडी** स्त्री. १. खादी इ. च्या दोन किंवा चार पट्ट्या (आटपळी) एकत्र शिवून केलेले ज़ाड पांघरूण; जोठ; सुताचे जाड पांघरूण; द्विपटी : 'कुरुसेनेवरि पसरीं शरपटला जेंवि भव्य पासोडी ।'– मोकर्ण १९.२७. २. बैठक; बसकर : 'पासोडी विचित्र वरी । बैसू घातलीसे सारी।'– स्त्रीगीतमाला पृ. १६. ३. विणकऱ्याकडून गावच्या पाटील वगैरेंचा एक पासोडी घेण्याचा हक्क. ४. पाटलाचे इनामी शेत. ५. तोंडावर घालावयाचे पांघरूण; झापड–डी : 'ऐसें वदोनि मार्गणवृष्टि तयावरि महातपा सोडी । जैसी आटोपाया मत्तगजशिरीं महात पासोडी ।' – मोद्रोण ९.३१. [सं.पांसुकूल = चिंध्यांचा ढीग]

**पासॉ** पु. १.फासा (खेळण्याचा). २. कुदळीचे नेडे.

**पास्कुल्यो** स्त्री. वृषण; अंड. (गो.)

**पास्टा** पु. (सोनारी) कोणत्याही धातूचा समपातळीचा लांब पत्रा.

**पास्तर** स्त्री.न. पहा : **पाचर**

**पाहडी** स्त्री. पालखी वाहून नेणाऱ्या लोकांची टोळी. पहा : **पाडी.** वि. डोंगरी. पहा : **पहाडी**

**पाहणी** स्त्री. १. पाहणे; बघणे; अवलोकन; दृष्टी; लक्ष. २. (जमीन, पिके, घरे, झाडे इ.ची) तपासणी; देखरेख. ३. जमाबंदीची तपासणी; अजमास, अंदाज करणे. ४. परीक्षा; देखरेख.

**पाहणी–ण खरडा, पाहणीपत्रक** १.कमाविशी पाहणी; कच्चे टिपण. २. हक्कनोंदणीचा कागद.

**पाहणी ताळा** जमाबंदीची पुन्हा तपासणी.

**पाहणी(ण)दार** पु. जमाबंदीची किंवा वसुलाची पाहणी करणारा इसम; कमावीसदार.

**पाहणे** उक्रि. १. बघणे; अवलोकन करणे; दृष्टी, नजर टाकणे. २. विचार करणे. ३. कोणत्याही इंद्रियाने जाणणे किंवा समजून घेणे; अनुभवणे. ४. काळजी घेणे; तपास, समाचार घेणे; लक्ष देणे; अंगावर जबाबदारीने घेऊन करणे. ५. पर्वा करणे; बाळगणे; काळजी करणे; लक्ष देणे. ६. पारखणे; तपासणे; कसाला लावून निश्चित करणे, सिद्ध करणे. ७.पाहणी, तपासणी करणे. ८. शोधणे; तपास करणे; हुडकणे. ९. चाहणे; मागणे; (जाणे, येणे, बोलणे, करणे इ. ची) इच्छा ठेवणे, असणे. उदा. करू पाहणे. १०.पाहणे ह्या धातूचा उपयोग पुष्कळवेळा अजमावणे, तपासणे, चाखणे, खाणे, तोलणे इ. अर्थाच्या धातूबरोबर त्यांच्या अर्थाला पुष्टी देण्यासाठी करतात. उदा. अजमावून –तपासून पाहणे. ११.भोगणे; संग करणे : 'परपुरुषाला तुमच्या वचनें पुत्रोद्भवार्थ पाहेन ।' – मोआदि १७.६१. १२. मदत करणे; रक्षण करणे. १३. हानी करणे; नाश करणे : 'कोण राम–राया पाहों शके ।'– मोसीतागीत ३५. १४. सूड घेणे; उट्टे काढणे. उदा. मी त्याला पाहून घेईन. १५. बंदोबस्त, व्यवस्था करणे. १६. पहा : **पाहणे** २ [सं.प्रेक्षण] (वा.) **पाहा–पाहा करणे** मागे लागणे; त्रास देणे. (व.)

**पाहणे** अक्रि. उजाडणे; उजेड होणे; उदय होणे : 'फिटला दुःख दुष्काळू। पाहला सुखाचा सुकाळू।'– एभा ११.१३. [सं.प्रभा]

**पाहणे** सक्रि. दोहणे; (म्हैस, गाय इ.ची) धार काढणे. (व.)

**पाहणे** क्रि. प्रार्थना करणे : 'पाये धूनी पाहीजे ईश्वरू ।' – उषा ३३. [सं.प्रार्थय]

**पाहण्या** वि. १. हरवलेली किंवा चोरीला गेलेली वस्तू परत मिळवून देणारा; हरवल्याचा थांग लावण्याची मंत्रादी विद्या जाणणारा. २. पानाड्या; विहिरीसाठी पाणी कुठे लागेल हे सांगणारा. ३. शकुन पाहणारा.

**पाहत** वि. प्रकाशणारे; उजाडणारे :'पाहतें निमतें सरें हंसगती'– ज्ञागा ९०. [सं.प्र+भा]

**पाहता पाहता** क्रिवि. १. डोळ्यादेखत; अगदी समोर; उघडपणे. २. मोठ्या चातुर्याने; कुशलतेने.

**पाहरी** पु. रात्रीचा पहारा करणाऱ्या घोडेस्वाराचा घोडा.

**पाहा–पाहा करणे** मागे लागणे; त्रास देणे. (व.)

**पाहाण(न)पट** स्त्री. पहाट : 'एकादीं नीरोपण करितां पाहाणपट जाली.'– पूजावसर.

**पाहाणा** स्त्री. (पाहण्यासारखा) सुंदर.

**पाहाती** वि. प्रकाशलेली; पहाटलेली; उजळलेली; उद्दीपित: 'तंवं बोले अरुणावती । रात्री जाहली वो पाहाती।' -शिव २२२.

**पाहाल–ले** न.पु. १. प्रात:काळ; प्रभातकाळ. २. उजेड; प्रकाश : 'अथवा चकोरा पाहालें । चंद्राचें जेवि ।'- स्वादि १.२.५२.

**पाहाल(ळ)णे** अक्रि. उजाडणे; पाहणे : 'तऱ्ही पाहालया रजनी । तारा लोपती गगनीं।'- ज्ञा १३.९३. [सं.प्रभा + काल]

**पाहाळ** पु. १. विस्तार; पाल्हाळ : 'ते वेळीं व्यामोहता भली । पाहाळीं जाय ।'- ज्ञा १५.१०२. २. वृष्टी; वर्षाव : 'पढतां श्रीकृष्ण पवाडें । ठिकसां बोलां घोंषु पडें । रसरंगाचें पाहाळ उघडे । श्रोतेयांसीं ।'- शिव २०. ३. झुमका : 'रुळती चामरांचे पाहाळ ।'- कृमुरा २५.३८. ४. ढीग : 'तेथ पसिमे लागलाचि कापुस पाहाळीं बालक लपविणें ।'- ऋ १२६.

न. १. जुंबाडा : 'कापुसाचे पाहाळ होते'- गोपच ९. २. उत्कर्ष; बहर : 'रसरंगाचे पाहाळ उघडे : श्रोतेयांसि'- शिव २०. ३. झाकण : 'कीं श्रृंगाराचे पाहाळ उघडलें' - शिव ७१९.

**पाहाळ** न. झाकण : 'पूर्ण चंद्राडौनि आभाळु काढिलें । कीं शृंगारें पाहाळ उपटिलें। तैसें अवयेवु उमटलें। वालिपें आडौनि ।'-शिव ७२०.

**पाहाळी जाणे** पान्हणे : 'आतां श्रीचरण तीर्थिचेनि ओलें । वरील सुख पाहाळीं गेलें।'- ऋ ९७.

**पाहिजे, पाहिजेल** क्रि. (पाह धातूचे कर्मणी रूप) इष्ट, हवे, अपेक्षित, जरूर असणे. याचा क्रियापदापुढे उपयोग केला जातो. जसे :- 'गेला पाहिजे, केला पाहिजे, दिला पाहिजे इ. पाहिजेल हे पाहिजे याचे भविष्यकाळाचे रूप होते, पण हल्ली ते फारसे प्रचलित नाही.

**पाहिजे** गरज असणे; निकड असणे; आवश्यकता; अपरिहार्यता असणे. (इं.)वॉन्टेड. [पाहणे भाववाच्य रूप]

**पाहुडा** पु. पाऊल. **पाहुडा पावणे** - पाऊल मागे घेणे.

**पाहुणचार, पाहुणपण, पाहुणेर** पु. न.१.पाहुण्यांचा आदरसत्कार; सरबराई. २. मेजवानी.

**पाहुणा** पु. घुसळखांब. (को., कुलाबा)

**पाहुणा** पु. १. काही दिवसांसाठीच राहण्यासाठी आलेली, बोलावलेली व्यक्ती; अतिथी. २. तिऱ्हाईत; नवशिक्या. ३. (ल.) मातब्बर योद्धा; वीर : 'सरस बासन, वजनदार पाहुणे मेले बहुत फार.'- ऐपो १८५. ४. भोक्ता; अधिकारी : 'ते पाहुणे होती अविचार । रवरवाचे ।'- विपू २.२०. ५. (ल.) चाचड; तांबडी मुंगी. [सं.प्राघुण]

वि. अल्पकाळ टिकणारे; अशाश्वत; क्षणभंगुर : 'आणि शुक्ल बीजेचें चांदणें । तैसें तारुण्य पाहुणें।'- मुरंशु २७६.

**पाहुणाराउळा** (व्यापक) पैपाहुणा; पाहुणाबिहुणा.

**पाहुणे** न. उखळ. [सं.पाषाण]

**पाहुन (ने)रु** पहा : **पाहुणचार**

**पाहुती** स्त्री. पातळी; स्थान : 'मग तेया पुण्याची पाहुती सरे' -ज्ञा ९.२५. [सं.पद]

**पाहुन (ने)रु** पहा : **पाहुणचार**

**पाहे** स्त्री. पहाट; प्रभात.

शअ. १. उद्या : 'पाहेचा पेणा वाटवधा। तंव आजीचि होईजे सावधा।'- ज्ञा १३.५४७. २. पुढे : 'म्हणऊनि सामान्य गा नोहे। हें सांगतां वडिल गोठि गा आहे। परी तें बोलों येईल पाहें। आतां प्रस्तुत ऐकें।'- ज्ञा ७.१४. [सं.प्रभा]

**पाहेणे** अक्रि. १. उजाडणे. पहा : २. **पाहणे**. २. प्रवेश करणे : 'कानाचेनि गवाक्षद्वारें । बोलाचे रश्मी अभ्यंतरें । पाहेना तंव चमत्कारें। अवधान ठकलें।'- ज्ञा ७.२००.

**पाहेरी–ती** स्त्री. पायरी : 'पाहेऱ्या तळापर्यंत जावें धडधडा ।' - ऐपो ४२४.

**पाह्योपाह्यो** उद्गा. तमासगिरी; वाहवा! मजा केली! असे म्हणणे. (व.)

**पाळ** पु. १. घेर; घेरा. २. समूह.

स्त्री. १.विहीर, सरोवर इ.च्या काठाकाठाने बांधलेली उंच व रुंद भिंत; कठडा; काठ; काठचा प्रदेश. २. ते ज्याच्या सभोवती उंच कड असते जात्याच्या वरच्या तळीचे तोंड, यातून वैरण( धान्याचा घास) घालतात; जात्याचे टवळे. ३. कानाची कड; नाकाचा शेंडा. ४. धान्याची कणसे झोडपताना धान्य उडू नये म्हणून खळ्यावर कडबा, सरम इ. चे केलेले कोंडाळे, कडे. ५.पाणी साठण्यासाठी मध्ये खळगा करून सभोवताली केलेला (माती, चुना इ. चा) उंचवटा, बांध; कालवण इ. पातळ पदार्थ वाहून जावू नये म्हणून घातलेला बांध (भाताचा). ६. झाडाच्या मुळाशी पाणी राहण्यासाठी केलेले आळे. ७. जात्याच्या भोवती पडलेली पिठाची वर्तुळाकार कड. ८. किल्ल्यासभोवतालची भिंत; तट. ९. (झाड, खांब, मनुष्य इ. चा) घेर, घेरा, वेढा. १०. (सामा.) कोणत्याही प्रकारचे, कोणत्याही पदार्थाच्या भोवती केलेले कडे. ११. पाण्याच्या जोराच्या प्रवाहाने जमिनीत पडलेला चर; (किनाऱ्यावरील) लाटेची खूण. १२.(सामा.) बंधारा. १३. टोक. १४. आंब्याची अढी. (खा.) [सं. पालि]

**पाळ** वि. १. कराची माफी असलेले (जनावर इ.). २. एखाद्याकडे वेठबिगारी करून त्याच्या जागेत घर बांधून पण घराचा कर न देता राहणारे (कूळ); ज्याला कर, सारा इ. काही द्यावे लागत नाही असा (मनुष्य, कुटुंब इ.). ३. माफ; मुक्त (कर, देणे इ.). पहा : **पाल** पु. ४

**पाळ,पाळा,पाळला** न. पु. लाकूड इ. तोडण्याचे एक हत्यार. याचा तोडण्याचा भाग कोयत्यासारखा व दांडा कुऱ्हाडीसारखा असतो. (गो.) लांब दांडा असलेला कोयता.

**पाळ** पु. १. धनगर वगैरेंनी पाळलेला कळप. २. पाळलेला प्राणी, माणूस इ.

वि. (प्र.) पालक; पालनकर्ता : 'झळाळिआं देवांचा पाळा।'- शिव १५५. [सं.पाल]

**पाळ, पाळक** न. १. झाडाच्या मुळाची शाखा; फाटा; लहान मूळ; उपमूळ; कुडी. २. (ल.) वस्तूंची अस्ताव्यस्त, विखुरलेली, पसरलेली स्थिती (क्रि.घालणे, मांडणे, पसरणे, पडणे) (वा.) **पाळेपाळे-मुळे खणून टाकणे** – पूर्ण नाश, विध्वंस करणे.

**पाळक** पु. १.मेंढपाळ; मेंढक्या. (ख्रि.) २.(ल.) ख्रिस्ताच्या मंडळीला पाळणारा; धार्मिकदृष्ट्या मंडळीची सेवा करणारा : 'पाळक प्रतिनिधि येशूचा । बंधु सखा निजसंघाचा ।'– उसं ५८९. [सं. पालक]

**पाळक** पु. १. निर्बंध. २. काही न करण्याचा दिवस. [सं. पाल्]

**पाळकपुत्र** पु. स्वतःचा म्हणून बाळगलेला दुसऱ्याचा मुलगा.

**पाळका** पु. उसाच्या चरकाला जुंपलेले बैल हाकणारा. [सं.पालक]

**पाळग्रहण** न. पालन; सांभाळ : 'ज्याजकडे त्यांच्या पाळग्रहणाचा अधिकार आहे. त्यांनीं त्यास उद्योगी मनुष्य करण्यास झटावें.'– व्यनि ८७.

**पाळजी** स्त्री. जोंधळा कापल्यानंतर कापलेल्या सडातून फुटलेला कोंब, धुमारा. (बे.)

**पाळणा** पु.१. लहान मुलांना निजवून झोके देण्याच्या सोयीचा, लाकूड इ. चा एक प्रकारचा झोपाळा; पालख; झोला. २. जत्रेत वगैरे उभे केलेले रहाटाप्रमाणे फिरणारे, पाळणे लावलेले एक खेळणे. पहा : **रहाटपाळणा.** ३. मुलाला पाळण्यात निजवून म्हटली जाणारी कृष्णाच्या बाललीलांची गाणी; देवाच्या जन्मोत्सवाच्या वेळी हरदास किंवा कीर्तनकार म्हणतात ते गीत. ४. मूल होण्याची पाळी; बाळंतपण; वेत. (क्रि. लांबवणे) ५.गाडीचा साटा. (व.) [सं.पालन] (वा.) ० **हलणे** – १. मूल होणे, २. कुटुंबवत्सल, मुलेबाळे असणे.

**पाळणाघर** न. सामान्यतः कामावर जाणाऱ्या आईबापांच्या अनुपस्थितीत जिथे लहान मुलांचा योग्य सांभाळ केला जातो असे ठिकाण.

**पाळणूक** स्त्री. पालनपोषण.

**पाळणू(णु)क** स्त्री. कर, सारा इ. सरकारी देण्यासंबंधी माफी : 'पाळणुक देशमुख व देशपांडिये यांच्या शिरस्तियाप्रमाणे चालवणें कलम?'– वाडशाछ १४२.

**पाळणे** सक्रि. १. मनुष्य, जनावर, पक्षी इ. ना खाऊपिऊ घालून त्यांचे संरक्षण व संगोपन करणे; बाळगणे; वाढवणे; रक्षण करणे. २. (ल.) (काही व्रत, नियम, आचार इ.) आचरणे; अनुसरणे; प्रतिज्ञेप्रमाणे वागणे. ३.आज्ञा, सूचना इ. मानणे. ४.(धर्म, कायदा इ. चे) रक्षण, पालन करणे. [सं.पाल]
अक्रि. (अन्न, पाणी, औषध इ.) मानवणे; हितकारक होणे. [सं. पाल्]

**पाळणेरहाट** पु. (विरू.) पहा : **रहाटपाळणा, पाळणा** २

**पाळण्यातील नाव** १. मुलाच्या जन्मनक्षत्रावरून ठेवलेले नाव. २. बारशाच्या दिवशी ठेवलेले नाव.

**पाळत** स्त्री. १.(दुसऱ्याच्या हालचालींवर असलेली) बारीक नजर; गुप्त देखरेख. २. (चोरी वगैरे शोधून काढण्यासाठी काढलेला) माग; सुगावा ; शोध; तलाश. (क्रि. घेणे, काढणे) ३.(एखाद्याने पळून जाण्याच्या किंवा चोरी करण्याच्या हेतूने त्यावर) ठेवलेले लक्ष; चोरून वा लपून ठेवलेली नजर. ४. रक्षण; जतन; पालन.

**पाळतणे** अक्रि. पाळत ठेवून असणे; टपून बसणे : 'चाले झडंझडां उसंतूनी वाट। पाहे पाळतूनी उभा तोचि नीट वो ।'– तुगा ११२.

**पाळती–थी** स्त्री. १. क्षेम; रक्षण; जतन; बाळगण : 'जिथे पदवीचेनि पोषकें। ते मातें यथासुखें। हे पाळती मज विशेखे । आवडे करूं। '– ज्ञा १०.१३६. २. बातमी; शोध; तपास; पत्ता; पाळत : 'कां रे न सांगा आम्हांस । पाळती तुमच्या गृहींची ।'– ह ७.१२१.
वि. पाळत ठेवणारा; गुप्तहेर : 'पाळती येवोनियां तेथ । शुद्धी सांगती वाळीसी ।'– भारा किष्किंधा ५.३.

**पाळनेत** न. पिवळे रेशमी वस्त्र.

**पाळपट्टी** स्त्री. सारा माफ असलेल्या जमिनीवर घेण्यात येणारा एक कर.

**पाळभार** पु. १. धान्याची झोडपणी झाल्यानंतर महाराला देण्यासाठी पाळ मोडून कडबा, सरम इ. चा केलेला भारा किंवा गठ्ठा. २. (काही प्रांतात) शेतकऱ्याकडून पाटील किंवा जहागीरदार यांनी घेतलेले गूड किंवा न झोडपलेल्या कणसांचा गठ्ठा किंवा भारा.

**पाळवी** वि. साहाय्यक; मदत करणारा; मदतनीस. (गो.) [सं.पालय]

**पाळंद** स्त्री. १. शेतातील वाट; गल्ली. २.डोंगर चढण्याची फरसबंदी वाट; घाटी.

**पाळंदिवड** स्त्री. न. पाण्यात राहणारा बिनविषारी साप.

**पाळा** पु. १. पाळ; वेढा; गरका; घेर; गराडा; कडे : 'त्याभोंवता मिळाला वीरांचा रण पहावया पाळा ।'– मोकर्ण १४.२०. २. समूह; समुदाय; थवा; टोळी; मेळा : 'तरी कंदर्पाचेनि बळें। इंद्रियें वृत्तीचेनि मेळे । विभांडूनि येती पाळे । विषयांचे ।'–ज्ञा १३.८४. ३. वस्तूंची अस्ताव्यस्त स्थिती; पसारा. (क्रि. घालणे, मांडणे, पसरणे, पडणे.) ४. (ल.) आसन; पीठ; बैठक : 'कीं सत्वगुणी विद्युल्लता । पाळा मांडिला शरीराधरुता ।'– नव ११.१२१. ५.बंधन; वेष्टन : 'घालू पाळा अविवेका।' – दावि २५९.६. छावणी : 'तेया झाडाभोवता रामदरणेयाचा पाळा पडिला'– लीचपू ७४. [क. पाल. सं. पालि]

**पाळा** पु. आज्ञापालन; आज्ञा, वचन इ. पूर्ण करणे. (कु.)

**पाळा** पु. समुद्रातील एक तांबूस लहान मासा. (को.)

**पाळाइणे, पाळांतणे** सक्रि. १.टेहेळणे; पाळत ठेवणे : 'आनंदे पाळांति श्रीमूर्तितें।' – दाव १८८. २.न्याहाळणे; अवलोकणे: 'मग पाळाइलें वत्सगोपाळांतें।'– दाव ३३९.

**पाळावणे** अक्रि. मुळे येणे; मुळ्या फुटणे.

**पाळि(ळी)गण–न** पु.न.साठवण. पहा : **पालिंग–न**

**पाळिगा** पु. थवा; तांडा.

**पाळिजणे** न. फाकणे; पसरणे. पहा : **पालेजणे**

**पाळित** वि. पाळलेला; पाल्य; (इं.) वार्ड. [सं. पालित]

**पाळी** स्त्री. १. खेप; क्रम; फेरा; बारी. २. नांगराचा किंवा कुळवाचा फेरा. (क्रि. घालणे) ३. भोग; क्रमप्राप्त अवसर; प्रसंग. ४. (ल.) स्त्रियांच्या मासिक रजःस्रावाची खेप; विटाळसपण. [सं. प्रालि, पाली] (वा.) ० **चुकणे, टळणे** – गरोदर राहणे; दिवस जाणे.

**पाळी** स्त्री. कानाच्या खालच्या टोकाचा भाग; चापा. [सं.पालि]

**पाळी** स्त्री. शिक्षण : 'गृहधर्माची कुतुकें दे तो भगवान् विरक्त परि पाळी।'– मोआदि ११.५४. [सं.पाल्]

**पाळी** स्त्री. १. पाट; ओटा; उंचवटा : 'अधरी प्रवाळ पाळी ।'– दावि १५४. २. दंड, जोर काढताना ज्यावर हात टेकतात तो ठोकळा, हत्ता.

**पाळी** स्त्री. १. (सैन्य,झाडे, भिंत कुंपण इ. चा) वेढा;गरका; समूह; समुदाय : 'होळकरांची फिरती पाळीं। – ऐपो २२४. २. बांध; काठ;

कड : 'वस्त्रें ठेवोनिया पाळीं । जळीं नग्ने निघालिया ।'-कथा १.५.६. २. भटक्या लोकांची तात्पुरती वस्ती.
क्रिवि. भोवताली; आसपास; सभोवार. [सं.पालि]

**पाळीव** वि. १. पाळलेला; बाळगलेला; वाढवलेला. २. माणसांच्या वस्तीत राहणारा; रानटी नव्हे असा (कुत्रा, बैल इ. जनावर).

**पाळीव बकरा** सांगितलेले काम कशाचीही पर्वा न करता करणारा.

**पालु–ळू** न. जात्याच्या तोंडाची उंच कड; पाळ; पाळे.

**पाळूक** न. गोगलगाय; पिकूळ. [सं.पल्लिका]

**पाळे** न. १. जात्याच्या तोंडाची उंच कड; पहा: **पाळ** स्त्री. २,६. २. (तिखट, मीठ इ. ठेवण्यासाठी केलेले) लाकडाचे भांडे; लाकडी वाडगा. ३. डोंगराळ प्रदेशातील सखल जमीन; दरी. ४. तळे, डबके इ. कांच्या आतील जागा, अवकाश. ५. मुशीच्या तोंडावरचे झाकण. (राजा.) ६. कोठे किंवा खण असलेला पानसुपारीच्या डब्याचा भाग. ७. साठा; आश्रय : 'तया ईश्वरें जो दयेचेंच पाळें ।'-विवि ८.३.५९. ८. डोंगराळ प्रदेशातील सखल जमीन; दरी. [सं.पल्यम्]

**पाळेगण** पु. पालिंग; समूह; समुदाय: 'ऐसें असोस पाळेगण । यादवांचें ।'- शिव ५४४.

**पाळेगार–कर–करी** पु. डोंगराळ प्रदेशात राहणारा कर्नाटक प्रांतातील लुटारू व बंडखोर लोकांचा मुख्य; बंडखोर सरदार. हे प्राचीनकाळी महालकरी, तर पुढे मुस्लिमांच्या अमलात स्वतंत्र वागणारे जहागीरदार बनले होते. [सं.पल्लीपाली = गावतळ]

**पाळेपडगे** न. (व्यापक) ताटवाट्या, भांडीकुंडी इ. संसारोपयोगी गोष्टी.

**पाक्षिक** न. दर पंधरा दिवसांनी प्रकाशित होणारे वृत्तपत्र, नियतकालिक इ.
वि. १. पंधरवड्याचे. पहा : **पक्ष.** २. (लढा, वादविवाद, धर्म इ. तील) बाजू, तड, पंथ, प्रकार इ. चा असणारा; पक्षाचा.

**पाक्ष्या** स्त्री. अव. दाणे काढलेली कणसे.(खा.)

**पांक्त** वि. १. पंक्तीत, ओळीत लिहिलेला ( मूळ ग्रंथ, पोथी, पुस्तक); ओळीसंबंधी; ओळींचा. २. (जेवताना) एका पंक्तीला बसवण्यायोग्य; पंक्तिव्यवहाराला लायक (मनुष्य). [सं.]

**पांग** पु. १. उत्कट इच्छा; आशा; तृष्णा; आसक्ती. (क्रि. फिटणे, निवारणे). २. पराधीनता; ताबेदारी; मिंधेपणा : 'येथ श्रवणाचेनि पांगें –। वीण श्रोत्या व्हावें लागे । हे मनाचेनि निजांगे । भोगिजे गा।' – ज्ञा ६.२४. ३. गरज; इच्छा; अपेक्षा; जरुरी : त्या सभोंवतां सर्वांगें। भक्तिचेनि पांगें भुलला ।' – एभा २.७१९. ४. उणीव; दारिद्र्य; पंगुपणा; हाल; अन्न, वस्त्र इ. कांची ददात, चिंता; (सामान्यत: अनेकवचनी प्रयोग): 'जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे ।'- ज्ञा ४.१६४. ५. यातायात; श्रम; कष्ट : 'न लगे वेदशास्त्राचा पांग ।'- विउ ११.१७.[सं. पंगु = लंगडा]

**पांगड** स्त्री. दोर : 'कटारे, कोहते, भिंडिमाळा। पाश पांगडी शंकळा।' – कृमुरा २५.१६.[म. पाग = होडीला, बैलाला बांधलेला दोर]

**पांगडा** पु. १. पारतंत्र्य; पराधीनता; पंगुपणा : 'अक्षै ठेवा सकळांचा। परी पांगडा फिटेना शरीराचा ।'- दास ५.२.३९. २.लोभ. [सं.पङ्गु]

**पांगड्यार** स्त्री. अव. विहिरीत उतरण्याच्या खोबण्या.

**पांगणे** अक्रि. (गर्दी, जमाव) अस्ताव्यस्त होणे; सैरावैरा पळणे; विसकळीत होऊन निरनिराळ्या दिशांनी पळू लागणे; पसरणे. [सं.पद]

**पांगणे** सक्रि. वश, परतंत्र होणे : 'भक्तभावें आभारला। देवो उपकारें दाटला । यालागीं नुल्लंघवे बोला । पांगें पांगला भक्तांच्या ।'- एभा ७.४८३.

**पांगापांग–गी,पांगणी** स्त्री. १. दाणादाण; फुटाफूट; फाकाफाक; विसकळीतपणा. २. दाणादाण झालेली स्थिती. [पांगणे द्वि.]

**पांगवात** स्त्री. पंगत; मेजवानीचा समारंभ : 'एक दिही एका को वोराडा पांगवात आथी ।'- भिल्ली २५. (भि.)

**पांगवि(व)णे** सक्रि. दुबळा, परतंत्र, पराधीन, पंगू करणे : 'बहु पांगवीलों बहु नागविलों ।' – तुगा १५०५. [सं. पंगु]

**पांगशी** स्त्री. झाड, पालेभाजी इ. खुडल्यानंतर त्यास फुटणारा अंकुर; घुमारा; फूट.
वि. १. ज्याचा बहर ओसरून गेला आहे असा (वेल, मिरचीचे जाड इ.). २. दुसऱ्या बहराचे (फळ).

**पांगशीचे फळ** उतारवयात झालेले अपत्य.

**पांगळा, पांगु(गू)ळ** पु. पहाटेच्या वेळी गावात फेरी घालून भिक्षा मागणारी किंवा नंदीबैल फिरवून उपजीविका करणारी एक जात, तीतील व्यक्ती.

**पांगळा, पांगा** वि. ज्याचा एक अथवा दोन्ही पाय निकामी झाले आहेत असा लंगडा, लुळा (मनुष्य). [सं.पंगु]

**पांगा** वि. १. पांगळा. २. फिका; निस्तेज : 'अन्याचें तेज किती काळाचें तेज त्यापुढें पांगें ।'- मोकर्ण ४६.१२. ३. बाक असलेला; फेंगडा (पाय). (राजा.) [पंगु]

**पांगार** पु. होडीचा एक प्रकार; पिर्ग. पहा: **पगार**

**पांगारा** पु. एक शोभिवंत वृक्ष. उंची १५-१८ मीटर; काटेरी; पानझडी; शिंबावंत (शेंगा असणारा); पांढरा व तांबडा असे दोन प्रकार. लाकूड हलके व खेळणी करण्यासाठी उपयोगी.

**पांगित्व** न. प्रसर.

**पांगि(गी)ला** वि. १. दुसऱ्यावर ज्याच्या पोषणाचा भार आहे असा; मिंधा; ओशाळा; अंकित; पराश्रित : 'या पोटाकारणें गा झालों पांगिला जना ।'- तुगा ३४९. २. (ल.) चिकटलेला. ३. शरण आलेला : 'एका जनार्दनीं अंबे तुजला पांगिले जन । '-भज ७५. ४. अधू; पंगू; दुबळा : 'येक देहाचे पांगिले । ते आंगीं हुर्पळले ।'- दावि ४०३. [पांग]

**पांगुई** पु. वासुदेव. (अहि.)

**पांगुतणे** अक्रि. व्याप्त, आच्छादित होणे : 'आंतु महानंदा चेइरें जाहलें। बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें। आपाद पांगुतलें । पुलकांचलें ।'- ज्ञा ११.२४६.

**पांगुरविणे** सक्रि. लपविणे : 'वालिपेचिआं ॐली पाइंचीं नूपुरें पांगुरविलीं।'- शिव १७५.

**पांगु(गू)ळ** वि. १. पहा: **पांगळा, पंगू** :'नरदेह पांगुळ असतां। तरी तो कार्यास न येतां।'- दास १.१०.२८. २. स्थिर : 'मोतियाची

कीळ । होय मोतियावरी पांगुळ ।'- अमृ १.५७. [सं.पंगु]

**पांगुळगाडा** पु. लहान मुलांना चालायला शिकवण्याचा तीनचाकी गाडा.

**पांगुळणे** अक्रि. १. पंगू होणे; गती खुंटणे; थोटावणे. २. (ल.) कुंठित, स्तिमित होणे.

**पांगूळ** पु. १. पहाटे येणारा एक भिक्षेकरी; पहा : **पांगळा.** २. घाण सोडणारा एक किडा; पिंगूळ; पांगूळ किडा. ३. अंगावर ठिपके असणारे घुबड; (प्र.) पिंगळा.

**पांगूळकाठी–गोडा–धिरा** स्त्री.पु. १. (ल.) पांगळ्यांचा, दुबळ्यांचा, दीनांचा कनवाळू मित्र; साहाय्यकर्ता. २. लंगड्या माणसाने चालताना धरण्याची काठी.

**पांगोरा** पहा : **पा(पां)गोरा**

**पांघरणे** उक्रि. १.(पोट, पाठ इ. अवयव झाकले जातील अशा तऱ्हेचे वस्त्र इ.) अंगावर घेणे; आच्छादणे; पांघरणे हा धातू (पागोटे, अंगरखा इ.) घालणे, नेसणे ह्या धातूहून अर्थाने भिन्न आहे व त्यांच्याऐवजी ह्याचा उपयोग कधीही होत नाही. २. पाहाणे. [सं.प्रघृण्, प्रांगावरण]

**पांघरूण** न. १. पांघरले जाईल अशा तऱ्हेने अंगावर घेण्याचे, धारण करावयाचे वस्त्र. उदा. शेला, शाल, रजई इ. २. (अनेकवचनी प्रयोग) पांघरण्याच्या, नेसण्याच्या पोशाखाच्या उपयोगाची वस्त्रे समुच्चयाने. ३. (ल.) (आपल्या) निर्वाहाचा, संरक्षणाचा भार ज्यावर आहे असा पुरुष, व्यक्ती, आईबाप, यजमान, आश्रयदाता इ. [सं.प्रावरण] ० **घालणे** – वाईट गोष्ट; गुन्हा लपविणे, झाकण्याचा प्रयत्न करणे, उघडकीस येऊ न देणे. ० **पांघरुणे जाळणे** – पत्राचा जबाब मिळण्यासाठी पूर्वीच्या काळचा धरणे घेण्याचा एक प्रकार; त्रागा करणे : 'खिजमतगारानीं पांघरुणें जाळलीं तथापि हुजूर न आले.'- पया ११८.

**पांचजन्य** पु. १. विष्णूच्या हातातील शंख. २. (ल). शंखध्वनी; बोंब. (क्रि. करणे) [सं.]

**पांचट** वि. फाजील; चावट.

**पांचरात्र, पांचरात्रधर्म** पु. वैष्णवधर्मीय एक प्रमुख पंथ व मत. यात चार वेद आणि सांख्य व योग या पाचांचाही समावेश होतो.

**पांचाल–ळ** पु. सुतार, कोष्टी, न्हावी, धोबी व चांभार या पाच कारागीर जातींचा समुदाय गट. शिवाय यासारखे दुसऱ्या अनेक प्रकारांची पांचाळ या नावाने निर्दिष्ट केलेले पाच पाच जातींचे गट आहेत.

**पांचाली** वि. पांचाल देशातील. [सं.]

**पांचाळ** वि.पाचकळ; बडबड करणारी; मूर्ख (स्त्री).

**पांचाळपाळी** पु. एक कीटक.

**पांचिक** वि. निकृष्ट, पाच कसांचे (सोने).

**पांचौर** न. पाच द्रव्यांचा, वस्तूंचा समुदाय : 'सर्व सुखाचे मळय - पांचौर'- उगी ६६२. [सं. पंच+चिर]

**पांज** स्त्री. कोंबड्या झाकण्यासाठी केलेला कळकाच्या कांबट्यांचा हारा; टोपल्याच्या आकाराचा पिंजरा. (कु.,गो.) [सं.पंजर]

**पांजणी** स्त्री. छपाई करण्यासाठी खळ लावून कपडा तयार करणे. पहा : **पाजणी**

**पांजणे** उक्रि. १. सूत, नवीन वळलेली दोरी, दोर इ. गुळगुळीत, मऊ करण्याकरता एखादे लाकूड, खांब इ. कावर घासणे. २. विणण्याचे सूत खळीने माखणे. ३. छपाईसाठीचा कपडा खळ लावून तयार करणे.

**पांजणे** अक्रि. हात इ. शरीरावयावरून दोरी, दोर घासत गेल्याने तो खरवडला, घसरवटला जाणे.

**पांजरण** न. छपरांच्या वाशांच्या वर व कौलाखाली गवत, पाने इ. कांचे केले जाणारे आच्छादन. [सं.पंजर]

**पांजरणे** अक्रि. १. विस्तारणे; पसरणे : 'शिष्टागमविधानें। विविधयागवितानें । इयें पानावरी पानें । पांजरती ।' – ज्ञा १५.१८९. २. पिंजारणे. [सं.पंचतितराम्]

**पांजर(रा)पोळ,पांजरपोळा** पु. म्हातारपणामुळे कुचकामी झालेल्या, लंगड्या, लुळ्या गुरांची मोफत निगा ठेवण्याचे ठिकाण. [सं.पंजर + म. पोळ; गु. पांजरपोळ]

**पांजरा** पु. १. (पशु, पक्षी इ.) कोंडून ठेवण्याचा पिंजरा, सापळा : 'एकु घरा नेऊनि कवतिकें पांजरां घातला।'- पंच १.५१. २. ताड, माड इ. वृक्षाला जेथे झावळ्या फुटतात तो शेंड्याचा, माथ्याचा भाग. ३. प्राणी, मनुष्य इ. कांच्या बरगड्यांचा सांगाडा, सापळा. ४. (घर, गलबत इ. काचा) आच्छादनावाचून असलेला सांगाडा.[सं.पंजर]

**पांजरी** स्त्री. खटाऱ्यातील सामान पडू नये म्हणून त्याच्या मागील बाजूस बसवली जाणारी चौकट. (खा.) [सं.पंजर]

**पांजळी** स्त्री. दिव्याची ज्योत.

**पांजी** स्त्री. १. तटाच्या भिंतीचा वरचा भाग; टोक; अग्रभाग; अग्र; शिखर . २. शेतकऱ्यांचा एक कुळाचार. यात देवतेला कोंबडे वा बकरा यांचा बळी देऊन तो प्रसाद म्हणून खातात. ३. भूत, पिशाच इ.ना शांत करण्याकरता अन्नबळी अर्पिण्याचा विधी. (क्रि. करणे). ४. सदर विधीने समर्पण केलेला अन्नबळी (क्रि. देणे) : 'इंद्राचि पांजी आपणचि खाय । त्याचिया क्रोधें पाडसाचें भय ।'- निगा ८४. ५. (एखाद्याला) कुंठित, चकित, निरुत्तर करणे; घोटाळ्यात पाडणे; मती गुंग करणे; कोड्यात पाडणे.(क्रि. करणे)

**पांजी** स्त्री. पंचांग.

**पांजे** न. (व्यापाऱ्यांत रूढ) घर. (नंदभाषा)

**पांजॉ** पु. पाच कोऱ्या कागदांचा एक दस्त. (गो.)

**पांझर–रा** पहा : **पांजरा** १,३

**पांझरट** न. नवरात्रादी उत्सवप्रसंगी, देव्हारा, मखर इ.वर शोभेसाठी लावण्याची कातरकाम केलेली कागदाची जाळी. [सं. पंजर = पिंजरा]

**पांटलॉ** पु. मोठी टोपली. (गो.)

**पांड,पांडगा** पु. १. जमीन मोजण्याचे एक परिमाण. हे बिघ्याच्या एक विसांश इतके किंवा चारशे चौरस काठ्यांइतके असते.२. जमिनीचा तुकडा, ठिके, फाळी.

**पांड** न. पाऊल; पावंड : 'वचन वदुनि ऐसें चालिला चार पांडें ।'- आविश्वा २५. [पावंड अप]

**पांड(ढ)र–री** स्त्री. वसाहतीची, गावठाणाची जागा. [सं.पाण्डुर]

**पांडरी** स्त्री. ग्रामसंस्था. पहा : **पांढर**

**पांडव** पु. १. पंडुराजाचे वंशज. युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव हे पंडुराजाचे पाच मुलगे. २. (ल.) पाच रुपये इ. कांचा समुदाय. ३. एक प्रकारचा पाणकोंबडा.

**पांडव,पांडवांचे लेणे** (ल.) डोंगर, खडक इ. पोखरून केलेली मनुष्यशक्तीला करायला अशक्य वाटणारी देवालय, मूर्ती, राहण्याच्या खोल्या इत्यादींची रचना.

**पांडा, पांड्या** पु. १. उत्तर हिंदुस्थानी ब्राह्मणांची एक पदवी. पहा : **पंड्या** २. भय्ये; परदेशी लोकांतील उपाध्याय. [सं. पंडा]

**पांडा, पांड्या** पु. (वाघाचा) बच्चा; पिल्लू.

**पांडाळ** पु. अरबाडी; सापाचे विष उतरविणारा.(व.)

**पांडित्य** न. १. शास्त्रार्थ सांगणे इ. प्रकारचे पंडिताचे काम; विद्वत्ता. २. भाषणचातुर्य; विद्येचे आडंबर; डौल. [सं.]

**पांडीया** पु. पुढारी : 'रयान पांडीये आमदाबाद प्रांत गुजराथ यांचे नांवें कौल.'- थोमारो २.८७.

**पांडीवड** पु. नदीत, डबक्यात आढळणारा एक साप. (को.)

**पांडु, पांडुर** वि. पांढरा; फिका. [सं.]

**पांडु, पांडुरोग, पांडुकामला** पु. स्त्री. रक्तक्षयाचा एक रोग.

**पांडुक** पु. पादुकेच्या आकाराचा घोड्याच्या अंगावरील केसांचा भोवरा.

**पांडुरत्व-ता** न. स्त्री. पांढरेपणा.

**पांडुरी** स्त्री. पांढरी; चुनखडीची जमीन.

**पांडे** पु. अव. वतनदार कुलकर्णी. (व.)

**पांढर** स्त्री. १. गावाच्या चतु:सीमेतील सर्व जमीन; गावठाण; वसाहतीची पांढरी जमीन : 'हस्तनापुरीं कांहीं वस्ती नाहीं. साक्षा मात्र जुनी पांढर आहे.' - भाब ४४. २. काळ्या जमिनीत मधून मधून असलेली पांढरी जमीन किंवा तिचा पट्टा. ३. गावाच्या शिवारातील जमिनीचा शेताचा भाग; शेत. ४. पांढरी माती किंवा जमीन. ५. गावातील सर्व लोक; सर्व गावकरी मंडळी (गावकीच्या कामासाठी एकत्र जमलेली): 'त्याची पंचाईत मौजे मजकूरचे पांढरीनें करून...' - समारो ३.६७. ७. गावची ग्रामदेवता किंवा शेताची स्थान देवता. ८.(गावठाणची) वसाहत झालेली, वस्ती असलेली स्थिती; लोकवस्ती. ९. व्यापारी जिन्नस, जंगम मिळकत इ.वरील सरकारी जकात; जकातीचे उत्पन्न. वि. गावातील; गावाचा इ. [सं.पाण्डुर]

**पांढर** वि. पांढरा या समासात पूर्वपदी येणारे रूप. जसे :- पांढरमाती; पांढरपोटा, पांढरवणी इ.

**पांढरकूळ-गण** न. गावातील सर्व समाज, मंडळी समुच्चयाने.

**पांढरगणा** पु. गावचे बारा बलुते.

**पांढरझाडा** पु. गावठाणाचा हिशेब : 'मौजे मजकूरचा थलझाडा व पांढरझाडा कुलकैफत दस्तक...' - शाछ १.१२९.

**पांढरपट्टी** स्त्री. गावातील कारागीर, दुकानदार, व्यापारी इ. शेतकी व्यतिरिक्त धंदा करणाऱ्या रहिवाशांस द्यावा लागणारा कर; मोहतर्फा.

**पांढरपायी** वि. मागचा एक पाय पांढरा असलेला (घोडा). (हा अशुभ मानतात.)

**पांढरपाल** स्त्री. (ल.) अतिशय रोड, निस्तेज मनुष्य.

**पांढरपेशा** पु. शेतीव्यतिरिक्त इतर धंद्यावर किंवा पांढरीवर उपजीविका करणारा; (अंगमेहनतीची कामे न करता) समाजातील उच्चवर्णीय म्हणून मानला गेलेला लेखक,वकील, डॉक्टर, शिक्षक, भिक्षुक, सोनार इ. कांचा वर्ग व त्यातील व्यक्ती. [सं.पाण्डुर + फा. पेशा]

**पांढरपोटा** वि. १. गव्हाची एक हलकी जात. हा एका बाजूस पांढरा व दुसऱ्या बाजूस तांबडा असतो. २.अव्यवस्थितपणे भाजलेली व मध्यभागी पांढरी राहिलेली (भाकरी).

**पांढरफळी** स्त्री. एक तृणधान्य व त्याचे तृण. मोहरीपेक्षा किंचित मोठे बी असते, दुष्काळात भाकरी करून खातात, एरवी जनावरांना उपयोगी.

**पांढरवणी-नी** न. पांढरा प्रदर : 'पांढरवनी पडे तें राहे.'-वैद्यक ८५.८६.

**पांढरा** पु. १. (सांकेतिक) सर्प; साप. २. फार विषारी अशी सापाची जात. रंगाने काळा, धामणीच्या पोटचा असतो.

**पांढरा** वि. १. सफेद; शुभ्र; श्वेतवर्ण. २.(ल.) लुच्चा; सोदा; कपटी; अमंगल अशुभ : 'हा पांढरा संन्यासी । तूं कांहीं जाणैसी ना।'- शिव २२०. [सं.पाण्डुर] (वा.) **पांढऱ्याचा काळा पांढऱ्यावर काळे करणे** - (एखादी गोष्ट, करार इ. पांढऱ्या कागदावर काळ्या शाईने) लिहून नमूद करणे; लेखनबद्ध करणे; (सामा.) लिहिणे. **पांढऱ्या कावळ्याकडे जाणे** - देशांतर करून भीक मागणे. **उखळ पांढरे होणे** - दारिद्र्य जावून श्रीमंती येणे.

**पांढरा कांदा- बटाटा** (उप.) कोंबडीचे अंडे. (कु.)

**पांढरा परीस** (उप.) १. दगड. २. पांढऱ्या पायाचा मनुष्य; कपाळ करंटा. ३. अट्टल; सोदा; लुच्चा.

**पांढरा फटफटीत-फिटूक** वि. अतिशय फिका; निस्तेज.

**पांढरा वडस** डोळ्याच्या बुबुळावर पांढऱ्या रंगाचा होणारा रोग; सं. शुक्लार्म- योर २.५३३.

**पांढरा हत्ती** (ल.) सांभाळण्यास अवघड पोसण्यास जड असे जनावर, मनुष्य, वस्तू इ.

**पांढरा हस्या** वि. तांदळाचा एक प्रकार.

**पांढरी** स्त्री. १. (गावठाणावरील) लोकवस्ती. २. गावची सीमा; शिवारातील (गाळाची मळी साठून तयार झालेली) जमीन; गावठाण : 'गांवची पांढरी सोडून लोकांनीं वस्ती लांब नेली.'- खेया २५. ३. पहा : **पांढर**

**पांढरी** स्त्री. डोंगराळ प्रदेशातील एक झाड. याचे लाकूड जड, कठीण व पांढरे असते. पांढरीची काठी हातात असल्यास भूतबाधा होत नाही वा सर्प अंगावर चालून येत नाही असा समज आहे.

**पांढरीचा डोळा** (ल.) गावचा महार वतनदार.

**पांढरीचा भेंडा** गावच्या वतनदारांनी आपली गरिबी, दैन्य इ.ला उद्देशून गावासंबंधी वतनदारासंबंधी योजण्याचा शब्द.

**पांढरी दांडी** हीन धातूचे मूल्यवान धातूत रूपांतर करण्याची किमया : 'कथिलांचे रूपें करणें तेयातें पांढरी दांडी म्हणिजे' - लीचपू ५४९.

**पांढरी सुरळी** (विणकाम) १. फणीतील एका घरात काळे व एका घरात पांढरे उभार सूत असून आडवण सर्व काळे व कोणतीही किनार असलेले लुगडे. २. फणीतील एका घरात तांबडे व एकात पांढरे असे

उभार आणि आडवण सर्व तांबडे असून कोणत्याही किनारीने युक्त असा लुगड्याचा प्रकार.

**पांढरे निशाण** १. (ल.) मुसलमानांचे, मोंगलांचे निशाण : 'नऊशें पठाण कापिला। पांढरें निशाण उपटलें।'-ऐपो ६१. (ल.) शरणागती.

**पांढऱ्या रक्तकणिका** अनियमित आकाराच्या, केंद्र असलेल्या व शरीराचे संरक्षण करणाऱ्या पेशी.

**पांढुरका-गा** वि. काहीसा पांढरा; तकतकीत (अस्पष्ट, अंधुक दिसणाऱ्या वस्तूंसंबंधाने रूढ).

**पांढुरकी** स्त्री. १. (कागद, कापड, पाण्यात उडी मारणारा मासा इत्यादींची) पांढरी चकाकी. २. डोळ्याच्या बुबुळावर आलेला पांढरेपणा, भुरी. ३. सूर्योदयाच्या वेळी दिसणारी आकाशाची पांढरी चकाकी.

**पांथ** पु. १. मार्ग; रस्ता; वाट; सडक. २.प्रवासी; यात्रेकरू. वि. पांथस्थ; वाटसरू. २. मार्गासंबंधी; रस्त्यासंबंधी. [सं.पथ]

**पांथगृह** न. धर्मशाळा; प्रवाशांच्या राहण्या-जेवण्याची सोय असणारी जागा.

**पांथस्थ, पाथिक** पु. वाटसरू; मुशाफिर; प्रवासी; मार्गस्थ.

**पांथरी** स्त्री. प्लीहा. (प्र.) पाणथरी.

**पांथा** पु. रीत; पद्धती; तऱ्हा; मार्ग : 'घेतु आला पांथा । महारथिआं चिआं।'- शिव ९८२.
स्त्री. (को.) पहा : **पा(पां)त** [सं.पथ ]

**पांथ्या** पु. खळ्यातील मळणी करणाऱ्या पातीतील मुख्य बैल. (को.)

**पांद-दी-धी** स्त्री. (व.) पहा: **पाणं(ण)द**

**पांदरा** पु. कोंबडीची पिल्ले झाकण्याची वेळूची टोपली. (बे.)

**पांदी-धी** स्त्री. (ल.) आकाशगंगा. (व.)

**पांदोलणे** सक्रि. पेलणे : 'मदगल पांदोलिते नाचती ।'- कला ९. [सं. प्रांदोलन]

**पांद्राच** पु. दिमाख; बढाई; फुशारकी. (गो.)

**पांप्राय** स्त्री. बढाई; दिमाख. (गो.)

**पांसाळी** स्त्री. धुळीचा लोट : 'मोंटका देओ वागारां हातु घालीं। सेवंचि बैसे मागिलीं पांसाळी।'- शिव १०११. [सं.पांसु + आली]

**पांसु** पु. धूळ; माती; रजःकण : 'मी रिगालों असें भूतळीं । म्हणौनि समुद्रमहाजळीं । हे पांसूची ढेंपुळी । विरेचिना ।'- ज्ञा १५.४०१.

**पांसुखूर** पु. घोड्याच्या पायाचा एक रोग.

**पांसोळां** क्रिवि. कुशीत; बाजूला : 'हळूचि माझा बाळु चोरुनि । आपुले पांसोळां ठेविलां ।'- ख्रिपु १.२६.१७. [सं.पार्श्व; प्रा. पासल्ल]

**पिक** पु. कोकीळ पक्षी : 'परी पिकचि एकला मधुर वाणि लाधे कृती।'- कोकिलान्योक्ति मपु ६.१८९६. [सं.]

**पि(पि)क** स्त्री. (तंबाखू किंवा विडा खाल्ल्यानंतर) तोंडातून टाकलेली किंवा टाकण्याची थुंकी. [सं.पिज्]

**पिक** न. १. शेतातील धान्य. २. (ल.) फळ : 'आजि कृष्णस्नेहाचें पिक।'- ज्ञा ४.९.

**पिक** स्त्री. पहा : **पिंक**

**पिकट** वि. १.फिकट; निस्तेज. २. पिकूट; पिवळसर; पिकटलेले. [सं.स्फट्]

**पिक(कु) टणे** अक्रि. फिक्के, निस्तेज होणे; पिवळसर होणे (रोगामुळे माणसाचे शरीर, पिकल्यामुळे झाडाचे पान इ.).

**पिकटाण** स्त्री. पिकलेल्या फळांचा वास (विशेषतः केळी, आंबा, फणस इ. चा ). (राजा.)

**पिकटी** स्त्री. आजारपणात शरीर व चेहरा यावर आलेला फिकटपणा. (राजा.)

**पिकणे** अक्रि. १. पक्व होणे; पूर्णावस्थेस जाणे. २. (अक्षरशः व ल.) टवटवीतपणा, तजेला, गर्दपणा वगैरे नाहीसा होणे. ३. उत्पन्न होणे (पीक वगैरे). ४. (बातमी, वदंता) पसरणे. ५. (सोंगट्यांचा खेळ) सोंगटी सर्व पट फिरून घरात जावून बसणे. ६. उत्कर्ष, भरभराट होणे; एखाद्याचा धंदा, योजना, बेत यशस्वी होणे. ७. (ल.) (पोटात) गर्भ वाढणे; पोट पिकणे. ८. चंगळ, चैन होणे. ९. फलद्रूप होणे : 'तैसा युक्तिमंतु कौतुकें। अभ्यासाचिया मोहरा ठाके । आणि आत्मसिद्धीचि पिके । अनुभवु तयाचा ।'- ज्ञा ६.३५५.[सं.पक्व] (वा.) **पिकले झाड** - अतिशय श्रीमंत व उदार मनुष्य; पुष्कळ मिळकर्तीचा, उद्योगी माणूस. **पिकले पान** -अतिवृद्ध व्यक्ती. **पिकल्या झाडाखाली मरणारा** - अतिशय आळशी माणूस. **कौल पिकणे** - एखाद्या गोष्टीस भर येणे; मनासारखे होणे; इच्छिलेली वस्तू प्राप्त होणे : 'लाभा नाहीं पुरें पिकला कौल ।'- निगा ३२५.

**पिकदाणी-दान-पात्र, पिकधरणी** स्त्री.न. तस्त; विड्याची किंवा तंबाखूची थुंकी थुंकण्याचे एक विवक्षित आकाराचे भांडे.

**पिकदाव-राड-ळाड** पु. स्त्री. १. सुगीचा, शेते पिकण्याचा काळ. २. शेतातले पीक.

**पिकनिक** सहल. [इं.]

**पिकर-स** पु. (विणकाम) धावत्या धोट्याच्या मागांतील धोट्याला गती देणारा ठोकळा. [इं.पिक्=उचलणे]

**पिकराड-लाड-दाव** पु. स्त्री. सुगीचा, शेते पिकण्याचा काळ. वि. शेतात पिकणारे.

**पिकवण** न. १. फळे पिकवण्यासाठी लागणारे गवत, पेंढा इ. २. गळू वगैरे पिकवण्यासाठी त्यावर बांधण्याचे पोटीस, लेप. इ.

**पिकवणे** सक्रि. १.पक्व करणे. २. (ल.)चोप देणे; खूप मारणे; बडवणे.

**पिकळी, पिकु(कू)ळ** स्त्री. गोगलगाय; शंबूळ. (दे.)

**पिका** वि. १. पिकलेला; परिपक्व झालेला. २. जीर्ण. [सं.पक्व]

**पिकाऊ** वि. १. पिकण्याच्या स्थितीत आलेला; पिकण्यास झालेला. २. सुपीक (जमीन).

**पिकाव** न. टिकाव; कुदळी. (हेट.)

**पिकास** न. मोठे टिकाव. (गो.)

**पिकाळ** वि. सुपीक.

**पिकेटिंग** न. दारू पिणे, विकणे. इत्यादी विघातक गोष्टी करणाऱ्याला सविनय प्रतिबंध करणे; तसे न करण्याविषयी त्याची समजूत घालणे; निरोधन. [इं.]

**पिको** पु. १. पोलकी, साडी वगैरेला लावतात ते कलाबतूचे काठ. २. वस्त्राच्या कडेला धागे निघू नयेत म्हणून घातलेली विशिष्ट शिवण.

**पिकोटा** पु. विहीर अथवा पाण्याचा झरा, डबके यातून पिकाला पाणी देण्याचे साधन. पहा : **ओकती**

**पिक्कल** न. एक माप, वजन, ५३२० सुरती रुपये भार : 'पिक्कलचें वजन ५३२० सुर्ती रुपये भार असतें.'- मुंव्या १०५.

**पिख(खु)रणे** उक्रि. अस्ताव्यस्त करणे. (केस वगैरे) अव्यवस्थित होणे, पसरणे, असणे, पिस्कारणे; विखुरणे. [सं.विकृ]

**पिखोली** स्त्री. एक प्रकारचे फुलपाखरू. (ना.)

**पिगुळ** पु. काथा. (गों.)

**पिग्मी** स्त्री. आफ्रिका खंडात आढळणारी, वैशिष्ट्यपूर्ण शरीररचना असलेली ठेंगू लोकांची जमात.
वि. खुजा; ठेंगू.

**पिघळणे** अक्रि. १. पघळणे. २. वितळणे; पातळ होणे. (प्रां.) [गुज. पिगळवुं; हिं. पिघळना]

**पिच** पु. खेळपट्टी. [इं.]

**पिचकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. (थुंकी, पिचकारी, रक्त इ. ची) चिळकांडी उडताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]

**पिचकट** वि. १. चीर पडलेला; किंचित फुटका; तडकलेला; पिचका. २. ज्याच्या डोळ्याच्या काचेला (बुबुळाभोवतालच्या भागास) चीर पडली आहे असा; मिचमिचा. [सं. पिच्चट = नेत्ररोग]

**पिचकणे** अक्रि. फुटणे; तुटणे; भंगणे.
सक्रि. जोराने दाबणे. (ना.)

**पिचकळी** स्त्री. पिंक; थुंकी वगैरेची टाकलेली पिचकारी; गुळणा. [ध्व.]

**पिचका** वि. १. पिचलेला; चीर, भेग, तडा पडलेला. २. ज्याला नेहमी पाणी येते व जो अर्धवट उघडा असतो असा डोळा; असा डोळा असणारा माणूस. ३.अपेक्षित काम पार पाडण्याची कुवत अंगी नसणारा; पादरफुसका. [ध्व.; क. पिच्चु]

**पिचकारी** स्त्री. १.( मागील बाजूस दट्ट्याने दाबून) रंग, औषध वगैरे उडवण्याची नळी; चिपनळी. २. (रक्त, रस, पाणी इ. चा) जोरात उडणारा फवारा. [सं.अपस्किरी]

**पिचको** पु. शिजवून तयार केलेले निरुपयोगी मिश्रण; खराब झालेले अन्नादिक पदार्थ. [सं.पच् ]

**पिचड** न. १. डोळ्यातून येणारी घाण; पू; चिपड.(को.) २. थुंकी.

**पिचडी** स्त्री. (प्रां.) थुंकी; थुंकीची पिचकारी : 'जैसे बाभुळीचें खोड। गिरबडूनि जाती सरड। तैसें पिचडीं तोंड। सरकटिजेल।'- ज्ञा १३.५६१. [ध्व.]

**पिचणे** अक्रि. १. फुटणे (बांगडी, काच, बरू इ.); चीर, तडा, भेग पडणे; मोडणे. २. (तांदूळ वगैरे फार भिजवल्यामुळे) फुगणे; फुलणे; ठिसूळ होणे; गिचगिचीत, गोळा होणे. ३.(हाड, शिंपा, चुनखडी इ. फार भाजल्यामुळे) उडणे. ४ सडणे; कुजणे. ५.दळणे. [सं.पच्; पिश्-ष्; ध्व.पेचणे] (वा.) **पिचून टाकणे** - नाहीसे करणे.

**पिचपिच-चा** क्रिवि. १. थुंकीची पिचकारी वारंवार टाकल्यामुळे होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. २. डोळ्यांची उघडझाप करून; डोळे मिचकावून. [ध्व.]

**पिचपिचणे** अक्रि. १. डोळ्यांची वरचेवर उघडझाक करणे; मिचकावणे. २. पिचकारीप्रमाणे आवाज करणे. [सं.पिच्चट]

**पिचपिचीत** वि. बारीक डोळे असलेला ; मिचका; मिचमिचा; लवलुका.

**पिचबाही** स्त्री. जाड भिंतीला असलेल्या दुहेरी चौकटीच्या दरवाज्याच्या आतील बाजूच्या चौकटीच्या दोन्ही खांबांपैकी प्रत्येक.

**पिचर** न. पाथरवटाचे एक हत्यार. (को.)

**पिचला** न. पिलू-ल्लू : 'एक पिचला तें काय उनार्यो नेत्र.' (एका पिल्लाने ते काही ऐकले नाही.)- भिल्ली ९. (भिल्ली)

**पिचवणे** अक्रि. १. (कढत अन्न खाल्यामुळे घशात, पोटात, उरात) जळजळणे. २. (विरू.) (राजा.) पहा : **पिचणे**

**पिचाचां, पिचापीच** क्रिवि. लवकर लवकर केलेल्या पिचपिच अशा मोठ्या आवाजाने. [ध्व.]

**पिचुमंद** पु. कडुनिंब : 'पिचुमंद नित्य सेविल्या देख । त्यासि बाधीना कोणी विख।'- एभा १५.२०६. [सं.]

**पिचुं(चों) ड्या** स्त्री. अव. पाठीमागे वळवून बांधलेले हात. (वा.) ० **बांधणे , बांधून घेणे** - (लेख, पत्रे, करार इ. च्या साहाय्याने) पूर्णपणे गुंतवणे.

**पिचू** न. १. खेळाची लहान गोटी. (कु.) २. माशाचे अगर कुर्लीचे पिलू. (कु.)

**पिचून पिचून** क्रिवि. हालहाल करून,होऊन.

**पिचोळी** पहा : **पिचकारी**

**पिचोंद्री** स्त्री. माडाच्या झाडाला पानांच्या मधून उपपर्णांप्रमाणे येणारी आवरणे.

**पिच्छ** पु.न.१.पक्ष्याचे पीस; शेपूट. २. मोराचा पिसारा. ३. कोंबड्याचा तुरा. [सं.]

**पिच्छल** वि. १. ओला चिंब; निसरडा; बुळबुळीत : 'स्वेदोदकें करुनि पिच्छल आंग बाई ।'- विठ्ठल, रसमंजरी ३६.२.पक्ष्याच्या पिसासारखे. [सं.पिच्छल, पिच्छिल]

**पिच्छंड** पाखंड.

**पिच्छा** पु. १. पाठीमागचा, मागील बाजूचा भाग. २. मागच्या बाजूचा तुकडा (अंगरखा इ.). ३. एखाद्याच्या मागे लावलेला तगादा; एखाद्याची एखाद्या कामासाठी पाठ धरणे (क्रि. घेणे, पुरविणे, धरणे, सोडणे). [सं.पश्चात्] (वा.) ० **करणे** - बंदूक उडवताना तिने मागे धक्का देणे; मागे हटणे.

**पिंच्छा** पु. (आयुर्वेद.) तोंडातून उत्पन्न होणारा चिकट स्राव.

**पिच्छाविपाक** पु. (रसा.) ज्या विपाकास गोंद किंवा गोंदासारखी द्रव्ये उत्पन्न होतात असा पदार्थ.

**पिछवा** पु. बसल्यावर पाठ टेकण्याच्या जागी लावले जाणारे भरजरी वस्त्र : 'देवाकरितां मोठा पाट मांडण्यांत येतो व त्याचे मागें भरगच्ची, पिछवा लाविला असतो.।'- ऐरा ३४१.

**पिछवाडा** पु. घराची मागची बाजू; परसू : 'दोदो लक्षांचा एक वाडा ।

त्याच्या फोडोनिया कवाडा । मोकळा अवघा पिछवाडा ।'- अफला २७. [हिं.]

**पिछाडा** स्त्री. मागील भाग; बाजू.

**पिछाडी** स्त्री. १. मागील भाग; बाजू. २. घोड्याचे मागील पाय. ३. पायबंद. ४.(सैन्य, घर इ. चा) मागील भाग. ५. कमतरता; त्रुटी. [सं.पश्चार्ध] (वा.) **०मारणे** - लाथ मारणे; हल्ला करणे.

**पिछेली** वि. शिल्लक; अवशिष्ट. - ऐको.

**पिछो(छों)डा-डी** पु.स्त्री. मागील बाजूस हात बांधण्याची शिक्षा : 'टांगणें टिपऱ्या पिछोडे । बेडी बुधनाल कोलदंडे ।'- दास ३.७.६७.

**पिजुण** पहा : **पिंजुळी**

**पिट** प्रेक्षागृहातील अगदी पाठीमागचा वर्ग; प्रेक्षकांसाठी जमिनीवर बसण्याची केलेली व्यवस्था.

**पिटकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. बेडकीच्या उडीमुळे, हलकी फळे किंवा बिया पडल्यामुळे किंवा पाण्याचे थेंब पडल्यामुळे होणाऱ्या टप,टप आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.]

**पिटकी** स्त्री. १. विष्ठेचा लहानसा लपका; लेंड. २.(अळण, कढी इ. कातील) लहान गोळा. [ध्व.]

**पिटकु(को)ला** वि. लहानसा; चिमुकला; छोटासा; गोंडस. [सं.प्रथुक्]

**पिटकुली** स्त्री. १. लहान आकाराचे फळ (आंबा, पेरू, डाळिंब इ.). २. पिवळ्या रंगाचे एक फूल. [सं.प्रथुक]

**पिटके,पिटुकले** न. एक माप; कोळवे; अदपाव; शेराचा एक अष्टमांश भाग.

**पिटके, पिटकुले** न. लहान व सुरेख असा छोटासा जिवंत प्राणी : 'परंतु तुपाचे घागरीवर उंदराचें पिटकुलें बसलें तैसा हा प्रकार झाला.'- भाब ४५. [सं.प्रथुक]

**पिटकोळी** स्त्री. १.एक वृक्षविशेष. (गो.) २. एक पक्षिविशेष. (गो.)

**पिटणी-ण** स्त्री. न. मारणे; कुटणे; बडविणे. [सं.पीडन]

**पिटणे** सक्रि. १. मारणे; बडविणे; झोडपणे; चोप देणे; (हातोडी, काठी, मुसळ, दांडके, लाटणे इ. कांनी) ठोकणे. २. जोराने हाकारणे (जनावर, सैन्य इ.); घोडा दवडणे; वेगाने पाठविणे (जासूद); पळवून लावणे (सैन्य, शत्रू इ.). ३. (टाळी इ.) वाजविणे, शब्द करणे. ४. पाजवणे. ५.गिलावा करणे. [सं. पीडव]

**पिटपि(पी)ट** स्त्री. त्रास; कटकट; कंटाळवाणे मागणे (उद्दाम मुलांचे); चिरचिर; पावसाची रिपरिप. [ध्व.]

**पिटपिट घाणी** दुर्गंधी.

**पिटपिटणे** अक्रि. १. दुसऱ्याला शीण येईल अशा रीतीने आग्रहाने मागणे; किरकिरणे; चिरचिरणे. २. मिचकावणे; (डोळे इ.ची) उघडझाप करणे. [ध्व.]

**पिटपिटे** वि. तुटणारे. (गो.)

**पिटपिट्या** वि. १. असंतुष्ट; सदा धुसमुसणारा आणि दोष काढणारा. २. पिरपिर, रडवे तोंड करून याचना करणारा.

**पिट(टा)ळणी** स्त्री. जोराने हाकलून लावणे (जनावर, मनुष्य इ. ना).

**पिट(टा)ळणे** उक्रि. १.जोराने आपल्यापुढे हाकणे (जनावर, भग्न सैन्य इ.). २. भरधाव सोडणे; दवडणे (घोडा इ.). ३. घालवून लावणे; हाकलून लावणे (मनुष्य, भिकारी इ. ना). [सं.पिट् + टल (टुल्)]

**पिटी** स्त्री. १. गरगट; कांजी; राब. २.टाळी; थप्पड; थापटी. [सं.पिष्ट]

**पिटी** स्त्री. उसाच्या रसात पीठ कालवून केलेले पक्वान्न. [सं.पिष्ट]

**पिटुकला** वि. लहान; चिमुकला. [सं.प्रथुक + ल]

**पिटुर्डी** पु. एक विशिष्ट मासा. छातीशी व गुदद्वारावर दोन पंख असलेला, अंगावर तीन-चार काळे पट्टे असणारा मासा.

**पिट्टोळ** पु. गोड्या पाण्यात राहणारी एका प्रकारची मासळी.

**पिट्युटरी ग्रंथी** मेंदूच्या मागच्या पृष्ठभागाच्या मध्यात असलेली नलिकाविरहित ग्रंथी.

**पिठ** न. खांब व खांड यामधील लाकडाच्या ठोकळा.(व.) [सं.पीठ]

**पिठरपाकवाद** पु. (न्याय.) (पिठर = अवयवी, वाद=मत) एखाद्या गोष्टीचे गुणधर्म तिच्या घटनेपासून उत्पन्न होतात असे मत. [सं.]

**पिठले** न. हरभऱ्याच्या डाळीच्या, कुळथाच्या पिठाचे एक तोंडी लावणे; बेसन; झुणका. [सं.पिष्ठ, पिष्टल]

**पिठा-ठी** पु.स्त्री. दारूचे दुकान; गुत्ता : 'दारुडे ताडदेवीच्या चमेली बागेच्या पिठ्याला उदार आश्रय देत आहेत.'- के २१.६.३०. [सं.पैष्टी=दारू]

**पिठा** पहा : **पिठ्या** १,२

**पिठा** न. नवीन जन्मलेल्या मुलाच्या अंगास असणारा चिकट पदार्थ.

**पिठाड-र-ळा** पु. १. चुरा; चूर्ण केलेली, खंदळलेली, जमीनदोस्त झालेली, फन्ना केलेली स्थिती (भोजनसमारंभात अन्न, शेतातील उभे पीक इ. ची.). २. ( ल.) शीण; थकलेली स्थिती. [सं.पिष्ट]

**पिठावे** न. निंदा. (दे.)

**पिठाळ** वि. मऊ; लिबलिबीत; पिठुळलेली (भाकरी इ.). [सं.पिष्ट]

**पिठा(ठु)ळणे** अक्रि. गिचगिचीत होणे (भाकरी इ.); पाणचट, पचपचीत होणे (भात, शिजविलेले अन्न इ.). [सं.पिष्टल]

**पिठाळे** न. एका प्रकारचे मऊ व स्रवणारे पोळे. हे मधाबरोबर खातात.

**पिठी** स्त्री. १. (तांदळाचे) बारीक पीठ; चूर्ण. २.पाण्यात शिजविलेले पीठ (खाण्याचा पातळ पदार्थ म्हणून); कोणतेही पीठ शिजवून केलेले कालवण. ३. कुळथाच्या पिठाची आमटी किंवा पिठले. (कु., हेट.). ४. पापडासाठी कालवून तयार केलेले पीठ (विशेषत: उडदाचे). [सं.पिष्= चुरा करणे; पिष्ट]

**पिठुळणे** सक्रि. १.गाभुळणे; पाडास येणे (फळ इ.). २. पिठाळ होणे; फुसफुशीत होणे (भाकरी, भात इ.).

**पिठूर** वि. पिठाप्रमाणे पांढरे, स्वच्छ, चकचकीत (विशेषत: चांदणे, चंद्रकिरणे).

**पिठूळ, पिठोळा** वि. १. पिठासारखे मऊ; गिचगिचीत; कच्चे (भात इ.) २. मऊ; पाणचट (भात इ.). ३. मऊ; ठिसूळ; भुसभुशीत (दगड इ.). ४.बेचव; पाणचट (फळे, शिजविलेले अन्न इ.).

**पिठेरा** पु. एक प्रकारचा कुंचला. कोष्टी लोक सुताच्या ताव्याला याने पांजण किंवा खळ लावतात.

**पिठँ** न. थंडीच्या दिवसात होणारा एक त्वचारोग. (गो.)

**पिठोरी-रा, पिठोरापाठोरा** स्त्री. पु. श्रावणी अमावास्या व त्या दिवशी करावयाचे व्रत. पिठाने चौसष्ट योगिनींच्या आकृती काढून त्याचे पूजन करणे. [सं.पिष्ट]

**पिठोळी** स्त्री. पीठ झाडण्यासाठी असणारी काथ्याची लहान कुंचली.

**पिठ्या** वि. १. भुसभुशीत; ठिसूळ; रेवाळ (दगड इ.). २. गिचगिचीत; चांगल्या न भाजलेल्या भाकरीप्रमाणे असलेला (फळांचा गीर इ.). ३. (ल.) मऊ; नरम; सहज वश होणारा. ४. ज्वारीच्या पिठाची भाकरी ज्याला वाढायची असा साधारण, सामान्य पाहुणा. [सं.पिष्ट] (वा.) **पिठ्या(पिट्टा) पाडणे** - १. घोकंपट्टी करणे.(ना.) २. एखादे काम नेटाने तडीस नेणे. ३. एखाद्याला दमविणे. (सोलापुरी)

**पिड-डे-ढे** न.बसावयाचा पाट (व.); आसन; बसण्याची चौकी. बसणं (क.). [सं.पीठ]

**पिडणूक** स्त्री. त्रास; जाच; छळणूक. [सं.पीडा]

**पिडणे** उक्रि. १. दुःख देणे; पीडा करणे; त्रास देणे. २. दुःखी असणे; त्रासात असणे. [सं.पीडनम्]

**पिडा** पहा : **पीडा** २

**पिडा-ढा** पु. १. नारळाच्या फांदीचा बुडख्याचा भाग; झावळीच्या मधला दांडा. २. चुडताचा देठ; पिडो (गो., कु.).

**पिडी** स्त्री. आसन; बैठक : '...आदिलाची पिडी। करी तेयातें।' - ज्ञा १३.८१०. [सं. पिडिका]

**पिडेवंत, पिडेखोर** वि. रोगी; दुखणेकरी. (गो.) [सं.पीडा + वंत]

**पिड्डुक** स्त्री. काचेचे काळे बारीक मणी; काळी पोत. (गो.) [सं.पिंड]

**पिढले** न. बसावयाचा पाट; आसन; चौरंग; पिढ (व.); पिड्ढि. (को.) [सं.पीठ]

**पिढा** पु. पाठलाग : 'पिढा करावयासी पाठविलें.'- शिचप्र ६७. [सं.पृष्ठ]

**पिढावणे** सक्रि. मारणे. (व.)

**पिढी** स्त्री. राजधानी : 'पातले राजपिढि' - गरा ३८. [सं. पिठिका]

**पिढी** स्त्री. पुत्र, नातू, पणतू; बाप, आजा, पणजा इ. जे वंशपरंपरेतील पुरुष ते प्रत्येक; पुस्त; कुळी.[सं.पीठिका](वा.) **० लागणे** - लग्न संबंधामुळे दोन गोत्रांच्या पिढ्यांचे परस्परांत मिश्रण होणे. (ब्राह्मणात मातेकडून व पित्याकडून अनुक्रमे पहिल्या पाच व सात पिढ्यांत लग्नसंबंध होत नाहीत.) **पिढीला लाथा मारणे, पाय देणे, लावणे** - १. पूर्वपरंपरेला झुगारून देणे; तिच्याविरुद्ध बंड करणे. २. कर्जफेडीत मुद्दलालासुद्धा कमी पडणे.

**पिढीचा** वि. वंशपरंपरागत; पिढीजाद.

**पिढीजाद-दा** वि. १. कुलीन; घरंदाज. २. पिढीचा ह्याबद्दलही चुकीने वापर. [सं. पीठिका पिढी + फा.झादा]

**पिढी दर पिढी, पिढी न पिढी** क्रिवि. वंशपरंपरेने.

**पिढी पेस्तर** क्रिवि. पिढ्यानपिढ्या; वंशपरंपरागत. [सं.पीठिका]

**पिढे** न. १. घिरट ठेवण्यासाठी असलेले लाकडी तीन ठोकळे. २. तुळई आणि खांब यांच्यामध्ये असलेला लाकडाचा तुकडा; खांबाखाली घालतात ती उथळी. ३. सूत कातण्याच्या चरख्याखाली असलेला लाकडाचा तुकडा; बैठक. ४. गाडीच्या साटीच्या पुढच्या बाजूला जोडलेला आडवा लाकडाचा तुकडा. ५.(बुरुडकाम) कळक तोडण्यास व फोडण्यास आधार म्हणून घेतलेला लाकडी ओंडा. [सं.पीठ]

**पिढेदान** न. पाट; मुसळ; काठी इ. चा मार : 'तंव पिढेदान त्या प्राप्त झालें.' - निगा १०.

**पिढ्याचे काम, पिढ्यापाटाचे काम** ज्यात घराचे छप्पर पिढ्यावर ठेवलेले असते अशी इमारत.

**पिणीचा** वि. १. मुख्यत्वे आईच्या दुधावर वाढलेले (मूल, वासरू इ.). २. अंगावर पिणारा; थानचा; बालपणी आईचे दूध पुष्कळ प्यायला मिळाल्याने गुटगुटीत, गोंडस असलेला.

**पिणे** उक्रि. १.प्राशन करणे; पाणी इ. पातळ पदार्थ तोंडाद्वारा गळ्याखाली उतरवणे. २.ढोसणे; झोकणे; गटगट पिणे; घोटणे. ३. (तंबाखू, अफू इ. च्या धुराचे) सेवन करणे; धूम्रपान करणे. ४. शोषणे; जिरवणे (कातडे, लाकूड, कापड इ. नी तेल, रंग, पाणी इ.). ५.बंदुकीने ठासलेल्या दारूचा बार न होणे. ६.(ल.) दाबणे; गिळणे; सहन करणे; पोटात घालणे (राग, अपमान, चेष्टा, खोड्या इ.). ७. (ल.) प्रीतीने ऐकणे : 'कवी तव यशःकथा नवसुधा नवद्या पिती।'- केका ५१. [सं.पा; सिं. पिअणी]

**पिण्णळता** स्त्री. रागाने थोडेसे खेकसून बोलणे. (गो.)

**पितर** पु. १. स्वर्गात किंवा चंद्रमंडलात राहणारे मनुष्य जातीचे मृत पूर्वज.

पु.न. अव. १. श्राद्धविधीने ज्यांना पिंडोदक दिले पाहिजे असे नातेवाईक (आई, बाप, भाऊ, बहीण, पुत्र, कन्या, पत्नी, मित्र इ.). २.भाद्रपद कृष्ण पक्षात समुदायाने केलेले महालय, श्राद्ध. [सं.पितृ] (वा.) **० उद्धरणे, स्वर्गावर नेणे** - पूर्वजांची निंदा करणे; आईबापावरून शिव्या देणे. **पितरे घालणे** - कोकणातील देवीच्या पुजाऱ्यास पाच-दहा रुपये देऊन भुते असलेले धोंडे आणवून त्यांच्याकडून दुसऱ्याला त्रास देवविणे.

**पितर खस्ता** स्त्री. १. श्राद्धाच्या वेळी करावी लागणारी खटपट, त्रास, गोंधळ. २.(ल.) थोडक्या कामासाठी कंटाळा येण्याजोगी करावी लागणारी मोठी खटपट; त्रासदायक काळजी व परिश्रम.

**पितरपक्ष-पाख-पाट-पाटा-पाठ-पारट** पु. भाद्रपद कृष्ण पक्ष; पितरांचे श्राद्ध करावयाचा पंधरवडा.

**पितरलंड, पितृलंड** वि. जो पितरांचे श्राद्ध करत नाही असा.

**पितऱ्या** पु. १.वृषण. बदलापूर १२८०. (कातकरी) २. (ल.) देवक बसविणारा. बदलापूर १४७. (ठाकूर).

**पितळ** वि.पित्तयुक्त; पित्तल.

**पितळ** न. जस्त व तांबे यांच्या मिश्रणाने बनवलेला एक धातू. हा वर्धनीय, गंजरोधक, कठीण व ओतकामाला योग्य असतो. [सं. पित्तल] (वा.) **० बाहेर पडणे, दिसणे, निघणे**- वरपांगी केलेला बहाणा, मिष, ढोंग नजरेस येणे.

**पितळपान** न. पितळेचा अतिशय पातळ पत्रा; पितळेचा वर्ख.

**पितळा** वि. चिडखोर; तापट; तामसी. (राजा.) [सं.पित्त]

**पितळी** स्त्री. पितळेची, उंच काठाची लहान ताटली, परात, बशी.

वि. पितळेचा; पितळमय.

**पिता** पु. बाप; जनक. [सं.]

**पितापूर** न. स्वतःचे स्थान. – रावाको. पहा : **पितृगृह**

**पितामह** पु. आजा; बापाचा बाप. [सं.]

**पि(पी)तांबर** पु. निरनिराळ्या (विशेषतः पिवळ्या) रंगाचे, रेशमी काठ असलेले नेसावयाचे वस्त्र. [सं.पीत + अंबर]

**पितांबरी** स्त्री. कमी किमतीचा लहान पीतांबर : 'लंगोटी नसली तर नसूंदे, आमच्याकडची पितांबरी देईन त्याला मी.'– सुदे १४.

**पितांबऱ्या** वि. अंगावर पट्टे असणारा (वाघ). (ना.)

**पित्तां(त्तां)बी, पिता(त्ता)म** स्त्री. पित्तोद्भवामुळे अंगावर येणाऱ्या गाठी; एक त्वचारोग. [सं. पित्त+म. बी]

**पिती** स्त्री. संतती. (गो.) [सं.पुत्र]

**पितुश्यो** पु. मत्स्यविशेष; पापलेट. (गो.).

**पितृकर्म** न. श्राद्ध, तर्पण इ. कर्म.

**पितृगया** स्त्री. गयेस केलेले वडिलांचे श्राद्ध.

**पितृगृह** न. १. वडिलांचे घर; (स्त्रियांसंबंधी) माहेर. २. स्मशान.[सं.]

**पितृतीर्थ** न. उजव्या हाताचा अंगठा व त्याच्या जवळील बोट (तर्जनी) यांच्यामधील भाग. पितृतर्पणात या भागांतून पाणी सोडतात.[सं.]

**पितृत्व** न. जनकत्व; वडिलांचे नाते, पद, गुण किंवा लक्षण.

**पितृप** पु. यम. [सं.पितृ = पितर + पा = पालन करणे ]

**पितृबंधू** पु. वडलांच्या बाजूचे नातेवाईक.

**पितृयज्ञ** पु. पंचमहायज्ञांपैकी चौथा; पितृश्राद्ध; सिद्ध अन्नापैकी पितरांना उद्देशून अन्नदानाचा विधी; तर्पण.

**पितृयान** पु. पितृमार्ग; देहपातानंतर चितेचा धूर, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणयान या मार्गाने चंद्रलोकाप्रत जाण्याचा जीवनक्रम. [सं.]

**पितृलोक** पु. मृत पितरांचा राहण्याचा प्रदेश; स्वर्ग; चंद्रलोक. [सं.]

**पितृवन** न. स्मशानभूमी : 'बहुधा तो पितृवनीं न मृत नेला ।' – मोविराट ३.६८. [सं.]

**पितृव्य** पु. चुलता; वडिलांचा भाऊ. [सं.]

**पितृशांती** स्त्री. पितरास अथवा वडील माणसास ठार मारणे : 'पंचभ्रतार द्रौपदी ते सती । करितां पितृशांती पुण्यधर्मा ।'– तुगा ९४८.

**पितृसत्ताक** वि. पिता कुटुंबप्रमुख असणारी पद्धत, व्यवस्था.

**पित्त** न. १. यकृताच्या योगाने रक्तातून निघणारा आणि अन्नपचनास मदत करणारा एक पिवळा रस. २.(आयु.) एक शरीरदोष. [सं.] (वा.) ० **उसळणे, खवळणे, चढणे, तापणे, भडकणे** – रागावणे; संतापणे; खवळणे. **पित्ताची जोत भरणे** – घशात, उरात जळजळणे (पित्तामुळे).

**पित्त** छंद.

**पित्तकर–कारी** वि. १.जो पदार्थ खाल्ल्याने पित्त होते असा. २. पित्तकारक प्रकृतीचा.

**पित्तकुरूपण** न. आग ओकणे : 'युग वोसंडिलेनि दर्पें। कामाही पित्तकुरुपें। तया धर्गीं सैंघ पळिपे । क्रोधाग्नि तो ।' – ज्ञा १६.३९४.

**पित्तपत्र–मारी, पित्तपापडा** न. पु. एक पित्तशामक औषधी वनस्पती. उंची ३-४ हात; पाने छोटी; फुले लहान. [सं.पितृ + पर्पटक]

**पित्तवेगी** वि. शीघ्रकोपी; रागीट; संतापी; तापट.

**पित्ताळू** वि. १. पित्तकारी; पित्तदोष उत्पन्न करणारा. २. पित्तप्रकृतीचा.

**पित्तू–त्त्या** पु. १.(खेळात) कमी असलेल्या खेळाडूची जागा भरून काढण्यासाठी दिलेला गडी; पोटगडी. (क्रि.देणे, पोटामध्ये घेणे) २. वाईट कर्मातील साथीदार, दोस्त. [सं. पित्रीय]

**पिथान** पु. आफ्रिकेतील एक प्रचंड अजगर. – प्राणिमो ७०. [इं.पायथॉन]

**पिदडणे** क्रि. हवे तसे जोरात, भरधाव हाकणे, सोडणे, पळवणे.

**पिधान** न. १. झाकण; टोपण. २. आच्छादन; आवरण; आच्छादनाची जागा किंवा कारण. ३. (ज्यो.) आकाशस्थ एका ज्योतीचे दुसऱ्या ज्योतीकडून आच्छादन. [सं.]

**पिनलकोड** न. फौजदारी कायद्याचा संग्रह. [इं.]

**पिन(ना–न्न)स** पु. नाकाचा रोग. [सं.पीनस]

**पिनाक** न. १. शिवधनुष्य. २. एक वाद्य : 'टाळ मृदंग मोहरिया । पांवे शृंगें घुमरिया । रुद्रवीणे पिनाकिया । वाजविती सुस्वरें ।'– ह १०.१४०.

**पिन्हा** पु. पिच्छा; पाठलाग. (व.)

**पिपा** पु. (रॉकेल इ.चे) पीप; डबा; टीप. (व., ना.)

**पिपाणी–णे** स्त्री. न. पान इ.ची तयार केलेली किंवा प्लॅस्टिक इ.ची वाजवण्याची पुंगी.

**पिपासा** स्त्री. तृष्णा; तहान; शोष. [सं.]

**पिपासू** वि. तहानेलेला; पिण्याची इच्छा करणारा. [सं.]

**पिपि** क्रिवि. पिंपाणी, सनई इ.च्या तीक्ष्ण व कर्कश आवाजाचे अनुकरण करून. [ध्व.]

**पिपी** स्त्री. (बालभाषेत) मातेचा स्तन.

**पिपीटे** न. पिपाणी. (राजा.)

**पिपीलिका** स्त्री. लहान, तांबड्या रंगाची मुंगी. [सं.]

**पिपीलिकामार्ग** पु. १. (योगशास्त्र) समाधी साधण्याची एक सोपी व पायरीपायरीची रीत. २. जगाविषयी विरक्त होण्याची, सर्व मनोवृत्तींचे, वासनांचे, इंद्रियांचे दमन करण्याची एक रीत. ३. (ल.) कोणतेही कार्य संथपणे, सावकाश करण्याची रीत.

**पिपीलिकायति–ती** स्त्री. (संगीत) गायनारंभी मध्य, द्रुत व अंती विलंबित अशा प्रकारच्या लयींच्या गती असणे.

**पिपेल** स्त्री. दारू पिणे. (गो.)

**पिप्पल** न. पिंपळाचे फळ. [सं.]

**पियडी** स्त्री. भिल्लीण : 'एक रामनाम शबरी नांवा पियडी रेयतली आथी।'– भिल्ली २६. (भि.)

**पियनी** स्त्री. सूर मिळविताना तंतुवाद्याची तार ओढण्याची कळ.

**पियानो** पु. एक तंतुवाद्य. हे मूळ जर्मनीत तयार झाले. [इं.]

**पियांकास** स्त्री. देवदारी पेटी. (गो.)

**पियु(यू)ख–ष** न. अमृत. [सं. पीयूष]

**पिर** स्त्री. बशी; चिनी मातीची लहान उथळ थाळी. (गो.) [पोर्तु.पिरि]

**पिरकणे** अक्रि. एकदम थोडेसे पातळ शौचास होणे; चिरकणे. [ध्व.] [सं.अपि + रिच]

**पिरग(गा)ळणी** स्त्री. मुरगाळणे; मुरडणे; पिळवटणे.
**पिर(रं)ग(गा)ळणे** सक्रि. मुरगाळणे; मुरडणे; पिळवटणे; पीळ घालणे.
**पिरगळा** पु. चक्कर; फेरफटका : 'थोडासा गेल्याचा देखावा करून मी पिरगळा मारला अन् घरीं आलो.'- के १.७.३०.
**पिरगा** पु. (नाविक) बुरीच्या जाळ्याचा दगडी नांगर. (को.)
**पिर(रं)गाळा** पु. १. मुरगाळा (शरीर, अवयव इ. काचा); पीळ; बळ. २.पिळवटलेली; पिरगळलेली स्थिती.
**पिरडुक** स्त्री. स्त्रियांच्या गळ्यातील मंगळसूत्राचे काळे किंवा हिरवे लहान काचेचे मणी. (कु.) पहा : **पिड्डुक**
**पिरपि(पी)र-णी** स्त्री. १. (लहान मुलाची) किरकिर; पिरंगणी. २. एकसारखी कटकट; जिकीर; त्रास. ३. एकसारखी लागलेली (झिमझिम पाऊस इ.ची) रिपरिप. [ध्व.]
**पिरपिरणे** अक्रि. किरकिर, करकर करणे; पिरंगणे; याचना करणे.
**पिरपिरा-ऱ्या** वि. किरकिर, कटकट करणारा; त्रासिक.
**पिरलुक** स्त्री. १. शिटी. २. अलगुज. (कु.) [ध्व.]
**पिरशा** पु. घमेल्यासारखे एक भांडे.
**पिरसा** पु. गवत, काटक्या इ. कांचा केलेला लहान विस्तव; शेकोटी (को.) पहा : **परसा**
**पिरसुपी** स्त्री. खाऱ्या पाण्यातील एक लहान, पांढरा मासा.
**पिरंगणी** स्त्री. पिरपिर; कुरकुर; किरकिर. (गो., राजा.)
**पिरंगणे** अक्रि. १. पिरपिर करणे; किरकिरणे; रड लावणे.(राजा.) २. गयावया करून भीक मागणे. [ध्व.]
**पिरंगा** वि. कुरकुऱ्या; पिरपिऱ्या.(कु.)
**पिरंजळचे** अक्रि. त्रासणे; उबगणे; तडफडणे. (गो.)
**पिराडन** न. संकट; आपत्ती. (व.) [सं.पीडन]
**पिराडॉ** पु. चुडताचा देठ. (गो.)
**पिराय** स्त्री. अमदानी; काळ. (गो.)
**पिराळ्या** पु. (उसाचा चरक) पहा : **भरकवळ्या**
**पिरिपिरि** क्रिवि. पाऊस इ.कांच्या एकसारख्या पडण्याच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; रिपरिप.
**पि(पी)री** स्त्री. १. वार्धक्य; म्हातारपण : 'यावरी नियत धरिली जे आपला पिरी-वक्त जाला, आतां मक्केस जावें.'- भा १८३४, पृ. १४४. २. प्रभुत्व. [फा. पीरी]
**पिरॅमिड** पु. चौरस, आयताकृती पायावर वरती निमुळती होत जाणारी इजिप्शियन आकर्षक वास्तुरचना; इजिप्शिअन राजाराणींची शरीरे यात दफन करत असत.
**पिरोजा** न. रत्न; वैडूर्य (वैदूर्य); तोरमल्ली; वज्रमणी; वैक्रांत.
**पिरोजी** वि. एक रंग.
**पिल** न. केळीचे रोपटे. (ना.)
**पिल, पिलकू** न. लहान मूल, छावा, मांजरीचे पिल्लू, कुत्रीचे पिल्लू इ. कांस लडिवाळपणे योजला जाणारा शब्द. (वा.) ० **पाठीमागे लावणे, काढणे** – एखाद्याच्या पाठीशी लचांड लावणे.
**पिलवान** पु. हत्ती हाकणारा; महात; माहूत. [फा. फीलवान]
**पिलस-सा** वि. मळकट; अस्वच्छ : 'खाशांच्या पिलसो नसोत म्हणती त्याला बहु रागिजे ।'- सारुह ३.४६. [फा. पिलिश्त]
**पिलंगणे** क्रि. १. पुढे-पुढे करणे; धावणे. २. खाली घालणे (मान). ३.लपत लपत जाणे; पकडू पाहणे : 'जो कां नानाविषयस्वार्था। न लाजे नीचापुढें पिलंगता।' – एभा ११.१२०९.
**पिलंटू** पु. १. मुलगा. २. शिष्य.(झाडी)
**पिलापांज** स्त्री. पुष्कळ मुले असणारी स्त्री; लेकुरवाळी. (गो.)
**पिलावा** पु. रेशमी वस्त्र.
**पिली** स्त्री. १. रंग देण्याची कुंचली (गो.,कु.) २. नाक, कान इ. टोचल्यानंतर त्यात घालावयाची गवताची लहान काडी; नाकात घालण्याची चमकी. (कु.)
**पिलीपिली** पु. संग्रहणीसारखा एक रोग : 'बहुतां दिसांचा पिलीपिली शमे' – वैवसं ४५.
**पिलू** पु. गायनातील एक राग.
**पिलू** स्त्री. झुडपांची जाळी; रहाटी.
**पिलूं-ल्लू-ले** न. पशू, पक्षी इ.कांचे लहान पोर, बालक, बच्चा; छावा. [सं.पिलुक, पिल्लिक]
**पिलॉ** स्त्री. कोंबडी. (गो.)
**पिल्ला** पु. (सुतारी धंदा) भोक पाडण्यासाठी किंवा ठसे उमटविण्यासाठी केलेला साचा. (राजा.)
**पिल्लार** न. पिल्लू.
**पिल्लूक** स्त्री. मुरली; पुंगी; शीळ; शिटी. (गो.)
**पि(पे)वडी** स्त्री. रंगाची पिवळी माती. [सं.पीत]
**पिवशी** स्त्री. पिशवी; थैली. (व.)
**पिवळ** पु. एक पक्षी. २. पीळ. (गो.)
**पिवळकी** स्त्री. पिवळेपणा.
**पिवळचे** सक्रि. पिरगाळणे; मुरगळणे; मुरडणे; आळेपिळे देणे. (कु.)
**पिवळट, पिवळवट** वि. किंचित पिवळा; पिंगट.
**पिवळदरडी** स्त्री. नदीकाठावरील बरड टेकाड; खारीची जमीन : 'पीवळ दरडीं आसन जालें' – स्थापो ५३. [सं. पीतल+दृ]
**पिवळा** वि. पिवळ्या रंगाचा.[सं. पीत] (वा.) **पिवळे करणे, होणे** – हळद लावणे; लग्न करणे.
**पिवळाचटक-रंजन-धमक, पिवळा जर्द, घमघमीत, रसरशीत** वि. अतिशय पिवळा.
**पिवळा पंजमलडी** रेशमाची एक जात.
**पिवळी जरतार** पांढऱ्या तारेला इलेक्ट्रोप्लेटिंग करून सोन्याचे पाणी चढवून तयार केलेली जरतार.
**पिवळी जुई** नागमल्ली; एक प्रकारचे फुलझाड.
**पिवळी पगडी** (पिवळी पगडी घालणारा.) (ल.) मुंबईचा पोलीस शिपाई : 'या सर्वांचे मुसलमान लोकांपासून संरक्षण करण्यास दोनशें पिवळ्या पगड्या पुरे आहेत.'- टि १.२६२.
**पिवळी माती** सोनकाव.
**पिवळोखी** स्त्री. पिवळेपणा; फिकटपणा; पिंगटपणा.

**पिवंदी** न. झाडाचे कलम. (क्रि. बांधणे, करणे.)

**पिवा** वि. जाड; लठ्ठ; गुबगुबीत; धिप्पाड. [सं.पीवा]

**पिशवाज-त-द** पु. पहा : **पेशवाज**

**पिशवी** स्त्री. १. थैली; कोथळी. २. पोटातील पित्ताशय. ३.गर्भाशय. [क. हिशिबे; सं. प्रसेवक]

**पिशवी** स्त्री. हत्तीच्या शेपटी खालून (कुल्ल्यामागून) घेतलेला दोर.

**पिशंग** वि. कबरा (रंग) : 'मध्यमस्वर पिशंगवर्ण । ऐसे करा तुम्ही ध्यान।'- गुच ३६.३३९. [सं.]

**पिशा** पहा : **पिसा**

**पिशाच** न. १. एक अतिमानवी योनी; मरताना इच्छा अतृप्त राहिलेला मनुष्यजीव नंतर वायुरूप बनतो व आपल्या स्वभावानुसार वागतो; असे वागणारी एक शक्ती; भूत; समंध. ३. अघोरी मनुष्य. [सं. ]

**पिशाच पक्वान** वडे, कोडबुळी इ.; पिशाचांचा नैवेद्य.

**पिशाचभावना** स्त्री. पिशाचबाधेमुळे उद्भवलेला आजार; पिशाचाचा अंमल.

**पिशाचभाषा** स्त्री. चार प्राकृत भाषांपैकी एक. हिचा उपयोग विशेषत: नाटकात करतात.

**पिशाचलिपी -लिप्त-लीप** स्त्री. मोठी लिपी. ही हेमाडपंताने लंकेहून इकडे आणली असे म्हणतात.

**पिशाचविद्या** स्त्री. भूत, पिशाच, समंध, ब्रह्मराक्षस इ. वर अंमल चालविण्याची कला. [सं.]

**पिशाचविवाह** पु. विवाहाच्या आठ प्रकारांपैकी एक. स्त्री झोपेत असताना किंवा तिला खूप दारू पाजून, बेहोश करून, बळजबरीने तिच्याशी केलेला विवाह.

**पिशाचाधिपती** पु. १. शिव किंवा वेताळ. २. (ल.) लहान मुलांत खेळणारा प्रौढ, भीतिप्रद मनुष्य.

**पिशाचिका** स्त्री. हडळ; डाकिणी.

**पिशाची** स्त्री. १. पिशाचिका. २. कुरूप स्त्री.

**पिशानदेवरू, पिशानवल्ली** पु. खुळचट, बावळट, वेडपट मनुष्य.

**पिशाब** पु.स्त्री. लघवी; मूत्र. [फा.पेशाब]

**पिशाल** पु. एक प्रकारचे झाड. (विरू.) पैसा.

**पिशित** न. मांस : 'कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें कां।' - ज्ञा १३.५२१. [सं.]

**पिशी** स्त्री. १. दाणे काढल्यानंतर उरणारे, मक्याखेरीज कोणत्याही धान्याचे कणीस. हुरडा खाताना याने दही खातात. २. पिशवी; थैली. (खा.) ३. गव्हाची एक जात. ४. ज्वारीवर आढळणारा एक रोग. (अहि.)

**पिशुन, पिसुण** वि. चहाडखोर; चुगलखोर; दुष्ट; द्वाड : 'हरिचें काय करावें परिसो तो हितकथा पिशुनकानें ।'- मोयोग ६.७. [सं.पिंशति]

**पिशुनता** स्त्री. कपट; लबाडी; दुष्टपणा; चहाडखोरपणा. [सं.]

**पिशुलोद** पु. कापूर आणि नत्रिक अम्लात कापूस भिजवून केलेल्या रासायनिक पदार्थांच्या संयोगाने झालेला रासायनिक पदार्थ. याचा उपयोग फण्या, बाहुल्या, खेळणी इ. बारीकसारीक वस्तू तयार करण्यासाठी करतात. [इं.सेल्युलॉईड]

**पिशुलोस** पु. वनस्पतीच्या मूळ पेशी ज्यापासून उत्पन्न होतात ते द्रव्य; उद्भिजपेशीद्रव्य.

**पिशेल** न. पिसा झाडाच्या बियांपासून काढलेले तेल.

**पिशँपण** न. खुळेपणा; वेडेपणा. (गो.)

**पिष** न. धान्यादिकांचे पीठ; चूर्ण. [सं.]

**पिष्टक** न. (आयुर्वेद.) डोळ्यांवर वाढलेले मांस.

**पिष्टपेषण** न. पुन: पुन: तेच ते सांगणे किंवा करणे; एखाद्या गोष्टीचा निरर्थक खल करणे; चर्वितचर्वण. [सं.पिष्ट = दळलेले + पेषण= दळणे]

**पिष्टमयद्रव्य, पिष्टसत्त्व** न. कंद, धान्य इ.त असणारा अन्नाचा पिठूळ सत्त्वांश.

**पिष्टशर्करा** स्त्री. पिष्टसत्त्वापासून तयार केलेली स्फटिकसदृश साखर.

**पिसक(का)रणे** उक्रि. विसकटणे; अस्ताव्यस्त होणे; विखुरणे; विस्कारणे. [सं. अपिस्करण]

**पिसणावळ,पिसाई** स्त्री. दळणावळ; दळण्याची मजुरी.

**पिसणे** सक्रि. १. दळणे; पीठ करणे; चूर्ण करणे. २. वाटणे; घोटणे; उगाळणे; गरगटणे. ३. पत्त्यांच्या पानांची भेसळ करणे; गल्लत करणे. [सं.पिंषृ; हिं. पिसना]

**पिसवाज** पु. पहा : **पेशवाज, पिस्वादी**

**पिसा-शा** पु. १. विशेषत: महाबळेश्वर, माथेरान येथे मोठ्या प्रमाणात आढळणारे एक विशिष्ट झाड. २. कापूस.

**पिसा-शा** पु. हातोड्याचे वजनदार व घाव मारावयाचे टोक.

**पिसा-शा, पिसाट** वि. वेडा; भ्रमिष्ट; पिशाचासारखे वागणारा.

**पिसा-सां** न. पिशाच; वेड : 'पिसां लागल्यागत हसावा (हसूं) लागली.'- विभूत २७.

**पिसाट** न. पिशाच; भूत; ब्रह्मराक्षस.
वि. पिशाचाने झपाटलेला; अनावर; बेबंद. [सं.पिशाच]

**पिसाटणी** स्त्री. वेड; खूळ; भ्रम.

**पिसाटणे** अक्रि. १. पिशाचबाधा होणे. (को.) २. भ्रमिष्ट होणे; वेडे चाळे करणे.

**पिसाटीक** वि. वेडा; भ्रमिष्ट; खुळचट; खोडकर; पिशाचासारखा.

**पिसाय** न. १. वेडेपणा. (गो.) २. पिसे उभारणे (पक्ष्याने).

**पिसारणे** उक्रि. पिसे उभारणे (पक्ष्याने).

**पिसारा** पु. १. पिसांचा समुदाय; उभारलेले पंख (पक्ष्याने). २. बाणाच्या शेवटी लावलेली पिसे. ३. पीस. ४. धान्याचे पोचट कणीस. ५. अंड्यातील बलक : 'दुधांत कोंबडीचे अंड्याचा पिसारा खलून देणें.'- बालरोगचिकित्सा २८. ६. चिपारीहून बारीक असे चांभाराचे हत्यार. ७. पिसे असलेली लहान मुलांची टोपी.

**पिसाळ** वि. कंटाळा मानणारा; त्रास, कटकट मानणारा.

**पिसाळणी** स्त्री. वेड; पिसाळणे; भ्रमिष्ट होणे.

**पिसा(स)ळणे** उक्रि. १. कोल्हा, कुत्रा इ.ना एखाद्या रोगाने वेड लागणे; अशा रोगयुक्त प्राण्याच्या चाव्याने मनुष्यालाही त्याच प्रकारचा रोग होणे. २. वेड्यासारखे करणे; संतापणे; खवळणे. ३. पिशाचबाधा होणे. [सं.पिशाच]

**पिवंदी** न. झाडाचे कलम. (क्रि. बांधणे, करणे.)
**पिवा** वि. जाड; लठ्ठ; गुबगुबीत; धिप्पाड. [सं.पीवा]
**पिशवाज-त-द** पु. पहा : **पेशवाज**
**पिशवी** स्त्री. १. थैली; कोथळी. २. पोटातील पित्ताशय. ३.गर्भाशय. [क. हिशिबे; सं. प्रसेवक]
**पिशवी** स्त्री. हत्तीच्या शेपटी खालून (कुल्ल्यामागून) घेतलेला दोर.
**पिशंग** वि. कबरा (रंग) : 'मध्यमस्वर पिशंगवर्ण । ऐसे करा तुम्ही ध्यान।'- गुच ३६.३३९. [सं.]
**पिशा** पहा : **पिसा**
**पिशाच** न. १. एक अतिमानवी योनी; मरताना इच्छा अतृप्त राहिलेला मनुष्यजीव नंतर वायुरूप बनतो व आपल्या स्वभावानुसार वागतो; असे वागणारी एक शक्ती; भूत; समंध. ३. अघोरी मनुष्य. [सं. ]
**पिशाच पक्कान** वडे, कोडबुळी इ.; पिशाचांचा नैवेद्य.
**पिशाचभावना** स्त्री. पिशाचबाधेमुळे उद्भवलेला आजार; पिशाचाचा अंमल.
**पिशाचभाषा** स्त्री. चार प्राकृत भाषांपैकी एक. हिचा उपयोग विशेषत: नाटकात करतात.
**पिशाचलिपी -लिप्त-लीप** स्त्री. मोठी लिपी. ही हेमाडपंताने लंकेहून इकडे आणली असे म्हणतात.
**पिशाचविद्या** स्त्री. भूत, पिशाच, समंध, ब्रह्मराक्षस इ. वर अंमल चालविण्याची कला. [सं.]
**पिशाचविवाह** पु. विवाहाच्या आठ प्रकारांपैकी एक. स्त्री झोपेत असताना किंवा तिला खूप दारू पाजून, बेहोश करून, बळजबरीने तिच्याशी केलेला विवाह.
**पिशाचाधिपती** पु. १. शिव किंवा वेताळ. २. (ल.) लहान मुलांत खेळणारा प्रौढ, भीतिप्रद मनुष्य.
**पिशाचिका** स्त्री. हडळ; डाकिणी.
**पिशाची** स्त्री. १. पिशाचिका. २. कुरूप स्त्री.
**पिशानदेवरू, पिशानवल्ली** पु. खुळचट, बावळट, वेडपट मनुष्य.
**पिशाब** पु.स्त्री. लघवी; मूत्र. [फा.पेशाब]
**पिशाल** पु. एक प्रकारचे झाड. (विरू.) पैसा.
**पिशित** न. मांस : 'कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें कां।' - ज्ञा १३.५२१. [सं.]
**पिशी** स्त्री. १. दाणे काढल्यानंतर उरणारे, मक्याखेरीज कोणत्याही धान्याचे कणीस. हुरडा खाताना याने दही खातात. २. पिशवी; थैली. (खा.) ३. गव्हाची एक जात. ४. ज्वारीवर आढळणारा एक रोग. (अहि.)
**पिशुन, पिसुण** वि. चहाडखोर; चुगलखोर; दुष्ट; द्वाड : 'हरिचें काय करावें परिसो तो हितकथा पिशुनकानें ।'- मोयोग ६.७. [सं.पिंशति]
**पिशुनता** स्त्री. कपट; लबाडी; दुष्टपणा; चहाडखोरपणा. [सं.]
**पिशुलोद** पु. कापूर आणि नत्रिक अम्लात कापूस भिजवून केलेल्या रासायनिक पदार्थांच्या संयोगाने झालेला रासायनिक पदार्थ. याचा उपयोग फण्या, बाहुल्या, खेळणी इ. बारीकसारीक वस्तू तयार करण्यासाठी करतात. [इं.सेल्युलॉईड]
**पिशुलोस** पु. वनस्पतीच्या मूळ पेशी ज्यापासून उत्पन्न होतात ते द्रव्य; उद्भिजपेशीद्रव्य.
**पिशेल** न. पिसा झाडाच्या बियांपासून काढलेले तेल.
**पिशँपण** न. खुळेपणा; वेडेपणा. (गो.)
**पिष** न. धान्यादिकांचे पीठ; चूर्ण. [सं.]
**पिष्टक** न. (आयुर्वेद.) डोळ्यांवर वाढलेले मांस.
**पिष्टपेषण** न. पुन: पुन: तेच ते सांगणे किंवा करणे; एखाद्या गोष्टीचा निरर्थक खल करणे; चर्वितचर्वण. [सं.पिष्ट = दळलेले + पेषण= दळणे]
**पिष्टमयद्रव्य, पिष्टसत्त्व** न. कंद, धान्य इ.त असणारा अन्नाचा पिठूळ सत्त्वांश.
**पिष्टशर्करा** स्त्री. पिष्टसत्त्वापासून तयार केलेली स्फटिकसदृश साखर.
**पिसक(का)रणे** उक्रि. विसकटणे; अस्ताव्यस्त होणे; विखुरणे; विस्कारणे. [सं. अपिस्करण]
**पिसणावळ,पिसाई** स्त्री. दळणावळ; दळण्याची मजुरी.
**पिसणे** सक्रि. १. दळणे; पीठ करणे; चूर्ण करणे. २. वाटणे; घोटणे; उगाळणे; गरगटणे. ३. पत्त्यांच्या पानांची भेसळ करणे; गल्लत करणे. [सं.पिंष्; हिं. पिसना]
**पिसवाज** पु. पहा : **पेशवाज, पिस्वादी**
**पिसा-शा** पु. १. विशेषत: महाबळेश्वर, माथेरान येथे मोठ्या प्रमाणात आढळणारे एक विशिष्ट झाड. २. कापूस.
**पिसा-शा** पु. हातोड्याचे वजनदार व घाव मारावयाचे टोक.
**पिसा-शा, पिसाट** वि. वेडा; भ्रमिष्ट; पिशाचासारखे वागणारा.
**पिसा-सां** न. पिशाच; वेड : 'पिसां लागल्यागत हसावा (हसूं) लागली.'- विभूत २७.
**पिसाट** न. पिशाच; भूत; ब्रह्मराक्षस.
वि. पिशाचाने झपाटलेला; अनावर; बेबंद. [सं.पिशाच]
**पिसाटणी** स्त्री. वेड; खूळ; भ्रम.
**पिसाटणे** अक्रि. १. पिशाचबाधा होणे. (को.) २. भ्रमिष्ट होणे; वेडे चाळे करणे.
**पिसाटीक** वि. वेडा; भ्रमिष्ट; खुळचट; खोडकर; पिशाचासारखा.
**पिसाय** न. १. वेडेपणा. (गो.) २. पिसे उभारणे (पक्ष्याने).
**पिसारणे** उक्रि. पिसे उभारणे (पक्ष्याने).
**पिसारा** पु. १. पिसांचा समुदाय; उभारलेले पंख (पक्ष्याने). २. बाणाच्या शेवटी लावलेली पिसे. ३. पीस. ४. धान्याचे पोचट कणीस. ५. अंड्यातील बलक : 'दुधांत कोंबडीचे अंड्याचा पिसारा खलून देणें.'- बालरोगचिकित्सा २८. ६. चिपारीहून बारीक असे चांभाराचे हत्यार. ७. पिसे असलेली लहान मुलांची टोपी.
**पिसाळ** वि. कंटाळा मानणारा; त्रास, कटकट मानणारा.
**पिसाळणी** स्त्री. वेड; पिसाळणे; भ्रमिष्ट होणे.
**पिसा(स)ळणे** उक्रि. १. कोल्हा, कुत्रा इ.ना एखाद्या रोगाने वेड लागणे; अशा रोगयुक्त प्राण्याच्या चाव्याने मनुष्यालाही त्याच प्रकारचा रोग होणे. २. वेड्यासारखे करणे; संतापणे; खवळणे. ३. पिशाचबाधा होणे. [सं.पिशाच]

**पिसाळा-ळे** पु. त्रास; कटकट; वैताग; कंटाळा : 'मी दागिन्याकरितां हट्ट करून त्याला पिसाळा आणते.' - कोरकि ३२१.
न. वेड; खूळ; भूतबाधा.
**पिसांतर** वि. पिसा; वेडा; भ्रमिष्ट. (कु.)
**पिसी** स्त्री. १. कोंबडीवरील कीटक. २. झोपेत गालावर येणारी लाळ. ३. गवताचे कूस. ४. दाणे काढलेले कणीस.
**पिसुडणे** सक्रि. (पिसे, फुलांच्या पाकळ्या, पुस्तकांची पाने इ.चे) ओढून तुकडे करणे; कुरतडणे; पिसुडचे (गो.).
**पिसुरडे** न. सापाच्या जातीचा एक प्राणी.
**पिसुवा, पिसू** स्त्री. दंश करणारा एक सपक्ष क्षुद्र जंतू; पंख असलेली ऊ.
**पिसुंडी** स्त्री. धोतराचा काष्टा. (झाडी)
**पिसुंडी, पिसुर(रुं)डी, पिसुंद्री** स्त्री. नारळाच्या फांदीच्या मुळाशी असलेले तंतुयुक्त जाळे; पोयीच्या वरची त्वचा.
**पिसूक** न. (शाप, मंत्र, जादूटोणा इ. नी) वाघ, लांडगा, कुत्रा इ. झालेला मनुष्य.
**पिसूड** न. अंबाडा बांधल्यानंतर राहिलेले केसांचे टोक (गो.) पहा : **पिसुंडी**
**पिसे** न. वेड; भ्रम; पिशाचबाधा; म्हातारपण इ.मुळे लागलेले वेड.
**पिसोटी-णी, पिसोंडी** स्त्री. एक प्रकारची गवताची केरसुणी.(गो.)
**पिसोर-रा** पु. हरणाची एक लहान जात.
**पिसोळा** पु. १. एक तांबडा, उडणारा व दंश करणारा किडा. २.पिसवांचा नाश करणारी एक उग्र व रेचक वनस्पती. [सं.पटुकर्मा]
**पिसोळे** न. कुट्टरी; फुलपाखरू; पतंग. (गो.)
**पिसोंडे, पिसुंड, पिसोंड्या, पिसुंड्या** पहा : **पिचुंड्या**
**पिसोंदर** स्त्री. (गो.) पहा : **पिसुंडी** २
**पिस्कात** स्त्री. झाकता न येणारी सुरी. (गो.)
**पिस्कारणे** क्रि. अस्ताव्यस्त, अव्यवस्थित पसरणे.
**पिस्ता** पु. पिस्त्याचे झाड व फळ. सिरिया, दमास्कस, मेसोपोटेपिया या भागात मुख्यत्वे उत्पादन. वृक्ष सुमारे १० मीटर उंच व पानझडी. फळ लहान, चपटे, स्वादिष्ट, पौष्टिक. साल हिरवट रंगाची. फळाचे तेल औषधी. [फा.]
**पिस्ताई** वि. काळसर हिरव्या रंगाचा; तसे वस्त्र.
**पिस्तुल** न. खिशात ठेवता येण्याजोगी लहान बंदूक. स्फोटक व एका हाताने वापरता येण्याजोगे हत्यार. [इं. पिस्टोल]
**पिस्तोल** न. जुन्या काळी असलेले सव्वाआठ रुपये किमतीचे एक नाणे.
**पिस्तोलफेर्नाद** वि. बाहेरख्याली मनुष्य. (गो.)
**पिस्वादी** स्त्री. पुढे खुला असलेला झगा (विशेषत: नर्तकीचा).
**पिहू** न. कोकिळाच्या आवाजाचे अनुकरण. [ध्व.]
**पिहू** पु. प्रियकर; जार; उपपति. [सं. प्रियकर]
**पिहे** न. स्तन्य; दूध : 'यैसी ते माउली... स्नेहभावें प्रेमपिहें : देती झाली ।'- रकौ ४०४. [सं. पयस]
**पिळकणे** अक्रि. एकदम थोडीशी पातळ शौचास होणे; लहानसा जुलाब.
**पिळक(का)वणे** न. पीळ घट्ट बसण्यासाठी दोरीच्या पदरात (गाडीच्या सांकणीमधील किंवा तेलाच्या घाण्याच्या लाटेच्या दोरामधील) घालून पिळण्याचे लाकूड.
**पिळकी** स्त्री. (लहान मुलास) एकदम व थोडा होणारा जुलाब.
**पिळगी** स्त्री. कूळ; पिढी; संतती. (गो.)
**पिळगुटणे** सक्रि. पिळणे; पिळवटणे; मुरगाळणे; जोराने फिरविणे.
**पिळण** न. १. ऐन उतारावर एक बाजूस कलणारे रस्त्याचे वळण. (व.) २. आखेतून घेऊन दमणीच्या धुऱ्यांच्या भोवती बांधलेला दोर.
**पिळण-णी** स्त्री. १. कापड इ. चे पिळणे; पिळवटणे. (को.) २. औषधी पिळून काढलेला अर्क. [सं. पीड् = दाबणे]
**पिळणे** सक्रि. १. पीळ घालणे; वळणे. २. पिरगाळणे; मुरगाळणे; पिळून काढणे (आचळ, फळ इ.तून दूध, रस इ.); दाबून काढणे. ३. (ल.) जुलमाने काढणे; उकळणे. [सं. पीडन]
**पिळदार** पहा : **पीळदार**
**पिळपिळीत** वि. १. चांगला पीळ न घातलेली, सैल विणीची (दोरी इ.). २. (ल.) सैल विणीचे (कापड); विसविशीत. ३. (ल.) मुळमुळीत, नेभळट, नि:सत्त्व, कमजोर (उपाय, भाषण, वर्तणूक इ.). ४. एखादे काम तडीस नेईल अशी खात्री ज्यात नाही अशी; मिळमिळीत (वागणूक). [ध्व.]
**पिळपिळे** न. सुताराचे एक हत्यार; पिलपील. (को.)
**पिळवट** वि. घट्ट पीळ दिलेला; पीळदार.
**पिळवटणी** स्त्री. पिळणे; पीळ घालणे.
**पिळवटणे** सक्रि. १. पीळ घालणे; पिळणे; पिरगाळणे. २. (ल.) व्यथित होणे; दु:खाने करपणे. [सं.पीड्]
**पिळवणी** न. कपडे वगैरे पिळून निघालेले पाणी.
**पिळसुटांणी** स्त्री. एक प्रकारची दुर्गंधी.(गो.)
**पिळा** पु. १. पीळ; वळ; पिळलेले वस्त्र वगैरे. २. (ल.) शरीराला दिलेले आळेपिळे. ३. घोड्याचा एक रोग. [सं.पीडन]
**पिळा** पु. स्नानोत्तर केस पिळून निघालेले भोगीचे पाणी : 'श्रीमुगुटीचेया पीळ्यांआंतु आणिक भोगी घातली'- लीचपू ४८०. [सं. पीठ]
**पिळाई** स्त्री. घाण्यातून तेल काढण्याची (पिळण्याची) मजुरी. [सं.पीड्=दाबणे]
**पिळाचंपा** पु. पिवळा चाफा; सोनचाफा.
**पिळाचा वाळा** (सोनारी) लहान मुलांच्या पायातील चांदीचा एक दागिना. चांदीच्या चार सुतांना एके ठिकाणी पीळ घातलेला असून, तो वर्तुळाकार असतो. याच्या तोंडाशी दोन्ही बाजूस मोगरे असतात.
**पिळू** पु.स्त्री. पहा : **पेळू-ळूं, पेळव-ए**
**पिळे** न. पहा : **पिळकवणे**
**पिं(पि)क** स्त्री. (तंबाखू किंवा विडा खाल्ल्यानंतर) तोंडातून टाकलेली किंवा टाकण्याची थुंकी. [सं.पिज्]
**पिंकणे** न. गुळणा, पाण्याची चूळ.
**पिंकाणी** स्त्री. केळीच्या पानाची गुंडाळी करून, आंब्याची कोय घासून कागद वगैरे गुंडाळून केलेले वाजविण्याचे मुलांचे खेळणे; पिंपाणी.
**पिंग(गू)ट** वि. १. पिवळट; पिवळसर; फिकट. २. पिंगूळ किड्याची

घाण येत असलेला. [सं. पिंग]

**पिंगटणे** अक्रि. १. पिंगट होणे; पिवळट होणे; सडून पिवळे होणे. २.पिंगूळ किड्याच्या घाणीप्रमाणे घाण, दुर्गंधी सुटणे. [सं.पिंग]

**पिंगल** न. साठ संवत्सरातील एकावन्नावे संवत्सर. [सं.]

**पिंगला-ळा** स्त्री. (योग.) उजव्या नाकपुडीतून वाहणारी एक श्वासनाडी.

**पिंगवी** स्त्री. कांगणी; कांगोणी; एक वनस्पती.

**पिंगवे** न. कांगोणीचे बी.

**पिंगवेल** न. पिंगवीच्या बियांपासून काढलेले तेल; कांगणीचे तेल.

**पिंगळ-ळा,पिंगूळ** पु. १. एक प्रकारचा, दुर्गंधी सोडणारा किडा. २. (ल.) काहीतरी बीभत्स किंवा अभद्र बोलणारा मनुष्य. (वा.) **० पादणे** - अमंगळ, अभद्र, अचकटविचकट, बीभत्स बोलणे.

**पिंगळ** पु. भोवरा; गुंतागुंत; भ्रमाचे आवरण : 'खेळ मोडा पिंगळ तोडा । म्हातारीचें डोचकें फोडा।'- दावि २३१.

**पिंगळ-ळा, पिंगा** वि. १. पिंगट; पिवळट. २.फिकट: 'तैसिया वन्हि पिंगळा दिठी । भ्रूभंगातळीं।'- ज्ञा ११.२०४. [सं.पिंगल]

**पिंगळा** पु. १. अंगावर लहान ठिपके असलेले एका जातीचे घुबड. आकार साळुंकीएवढा; बांधा बसका. डोके मोठे-वाटोळे. रंग भुरकट तपकिरी. निशाचर प्राणी. २. डमरू किंवा कुडबुडे वाजवून पहाटेच्या वेळी भिक्षा मागणारा एक भिक्षेकरी. [सं.पिंगला]

**पिंगळा जोशी** भविष्यासंबंधी नेहमी चांगल्या गोष्टी सांगणारा ज्योतिषी; कुडबुड्या जोशी.

**पिंगळी** पु. कुडबुड्या जोशी. (गो.)

**पिंगा, पिंगारा** पु. १.कमरेत अंग पुढे वाकवून तोंडाने आवाज करत कमरेभोवती गोल-गोल फिरण्याचा मुलींचा एक खेळ. (क्रि.घालणे) २.(ल.) जागचे जागी फिरणे; भ्रमंती. ३.बखेड्याचा, घोटाळ्याचा कारभार. [सं.पिंज्= आवाज करणे] (वा.) **० घालणे** - एखाद्या व्यक्तीच्या भोवती भोवती करणे.

**पिंगाणी** काळा गर्द परकर.

**पिंगाणा-णे** न. दिव्याच्या भोवती घिरट्या घालणारा, पंख असलेला किडा; पतंग; फुलपाखरू. (कु.) [ध्व.]

**पिंगाळे** न. लहान पितळी; परात.(बे.)

**पिंगाक्षी** पु. वानर; माकड: 'खावें फळा तैं अकस्मात । उडोनि पिंगाक्षी पातला ।'- दावि २६१. [सं. पिंग + अक्षिन्]

**पिंजकट-कर, पिंजर** वि. सहज पिंजण्याजोगे; सहज तुटणारे; जीर्ण.

**पिंजट** न. बरू, बांबू इ.ची काढलेली लहान कामटी.

**पिंजणावळ, पिंजरणावळ** स्त्री. (कापूस इ.) पिंजण्याची मजुरी.

**पिंजणी** स्त्री. १. (कापूस, लोकर इ.) पिंजण्याची क्रिया. २. फुटणे; पिचणे; तुटणे इ. क्रिया. ३. पिंजण्याचे हत्यार. ४. पहा : **पिंजरी** ५. गळपट्टी. [सं.पिञ्जा]

**पिंजणे** उक्रि. १. धुणकणे; मोकळा करणे (कापूस, लोकर इ.); विंचरणे; (बांबू, बरू, काठी इ. स)चीर, भेग पडणे. २. उभा फाडणे (कापड, कागद इ.). [सं.पिंज्]

**पिंजणे** अक्रि. १. शिणकणे; धमकणे; धुसधुसणे. २.(हाडे इ.) वेदनादायक रीतीने शिवशिवणे; ठसठसणे. ३.(सोनारधंदा) सोने मुशीला चिकटणे. ४. (ल.) तटाटणे : 'गौळी म्हणती पिंजल्या गाई।'- निगा २२. [सं. पिंजा]

**पिंजपिंजणे** अक्रि. मिचकावणे; उघडझाप, पिचपिच करणे.

**पिंज(बी)र** स्त्री. लाल रंगाची पूड; धवधवीत तांबडे व कोरडे कुंकू. [तु. पिंजल]

**पिंजर** न.१. पिंजरा; पंजर. २.(ल.) (मनुष्य, पशू इ. च्या) हाडांचा सांगाडा. ३. बरगड्या. [सं.पंजर]

**पिंजर(रा)णी** स्त्री. पिंजरणे; विस्कटणे; विखुरणे; पसरणे.

**पिंजरणे** अक्रि. विखुरणे (केस, पिसे इ.); विस्कटणे; अस्ताव्यस्त होणे; दूरवर पसरणे (गवत इ.).

**पिंजरा** पु. १. पहा : **पंजर**; सापळा; पांजरा. २. गज बसवून केलेली लहान खोली. ३. माडाचा शेंडा; बोंखा. ४. घर, जहाज, गाडी, पालखी इ. चा सांगाडा. ५. तुरुंग. [सं. पंजर] (वा.)**० होणे** - अत्यंत अशक्त होणे.

**पिंजरा** पु. (सागरगोट्यांचा खेळ) प्रथम जमिनीवर डाव्या हाताची बोटे निरनिराळी उभी ठेवावी. हा पिंजरा झाल्यावर उजव्या हातात खडे घेऊन ते पिंजऱ्याबाहेर जमिनीवर टाकावे व झेलखडा हातात घेऊन वर उडवावा व तो खाली पडण्यापूर्वीच हाताने एक खडा पिंजऱ्याखाली ढकलून हात उलटून झेलखडा झेलावा. याप्रमाणे खेळण्याचा खेळ.

**पिंजरा पोळ** १. पोळाने लोकांना त्रास देऊ नये म्हणून त्याला ठेवण्यासाठी केलेले बंदिस्त आवार. २. पहा : **पांजरपोळ**

**पिंजरी** स्त्री. १. पिंजरा. २. पालखीवरील सुशोभित आच्छादन. ३. गाडीचा चांदवा, चवरडोल. ४. छत: 'धूम्ररजांची पिंजरी । वाजतिया वायूतें जरी होकारी । कां सूर्यबिंबा माझारीं । आंधारें शिरे ।' - ज्ञा ९.१२५. ५. (ल.) उटी : 'तैसी चंदनपिंजरी देखिली । सर्वांगीं तेणें ।'- ज्ञा ११.२२३. [सं. पंजर]

**पिंजार** न. मळणीमध्ये गुंतलेले आखूड भात्याणाचे लहान तुकडे.

**पिंजारणे** अक्रि. १. हलणाऱ्या पालवीने आच्छादित होणे. २. रागाने (डोळे, नाक, शेपूट इ.) फुगणे; मोठे होणे; विस्फारणे. ३.खवळणे; रागावणे : 'त्रिंबकराव नानाचा लष्करी । पंचमुख व्याघ्र जैसा पिंजारी।'- ऐपो ८८.

**पिंजारणे** उक्रि. पहा : **पिंजरणे**

**पिंजारी** पु. (कापूस, लोकर इ.) पिंजणारा मनुष्य.
स्त्री. पालखीच्या दांडीवर बांधण्याचे रेशमी आच्छादन. [सं. पिंजिक= कापसाचा पेळू]

**पिंजाह** पन्नास. - ऐको.

**पिंजु (जू,जो)ळी** स्त्री. धांदोटी; चिरफळी; कांबट; फाडलेला लांब व अरुंद तुकडा(पान, वेत इ.चा).

**पिंड** पु. १. गोळा; पुंज; समुदाय; ढीग. २. मृत पितरांना जवळच्या नातेवाइकाने श्राद्धाच्या वेळी अर्पण करावयाचा भाताचा गोळा. ३. शरीर; देह: 'पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान।'-तुगा ३३५६. ४. गोल; कोणताही वाटोळा पदार्थ. ५. (भूमिति.) घनतेचे माप.

६. नुकताच धरलेला गर्भ; भ्रूण. ७. (गणित) त्रिज्येचा एक चोविसांश. ८. एक प्रकारचे रान. ९. जीव : 'पदपिंडाची गांठी।'- ज्ञा ३.२७२.[सं.] (वा.) **पिंडास खिळणे, जडणे, बसणे, लागणे** - खोड, आजार, उपद्रव इ. जडलेला, खिळलेला, चिकटलेला असणे.

**पिंडजन** पु. जीवसृष्टी; देहधारी लोक : 'तैसें होय शरीर । तैं तें म्हणिजे खेचर । हें पद होता चमत्कार । पिंडजनीं।'- ज्ञा ६.२९६.

**पिंडदंड** वि. आडदांड : 'चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भगपाळ ।'- तुगा २८.१९.

**पिंडब्रह्मांडरचना** स्त्री. मानवी देहाची जी रचना तीच अखिल विश्वाची रचना (माणसाचे डोळे, रक्तवाहिन्या, केस इ. च्या ठायी चंद्रसूर्य, नद्या, झाडे इ. कल्पिणे) असे समजणे.

**पिंडरी** स्त्री. १. पायाची पोटरी. २. (ल.) ज्यात दाणे ठासून भरले आहेत असे कणीस; पोटरा. ३. व्यायामाने जाड व टणक झालेले दंड, पोटऱ्या इ. [सं.पिंड ]

**पिंडरोगी** वि. जन्मापासूनचा, गर्भावस्थेपासूनचा आजारी.

**पिंडा** पु. सूत, रेशीम, सुंभ इ. चा गोळा; बिंडा. [सं.पिंड]

**पिंडार** न. एक बाहुभूषण : 'दोहीं दंडीं पिंडार।'- श्रीकृच १३. [सं.]

**पिंडी** स्त्री. १. औषधे फडक्यात घालून केलेली, डोळे आले असता डोळ्यावर ठेवण्याची पुरचुंडी. २. शिवाचे लिंग; शाळुंकेमधील बाण. ३. (कुंभारी धंदा) चाकावर ठेवून, चाक फिरवून मडके, रांजण इ. बनवण्यासाठी केलेला मातीचा गोळा. ४. गोळा; चोथा : 'श्रीमुखी तांबोळ होते तेयांची पिंडी डोळा बांधली' - लीचपू ५५. [सं.पिंड]

**पिंडीबंध** पु. (नृत्य.) अनेक व्यक्तींनी मिळून विशिष्ट प्रकारच्या निरनिराळ्या आकृतीत उभे राहून करावयाचे नृत्य. [सं.]

**पिंतारचे** क्रि. रंगवणे (गो.) [पोर्तु.पिंतर]

**पिंप,पिंपळी** न. १. पीप; टीप. २.लोखंडी लहान पीप. (व.)

**पिंपर-रू-रे** न. १.पिंपळाच्या झाडाचे फळ : 'पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळु जैसा।'- ज्ञा १८.१७३. २. कोणतेही कोवळे फळ, भाजीचे फळ. (राजा.) [सं. पिंप्पल] (वा.) **पिंपरासारखा आपटणे** - एकदम जोरात आपटणे.

**पिंपरणी, पिंपरी** स्त्री. एक झाड; पायरी. [सिं. पिपिरी; सं.पिप्परीजटी]

**पिंपरी** स्त्री. लहान व कोवळी काकडी. (गो.)

**पिंपलिका** स्त्री. मुंगी. पहा : **पिपीलिका**

**पिंपळ** पु. १. एक अत्यंत पवित्र मानलेला, मोठ्या आकाराचा, पानझडी, दीर्घायुषी वृक्ष; अश्वत्थ; याच्या लाकडावर लाख तयार होते. २.पिंपळाचे फळ. [सं.पिंप्पल](वा.) **पिंपळास पार बांधणे** - एखादे पुण्यकारक धर्मकृत्य करणे. **वडाची साल पिंपळास बांधणे** - खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे करून सांगणे; एखाद्या गोष्टीचा भलत्याच गोष्टीशी संबंध जोडणे.

**पिंपळाचे फूल** (पिंपळाचे फूल कधीच आढळत नाही यावरून) क्वचित व फार दिवसांनी भेटणारी व्यक्ती.

**पिंपळपान-वण(न)-वाण** न. १. लहान मुलाच्या कपाळावर केसाला बांधायचा सोन्याचा, मोत्यांनी गुंफलेला व पिंपळाच्या पानासारखा एक दागिना. २. स्त्रियांच्या भांगाना मागे फुटणाऱ्या दोन फाट्यांमधील आकार, भाग. ३. त्या ठिकाणी घालावयाचे पदक.

**पिंपळवासी, पिंपळावरचा मुंज्या** वि. १. (पिंपळावरील भूत नेहमी जागा बदलते यावरून) भूत-पिशाचादिकांची भीती न बाळगता रात्री-अपरात्री भयाण प्रदेशात हिंडणारा. २. भटक्या; भटकणारा; एके ठिकाणी न सापडणारा.

**पिंपळमूळ** न. एक औषधी मूळ. [सं.पिप्पलीमूल]

**पिंप(पि)ळा** पु. केळीची पाने कापण्याचे एक हत्यार. कधी कधी हे कळकाच्या टोकास बांधून त्याने झाडाची पाने, फुले इ. काढतात.

**पिंपळी** स्त्री. १. एक औषधोपयोगी वनस्पती. फळे हिरव्या रंगाची, स्वाद तिखट-गोड, बहुवर्षायू, वास असलेली सर्वत्र आढळणारी वनस्पती. गाठी पिंपळी व लेंडी पिंपळी असे दोन प्रकार. २. पिंपळीची शेंग. ३. पिंपळीच्या शेंगेसारखा जानव्यास पडलेला पीळ. ४. मोत्यांनी मढवलेला कानातील किंवा नाकातील पिंपरीसारखा दागिना; भिकबाळीचे मधले मोती. ५. (सोनारी) झेलरव्याचे सूत मोत्यात ओवून ते मोती झेलरव्याच्या गोलाकाराजवळ बसवल्यावर मोत्याच्या दुसऱ्या बाजूस केला जाणारा फासा किंवा मुदनी. [सं.पिप्पली]

**पिंपुर** न. पिंपळाचे फळ.

**पी** वि. पिणारा. (समासात अंत्यपदी) जसे :- मद्यपी इ. [सं.पा]

**पीक** न. १. पेरलेल्या धान्याची परिपक्वता. २. शेतात उभे असलेले किंवा नुकतीच कापणी केलेले काडासह धान्य. ३. मळून तयार झालेले धान्य.[सं.पच्, पक्व] (वा.) ० **जळणे**- अतिशय उन्हाने पीक वाळणे. ० **सोडणे**- जमिनीची पीक देण्याची शक्ती, सुपीकता कमी होणे. **पिकाचा फुफाटा उडणे** - पिकाची धुळधाण, राखरांगोळी होणे.

**पीकनुकसानी** स्त्री. (पिकाची नासाडी) पीक बुडाल्यामुळे सरकारने दिलेली सूट.

**पीकपाऊस** पु. पीक पिकण्यास योग्य असा पाऊस. (वा.)

**पीक** स्त्री. गोगलगाय. (बे.) [दे.]

**पीक** पु. फोड, जखम इ. तून येणारा द्रवपदार्थ; पू.(व.)

**पीछेहाट** स्त्री. माघार; मागे हटणे.

**पीटतावी** वि. ज्योतीच्या दिव्याप्रमाणे चमकणारा.

**पीटिका** स्त्री. पुळी; लहान फोड. [सं.]

**पीठ** न. १. धान्य दळून केलेले चूर्ण. २. जमीनदोस्त, चिरडलेली, नाश पावलेली स्थिती; पराभूत, पादाक्रांत केलेली स्थिती; पूर्ण खर्च; चूर, चुराडा, धूळ, माती, राख यांबद्दल योजला जाणारा शब्द. ३. आधिक्य दाखविण्यासाठी गोरा या शब्दापुढे योजला जाणारा शब्द. जसे :- गोरा पीठ. ४. स्वच्छ व शुभ्र चांदण्याबद्दल क्रियाविशेषणाप्रमाणे योजला जाणारा शब्द. [सं.पिष्ट]

**पीठ** न.१. आसन; बैठक. २. वेदाभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी केलेले दर्भाचे आसन. ३. मुख्य स्थान. जसे :- गुरुपीठ इ. ४. विष्णूच्या चक्राने झालेले पार्वतीच्या मृत शरीराचे तुकडे ज्या ठिकाणी पडले, ती कल्पिलेली स्थाने. (अशी एकावन्न पीठे आहेत). [सं.पीठ]

**पीठकूट** न. स्वयंपाकाला लागणाऱ्या नेहमीच्या व आवश्यक वस्तू.
**पीठगोट** पु. सैन्याच्या तळावरील खाशाचा गोट किंवा डेरा.
**पीठगाठ्या** पु. अळवाच्या पानाची पीठ लावून, तेलात तळलेली वडी.
**पीठपाणी** न. साखर घालून पाण्यात कालवलेले लाह्याचे पीठ; आजारी माणसाला देण्याचे एक पेय.
**पीठपोळी** स्त्री. तांदळाच्या उकडीचे पुरण भरून केलेली गव्हाची पोळी.
**पीठवण** स्त्री. कोडावरील एक औषध. [सं.पृष्ठिपर्णि]
**पीठा** पु. १. वखार; लक्कडपीठा. २. दारूचे दुकान. [सं.पीठ]
**पीठिका** स्त्री. १. वंशपरंपरा; कुळपरंपरा; सर्व गोत्र, कुल किंवा वंश. २. पाया; भूमिका; आसन. ३. (ल.) कोणत्याही गोष्टीची, धंद्याची इ. संपूर्ण हकिगत. [सं.]
**पीड** उक्रि. ताडाच्या झाडाचा बुंधा.
**पीडणे** उक्रि. १. त्रासणे; त्रासविणे; दुःख देणे. २. दाबणे : 'सव्य तें तळीं ठेविजे । तेणें सिवणीमध्यु पीडिजे ।'- ज्ञा ६.१९४.[सं.पीडन]
**पीडन** न. १. त्रास; पीडा; दुःख. २.(आयुर्वेद.) गळवावर लावल्याने ओढा बसणारे औषध.
**पीडा** स्त्री. १. दुःख; त्रास; कटकट. २. व्याधी; उपाधी; त्रासदायक मनुष्य, गोष्ट, धंदा इ. ३. भूतबाधा. ४. बाळंतपणापूर्वीची वेण. [सं.]
**पीडापीड** स्त्री. संकटपरंपरा. [सं.पीडा द्वि.]
**पीडावणे** अक्रि. त्रासणे; दुःखित होणे; पीडणे : 'तंव ते अत्यंत पीडावलीं। वाट पाहात बैसलीं ।'- दास ३.४.१८. [सं.पीडा ]
**पीडित** वि. त्रासलेला; गांजलेला; पीडलेला; कष्टलेला. [सं.]
**पीढ** न. पाट. (व.) [सं.पीठ]
**पीण** स्त्री. स्तनपान; थान पिणे. (को.) [सं.पा=पिणे]
**पीत** वि. पिवळा. [सं.]
**पीत–त्त** न. शरीरातील एक द्रव्य; पित्त. [सं.पित्तम्]
**पीत** पु. (ल.) दिवा; ज्योत: 'पीतापासून कृष्ण जाले । भूमंडळीं विस्तारलें। तेणेंविण उमजलें। हें तों घडेना।'- दास १५.६.१.
**पीत** वि. १. प्यायलेला (मनुष्य). २. प्राशन केला गेलेला (पदार्थ). [सं.पा]
**पीतज्वर** पु. विषाणुजन्य रोग; कावीळ.
**पीताम्ल** न. एक रंगहीन तेल; या आम्लाच्या ताम्राच्या क्षाराचा रंग पिवळा असल्याकारणाने यास पीताम्ल म्हटले जाते. [सं.पीत + आम्ल]
**पीतांजनविषांग** वि. उजव्या बाजूस पिवळे ठिपके असलेला (घोडा.)
**पीन** वि. पुष्ट; लठ्ठ; मांसल: 'एकें पीनावयव मांसाळें । एकें शुष्कें अतिविक्राळें।' -ज्ञा ११.१३९. [सं.]
**पीप** न. पाणी भरण्याचे लाकडाचे एक मोठे पात्र. [पोर्तु.पिपा]
**पीयु(यू)ख–ष** पु. १. अमृत. २. पाणी :'आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगेपीयूखें ।'- ज्ञा १६.१९७. ३. कोवळे (जनावर व्याले असता प्रथम काढलेले) दूध; चीक. ४. दह्यापासून बनवलेले, श्रीखंडाची चव असलेले एक पेय. [सं.]
**पीयूषिका** स्त्री. प्रमस्तिष्काच्या मागील भागाच्या अधोभागात असणारी, अनेक संप्रेरकांचा स्राव करणारी ग्रंथी.
**पीर** पु. १. मुसलमान साधू किंवा त्याचे थडगे. २. वृद्ध माणूस. ३. वस्ताद. ४. खुळा, वेडा माणूस. [फा.]
**पीर** स्त्री. बशी; पिण्याचे उथळ पात्र. (गो.) [पोर्तु. पीरेस]
**पीरखानी** रुपयाचा प्रकार.
**पीरजादा** पु. साधुपुत्र : 'त्या ठिकाणीं हुसैनीसाहेब म्हणून मशायख पीरजादा आहे.'- मइसा ५.११२. [फा.पीर्झादा]
**पीरवार** पु. सोमवार.
**पीरान** वि. वैराण जमीन; जिराईत जमीन; विहीर नसलेली जमीन.
**पील** न. (कोंबडी, पोपट, कावळा, मांजर इ. पशुपक्ष्यांचे) पिलू. पु.न. केळ, कळक इत्यादींचा कोंब; अंकुर.
**पील** न. एक उपरत्न. हे जपानी व चिनी लोकांत फार प्रिय आहे. त्याला ते राष्ट्रीय रत्न समजतात. हे भुरकट पांढरे, पांढरट हिरवे असून कठीण व पारदर्शक आहे. (इं.) जेड.
**पील** पु. हत्ती. [फा.]
**पील(पि)खाना** पु. १. गजशाळा; हत्तीखाना. २. गजदळाचे खाते. [फा.]
**पीलबाला** वि. हत्तीसारखा उंच व लठ्ठ बांध्याचा (घोडा).
**पीलभक्त** वि. दांभिक; ढोंगी; भोंदू.
**पीलभक्ती** स्त्री. १. जग परमाणूपासून उत्पन्न झाले आहे असे मत. २. प्रेम व मैत्री याविषयींच्या पोकळ बाता. ३. ढोंगीपणा; दांभिकता. [सं. पिलु+भक्ति]
**पीलव** पु. डोळ्यांनाही दिसू शकत नाही असा बारीक कण.
**पीलवान** पु. हत्ती हाकणारा; महात. [फा.]
**पीलसोज** वि. पांढऱ्या रंगाचा. - रावाको.
**पीलु** पु. (संगीत) गायनातील एक राग. गायनसमय दिवसाचा तिसरा प्रहर, कोणी सार्वकालिकही मानतात.
**पीलु** न. एक कोकण–गुजरातप्रांतीय वृक्ष. याची पाने धायटीसारखी व फळे तोरणासारखी असून फळांचे तेल वायुहारक आहे (कोकणी नाव किंकण, सारी इ.).
**पीषांट** स्त्री. पिछाडः 'येक दंडी मुडू पीषांटीं षात । मनगट वरी गुंडाळत । तोंडें काढूनी येरी मोहोरे। तेथें आणीकें डसती ।'- उषा १६९९. [हिं.पिछाडी]
**पीस** न. १. लहान, बारीक पंख. २. बाणाच्या टोकाला लावलेली पिसे प्रत्येकी. [सं.पिच्छ] (वा.) **पिसाचा कावळा करणे** - अतिशयोक्ती करणे.
**पीस** स्त्री. न. १. भाताच्या रोपाला लागणारी कीड; कीड लागून रोगटलेले कणीस. २. पळी, उचटणे इ. चा दांडा : 'पळीचें पीस भातांत फिरवून वर झांकण ठेवावें.- पाकशास्त्र २.
**पीस** न. पिसवा.
**पीहू** न. कोकीळ पक्ष्याचा आवाज. [ध्व.]
**पीळ** पु. १. वळ; मुरड; पिरगळा; पिरगाळलेली स्थिती (दोर इ.ची). २. (ल.) ताठा; मगरूरी; शिरजोरपणा. ३.(ल.) प्रेमाचा किंवा दयेचा कळवळा. ४. (ल.) मनातील अढी; पेच; बाक; तिढा; विपरीत ग्रह.

**पीळ** पु. (पगडबंद) पागोट्याच्या बांधणीतील एक विशिष्ट रचना. राठ चिरगुटाच्या सुरळीभोवती नव्या कापडाच्या पट्ट्या मुडपून गुंडाळतात व भक्कम शिवतात. पगडीच्या कोक्याच्या एका बाजूस सारखे पीळ व दुसऱ्या बाजूस सपाट पट्ट्या असतात. [सं. पील = अडविणे]

**पीळकाणे** न. (ढोराचा धंदा) चामडे पिळून काढण्याचे लाकूड.

**पीळणी** स्त्री. पीळ : 'आसुडी गजाचे प्रहात । पाये देउनी उपडी दांत। तेची पीळणी घेउनी । पुरवी राउतासी जुगांत ।'- उषा १४८३.

**पीळदार** वि. १. चांगले पिळलेले; कसलेले; मजबूत. २. गर्विष्ठ; आढ्यतेखोर; मिजासखोर (मनुष्य).

**पुआळणे** अक्रि. पळणे; धावणे; चालणे; स्थिर न राहणे : 'राउळांपुढें वाढत । राजवाहान पुआळित । हो हो भणतां राउत । आखूडती ना।' - शिव ५३०. [सं. प्लवन = घोड्याची चाल, दौड]

**पुई** स्त्री. १.पुळी; पुरळी. २. पुरुषभर उंचीचे औषधी झुडूप. (याचा पाला वाटून ताकात कालवून व्रणावर लावला असता व्रणातील सर्व पू बाहेर येतो.) [प्रा. पुइ=पू; सं.पूति]

**पुकार-रा, पुकारणी** पु.स्त्री. १. मोठ्याने मारलेली हाक; आरोळी; बोलावणे. २. हाकाटी; गवगवा; बोभाटा; बातमी. (क्रि. कळणे, पडणे) ३. (सामा.) आरडाओरड; ओरडा. [सं.पूत्कार; प्रा. पुक्कार; हिं. पुकारना]

**पुकारणे** अक्रि. १. ओरडणे; मोठ्याने आवाज करणे. २. एखाद्या विरुद्ध ओरडा, हाकाटी करणे. ३. जाहीर करणे; बातमी पसरविणे. [सं.पूत्+ कृ]

**पुकारा** पु. ताठा; अभिमान : 'नको मानसीं ज्ञानगर्वे पुकारा ।'- रामदास, करुणाष्टक ४.

**पुखा-ख्खा** पु. यथेच्छ जेवण; भरपूर, आकंठ जेवण. (क्रि. पाडणे, करणे, उरकणे).[सं. पुष्] (वा.) ० **झोडणे** - स्वतः श्रम न करता मिळालेल्या अन्नावर यथेच्छ हात मारणे.

**पुखानंद** पु. पोटभर जेवण मिळण्यातच समाधान मानणारा; इतर कोणत्याही गोष्टीत रुची नसलेला; केवळ पोटभरू.

**पुचकणे** अक्रि. मरणे; गचकणे. [ध्व.]

**पुच(चा)करणे** अक्रि. चुचकारणे; पटवून ताब्यात घेणे. [ध्व.]

**पुचपुच, पुचुपुचु** स्त्री. १. हलक्या व खोल आवाजात बोलणे; कुजबुजणे; कानगोष्टी. २. कुणकुण; गुणगुण; थोडा बभ्रा. [ध्व.]

**पुचाट** वि. १. पोचट; हलका; पुचट. २. दुर्बल; नामर्द.

**पुची-च्ची-च्चा** पुस्त्री. स्त्रियांचे जननेंद्रिय; योनी; मायांग. [क. पुक्की -च्ची; सं. स्फिचौ]

**पुचुपुचुरंगण** न. एक कवड्यांचा खेळ.

**पुच्छ** न. शेपूट. (पुच्छवरून होणारे वाक्प्रचार इ. शेपूट मध्ये पहावेत.) [सं.]

**पुच्छदीप** पु. वाहनाच्या मागे असलेला तांबडा दिवा.

**पुच्छप्रगति-ती** स्त्री. (ल.) (शेपटाच्या दिशेने जाणे) मागे हटणे; माघार घेणे; पीछेहाट : 'परांजपे साहेबांची पुच्छप्रगति पाहून बिचाऱ्या शिक्षकवर्गाला काय वाटेल?-' केले १.२६७.

**पुच्छापताई** स्त्री. (परदेशी तेली) मुलाच्या बापाने वधूकडील माणसाला पैसे देण्यासंबंधीचा विधी.

**पुच्छावर्त** वि. शेपटीजवळ भोवरा असलेला (घोडा).

**पुजणे** सक्रि. १.पूज्य मानणे; आदरसत्कार करणे; मान देणे. २. पूजा करणे; संभावना करणे; उपासना करणे. [सं.पूजन](वा.) **पुजून ठेवणे** - एखाद्या गोष्टीचा उपयोग, दान इ. न करता उगीच संग्रही ठेवणे. **पान पुजणे** - फार न खाणे; नावाला जेवणे. **पाने पुजणे** - खाद्यपदार्थ पानावर थोडा थोडा वाढणे; नुसते नावाला पदार्थ वाढणे; पानावर वाढल्यासारखे करणे. **लोकांची घरेदारे पुजणे** - आपल्या कामाकरता लोकांच्या घरी वारंवार खेपा घालणे.

**पुजना** पु. भाताची गंजी. (झाडी) [सं.पुंज]

**पुजमाल** पु. घोड्याला खरारा करतेवेळी किंवा नाल ठोकतेवेळी त्याच्या तोंडाच्या खालच्या जबड्याला बांधून मग शेपटीच्या खाली बांधलेली दोरी; ओठाळी. [फा. पूझमाल]

**पुजरट** न. घाणेरडे फडके किंवा कपडा. (व.)

**पुजारा-री** पु. देवालयात देवाची पूजा करण्यासाठी नेमलेला माणूस.

**पुट** न. १. (हात, कान, पाने इ.) दुमटून केलेली पोकळी; द्रोण; घडी; पुडा. (समासात) अंजलीपुट, चंचुपुट, पर्णपुट, कर्णपुट इ. २. अर्धगोल; अर्धवर्तुळ. ३. केलेली रासायनिक क्रिया; लेपाचे द्रव्य. औषधादिकास एकदा केलेला संस्कार, क्रिया, पातळ थराचा लेप. उदा. औषधावर भाजण्या-वाळविण्यासाठी विस्तव, ऊन, हवा इ.त एकवेळ ठेवणे; तसेच एखाद्या रसाने एक वेळ माखणे किंवा त्या रसात बुडवणे. (क्रि. देणे). (समासात) अग्निपुट, सूर्यपुट, औषधपुट, रसपुट इ. ४. पुट देण्याचा पदार्थ (रस, लेप. इ.). ५. (ल.) मूस; भट्टी : 'सोनें जेवी पुटीं पडे । मळ तुटे वाणी चढे । तेवीं गुरुसेवा जडत्व मोडे । चित्तशुद्धी जोडे निर्दुष्ट ।'- एभा ३.३८८. ६. संकुचित जागा: 'तैशी सुबद्ध आटली । पुटीं होती दाटली । ते वज्रासनें चिमुटली । सावध होय ।'- ज्ञा ६.२२५. ७. तेज : 'कृष्ण अंगा जडलेपणें विजूर्शी पुट जालें चौगुणें ।'- एरुस्व १.२६. ८. घोड्याच्या पृष्ठभागाच्या ठिकाणी कंबरेपर्यंत असणाऱ्या दोन बाजूंपैकी प्रत्येक. ९. (नृत्य.) पापण्यांच्या द्वारा केलेला अभिनय. १०. पूड; पुडी. समासात नासिका, नासा, घ्राण या शब्दाबरोबर योजतात. ० **पडणे** - शुद्ध होणे. ० **चढविणे** - स्तुती, प्रशंसा करणे. 'सु - देवें ब्राह्मणें । पुठ चढविलें वायानें । सेवटी एकें हीं गुणें । भुंजो नअे ।'- शिव २०३. [सं.]

**पुट** स्त्री. भानगड; कारस्थान; दंगी; फितुरी.

**पुट-टी** न. स्त्री. वेटोळे : 'ना हे उकलली पुटी । क्रोध भुजंगाची ।'- भाए ७५५.

**पुटक(कु)ळणे** अक्रि. पुटकळ्यांनी व्यापून जाणे; पुळ्या होणे; पुरळ उठणे.

**पुटक(कु)ळी** स्त्री. पाणी किंवा पू असलेली पुळी; लहान फोड. [सं.पिटक, पीटिका]

**पुटका** पु. गुळणा.

**पुटणे** अक्रि. १. प्रकाशणे. २. घासणे; घसटणे; एकमेकांत गुरफटणे : 'आंगिचेनि कसमसाठें । रसरंगाचां पूर पुटे ।'- शिव ४११. ३. उसळणे; उडणे. [सं.स्फुट]

**पुटपाक** पु. १. औषधादिकांच्या सभोवार पाने घालून व वर माती लावून ती भट्टीत भाजण्याची क्रिया. २. मुशीमध्ये सोने वितळवणे. [सं.]

**पुटपुट** स्त्री. १. तोंडातून काढलेला एकसारखा पण बारीक आवाज; कुजबुज; कुरकुर (क्रि. करणे, बोलणे). २. पटपट मारलेली उडी (बेडकीची). (क्रि. येणे, जाणे, पडणे).
क्रिवि. एकसारख्या बारीक आवाजाने; रिपरिप; पिटपिट (पाऊस इ. पडणे).

**पुटपुटणे** अक्रि. १. रिपरिप, फुट फुट पडणे. २. तोंडातल्या तोंडात अस्पष्ट बोलणे. ३. कुरकुरणे; धुसमुसणे.

**पुटंवचे** सक्रि. पुरवणे. (गो.)

**पुटिका** स्त्री. पोटात विरघळू शकणारी, लहान आवरण असलेली औषधी गोळी;(इं.) कॅप्सूल.

**पुटिकाळी** स्त्री. वेटोळे; वळसा : 'आनंदनिधानांवरी बैसीनिलीं। मोक्ष भुजंगाची पुटिकाळी । तैसी देहुडी वेणी खोविली । आठाइती ।'- शिव ४२५.

**पुटिला** पु. पटल : 'तोंडा येतो फेंस पुटिला नाचसिल बा रे ।'- निगा ९४.

**पुटी** वि. औषध, रस, लेप इ. ची पुटे किंवा हवा, उष्णता दिलेला असा (रासायनिक पदार्थ). पहा : **पुट** . समासात - अग्निपुटी, सूर्यपुटी, सहस्रपुटी इ. (वा.)

**पुटीकरण** न. (भूशास्त्र.) एकावर एक पुटे, थर, लेप बसणे. गाळाच्या निरनिराळ्या तऱ्हा निवडल्या जाऊन प्रत्येकाचे निरनिराळे व्यवस्थित थर एकावर एक रचले जाण्याची क्रिया.

**पुटे** न. कर्नाटक राज्यात होणारे टरबूज. (बे.)

**पुट्टा** पु. गाडीच्या साटाऱ्याखालचा कण्यावरील लाकडी आडवा भाग. (कर.)

**पुठ** न. पहा : **पुट** ७

**पुठा-ट्ठा** पु. १. घोडा इ. च्या शेपटीजवळचा भाग; ढुंगण. २. घोडा विकत घेताना एका घोड्याबद्दल योजावयाचा शब्द. ३. वही, पुस्तक इ. वर असलेले जाड, मजबूत आच्छादन; मलपृष्ठ; वेष्टनासाठी वापरण्याचा, कागदाच्या लगद्यापासून बनवला जाणारा जाड व टणक कागद. ४. कागदपत्रे ठेवण्यासाठी दोन पुष्टिपत्रे एकत्र करून केलेली वही; (इं.) फाईल. ५. जूट; जमाव; गठ्ठा; संघ; टोळके; कंपू. ६. शेजारी-शेजारी असलेल्या पाच-सात खेड्यांचा टापू, संघ, प्रदेश. ७.विक्रीसाठी ठेवलेल्या वस्तूंचा गट; संच. ८. गाडीच्या चाकाला वर्तुळाकार बनवणारा बाकदार लाकडी तुकडा; चाकाच्या आऱ्यावरची जाड फळी; पाटा. ९. (जरतारी) पिंडोळा; गुंडा. १०. पक्ष; गोट. (ल.) विश्वास : 'फडणविसांच्या पुठ्यांत शिरलें पाहिजे असें विसूभाऊस वाटलें '- अस्तंभा ३५. ११. पृष्ठभाग; पाठ; मागचा भाग : 'कां पुठीं वळला ऊंसीं । गोडी जैसी ।- ज्ञा १८.८४२. १२. पुष्टिपत्र; जाड कागद; कार्डबोर्ड. [सं.पृष्ठ]

**पुठीवळा** वि. वाकडा.

**पुठ्ठी** स्त्री. कुस्तीतील एक डाव; आपल्या एका हाताने जोडीदाराच्या चड्डीत कुल्ल्यावर हात घालून आपला दुसरा हात जोडीदाराच्या बगलेतून उराच्या खङ्ग्यात घालून आपल्या जोडीदारास उचलून उताणा पाडणे.

**पुड** क्रिवि. पुढे : 'जैसें विष अति गोड । गोडचि म्हणून करावा पुड। मग ते मिरवें शत्रुचाड । द्वंद्व सुख वाटावया ।'- नव १४.१५६.

**पुडका-के** पु. १. कागद, पत्रावळी, पाने इ. चा एकत्र बांधून केलेला गठ्ठा; पुडा. (इं.) बंडल. २. पत्राचे पाकीट; लिफाफा. (व.) ३. (विणकाम) दहा पौंड वजनाचे सुताचे बंडल. (बे.) ४. खण (टेबलाचा). [सं. पुट]

**पुडका-की** पु.स्त्री. (चर्मकार.) ढेप्याच्या पाठीमागे लागणारा चामड्याचा तुकडा; सोमुसे.

**पुडयाँ-ये** न. प्रसंगविशेषी नेसण्यासाठी ठेवलेले वस्त्र, धोतर इ. (कु.)

**पुडवटी** स्त्री. लहान पुडी.

**पुडवाटवा, पुडुवाटोवा** पु. डबा किंवा बटवा : 'बाइसें पुडवाटवा घेति।'- पूजावसर. पहा : **वाटवा**

**पुडवे** न. धोतर. (गो.) पहा : **पुडयाँ-ये**

**पुडसावणे** अक्रि. धमकावणे; धमकी देणे; दटावणे.

**पुडा** पु. १. पाने, कागद इ. चा दुमटून बांधलेला गठ्ठा; पुडका. २. साखर इ. जिन्नस कागद, पान इ.त गुंडाळून बांधला असता होणारा आकार; पिशवी. ३. मृदंगादिकांचे पूड; वाजणारा कातडी भाग. ४. (चर्मकार.) टाचेचा भाग उजरण्याकरता उपयोगात आणावयाचा कातड्याचा अर्धगोल ठोकळा. ५. पुड्याच्या आकृतीची एक प्रकारची पोळी. (गो.) [सं.पुट]

**पुडा घालप** दाणे सुपात घालून निवडण्याचा एक प्रकार. (गो.)

**पुडिरा** पु. पुरवठा : 'बाई : इंद्रभटासि पुडिरा करा ।'- लीचपू ५५९. [सं.पुर]

**पुडिव** पु. गाभा : 'रुक्मिणीचे रूप... की चंद्राचे पुडिव ।'- रुस्व ८६. [सं.पुट]

**पुडी** स्त्री. १. लहान पुडा. २. कागद, औषध इ. कांचे लहान पुडके. ३. साखर इ. बांधून केलेला लहान पुडा. ४. (ल.) संन्याशाचे भोजन ( हे अत्यंत कमी असल्याने त्यास पुडी म्हणतात). (ल.उप.) जेवण; जेवणाचे आमंत्रण. (चर्मकार.) सागळ रंगवण्याचा कच्चा रंग. ५. पखवाज इत्यादीला बसवण्याची शाई. ६. (ल.)गुप्त गोष्ट, बातमी इ. ( क्रि. फुटणे, फोडणे.). ७. गोळा : 'तोंडात तंबाखू व चुना यांची पुडी टाकून ती चघळत...' - एआ १५५. (वा.) ० **सोडणे-** गप्पा मारणे; बाता मारणे. **पुडीस जाणे** - संन्याशाने जेवणास जाणे.

**पुडीमांस** न. सागोती व मांस शिजवून त्यात चाकवताचा पाला घालून तयार केलेला पदार्थ.

**पुड्का** पु. लाल मुंगळ्यांचे घरटे. (झाडी)

**पुड्डीस** वि. गोट्यांच्या खेळात ज्याची पाळी अगदी शेवटी येईल तो . पहा : **फड्डी**

**पुढचा–ला, पुढील** वि. १. अगोदरचा; पूर्वीचा; पुढे जाणारा; (स्थलकालासंबंधात) अग्रिम. २. भविष्यकाळची. ३. (वारांच्या, नावांच्या पाठीमागे योजला असता) ताबडतोब येणारा; आता यापुढे येणारा. जसे :– पुढला सोमवार. [सं. प्रथम]

**पुढच्या जोताचा** वि. १. पुढच्या जुवास जुपण्यास योग्य. २. (ल.) चलाख; तल्लख; हुशार; तरतरीत. ३. पुढारी; सूत्रधार; सुकाणूदार.

**पुढच्या पुढे** शअ. क्रिवि. १. अगदी समोर; समक्ष; एकदम पुढे (क्रियावाचक धातूसमवेत प्रयोग). २. पहा : **पुढेपुढे**

**पुढतपुढत–ता–ती, पुढतांपुढती, पुढतो–ती** क्रिवि. वारंवार; पुन: पुन्हा; पुढे पुढे : 'सर्वस्वेसी तुझा आधार । पुढत पुढत सांभाळी ।' – दावि १२.

**पुढपुढे** क्रिवि. पहा : **पुढेपुढे**

**पुढा** पु. १. पुढचा, तोंडाकडील भाग. (राजा.) २. (शिंपी) कोट इत्यादींचा पुढे येणारा भाग; आगा.

**पुढाकार, पुढार–रा** पु. १. पुढारीपणा; नेतृत्व; हुकमत. २. कारभार; अधिकार; व्यवस्था.

**पुढार–री** वि. पुढील; पुढे येणारी : 'पुढारी दोपायीं तनुभर उपायीं उतरतो।'– र ५६.

**पुढार** पु. बोल; वचन : 'मग म्या बोलिलें उत्तर। माझा एक हो पुढार। हिमवंत होईल नृपवर। रेणुरावो ।'– कथा २.१२.४७.

**पुढारणे** अक्रि. पुढे होणे; सरसावणे : 'मारीचाख्य पुढारला भुजबळें झुंझावया रूढला ।'– आय २५. २. बोलणे : 'आणि आत्मया एथ कांहीं । सर्वथा लागु नाहीं। हे पुढारलासि तें देई । लाहाणें माझें।'– ज्ञा १८.२९९. ३. उत्कर्षास, प्रगतीस चढणे; पुढे येणे.

**पुढारा** शअ. १. पुढे; समोर : 'प्रकट तिजपुढारां जाहला राजमौळी।'– र ४०. २. निमित्ताने : 'कां पितृवचन पुढारां । सीतेचिया वियोगाद्वारां। रीसा आणि वानरां । उद्धरी निशाचरां रघुनाथ।'– एभा १६.३३३.

**पुढारा–री–रे** क्रिवि. १. पुढे, कालांतराने : 'मग ते दयाळू द्वारपाल। म्हणती नाथा न करी तळमळ । तुम्हां मायलेकरांचा मेळ । ईश्वर करील पुढारां ।'– नव १५.३७. २. पुढे होऊन; आगाऊ; अगोदर.

**पुढारी,पुढाईत, पुढाकारी** वि. पु. १. पुढाकार घेणारा; नेता; नायक; पुढे होऊन हुकमत चालविणारा. २. अधिकारी; कारभारी; व्यवस्थापक; प्रमुख.

**पुढाळचे** क्रि. पुढे जाणे. (गो.) पहा : **पुढारणे**

**पुढिल्ल्यो** क्रिवि. (विटीदांडू) विटीच्या पुढल्या टोकापासून (मोजणे). (कर.)

**पुढी** क्रिवि. पुढ्यात; पोटाशी : 'घेऊन पुढीं नुसती सौख्यांत विडी तोडावी।'– प्रला १६०.

**पुढी(दि)ल** वि. १. पुढचा; अगोदरचा; नंतरचा (स्थल–काळा संबंधी). पहा : **पुढचा.** २. अन्य; दुसरा; लोक : 'आपुले अंगीचें मळ । पुढिलीं क्षाळितां सकळ ।'– एभा २३.७२. ३. पुढे येणारी; भावी (पिढी, लोक) : 'पुढिला सिकवण । ते घ्यावी आपण ।'– दावि १०३. ४. पुढे – खाली या नंतर येणारी, सांगितलेली (गोष्ट, मुद्दा इ.). ५. जवळचा. [सं. पुरस्]

**पुढील पाय** प्रवृत्ती; प्रपंचाकडील वृत्ती : 'ऐसाही जरी विपायें । सांडूनि पुढील पाये । सर्वेंद्रियासि होये । पाठिमोरा जो ।'– ज्ञा १०.७२.

**पुढून** क्रिवि. १. समोरून; पुढील बाजूने. २. पूर्वी; अगोदर. (कालवाचक)

**पुढे** क्रिवि. १. समोर; अग्रभागी. २. विशिष्ट मर्यादेपासून; नंतर; पलीकडे.[सं. पुरस्] (वा.) ० **पाऊल पडणे** – लुडबुड, प्रगती करणे. ० **वाढून जाणे, येणे** – फौजेसह शत्रूवर हल्ला करणे : 'इंग्रज पुढे वाढून येत नाहीत.' – पया १७६.

**पुढेपुढे** क्रिवि. १. आरंभापासून पुढे जातो तसातसा; उत्तरोत्तर. २. इतरांना मागे टाकून आपण एकट्यानेच पुढाकार घेण्यासाठी पुढे सरून, होऊन (बोलणे); पुढच्या पुढे. [पुढे द्वि.] ० **करणे** – लुडबुड करणे; विनाकारण लुब्रेपणा, लघळपणा करणे. ० **नाचणे** – मनधरणी, खुशामत करणे.

**पुढवसा** पु. पुढला, पुढचा भाग.

**पुढ्या** पु. एक प्रकारचे लव्हाळे.

**पुढ्या** न. धोतर (कु.); पुडवे (गो.).

**पुढ्यात** क्रिवि. १. पुढे; पुढच्या भागात; समोर. २. ओटीत; पायापाशी–मध्ये.

**पुण** उअ. परंतु: 'म्हणौनि मज आत्मारामा । पुण पढियो तो ।'– भाए ८०४.

**पुणती** क्रिवि. पुन्हा. – खिप्रु १.१.४७.

**पुणी** स्त्री. पिंजलेल्या कापसाची वळी; पेळू. [गु.]

**पुणु** पु. पण; होड; पैज. – खिप्रु.

**पुणेरी** वि. पुणे शहरासंबंधीचा; पुण्याचा (जोडा, भाषा, चाल इ.).

**पुण्य** न. १.उत्तम आचरण केल्याने ईश्वरकृपेने सुख प्राप्त करून देणारा आत्म्याच्या ठिकाणी असलेला विशिष्ट धर्म; धार्मिक, नैतिक गुण; उत्तम आचरणाचे फळ. २. सत्कृत्य; धार्मिक, परोपकारी कर्म.[सं. पुण् = धर्मकृत्य करणे] (वा.) ० **खरचणे** – वाईट कृत्य करणे.

**पुण्यकाल–ळ** पु. संक्रांती, ग्रहण इ.चा पर्वकाळ; ज्या काळात पुण्यकृत्य करणारास अधिक फळ मिळते असा काळ. पहा : **पर्व** [सं.]

**पुण्यजन** पु. १. पुण्यवान मनुष्य. २. राक्षस. [सं.]

**पुण्यतिथी** स्त्री. १. पवित्र दिवस. २. संन्यासी मृत झाल्यावर बाराव्या दिवशी किंवा प्रतिवर्षी त्याचा मृत्यू ज्या तिथीला झाला त्या तिथीला त्याचे पुत्र–शिष्य इ. लोक श्राद्धाच्या वेळी करतात ते कर्म किंवा ती तिथी. ३. थोर सत्पुरुषाची प्रतिवार्षिक मृत्युतिथी. [सं.]

**पुण्यपूर्व** न. चांगल्या, पुण्याच्या कृत्यामुळे मिळणारे फळ; सुकृत. [सं.]

**पुण्यभूमि–मी** स्त्री. यज्ञादी कर्म करण्याविषयी शास्त्राने योग्य म्हणून सांगितलेली भूमी. उदा. हिमालय व विंध्य यामधील प्रदेश; आर्यावर्त. [सं.]

**पुण्यलोक** पु. स्वर्ग; इहलोक सोडून गेल्यानंतर स्वत:च्या पुण्याईमुळे मिळणारी सुखाची जागा; ब्रह्मलोक.

**पुण्यवान्-वंत** वि. सद्गुणी; सदाचरणी; नैतिक व धार्मिक गुण असलेला; पुण्यात्मा. [सं.]

**पुण्यश्लोक** पु. पुण्यकारक कृत्याने प्रसिद्ध असलेला मानव किंवा दैवी पुरुष; ज्याच्या नामस्मरणाने पुण्य लाभते असे संत, देवदेवता यांना योजले जाणारे विशेषण. [सं.]

**पुण्याई** स्त्री. १. पुण्याचा संचय; पुण्यसामग्री. २. (ल.) सामर्थ्य; वकूब. (वा.) ० **खर्चणे** – आटोकाट प्रयत्न करणे; शिकस्त करणे.

**पुण्याह** न. पुण्यकारक, पवित्र दिवस. [सं.]

**पुण्याहवाचन** न. १. स्वस्तिवाचन; विवाहादी मंगलकार्यात प्रारंभी केले जाणारे कर्म. २. (ल.) प्रारंभ; सुरुवात. [सं.]

**पुत** पु. पुत्र; मुलगा.[सं.पुत्र] (वा.) **बाबापुता करणे** – समजूत घालणे; गोंजारणे.

**पुतणी** स्त्री. पुरुषाच्या भावाची मुलगी; स्त्रीच्या दिराची मुलगी; ध्वाडी.

**पुतण्या** पु. पुरुषाच्या भावाचा मुलगा; स्त्रीच्या दिराचा मुलगा. [सं.पुत्रान्यक]

**पुतलिका** स्त्री. दैवताची मूर्ती.

**पुतळा–ला** पु. १. धातू, लाकूड,माती, दगड इ. चे पुरुषाकार बाहुले; प्रतिमा; मूर्ती वगैरे. २. गुणांचे आत्यंतिकत्व, मूर्तिमंतत्व दाखविण्यास योजतात. उदा. क्रोधाचा, प्रेमाचा, धर्माचा पुतळा. ३. तरवारीच्या मुठीचा परजेच्या बाजूचा पकडीत धरावयाचा भाग.[सं.पुत्तल, पुत्रक]

**पुतळी** स्त्री. १. दगड, लाकूड, धातू, माती इ. ची स्त्रीच्या आकाराची प्रतिमा, मूर्ती इ. २. पूर्वीच्या चलनातील एक सोन्याचे नाणे (या नाण्यांची माळ करतात); दागिन्यात घालतात तो सोन्या-चांदीचा वाटोळा व चपटा तुकडा : 'तूं मज पुतळीचा ठसा आवडसी कसा।' –होला ११५. ३. तलवारीचे टोक. ४. घोड्याच्या तळव्यावरचा नाजूक व मऊ शिंगासारखा उंचवटा. ५. दसऱ्याच्या दिवशी आपट्याच्या पानासाठी वापरला जाणारा शब्द. ६. डोळ्यातील बाहुली. ७. एक प्रकारचा मासा. ८. सुंदर स्त्री. ९. (विणकाम) काठातल्या नक्षीचा एक प्रकार. दुहेरी धाग्याचा अर्धा इंच आकाराचा चौकडा (चौकडा एकेरी धाग्याचा असतो). (बे.) [सं.पुत्तली]

**पुतळी** स्त्री. शेणी; गोवरी.

**पुतळी घर** कापडाची गिरणी. (ना.)

**पुती** स्त्री. संतान; अपत्य; मूल.
वि. संख्यावाचक शब्द मागे जोडून विशेषणाप्रमाणे उपयोग करतात. जसे :- एकपुती, सातपुती वगैरे. [सं.पुत्र]

**पुतो** पु. वरवंटा. (को.,राजा.)

**पुत्त** पु. १. पुष्य नक्षत्र. (गो.) २.पुत्र; मुलगा. (गो.) [सं.पुत्र]

**पुत्येण** न. एक प्रकारचे गवत.

**पुत्र, पुत्रक** पु. १. पोटचा मुलगा. २. दत्तक. ३. हिंदू धर्मशास्त्रात बारा प्रकारचे पुत्र सांगितले आहेत ते प्रत्येकी. [सं.]

**पुत्रकामेष्टी, पुत्रेष्टि–ष्टी** स्त्री. पुत्रप्राप्तीसाठी करावयाचा एक याग. [सं.]

**पुत्रजीव** पहा : **पुत्रवंती** २

**पुत्रराग** पु. (संगीत) संगीतातील एक राग. काही ग्रंथकारांनी भार्याराग, पुरुषराग, पुत्रराग असे वर्गीकरण केले आहे.

**पुत्रवंती** वि. १. मुले असलेली; विशेषत: औक्षणाच्यावेळी स्त्रियांकडून वापरला जाणारा शब्द : 'म्हणेति तूं होसिल पुत्रवंती।'– सारूह ८.९७. २. एक प्रकारचे झाड. या झाडाच्या बियांची माळ पुत्रवती स्त्रिया घालतात. या बियांना पुत्रवंतीचा मणी म्हणतात. [सं.पुत्र + वत्]

**पुत्रावण** न. सोळा संस्कारांपैकी एक संस्कार; पुत्रमुखावलोकनाचा विधी; जातकर्म. ह्यात नालच्छेदनापूर्वी मुलास सोन्याच्या स्पर्शाने युक्त असे तूप व मध देतात. [सं.पुत्र + अवन = रक्षण]

**पुत्रिका, पुत्री** स्त्री. १. कन्या; पोटची, स्वत:ची मुलगी; दुहिता; पुत्रस्थानी मानलेली कन्या. २. बाहुली; प्रतिमा. [सं.]

**पुत्रिकासुत** पु. बारा पुत्रातील दुसरा. मुलीचा मुलगा. हा ही औरसासारखाच असतो.

**पुत्री** वि. पुत्र असलेला; पुत्रवान. [सं.]

**पुत्रीकरण** न. १.दत्तक घेणे; पुत्र करणे. २. (ख्रि.) आपली कृपा दानरूपाने देण्याचा ईश्वराचा एक संकल्प. यामुळे उद्धारार्थ निवडलेल्या जनसमूहात ख्रिस्ती माणसांना प्रवेश मिळून देवाच्या पुत्राला जे अधिकार आहेत, त्या सर्वांवर त्यांचा अधिकार राहतो. (इं.) ॲडॉप्शन.

**पुत्रीय** वि. पुत्रासंबंधीचे; पुत्रविषयक. [सं.]

**पुत्रेषणा** स्त्री. १. पुत्राविषयी प्रेम, प्रीती, आदर इ. (अर्थ रूढीने आला आहे). २. पुत्रप्राप्तीची इच्छा.

**पुद(दा)डणी, पुदल(ळ)णी** स्त्री. निष्काळजीपणाने वापर, उपयोग, वागविणे; गुधडा.

**पुद(दा)डणे, पुदल (ळ)णे** उक्रि. गुधडणे; खराब करणे. (मनुष्य, प्राणी वस्तू इ.) निष्काळजीपणाने वापरणे, वागविणे, उपभोग घेणे. [सं.पुध्]

**पुद(दा)डा, पुदाला–ळा** पु. (मनुष्य, प्राणी, वस्तू इ. चा) बेफिकीरपणे; निष्काळजीपणाने वापर; उपयोग; उपभोग वगैरे.

**पुदरट** न. अत्यंत जीर्ण व फाटके वस्त्र.
वि. फाटका; मळका.

**पुदळ** वि. कोणत्याही कामाचा उरक नसणारा. (माण.)

**पुदाक–ख** स्त्री. उगीचचा त्रास; कटकट. (व., खा.)

**पुदिना, पुदाणा–ना** पु. तुळशीच्या वर्गातील एक वनस्पती. याच्या पानास तिखट ओव्यासारखा वास येतो. औषधी व चटणीसाठी उपयोगी. [बं.; फा.पूदिना]

**पुन** पहा: **पुन्हा**

**पुन** स्त्री. बाजू : 'आणि मध्यस्थान सोडोनि सविता । दक्षिणेचे पुनी उगवे सविता ।' – कथा ६.४.३४.

**पुनई–य–व** स्त्री. एक जंगली झाड; पुनर्नवा.

**पुनति–ती** क्रिवि. पुन्हा : 'जन्मौनि मरणें पुनति उपजणें । ऐसा जो संसृतिभ्रमण तो तोडिला ।'– ऋ २६.

**पुनरपि** क्रिवि. पुन्हा; वारंवार; वरचेवर; फिरून. [सं.]

**पुनरधिवास** पहा : **पुनर्वसन**

**पुनरा** वि. पूर्ण: 'पोटरिया केळी गाभ पुनरा सोडिले ।'– वसा ३८.

**पुनरागमन** न. एखाद्या ठिकाणी पुन्हा परत येणे. [सं.]
**पुनरावर्ती** वि. पुनः पुन्हा घडणारी; वारंवार होणारी.
**पुनरावृत्ति–त्ती** स्त्री. १. ग्रंथ पुन्हा पुन्हा वाचणे. २. उजळणी; पुन्हा करणे, घडणे. ३. पुनरागमन. ४. पुनर्जन्म : 'पैं पुनरावृत्तीचेनि उभडें । झळंबती सत्यलोकींचे हुडे ।'– ज्ञा ७.८०. [सं.]
**पुनरुक्त** वि. पुन्हा सांगितलेले; एकदा उच्चारिलेले (वाक्य). [सं.]
**पुनरुक्तदोष** पु. एके ठिकाणी सांगितलेला प्रकार किंवा विधी पुन्हा सांगणे. हा शास्त्रात वाक्यदोष सांगितला आहे. [सं.]
**पुनरुक्ति–क्ती** स्त्री. १. एकदा बोललेले वाक्य किंवा शब्द फिरून बोलणे; पुनरुच्चार. २. द्विरुक्ती ; अनुवाद. [सं.पुनर् + उक्ति]
**पुनरुज्जीवन** न. १. पुन्हा नवीन जीव आल्यासारखे ताजेतवाने वाटणे. २. बंद पडलेली गोष्ट पुन्हा सुरू करणे.
**पुनरुत्थान** न. १. पुन्हा उठणे; (ल.) जिवंत होणे. २. (ख्रि.) येशू ख्रिस्ताचे पुनरुज्जीवन. ३. (ख्रि.) मृतोत्थापन; मेलेली सर्व माणसे न्यायाच्या दिवशी पुन्हा उठणे. (इं.) रेझरेक्शन. [सं.]
**पुनरूढा** स्त्री. पहिल्या पतीचे निधन झाल्यानंतर पुन्हा लग्न केलेली स्त्री. [सं.पुनः + ऊढा]
**पुनर्ग्रहण** न. बंद पडलेला उपक्रम पुन्हा सुरू करणे.
**पुनर्जन्म** पु. १. दुसरा जन्म; आत्म्याचे एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जाणे. २. (ल.) मृत्यू येण्याजोग्या मोठ्या संकटांतून झालेला बचाव. ३. (ख्रि.) ख्रिस्तद्वारा नवीन व पवित्र मन प्राप्त होणे : 'पुनर्जन्म झाल्याविना । ख्रिस्तकृपा त्या कळेना ।'– उसं. १९७.
**पुनर्नवा** पु.स्त्री. एक औषधी वृक्ष; घेटूळी; खापरी. तांबडा व पांढरा असे दोन प्रकार.
**पुनर्भू** स्त्री. पुनर्विवाह झालेली, पाटाची स्त्री; पुनरूढा.[सं.पुनर् +भू]
**पुनर्वसन** न. १. जमिनी व घरेदारे वगैरेंना मुकलेल्यांना पुन्हा जीवन सुरू करण्यासाठी आवश्यक त्या सुविधा उपलब्ध करून देणे. २. शारीरिक किंवा मानसिक दृष्ट्या अपंग असणाऱ्या किंवा तुरुंगातून सुटलेल्या व्यक्तीला समाजामध्ये अगर कामाच्या ठिकाणी सर्वसामान्य रीतीने वावरता यावे म्हणून समुपदेशन, प्रशिक्षण किंवा उपचार इ. द्वारा केली जाणारी मदत किंवा अशा प्रकारची मदत करणे.
**पुनर्वसु,पुनवस** पु. स्त्री. सातवे नक्षत्र व त्याच्या तारका.
**पुन(ना)व, पुनीव, पुन्यो, पुन्योव** स्त्री. पौर्णिमा. [सं.पूर्णिमा]
**पुनवा** पु. घोडा : 'पडली पुनव्याची कामा.'– एहोरा ८.९.
**पुनश्च** क्रिवि. पुनः पुन्हा; पुनरपि; आणखी; वारंवार. [सं.]
**पुनीत** वि. पवित्र; शुद्ध; प्रायश्चितादिकांनी पावन झालेला. [सं.]
**पुनःसंधान, पुनःसंस्कार** न. पु. १. पुन्हा आवश्यक संस्कार करणे (पहिल्यात व्यत्यय आल्याने). २. गृह्याग्नी (गृहस्थाने विवाह झाल्यादिवसापासून धारण करण्याचा अग्नी) नाहीसा झाल्यास तो पुन्हा उत्पन्न करण्याचा विधी. कोणताही संस्कार चूक झाल्यामुळे पुन्हा करणे. ३. (ल.) कोणतेही आरंभलेले कार्य तडीस न जाता विसकटल्यामुळे पुन्हा मुळापासून करणे; त्यासाठी करावी लागणारी खटपट.

**पुन्हा–नः–न** क्रिवि. पुन्हा : 'पुन हे प्रकटली श्रीचक्रपाणी । तो कळसोद्धऊ।' – ऋ ३.
उअ. पण; परंतु : 'चांपेगोरटी आगें उघडी ठेंली पुन पडतीचि ना ।'– शिव ५५८. [सं.पुनः]
**पुन्नाग** पु. १. नागचाफा. २. उंडीण. [सं.]
**पुफवंती** स्त्री. रजस्वला : 'गोसावीयांची राणी पुफवंती जाली होती'– लीचपू २. [सं. पुष्पवंती]
**पुबरू** कापूस. (तंजा.)
**पुमंग** पु. फुलाचा नर घटक.
न. दलपुंजाच्या आतील मंडळ.
**पुमान** न. पुरुष. [सं.]
**पुयतण** न. एक प्रकारचे गवत. (को.)
**पुयशिरे** न. एक झुडूप; वेल चढविण्यासाठी उपयोगी येणारे (झुडूप).
**पुयाड** वि. कुजका; फुसका. (व.)
**पुर,पूर** न. १. नगर; शहर; मोठे गाव; लोकवस्तीचे ठिकाण. २. किल्ला. ३. घर. ४. अंतर्भाग. ५. शरीर : 'तें पुर त्यजीलें।'– लीच १.२. [सं.पुरम् ]
**पुर** क्रिवि. पूर्णपणे; पुरेपूरः 'पुर पालख्या तमाम केल्या फुन्ना।'– ऐपो १३९. [फा. पुर; सं. पूर्ण]
**पुरकणे** अक्रि. १.(लहान मुलाने) पुरकी वाजविणे; पुरपुर असा आवाज काढणे. २. एकदम व थोडेसे शौचास होणे; पिळकणे; चिरपणे.
**पुरखा–खी** पु. जुना माणूस; म्हातारा गृहस्थ.
वि. १. प्रौढ; वडील, वयस्क, मोठा : 'पडतां उरावर धनुष्य घेतला लज्जेचा बुरखा। तें रामानें सहज मोडिलें नसतां वीर पुरखा ।।' – पला ४२. २. अनुभवी; समंजसः 'शहाणे पुरखे अकलवंत हेवट म्हातारे बिनकाजी ।'– पला ६९.
**पुरखांब** पु. जमिनीत पुरलेला खांब. याउलट उथळ्यावरचा खांब.
**पुरचुं(चों)डी** स्त्री. अगदी लहान गाठोडी, मोटळी; वस्त्राच्या कोपऱ्याला गाठ मारून ठेवलेला लहान जिन्नस. [सं.पुर = चुडा]
**पुरजा–जे** पहा : **पुर्जा**
**पुरजारी** स्त्री. जप्त होऊन पुन्हा परत मिळालेले इनाम किंवा इनाम जमीन. [सं.पुरः = पूर्वी + अर. जारी = चालू]
**पुरजे पुरजे** पु. अव. तुकडे तुकडे.
**पुरड, पुरडली** वि. म्हातारी; जिची मुले मोठी आहेत अशी. (व.)
**पुरडैला** वि. पुरेसे खाल्लेला; ज्यास पूर्ण बळी मिळाला आहे असा : 'काळयवनाचा ॐ गरू। पुरडैला देतुसें ढेकरू ।'– शिव ४०.
**पुरढ(ढा)वणे** उक्रि. १. (मातीचे मडके इ. काही विशिष्ट कृतीने) मजबूत करणे, होणे; रापविणे. पहा : **निरढावणे**. २. (ल.) कोणत्याही व्यसनात पक्के गुरफटवणे, मुरविणे.
अक्रि. फार व्यसन लागणे; निरढावणे; मुरणे.
**पुरण** न. स्त्री. १.करंजी, पोळी, मोदक इ. खाण्याच्या पदार्थात चव, शिजवून वाटलेली डाळ, खवा इ. घालतात तो पदार्थ. २. सोन्याच्या पाटल्या, गोठ वगैरे पोकळ दागिन्यांत तांबे, रुपे इ. घातला जाणारा

हलका धातू. ३. कोणत्याही पदार्थाचा आकार मोठा करण्यासाठी आत घातले जाणारे (मिश्रण). ४. भिंत, जोत्याची आतील बाजू इ. मध्ये घालतात ती दगड, धोंडे, माती इ. भर. ५. नुकत्याच लावलेल्या रोपाभोवती घातली जाणारी माती, भर. ६. (सामा.) आत भरण्याची, समाविष्ट करण्याची वस्तू, क्रिया. [सं. पूरण]

**पुरणपोळी** स्त्री. चणाडाळ व गूळ यांचे गोड पुरण घालून केलेली गव्हाची पोळी.

**पुरणभरण** न. वरचेवर घातलेली भर; झाडाच्या मुळाशी घातलेली (मातीची) भर.

**पुरणावरणाचे** न. पाहुणे, देवधर्म, सण यासाठी नेहमीपेक्षा अधिक पदार्थ, पक्वान्ने इ.चा केलेला स्वयंपाक.

**पुरणी** स्त्री. १. (खांब, झाडे इ.) जमिनीत पुरणे; रोवणे; जमिनीत गच्च बसविणे. २. पहा : **पुरण** २-५. ३. दशा असलेले पागोटे (ज्याला मागाहून काठ लावता येतो). ४. सूत ताणण्याची लाकडी नळी. (कर.) ५. हाताचे किंवा पायाचे लांब हाड. (कर.) ६. रेशीम, दोरा यात मोती, मणी ओवण्याची कृती. (बडोदे) ७. साठा; पुरवठा; पुरवणी: 'केली मळमुत्राची पुरणी.'- भाए ७६२.

**पुरणीचा ऊंस** लावणी केल्यानंतर पाण्याशिवाय वाढीस लागून परिपक्व होणारा ऊस.

**पुरणीग(गा)र** पु. दागिन्यांची दुरुस्ती, पुरणी करणारा; पटवेकरी.(बडोदे)

**पुरणीपराटे** पु. अव. पराट्यातील एक प्रकार; बिरई पराटे. गृशि २.३४. पहा : **पराटा** .

**पुरणे** उक्रि. १. गाडणे; चीजवस्तू इ. जमिनीत ठेवणे, घालणे. २. (झाड, काठी, खांब इ.) जमिनीत माती घालून रोवणे; स्थिर राहील असे करणे. ३. पूर्ण, पुरा होणे; पुरे पडणे; बेताचा होणे : 'परी कायकीजें वांजटा । पूरीजत असे ।'- ज्ञा १३.५९. ४. संपणे; थांबणे : 'नातरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें काही नोहे ।'- ज्ञा २.६७. ५. समाधान होणे; पावणे; संतोषणे : 'ऐकोन पुरे गुरूचे कान ।'- मुआदि १७.१०९. ६. टिकणे : 'प्रियदार बंधु न पथीं पुरले...।'- मोमहाप्रस्थान २.२३. [सं. पूर् = भरणे, संतोषविणे]

**पुरत** क्रिवि. (विरू.) पुरते; पुरे आहेत.

**पुरतकाली** वि. पुरतकाल (पोर्तुगाल) देशातील कागद, भाषा, चाल इ.

**पुरता** वि. १. बेताचा; पुरेसा : 'पुण्यसामग्री पुरती। तयासीच घडे भगवद्भक्ती।'- दास २.४.२७. २. समग्र; संपूर्ण; व्यंग नसलेला. ३. पुरण्याजोगता; चालण्यासारखा. ४. निष्णात; निपुण. ५. संपन्न. क्रिवि. बरोबर; तंतोतंत; नक्की. [सं. पृ - पूर्त]

**पुरती** स्त्री. (बडोदे) पावती, पूर्तता करणे : 'भांडीं परत आलीं म्हणजे पुरतीचा शेरा करून...'- ऐरापुप्र २.१२०. [सं.पूर्ति]

**पुरतेपणी** क्रिवि. काही एक कमी न राहता पूर्ण होई असे (ऐकून घेणे, करणे.).

**पुरद्वार** न. (शहर, राजवाडा, देऊळ इ. चा) पुढचा दरवाजा; महाद्वार.

**पुरपुट** वि. १. मन:पूर्ण; समाधानकारक : 'आस नाही पुरपुटी : तरि कां न ठकावें पाठी' - शिव १९३. २. संतोषदायक : 'ना पुरपुटे होए मरण : जिणें ते सावियांचि दु:खा कारण' - नवि २२८.

**पुरपुराट** पु. विपुलता; समृद्धी; भरपूरपणा.

**पुरपुरे** क्रिवि. पुरे, आता नको, बस - याप्रमाणे (होणे, वाटणे).

**पुरभजनीया** पु. ईश्वरावताराला भोजन घालणारा (आठ प्रकारच्या भक्तापैकी एक) : 'आठाइ भक्तांसि माझे दंडवत : पुरभजनीयां इ.'- निलीपूजावसर ४.२३. [सं. पुर+भजन]

**पुरभय्या** न. १. उत्तर हिंदुस्थानी मनुष्य. २. हिंदूतील एक जात व तीतील व्यक्ती. पहा : **भय्या** [सं. पूर्व]

**पुरमगज** वि. पुरून उरण्याइतका; भरपूर. (व.)

**पुरमाशीण** स्त्री. (अप.) गरोदरपणाचे दिवस पूर्ण भरलेली स्त्री.

**पुरव** स्त्री. पुरेसेपणा; पुरवठा (एखादे कार्य, हेतू इ. साधण्यास); समाधान होण्यासारखा गुण. (क्रि. येणे).

**पुरवटेसार** वि. जितके पाहिजे तितके; विशिष्ट कार्याला पुरण्याइतके; विपुल; भरपूर; शेवटपर्यंत पुरणारे (अन्न इ.).

**पुरवठा** पु. १. पुरेसेपण; तोटा न येणे; भरपूर होणे; समृद्धी; विपुलता. २. समाधान; पुरतेपणा पावलेली स्थिती. (क्रि. घालणे, भरणे, येणे). ३. साठा; संग्रह; बेगमी; साहित्य. ४. (अर्थ.) मागणीप्रमाणे देणे; पुरे करणे; गरज भागवणे. ५. (स्त्रिया एकत्र गाणे गात असताना) एकीने दुसरीपासून घेतलेला, मागच्या शब्दापासून पुढे चालू केलेला गाण्याचा भाग. भेंडीसारखा एक प्रकार. ६. कप्पे असलेली पिशवी; बटवा. (कु.)

**पुरवणा** पु. थोर व्यक्ती व राजे यांचा इतिहास. [सं.पुराण]

**पुरवणी** स्त्री. १. पुरवठा; भर; समृद्धी : 'पुरवणी मानसी कीं । जिती आथी ।'- ज्ञा १३.५१२. २. कागद संपल्यामुळे दुसऱ्या कागदावर लिहिलेला मजकूर. ३. परिशिष्ट; पुस्ती; जोड. ४. पुराव्याने सिद्ध करणे; पाठपुरावा करणे. ५. उणीव भरून काढणे, त्यासाठी घातलेली भर. ६. (क्व.) नदीस आलेला पूर, लोंढा.

**पुरवणी** स्त्री. मोत्याची माळ.

**पुरवणी अर्ज-र्जी** पु.स्त्री. १. पूर्वीच्या अर्जाला जोड म्हणून केलेला नवीन अर्ज; न्यूनतापूरक अर्ज. २. काम चालवण्यासाठी वकिलाला पुरवलेली अधिक माहिती.

**पुरवणीगार** पु. मोत्यास भोके पाडून ती ओवणारा; पटवेकरी; पुरणीगार.

**पुरवणी परीक्षा** वार्षिक परीक्षेत अनुत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांची मागाहून घेण्यात येणारी परीक्षा.

**पुरवणीवाचन** न. स्थूल अभ्यासासाठी नेमलेल्या पुस्तकाचे वाचन.

**पुरवणूक** स्त्री. १. परिशिष्ट; पुरवणी; ग्रंथशेष. २. भर; पुरवठा; कमी असलेल्या भागाची पूर्तता.

**पुरवणे** अक्रि. १. व्यापणे; सामावणे; जेथे-तेथे हजर असणे : 'उपासना करूनिया पुढें । पुरवलें पाहिजे चहुंकडे ।'- दास १९.१०.८. २. परवडणे; पत्करणे; आवडणे; मान्य होणे : 'माजा घात पुरवला, तुज त्यांचा मात्र घात पुरवेना ।'- मोउद्योग ११.२१. [सं.पृ]

**पुरवं(गु)टा** पु. मलद्वार. (गो.)

**पुरवंडा-ढा** पु. मृदंगवाला; पखवाजजी : 'तैं कटीं कवळून मृदंगातें।

कुशल वाजवी पुरवंडा ।' - नव २०.१२४.

**पुरवार** स्त्री. (क्व.) पुराव्याने खरे करून दाखविणे.
वि. पुराव्यासहित. [गु.]

**पुरविणे** उक्रि. १. पुरवठा करणे; पुरेसे वाढणे; देणे. २. पुरेल अशा बेताने खर्च करणे; टिकविणे. ३. पुरेसे होणे; सबंध वेळ पुरणे. ४. पूर्ण करणे; पुरवणी लावणे; कमीपणा भरून काढणे. ५. समजाविणे. सिद्ध करणे. ६. कडे लक्ष लावणे; देणे : 'परमेश्वरास पुरवी मन ।'-दावि २८२. ७. धरणे; बाळगणे : 'धीर न पुरवे कवणाही प्रस्तुत ।'- दावि २१८.

**पुरव्या** वि. १. पुरविणारा; पुरवठा करणारा. २. सेवा, चाकरी करणारा; उपयोगी पडणारा.

**पुरशिदा** स्त्री. चौकशी; विचारणा. पहा : **पुरशीस**

**पुरशी(सी)स** स्त्री. १. चौकशी; विचारणा; मुख्य तपासणी: 'मौजे मजकूरचे मोकदमास बोलावून आणून पुरशीस केली.'- वाडबाबा २.४२. २. प्रश्नास दिलेला जबाब; जबानी : 'राजश्री मल्हार जगन्नाथ कारकून यांसी हुजूर आणून दरबार खर्चाची पुरसीस केली.'- थोमारो २.३३. ३. सर्व पक्षांचे म्हणणे विचारून लिहिलेला कागद; जबाबाचा कागद; कैफियत. (क्रि. घालणे, पाडणे, करणे, लावणे इ.). ४. अर्ज; सवाल : 'देवकुटे यांस पुरशीस केली.' – वाडसमा ३.६२. [फा. पुर्सिदन = विचारणा]

**पुरश्चरण** न. १. मंत्रसामर्थ्य मिळविण्यासाठी मंत्रशास्त्रात सांगितल्याप्रमाणे मंत्रांचे जपानुष्ठान करणे. २. (सामा.) अनुष्ठान; जप; पाठ; तप; आराधना. ३. निरसन : प्रायश्चित्त : 'हाडगदलेयां पापां पुरश्चरण होए' – लीचपू २२१. [सं.]

**पुरसॉ** वि. लठ्ठ; स्थूल मनुष्य. (गो.) [सं.]

**पुरस्करणे** उक्रि. १.पुरस्कार देणे; साहाय्य करणे. २. सन्मान करणे; शाबासकी देणे; बक्षीस देणे : 'ऐसें पुरस्करोनि श्रीहरी । आदरिलें बोलें ।'- ज्ञा ९.२३८. ३. सावध करणे. [सं.पुरस्कार]

**पुरस्कर्ता, पुरस्कारी** पु. १. चालना, उत्तेजन देणारा; पुरस्कार करणारा; पुष्टी देणारा; पक्षपाती; साहाय्यक. २. पुढारी; म्होरक्या; कारभारी; व्यवस्थापक; संचालक. [सं.पुरस् + कर्ता - करी]

**पुरस्कार** पु. १. पुढे नेणे, करणे; चालना, पुष्टी देणे; पुढे ढकलणे. २. पुढाकार; (एखादे कार्य) अंगावर घेणे, चालविणे; व्यवस्था पाहणे. ३. सन्मान; प्रशंसा; सत्कार : 'या ग्रंथाचा त्यांनी पुरस्कार केला. '- के १७.५.३०. ४. बक्षीस; साहाय्य.

**पुरस्त** स्त्री. ईश्वरावताराच्या शरीरात व्यापलेली शुद्ध माया : 'पुरीं पुरस्तेसी अभिमानु' - मूप्र १०५४. [सं. पुरस्थ]

**पुरस्तुरग** पु. कोतवाल.

**पुरस्सर** वि. १. मुख्य पुढारी; अग्रेसर. २. पुढे जाणारा, सरणारा : 'पुरस्सर गदासवें झगडितां तनू भागली ।'- केका ४६. ३. (समासात) सहित; पूर्वक. उदा. बुद्धिपुरस्सर; हेतुपुरस्सर इ. [सं.पुरस् + सृ]

**पुरळ–ळा–ळी** पु. पित्तादी विकृतीमुळे अंगावर येणाऱ्या पुटकुळ्या; (क्रि. येणे, उठणे, निघणे) बारीक फोड.[सं.पूलक; क.पुरे = फोड]

**पुरंध्री** स्त्री. मुले, पती असलेली स्त्री. [सं.]

**पुरा** वि. १. पुरता; पूर्ण कमीपणा नसलेला; निर्दोष; अव्यंग : 'उणा पुरा यासीं नाहीं कोणी ठाव।'- तुगा २२. २. पूर्ण झालेला; संपविलेला; साध्य केलेला. ३. निष्णात; निपुण; पक्का; कुशल; पारंगत : 'धनवंत रत्नपारखी पुरा । तेणें धुळीमाजीं देखिल्या हिरा ।'- एभा ९.४९७. ४.पुरेसा; बेताचा; पाहिजे तितका.
क्रिवि. १. पूर्णपणे. २. कुशलतेने; भरपूरपणे; पुरतेपणी.[सं.पूर] (वा.) ० **करणे** – १. पार पाडणे; अमलात आणणे (कोर्टाचा हुकूमनामा, खटला, निकाल इ.). २. शेवट करणे; नायनाट करणे; खलास करणे. ० **जाणे** – थकणे; दमणे. (गो.)

**पुरा** पु. १. शहराची पेठ, भाग, मोहोल्ला. २. उपनगर; सभोवतालचा प्रदेश; टापू. [सं.पूर]

**पुराड–ट** न. नदीच्या पुराबरोबर वाहत आलेले गवत, लाकडे, पाने, केरकचरा इ. : 'पुरीं पुराडें भेटलीं।'- ग्रंथराज ७५.

**पुराण** न. १. प्राचीन इतिहासपर व चरित्रपर काव्यग्रंथ. ह्यात सृष्टीची उत्पत्ती, स्थिती व लय, देव-दानव, राजे-ऋषी आदींच्या कथा, पराक्रमवर्णने, वंशावळी इ. माहिती आहे. पुराणांना पाचवा वेद म्हणतात. हे एक धार्मिक वाङ्मय असून पुराणांची संख्या अठरा आहे.२. (ल.) चऱ्हाट; कंटाळवाणी गोष्ट.
वि. पुरातन; जुनाट; प्राचीन. [सं.]

**पुराण–णी–णे** न.स्त्री. बैलास हाकताना त्याला टोचण्याकरिता टोकास अणीदार खिळा, आर इ. बसविलेली काठी; चाबूक; पराणी. (खा.,व.)

**पुराणपुरुष** पु. १. ईश्वर : 'किंवा पुराणपुरुषा संप्रति बहु भागलासि या कामीं।'- मोसंशयरत्नमाला १९. (नवनीत ३५०). २.(ल.) जुन्या तऱ्हेचा, अगदी म्हातारा माणूस.

**पुराणवैराग्य** न. पुराण ऐकत असताना जगाच्या फोलपणाबद्दल वाटणारा तिटकारा; संसारासंबंधी नावड; विरक्ती; धर्मोपदेशामुळे वाटणारा तात्पुरता पश्चात्ताप. [सं.]

**पुराणिक** पु. १. पुराणांचा अभ्यास केलेला; पुराणात पारंगत असलेला ब्राह्मण. २. देऊळ इ. जाहीर ठिकाणी पुराण वाचून त्याचा अर्थ सांगणारा; पुराणावर चरितार्थ चालवणारी व्यक्ती.
वि. जुना; पुरातन : 'तंव कोणे एके काळीं। कंबल अश्वतर पाताळीं। पुराणिक शेषाजवळीं । असती दोघे भुजंगा ।'- कथा ५.६.१०९. [सं.पौराणिक]

**पुराणोक्त** वि. पुराणात सांगितलेला (मंत्र, स्तोत्र, उपदेश इ.); पुराणांच्या आधारे केलेले (कर्म, संस्कार इ.).[सं.पुराण + उक्त]

**पुराणोक्त कर्म–संस्कार** वेदाधिकार नसणाऱ्यांचे पुराणांच्या वचनाप्रमाणे केले जाणारे संस्कार.

**पुरातत्त्वविद्या** स्त्री. इतिहासपूर्वकालीन अवशेष शोधणे, त्यांचा अभ्यास करणे व प्राचीन काळाच्या इतिहासजुळवणीस मदत करणे अशा गोष्टींचा समावेश असलेली ज्ञानशाखा; पुरातत्त्वशास्त्र.

**पुरातन** वि.जुना; प्राचीन; पूर्वीचा; जुन्या काळचा. [सं.]

**पुरातन पाया** विश्वाचे मूलस्थान.

**पुराभिलेख** पु. जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांचा संग्रह.
**पुरारणे** अक्रि. भरणे; व्यापणे; परिपूर्ण असणे : 'वीरश्रीनें अगदीं पुरारलेले लोक. '- सूर्योदय ९९. [पूर द्वि.]
**पुरालेख** पु. दगड, मूर्तींचा चबुतरा, नाणी इ. वर कोरलेला मजकूर.
**पुराव-वा** पु.१. पुरवठा; पुरविण्याचा व्यापार : 'करूनि पुरावा कृष्णागरुकर्पुरादि पुण्यगंधाचा।'- मोअनुशासन ८.६५. २. पुरवणी; भर. ३. साक्ष; प्रमाण; आधार. ४. (कायदा.) चौकशी चालू असलेल्या गोष्टीबद्दल कोर्टासमक्ष साक्षीदाराने सांगितलेली हकिगत, हजर केलेला दस्तऐवज. ५. मदत; साहाय्य; कुमक; पाठबळ : 'याणीं ठिकाणीं राहूनच फौजेंचा पुरावा करावयाचा होता.'- भाब ११०. [सं.पृ]
**पुरि(रु)मेंत** पुरवठा; बेगमी. (गो.) [पोर्तु. प्राव्हिमेंतो]
**पुरी** स्त्री. १.नगरी; लहान शहर. २. पवित्र नगर; क्षेत्रस्थान (हिंदू धर्मात अयोध्या, मथुरा, माया इ. सात पुरी मानल्या जातात). ३. चार धामे व त्यातील प्रत्येक. उदा. जगन्नाथपुरी.
**पुरी** पु. दसनाम गोसाव्यांचा एक वर्ग. [सं.]
**पुरी** स्त्री. १. गव्हाचे पीठ, मैदा, रवा भिजवून गोल लाटून, तेला-तुपात तळलेला पदार्थ; एक पक्वान्न. २. पुरणपोळी. (रवा.) [सं.पूरक]
**पुरी** स्त्री. पुरवठा; पूर्तता; पुरतेपणा. (क्रि. करणे, पडणे, पाडणे इ.). वि. परिपूर्ण; तृप्त :'मनपवनाची खीच पुरी । वादूनियां ।'- माज्ञा १८.१०४०.
**पुरी ताजीम** पाहुणा भेटावयास आला असता किंवा भेटून परत जाताना त्यास उभे राहून दिलेला मान.
**पुरीश** पु. नगराध्यक्ष; शहराचा मुख्य; पुराधिकारी. [सं.]
**पुरीष** पु. विष्टा; गू; शेण. [सं.]
**पुरुष** पु. १. ज्याच्या अंगी प्रजोत्पादनबीज आहे असा मनुष्यप्राणी; नर. २. वयात आलेला माणूस; बाप्या. ३. फळझाडामधील नर; ज्या झाडात पुंकेसर असतात ते झाड. ४. (व्या.) पुरुषवाचक लिंग; पुल्लिंग. ५. (व्या.) वक्ता, श्रोता व उक्तविषय असे सृष्ट व्यक्तीचे जे तीन प्रकार केले जातात, त्यास लावली जाणारी 'पुरुष' ही संज्ञा. प्रथम-द्वितीय-तृतीय पुरुष असे. ६. साडेतीन हात उंचीचे प्रमाण. ७. पिढी; पिढीची एक व्यक्ती; पिढीतील पूर्वज. ८. पती; नवरा : 'तुझा जन्म कवणें वंशीं। पुरुष तुझा कोण सांगे।'- गुच ३५.२४१. ९. ज्ञाता, जाणणारा, उपभोग घेणारा माणूस. १०. जगताच्या उत्पत्तीस प्रकृतिसमवेत कारणीभूत व्यक्ती : 'प्रकृति आणी पुरुष । यां दोहींस जेथें निरास ।'-दास ९.२.३९. ११. (सांख्यदर्शन) आत्मा; क्षेत्रज्ञ. १२. मूळ पुरुष. (गो.) १३. महारांचा देव.(राजा.) [सं.]
**पुरुषगाठ** स्त्री. चाडेगाठ; बोटात घालावयाच्या सोन्याच्या पवित्रकावर असते तशी गाठ.
**पुरुषग्रह** (फ.ज्यो.) रवी, मंगळ, गुरू, हर्षल हे पुरुष मानलेले ग्रह.
**पुरुषत्व** न. १. पुरुषाच्या ठिकाणी प्रजोत्पादनाविषयी उपयुक्त असणारी शक्ती; वीर्य. २. (ल.) सामर्थ्य; शौर्य; पराक्रमाचा उत्साह : 'वृषकेतूचें पुरुषत्व पाहोन । डोलवी मान आनंदें।'- जै १८.७७. ३. (व्या.) पुल्लिंग. [सं.]
**पुरुषभाव** पु. (फ.ज्यो.) जन्मकुंडलीतील विषम क्रमांकाची भावस्थाने.
**पुरुषवाचक** न. (व्या.) सर्वनामाचा एक प्रकार; मी, तू, तो इ. जातीचे सर्वनाम; याचे प्रथम, द्वितीय, तृतीय (पुरुष) असे प्रकार आहेत.
**पुरुषाकार** पु. शौर्य; पराक्रम; पुरुषत्व : 'तुझा जाणे पुरुषाकारु ।' - उषा १४३८.
**पुरुषाद** वि. नरभक्षक; नरमांसभक्षक. [सं.]
**पुरुषार्थ** पु. १. पुरुषाने साधावयाच्या चार गोष्टी; कर्तव्ये; धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष; पुरुषाच्या इच्छेचा विषय; ईप्सित वस्तू. २.धाडस; पराक्रम; शौर्य.
**पुरुषार्थराज** पु. मोक्ष : 'म्हणोनि करावा स्वधर्मु । तो करितां हिरोनि घे श्रमु । उचित देईल परमु । पुरुषार्थ राजु ।'- ज्ञा १८.९४९.
**पुरुषार्थी** वि. धर्म, अर्थ, काम, मोक्ष यापैकी कोणताही एक पुरुषार्थ साधण्याविषयी प्रयत्न करणारा. [सं.]
**पुरुषांतर** न. एक पिढी.
**पुरुषोत्तम** पु. १. उत्तम पुरुष; पुरुषश्रेष्ठ; २. परमात्मा; विष्णू : 'व्याप्युमी व्यापकु । पुरुषोत्तमु मी।'- ज्ञा १८.११९८.
**पुरुषोत्तममास** पु. अधिकमास; मलमास; धोंड्याचा महिना (हा दर तेहतीस महिन्यांनी येतो).
**पुरुख** पु. महारांचा देव. (राजा.)
**पुरे, पुरेपुरे** क्रिवि. १. पुरेसे; पुरेपूर. २. बस्स; बसबस : 'वसवा पुरें पुरे कां म्हणतां धनवंत कण कसा वेंची ।'- मोसंशयरत्नमाला २६. (वा.) ०करणे - त्रासवून, भंडावून सोडणे.
**पुरे** न. मूर्खपणा : 'म्हणोनि मागील जे अध्याय । ते चढते भूमीचे आय। तयांचें पुरें दाविताहे । आपुल्या आंगीं। - ज्ञा १८.४२. पहा : **पुरा**
**पुरेजात** पु. अव. पुरे; पेठा; शहरातील भाग : 'राजश्रींनीं परलोकसाधन करितांच तमाम पुरेजात व कारखाने व राजमंदिरीं चौक्या ठेऊन बदोबस्त केला.'- ऐटि १.६५.
**पुरेपूर** क्रिवि. पुष्कळ; भरपूर; विपुल.
**पुरोटा, पुरोटेसार** वि. पुरवटा-ठा. पहा : **पुरवटेसार**
**पुरोडाश** पु. १. इष्टि, यज्ञ इ. श्रौतकर्मात देवतांना हवी देण्याकरिता तांदळाचे पीठ तुपावर भाजून त्यात गरम पाणी ओतून घट्ट झालेल्या पिठाचा कासवाच्या आकाराचा केला जाणारा गोळा; हविर्द्रव्य. २. सातूच्या पिठाचे गाकर ज्या तुपात बुडवून हवन करतात ते तूप. ३.यज्ञात हवन केल्यानंतर शिल्लक राहणारा भाग : 'मग आत्मबोधींचें सुख । जें संयमाग्नीचें हुतशेष । तोचि पुरोडाशु देख । घेतला तिहीं।'- ज्ञा ४.१३९. [सं.]
**पुरोधा** पु. उपाध्याय; पुरोहित. [सं.]
**पुरोबंध** पु. तारण वस्तू परत मिळविण्याचा हक्क सोडून देण्यासंबंधीची प्रक्रिया.
**पुरोभागी** वि. व्यवस्थापक; देखरेख करणारा; पुढारी. [सं.]
**पुरोवर्ती** वि. समोर उभा असणारा; पुढे असणारा. [सं.]
**पुरोहित** पु. १. यज्ञयाग, धार्मिक विधी इ. धर्मकृत्ये यजमानांकडून यथासांग रीतीने करवून घेऊन, त्याच्यावर देवाची कृपा संपादन करू

इच्छिणारा वर्ग किंवा त्यातील व्यक्ती. २. कुळाचा उपाध्याय, कुटुंबातील सर्व धर्मकृत्ये चालविणारा भिक्षुक. [सं.]

**पुरौंचे** उक्रि. लिंपणे; पुरणे. (गो.)

**पुर्कस** पु. लढाई; तंटा; बखेडा : 'तरी पुर्कस-बखेडा पडल्यास खावंद प्रतापी आहेत.'- ऐटि ३.४२. [फा.पुर्खाश]

**पुर्गतोर-री** स्त्री. मरणानंतर जेथे आत्म्याला पापापासून मुक्तता मिळते असे ठिकाण किंवा स्थिति. (गो.) (इं.) पर्गेटरी. [पोर्तु.पुर्गातोरिओ]

**पुर्गुंटली** स्त्री. अंगाची कवळी; फुरंगटून बसणे. (गो.)

**पुर्जा** पु.१. कागदाचा तुकडा: ' सर्व घर शोधून कागदाचा पुर्जा न् पुर्जा घरांतून वोढून काढून सरकार कचेरींत न्यावा.' - इनाम ६२. पहा : **पुरजा**. २. कागद; लेख; पत्र: 'तरी आम्ही यांस दरम्यान होऊन पुर्जा दिल्हा होता.' - पेद २०.१०१. ३. दस्तऐवज; खत.

**पुर्ती** स्त्री. पाण्याच्या प्रवाहातून वाहून आलेली माती; झाडाला घातली जाणारी माती, गाळ. (गो.)

**पुर्भा** पु. पहा : **पुरभय्या** : 'गढींत मासे शिरले। मराठे मोंगल पठाण पुर्भे इतर घरोघर भरले ।'- ऐपो २२४.[म. पुरभय्या; हिं. पुर्बिया]

**पुर्या** स्त्री. पूर्वा; संगीतातील एक राग. [सं.]

**पुर्वस** पु. मूळ पुरुषाच्या नावे स्थापन केलेली देवता. (कु.)[सं.पूर्ववंश]

**पुर्शि(र्सि)दा** स्त्री. चौकशी; विचारणा :'सांप्रत पुन्हां सरकारात पुर्सिदा जाली.' - दिमरा २.१८२. [फा.पुर्सीदा]

**पुऱ्हाणे** न. बैलास टोचण्याची आर; टोचणी; पराणी. पहा : **पुराणी-णे**

**पुलक, पुलकांचन** पु.न. रोमांच; (भय, आनंद, शीत इ. मुळे) अंगावर उभा राहिलेला काटा : 'पोषी जशी पति शुभाऽशुभ-भव-मुदऽमुद्रें पुलक लंका ।'- मोसभा ७.२५. [सं.]

**पुलकस, पुलक्स** वि. चांडाळातील निंद्य दर्जाचा.

**पुलका** स्त्री. अश्वाच्या पाच गतींपैकी एक गती.

**पुलकांकित, पुलकित** वि. रोमांच उठलेले (शरीर).

**पुलन** न. (जखम, गळू इ. मध्ये) पू उत्पन्न करणारा, विकारवर्धक खाद्यपदार्थ.

**पुलबंदी** स्त्री. १. पुलाची बांधणी. २. पुलाची रचना, मांडणी. ३. धरण; धक्का; बंधारा. [फा. पुल् + बंदी]

**पुलस्ती** स्त्री. पोलीस; पोलीसठाणे.(ना.)

**पुला** पु.स्त्री. (गवत, चारा, कडबा इ. ची) पेंढी; गठ्ठा; भारा: 'वैरण चोवीस-पंचवीस पुले अशी महागाई.'- भाब १४. [हिं. पूला; सं.पुल् = गोळा केले जाणे]

**पुलाव-वा** पु. मांसमिश्रित वा भाज्यामिश्रित मसालेदार भात; बिर्याणी; मुस्लिम संस्कृतीतील महत्त्वाचा खाद्यपदार्थ. [सं.पल्लान्न]

**पुलांवचे** उक्रि. (फोडफोडून) पू काढणे; पहा : **पुलेजणे** (गो.)

**पुलिका** स्त्री. १. कण; बिंदू : 'पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां।' - ज्ञा १८.१५५३. २. ज्याचा त्याचा धर्म.

**पुलिन** न. १. नुकतेच तयार झालेले बेट; नुकताच उघडा पडलेला नदीतील खडक २. वाळवंट. पहा : **पुळ(ळी)ण**.

**पुलिंद** पु. एक जंगली, रानटी मनुष्यजात; त्यातील व्यक्ती.

वि. अशुद्ध, ग्राम्य, बीभत्स भाषा बोलणारा.

**पुली** स्त्री. (गवत-कडब्याची) लहान पेंडी; पुला याचे अल्पत्वदर्शक रूप. [हिं.पूली]

**पुली** स्त्री. (यंत्र.) कप्पी; खोबणीचे चाक. जड, वजनदार वस्तू उचलण्याचे माध्यम. [इं.]

**पुलेजणे, पुलेणे, पुल्याणे, पुवळणे, पुवारणे** अक्रि. (जखम, फोड इ. तून) पू वाहणे; पुवाने युक्त होणे. [सं.पूय्]

**पुल्याण** न.पू उत्पन्न करणारे खाद्य (पावटा, हरबराडाळ इ.). (कु.) पहा : **पुलन**

**पुल्ला-ल्ली** पु.स्त्री. जुडी; पेंडी; पुला :'गोविंदराव बुंदेले अग्नीचा पुल्ला गेला होता रस्त्यावर।'- ऐपो १३३. पहा : **पुली**

**पुल्लिंग** न. (व्या.) ज्या नामामुळे प्राणिवाचक किंवा अप्राणिवाचक पदार्थांच्या पुरुषत्वाचा बोध होतो ते नाम. पहा : **लिंग**
वि. पुल्लिंगी; पुरुषवाचक. [सं.]

**पुल्हो** पु. पेंढा; जुडगा; ढीग : 'कस्तुरीचा पुल्हो चिवडौनी ।'- शिव ७६१. पहा : **पुला**

**पुवा** पु. १. एक प्रकारची भाकरी. २. मऊ, सुग्रास अन्न; मालपुवा. [हिं. पुआ; सं. अपूपः]

**पुवाळणे** अक्रि. १. चुचकारणे; शांत करणे (घोड्याला) : 'घन थीरू भणतु । खाखांळियां तें पुवाळितु । उपलानें निगालें वरवंतु। हाटांमाजि।'- शिव ५०३. २. जखमेत पू होणे.

**पुवो** स्त्री. पूर्वा नक्षत्र. (गो.)

**पुशी** स्त्री. १. (विरू.) (को.) पहा : **पिसू** . २. भोपळ्यातील कीड. (गो.) [फा. पश= पिसू]

**पुशी** स्त्री. प्रश्न; चौकशी; विचारपूस. (क्रि. घालणे) : 'देउळाच्या कळशीं नांदे एक ऋषी । तया घातली पुशी योगेश्वरी ।'- मुक्ताबाई ४१.

**पुश्तू** पहा : **पुस्तू**

**पुष्कर** न. १. अजमीराजवळचे एक तीर्थ. हल्ली त्यास पोखर म्हणतात. २. हत्तीच्या सोंडेचे अग्र. ३. एक औषधी; पोखर. ४. निळे कमळ. ५. सप्तद्वीपांपैकी एक. पहा : **द्वीप**. ६. तळे; सरोवर; तलाव. ७. आकाश; अंतराळ : 'तिरस्कारसंस्कार लावोनि रामीं। निघे पुष्करीं दुष्कराचार कामीं।'- मुरामा ३.६६. ८. एरंड : 'पाड कां जैसा हरिचंदना । पुष्करेसीं।'- ऋ ४७.
पु. राजलक्षणी घोडा; घोड्याचा एक प्रकार.

**पुष्करवाद्य** न. चर्मवाद्य.

**पुष्कराग-ज** पु. एक प्रकारचे रत्न. पिवळ्या, पांढऱ्या अशा रंगाचे असून त्याच्या कारटंक, इंद्रनील, सोमलक अशा पोटजाती आहेत.

**पुष्करि(र)णी** स्त्री. १.(विशेषत: कमळे असलेले) बांधीव लहान तळे, हौद. २. पायऱ्या असलेली मोठी विहीर. [सं.पुष्करिणी]

**पुष्कलज्ञान** न. मन आणि चैतन्य यांची समरसता.

**पुष्कळ-ल** वि. १.भरपूर; रगड; विपुल; असंख्य; अतिशय. २. विशाल; मोठे : 'जें कृश ना पुष्कळ । जें वक्र ना वर्तुळ ।'- एभा ३.६७७. ३. श्रेष्ठ; उच्च : 'ऐसें करितां अनुसंधान । चैतन्यीं समरसे

मन । त्यातें म्हणिजे पुष्कल ज्ञान । उपदेश पूर्ण या नांव ।'- एभा २९.४३९. ४. हितकर; फायदेशीर; चांगले : 'जें मुळींचि चंचल । तें कदा नव्हे पुष्कळ । क्षणां भासे क्षणां चपळ । तेणें तळमळ साधकां ।'- एभा ९.४०४. [सं. पुष्कल]

**पुष्ट** वि. १.लठ्ठ; मांसल; स्थूल; गुबगुबीत. २.पोसलेला; वाढविलेला; पोषण केलेला. ३. पुष्कळ; भरपूर. (गो.) [सं. पुष् = पोसणे]

**पुष्टगंड** वि. १. फुगीर गालांचा. २. (ल.) ताठा धरणारा : 'ऐसा मान्यतेचा पुष्टगंडु । तो अभिमानी परम लंडु ।'- ज्ञा १६.२३६.

**पुष्टि-ष्टी, पुष्टाई** स्त्री. १. पोषण झाल्यामुळे आलेली शक्ती; लठ्ठपणा, मांसलपणा; स्थूलता; गुबगुबीतपणा. २. परमेश्वराचा अनुग्रह, कृपा. ३.(ल.) दुजोरा; पाठबळ; पाठिंबा; पाठपुरावा. ४. वाढ; भरभराट; उन्नतावस्था; प्रगती. [सं. पुष्टि]

**पुष्टिपत्र** न. १. पुस्तक खराब होऊ नये म्हणून घातलेला जाड पुठ्ठा. २. पोथीच्या किंवा ग्रंथाच्या खाली-वर घालता येईल असा सुपारीच्या विरीचा दुमडलेला तुकडा. ३. (सामा.) कोणत्याही पुस्तकाचे जाड आवरण. (इं.) कव्हर. ४. लिहिताना कागदाखाली घेतलेला जाड आधार; पुठ्ठा. ५. दुजोरा; पाठिंबा; मदत. (क्रि. देणे). ६. दुजोरा देणारा; मदतनीस; साहाय्यक. [सं.]

**पुष्टिरक्षक** वि. शक्तिवर्धक. (व.) (प्र.) पौष्टिक. [सं.पौष्टिक]

**पुष्टीविन्यास** पु. समाधानी अवस्था. - एभाको.

**पुष्टे** न. शेपूट. (व.)

**पुष्तपन्हा** वि. मदतनीस; सहकारी. - राव्य ८.९४. [फा.पुश्त्+पनाह]

**पुष्प** न. १. फूल. २. स्त्रियांचा विटाळ; स्त्रीरज; आर्तव; ऋतू. ३. डोळ्यांचा एक रोग; फूल. ४. गर्भाशय; गर्भकोश. [सं.] (वा.) ० **ठेवणे** - दोष काढणे; नावे ठेवणे.

**पुष्पक** न. डोळ्यांतील फूल; वडस.

**पुष्पक** पु. न. कुबेराचे विमान.

**पुष्पकोश** पु. फुलाच्या बाहेरील हिरवे आवरण.

**पुष्पचक्र** न. पाश्चिमात्य पद्धतीप्रमाणे मृतदेहावर, थडग्यावर ठेवण्याचे फुलांचे चक्र.

**पुष्पण** न. फुलांचा बहर.

**पुष्पद्रव** पु. फुलांमधील मध.

**पुष्पधरी, पुष्पवती** पु. जयदत्तांनी सांगितलेल्या घोड्याच्या बारा प्रकाराच्या लगामांपैकी एक. - अश्वप १.१८५.

**पुष्पपण** न. मोठेपण.

**पुष्पपुट** न. (नृत्य.) पहा : **पुष्पांजलि**

**पुष्पबंध** न. (व. शा.) वनस्पतीचा फुले येणारा संपूर्ण (दांडा, पान व फूल) भाग.

**पुष्पमुकुट** पु. फुलाच्या रचनेतील पाच भागांपैकी एक.

**पुष्पयाती** स्त्री. अनेक प्रकारची फुले.

**पुष्परचनाशास्त्र** न. उत्सवप्रसंगी सभा-समारंभात करण्याच्या फुलांच्या रचनेचे, मांडणीचे शास्त्र.

**पुष्परेणु-णू** पु. फुलातील पराग.

**पुष्पवंती** स्त्री. रजस्वला. पहा : **पुफवंती**

**पुष्पवृष्टि** स्त्री. १. फुलांचा वर्षाव. २. (ल.) अस्खलित व अर्थपूर्ण भाषण किंवा वादविवाद. ३. (ल.) शिव्या, अपशब्द यांचा भडिमार. 'महाराजांची जांवई व शालकमंडळी राहिली त्यांच्यावर पुष्पवृष्टि पडत असते.'- विक्षिप्त १.६५.

**पुष्पसारा** पु. पराग; परिमल; सुगंध : 'नाना पुष्पांचिया उदरा । न येतां पुष्पसारा । आपणचि भंवरा । होआवें पडे ।'- अमृ ५.४२.

**पुष्पाधार** पु. देठावरील फुलाच्या खालचा फुगीर भाग.

**पुष्पासव** पु. फुलापासून काढलेली दारू.

**पुष्पास्तरण** न. शय्येवर फुले पसरण्याची कला; फुलांचा गालिचा करणे; चौसष्ट कलांपैकी एक. [सं.]

**पुष्पांजलि-जुळी** स्त्री. १. पूजेच्या शेवटी दोन्ही हातांच्या ओंजळीत घेऊन देवास वाहिली जाणारी फुले. २. (नृत्य.) उजवा हात सर्पशीर्ष करून त्याच्या तळहातावर डाव्या हाताची बोटे चिटकवून ठेवणे : 'ते रंगी उभी ठेली। सर्वेचि विचारें लागि केली । तेथ पुढां जुझे पुष्पांजुळि । खैवंगी मनकटाचां। - भाए ४५१.

**पुष्पे(ष्पै)ल** न. पुष्पतेल; फुलांपासून काढलेले सुगंधी द्रव्य; अत्तर : 'सुगंध पुष्पैलेकरूनी । चर्चिले कबरी मूर्धनी ।'- कृमुरा ७५.२.

**पुष्य** पु. १. सत्तावीस नक्षत्रांपैकी आठवे नक्षत्र (यात तीन तारा असतात); तिष्य. २.पौष महिना. [सं.]

**पुष्यार्क, पुष्ययोग** पु. रविवारी पुष्यनक्षत्रामध्ये चंद्र येतो तो काळ. [सं.]

**पुस** स्त्री. विचार; समाचार. (व.)

**पुस** न. पुच्छ; शेपूटः 'पुसीं आंखुडी दावणी कुजरांच्या । नभीं भोंवणीं दाविती मोवणीच्या ।'- मुरामा ६.११७. [सं.पुच्छ]

**पुसक** वि.वेडा; पिसा. (गो.)

**पुसकट, पुसट, पुसका** वि. १.(पुसले गेल्यामुळे) किंचित पुसका, अस्पष्ट; अंधूक. २. अस्पष्ट दिसणारा (पदार्थ, देखावा इ.).

**पुसकुयरी-ली, पुसकुंवरी-ली** स्त्री. पौष महिन्यात येणारा कोवळा, लहान फणस. [सं.पौष+म.कुइरी]

**पुसटणे, पुसकटणे** अक्रि. १. अक्षर, चित्र इ. पुसणे, स्वच्छ दिसणार नाही असे करणे. २. जोराने चोळणे, घासणे, पुसणे.

**पुसटता** वि. थोडासा; विस्ताराने नव्हे असा; ओझरता.

**पुसणारा,पुसता** वि. १. विचारणारा; चौकशी, वास्तपुस्त करणारा. २. विचारण्याचा किंवा रागावण्याचा ज्याला हक्क, अधिकार आहे असा.

**पुसणारी** स्त्री. कणकेला तूप किंवा तेल पुसून केलेली पोळी. (व.)

**पुसणे** उक्रि. १. विचारणे; प्रश्न करणे; चौकशी करणे. २.समाचार घेणे; वास्तपुस्त, आदरातिथ्य करणे. ३. आज्ञा मानणे; मान देणे; काळजी घेणे; आदर असणे. ४. तपास करणे. ५. बोलावणे. [सं.पृच्छ्] (वा.) **पुसता आकार, सोय नसणे** - विचारणे शक्य नसणे; विचारण्याची सोय नसणे (अतोनात, बेसुमार गोष्टींबद्दल नापसंती).

**पुसणे** उक्रि. १.(कागद, शरीर, वस्त्र इ. चा मळ कपड्याने) घासून नाहीसा करणे; साफ करणे; चोळून स्वच्छ करणे. २. नाहीसे होणे,

करणे : 'तें उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरणजन्म ।'- ज्ञा ९.४०४. ३. कोरडे करणे. ४. लिहिणे या क्रियापदाबरोबर निरर्थक योजतात. जसे :- त्याला लिहितां पुसतां येत नाही. [सं.स्पृश्]

**पुसणे** न. १. स्वच्छ किंवा कोरडे करावयाचे फडके. जसे :- नाक पुसणे, पाय पुसणे इ. २. तिखट घालून व तेल लावून केलेली पोळी. (व.)

**पुसलाणी** स्त्री. पौषात केलेली मेंढरांच्या केसांची कातरणी. (जुन्नरी)

**पुसवणे** न. उपचार; उपाय : 'एकैके वेळें जालें दुखणें । तैं आम्हीं केलें पुसवणें ।'- शिव ८१६, ८१८.

**पुसा** वि. पौष महिन्यासंबंधी.

**पु(पुं) सा** पु. पुरुष; मनुष्य : 'जयाचा भावार्थ जैसा । यास लाभ तैसा । मत्सर धरी जो पुसा । तयास तेंचि प्राप्त ।'- दास १.१.३८.[सं.पुस्]

**पुसाट, पुसाटी, पुसा** स्त्री. पुच्छ; शेपटी : 'रागें आपटोनि पुसाटी ।'- भाराकिष्किंधा ३.५१. [सं.पुच्छ; गु. पुछडी]

**पुसारा** वि. पोचट; माकलई; पोचारा. (तंजा.)

**पुसावर्त** पु. घोड्याच्या पुच्छाजवळचा भोवरा.[सं.पुच्छ + आवर्त]

**पुसी** स्त्री. १. प्रश्न; विचारणा; शंका : 'तया अध्यात्मशास्त्रांसीं । जैं साचपणाची ये पुसी । तैं येईजे जया ठायासी । ते गीता ।'- ज्ञा १८.१२३४. २. समाचार; शोध; तपास. (क्रि. करणे) : 'पुसी करितो विवरितो व्यापक त्रैलोक्याचा ।'- दावि १७१. ३. विचार; कल्पना : 'ऐसें बळीसि राज्य करितां। कंटक नाहीं पै सर्वथा । तंव पुसी आठवली बहुतां। दिवसी एक ।'- कथा २.६.९.

**पुसीचा** वि. विचारण्यास योग्य; जो विचारायला हवा होता तो; फार दिवसांचा मनातला : 'तुवां पुसिले पुसीचा प्रश्न। ऐक आतां।'- कथा २.६.३.

**पुस्त** स्त्री. १. गंजिफेची (पानाची) मागील बाजू. २. पाठ; पिछाडी. [सं.पृष्ठ]

**पुस्त** पु. पिढी; वंश : 'सन १७५० इसवी व सन १७९६यांचे दरम्यान जे दिल्हेले असतील ते दोन पुस्त चालवावे व तिसरे पुस्तास निम्मे पेनशन द्यावें.'-इनाम ३८.

स्त्री. पाठ; पिछाडी. [ सं.पृष्ठ; फा. पुश्त]

**पुस्त** स्त्री. (चर्मकार.) तजा; जोड्याची सागळ. पहा : **पुस्ती**

**पुस्तक** न. छपाई केलेला, एका बाजूने शिवलेला, पानांवर अंक टाकलेला, एका विषयाला वाहिलेला किंवा संग्रहित मजकूर देणारा, विविध आकारांचा ग्रंथ; पोथी; चोपडी. [सं.] (वा.) **पुस्तकावरून ओढणे**- वरवर वाचणे; कोणत्याही विषयाचे अर्धवट ज्ञान असणे.

**पुस्तकडाक** स्त्री. छापील मजकुराच्या अनेक प्रती सवलतीच्या दराने पाठवण्याची पोस्टाने केलेली सोय; खुली डाक; पुस्तकप्रेष; (इं.) बुक-पोस्ट.

**पुस्तकपाठ** वि. पुस्तकावरून सहज वाचता येईल किंवा समजावून सांगता येईल अशा तऱ्हेने माहिती असणे; पोथीपाठ.

**पुस्तकपानट, पुस्तकपानरट** न. पोथ्या, पुस्तके, कागदपत्रे इ.

**पुस्तकपालन** न.संस्थेचा जमाखर्च, ताळेबंद विशिष्ट तऱ्हेने लिहून ठेवणे; (इं.)बुककिपिंग.

**पुस्तकपेढी** स्त्री. १. पाचवी ते दहावीपर्यंत शिकणाऱ्या मुलांना क्रमिक पुस्तकांचा संच कर्जाऊ स्वरूपात देण्याची शासकीय योजना. २. पुस्तकांच्या दुकानात थोडा वेळ पुस्तक घेऊन वाचत बसण्यासाठी केलेली व्यवस्था.

**पुस्तकालय** न. ग्रंथालय.

**पुस्तगारी** पहा : **पुस्तपना**

**पुस्तधान** न. पुस्तकांचे कपाट.

**पुस्तधानी** स्त्री. उघड्यावर, स्टेशनसारख्या जागी असणारे पुस्तकांचे छोटेखानी दुकान.

**पुस्तपना-पन्हा-पन्हाई** पु. मदत; टेका; आश्रय; कुमक; पाठराखण; पाठपुरावा (क्रि. करणे, देणे, ठेवणे) : 'धोंडजी लवंडे तुम्हास लिहून पाठवितील त्या प्रमाणे पुस्तपन्हा करणे.'- दुसरे बाजीराव ७५. [फा. पुश्तपनाह]

**पुस्तपास-स्त** स्त्री. विचारपूस; शोध; बारकाईने केलेली चौकशी; वास्तपुस्त (क्रि. करणे, घेणे.) : 'ज्यांची चोंहोंकडे मानमान्यता व्हावी त्यांची फारशी पुस्तापास्तहि न होऊन ते कोनाकोपऱ्यांत कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडतात.'- नि १३.

**पुस्तवानी-णी** स्त्री. पाठिंबा; आधार; आश्रय; मदत.(क्रि. करणे; देणे): 'या उपरी साहेब लष्करची पुस्तवानी फौज उत्तम व दारु.' - पेद ३.१२६. [फा. पुश्त् + प्र. वानी]

**पुस्तंग** पु. १. पोटाखालून जाणारा घोड्याच्या खोगिराचा तंग. २. (मल्लविद्या) एक डाव. [फा. पश्तंक्]

**पुस्तिका** स्त्री. लहानसे पुस्तक.

**पुस्ती** स्त्री. १. मुलांचे अक्षर कितपत सुधारले हे पाहण्यासाठी ठरावीक दिवसांनी त्यांच्याकडून लिहून घेतला जाणारा खर्डा, कागद; अक्षराचा नमुना. २. (ल.) काय येते, समजते हे पाहण्याची परीक्षा. ३. जोडा इ.कास दिलेले कातड्याचे ठिगळ. ४. मदत; साहाय्य; पाठबळ; पाठिंबा; आधार : 'दाभाडिये, गायेकवाड, व बांडे यांचे फौजेस पुस्ती दाखवावी'- पेद १०.६१. ५. कोणत्याही वस्तूस बळकटीसाठी त्यासारख्याच पदार्थाचा दिलेला जोड. ६. जोड; पुरवणी : 'पुढें होत खस्ती नसे पुण्यपुस्ती।'-दावि २१६. ७. दारास दिलेली उभी पट्टी. (को.) [सं.पृष्ठ; फा. पुश्त् - श्ती]

**पुस्तु-स्तू** स्त्री. अफगाणिस्थानातील पठाणांची भाषा. [फा. पुस्तू]

**पुस्तैन** पु.न. दोन पिढ्या. पहा : **पुस्त** : 'दोन्ही रीयासती पुस्तैन पासोन येक. जुदाई नाहीं.'- मइसा ७.१५१. [फा.]

**पुहपकी** स्त्री. माळीण; फुले देणारी : 'रथु संजोगिले गुढरिले हाथी पुहपकीं रुखुमिणी श्रीकृष्ण वारू ।'- सिद्धांतसूत्रपाठ, पूजावसर, धवळे. [सं. पुष्पकी]

**पुळका** अक्रि. १. थोडे व पातळ शौचास होणे; पिळकी. २. पावसाची जोराची व अल्पकाळ टिकणारी सर. ३. एकसारखे व त्रासदायक रीतीने मागणे; टुरटुर; पिरपिर. (क्रि. लागणे, लावणे). [ध्व. पुळ ! पुळ!]

**पुळका** पु. उमाळा; लहर; इच्छा; प्रेमाचा मोठा आवेग. [सं. पुलक]

**पुळका** पु. भुसकट. (व.) पहा : **फुलका**

**पुळचट** वि. नेभळट; भित्रा; कर्तृत्वशून्य. [सं. पुलक]

**पुळ(ळी)ण-णी** न.स्त्री. वाळवंट; समुद्रकिनाऱ्यावरील वाळूचा पट्टा. स्त्री. रेती; वाळू. [सं. पुलिन]

**पुळणवट** वि. १. रेताड; वालुकामय (जमीन). २. किनाऱ्यावरील, फक्त पावसाळी पीक देणारी (जमीन).

**पुळण** न. शारीरिक दोष उत्पन्न करणारा खाण्याचा पदार्थ; जखम, फोड इ. मध्ये पू उत्पन्न करणारा पदार्थ. (कु.) पहा : **पुलन**

**पुळपुळ, पुळपुळाट** स्त्री. पु. १. एकसारखे शौचास होणे. २. एकसारखा पाऊस पडत राहणे. ३. एकसारखे बोलणे; पुटपुटणे; कुरकुरणे; भीक मागणे किंवा कोणतीही त्रासदायक, कंटाळवाणी क्रिया करणे.[ध्व.]

**पुळपुळीत, पुळपुळा** वि. पहा : **पळपळीत**

**पुळा** पु. पेंढा : 'हातात घासाचे पुळे पेटवून घेऊन.'- चिमा ८. पहा : **पुला**

**पुळाटी** स्त्री. रामकाटी जातीच्या बाभळीचे लहान झाड.

**पुळिका** स्त्री. १. दिव्याची ज्योत : 'गुणा तेलाचिया सोयरिका । निर्वाहे दीपकळिका । ते कां होईल पुळिका । कापुराची ।'- अमृ २.५१. २. (ल.) बुद्धीची स्फूर्ती; उठाव : 'बुद्धीची पुळिका विरे। परिमळु घ्राणीं उरे ।'- ज्ञा ६.२४६. [सं. पुलक]

**पुळी** स्त्री. १. पुटकुळी; लहान फोड : 'खरूज खवडे पुळिया नारू ।'- दास ३.६.१६. २. मोठा होणारा व्रण; चकंदळा; स्फोट. [सं.पुलक] (वा.) **पुळीचे फांपर करणे** - लहान गोष्ट मोठी करून सांगणे; क्षुद्र गोष्टीस जास्त महत्त्व देणे.

**पुळुक** पु. केस; रोमांच : 'प्रेम समुद्राचें भरितें जैसें । आनंदाअश्रु येति तैसे । किं सुखा डीर फुटले मीषे । पुळुकांचेनि ।' - भाए ७९८. [सं. पुलक]

**पुक्ष** पु. पौष महिमा. (कु.) [सं. पौष]

**पुं** वि. पुरुषवाचक पद. समासात उपयोग. जसे :- पुंकेसर; पुंगव; पुंलिंग. [सं. पुंस]

**पुंकेसर** पु. फुलातील स्त्रीकेसराच्या भोवतालचे केसर.[सं. पुंस + केसर]

**पुंख** पु.न. १. पिसे लावलेले बाणाचे अग्र : 'रणा माजवी तोरण, पुंखवाणी मेघवर्ण।'- आपद ५८. २. पुच्छ; पिसारा: 'शार्ङ्गधनुष्य अतिसबळ । सुवर्णपुंख बाण सरळ । - एभा २७.२५६. [सं.]

**पुंगट-स** वि. पुंगळाच्या अंगास येणाऱ्या दुर्गंधीप्रमाणे घाण येणारा; वाईट वास असलेला.

**पुंगळ** पु. एक पादरा किडा. पहा : **पिंगूळ** [सं.पिंगल]

**पुंगळी** स्त्री. कागद वगैरेची सुरळी; वळकटी; नळी. (ना.) पहा :**भोंगळी**

**पुंगी** स्त्री. तोंडाने वाजविण्याचे गारुड्यांचे एक वाद्य. हे कडू भोपळ्याचे करतात. सापाला मोहिनी टाकण्याच्या कामी उपयोगात आणतात. **०बंद करणे** - एखाद्यास गप्प बसविणे; बोलती बंद करणे; दुसऱ्याचे वर्चस्व चालू न देणे.

**पुंगीपेटारा** पु. सामानसुमान. (व.)

**पुंगीवाला** पु. गारुडी; पुंगी वाजविणारा.

**पुंज** पु. १. धान्यादिकांची रास; ढीग; समुदाय; झुबका; गुच्छ. २.खोत किंवा धारेकरी यांनी गुरव आणि महार यांना त्यांच्या त्या वर्षातील कामाबद्दल दिलेली धान्याची लहानशी रास. ३.मेळा; गट. [सं.]

**पुंजका** पु. झेला; झुबका; तुरा; घोस; समूह; रास; जुडगा; जुडी; गठडी (केस, पाने, पाती, मधमाशा इ.चा). [सं.पुंज]

**पुंजट, पुंजर(रू)ट** न. धान्यादिकातील हलके, पोचट दाणे.

**पुंजनी** न. रेशमाची एक जात.

**पुंजवणी** स्त्री. गोळा करण्याची क्रिया. (महारामध्ये रूढ) मृताची तिसऱ्या दिवसाची उत्तरक्रिया; राख सावडणे.

**पुंजा, पुंजाणा-ना** पु. १. (विणकाम) तळहाताभोवती गुंडाळलेले धागे किंवा तंतू. याची संख्या साठ ते ऐंशी पर्यंत असते. २. (सामा.) तारांचा समूह. ३. टाकाऊ, निरुपयोगी पदार्थांचा ढीग, रास, समुदाय: 'नाव ठेवीत केर- पुंजा ।' - दास ३.३.४२. (तिरस्कारार्थी) केरकचरा; गवत; घाण इ. चा ढीग; उकिरडा. ४.वाळवीने खाल्लेल्या धान्य, लाकूड, कापड इ.चा ढीग. [सं. पुंज]

**पुंजापा** पु. पूजेचे साहित्य; पूजापत्री. (खा.) [हिं. पुजापा]

**पुंजावणे** क्रि. एकत्र, गोळा करणे: 'तू उधळलेल्या त्या स्वप्नांची ही सारी रुजणारी स्वप्ने मी ओटीत पुंजावली आहेत.' - धृपद ७७.

**पुंजाळ** पु. १.ढीग; रास. २. जमाव : 'परम तेजस्वी प्रळयाग्न । पुंजाळ लक्ष जीवांचा।'- दावि ४८२.

**पुंजाळ** वि. तेजस्वी; चकचकीत : 'पैल सांवळें तेज पुंजाळ कैसें। सिरीं तुर्विलीं साजिरीं मोरपिसें। -' तुगा ४२५. [सं. पुंज]

**पुंजाळणे** अक्रि. १. एकत्र गोळा, जमा होणे. २. तेजस्वी होणे; चकाकणे : 'नयन पुंजाळले निश्चित । अर्धोन्मीलित ते जाहले ।'- एभा २९.६५४. २. पसरणे : 'वरचिलें पातीं ढवती । तळींचीं तळीं पुंजाळती । तेथ अर्धोन्मीलित स्थिती । उपजे तया ।'- ज्ञा ६.२०३.

**पुंजी** स्त्री. १. (धान्य, रुपये इ. चा) लहान ढीग; रास; समूह. २. (सामा.) साठा; संग्रह; कोठार; भांडवल; भरणा; भांडार (वस्तू, विद्या, द्रव्य इ. चे); द्रव्य; पैसा. [सं. पुंज]

**पुंजी** स्त्री. घोड्याला शृंगारण्याच्या सामानापैकी एक; शिरोबंद.[फा. पूझी]

**पुंजी** स्त्री. (लुगड्याच्या) काठाचा एक इंचाचा भाग; (सामा.) मागावरील ताणाचे साठ दोरे.

**पुंजी** स्त्री. एक सागरगोट्यांचा खेळ.

**पुंजीपती** न. उत्पादनासाठी पैसे पुरवणारा; भांडवलदार.

**पुंजुलाँ** पु. १. पुंजी. (गो.) २. पहा : **पुंजाळ**

**पुंड** वि. १. बंडखोर; गावगुंड; दांडगा; उलाढाल्या २. (सामा.) दरोडेखोर; लुटारू; चोर. [सं.पौगंड, पुंड्र]

**पुंडगिरी** स्त्री. बंड, गुंडपणा; दांडगेपणा; उलाढाली.

**पुंडपाळ** पु. लुटारूंचा मुख्य.

**पुंडपाळेगार** पु. सामान्यत: लुटारू व बंडखोर लोक.

**पुंडमवासी** पु. पुंड आणि मवाशी; पुंड आणि पाळेगार, भुमे वगैरे लोक : 'देशोदेशिंच्या खंडण्या धाडुन देती पुंडमवासी ।'- ऐपो १७७.

**पुंडरीक** न. १. पांढरे कमळ. २. अष्टदिग्गजांपैकी एक. [सं.]

**पुंडा** वि. (प्रां.) पांढरा (गाय, बैल इ.): 'एकें मोहरीं मोरी पारडीं। एके वाघी चितळी पुंडीं ।'- दाव २८१. [सं.पुंड्र, पांडु]

**पुंडा,पुंडा-ड्या ऊंस** पु. उसाचा एक प्रकार; तांबूस ऊस.[सं.पुंड्र]

**पुंडाई, पुंडायकी, पुंडाव-वा, पुंडावके, पुंडावे** स्त्री. न. १. बंडखोरपणा; लुटारूपणा; बेकायदेशीर वर्तन. २. जुलूम; उपद्रव; जबरदस्ती; लुटालूट; बंड.(गो.). पहा : **पुंडाई**

**पुंड्र** पु. कपाळास लावलेला चंदन, भस्म इ. चा टिळा; गंध. [सं.]

**पुंड्रक** पु. घोड्याचे प्रपाणावर (वरच्या ओठावर) असणारा पांढरा पट्टा - अश्वप १.१०७. [सं.]

**पुंश्चली** स्त्री. स्वैरिणी; वेश्या; व्यभिचारिणी. 'पुरुष सदा स्त्रीअनुराग । परी सहसा न करवे प्रसंग। त्यासि पुंश्चलीचा घडल्या संग। ते बाधी निलाग हावभावीं ।'- एभा २६.१७५. [सं.]

**पुंसवन** न. सोळा संस्कारांपैकी एक. स्त्रीच्या ठिकाणी गर्भधारणा झाल्यापासून तीन महिन्यांनी त्या गर्भाला पुंस्त्व प्राप्त होण्यासाठी अथवा त्या गर्भाची योग्य प्रकारे वाढ होण्यासाठी केला जाणारा संस्कार : 'गर्भाधान पुंसवन। जातकर्म अन्नप्राशन। ही समस्त कर्मे पूर्वीं जाण । केलीं संपूर्ण चौलांत ।'- एभा १७.२७०. [सं.]

**पुंसा-स** पु. पक्षी; पोपट: ' अहो पुंसा आपणचि पढविजे । मग पढे तरी माथा तुकिजे ।'- ज्ञा ११.१७. [सं.पुच्छ + क]

**पुंस्त्व** न. १. पुरुषत्व. २. सामर्थ्य; शक्ती; पराक्रम. ३.पुंल्लिंगत्व.[सं.]

**पू** पु. १. दूषित रक्त; फोड, जखम इ. मध्ये उत्पन्न होणारा दुर्गंधीयुक्त पातळ पदार्थ. २. डोळ्यातून येणारा चिकट स्राव. ३. अत्यंत जीर्ण, कुजका झालेला पदार्थ (लाकूड, वस्त्र, कागद इ.).[सं.पूय] (वा.) **० करणे** - अतिशय बिघाड, नुकसान करणे.

**पू(पु)कु** वि. चार ही संख्या. (नंदभाषा)

**पूकुकाटी** वि. ऐंशी ही संख्या. (नंदभाषा)

**पूक्र** न. काचेचा पेला. (गो.) [पोर्तु.पुकारो]

**पूग** पु. सुपारीचे झाड; पोफळ.
न. सुपारी (फळ). [सं.]

**पूग(गी) फल** न. सुपारी : 'पूगीफळें आणि पानें । उत्तम संभ्रमाचीं अन्नें।'- वेसीस्व ७.७. [सं.पूग + फल]

**पूजक** वि. पूजा, आदरसत्कार करणारा; पूज्यबुद्धी ठेवणारा. [सं.]

**पूजन** न. १. पूजा; अर्चा. २. सत्कार; सन्मान. [सं.]

**पूजनीय, पूजार्ह** वि. पूजनास योग्य; वंद्य; आदरणीय; सन्माननीय.

**पूजा** स्त्री. १. मंत्र इ. म्हणून फुले, गंध, नैवेद्य इ. वाहून केलेली देवाची आराधना; पूजेचे पंचोपचार व षोडशोपचार असे प्रकार आहेत. २. पूजनासाठीचे गंध, फुले इ. साहित्य. ३. सत्कार; सन्मान; आदर ठेवणे; भक्ती. ४. (ल.) द्रव्यरूप सत्कार; पैसा : 'पैं कळांतर गांठीं बांधिजे । मग पुढिलांचें काज कीजे । पूजा घेऊनि रसु दीजे । पीडितांसी ।'- ज्ञा १७.२८७. ५. (ल.) अपमान; खरडपट्टी : 'नागोपंतांची पूजा होऊन ते घरीं गेले.'- विक्षिप्त १.३२. ६. लाचलुचपत. [सं.] (वा) **० करणे, घालणे**- मारणे; बडविणे; खुदळणे; भोसडपट्टी काढणे; अतिशय रागावणे.

**पूजाअर्चा, पूजाआरती-आर्ती-उर्जा** पहा : **पूजा**

**पूजाद्रव्य** न. पूजेस लागणारा किंवा अवश्य असलेला जिन्नस (फूल, गंध, पाणी इ.). [सं.]

**पूजापत्री-पाती** स्त्री. १. पहा : **पत्री** १. २. पूजा करणे. (खा.)

**पूजापात्र** न. पूजेचे साहित्य ठेवण्याचे विशिष्ट आकाराचे भांडे.

**पूजापुरस्कार** पु. पूजा व तदनुषंगिक इतर कर्मे.

**पूजाबंध** पु. बांधलेली पूजा : 'मुगुटावरी स्तबक । ठायीं ठायीं पूजाबंध अनेक ।'- ज्ञा ११.२२०.

**पूजित** वि. पूजिलेला; वंद्य; आदरणीय.

**पूजिता** वि. पूजणारा; पूजक: 'पूजित्या होते जयप्रद ।'- दावि १८२.

**पूज्य** वि. १.पूजा करण्यास योग्य (गुरू इ.). २. माननीय; वंदनीय.[सं.]

**पूज्य** न. १. अक्षराच्या डोक्यावर देतात ते टिंब; अनुस्वाराचे चिन्ह; अनुस्वार. २. शून्य. ३. दशांश अपूर्णांक मांडला असता डावीकडे देतात ते टिंब; दशांश अपूर्णांकाची खूण. ४. यादीतील विशिष्ट नाव किंवा पदार्थ नाही, तो पाहिजे असे दर्शविण्यासाठी त्यापुढे केलेले वर्तुळ किंवा खूण. ५. खोट; अभाव; कमीपणा : 'अस्मत्सुखासि पडलें तेव्हांपासूनि आजिवरि पूज्य।'- मोकर्ण ४२.४३. (वा.) **०करणे** - १. वगळणे; विसरून जाणे; दुर्लक्ष करणे. २. खाऊन सफा करणे; चापणे. **(विद्या, स्नानसंध्या इ. वर) ० पडणे** - विद्या, स्नानसंध्या इ. बाजूस सारणे; बंद करणे;करण्याचे विसरणे. **(विद्या, पैसा इ. च्या) नावाने पूज्य** - विद्या, पैसा इ. चा पूर्ण अभाव असणे.

**पूट-ठ** पु. लेप.पहा : **पुट**

**पूड-ट-ठ** स्त्री. १. चूर्ण; भुकटी; पीठ. १. तपकीर. (गो.). [क.पुडि; सं. पुट्]

**पूड** न. १. नगारा; नौबत इ. चे भांडे; पडगे. २. वाद्यांचे तोंड;. पहा: **पुडा**
पु. न. १. खण; घर; कप्पा (पेटी, पिशवी इ. चा). २. चुनाळे; तपकिरीची डबी इ.च्या दोन अर्धुकां(टोपणां)पैकी प्रत्येक. ३. (वेत, बांबू, माडाच्या पाती, गवत इ. चे) विड्याची पाने ठेवण्यासाठी केलेले बारदान. ४. दुहेरी तंबूच्या आतील किंवा बाहेरील आवरण. [सं.पुट] (वा.) **० फुटणे-बाहेर येणे** - रहस्य प्रकट, जाहीर होणे.

**पूडकार** पु. तपकीरविक्रेता. (गो.)

**पूत** पु. पुत्र; मुलगा (मर्यादित प्रयोग). [सं. पुत्र]

**पूत** वि. पवित्र; शुद्ध; निर्मळ; स्वच्छ: 'मोही तन्मन जैसें साधूचें पूतहि मन गाढ कली ।'- मोभीष्म ५.४४. [सं.]

**पूत** स्त्री. रीत; पद्धत : 'लुटीचीं वस्त्रें अपरिमित । महार पोरग्यांस झालीं प्राप्त । परंतु पांघरावयाची पूत । काय त्याला ठाऊकी ।'-अफला २७.

**पूतनामावशी** स्त्री. १.एक राक्षसी. कंसाच्या सांगण्यावरून मायावी रूप धारण करून गोकुळात आलेली. २. (यावरून ल.) त्रासदायक, नावडती मावशी. ३. (ल.) दिसण्यास सुंदर व सभ्य, पण अंतर्यामी दुष्ट अशी स्त्री. [सं. पूतना]

**पूति-ती** पु. दुर्गंध. [सं.पू.]

**पूतिकावृक्ष** पु. काटेकरंज वृक्ष.
**पूतिव्रण** पु. आग करणारा व पसरणारा व्रण, क्षत; जाळपुळी.[सं.]
**पून** अ. पासून : 'प्राजक्तावरचा बहार निथळे केव्हां पुनी अंगणीं।'- केशवकुमार.
**पून** न. धर्म; पुण्य : 'केलें दानपून पालखी दिली ब्राह्मणाला।'- ऐपो ८९. [सं.पुण्य]
**पूप** न. अपूप; एक खाद्यविशेष. [सं.अपूप]
**पु(पो)पी** स्त्री. १. रव्याची लहान पोळी. २. पहा : **पूप** [सं. पूपिका]
**पूय** न. पू; दूषित रक्त : 'सांगे पूयपंकींचे किडे । काय चिळसी घेती।' - ज्ञा ५.१२१. [सं.]
**पूयन** न. पू होण्याची क्रिया.
**पूयालस** पु. १. सांध्यांचा एक विकार; गुडघी; ढोपरी. २.गळू इ. पुवाळणे.
**पूर** वि. (समासात उपयोग) पूर्ण : 'पैकेपूर होऊन पार उतरोन गेला'- दिमरा १.२७३. [फा.पूर]
**पूर** पु. १. (नदी, ओढा, नाला इ. ना येणारा) पाण्याचा लोंढा. २. (ल.) वृद्धी; समृद्धी; विपुलता : 'मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी ।'- करुणाष्टक. [क.पूरी]
**पूर** पु. शहर; मोठा गाव; पुरी; सामासिक शब्दात विशेष योजना. उदा. कोल्हापूर, पंढरपूर, सोलापूर इ. [सं.पूरम्]
**पूरक** पु. (योग.) उजवी नाकपुडी दाबून डावीतून श्वास आत घेणे. वि. १. पूर्ण करणारा. २. साहाय्य करणारे; भर टाकणारे. ३. समाधान, तृप्ती करणारा. ४. (शाप. गणित) पुरवणीचा; भरतीचा. जसे :- पूरककोन इ. [सं.पृ = पूर्ण करणे]
**पूरकालवे** पु. अव. नदीला पूर आला असताना ते पाणी शेतजमिनीपर्यंत नेण्यासाठी काढलेले कालवे.
**पूरण** न. १. भर; एखाद्या न्यूनतेची पूर्तता करणे; पूर्ण करणे : 'पंडितरायांनीं ज्याप्रमाणें स्वकृत व्याख्यांचें पूरण स्वरचित उदाहरणांनीं केलें आहे...'- नि ८६७. २. पूर्ण करणारा भाग; पुरवणी; न्यूनता घालविणारा, तृप्ती देणारा अंश. ३. तृप्ती; समाधान. ४.(विणकाम) आडवी वीण; बाणा; अडवण. [सं.]
**पूरणिका, पूरणी** स्त्री. भर; भरती; पुरवणी. पहा : **पूरण**
**पूरणी** स्त्री. (गवंडीकाम ) विटा, दगड, भेंडा इ. च्या बांधकामात मधून घातली जाणारी भर; मसाला; पुरण.
**पूरणे** उक्रि. (योग.) उजवी नाकपुडी बंद करून डाव्या नाकपुडीने श्वास आत घेणे : 'वायुबीजें आवाहूनी । पिंगला प्राण पूरूनि ।'- एभा २७.१८२. [सं.पृ = पूरण]
**पूरिका** स्त्री. पुरी; एक खाद्यविशेष: 'वाढितां उदंबरें सरिसें। पूरिकांसी ।'- ऋ ८२.
**पूरित** वि. १. पूर्ण केलेला; भरलेला; पूर्ण. २. तृप्त. [सं.]
**पूरिया** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर.
**पूर्ण** न. १.वेळेच्या विवक्षित भागाचा अभाव दर्शविण्यासाठी पंचांगात शून्याबद्दल योजावयाचा शब्द. २. संख्येचे अभावबोधक चिन्ह; शून्य : 'आधीं एक पुढें पूर्ण । त्या नांव दहावें लक्षण।'- एभा ११.१४३३. ६. सोळा कलांनी युक्त (चंद्र, ईश्वरावतार इ.) [सं.]
**पूर्ण** वि. १. भरलेला. २. इच्छा, आकांक्षा इ. शेवटास गेली आहे असा; सफल. ३. पुरता; सर्व; कोणत्याही बाबतीत न्यूनता नसलेला. ४. कुशल; निष्णात. ५. उच्च अवस्थेस पोहोचलेला : 'आतां आणिक एक गहन । पूर्णाचें चिन्ह । अर्जुना तुज सांगेन । परिस पां।'- ज्ञा २.३५४. [सं.पृ = पूर्ण करणे]
**पूर्णकपोल** पु. (नृत्य.) गर्व व उत्साह अशी मनःस्थिती दाखविण्याच्या वेळी गाल फुगीर दाखविणे.
**पूर्णकंठी** स्त्री. घोड्याचा गतीचा एक प्रकार. - अश्वप १.१८५.
**पूर्णगर्भा** स्त्री. १.गरोदरपणाचे नऊ महिने भरले आहेत अशी स्त्री. २. पुरणपोळी : 'तरी पूर्णगर्भा करूनि सत्वर । भोजन पोटभरी घालावें।'- भवि ५६.५७.
**पूर्णघटिका** स्त्री. लग्न, मुंज इ. विधीसाठी मुहूर्त दाखविणारी, पाण्यात तरंगत सोडलेली व पूर्ण भरलेली शेवटची घटिका.
**पूर्णघन** वि. सर्वत्र भरून राहणारा; सर्वव्यापक.
**पूर्णचंद्रोदय** पु. १.एक औषधी मात्रा. २. पौर्णिमेचे लख्ख चांदणे.
**पूर्णचैतन्य** न. पूर्ण प्रवर्तकत्व, चालकत्व; जिवाची पूर्णता. वि. १.चैतन्याने युक्त (परमेश्वर). २. अत्यंत उत्साही, उद्योगी.
**पूर्णपात्र** न. १. राजादिकांनी ब्राह्मणाला दिलेले पंचपात्रासारखे भांडे. २. हे कोणासही दाखवून धान्याने भरून घेण्याचा मिळणारा हक्क. ३. काही धार्मिक विधीत कलशावर तांदूळ इ. नी भरून ठेवलेले भांडे. यात आराध्यदेवतेची स्थापना करतात. ४. एक कैली माप.- वाडदुबार २४६.
**पूर्णपात्री** वि. राजाकडून पूर्णपात्र मिळालेला (ब्राह्मण).
**पूर्णबोध** वि. अत्यंत ज्ञानी, विद्वान; तत्त्व जाणणारा (सत्पुरुष).
**पूर्णब्रह्म** न. १. केवळ ब्रह्म; ब्रह्मसार. २. ब्रह्माशी तादात्म्य, एकरूपता.
**पूर्णभूत** वि. (व्या.) कालनिदर्शक शब्द. ज्या काळी क्रियेची केवळ पूर्णता किंवा परिसमाप्ती दर्शविली जाते तो काळ.
**पूर्णा, पूर्णातिथी** स्त्री. अमावास्या, पौर्णिमा, पंचमी आणि दशमी या तिथींपैकी प्रत्येक.
**पूर्णागमी** पु. वेद, श्रुती इ. पूर्णपणे जाणणारा; वैदिक : 'मृत्य न म्हणे हा श्रोत्री । भृत्य न म्हणे मंत्रयंत्री । पूर्णागमी ।'- दास ३.९.२०.
**पूर्णाभिषेक** पु. १. काही धार्मिक विधी समाप्त झाल्यानंतर ऋत्विजाने यजमानावर कलशोदकाने (किंवा शेवटी भरलेल्या घटिकेतील उदकाने) केलेले सिंचन. २. मंत्रोपदेश दिल्यानंतर गुरूने शिष्यावर केलेला अभिषेक. ३. (ल., उप.) एखाद्या मनुष्याच्या सर्व सद्गुण, दुर्गुण इ. चे अनेकांनी केलेले वर्णन. [सं.]
**पूर्णाहुति-ती** स्त्री. १. यज्ञाच्या शेवटी सर्व देवतांना दिली जाणारी आहुती : 'होईल यागपूर्णाहुति । मग करूं भागा स्थिती ।'- कथा १.२. २. (ल.) (सैन्याची) भयंकर कत्तल; रक्तपात; सर्व गारद होणे. ३. लढाईत मरण, मृत्यू.
**पूर्णोदर** न. (नृत्य.) टाचांवर उभे राहून श्वास कोंडून धरून पोट थोडे पुढे

आणणे. श्वास सोडणे, उदररोग दाखविणे इ.च्या वेळी हा अभिनय करतात.

**पूर्णोद्गार** पु. समारोप; तात्पर्यार्थ : 'व्यासशिष्य – संजयाचा। पूर्णोद्गारु हा।' – ज्ञा १८.१६४१.

**पूर्णोपमा** स्त्री. (साहित्य.) उपमेय, उपमान, सामान्यधर्म आणि साम्य (उपमा)वाचक शब्द ही उपमेची चारही अंगे ज्या उपमेत आहेत असा शब्दालंकार.

**पूर्णिमा** स्त्री. ज्या तिथीस चंद्रबिंब सोळाही कलांनी युक्त असते ती तिथी; पौर्णिमा. [सं.]

**पूर्णिमांत मास** वद्य प्रतिपदेपासून शुक्ल पौर्णिमेपर्यंतचा महिना. हा उत्तर भारतात मानतात.

**पूर्त** न. विहीर, तळे, देऊळ, धर्मशाळा इ. बांधणे, झाडे लावणे, अन्नदान करणे अशा प्रकारचे धर्मकृत्य : 'या परी ज्यास विषयविरक्ती । तेही इष्टापूर्ते जैं करिती। योग याग त्याग साधिती। माझी भक्ति तैं उपजे।'– एभा ११.१५१४.

स्त्री. पहा : **पूर्ति–ती**

वि. १. पूर्ण; पूर्ण भरलेले; संपूर्ण; समग्र. २. पूर्ण केलेला; शेवटास नेलेला : 'पूर्त कवणी ही न कळे चरित्र । जव चाफळीं केले लीळा विचित्र ।'– सवि ४५६. पहा : **परिपूर्ण** [सं.]

**पूर्तकाल** पु. (अप.) पोर्तुगाल देश.

**पूर्तकेश** पु. पोर्तुगीज लोक.

**पूर्तता** स्त्री. परिपूर्णता. पहा : **पूर्ति–ती**

**पूर्ति–ती** स्त्री. १. समाप्ती; अखेर; शेवट; संपूर्णता. २. तृप्ती; समाधान. संतोष : 'हे दुर्दशा बरी कीं पूर्ति असे कीं न अक्षतृष्णेची।' – मोसभा ५.३२. ३. परिपूर्णता; पूर्णपणा.

**पूर्व** स्त्री. उगवत–ती दिशा; ज्या दिशेस सूर्य उगवतो ती दिशा : 'कां पूर्वापर सरिता । भिन्न दिसती पाहतां । मग सिंधु मिळणीं ऐक्यता । पावती शेखीं।'– ज्ञा ३.३९. [सं.] (वा.) **पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवणे** – अत्यंत अशक्य गोष्टसुद्धा घडून येणे.

**पूर्व** वि. १. पूर्व दिशेचा; पूर्वेकडील. २. पहिला; अगोदरचा; आधीचा; सुरुवातीचा. ३. प्राचीन; मागला; गतकालीन. ४. पुढील किंवा मागील (भाग, बाजू इ.) : 'जेथ पूर्वानुक्रमु दिसे । चोखाळत।' – ज्ञा २.२२३. ५. ज्या दोन गोष्टीत आनुचर्यसंबंध असतो त्यांपैकी आधीच्या वस्तूस पूर्व व नंतरच्या वस्तूस उत्तर म्हणतात. समासात पूर्वपदी – उत्तरपदी असा शब्द योजतात. जसे :– दृष्टपूर्व, श्रुतपूर्व. ६. (ल.) मागील जन्मांतील. [सं.]

**पूर्वकथा** स्त्री. १. संदर्भ लागावा म्हणून पूर्वी सांगून झालेल्या कथेचा सारांशरूपाने पुन्हा सांगितला जाणारा भाग. २. मागील हकिगत; इतिहास.

**पूर्वकर्म, पूर्वसुकृत** न. सद्यस्थितीत सुख–दुःखास कारणीभूत असे मागील (पूर्व) जन्मांत केलेले किंवा मागील कर्म.

**पूर्वकालवाचक अव्यय** (व्या.) मूळ धातूस ऊन, हून प्रत्यय लागून होणारे अव्यय. उदा. करून, बोलून इ.

**पूर्वग्रह** पु. प्रथम, पूर्वी, आरंभी झालेली कल्पना, मत, समज इ.

**पूर्वग्रहदूषित** वि. पूर्वीच्या मताचा, ग्रहाचा परिणाम झालेला; पूर्वग्रहाने कलुषित असे (मन).

**पूर्वज** पु. आपल्या अगोदरच्या पिढीतील माणूस, पुरुष; वाडवडील. वि. पूर्वी, आधी जन्मलेला (बंधू). [सं.]

**पूर्वठेवा** पु. पहा : **पूर्वकर्म**

**पूर्वदत्त** वि. (पूर्वजन्मी दिलेले) ह्या जन्मी बरे–वाईट अनुभव येण्यास कारणीभूत असे पूर्वजन्मी केलेले दानादी कर्म; आपण जसे पूर्वजन्मी दिले–आचरले असते तसे परमेश्वर या जन्मी आपणास देतो असा समज.

**पूर्वदशा** स्त्री. अज्ञानी अवस्था.

**पूर्वधन** न. वडिलोपार्जित पैसा : 'माझें पूर्वधन । तुम्ही द्यावें ऋण।'– गुच १.१२०.

**पूर्वधरी** वि. १. पूर्वापार चालत आलेला. २. सनातन :' कां सृष्टिकर्ता पूर्वधरी । भणऔनियां ।'– दाव ३८०.

**पूर्वधान** न. खरिपाचे पीक.

**पूर्वपद** न. १. हरिदासाने कथेच्या सुरुवातीस घेतलेले एखादे विधान, सूत्र, नीतिवचन, अभंगातील सत्त्वविचार. याचे तो निरनिराळी उदाहरणे देऊन विवरण करतो व पुन्हा शेवटी सिद्धांत म्हणून त्याच पदावर येतो यावरून. २. पूर्वस्थिती. ३. समास; वाक्य, कविता इ. चे पहिले पद.

**पूर्वपक्ष** १. (तर्क., न्याय.) वादविवादात एका पक्षाने केलेली आपल्या मताची मांडणी; एका बाजूचा उपन्यास. २. (कायदा) तक्रार; फिर्यादीचे म्हणणे. ३. सिद्धांत; प्रमेय. ४. महिन्याचा शुद्ध पंधरवडा. ५. आशंकामय स्थिती; माया : 'पूर्वपक्ष म्हणिजे माया । सिद्धांतें जाये विलया।'– दास २०.३.२०. ६.पूर्वीची अविचल, अविकल स्थिती (मनाची); मूळ सिद्धान्तमय स्थिती :'तुकाराम रूपें येवोनि प्रत्यक्ष । म्हणे पूर्वपक्ष सांभाळीजे ।'– ब २५.

**पूर्वपाठ** पु. पूर्वापार चालत आलेली रूढी; प्रघात; रिवाज; वहिवाट.

**पूर्वपीठिका** स्त्री. १. पहिली, मागील, पूर्वीची किंवा प्राचीन पद्धत, मार्ग, चाल, रीत इ. २. (एखादा वादविवाद किंवा इतर प्रसंग याच्या) हकिगतीचा पहिला भाग; पूर्वीचा इत्थंभूत वृत्तांत; पूर्ववृत्त; आरंभीचा किंवा मूळचा भाग. ३. ग्रंथाचा प्रास्ताविक भाग; प्रस्तावना.

**पू(पु)र्वपु(पू)जा** स्त्री. १. पूर्वजन्मी सत्कृत्ये करून मिळवलेले पुण्य : 'सांब कृपा परिपुर्ण । पूर्व पुजा बहुत चांगली ।'– ऐपो ३२०. २. देवपूजेत देवतेस अभिषेक करण्यापूर्वी करण्याची पूजा.

**पूर्वपुरुष** पु.अव. पूर्वीचे वंशज; पूर्वज : 'मग वोवांडिती स्वर्गस्थ । पूर्वपुरुष।'– ज्ञा १.२५३.

**पूर्वबस्ती** स्त्री. १. (शरीर.) वरचे, ओटीच्या वरचे पोट; छातीचे मध्यपटल व बेंबी यामधील भाग. २. (योग.) मणिपूर.

**पूर्वमीमांसा** स्त्री. षड्दर्शनांपैकी एक; कर्ममार्गाचे प्रतिपादन करणारा मीमांसाशास्त्राचा भाग. कर्ता जैमिनी. [सं.]

**पूर्वरंग** पु. कीर्तनातील वेदान्तपर कथनाचा पहिला भाग.

**पूर्वरात्र** स्त्री. रात्रीचा पहिला भाग. संध्याकाळपासून मध्यरात्रीपर्यंतचा काळ.

**पूर्वरूप** न. १. पूर्वचिन्ह; पूर्वलक्षण; आधीचे स्वरूप, आकार; (रोग,

संकट, पाऊस इ.ची) प्रथम दिसू लागणारी लक्षणे, चिन्हे. ३. कानउघाडणी. ४.आगाऊ दिलेली सूचना.

**पूर्वरूपसंधी** पु. (व्या.) ज्यात दोन स्वरांच्या जागी प्रथम स्वर कायम होतो असा संधी.

**पूर्वसंधान** न. नाटकात घडणाऱ्या घटनेचे पूर्वसूत्र.

**पूर्वरेखा-खा** स्त्री. कपाळावर लिहून ठेवलेल्या पुढील आयुष्याच्या बऱ्या-वाईट भाग्याविषयीच्या गोष्टी; दैव; नशीब; भाग्य; ललाटरेषा.

**पूर्ववादी** वि. १.(वादविवादात) वादविवादास सुरुवात करणारा; पूर्वपक्षी. २. (कायदा) तक्रार करणारा; पूर्वीपासून चालत आलेली मालकी प्रस्थापित करणारा.

**पूर्वसंध्या** स्त्री. (ख्रि.) सणाच्या आदल्या दिवसाची संध्याकाळ. (इं.) ईव्ह : 'ज्या कोणत्या सणाला... पूर्वसंध्या आहे, त्यासाठी नेमलेली सारप्रार्थना पूर्वीच्या संध्याकाळच्या उपासनेंत म्हणावी.'- साप्रा ३९.

**पूर्वज्ञान** न. १. पूर्वचिन्हावरून होणारे ज्ञान; आधीची लक्षणे, सूचना इ. वरून होणारे ज्ञान. २.(वैद्यक.) रोगाचा साध्यासाध्य विचार; चिकित्सा

**पूर्वस्वस्तिक** न. क्षितिजाच्या पूर्वेकडील बिंदू.

**पूर्वा** स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकी अकरावे नक्षत्र.

**पूर्वाग्रा** स्त्री. पूर्वेकडील अग्र; सूर्य व तारा जेथे मावळतो तो क्षितिज बिंदू; पूर्वदिगंश.

**पूर्वापर** वि. मागील व पुढील; पूर्वीचे व नंतरचे.
क्रिवि. आधी आणि नंतर; पहिल्यापासून शेवटपर्यंत; अथपासून इतिपर्यंत.

**पूर्वापरवृत्त** न. समवृत्त; सममंडल. स्थलाच्या माध्यान्ह वृत्ताला लंबरूपानें छेदणारे दृड्मंडल.

**पूर्वापार** क्रिवि. १. पहा : **पूर्वापर.** २. पूर्वीपासून; प्राचीन काळापासून.

**पूर्वाफाल्गुनी** स्त्री. फाल्गुनी नावाच्या नक्षत्रपुंजातील पहिल्या दोन तारका व सत्तावीस नक्षत्रांपैकी अकरावे नक्षत्र.

**पूर्वाभाद्रपदा** स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकी पंचविसावे नक्षत्र.

**पूर्वाभ्यास** पु. मागील किंवा पूर्वीची सवय, चिकाटी, अभ्यास इ.

**पूर्वार्ध** पु. स्थलकालादिकाचा पहिला,अलीकडचा, जवळचा अर्धा भाग.

**पूर्वाषाढा** स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकी विसावे नक्षत्र.

**पूर्वाह्ण** पु. सूर्य उगवल्यापासून सहा घटिकेचा तिसरा भाग; दुपारच्या अगोदरच्या सहा घटिका. पहा : **पराण्ह**

**पूर्विक-ल** वि. १. पूर्वीचा; प्राचीन; मागच्या जन्माचा. २. पूर्व दिशेकडील; पूर्व दिशेची : 'निगिजे पूर्वीलिया मोहरा ।'- ज्ञा ६.१५९.

**पूर्विका** स्त्री. पूर्वपीठिका; वंशाची हकिगत; पूर्वज; वाडवडील.

**पूर्वी** क्रिवि. १. प्रथमत; आरंभी; अगोदर. २. मागे; प्राचीन काळी.

**पूर्वी** स्त्री. १. (संगीत) संगीतातील एक राग. गायनसमय संध्याकाळ. २. पत्राचा आरंभीचा भाग; उपोद्घात.

**पूर्वेक्षण** न. खाणीसाठी केलेली (जमिनीची) पाहणी.

**पूर्वोत्तर** वि. पुढील व मागील; आधीचा व नंतरचा.
क्रिवि. १. सुरुवातीस व शेवटी; प्रथम व अखेर. २. आरंभापासून अखेरपर्यंत; संपूर्णपणे.

**पूर्वोदय** पु. सूर्योदयाच्या पुष्कळ आधी होणारा शुक्र व बुध यांचा उदय.

**पूल** पु. नदीचे पात्र, आगगाडीचा फाटा इ. ओलांडून जाण्यासाठी उंचावरून बांधलेला रस्ता. दोन उंचावरची व लांब असणारी टोके जोडण्याचे साधन. [फा. पुल्]

**पूलिका** स्त्री. १. राशी; ढीग. २. जमाव. [सं.पूल् = ढीग होणे]

**पूषा** पु. सूर्य. [सं.पूषन्]

**पूस** पु. १. (बायकी) पौष महिना. २. पुष्य नक्षत्र.[सं.पौष, पुष्य]

**पूस** स्त्री. चौकशी; तपास (पूसतपास, विचारपूस अशा शब्दातच वापरतात).

**पूंजीवादी** वि. भांडवलवादी.

**पूंस** न. शेपूट : 'बैल विकुनि कोठा । पूंस लाउनि गांठा ।'- ज्ञा १३.२३३.

**पृच्छा-त्सा** स्त्री. प्रश्न; सवाल; विचारपूस; चौकशी.

**पृतना** स्त्री. १. सेना; सैन्य; फौज : 'असतां तुम्ही पति पृथापुत्र मथिति या मदीय पृतनेतें ।' - मोभीष्म ४.४. २. सैन्याचा एकतृतीयांश भाग. [सं.]

**पृथक्** वि. वेगळा; भिन्न; निराळा.
क्रिवि. निराळेपणाने; वेगळेपणाने; भिन्नपणाने. [सं.]

**पृथक्करण, पृथग्भवन** न. १. (शाप.) पदार्थांची घटकद्रव्ये निरनिराळी करणे, वेगळी करणे; वर्गीकरण; फोड; विघटन; विभाजन. २. (व्या.). वाक्यपदच्छेद; वाक्यमीमांसा. [सं.]

**पृथक्जन** पु. मूर्ख मनुष्य: 'मनी म्हणे हे सतीरत्न । म्यां वनीं सांडिलें आपण । तरी मी जाहलों पृथक्जन । यथार्थ ठेवा ।'- कथा १.१०.१६०.

**पृथक्त्व, पृथगत्व** न. वेगळेपणा; निराळेपणा; भिन्नत्व.

**पृथगात्म** वि. आगळा-वेगळा; लक्षणीय गुण असणारा; विभिन्न; वैशिष्ट्यपूर्ण.

**पृथगात्मिका** स्त्री. प्राण्याची, जिवाची निराळी स्थिती, व्यक्तित्व; स्वतंत्र अस्तित्व.

**पृथा,पृथु-पृथुक** स्त्री. पोहे : 'पुरामाजि जाऊन भिक्षा पहातें । मिळाल्या पृथा देत मुष्टीक हातें ।'- किंसुदाम १५. [सं.पृथुक]

**पृथिमी-वी** पहा : **पृथ्वी**

**पृथु-थू** वि. १. मोठा; जाड; स्थूल : 'पृथुनितंब-नितंबिनिचा बरी । कटितटीं कटिसूत्रचि सांवरी ।'- वामन. २. अवाढव्य; विस्तृत; गुरू. [सं.]

**पृथुकरण** न. (शाप.) महत्करण; मोठा करणे, दाखविणे, (इं.) मॅग्निफिकेशन.

**पृथ्वी** स्त्री. १. भूगोल. २. भूमी; जमीन. ३. पंचमहाभूतांपैकी एक भूत. याचा गुण गंध आहे. ४. (भूगोल) सूर्यमालेमधील सूर्यापासूनचा तिसरा ग्रह. ५. भूगोलावर राहणारे मनुष्य, पशू, वृक्ष, पर्वत इ. सर्व जग. ६. माती :'अवतरली गाडग्यां घडां। पृथ्वी अनोळख जाली मूढां।'- ज्ञा १८.५४३. ७. एका वृत्ताचे नाव. याच्या चरणात सतरा अक्षरे आणि ज,स,ज,स,य,ल,ग हे गण असतात.

**पृथ्वीपति-ती** पु. राजा. [सं.]

**पृष्ठ** न. १. प्राणी, मनुष्य, पक्षी इ. कांची पाठ. २. मागची बाजू; पाठीमागचा भाग; पिछाडी. ३. कागदाची दोन अंगे प्रत्येकी; पुस्तकाचे पान. ४. पदार्थाची वरची बाजू. ५. (ज्यो. पदार्थ.) (गोल इ.ची) बाहेरची पातळी. ६. (महत्त्वमापन) जिला फक्त लांबी-रुंदी आहे अशी पातळी.(इं.) सरफेस. ७. बसण्याचा लहान पाट.(को).[सं.]

**पृष्ठकेंद्र** न. वर्तुळाचा आंस, कणा, ध्रुव.

**पृष्ठकेंद्रगवृत्त** न. एका वर्तुळाच्या ध्रुवातून जाणारे दुसरे, गौण वर्तुळ.

**पृष्ठदेश** पु.१. घोड्याचा मध्यभाग आणि कंबरेपासून खुरापर्यंत पश्चिम (मागील) भाग. २. पहा : **पृष्ठभाग**

**पृष्ठफल-ळ** न. (महत्त्वमापन) कोणत्याही घनाकृतीची मर्यादा दाखविणाऱ्या सर्व पृष्ठांच्या क्षेत्रफळांची बेरीज; भरीव पदार्थाच्या वरील भागाचे क्षेत्रफळ.

**पृष्ठभाग** पु. १. पृष्ठ; पाठ. २. सपाटी; पातळी; सपाटीवरचा भाग. ३. (स्थापत्य) मागली उभारणी. (इं.) बॅक एलेव्हेशन.

**पृष्ठमात्रा** स्त्री. (के,कै,को,कौ प्रमाणे) अक्षराच्या डोक्यावर न देता पाठीमागे दिलेली मात्रा.

**पृष्ठमुद्रित** न. पानांच्या आकड्यांसहित तयार केलेले मुद्रित पान.

**पृष्ठमैथुन** न. गुदमैथुन; अनैसर्गिक संभोग; बच्चेबाजी.

**पृष्ठवंश** पु. (शाप.) पाठीचा कणा; मणिस्तंभ.

**पृष्ठवंशाधर** न. १. शेवटचा कटिमणी; कटिकशेरुका. २. शेवटचा कटिमणी आणि माकडहाडाच्या वरच्या बाजूचे त्रिकोणाकृती हाड यांमधील प्रदेश.

**पृष्ठवंशी-वंशीय** वि. कणा, हाडे इ. असलेला (प्राणी).

**पृष्ठस्वस्तिक** न. (नृत्य.)हात सारखे वेडेवाकडे फेकणे व हात फेकता-फेकता त्याचे स्वस्तिक करणे. तसेच पायांनी अपक्रांत आकाशचारी करून अर्धसूचीकरणाप्रमाणे पाठीमागचे बाजूस पायांचे स्वस्तिक करणे.

**पृष्ठाकृति-ती** स्त्री. (महत्त्वमापन) एक किंवा अनेक रेषांनी सर्व बाजूंनी मर्यादा असलेली पातळी.

**पृष्ठानुसारी (बाहु)** पु. (नृत्य.) बाहू पाठीकडे नेणे.

**पृष्ठांकिती** पु. विपत्रावर शेरा किंवा टिप्पणी करणारा.

**पे** शअ. १. पाशी; जवळ. ' मन न वळे मज जैसा गज अंकुश न वसतां महाता पें ।'- मोआदि ७.१०. २. कडे; शी; सी: 'खोंचि कीं निवटी मागें। येवढ्या जैता निघे । आपण पें जो ।'- अमृ २.१९. ३. स, ला, ते :'तें तीर्थे पांतां न स्मरे । आपण पें ।'- ऋ १९. ४. पासून; पाशी : 'तव गिरिजा म्हणे देवें । मज हिमवंतापें मागावें।'- कालिकापुराण ५४४. ५. वर : 'तियाज चाडापें वांदरें आथें ।'- भिल्ली १९.

**पेऊली** स्त्री. बासाची (कळकाची) लहान पेटी. (चंद्रपूर)

**पेकट-ड,पेकाट,पेगट** न. १. (निंदार्थी) कंबर; कंबरेचा सांधा; कमरेपासून मांड्यापर्यंतचा भाग. २. कंबर. (को.)[सं.अप+ कटि]

**पेकडहाड** न. पाठीच्या कण्याचा खालचा शेवट; अगदी खालचा मणका; कमरेचा काटा. पेकडहाड व माकडहाड एक नव्हेत.

**पेक(ख)णे** सक्रि. वाट पाहणे; थोडा वेळ थांबणे. (को.)[सं.प्रेक्षण]

**पेकप** अक्रि. जखम इ. बरे होणे. (गो.)

**पेखण** १. कल्पित कथा; वार्ता. २. भूषण. ३. व्यर्थ बडिवार.

**पेखण** न. १. काथ्याकूट. २.छंद. ३. पहा : **पेखणे**

**पेखणाइत** न. नृत्य करणारे माणूस, नर्तक : 'देवाचीं पेखणाइतें पेखणें करावेया आली'- लीचपू १२१. [सं.प्रेंखण]

**पेखणिक** न.नृत्य : 'ठाईठाई पेखणिके'- मधउ २२.

**पेखणी** स्त्री. नर्तकी; नाचणारी : 'मध्ये कव्हणी ठाई पेखणी ।' - ऋ ६९. [सं.प्रेंख]

**पेखणे** न. १. नाच; नृत्य; नाचरंग : 'पेखणें या करिती तिआं विद्याधरा नारी।'- धवळे पूर्वार्ध ७१. २. नर्तकांचा ताफा : 'अवघें पेखणें गोसावीयांपासि आलें'- लीचपू १२१.

**पेखणे** सक्रि. चूर्ण होणे; पीठ होणे. [सं.पेषण]

**पेखणे** सक्रि. जखम सुधारणे.- ख्रिपु. (को.)

**पेखणेकार** पु. नर्तक : 'मंगळ तुरांचां शब्दी : पेखणेकारांचां मांदी।' - रुस्व ४७९. [सं. प्रेङ्खण+कार]

**पेगमबरी नवसागर** एक प्रकारचा नवसागर. [हिं.]

**पे(पै)गंबर, पेगमबर** पु. ईश्वराचा दूत; स्वर्गातून निरोप आणणारा.

**पेगा(ग)म** पहा : **पैगाम**

**पेगाव** पु. मातीचा खांब. (गो.)

**पेच** पु. १. पीळ; वेढा; आटा; वळसा (स्क्रू, मळसूत्र, पागोटे इ.चा). २. दोरीचा वेढा; विळखा (एखाद्या वस्तूभोवती असलेला); पिरंगळा; वेटोळे; वर्तुळ (एखाद्या पिळलेल्या वस्तूचे). ३.(ल.) खुबीची लपेट; हूल; शकल; हिकमत; कुस्तीतील, मल्लयुद्धातील डाव; प्रतिपक्षाला पाडण्याची युक्ती. ४. त्रास; अडचण; संकट; दुःख; खेकटे : 'सुझें समजुनि गुर्वध करितां नमनें ढळेल कां पेंच ।'- मोशांति २.४७. ५.पंचाईत; गोंधळ; घोटाळ्याची स्थिती. ६. पोच; समज : 'नुसत्या शिपायाला इतका पेंच कुठला.-' इंप १२३. ७. (भाषण वगैरेतील) खोच; खुबी; युक्ती. ८. कूट; गूढ : 'जाणत्याचे पेंच जाणावे ।'- दास १८.२.११. (विडीचा धंदा) सांधा; शेवट (पानाचा). १०. कपट; कुटिलता. [सं.प्रेत्य; फा. पेच]

**पेचक** स्त्री. १.(धंदा) पितळी तार. २.(फुलमाळी धंदा) हाराची कलाबूत (पांढरी, क्वचित पिवळी). ३. पक्क्या दोऱ्याची गुंडी. ४. चमकदार सूत.

**पेचकट** पु. (मुद्रण.) जुळवलेल्या मजकुराची पृष्ठे बांधण्यासाठी वापरला जाणारा पक्का दोरा.

**पेचकस** पु.स्क्रू वळवण्याचे हत्यार. (ना.) (इं.) स्क्रू ड्रायव्हर.

**पेचकाड** न. (निंदार्थी) कंबरडे; पेकाड.

**पेचणी** स्त्री. पीळ; विळखा.

**पेचणे** सक्रि. १. पिळणे; पीळ घालणे; पिळवटणे; पिरगाळणे; जोराने फिरविणे. २. घोटाळ्यात, बुचकळ्यात पाडणे; निरुत्तर, कुंठित करणे. ३. (वादात) बोलण्यात पकडणे; पेचात, अडचणीत, संकटात, पेचात धरणे, आणणे. ५. लचकणे; तिरपणे; दुमडणे; कचकणे; मुरगाळणे (हात, पाय इ. अवयव).

**पेचणे** सक्रि. मधोमध दोन भाग करणे; उभा चिरणे; फोडणे (बांबू इ.). अक्रि. १. लचकणे. २. लाकूड पिंजले जाणे; बांबू इ. फुटणे.

**पेचदार** वि. १. गुंतागुंतीचा; घोटाळ्याचा. २. आटे असलेला; पेच असलेला; वाकविलेला.

**पेचपट्टी–पाटी** स्त्री. (सुतारीधंदा) पेच पाडण्याचे हत्यार; आटे पाडण्याचे चपटे यंत्र.

**पेचपाच–ड** पु.१. (मल्लविद्या) डावपेच; खुबी; लपेट; हिकमत; पक्कड. २. (ल.) त्रासदायक धोरण, कारस्थान, युक्ती; छक्केपंजे; धावडाव. ३. संकट; अडचण.

**पेचप्रसंग** न. अवघड परिस्थिती; कठीण समस्या.

**पे(पें)चाटी** स्त्री. गोंधळून जाण्यासारखी, पेचात पडल्याची अवस्था; कचाटी; अडचण; पंचाईत; खेकटे. (क्रि.सापडणे, धरणे.) (सामान्यत: सप्तम्यन्त प्रयोग).

**पेज, पेजवणी, पेजपाणी** स्त्री. न. कांजी; भातावरचे काढून घेतलेले पाणी; कण्हेरी; तांदूळ शिजल्यानंतर उरणारे भातातील निथळून काढले जाणारे पाणी. [सं.पेय]

**पेजट, पेजकर, पेजवरा, पेजबुडा** वि. १. पचपचीत; ज्यात पेज फार आहे असा (भात). २. (ल.) फोपशा; वातपुष्ट; स्थूल; दिसण्यात पुष्ट पण शक्तिहीन (मनुष्य).

**पेजपात्र, पेजा** न. वि. फोपशा. पहा : **पेजट** २

**पेजबुडे** न. पेज घालून घट्ट केलेले ताक.

**पेजर** पु. आलेल्या टेलिफोनची खबर माणूस असेल तेथे पोहोचती करण्याचे इलेक्ट्रॉनिक साधन.

**पेजळी, पेजवणे, पेजवत, पेजळूक** न.स्त्री. १. दुभत्या जनावराचे भाडे. २. भाड्याने घेतलेले दुभते जनावर. (कु.,राजा.)

**पेजे** न. गाय किंवा म्हैस व्यायल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या दोन पैदासी पैकी एक म्हणजे दूध. (राजा.) [सं.पेय]

**पेजेजापे, पेजेजावपे** न. दुभते (पेजे) व वासरू (जावपे) न घेता गाय किंवा म्हैस परत घेण्याच्या अटीवर ही पाळण्यासाठी एखाद्याकडे ठेवण्याची पद्धत.

**पेट–टे** स्त्री. न. नदी वगैरे तरून जाण्यासाठी केलेली भोपळ्यांची सांगड. (व.)

**पेट** पु. १. तोफेची दारू भरण्याची कोठी; (विशेषत:) तोफेचा, बंदुकीचा भरलेला बार. २. बंदुकीचा, तोफेचा आवाज, बार.
स्त्री. पु. पेट घेणे; शिलगणे; चेतणे.

**पेट** पु. न. १. एखादी वस्तू सारखी किंवा सपाट करण्याकरिता थापटणे; ठोकणे; प्रहार; तडाखा; चपेटा. (कु.) २. भुकेची आग : 'जंव पेट सुटे जीवांत' – नाम १८३४.

**पेट** स्त्री. पेटी; संदूक. (कु.) [सं.पेटिका]

**पेट** न. पोट. [गु.;हिं.]

**पेटकर** पु. पटवेकरी; दागिने पटविणारा. (व.)

**पेटका–की** पु.स्त्री. १.साप चावल्यामुळे अंगात ओढी येणे; गात्रसंकोच; झटका; लहर; वळ. २.स्नायू जोराने ओढल्यामुळे उठणारी बेडकी; वळ. (क्रि.काढणे, उठवणे, दाखवणे, निघणे). ३. स्नायूत उठणारा गोळा, वरवंटा.

**पेटकुली** स्त्री. पहा : **पेऊली**

**पेटणे–णां** न. जमीन ठोकून सपाट करण्यासाठी वापरले जाणारे लाकूड, चोपणे; थोपटणे. [गु.;हिं.]

**पेटणे** अक्रि. १. (ल.) रागावणे; क्षुब्ध होणे; संतापणे; भडकणे. २. (बैल) जोताला धरणे; वटणीस येणे. [सं.प्र + इंध]

**पेटवा** पु. १. आग. २. (ल.) चिंताग्नी : 'तरीं तुज पेटवा किमर्थं अर्थ। कामानळें दाटला ।'– नव १३.१३९.

**पेटवण** न.स्त्री. १. विस्तव पेटविण्यासाठी उपयोगात आणावयाचे गवत, काटक्या, सरपण, झिलप्या इ. साधन, इंधन. २. अग्नी पेटविण्यासाठी रचून ठेवलेले गोवऱ्या, काटक्या इ. चे तुकडे.

**पेटवणी** स्त्री. १. शिलगावणे; क्षुब्ध करणे. २. वठणीस आणणे.

**पेटीव** वि. १. पेटलेला; पेटवलेला. २. (ल.) वठणीस आणलेले (जनावर).

**पेटा** पु. १. वर्तुळ; घेर. २. पोट. ३. (ल.) ताबा; अधिकार. ४. अनेक गावांचा समुदाय व त्याचे मुख्य ठिकाण; देश विभाग; बरीचशी लहान गावे आणि खेडी ज्यात आहेत असा देशाचा विभाग; परगण्याचा, तालुक्याचा पोटविभाग. पहा : **देश.** ५. किल्ल्याच्या घेरातील गावांचा समुदाय व तो किल्ला. ६. अधिकारी पुरुष व त्याच्या हाताखालील नोकर किंवा लवाजमा. ७. वाघाचा पेटीसारखा पिंजरा; सापळा. ८. नदी वगैरे तरून जाण्यासाठी केलेला भोपळ्याचा तराफा. (को.) ९. एक प्रकारचा भोपळा. १०. (मुख्यत्वे करडई, हरभरा, अंबाडी, ताग इ.च्या) मुळासकट उपटलेल्या झुडपांचा केलेला भारा; ओझे; काट्यांचा भारा; तसल्या झुडपांची रास; गंजी. ११. पिल्लू; बच्चा; ज्या जातीचे पिल्लू असेल त्या (वाघ, कुत्रा, मांजर, ससा इ.) जातीचा शब्द पाठीमागे योजून हा शब्द योजतात. जसे :– कुत्र्याचा पेटा इ. १३. (बीजगणित) समीकरणाची एक बाजू.[हिं. पेट = पोट]

**पेटा** पु. बाजार; पेठ : 'उकलू विषयांचा पेटा ।'– ज्ञा ८.१८४.

**पेटारा–री** पु.स्त्री. बांबूची, वेताची साधारणपणे लांब, आयताकृती व १५–१८ इंच खोल अशी केलेली झाकणाची पेटी; टोपली; पेटीसारखा मोठा करंडा.
स्त्री. १.नांगरलेल्या जमिनीतील ढेकळे फोडून ती सारखी करण्याचे व डिफळ्यामागून फिरविण्याचे सुपासारखे एक लोखंडी आऊत.(अष्टागरी) २.गारुड्याची साप ठेवण्याची झाकणाची टोपली. [सं.पेटक]

**पेटिया** पु. दाणाचारा; चंदी; आहार (भोजन किंवा त्याच्या खर्चाइतका पैसा); पोटापुरते अन्न; भत्ता; साक्षीदार, चपराशी वगैरेंना दूर पाठवावयाचे असता त्यांना देण्यात येणारा खर्च, भत्ता. [हिं. पेट]

**पेटी** स्त्री. १. संदूक; वस्तू बंदोबस्ताने ठेवण्याचे लाकडाचे आच्छादनासहित साधन; लहान पेटारा. २. पुरुषाच्या मनगटावर, दंडावर बांधावयाचे एक भूषण. ३. बायकांच्या गळ्यातील एक जडावाचा, लहान–लहान पेट्या असलेला दागिना; चिंचपेटी.

४. फटाक्यांच्या सरांचे बंद पुडके. ५. दगडी जोत्याचा मधला थर; बेंदरी व पाटथर यांमधील लहान थर. ६. बालातंगी; तंगी; घोड्याच्या पोटाखालून घ्यावयाचा खोगीर आवळण्याचा पट्टा. ७. कमरेपासून खांद्यापर्यंतचे चिलखत; जाकीट. ८. गाडीच्या दांड्या ज्यात बसवितात तो व गाडीच्या कण्यावर असलेला पेटीच्या आकाराचा लाकडी भाग. ९. नदीतून तरण्याचा तराफा; सांगड : 'पेटी आणायासी गेले तेव्हां ।'- रामदासी २.२८. १०. परभाणाचे तुकडे मध्यभागी ज्या ठिकाणी कांड बांधतात त्या ठिकाणी विशिष्ट पद्धतीने सांधतात ते सांधकाम. ११. (विणकाम) सुताचे थोक एकत्र बांधलेले बंडल; पुडके; जितक्या नंबरचे सुत असेल तितके थोक त्या नंबरच्या सुताच्या पेटीत असतात. १२.(ल.) खजिना : 'सबळ जनक माझा राम लावण्यपेटी ।' - स्तोत्रमाला रामदास, करुणाष्टक १. १३. बाजाची पेटी.(इं.) हार्मोनियम. १४. (ल.) समूह; समुदाय : 'तयातें इंद्रियबैलांची पेटी । न म्हणे अवसीं पाहाटीं ।'- ज्ञा १३.२९. [हिं.; सं.पेटक]

**पेटी(टी)ची साखर** एक प्रकारची मऊ पिठीसाखर.

**पेटु(टू)ळ** न. लहान पेटी.

**पेटे** क्रिवि. बाबतीत; (कर्जफेडीच्या) पोटी : 'सरकार घेण्यापेटें जमा करविण्याची तजवीज केली पाहिजे.' - (बडोदे) खानगी खात्यातील अंमलदारांचे अधिकार १५७. [गु.पेट, पोट]

**पेटे** न. पहा : **पेटा ८**

**पेटेकरी** पु. १. माणसांना तराफ्यावर बसवून नदी वगैरेतून नेणारा इसम; सांगडवाला; नावाडी. २.ज्याच्याजवळ पेटे आहे असा.

**पेटोली** स्त्री. जिच्यावर घोड्याचा तंग बांधावयाचा ती पोटाखालची पट्टी. - अश्वप.

**पेट्रोल** न. शुद्ध केलेले ज्वालाग्रही खनिजतेल. [इं.]

**पेठ** स्त्री. १. अनेक कारखाने असलेले, व्यापाराचे शहर; बाजारगाव; कसबा. २. खरेदी-विक्रीचे, देवघेवीचे ठिकाण; (धान्य, कापड इ.चा) विशिष्ट बाजार. ३. शहरांचा मोठा भाग. जसे :- पुण्याची शनिवार, नारायणपेठ. ४. बाजारभावाची बातमी; सावकाराची खबर; बाजारभावाच्या चढ-उताराची माहिती (क्रि. येणे). ५. बाजारभाव. उदा. पेढ उतरली. ६. खाजगी, गुप्त बातमी. (सामा.) खबर; बातमी. ७. किल्ल्याच्या किंवा गडाच्या खालचा मोठा गाव. ८. पेढीवाल्याचे बातमीपत्र. ९. (अस्सल हुंडी हरवल्यामुळे) नवी केलेली हुंडी; हुंडीची पहिली नक्कल.[सं.पीठ=स्थान, द्रा. पॅटे; हिं.] (वा.) **पिकणे** - समुदाय जमणे. ० **लागणे** - गुप्त गोष्ट बोलल्याची बातमी फुटणे.

**पेठकरी** पु. १. पेठेवरील, बाजारातील मुख्य मनुष्य; पेठेवरील अधिकारी; वाकबगार. पहा : **शेट्या.** २. प्रत्येक गोष्ट जाणणारा व ती करणारा गावचा कुलकर्णी. ३. एखाद्या परगण्याच्या किंवा गावाच्या जोशीपणाची पाळी क्रमाक्रमाने ज्याच्याकडे आली आहे असा माणूस.

**पेठचलन-नी, पेठचाल-ली** वि. पेठेत किंवा मोठ्या गावात चालणारे (चलन, नाणे).

**पेठपाड** पु. पेठेतील बाजारभाव.

**पेठवणी,पेठवणूक, पेठविणे** स्त्री.न. बोळवण. 'पेंठवणी मागा नका ठेऊं लिगाड ।' - तुगा २८३. [सं.प्र+इष्]

**पेठा** चुंबन. (अहि.)

**पेठा** पु. गोल दुध्या भोपळा. [हिं.; सं.पिंडी]

**पेठा** पु. कोहाळ्याची बर्फी.

**पेड** न. झाड; वृक्ष. [हिं.]

न.स्त्री. झाडाचे खोड; मुख्यत्वे जमिनीपासून फांद्यांपर्यंतचा झाडाचा भाग.

न. १. (माड, पोफळी यांचा) दुसरीकडे लावण्यासाठी, मुळास इजा होऊ नये म्हणून बुंध्याशी थोडी माती ठेवून खणून काढलेला रोपा; हांडी. (को.) २. झाडाचा घेर. ३. झाडाचा पार; वृंदावन. [हिं.]

**पेड** मैदान; पठार. [सं.पदम्]

**पेड-ण** १. वाळलेल्या गवताचा भारा. २. पूर्वी शेतकऱ्याकडून गवताच्या रूपाने वसूल केला जाणारा कर.

**पेड** पु. पेढ; वेठ; एकेरी दोरी; पदर. (दोरी, वेणी, पीळ इ. कांचा).

स्त्री.न. जात्याची तळी. (को.)

स्त्री. उच्च आसन; बसण्याची जागा. (को.).

न. १. डोंगराच्या उतरणीवरचा सपाट जमिनीचा तुकडा; भाग. (को.) २. सापाचे वारूळ (विशेषत: मुंग्यांनी केलेले). (कु.)[क. पिडी]

**पेडकण** न. कुंपणाचे कवाड; दार.

**पेडका-गा** पु. पहा : **पेटका ३**

**पेडण** न. मोदक इ. उकडताना त्यांना पाणी लागू नये म्हणून भांड्यात तळाशी घालावयाचा पाचोळा, पाने इ. (राजा.)

**पेडणे** न. नांगराचा भाग; नांगराचे रुमणे. (बे.)

**पेडवॉ-वो** पु. लहान जातीचा एक मासा. (गो., कु.)

**पेडाबंद** पु. (संगीत) गाण्याचे ध्रुपद किंवा पालुपद.

**पेढ** पु. १. पहा : **पेड १,२,४.** २. एक प्रकारचा निवडुंग.

न. नारळ, सुपारी इ. चे झाड पोफळ, माड. (या शब्दाचा उपयोग रोपा लावण्याच्या किंवा गणती करून कर बसवण्याच्या संबंधात करतात).

**पेढा-डा** पु. १. दुधाचा खवा करून त्यात साखर घालून तयार केलेली मिठाई; दूधपेढा. २.डोंगराच्या माथ्यावरील किंवा उतरणीवरील काहीसा उंच व सपाट भाग. [हिं.; सं.पिष्ट]

**पेढी** स्त्री.१. बसण्याकरिता, जेवण्याची ताटे, देव वगैरे ठेवण्याकरिता जमिनीवर केलेली उंच जागा. २. सराफकट्टा; सराफाची बैठक, बसण्याची जागा; सराफ, हुंडीवाला यांचे दुकान. ३. दुकान. (गुज.) ४. (अर्थ.) पैशांचा व्यवहार करणारी संस्था. (इं.) बँक. [सं.पीठम् = आसन]

**पेढीवाला** पु. पैशाचा, भांडवलाचा व्यापारी; पेढीचा मालक.

**पेढेघाटी** वि. पेढ्याच्या आकाराचे (रत्न, जवाहीर, डबा.).

**पेण** स्त्री. (प्र.) पहा : **पाणकोळी**

**पेण-णे** न. १.मिरवणुकीच्या वेळी पालखी उभी करण्याचे एक ठरावीक ठिकाण; प्रवासातील मुक्कामाची जागा : 'देवा तव कृपे वांचून । मीं

न पावेचि हें पेण ।'– कथा २.१. २. मुक्काम; मजल; टप्पा; मजलीवर थांबणे. [सं.आप्यायनम्]

**पेणा** पु. प्रवासातील मुक्काम : 'पाहेचां पेणां वाटवधां। तंव आजिचि होइजे सावधां' – ज्ञा १३.५४६. २. खेळातील डाव, बाजू : 'गोसावीयांचेया गडावरि पेणा आला' – लीचपू ५२. [सं. प्रयाणक]

**पेणावणे** अक्रि. मुक्काम करणे.

**पेणी** स्त्री. नदी : 'आवघां लोकीं पेणीसि मात्रास्नानें केलीं' – लीचपू २. [सं.प्रवाहिनी]

**पेणी** स्त्री. पालखी.

**पेणे** क्रि. निघणे; प्रयाण करणे.

**पेणे** न. सामान; माल; व्यापारी जिन्नस. [सं.पृ,पण्]

**पेत्राल, पेत्रॅल** न. रॉकेल; घासलेट. (गो.) [इं.पेट्रोल; पोर्तु.-पेत्रोलिओ]

**पेत्रीलो** स्त्री. एक फुलझाड. (गो.)

**पेद** स्त्री. शेताच्या (खाचराच्या) बांधाची कड मजबूत व्हावी म्हणून लावण्यात येणारा चिखल. (गो.)

**पेदको** वि. फोफसा; बळकट नसलेला.

**पेदिद** पु. मागणी; शब्द टाकणे. (गो.)

**पेदीद** पु. पत्यांनी खेळण्याचा जुगाराचा एक प्रकार. (गो.)[पोर्तु.पेदिदो]

**पेदो** पु. स्मशानरक्षक. (गो.)

**पेद्रू** वि. दुर्बल; कमकुवत; निर्बल; भित्रा. [पोर्तु. पेद्रो]

**पेन** पु. न. लेखणी. [इं.]

**पेनसी** वि. पन्नास. (नंदभाषा)

**पेनिसिलीन** न. सूक्ष्म रोगजंतूंचा नाश करणारे प्रभावी औषध. [इं.]

**पेनेत** न. बायकांच्या कानातील एक दागिना. (इं.) इअररिंग.[इं.पेंडंट]

**पेन्याचा भात** कढईतील उकळत्या पाण्यामध्ये तांदळाचे टोपले ठेवून केलेला भात. (झाडी)

**पेन्शन** न. ठरावीक मुदतीपर्यंत चाकरी केल्यानंतर तहहयात मिळणारा बैठा पगार; निवृत्तिवेतन.

**पेन्सिल** स्त्री. १. दगडी पाटीवर लिहावयाची दगडी कांडी. २. (कागदावर लिहावयाची) शिसपेनसिल. [इं.]

**पेपर** पु. १. कागद. २. (परीक्षेची) प्रश्नपत्रिका. ३. वर्तमानपत्र.[इं.]

**पेपरमिंट** न. १. पुदिन्याचा किंवा एका विशिष्ट वनस्पतीचा अर्क. २. हा घालून केलेली मिठाई; गोळी. [इं.]

**पेपाणी, पेंपेरे** स्त्री. न. (पानाची) पिपाणी; वाजविण्याची पोंगळी; पुंगी; नळी; शिटी.

**पेमने** न. (निंदार्थी) पाणचट, पातळ पदार्थ. (व.)

**पेय** स्त्री. गुरांच्या पोटातील एक रोग. (कु.)

**पेय** न. पिण्याचा पदार्थ.
वि. पिण्यास योग्य; पिण्यासारखे.

**पेर** स्त्री. पेरूचे झाड. (को.,गो.)
न. पेरू; जांब.

**पेर** पु. १. बैलाकडून मळली जावीत म्हणून खळ्यामध्ये कणसे वगैरे पसरणे; पात; अशा रीतीने पसरलेली कणसे. (क्रि. घालणे). २. (पेरल्याप्रमाणे) धान्य, फुले, कागद, वस्त्रे, निरुपयोगी वस्तू यांची पडलेली पखळण, पसरण. (क्रि. घालणे, करणे, होणे, पडणे). अशा रीतीने पडलेल्या वस्तू. [सं.प्रदर]

**पेर** स्त्री. बी; बीज; पेरणी.

**पेर, पेरके** न. १. बोट, ऊस, वेळू इ. चे कांडे; तुकडा; पेरें; वेळू वगैरेच्या दोन गांठींमधील भाग. [सं.पर्वत्]

**पेरअळू** न. एक झाड; गेळ.

**पेरओल** स्त्री. पहा : **पेरवल**

**पेरकंड** न. ज्वारीच्या ताटाचे, धांड्याचे पेर. (व.)

**पेरकूट** न. एक प्रकारचा निवडुंग.

**पेरकूं** न. १. मोडलेले, खडबडीत, निरुपयोगी पेर; कांडे. २. बोरू. ३. (ल.) खेकटे; अडचण; त्रास; लचांड.

**पेरगाव** स्त्री. जाहिरात; दवंडी. (गो.)

**पेरगावकार** पु. दवंडी पिटणारा. (गो.)

**पेरण** न. पाण्याच्या आश्रयास वाढणारे सुंदर पानांचे झाड. हे सावलीत ठेवून यास पाणी घातल्यास हिरवेगार राहते. [इं.फर्न]

**पेरण–णे** न. (प्र.) पेहरण. [सं. परिधान]

**पेरणे** उक्रि. १. उगवण्यासाठी जमिनीत बी टाकणे, लावणे. २. पसरणे; पसरून टाकणे; फेकणे; सांडणे. ३. (ल.) पाया घालणे; आरंभ करणे; उत्पन्न करणे. ४. (ल.) पसरणे; फैलावणे (बातमी, खबर, चुगली, कंड्या इ.). ५. (ल.) विद्यादी गुण प्रसृत व्हावयासाठी शिष्यादिकांस शिकवणे. ६. (ल.) अधिक प्राप्तीच्या इच्छेने (व्याजाच्या बोलीने) धन इ. दुसऱ्यास देणे. [सं.प्र + ईर्]

**पेरणी, पेरा** स्त्री. पु. शेतात बीज पेरणे; पेरणी करणे; बीजारोपण.

**पेरव** स्त्री. पहा : **पैरवी**

**पेरवल** स्त्री. बी पेरण्यायोग्य असा जमिनीतील ओलावा.

**पेरीव** वि. १. पेरल्यामुळे उगवणारे; सहजगत्या, आपोआप न उगवणारे. २. पेरलेली (जमीन). ३. पेरलेले (बी, धान्य).

**पेरसवाणा** वि. खिन्न; उदास; उद्विग्न. (व.)

**पेरसोन** वि. ज्याचे कान मोठे व डोळे मनुष्यासारखे आहेत असा (घोडा). हे शुभलक्षण होय.

**पेरा** पु. (सोनारी) सोन्याच्या कांबीच्या गोल सळया बनविणे (अंगठी इ. करण्यासाठी).

**पेराज** स्त्री.(नाविक) होडीच्या काठावर ठोकलेली आडवी जाड फळी. ही सर्व गलबतांना नसते. (को.)

**पेरांची अवटी** सोनाराची अवटी. एक प्रकारचा पेरे किंवा सांधे असलेला एक पंचरस धातूचा तुकडा. याला आडवे रवे असतात. पहा : **वावाची अवटी, बेटणी**

**पेरुजा, पेरोज–जा, पिरोजा** पु.न. वैदूर्य; एक रत्न. [फा. फिरूझा]

**पेरुळ्या** पु. चरकात घालावयाची उसाची पेरी तोडणारा मुलगा, माणूस.

**पेरू** पु. उष्ण कटिबंधात आढळणारा वृक्ष. उंची ५–९ मीटर, पाने लांब व गोल, फुले लहान पांढरी, फळ मध्यम आकाराचे, गोलाकार, पण देठाजवळ निमुळते. कच्चे फळ हिरवे तर पिक्के फळ पिवळ्या रंगाचे,

चवदार मगजामध्ये बारीक बिया.

**पेरे** न. १. पेऱ्याच्या अवटीवर ठोकून ठसे, छल्ले पाडलेली सोन्या-चांदीची सळई. २. पहा : **पेर-पेरके** १,२. [सं.पर्व]

**पेर्ण** स्त्री. सरकस. (गो.)

**पेऱ्या** पु. घेवड्याची एक जात.

**पेर्वी** स्त्री. जुन्या काळातील एक प्रकारचा दागिना. (गो.)

**पेर्वीचा** न. पेर्वी करण्याचे सोनाराचे एक हत्यार. (गो.)

**पेल** पु. तोलण्या-सावरण्याची क्रिया. पहा : **पेलाव**

**पेलकट** न. निंदा; आरोप; आळ. (क्रि. घालणे, येणे).

**पेलण-णा** न स्त्री. १. तोल राखणे; पेलणे; समतोल. २. वजन; वर्चस्व; जोर. (क्रि. चालवणे, चालणे).

**पेलणे-ने** न. छपरावरील गवत उडू नये म्हणून त्यावर आडवी ठेवलेली ताड इ. ची फांदी. या कामाकरिता जर जंगली लाकडाचा उपयोग केला असेल तर ते आडवे न ठेवता मुगळापासून लोंबते (वरून खाली असे) ठेवतात. (को.)

**पेलणे** सक्रि. १. समतोल राखणे; तोल सांभाळून धरणे; स्थिर, समतोलात राखणे (ओझे, उभी काठी इ.); वाढणे. २. शरीर दृढ करण्यासाठी मुद्गल, लेजीम इ.फिरविणे. ३. (ल.) निभावणे; झेपणे; रेटणे; पार पाडणे (अडचणीतून); आटपणे; चालवणे; व्यवस्था लावणे (पैसा, शक्ती, बुद्धी इ. कांच्या जोरावर). ४. दामटणे; हाकलणे; पुढे लोटणे (मनुष्य, जनावर); पुढे रेटणे; ढकलणे; धकविणे (सैन्य); दवडणे; पाठविणे (दूत). ५. लोटणे : 'राम पहाया पेलती ।' - वेसीस्व ९.७३. ६. घर, खांब. इ. एका बाजूला कलणे. ७. तयार होणे : 'तंव पुढां वाढी पेले । नवेया देहांची ।'- ज्ञा १५.१६०. ८. भरणे. [सं.प्रेर, प्रेरण, प्रेरय]

**पेलव** स्त्री. पेळू. (को.)

**पेला** पु. १. धातू, काच, माती इ.चे पाणी, पेय पिण्याचे भांडे; प्याला. २. (विणकाम) ताण्याच्या सुतांचे आलटून पालटून वर-खाली होण्याने त्यात पेल्यासारखा होणारा आकार. ३.(शिवणकाम) सरदारी अंगरख्याचा (छातीवरील) पेल्यासारखा गोल भाग : 'गिर्वाणावरून उजवे कडील पेल्याच्या आकारास त्या आकाराची पट्टी बसवावी.'- शि २.२०. [वैदिक सं. पेरु.; फा. प्याला]

**पेला, पेले** पु. न. काट्यांचा, झाडांच्या डहाळ्यांच्या कुंपणाकरता बांधलेला भारा, ओझे. (कु.,को.)

**पेला** पु. प्रेरणा; उत्कर्ष : 'ते अभिमानासि बुधि सांगता : अहंकारातें दक्ष करिता : अहंतेसी पेला देता : दुजा नाही' - मूप्र २१८१.[सं.प्रेरणा]

**पेलाव, पेल** पु. १. उचलणे, तोलणे (वाहून न्यायचे ओझे); शरीर पेलणे किंवा समतोल राखणे (उडी मारण्याच्या वेळी); शरीराचा तोल. २.(प्रयत्नाचा कामाशी मेळ बसण्याकरिता) निश्चित व संघटित प्रयत्न.

**पेलिणे** क्रि. पोसणे.

**पेली** स्त्री. १. ओली साल; लाकूड : 'कलियुगांतीं कोरडीं। चहूं युगांचीं सालें सांडी । तंव कृतयुगाची पेली । देव्हडी पडे पुढती।' - ज्ञा १५.१२९. २. उत्पत्ती. [सं.प्रालि]

**पेलू** स्त्री. केसांच्या जटा; जटांच्या केसांचा झुबका. पहा : **पेळू**

**पेलोवेली** स्त्री. वाढ; वृद्धी: 'पाठीं रूपपत्र पेलोवेलीं । चक्षु लांबतें कांडें घाली ।'- ज्ञा १५.१०२. [सं.प्र + ईर]

**पेल्याड** स्त्री. पैलतड; पलीकडील जागा; पैलाड. (गो.)

**पेल्ल** पु. चेंडू. (गो.)

**पेव** न. धान्य साठविण्याची जमिनीतील कोरडी विहीर; जमिनीतील कोठार.[त.पयंवु=खळगा] (वा.) ० **फुटणे-उघडणे** - भराभर बाहेर पडणे; गोळा होणे. ० **भरणे** - (बायकी) चातुर्मासात देवापुढे सुमारे कोळवेभर धान्य मावेल असे दोन खळगे काढून एकात तांदूळ व एकात दाणे घालण्याचा संकल्प करून उदक सोडणे, रोज तसे करणे. **पेवात पडणे** - मोठ्या संकटात, त्रासात पडणे.

**पेवडी** स्त्री. पिवडी; पिवळा रंग; पळसाची फुले गोमूत्रात भिजवून तयार केलेला पिवळा रंग.

**पेवणी** स्त्री. पोहणे. (क्रि. मारणे, टाकणे). (राजा.)

**पेवणे** अक्रि. पोहणे. (राजा.)

**पेवने** न. जोंधळ्याच्या पिठाचा एक खाद्यपदार्थ : 'आउर्सी पेवनें रांधिले'- गोप्रच १८८.

**पेवली** स्त्री. विड्याची पाने ठेवण्याची टोपली. (व.)

**पेवंदी-धी** स्त्री. झाडाचे कलम बांधणे; कलमबंदी.
वि. १. कलम केलेले (झाड). २. ठिगळ लावलेला; ठिगळाचा. [फा.पेवंद]

**पेश** पु. झगा. [फा.]

**पेश** वि. वजनदार; सरकारात मान-मान्यता असलेला; सन्माननीय (माणूस इ.) : 'राजकारणात बहुत पेश.'- पेद २१.९१.[फा. पेश्] (वा.)
० **करणे** - सादर करणे; पुढे ठेवणे; अर्पण करणे.

**पेशक** वि. घुसलेला.

**पेशकदमी** स्त्री. १. पाऊल पुढे टाकणे; प्रगती : 'दिवसेंदिवस त्याचे फौजेची पेशकदमी आहे.'- मइसा ६.४३७. २. पहिली हालचाल, युद्धाची हालचाल : 'जितका मुलूख आपले काबूंत येईल तितका पुर्तेपणें बंदोबस्त करून मग पुढें पेश-कदमी करणें ठीक आहे.'- दिमरा १.१८०. ३. आगळीक : ' आम्हांकडून अंतर नसतां तिकडून पेशकदमी झाली तेव्हां इकडून पेशकदमीची तर्तूद करणें प्राप्त झालें.'- ऐलेसं ८.४०२८. [फा.]

**पेश(ष)कबज, पेशकबाज, पेषकब्ज** न. एक प्रकारची कट्यार; सुरा : 'तिणें पेशकबज चालविलें तें मांडीवर लागू जाहलें.'- ऐटि १.१६. [फा. पेश्कब्ज़्]

**पेशकश(श्क)-ष, पेशकसी-शी** पु. देणगी; मानपान; वंशपरंपरागत हक्क इ. मिळाला असता त्याबद्दल सरकारला द्यावा लागणारा नजराणा, खंडणी, रक्कम : ' त्या फर्देवर पातशहानीं दस्तक केलें माकूल पेशकस सरकारांत दिधलियां देऊं.' -दिमरा १.२४०. [फा. पेश्शक]

**पेश(ष-स)कळी** स्त्री.अंगरख्याला पुढच्या बाजूला लावलेला त्रिकोणाकृती तुकडा; पुढच्या बाजूला येणारी कळी. [हिं.]

**पेशकार** पु. १.मदतनीस; नायब; मुतालीक; अर्ज पेश करणारा;

व्यवस्थापक; प्रधान; मुनीम. २.फडणीस; अवल कारकून; नायब तहसीलदार. (व.)

**पेशखाना, पेशखेमा** पु. प्रवासात अगोदर पुढे पाठवायचे डेरे वगैरे मुक्कामाचे व बिऱ्हाडाचे सामान; प्रस्थानमंडप : 'नेरल्याहून पांच कोस तेथें पेशखेमा पाठविला आहे.'- दिमरा १.८६. [फा.]

**पेशगह** सभा. - ऐको.

**पेशगी, पेश्गी, पेसकी** स्त्री. आगाऊ दिलेली खर्ची; इसाऱ्यापैकी आगाऊ. [फा.पेश्गी]

**पेशदस्ती** स्त्री. १. व्यवस्था; पैरवी: 'मोहिबांकडून असें अमलांत येत असतां सरकार तर्फेनें पेशदस्ती होत नाहीं.'- मइसा १०.१२८. २. चाल.

**पेशवा** पु. मुख्य प्रधान; पंतप्रधान; मराठ्यांच्या राज्यातील सातारच्या छत्रपतींचे मुख्य प्रधान. [फा.]

**पेशवाई** स्त्री. प्रधानकी; पेशव्यांचा अंमल, कारकीर्द, पदवी.

**पेश(ष)वाज, पेशवात-द** पु. पुढे खुला असलेला विशेषत: नर्तकी घालतात तो झगा. [फा.पेश्वाझ]

**पेशस्क(स्का)र** स्त्री. कुंभारीण माशी.

**पेशा** पु. धंदा; उद्योग; वृत्ती; रोजगार; बाणा; काम; खाते. [फा.]

**पेशा(सा)ब** पु. मूत्र; लघवी. (क्रि.करणे). [फा.]

**पेशिकी** स्त्री. सजीवांच्या वनस्पतींच्या पेशींचा अभ्यास करणारे शास्त्र.

**पेशी** स्त्री. जीवघटक; सजीव सेंद्रिय पदार्थाचा अतिसूक्ष्म एकक.

**पेश्मानी** स्त्री. पस्तावा; दु:ख : 'सर्वांनीं तीर्थरूपाचे आज्ञेचे आधीन रहावें हें ज्यास अमान्य त्याजकडेच पेश्मानी, बुद्धिदोष, दूषण.'- चंद्रचूड दप्तर १३९. [फा.]

**पेषण** न. दळणे; जात्यातील दळण : 'दळण कांडण पेषण चाळणें।'- सारुह ३.५२. [सं.]

**पेष(स)णूक** स्त्री. दुसऱ्यावर पिशाच्च घालणे; दुसऱ्याला उपद्रव देण्याकरता भूत उठवणे. [सं.प्रेषण]

**पेषणे** उक्रि. दळणे; पिसणे.

**पेस** स्त्री. फाक; तुकडा; शकल; फोड (काकडी इ.चा). (राजा.)

**पेस** वि. ओस; मोकळा; वस्ती उठलेला; निर्मनुष्य.

**पेसणे** उक्रि. १. पहा : **पेषणूक.** २. फोडी करणे; चिरणे.

**पेसपाड** स्त्री. ताळतंत्र.

**पेस्तर** वि. पुढील; पुढील काळचा; आगामी; भावी. (समासात) पेस्तरसाल - वर्ष- मास- दिन-रोज. इ. [फा.पेस्तर]

**पेह** पु. पोटफुगी; जलोदर: 'पेहाचें पोट विस्तीर्ण ।'- दास ३.६.२०. [फा.]

**पेहरण** न. पहा : **पेहराव** [फा.]

**पेह(हे)रणे** उक्रि. परिधान करणे; अंगात घालणे; पांघरणे.[हिं.पहिरना] [सं.परिधान]

**पेह(हे)राव, पेहरवा, पेराव** पु. पोशाख; पोशाखाची तऱ्हा. [हिं. पहिरना; सं. परिधा]

**पेहर्णी** स्त्री. ओढणी; उत्तरीय.

**पेहे** न. पेय पदार्थ : 'तया ओरसे देतुसे पेहें।'-ऋ २. [सं.पेय]

**पेळ** स्त्री. अंगण, खळे इ. च्या भोवतालची वरवंडी; उंच बांधा.(कु. माल.)

**पेळणी** स्त्री. भांड्याचे तोंड रुंदावण्याचे हत्यार.

**पेळी** स्त्री. कडधान्याचे कळण; कट. (गो.)

**पेळी** स्त्री. बांबूच्या वेळांची किंवा वेताची लहान करंडी; संबळी; पेटारा (स्नानसंध्येचे सामान ठेवण्याचा).

**पेळू, पेळव-ए** पु.स्त्री. १. कापूस, काथ्या, लोकर इ. ची थोडा पीळ घालून केलेली वळकटी किंवा दिलेला वातीसारखा आकार. (को.) २. गुरांचा एक रोग.
न. गुरांच्या पेळूसारखे माणसाला होणारे खांडूक; उठाणू .
वि. नि:सत्त्व; अशक्त; लवकर दमणारा.

**पेळेर** पु. काश्याची पितळी. (गो.)

**पेक्षा** उअ. हून; अपेक्षेने. [सं.अपेक्षया]

**पेक्षा, पक्षी** क्रिवि. ज्या अर्थी; त्याप्रमाणे; म्हणून; असे झाल्यामुळे. (ज्या त्या, या शब्दांना जोडून प्रयोग). [सं.पक्ष]

**पेंक** न. पोक; कुबड; पोंग; कोंग.

**पेंका** पु. बेडकाच्या जातीचा एक प्राणी.

**पेंका-क्या** वि. कुबडा; पोक असलेला.

**पेंग** स्त्री. डुलकी; झोपेमुळे मान डोलणे. (क्रि. येणे). [सं.प्र + इंग्]

**पेंगणे** अक्रि. १. (झोपेच्या गुंगीमुळे) डुलकी घेणे. २. लंगडणे; एका पायावर चालणे. ३. (रोगादिकांनी) निरुत्साही, उदास होणे; दुबळेअशक्त होणे. [हिं.]

**पेंग(गु)ळणे** अक्रि. निरुत्साही, उदास होणे; अशक्त होणे; ग्लानी किंवा सुस्ती चढणे; नि:सत्त्व होणे; गळणे. [सं.प्र + इंग + ग्लै]

**पेंगळा** वि. ढिला; जड; सुस्त; निरुत्साही; उदासीन; कमजोर.

**पेंगूळ** पु. एक घाण वास सोडणारा कीटक; पिंगूळ.

**पेंग्विन** पु. दक्षिणध्रुवालगतच्या प्रदेशात आढळणारा, पोहण्यासाठी मोठे पंख असलेला सागरी पक्षी. पोटाकडची बाजू पांढरी व वरची काळी, चोच टोकदार व निमुळती.

**पेंड** स्त्री. भुईमुगाच्या शेंगा, तीळ, खोबरे इ. गळीत धान्यातील तेल काढून घेतल्यावर राहणारा चोथा.
पु. १. पायाला किंवा जोड्याला चालताना चिकटणारा चिखलाचा गोळा; धान्याचा किंवा दुसऱ्या ओल्या पदार्थाचा भिजून झालेला लगदा. २. कोवळ्या नारळांचा घड; नारळीस येणारा शहाळ्यांचा झुबका. ३. (शेकण्यासाठी) चेचलेली आणि ऊन केलेली पाने; दुखलेल्या भागावर बांधायचा नारळाचा चव. ४. वेठीला धरलेल्या मनुष्यांनी वाहिलेले ओझे; अशा तऱ्हेने वेठीचे ओझे वाहणे. ५. घराच्या पाटणीवर किंवा ओमणावर पसरलेला मातीचा थर. ६. मोठे ढेकूळ; मातीच्या भिंती इ. घालताना वापरलेला मातीचा गोळा; भेंडा.[सं. पिण्याक, सं. पिंड] (वा.) ० **टाकणे-** लागवडीस आणण्याच्या जमिनीवर बाजूच्या खुणेसाठी ढेकळे टाकून बांध-वरुळ्या घालणे. ० **वळणे** - १.(मोठ्या प्रमाणात, माणसे जनावरे

इ.) मरणे; आजारी पडणे. २. घरात अडकविणे; कोंडणे.
**पेंड** पु. (मुद्रण.) सरस चिकटविण्याचा रुळाचा दांडा.
**पेंडओल** स्त्री. पहा : **पेरवल**
**पेंडकवणी** न. गजमदाच्या गोळ्यातून गळणारे पाणी : 'तैसे गजमदांचे पेंडकवणी भूमीवरी : पडत दिसे'- रुस्व ९२२.
[सं.पिंडक+पानीय]
**पेंड(ढ)का-की-के** पु.स्त्री.न. गवत, कडबा इ.काचा भारा, गठ्ठा.
**पेंडके** न. दोरीचे पेंढे किंवा धातूचे कडे. पहा : **पेंढे** [सं.पिंड]
**पेंडखजूर** पु. ओला, लगदा, गोळा झालेला खजूर.
**पेंडगूळ** स्त्री. एक मोठी वेल.
**पेंडपोहो** पु. आळशी; ऐदी; जड; काही केले तरी जो काम करीत नाही असा मनुष्य.
**पेंडवल** स्त्री. जमीन ओली होणे. पहा : **पेरवल**
वि. १. (क्व.) (थोडा पाऊस झाल्यामुळे) किंचित ओली झालेली (जमीन). २. (जोंधळा या शब्दासह प्रयोग) कणसात दाणा असलेला.
**पेंडवळा-ळे** पु.न. १. मर्यादा; सीमा : 'लाजेचा पेंडवळा । खाणोनि घाली।' - ज्ञा १३.६९५. २. (ल.) भेंडोळा : 'तरि हे गंधर्वनगरीचे उमाळें । जाण पोकळीचे पेंडवळें।'- ज्ञा ११.४६४. ३. शेताचा बांध.
**पेंडस** पु.न. दोन हात लांब, लाकडी दांडा असलेले व खाली चापट सरळ टोक असलेले खोदण्याचे एक लोखंडी हत्यार. (को.)
पु. खळगे खणण्याचे फावडे; खळगे करण्याची लाकडी पहार. याच्या लोखंडी पात्याला भाल म्हणतात. (राजा.)
**पेंडसळ, पेंडसा** स्त्री.पु. पावसाळा संपल्यानंतर घराच्या वाश्यांवर पसरून टाकलेल्या गवताच्या पेंढ्या, ओमण.
**पेंडळी** स्त्री. पुष्टता. - हंको.
**पेंडा** पु. १. ओल्या गवताचा किंवा वड इ. झाडांच्या पानांचा भारा. २. भाताचे काड; भात्याण. ३. विस्तव कायम राहावा म्हणून चुलीतल्या आहाराखाली, फुफाट्यात ठेवलेला, अर्धवट वाळलेला शेणाचा गोळा. [सं.पिंड]
**पेंडा, पेंडार-री, पेंडी** पहा : **पेंढा, पेंढार** इ.
**पेंडापट्टी** स्त्री. फळझाडावर बसविलेला कर.
**पेंडाऱ्या** वि. एका गावापासून दुसऱ्या गावापर्यंत ओझे नेण्यास वेठीस धरलेला माणूस.
**पेंडाळू-लु-लू** न. पु. एक प्रकारचा कंद.
**पेंडी** स्त्री. पानमळ्यात होणारा एक कंद. उपवासाला खातात. (व.)
**पेंडी** स्त्री. सणंग; मालाचा बांधलेला गठ्ठा; (इं.) पार्सल. [सं.पिंड]
**पेंडीचा खडा** गाणाऱ्या किंवा नाचणाऱ्याच्या कुरूपतेवरून श्रोते मंडळींचे लक्ष दूर करण्याकरिता तमासगिरांमध्ये बसविलेला सुंदर, खूबसुरत मनुष्य.
**पेंडीचे गुरू** १. पेंडीची आवड असलेले, पेंडीवर पोसलेले जनावर. २. (ल.) लाचखाऊ, लाच घेणारा मनुष्य.
**पेंडुके** न. गोळी.
**पेंडे** न. १. मोत्याच्या सरांची माळ. २.बिरडे; मुदन (दाव्याची, दावणीची, गाड्याच्या घोडकीची इ.). ३. एका गट्टीतील, मेळातील, परस्पर संबंध असणारी मंडळी; टोळी; जूट; जमाव. (को.) ४. (विणकाम) जुंपणी आणि अटणी जोडणारी दोरी; बैला अथवा बैलीची दोरमुदन. ५.(ढोरधंदा) गोफण मारण्यासाठी कातड्याची केलेली वस्तू- अंगठा. [सं.पिंड]
**पेंडोळा-ळे** पु.न. १. (दोर, नवार इ. ची) गुंडाळी; वेटोळे; गुंडी. २. भारा बांधण्याचे साधन; पेंढीचे बंधन (वळलेल्या गवताचे, ओल्या सालीचे, लवचीक वेलाचे). ३. शेताची हद्द, सीमा दाखविणारा बांध, कड, रस्ता, रेषा इ. ४. पेंडाची वळ; एका खेड्यातून दुसऱ्या खेड्याकडे जाणाऱ्या ओझ्याने लादलेल्या वाहनांची किंवा वेठीस धरलेल्या लोकांची रांग. ५.(ल.) क्रम; परंपरा; (यावरून) रूढी; वहिवाट; नित्यक्रम.
**पेंढ** स्त्री. (गो.) पहा : **पेंड १**
**पेंढर-रा-री** पु.स्त्री. एक प्रकारचे झाड. यास पेंढरे किंवा तूपकेळे असेही म्हणतात.
**पेंढा** पु. १. भाताचे तृण, भात्याण. (को.) २. भात्याणाचा भारा, मोठी पेंडी. ३. भात्याणाच्या तीन घाडांचा भारा. ४. जोंधळे भिजत घालून व आंबवून तयार केलेले पेय. गुरे किंवा माणसांसाठीचे भातेणापासून तयार केलेले पेय. [सं.पिण्ड = गोळा होणे]
**पेंढार-रा-री** नपु. १. लुटारू लोकांची टोळी, समुदाय; पेंढारी लोक. २. (विशेषत:) पेंढारी लुटारूंची धाड. (क्रि. घालणे). ३. गाई-म्हशींचे कळप घेऊन फिरणारे अहीर वगैरे. [सं.पिंडार = गवळी]
**पेंढी** स्त्री. १. गवत, कडबा, भाजी वगैरेची जुडी, लहान गठ्ठा; कापलेल्या जोंधळ्याच्या ताटांची मुठीत मावेल अशी गड्डी. २. पहा : **पेंढे** १. ३. (कर्ज, व्याज इ. चे) ओझे; भारा. (क्रि. जमणे, होणे, असणे). ४. वस्त्राचा गठ्ठा. (गो.) (वा.) **(जळत्यात) पेंढी टाकणे** - भांडणास उत्तेजन देणे.
**पेंढीकाडी** स्त्री. (व्यापक) पेंढ्या.
**पेंढे** न. (विणकाम) १. बैलीच्या गुलड्याला अडकविलेले धातूचे कडे किंवा दोरीची मुदन. दोरीचे एक आठ बोटे रुंदीचे वाटोळे कडे असते व ते आर, चाळ, तनकूल, गुलडा वगैरेंना ताण देण्यासाठी उपयोगी येते. २. ढेकणी आणि वही यांना सांधणारा दुवा.
**पेंढ्या** पु. मुलांचा एक खेळ. यात प्रत्येकाजवळ एक-एक पेंढी असावी लागते. हा पावसाळ्यात खेळतात.
**पेंद** न. गवत, भात वगैरेंचा जुंबडा; गवताच्या एका बीजापासून अनेक अंकुर फुटून होणारा विशिष्ट समुदाय; नारळाचा घड. (को.)[सं.पिंड]
**पेंदवी** पहा : **पेंद ३**
**पेंदळा-ळे** पु. न. वेटोळे : 'एकासि लोंबती, आंताचे पेंदळे : हुळ लागली जेथे'- रुस्व २१९३. [सं.पेट्ट]
**पेंदारणे** अक्रि. १. पेंद होईल अशा रीतीने विस्तृत होणे, विस्ताराने वाढणे (गवत वगैरे). २. (जमीन) झुबकेदार पेंदांनी आच्छादित होणे. (कु.)
**पें(पों)द-दी-धी** स्त्री. १. प्याला, भांडे वगैरेची बैठक, बूड.

२. उडविण्याच्या पतंगाचा खालचा भाग. ३.कलमबंदी; पेंदवी. (क्रि. करणे, बांधणे).

**पेंदूर** न. कोकणात येणारे एक झाड. याला ज्येष्ठ, आषाढ महिन्यात पेरूएवढी फळे येतात. याची भाजीही करतात.

**पेंदो** पु. खेकड्याचा मगज किंवा पाय. (गो.)

**पेंधा** पु. गोळा.
वि. मोडका; पांगळा : 'जे अनंगु तो पेंधा । निकवडा नुसधा ।'- ज्ञा १३.९८०.

**पेंधे** न. पडीत जागेत, शेतात उगवणारे गवत.

**पॅकिंग** न. नाजूक किंवा किमती वस्तू इतरत्र पठवितांना किंवा नेतांना धक्का लागून नुकसान होऊ नये म्हणून विशिष्ट प्रकारच्या खोक्यात कागद, भुस्सा, थर्माकोल इ. घालून पोकळी भरून काढण्याची क्रिया.

**पॅटिस** न. गव्हाच्या पिठाच्या पातळ आवरणात मांस किंवा भाजी घालून तेलात परतून तयार केलेला पदार्थ.

**पै** स्त्री. आण्याचा बारावा भाग; पैशाचा तिसरा हिस्सा; अर्धी.[सं.पाद]

**पै** स्त्री. (मुद्रण.) त्यांच्या-त्यांच्या घरात न टाकता एकत्र गोळा झालेले, अर्थात निरनिराळ्या अक्षरांचे निरुपयोगी टाईप.

**पैआ** स्त्री. प्रतिज्ञा; वचन : पैआंतें फेडी तेआ श्रीगिरिजादेविची आण' - आपेगाव शिला I ३. [सं. प्रतिज्ञा]

**पैक-कु** पु. समुदाय : 'म्हणूनि प्राणियांच्या पैकीं । पडिली श्रद्धा अवलोकीं।'-ज्ञा १७.६१. [क.; सं.पक्ष]

**पैकडी** स्त्री. मधमाश्या राहतात तो पोळ्याचा भाग. (राजा.)

**पैक(ख)णे** सक्रि. वाट पाहणे; मार्गप्रतीक्षा करणे. [सं.प्रतीक्षा]

**पैका** पु. १. पैसा; द्रव्य. २.रुक्क्याचा चवथा भाग किंवा शिवराईचा बारावा भाग. ३. पैसा; चार कवड्या. (व.)[लॅ.पेक्यु - पेक्युनिया = पैसा; इं.पेक्युनियरी]

**पैकाना** पु. नारळाच्या झाडाच्या पान, विरी, डहाळ्या इ. चा (घाण लोटण्यासाठीचा) खराटा. (राजा.,को.) [फा. पाखाना]

**पैकाळा** पु. घरकाम, मालमत्तेचे संरक्षण इ. करण्यासाठी ठेवलेला पगारी किंवा भाडोत्री नोकर. (को.)

**पैकी** शअ. अनेकांमधील, मधला; अनेकांतील. [क.पैक, पैकी]

**पैगंबर** पु. ईश्वराचा दूत; स्वर्गाहून निरोप आणणारा. मोसेस, येशू, महंमद आणि अल्ली यांस काहीशा विशेष अर्थाने व भेदाने हा शब्द लावतात. [फा.]

**पै(पे)गाम** पु. १. विनवणी; उपाय; युक्ती; मार्ग काढण्याचा किंवा प्रवेश मिळविण्याचा प्रयत्न. २. पत्रव्यवहार, दळणवळण चालू करणे, निरोप, युक्तीने बांधलेले संधान इ. च्या साखळीचा दुवा, एकरूपता; परस्पर माहिती किंवा संदेश; खटपट (क्रि. करणे, बांधणे, घालणे.) ३. बोली (तहाची) : 'तहोत्तर पांचसावेरोजीं सुलुखाचा पेगाम नबाबाकडून आला.'- पेद १.१.

**पैगामा** पु. ढवळाढवळ; धुमाकूळ; दंगा :'अशी ताकीद देवावी कीं तुमचे फौजेपैकीं कोणी पादशाही मुलखांत पैगामा करूं नये.'- मइसा ८.७७. [फा.]

**पैची** स्त्री.इलायची.(अहि.)

**पैज** स्त्री. १. होड; शर्यत. २. पण; प्रतिज्ञा. ३. करार; ठराव; वायदा; बोली.

**पैजार** स्त्री. पायताण; विशेषत: मुसलमानी पद्धतीचा जोडा.[फा.पैझार]

**पैजारपगडी- पागोटे** स्त्री.न. विशेष रीतीने पैजाराच्या डोलाने बांधलेले पागोटे. [फा.पैजार + हिं. पगडी]

**पैजाळ** वि. उग्र; प्रखर : 'तळीं सूदलीं आसना सात प्रेतें । शिरीं बांधिलें व्याल पैजाळ जेथें ।'- मुरामा युद्ध २१३. [सं.प्रज्वल]

**पैठ** पु. १. परिपाठ. २. रीतिरिवाज. ३. प्रस्ताव; मार्ग; प्रवेश होणे. पहा : **पैठा**. ४. पद्धत. (व.) [हिं.पैठा; सं.प्रविष्ठ]

**पैठणी** स्त्री. १. रेशमी,रुंद, नक्षीदार, जरीकाठी, पदरावर वेगवेगळी नक्षी (विशेषत: मोर) असलेले लुगडे. २. पैठणगावी विणलेले लुगडे.
वि. १. पैठण गावासंबंधी; त्या गावाचे (पागोटे इ.). २. (ल.) पोकळ; खोटा; दिखाऊ; लबाडीचा. [सं.पट्टन, प्रतिष्ठान]

**पैठणे** अक्रि. १. प्रविष्ट होणे. २. बसणे : 'मग पैठें होइजे महापदीं । निजात्मयोगें ।'- स्वादि १०.४.६१. [हिं. पैठना]

**पैठनी** वि. कर्तृत्ववान (स्त्री). (अहि.)

**पैठा** पु. प्रवेश; शिरकाव : 'भीतरीं जाहला पैठा । मारिला व्याधीचा कुरठा ।' - कालिकापुराण २७.२. २. अंकित. [सं.प्रविष्ट]

**पैण** स्त्री. नायट्यासारखा एक रोग; आगपेण.

**पैण** स्त्री. पैज; होड; शर्यत; करार. (क्रि. करणे, घालणे). [सं.प्रतिज्ञा] (वा.) ० **भोगणे, बाळगणे, पाळणे, धरणे, मारणे** - १.आग्रहाने, निश्चयाने पाठपुरावा करणे; एखादी गोष्ट करण्याची धमक बाळगणे. २. एखाद्याबद्दल तिरस्कारयुक्त आदर असणे.

**पैणन** न. वाळलेले गवत; पयेण. पहा : **पह्याण**

**पैत** वि. सात. (नंदभाषा)

**पैतृक,पैत्र** वि. पूर्वजांसंबंधी; वाडवडिलांसंबंधी. [सं.]

**पैत्तिक** वि. पित्तासंबंधी. [सं.]

**पैदा** वि. मिळविलेले; संपादित, प्राप्त केलेले; निर्माण केलेले. [फा.]

**पैदागिरी** स्त्री. उकळणूक; (बहुधा जुलमाने) केलेली वसुली, घेतलेले धन : 'दरीं वख्त पनालेस विजापूरहून एक हवाल्दार गैरमहसूल पैदागिरी कबूल करून आला.'- इऐ ५.१००. [फा.]

**पैदास-स्त** स्त्री. १.नफा; फायदा; मिळकत. २. उत्पत्ती; उत्पन्न; उपज; निपज. ३. अमदानी : 'पैदास्ती वरील नेमणुकीमुळें साहुकारांस उपद्रव होऊन साहुकारी बुडेल.'- मराआ ३६. [फा. पैदाइश]

**पैन** पु. घोड्याचा एक रोग; शिंगाडा. याने कानात मांस वाढते, छेद बंद होतात, पिवळे पाणी निघते. - अश्वप २.१३५. पहा : **पैण**

**पैबंद** ठिगळ; जोड; चकती.

**पैबंदी** स्त्री. १. बंधन; व्यवस्था : 'स्नेहाचे वृद्धीची पैबंदी करीतच आहों.'- दिमरा १.३९. २. पहा : **पेवंदी** [फा.पैवंद = संबंध]

**पैमा** कापडाचा प्रकार.

**पैमाल** वि. कःपदार्थ; तुच्छ. (ना.)

**पैमाश-ष-स, पैमाशी-षी, पैमायष** स्त्री. शेतजमिनीची मोजणी व नोंदणी; मोजणी; जमीन-धारापद्धती ठरविणे; सर्व्हे आकारणी :

'तीस वर्षाच्या पैमाषीची चाल मोडून कायमधाऱ्याची पद्धत सर्वत्र स्थापावी.'- आगर ३.११८. [फा.पैमाइश्]

**पैमाशदार** पु. मोजणीकामगार.

**पैयार** न. पायरी; टप्पा : 'येथ अग्नि हें पहिलें पैयारें ।' - ज्ञा ८.२२१. [सं.पद]

**पैरण** स्त्री. सदरा; अंगरखा. [सं.प्रावरण]

**पैरव-वी** पु.स्त्री. १. जाण्यायेण्याचा राबता; जाणे-येणे; दळण-वळण. २. संबंध : 'कितेक हुजूर येणार ते नाउमेद होऊन केलेली पैरवी सोडतील.'- राज १२.६७. ३. व्यवस्था : 'तदुत्तर महाराजानीं राज्याचा बंदोबस्त करावयाची हिंमत धरिली आणि पैरवीस लागले.'- चित्रगुप्त ७५. ४. विचार; वाटाघाट; चर्चा : 'पुढें ते कागद हस्तगत करून घ्यावेत या पैरवीत आहेत.'- ऐलेसं ९.५०४२. ५. पाठलाग : 'चहूंकडून तंग करून खुश्कींत पुन्हां पैरवी न करीत ऐसे केलें असता पातशाहींत नक्श.'- दिमरा १.६३. ६. मागे जाणे. ७. ढवळाढवळ. [फा.पैरवी]

**पैरा** पु. १. मजुरी करणारा; रोजकरी; हातकाम्या. (राजा. कु.) २. हंगाम; पाळी (तापाची). ३. इरजीक. पहा : **पारंगुळा** [सं. प्रदर]

**पैरा** क्रिवि. दूर; पलीकडे : 'पैरा गा ; पैरा गा ऐसें बोंबातु असे' - लीचउ २३८. [सं.परत:]

**पैरावणे** सक्रि. आच्छादणे; नेसवणे : 'पृथ्वी पैराविली कीर्तीचेनि क्षीरोदकें' - रुस्व २६९. [सं.परि+धा]

**पैरे** न. १. दिवसाच्या बोलीवर मजुरीवर लावलेली स्त्री किंवा मुलगा. (राजा.) २. रोजंदारीचे एका दिवसाचे काम; मजुरी. (क्रि. घालणे).

**पैरेपण** न. १. पैरे केल्याबद्दलची मजुरी. २. पैऱ्याचे काम.

**पैल** वि. दुसरा; समोरचा; पलीकडचा (तीर, किनारा, बाजू).
क्रिवि. पलीकडे. [सं.प्रति + ईर]

**पैल** वि. पहिला; आरंभाचा; प्रथमचा.
क्रिवि. प्रथमत:; आरंभी; सुरुवातीस.

**पैलत(थ)ड** न. पलीकडील किनारा; पैलतीर. (को.)

**पैलतीर,पैलपार** क्रिवि. पलीकडल्या तीरावर, पलीकडे.

**पैलवान** पु. मल्ल. पहा : **पहिलवान** [सं.प्रथम; प्रा. पहल]

**पैला** वि. दुसऱ्या, समोरच्या, पलीकडच्या तीराचा, बाजूचा.

**पैलाड** स्त्री. समोरचा, पलीकडचा किनारा, बाजू.

**पैलाड-वू** क्रिवि. पलीकडे.

**पैलू,पहिलू** पु. १. बाजू; कोन (विशेषत: रत्नाचा). २. रत्नाची एक बाजू; हिरा, माणिक इ. ना कोन पाडल्यानंतर चमकणारा दोन कोनांच्या मधला सपाट भाग. [फा.पहलू]

**पैलूदार** वि. घासून, पैलू पाडलेले; पैलू असलेले (रत्न इ.).

**पैवस्ता** क्रिवि. तीन वर्षांपूर्वी; तिगस्ता. (ना.; व.)

**पैवस्ती** स्त्री. १. पत्र, पत्रव्यवहाराचे पुडके इ. मिळाल्याची, दाखल झाल्याची तारीख; दाखल झाल्याची नोंद; दाखला; पोच. २. पोहोचणूक; येणे; आगमन : 'पुन्हां खुश्कींत त्यांची पैवस्ती न होय ऐसें जालें असतां सर्वांस चांगलें.'- दिमरा १.४४. ३. वसती; राहणे. ४. संबंध; दळणवळण. [फा.पैवस्त्]

**पैशाच, पैशाचिक** वि. पिशाचासंबंधी; भुताचा. (उपद्रव इ.)[सं.]

**पैशाचविवाह** पु. विवाहाचा एक प्रकार. कन्या चोरून आणून केलेला विवाह. मूर्च्छित, वेड्या, झोपलेल्या मुलीवर बलात्कार करून तिच्याशी प्रस्थापित केलेला विवाहसंबंध.

**पैशाची** पहा : **पिशाचभाषा**

**पैशु(शू)न्य** न. १. दुष्टपणा; दुराचारण. २. चहाडी; ठकबाजी; द्वेषबुद्धी; दोषदृष्टी : 'तया टाकिती इटाळें । पैशून्याची ।'-ज्ञा १६.४०१. ३. गुप्त दुर्गुण; दोष; व्यंग; न्यून; बिंग. ४. एखाद्याची अप्रतिष्ठा होईल असा त्याचा दोष - दुराचरण इ. प्रसिद्ध करणे. [सं.]

**पैष्टी** स्त्री. पिठापासून तयार केलेले मद्य.
वि. पिठाची. [सं.]

**पैस** पु. यत्न; प्रयत्न; प्रयास: 'नावेकु घालौनि उसासु । बोलावया केला पैसू ।'- नरुस्व ४४५. [सं.प्रयास]

**पैस** पु. १.जागा; स्थळ; मोकळी, विस्तृत जागा : 'पैस धरूनी चाला ठाकत ठायीं ठायीं ।'- तुगा ४६३. २. प्रसार; विस्तार; फैलाव : 'एऱ्हवीं विकाराचेनि पैसे । करी कीर इंद्रियांचेयाचि ऐसें ।'- ज्ञा ७.४७. ३. पाऊल; मार्ग : 'जेथ पुढील पैस पारुखे । मागील स्मरावें तें ठाके ।'- ज्ञा ६.६०. ४. ओंजळ; खोंग. (अहि.). ५. प्रवृत्ती.
वि. १. प्रशस्त; विशाल; विस्तीर्ण; अघळपघळ. २. दूर; लांब : 'पैस असे तोचि कळे ।'- सिसं ९.२७५.
क्रिवि. दाटी, अडचण न होई अशा रीतीने; ऐसपैस; प्रशस्तपणे; मोकळेपणें.
उद्गा. (रस्त्यावरच्या लोकांना संबोधून) दूर व्हा ! बाजू हटा ! रस्ता सोडा ! [सं.प्रसृ किंवा पार्श्व.]

**पैसणे** क्रि. १. प्रवेश करणे : 'तरी मज आंत पैसो । दिठी तुझी ।'- ज्ञा ९.७०. २. मरून जाणे. ३. पसरणे; फैलावणे.

**पैसा** न. १.तांब्याचे नाणे; एक दिडकी; दोन दिडक्या ढब्बू. २. द्रव्य; धन; संपत्ती; पैका. ३. तीन रुक्याचे अथवा साडेसात बिघ्याचे जमीन मोजण्याचे माप. ४. एक प्रकारचा किडा. पहा : **वाणी** [हिं. पैसा] (वा.) **पैसा(शा)पायली, पासरी** - अतिशय स्वस्त, मातीमोल. ० **न जळणे** - अतिशय श्रीमंत असणे. ० **मरणे** - निरुपयोगी होणे; व्याज, फायदा न मिळता मुद्दल देखील परत येण्याची आशा नसणे. **पैसे उडविणे** - अनावश्यक वस्तूत, चैनीत पैसे खर्च करणे. **पैसे खाणे** - लाच घेणे; अफरातफर करणे.

**पैसा अडका, पैसा रुका** (व्यापक) पैसा; नगदी रक्कम.

**पैसाखाऊ** वि. १. खर्चाचा; मौल्यवान (पदार्थ). २. पैसे खाणारा; डल्ला मारणारा.

**पैसार** पु. १. प्रशस्त रस्ता, मार्ग : 'ऐसा पवनाचेनि पाठारें । येतां धारणेचेनि पैसारें ।'- ज्ञा ६.५८. २. विस्तार; प्रसार. ३. अवकाश. [सं. प्रवेश = मार्ग, प्रसार]

**पैसाव** पु. १. विस्तृतपणे पसरणे. २. कमी झालेली दाटी, गर्दी; गर्दीनंतरचा मोकळेपणा; प्रशस्तपणा. [सं.प्रसृ]

**पैसाव(वि)णे** अक्रि. मोकळे, सुटे होणे; पसरणे; फाकणे; फैलावणे; विस्तारणे; दूर होणे.

**पैसाळू** पु. आयात माल.
वि. माल आयात होण्याजोगे (बंदर).

**पैसे** क्रिवि. बळाने; योगाने : 'त्या दिव्यचक्षूंचेनि पैसें । चहूंकडे जंव पाहत असें।'– ज्ञा ११.२६५.

**पैं** क्रिवि. पादपूरक, वाक्यालंकारार्थ अव्यय. ह्याचा अर्थ खात्रीने, निश्चितपणे : 'पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेवी अवचितें ।'– ज्ञा १७.६१. [सं.वै.]

**पैंगळ** पु. किडा; पिंगूळ; पैंगीळ (गो.)

**पैं(पै)जण** पु.स्त्रियांच्या पायातील रुप्याचा एक दागिना; नूपुर.

**पो** क्रिवि. सनई इ.सारखा आवाज होऊन.

**पो** पु. एकदम पडलेले शेण; शेणाचा लगदा; मोठी पोयटी. (वा.)
o **घालणे** – नको ते करणे.

**पोइशी** स्त्री. (वैशाखात) वायव्येकडून वाहणारा वारा.

**पोई** स्त्री. पाणपोई; (प्र.) पोय.

**पोईड** न. नदीत मिळालेला ओघळ; नाला. (राजा.,कु.)

**पोक–ग** न. कुबड; पोंग; पाठ, भिंत इ. ला आलेला बाक, वक्रता.
वि. वाकलेला; बाक आलेला (मनुष्य, इमारत इ.). (को.)

**पोकटा** पु. कोवळा नारळ. पहा: **खांकट–टा**

**पोक(का–को)टी** स्त्री. कोवळे पोफळ; सुपारी.

**पोकडी** स्त्री. मधमाश्यांचे जाळे, पोवळे, घर. (को.)

**पोकण** न. धान्यातील किडीने खाल्लेला पोकळ दाणा. (को.)

**पोकणे** अक्रि. १. पाठीस कुबड असणे; इमारत इ. झुकणे. २. वाढणे; पुष्ट होणे. [सं.पुष्ट]

**पोकळ** वि. १. भरीव नसलेले. २. (ल.) रिकामा; शून्य; फुसका; ढिला; सैल; वरकरणी; अर्थहीन; फोल (वचन); निरर्थक; व्यर्थ (भाषण); बिन फायद्याचा, फोल (धंदा, उद्योग); हलका; सोपा; क्षुद्र (नकाराच्या निषेधार्थ योजतात). ३. अनिश्चित; अनिर्णीत; पुरा न केलेला (हिशोब, बाब); मोघम; मुळमुळीत (भाषण).[सं.पुष्कर]

**पोकळ धोत्र्या, भट** (निंदार्थी) विद्या, धन, बुद्धी हे काहीच जवळ नसलेला ब्राह्मण; नुसता धोतरबडव्या मनुष्य.

**पोकळ ब्रह्म** (ल.) दिखाऊ, पोकळ काम, भाषण, बाब इ.

**पोकळसूत्री** वि. नेभळट; गबाळ्या; अव्यवस्थित (मनुष्य).

**पोकळी–ळा** पु. हातभर उंचीची एक पालेभाजी, देठ तांबूस असून माठासारखा, पाने तांदुळजासारखी. ही भाजी किंचित आंबट लागते.

**पोकळापोकळ–ळी** वि. १. पोकळ. २.(ल.) वरकरणी; निरर्थक; निष्फळ; निर्जीव; निकस; रिकामा; लभ्यांश नसलेला. [पोकळ द्वि.]

**पोकळि(ळी)स्त** वि. १. अनिश्चित; अनिर्णीत; दिखाऊ; हिशेबात न धरलेला (जमाखर्च). २. मोघम; निरर्थक; संदिग्ध (भाषण).

**पोकळी** स्त्री. १. पोकळपणा. २. पोकळ जागा; अवकाश; ढिलेपणा. ३. अनधिकार. (वा.) **पोकळीस, पोकळाखाली जाणे** – फुकट, व्यर्थ जाणे; निष्फळ होणे.

**पोकळी (पोळकी)** स्त्री. कागदाची नळी (बाण, काडतुसे ठेवण्याकरता).

**पोकळीक** स्त्री. पोकळपणा; रितेपणा; व्यर्थपणा.

**पोकारणे** अक्रि. पुकारणे: 'दुर होऊनि धाया पोकारिती ।'– क्रिपु ३५.६१.

**पोकू** वि. चार (४) : 'सेलू पोकू आणि ढकार आवारू खूण सांगती सत्वर।'– भवि ४२.४६. (नंदभाषा)

**पोके** न. मधमाश्यांचे मोहोळ. (को.)

**पोके** वि. नादान, नामर्द (माणूस).

**पोक्त, पोख्त–ख्ता** वि. १. प्रौढ; वयात आलेला; समंजस. २. पूर्ण; निपुण; पटाईत; वाकबगार; निष्णात. ३. पक्की; पक्व; चांगला विचार केलेली (बाब,गोष्ट). ४. विपुल; मुबलक; भरपूर; पुष्कळ; उदंड; अतोनात : 'त्यास येथें पोख्तें सामान असलें पाहिजे.'– पेद ३.१८९. ५. बळकट; मजबूत; भक्कम (इमारत); जाड, भक्कम (भांडे); वजनदार, मोठे (ओझे); मोठी, प्रशस्त, प्रचंड (वस्तू).[फा.पुख्त्]

**पोक्त(ख्त)गी** स्त्री. पक्वता; मजबुती; कायमी : 'आपले स्नेहाची पोक्तगी करावी.'– दिमरा १.३. [फा. पुख्तगी]

**पोक्तदाणा** पु. मुख्य दाणा; खाण्याचे मुख्य धान्य.

**पोक्ता पुरवता, पोख्तकार** वि. प्रौढ; समंजस; दूरदर्शी.

**पोक्या** वि. कुबडा.

**पोखणे** न. पोषण; लालनपालन. [सं.पुष्]
सक्रि.अनुकरण करणे.
उक्रि. पुष्ट होणे, करणे : 'आणि सौभाग्य पोखलें ।'– ज्ञा १.३५.

**पोखर** पु. (लाठी) प्रतिपक्षाच्या उजव्या बगलेवर केलेला वार; उजव्या बरगडीपासून डाव्या बरगडीपर्यंत केलेला वार.

**पोख(खा)र** न.पु. सरोवर; तळे; हौद. [सं.पुष्कर; प्रा. पोक्खर]

**पोखर,पोखार–रा** न. पु. १. भोक; नळा; पोकळी( झाड, भिंत, बंधारा इ.त उंदीर, किडे यांनी पोखरून केलेली). २. खरडून, कुरतडून, खणून काढलेली घाण; धूळ; चूर्ण; पीठ. ३.खडकात, जमिनीत पोखरलेले विवर. ४. झाडाची ढोली; पोकळ जागा.
वि. १. पोकळ केलेली; पोखरलेली (जमीन, धान्य इ.). २. (ल.) भुसभुशीत; सहज नांगरली, खणली जाण्याजोगी (जमीन). ३. फुगलेला, तरारलेला (वडा इ.) : 'तळींव वडे पोखरे । दह्यांत घालोनियां वाढिले ।'– नव ९.१२०. ४. तलाव.

**पोखरण–णी** स्त्री. १. लहान सरोवर; तळे; हौद : 'कां आंगीं कीं निर्मळपणीं । हारपलिया या पोखरणी ।' – अमृ ४.३९. २. एक औषधी फुलांचे झाड. [सं. पुष्करिणी]

**पोखरणे** सक्रि. १. खणून, खरवडून, उकरून, कोरून पोकळ करणे. २. (ल.) पोखरून खाणे; बुचाडणे; मुंडणे. [सं.प्र + उत् + कृ]

**पोखरणे, पोखारा** न. झाडाची ढोली; खडकाची पोकळी; विवर (जमिनीतील).

**पोखराज** पु. पुष्कराज (रत्न). (गो.) [सं.पुष्कराज]

**पोग, पोगारी** पु.स्त्री. १. ताडास जेथून फळे येतात तो गाभा.२. कोंब; भाताच्या रोपाला दोन पानांतून फुटणारी सुरळी.

**पो(पों)गडा** पु. वयात न आलेला मुलगा; तरुण पोरगा; सोळा वर्षे वयापर्यंतचा किंवा त्याच्या आतील मुलगा. [सं.पौगंड]

**पोगर-रा** पु. १. पत्र्याला भोके पाडण्याची लोखंडी छिन्नी; पोलादी खिळा. (कासारी) भांड्याला भोके पाडण्याचा एक जाड खिळा. २. (चर्मकार.) चामड्याच्या चाक्या पाडण्याचे पोलादी हत्यार. ३. सुरीच्या धारेवर पडलेला खड्डा.

**पोगरदम्या** वि. गलेलठ्ठ. (व.)

**पोगा** पु. कणीस बाहेर येण्यापूर्वी येणारी पोटरी; अंकुर; कोंब.

**पोगाडा** पु. अळवाचा, कासाळूचा देठ. (को.)

**पोगिरा** पु. कोरण्याचे हत्यार.

**पोगी** स्त्री. १. नारळाला शेवटच्या पानांच्या झुबक्यांतून येणारा मोख (कोंब); नारळ, सुरमाड इ. चा कोका. २. फोगी; शिडाची जीभ; गलबतावरचे त्रिकोणाकृती निशाण (शीड). [सं.पूग]

**पोघर** वि. पोकळ. (व.)

**पोच** पु. १. दूरदृष्टी; शहाणपण; सारासार बुद्धी. २. झेप; धाव. ३. पत्र मिळाल्याची पावती.

**पोच** पु. कोकणकिनाऱ्यावर आढळणारा एक समुद्रसर्प.

**पो(पों)चट-ड** वि. १.पोंचा; चेचका; पोचारा; खळगा पडलेला. २. पोकळ; नि:सत्त्व; निर्जीव; टणक नसलेले (धान्य इ.).३. (ल.) नि:सत्त्व; नि:सार; निर्जीव; दुबळा. [गुज. पोचा; सं. प्र + कुचिष्ट]

**पो(पों)चलणे** सक्रि. (भांडे, दागिना इ.ला) पोचा पडणे, येणे.

**पो(पों)चा** पु. घावटा; ठोका; भांडे, दागिना इ. ना पडलेली खळी; भांड्याचा खळगा. [हि. पोंचा; सं.प्र + कुश्]

**पोचारणे** सक्रि. (कपडे धुताना ते) हाताने चुबकणे; मुठीने ठोकणे.(को.)

**पोचा(चे)रा** वि. पोचा, ठोका असलेला.

**पोची** स्त्री. १. मनगट. २. पुरुषांचा, मनगटावर बांधण्याचा दागिना.(वा.) **० ओळखणे** – एखाद्याचे सामर्थ्य ओळखणे, जाणणे.

**पोट** पु. न.१. अन्नाशय; छातीपासून कमरेपर्यंतचा, ज्यात आतडी, पचनेंद्रिये इ. (व स्त्रियांच्या बाबतीत गर्भाशयही) असतात असा शरीराचा भाग; बरगडीच्या खालचा व कंबरेच्या वरचा भाग; उदर. २. कोठा; अन्नपचनाचे स्थान; जठर. ३. (ल.) कोणत्याही वस्तूचा फुगीर, पुढे आलेला भाग. उदा. घटाचा, पापण्याचा इ. ४. वस्तूचा पोकळ भाग; पोकळी; दरा; खळगी; खाच. ५. खोलवा; साठवा; कव; कवळ; खाते; समावेश करण्याचा गुण, शक्ती; मुख्य किंवा आतील बाजू; मुख्य कामाच्या अंगभूत इतर कामे. ६. नदीच्या पात्राचा मध्य. ७.(ल.) मन; हृदय; बुद्धीचे, विकाराचे स्थान: 'ज्याच्या पोटीं खर विष, मुखीं आज्य हैय्यंगवीन ।'– वि. वा. भिडे [सं.पुष्ट,पुट] (वा.) **० करणे** – १. (जनावर) गाभण राहणे. २. लठ्ठ बनणे. **० करणे,फुगणे,येणे,वाढविणे**– व्यभिचाराने गर्भार होणे. **० गळ्याशी, तडीस लागणे** – फार जेवल्याने पोट आकंठ भरणे. **० चावणे, दुखणे** – मत्सर उत्पन्न होणे. **पोट(टा)चे दु:ख काढणे, सोसणे** – भुकेची वेदना सोसणे. **पोटचे, पोट पाडणे** – कृत्रिम उपायांनी गर्भपात करणे. **० जाणे–ढाळणे**–ढाळ, रेच, जुलाब होणे. **० जाळणे** – १. (निंदार्थी, वैतागाने) कोणतेही घाणेरडे काम करून पोट भरणे. २. दुसऱ्याचे नुकसान करून आपला फायदा करून घेणे. **० जिरणे**– वाढू लागलेला गर्भ पोटात जिरणे. **० धरणे** – जुलाब बंद होणे. **० नकटे आहे** – पोट लाजबीज काही जाणत नाही (भूक लागली असता, वात्सल्यप्रेमाने कळवळा आला असता). **० पाठीस लागणे** – पोटाला मिळविण्यासाठी उद्योग करावा लागणे. **० पाठीस लागणे, ० पाताळास, रसातळास जाणे, पोटाची पत्रावळ होणे** – खावयास न मिळाल्यामुळे पोट खपाटी जाणे. **० पिकणे** – १.प्रसूत होणे; मूल होणे. २. गर्भार असणे. **० फुगणे** – १. अजीर्णादिकांमुळे पोटात वायू साठून पोट मोठे होणे. २.(ल.) एखादी गुप्त बातमी कोणाला तरी सांगायची संधी न मिळाल्यामुळे अस्वस्थता वाटणे. **० फुटणे** – खरोखरी पोट फुटल्याप्रमाणे पोटाला वेदना होणे. **० फोडणे** –गुप्त बातमी फोडणे, उघडकीस आणणे. **० बांधणे** – उपासमार करणे. **० बांधून चाकरी करणे, पैसा जमविणे, जेवणे–खाणे–खरचणे**– पोटास न खाता नोकरी करणे, पैसे जमविणे इ. **० बाहेर पडणे** – जेवणाचा खर्च परभारा भागणे. **० बाहेर पाडणे**– पहा : **पोट फोडणे.** **० बुडणे** – चरितार्थाचे साधन नाहीसे होणे. **० भरणे** – १. इच्छा तृप्त होणे; पोटाची गरज भागणे. २. चरितार्थ चालविणे. **० मोठे करणे** –दया दाखविणे; कृपाळू होणे. **० लागणे,सरणे–सुटणे**– रेच होणे. **० सुटणे** – १. वाताने दोंद वाढणे; खायला–प्यायला यथेच्छ मिळत असल्याने दोंद येणे. २.उदरनिर्वाहाचा खर्च बाहेर पडणे, अंगावर न पडणे. **पोटाखाली जाणे-येणे** – विधवेने पाट लावला असता पहिल्या नवऱ्यापासून झालेल्या मुलांनी तिजबरोबर जाणे. **पोटाचा कपोता वळणे** – अतिशय रोड, कृश होणे. **पोटाचा चाकर, पाईक होणे, असणे** – पोटाकरता मजुरी करणे. **पोटाचा डमामा, नगारा होणे** – पोटात वायू धरल्यामुळे पोट फुगणे. **पोटाच्या पाठीस लागणे** – चरितार्थाची साधने मिळविण्याकडे सर्व वेळ, शक्ती खर्चणे. **पोटाचे पाणी होणे** – जोराची हगवण लागणे. **पोटात आग पेटणे** – अतिशय भूक लागणे. **पोटात कालवणे** – पोटात ढवळणे; पोटात गडबड होणे. **पोटात कावळे ओरडू–कोकावू–तोडू–टोचू लागणे; पोटात कोंबडी चरू लागणे** – अतिशय भूक लागणे; भुकेने जीव व्याकूळ होणे. **पोटात खडबडणे** – भूक लागणे. **पोटात गोळा उभा राहणे** – संकट येणे; भीती वाटणे; पोटात धस्स होणे. **पोटात घालणे, घेणे; पोटी घालणे** – (अपराध, चूक) सहन करणे;क्षमा करणे. **पोटात जावप** – पोटात दुखणे. (गो.) **पोटात ठेवणे** – गुप्त ठेवणे; कोणाला कळू न देणे. **पोटात–स डोके घालणे**– आश्रय, कृपा संपादणे. **पोटात तोडणे** – दयेने पोटात कळवळणे; दु:ख होणे. **पोटात धाक पडणे** – भीती उत्पन्न होणे. **पोटात धोंडा उभा राहणे** – अतिशय भीती वाटणे. **पोटात पाय शिरणे**– खचून जाणे; भ्रांत होणे; भांबावणे. **पोटात पोट** – मुख्याच्या पोटात असलेला, गौण (मनुष्य, वस्तू). **पोटात पोट चालणे, करणे** –

एकाच्या अन्नात, निर्वाहात दुसऱ्याचा सहज निर्वाह होणे, करणे. **पोटात ब्रह्मराक्षस असणे,उठणे** - खा खा सुटणे. **पोटात शिरणे,निघणे** - १. (दुसऱ्याची) मर्जी संपादन करणे. २. दुसऱ्याच्या गुप्त गोष्टी काढून घेणे. **पोटात शूळ उठणे, सलणे** - मत्सर, हेवा वाटणे; दुसऱ्याचे बरे पाहून वाईट वाटणे. **पोटातील पाणी न हालविणे** - १. एखादी गोष्ट गुप्त ठेवणे. २. अतिशय आरामात, त्रास न होता प्रवास करणे. **पोटातून उगळणे,कळवळा येणे** - प्रेम, माया उत्पन्न होणे. **पोटा येणे** - पोटी जन्म घेणे. **पोटाला कुंकू लावणे** - गर्भारपणीच भावी संततीचा वाङ्‌निश्चय करणे. **पोटाला गाठी देणे, पोटाला चिमटा घेणे** - चिक्कूपणाने, दारिद्र्यामुळे पोटाला पुरेसे न खाणे. **पोटाला पाटा बांधणे** - भुकेच्या वेदना बंद करण्यासाठी धोतराने पोट बांधणे. **पोटावर उठणे, मारणे,येणे, पोटाआड येणे, पोटावर पाय देणे** - दुसऱ्याचे उदरनिर्वाहाचे साधन काढून घेणे; प्राप्ती कमी करणे. **पोटावारी नोकरी करणे, राहणे** - फक्त जेवण घेऊन नोकरी करणे. **पोटा(ट)शी धरणे** - १. प्रेम, ममता करणे. २. मदत करणे; पोषण, सांभाळ करणे. ३. (झाडांसंबंधी तंट्यात) झाडास कवटाळून देवाची शपथ घेणे, वाहणे इ. **पोटा(टु-टि-टे)शी राहणे-असणे** - गर्भार असणे, राहणे. **पोटास अन्न ढोंगास वस्त्र मिळणे** -निर्वाहाचे अगदी किमान साधन मिळणे; निर्वाहाच्या अगदी आवश्यक वस्तू मिळणे. **पोटास बिब्बे घालणे, चिमटे घेणे**- पोटाला न खाता राहणे; उपास काढणे. **पोटास येणे** - उदरी येणे; जन्मणे; मूल होणे. **पोटी उतरणे** – जिरणे. **पोटी खोसणे** – कनवटीला बांधणे. (ना.) **पोटी धरणे** - आवड धरणे; स्वीकारणे. **पोटी, पोटात पडणे** - १. भक्ष्यस्थानी पडणे. २. शरीरात खिळणे (रोग, गोवर, देवी, ताप, खरूज इ.). ३. स्वतःच बळकावणे (पैसा, द्रव्य). ४. जेवणासाठी खर्च होणे. ५. पोटात मुरणे; नाहीसे होणे (औषध); (दूध) पोटात तसेच राहणे (रेच करणे). **पोटी पडणे** – १. आवाक्यात येणे; शहाखाली येणे. २. गिळंकृत होणे; पोरके होणे. **पोटी वागविणे** – एखाद्याला सतत आपल्याबरोबर वागवून त्याची काळजी वाहणे. **पोट्या चालणे** – मुलाने पोटावर सरकणे. (गो.) **(थंड्या) पोटाने** – मित्रभावाने; सलोख्याने; चिरडीशिवाय; आकसाशिवाय; रागा-क्षोभाशिवाय.

**पोटउक(का)ल** स्त्री. पु. मन मोकळे करणे; पोटातील मळमळ बाहेर टाकणे; (ल.) मनातील विचारांना प्रसिद्धी देणे.

**पोटकटार-री** स्त्री. १. पोटात कट्यार, सुरा खुपसून घेऊन केलेली आत्महत्या. २. कट्यारीने दुसऱ्यास भोसकणे.

**पोटकरपी** स्त्री. (बायकी) एक शिवी; पोटजाळी.

**पोटकरीण** स्त्री. व्यभिचाराने गरोदर झालेली स्त्री.

**पोटकली-कुली-कुळ** स्त्री.न. १. (निंदार्थी) लहान पोट. २. पहा : **पोटकुळी**

**पोटकांब** स्त्री. बांबूच्या आतल्या बाजूची चिरटी, कामटी.

**पोटकिडा** पु. १. (झाड, फळ इ. च्या) आत राहणारा किडा. २.(ल.) गुप्तगोष्टी, गुह्य जाणणारा माणूस.

**पोटकुलूप** न. दरवाजाच्या आत असलेले पण बाहेरून चावीने उघडता येणारे, स्प्रिंगचे कुलूप.

**पोटकुळी** स्त्री. तांबडी फुले, फळे येणारी एक वनस्पती.

**पोटकुळी** स्त्री. १. पोटाची बाजू; कनवटी; कडोस्त्री; ज्यावर धोतर, लुगडे आवळले जाते तो भाग. काही वस्तू खोवून ठेवण्यासाठी उपयोग. २. क्रियाविशेषणाप्रमाणेही उपयोग. ३. पोटातील दुखणे. [क.पोटकुळी = दु:ख; वेदना]

**पोटकूळ** न. (निंदार्थी) पोट.

**पोटकूळ** न. दुसऱ्याकरता जामीन राहणारा मनुष्य; संगतीचा, परिवारातील माणूस.

**पोटखण** स्त्री. अधाशीपणा. (कु.)

**पोटखराब** वि. मध्ये (खडक, वाळवंट, घळ, पायवाट इ.मुळे) खराब असलेली, लागवड न होण्याजोगी (जागा, जमीन).

**पोटखराबा** पु. वहित जमिनीच्या पोटी ओसाड, खराब असलेली जमीन.(को.)

**पोटखर्च** पु. उपजीविकेसाठी आवश्यक गोष्टींसाठी होणारा खर्च.

**पोटखील-खिळा** स्त्री.पु. १. शिवाळाची आतील खीळ. २. आतील, मधली खीळ; खुंटी.

**पोटगडी** पु. १.(सोंगट्यांचा खेळ) खेळणाऱ्याच्या हाताखालचा व त्यास मदत करणारा गडी; पित्तू. २.(ल.) मदतनीस; रिकामी झालेली जागा भरून काढणारा गडी.

**पोटगळ** स्त्री. खाजणाच्या बांधाच्या आत पाणी साचणारा चर. (राजा.)

**पोटगा** पु. सुंगटासारखा मोठ्या पोटाचा एका जातीचा मासा. (गो.)

**पोटगी-गे** स्त्री.न. १. पोटखर्चाकरता घेतलेले पैसे किंवा आवश्यक वस्तू; पोटखर्ची. २. उपजीविकेचे, निर्वाहाचे साधन; जीवनोपाय; अन्न-वस्त्र इ. ३. कामाकरता परगावच्या कचेरीत जाणाऱ्या गावकामगाराने गावखर्चाच्या रकमेतून घेतलेला पैसा. ४. घटस्फोटानंतर तो मागणाऱ्याने घटस्फोटित व्यक्तीला निर्वाहासाठी द्यायची रक्कम; पोटखर्च.

**पोटगुजारा** पु. १. नुसती गुजराण, उपजीविका, निर्वाह. २. क्षुद्र वृत्ती.

**पोटघडी** स्त्री. गर्भार आहे असे दिसावे म्हणून वांझोट्या स्त्रीने पोटावर बांधलेली घडी.

**पोटघर** न. (सोंगट्यांचा खेळ) पटाच्या बाजूवरील घरांच्या तीन ओळींपैकी मधल्या ओळीतील शेवटचे (खालचे)घर.

**पोटचे ज्ञान** १. नैसर्गिक, उपजत, स्वाभाविक ज्ञान; न शिकता - संपादिता अंगी असलेले ज्ञान. २. अंगची हुशारी, शहाणपण. ३. स्वतःची बुद्धी, अक्कल, समज इ.

**पोटजन** पु. संतती; पोटची मुले.

**पोटजाळ** पु. १.आईची माया; मातृवात्सल्य. २. पोटच्या पुत्रादिकांचा नाश झाल्यामुळे होणारा शोक.

**पोटजाळू** वि.१. पोटासाठी हलके काम करणारा. २.(ल.) चहाडखोर.

**पोटजीभ** स्त्री. पडजीभ; घशाच्या आतील बाजूची जीभ.

**पोटझाकणी-णे** स्त्री. न. (बायकी) १.लग्नात सूनमुखाच्यावेळी वराच्या आईकडून वधूच्या आईला देण्यात येणारे लुगडे. २. तो विधी.

**पोटटाळा** पु. (ढोरधंदा) दोन अधोडीमधील तुकडा.

**पोटडी** स्त्री. (प्र.) पोटळी.

**पोटतिडीक** स्त्री. १.पोटातील कळ, वेदना. २. (ल.) कळकळ; आस्था.

**पोटदुखी-फुगी** पु.स्त्री.न. १. पोटशुळाची व्यथा; नेहमीचे पोट दुखणे; पोट फुगण्याचा रोग. २. अजीर्ण वगैरेने पोटात वेदना होणे; मुरडा होणे. ३. (ल.) दुसऱ्याचे बरे झालेले पाहून होणारे दु:ख, मत्सर, हेवा. ४. (ल.) गरज; मागणी; हाव.

**पोटनळ** न.अव. १. पोटातील नळाचे वर-खाली जाणारे भाग. २. नळाचा आजार; दुखणे.

**पोटपडीत** न. लागवड केलेल्या जमिनीमधला पडीत तुकडा.

**पोटपाई (य)ळ** वि. पोटार्थी; उपजीविकेकरता काम, नोकरी करणारा; काम करण्याची जरूर असलेला (मनुष्य).

**पोटपाणी** न. पोटाची तजवीज, व्यवस्था.

**पोटपु(पू)जा** स्त्री. १. खाणेपिणे; भोजन. २. (ल.) लाच देणे.

**पोटपोशा-सा** वि. पोटार्थी; पोटभरू; खादाड.

**पोटफुगी** स्त्री. १. व्यभिचार करून गरोदर, झालेली स्त्री. २. पोट फुगणे, दब्ब होणे; पोटात गुबारा धरणे. ३.काही गुप्त गोष्ट फोडण्याची उत्कंठा ( त्यामुळे पोट फुगणे). (क्रि. झाडणे)

**पोटफोड** स्त्री. १. मन मोकळे करणे. २. गुप्त गोष्ट, प्रसिद्ध करणे. ३. एखादे कोडे उकलणे.

**पोटफोडे** वि. एकदा व्यायलेले (जनावर).

**पोटबंदा** वि. पोटार्थी; फक्त पोटाकरता काम, चाकरी करणारा.

**पोटबांधणे-णी** न.स्त्री. पोटास बांधण्याचे वस्त्र. (विशेषत: बाळंतीण स्त्रियांकरता, मुलांकरता).

**पोटबाबू** पु. १. पहा : **पोटपोशा** २. पोटाला मिळाले म्हणजे बाकीच्या गोष्टींविषयी बेफिकीर असणारा.

**पोटबूड** स्त्री. १. निर्वाहाच्या साधनांचा नाश. २.वाजवी किंवा अपेक्षित रकमेपेक्षा कमी रक्कम, उत्पन्न येणे; नुकसानी.

**पोटभर** स्त्री. तृप्त स्थिती; एखादी गोष्ट भरपूर मिळाल्याने मन तृप्त होणे. क्रिवि. १. पोट भरेपर्यंत; (क्षुधेची) तृप्ती होईपर्यंत. २. (ल.) गरजेची, इच्छेची तृप्ती होईपर्यंत.

**पोटभरू, पोटवाईक** वि.पोषक किंवा रुचकर नसून नुसते प्राणधारणेपुरते किंवा भरपूर पोट भरणारे (अन्न).

**पोटभाजी** स्त्री. एक शिवी; मुलाला त्रास देणारी वांझ स्त्री.

**पोटमजला** पु. तळमजला व पहिला मजला यांमध्ये काढलेला मजला.

**पोटमाळा** पु. जमीन आणि छप्पर यांच्यामध्ये काढलेला माळा.

**पोटमांडणी, पोटमांडवण, पोटसर** स्त्री.. लग आणि कांबेरे. घराची पाखी दबू नयेत म्हणून त्यांच्या मध्यभागी खांबावर लगा घालून उभे केलेले काम.

**पोटरणे** अक्रि.पुष्ट होणे : 'ते आनंदरसें वोल्हावलें : तेणें थोरचि पोटरैले'- ज्ञाप्र४२८. [सं.पुष्ट]

**पोटरी** स्त्री. १. गुडघा व पायाचा घोटा यांच्यामधला मागचा मांसल भाग; कोपर व मनगट याच्यामधला मांसल भाग. २. (प्र.) पोटरा. ३. पोटडी; पोटळी. [सं. प्रकोष्ठ]

**पोटरी-रा** न. तयार झालेले , उकलायच्या बेताला आलेले कणीस.

**पोटर्की** स्त्री. गर्भ अर्धवट असलेले, अर्धवट तयार झालेले पीक. (व.)

**पोटला** पु. बकऱ्याच्या पोटाचा भाग; या भागातील मांस.

**पोटवहित** वि. मध्ये मध्ये लागवड केलेली (जमीन).

**पोटवा** पु. (ढोर धंदा) जनावराच्या पोटाची (कातड्याची) जागा.

**पोटवाढवी, पोटवाढी** स्त्री. व्यभिचाराने गर्भार झालेली स्त्री.

**पोट(टु)शी** स्त्री. गरोदर.

**पोटशूळ-सूळ** पु. पोटदुखी; मुरडा.

**पोटसरू** स्त्री. पोटजाळी; एक शिवी: 'रांड मुलखाची पोटसरू।' - राला ४६.

**पोटस्त-स्थ, पोटिस्थ** स. १. प्राप्तीचे अप्रत्यक्ष किंवा गौण साधन; किरकोळ, मिळकत, प्राप्ती. २. (क.) उदरनिर्वाह; उपजीविका.

**पोटस्ते** क्रिवि. पोटास्तव; पोटासाठी : 'पोटस्तें करणें घडे । सेवा कुटुंबाची।'- दास ८.१०.३.

**पोटळणे** अक्रि. १. गाभण होणे; (गर्भ वाढीस लागल्यामुळे मादीचे ) पोट मोठे होणे. (को.) २. धान्याच्या कणसात दाणा भरणे; कणीस (दाण्याने) भरदार होणे.
सक्रि. वर चढताना कवटाळणे (माड, ताड इ.); पोटाशी घट्ट धरणे (पैसा, मालमत्ता इ.); (सामा.) पोटाळणे.

**पोटळा** पु. १. पोटातील आतडी किंवा त्यांचा गोळा; कोथळा. २. वायूने उत्पन्न झालेली फुगवटी.

**पोटळा-ळी, पोटोळी** पु.स्त्री. १. वरचेवर डोक्यावर ठेवण्याकरता केलेली औषधाची पुरचुंडी. २. मोटली; गाठोडी; बोचके. पहा : **पुरचंडी** [फा. पोता = कापडाचा बोळा. सं.पुष्ट]

**पोटा** स्त्री. दाढीमिशी असणारी, पुरुषी स्त्री. [सं.]

**पोटाग** स्त्री. १. आस्था; अगत्यवाद; कळकळ; काळजी. २. खरी ममता; आतड्याची माया.

**पोटाची आग** भूक.

**पोटातले** न. (सांकेतिक) 'चीप' नावाचा लहान मुलांना पोटात होणारा विकार. याचे तीन प्रकार - पोटातले, डबा व सुशी.

**पोटार्थी** पु. पगार न घेता नुसत्या जेवणावर राहणारा नोकर.

**पोटारा** वि. १. विशाल; प्रशस्त (भांडे). (कु.) २. फक्त पोटाची काळजी करणारा.(राजा.)

**पोटारी** वि. अधाशी. (गो.)

**पोटावर्त** पु. घोड्याच्या पोटावरील भोवरा. हे अशुभ चिन्ह मारले जाते.

**पोटाळ** वि. १. मोठ्या पोटाचा; ढेरपोट्या; दोंदील (माणूस). २. दुसऱ्याच्या अन्नावर पोसलेला.

**पोटाळणी** स्त्री. १. पालनपोषण. २. आलिंगन. ३. कोडकौतुक.

**पोटाळणे** अक्रि. पोटळणे.
सक्रि. १. पाळणे; पोसणे; खायला घालणे. २. कवटाळणे; मिठी

मारणे; पोटाशी धरणे : 'तुका म्हणे केलें सन्मुख वदन । देखतां चरण पोटाळीत ।'- तुगा १६६३. ३. (ल.) कुरवाळणे; लाड करणे.[सं.पुष्ट]

**पोटी** क्रिवि. (हिशेब) टिपलेल्या जिनसांच्या निरनिराळ्या रकमा असणाऱ्या सदरामध्ये.

शअ.अंगभूत; नंतर; पासून; योगे.

**पोट्या** (विणकाम) किनारीचा मधला भाग.

**पोट्या** वि. १. पहा : **पोटभरू.** २. पोटचा (मुलगा). ३.पाटाच्या स्त्रीचा पूर्वघरचा, तिच्याबरोबर येणारा मुलगा. (व.)

**पोर्ट्रेट** न. एखाद्या व्यक्तीस समोर बसवून काढलेले मोठे चित्र. [इं.]

**पोठरा** पु. ( कासारी) भांड्याच्या ज्या भागावर ओळी, रेषा करतात तो भाग.

**पोड** पु. दोरी. (गो.)

**पोडा** पु. माडाच्या झापाला जेथून पात्या फुटतात त्याच्या मागील दांडा. (को.)

**पोडूर** वि. निष्ठुर; निर्दय. (गो.)

**पोणसुला** पु. व्रतबंधसमारंभाचा चौथा व शेवटचा दिवस. (गो.)

**पोत** पु.स्त्री. १. काचेचा, (क्व.) सोन्याचा, दगडाचा मणी. २. स्त्रियांच्या गळ्यातील मोत्यांचा, मण्यांचा दागिना; माळ; गळेसर. [सं.प्रोतम्]

**पोत** पु. १.अनेक चिंध्या गुंडाळून केलेला भुत्याचा काकडा. यास लोखंडाची विडी जोडली म्हणजे मशाल होते. २. (हत्याराचे, काठीचे इ.)अग्र, टोक, शेवट; शेवटचा भाग (वस्तूचा).

**पोत** पु. जन्मलेल्या मुलाच्या ढुंगणावर असणारा निळा डाग; लासे. (ठाकरी.) [सं.पोलिंद= (ल.) सांगाडा]

**पोत–थ** पु.न. १. जखम वगैरेतून पू इ. काढून धुण्यासाठी घालावयाची वात. २. (ल.) फाळाला पडलेले भोक. [क. पोत्तु=जाळ]

**पोत** न.पु. १. वीण; विणकाम (वस्त्राचे); खेटणी; घट्टपणा; विणकामाची सफाई. २. चांगले–बारीक तलम सूत. [सं. पोत=कापड]

**पोत** पु. नौका; होडी: 'निज विरहार्णवीं पोत । प्रेरुनियां आम्हांसि येथें । आणिलें तुवां ।' - रास १.८२७. [सं.]

**पोत** प्रत.

**पोत** पु. थैला; पोते; मोठी पिशवी; गोण. [फा.पोता]

**पोत** स्त्री. तुंबडी. (कु.)

**पोत** वि. १. रोख. २. चालू (नाणे, रुपया, पैसा).

**पोतकडो** पु. आतडी. (गो.)

**पोतडी–डे** स्त्री. न. १.पिशवी; सोनार, सराफ यांची वजने, तराजू वगैरे जिन्नस ठेवण्याची पिशवी; बटवा. २. पुरचुंडी; गाठोडे. [फा.]

**पोत(ते)दार** पु. नाणेपारखी; द्रव्यपरीक्षक; सरकारात आलेले रुपये इ. नाणी पारखणारा अधिकारी. [फा.]

**पोतनिशी** स्त्री. खजिनदारी; पोतनिसाचे काम, अधिकार. [फा. पोतनविशी]

**पोतनीस** पु. खजिनदार; सरकारी पोत्यावरचा अधिकारी : 'पोतनीस यांणीं पोते - जमा - खर्च लिहिणे करावे.'- वाडसनदा १२५. [फा.पोतनवीश]

**पोतरा** वि. पोरका.

**पोतराज** पु. शेंदूर फासून, लहंगा नेसून, मरीआईच्या नावाने भीक मागणारा महार, मांग; कडकलक्ष्मी.

**पोतवड, पोतवडजमीन** स्त्री. नुकतीच लागवडीस येत चाललेली जमीन. दोन वर्षांपासून लागवडीखाली आणलेली पडीत जमीन. (डांग.)

**पोतसणे** सक्री. पाजळणे; प्रज्वलित करणे : 'रामद्रणा दिविया पोतसुनि आला'- लीचपू ७४. [सं. पोट्टु]

**पोतंडी** स्त्री. गरम पाण्याने शेकण्यासाठी केलेला वस्त्राचा बोळा. पहा : **पोटळी** १,२ [फा. पोता = कापडाचा बोळा]

**पोता** खजिना [सं. पोवा]

**पोताई** स्त्री. रंगकाम. (झाडी) [हिं.पुताई]

**पोतारणे** क्रि. सारवणे. (को.)

**पोतास** पु. भीमसेनी कापूर. [सं. पोतास]

**पोता–त्या, पोत्यानिशी** क्रिवि. स्वतः; जातीने; खुद्द. [गु. पोता = स्वतः]

**पोती** स्त्री. पिशवी; थैला. [फा. पोता]

**पोती** स्त्री. चुलीवर भांडे जळू नये म्हणून त्याच्या बुडाला लावलेला मातीचा, राखेचा लेप.

**पोते** न. १. धान्य इ. भरण्याचा पडमाचा थैला; गोण; मोठी व जाड पिशवी. २. कोथळा. ३. सरकारी खजिना पोचविण्याची पिशवी. (ल.) तिजोरी; खजिना: 'जे देणें तें वरातीनें द्यावें अगर पोत्यांतून रोख ऐवज द्यावा.'- सभासद २४. ४. जिल्हृयाच्या खजिन्यात गावचा खजिना नेण्यासाठी तयार केलेली पिशवी. ६. एक माप. [सं. पोतक; फा. पोता]

**पोते अलग** वि. वृषण अलग असणारा किंवा त्यावर केस असणारा (घोडा). हे लक्षण अशुभ मानले जाते.- अश्वप १.१०४.

**पोतेखाद** स्त्री. पोत्यातील (साखर इ.) माल पोत्यास चिकटल्यामुळे होणारी मालाची तूट, नुकसान.

**पोतेचाल** स्त्री. चालू नाणे; सरकारी खजिन्यातील चलन.

वि. त्या चलनाचा; पोतेचालीचा (रुपया, पैसा, नाणे इ.).

**पोतेझाडा** पु. खजिन्याच्या पैशाचा हिशोब.

**पोते(ता)रे** न. १. शेणमातीने चूल, घर इ. सारविण्याचे फडके. २. असे सारवण; शेणशिंतोडा; पोतेरा. ३.(ल.) क्षुद्र, क्षुल्लक वस्तू :' शरीर नव्हे तें पोतारें।'- गीता २.९०५.

**पोथ–थी** स्त्री. अळू (भाजी) (व.); चमकोश (एक पालेभाजी). [हिं.पोथी]

**पोथळा** पु. जोडा. (व.)

**पोथा** पु. (ल.) मोठी पिशवी. (कर.)

**पोथी** स्त्री. १.पुस्तक; ग्रंथ; हस्तलिखित. २. तांबड्या शाईप्रमाणे उपयोगात आणावयाचा लाख, लोध्र इ. कांचा रंग; त्यात भिजविलेला पोळीच्या आकाराचा कापूस. पहा : **पोळी** ४ [सं. पुस्तक]

**पोदीन** पु. पुदीना. [फा.]

**पोदोन** पु. धर्मपिता. (गो.) [पोर्तु. पॉद्रिन्हो]

**पोद्या** क्रिवि. निष्फळ; व्यर्थ; फुकट; वाया.

**पोद्दार** पु. सोनार.
**पोपट** पु. खिळे काढण्याचे पोपटाच्या आकाराचे यंत्र.
**पोपट** पु. १.बहुरंगी, विविध आकारांचा, बाकदार व तीक्ष्ण चोच असलेला, सर्वत्र आढळणारा, माणसाळणारा पक्षी. [सं.पुट् = बोलणे]
**पोपट** न. शेणीचा, गोवऱ्यांचा पोपडा.
**पोपट–टी** स्त्री.पु. कडवेवाल; पावटा. (ना.,व.)
**पोपटणे** अक्रि. ढिले पडणे. (व.)
**पोपटनेत्री** वि. डोळ्यात लाज नसणारा; निर्लज्ज.
**पोपटपंची, पोपटपंचीविद्या** स्त्री. १. अर्थज्ञानावाचून केवळ शब्दोच्चार; केवळ शब्दज्ञान. २.(ल.) अल्पविद्या : 'अलीकडची जी पोपटपंची तीस पूर्वी मुळीच थारा न मिळून...'–नि १०७.
**पोपटपंडित** पु. तुटपुंज्या, उसन्या ज्ञानावर विद्वानांशी स्पर्धा करणारा.
**पोपटज्ञान** न. पोपटासारखे शिकविलेले तुटपुंजे ज्ञान.
**पोपटी** वि. पोपटाच्या रंगासारखा रंग असलेला; हिरवट पिवळ्या रंगाचा.
**पोपटी** स्त्री. तांबडसर जातीची कवडी.
**पोपटी** स्त्री. शिमग्यामध्ये घरोघरचे पदार्थ आणून करावयाचे सहभोजन. (को.) २. उकडलेल्या तुरीच्या शेंगा : 'भक्तिजनें तुरीची पोपटी आणीति : पोपटीचे सोले करीति'–गोप्रच २४२.
**पोपट्या** पु. भाताची हळवी जात. (झाडी)
**पोपडा–ट** पु. १. सारवलेल्या जमिनीचा, भिंतीचा खपला; उखिरवळी; सुटलेला पापुद्रा. २. जखमेवरील खपली. [सं. पुड्= सोडणे, सुटणे]
**पोपडी** स्त्री. दायठ्यात उगवणारे रोप. पहा : **दायठा**
**पोपडेदोडके** न. घोसाळे. (ना.)
**पोपणे** उक्रि. विकणे.
**पोपती** स्त्री. (विणकाम ) १. मागावर सूत ताणून बसविण्यापूर्वी कुंच्याने ते साफ करण्याची क्रिया; (क्र.) सांदणी. २. दहा–बारा लुगड्यांसाठी तयार केलेला, गुंडाळलेला उभाराचा ताणा. (नाशिक)
**पोपय–या–ई, पपैया** पु. पपईचे झाड व त्याचे फळ. हे झाड उष्ण देशात होते. पहा : **पपई** [हिं. पपैया]
**पोपली, पोपो–पी** स्त्री. लहान मुलासाठी पिठात दूध घालून बनवलेली व निखाऱ्यावर भाजलेली चांदकी. [सं. अपूप]
**पोपा** पु. वडा. (गो.) [सं.अपूप]
**पोपाटा** पु. जाहिरात. (झाडी)
**पोपिसो** पु. फुप्फुस. (गो.)
**पोपेला** न. पुढील दात नसलेला घोडा. –अश्वप१.१०४.
**पोफळ–ळी** स्त्री. १. सुपारीचे झाड. २. सालीसकट असलेली सुपारी. [सं.पूगीफल] (वा.) **० घालणे** – पैज मारणे; देवापुढे सुपारी ठेवून प्रतिज्ञा करणे: 'लटकें वाग्जाल । ना म्हणसी तरि पोफल। घातलें आहे ।'– ज्ञा १३.२०.
**पोफळगाठ** स्त्री. १.दोरीच्या पदराला दिलेली एक प्रकारची गाठ. २.नेसलेल्या वस्त्राला कमरेवर दिलेली सुपारीएवढी गाठ; वस्त्र नेसण्याचा, अंगावर घेण्याचा एक प्रकार; पद्धत : 'पोफळगांठी सेले नेसलियां । सुंदरी तिआं ।' – शिव ६५४.
**पोफळी** वि. मोठ्या चौकटीचे (वस्त्र); फणीची तीन घरे काळी, एक घर पांढरे, एक तांबडे, एक पांढरे असा उभार. अडवण तीन घरे – एक काळे, एक पांढरे, एक तांबडे असे व किनार कोणतीही (असे लुगडे).
**पोफळीयें** न. पोफळी रंगाचे वस्त्र : 'पोफळीयें घेयावें म्हणे'– गोप्रच १२२. [सं.पूग + फल]
**पोफाळे** न. लहान ओहोळ, नाला इ. वरून पलीकडे जाण्याकरता बांधलेला पोफळी–नारळीच्या लाकडाचा पूल. (गो.)
**पोबारा** पु. (ल.) पळणे; एकदम निघून जाणे; धूम ठोकणे.
**पोबारा** पु. (तिफाशी खेळ) फाशातील एक दान. पहा : **पवबारा**
**पोभाळणे** सक्रि. १.चोळणे; गोंजारणे : 'पोभाळितां चरे अंतरीचें दुःख। लांसें फांसें मुख उघडावें।'– तुगा २११७. २. वरून चालणे.
**पोम** न. १. अंगी विद्या नसता माजविलेले ढोंग; स्तोम; अवडंबर; देखावा; भपका. २. पोकळ प्रसिद्धी; रिकामा लौकिक; ख्याती. [क. पोम = फुगणे] (वा.) **पोमा डेंगी हाकलणे** – आपलेच म्हणणे खरे करणे. (व.)
**पोमशी** स्त्री. ढगांच्या दिशेने किंवा वायव्येकडून येणारा वारा. (को.) [हेट. पोयस = वायव्य दिशा]
**पोमिनी** स्त्री. १. जाड व मोठ्या पानांचे एक झाड. २.वेली; पद्मिनी : 'एकें पोमिनीचीं पानें करितां ती ।'– दाव २१२. [सं. पद्मिनी]
**पोमी** स्त्री. बसण्यासाठीची पातळ गादी.
**पोय** स्त्री. सुई. (व.)
**पोय** स्त्री. १. पोफळीच्या पानाच्या देठाजवळचा पसरट भाग (याचा द्रोण करतात); विरी; पवली; पोगी; नारळाचा कोंब; माडाचे बोंड; नारळीच्या फुलावरचे आच्छादन. २. नारळीच्या पेंडीचा जाड पापुद्रा.(कु.)
**पोय** स्त्री. धर्मपोई; पाणपोई.
**पोय** स्त्री. १. पोयाड; नदीला जाऊन मिळणारा ओहोळ; नदीला मिळणारा फाटा; अरुंद खाडी. (कु.) २. शेतात खारे पाणी राखण्याकरता केलेली खळी. (गो.) ३. नारळीच्या शेंडीचा जाड पापुद्रा. ४. नारळ कापायची कोयती.
**पोयकर** वि. प्रथमतः ज्यास पोय आली आहे असा (माड).
**पोयकापी** पु. माडी काढणारा भंडारी. (को.)
**पोयटा** पु. शेणाचा गोळा. (व.)
**पोयणे** क्रि. १. संतापणे. २. सुईत दोरा ओवणे. (व.)
**पोयरा** पु. मुलगा.
**पोयस** स्त्री.वायव्य दिशा. (हेट.)
**पोयाड** न. नदीकडे सखल झालेली जागा; लहान खाडी.
**पोये** न. झाडाच्या ढोलीत, खबदडात, बिळात लागलेले मोहोळ; मधाचे पोळे.
**पोर** पु. लहान मुलगा; पोरगा.
स्त्री. लहान मुलगी; पोरगी.
न. १. जनावराचे लहान पिल्लू; पाडस; बछडे. २.लहान मूल. [सं.पुत्रक]

वि. पोरका; अनाथ. (गो.) [सं.पुत्रक; क. पोर]

**पोर** न. मागील वर्ष. [सं.;हिं. पूर्व]

**पोरक(व)ट – गळ,पोरका** वि. पोरासारखे; पोराला शोभणारे.

**पोरका** वि. आई-बापावाचून असलेला; अनाथ. (को.)

**पोरका** पु. पावसापासून भिंतीचे संरक्षण करण्याकरिता पळसाच्या फांद्यांवर माती घालून केलेला थर.(व.)

**पोरकिडा, पोरा,पोरी** पु. धान्य खाणारा एक लहान किडा; टोका.

**पोरके-क्या** न. (नाविक) सुकाणूजवळची तिसरी, कलमीच्या मागची व तिच्यापेक्षा लहान काठी किंवा शीड.

**पोरखाद्या** वि. जिची मुले लवकर मरतात अशी (स्त्री).

**पोरखेळ** पु. १.मुलांचा विटीदांडू इ. खेळ. २. पोरासारखे हसणे, उड्या मारणे इ. ३. घेणे-देणे इ. व्यवहारांचे मर्यादा सोडून मनस्वी वर्तन. ४. (ल.) सहज करता येण्यासारखी गोष्ट.

**पोरगा** पु. १. मुलगा. २.पोऱ्या; लहान वयाचा नोकर. ३. स्त्रीवेष घेतलेला नाचणारा पोर. ४. लेकवळा; गुलाम.

**पोरचेष्टा** स्त्री. १. मुलांचे नाचणे; बागडणे. २. पहा : **पोरखेळ** २,३

**पोरजिन्नस** पु.स्त्री. (निंदार्थी) लहान मुलगा; पोरसवदा; पोर.

**पोरटा-टी-टे** पु.स्त्री.न. (निंदार्थी किंवा रागाने) पोरगा-गी-गे; कारटा. वि. पोरका; निपितरे.

**पोरपिसा** वि. १. पोरांचा अतिशय शोकी; मुलांची फार आवड असणारा. २. अपत्यप्राप्तीसाठी अतिशय उत्कंठित झालेला.

**पोरबुद्धी** स्त्री. अपक्व बुद्धी.

**पोरवडा-वाडा-वंडा** पु. पोरांचा समुदाय, सुळसुळाट; मुलांचा पुष्कळ भरणा असलेले कुटुंब; घर, गाव, राज्य इ. च्या कारभारामध्ये प्रौढ, अनुभवी मनुष्य नसल्यामुळे होणारी अव्यवस्था किंवा अननुभवी लोकांचे प्राधान्य.

**पोरवाला** वि. मुलेबाळे असलेला. (ल.) लेकुरवाळे; फाटे फुटलेले (हळकुंड).

**पोरसचे** सक्रि. अजमासाने ताडणे. (को.)

**पोरसवदा,पोरसौदा** पु. लहान मुलगा; पोरजिन्नस. वि. पोरवय; मुलासारखा.[म.पोर+फा.सौदा=माल]

**पोरसावणे** सक्रि. कपडा जळल्याचा वास येणे. (गो.)

**पोरा-ऱ्यो** वि. १. लावल्यावाचून, आपल्या आपण उगवलेले, रानटी, जंगली (झाड). २. (ल.) निरुपयोगी. [सं.पूर्व]

**पोराटकी** स्त्री. पोरकटपणा; अजाण मुलाचे वागणे.

**पोरापोरका, पोरी** वि. आईबाप आणि मित्र नसलेला; अनाथ (मुलगा). (कु.)

**पोरापो(सो)री** क्रिवि. १. पोरांमध्ये; पोरांकडून; पोरांनी. २. एका मुलापासून दुसऱ्या मुलाला अशा रीतीने वंशपरंपरेने (वतन, वारसा इ. जाणे).

**पोरांडी-डे** स्त्री.न. (उपहासाने) पहा : **पोरवडा** वि. पोरे व बायका मात्र आहेत असे. [सं.पुत्ररंड]

**पोरीटोरी** स्त्री. अव. (निंदार्थी) मुली.

**पोरुणे** न. कण्हणे.(कु.)

**पोरोका** पु. पाला. - लोसाको.

**पोर्टर** पु. रेल्वेतील हमाल. [इं.]

**पोर्णे** वि. जुने; पुराणे. (गो.) [सं.पुरातन]

**पोर्तुचे** सक्रि. परतणे; उलट करणे. (गो.)

**पोर्पोळ** वि. १. उजाड. २. बेलगामी. (गो.)

**पोर्या-ऱ्या** पु. १. पोरकिडा. (को.) २. बताणा. ३. पहा : **पोहरा.** व ४. पहा : **पोरगा** १ ते ३

**पोर्ल,पॉल्ल** न. चुलीच्या आसपासची जागा. (गो.)

**पोल,पोलकट, पोलट** न. १. भरदार दाणा नसलेले धान्य (विशेषतः भात); हलका दाणा; फोलपट; भरडीचा कोंडा; फोल. भरडीचा कोंडा; फोल. २. शोभेची दारू साठविण्याचे मातीचे भांडे; पोकळ नळी (दारूच्या बाणाची) :

वि. १. पोकळ; फोल (दाणा); हलके, पोकळ धान्य असलेली (धान्याची रास). २. कोय किंवा गुठी नसलेला (आंबा, फणस इ.). ३. फुकट झालेले; पळिंज; फलकट.(गो.) [सं.पुल् = उंच होणे; पूल्य] (वा.) **पोलपट्टी धकणं** - सावळा गोंधळ चालणे.

**पोलक** पु. १. लखोटा; लिफाफा. (सातारी) २. गालिचा. (नेवासा)

**पोलके** न. बायकांची सैलसर चोळी.

**पोलणे** अक्रि. नाहीशी होणे (थंडी, पडसे); (प्र.) फोलणे.

**पोलमपोल** पु. रहस्य; भानगड: 'त्याचा पोलमपोल आता खुला झाला.'- वासुनाका ९२.

**पोला** वि. पोकळ. पहा : **पोलकट** [हिं.पोल = पोकळ]

**पोला-लो** पु. गाल. (कु.) [सं. कपोल]

**पोलाटी** स्त्री. छातीशी पंख असणारा लहान मासा. (को.)

**पोलाद** न. कार्बन घालून कठीण व लवचीक केलेले लोखंड; तिखे. [फा. पु (फु)लाद्]

**पोलिस्त** स्त्री. १. लागवड केलेली जमीन. २. शेताच्या उत्पन्नावरचा पाटलाचा आणि महाराचा हक्क.

**पोली** खंडणी. -ऐको.

**पोली** वि. मेलेली व वाळलेली (लीख, ऊ). (को.)

**पोलीस** पु. शिपाई; स्थानिक बंदोबस्ताकरिता ठेवलेला शिपाई. न. बंदोबस्ताचे खाते.

**पोलू** वि. पातळ.(गो.)

**पोले** न. एका चौरस काठीचे अथवा बिघ्याच्या एक चारश्यांश हिश्श्याचे जमिनीचे माप. [इं.पोल]

**पोलेगाद** न. सव्वा इंच लांबीचे परिमाण. (गो.)

**पोलो** पु.घोड्यावर बसून चेंडू खेळावयाचा विलायती खेळ.

**पोल्योपोल्यो** न. ढिलाई; पोकळपणा. (व.)

**पोल्हार-रा, पोलार** सु. पायाच्या अंगठ्यात घालण्याचे बायकांचे एक चांदीचे भूषण, दागिना : 'अनवट जोडवीं पोल्हारें । कानीं बांधली एकसरे ।'-ह १९.६७.

**पोव, पोवटी** पु.स्त्री. शेणाचा, विष्ठेचा पोहो, ढीग. (राजा.)

**पोव** पु. वळचणीपासून मुगळा(आढ्या)पर्यंत एकापासून एक असे छपरास

आलटून-पालटून दिलेले (गवत, टहाळ इ.चे) थर. (क्रि. घालणे).

**पोवई** स्त्री.(प्र.) पोई; धर्मपोई.

**पोवखंड** न. पोफळीच्या पोयीची चिरटी. ग्रंथ, पोथी इ. ला अथवा कागद सुरक्षित ठेवण्यासाठी पुष्टिपत्राप्रमाणे हिचा उपयोग करतात. पहा : **पोय**

**पोवची** स्त्री. १. पोची; मनगटावर बांधण्याचा दागिना : 'मुद्रिका पोवची धगधगिती।'- वेसीस्व ९.१४. २. स्त्रियांच्या हातातील जवा नावाचा दागिना. (व.) [हिं.]

**पोवच्या** पु. तळपाय. (व.)

**पोवटी** स्त्री. पोटरी. (गो.)

**पोवडा** पु. माडाच्या फांदीचा मुळाकडचा शेवट; बुडखा. पहा : **पोय**

**पोवणी** स्त्री.पोहण्याचा एक दम; सुरकांडी.

**पोवणे** सक्रि. (केळीची पाने इ.) विस्तव, ऊन, वाफ इ. चा शेक देऊन नरम करणे.

**पोवणे** सक्रि. (विणकाम) फणी - ओवीमध्ये ताण्याचे धागे ओवणे.

**पोवणे** सक्रि. पोहणे; तरंगणे. (को.)

**पोवती पूर्णिमा-पुनव** श्रावणी पौर्णिमा. या दिवशी पोवते घालतात.

**पोवते-ती** न. स्त्री. १. श्रावणी पौर्णिमेस (व इतर दुसऱ्या महिन्यात) देवास अर्पण केलेला (चार अथवा पाच कापसाच्या धाग्यांचा) दोरा; या महिन्यात घालावयाचे नवे जानवे; उत्सवाच्या किंवा व्रताच्या प्रसंगी ब्राह्मणांनी आणि इतरांनी गळ्यात, हातात, मनगटात घातलेले पवित्र दोरे. २. स्त्रियांच्या पोतीचा, मोत्यांचा गळ्यातील एक दागिना. ३.लग्नात शूद्रांनी गळ्यात घालावयाचे पिवळे दोरे; गंडा. [सं.पवित्र]

**पोवन** पु. सावरीन (नाणे). (गो.) [इं.पौंड]

**पोवनकांदा** पु. एक कंद. (झाडी) [सं.पद्मकंद]

**पोवप** सक्रि. पाऊस पडून घरात गळणे. (गो.)

**पो(पों)वरी** स्त्री. बासरी; मुरली; पावा.

**पोवली** स्त्री. १. सुपारीची विरी. पहा : **पोय**. २.पोफळीच्या पानाचा पसरट देठ. (गो.)

**पोवशेंवचे** सक्रि. कुजू लागणे; विरविरीत होणे. (गो.)

**पोवसुटाण** स्त्री. घाण; दुर्गंध; कुजट वास. (गो.)

**पोवसॉ** वि. कुजू लागलेला (मासा). (गो.)

**पोवळपाटली** स्त्री. (बायकांच्या हातात घालावयाचा ) पोवळे सोन्यात मढवून केलेला एक दागिना; पाटली.

**पोवळसर** पु. पोवळ्याचे कोरलेले कंकण.

**पो(पों)वळा** वि. धूसर किंवा पोवळ्याच्या रंगाचे (जनावर).

**पोवळी-ळ** स्त्री. १. देवळाच्या भोवतालची भिंत. २. पाट, कालवा यात पाणी सोडण्याकरता ठेवलेली.(को.)

**पोवळी-ळे** न. प्रवाल; पोळे; एक कीटकजन्य तांबड्या रंगाचा दगड; एक रत्न. [सं.प्रवाल]

**पोवळी** पु. गवळी.

**पोवा** पु.१. सापाचे पिल्लू. २. (छप्पर शिवणे, कुंपण करणे इ. कामात) दाभणाप्रमाणे उपयोगी पडणारी काठी. (को.) [सं.पोत]

**पोवा** पु. समूह; जमाव (यात्रेकरू, भिकारी यांचा) : 'पोवा वरी पोवा येऊनि जाती।'- दावि १६३. [सं.प्रवाह]

**पोवा** पु. १. (सामा.) केळफुलाचे आवरण; पोफळीची विरी. २.करडईवर पडणारा रोग.

**पोवा** पु. अलगुज; पावा; वेळूची पिपाणी.

**पोवाडा** पु. पहा : **पवाड**

**पोवाणी-ळी** स्त्री. १. पोहणे. (को.) २. (प्र.) पोवणी. (क्रि. टाकणे)

**पोवी** स्त्री. (प्र.) पोई; पेय. (को.)

**पोवे** न. दगड, झाड, लाकूड वगैरेच्या सांधीत मधमाश्यांनी केलेले मधाचे पोवे पहा: **पोळे**.

**पोशा** वि.१ (निंदार्थी) पोसलेला; पालन केलेला; स्वतःच्या मुलाप्रमाणे वाढविलेले (मूल). २. गबदूल;खाऊन स्वस्थ बसणारा.[सं.पोषण]

**पोशाक-ख-ग** पु. पेहराव; अंगावर घेण्याची वस्त्रप्रावरणे; शोभेसाठी अंगावर घालावयाची वस्त्रे. [फा.पोशाक]

**पोशाकपट्टी** स्त्री. सन्मानार्थ द्यावयाच्या पोशाखांच्या खर्चाकरिता बसविलेली पट्टी; कर.

**पोशाकी-खी-गी** वि. छानदार, दिखाऊ, आकर्षक पण कवडीमोल; मिजासी; डामडौली; दिखाव्याच्याच उपयोगी; फारसे टिकाऊ नसलेले (भांडी, वस्तू, मनुष्य इ.).

**पोशाखी नाव** औपचारिक परिपाठातील नाव; व्यावहारिक नाव.

**पोशिंदा** वि. आश्रयदाता; पालनकर्ता; प्रीतिपूर्वक पोसणारा. [फा.]

**पोशेणे** अक्रि. धान्याचे कणीस बाहेर पडणे. [सं.प्रसवणे]

**पोशे(स)र-रे** पु.न. मोठे, तांबडे व काटेरी कमळ. (को.)

**पोशेवचे** सक्रि. १. हातांनी घासणे. (गो.) २. काढून घेणे. (गो.)

**पोषक** वि. १. पोसणारा; पालन करणारा; आश्रय देणारा. २. पुष्टी देणारे.

**पोषण** न. १. पालन; संवर्धन; अन्नादी देऊन रक्षण करणे; आश्रय. २. (ल.) भक्ष्य. ३.बढती. [सं.]

**पोषणीय** वि. पोषण, पालन किंवा संवर्धन करण्यास योग्य.

**पोषणे** सक्रि. पहा: **पोसण**

**पोषित** वि. पोसलेला; सांभाळलेला; बाळगलेला.

**पोष्ट** न. १. टपालकचेरी. २. टपाल. ३.(छापखाना) छापण्याचा कागद. [इं. पोस्ट]

**पोष्ट(स्ट)र** न. भित्तिपत्रक. [इं. पोस्टर]

**पोष्णा** वि. १. दत्तक. २. खायला घालण्याच्या अटीवर ठेवलेले व स्वतःच्या उपयोगात आणलेले (दुसऱ्याचे जनावर). ३. दुसऱ्याच्या जिवावर जगणारा.

**पोष्या** वि. १. ज्याचे पोषण करावयास पाहिजे असा (पुत्र, कन्या इ.). २. पूर्वीच्या पत्रव्यवहारात वयाने वडील मित्र किंवा आश्रयदाता इ. ना पत्र लिहिताना लिहिणाराच्या नावापूर्वी हा शब्द लिहीत असत; आश्रित. [सं.]

**पोस** पु. खरवस. (गो.) [सं.पीयूष]

**पोसका** वि. दत्तक; सांभाळलेला; पोसावयास घेतलेला (मुलगा). (गो.)

**पोसकेपण** न. दत्तकपद्धती. (गो.)
**पोसणा-णे-ण्या** पु.न. पोसलेला; पाळलेला; दत्तक. पहा : **पोष्णा**
**पोसणे** सक्रि. खाऊ-पिऊ घालणे; सांभाळणे.
अक्रि. १. जोराने वाढणे; पुष्ट होणे; भरभराट होणे; लठ्ठ होणे. २. पूर्ण वाढ होणे (प्राणी, झाड इ.ची). [सं.पुष्]
**पोसवणे** अक्रि. कणीस बाहेर पडणे; पसवणे. [सं.प्रसव]
**पोसा** पु. इनाम; बक्षीस.(व.)
**पोसिली** वि. १. सावत्र; २. मानलेली.- ऐको
**पोसू** न. नाचणीचे लोंगर. (गो.)
**पोस्त** न. १. नोकरचाकरांना सणावारी विशेषत: होळीच्या सणानिमित्त दिलेले बक्षीस (पैसा किंवा दारू). २. त्या पैशाची श्रमपरिहारार्थ दिलेली मेजवानी. ३. नेहमीपेक्षा जास्त किंवा दक्षतेने काम करण्याबद्दल दिलेला पैसा; चिरीमिरी. ४. शाई बोळून किंवा वाळून जाऊ नये म्हणून दौतीत ठेवलेली चिंधी; शाईत काजळ घोटण्याकरिता (पुरचंडीसाठी) घ्यावयाचे फडके. ५. सर्व गावाने शिकार करून, घरोघरचे धान्य जमवून करावयाचे सहभोजन. [सं.पुष्टि]
**पोस्तपिंड** पु. दुसऱ्याच्या जिवावर चैन करणारा; पंक्तिपठाण; परान्नपुष्ट.
**पोस्तबोंड** न. अफूचे बोंड. [हिं.पोस्त= अफूचे बोंड]
**पोस्ती,पोस्त्या** वि. १. निशाबाज; झिंग्या; दारूबाज. २. गलेलठ्ठ.
**पोहच** स्त्री. पु. १. पावती. २. येणे; पावणे; हातात येणे (येणे असलेला पैसा). ३. पावलेला पैसा; भरणा.
पु. (ल.) टप्पा; आटोका; आवाका; सामर्थ्य.
**पोह(हो)चणे** अक्रि. १. पोचणे; दाखल, प्राप्त होणे. २. हाती येणे; पावणे. ३.(ल.)समजणे; अर्थ कळणे; जाणणे; अवगत होणे.
**पोहची** स्त्री. पहा : **पोची, पोवची** [हिं.]
**पोहचेला** वि. (ल.) दूरवर पाहणारा; दूरदृष्टी; दूरवर पोहच असलेला.
**पोहटा-टी** पु. १. पुरामध्ये नदीच्या पाण्यास येणारी फुगवटी; पूर. २. पुरामुळे, नदीच्या पाण्यास आलेल्या फुगवटयामुळे जमिनीस पडलेले भगदाड; घळी. ३. खाडीपासून दूरवर गेलेला तिचा फाटा. ४. मळीची जमीन. पहा : **गद्दी**. ५. शेणाचा गोळा; पोहो.
**पोहणी** स्त्री. १. पोहणे. २. पोहण्याचा एक दम; एक सुरकांडी.
वि. पोहण्याजोगी खोल (नदी); प्रवाह.
**पोहणी** स्त्री. घाण; दुर्गंधी (शेण इ.ची).
**पोहणे** अक्रि. १. हातापायांनी पाणी तोडून नदीत वगैरे तरणे. २.तिरणे; तरंगणे; पेवणे. ३. परिपूर्ण होऊन कायम गर्क असणे (शास्त्र, संपत्ती इ. मध्ये).
सक्रि. पोहून नदी ओलांडणे. [सं.प्लवन, प्रोहण]
**पोहती** स्त्री. लहान पोहो.
**पोहनाव** वि. पायउताराने जाता येत नसल्याने नावेच्या साहाय्याने जाता येण्याजोगे. पहा : **पोहणी**
**पोहरण** स्त्री. लावण; दीर्घसूत्रता. (व.)
**पोहरणे** क्रि. डब्ब होणे; फुगणे (पोट); फुगणे (सारवली असता माती, भिंत इ.).
**पोहरा** पु. विहिरीतून पाणी काढण्याचे भांडे. [सं. अपोहर, पयोधर]
**पोहा** पु. मेळा; पोवा; समुदाय (यात्रेकरू, भिक्षेकरी इ.चा). [सं.प्रवाह]
**पोहा** पु. साळीवर गरम पाणी घालून कुटून चपटा केलेला भाताचा दाणा. नेहमी अनेकवचनी वापर - पोहे. [सं. पृथुक]
**पोहाडणे** सक्रि. पोहणी घालणे. (व.) [सं.प्लवन]
**पोही-हे** स्त्री. (प्र.) पहा : **पाणपोई** :'पोह्या अन्नछत्र घालूनियां घरीं। दंडितो बाहेरी आलियासी।'- तुगा १२१६.
**पोहोटा** पु. भाजून वाळविलेला हुरडा. (व.,ना.)
**पोहो फाकणे** अकर्तृक क्रिया. अरुणोदय होणे. (व.) [सं. प्रभात]
**पोहोरी** स्त्री. पोरकिडा; धान्यातील कीड.
**पोळ** पु. १. देवाला वाहिलेला, पितरांच्या नावाने सोडलेला खोंड. याचे अंगावर त्रिशूलादी चिन्हे डागतात; वसू .२.(ल.) आळशी, लठ्ठ, निरुपयोगी माणूस. [सं. पोतक]
वि. माजलेला; मोकाट.
**पोळ** स्त्री. १. नुसत्या दगडांची रचलेली (माती, चुना इ. शिवाय) भिंत. २. आळी; बोळ. [सं. प्रतोली]
**पोळ** न. जमीनमोजणीच्या मापाची काठी.(गो.) [इं.पोल]
**पोळ** पु. मोठी पळी; पळा.
**पोळ** पु. (बैलगाडी) लांब, सरळ व वाटोळ्या गाडीच्या दांड्या प्रत्येकी.
**पोळ-ळे** न. मोहोळ. (को.)
**पोळकी** स्त्री. १. कागदाची नळी (बाण, काडतूस, फटाकडा इ. करिता केलेली). पहा : **पोलकट** २, **पोल**. २. (क्व.) लखोटा; लिफाफा. [हिं. पोल = पोकळ]
**पोळजत्रा** स्त्री. १. पोळ, सोडलेला बैल, रेडा यास देवीपुढे बळी देणे. २. (ल.) पिटवणूक; शत्रूच्या सैन्याची कत्तल व दाणादाण : 'या प्रकारें मल्हारराव यांचे फौजेची पोळजत्रा झाली.'- भाब ८१. पहा : **पोळा**
**पोळणे** अक्रि. १. भाजणे; होरपळणे; जळणे; अग्निस्पर्श होणे; चटका लागणे. २. (ल.) हाती घेतलेल्या कामात तोटा, नुकसान होणे; चट्टा बसणे. ३. (ल.) दुःखाने व्यथित होणे. [दे.क.होळे = चकाकणे; तेजस्वी असणे.; सं. प्रज्वल्]
**पोळप(पा)ट** पु. पोळी लाटण्याचा लाकडी, गोल पाट.
**पोळभाज** स्त्री. (शेती) जमीन भाजण्याचे काम; भाजवणी.
**पोळा** पु. आषाढ शुद्ध १४, श्रावण वद्य ३० व भाद्रपद वद्य ३०या दिवशी बैलास शृंगारून पूजाअर्चा करून थाटाने मिरवितात तो सण, उत्सव. [दे.प्रा.पोअलय, पोळ]
**पोळा** पु. १. मधमाश्यांचे पोळे. २. झाडाच्या पानावर मुंगळे, उंबील, हुरण यांनी केलेले घरटे.
**पोळा** पु. १. घर इ. जळत असताना त्यातून वाऱ्याने वर उडणारा तृणादी समुदाय. २. जमीन भाजण्यासाठी त्यावर पसरलेले गवत व पानांचे डहाळे इत्यादींचा जळल्याशिवाय राहिलेला भाग. (को.)[हिं.पोल]
**पोळा** पु. केळीच्या पानात घालून विस्तवावर भाजलेला पोकळा अथवा शेवग्याची फुले; पानपुडा; लहान मुलांचे एक खाद्य, शिजवलेला भात. [सं.पुलाक]

**पोळी** स्त्री. पोळ्याच्या दिवशी पूजेसाठी बैल आणण्याकरिता दिलेले पैसे. (व.)
**पोळी** स्त्री. १. कणीक भिजवून, लाटून भाकरीसारखी केलेली चपाती; कणकेचा उंडा आणि उकडीचे किंवा डाळीचे पुरण यांची केलेली चपाती. २. मोहोळाचा – मध नसलेला पोळीच्या आकाराचा भाग. ३.(ल.) एखादा दाबून पोळीसारखा केलेला पदार्थ. ४. लाख, लोध्र, अळिता इ. कांच्या रंगात भिजवलेला, पोळीच्या आकारासारखा केलेला आणि वाळलेला कापूस. हा वाटेल तेव्हा पाण्यात भिजवून याची तांबडी शाई करता येते. ५. (ल.) कांबळी; बैलाच्या गळ्याखाली सुटलेला भाग; पवळी. [सं.पोलिका] (वा.) ० **पडणे** – (प्रा.) दग्ध होणे. ० **पिणे**– चैन होणे; काही दिवस सुग्रास अन्न मिळण्याची सोय होणे. **(आपल्या) पोळीवर तूप ओढणे** – दुसऱ्याच्या फायद्याकडे लक्ष न देता, आपलाच फायदा करून घेणे; अपल्लपोटेपणा करणे; एकट्यानेच सगळे गिळंकृत करणे.
**पोळीव** वि. पोळलेले; भाजलेले; जळलेले.
**पोळे** न. मधमाश्यांचे मोहोळ; मधुकोश. [सं.पूलिका]
**पोळो** पु. आंबोळी (खाद्यविशेष). (गो.)
**पोळोव** पु. तोंडीलावण्यातील दाट रस. (गो.)
**पोंगटी,पोंगा–ग्या** वि. कुबडी; पोक आलेली : 'ते आदिंची पोंगटी केवटा । अैकै गा मग ती झाली नीटा ।'– श्रीकृच १८.५०.
**पोंगणे** अक्रि. पोक, कुबड असणे.
**पोंगडी** स्त्री. सोळा वर्षांच्या आतील कुमारी; स्वत:ची मुलगी (खा.)
**पोंगा** पु. सापाचे पिलू.
**पोंगा** पु. गवताची झोपडी : 'प्रत्येक विवाहोत्सुक तरुणाने एक पोंगा बांधून तयार ठेवलेला असतो.' – गुमा १०१.
**पोंगा,पोंगाडा** पु. १. गिरणी, कारखाने यांची शिटी. (ना.) २. एक वाद्य. [ध्व.]
**पोंज(झ)ड–डा** वि. १.घाणेरडा; ओंगळ; खराब (मनुष्य). (कु.) २. अभद्र बोलणारा. (गो.)
**पोंझा, पोंझट–डा** वि. फोपशा; फुगीर.
**पोंडा, पोंडा ऊस** पु. उसाचा एक प्रकार.
**पोंढ–ड, पोंढा** पु. १. (ल.) विहिरीतून काढलेले किंवा पाटातून आणलेले पाणी साठविण्याचा हौद. २. जेवताना भातावर कालवण घेण्यासाठी केलेली खळी; चोडे कुजत घालण्यासाठी खाजणात खणलेली खळी. आगर शिंपण्यासाठी केलेल्या दांड्यात पाणी राहावे म्हणून (नदी, पाट यात) खणलेली खळी; पाण्याकरिता केलेला किंवा झालेला खळगा; घराच्या मोरीचा डवरा. ३. डोक्याचा मागील भाग. [सं.कुंड]
**पोंढळणे** अक्रि. खोल जाणे (उपासामुळे डोळे इ.). (को.) सक्रि. (नारळीची, पोफळीची लहान रुजवणीची झाडे) उपटून पोंढात नेऊन लावणे.
**पोंढी–डी** स्त्री. १. लहान खळगा; खळी. २. डोक्याच्या मागील खळी; खोलगट भाग.
**पोंढे** न. भाताचे रोप लावण्याकरिता केलेला खोलगट जमिनीचा लहान तुकडा; भाताचे खाचर.(को.)
**पोंथ** पु. १. क्षत–छिद्रात सूत घालून वाहविण्याची वात; खीळ; सूत्रण; पोत; वात. २. फाळाने पडणारे भोक.
**पोंथा** पु. १. शेणाचा, विष्टेचा पोहो. २. (ल.) (निंदार्थी) सुस्त मनुष्य; वातुळ शरीराचा माणूस. (राजा.)
**पोंद** न. कुल्ले; ढुंगण.
**पोंदाडा** पु. मोठा पोचा; ठोका; खळगा.
**पोंदी–धी, पोंधा, पोंद्या–ध्या** वि. फोफशा; मांसल; सुटलेला; पुष्ट पण शक्तिहीन; सुस्त; आळशी (माणूस).
**पोंधा** पु. रुमणीची खुंटी; हळीस आणि नांगर यांचा जेथे जोड होतो तेथील खुंटी.
**पोंपेरे** न. लहान मुलांनी तोंडाने वाजवण्यासाठी ताड किंवा केळीच्या पानाची केलेली पिपाणी; पेपेरे. [ध्व.]
**पॉईंट** पु. १. (मुद्रण.) टाइपाची जाडी मोजण्याचे परिमाण. हे एकबहात्तरांश इंच प्रमाणाचे असते. २. टोक. ३. बिंदू. ४. मुद्दा; विषय; हेतू; प्रकरण; बाब. ५. पायरी; प्रमाण; मर्यादा; स्थिती; अवस्था. [इं.]
**पॉख(खा)र** स्त्री. झाडाची ढोली. (गो.)
**पॉटाचा** वि. रांडलेक. (गो.)
**पॉपलर** पु. समशीतोष्ण कटिबंधातील उंच व झपाट्याने वाढणारा, अल्पायुषी, पानझडी वृक्ष. साधे, रुंद व एकाआड एक पान. मुख्य उपयोग कागद बनवण्यासाठी, 'रेझीन' व औषधासाठी होतो.
**पॉयरों** वि. भुकेकंगाल; खादाड. (गो.)
**पॉलॉ** वि. गाल. (गो.)
**पॉलॉ** वि. गीर/गर नसलेले (फळ) पोचट.
**पॉलारों** पु. पायाच्या बोटात घालण्याचा रुपेरी दागिना. (गो.).
**पॉलिएस्टर, पॉलिस्टर** न. बहुवाटिकांपासून तयार केलेला कृत्रिम धागा. [इं.]
**पॉलिथीन** न.इथिलीन रेणूंच्या परस्परांत समावेशी अभिक्रिया होऊन त्यातून मिळणारे एक उत्पादन.
**पॉलिश** न. १. रोगण; सफाईचा रंग; चकाकी आणणारा घट्ट रंग. २. जिल्हई; चकाकी; सतेजता. [इं.]
**पॉलिसी** स्त्री. कार्याची दिशा; कार्यक्रमपद्धती; धोरण; कपटनीती; बेत. [इं.]
**पॉलिसी** स्त्री. विमापत्रक. [इं.]
**पॉल्लॉ, पल्लॉ** पु. गरोदरपणामुळे दुग्धोत्पत्ती कमी होत गेली म्हणजे अर्भकास निर्माण होणारा हावरेपणा.
**पॉश्य** स्त्री. ताबा; अधिकार. (गो.) [पोर्तु. पास]
**पॉसॉ** पु. (गो.) पहा : **पसा**
**पॉस्त** न. मासळीचा आडवा तुकडा. (गो.) [पोर्तु. पोस्ता]
**पॉळॉ** पु. १. भाकरी. २. लहान गोधडी. (गो.)
**पौ** पु. फाशावरील एक या संख्येचे चिन्ह; पव. [हिं.पव]

**पौगंड** न. मनुष्याची पाचपासून सोळा वर्षापर्यंतची, वयात येईपर्यंतची अवस्था; बाल्यावस्था व तारुण्य यांच्यामधील स्थिती. [सं.]
**पौची** स्त्री. सदऱ्याच्या बाहीचा मनगटावरील भाग किंवा पट्टी.
**पौठ** स्त्री. १. पोटरी. (गो.) २. बरोबरी; तुलना. (गो.)
**पौढणे** अक्रि. पहा : **पहुडणे**
**पौत्र** पु. नातू (मुलाचा मुलगा). [सं.]
**पौत्रिकेय** पु. मुलीचा मुलगा. [सं.]
**पौत्री** स्त्री. नात (बहुधा मुलीची मुलगी). [सं.]
**पौत्रू** सवि. सात. (नंदभाषा)
**पौन:पुन्य** न. पुन: पुन्हा करण्याची क्रिया; पुनरावृत्ती. [सं.]
**पौनर्भुव** पु.दुसऱ्यांदा लग्न झालेल्या स्त्रीचा मुलगा; पुनर्भूच्या ठिकाणी सवर्णापासून जन्मलेला मुलगा; बारा पुत्रांतील सहावा. [सं.]
**पौबारा** (फाशाचा खेळ) पहा : **पवबारा**
**पौर** वि. १. नगरात रहाणारा; नागरिक. २. शहरात बनविलेला; उत्पन्न केलेला; नगराचा; नगरी; नगरासंबंधी. [सं.]
**पौराणिक** पु. पहा : **पुराणिक**
वि. पुराणासंबंधी; पुराणातील. [सं.]
**पौरुष, पौरुषेय** न. १. पराक्रम; शौर्य; पुरुषाचा गुण; पुरुषत्व. २.शक्ती; सामर्थ्य; जोम.
पु.स्त्री.न. मनुष्याच्या उंचीसंबंधी दोनही हात वर करून हाताच्या बोटापर्यंतची उंची.
वि. मर्दानी; मानवी; मनुष्याचा; मनुष्यविषयक. [सं.]
**पौरुषवाद** पु. व्यक्तीचे इच्छास्वातंत्र्याचे मत किंवा त्याचे समर्थन; स्वत:च्या प्रयत्नाने मनुष्य आपला उत्कर्ष किंवा अवनती करून घेतो असे मत; प्रयत्नवाद. [सं.]
**पौरोहित–त्य** न. पुरोहिताचे काम. [सं.]
**पौर्णमासी, पौर्णिमा** स्त्री. पूर्ण चंद्राचा दिवस; शुक्ल पक्षातील शेवटचा दिवस. उत्तर हिंदुस्थानात पौर्णिमान्त महिना मानतात. [सं.]
**पौर्वापर्य** न. पूर्वापार; मागला–पुढला संबंध. [सं.]
**पौर्विक** वि. पूर्वीचा; आधीचा. [सं.]
**पौल** पु. संतती; गाय, म्हैस इ. चे वासरू.
**पौष** पु. हिंदू वर्षातील दहावा महिना. [सं.]
**पौषी** स्त्री. पौर्णिमा.
वि. पौषासंबंधी.
**पौष्टिक** वि. १. पुष्टिकारक; बलवर्धक; तेजस्कर; पोषक; धातू पुष्ट करणारे. २. श्रेयस्कर; आयुष्यवर्धक; संपत्तिदायक; सुखकारक. [सं.]
**पौळ–ळी** स्त्री. १. कुंपणवजा दगडाची लहान भिंत; पोवळी; आवार; तट: 'तेथ सप्त पौळीं। रत्नतेजाची बाहाळी ।'– शिव ३२२. पहा : **पोवळ** १. २. दगडाचा ढीग. [क.पौली = आवाराची भिंत]
**पौळी** १. मूढ दशा. २. धर्मपोई. – हंको.
**पौंध्या** क्रिवि. व्यर्थ; निष्फळ.
**प्याज** पु. कांदा. [फा.पियाझ]
**प्याजी** वि. कांद्याच्या रंगासारखे; किंचित गुलाबी रंगाचे; फिकट गुलाबी; पाटल : 'जहनेवादी पोशाख गुलाबी प्याजी ।'– सला ३८. [फा. पियाझी]
**प्यादगान** न. अव. पायदळ : 'पाटील बावापासीं वीस पंचवीस हजार स्वार प्यादगान मिळून आहे.'– दिमरा १.२४३. [फा. पियाद् गान]
**प्यादगी** स्त्री. १.पाईकपण; पायदळाचे काम. २.पाइकाचे वेतन : 'यांचा रोज्मुरा कजा व नेबकजा व प्यादगी टक्के तीनशें साडेसात यास जागा जकात कसबे मज्कूर देविले असेत.'–वाडसनदा १४१.
**प्यादा** पु. १. पायदळातील शिपाई; पायशिपाई; पाईक. २. (बुद्धिबळाचा खेळ) हलकी सोंगटी; मोहरीखेरीज करून इतर कोणतेही बुद्धिबळ; प्यादे . [सं.पदाति; फा. पियादा] (वा .) **प्यादाचा फर्जी होणे** – हलका मनुष्य मोठ्या पदवीस चढणे.
**प्यादाजवादा** पु. प्यादा इ. शिपाई.
**प्यादेमात** स्त्री. १. (बुद्धिबळ) प्याद्याने शह देऊन राजाचा केलेला कोंडमारा; प्याद्याच्या शहाने केलेली मात. २.(ल.) पराभव : 'समजतात जरी येतात प्यादेमात कुच उरांत रसासले ।'– अफला ८१.
**प्यान** न. खोऱ्याच्या एका हिसक्यात येणारा मातीचा भाग. (कु.,को.)
**प्यार** स्त्री. १. प्रेम; माया; ममता; प्रीती. २. प्रीतिपात्र; रखेली. [हिं.]
**प्यार–रा** वि. प्रिय; आवडता; खूश झालेला; प्रेमाचा; लाडका.[हिं.]
**प्याला** पु. १. पेला; (धातू, काच, माती इ. चे) पाणी,पेय इ. पिण्याचे लहान भांडे. २. बंदुकीचा काना; रंजकीचा पेला. (वा.) ० **पिणे–घेणे** – मुसलमान होणे (हिंदूंना मुसलमान करताना काझी त्याला प्याल्यातून काही पेय देतो यावरून).
**प्याला मतवाला** झिंगलेला; दारू पिऊन मत्त झालेला.
**प्यालेदार** वि. छातीवर येणारा भाग प्याल्यासारखा शिवलेला (अंगरखा).
**प्यास** स्त्री. तहान; तृष्णा (अक्षरश: व लक्षणेने). [सं.पिपासा, हिं.]
**प्याहा** पु. १. प्लीहागुल्म. २. पानथरी; प्लीहा : 'एका प्याहा पानथरी ।'– गीता १३.२४९५. [सं.प्लीहा]
**प्यॉड** न. वारूळ. (गो.)
**प्यॉद** स्त्री. लहानशी भिंत. (गो.)
**प्र** हा उपसर्ग शब्दाला लागून पुढील मुख्य अर्थ होतात. (अ) अधिक गती. (आ) आधिक्य; प्रकर्ष; अतिशयता (फार, पुष्कळ इ.); श्रेष्ठता; उच्चपणा. [सं.]
**प्रकट** वि. १. उघड; स्पष्ट.२. जगजाहीर; विख्यात; प्रसिद्ध; नावाजलेला.
क्रिवि. उघडपणे; स्पष्टपणे; जाहीरपणे; साक्षात. [सं.]
**प्रकटणे** उक्रि. १. प्रसिद्ध, जाहीर करणे; उघडकीस आणणे. २. दाखविणे (उघड रीतीने); प्रदर्शित, प्रकट करणे. ३. गुप्त स्थिती टाकून उघडपणे बाहेर येणे; स्पष्टपणे दिसणे. [सं. प्रकट]
**प्रकर** पु. समूह; समुदाय. [सं.]
**प्रकरण** न. १. खाते; शाखा; कामाचा वर्ग; विभाग. २. ग्रंथातील विषयादी अनुरोधाने पाडलेल्या भागांपैकी प्रत्येक अध्याय; परिच्छेद; खंड; स्कंध; पर्व; कांड; एखाद्या विषयाचे कागदपत्र. ३. विषय; मुद्दा; बाब. ४. काम; गोष्ट; उद्योग. ५. विशिष्ट मताने किंवा विचारसरणीने वागणारे लोक; पक्ष; मंडळी; मंडळ. ६. चालू विषय, काम. ७. (ल. उप.)

विद्या, कुल, जाती, गुण, अवगुण इ. गोष्टींनी असामान्य असा मनुष्य; गाढा विद्वान; प्रस्थ; धेंड. ८. हा शब्द गोष्ट, प्रस्थ, काही हेतू इ. अर्थी पुष्कळ ठिकाणी योजतात. जसे :- घरीं चार भाऊ आहेत, चौघांची चार प्रकरणे निराळी इ. ९. (नाट्य), नाटकाच्या दहा प्रकारांपैकी एक. [सं.]

**प्रकरणवस** पु. संदर्भ : अर्थु तो प्रकरणवसे' – अली ७२. [सं. प्रकरण + वश]

**प्रकरणोपात्त** वि. चालू विषयाला, प्रसंगाला किंवा कामाला धरून असलेले. [सं.]

**प्रकर्तनयंत्र** न. कागदाचे ताव कापण्याची यांत्रिक सुरी.

**प्रकर्ता** पु. आपल्या वतीने काम पाहणाऱ्याची नियुक्ती करणारा.

**प्रकर्ष** पु. उत्कर्ष; श्रेष्ठता; आधिक्य; अतिशयपणा; कोणत्याही गुणाची किंवा गोष्टीची परिणती; विपुलता. [सं.]

**प्रकल्प** पु. विशिष्ट हेतू साधण्यासाठी तयार केलेला योजनाबद्ध उपक्रम.

**प्रकक्ष** पु. खेळाच्या मैदानावर खेळाडूंसाठी ठेवलेली राखीव इमारत किंवा इमारतीचा भाग.

**प्रकंद** पु. अतिशय काळजी. (गो.)

**प्रकंपन** पु. वारा; वायू. [सं.]

**प्रकंपित (वक्षस्थळ)** न. (नृत्य.) नृत्याच्या वेळी दोनही पायांच्या चवड्यांवर उभे राहावयाचे व पुन्हा टाचा जमिनीवर टेकवायच्या. असे करताना वक्षस्थळ खाली-वर होऊ लागते ती स्थिती; जोराने श्वासोच्छ्वास घेत असताना उराचे हलणे. हसणे, रडणे, फार श्रम, भय वाटणे इ.च्या वेळी हा अभिनय करतात. [सं.]

**प्रकाम** वि. अतिशय; पुष्कळ; भरपूर; आकंठ. [सं.]

**प्रकार** पु. १. भेद; जाती. २. तऱ्हा; मार्ग; रीती; पद्धत.[सं.] (वा.) ० **करणे** – निरनिराळ्या रीतीने त्रास देणे, सतावणे.

**प्रकाश** पु. १. उजेड; तेज; चमक; अंधकाराचा लोप. २. (शब्दश: व ल.) फैलाव; विस्तार; प्रसार. ३. फुलाचा विकास; प्रफुल्लता. ४. ज्ञान; विषयाचे रहस्य; बुद्धीचा विकास. ५. बातमी, खबर इ. चा फैलाव, प्रसार. ६. सत्य प्रकट करणे; सत्यान्वेषण. ७. चैतन्य; आत्मज्ञान : 'सत्ता प्रकाश सुख । या तिहींतिहीं उणें लेख ।'– अमृ ५.१.८. प्रसिद्धी; ख्याती : 'समस्त लोकशिकतां । प्रकाश झाला चहूं राष्ट्रीं ।'– गुच ४६.५. ९. (नाट्य.) उघड भाषण; पात्राने प्रथम स्वगत भाषण करून नंतर दुसऱ्या पात्राबरोबर भाषण करणे. [सं.]

**प्रकाशक** वि. १. प्रकाशित करणारा; तेज देणारा; चकचकीत करणारा. २.स्पष्ट, विशद करणारा; जाहीर करणारा; प्रसिद्धिकर्ता. ३. पुस्तके प्रसिद्ध करणारा. [सं.]

**प्रकाश(शि)णे** उक्रि. १. चकचकणे; चमकणे; झळकणे. २. (ल.) उघडकीस येणे; प्रकट होणे. ३. तेजस्वी करणे; उजेड देणे; प्रकाश देणे; सूर्यप्रकाशाने पदार्थ दिसेल असा करणे. ४. (ल.) उदाहरण देऊन स्पष्ट करणे; प्रकट करणे; दाखविणे; उघडकीस आणणे; प्रसिद्ध करणे. ५. निर्माण करणे.

**प्रकाशन** न. ग्रंथ, वर्तमानपत्र इ. छापील मजकूर प्रसिद्ध करणे.

**प्रकाशनौका** स्त्री. नांगरलेले किंवा रुतून बसलेले, पण वरती खुणेचा दिवा लावलेले जहाज.

**प्रकाशपुंज** पु. दुर्बिणीतून दिसणारे मोठ्या प्रकाश गोलातील लहान तेजाचे बिंदू.

**प्रकाशबंदी** स्त्री. युद्धकाळात शत्रूच्या वैमानिकांना नेमके हल्ले करणे कठीण व्हावे म्हणून रात्रीच्या वेळी अमलात येणारा दिवाबंदीचा हुकूम.

**प्रकाशभेद** वि. (पारदर्शक नसून) उजेडास वाट देणारा; उजेड जाऊ देणारा. (इं.) ट्रॅन्सल्यूसंट

**प्रकाशमान** वि. प्रकाशणारा; तेजस्वी; चकचकीत.

**प्रकाशमापकयंत्र** न. प्रकाशाची तीव्रता मोजण्याचे यंत्र.

**प्रकाशयोजना** स्त्री. विशिष्ट परिणाम साधण्यासाठी केलेली दिव्यांची रचना.

**प्रकाशलेखन** न. प्रकाशाच्या साहाय्याने चित्रे काढण्याची कृती. [इं. फोटोग्राफी]

**प्रकाशवर्तुळ** न. विशिष्ट ठिकाणी टाकलेला गोलाकार प्रकाश. (इं.) स्पॉट लाईट.

**प्रकाशवर्ष** न. दर सेकंदाला सुमारे तीन लक्ष कि.मी. या वेगाने सूर्यापासून निघालेला. प्रकाश पृथ्वीवर पोहचण्यास आठ मिनिटे वीस सेकंद लागतात. या गतीने किरणांचे एका वर्षातील अंतर.

**प्रकाशवृत्त** न. सूर्याचे प्रकाशित जे गोलार्ध त्यास अप्रकाशित गोलार्धापासून निराळे करणारे काल्पनिक वृत्त.

**प्रकाश व्यतिकरण** प्रकाशलहरी एका दिशेने जात असता विरुद्ध दिशेने जर तशाच प्रकाश लहरी येत असतील, तर त्या दोहोंचा संयोग होऊन त्या ठिकाणी प्रकाशाच्या ऐवजी काळोख दिसणे.

**प्रकाशशास्त्र** न. दृष्टिशास्त्र; दृक्‌शास्त्र; दर्शनानुशासनशास्त्र.(इं.) ऑप्टिक्स.

**प्रकाशशोषण** न. दूर अंतरावरून एखाद्या वस्तूचा प्रकाश येत असल्यास मधल्या वातावरणात त्याचे किरण शोषले जाऊन प्रकाश कमी तेजस्वी दिसणे अगर प्रकाशित वस्तूच्या समोर दुसरे द्रव्य अगर वस्तू ठेवल्यास त्याकडून प्रकाश शोषला जाऊन मंद होणे.

**प्रकाशसंप्रदाय** पु. नाथ संप्रदाय, पंथ.

**प्रकाशसंश्लेषण क्रिया** (वनस्पति.) हरित वनस्पतींची कार्ब-द्वि-प्राणिल आणि पाणी यांचा वापर करून सूर्यप्रकाशाच्या साहाय्याने पिष्टमय पदार्थ तयार करण्याची प्रक्रिया.

**प्रकाशानुवर्ती** वि. प्रकाशाच्या दिशेने वळणारी (वनस्पती).

**प्रकाशित** वि. १. प्रकाशलेला; तेजस्वी झालेला; तेजोमय. २. प्रसिद्ध; उघड केलेला. [सं.]

**प्रकाशी** वि. प्रकाशणारा; तेजस्वी. [सं.]

**प्रकाशीय** वि. दृष्टीसंबंधी; दृष्टीविषयक. (इं.) ऑप्टिकल.

**प्रकाश्य** वि. प्रकाशित; प्रकट; उघड; प्रसिद्ध करण्यास योग्य; इष्ट.[सं.]

**प्रकाळ–ळा** पु. उशीर; विलंब : 'आतां प्रकाळा काईसा ।' – उषा १८.१७. [सं. प्र=परिवर्तित+म. काळ]

**प्रकाळणे** अक्रि. लांबणे; बराच वेळ टिकणे : 'मग संभोगसुखें प्रकाळेली । रात्रीं तेयां ।'– शिव २२९. २. क्रमणे; कंठणे.

**प्रकांड** वि. १. उत्कृष्ट; श्रेष्ठ; उत्तम; उच्च दर्जाचा. २. विशाल. पहा : **प्रचंड** [सं.]
**प्रकांत** वि. १. वरचढ. २. आरंभलेले. ३. पूर्वोक्त. ४. प्रकरणप्राप्त.[सं.]
**प्रकीर्ण** वि. १. नानाविध; विविध; निरनिराळ्या विषयांनी युक्त (पुस्तक, अध्याय, भाषण इ.). २. विस्तृत, विशद, उघड केलेला. ३.विखुरलेला; विस्कटलेला; अस्ताव्यस्त पडलेला. ४. सर्वत्र प्रसिद्ध किंवा जाहीर झालेला. [सं.]
**प्रकुपित** वि. क्रुद्ध; खूप रागावलेला. [सं.]
**प्रकृत** स्त्री. १. (प्र.) प्रकृती; शरीरावस्था; तब्येत. २. स्वभाव. वि. चालू; प्रस्तुत; सांप्रत; हल्ली; प्रचलित. [सं. प्रकृत] क्रिवि. सध्या; ह्या प्रसंगी; हल्ली.
**प्रकृति-ती** स्त्री. १. शरीर किंवा मन ह्यांचा मूळ स्वभाव, धर्म, अवस्था, स्थिती; स्वभाव; शरीर; तब्येत. २. पदार्थमात्राचा मूळ धर्म, मूळ स्वभाव किंवा स्थिती. ३. (तत्त्व.) विश्वाच्या उत्पत्तीचे कारण; मूळ कारण; उपादान कारण. ४. (वेदान्त.) माया; आदिमाया; ब्रह्माची जग उत्पन्न करण्याची इच्छाशक्ती; अविद्या. ५. (व्या.) शब्दाचे किंवा धातूचे प्रत्यय लागण्यापूर्वीचे मूळ रूप. ६. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार हे आठ पदार्थ. (यातील पहिल्या पाचांना पंचमहाभूते म्हणतात.) ७. राज्यकारभाराची सात अंग (स्वामी, अमात्य, सहृद, कोश, राष्ट्र, दुर्ग आणि बळ). ८. प्रजा; रयत : 'दुसरे दिवशीं प्रकृति प्रार्थिति येऊनि आपुल्या पतितें ।'- मोवन १३.१०४. ९. एक छंद. १०. एखाद्या व्यवहाराचा सामान्यत: चाललेला प्रकार. [सं.] (वा.)
**प्रकृतीवर टाकणे-ठेवणे-असू देणे** -- आजार वगैरे नैसर्गिक रीतीने बरा होऊ देणे.
**प्रकृतिगत** वि. प्रकृतीच्या किंवा मायेच्या स्वाधीन झालेला; मायोपाधिक : 'आणि हाचि प्रकृतिगतु । सुखदु:खभोगी हेतु ।'- ज्ञा १४.३४.
**प्रकृतिज** वि. उपजत; जन्मत:; स्वाभाविक.
**प्रकृतिप्रलय** पु. कल्पांती होणारा सृष्टीचा विलय; महाप्रलय.
**प्रकृष्ट** वि. उत्कृष्ट; उत्तम; श्रेष्ठ. [सं.]
**प्रकोप** पु. १. कफ, वात, पित्त या शारीरिक दोषांची अतिशय वाढ. २. दंगा; बंड. ३. चित्तक्षोभ; राग; क्षुब्धता; क्रोध. [सं.]
**प्रकोष्ठ** पु. कोपराखालचा हाताचा भाग. [सं.]
**प्रक्रांती** स्त्री. (मालमत्ता) एकाकडून दुसऱ्याकडे जाणे.
**प्रक्रिया** स्त्री. १. रीती; सरणी; पद्धती; मार्ग; चाल. २. (व्या.) शब्दाच्या मूळ रूपापुढे प्रत्यय वगैरे लावून शब्द सिद्ध करण्याची कृती. ३. संधिलोप वगैरे होण्याच्या पूर्वीचे शब्दाचे रूप.
**प्रखर** वि. १. अतिशय उष्ण; तीक्ष्ण; तीव्र; कडक (औषध, तपकीर इ.). २. भयंकर; तीव्र; अनावर; मनस्वी; उतावीळपणाची. क्रिवि. चलाखपणे; चुणचुणीतपणे; रोखठोकपणे; स्पष्टपणे.[सं. प्रखर]
**प्रखेळ** वि. परमार्थ न साधणारा. (गो.)
**प्रख्या** स्त्री. प्रसिद्धी; कीर्ती; ख्याती; लौकिक. [सं. प्र+ख्या]
**प्रख्यात** वि. प्रसिद्ध; सर्वश्रुत; नावाजलेला. [सं.]
**प्रग** वि. परंपरागत.
**प्रगट** पहा : **प्रकट**
**प्रगणक** पु. गणती करणारा.
**प्रगत** वि. विकसित; सुधारलेला.
**प्रगति-ती** स्त्री. सुधारणा; उत्कर्षाची स्थिती. [सं.]
**प्रगमनशील** वि. सुधारणाप्रिय; प्रगतिप्रिय.
**प्रगल्भ** वि. १. पूर्ण वाढलेला; प्रौढ; परिपक्व. २. धीट; धाडसी; निश्चयी; उत्साही. ३. शहाणा; गंभीर; खोल; अगाध (ज्ञानी मनुष्य). [सं.]
**प्रगल्भता** स्त्री. आधिक्य; पूर्णता.
**प्रगंड** पु. बाहू; हात; प्रकोष्ठ.
**प्रगाढ** वि. अतिशय; सुदृढ.
**प्रग्रह** पु. (चंद्र, सूर्य यांचे) ग्रहण. [सं.]
**प्रघट्टक** न. एखाद्या विषयाची मांडणी व त्यावर केलेली चर्चा, वादविवाद; ग्रंथाचे किंवा भाषणाचे विस्तृत पाडलेले विभाग.
**प्रघात** पु. १. परिपाठ; शिरस्ता; प्रचार; सर्वत्र रूढ असलेली गोष्ट. २. चाल; रीत; रूढी; संप्रदाय. ३. पद्धत; धर्ती; टूम; रूढ मार्ग, पद्धत. [सं.]
**प्रचलन** न. प्रचार; प्रसार; फैलाव : 'रामदासाप्रमाणें प्रवृत्तिमार्गाचें संतांनीं प्रचलन केलें.'- टि ४.४९६. [सं. प्र+चल्]
**प्रचलित** वि. १. भटकणारा; अस्थिर; विचलित; च्युत : 'प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।'- राक.२. चालू; रूढ. [सं.]
**प्रचंड** वि. १. श्रेष्ठ; परमावधीचा; अतोनात; पराकाष्ठेचा; आत्यंतिक; कमालीचा; भारी. २. जोरदार; आवेशी; जबरदस्त; दांडगा. ३. भयंकर; अनर्थकारी. ४. फार मोठा; अवाढव्य; विशाल. [सं.]
**प्रचार** पु. १. चाल; रीत; शिरस्ता; परिपाठ; प्रघात; रूढी. २. वर्तणूक; व्यापार : 'कीं मावळलिया दिनकरु । सरे किरणांचा पसरु । तैसा मनोजयें प्रचारु । बुद्धींद्रियांचा ।'- ज्ञा १६.१८४. ३. प्रसिद्धी; प्रसार; जाहिरात; परिस्फुटता. ४. गमन. [सं.]
**प्रचारक** पु. प्रचार करणारा; माहिती सांगून प्रसार करणारा. [सं.]
**प्रचारपट** पु. एखाद्या गोष्टीची जाहिरात.
**प्रचारित** वि. प्रचारात असलेले; वहिवाटलेले; रूढ; सामान्य; सर्वसाधारण.
**प्रचालन** न. मध्यवर्ती बँकेने काढलेल्या नोटा.
**प्रचालित** न. बढती मिळालेला.
**प्रचि(ची)त, प्रचीति-प्रचिती** स्त्री. प्रत्यक्ष अनुभव; खात्री; प्रत्यंतर; विश्वास; पडताळा. [सं. प्रतीति]
**प्रचुर** वि. पुष्कळ; विपुल; भरपूर; समासात युक्त; पूर्ण, व्याप्त. इ. अर्थी योजतात. जसे : - जल-वृक्ष-धान्य-सुवर्ण-विद्वत्ता प्रचुर इ.
**प्रचोदक** वि. प्रेरक; प्रेरणा देणारा.
**प्रचोदन-ना** न. स्त्री. १. प्रेरणा;उत्तेजन २.भर देणे; आग्रह करणे. ३. आज्ञा. ४. नियम; विधी; कायदा. [सं.]
**प्रच्छन्न, प्रच्छादित** वि. झाकलेला; लपलेला; गूढ; गुप्त; अप्रकट. [सं.]
**प्रच्छादणे** सक्रि. झाकणे; आच्छादणे; लपविणे. [सं.प्र+छद्]
**प्रच्छादन** न. १. झाकण; आच्छादन; आवरण. २. घोड्याच्या डोळ्यांमधील काळे व पांढरे वर्तुळ. [सं.]

**प्रच्छाया** स्त्री. १. सूर्यप्रकाशामुळे पडणाऱ्या पृथ्वीच्या सावलीचा मध्यभाग. तिच्यात सूर्यकिरणे अजिबात नसतात. २. दाट छाया. ३. दाट छायेचा प्रदेश.

**प्रछेद** पु. १. परिच्छेद. २. त्याग.

**प्रजन** पु. सधन, श्रीमंत लोक. [सं. ]

**प्रजनन** न. शुक्रजंतू व डिंब यांच्या सहयोगातून जीवनिर्मितीची होणारी क्रिया.

**प्रजननशास्त्र** न. आनुवंशिक गुणांतरण एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे कसे होते याचा अभ्यास करणारे शास्त्र.

**प्रजळणे** अक्रि. १. जोराने जळणे. २. (ल.) जळफळणे; दुष्टावा करणे : 'दाहीजें प्रजळतीं वैरी चिंतीति आन।'-वसा ४. ३. प्रज्वलित करणे; पेटवणे. [सं. प्रज्वलन]

**प्रजा, प्रज** स्त्री.अव. १. रयत; लोक. २. संतती; मुलेबाळे.[सं. प्रजा]

**प्रजाती** स्त्री. १. चांगले आनुवंशिक गुण असलेल्या जाती. २. एकाच कुटुंबातील प्राणी अथवा वनस्पतींचा समूह; वंश.

**प्रजातंत्र** न. लोकांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींनी चालवलेली शासन पद्धती.

**प्रजापति-ती** पु. १. ब्रह्मदेव. २. दक्षकर्दमादी ऋषींपैकी प्रत्येक. ३. राजा. ४. पुरुषांचे जननेंद्रिय; शिश्न. ५. सूर्यमालेतील एक ग्रह-युरेनस. [सं.]

**प्रजापरिठि-ठी** स्त्री. प्रजेची (भक्तांची) पालनकर्ती

**प्रजापती** पु. (ज्योतिष.) हर्षल. [सं.]

**प्रजापरिषद** स्त्री. स्वातंत्र्यलढ्याच्या काळात संस्थानातून लोकसत्ता मिळविण्यासाठी स्थापन करण्यात आलेली कोणतीही संस्था; प्रजेच्या मताबद्दल चर्चा करण्याची महासभा.

**प्रजाभाग** पु. उत्पन्नापैकी रयतेचा भाग.

**प्रजासत्ताक** वि. लोकांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींनी चालविलेली (राज्यपद्धती).

**प्रजासाधन, प्रजोत्पादन** न. प्रजोत्पत्ती; वंशवृद्धी.

**प्रजिता** पु. (शस्त्र) परजणारा.

**प्रजी** स्त्री. तरवार, ढाल, पट्टा इ. ची मूठ; खोबळा. पहा : **परज**

**प्रजोत्पत्ति-त्ती** स्त्री. १. मैथुनद्वारा संततीचे जनन. २. संतान; संतती.

**प्रज्यनाथ** पु. पर्जन्य; पाऊस. (को).

**प्रज्वलन** न. जळणे; पेटणे; पेटविणे. [सं.]

**प्रज्वलित** वि. पेटविलेला; जळणारा; जळत असलेला; प्रदीप्त. [सं.]

**प्रज्व(ज्वा)ळणे** उक्रि. १. जळणे; प्रदीप्त होणे; जाळणे. २. (ल.) जळफळणे; रागावणे; कोपणे. [सं. प्रज्वलन]

**प्रणणे, पर्णणे** सक्रि. १. विवाह करणे; वरणे; पाणिग्रहण करणे (विशेषत: वराकडून) : 'स्वयंवरा आली उर्वशी। ते मागौती पाठविली साधुर्सी। परी बुद्धी ठेली कैसी। जे हेची प्रणावी।'- शिव २०२. २. (ल.) स्वीकार करणे; घेणे : 'कौरव प्रणून अपकीर्ति। जाते झाले स्वस्थळां।'- मुविराट ६.१७०. [सं.परि+नी, परिणय]

**प्रणत** वि. १. नमलेला; वाकलेला. २. (ल.) नम्र; विनयशील; शरण आलेला. [सं.]

**प्रणति-ती** स्त्री. १. नमस्कार; नमन; वंदन. २. (ल.) नम्रता; लीनता. [सं.]

**प्रणतु** पु. वंदन. 'भाग्यवंतासि राजकि मंडल श्री प्रणतु' - राजपुरी शिला १३-१४. [सं. प्र+नम्]

**प्रणय** पु. प्रेम; प्रीती; लळा. [सं.]

**प्रणयन** न. १. नेण्याची क्रिया. २. पुरस्कार; प्रचार; प्रसार. [सं.]

**प्रणयिनी** स्त्री. प्रिया; प्रियकर स्त्री. [सं.]

**प्रणयी** वि. प्रेम करणारा; प्रेमी; प्रेमीजन; प्रियकर.

**प्रणयी जन** प्रिय व्यक्ती; प्रेमपात्र; प्रियकर.

**प्रणव** पु. १. ओंकार. २. प्राणायाम. ३. वाद्यविशेष. पहा : **पणव**

**प्रणाम** पु. नमस्कार; वंदन. [सं.]

**प्रणाल** पु. पाट; नळ. [सं.]

**प्रणालिका, प्रणाली** स्त्री. १. पाट; नळ; गटार; पन्हळ; परिनलिका. २. (ल.) नेहमीची ठरावीक व्यवस्था, पद्धत, मांडणी; रूढ झालेला, योग्य मार्ग, रीत, क्रम, परिपाठ, परंपरा : पहा : **परिनलिका** [सं.]

**प्रणिति-ती** स्त्री. झाकण.

**प्रणिधान** न. १. (एखाद्या गोष्टीकडे किंवा गोष्टीत) मन लावणे, घालणे; एक प्रकारची भक्ती; ध्यान; चिंतन. २. दीर्घोद्योग; प्रयत्न. ३. कर्मफलत्याग. [सं.]

**प्रणिधी** पु.१. विशिष्ट कामासाठी पाठविलेला प्रतिनिधी. २. गुप्तहेर.[सं.]

**प्रणिपात** पु. नमस्कार; वंदन; दंडवत. [सं.]

**प्रणियणे** क्रि. पहा : **प्रणणे**

**प्रणीत** वि. बनविलेला; केलेला; रचलेला. समासात उत्तरपदात योजला जाणारा शब्द. जसे : -व्यासप्रणीत, गौतमप्रणीत इ. [सं.]

**प्रणीता-ति** स्त्री. यज्ञातील एक पात्र. हे समंत्रक पाण्याने भरून अग्नीच्या उत्तर बाजूस ठेवतात. हे लाकडी चौकोनी पाळण्याच्या आकाराचे असून त्यास मूठ असते.

**प्रणु** पु. परिणय; विवाह; लग्न : 'रामप्रणुसंभ्रमानें। दुंदुभी तुरें लागलीं।'- वेसीस्व ९.३९. [सं. परिणय]

**प्रणेता** पु. जनक; प्रारंभ करणारा.

**प्रणोदक** पु. स्फोटकामधला दुर्बल मानला जाणारा एक घटक.

**प्रणोदन** न. गती देण्याची व ती चालू ठेवण्याची क्रिया.

**प्रत** स्त्री. १. नक्कल; कित्ता; मूळ वस्तूची प्रतिकृती; प्रतिलेख; मुळाबरहुकूम बनविलेली दुसरी वस्तू. २. अनेक पुस्तकांपैकी एक पुस्तक; एक नग. ३. ज्या लेखा किंवा पुस्तकावरून दुसरा लेख किंवा पुस्तक लिहितात तो मूळ लेख किंवा पुस्तक. ४. एक चित्र पाहून त्यासारखेच काढलेले दुसरे चित्र. ५. पुस्तक; ग्रंथ. ६. नमुना; मासला; जात; तऱ्हा. ८. विभाग; वर्ग; दर्जा : 'सन १७५० इसवीचे अगोदरचे जे सरंजाम लोकांकडे चालत असतील ते वंशपरंपरा चालवावे व त्या सर्व सरंजामांची पहिली प्रत करावी.'- इनाम १९. ९. संच; गंज; गठ्ठा; समूह; गट. १०. समारंभाच्या वेळी निमंत्रित व उच्च दर्जाच्या पाहुण्याला, मान्यवरांना देण्यासाठी योजलेल्या दक्षिणा - आहेरातील सर्वांत उत्तम गट. [सं. प्रति]

**प्रत** शअ. १. स; ला; ते; कडे; दिशा, उद्दिष्ट दाखवणारा प्रत्यय. जसे:- राजा प्रधानाप्रत बोलतो. २. उद्देशून; करिता; साठी. उदा. काही रुपये घराप्रत दिले. ३. जेथे जायचे त्या ठिकाणाचा बोध करून देणारा प्रत्यय; ला. जसे :- 'ही वाट संपून आम्ही घराप्रत होऊ तेव्हाच्या साऱ्या गोष्टी.' पहा : **प्रति** [सं. प्रति]

**प्रतझाडा** पु. १. एखाद्या मोठ्या कामाचा किंवा निरनिराळ्या गोष्टींचा (जमाखर्च, निरनिराळ्या वस्तूंचा) खातेवार हिशेब. (क्रि. ठेवणे, काढणे, लावणे, मिळवणे इ.). २. अशा तऱ्हेने ठेवलेला हिशेब. (क्रि. निघणे, लागणे, मिळणे इ.)

**प्रतबंदी** स्त्री. जमाबंदीच्या गुणावरून पिकाच्या गुणवत्तेच्या आधारे केलेले वर्गीकरण : 'धारवाड जिल्ह्यांत प्रतबंदी सुरू होती.'- इनाम ९.

**प्रतयंत्र** न. मजकुराच्या जशाच्या तशा नकला करून देणारे यंत्र. (इं.) झेरॉक्स मशीन.

**प्रतल** न. सपाट पृष्ठ; समपातळी.

**प्रतवार** क्रिवि. गटाने; वर्गवारीने; घटकांप्रमाणे.

**प्रतान** पु. १. वेल; लता : 'प्रतान कोमल निजशीलाचा खालीं ढासळलेला।' - बंदीशाळा. २. लतेचा बारीक तंतू; घुमारा; पागोरा; ताणा. ३. विस्तार; प्रसार. [सं. प्र+तन्]

**प्रताप** पु. १. योग्यता; अधिकार; प्रभुत्व. २. वैभव; प्रभाव; सामर्थ्य; प्राबल्य. ३. शौर्य; पराक्रम; वीर्य; पौरुष. ४. सामर्थ्य; शक्ती; गुण; परिणाम (औषध इ.चा). ५. उष्णता; दाह : 'सुटला प्रतापाचा वारा।'- उषा ७४.८३१. ६. पूर्वी धारवाड वगैरेकडे प्रचारात असलेले दोन रुपये किमतीचे एक नाणे; अर्धा होन. [सं.] (वा.) **०उधळणे** - अंगचे दुर्गुण उधळणे.

**प्रतापरुद्र** वि. भयंकर; उग्र शक्तीचा, पराक्रमाचा. [सं.]

**प्रतापलंकेश्वर** पु. एक औषधी मात्रा.

**प्रतापवराळी** पु. (संगीत) एक राग; गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**प्रतापवान, प्रतापी** वि. १. पराक्रमी; सामर्थ्यवान; शौर्यशाली; शक्तिवान. २. परिणामकारक; गुणकारी; जहाल; कडक (औषध इ.).

**प्रतारक** वि. प्रतारणा करणारा; लबाड; लुच्चा. [सं.]

**प्रतारण, णा** न. स्त्री. फसवणूक; लबाडी; लुच्चेगिरी; कपट.[सं. प्रतारणा]

**प्रतारणे** अक्रि. फसविणे; ठकविणे; वंचणे.

**प्रतारित** वि. फसविलेला; फसगत झालेला; ठकविलेला; वंचित. [सं.]

**प्रति** उप. १. ऐवजी; बदली; जागी. २. प्रत्येकी; दर एकास. ३. दिशा; अपेक्षित ठिकाण; कडे; दिशेने; वर. ४. परत; माघारी; पुन्हा. ५. तुल्य; समान; तद्रूप; प्रमाणे.६. गौण; सामान्य. शअ. पहा : **प्रत** [सं.]

**प्रति** स्त्री. बरोबरी; जोड : 'प्रति नाहीं त्याशीं करी पराभव।'- शिवगीता ६१. [सं.]

**प्रतिकर-रूं** पु. अनुभव; प्रतीती.

**प्रतिकर्षण** न. अपसरण; दूर होण्याची क्रिया.

**प्रतिकंचुक** पु. शत्रू; विरोधी. पहा : **प्रतिकुंचक** [सं.]

**प्रतिकाय** पु. पहिल्यासारखीच तयार केलेली दुसरी कृती; नक्कल; प्रतिमा; प्रतिबिंब; चित्र; प्रतिकृती. (इं.) डमी. [सं.]

**प्रतिकार** पु. १. प्रतिक्रिया; विरुद्ध दिशेने, उलट प्रयत्न, व्यापार. २. उपाय; इलाज; दूरीकरण; निरास. ३. विरोध; प्रतिबंध; अडवणूक. ४. सूड; अपमानाची, दुःखाची फेड; उसने फेडणे. [सं.]

**प्रतिकारक** वि. १. प्रतिक्रिया करणारा; उलट उपाय योजणारा; प्रतिबंधक; विरोधक. २. सूड उगविणारा; प्रतिफल देणारा. [सं.]

**प्रतिकाश** पु. प्रतिबिंब; दर्शन : 'प्रळयशब्दें प्रत्यक्ष नाश। जयासी पुन्हां नाहीं दर्शन प्रतिकाश।' - स्वादि १३.५.१२. [सं.]

**प्रतिकुंचक** वि. प्रतिकूल; विरुद्ध : 'जयास सांगावा विवेक। तोचि जाणावा प्रतिकुंचक'- दास १९.६.५.

पु. रिकामी लुडबूड, मध्यस्थी, ढवळाढवळ करणारा; त्रास देणारा. [सं. प्रतिकंचुक]

**प्रतिकूल-ळ** वि. विरुद्ध; उलट; विरोधी; विपरीत; विषम (माणूस, प्रसंग, घटना इ.).

न. विवाहादी मंगलकार्याचा निश्चय झाल्यावर अशौचादिकामुळे येणारी अडचण.

**प्रतिकृति-ती** स्त्री. १. पहा : **प्रतिकाय**. २. पहा : **प्रतिक्रिया**[सं.]

**प्रतिकोश** पु. मोबदला; प्रतिमूल्य; एका वस्तूऐवजी दिलेली दुसरी वस्तू.

**प्रतिक्रिया** स्त्री. १. परतफेड; बऱ्यावाईट गोष्टींचे प्रतिफल; प्रतिकार; उलट क्रिया; क्रियांतर. २. प्रतिपक्षाच्या क्रियेवर केलेला उपाय; तोड; इलाज; उपचार; विरोध : 'कीं स्फुरे हननक्रिया प्रतिक्रिया।'- यथादी ४.१५०९. पहा : **प्रतिकार**. ३. (शाप.) प्रत्याघात; उलट क्रिया. (इं.) रिॲक्शन [सं.]

**प्रतिगामी** वि. १. विरुद्ध; उलट; विरोधी : 'तथापि प्रतिगामी स्वरूपाचीं देखिल कांहीं उदाहरणें दाखवितां यावयाचीं नाहींत असें नाहीं.'- वस्व ७२. २. पीछेहाटीची. [सं.]

**प्रतिगृहीत** वि. १. स्वीकार केलेले; स्वीकृत. २. कबूल केलेले; परवानगी, मान्यता दिलेले; पसंत; मान्य. [सं.]

**प्रतिग्रह** पु. १. देणगीचा स्वीकार; दान घेणे. २. स्वीकार; मान्यता; पसंती; कबुली. ३. (कायदा) देणगीचा प्रत्यक्ष ताबा मिळणे. ४. (कायदा) देणगीच्या मालाचा कबजा घेण्याची पात्रता, अधिकार. [सं.]

**प्रतिग्रहि(ही)ता** वि. दान घेणारा : 'आपणचि विऊनि दुहिता। कीं न मम म्हणे पिता। तो सुटे कीं प्रतिग्रहिता। जांवाई शिरके।'- ज्ञा १८.२३४.

**प्रतिग्राहक, प्रतिग्राही** वि. १. स्वीकार करणारा; दान इ. घेणारा. २. कबूल करणारा; मान्यता, परवानगी देणारा. [सं.]

**प्रतिग्राह्य** वि. स्वीकारण्यास, घेण्यास योग्य; लायक; स्वीकारणीय.[सं.]

**प्रतिघात** पु. एका पदार्थावर दुसरा पदार्थ आपटला असता उलट वेग उत्पन्न व्हावयाजोगा त्यावर बसणारा तडाखा; प्रतिक्रिया; प्रतिकार; उलट प्रहार; प्रतिबंध; प्रत्याघात; प्रतिक्षेपण. [सं.]

**प्रतिघातक** वि. प्रतिक्रिया करणारा; प्रतिकारक. [सं.]

**प्रतिचिन्ह** न. अधिक सुरक्षिततेसाठी केलेली दुसरी खूण.

**प्रतिछाया** स्त्री. १. पडसावली; पडछाया. २. प्रतिबिंब. ३. पुतळा; चित्र; प्रतिमा. [सं.]

**प्रतिजाप** पु. उलट उत्तर; जबाब. [सं. प्रति+फा.जाप]

**प्रतिजिव्हा** स्त्री. पडजीभ. [सं.]

**प्रतिजैविक** वि. रोगजंतुनाशक. (इं.) अँटिबायोटिक.

**प्रतिताल** पु. (संगीत) पहा : **विषम**

**प्रतित्य** न. अनुभव.

**प्रतिथि–थी** स्त्री. प्रसिद्धी; ख्याती. [सं.]

**प्रतिदान** न. १. मोबदला; परतफेड. २. परत दिलेली देणगी; उलट आहेर. ३. मालकाला त्याची हडप केलेली संपत्ती परत मिळवून देणे. [सं.]

**प्रतिदीप्ती** स्त्री. काही पदार्थांवर उत्सर्जित झालेले किरण पडले असता त्यांचा चमकू लागण्याचा गुणधर्म.

**प्रतिदेह** पु. १. प्रेतदेह. २. मृत्यूनंतर दु:ख भोगण्यासाठी मिळणारा (अव्यक्त) देह. [सं.]

**प्रतिदोकडा** पु. दोकड्याचा किंवा कच्च्याचा कोणताही अपूर्णांक. [सं.]

**प्रतिद्वंद्वी** वि. १. विरुद्ध जाणारा; आड येणारा; प्रतिस्पर्धी; उलटपक्षी. २. अर्थांतरमय; अर्थांतरन्यासरूप. [सं.]

**प्रतिध्वनी, प्रतिनाद** पु. पडसाद; प्रतिशब्द.

**प्रतिनिधी** पु. १. प्रतिमा; चित्र; प्रतिकृती; प्रतिमूर्ती; प्रतिरूप. २.(ल.) नायब; मुतालिक; राजाच्या जागी असणारा अधिकारी, वकील, मुखत्यार, मदतनीस, दुय्यम; हाताखालचा. मारुती व गरुड यांचे मुखवटे व दोन अबदागिरी ही प्रतिनिधित्वाची चिन्हे होती. ३. एकाच्या बदली घेतलेला दुसरा माणूस किंवा पदार्थ. ४. संस्थेने विशिष्ट कामासाठी, आपल्या वतीने काम करण्यासाठी नियुक्त केलेला माणूस. ५. मराठ्यांच्या राजमंडळातील अष्टप्रधानांहून वरचे पद. ६. जामीन; करारदार. [सं.]

**प्रतिनियुक्ती** स्त्री. प्रतिनिधी पाठवणे. (इं.) डेप्युटेशन.

**प्रतिनियोक्ता** पु. मतदारसंघाचा सभासद.

**प्रतिनिवेश** न. (सशा.) बदलला जावू शकत नाही असा संबंध.

**प्रतिपत्–पदा** स्त्री. शुक्ल, कृष्ण पक्षातील पहिली तिथी. [सं.]

**प्रतिपत्ति–त्ती** स्त्री. १. आदर; मान. २. संपादणूक; उपार्जन. ३. (ल.) मेजवानी : 'हें असोतु या बोलाचीं तारें भर्ली । बरी कैवल्यरसें वोगरली । ही प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ।' – ज्ञा ६.२२. ४. साधन; पद्धती; विधिविधान : 'तयां कोणें प्रतिपत्तीं । विवाह केले ।'– ज्ञा १६.३०४. [सं.]

**प्रतिपत्री** पु. आपल्यावतीने मत देण्यासाठी नियुक्त केलेली व्यक्ती. (इं.) प्रॉक्सी.

**प्रतिपथ** पु. रूपांतर : 'तेचि रसाळकथा । मऱ्हाठिया प्रतिपथा । आणिजेल आतां । अवधारिजो ।'– ज्ञा १२.२४६. [सं.]

**प्रतिपद** न. १. समानार्थी शब्द; प्रर्याय. २. विवेचन; फोड : 'एवं सर्वशब्दाचें प्रतिपद । कृत्स्न म्हणे गोविंद ।' – यथादी १८.६३२.
वि. प्रत्येक शब्दाची; शब्दागणिक; सविस्तर : 'टीका याची विशद। माये जाली प्रतिपद ।'– यथादी १८.६७४. [सं.]

**प्रतिपदी** क्रिवि. (शब्दश: व ल.)पावलोपावली; क्षणोक्षणी : 'प्रवृत्तीचिये राजबिदीं । अवस्थाभेदप्रमर्दी । कीजत आहे प्रतिपदीं । सुखाचें लोण ।'– ज्ञा १८.१०९६.

**प्रतिपन्न** वि. शरणागत: 'प्रतिपन्न म्हणिजे किंकरधर्मी' – लीचउ ५८९[सं.]

**प्रतिपक्ष** पु. १. (कायदा, वादविवाद इ.) विरुद्ध पक्षाचा इसम; प्रतिवादी. २. प्रतिस्पर्धी; दुसऱ्या गोष्टीच्या विरुद्ध व नाशास कारण असलेली एखादी गोष्ट. ३. शत्रू. [सं.]

**प्रतिपंथी** वि. विरोधी; विसंगत.

**प्रतिपादक** वि. प्रस्थापित करणारा; पुराव्याने सिद्ध करणारा. [सं.]

**प्रतिपादणे** उक्रि. १. सिद्ध करणे; प्रस्थापित करणे; पुष्टी देणे; प्रमाणाने खरा करून देणे. २. सर्वस्वी दुसऱ्याच्या स्वाधीन, हवाली करणे; कायमचा देऊन टाकणे; बहाल करणे. ३. बोलणे; सांगणे : 'आधींचि विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी ।'– ज्ञा ४.२.

**प्रतिपादन** न. १. हरकतींचे, दोषांचे निरसन करून स्वत:चे मत सिद्ध, प्रस्थापित करणे; विवेचन; आत्मसमर्थन. २. दान; देणगी देणे. [सं.]

**प्रतिपादित** वि. सिद्ध, प्रस्थापित, समर्थन केलेला. [सं.]

**प्रतिपाद्य** वि. सिद्ध करण्यालायक; समर्थनीय. [सं.]

**प्रतिपालित** वि. संरक्षण, संवर्धन केलेला; पोसलेला. [सं.]

**प्रतिपाळ–ल, प्रतिपालन** पु. न. (अन्नवस्त्रादीद्वारा) संरक्षण, संवर्धन; संगोपन; पालनपोषण (शब्दश: व ल.).

**प्रतिपिंड** पु. प्रथिनांचा बनलेला, रोगांपासून शरीराचे रक्षण करणारा पिंड.

**प्रतिपुस्तक** न. भाषांतर; नक्कल.

**प्रतिपूतक** वि. जंतुविरोधक. (इं.) अँटीसेप्टिक.

**प्रतिपूर्ती** स्त्री. १. दुरुस्ती; सुधारणा. २. नुकसानभरपाई. ३. केलेल्या खर्चाची मागाहून देण्यात आलेली रक्कम.

**प्रतिप्रसव** पु. सामान्य निषेधाचा विशेष गोष्टीपुरता पुन्हा केलेला विधी; प्रतिबंध-कायद्याच्या बाबतीत सवलत; निषेधात्मक गोष्टींचे पुन्हा प्रतिपादन. [सं.]

**प्रतिफल–ळ** न. फेड; मोबदला; उलट फळ. [सं.]

**प्रतिफलन** न. (प्रकाश) परावर्तन.

**प्रतिफळणे** अक्रि. फलद्रूप होणे; अनुरूपपणाने फळणे; सिद्ध होणे.

**प्रतिबद्ध** वि. अडथळा झालेला; प्रतिकार केलेला; प्रतिबंध झालेला; मज्जाव केलेला; अडविलेला. [सं.]

**प्रतिबद्धक** वि. प्रतिबंध करणारा; आड येणारा.

**प्रतिबंध, प्रतिबंदी** पु. स्त्री. १. अडथळा; विरोध; अडवणूक; आडकाठी; प्रतिकार; विघ्न. २. (यंत्रशास्त्र) ज्या कारणाने चलन पावलेल्या पदार्थाचे चलन कमी होते अथवा नाहीसे होते किंवा उलटे होते, अशी गोष्ट. [सं. प्रतिबंध]

**प्रतिबंधक** वि. प्रतिबंध, अडथळा, प्रतिकार, अडवणूक करणारा; निवारक. [सं.]

**प्रतिबंधकन** न. अडचण; विघ्न; अडथळा : 'अधिक खादलिया अन्न । तें प्रतिबंधन गुरुसेवें ।'– एभा १७.३१०.

**प्रतिबिंब** न. पाणी, आरसा इ. च्या पृष्ठभागावर दिसणारी पदार्थांची पडछाया; प्रतिरूप. [सं.]

**प्रतिबिंबणे** अक्रि. १. पडछाया पडणे; प्रतिबिंबित होणे; स्वरूप उमटणे: २. भासणे; वाटणे: 'माझे अव्ययत्व तरी न नसे। परी होणें जाणें एक दिसे। तें प्रतिबिंबे मायावशें। माझ्याचि ठायीं।'- ज्ञा ४.४५.

**प्रतिबोध** पु. एखादी गोष्ट पाहिल्यावर तिचे मनात उमटणारे प्रतिबिंब. [सं.]

**प्रतिभट** पु. स्पर्धक; शत्रू. [सं.]

**प्रतिभटणे** अक्रि. स्पर्धा, बरोबरी करणे; भांडणे : 'असे ज्याचें त्याशीं प्रतिभटति जे पामर पिसे।'- वामन स्फुटश्लोक नवनीत १३४.

**प्रतिभा** १. प्रतिबिंब; छाया; स्वरूपांतर: जैसे सरोवर आटे। मग प्रतिभा नाहीं।' - सा ५-१५६. २. कल्पना; मानसिक प्रतिमा; कल्पना चित्र. ३. अनुभव; प्रतीती : 'कीं आत्मराजाचिये सभें। गीते वोडविले खांबे। मज श्लोकप्रतिभे। ऐसे येत।'- ज्ञा १८.१६६५. ४. उच्च प्रकारचे ज्ञान; अलौकिक बुद्धी; स्फूर्ती. ५. कांती; तेज.

**प्रतिभाक** स्त्री. प्रतिज्ञा.

**प्रतिभावान-शाली, प्रतिभासंपन्न** वि. श्रेष्ठ बुद्धिमान; अतिशय हुशार.

**प्रतिभास** पु. १. प्रतिबिंब; प्रतिरूप. २. पहा : **प्रतिभा २** [सं.]

**प्रतिभासणे** क्रि. १. दिसणे; वाटणे; भासणे; प्रतीत होणे. २. प्रतिबिंबित होणे.

**प्रतिभू** पु. जामीन; हमीदार. [सं.]

**प्रतिभूती** स्त्री. गहाण टाकलेली वस्तू; तारण.

**प्रतिम** वि. सारखा; एखाद्याची प्रतिमा असणारा.

**प्रतिमंडल** न. १. (गणित) केंद्रपराङ्मुख वर्तुळ; विक्षेप वर्तुळ; उपकारक वर्तुळ. २. प्रतिबिंब : 'नातरी सूर्यप्रतिमंडळ। जैसेनि धरी सलिल।' - ज्ञा १३.९०८.

**प्रतिमा** स्त्री. १. सादृश्य; साम्य; बरोबरी; उपमा. २. धातू, पाषाण इ.कांवर कोरलेली देवादिकांची मूर्ती. ३. प्रतिबिंब. ४. चित्र. ५. नक्कल. ६. चिन्ह; खूण. ७. प्रतिनिधी; मुतालिक. [सं.] (वा.) **०वाढवून दाखविणे-** स्वतःची बढाई सांगणे.

**प्रतिमान** न. १. लेखकाच्या कल्पित सृष्टीत जी पात्रे वावरतात, त्या प्रत्यक्षातील (जे जे इंद्रियगम्य ते ते) स्त्री-पुरुषाचा गाळीव नमुना. - प्रतिभासाधन२. कल्पना यावी म्हणून एखाद्या इमारत, धरण इ. ची हुबेहूब प्रतिकृती; प्रतिरूप; वळण.

पु. कित्ता; नमुना; नकाशा; साचा. (इं.) मॉडेल.

**प्रतिमानाश्रयी कला** त्रिमिती आकृत्या (उदा. पुतळा) तयार करण्याचे शास्त्र.

**प्रतिमुख** न. प्रतिबिंबातील मुख : 'पै बुद्धिभेदाचा आरिसा। तया हातोनि पडिला वीरेशा। म्हणौनि प्रतिमुखाभासा। मुकला तो।'- ज्ञा १४.३०४.

**प्रतियत्न** पु. एखाद्या गोष्टीचे दुष्परिणाम टाळण्यासाठी किंवा त्यांना विरोध करण्यासाठी केलेली उपाययोजना.

**प्रतियुती-योग** स्त्री. पु. (ज्यो.) पृथ्वीच्या एका बाजूस सूर्य आणि दुसऱ्या बाजूस ग्रह असून त्यापासून भूमीकडे येणाऱ्या रेषात १८० अंशाचा कोन होत असलेली स्थिती. [सं.]

**प्रतियोगी** पु. १. शत्रू; प्रतिस्पर्धी. २. विरुद्ध बाजूचा इसम; विरुद्ध व नाशकारक पदार्थ किंवा गोष्ट. ३. जोडीचा, पूरक भाग; जोड; उतारा. वि. १. जशास तसा वागणारा; दुसरा आपल्याशी कसा वागतो त्याप्रमाणे त्याच्याशी वागणारा. २. मागून; नंतर येणारा. पहा : **अनुयोगी**[सं.]

**प्रतिरक्तजल** न. विशिष्ट रोगाला प्रतिबंधक होऊ शकतील असे प्राण्याच्या रक्तातून घेतलेले घटक; प्लाझ्मा.(इं.)

**प्रतिरव** पु. १. (कायदा) विरूद्ध तक्रार; मालकी हक्काविरूद्ध तक्रार; भांडण; तंटा; झगडा. २. प्रतिध्वनी. [सं.]

**प्रतिरूप** न. प्रतिमा; चित्र; प्रतिकृती; कोणत्याही वस्तूची हुबेहूब नक्कल.

**प्रतिरूपक** न. १. सारांश; तात्पर्य. २. आदर्श गुण असणारी व्यक्ती.

**प्रतिरूपक** न. नाटक, कादंबरी इ.त काही फेरफार करून नवीन बनवलेले नाटक, कादंबरी इ. रूपांतर.

**प्रतिरूपण** न. एखाद्या गोष्टीची डोळ्यांना दिसेल अशी प्रतिमा तयार करण्याची क्रिया.

**प्रतिरूप मुद्रण** छपाईची एक पद्धत; यात शाई प्लेटवर (एकसारख्या रबरी पृष्ठभागावर) लावली जाते व त्यावरून छपाई केली जाते.

**प्रतिरोध** पु. अडथळा; थांबवणूक; प्रतिबंध. [सं.]

**प्रतिरोधक** पु. लेख, पुस्तक इ. ची केलेली हुबेहूब नक्कल. (इं.) कॉपी.

**प्रतिरोधी** वि. प्रतिस्पर्धी; विरोधक.

**प्रतिरोपण** एका अवयवाच्या जागी दुसरा अवयव लावण्याची किंवा बसवण्याची क्रिया.

**प्रतिलिपी** स्त्री. प्रतिलेख; नक्कल; प्रतिमा; छाया; दुसरी प्रत.

**प्रतिलिपी कागद** कार्बनपेपर.

**प्रतिलोम** पु. १. उलट क्रम; व्यतिरेक. २. उच्चवर्णाच्या स्त्रीचा नीच वर्णाच्या पुरुषाशी झालेला विवाह.

वि. १. नैसर्गिक मार्गाच्या विरुद्ध; प्रवाहाच्या विरुद्ध दिशेचा; उलटा; विपरीत; विरुद्ध. २. (ल.) नीच; हलका; क्षुद्र; दुष्ट. ३. हीन जातीच्या पुरुषापासून उच्च जातीच्या स्त्रीस झालेला. [सं.]

**प्रतिवचन,प्रतिवाद** न.पु. १. उत्तर; जबाब. २. आक्षेपास उत्तर; विरुद्ध भाषण. [सं.]

**प्रतिवदन** न. प्रतिबिंब : 'कां प्रतिवदन जैसें। आरसेनि।'- ज्ञा १३.९०७.

**प्रतिवाद** पु. आरोपाला दिलेले उत्तर; उलट जबाब.

**प्रतिवादी** पु. १. (कायदा) दिवाणी दावा लागलेली व्यक्ती; वादीची तक्रार ज्या व्यक्तीच्या विरोधात असते अशी व्यक्ती. २. प्रतिपक्षी. ३. वादविवादात प्रत्युत्तर देणारा; उलट जबाब देणारा; प्रतिस्पर्धी.

**प्रतिवाय-वाव** पु. दोष; पाप.

**प्रतिविधा** पु. प्रतिक्रिया करण्यासाठी केलेले एखादे कृत्य, व्रत, संस्कार, अनुष्ठान.

**प्रतिविभूति-ती** स्त्री. सामान्य, गौण विभूती (ऐश्वर्यादी) : 'येथ विभुती प्रतिविभूती। प्रस्तुत अर्जुना सांगिजेती।'- ज्ञा १०.४१.

**प्रतिवृत्त** न. १. केंद्रपराङ्मुख वर्तुळ. पहा : **प्रतिमंडळ** १. २. (सभा, संमेलन इ.ची) हकिगत; इतिवृत्त; अहवाल.

**प्रतिवेदक** पु. न्यायालयातील खटल्यांचा किंवा विधानसभेतील, संसदेतील वक्तव्यांचा अधिकृत अहवाल तयार करणारा.

**प्रतिशब्द** पु. १. पडसाद; प्रतिध्वनी; प्रतिनाद. २. एका शब्दाला जोड

देण्यासाठी द्विरुक्ती करून योजिलेला दुसरा त्यासारखा शब्द. जसे :- भाकरी बिकरी; इ. ३. एखाद्या शब्दाचा अर्थ स्पष्ट करण्यासाठी योजलेला त्याच अर्थाचा दुसरा शब्द; पर्याय; समानार्थक शब्द.

**प्रतिशोध** पु. बदला; सूड.

**प्रतिषिद्ध** वि. १. मनाई केलेला; निषिद्ध; त्याज्य. २. अमान्य; नाकारलेला; रद्द; आक्षिप्त. [सं.]

**प्रतिषेध** पु. १. मनाई; मज्जाव. २. निषेध; नकार; त्याग. ३. निवारण; प्रतिबंध. [सं.]

**प्रतिषेधणे** उक्रि. १. मनाई करणे. २. नाकारणे; वर्जणे; प्रतिबंध करणे.

**प्रतिष्टंभ** पु. १. अडथळा; विरोध; हरकत. २. न्यायालयाने वा व्यक्तीने एकदा मान्य केलेली गोष्ट नाकारता येत नाही असे सांगणारे तत्त्व. [सं.]

**प्रतिष्ठणे** सक्रि. १. देवळात मूर्तीची यथाविधी स्थापना करणे; स्थापणे; समंत्रक प्राणप्रतिष्ठा करणे. २. ठेवणे; मांडणे. ३. अधिकाराच्या, मानाच्या जागी एखाद्याची स्थापना करणे.
अक्रि. असणे; राहणे; थांबणे; चालू असणे: 'तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे।'- ज्ञा. ४.१९०.

**प्रतिष्ठा** स्त्री. १. मान; कीर्ती; पत; लौकिक; प्रसिद्धी; मोठेपणा; ख्याती. २. अधिकाराच्या, बहुमानाच्या जागी एखाद्याची स्थापना. ३. एखाद्या देवतेच्या सन्मानार्थ उभारलेल्या स्मारकाची स्थापना. ४. देवादिकांच्या मूर्तींची यथाविधी स्थापना. ५. नवीन बांधलेल्या घरात राहायला जाण्यापूर्वी केला जाणारा विधी; घरभरणी. ६. भ्रष्ट झालेल्या देवादिकांच्या मूर्तींची स्थापना. ७. वसतिस्थान; गृह. ८. डौल; आढ्यता; अभिमान. ९. देवळाला मिळालेली नेमणूक; वर्षासन इ. १०. हुंडा देऊन मुलीचे लग्न लावणे. ११. आयुष्यात स्थिर, कायम, स्थायिक होणे. १२. (सामा.) स्थिरता; स्थैर्य; कायमपणा; स्थापना. १३. (निंदार्थी) अप्रतिष्ठा; अपमान. [सं.]

**प्रतिष्ठान** न. न्यास; विश्वस्तनिधी. (इं.) ट्रस्ट.

**प्रतिष्ठापना** स्त्री. १. पहा : **प्रतिष्ठा** ४ व ६. २. आचार्याची एखाद्या मंडळीवर यथाविधी केलेली स्थापना, योजना.

**प्रतिष्ठामुद्रा** स्त्री. अर्धप्रतिमा; अर्धपुतळा.

**प्रतिष्ठावस्त्र** न. १. सभा, दरबार इ. ठिकाणी प्रतिष्ठेने घालून जाण्याच्या उपयोगी पोशाख. उंची, भारी, सुंदर, छानछोकीचा पोशाख. २. उंची पोशाखातील एक वस्त्र. ३. सन्मानार्थ अर्पण केले जाणारे महावस्त्र.

**प्रतिष्ठित** वि. १. सन्मानाने, आदराने वागविलेला; मान दिलेला. २. मानाला पात्र असलेला; सन्माननीय; आदरणीय; संभावित. ३. सुंदर; भपकेदार; मान्यतेचा (पोशाख). ४. अधिकाराच्या जागी स्थापिलेला किंवा नेमलेला (माणूस). ५. यथाविधी स्थापिलेली; प्राणप्रतिष्ठा केलेली (देवाची मूर्ती). ६. प्रसिद्ध; प्रख्यात; नावाजलेला; लौकिकवान. ७. साध्य झालेला; संपूर्ण झालेला. ८. (लग्न, उद्योगधंदा इ. च्या योगाने आयुष्याच्या मार्गाला लागून) स्थिर, दृढमूल, कायम, स्थायिक झालेला. ९. वर्षासन; नेमणूक दिलेले (देऊळ, देवस्थान इ.); हुंडा दिलेली (कन्या). १०. सर्वांना आवडणारा. ११. (निंदार्थी) अहंमन्य; शिष्ट; मिजासखोर; आढ्यताखोर. [सं.]

**प्रतिष्ठेखोरपणा** पु. (निंदार्थी) शिष्टपणा; मिजासखोरपणा; अहंमन्यता.

**प्रतिसंदर्भ** पु. एका गोष्टीचा दोन ठिकाणी उल्लेख करणे. उदा. रोखीच्या पुस्तकात व खातेवहीत नोंद करणे.

**प्रतिसाद** पु. १.दाद. २.प्रतिध्वनी.

**प्रतिसूचना** स्त्री. आधी केलेल्या सूचनेत फरक करणारी सूचना.

**प्रतिस्पर्धा** स्त्री. १. चढाओढ; बरोबरी; एखाद्याच्या वरचढ होण्याची, त्यास मागे टाकण्याची इच्छा, प्रयत्न; एखाद्या बरोबर स्पर्धा. २. मत्सर; द्वेष. [सं.]

**प्रतिस्फटि(दि)क** वि. सरसासारखा चिकचिकीत; पिच्छल; जिलेटीनप्रमाणे दिसणारा. (इं.) कोलोइड.

**प्रतिस्फळणे** अक्रि. फळास येणे.

**प्रतिस्वाक्षरी** स्त्री. कागदपत्र बरोबर असल्याची दुसऱ्या अधिकृत व्यक्तीने केलेली सही.

**प्रतिहत** वि. १. मार खाल्लेला; तडाखा दिलेला; जखमी केलेला. २. मागे हटविलेला; मागे किंवा खाली लोटलेला. ३. परावृत्त; माघारी फिरलेला. ४. निराशा झालेला : 'कुळ उद्धरील समस्त। विषयीं प्रतिहत तें केलें।'- एभा ९.३७९. ५. नष्ट झालेला. [सं.]

**प्रतिहरण** न. वचपा; सूड.

**प्रतिहल्ला** पु. १. वेढा घातलेल्या सैन्याने वेढा घालणाऱ्या सैन्यावर चढवलेला हल्ला. २. लढाऊ विमानाने उलट हल्ला करण्यासाठी मारलेली एक भरारी. (इं.) सॉर्टी.

**प्रतिहस्त** पु. प्रतिनिधी.

**प्रतिक्षम** वि. प्रतिकार करण्यास समर्थ असणारा.

**प्रतिक्षिप्त** वि. १. प्रतिबिंबित; परावर्तीत. २. प्रतिक्रिया; प्रतिसाद; प्रतिकार; परतफेड; उलट जबाब. [सं.]

**प्रतिक्षेप** पु. शरीराच्या आपोआप होणाऱ्या हालचाली.

**प्रतिक्षेपक, प्रतिप्रक्षेपणीय** वि. (शाप.) परत पाठविणारी, धातूवर ज्वाळा फेकणारी (भट्टी). (इं.) रिव्हबरेटरी.

**प्रतिज्ञा** स्त्री. १. वचन; करार; ठराव. अमुक गोष्ट अमुक रीतीनेच घडेल किंवा मी अमुक करीनच अशा सारखे एखाद्याने ठासून केलेले विधान, निश्चय. २. पैज; पण; होड. ३. (कायदा) शपथपूर्वक केलेले विधान; कबुली; सत्यास स्मरून सांगणे. ४. (न्याय.) साध्याचा निर्देश; प्रमेय; उपपाद्य; सिद्ध करावयाचे उपपादन; सिद्धांत. ५. शपथ. [सं.]

**प्रतिज्ञात** वि. १. ज्याच्या संबंधाने प्रतिज्ञा केली आहे असे; कबूल केलेले; मान्य केलेले. २. ठासून सांगितलेले; उपपादन केलेले. [सं.]

**प्रतिज्ञापत्र** न. न्यायालयासमोर प्रतिज्ञापूर्वक दाखल केलेले लेखी निवेदन. (इं.) ॲफिडेव्हिट.

**प्रतिज्ञाविरोध** पु. (न्याय) पूर्वपक्षाची किंवा उपपाद्याची अमान्यता.

**प्रती** क्रिवि. १. विरुद्ध. २. दर; प्रत्येकी. ३. त्यासारखा.

**प्रतीक** न. १. मूळ ग्रंथ; विवरण किंवा टीका करण्यासाठी मूळ ग्रंथातील घेतलेले वाक्य, पंक्ती, पद इ. २. प्रतिपक्षाच्या विधानातील खंडणार्थ घेतलेला अंश, मुद्दा. ३. उदाहरण, दाखला देण्यास, सादृश्य दाखविण्यासाठी पुढे केलेली गोष्ट, बाबत. ४. चिन्ह; खूण. ५. मुद्रा.

६. मूर्तिमंत उदाहरण.

**प्रतीक नाणे** ज्या नाण्याची दर्शनी किंमत धातूच्या किमतीपेक्षा जास्त असते असे नाणे.

**प्रतीचा** वि. गुण, जाती इत्यादींनी बरोबरीचा; समान गुण असलेला.

**प्रतीची** स्त्री. पश्चिम दिशा; मावळत. [सं.]

**प्रतीचीन** वि. पश्चिम दिशेकडील; मावळतीचा; पश्चिम. [सं.]

**प्रतीत** स्त्री. अनुभव; खात्री. पहा : **प्रतीति**

वि. अनुभवलेले; दिसून आलेले; अनुभवाने किंवा पाहणी करून खरे ठरलेले; प्रत्ययास आलेले; सिद्ध केलेले (ज्ञान). [सं.]

**प्रती(ची)ति-त्ती** स्त्री. १. जाणीव; अनुभव; खात्री; प्रत्यय; शोध; अंतरास, मनास पटलेला दाखला; प्रत्यय; अनुभवाने, अवलोकनाने झालेली खात्री; एखाद्या गोष्टीबद्दल किंवा एखाद्याच्या स्वभावाबद्दल कोणी केलेले विधान खरे आहे असे आढळून येणे. २. प्रत्यक्ष जाणीव; ज्ञान; छाप; अवलोकन. ३. चमत्कार; अद्भुत कर्म; साक्षात्कार. ४. प्रसिद्धी; ख्याती : 'ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाष्यप्रतीती ।'- ज्ञा १५.९०. [सं.]

**प्रतीपगमन** न.(मानस.) १. अधोगती; अवनती. २. ऱ्हास. ३. पूर्वस्थितीस जाणे.

**प्रतीयमान** वि. अनुभवाला किंवा निदर्शनाला येत आहे असा; ज्याची जाणीव होत आहे असा. [सं.]

**प्रतीहार** पु. राजवाड्यावरील द्वारपाल. [सं.]

**प्रतीहारी** स्त्री. अंत:पुराच्या द्वारावर असलेली स्त्री द्वारपाल; वेत्रवती. [सं.]

**प्रतीक्षणे** सक्रि. वाट पाहणे; अपेक्षा करणे. [सं. प्रति+ईक्ष्]

**प्रतीक्षा** स्त्री. १. वाट पाहणे. २. अपेक्षा : 'ऐसी प्रतीक्षा हृदयात देवा ।'- वामन, नृसिंहदर्पण २४. [सं.]

**प्रतीक्षाआकार** रिक्षा, टॅक्सीच्या चालकांना थांबवून ठेवायचे असेल, तर त्यासाठी द्यावे लागणारे पैसे. (इं.) वेटिंग चार्जेस.

**प्रतीक्षागृह, प्रतीक्षालय** न. १. पु. रेल्वे, बस इ. स्थानकावर उतारूंसाठी आराम करण्याची खोली वा कक्ष. २. भेटीस येणाऱ्यांना भेट होण्यापूर्वी बसण्यासाठी असलेली जागा. (इं.) वेटिंगरूम.

**प्रतीक्षासूची** स्त्री. वाट पाहणाऱ्यांची सूची. (इं.) वेटिंग लिस्ट.

**प्रतीक्षित** वि. अपेक्षित.

**प्रतेजणे** त्याग करणे; टाकून देणे: 'श्रीमुखींचे तांबोळ प्रतेजिलें' - गोप्रच १३८. [सं. प्रति + त्यज्]

**प्रतोद** पु. १. चाबूक; कोरडा; असूड : 'भीष्म वधाया धावे हरि हस्तें कवळुनि प्रतोदास ।'- मोभीष्म १०.९५. २. छायेवरून वेळ मोजण्याचे सोटयासारखे यंत्र; छायायंत्र; शंकू यंत्र. ३. पक्षातील लोकांना सूचना देणारा. [सं.]

**प्रत्य** क्रिवि. उलट : 'आलें परि प्रत्य आपणाशि कैसें उचित हे होये ।'- गीताचंद्रिका १.२९. [सं. प्रत्यक्]

**प्रत्यक्** वि. १. पुढचा; पुढला; नंतरचा. २. पश्चिम दिशेकडील. ३. (स्थल, काल, जीव, पदार्थ, भाग इ.त) सर्वत्र व्यापून राहणारा; सर्वव्यापी (आत्मा, शिव, जीव, यांस जोडून). ४. साक्षात. प्रत्यक्ष : 'नामया शरण भगवंतासी। भगवंत तरी प्रत्यक् त्यासी ।'- एकनाथ आनंद लहरी ११९. [सं.]

**प्रत्यक्बुद्धि-द्धी** स्त्री. अंतर्मुख झालेली बुद्धी; मी अंतर्यामी (आत्मा) आहे अशी बुद्धी.

**प्रत्यङ्मुखपण** न. अंतर्मुखवृत्ती : 'येथ प्रवृत्ति बोहटे जिणें । अप्रवृत्तिसी वाधावणें । आतां प्रत्यङ्मुखपणें । प्रचारु दिसे ।'- अमृ ९.२८.

**प्रत्यगात्मा** पु. १. स्वयंप्रकाशी चैतन्य. २. देहात व्यापून राहिलेले ब्रह्म. ३. त्वंपदाचे लक्ष्य. ४. कूटस्थ. [सं.]

**प्रत्यगावृत्ति, प्रत्यक्वृत्ति-त्ती** स्त्री. आत्मकारवृत्ती; अंतर्वृत्ती; अंतर्मुखता; सोहं अशी स्व-रूपाकारवृत्ती : 'मग प्रत्यगावृत्तीचीं चोखटें। लाविलीं गंगेचेनि तटें ।' - ज्ञा १८.१०९७.

**प्रत्यपकार** पु. सूड. [सं.]

**प्रत्यभिज्ञा** स्त्री. डोळस.

**प्रत्यभिज्ञान** न. १. अधिकृत मान्यता. २. आत्ता पाहिलेली किंवा अनुभवलेली गोष्ट आपण पूर्वी पाहिली आहे अशी होणारी जाणीव.

**प्रत्यय** न. १. अनुभव; खात्री; प्रतीती. २. भरवसा; श्रद्धा; निष्ठा; आत्मविश्वास. ३. नाम व धातू यांना विशेष अर्थ उत्पन्न करण्यासाठी त्यांना जोडून येणारा शब्द. [सं.]

**प्रत्ययकारी** वि. खात्री पटविणारे; सबळ.

**प्रत्ययित** वि. विश्वास टाकलेला; भरवसा टाकलेला; विश्वस्त. [सं.]

**प्रत्ययी** वि. विश्वसनीय; भरवशाचा; खात्रीचा; पतीचा. [सं.]

**प्रत्यर्पण** न. शरणागती; आरोपीने ज्या देशात गुन्हा केला असेल, त्या देशाच्या हवाली करणे.

**प्रत्यवाय** पु. १. पापीपणा; गुन्हेगारी. २. जे करावे ते न केल्यामुळे किंवा जे करू नये ते केल्यामुळे उत्पन्न होणारा दोष; नुकसान; हरकत; विधिनिषेध : 'जे प्रत्यवाय तंव गळे । स्वाधिकार बहुवें उजळे ।' - ज्ञा १८.१२२. ३. विघ्न; अडथळा : 'जो एकदां संकल्प केला तो कितीही प्रत्यवाय आले तरी तडीस नेऊन पोंचवणें...'- नि ७३२. [सं.]

**प्रत्यवायी** वि. दोषी; अपराधी; पापी. [सं.]

**प्रत्यस्त्र** न. धनुर्वेदाचा एक प्रकार.

**प्रत्यस्था** स्त्री. स्थितिस्थापकत्वाचा गुण असणारे तारेचे वेटोळे. (इं.) स्प्रिंग.

**प्रत्यही** क्रिवि. दररोज; प्रतिदिवशी. [सं. प्रति+अहन्]

**प्रत्यक्ष** न. जाणीव; डोळे, कान इ. इंद्रियांनी होणारे ज्ञान; विषयगोचरता.

शअ. समक्ष; देखत; पाहता-पाहता.

क्रिवि. १. वास्तविकपणे; वस्तुत: २. स्वतंत्रपणे; साक्षात; खरोखर जातीने.

वि. दिसणारे; प्रकट; हजर; उपस्थित; इंद्रियगोचर. [सं.]

**प्रत्यक्ष कर** कर देणारा व कर सोसणारा या व्यक्ती एकच असतात असा कर. उदा. जमिनीवरील कर.

**प्रत्यक्षकारी** वि. १. मनातील विचार, भावना स्पष्ट करणारा. २. स्पष्ट दिसून येणारा.

**प्रत्यक्षदर्शी** वि. घडलेली गोष्ट ज्याने स्वत:च्या डोळ्याने पाहिली आहे असा; एखाद्या गोष्टीचा स्वत: अनुभव घेतला आहे असा. [सं.]

**प्रत्यक्षप्रमाणवाद** पु.अनुभवाने मिळणाऱ्या ज्ञानावर सर्वस्वी अवलंबून असणारा तत्त्वज्ञान्यांचा एक पंथ. (इं.) पॉझिटिव्हिझम्. [सं.]

**प्रत्यक्षार्थवाद** पु.फक्त निरीक्षण करता येते अशा घटनांतील वास्तव तथ्यांचा व घटनांचा स्वीकार करणारे कांटचे तत्त्वज्ञान.

**प्रत्यक्षी** वि. पाहणारा; द्रष्टा; स्वतः, जातीने पाहणारा; जाणणारा. [सं.]

**प्रत्यंग** न. १. शरीराचा गौण अवयव : 'मग तळवे तळहात शोधी। उर्ध्वाचे खंड भेदी। झाडा घे संधी। प्रत्यंगाचा।'– ज्ञा ६.२३२. २. विषयाचा पोटविभाग. [सं.]

**प्रत्यंचा** स्त्री. धनुष्याची दोरी. [सं.]

**प्रत्यंतर** न. १. पुरावा; खात्री; पुष्टी देणारी एखादी गोष्ट; दाखला; उदाहरण; दृष्टांत; प्रमाण; आधार. २. अनुभव; खात्री. [सं.]

**प्रत्याख्यात** वि. १. नाकारलेले; नापसंत म्हणून दूर सारलेले : 'तिच्या (कौमुदीच्या) तेजापुढें पूर्वीची अल्प तेजें प्रत्याख्यात होत्सातीं निष्प्रभ होऊन गेलीं.'– नि ५०८. २. प्रसिद्ध; नावाजलेला; सर्वश्रुत. [सं.]

**प्रत्याख्यान** न. मनाई; निराकरण; झिडकारणे; दूर सारणे. [सं.]

**प्रत्याघात** पु. प्रतिक्रिया; उलट परिणाम; उलट प्रहार; प्रतिकार. [सं.]

**प्रत्यातीत चिंतन** अडचणी; संकटे, समस्या यातून मन मुक्त करण्याची पद्धती.

**प्रत्यादेश** पु. १. आव्हान. २. नकार; अस्वीकार. [सं.]

**प्रत्यापतन** न. (ताप, रोग) उलटणे; रोगाने उचल खाणे.

**प्रत्यानयत** न. परत मिळवणे.

**प्रत्यापन** न. निराकरण. [सं.]

**प्रत्याभरण** न. केलेल्या कृतीचे, उपक्रमाचे परिणाम काय झाले याची माहिती प्रयोजकास मिळणे.

**प्रत्याम्नाय** पु. मुख्यत्वेकरून जे प्रायश्चित्तादी कर्म सांगितले ते तसे घडणे शक्य नसल्यास त्याच्या ऐवजी द्रव्यदान किंवा इतर केले जाणारे अनुष्ठान. [सं. प्रति=ऐवजी+आम्नाय=बोललेले]

**प्रत्यायोजन** न. एखाद्या संस्थेच्या किंवा व्यक्तीच्या वतीने भाग घेण्याचे, बोलण्याचे अधिकार देणे.

**प्रत्यालीढस्थान** (नृत्य) आलीढ स्थानाप्रमाणे उभे राहणे. उजवा पाय कुंचित व डावा पाय पाच ताल पुढे ठेवणे. आलीढ स्थानाप्रमाणे यात अभिनय सूचित होतात. पहा : **आलीढस्थान**

**प्रत्यालेखनयंत्र** न. मूळ प्रतीवरून पण हव्या त्या प्रमाणात आकृती काढण्याचे यंत्र.

**प्रत्यावर्तन, प्रत्यावृत्ति–त्ती** न. स्त्री. १. वारंवार, वरचेवर, पुनःपुन्हा: करणे; माघारी येणे; उलट अवस्था : 'कृष्णरूपीं वेधल्या वृत्ती। प्रत्यावृत्ती हरि पाहती।'– एरुस्व ६.२७. २. पुन्हा जन्मास येणे; पुनर्जन्म : 'तंव प्रत्यावृत्ती येरझारें। आत्मसाक्षात्कारें खुंटली।'– एभा २.३१९. ३. वरच्या पदावरून किंवा विशिष्ट कामावरून मूळच्या जागेवर पाठवणे. [सं.प्रति+आवर्तन, आवृत्ति]

**प्रत्यावर्त वारे** एखाद्या प्रदेशात मध्यभागी जास्त व सभोवताली कमी वायुदाब निर्माण झाला तर मध्यभागापासून सभोवतालच्या प्रदेशाकडे वाहणारे वारे.

**प्रत्यावाहन** न. १. (राज्यशा.) निवडून दिलेल्या प्रतिनिधीला परत बोलावण्याचा अधिकार. २. शिकलेल्याची किंवा घडलेल्याची पुन्हा उजळणी करणे. [सं.]

**प्रत्याशा** स्त्री. अंदाज; अटकळ; अपेक्षा. (क्रि. करणें) [सं.]

**प्रत्यासत्ति–त्ती** स्त्री. विशेष दळणवळण; सहवास, घरोबा, नाते; संबंध.

**प्रत्यासन्न** वि. अगदी जवळ असलेला; निकट संबंध असलेला.

**प्रत्यास्थण** स्त्री. विरूपणानंतर पूर्वस्थितीला येण्याचा वस्तूचा गुणधर्म.

**प्रत्याहत** (संगीत) गाताना ध्वनीत खंड पडू न देता इच्छित उच्च स्वरापासून नीच स्वराकडे जाणे. पहा : **घसिट**

**प्रत्याहार** पु. १. आपापल्या विषयांचा संसर्ग न करता इंद्रियांचे चित्ताच्या स्वरूपास अनुसरून राहणे; इंद्रियांची अंतर्मुखता; इंद्रियदमन. २. प्राणायामभूमिकेच्या पूर्णावस्थेत गुरूपदिष्ट पद्धतीने कुंडलीसहित प्राणवायू पायाच्या अंगठ्यापासून ब्रह्मरंध्रापर्यंत चढविण्याचा व पुन्हा उतरविण्याचा क्रियाभ्यास. अष्टांगयोगापैकी पाचवे अंग. ३. प्राणायामाचा निरोध नाहीसा करणारा शरीरातील एक वायू. ४. नियमन. ५. परत घेणे; प्रत्यादान; अपहरण. ५. संक्षेप; अनेक अक्षरे अगर प्रत्यय यांचे विवेचन थोडक्यात करण्यासाठी त्यांचा एकावयवी शब्दात केलेला समावेश. [सं.]

**प्रत्याहिक** वि. दररोज निघणारे; दैनिक : 'मुंबईच्या एका प्रत्याहिक इंग्रजी पत्रांतील टीकेवरून हें उघड आहे.'– टि १.३८१. [सं.]

**प्रत्याहत करणे** निर्णय फिरवणे; माघार घेणे; रद्द करणे.

**प्रत्युत** क्रिवि. १. एवढेच नव्हे तर; आणखी; शिवाय; खेरीज. २. दुसऱ्यापक्षी; उलटपक्षी. [सं.]

**प्रत्युत्तर** न. १. उत्तरास दिलेले उत्तर; उलट जबाब; प्रतिवचन. २. (सामा.) उत्तर; जबाब. [सं.]

**प्रत्युत्थान** न. १. भेटीस आलेल्या मनुष्याच्या सन्मानार्थ आसनावरून उठणे. २. युद्ध, वादविवाद इ. मध्ये प्रतिपक्षाचा पराभव करण्यासाठी उठणे. [सं.]

**प्रत्युद्गत** वि. सामोरा गेलेला; पुढे गेलेला. [सं.]

**प्रत्युद्गम, प्रत्युद्गमन** पु.न. भेटीसाठी, दोन हात करण्यासाठी सामोरे जाणे. [सं.]

**प्रत्युद्वाह** पु. आपली मुलगी दुसऱ्याच्या मुलाला देऊन त्याची मुलगी आपल्या मुलाला सून करून घेणे, असे लग्न; साटेलोटे. [सं.]

**प्रत्युपकार** पु.दुसऱ्याने केलेला उपकार फिटावा म्हणून त्यावर केलेला उपकार; उपकाराची फेड. [सं.]

**प्रत्युपस्थान** न. नव्याने सुरुवात करणे; ज्याने आपला पराभव केला त्याच्या पराभवासाठी उठणे; गेलेला हक्क पुन्हा मिळविण्यासाठी सज्ज होणे. [सं.]

**प्रत्यूष** न. प्रातःकाल; पहाट. [सं.]

**प्रत्यूह** न. विघ्न; संकट : 'श्री रामनाममंत्रश्रितचिंतामणि करील हें पूर्ण। चूर्णप्रत्यूहाचें रसिकांचें चित्तही सुखी तूर्ण।'– मोआदि १.१०. [सं.]

**प्रत्येक** वि. पृथक पृथक; दरएक; वेगळा वेगळा; हरएक.
क्रिवि. एकेक; एकएकटा; एकामागून एक. [सं.]

**प्रथम** वि. पहिला; पूर्वीचा; आरंभीचा; मुख्य; स्थल किंवा काल यांमध्ये आधीचा.

क्रिवि. पहिल्यांदा; आरंभी; अगोदर. [सं.]

**प्रथमदशा** स्त्री. १. आरंभ; सुरुवात. २. बाळपण.

**प्रथमपुरुष** १. (संस्कृत व्या.) क्रियापदाच्या धातूचे कोणत्याही काळातील तृतीयपुरुषाचे रूप बनविणारा प्रत्यय. २. (संस्कृत व्या.) तो, ती इ. चा पुरुष.

**प्रथम भार** जेव्हा एकाच तारण वस्तूवर अनेकांकडून कर्ज घेतलेले असते, तेव्हा परतफेडीच्या वेळचा प्रथम हक्क.

**प्रथमवयसा** वि. तरुण. : 'कीं लावण्यामृतसागर । प्रथमवयसा ।'– कथा १.८.५३.

**प्रथम वाचन** सभागृहासमोर विधेयक मांडणे, उद्दिष्टे स्पष्ट करणे व विधेयक मांडण्यासाठी सभागृहाची संमती घेणे यासाठी केलेले वाचन.

**प्रथम सवन** बोलण्याचा साधा, नेहमीचा स्वर.

**प्रथमा** स्त्री. १. (व्या.) पहिली विभक्ती; क्रियापदाच्या कर्त्याची विभक्ती. २. संबोधनाची विभक्ती. ३. कोणत्याही काळाचा प्रथमपुरुष. [सं.]

**प्रथमोपचार** पु. अव. आजारात, अपघातातील जखमींवर (अधिक हानी होऊ नये म्हणून) तातडीने केलेले तात्पुरते उपचार.

**प्रथा** स्त्री. १. रूढी; प्रघात; सर्वसाधारण चाल; पद्धती; सरणी. २. प्रसिद्धी; कीर्ती; प्रख्याती : 'तुझेनि पाडे पाहतां । आणिकाचि काय कथा । पुरुषोत्तम हे प्रथा ।। तुजचि कां घडली ।'– रास १.९६९. ३. लोकमत; सर्वसाधारण भावना. ४. लोकसमाज. ५. अनुभव; बुद्धी; प्रतीती : 'किंबहुना ऐसी प्रथा । वाढती देखसी पार्था ।'– ज्ञा १८.५७४. ६. स्थिती. [सं.]

**प्रथित** वि. प्रसिद्ध; कीर्तिमान; नावाजलेले; प्रसिद्ध केलेले; उघडपणे जाहीर केलेले. [सं.]

**प्रथिन** न. शरीराची झीज भरून काढणारा व वाढ करणारा अन्नघटक. (इं.) प्रोटीन.

**प्रथुत** अ. सत्वर.

**प्रद** वि. (समासात) देणारे; बहाल करणारे; कायम करणारे. उदा. सुखप्रद; धनप्रद; शोकप्रद इ. [सं. प्र+दा=देणे]

**प्रदत्त** वि. १. दिलेला. २. (मानस.) बहिस्थ; बाह्य.

**प्रदर** पु. स्त्रियांचा एक रोग; धुपणी. ह्यात निरंतर रज:स्त्राव होतो. याचे रक्तप्रदर व श्वेतप्रदर असे दोन भेद आहेत. [सं.]

**प्रदर्शन** न. १. दाखविणे; आविष्करण करणे; दर्शविणे. २. (ल.) तमाशा; देखावा. ३. अनेक प्रकारच्या नैसर्गिक किंवा कलाकुसरीच्या वस्तू व्यवस्थित रीतीने मांडून ठेवणे किंवा त्या मांडून ठेवण्याची जागा. [सं.]

**प्रदक्षणे** अक्रि. प्रदक्षिणा घालणे : 'प्रदक्षिणूनी आदरी स्तुतीतें ।'– दे कृष्णजन्म ४८.

**प्रदक्षिण** क्रिवि. पूर्व, आग्नेय, दक्षिण, नैर्ऋत्य असा क्रम धरून (केलेले गमन); उजव्या बाजूने; प्रादक्षिणिक. [सं. प्र+दक्षिण]

**प्रदक्षिणा** स्त्री. १. देव, ब्राह्मण इ. कांना आपल्या उजव्या हाताकडे करून त्यांच्या भोवताली घातलेली फेरी. २. कधी कधी उजव्या हाताचा संबंध न ठेवता घातलेली फेरी. उदा. सोमसूत्री प्रदक्षिणा. [सं.]

**प्रदानपद्धती** स्त्री. देय रक्कम देण्याची ठरवून दिलेली पद्धत.

**प्रदानमाध्यम** न. (संगणक) समस्येचे उत्तर किंवा फलित सांगणारे माध्यम. उदा. मॉनिटर, प्रिंटर.

**प्रदानादेश** पु. 'उल्लेखित व्यक्तीला पैसे द्यावेत' असा अधिकृत पदाधिकाऱ्याने दिलेला आदेश.

**प्रदायी अतिथी** पाहुण्यासारखा राहणारा, पण त्याबद्दल ठरावीक पैसे देणारा माणूस; (इं.) पेइंग गेस्ट.

**प्रदाह** पु. लाली, वेदना, दाह अशी लक्षणे असणारी सूज.

**प्रदिप्ती** स्त्री. उघडपणा; प्रसिद्धी; वाच्यता. [सं. प्रदीप्त]

**प्रदीप** पु. दिवा. [सं.]

**प्रदीपन** न. पेटविणे; चेतविणे; ज्वलन. [सं.]

**प्रदीप्त** वि. १. चांगले पेटलेले; जळत असलेले; प्रज्वलित. २. उज्ज्वल; तेजस्वी; प्रकाशमान. [सं.]

**प्रदूषक** पु. हवा, पाणी इ.त मिसळणारे हानिकारक घटक. [सं.]

**प्रदूषण** न. वातावरणात स्थिर प्रमाणात असलेल्या घटकात शहरीकरण, औद्योगिकीकरण, नवे शोध, निचरापद्धती, युद्धप्रणाली इ. मुळे हवा, पाणी, आवाज इ. त होणारे सामान्य जीवनास धोका निर्माण करणारे बदल; निसर्गात असमतोल निर्माण करणारे बदल.

**प्रदेश** पु. विशिष्ट मर्यादांनी नियंत्रित असा भूमी, शास्त्र, कला इ.चा भाग, प्रांत; जागा. [सं.]

**प्रदेशज्ञान** न. (भूगोल) प्रदेशाच्या नैसर्गिक (नाला, खड्डा, सपाट मैदान) व कृत्रिम (देऊळ, शाळा, रुग्णालय) गोष्टींची माहिती.

**प्रदेशिनी** स्त्री. हाताच्या अंगठ्याजवळचे बोट, तर्जनी. [सं.]

**प्रदेष्टा** पु. न्यायाधीश.

**प्रदोष** पु. १. सायंकाळ; रात्रीचा आरंभसमय; तिन्हीसांजेची वेळ; सूर्यास्तानंतरच्या दोन घटिका. २. त्रयोदशीस नक्तव्रत करून सायंकाळी शिवपूजा करण्याचे व्रत. प्रदोषाचे शनि व सोम (शनिवारी व सोमवारी येणारा) असे दोन प्रकार आहेत. ३. चतुर्थी, सप्तमी आणि त्रयोदशी ह्या तिथी पूर्वरात्रीत असता पळावयाचा अनध्याय.

**प्रदोषोपोषणे** न. अव. सणाच्या आदल्या दिवशी करावयाचे उपवास. (इं.) व्हिजिल्स : 'अँग्लिकन्... चर्चच्या प्रार्थनासंग्रहांत... कित्येक विशिष्ट दिवसांच्यापूर्वी करावयाचीं प्रदोषोपोषणें सांगितलीं आहेत.'– उमं ३.

**प्रधान** पु. १. मंत्री; दिवाण; अमात्य, सचिव इ. राजाचे मुख्य मदतनीस प्रत्येकी; राजाचा सल्लागार; कारभारी. २. (बुद्धिबळ) पहा : **वजीर.** ३. गोंड जातीतील कवी, भाट.

वि. १. मुख्य; श्रेष्ठ; उत्तम; वरिष्ठ. २. जोराचा; प्रबळ; महत्त्वाचा. ३. प्रमुख; विशेष महत्त्वाचा असलेला; प्रचुर; युक्त.

**प्रधान** न. प्रकृती, जगाचे उपादानकारण; माया. [सं.]

**प्रधानपट** पु. कथापट; जाहिराती किंवा वार्तापट सोडून, कथाप्रधान असणारा. (इं.) फिचरफिल्म.

**प्रध्वंस** पु. समूळ उच्छेद; पूर्ण नाश. [सं.]

**प्रध्वंसाभाव** पु. (न्याय.) पदार्थाचा समूळ नाश झाल्यामुळे उत्पन्न होणारा त्या पदार्थाचा अभाव.

**प्रनामणे** क्रि. साकार होणे; नावारूपास येणे : 'ना ना तें ऐस्वर्ये प्रनामलें।'– रुस्व ११४३. [सं.परि + नाम]

**प्रपट** पु. पापड.

**प्रपत्र** न. संबंधित आवश्यक माहिती तयार करण्यासाठी तयार केलेला तक्ता (फॉर्म).

**प्रपद** न. पावलाचा पुढील भाग; पायाच्या बोटाजवळील प्रदेश; चवडा : 'ज्याच्या मुकुटरत्नकिरणें साचार। प्रपदें ज्याचीं उजळलीं।'– शिली १.७२. [सं.]

**प्रपंच** पु. १. जग; ईश्वरी मायेपासून निर्माण झालेला आणि जिथे जीवांना सुखदु:खादी भोग उपभोगावे लागतात तो. २. संसार; मनुष्याच्या बायका, मुले, घर, शेत इ. रूप खटला. ३. कपट; प्रतारणा; वंचना; फसवणूक; लबाडी. ४. भेदभाव; पक्षपात. ५. माया; भ्रम; अविद्या. ६. विस्तार; व्याप; पसारा; पाल्हाळ. ७. तपशीलवार कथन; विवरण; स्पष्टीकरण. [सं.]

**प्रपंच, प्रपंचता** स्त्री. पक्षपातीपणा; भेदभाव : 'कृष्णाकडे आमुचा पिता। जिवें भावें तिकडेच माता। कार्याकारण प्रपंचता। मिथ्या दाविती आम्हाकडे।' – एरूस्व ६.४८. [सं. प्रपंच+ता]

**प्रपंचा** स्त्री. शेतीची जमीन.

**प्रपंची** वि. १. संसारातील गोष्टीत निमग्न; ऐहिक सुखात दंग झालेला; संसारी. २. संसारासंबंधी; सांसारिक. [सं.]

**प्रपाठक** पु. विश्वविद्यालयातील 'रीडर' जागेवरील प्राध्यापक.

**प्रपाण** पु. घोड्याचा वरचा ओठ.

**प्रपात** पु. खूप उंचीवरून पडणारा पाण्याचा प्रवाह; धबधबा. [सं.]

**प्रपादणी** स्त्री. १. सिद्ध करणे; प्रस्थापित करणे; निश्चयाचे प्रतिपादन. २. निश्चयपूर्वक, प्रतिज्ञापूर्वक बोलणे, बजावणे. [सं.प्रपादन]

**प्रपादणे** सक्रि. १. सिद्ध करणे; समर्थन करणे; पुष्टी देणे. २. बजावून निश्चयपूर्वक सांगणे; बाजू राखण्यासाठी बोलणे. [सं. प्रपादन]

**प्रपासन–स्थान** न. पाणपोई : 'अति रमणीय प्रपास्थानें। मायामय निर्मिलीं।'– मुवन, हरिश्चंद्राख्यान १९९.

**प्रपिता** पु. बापाचा बाप; आजा. [सं.]

**प्रपिता** पु. एक औषधी वनस्पती.

**प्रपितामह** पु. वडिलांच्या वडिलांचे वडील; स्वत:चा पणजा. [सं.]

**प्रपोटक** पु. घोड्याच्या पायाचा एक रोग. – अश्वप २.३८.

**प्रपौत्र** पु. मुलाच्या मुलाचा मुलगा; पणतू. [सं.]

**प्रफुल्ल, प्रफुल्लित** वि. १. फुललेले; उमलेले; विकसित. २. (ल.) आनंदित. [सं.]

**प्रबळ–ल** वि. १.अतिशय बलवान; सामर्थ्यवान; बलिष्ठ. २. अतिशय; भरपूर; विपुल. [सं.]

**प्रबळणे** अक्रि. बळकट, समर्थ होणे; जोराने वाढणे; जोरदार होणे.

**प्रबंध** पु. १. एखाद्या विषयाचे सांगोपांग विवेचन करणारे लेखन. २. गायनाचे विविध प्रकार. उदा. ध्रुपद, धमार, ख्याल इ. ३. (संगीत) गाण्यातील एक चीज. पहा : **चीज**. ४. काव्य, श्लोक, निबंध इ. ची रचना; छंदोबद्ध रचना : 'तें वोंवियेचेनि प्रबंधें। सांगेन मी।'– ज्ञा ६.४९७. ५. काव्यग्रंथ; (सामा.) ग्रंथ : 'म्हणोनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे।'– ज्ञा १८.१७३४. ६. भाषण; गोष्ट; कथा : 'आतां निरोपीन प्रबंधु। अवधान दीजे।'– ज्ञा १२.१९. ७. कथणे; सांगणे : 'कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामाचे निखळ प्रबंध।'– ज्ञा ९.२१०. ८. अखंडपणा; सातत्य. ९. समूह. १०. तजवीज; व्यवस्था. [सं.]

**प्रबंधक** पु. १. कार्यवाह; व्यवस्थापक. २. सभेचा सूत्रधार. ३. उच्च न्यायालयाची कागदपत्रे सांभाळणारा अधिकारी.

**प्रबंधिका** स्त्री. एखाद्या विषयाचे विस्तृत विवेचन करणारा लघुनिबंध.

**प्रबंधित** वि. शासित.

**प्रबुद्ध** वि. १. प्रौढ; पूर्णावस्थेला आलेला; (मन, ज्ञान, बुद्धी इ.ने) पूर्ण वाढ झालेला(मनुष्य). २. (यावरून ल.) अतिशय बुद्धिमान; शहाणा; विद्वान; हुशार. ३. निद्रावस्था जाऊन पूर्णपणे जागा, हुशार झालेला; (अक्षरश: व ल.) आत्मज्ञान पावलेला. [सं.]

**प्रबोध** पु. १. जागृती; जागेपणा; निद्राभाव; जागरूकता; सावधानता; शुद्धीवर आलेली स्थिती. २. जागे करणे; शुद्धीवर, भानावर आणणे; जागृत करणे. ३. यथार्थ ज्ञान, जाणीव . ४. सूचना; परिचय; उपदेश; कळवणे; सांगणे. ५. प्रकाश : 'मी आनंदाचा आनंद। मी बुद्धीचाही प्रबोध।'– एभा १६.२७१.
वि. विकसित करणारा; उमलवणारा : 'नमो विशदबोधविद्गदा। विद्यारविंदप्रबोधा।'– ज्ञा १०.१. [सं.]

**प्रबोधक** वि. १. जागृत करणारा. २. ज्ञान देणारा : 'भागवतशास्त्र गुरुपाशीं। अभ्यासावें आदरेंसी। दृढनिश्चयेंसीं प्रबोधक।'– एभा ३.५०३.[सं.]

**प्रबोधणे** उक्रि. १. जागृत होणे, करणे . २. ज्ञान सांगणे, उपदेश करणे.

**प्रबोधिका** स्त्री. विशिष्ट ज्ञान किंवा तंत्रज्ञान देणारी संस्था; अकादमी.

**प्रबोधित** वि. १. जागा केलेला; उठविलेला. २. शिकविलेला; पढविलेला; उपदेशिलेला. [सं.]

**प्रबोधिनी** स्त्री. १. कार्तिक शुद्ध एकादशी. या दिवशी विष्णू जागा होतो. २. ज्ञानप्रसार करणारी संस्था. [सं.]

**प्रबोधोत्सव** पु. विष्णूस जागृत करण्यासाठी कार्तिक शुद्ध दशमी ते पौर्णिमेपर्यंत केला जाणारा उत्सव. [सं.]

**प्रभव** पु. १. पराक्रम; बल; प्रभाव; ऐश्वर्य; वैभव; उत्कर्ष; उच्चत्व. २. मूळ कारण; उत्पादक कारण. ३. प्रवर्तककारण. ४. उगमाचे स्थान. ५. उत्पत्ती; जन्म. ६. सुख–दु:ख. ७. साठ संवत्सरांतील पहिले.[सं.]

**प्रभवणे** अक्रि. १. प्रभाव चालणे; समर्थ असणे : 'एथ महाशोषु न प्रभवे। मारुताचा।'– ज्ञा २.१४६. २. उत्पन्न होणे; जन्मणे. [सं. प्रभव]

**प्रभविष्णु** वि. तेजस्वी.

**प्रभंजन** पु. सोसाट्याचा, तुफान वारा; प्रचंड वायू. [सं.]

**प्रभा** स्त्री. १. प्रकाश; तेज; कांती; दीप्ती (विशेषत: फाकलेली, पसरलेली). २. छाया; सावली. ३. कीर्ती; लौकिक; प्रसिद्धी. ४. शोभा. ५. स्वत:बद्दलची जाणीव, ज्ञान; निश्चय : 'तैसा ज्ञानरूप आत्मा। ज्ञानेंचि आपुली प्रभा। करितसे सोहं मा। ऐसा बंध।'– अमृ ३.२३. ६. (चुकीने रूढ) पर्वा; फिकीर; किंमत; महत्त्व. [सं.]

**प्रभाग** पु. १. (गणित) भागाचा प्रतिभाग; अपूर्णांकाचा भाग. २. नगरपालिकेने किंवा महानगरपालिकेने शासनाच्या सोयीसाठी पाडलेले विभाग; (इं.) वॉर्ड. ३. निवडणुकीसाठी पाडलेले मतदारांचे गट. ४. हडप्पा संस्कृतीतील २० ते ३० घरांचा नगरातील भाग. [सं.]

**प्रभात** स्त्री. सकाळ; पहाट; प्रात:काळ; अरुणोदयाचा काळ; उष:काळ. [सं.]

**प्रभात** पु. (संगीत) एक राग. गानसमय प्रात:काळ. [सं.]

**प्रभातफेरी** स्त्री. प्रात:काळी रस्त्याने देशभक्तिपर व प्रचारात्मक पदे गात जाणारा स्त्री-पुरुषांचा मेळा.

**प्रभार** पु. १. विद्युतभार. २. तात्पुरती नेमणूक.

**प्रभारक** पु. कामगारांवर देखरेख करणारा थोड्या वरच्या दर्जाचा अधिकारी.

**प्रभारण** न. विद्युतऊर्जेचे रूपांतर रासायनिक ऊर्जेत होण्याची क्रिया. (इं.) चार्जिंग.

**प्रभारी** वि. हंगामी; दुसऱ्याचे काम त्याच्या गैरहजेरीत तात्पुरते पाहणारा (अधिकारी).

**प्रभाव** पु. १. ऐश्वर्य; वैभव; मोठेपणा; तेज. २. सामर्थ्य; पराक्रम; प्रताप; शौर्य. [सं.]

**प्रभावळ** स्त्री. १. मूर्तीच्या पाठीमागे चांदी इ. धातूंची केली जाणारी महिरप. २. (ल.) मोठ्या लोकांच्या सभोवतालची मंडळी. [सं. प्रभा आवलि]

**प्रभावान** वि. तेजस्वी; कांतिमान; प्रकाशणारा; चकचकीत. [सं.]

**प्रभास** पु. झरोक्यातून येणारा उजेड.

**प्रभाळ** स्त्री. देवास कौल लावताना लावलेल्या पाकळ्यांपैकी एक पाकळी. (गो.)

**प्रभु-भू** पु. १. धनी; स्वामी; मालक. २. राजा. ३. देव; ईश्वर.
वि. समर्थ; कर्ता. [सं.]

**प्रभुत्व** न. १. (राज्यकर्ता, अधिकारी, अंमलदार इ.ची) जागा; पदवी; स्थान इ. २. अधिकार; हुकमत. [सं.]

**प्रभुत्वाधिकार** पु. राज्यातील खाजगी मालकीची जमीन वा मालमत्ता लोककल्याणासाठी ताब्यात घेण्याचा सरकारचा अधिकार.

**प्रभुभोजन** न. ख्रिस्त धर्मातील एक संस्कार किंवा साक्रमेंत आहे.ह्यात ख्रिस्ताने नेमून दिल्याप्रमाणे द्राक्षरस देतात व घेतात. हा ख्रिस्ताच्या मृत्यूचा दर्शक मानला जातो.योग्य प्रकारे ते भोजन करणारे, दैहिक इंद्रियगोचर रीतीने नव्हे तर विश्वासाने त्याच्या शरीराचे व रक्ताचे व त्यापासून होणाऱ्या सर्व लाभाचे वाटेकरी होतात व त्यायोगे त्यांचे आत्मिक पोषण होते व त्यांच्या ठायी ईश्वरी अनुग्रहाची वृद्धी होते असे प्रॉटेस्टंट ख्रिस्ती लोकांचे मत आहे.

**प्रभुशक्ती** स्त्री. युद्धाच्या तीन शक्तींपैकी एक. राजाचे सामर्थ्य; द्रव्यबल व सेनाबल अशा ह्याच्या दोन शाखा आहेत.

**प्रभूत** वि. पुष्कळ, विपुल. [सं.]

**प्रभूति-ती** स्त्री. १. बाहुल्य; पुष्कळपणा; वैपुल्य. २. आकार.

**प्रभृति-ती** क्रिवि. १. आदि; पासून. जसे: - जन्मप्रभृति, बाल्यप्रभृती इ. २. इत्यादी; आद्यत्वेकरून. [सं.]

**प्रभेद** पु. भिन्न प्रकार, रीत. [सं.]

**प्रमणे** अक्रि. प्रतिबिंबित होणे; उमटणे.

**प्रमत्त** वि. १. गर्विष्ठ; उन्मत्त (अधिकार, संपत्ती इ. मुळे); मगरूर; बेफाम झालेला. २. झिंगलेला; कैफ चढलेला; नशेत असलेला; धुंद; गाफील. [सं. प्र+मद्=माजणे]

**प्रमथ** पु. शिवाच्या गणांपैकी एक वर्ग. [सं.]

**प्रमथन** न. उठाव; चळवळ; खळबळ; आंदोलन.

**प्रमदा** स्त्री. १. सुंदर व तरुण स्त्री. २. (सामा.) स्त्री. [सं.]

**प्रमदावन** न. स्त्रियांकरिता करमणुकीची स्वतंत्र बाग, जागा.

**प्रमनशील** वि. सुखी-समाधानी वृत्तीचे.

**प्रमय** न. छंद; वृत्त : 'पदप्रमयांचें गुंफणें। स्यामा भुजबंधातें जिणे।'- भाए २६.

**प्रमस्तिष्क** न. मेंदूचा पुढील अर्धा भाग. याचा संबंध जाणीव, बुद्धिमत्ता, माहितीची साठवण व स्मृती यांच्याशी असतो. [सं.]

**प्रमा** स्त्री. १. (न्याय.) यथार्थज्ञान; निश्चितज्ञान. २. समजूत; जाणीव; बुद्धी : 'जें देहखंडा नाम आत्मा। ईश्वर पाषाण प्रतिमा। ययापराती प्रमा। ढळो नेणें।'- ज्ञा १८.५६७. ३. प्रमाण : 'अविद्या नाशी आत्मा। ऐसी नव्हे प्रमा।'- अमृ ६.४१. [सं. प्र+मा=मोजणे]

**प्रमाण** न. १. पुरावा; दाखला; आधार; साक्ष; वादग्रस्त विषयाचा निर्णय करणारा लेख, भाग, साक्ष इत्यादी प्रमाणाचे आठ प्रकार आहेत. २. यथार्थ ज्ञानाचे साधन; निश्चय; प्रमा उत्पन्न होण्यास कारणीभूत असे आप्तवाक्य, अनुमान इ. ३. निश्चितपणा; खात्री; प्रत्यंतर. ४. कसोटी; कठीण प्रसंग; तप्तदिव्य. ५. सीमा; मर्यादा; इयत्ता; तंतोतंत बरोबर संख्या इ. ६. परिमाण; आकार; विस्तार; (औषधाचा) टक; मात्रा. ७. माप (वजन, लांबी, रुंदी, वेळ इ. चे). ८. एखाद्या वस्तूचा निश्चितपणा, विभाग इ. ठरविण्याचा नियम. ९. (गणित) त्रैराशिकातील पहिली संख्या; दोन समान गुणोत्तरांची मांडणी. १०. सर्वमान्य आज्ञा, उपदेश, सल्लामसलत घ्यावयास योग्य असा शब्द, माणूस, वचन, ग्रंथ इ. ११. शपथ; वचन. १२.(चुकीने) फर्मान; हुकूम : 'बाच्छाय पाठविलें प्रमाण। वजीर बोलावा तमाम।'- ऐपो १०.१३. ज्ञान; यथार्थ ज्ञान. १४. अंत:करण. - हंको.
वि. खरे; योग्य; बरोबर; सत्य; न्याय.
क्रिवि. मान्य; कबूल. [सं.]

**प्रमाणक** पु. १. प्रमाणपत्र देणारा अधिकारी. २. माल दिल्याचा किंवा सेवा केल्याचा दाखला. (हा दाखवून पैसे घ्यायचे असतात.)
न. ठरवून दिलेला, प्रमाणित नमुना.

**प्रमाणगणित** न. त्रैराशिक.

**प्रमाणचिन्ह** न. १. वस्तूची गुणवत्ता तपासल्याचा शिक्का. २. ठळक खूण.

**प्रमाणपत्र** न. अधिकारपत्र; मुख्याच्या सहीचे पत्रक; व्यक्तीच्या अगर वस्तूच्या पात्रतेविषयी अधिकृत व्यक्तीने दिलेले मान्यतापत्र.

**प्रमाणफल** न. त्रैराशिकातील चौथी संख्या; उत्तर.

**प्रमाणभूत** वि. १. प्रमाण म्हणून घेता येईल असे; इयत्ता ठरविणारे.

२. (यावरून) खरे; सत्याला धरून असलेले.

**प्रमाणमद्यार्क** पु. (प्रमाणाइतकी) पुरी तेज दारू; पुरी कडक दारू.

**प्रमाणवेळ** स्त्री. देशातील मध्यवर्ती रेखावृत्तावरील स्थानिक वेळ.

**प्रमाणसूत्र** न. लग्नाचे वेळी वधू व वर यांची उंची मोजण्यासाठी वापरले जाणारे सूत.

**प्रमाणिका** स्त्री. एक समवृत्त.

**प्रमाणित** वि. नियम, कसोटी, पुरावा इ.नुसार मान्य, निश्चित केलेला; अधिकृत.

**प्रमाणे** शअ. १. एखाद्याला अनुसरून. २. सारखे; सदृश; अनुरूप. [सं. प्रमाणेन]

**प्रमाता** वि. १. सिद्ध करणारा; आधार, पुरावा दाखविणारा, दर्शविणारा. २. जाणून घेणारा. [सं.]

**प्रमाता** पु. (तत्त्व.) जीव. [सं.]

**प्रमातामह** पु. आईच्या बापाचा बाप; पणजा. [सं.]

**प्रमातृचैतन्य** न. सप्तचैतन्यातील आभासचैतन्याचे जडास चेतविणारे चवथे अंग. [सं.]

**प्रमाथी** पु. साठ संवत्सरांपैकी एक. [सं.]

**प्रमाथी** स्त्री. अव. दोषयुक्त स्रोतसांमध्ये जाऊन दोषांना वितळवून स्रोतसे खुली करणारी औषधे.

**प्रमाद** पु. १. दुर्लक्ष; हयगय; अनवधानता; भ्रम; विस्मृती; असावधपणा. २. चूक; कसूर; गुन्हा; अपराध. ३. मगरुरी; माजुरीपणा; गर्विष्ठपणा; उन्मत्तपणा. ४. (शब्दशः व ल.) कैफ; अंमल; मद. [सं.]

**प्रमादी** वि. दुर्लक्ष करणारा; निष्काळजी; बेसावध; हयगय करणारा; गाफील. [सं.]

**प्रमापी** पु. ठरावीक माप.

**प्रमित** वि. १. प्रतिपादिलेले; समर्थन केलेले; सिद्ध केलेले. २. मोजलेले; मापलेले; प्रमाणबद्ध; परिमित. 'तें द्वादशांगुळ प्रमित। अतिक्रमूनि चालिलों त्वरित।'– स्वादि १०.३.४२. [सं.]

**प्रमिति–ती** स्त्री. १. यथार्थज्ञान; अनुभवसिद्ध ज्ञान; प्रमा. २. मोजणे; मोजमाप; मोजदाद; गणती. [सं.]

**प्रमिला** स्त्री. सुंदर स्त्री. [सं.]

**प्रमीत** न. प्रमाण. 'पीकाचे धरून कांहीं प्रमीत। नीभावणी त्यामाने पाहेली।'– पैमा १.३८.

**प्रमुख** वि. १. मुख्य; वरिष्ठ; श्रेष्ठ; प्रधान. २. अत्युत्तम; उत्कृष्ट. ३. (समासात) अग्रभागी, शिरोभागी असलेला. [सं.]

**प्रमुदित** वि. आनंदित; आल्हादित; हर्षित; खूष. [सं.]

**प्रमेतिह, प्रमेही** वि. प्रमेहाचा विकार ज्यास झाला आहे असा. [सं.]

**प्रमेय** न. १. प्रमाणांनी सिद्ध करण्याचा विषय. सिद्ध करण्याची गोष्ट. २. प्रतिपादिलेले तत्त्व, विषय. ३. सिद्धान्त. ४. तात्पर्य; सारांश. ५. अर्थ: 'प्रस्ताविलें बरवें। प्रमेय तें जी।'– माज्ञा १८.२९७. ६. ज्ञान. ७. दृष्टान्तग्रंथ.

वि. १. सिद्ध करावयाचे; सिद्ध करण्यास योग्य किंवा शक्य. २. ज्ञेय : 'तैसें प्रमाता प्रमेय। प्रमाण जे त्रय।'– अमृ ७.४६. [सं.]

**प्रमेयचैतन्य** न. सप्तचैतन्यातील आभासचैतन्याचे पाचवे अंग.

**प्रमेयत्व** न. विषयत्व : 'विषो नाहीं कोणाही। जया प्रमेयत्वचि नाहीं।'– अमृ ५.१६.

**प्रमेह** पु. एक धातुरोग. लक्षणे – लघवीचा रंग बदलणे, प्रमाण कमी-जास्त होणे. याचे एकवीस प्रकार आहेत.

**प्रमोद** पु. १. आनंद; आल्हाद; सुख. २. साठ संवत्सरांपैकी चौथे संवत्सर.

**प्रमोदित** वि. आनंदित; आल्हादित; सुखी. [सं.]

**प्रयत** वि. नम्र. [सं.]

**प्रयत्न** पु. १. मोठा यत्न; परिश्रम; कष्ट. २. शिणवणारे काम; परिश्रमाचे कृत्य; दीर्घोद्योग. ३. (संगीत) गाताना स्वरोच्चारण करावयाच्या अगोदर श्वास आत घेण्याची व नंतर बाहेर सोडण्याची क्रिया. पहा : **आभ्यंतरप्रयत्न** व **बाह्यप्रयत्न**. ४. (सामा.) श्रम; यत्न; खटपट; एखादे काम होण्यासाठी केलेली धडपड. [सं.]

**प्रयत्नवाद** पहा: **पौरुषवाद**

**प्रयाग** पु. एक पवित्र क्षेत्र; अलाहाबाद. २. (ल.) संगम; 'युक्ति योगाचें आंग पावे। ऐसें प्रयाग जेथ होय बरवें।'– ज्ञा ६.३५७.

**प्रयागवळ** पु. प्रयागक्षेत्रीचा तीर्थोपाध्याय.

**प्रयाण** न. १. जाणे; गमन; निघणे. २. मजल : 'एकभावें राजा आपण। घ्यावया श्रीगुरुदर्शन। प्रयाणावरी करी प्रयाण।'– गुच ६.१६७. ३. (ल.) मरण; मृत्यू. [सं.]

**प्रयास** पु. आयास; कष्ट; श्रम; प्रयत्न. [सं.]

**प्रयुक्त** वि. १. (समासात) एखाद्या गोष्टीपासून प्राप्त झालेले, उद्भवलेले; कार्यकारणसंबंधी; औपचारिक; प्रेरित. जसे : –पापप्रयुक्त दुःख, प्रीतिप्रयुक्त तप इ. २. योजलेला; नेमलेला. ३. युक्त; नियुक्त; सहित; संपन्न. [सं.]

**प्रयुक्ति–क्ती** स्त्री. परिणाम; शेवट; मुख्य हेतू; ध्येय. [सं.]

**प्रयुत** न. दशलक्ष (१०,००,०००) ही संख्या.

**प्रयोक्ता** वि. लावणारा; योजणारा; नियोजित करणारा; व्यवस्था करणारा.

**प्रयोग** पु. १. (मंत्र, अस्त्र, औषध इ.ची) योजना; लावणे; योजणे एखाद्याकडे – वर – विरुद्ध लावणे, उपयोग करणे. २. रचना; मांडणी (शब्द, वाक्यातील अवयव इ.ची). ३. मंत्र, तोडगा; मंत्राचा प्रयोग; चेटूक. ४. (व्या.) वाक्यामध्ये कर्तृप्रधान, कर्मप्रधान, भावप्रधान या भेदांमुळे क्रियापदात कर्ता, कर्म व भाव यांच्या अनुरोधाने विकार होऊन वाक्यरचनेचा होणारा प्रयोग. ५. विस्तारपूर्वक स्पष्टीकरणानंतर केलेले विधान; अनुमानावरून काढलेला नियम; सूत्र. ६. (आज्ञा, नियम इ.ची) प्रत्यक्ष क्रिया, काही गोष्ट सिद्ध करण्याकरिता करावा लागणारा संस्कार. ७. परिणाम; शेवट; पर्यवसान. ८. रीत; पद्धत; सरणी. ९ अनुष्ठान. १०. (शब्दाचा) उपयोग; वापर. ११. रंगभूमीवर नाटक करून दाखविणे. १२. कर्म; कृत्य : 'विवेकयोगें सकळ प्रयोग। करीत जावे।'– दास १७.७.१९. १३. यत्न; श्रम; कष्ट. [सं.]

**प्रयोगछंद** पु. पूजेतील प्रकार.

**प्रयोगपाठी** वि. विवाहादी कर्माचे प्रयोग पाठ असूनही त्यांचा आधार किंवा कारण सांगता न येणारा.

**प्रयोगशाळा** स्त्री. शास्त्रीय पद्धतीने प्रयोग करून पाहण्यासाठी आवश्यक ती साधने असलेली जागा.

**प्रयोगी** वि. जादूटोणा, जारणमारणादी कर्म करणारा : 'नित्य मायबाप जाती तृणा लागीं । पाळितां प्रयोगी जाण तोषे ।'– ब १४.११.

**प्रयोजक** वि. १. कार्यप्रवर्तक; कर्त्याला क्रियेसाठी प्रवृत्त करणारा; प्रधान; आदिकरण. २. करविता; प्रेरणा देणारा; घडवून आणणारा; योजिणारा; योजक. ३. मूळ धातूच्या क्रियेचा कर्ता स्वत: क्रिया करत नसून ती दुसऱ्याकडून करवून घेत असतो असे दाखवणारे (क्रियापद). [सं.]

**प्रयोजनशक्ती** स्त्री. रासायनिक आकर्षणाचे माप. (इं.) बाँड.

**प्रयो(युं)जणे** सक्रि. योजना, प्रयोग करणे. पहा : **योजणे**

**प्रयोज्य** वि. १. योजण्यास, परिणाम करण्यास, उत्पन्न करण्यास शक्य, इष्ट, योग्य; संभवनीय. २. (व्या.) प्रयोजक. [सं.]

**प्रयोजन** न. १. जरुरी; गरज; आवश्यकता. २. कारण; साधन; आधार; प्रसंग; निमित्त. ३. हेतू; उद्देश. ४. लग्न, मुंज, ब्राह्मणभोजन इ. प्रकारचे कार्य; जेवणावळ. ५. अनुबंधचतुष्टयातील शोकापगमन आणि आनंदावाप्ती या उभयरूपाने तिसरे अंग. [सं.]

**प्ररुद्ध** वि. पूर्णपणे झाकलेले, आच्छादिलेले : 'तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असे प्ररुद्ध ।'– ज्ञा ३.२६३. [सं. प्र+रुध्]

**प्ररोचना** स्त्री. नाटकाचा हेतू, त्यातील युक्ती इ. चा निर्देश; प्रस्तावना. [सं.]

**प्ररोह** पु. १. अंकुर. २. उदय; वाढ : 'अन्नास्तव भूतें । प्ररोह पावती समस्तें ।'– ज्ञा ३.१३४. ३. उदय. ४. उत्पत्ती. [सं.]

**प्रर्जी** पु. रोग.

**प्रल(ला)पणे** अक्रि. निरर्थक, विसंगत बोलणे; बकणे. [सं. प्रलपन्]

**प्रलय** पु. १. कल्पांताच्या वेळी (४,३२,००,००,००० वर्षांच्या मुदतीनंतर) होणारा जगाचा अंत. २. मृत्यू; लय; विध्वंस; संहार; (सामा.) नाश. ३. (ल.) अतिशय नासधूस; धुळधाण; अनर्थ; कहर; धुव्वा; महामारी, दुष्काळ, टोळधाड, दरोडा, लूट इ. सारखी आपत्ती. ४. निरतिशयता; अमर्यादता; अपरंपारता; असामान्यता; अतिशयता; पराकाष्ठा. ५. मूर्च्छा; एकाएकी बेशुद्ध होणे; घेरी; झीट. पहा : **अष्टभाव.** [सं.]

**प्रलयकाळ** पु. १. जगाच्या अंताची वेळ. २. अत्यंत भीतिप्रद व अक्राळविक्राळ स्वरूपाचा मनुष्य; राक्षस. ३. (ल.) अवदसा; कर्कशा; कृत्या; कैदाशीण; अत्यंत भांडखोर स्त्री.

**प्रलयभैरव** पु. प्रलयकाळचे भूत, पिशाच्च, राक्षस.

**प्रलयवीज** स्त्री. १. अतिशय गडगडाट करणारी, भयंकर वीज. २. (ल.) भयंकर किंवा भीतिप्रद मनुष्य. ३. चलाख, तरतरीत, उत्साही मनुष्य. ४. (ल.) सुंदर व वेड लावणारी स्त्री.

**प्रलयाग्नि-ग्नी, प्रलयआग** पु.स्त्री. १. अतिशय मोठी आग; वणवा. २. (ल.) पहा : **प्रलयवीज**

**प्रलंबक** वि. टांगणारा; लोंबत, अधांतरी ठेवणारा. [सं.]

**प्रलंबित** वि. १. लोंबकळत राहिलेला. २. साचलेला.

**प्रलाप** पु. असंबद्ध, निरर्थक बडबड; (झोप, शोक, पद, इ.तील) व्यर्थ भाषण.

**प्रलोभन** न. १. फूस; आमिष; मोह. २. (विजेचे) प्रवर्तन; उपपादन. वि. मोह, लालूच, आमिष दाखविणारा; फूस लावणारा. [सं.]

**प्रलोभित** वि. मोहित; मोह पडलेला; लालचावलेला. [सं.]

**प्रवक्ता** पु. १. देवाच्या संदेशावर भाष्य अगर प्रवचन करणारा. २. भविष्यवादी. ३. संघटनेच्या, संस्थेच्या, पक्षाच्या वतीने बोलणारा. [सं.]

**प्रवचन** न. पुराणे, उपनिषदे इ.तील काही भाग घेऊन त्यातील सिद्धांतांची फोड करून श्रोत्यांना समजून सांगणे; विवरण; व्याख्यान. [सं.]

**प्रवचनकार** पु. प्रवचन करणारा.

**प्रवण** वि. १. उतरता; सखल; कललेला. (समासात) दक्षिण-प्रवण. २. आसक्त; तत्पर; परायण. ३. तयार; सिद्ध. [सं.]

**प्रवर** पु. स्त्री. परंपरा; पद्धत.

**प्रवर** पु. गोत्रातील मुख्य पूर्वज; गोत्रप्रवर्तक ऋषी; प्रवरात एक प्रवर, द्विप्रवर, पंचप्रवर असे प्रकार आहेत.
वि. मुख्य; प्रधान; श्रेष्ठ; उत्कृष्ट. [सं.]

**प्रवरण** न. प्रथम पसंती; निवडीचे प्राधान्य.

**प्रवर्त** पु. १. देवघेव; व्यापार; व्यवहार : 'इसाळ्यानें गेलें शेत । प्रवर्त बुडाला जेथिचा तेथ ।'– एभा २३.१२८. २. मार्ग : 'माजी कर्माकर्मांचिया व्यवहारीं । प्रवर्तु दावी ।'– ज्ञा ७.२६. [सं.]

**प्रवर्त** डोहणा; दंगा; हालचाल.

**प्रवर्तक** वि. १. उत्पादक; मूळ प्रेरक; पुरस्कार करणारा. २. उत्तेजन देणारा; नेट देणारा; उठावणी करणारा. ३. पंच; लवाद. ४. खेड्याचा मुख्य; पाटील (कर्ता). [सं.]

**प्रवर्तककारण** न. परिपोषक कारण; पूर्व तयारी करणारे कारण.

**प्रवर्तणे** अक्रि. १. तयार होणे; उद्युक्त होणे. २. चालू होणे; चाल पडणे; (काही काम) चालू असणे, सुरू झालेले असणे : 'या यज्ञदानादि क्रिया । ओंकारें सावायिलिया । प्रवर्तती ।'– ज्ञा १७.३६७. ३. आरंभिणे; सुरू होणे. ४. चालणे; जाणे. [सं. प्र+वृत्]

**प्रवर्तन** न. १. आरंभ; सुरुवात; चालू करणे; पुढे करणे. २. उद्युक्त करणे; भर देणे. ३. वागणूक; कामधंदा; उद्योग; ऐहिक कर्म. ४. उपपादन. [सं.]

**प्रवर्तमान** वि. उद्युक्त; व्यापलेला; वर्तणारा; चालणारा; हालचाल करणारा. [सं.]

**प्रवर्तित** वि. १. चालू केलेला; पुरस्कार केलेला; रूढ केलेला. २. उत्तेजन दिलेला; उद्युक्त केलेला; भर दिलेला. [सं.]

**प्रवर्त्यमान** वि. चालू, सुरू असलेला; चालविणाऱ्याच्या किंवा व्यवस्थापनाच्या हाताखाली असलेला (धंदा). [सं.]

**प्रवर्धन** न. (व. शा.) वनस्पतींच्या अवयवातून प्रजनन होण्याची क्रिया.

**प्रवसणे** सक्रि. कुरवाळणे; थापटणे : 'कोडीसवाणे पाये धाकुलें । रायें हातें प्रवसीले ।'– उषा ७०८. [सं. प्र+मृश्]

**प्रवसर** पु. मोह. -शर.

**प्रवस्कंध** पु. मेघमंडळापासून सूर्यमंडळापर्यंत असणारा सप्तस्कंधांतील दुसरा स्कंध. [सं.]

**प्रवाद** पु. १. लोकवार्ता; वदंता; लोकात झालेला बोभाटा; अफवा. २. उल्लेख : 'म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ।'– ज्ञा १८.९७८.

३. संज्ञा : 'तैसा सुखप्रवादु बरळु। विषयिकु हा।'- ज्ञा ५.११६. ४. बोलणे; भाषण. [सं.]

**प्रवाल–ळ** न.पु. पोवळे. [सं. प्रवाल]

**प्रवास** पु. १. स्वदेश सोडून अन्यत्र जाणे; देशाटन; परदेश संचार. २. परदेशात केलेला तात्पुरता वास; परदेशात प्रवास करताना राहणे. ३. परदेश. [सं.]

**प्रवासणे** अक्रि. प्रवास, देशाटन करणे; परदेशात तात्पुरते राहणे.

**प्रवासिक, प्रवासी** पु. प्रवास करणारा.
वि. कष्टी.

**प्रवाह** पु. १. जल,वायू, अग्नी इ.ची गती किंवा एका दिशेकडे गमन; ओघ; वाहणे. २. (ल.) कामकाजाची सरणी, ओघ. ३. भाषणाचा अखंडपणा; अकुंठित ओघ. ४. कामधंदा; उद्योग; हालचालीचे जीवन. ५. (प्रेम, बुद्धी इ. चा) कल; झोक; प्रवृत्ती. ६. ओढ; पक्षपात; प्रवृत्ती; धाव. [सं.] (वा.)

**प्रवाहात पडणे** – जनसमुदायाच्या वर्तनाप्रमाणे किंवा रूढीप्रमाणे वागणे.

**प्रवाहपतित** वि. (शब्दशः व ल.) प्रवाहात पडलेला; प्रवाहाप्रमाणे जाणारा; परिस्थितीप्रमाणे वागणारा; गतानुगतिक.

**प्रवाहित्व** न. वाहते राहण्याचा धर्म; द्रवता; जलरूपता.

**प्रवाही** वि. १. वाहणारे; पातळ; द्रवरूप. २. धावती (लिपी). [सं.]

**प्रवाही खत** जनावरांचे मूत्र.

**प्रवाहण, प्रव्हाण** न. होडी; नाव; तर.

**प्रवाळ** न. १. पल्लव; अंकुर. २. समुद्रात मिळणारे रत्न; पोवळे.[सं. प्रवाल]

**प्रवाळद्वीप** न. सागरी सूक्ष्म जिवाणू व त्यांच्या अवशेषांनी तयार होणारे बेट.

**प्रविलाप** पु. नाश; नाहीसे होणे (गिळंकृत किंवा शोषण केल्यामुळे); शोषण. [सं.]

**प्रविष्ट** वि. १. (शब्दशः व ल.) शिरलेला; घुसलेला. २. पोहोचलेले; पावलेले (पत्र). ३. निमग्न. [सं.]

**प्रवीण** वि. चांगली माहिती असलेला; निपुण; निष्णात; हुशार; कुशल; पारंगत; वाकबगार; चतुर. [सं.]

**प्रवृत्त** अक्रि. १. उद्युक्त; चालू असलेला; तयार; अधिष्ठित; स्थापित. २. कार्यामध्ये व्यग्र झालेला; गुंतलेला; तत्पर; कामात असलेला. ३. सांसारिक; ऐहिक; जीवनकलहविषयक; प्रापंचिक. [सं.]

**प्रवृत्तणे** अक्रि. एखाद्या कार्यात व्यग्र होणे; उद्युक्त, तत्पर होणे.

**प्रवृत्ति–त्ती** स्त्री. १. प्रस्थापना; व्याप्ती; परिपाठ; प्रघात; रूढी. जसे : – कर्म–काल–देश–आचार प्रवृत्ती. २. चाल; गती; गमन; आरंभ; सुरुवात. ३. निमग्नता; चळवळ; हालचाल; एखाद्या कामात गुंतलेले असणे. ४. संसार; प्रपंच; संसारातील आसक्ती; आत्मस्वरूपाचा विसर पडून प्रापंचिक व्यवहाराकडे असणारी जीवाची विशेष वृत्ती; बहिर्मुखवृत्ती : 'आतुला चित्ताचे अंगवरी। प्रवृत्ति पेलोनि माघारी।'- ज्ञा १६.९१. ५. (ल.) प्रवाह; ओघ; प्रगती. ६. इच्छा; कल; ओढ; धाव; झोक (प्रेम, मन, बुद्धी इ.चा). ७. आसक्ती; पक्षपात; ओढा. ८. कर्ममार्ग: 'तेथें भ्रमेंसहित पळाली भ्रांती। क्रियेसहित गळाली प्रवृत्ती।' – एभा १३.४२१. ९. प्रेरणा : 'तो साधी चिद्रुपु। कर्मप्रवृत्तीचा संकल्पु।' – ज्ञा १८.४५७. १०. प्रेरक; प्रेरणाहेतू : 'म्हणोनि ज्ञान ज्ञेय ज्ञाता। हे त्रिविध गा पांडुसुता। होयचि कर्मा समस्तां । प्रवृत्ति येथ।' – ज्ञा १८.४८५. ११. रूढी; प्रघात : 'तरी हें प्रवृत्तीचें बोलणे। प्रत्ययास आणी उणें।' – दास ९.७.११. १२. बातमी. १३. कर्मक्रिया. [सं. प्रवृत्ति]

**प्रवृत्तिकारण** न. (व्या., न्याय.) विशिष्ट अर्थानेच शब्दाचा उपयोग किंवा रूढी होण्याचे कारण. [सं.]

**प्रवृत्तिकास्त** पु. शेतकीचा उद्योग करणारा एक जातिसमुदाय.

**प्रवृत्तिमार्ग** पु. प्रापंचिक व्यवहाराचा मार्ग; ऐहिक सुखासंबंधीचा उद्योग; धार्मिक क्रिया, विधी, आचार इ.

**प्रवृद्ध** वि. १. पूर्णपणे वाढलेला; प्रौढ; प्रगल्भ. २. वाढलेला; विस्तारलेला; विस्तीर्ण केलेला; वृद्धिंगत; वाढविलेला. [सं.]

**प्रवेश** पु. १. शिरणे; निघणे; शिरकाव. २. शास्त्र, कला इ. मध्ये झालेला बुद्धीचा शिरकाव. ३. रंगभूमीवर पात्राचे येणे. ४. नाटकातील अंकाचा पोटभाग. ५. दार. ६. जवळीक. [सं.]

**प्रवेशक** पु. १. पूर्वरंग; नांदी. २. मुख्य पात्र रंगभूमीवर येण्याअगोदर श्रोत्यांना संदर्भ कळविणाऱ्या हलक्या दर्जाच्या पात्राचा प्रवेश. ३. प्रस्तावना; उपोद्घात; उपन्यास.
वि. प्रवेश करून, मिळवून देणारा. [सं.]

**प्रवेशणे** अक्रि. प्रवेश,शिरकाव करणे; शिरणे;घुसणे. [सं. प्र+विश्]

**प्रवेशन** न. १. शिरणे; शिरकाव करणे. २.(नृत्य.) नृत्यामध्ये बुबुळे दिसेनाशी होतील अशी करणे. हा अभिनय हास्य व बीभत्सरसद्योतक आहे. [सं.]

**प्रवेष्ट** पु. कोपरापासून वरचा हात. पहा : **प्रकोष्ठ** [सं.]

**प्रवेसन** न.१. श्रवण; ऐकू येणे; समजणे. २. प्रविष्ट.

**प्रव्याजी** पु. विम्याचा हप्ता.

**प्रव्रज्यायोग** पु. (फ. ज्यो.) जन्मकुंडलीत राहू, गुरू, शनी, हर्षल व नेपच्यून हे पाच ग्रह ३,४,९ किंवा १२ या स्थानी असणे.

**प्रव्हा** स्त्री. प्रभा; तेज : 'श्रीमूर्तीवरी बाळकत्वाची प्रव्हा जाली' – लीचपू ९५ [सं. प्रभा]

**प्रव्हाणे** अक्रि. प्रभवणे; निर्माण होणे: 'वरिला देहा छेदभेद न प्रव्हाति' – लीचपू २०० [सं. प्र + भु]

**प्रशम** पु. १. (राग,लोभ इ. चे) समाधान; सांत्वन;उपशम; शांती. २. विश्रांती; विश्राम; विसावा. [सं.]

**प्रशमन** न. १. समाधान; सांत्वन; उपशमन. २. सांत्वन करणारे, शमविणारे, दुःख, व्याधी, वेदना दूर करणारे, उताऱ्याचे औषध. [सं.]

**प्रशस्त** वि. १. प्रशंसलेले; वाखाणलेले. २. ऐसपैस; विस्तीर्ण; मोकळी (जागा, घर इ.). ३. पुरण्याइतके मोठे; अघळपघळ; सैल; मोकळे (वस्त्र). ४. मनमोकळे; स्पष्ट; खुले (भाषण). ५. उदार; थोर; दिलदार; उदात्त (मन, स्वभाव). ६. विपुल; अतिशय; भरपूर; रेलचेल; वाजवी; समाधानकारक (कृती, धंदा, वागणूक इ.). ७. स्तुत्य; बरोबर; उत्कृष्ट; कौतुकास्पद; श्रेष्ठ. ८. निर्दोष; दोषरहित.

क्रिवि. स्वैर; मोकळेपणाने; स्वतंत्रपणे (भटकणे, पडणे, शिव्या देणे, चोरी, बाहेरख्यालीपणा करणे इ.). [सं.]

**प्रशस्ति-स्ती** स्त्री. १. स्तुती; प्रशंसा; तारीफ; वाहवा. २. पत्राचा गौरवपर लिहिलेला प्रास्ताविक भाग. अलकाब. ३. प्रसन्नता : 'आत्मबोध प्रशस्ती । हे तिये दशेची ख्याती ।'– ज्ञा १८.१०९५. ४. समाधान. ५. महत्त्व; पूज्यत्व.

**प्रशंसक** वि. स्तुती, प्रशंसा करणारा; स्तावक. [सं.]

**प्रशंसणे** सक्रि. स्तुती करणे; गुणवर्णन करणे; वाखाणणे.

**प्रशंसनीय** वि. स्तुतीस पात्र, योग्य; स्तुत्य; वाखाणण्याजोगे. [सं.]

**प्रशंसा** स्त्री. स्तुती; वाखाणणी; तारीफ; नावाजणी; वाहवा. [सं.]

**प्रशाखा** स्त्री. फांदीला फुटलेली फांदी; फाटा.

**प्रशाला** स्त्री. माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा.

**प्रशासक** पु. व्यवस्थापनासाठी नेमलेला मुख्य अधिकारी.

**प्रशांत** वि. १. शांत; स्तब्ध; बंद पडलेला; थंड. २.ज्याचे काम, क्रोध इ. विकार शमले आहेत असा. ३. मृत; नष्ट. [सं.]

**प्रशिक्षण** न. विशिष्ट पद्धतीने, शिस्तीने, कौशल्याने काम करण्याचे शिक्षण. [सं.]

**प्रशीतन** न. सामान्यत: ५° से. तापमानात अन्नपदार्थ ठेवून साठवण्याची क्रिया.

**प्रश्न** पु. १. विचारणा; सवाल; चौकशी; विचारपूस; पृच्छा. २. शुभ किंवा अशुभ दर्शवणारे चिन्ह; शकुन. ३. भविष्यातील गोष्टीसंबंधाने ज्योतिषी वगैरेंचा घेतलेला सल्ला; मुद्दा; बाब. ४. विचारलेल्या भविष्याचे सांगितलेले भाकीत किंवा उत्तर. ५. कोडे; कूट. ६. अथर्ववेदातील एका उपनिषदाचे नाव. (वा.) **०उठविणे –** प्रश्न टाळणे. **०पाहणे–** भूत आणि भविष्य गोष्टीचे ज्ञान फलज्योतिष, रमल इ. शास्त्रांवरून करून घेणे. **०सांगणे–** ज्योतिषशास्त्र वगैरेवरून विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर सांगणे; कूटप्रश्न, कोडे इ. सोडविणे. [सं.]

**प्रश्नकुंडली** स्त्री. (फ.ज्यो.) विशिष्ट वेळी एखादा प्रश्न विचारला गेला असताना त्या प्रश्नाचे जातक सांगण्यासाठी त्यावेळेची मांडलेली कुंडली.

**प्रश्नचिन्ह** न. प्रश्न विचारणारे वाक्य आहे असे दर्शविण्यासाठी दिले जाणारे चिन्ह.

**प्रश्नणे** सक्रि. विचारणे.

**प्रश्नपखडी** स्त्री. विविध प्रश्न.

**प्रश्नपत्रिका** स्त्री. १. परीक्षेत मुलांना सोडविण्यासाठी दिलेला प्रश्नांचा कागद. २. विशिष्ट उद्देशाने माहिती मिळवण्यासाठी सर्वेक्षणासाठी तयार केलेला प्रश्नांचा कागद.

**प्रश्नय** शौच. 'नंतर प्रश्नयाची वृत्ति ।'– पूजावसर.

**प्रश्नालंकार** पु. बाहेरून वाक्य प्रश्नासारखे दिसते, पण वस्तुत: वक्त्याचा त्या गोष्टीविषयी पक्का निश्चय असतो अशा वेळी होणारा अलंकार.

**प्रश्नावलि–ली–ळी** स्त्री. प्रश्नांची परंपरा; मालिका; प्रश्नमाला.

**प्रश्नोत्तरी** स्त्री. प्रश्न विचारण्याच्या वेळेच्या ग्रहदशेवरून केलेले भूतभविष्य टिपण किंवा जन्मपत्रिका.

**प्रष्टव्य** वि. विचारण्यास शक्य, पात्र, योग्य, आवश्यक. [सं.]

**प्रष्टा** वि. विचारणारा; पृच्छक; चौकशी करणारा. [सं.]

**प्रसऊ** न. प्रसवते द्वार : 'जे वेदाचा उगऊ । पूर्ण बोधाचा जीऊ । ब्रह्मविद्ये प्रसऊ । जे परवाचा ।'– ऋ १.

**प्रसक्त** वि. आलेली; प्राप्त झालेली, ठेपलेली; गुदरलेली (वेळ, उद्योग इ.).

**प्रसक्ति–क्ती** स्त्री. (न्याय.) लक्ष्याच्या ठिकाणी लक्षणादिकांची प्राप्ती; प्रवृत्ती; कल; व्याप्ती; योग्य असणे; लागू पडणे. [सं.]

**प्रसज्यप्रतिषेध** पु. (पंडिती) समान किंवा भिन्न गोष्टीची आज्ञा, परवानगी न देता विशिष्ट गोष्टीचा केलेला निषेध.

**प्रसन्न** वि. १. संतुष्ट; समाधानयुक्त; अनुकूल प्रवृत्ती असलेला; प्रसाधित; आराधित. २. आनंदी; आल्हादित; प्रफुल्लित. ३. आनंदायक; संतोष देणारे; अनुकूल. ४. स्वच्छ; शुद्ध; साफ; चकचकीत; निरभ्र. ५. शांत; निर्मळ; झुळझुळ वाहणारा (प्रवाह, ओढा). [सं.]

**प्रसन्नमुखराग** पु. (नृत्य.) हास्य, शृंगार व अद्‌भुत रसाचे प्रसंगी चेहऱ्यावर दाखवले जाणारे तेज.

**प्रसभ** पु. बल; तेज; सामर्थ्य : 'म्हणौनि तुमचां कृपआशीर्वादीं । विश्व कीर्ती आमुतें वंदी । जैसे याज्ञिकां अधिकार सुरपदीं । प्रसभवन्हिप्रसादें ।'– कृमुरा ७२.५२. [सं.]

**प्रसर** पु. १. विस्तार; प्रसार; फैलाव; वाढ; वृद्धी. २. पसारा; वस्तू अस्ताव्यस्त पडणे; विस्कटणे; पसरणे. ३. प्राप्ती.

**प्रसरण** न. १. विस्तार; फैलाव; प्रसार; वृद्धी. २. पसरणे; विखुरणे; विस्कटणे; पसारा. ३. उष्णतेचा पदार्थाशी संबंध झाला असता त्याच्या ठिकाणी होणारा फुगण्याचा धर्म; (इं.) एक्स्पांशन.

**प्रसरणगुणक** पु. पदार्थ किती प्रसरण पावतो हे दर्शविणारा अपूर्णांक.

**प्रसव** पु. १. बाळंत होणे; प्रसूती. २. जन्म; उत्पत्ती. ३. अपत्य; संतान. ४. परिणाम; फल.

**प्रसव(वि)णे** उक्रि. १. जन्माला येणे; जन्मणे. २. जन्म देणे; प्रसूत होणे; बाळंत होणे. ३. (ल.) उत्पन्न होणे, करणे : 'बीज शाखातें प्रसवे ।'– ज्ञा ९.२९२. ४. काही एक गोष्ट अभिव्यक्त होणे किंवा करणे.

**प्रसवती** स्त्री. जन्म देणारी स्त्री; आई; माता.

वि. उत्पन्न होणारी, करणारी; प्रसविणारी : 'तेव्हां गुणप्रसवती माया । शोधितसत्वें आणिली लया ।'– एभा १०.३५५.

**प्रसवधर्मिणी** स्त्री. (ल.) प्रकृती; माया.

**प्रसवराशी** स्त्री. कर्क, वृश्चिक, मकर, मीन या चार राशी.

**प्रसवि(वी)का** स्त्री. प्रसूती नैसर्गिक रितीने व्हावी म्हणून मदत करणारी स्त्री; सुईण; (इं.) मिडवाइफ.

**प्रसववैराग्य** न. १. बाळंतपणाच्या वेदनांमुळे त्या वेळेपुरती स्त्रीला आलेली विरक्ती. २. (ल.) अल्पकाळ टिकणारे वैराग्य.

**प्रसवी** वि. कारस्थानी; अवडंबर करणारा.

**प्रसंग** पु. १. योग्य वेळ, काळ, संधी; योग्य स्थल किंवा परिस्थिती. २. येऊन ठेपलेली वेळ; आकस्मिक किंवा एकाएकी उद्भवलेला काळ; कठीण परिस्थिती; संकट. ३. विपत्ती; आपत्काल; अटळ, संकटाचा समय. ४. योग; संबंध; दळणवळण; व्यवहार. ५. नित्य; वारंवार दिसणारी, घडणारी गोष्ट; नित्य आढळून येणे; नित्य संबंध; गाठ.

६. (वादविवाद, चर्चा इ.साठी) सभा; जमाव; एकत्र जमणे. ७. (भाषण, पुस्तक इ.चा) विभाग; प्रकरण; अध्याय. ८. चर्चेचा विषय. ९. (ल.) लाभ; प्राप्ती : 'कां वार्षिये आणिजे मेघु। मेघें वृष्टिप्रसंगु।'- ज्ञा १८.३५५. १०. कथा; गोष्ट. ११. भाषणाचा ओघ : 'म्हणोनि आम्हीं हा प्रसंगु। आदरिला।'- विपू १.८७. १२. (ल.) भेद; प्रकार. १३. (ल.) फलप्राप्ती. १४. सुरतसुख; मैथुन; संयोग. १५. युद्ध; सामना. [सं.] (वा.) ० **घडणे–** संग, संयोग घडणे; संभोग होणे; सुरतसुख भोगणे.० **मारून नेणे, काढणे, संपादणे, शेवटास लावणे–** वेळ मारून नेणे; संकटातून किंवा अडचणीतून यशस्वी तऱ्हेने पार पडणे. **प्रसंगास येणे –** अगदी निकडीच्यावेळी येणे; जरूरीच्या किंवा योग्य वेळी येणे. **प्रसंगी असणे, राहणे, वागणे, चालणे, निभणे–** वेळेवर हजर असणे.

**प्रसंगता, तः** क्रिवि. ओघाने; प्रसंगानुसार : 'जी व्यापकपण बोलतां। निरुपाधिक जें आतां। स्वरूप प्रसंगता। बोलिले देवो।'- ज्ञा १५.४४६. [सं. प्रसंगतः]

**प्रसंगमान** न. प्रसंगाला उचित असे कार्य, गोष्ट; योग्य वेळ.

**प्रसंगावधान** न. संकटसमयी भांबावून न जाणे; योग्य वेळी युक्ती सुचणे.

**प्रसंगोपात–त्त** क्रिवि. प्रसंगाच्या अनुरोधाने, ओघात; यथाकाळी;

**प्रसंविदा** पु. करार; करारनामा.

**प्रसा** पु. प्रशंसा; स्तुती : 'ऐसे (क्षेमालिंगन) प्रसेयासि देओं नैए।'- लीचउ ५३३.

**प्रसाद** पु. १. कृपा; प्रसन्नता; अनुग्रह. २. कृपा म्हणून देव, गुरु, साधू इ. कडून मिळालेली फळे, तांदूळ, फुले इ. रूप वस्तू. ३. देवाला अर्पिलेल्या अन्नाचा उरलेला भाग. ४. पुराण, कीर्तन इ. च्या समाप्तीनंतर वाटली जाणारी मिठाई, फळ इ. ५. देवाला शुभाशुभ विचारताना, कौल लावताना देवाच्या मूर्तीला चिकटवतात ती फुले, तांदूळ इ. रूप वस्तू; कौल. ६. स्वच्छपणा; निर्मलता; चकचकीतपणा. ७. (ल.) मानसिक पावित्र्य. ८. (साहित्य.) सरळ रचनेचा गुण; स्पष्टार्थता; सुबोधता. ९. देणगी; बक्षीस दिलेली वस्तू. १०. साक्षात्कार. [सं.] (वा.) ० **मिरविणे–** लोकात कीर्ती होईल अशी कृपा करणे. (वा.) ० **करणे–** परमेश्वरावताराने खाद्यपदार्थ उष्टे करणे.

**प्रसादन** न. स्तुती वगैरे करून, अनुकूल, संतुष्ट करणे; आराधना. [सं.]

**प्रसादपाकळी** स्त्री. देवाचा कौल. (गो.)

**प्रसादी भक्त** केवळ प्रसाद मिळावा म्हणून बनलेला भक्त.

**प्रसाध(धि)क** पु. १. पोशाख चढविणारा. २. शागीर्द.

**प्रसाधन** न. अधिक चांगले दिसावे म्हणून चेहरा व शरीराची सजावट करणे.

**प्रसाधनगृह** न. पोशाखघर; कपडे करावयाची जागा.

**प्रसार** पु. १. पसरणे; विस्तारणे; फैलावणे; विखुरणे. २. विस्तार; पसारा; वृद्धी; वाढ; विस्कटलेली किंवा पसरलेली स्थिती. [सं.]

**प्रसारण** न. १. पसरणे; विस्तारणे; विखुरणे. २. (पिशाच्चबाधा) घालवणे; नाहीशी करणे. ३. नभोवाणीवरून कार्यक्रम प्रक्षेपित करणे. [सं.]

**प्रसारणे** सक्रि. पसरणे; विखुरणे; दूरवर पसरणे; विस्कटणे.

**प्रसारता** स्त्री. (संगीत) गाताना हातपाय पसरणे.

**प्रसारमाध्यमे** पु. प्रसार करणारे माध्यम. उदा. वर्तमानपत्र, दूरदर्शन.

**प्रसारिणी** स्त्री. (संगीत) अकराव्या श्रुतीचे नाव.

**प्रसारित** वि. १. पसरलेले; विस्कटलेले; विस्तारलेले; विखुरलेले. २. काढून टाकलेले; घालवलेले; नाहीसे केलेले (भूत, पिशाच्च इ.). [सं.]

**प्रसिद्ध** वि. १. सर्वांना ठाऊक असलेला; विख्यात; जाहीर; सार्वजनिक; रूढ. २. स्पष्ट; उघड; स्वच्छ. ३. अस्तित्वात असलेला; वर्तमान.[सं.]

**प्रसिद्धि–द्धी** स्त्री. १. ख्याती; कीर्ती; व्यक्ती, वस्तू इ. सर्वांना माहीत होणे. २. व्याप्ती; रूढी; वहिवाट; प्रचार; परिपाठ. [सं.]

**प्रसिद्धिका** स्त्री. प्रसिद्धीसाठी वाटलेले पत्रक; (इं.) हँड बिल.

**प्रसिद्धिपत्रक** न. प्रसारमाध्यमांकडे प्रसिद्ध करण्यासाठी पाठवलेला मजकूर; (इं.) प्रेसनोट.

**प्रसुप्त** वि. गाढ झोपी गेलेला; निद्रिस्त. [सं.]

**प्रसू** स्त्री. प्रसूत होणारी स्त्री. [सं.]

**प्रसूत** वि. १. बाळंत झालेली (स्त्री); प्रसवलेली. २. जन्मलेले; उत्पन्न झालेले. [सं.]

**प्रसूति–ती** स्त्री. १. बाळंत होणे; प्रसवणे. २. जन्म; उत्पत्ती; उत्पन्न होणे; प्रसव; उद्भव. [सं.]

**प्रसूतिका** स्त्री. १. नुकतीच प्रसूत झालेली स्त्री; बाळंतीण. २. जिला एकच मुलगा आहे अशी स्त्री. [सं.]

**प्रसूतिशास्त्र** न. प्रसूतीपूर्वी, प्रसूतीच्या वेळी व नंतर स्त्रीची काय काळजी घ्यावी, ते सांगणारे शास्त्र.

**प्रसृत** वि. पसरलेले; विसकटलेले. [सं.]

**प्रसृत(पुट)** न. (नृत्य.) नृत्यात खालच्या–वरच्या पापण्या फार दूर नसून थोड्या पसरणे. विस्मय, हर्ष, वीररसद्योतक हा अभिनय आहे. [सं.]

**प्रसृति–ती** स्त्री. हाताचा पसा. [सं.]

**प्रसेक** न. तोंडाला पाणी सुटणे; लालास्त्राव.

**प्रस्तर** पु. खडकाचा थर. [सं.]

**प्रस्ताइ** क्रिवि. बहुतेक; म्हणून. -ख्रिपु. [सं.]

**प्रस्ताय** स्त्री. लचांड; भानगड; शुक्लकाष्ट. (को., गो.)

**प्रस्तार** पु. १. (विरू.) प्रसार; पसरणे; विस्तार; फैलाव. २. (गणित) एकीकरण. ३. (संगीत) मात्रांचे भेद चिन्हांनी लिहून दाखवणे व गणितशास्त्राच्या रीतीने तालांच्या अनेक प्रकारच्या रचना करून सर्व प्रकार काढणे. [सं.]

**प्रस्ताव** पु. १. विषयाची व्याप्ती; कथन; उल्लेख; वर्णन; निरूपण. २. प्रसंग; अवसर; योग्य काळ. (क्रि. चालणे, होणे, असणे.). ३. आरंभ; उपक्रम; सुरुवात. ४. ठराव. ५. प्रस्तावना. ६. गोष्ट; प्रसंग : 'असो आतां हा प्रस्तावो। आधीं अज्ञानाचा धांडोळा घेवों।'- अमृ ७.७. ७. पसारा : पिंडब्रह्माडात्मक प्रस्ताव। तुमचेनि जी सद्गुरु।'- स्वादि १३.४.५. ८. सिद्ध करण्याचा आधार. [सं.] (वा.) ०**करणे–** दिलगिरी, खेद व्यक्त करणे. (व.)

**प्रस्तावक** वि. सूचक.

**प्रस्तावणे** अक्रि. १. (विरू.) पस्तावणे. २. सांगण्यास आरंभ, सुरुवात करणे: 'हा फळहीवरी उपावो। कां पां प्रस्तावीतसे देवो।'- ज्ञा १८.१२२९.

**प्रस्तु** पु. प्रस्थ; स्तोम.

**प्रस्तुत** न. व्याख्यान, बोलणे, चर्चा इ. चा विषय. [सं.]

**प्रस्तुत** वि. १. तयार; सिद्ध; घडलेले; वाट पाहात असलेले; चालू. २. विवादासाठी, चर्चेसाठी घेतलेला; वर्णिलेला (विषय). [सं.] क्रिवि. तूर्त; आता; सध्या; हल्ली.

**प्रस्थ** न. १. लग्न, मुंज इ. प्रसंगी दिलेले ब्राह्मणभोजन. २. (कोणी थोर पुरूष प्रवासाला जाण्यासाठी निघताना किंवा लग्न कार्याच्या वेळी होणारी) गडबड; घाई; गोंधळ इ. ३. विद्या, संपत्ती, वक्तृत्व इ. गोष्टीमुळे असामान्य असा माणूस. ४. (ल.) ढोंग; स्तोम; भपका; नसते महत्त्व; ५. (ल.) धेंड; प्रकरण. ६. खटले; घरदार; जमीनजुमला. ७. आसन; स्थान. ८. धान्य मोजण्याचे एक माप.

**प्रस्थान** न. १. जाणे; निघणे; गमन; प्रयाण. २. प्रवासास निघण्याच्या वेळी शुभमुहूर्त नसल्यास तत्पूर्वी एखाद्या शुभवेळी शेजाऱ्यांच्या घरी राहून नंतर प्रवासाला निघणे. ३. प्रवासाला निघायचे असेल तो दिवस अशुभ असल्यास त्यापूर्वी शुभदिवशी तांदूळ, पैसा, हळकुंड इ. वस्तूंची पुरचुंडी करून ती दुसऱ्याच्या घरी ठेवणे. (प्रवासाला जाताना ही पुरचुंडी बरोबर घेतली जाते.) ४. प्रवासाला निघणे. ५. आगमनाचे चिन्ह; ठाणे : 'निद्रालस्याचें नये प्रस्थान। तैसें करावें प्राणधारण।'- एभा १८.२४८. ६. (ल.) मरणे. (क्रि. गुंडाळणे, अटपणे, बांधणे, नदीवर चालणे.). ७. (देवपूजेची उपकरणे, दुकानातील वस्तू, धंद्याची हत्यारे, लेखनाचे साहित्य इ. वस्तू) पसरलेल्या, मांडलेल्या असणे. ८. ईश्वरप्राप्तीचे निरनिराळे मार्ग, पद्धती (योग, सांख्य, वेदान्त इ.). ९. कोणत्याही प्रकारचा मोठेपणा व प्रमुखपणा असलेला मनुष्य; अत्यंत पराक्रमी वीर; विद्वान मनुष्य; मोहरा; प्रकरण; प्रस्थ. १०. उच्चाटन. [सं.] (वा.) ० **ठेवणे**–उतरणे; बिऱ्हाड ठेवणे.

**प्रस्थानी वऱ्हाडी** लग्नाच्या मिरवणुकीतील वरपक्षाकडील लोक.

**प्रस्थापन** न. १. स्थापना; कायम करणे; घट्ट बसवणे; खिळवणे. २. पाठवणे. [सं.]

**प्रस्थापित** वि. १. घट्ट, पक्के, कायम केलेले; स्थापलेले. २. पाठविलेला. [सं.]

**प्रस्थित** वि. प्रवासाला निघालेला; जाण्यासाठी प्रस्थान केलेला. [सं.]

**प्रस्फुट, प्रस्फुटित** वि. १. फुललेले; उमललेले; प्रफुल्लित; विकसित. २. (ल.) पसरलेले; पुष्कळ लोकांना माहीत झालेले; जाहीर झालेले. ३. स्पष्ट, सरळ झालेले; उघड झालेले. [सं.]

**प्रस्र(स्रा)व** पु. १. पाझर; प्रवाह; धार. २. मूत्र. [सं.]

**प्रहजळणे** अक्रि. (सर्पाने) रागाने फूत्कारणे; फुसफुस करणे : 'द्वाराशीं भुजंग प्रहजळे अंगीं। जीव त्या प्रसंगीं केवीं राहे।'- ब ६२.[सं. प्रज्वल्]

**प्रहर** पु. सबंध दिवसाचा आठवा भाग; तीन तासांचा कालावधी. [सं.] (वा.) ० **दिवस येणे** – पापाचा घडा भरणे.

**प्रहरणे** उक्रि. १. आदळणे : 'भीडि भीडि म्हणौनि (पाउ) प्रहरिली।'- लीचपू १९८. २. पिटणे; हाकणे : 'मग रथूं प्रहरविला। सारथिआं करवी।'- शिव ९७८. [सं. प्रहार]

**प्रहर्षण** पु. एक अर्थालंकार. जेथे प्रयत्न केल्यावाचून कार्य सिद्ध होणे किंवा इच्छितार्थापेक्षा अधिक अर्थाचा लाभ होणे इ. चे वर्णन केले असते, तेथे हा अलंकार होतो. [सं.]

**प्रहर्षिणी** स्त्री. एक वृत्त. १३ अक्षरे व म,न,ज,र,ग हे गण असणारे.

**प्रहसन** न. १. एक हास्यप्रधान रूपक; फार्स. याच्या संविधानकात व्याजोक्ती व एखाद्या गोष्टीचा उपहास केलेला असतो. २. मोठा हशा.

**प्रहात** पु. सोंड : 'आसुडी गजाचे प्रहात। पाय देउनी उपडी दांत।'– उषा १५८३.

**प्रहार** पु. १. आघात; तडाखा; रट्टा. २. कठोर शब्दांनी मारलेला टोमणा.

**प्रहारणे** सक्रि. १. मारणे; ठोकणे; घाव घालणे. २. (हत्यार) चालविणे.

**प्रहास** पु. १. मोठा हशा. २. रंगेलपणा; चैनबाजी. ३. उपहास; थट्टामस्करी. [सं.]

**प्रहेणक** न. वाण; पाहुणकी; सासुरवाडीहून जावयासाठी आलेला खाऊ.

**प्रहेलिका** स्त्री. उखाणा; कोडे; कूटप्रश्न. [सं.]

**प्रह्वाण** न. तारू; नाव : 'वेसन– सागरिचें प्रह्वाण बुडालें। पांडवांचें।'– उगी ११५. [सं. प्रवाहन]

**प्रळय–यो, प्रळयकाळ, प्रळयवीज, प्रळयसौदामिनी** पहा : **प्रलय**

**प्रक्षाल(ळ)णे** सक्रि. (वस्त्र, भांडे इ.) धुणे. [सं. प्रक्षालन]

**प्रक्षालन** न. १. धुणे. २. धातुकाचा चुरा पाण्याच्या प्रवाहाने धुतला जावून मातीच्या अशुद्धीतील हलके कण वाहून जावून जड कण तळाशी जमा होण्याची क्रिया. [सं.]

**प्रक्षालित** वि. धुतलेले. [सं.]

**प्रक्षिप्त, प्रक्षेप** वि. १. फेकलेला; सोडलेला; टाकलेला. २. पूर्वीच्या ग्रंथात मागाहून घातलेला (वाक्य, श्लोक, शब्द इ.). [सं.]

**प्रक्षिप्तआकाशीचारी** न. (नृत्य.) उजवा पाय कुंचित करून वर उचलणे व दुसऱ्या पायाच्या डाव्या बाजूस अंचित करून असा टाकणे की पोटऱ्यांचे स्वस्तिक होईल. [सं.]

**प्रक्षुब्ध** वि. खवळलेला; चिडलेला; रागावलेला; संतापलेला. [सं.]

**प्रक्षेप** पु. १. फेकणे; टाकणे; उडवणे. २. घुसडून देणे. ३. घुसडून दिलेला भाग. [सं.]

**प्रक्षेपण** न. १. फेकणे; टाकणे. २. निश्चित करणे; ठरवणे; नक्की करणे. ३. सूर्य, अग्नी यांच्यापासून उष्णतासंक्रमणाची पद्धत. ४. आकाशवाणी, दूरदर्शनवरून कार्यक्रम प्रसारित करणे. [सं.]

**प्रक्षेपणे** सक्रि. टाकणे; सोडणे; फेकणे; प्रक्षिप्त करणे.

**प्रक्षेपी** पु. पडद्यावर फोटोचा आकार मोठा करून दाखवण्यासाठी वापरण्यात येणारे साधन; (इं.) प्रोजेक्टर.

**प्रक्षोभ** पु. खळबळ. [सं.]

**प्रज्ञा** स्त्री. १. विचारशक्ती, आकलनशक्ती; ज्ञान; शहाणपण. २. बुद्धी; अक्कल. ३. (बौद्धतत्त्व) दु:खमुक्त होण्याच्या मार्गातील अंतिम टप्पा. म्हणजेच गौतम बुद्धांचे तत्त्वज्ञान आत्मसात करणे.

**प्रज्ञात, प्रज्ञावान** वि. शहाणा; हुशार; बुद्धिवान; धूर्त; तरतरीत. [सं.]

**प्रज्ञान** न. (तत्त्व) प्राणी ज्या योगाने पाहतो, ऐकतो, स्वाद-रस-स्पर्श अनुभवतो ते जाणिवेचे व्यापार.

**प्राकट्य** न. प्रसिद्धी; जाहीर करणे; प्रकटपणा. [सं.]

**प्राकर्णिक** वि. प्रस्तुत; चालू विषयासंबंधी; प्रकरणविषयक. [सं.]

**प्राकल** न. कोशिकेचा सजीव भाग. यात कोशिकाद्रव्य, केंद्रक व पापुद्रा यांचा समावेश असतो.

**प्राकाम्य** न. अष्टमहासिद्धींपैकी एक.

**प्राकार** पु. कुंपण; वई; तट; कोट; पोवळी; आवार. [सं.]

**प्राकाश्य** न. अष्टमहासिद्धींपैकी एक. [सं.]

**प्राकृत** वि. १. सामान्यत: नेहमीच्या प्रचारातला; साधा; नेहमीचा. २. प्रकृतीपासून (मायेपासून) उत्पन्न झालेले. ३. मूळचा; स्वभावसिद्ध; स्वाभाविक; नैसर्गिक; अकृत्रिम. ४. निरक्षर; अशिक्षित; अडाणी; अज्ञानी. ५. क्षुल्लक; हलके; क्षुद्र; कनिष्ठ : 'उत्तम मध्यमप्राकृतमेळ। वंदी, परी छळ करूं नेणें।'- एभा १०.२१३. ६. सामान्य मनुष्यासारखा देहधारी; शरीरयुक्त : 'तैसा मनुष्य लोकाआंतु। तो जरी जाहला प्राकृतु।'- ज्ञा १०.७९. ७. संस्कृत भाषेपासून झालेली किंवा संस्कार पावण्यापूर्वी स्वाभाविक जनांची भाषा; जनभाषा. ८. प्रकट. ९. प्रापंचिक; संसारातील : 'पां प्राकृताही अमृतपाना। ना न म्हणवे जी।'- माज्ञा १०.१९१. (वा.) **० बोलणे, प्राकृतावर येणे–** असभ्यपणाची भाषा बोलणे; शिवीगाळीवर येणे. [सं.]

**प्राकृततारा** पु. (नृत्य.) स्वाभाविक स्थितीत असलेले बुबूळ.

**प्राकृतिक** वि. १. प्रकृतीसंबंधी; प्रकृतीविषयक. २. स्वाभाविक; नैसर्गिक; अकृत्रिम. ३. सामान्य; साधा; प्रचारातील; रूढीतील.

**प्राकृतिक कुल** (व. शा.) नैसर्गिक समान गुणधर्म असलेले प्रकार/वर्ग.

**प्राकृतिक घटक** निसर्गाचे मुख्य घटक (उदा. जमीन, सागर, नद्या इ.).

**प्राकृतिक भूगोल** भूपृष्ठ, हवामान, जमीन, सागर, वनस्पती, प्राणी इ. निसर्गाच्या घटकांचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास करणारी विद्याशाखा.

**प्राकृत्या** वि. सामान्य विद्यार्थी; संस्कृत येत नसल्याने मराठी ग्रंथ वाचणारा.

**प्राक्** क्रिवि. १. पूर्वी; अगोदर; पूर्वकाळी; पूर्वस्थली. २. पूर्व दिशेकडे. [सं.]

**प्राक्कपाल** न. पूर्व गोलार्ध. [सं.]

**प्राक्कलन** न. प्राथमिक अंदाज.

**प्राक्तन** वि. १. अगोदरचा; पूर्वीचा; प्राचीन काळचा. २. पूर्वजन्मीचे. [सं.]

**प्राक्संबंध** पु. पूर्वी केलेले पापपुण्य व हल्लीचे बरेवाईट भोक्तृत्व यामधील संबंध. [सं.]

**प्राक्स्वस्तिक** न. क्षितिजाचा पूर्वबिंदू. [सं.]

**प्रागतिक** वि. ज्याची प्रगती होत आहे असा. (समाज, देश इ.) [सं.]

**प्रागभाव** पु. (न्याय.) वस्तू उत्पन्न व्हावयाच्या अगोदरचा अभाव. पहा : **अभाव**

**प्रागल्भ्य** न. १. प्रौढपणा; पूर्णावस्था; मोठेपणा; पूर्णता. २. शहाणपणा; समंजसपणा; चातुर्य (वक्तृत्व, वागणूक इ.चे). ३. हिंमत; धिटाई, धैर्य; पाणीदारपणा.

**प्रागैतिहास** पु. इतिहास लिहिण्यास प्रारंभ करण्यापूर्वीचा काल.

**प्रागुदायांश** पु. जीवनात स्थिरता यावी म्हणून अल्पवयीन व्यक्तीला, किंवा विशिष्ट गरज भागवण्यासाठी दिलेली देणगी किंवा भांडवल.

**प्राङ्न्याय** पु. एखाद्या खटल्यात एखाद्या मुद्द्यावर पक्षकारांमध्ये चर्चा होऊन न्यायालयात निर्णय मिळण्याची शक्यता असेल, तर तोच मुद्दा दुसऱ्या खटल्यात उपस्थित करता येत नाही, असे मान्य केलेले तत्त्व.

**प्राङ्मुख** वि. १. पूर्व दिशेकडे तोंड असलेला. २. (पराङ्मुखबद्दल चुकीने) विन्मुख : 'कीं मीं कृपिणें प्राङ्मुखें। होउनि वंचिजे तुज।'- ऋ ५०. [सं.]

**प्राचार्य** पु. १. महाविद्यालयाचे प्रशासन करणारा मुख्य प्राध्यापक. २. प्रधान आचार्य इ. [सं.]

**प्राची** स्त्री. पूर्व दिशा.

**प्राचीन** न. दैव; प्रारब्ध; पूर्वकर्म : 'आणि मातलिया इंद्रियाचे वेग। कां प्राचीनें खवळले रोग।'- ज्ञा १६.१९२.
वि. १. पूर्व दिशेकडील. २. पूर्वीचा; अगोदरचा; गतकाळचा; पुरातन; जुना. [सं.]

**प्राचीनावीति–ती** स्त्री. उजव्या खांद्यावर टेकलेले व डाव्या कुशीवर लोंबणारे असे जानवे असलेली स्थिती.
वि. वरीलप्रमाणे जानवे धारण करणारा. [सं.]

**प्राचुर्य** न. विपुलता; पुष्कळपणा; बाहुल्य; समृद्धता. [सं. प्राचुर्य]

**प्राच्य** वि. पूर्व दिशेने; पूर्व दिशेसंबंधी. [सं.]

**प्राजक** वि. प्रजासत्ताक. [सं. प्रजा]

**प्राजापत्य** न. १. एक प्रकारचे प्रायश्चित्त. २. एक विशिष्ट यज्ञ, होम. ३. पापाचे परिमार्जन व्हावे म्हणून ब्राह्मणाला दिलेले गायीचे. ४. (भिक्षुकी) (सांकेतिक) चार ही संख्या.
पु. विवाहाच्या आठ प्रकारांपैकी एक.
वि. प्रजापतीसंबंधी. [सं.]

**प्राण** पु. १. देहातील प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पाच वायू. २. शरीरातील पाच वायुंपैकी पहिला; हृदयातील वायू. ३. एक बेचव, रंगहीन व वासरहित, हवेपेक्षा किंचित जड असणारा वायू. सर्व प्राण्यांना आवश्यक असणारा वायू. ४. श्वास; फुफ्फुसात घेतलेली किंवा सोडलेली हवा; उच्छ्वास. ५. वायू; वारा. ६. जीव. ७. (ल.) अत्यंत प्रिय वस्तू. ८. (संगीत) तालाला लागणारी आवश्यक आणि महत्त्वाची गोष्ट. हे दहा प्राण आहेत. [सं.] (वा.) **०असणे–** अत्यंत प्रिय असणे. **०उरणे–** केवळ जगणे; कसेतरी जगणे. **०ओकणे–** १. अत्यंत दु:ख करणे. २. एखाद्या गोष्टीचा अतिशय छंद असणे. **०ओवाळून टाकणे–** सर्वस्व अर्पण करणे. **०काढून ठेवणे–** परोपरीने विनविणे; हट्ट घेणे. **०खाणे–** अतिशय त्रास देणे; त्रासून सोडणे. **०ठेवणे –** एखाद्या गोष्टीवर अंत:करणपूर्वक प्रेम करणे. **०डोळ्यात उतरणे–** प्राण जाण्याचा प्रसंग येऊन ठेपणे. **०पिकणे–** सर्वस्व अर्पण करणे. **०फुटणे–** अतिशय उत्कंठा असणे; तीव्र इच्छा होणे. **०वाहणे–** एखाद्यासाठी सर्वस्व अर्पण करणे. **०सोसणे–** १. तहानेने व्याकूळ होणे; तहानेने जीव कासावीस होणे. २. एखाद्या गोष्टीचा ध्यास, रुखरुख लागणे; एखाद्या गोष्टीची तीव्र इच्छा धरणे. **०सोडणे–** प्राण देणे;

मरणे. **प्राणाशी जाणे–** (आकस्मिक घाला आल्यामुळे) प्राणास मुकणे. **प्राणे उत्तीर्ण होणे–** मरणे. **उघड्या डोळ्यांनी प्राण न जाणे –** आपल्या डोळ्यासमोर एखादा अन्याय होत असता स्वस्थ न बसवणे.

**प्राणघातक–की** वि. जीवनाचा नाश करणारा; जिवावर बेतणारा; जीव धोक्यात आणणारा; प्राणघेणा.

**प्राणघेणा--खाऊ** वि. १. प्राणघातक; त्रासदायक. २. (ल.) अतिशय लोचट (भिकारी इ.); अतिशय कष्टप्रद (काम इ.)

**प्राणघोष** पु. (कान बंद केले असता) कानात होणारा मोठा आवाज.

**प्राणजय** पु. वायूचा निरोध : 'तैसी प्राणजयें कर्मेंद्रियां। कुंठे गति।'– माज्ञा १६.१८३.

**प्राणजीवन** न. १. जीवनाचा आधार. २. चरितार्थाचे साधन. ३. पती. ४. प्रियकर; जार.

**प्राणतिया** स्त्री. मातीचे उथळ पात्र; परात; थाळी; परळ.

**प्राणत्याग** पु. प्राण सोडणे; मरणे; प्राणाचे बलिदान करणे.

**प्राणदान** न. एखाद्याला जिवावरच्या संकटातून सोडवणे.

**प्राणद्यूत** न. (ल.) भयंकर किंवा कजाखीची लढाई.

**प्राणधर्म** पु. भूक व तहान.

**प्राणधारण–णा** न. स्त्री. १. जिवंत राहणे; जगणे. २. (योग.) श्वासाचा निरोध करणे. ३. जीवन.

**प्राणन** न. जीवन : 'प्राण्यांचें प्राणन फार दिवस चालणें नाहीं.'– विवि ८.१.४६.

**प्राणनाथ** पु. पती; नवरा.

**प्राणपूजा** स्त्री. (ल.) भोजन; जेवण.

**प्राणप्रतिष्ठा** स्त्री. १. दक्षिणाचार विधीच्या प्रसंगी मंत्रादिकांनी धातू, काष्ठ, पाषाण इत्यादिकांच्या देवतेच्या मूर्तीत प्राणांची स्थापना करण्याचा विधी. २. स्थापना.

**प्राणमय** वि. पंचप्राणयुक्त; सजीव.

**प्राणमय कोश** आत्म्याच्या पंचकोशांपैकी दुसरा कोश.

**प्राणमित्र** पु. १. नवरा; पती. २. मित्र. ३. जार. पहा : **प्राणजीवन.**

**प्राणयात्रा** स्त्री. चरितार्थ; उपजीविका.

**प्राणलिंग** न. गळ्यात असलेले शिव (महादेवाचे) लिंग.

**प्राणविसावा** पु. १. अत्यंत आवडता मनुष्य. २. प्राणांचे विश्रांतिस्थान.

**प्राणसंकट–संदेह** पु. प्राणघातक, दारुण संकट; जीवावर बेतणारे संकट.

**प्राणहानी** स्त्री. अनेकांचे प्राण जाणे (लढाई, नैसर्गिक आपत्ती इ. मध्ये).

**प्राणापदी** स्त्री. प्राणसंकट : 'श्रीकृष्णा सांडितां प्राणापदी जाली।'– शिव २३१.

**प्राणायाम** पु. (योग.) भू:, भुव: इ. सात व्याहृती म्हणून उजव्या नाकपुडीने श्वास आत घेणे, पुन्हा त्या सात व्याहृती म्हणून श्वास कोंडून धरणे व पुन्हा त्या व्याहृती म्हणून डाव्या नाकपुडीने श्वास बाहेर सोडणे. या तीन क्रियांना कुंभक, पूरक व रेचक असे म्हणतात; श्वासाच्या गतीचा निरोध. [सं.]

**प्राणासन** न. (योग.) उजवी मांडी मोडून व डावा पाय जमिनीवर टेकवून बसणे. उजव्या पायाची बोटे डाव्या जांघेत भरून डावा पाय डाव्या हाताच्या खांद्यावरून काढून तो पाय जमिनीवर टेकणे व हात जमिनीवर टेकणे.

**प्राणाहुति–ती** स्त्री. भोजनाच्या प्रारंभी पाच प्राणांना दिले जाणारे पाच किंवा सहा घास. [सं.]

**प्राणांतबुद्धी** स्त्री. धोक्याचा किंवा घातक सल्ला.

**प्राणांति(ती)क** न. जीविताचा शेवट; मरणकाल. वि. घातक; भयप्रद; प्राण घेणारे; अति संकटमय. [सं.]

**प्राणिचर्मपूरक** पु. मेलेल्या प्राण्यांच्या सांगाड्यात पेंढा भरून व शिवून खऱ्या प्राण्याचा देखावा निर्माण करणारा.

**प्राणिज** वि. प्राण्यापासून उत्पन्न झालेले. [सं.]

**प्राणिद** न. कोणतेही मूलद्रव्य आणि प्राण यांचा संयोग होऊन मिळालेले रसायन.

**प्राणिदीकरण** न. ज्वलनास शास्त्रीय भाषेत असलेली संज्ञा.

**प्राणिद्यूत** न. कोंबडे, एडके, बैल इ. च्या झुंजीवर खेळावयाचा जुगार.

**प्राणिशास्त्र** न. प्राण्यांच्या जीवनाचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास करणारे शास्त्र; जीवशास्त्र; जीवविज्ञान; प्राण्यासंबंधीचे शास्त्र; (इं.) झुऑलॉजी.

**प्राणिसंग्रहालय** न. प्राण्यांची माहिती व्हावी म्हणून विविध प्रकारचे प्राणी एकत्र ठेवलेली बाग.

**प्राणी** पु. १. कोणताही सजीव घटक; जीव. २. गाय, बैल, म्हैस, वाघ इ. ३. जखमेतील बारीक बारीक कृमी, जंतू. ४. (ल.) अद्वितीय, अलौकिक पुरुष.

**प्राणेश, प्राणेश्वर** पु. १. पती; नवरा. २. जार; उपपती; प्रियकर. ३. प्रभू; स्वामी; मालक.

**प्राणेश्वरी** स्त्री. १. प्रकृती : 'जो प्रियूचि प्राणेश्वरी। उलथे आवडीचिये सरोभरीं।'– अमृ १.२. २. बायको; पत्नी.

**प्राणोत्क्रमण** न. प्राण निघून जाणे; मरण; मृत्यू. [सं.]

**प्राणोपासना** स्त्री. उपासनेचा एक प्रकार. [सं.]

**प्रातराश** पु. सकाळचा फराळ किंवा जेवण; न्याहारी. [सं.]

**प्रातर्विधी** पु. शौच, मुखमार्जन, स्नान इ. सकाळी आटोपण्याच्या गोष्टी. [सं.]

**प्रातिकूल्य** न. १. प्रतिकूलता; विरोध; वैरभाव. २. आवश्यक सामग्रीची उणीव. [सं.]

**प्रातिनिधिक** वि. संबंधित सर्व जाती, वर्गांचा बोध करून देणारा. [सं.]

**प्रातिभासिक** वि. वास्तविक नसता भ्रमामुळे तसे दिसणारे; समरूप; सारखे दिसणारे. [सं.]

**प्रातिलोम्य** वि. प्रतिलोमपणा; विरुद्धपणा; उलटा क्रम. [सं. प्रतिलोम]

**प्रात:काळ** पु. दिवसाच्या पाच भागांपैकी पहिला भाग; पहाटेच्या दोन घटकांपासून सहा घटकांपर्यंतचा काळ; पहाट. [सं. प्रात:काल]

**प्रात्यंतिक** वि. १. अनुभवाने ओळखीचा किंवा माहिती असलेला. २. विश्वास ठेवणारा; भरवसा ठेवणारा. [सं.]

**प्रात्यक्षिक** न. १. प्रयोग. २. प्रत्यक्ष कृती, प्रयोग करणे.

**प्रात्याहिक** वि. दैनिक; दररोजचे : 'आमच्या मुंबईच्या प्रात्याहिक पत्रांतील

असल्या खटल्यांच्या बातम्या वाचाव्या.'– आगर ३.१०६. [सं.]

**प्राथमिक** वि. १. पहिले; आधीचे; सुरुवातीचे; आरंभीचे. २. प्रथमावस्थेतील. ३. मूलभूत (गरजा इ.).

**प्राथमिक भक्षक** निसर्गातील अन्न–उत्पादक अशा हिरव्या वनस्पतींवर उपजीविका करणारे प्राणी.

**प्राथमिक शिक्षण** स्थूलमानाने १ ते ४ किंवा ५ इयत्तांपर्यंतचे शिक्षण.

**प्राथमिक क्षेत्र** आर्थिक व्यवस्थेतील शेती, जंगल, मत्स्यव्यवसाय, खनिज–उत्पादन यांच्याशी संबंधित असलेले क्षेत्र.

**प्राथमिका** स्त्री. तर्जनी; हाताचे, अंगठ्याजवळचे बोट. [सं.]

**प्रादक्षिण्य** न. (ब्राह्मण, देवीची मूर्ती इ.स) उजव्या बाजूने फेरी घालणे. (विरू.) प्रदक्षिणा.

**प्रादुर्भाव** पु. १. दिसणे; दृग्गोचर होणे; दृष्टोत्पत्तीस येणे. २. अस्तित्वात येणे; उत्पन्न होणे. ३. उत्पत्ती; जन्म. ४. आरंभ; सुरुवात. ५. अवतार : 'नोहे तयाचा प्रादुर्भावो। तो साभिलाष भिल्लांचा गावो।'– ज्ञा १८.६७४.

**प्रादुर्भूत** वि. दृग्गोचर झालेला; दृष्टोत्पत्तीस आलेला; उत्पन्न झालेला; पसरलेला. [सं.]

**प्रादुषक** न. ज्याच्यामुळे हवेच्या स्थिर प्रमाणातील घटकांत बिघाड प्रदुषण होतो (उदा. धूर, धुरके, कणयुक्त घटक) अशा गोष्टी.

**प्रादेश** पु. अंगठा व त्याच्या जवळील बोट यांच्या टोकांतील महत्तम अंतर; ही दोन बोटे एकमेकांपासून दूर धरली असता त्यामधील अंतर; टीच. [सं.]

**प्रादेशिक** वि. विशिष्ट प्रांताशी संबंधित. [सं.]

**प्राधान्य** न. १. मुख्यत्व; वर्चस्व; श्रेष्ठत्व. २. वैपुल्य; अधिकपणा. [सं.]

**प्राधिकरण** न. अधिकारप्राप्त सभा; अधिकार सोपवलेली संस्था; मुखत्यारीने अधिकार दिलेली संस्था.

**प्राधिकार** पु. कायद्याने दिलेली मुखत्यारी, (इं.) ऑथॉरिटी.

**प्राधिग्रहण** न. सार्वजनिक उपयोगासाठी खाजगी मालमत्ता सरकारने ताब्यात घेणे.

**प्राधिलेख** पु. एखाद्या व्यक्तीला विशिष्ट गोष्ट करण्याचा किंवा न करण्याचा न्यायालयाने दिलेला लेखादेश.

**प्राध्यापक** पु. महाविद्यालयात / विश्वविद्यालयात शिकवणारा शिक्षक.

**प्रापक** वि. देणारा; पोचविणारा; मिळवून देणारा.
पु. दिवाळखोरीचा अर्ज करणाऱ्याच्या मालमत्तेची कायदेशीर व्यवस्था करण्यासाठी सरकारने नियुक्त केलेला अधिकारी. [सं.]

**प्रापण** न. १. देणे; प्राप्त करून देणे; पोचवणे; नेणे. २. (रसा.) उष्णतेच्या स्थलांतरापैकी एक पद्धत. यात उष्णता उष्ण झालेल्या द्रव्याच्या परमाणूंच्या गतीने पसरते. (इं.) कन्व्हेक्शन. ३. (समुद्राखाली) गेलेली जमीन परत मिळवणे.

**प्रापंचिक** वि. १. प्रपंचविषयक; ऐहिक; सांसारिक. २. कुटुंबवत्सल; संसारी. [सं.]

**प्राप्त** वि. १. मिळवलेले; संपादन केलेले; संपादित. २. पोहोचलेले; आलेले; येऊन दाखल झालेले. ३. येऊन ठेपलेले; उद्भवलेले; भोगाला आलेले. ४. जरूर; आवश्यक. ५. पूर्ण अवस्थेला पोहोचलेला : 'तैसी प्राप्तेंही पुरुषें। इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें।'– ज्ञा २.३५०. ६. (ल.) सिद्धी पावलेला; कृतार्थ. ७. बळकट. [सं.]

**प्राप्त** स्त्री. नफा; फायदा; मिळकत; प्राप्ती. [सं. प्राप्ति]

**प्राप्तकाल, प्राप्तावसर** वि. समयोचित; प्रसंगोचित; कालानुरूप. [सं.]

**प्राप्तव्य** न. ध्येय; अंतिम हेतू; साध्य.
वि. मिळवण्यास योग्य; शक्य; मिळवण्याजोग. [सं.]

**प्राप्तव्यवहार** वि. बालपण जाऊन वयात आलेला. पहा : **व्यवहारज्ञ**

**प्राप्तार्थ** न. कृतार्थ; कृतकृत्य : 'देखें प्राप्तार्थ जाहले। जे निष्कामता पावले।'– ज्ञा ३.१५५.

**प्राप्ति–प्ती** स्त्री. १. मिळकत; लाभ; फायदा; नफा. २. सिद्धी; सफलता. ३. येणे; उद्भवणे; प्राप्त होणे; भोगास येणे (सुख, दुःख इ.). ४. अष्टमहासिद्धींपैकी एक. सर्व प्राण्यांच्या इंद्रियांशी त्या त्या इंद्रियाच्या अधिष्ठात्री देवतांच्या रूपाने संबंध घडणे. ५. प्राज्ञा; सामर्थ्य; छाती; हिंमत; किंमत; बिशात; प्रतिष्ठा; लाग; पाड. ६. अंमल; प्रभाव.

**प्राप्तिकर** वि. प्राप्ती करून देणारा; लाभकारक. [सं.]

**प्राप्तिकर** पु. प्राप्तीवरील कर; कामधंदा, नोकरी अगर इतर मार्गाने येणाऱ्या वार्षिक उत्पन्नावर मध्यवर्ती सरकारने लावलेला कर; आयकर.

**प्राप्तिपुरुष** पु. ज्यास भगवत्स्वरुपाचा साक्षात्कार झाला आहे असा साधुपुरूष.

**प्राप्य** वि. मिळविण्यास योग्य, लायक, पात्र, शक्य; संपादनीय.
न. फल; साध्य : 'या यज्ञक्रिया तरी आनानीं। परीं प्राप्य तें एक।'– ज्ञा ४.१४०. [सं.]

**प्राबल्य** न. प्रबलता; प्रबलपणा; सामर्थ्य; वर्चस्व; बडेजाव. [सं.]

**प्रामाणिक** वि. १. खरा; सच्चा; इमानी; सत्त्वनिष्ठ; विश्वासू. २. सप्रमाण; आधारयुक्त. ३. ग्रंथाशिवाय म्हणजे आधाराशिवाय न बोलणारा. [सं.] शअ. प्रमाणे : 'स्वल्प होते तंदुल कणिक। वरकड त्या प्रामाणिक।'– गुच (पाठभेद) ३८.११.

**प्रामाण्य** न. १. सप्रमाणता; सत्य; न्यायीपणा. वस्तुस्थितीदर्शकत्व. २. खरेपणा; सत्यता; विश्वसनीयता; प्रांजलपणा. ३. आधार; पुरावा; प्रमाण. [सं.]

**प्रामादिक** वि. चुकीचे; दोषयुक्त; चुकांनी व्याप्त. [सं.]

**प्राय** वि. १. (समासात) सारखा; तुल्य; सम; सदृश; प्रमाणे. जसे :– वज्रप्राय, विषप्राय, गतप्राय इ. २. बहुतांशाने युक्त असलेले; विपुल.

**प्रायवंत** वि. म्हातारा.–ख्रिपु. (को.)

**प्रायश्चित्त** न. १. पापाच्या निराकरणार्थ करण्याचे यज्ञ; उपवास, तप, दान इ. विधी; पापक्षालनार्थ केलेले कर्म; दंड; परिमार्जन; शुद्धी. २. सर्व दोषांचे व चुकांचे निरसन करण्यासाठी यज्ञाच्या शेवटी केलेला होम. ३. येशू ख्रिस्ताने मरणदंड भोगून देव व मनुष्याचा घडवून आणलेला समेट. (इं.) अॅटोनमेंट. [सं.]

**प्रायश्चित्ती** वि. प्रायश्चित्त घेणारा; प्रायश्चित्तास योग्य; पापक्षालन करणारा. [सं.]

**प्रायिक** वि. १. सामान्य; सर्वसाधारण; बहुतकरून; बहुधा असणारा. २. (चुकीने) विरळा; क्वचित आढळणारा. ३. अर्धवट; अस्पष्ट. [सं.]

**प्रायोगिक** वि. १. अनुभव घेण्यासाठी केलेले; समजून घेण्यासाठी केलेले. २. प्रत्यक्ष कृतीत आणलेले.

**प्रायोजक** पु. उपक्रम, कार्यक्रम, सभा इ. ला आर्थिक साहाय्य देऊन आयोजन करणारा.

**प्रायोपविष्ट** वि. प्रायोपवेशन करणारा. [सं.]

**प्रायोपवेशन** न. काहीच अन्नग्रहण न करता एकासनी बसून मरणाची वाट पाहणे. परिमार्जनाचा किंवा धार्मिक पुण्यप्राप्तीचा एक मार्ग. [सं.]

**प्रायः, प्रायशः** क्रिवि. १. बहुतकरून; बहुधा; बहुतांशी; सामान्यपणे; साधारणतः २. बहुतेक; विशेषकरून. [सं.]

**प्रारण** न. विद्युतचुंबकीय तरंगांच्या स्वरूपात व द्रवमाध्यमाशिवाय होणारे उष्णतेचे स्थानांतरण किंवा प्रसरण.

**प्रारब्ध** न. १. बऱ्यावाईट कर्मांचे ह्या जन्मात भोगावे लागणारे फळ. संचित (पूर्वजन्मी केलेल्या कृत्यावरून ठरवलेले) आणि क्रियमाण (ह्या जन्मात केलेल्या कृत्यावरून ठरवलेले) असे प्रारब्धाचे दोन प्रमुख भेद होत. या शिवाय अनिच्छा, परेच्छा व स्वेच्छा असेही आणखी भेद मानले जातात. २. नशीब; दैव; भाग्य. ३. (ल.) कपाळ : 'राघोबादादानें प्रारब्धावर मारलें नारायणरावास दिला ढकलून !'– गापो १००.[सं.] (वा.) ०**उघडणे** – दैव उघडणे; चांगली ग्रहदशा येणे; सुखाची प्राप्ती होणे.

**प्रारब्ध** वि. आरंभलेले; आरब्ध; सुरवात केलेले. [सं.]

**प्रारब्धगती** स्त्री. नशिबाच्या चक्राकार गतीबरोबर फिरणे; आकस्मिक गोष्ट; दैवाचा फेरा. [सं.]

**प्रारब्धवाद** पु. दैव हेच श्रेष्ठ होय असे मानणे. [सं.]

**प्रारंभ** पु. आरंभ; सुरुवात. [सं.]

**प्रारंभणे** उक्रि. आरंभणे; आरंभ, सुरुवात करणे; सुरू करणे. [सं.]

**प्रारूप** न. आराखडा; खर्डा; मसुदा.

**प्रार्थक** वि. १. याचना, विनवणी करणारा; मागणारा. २. प्रार्थना करणारा. [सं.]

**प्रार्थ(र्थि)णे** उक्रि. १. याचना करणे; याचिणे; मागणे; भिक्षा मागणे. २. विनंती, अर्ज, प्रार्थना करणे; विनविणे. ३. मिळवणे.

**प्रार्थन–ना** न.स्त्री. १. याचना; मागणे. २. विनंती; विनवणी. ३. ईश्वराशी जीवात्म्याचे संभाषण. [सं.]

**प्रार्थनास्थळ** न. सर्वांनी मिळून प्रार्थना करण्याची जागा.

**प्रार्थनीय** वि. प्रार्थना करण्यास योग्य, लायक; याचना करण्याजोगे. [सं.]

**प्रार्थित** वि. याचिलेला; विनंती केलेला. [सं.]

**प्रार्थ्य** वि. याचना करण्यायोग्य, शक्य, आवश्यक; प्रार्थना करण्याजोगा. [सं.]

**प्रावण्य** न. १. उतार; उतरण; वाकडेपणा. २. (ल.) प्रवृत्ती; कल; झोक; आसक्ती; ओढ. [सं. प्र+अवनम्]

**प्रावधान** न. पुढची तरतूद.

**प्रावरण–णी** न. पांघरण्याचे वस्त्र; पांघरूण; चादर. [सं.]

**प्राव(वा)रणे** सक्रि. (शाल वगैरे पांघरूण) अंगावर टाकणे; पांघरणे; आच्छादणे.

**प्रावस्था** स्त्री. बदल होत असताना कोणत्याही विशिष्ट काळी आढळणारी स्थिती; (इं.) फेज. [सं.]

**प्रावार** न. मृदुकाय प्राण्यांच्या शरीरावरील आवरण.

**प्रावीण्य** न. नैपुण्य; कौशल्य; शास्त्र, कला इ. मध्ये निष्णातपणा; दक्षता.

**प्रावृट–षा, प्रावृटकाल, प्रावृक्षी** पु.स्त्री.पु. पावसाळा. [सं.]

**प्रावृत्त** वि. १. आच्छादलेले; झाकलेले; गुरफटलेले. २. वेढा, गराडा घातलेले. [सं.]

**प्राशक** वि. (समासात) प्राशन करणारा; पिणारा. [सं.]

**प्राशणे** उक्रि. प्राशन करणे; पिणे; सेवन करणे; शोषणे; शोषून घेणे.

**प्राशन** न. १. पिणे; पान. २. शोषण; शोषून घेणे. ३. (ल.) नाश. [सं.]

**प्राशस्त्य** न. १. प्रशस्तपणा; ऐसपैसपणा; अघळपघळपणा; विस्तृतता. २. स्पष्टपणा; मोकळेपणा; उघडपणा (भाषण, वागणूक यांचा). ३. थोरपणा; औदार्य; उच्चपणा (भावना, मन इ.चा). ४. विपुलता; समृद्धता; पुष्कळपणा (साधन, उपाय, सामग्री इ.चा.).

**प्राश्निक** पु. ज्योतिषी.
वि. १. शकुनासंबंधी; शुभाशुभलक्षणविषयक. ३. शकुन, दृष्टांत इ. चा उलगडा करण्यात कुशल. [सं.]

**प्रास** पु. एक शब्दालंकार. [सं.]

**प्रास** पु. भाला. [सं.प्र + अस्]

**प्रासंगिक** वि. १. प्रसंगाने आलेला; प्रसंगविषयक; नैमित्तिक. २. प्रसंगानुरूप; समयोचित; विषयानुरूप. [सं.]

**प्रासाद** पु. १. राजवाडा; राजमंदिर. २. देऊळ; देवालय : 'कीं प्रासादांचेनि मीषें। आकाशा मांच बांधले जैसें।'– ऋ १६. [सं.]

**प्रासादणे** सक्रि. प्राणप्रतिष्ठा करणे; प्रतिष्ठापणे : 'हनुमानमूर्ति पुरातन निद्रिस्थ उठविली। ब्रह्मदेवें त्रेतायुगीं पुजूनि जे प्रासादिली।'– सप्र ३.३८.

**प्रासादिक** वि. १. देव, सत्पुरुष इ. पासून प्रसाद म्हणून मिळालेले (फूल, फळ इ.); थोरांच्या कृपेने मिळालेले. २. ईश्वरकृपाविशिष्ट; प्रसादयुक्त (ग्रंथ, काव्य, वैद्य, गुरू). ३. प्रेमळ. [सं.]

**प्रासूतिक** वि. बाळंतपणासंबंधी; प्रसूतिविषयक. [सं.]

**प्रास्ताविक** वि. १. समयोचित; विषयानुरूप; प्रस्तावनारूप. २. योग्यपणे सुरुवात केलेले; योग्य वेळेला उद्धृत केलेले. [सं.]

**प्रास्ताविका** स्त्री. संविधानाचे उद्देश थोडक्यात स्पष्ट करणारे निवेदन; उद्देश्यपत्रिका; (इं.) प्रिॲम्बल.

**प्रास्थानिक** न. पहा : **प्रस्थान**
वि. प्रस्थानासंबंधी; गमनविषयक (मुहूर्त, साहित्य इ.).

**प्राज्ञ** न. सुषुप्ती अवस्थेचा अभिमानी जीव.
वि. शहाणा; हुशार; विद्वान; बुद्धिमान. [सं.]

**प्राज्ञा** स्त्री. १. तीव्र बुद्धिमत्ता; ज्ञान; धूर्तपणा. २. योग्यता; महत्त्व; पर्वा; किंमत; सामर्थ्य; मगदूर; लायकी; मातब्बरी; धैर्य; शक्ती; वकूब; प्रभाव; बिशाद. [सं.]

**प्रॉटेस्टंट** पु. अव. मार्टिन ल्यूथरचे अनुयायी. ख्रिश्चन धर्मातील सुधारणावादी लोक. [सं.]

**प्रांजल-ळ** वि. १. स्पष्ट; सहज कळण्यासारखा (उच्चार, बोलणे इ.). २. स्वच्छ; सुवाच्य; सुगम (लेखन). ३. निर्मळ; निष्पाप; निष्कपट; शुद्ध (अंतःकरण). ४. स्पष्ट; उघड; सचोटीचे (भाषण). ५. स्वच्छ; शुद्ध; घाण नसलेले (पाणी, जागा). ६. प्रामाणिक; सरळ; सच्चा (माणूस इ.). ७. सोपे; सुलभ; सरळ : 'जो परिणामींचा निर्वाळा। अचुंबितु ये फळां। आणि अनुष्ठिता प्रांजळा। सावियाचि।'-ज्ञा ५.७. ८. अनुकूल; स्वाधीन.

**प्रांत** पु. १. देशाचा मोठा भाग; इलाखा इ. प्रदेश. पहा : **देश**. २. भाषा, चालीरीती, हवापाणी इ. बाबतीवरून होणारा देशाचा विभाग. ३. स्थल; जागा; स्थान. ४. शेवट; अंत; अखेरची स्थिति. 'कीं रामकथेचा प्रांत। वाल्मीकमुनी जाणतसे।'- रावि ८.५. ५. कड; काठ; हद्द; सीमा; मर्यादा; शीव : 'परी तो संवचोराचा सांगातु। जैसा नावेक स्वस्थु। जंव नगराचा प्रांतु। सोडिजेना।'- ज्ञा ३.२११. ६. शेवटचा, टोकाचा भाग; अग्र. ७. जिल्ह्यातील तीन-चार तालुके मिळून मुलकी कामासाठी केलेला जिल्ह्याचा पोटविभाग. ८. जिल्ह्याच्या वरील पोटविभागाचा अधिकारी; (इं.) डिस्ट्रीक्ट डेप्युटी कलेक्टर. ९. मुक्काम. १०. समूह; थवा; समुदाय : 'प्रांत तेथ फिरती अबलांचे।'- आशा बरी ५. ११. वेळ; समय. १२. भाग. १३. हस्तगत केलेला टापू, प्रदेश. १४. परिणाम. [सं.]

**प्रांतसाहेब** पु. जिल्हाधिकाऱ्याच्या (कलेक्टरच्या) हाताखालील अधिकारी. पहा : **प्रांत ८**

**प्रांतहीन** वि. अमर्याद; अपार; अनंत : 'कीं विवेकामृतसागरु। प्रांतहीनु।'- ज्ञा २.३७४.

**प्रांतिक** वि. प्रांतातील; प्रांतासंबंधी.

**प्रांती** स्त्री. शेवट; समाप्ती.

**प्रांतीची** स्त्री. पश्चिम दिशा. [सं. प्रतीची]

**प्रांतु-त्** पु. मार्ग; वाट : 'जेआंचां आम्हीं नेणौ प्रांतु। ब्रह्मा भणें।'- दाव ४४१.

**प्रिझम** पु. ज्यातून प्रकाशकिरण प्रवर्तित झाले असता पडद्यावर सात रंग दिसतात, अशा त्रिकोणाकृती काचेचा घन.

**प्रिय** पु. १. पती; नवरा. २. जार; ३. प्रियकर.
वि. आवडते; प्रेमाचे; सुखकर. [सं.]

**प्रियकर** पु. १. पती; नवरा; कांत. २. जार.३. प्रेमपात्र. [सं.]

**प्रियतम** न. (नाट्य.) पहा : **प्रिय**
पु. १. पती; नवरा. २. प्रियकर; नायक. ३. जार.
वि. अत्यंत प्रिय. [सं.]

**प्रियतमा** स्त्री. १. घरधनीण; गृहिणी. २. जारिणी; प्रेमपात्र; नायिका.[सं.]

**प्रियवंत** पु. प्रियकर.

**प्रियंकर** वि. प्रेमास चालना देणारे; आदरास उत्तेजन देणारे. [सं.]

**प्रियंगु** पु. राळा (धान्य). [सं.]

**प्रियंवदा** स्त्री. १. एक वृत्त. १२ अक्षरे, न भ ज र ह्या गणांनी युक्त असणारे. २. चांगले, प्रिय भाषण करणारी स्त्री.

**प्रिया** स्त्री. १. गृहिणी; बायको. २. जारिणी; प्रेमपात्र. ३. नायिका.
वि. आवडती. [सं.]

**प्रियारूं** वि. प्रिय : 'तैसा मनुष्यदेहाचा आकारूं। बाहिजे दृष्टीं प्रियारूं। भीतरूं कुडा।'- ज्ञाप्र ७४९.

**प्रियेव, प्रेस** पु. किंमत. (गो.) [पोर्तु. प्रेसो]

**प्रीणन** न. संतोष; तृप्ती; खूष करणे. [सं.]

**प्रीत** स्त्री. १. प्रीती; प्रेम. २. आवड.
वि. १. आवडते; प्रिय. २. संतुष्ट; तृप्त; खूष केलेला. [सं.प्रीति]

**प्रीति-ती** स्त्री. १. प्रेम; स्नेह; माया; दया. २. मर्जी; कृपा. ३. आवड; शोक; एखाद्या गोष्टीत संतोष मानणे. ४. ज्योतिषशास्त्रातील सत्तावीस योगांपैकी दुसरा योग. पहा : **योग**. ५. (संगीत) बाराव्या श्रुतीचे नाव. ६. (रसायन.) एकमेकांशी मिसळण्याचा धर्म. [सं.]

**प्रीतिदत्त** वि. नववधू सासू-सासरे यांना प्रथम नमस्कार करते, त्यावेळी त्यांचेकडून नववधूस दिले जाणारे धन; स्त्रीधन.

**प्रीतिषडाष्टक** न. (ज्योतिष.) सिंह-मीन, तूळ-वृषभ, मकर-मिथुन, मेष-वृश्चिक व धन-कर्क ह्या जोड राशी. हे विवाहात शुभकारक आहे.

**प्रीतिश्राद्ध** न. माता-पितरांच्या नावाने केलेले एक प्रकारचे श्राद्ध.

**प्रीतिसंगम** पु. समोरासमोरून येणाऱ्या दोन नद्यांचा संगम.

**प्रीत्यर्थ** शअ. करिता; साठी; मुळे; एखाद्याच्या उद्देशाने. [सं.]

**प्रु(प्रू)फ** न. (मुद्रण.). जुळलेला मजकूर शुद्ध आहे की नाही हे तपासण्यासाठी काढलेली छापील, कच्ची प्रत; कच्चे मुद्रित. [इं.]

**प्रेत** न. १. शव; मुडदा. २. सपिंडी; उत्तर क्रिया इ. होऊन पितर होण्यापूर्वीचा मृत जीव. [सं.]

**प्रेतकर्म-कार्य-क्रिया** न. स्त्री. और्ध्वदेहिक विधी.

**प्रेतकळा-दीक्षा** स्त्री. १. मरणसमयी तोंडावर येणारा फिकटपणा. २. (ल.) भीती, आजार, फजिती इ. मुळे चेहऱ्यावर दिसणारा निस्तेजपणा.

**प्रेतज** वि. (उप.) (प्रेतापासून उत्पन्न झालेला. परशुरामाने श्राद्धासाठी प्रेतापासून उत्पन्न केला यावरून) चित्पावन किंवा कोकणस्थ ब्राह्मण. [सं.]

**प्रेतभूमी-वन** स्त्री. न. स्मशान; मसणवाट.

**प्रेतावरील पान** (ल.) अत्यंत क्षुल्लक व अत्यंत अशुभ वस्तू.

**प्रेताशौच** न. प्रेत वाहून नेल्यामुळे होणारा विटाळ. [सं.]

**प्रेत्या** पु. (तिरस्कारार्थी) और्ध्वदेहिक कर्म सांगणारा ब्राह्मण; कारटा; किरवंत.

**प्रेम** न. १. प्रीती; माया; स्नेह. २. दैवी प्रेम; प्रेमाची तदाकार अवस्था. ३. पुत्र वगैरेच्या ठिकाणी असलेली अत्यंत प्रीती; प्रीतीचा उमाळा.[सं.]

**प्रेमटांगा** वि. ज्याचे प्रेम गुंतले आहे असा : 'फुलांचिया भोगालागीं प्रेमटांगा। तें करेयाचा गुडघा। तैसें होईल।'- ज्ञा १३.५५७.

**प्रेममुद्रा** स्त्री नाथपंथीय दीक्षा : 'तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दिधली'- निगा १३५. [सं.]

**प्रेमळ** वि. १. प्रेमाने वागण्याचा स्वभाव असणारा; दयाळू. २. ईश्वरभक्ती, कथा इ. विषयी अत्यंत प्रेम असलेला. [सं.]

**प्रेमा** पु. १. प्रेम; प्रीती. २. एखाद्याविषयी वाटणारे उत्कट प्रेम. ३. प्रेमाचा

विषय; प्रिय मनुष्य.

**प्रेमागळी** वि. विशेष प्रेम असलेली : 'कैवल्यातें ओळणे भक्ति प्रेमागळी' –मूप्र ७४६ [सं.प्रेमन् + अग्र]

**प्रेमाथणे** अक्रि. प्रेमात बुडून जाणे : 'त्या जळीं तो जळदनीळ। प्रेमाथिला होत्साता।' – रास ५.६३४

**प्रेय** न. इंद्रियांना प्रिय असे ऐहिक सुख. [सं.]

**प्रेरक, प्रेरयिता** वि. १. पाठवणारा; गती देणारा. २. उत्तेजन, चेतना, स्फूर्ती, प्रेरणा देणारा; करणारा. [सं.]

**प्रेरकक्रिया** स्त्री. प्रायोजक धातू.

**प्रेरण–णा** न. स्त्री. १. पाठवणे. २. प्रवृत्त करणे; उत्तेजन; स्फूर्ती; प्रोत्साहन; उठावणी. ३. आज्ञा : ' जो परमात्मा श्रीकृष्ण। तो करी प्रेरण प्रभासे।'– एभा ३०.९९. ४. (यंत्रशास्त्र) ज्या कारणाने स्थिर पदार्थाच्या अंगी चलन उत्पन्न होते अथवा चलन पावलेल्या पदार्थाचे चलन कमी होते किंवा फिरते त्या कारणास प्रेरणा म्हणतात.

**प्रेरणे** सक्रि. १. पाठवणे. २. उद्युक्त, प्रवृत्त करणे, प्रोत्साहन देणे; मनात ठरवणे : 'इंद्रियां प्रेरितां वारिता। हे सत्ता आधीन हृदयस्था।'– एभा ११.११४७.

**प्रेरणैकीकरण** न. अनेक प्रेरणांची फलित प्रेरणा काढण्याची रीत; प्रेरणासंघात.– यंस्थि ९.

**प्रेरित** वि. १. पाठवलेला. २. उत्तेजित; उत्तेजन, प्रोत्साहन दिलेला.[सं.]

**प्रेरिता** पहा : **प्रेरक**

**प्रेष** पु. १. उत्तेजन; प्रोत्साहन; उठावणी; सुचवणे. (क्रि. करणे). २. निरोप: 'स्वामीकडे विसूभाऊंनी प्रेषही पाठविला.–' अस्तंभा ४७. ३. आज्ञा; हुकूम. ४. संधान. ५. जासूद. ६. तगादा; जाच : 'न धरितां प्रेषे कवणीं ही।'– दावि १४०. [सं. प्रेष्य]

**प्रेषक** वि. पाठवणारा. [सं.]

**प्रेषण** न. पाठवणे. [सं.]

**प्रेषणीय** वि. पाठवण्यास योग्य, लायक.

**प्रेषमंत्र** पु. (याज्ञिक) मोक्षाप्रत पाठवणारा मंत्र.

**प्रेषित** वि. १. पाठवलेला. २. कामाचा अधिकार देऊन पुढे पाठवलेला. पु. (ख्रि.) नव्या करारात ख्रिस्ताच्या प्रथम शिष्याला प्रेषित म्हटले आहे. २. धर्मोपदेशक; येशू ख्रिस्ताचे एक नाव. [सं.]

**प्रेषिती** पु. ज्याच्या नावे पत्र पाठवतात ती व्यक्ती.

**प्रेषोच्चार** पु. संन्यास घेतेवेळी केलेला प्रेषमंत्राचा उच्चार : 'भूता अभयदान पुरस्कर। संकल्पपूर्वक प्रेषोच्चार।' – एभा १८.८६.

**प्रेष्य** पु. सेवक.
वि. पाठविण्यास शक्य, आवश्यक. [सं.]

**प्रेस** पु. १. छापखाना; मुद्रणालय. २. गठ्ठा बांधण्यासाठी कापूस दाबण्याचा कारखाना. [इं.]

**प्रेक्षक** वि. १. पाहणारा; अवलोकन करणारा; विचारी. २. नाटक, तमाशा इ. पाहावयास आलेला माणूस. [सं.]

**प्रेक्षण, प्रेक्षा** न. स्त्री. १. अवलोकन; विलोकन; लक्ष्य देणे; विचार करणे. २. पाहणे. ३. (ल.) विचार; ध्यान; चिंतन. [सं.]

**प्रेक्षणीय** वि. पाहण्यासारखे; मुद्दाम जाऊन पहावे असे. [सं.]

**प्रेक्षणे** सक्रि. १. अवलोकणे; नजर टाकणे; पाहणे. २. नजर, लक्ष्य असणे.

**प्रेक्षागार–गृह** न. प्रेक्षकांना बसण्यासाठी तयार केलेली जागा.

**प्रेक्षावान–वंत** वि. १. दूरदर्शी. २. विचारी; चौकस; हुशार; कसून पाहणारा. [सं.]

**प्रेक्षित** वि. १. अवलोकित; लक्ष दिलेले; चिंतित. २. पाहिलेले. [सं.]

**प्रेंखोलित(करण)** न. (नृत्य.) पाय कुंचित करून वर करणे व पुढे–मागे हलवून खाली टाकताना अंचित करणे व त्रिक फिरवताना उडी मारणे. [सं.]

**प्रोक्त** वि. बोललेले; सांगितलेले; म्हटलेले. [सं.]

**प्रोजेक्टर** पहा : **प्रक्षेपी**

**प्रोटॉन** पु. अणूमधील धनप्रभारित कण.

**प्रोत** पु. मागावर विणण्याचे उभे सूत; ताणा : 'ओतप्रोत पटीं। तंतु जेवीं।'– ज्ञा १०.२६४. [सं.]

**प्रोत्साह** पु. उत्साह; उठावणी; आवेश; प्रबोधन. [सं.]

**प्रोत्साहक** वि. चेतना, उत्तेजन, प्रोत्साहन देणारा; उद्बोधक.

**प्रोत्सा(त्स)हन** न. उत्तेजन; चेतवणी; प्रवर्तन; चेतना. [सं.]

**प्रोथ** पु. घोड्याच्या ओठावरील भाग. – अश्वप १.६१.

**प्रोषित** वि. बाहेर गेलेला; गैरहजर; गावाला गेलेला. [सं.]

**प्रोषितभर्तृका** वि. (साहित्य.) जिचा पती गावाला, प्रवासाला गेला आहे अशी स्त्री. [सं.]

**प्रो(प्रौ)ष्ठपदी** स्त्री. भाद्रपद शुद्ध पौर्णिमा. [सं.प्रोष्ठपदी]

**प्रोक्षण** न. शिंपडणे; सिंचन करणे. [सं.]

**प्रौढ** वि. १. पूर्ण वाढलेले; परिपक्व; पूर्णावस्था प्राप्त झालेले. २. पोक्त; वयोवृद्ध; प्रगल्भ; मोठे. ३. (ल.) थोर; पूज्य; सन्माननीय. ४. मोठा; भव्य; नावलौकिकाचा (मनुष्य). ५. अलंकारिक; सुशोभित; सुरेख (शब्दरचना). ६. सभ्य; समंजस; शिष्टसंमत (चाल, रीत). ७. समर्थ. ८. धीट. [सं.]

**प्रौढणी** स्त्री. तरुण स्त्री : 'तये प्रौढणिलागि दृष्टीस नाणी।'– दावि २९२.

**प्रौढता** स्त्री. मोठेपणा; पोक्तपणा; प्रगल्भपणा.

**प्रौढप्रतापी** वि. पराक्रमी; वीर्यशाली; सामर्थ्यवान; शस्त्रास्त्रांत कुशल.

**प्रौढवर्ण** पु. अक्षरांचा उच्च वर्ण; 'ट' वर्ग व जोडाक्षरे.

**प्रौढा** स्त्री. १. तीस ते पन्नास वयोगटातील स्त्री. २. मदनावस्थेने जिची लज्जा जिंकली आहे अशी नायिका. [सं.]

**प्रौढि–ढी** स्त्री. १. प्रौढपणा; पूर्णता; प्रगल्भता. (शरीर, मन इ.ची). २. मोठेपणा; कीर्ती; थोरवी. ३. सामर्थ्य; पराक्रम; प्रगल्भता : 'तैसी सर्ववृद्धिवैभवीं। बुद्धिचि एकली बरवी। बुद्धीही बरव नवी। इंद्रियप्रौढी।'– ज्ञा १८.३४८. ४. भारदस्तपणा; प्रगल्भपणा; सुशोभितपणा. (भाषा, चालरीत इ.चा). ५. आढ्यता; अभिमान : 'परी प्रौढी न बोलें हो जी। तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं।'– ज्ञा ९.२. ६. महिमा; महत्त्व : 'मुद्रेची प्रौढी ऐशी। तेचि सांगिजेल आतां परियेसीं।'– ज्ञा ६.१९२. [सं. प्रौढि]

**प्लव** पु. १. नाव; नौका; होडी : 'सांगें प्लवेंचि काय बुडिजे। कां मार्गी

जातां आडळिजे।'– ज्ञा २.२२३. २. बेडूक : 'सापानें धरिला प्लव न जगे बडबडसि तूं जसा पानें।'– मोकर्ण २७.२. [सं]

**प्लवंग** पु. साठ संवत्सरांपैकी चाळिसावे संवत्सर. [सं.]

**प्लवं(व)ग, प्लवंगम** पु. १. वानर. २. बेडूक. [सं.]

**प्लक्ष** पु. उंबर वृक्ष : 'सरल कुटज वटवृक्ष सातवण प्लक्षदाडिमी चांफा।'– नरहरि, गंगारत्नमाला १४७. [सं.]

**प्लाझ्मा** पु. रक्तातील द्रवपदार्थ; रक्तजल.

**प्लीहा** स्त्री. १. पाणथरी (इंद्रिय व त्याचा रोग); उदरपोकळीत डाव्या बाजूला श्वासपटल व जठर यांच्या मध्ये असणारी मोठी नलिकारहित ग्रंथी. २. कौलू; गुल्म; पोटात होणारा एक रोग. [सं.प्लीहा]

**प्लुत** पु. (संगीत.) ज्याचा तीन मात्रा इतका लांब उच्चार आहे, असा आकारादी स्वर. [सं.]

**प्लुटो** पु. सूर्यमालिकेतील सर्वांत दूरचा ग्रह.

**प्लुति–ती** स्त्री. (पक्षी, बेडूक इ.नी) उडी मारीत चालणे; उडी. [सं.]

**प्लेग** पु. एक प्रकारचा साथीचा रोग; ग्रंथिज्वर. [सं.]

**प्लेना** पु. (मुद्रण.) प्रेसवर फॉर्म असताना टाईपसारखा करण्यासाठी (टाइप ठोकण्यासाठी) उपयोगात आणावयाचा लाकडाचा ठोकळा. [इं. प्लेन]

**प्लॅ(फ्ला)टफॉर्म** पु. फलाट; स्टेशनवर गाडी ज्या ठिकाणी उभी राहते ती ओट्यासारखी जागा. [इं.]

**प्लॅटिनम** न. निकेल व तांबे यांच्या खनिजातून मिळणारे, चकचकीत पांढरे गंज न चढणारे, उच्च उष्णतामानातच विरघळणारे, पसरट धातुरूप मूलद्रव्य.

**प्लॅन खपणे** मनोरंजनाच्या कार्यक्रमाच्या सर्व तिकिटांची विक्री होणे.

**प्लॅस्टर** न. १. भिंतीला करण्याचा गिलावा. २. जखमेवर लावण्याची मलमपट्टी; हाड मोडले असता ते जुळण्यासाठी बांधायची पट्टी. [इं.]

**प्लॅस्टिक** न. हवा तो आकार देता येईल असा गुणधर्म असणारा मानवनिर्मित पदार्थ. [सं.]

**प्लँचेट** न. मृत मनुष्याशी संभाषण करण्याचे यंत्र. [इं.]

**प्लॉट** पु. १. कथानक २. कटकट. ३. जमिनीचा तुकडा. [इं.]





**फ** मराठी वर्णमालेतील सदतिसावा वर्ण आणि बाविसावे व्यंजन.

**फ** स्त्री. (सांकेतिक) फजिती.

**फईल** पु. ढोंग; बतावणी. (झाडी)

**फईल** पु. पेठ; स्टेशनजवळील हमालांची वस्ती.

**फ(फं)क** न. १.कोवळे फळ; कोवळी मिरची. २. कच्चा काजू. (को.)

**फक** वि. एकाएकी, अचानक घडलेली अनाकलनीय घटना. (तंजा.)

**फककन–कर–दिनी–दिशी** क्रिवि.१. पोहे इ. कोरडे पदार्थ खाताना, गुलाल वगैरेची फकी उडवताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज करून. (क्रि.खाणे, टाकणे इ.).२.तोंडातून हवा बाहेर सोडताना होणारा आवाज करून.

**फकर्डी** स्त्री. फाक; फोड; कापलेला तुकडा.

**फकडी** स्त्री.१. फुलांच्या पाकळ्यांची रांग, ओळ किंवा घेर. २. एकेरी पाकळीचे फूल किंवा तशी फुले लागणारे फुलझाड.
वि. १. संख्यावाचक उपसर्ग लावून बनणारे विशेषण. जसे :– एकफकडी, दुफकडी. २. फक्कड; आकर्षक; सुंदर.– लोसाको.

**फकडी** स्त्री. फुलपाखरू; पतंग. (व.)

**फकणे** अक्रि. पसरणे; फाकणे. [सं. स्फै]

**फकणे** अक्रि. वाईट मार्गास लागणे. [सं. फक्क्]

**फकणे** सक्रि. बुकणे; म्हणजे वरचेवर तोंडात घालणे. (तंजा.)

**फकण्या–न्या–ना, फकनेभाई** वि.१. निर्धन; दरिद्री; भुकेकंगाल. २. उसनी ऐट आणणारा.

**फक(का)फक–कां, फकाका** पहा:**फककन–कर–दिनी–दिशी**

**फकफकाट** पु. फकफक असा मोठा आवाज. [ध्व.]

**फकफकीत** वि. साधा; पांढरा.

**फकरा** वि. सुटा (भात).

**फकरूड** न. ज्याच्या फाका निघतात असे क्षुद्र, अगदी कोवळे फळ. पहा : **फक** [सं. प्र+कृत]

**फकस्त–त** वि.क्रिवि. 'फक्त'चे अपभ्रंश रूप. (ग्रा.)

**फका–क्का** पु.पीठ, पोहे इ.सारख्या कोरड्या पदार्थांचा तोंडात भरलेला मोठा घास(क्रि. मारणे); पसा; उष्टा होणार नाही अशा तऱ्हेने पदार्थ तोंडात घालणे. (तंजा.) [अर. फक्क=जबडा; ध्व. फक]

**फकाट** वि.१.फाकलेले, दूर केलेले (पाय); वासलेले. २. रुंद. ३.मोकळे; स्वच्छ; स्पष्ट. (क्रि. उजाडणे).

**फकाण–णा** न. मस्करी; थट्टा. (गो.)
वि. टवाळ. पहा : **फकांड**

**फकाणणे** अक्रि. फकी मारणे; खाणे : 'शरयूताईंनी मुलामुलींना थोडें कांहींतरी फकाणायला दिलें.' – उअं ३६.

**फकाणा, फकांदा** पहा: **फका–क्का**

**फकाफका** क्रिवि. एकसारख्या भयंकर शिव्या देणे, पण करणे. (तंजा.)

**फकारविल्हे** वि. फुकट; निष्फळ : 'त्यास तेथील प्रकार तर फार करून फकारविल्हे आहे.' – ऐको.

**फकारी** वि. गप्पा झोकणारा; अफवा उठवणारा. (गो.)

**फकावणे** सक्रि. पकडणे. – अमृ.

**फकांड–डी–ड्या** वि.१. टवाळखोर; खुषमस्कऱ्या; थट्टेखोर. पहा : **फकाण**.२.बडबड्या; पोकळ गप्पा मारणारा; गप्पीदास.

**फकांडी** स्त्री. आधारहीन व अर्थहीन बोलणे; पोकळ बडबड; निव्वळ गप्पा (अनेकवचनी प्रयोग). (क्रि. मारणे)

**फकिका** स्त्री. गद्यरचना; छंद-अलंकार नसलेले लेखन. [सं.फक्किका]

**फकिराणा** पु. १.फकिराच्या चरितार्थासाठी इनाम दिलेली जमीन. २.दानधर्म. [फा. फकीराना]

**फकिरी** स्त्री. १.फकिराची वृत्ती; संन्यास; वैराग्य. २. मोहरमच्या दिवशी फकिरांना द्यायची भिक्षा; नाडा. ३. मोहरममध्ये घ्यायची फकिराची दीक्षा.४. भिक्षावृत्ती; भीक. (क्रि. मागणे).५. गरिबी.
वि.१. फकिरासंबंधी; फकिराची (संपत्ती इ.).२. (ल.) एका जागी स्थिर न राहणारी (संपत्ती इ.). [फा.]

**फकि(क)स्त** वि. फटिंग; पोटापाण्याची सोय नसलेला; निर्धन.

**फकी–क्की** स्त्री. १.पहा : **फका–क्का**. २. चूर्ण; पूड; चुन्याच्या कळीची भुकटी. [ध्व.]

**फकी** स्त्री. बढाई. (गो.) [सं. फक्क = फुगणे]

**फकीर** पु. १. मुसलमान धर्मातील भिक्षेकरी साधू, भिक्षू. २. मोहरमच्या दिवशी साधूचा वेष घेऊन त्या वृत्तीने राहणारा मनुष्य. ३. संसारापासून अलिप्त, विरक्त राहणारा मनुष्य. ४. ज्याला पुढे-मागे कोणी नाही असा, सडाफटिंग मनुष्य. ५. दरिद्री, गरीब, कंगाल मनुष्य. [अर.]

**फकीरफुकरा** पु. फकीर, गोसावी वगैरे भिक्षेकरी लोक; गोरगरीब.

**फकोडा** पहा : **फाकडा**

**फक्क** वि. फटक(पांढऱ्या रंगाचे आधिक्य दाखविण्यासाठी वापरतात).

**फक्कड** पु. १. फकीर; स्वतंत्र; मोकळा; लोकांना न जुमानता किंवा त्यांची पर्वा न करता स्वतंत्रपणे वागणारा; कशाबद्दलही आस्था नसणारा. २. फाकडा; चैनी; रंगेल. ३. सुंदर; छान; सुरेख; चवदार. [सं. फक्किका, फक्क; हिं.]

**फक्कण–न–र** १.पहा:**फककन–कर–दिनी–दिशी**. २. पटकन; लगेच.(माण.) [ध्व.]

**फक्कि(कि)का** स्त्री. १.(वादात) सिद्ध करायचा मुद्दा; प्रतिज्ञा; पूर्वपक्ष. २. पूर्ण चौकशी न करता बनवलेले मत; पूर्वग्रह. ३. खोटे असूनही खरे भासवण्याचा प्रयत्न; हेत्वाभास. ४. कपट; लबाडी; लुच्चेगिरी. ५. पहा: **फकिका**

**फक्त** अ. पत्र किंवा लेख यांच्या शेवटी 'इतकेच','समाप्त','यापुढे मजकूर नाही' असे दर्शविण्यासाठी लिहायचा शब्द.

**फक्त** वि.क्रिवि. केवलत्ववाचक शब्द; केवळ; निव्वळ; नुसता. [अर. फकत्]

**फक्ते** वि.फटिंग; रिक्त; एकटा; नुस्ता. (तंजा.)

**फखर** स्त्री. १. गर्व; अभिमान. २. फिकीर.

**फग** स्त्री.१. सोयीची वेळ; सुसंधी. २.मोकळीक; फुरसत. (क्रि. फावणे)

**फगणे** अकर्तृक क्रि. १. संधी सापडणे. २. सवड सापडणे. पहा: **फावणे**
**फगफगणे** अक्रि. फडफडणे : 'फगफगिती टके निबिड।'- शिव ५२७.
**फगरूड** न. १. आढेवेढे; कारणाशिवाय घातलेला वाद, हुज्जत; उगीचच निर्माण केलेली अडचण. २. चालू विषयाला सोडून बोलणे; बहकणे. ३. बोलण्याची किंवा भाषणाची लपेट; बोलण्यातील छक्केपंजे.(क्रि. फोडणे, लावणे). पहा : **फणगडा** [क. पंगड]
**फजर-ल** स्त्री. सकाळ.
क्रिवि. उद्या सकाळी; उदईक. [अर. फज्र]
**फजल** स्त्री.१.कृपा; मेहरबानी:'खुदाचे फजलनें इतकियावर इंग्रजांची तंबी होईल.'ह्न मइसा १९.१०५.२. सुबत्ता;सुकाळ.(व.)३. गुण. [अर.फज्ल]
**फजितरोखा** पु. एखाद्याची फजिती किंवा निर्भर्त्सना करून लिहिलेले जरबेचे पत्र.
**फजितव(वा)डा** पु. मानहानी; फजिती.
**फजितवाण** वि. फजीतखोर.
**फजिता** पु. १. पाणी, पीठ इ. जास्त मिसळल्याने किंवा फोडणी, मसाला न वापरल्याने बेचव झालेला आंबरस, वरण, सांबारे इ. पदार्थ. २. आंब्याचे पातळ रायते. ३. आंब्याचा रस काढल्यावर उरलेल्या कोया पाण्यात कोळून काढतात तो रस. (खा.)
**फजिता-ती** स्त्री. १. अपमान; अप्रतिष्ठा; पच्ची; तमाशा. (क्रि. होणे, उडणे) २. हबेलंडी; गळाठा; गोंधळ; अडचणीच्या वेळी मार्ग न सुचल्याने झालेली अवस्था; वाईट स्थिती; फज्जा. [अर. फझीहत्]
**फजिंदार, फजीनदार** पु. १. स्वतःची जमीन असलेला मनुष्य; जमीनदार. २. विशिष्ट अटींवर जमीन कसणारा. [ पोर्तु. फाजंदा+दार प्रत्यय]
**फजीत** स्त्री. अपमान; मानखंडना.
वि. लज्जित; विरमलेला; ओशाळलेला; एखाद्या व्यवहारात मूर्खपणामुळे फसलेला.(क्रि. होणे, पावणे, करणे.) [अर. फझीहत्]
**फजीतखोर** पु.नेहमी फजीत होणारा; स्वतःचे हसे करून घेणारा.
**फजीन** न. स्वतःच्या मालकीची वाडी, शेत इ. ठिकाण. [पोर्तु.फाझंदा]
**फजूल** वि. निष्कारण; फुकट; व्यर्थ. [अर. फझल]
**फज्जा-ज्या** पहा : **भोज्या**
**फज्जा-ज्या** पहा : **फजिती** [अर. फजीह्]
**फज्जा** पु. ठरावीक अंतर; टप्पा.(क्रि. करणे).[अर. फजीह्] (वा.)**फज्याला पोचणे, पोचविणे**- शेवट, पूर्ण करणे.
**फज्जी** वि. शेवटचा. (व.,ना.)
**फज्ल** स्त्री. १. प्रावीण्य. २. कृपा. [अर.]
**फट** स्त्री.१. दोन वस्तू नीट न जुळल्यामुळे राहिलेली भेग, चीर. २.रिकामी जागा; कूस(बोलण्यात, लिहिण्यात). ३. फावला, रिकामा वेळ.
**फट** स्त्री. १. बहाणा; निमित्त; सोंग; ढोंग. (राजा.) २. गप्प; खोटी गोष्ट. (गो.) ३.वाईट शब्द; अपवाद. उद्गा. अवहेलनार्थी उद्गार. [सं. फट्=हिंसनम्;ध्व. फट]
**फट-टू** उपपद. रांड, लंडी, फजिती या व यांसारख्या शब्दांबरोबर आधिक्य दाखवण्यासाठी उपयोग.
**फट** स्त्री. फजिती; तमाशा : 'घरचा पती सोडियेला फट संसारी।'- मध्व ५४५.
**फटक** फटीक; पांढरा या शब्दाचे आधिक्य दाखवण्यासाठी त्याच्याशी जोडतात. उदा. पांढराफटक. [सं. स्फटिक]
**फटक** पहा : **फटकफटक**
**फटकडा** पु. १. फटाका (स्फोटक दारूने भरलेला). २.(ल.) लहान, आटोपशीर, ठुमकेदार, बांधेसूद, चलाख मनुष्य. [ध्व.]
**फट(टे)कडी** स्त्री. १. दारूचा लहान फटाका. २.जलद बार टाकणारी एक तऱ्हेची तोफ. ३. चुणचुणीत,नखरेबाज, सुंदर, बांधेसूद स्त्री, मुलगी. ४.(घोड्याची)उडी; झडप. (क्रि. मारणे) ५. घोड्याच्या शेपटीचा फटकारा. (क्रि. मारणे)
**फटकडी** स्त्री. तुरटी; फटकी. [सं. स्फटिक+खंड; हिं. फिटकरी]
**फटकडी** स्त्री. कडधान्याशिवाय जास्त खोबरे टाकून केलेली आमटी.
**फट(ट्)कण-कन-कर-दिनी-दिशी** क्रिवि.१. एखादी वस्तू खाली पडताना, बार उडताना किंवा उडी मारताना येणाऱ्या 'फट' या आवाजासारखा आवाज होऊन. २. तडाख्यासरशी; चटकन. [सं.स्फट्;ध्व.फट]
**फट(ड)कणे** उक्रि.१. धान्य पाखडणे.२. (विस्तवास) पंख्याने वारा घालणे.
अक्रि. १. सटकणे; झुकांडी देऊन निघून जाणे; निसटणे. २. फुटून बाहेर पडणे; वेगळे होणे, राहणे. ३. फरकणे; फिरकणे. - ऐको. [सं. स्फट्]
**फटकणे** न. पंखा; वारा घ्यायचे, घालण्याचे साधन; झडपण. [सं. स्फट्]
**फटकफटक** क्रिवि. पायात सैल जोडा घातल्यामुळे येणाऱ्या, सुपाने धान्य पाखडताना येणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज करून.(क्रि. चालणे, वाजणे.) [ध्व. फटक]
**फट(टा)कफळी** स्त्री. १. लहान मुलांची खेळण्यातली बंदूक, नपटी; नेपटी. असाणा इ.चे फळ किंवा पाल्याची गुंडाळी ज्या वेळूच्या नळीत घालून गजाने रेटून वाजवतात ती नळी. २. (ल.) चटकचांदणी; सुंदर स्त्री. पहा: **फट(टे)कडी** ३
**फटकर** न.पहा : **फटकुरी-रे, फटकूर**
**फटकळ** न. अशुभ गोष्ट घडणे; दुर्घटना.
वि.१.शिवराळ,बीभत्स बोलणारा; मागेपुढे न पाहता शिव्या देणारा. २. बेधडक बोलणारा. ३. स्वतंत्र वृत्तीचा; एकांडा. ४. घाणेरडे; खराब; वाईट (भाषण, मनुष्य इ.). ५. अशुभ; विषम; वाईट; आपत्तीची (वेळ) :'काळ मोठा फटकळ आला.' - ऐलेसं २९९९. ६. व्यर्थ बडबड करणारा.
**फटका** पु. १. फटकारा; प्रहार; तडाखा (काठी, चाबूक वगैरेंचा). २. एक प्रकारची सरळ, आखूड तलवार. ३.आवेशयुक्त, वीरश्रीने भरलेले पोवाड्यासारखे पद; चुरचुरीत, उपदेशपर काव्य. ४. एक मात्रावृत्त. [ध्व.फट्]
**फटका** पु. गावाची, पेठेची वेस, दरवाजा. पहा : **फाटक**
**फटका** पु.डोक्याला बांधायचा फेटा; पटका. (तंजा.)

**फटकाफटकी** स्त्री. किरकोळ शिवीगाळ, मारामारी; भांडण; बाचाबाची. क्रिवि. तडकाफडकी; क्षणात.

**फटकार** पु. (क्रिकेट) चेंडूला मारलेला फटका.

**फटकारणी-नी** स्त्री. १. भरकाडणे; झपाट्यासरशी उरकणे. २. हकालपट्टी; धुडकावून लावणे.

**फट(ड)कार(व)णे** उक्रि. १. शिताफीने व झटपट करणे; तडाख्यासरशी संपवणे. २. मोठ्या कुशलतेने, प्रतिष्ठेने सहज मिळवणे; साध्य, संपादन करणे.३. (शब्दशः व ल.)फटकारा मारणे; टाकून बोलणे. ४. भराभर धुणे. ५. बंदुकीची गोळी मारून पाडणे.

**फटकारना** क्रि. वेचणे; पाखडणे. (झाडी)

**फटकारा** पु. १.पहाः **फटका** १. २.(ल.) जोराचा, कौशल्याने केलेला प्रयत्न, परिश्रम. ३. झडप; झपाटणे (भुताने, पिशाचाने). ४. झपाटा; जोर (वाऱ्याचा किंवा साथीच्या रोगाचा). ५. पावसाची जोराची सर. ६.झटका; फिरका; झणकारा (हात, सूप, पदर इ.चा). ७. सूं सूं करीत जाणे; धडाका (बंदुकीच्या गोळ्यांचा अथवा बाणांचा). ८. दणका; चलाखीने, आवेशाने केलेले काम. ९. विंचवाच्या नांगीचा तडाखा. १०. पित्त होणे. ११. लावणीची अनुप्रासयुक्त चाल. [ध्व.]

**फटकाल** पहा : **फटकळ** ५.

**फटकावणे** क्रि. विस्तारणे. [सं. स्फटक]

**फटकाळ** पु. वाईट, प्रतिकूल, दुर्दैवाची, आपत्तीची वेळ.

**फटका(कू)ळ** वि.१.(सामा.) पहा: **फटकळ** : 'गृध्र म्हणे रे कोठे नेसी माझ्या सुनेसी फटकाळा।'- मोवन ११.३८. २.व्यर्थ : 'फटकाळ तो फटकाळ अंगारा।'- तुगा ३५६६. ३. लाजिरवाणे : 'कर्णापुढे पळावे हे मरणापरीस फटकाळ।'- मोकर्ण ३९.४०.

**फटकिरॉ-रो** पु. असत्यवादी. (गो.)

**फट(ड)की** स्त्री. तुरटी; फटकडी. [सं. स्फटिक]

**फटकी** स्त्री. उपाय; दाद. (क्रि. साधणे).

**फटकुरी-रे, फटकूर** स्त्री.न. १.पटकूर; जुने व फाटके कांबळे, घोंगडे, तरट, सतरंजी किंवा असाच तुकडा. २. तुच्छता दाखविण्यासाठी कांबळ्याला किंवा घोंगडीला म्हणतात. [सं. पट + कूर]

**फटकुरो** पु. बागुलबुवा. (गो.)

**फटकुऱ्या-र्या** वि. फटकुरी, फाटकी वस्त्रे वापरणारा; अगदी दरिद्री.

**फटकून** क्रिवि. दूर; एकीकडे; वेगळेपणाने. (क्रि. राहणे, असणे, वागणे)

**फटक्या सोंबल, सोमल** एक अतिशय पांढऱ्या रंगाचा क्षार. [सं. स्फटिक + सोमल]

**फटखुरा** वि. ज्याचे खूर द्विभागले आहेत असा.

**फटगुर** पु. खोडाला किंवा फांदीला फुटलेला अंकुर, फाटा; लहान उपफांद्या. (अहि.)

**फटणे** क्रि. मनाला येईल ते बोलणे.

**फटतुंडी** वि. चोच असलेला.

**फटनाद** पु. अपमान.

**फटफजिती** स्त्री. १. अत्यंत निकृष्टावस्था; दुःखदायक, अपमानकारक, लाजिरवाणी स्थिती; दैना. २. पुरेपूर फजिती; पच्ची; बोऱ्या.

**फटफट** स्त्री. एखाद्या महत्त्वाच्या कार्यात, व्यवहारात, उद्योगात, प्रसंगाने येणारे आघात, अडथळे, धक्के; धक्काबुक्की; प्रहार.

**फटफट-टा** क्रिवि. १.फटफट अशा एकसारख्या तडाख्यांच्या, फटकाऱ्यांच्या, शिव्यांच्या इ. आवाजाने; वाऱ्याने फळे पडताना, दोरी तोडताना, शिंकताना, लाकडे जळत असताना, धान्य भाजताना किंवा काठीने मारताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज करून. २. व्यर्थ. [ध्व. फट द्वि.]

**फटफट** स्त्री. पहाटेचा प्रकाश.

**फटफटणे** अकर्तृक क्रि. रात्र संपून चांगले दिसू लागणे; उजाडणे. [सं. स्फट्]

**फटफटणे, फटफटे** न.१. विस्तव फुलविण्यासाठी केलेला कळकाच्या कांबीचा पंखा; झडझडणे. २. वाळलेले गवत जळताना होणारा आवाज.

**फटफटा** वि. पांढरा. (झाडी)

**फटफटी** स्त्री. मोटरसायकल.

**फटफटी** स्त्री. लाह्या बनवण्यासाठी वापरण्यात येणारी ज्वारी. (अहि.)

**फटफटीत** वि. १. अत्यंत पांढरे. 'पांढरा' शब्दाबरोबर वापरतात. पहा : **फटक**.२. फिकट; निस्तेज; आजाऱ्यासारखा दिसणारा. ३. तेजोहीन; किरण नसलेला (दिवसाचा चंद्र). ४. साधे; उघडे; पांढरे (कुंकू किंवा गंध नसलेले कपाळ). ५. प्रकाशित; उजळलेला (दिशा, आकाश). ६. स्वच्छ; सुरेख; शुभ्र (पावसाळी ढग वितळून गेल्यावर पडणारा प्रकाश).

**फटफटे** न.१.लहान मुलांचे एक खेळणे; फळीचा तुकडा व काटकी किंवा केळीच्या डांगेचा दांडा, टाटोळा छिलून एकमेकांवर आपटून आवाज करतात असे खेळणे. २. पक्षी उडवून लावण्याचे साधन. पहा : **खटखटे** [ध्व. फटफट]

**फटमर** वि. भित्रा; भ्याड; फजीतखोर; अब्रूला कलंक लावणारे : 'पाठीवरी घाय म्हणती फटमर । निधडा अंगें शूर मान पावे ।'-तुगा ३८२.

**फटमार** पु. चित्रपटाच्या चित्रीकरणाच्या वेळी प्रसंगदृश्याच्या सुरुवातीला हातात दोन फळ्या घेऊन प्रसंगदृश्याचा क्रमांक उच्चारून फळ्यांचा फट असा आवाज करणे.

**फटरांड** स्त्री. हलकट वेश्या. पहा : **फट**

**फटलंडी** पु. हलकट मनुष्य. पहा : **फट**. (वा.)**फटलंडीचे काम** - अति गर्ह्य कृत्य. 'नाव बदलून देईन' या अर्थी उपयोग. उदा. हे मी न केले तर फटलंडीचे काम.

**फटवण** स्त्री. १. फसवणूक; ठकवणूक. २. लबाडी; युक्ती; डाव; कपट. ३. मुलांची समजूत काढण्यासाठी त्यांना दिलेली मिठाई, खाऊ वगैरे.

**फटव(वि)णे** क्रि. काही आमिष दाखवून फसवणे, वंचना करणे : 'आता नको मज खोट्याने फटवूं ।'- तुगा १२६५. [सं. फट् =फसव्या]

**फटसट-टा** क्रिवि. १. अभद्र, अपशब्द बोलून; तोंड टाकून. २. फटकळ रीतीने; फाडफाड. (क्रि. बोलणे, करणे.)

**फटसा(सू)ळ** वि. विचार न करता मनातील गोष्टी उघड बोलणारा; भडभड्या. पहा : **फटकळ** १,२

**फटंग** वि. तुसडा; न मिसळणारा : 'कोकीळ परभृत असल्यामुळे असा

फटंग झाला आहे.' - पद २७.

**फटाकडा-डी** पु.स्त्री. फटाका; लहान नळी (स्फोटक दारूने बनलेली). वि. १. फक्कड; छानदार. पहा : **फाकडा.** २. चुणचुणीत, चटकदार, हुशार (बाई, मुलगी); सुंदर व तरतरीत. [सं. स्फट्]

**फटाकडी** स्त्री. कुकडी; मुरंगी; पाणकोंबडी.

**फटाका** पु.१. फटाकडा-डी; दारूचा बार; फटाकी. (क्रि.सोडणे) २. हाताने दाबला असता होणारा कागदी फुगा. ३. (घोड्याच्या) शेपटाचा फटकारा, तडाखा.(क्रि. मारणे).४. (ल.) हुशार व चुणचुणीत मुलगा, मुलगी किंवा स्त्री. [हिं. पटाका-खा; ध्व. फटक]

**फटागडी** वि.फताडीः'फटागड्या शिंगाची एक म्हैस हाय.'-गोता ३२.

**फटाटणे** अक्रि.१. फटफटणे; उजळणे (सूर्य किंवा चंद्र उगवताना दिशा किंवा आकाश). २. चांगला प्रकाशणे (उगवणारा सूर्य अथवा चंद्र). अकर्तृक क्रि. फटफटीत उजाडणे. पहाः **फटफटणे**

**फटाटणे** अक्रि. बिनसणे; फाटणे.

**फटाटा, फटाफट-टा** पहा : **फटफट-टा**; तसेच कोणत्याही क्रियेपासून होणाऱ्या फटफट आवाजाचे अनुकरण करून.

**फटाडा** वि. खुजट व पसरट; बुटका व रुंद; बसकट. पहा : **फताडा**

**फटारना** अक्रि. घाबरणे. (झाडी)

**फटावळ** स्त्री. १. (झाडावरून फळांचे) पटापट, एकामागून एक पडणे. २. लेंढार. ३. कटकट; निरर्थक बडबड. [ध्व. फट]

**फटाशी-स** स्त्री. तिरफळे घालून बार उडवण्याची नळी. (गो.) पहा: **फटकफळी**

**फटास** स्त्री. मनीषा; हेतू. (गो.)

**फटांगरा-री** पु.स्त्री. फटाका.

**फटांगा** वि. १. आडवातिडवा; फताडा; विस्तृत रीतीने पसरणारा (लहान वृक्ष, झुडूप इ.).२. आखूड, थपकट, पसरट व झुपकेदार(शिंगे इ.).

**फटिक** पु. स्फटिक : 'जैसा फटिकु चि आवडे उदक ।' - ज्ञा ७.११०.

**फटिं(टं)ग, फटिंगभाई, फट्ट्या** पु. १.जगातील व्यवहारापासून किंवा प्रपंचापासून अलिप्त राहणारा मनुष्य; कुटुंब किंवा परिवार वगैरे नसलेला एकाकी इसम. २.मुक्त स्वभावाचा मनुष्य.

वि. १. निःस्पृह; विरक्त; बेपर्वा . २. फसव्या. (गो.) ३. फितूर; बदमाष. [क. फटंग; सं. स्फटिक; वै.सं.फट्=हिंसा]

**फटीक, फट्ट** पहा : **फटक** [सं. स्फटिक]

**फटुकनळी** पहा : **फटकफळी**

**फटे** पु. जुनी घोंगडी. (गो.) पहा : **फटकूर**

**फटेकार** पु. जुनी घोंगडी पांघरणारा गरीब शेतकरी. (गो.) पहा: **फटकुऱ्या**

**फटौणी** स्त्री. फसवणूक. पहा : **फटवण** [गो. फट]

**फट्कार** पु. तंत्रमार्गातील एक उच्चार.

**फट्ट** उद्गा. अ. छी; हत्त; धिग; धिगधिग.

**फट्टा, फंटी** पु.स्त्री. काँक्रीट समपातळीत आणण्यासाठी वापरण्यात येणारी ॲल्युमिनियमची चौकट.

**फट्टी** स्त्री.१. पाण्याचा चर, पाट किंवा नाली. २. दोन पिकांच्या रांगांमधील जागा. ३. (ल.) संधी; वाईट वागण्यासाठी मिळणारे प्रोत्साहन. (अहि.)

**फट्या-ट्या, फट्या बावरा** वि. धीट व बेफिकीर; पूर्ण स्वतंत्र; निर्भीड; आपली मते अप्रिय असली तरी धडकावून बोलून दाखवणारा.

**फट्याळ** वि. (को.) पहा : **फटकळ**

**फट्ऱ्यांग** स्त्री. फजिती. (झाडी)

**फड** पु. १.फडणिसाकडील कारकुनी खाते. २. सरकारी कामाची, व्यवहाराची, राबत्याची जागा, ठिकाण. जसे :- न्यायालय, देवघेवीचा कट्टा, बाजार, चावडी इ. ३. याचा निंदार्थीही उपयोग करतात. उदा. खेळण्याचा, नाचण्याचा फड. ४.(व्यापक) तालीमखाना, सर्कस, वादविवाद, गप्पा इ.चा अड्डा, जागा. ५. सारा ठरवण्यासाठी, शेतातील धान्य ज्या ठिकाणी जमवले जाते ती जागा; धान्य, माल या रूपाने सरकारी सारा ज्या ठिकाणी आणून दिला जातो ती जागा; कोठार. ६. मालाच्या विक्रीची किंवा तपासणीची जागा. ७. मोठ्या उद्योगधंद्याची, कामाची जागा. उदा. कारखाना, गोदी इ. ८. लागवड; पीक; शेत(ऊस, वांगी, मिरच्या इ.चे); शेतमळ्यातले उभे पीक. ९.(ल.) जोरात, जोमात सुरू असणे (एखादे काम); कामाचा रगाडा. (क्रि. चालणे, पडणे, घालणे, मांडणे.) १०. मंडळी; कंपू; टोळी; ताफा; संच (नट, नाचे इ.चा). ११. सभा; मंडळ; बैठक : 'फड नासोंच न द्यावा। पडला प्रसंग सांवरावा।'- दास ११.५.१२. १२.कणसांचा ढीग. (व.) १३. धान्याचे कोठार. (को.)१४. निरनिराळ्या खात्यांच्या कार्यालयांचा समुदाय. [हिं.; फा.] (वा.) ० **पडणे**- १.एखादे काम पूर्ण रंगात, जोमात असणे. २. कडाक्याच्या वादाचा विषय होणे.० **पेटवणे**- भांडण लावणे. ० **मारणे, राखणे, सांभाळणे**- जुना डौल सांभाळणे; बहाणा करणे; सोंग आणणे (वाईट स्थिती झाकण्यासाठी).० **मारणे, मारून नेणे, जिंकणे, संपादणे**- एखाद्या सभेत किंवा समाजापुढे प्रसंगानुरूप बोलून किंवा कृती करून वेळ मारून नेणे, साजरी करणे; सभा जिंकणे; विजयी होणे. **फडाच्या मापाने**-काठोकाठ, पूर्ण माप घालून. **फडास येणे** -सार्वत्रिक चर्चेचा विषय होणे; जाहीर चर्चा होणे. **फडी धरणे**-एकजूट करून जोर धरणे : 'त्यामुळे कितेक रजपूत राजे... फडी धरतात.'-पेद २.१९.

**फड-डा** पु.१. खजुरीच्या फांदीचे टोक, तुकडा, पान, हीर, फळांचा घोस. २. निवडुंगाचे पान; फडा. ३. झुडपांची दाटी.

**फडक** १.पलाणास लावलेले पंखे. २. हत्तीवर लादलेल्या अंबारीला लावलेले पडदे. ३. निशाणाचे कापड. (तंजा.)

**फडकणी** स्त्री. फडफडणे; फडकणे.

**फडकणे** अक्रि. १. वाऱ्यामध्ये फडफडणे (निशाण, पताका, वस्त्र इ.); फडफड करणे; सरसरणे; कडकडणे (कपडे, तबला, ढोलकी इ.). २. अंकुर, कोंब जोमाने येणे, वाढणे. ३. भीतीने कापणे; डचकणे : 'अपमानाचिये आडके। देखोनि न फडकें भयभीतू।'- एभा ११.४६४. ४. झोकात जाणे, येणे, असणे. ५. जाणे; उडून जाणे; पुढे जाणे; निसटणे. ६. जोराने उडी मारणे. [सं. स्फट्; ध्व. फड !फड !]

**फडकणे** अक्रि. १. प्रसिद्धीला येणे. २. गरजणे. ३. पुढे होणे; बोलू लागणे : 'आवडिचे नि भावें अडके। सवेंचि फडके गजबजला ।' - भारा बाल २.२४. ४. तालवाद्ये वाजवताना त्याचा आवाज टिपेला नेणे. [ध्व.]

**फडकरणे** अक्रि. फडफड करणे : 'पाख फडकरुनि उभा ठेला।'-रुस्व १७९.

**फडकरी** पु. १. (खेळकऱ्यांच्या, नटांच्या, तमासगिरांच्या इ.) कंपूतील फडातील इसम. २.फडाचा, सरकारी ठिकाणाचा, कारखान्याचा मालक, अधिकारी. पहा: **फड**. ३. किरकोळ विक्री करणारा (विशेषतः धान्याची). ४. (गुऱ्हाळावर नेण्यासाठी) उसाच्या फडातून ऊस कापून देणारा; उसाचे तुकडे करणारा.

**फडका-के** पु.न. १. फडके; चिरगूट; धडपा; वस्त्राचा तुकडा. २. चिंधी; फाटका जुना तुकडा; लत्तर. ३.परकर; घागरा. [सं. स्फट्] (वा.) ० **फाडणे, फाडून देणे**- स्पष्ट किंवा रोखठोक उत्तर देणे.

**फडका** पु़ लोखंडी गजाची जाळी आणि फळ्या यांचा आडोसा करून बंद केलेला ओट्याचा भाग. (अहि.)

**फडका** पु. १. झटका; झटकारा (पंखा, हात इ.चा). २. प्रसिद्धी; कीर्ती.

**फडका** पु. दुफण; एक प्रकारची पाभर; पेरणीचे औत. याला दोन फण असून एका वेळी दोन रांगांत बी पडते.

**फडकानी** वि. मोठे कान असलेली (मेंढी). (माण.)

**फडका(क)विणे** क्रि. १. फडफडावयास लावणे; फडफडवणे (निशाण इ.).२. जोराने थप्पड किंवा चपराक देणे, भडकावणे (गालावर); फरकावणे. ३. (उंची वस्त्र) अंगावर धारण करून ऐट करणे.

**फडकी-के** स्त्री.१. लहान मुलांची पांघरण्याची रंगीत शाल; पीतांबरासारखे उंची वस्त्र. २. लहान मुलींचे परकरावरून साडीसारखे नेसायचे वस्त्र; ओढणी. (खा.) ३. मृताच्या शरीरावर घालायचे वस्त्र. (अहि.)(वा.)० **पंघरन-** साखरपुडा करणे. (अहि.)

**फडके** न. लुगडे. - बदलापूर १२८.

**फडके** न. एक मोठ्या जातीचा, दोन मोठे पंख असलेला मासा. (गो.)

**फडगर** न. फांदी : 'नाना फडगरें फुटली । नाना जुंबाडें वाढलीं ।' - दास १५.७.११.

**फडझडती-झाडणी** स्त्री.१.कोणत्याही फडाचा, सरकारी कामाचा केलेला निरानिपटा; फडाच्या जागेची झडती, तपासणी. २.(ल.)जोराने, खडसावून रागे भरणे. (क्रि. काढणे, घेणे). ३.निरनिराळ्या फडांचे हिशेब घेणे (आलेल्या मालाचा, विक्रीचा, दराचा इ.). ४. तमासगिरांच्या दोन फडांमधील, टोळींमधील भांडण, झगडा. ५. (व्यापक) कसून परीक्षा घेणे; छाननी करणे.

**फडण(न)वीस, फडणी(नी)स** पु.१. एक सरकारी अधिकारी; वरिष्ठ हिशेबनीस; मुख्य दफ्तरदार. पूर्वीच्या राजवटीत दफ्तरे इ. ठेवणे, सर्व खात्यांचे हिशेब तपासणे, देणग्या देणे, हुकूम सोडणे इ. कामे याला करावी लागत. २. मामलेदार कचेरीतील वरिष्ठ कारकून.

**फडणि(नि)शी-सी, फडण(न)विशी-सी** स्त्री.१. फडणिसाचे काम. २. फडणिसाचा अधिकार, हुद्दा, दर्जा.

**फडत(द)र** स्त्री. लहान फोड, तुकडा, काप : 'तोचि दधीभाताचा उंडा वामकरीं । आवळें वेलें आलेआंचिआं फडतरीं ।'- दाव ३८५. [सं.स्फट्; देप्र.फड्ड=अंश;गु.फाडिएं]

**फडत(द)रणे** उक्रि. विभागणे; विस्तारणे : 'किंबहुना चराचराचेनि मीषें। फडतरैलें चीद्रूप पढियासे ।'- भाए ७००.

**फडत(ता)ळ, फडतार** न.१.भिंतीत चौकटी, दारे बसवून केलेले कपाट (प्रामुख्याने दूध, दही ठेवण्याचे). २. सरकत्या झडपांची खोली. ३. खोलीचे सरकते झडपे, ढापणे.

**फडतु(तू)स** वि. टाकाऊ; गचाळ; निरुपयोगी; हलक्या दर्जाचा; फालतू.

**फड(डा)त्कार** पु.१. जोराच्या वाऱ्याने वस्त्र, निशाण, पंखा इ.चा होणारा फडफड असा आवाज. २. फडफड आवाज (शेपटाचा). (क्रि. करणे). ३. जोराचा मार (छडीचा, चाबकाचा इ.).

**फडदा** पु. भिंतीतील खांबावर, टेकणाऱ्या बहालांच्यामध्ये फट झाकण्यासाठी बसवतात त्या फळ्या.

**फडनाईक** पु. जातपाटलाची एक संज्ञा.

**फडपद्धत** स्त्री.वाहणाऱ्या पाण्याला बंधारा घालून अडवलेले पाणी पाट काढून जरूर त्या ठिकाणी नेण्याची पद्धत.

**फडपूस-पोशी** स्त्री. सरकारी, जाहीर, उघड चौकशी.

**फडपोशा** वि. १. हजरजबाबी. २. वाटेल ती कामगिरी बजावणारा.

**फडफड** स्त्री. फजिती; घोटाळा.

**फडफड, फडाडा, फडाफडा** स्त्री. १.फडफड असा आवाज. २. हालचाल.

क्रिवि. निशाण, पंखा, जाड कागद, सूप इ.चा आवाज, शिव्यांचा, बंदुकीच्या गोळ्यांचा भडिमार, जोराचे प्रहार इ.च्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.]

**फडफडणी** स्त्री. फडफडाट; फडकणी. [ध्व.]

**फडफडणे** क्रि.१. (पंख, जाड कागद, सूप, बंदुकीतून गोळ्यांचा भडिमार इ.चा) फडफड असा आवाज होणे, करणे; फडफड वाजणे. २. एखाद्यावर तोंड सोडणे; ताशेरे झाडणे; शिव्याशाप देणे. ३. लग्नासारख्या कार्यात मिळालेल्या अधिकाराने एखाद्यावर रागावणे. ४. चडफडणे; पश्चात्ताप करणे. (गो.) ५. तालवाद्य जोरात ठेक्यावर वाजणे. [ध्व.]

**फडफड(डा)वणी** स्त्री. १. फाडफाड मारणे (चाबूक, छडी इ.नी). २. शिव्याशापांचा भडिमार; चडफड. ३. फडफड आवाज. [ध्व.]

**फडफड(डा)विणे** उक्रि. १. छडी, चाबूक इ.चा तडाखा देणे; परजणे (शस्त्र). २. खडकावणे; एखाद्यावर रागाने ओरडणे. ३. वादविवादात वरचढपणा करणे; पाडाव करणे. ४. घाईने, कसेतरी, अर्धवट करणे. ५. फडफडाट करण्यास लावणे.

**फडफडा** वि. पांढरा. (झाडी)

**फडफडागत, फडफडाव** स्त्री.पु. (व्यापक) मालमत्ता; इस्टेट; जिंदगी (जमीनजुमला, गुरेढोरे, कुटुंब व परिवार इ.); संसाराचे खटले.

**फडफडाट** पु.१.मोठा आवाज; धुमधडाका; भडिमार (बंदुकीच्या गोळ्या, शिव्या, तडाखे, लाथाबुक्क्या इ.चा). २. पक्षी पंख जोराने हलवतात तेव्हा; निशाण, शीड वाऱ्यावर जोरात हलते तेव्हा होणारा आवाज.

**फडफडीत** वि. अगदी मोकळा, कोरडा (पाणी कमी पडल्यामुळे झालेला भात, सांजा इ.).

**फडफरमाश-स, फडफर्माश-स** स्त्री. १. राजेलोकांच्या किंवा अधिकाऱ्यांच्या हुकमाप्रमाणे, ते ज्या गावी येतील त्या गावातून त्यांना

दिलेली फळफळावळ, भाजीपाला इ.ची भेट; डाली; नजराणा. २. सरकारने किंवा सरकारी अधिकाऱ्याने रयतेकडून घेतलेले किरकोळ जिन्नस किंवा करून घेतलेले काम; वेठ. ३. शेतात तयार झालेल्या पिकाचा सरकारात भरावा लागणारा नमुना; वस्तुरूपाने दिलेला नजराणा. हा सरकारी हक्क होता.

**फडशा** पु. १. (कर्ज) निःशेष, बेबाक करणे; फेड. २. निकाल; बंदोबस्त; संपवणे (काम, व्यवहार इ.). ३. बाकी न ठेवता खर्च करून टाकणे; निरानिपटा करणे (पुरवठ्याचा, खाण्याचा पदार्थ, बेगमी इ.चा). ४.नाश; निर्दालन; संहार. [हिं. फरचा; अर. फर्सा]

**फडशाफारक** पु. पूर्ण निपटारा; शेवटचा निकाल; बंदोबस्त (वादाचा, खटल्याचा).
वि. पूर्णपणे, अखेरचा निकाल लावलेला व ठरवलेला; अगदी निश्चित; ठाम. [फा. फडशा+फारिघ]

**फडशाही** वि. आवेशयुक्त : 'जाहीर सभेतील फडशाही भाषण...'– वक्तृत्व ३.

**फडस उठावणी** मुलांचा एक खेळ.

**फडसमजाविस** स्त्री. तात्पुरते समाधान.

**फडसंपादणी** स्त्री. १. फडावर उत्तम प्रकारचे काम दाखवून यश मिळवणे. २. कोणतेही काम उत्तमप्रकारे तडीस नेऊन पूर्वीचा लौकिक कायम ठेवणे.

**फडसूळ** वि.१.पहा : **फटसा(सू)ळ.** २. दरिद्री; कृश. ३. निकस; बिनफायद्याचा (देश, जमीन, शेत इ.).

**फडा** स्त्री. १. दहाचा आकडा असलेली नागाची फणी. २.(आले, हळद, वेखंड इ.चा) अनेक कांड्यांचा, कुड्यांचा पसरट कांदा, गड्डा.
पु.स्त्री. निवडुंगाचे पान, फणी. [सं. फटा]

**फडा** पु. १. पहा : **फड** १. २. शिंदीच्या पानांची केरसुणी. [सं. फटा]

**फडाका** पु.१.फडफडाट(पंख, निशाण, जहाजाचे शीड इ.चा). २. झटका; फटकारा; झणकारा (वस्त्राचा). ३. पावसाची जोराची सर. ४. धडधडाट; खडखडाट; वादळात वस्तू आपटणे, आदळणे. ५. भडिमार (शब्द, शिव्या इ.चा). ६. तोंडी गणित, हिशोब.
क्रिवि. पहा : **फडफड**

**फडाड** पु. पहा : **फडफडाट** १

**फडी–डे** स्त्री. १.नागाचा लहान फडा, फणी. २. जेथे जू बांधतात तो धुऱ्याचा भाग.(व.) [सं. फटा] (वा.)० **फिंदारणे** – डोळे वटारून पाहणे.

**फडी** स्त्री. केरसुणी. (खा.)

**फडी** स्त्री. निकाल; खुलासा :'येचि आता घडी। करूं बैसों तेचि फडी।'– तुगा १३५६. [सं. स्फट्]

**फडे** न. १. गोफणीची वादी. २. गोफणीस मधे खडा ठेवण्याकरता ठेवलेली सापाच्या फणीसारखी विणलेली जागा.

**फडे** वि. सम (संख्या). (कु.)

**फडेकार** पु. विभागणी; पडदा. (बडोदे): 'फळ्यांचा फडेकार घालून केलेली खोली.' – स्वारीनियम ७.

**फडोफडो** क्रिवि. फाडकन (मारणे).

**फड्डी** स्त्री. (कवड्यांचा खेळ)तोंड वर करून उपडी पडलेली कवडी. (वा.)० **उडवणे**– फजिती, टिंगल करणे : 'निख्खयच फड्डी उडोता बा तुमी गरीब मानसायची.' – माणूस २०५.

**फड्डी** वि. शेवटचा (खेळगडी). [हिं.फड्डी = शेवटी]

**फड्या** पु. १. धान्य इ.ची किरकोळ, फुटकळ विक्री. २. अशी विक्री करणारा. [हिं.फरिया]

**फण** पु. १. एक प्रकारचे दाताळे; गुठे. २. या दाताळ्याचा एक दात; दाणा खोल जाण्यासाठी जमीन उकरणारा, पाभरीला लावलेला लोखंडी फाळ, पन्हळ, पत्रा.
पु.न. पहा : **फणी, फडा**

**फण** पु. ज्वारीची कापणी केल्यावर त्याचा जमिनीत राहिलेला खुंट, सड.

**फणकट** पु. ज्वारी, बाजरी इ.च्या ताटाचा तुकडा; धसकट.(व.)

**फणका, फणकारा** पु. १.विंचवाच्या नांगीचा प्रहार, तडाखा; त्याने होणारी आग, वेदना. (क्रि. मारणे). २. मीठ, मिरची, तिखट यांसारख्या पदार्थांचा जखमेस किंवा शरीराच्या नाजूक भागास स्पर्श झाला असता होणारी आग. ३. ताप, उष्णता यांमुळे शरीराची होणारी तलखी, काहिली. ४. रागाची उसळी; झणकारा; संताप. (क्रि. येणे, होणे.) [सं. प्र+हन्]

**फणकारणे** अक्रि. १.फणकाऱ्याने, रागाने बोलणे. २. फटकारा मारणे.

**फणकावणे** क्रि. विंचवाने नांगी मारणे; डसणे : 'तो विंचुवें फणकाविला।'– दास १८.११०.२३.

**फणकु(कू)ट** न. (तिरस्कारार्थी) जाड दात्याची ओबडधोबड फणी.

**फणगडा** पु.१. फाटा. (क्रि. फुटणे, वळवणे, फिरवणे.). २. निर्माण झालेली, केलेली हरकत, अडचण, अडथळा, सबब.(क्रि. फोडणे) ४. विषयांतर. ५. इतर अर्थी पहा : **फाटा**

**फणणे** उक्रि. फण किंवा कुळव याने शेत नांगरणे.

**फणदे** न. गावकुसाजवळ उगवणारे गवत.

**फणफण** स्त्री. १. दाहामुळे होणारी ठुसठुस. २. विंचवाने नांगी मारल्यामुळे होणारी वेदना. ३. संताप; मनस्ताप.

**फणफण–णा** क्रिवि. खदखदणाऱ्या पदार्थातून निघणाऱ्या किंवा रागाने पुटपुटताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज करून. [ध्व.]

**फणफणणी** स्त्री. १. धुसफुस. २. पहा : **फणफणाट**

**फणफणणे** क्रि. १. संताप, दाह, जळजळ, काहील होणे(ज्वर, क्रोध, गरम पदार्थ खाणे, विंचू चावणे या कारणांमुळे).२. पदार्थ आंबत ठेवल्यास खदखदणे; फसफसणे; आवाज करणे. ३. अधिक होणे; वाढणे.

**फणफणाट** पु. अंगाचा दाह होणे; जोराची ठसठस, जळजळ; (आंबणारा पदार्थ) खदखदणे; फसफसणे.

**फणफणीत** वि.१. (ताप, क्रोध, दंश इ.मुळे) फणफणणारा. २. खदखदणारा; फसफसणारा.

**फणशा** वि.१.चलाख; तडफदार; हिंमतवान. २. निश्चयी; करारी; बाणेदार; निर्भय. ३. आकाराने मोठा.

**फणशी–सी** स्त्री. फणसासारखे एक जंगली झाड.

वि. फणसासंबंधी; फणसाचे.

**फणस** पु. एक झाड व त्याचे फळ. याची साल जाड व काटेरी असते. हा डोंगरभागात होतो. याच्या बरका, कापा व रसाळ अशा जाती आहेत. [सं.पनस; क. हलसु ]

**फणसट** न. (निंदार्थी) फणस.

**फणसपोळी, फणसाचे साट** स्त्री. बरक्या फणसाच्या गरातील आठळ्या काढून त्याच्या रसाची उन्हात वाळवून केलेली पोळी.

**फणसं(सां)बे, फणसांबा** न.पु. फणसाच्या खोडावर वाढणारे अळंबे. याचा औषधात उपयोग होतो.

**फणसुला**- पु. १. सीताफळ. (कु.) २. पळसुला. मुंजीनंतर ब्रह्मचारी काशीयात्रेस जाताना करायचा विधी. (कु.)

**फणसूळ** न. फणस. (गो.)

**फणा** पु. १. नागाची फणी, फडी, फडा. २. केळ्यांचा घड. (को.) ३. गोठ्यातील जमिनीवरील शेण खरडण्याचे लोखंडी साधन. (को.) ४. बाहेर दिसणारी दातांची कवळी. ५. (गुऱ्हाळ) उकळत्या रसावरील मळी काढण्याचे शिपतर, पाटी. ६. गोणपाटासारखा विणलेला कपडा गुंडाळण्याची फळी.

पु. आल्याचे, हळदीचे कुडी असलेले मूळ. [सं.]

**फणाटोप** पु. नागाची पसरलेली फडी : 'फणाटोप नृत्ये सीहाना.'– गरा ११.

**फणाडी** वि. फणी तयार करणारा. (नाशिक)

**फणाण–णा** पु. १.पहा : **फणका** २,३. २. पदार्थ आंबताना, फसफसताना होणारा आवाज.

**फणाणणे** अक्रि. तीव्र दाह, जळजळ होणे; फणफणणे.

**फणारे, फणे(णो)रे** न.१.शिवणकामाचे सामान ठेवण्याचे जुगदान, पिशवी. २. फणी, करंडा, आरसा यांसारखे वेणीफणी करण्याचे साहित्य ठेवण्याची बायकांची पिशवी, झोळणा.

**फणिआरे** न. न्हाव्याची धोकटी : 'फणिआरे दे : दिवसु उगवला :' – पंचो २१.१.

**फणिक** पु. नाग; साप. [सं.]

**फणिचक्र** न. शेतीविषयक कामासाठी शुभ नक्षत्रे दर्शवणारे चक्र.

**फणी** स्त्री. नागाची फडा.

पु. १. फणा असलेला सर्प. २. राहू. [सं.फण]

**फणी** स्त्री. १. केस विंचरण्याचे, दाते असलेले साधन; कंगवा; विंचरणी. २. कापड विणण्यासाठी ज्यात ताणे ओवतात ती चौकट. मागाची फणी. ३.पिंजण्याचे यंत्र, साधन. ४. काहिलीला चिकटलेला गूळ खरवडण्याचे साधन. ५. केळ्यांचा घड, फडी. [क. हणिगे]

**फणीकरंडा** पु.१. चांदीच्या पत्र्याची लहान फणी व त्याचीच कुंकवासाठी केलेली लहान डबी. (विवाहसंस्कारात वापरतात.) २. हळदी-कुंकू, मेण, कंगवा, फणी ठेवण्याची बायका वापरतात ती लाकडी पेटी.

**फणीचेंडू** पु. चेंडूफळीचा खेळ.-मखेपु ३७.

**फणीबदाकर** पु. फरीगदगा धारण करणारा.

**फणींद्र, फणिंद्र** पु. १. शेष.२. एक छंद; अक्षरे १३. गण र, ज, र, ज, ग.

**फणेरे** न.१.पान : 'माडाच्या झावळ्यांच्या देठाचे दात फणेऱ्यात बसवले.'– आआशे २८५. २. पहा : **फणीकरंडा** २

**फणे(ण्या)रे** पहा : **फणारे**

**फणोले** पु. अव.१. खिरीकरता केलेले सपीटाच्या पिठाचे-मैद्याचे गहुले. २. फेणया; फेणिया.(बे.)३. दुधात भिजवलेल्या रव्याची गोळी कोऱ्या, न वापरलेल्या फणीच्या दात्यांवरून फिरवून केलेला पदार्थ. ह्याची खीर करतात.

**फण्णा** पु.फडशा; फस्त होणे, करणे.पहा : **फन्ना** [फा. फना]

**फण्या** पु. करवतीने लाकूड कापताना आत घातलेली पाचर.

**फतई** स्त्री. एक प्रकारचे जाकीट; फितवी; बनियन.

**फतक फतक** क्रिवि. उथळ पाण्यात चालताना होणारा आवाज.[ध्व.]

**फतकण–ल** स्त्री. १. थबकण; आसनमांडी घालून प्रशस्त बसणे. (क्रि. मारणे, घालून बसणे.) २.(ल.)अव्यवस्थितपणे, वेडेवाकडे बसणे. [सं. प्रस्थ]

**फत(द)फत(द)** स्त्री. थुंकी उडवत घाईघाईने बोलणे.

**फतफतणे** क्रि. फळ, जखम सडून त्यात पाणी होणे.

**फतफते** न. अळूची पातळ भाजी. (को.)

**फ(फा)तमाय** स्त्री. (निंदार्थी) फोपशी, आडव्या अंगाची व ठेंगू स्त्री.

**फतरडा, फतरा** पहा : **फताडा**

**फतऱ्या** पु. कपाशीच्या गाडीचे वजन करताना वजनदार फत्तर उचलण्यासाठी ठेवलेला नोकर.

**फतवा** पु.१.वादग्रस्त प्रश्नावर काझीने दिलेला निकाल. २. न्यायाधीशाचा निवाडा, हुकूम. [अर.]

**फतह** स्त्री. विजय. पहा : **फते** [अर.]

**फताडा** वि. १. पसरट; विस्तारलेले (झुडूप). २. बसकट; फाटे फुटलेली (शिंगे किंवा अशी शिंगे असलेले जनावर); फांद्या असलेली. ३. रुंदट; थबकट (तोंड, चेहरा). ४. चापट; रुंदट; पसरट (शेंगा, काही फळे, निवडुंग). ५.(सामा.) विशोभित; बेडौल. ६. उंच पायांचा; चालताना पाय फेकीत चालणारा. (अहि.) [सं. प्रसृत]

**फतु** न. कर्ज.

**फतुला** पु. १. नपुंसक; षंढ. २. (ल.) नेभळा. (को.)

वि. चैनी.(व.)

**फतुलाई** स्त्री. १. षंढपणा.(को.) २. (ल.) नेभळेपणा; बुळेपणा.

**फतू, फतोई** स्त्री. कुडते; जाकीट.-राव्य २.२७. [अर.फतूही]

**फते–त्ते** स्त्री. विजय; सरशी; यश; उत्कर्ष.

वि. १. यशस्वी; विजयी.(क्रि. होणे).२. काबीज; हस्तगत : 'स्वामींचे पुण्येंकरून जागा फत्ते जाहली.'– ऐलेसं १.३. [अर. फतेह]

**फतेनामा** पु. विजयाची वार्ता कळवणारे पत्र.

**फतेमारी** स्त्री. जलद चालीचे, लहान, तीन ते पाचपर्यंत शिडे असलेले गलबत. [पोर्तु. पातीमार; हिं. पातीमारी=पत्रवाहक]

**फतेलष्कर** न. नेहमी यशस्वी होणारा माणूस; (उप.)अपयशी माणूस.

वि. (ल.) स्थूल, बोजड शरीराचा (मनुष्य, जनावर).

**फतेहमंद** वि. यशस्वी.

**फ़तोल्या** स्त्री. अव. शंकाकुशंका; फाटे. (क्रि. फोडणे).

**फत्तर-रा** पु. १. दगड; पत्थर; धोंडा. २. (ल.) बुद्धीचा जड; मठ्ठ. [हिं. पत्थर; सं. प्रस्तर]

**फत्तरकाट** १. दगड फोडण्याचे हत्यार; सुतणी. २. पाथरवट.

**फत्तरचुरणी** स्त्री. दगडाची पूड करण्याचे यंत्र.

**फत्तरपालथ्या** पु. तपकिरी पाठीचा, पोट पांढरे, मान व शेपूट काळी असणारा पक्षी.

**फत्तरपूजा** स्त्री. १. मूर्तिपूजा. २.(ल.) दगड मारणे; शेणमार करणे.

**फत्तरफोड** स्त्री.१.दगडफोड. २.(ल.)फार मेहनतीचे, कष्टाचे काम. वि. अवघड; दुःसाध्य.

**फत्तीरी रोटी** रोटीचा एक प्रकार. ही शेरभर वजनाची असून एक इंच जाड असते. हिचा परीघ एक फूट असतो.

**फत्ते, फत्तेमारी इ. शब्द फते मध्ये पहा.**

**फत्तेजंग** पु. विजयी युद्ध; जय मिळवता येईल असे युद्ध. [फा.]

**फत्या** पु.१. रात्री गस्त घालताना पहारेकऱ्यांनी एकमेकांकडे द्यायचा सोटा. २. तोफ किंवा बंदूक उडवताना दारूला लावायचा काकडा.

**फत्या** पु. (अशिष्ट) नपुंसक, बुळा मनुष्य.

**फत्या, फत्याई** स्त्री. जय; सरशी.

**फत्या बुरूज** सर्वांत मोठा बुरूज.

**फत्री** स्त्री.१.कुचकामाची वस्तू.२. (पत्त्यांचा खेळ) हलके पान.[सं. पत्र]

**फत्तेल** न. पेट्रोल : 'विशिष्ट गुरुत्वाच्या (०.८-०.९८) द्रवरूप हैड्रोकार्बनला फत्तेल (Petroleum) असे म्हणतात.'ह्व भाख ६२.

**फदडं-डे** न.पु. खेळखंडोबा; काम अपूर्ण राहणे, खोळंबणे. (क्रि.पडणे) (अहि.)

**फदफद-दा** क्रिवि. (निंदार्थी) उगाच, दुष्टपणाने, मत्सराने खदखदा हसण्याच्या आवाजासारखा आवाज करून; फिदीफिदी. [ध्व.]

**फदफदणे** क्रि.१.खदखदणे; फसफसणे (पदार्थ आंबताना). २. टचटचणे; ठुसठुसणे (फुटायला आलेले गळू). ३. (गाय, म्हैस यांनी) मोठ्यांदा आवाज करून हगणे; पो घालणे. [ध्व.]

**फदफदे** न. अनेक पालेभाज्या, अळकुडे इ. एकत्र करून केलेली सरबरीत भाजी. (गो.) पहा : **फतफते**

**फदाड्या** वि. १. लठ्ठ. २. रुंद. (झाडी)

**फदाल्या** वि. मोठ्या तोंडाचा. (झाडी, व.)

**फदिसा** पु. फजिती. (झाडी)

**फदुली** वि. फालतू; निरर्थक.

**फदुल्या** पु. कुचकामाचा माणूस .पहा : **फतुला**

**फदूल** वि. फोपशा; लठ्ठंभारती; वातूळ शरीराचा.

**फद्दल** वि. फारसे काम न करता फतकल मारून बसणारी.

**फद्या** पु. पैसा; एक तांब्याचे नाणे; चार पै; दीड पै. वि. कुचकामाचा माणूस. [क.पेद्द = मूर्ख]

**फन** न.१. नांगराच्या दांड्याचे, ज्याला फाळ बसवलेला असतो ते दाताचे टोक; चिखलणीचे साधन. २. चात; तर्कु. ३.जोंधळ्याची कापणी केल्यावर त्याचे जमिनीत राहिलेले खुंट; फण.

**फनकी** स्त्री. कवडा पक्षी. (झाडी)

**फनगट-गडा-गंडा-गाडा** पु. १. फाटा. २. झाडावर जेथे दोन फांद्या फुटतात ती जागा; दुबेळे; दुबेळके. पहा : **फणगडा**

**फनम** पु. चांदीचे लहान नाणे; फलम.

**फनसाड** पु. भाताचे धसकट. (झाडी)

**फनसावडी** स्त्री. फन सावडण्याचे, सड गोळा करण्याचे औत.

**फनसावने** सक्रि. मारणे; पिटणे. (व.)

**फना(न्ना)बाजी** स्त्री. नुकसानकारक, नाश करणारा खेळ.

**फनिमासा** वि. वांब, एक प्रकारचा लांबट आकाराचा मासा. (तंजा.)

**फनेल** न. नरसाळे. [इं.; फ्रें.]

**फन्** पु. नाद; छंद; हट्ट. (अहि.)

**फन्का** पु. फोडणी; सातळणी. (व.)

**फन्न** पु. स्त्री. तीन फणांची पाभर; तिफण. पहा : **फण**

**फन्ना-ना** पु.१.(खाऊन, खर्चून) फडशा; निःशेष, नाहीसा होणे, करणे; खलास.२. लुटून, मोडूनतोडून, जाळून नाश करणे; सत्यानाश. वि. नष्ट; उद्ध्वस्त; फस्त. [अर.]

**फपोला** वि. फोपसा; स्थूल; वाताने जाड झालेला. पु. भाजल्याचा फोड.

**फप्प** क्रिवि. वि. १. पहा : **भप्प**. २. झपाट्याने; भपकाऱ्याने.[इं.पफ्]

**फफय्या** वि. निरुपयोगी; कुचकामाचा.

**फफुटा** पु. धुरळा. पहा : **फुपाटा**

**फयदा** पु.(गोट्यांचा खेळ) जेथे उभे राहून गोट्या गलीत टाकतात ती जागा. (कु.)

**फयारने** सक्रि. व्यवस्थित लावणे; छावणे. (व.)

**फय्यर** पु. १. कवलूचा तुकडा. २. एक खेळ. (झाडी)

**फर** स्त्री. मऊ व आखूड केस असलेल्या प्राण्यांचे कातडे; मऊ केस.[इं.]

**फर** (को.) पहा : **फरा**

**फरईत** वि. कर्तबगार : 'माज्या त्या मालनीच राघू झाल्याती फरईत.'- लोसाको.

**फरक** पु. १. अंतर; भिन्नत्व; असमानता. २. फेर; विरोध; भेद; विपरीतता. ३. फट; अवकाश; जागा; रीघ : 'फरक देखिली जागा रोही वाड्यांत शिरलें ।'- ऐपो ६९. क्रिवि. वेगळा; निराळा; आडबाजूस; दूर. [अर. फऱ्क, फर्क]

**फरक** पु. (गवंडीकाम) कोपरा; शेवट (भिंतीचा). [इं.फोर्क]

**फरकट, फरकंड-डा, फरकांडी** स्त्री. पहा : **फरक(का)ड २**

**फरक(का)टणे** अक्रि. ढुंगण सरकवीत, घासत जाणे. पहा: **फरपटणे**

**फरकटणे** उक्रि.भरभर लिहिणे; खरडणे; घाईने लिहिणे. पहा: **भरकटणे**

**फरकटा-डा** पहा : **फरगटा-डा**

**फरक(का)ड** स्त्री.१.धांदल; तिरपिट; तारांबळ.(क्रि. मचणे). (ना.)२. सापासारख्या सरपटणाऱ्या प्राण्याचे मार्गावर उमटलेले चिन्ह.

**फरकणे** अक्रि.१.बाजूला होणे; वाट देणे.२.(क.) आवाज करून जाणे; फरकन निसरणे, घसरणे.३. फरक होणे, करणे. ४. फिरकणे.

**फरकणे** अक्रि. ताठ उभे राहणे; फडकणे : 'रोमांच जंव फरके। तंव तंव

आंग सुरके ।'-ज्ञा १८.१६०३.

**फरकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. फाडणे, ओढणे, घसरणे अशा क्रियांच्या वेळी होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन.

**फरकंडा** पु.१. धांदोटी; चिंधी. २. तारांबळ. (क्रि. घालणे, पडणे).

**फर(ल)काविणे** सक्रि. १. नटवेपणाने, डौलाने (फाटेल, मळेल अशी काळजी न करता) शालजोडीसारखे उंची वस्त्र धारण करणे, नेसणे. २. तोंडात भडकावणे. पहा : **फडकावणे**

**फरकी** स्त्री. मुख्य धान्यात दुसऱ्या जातीचे धान्य थोडे थोडे मिसळून पेरणे; पिकांचे मिश्रण.

**फरकोंडी** स्त्री. फुटकुळी; घामोळी. (व.)

**फरखती** स्त्री. कर्जफेडीची पावती. पहा : **फारखत**

**फरगटा-गडा-गाडा** पु. १. वाकडी लिहिलेली ओळ, रेघ; फाटा; फराटा.(क्रि. ओढणे, फोडणे, काढणे.) २.(अव.) लपेटी; ओरखडे; भरकाडे; फरकाटे.(क्रि.फोडणे) ३.(ल.)(कामामध्ये)अडचणी, अडथळे; आक्षेप; फंदाडे; फाटे.(क्रि. घालणे)

**फरगडी** स्त्री. बडेजावाने बोलणे; चावटपणा. (तंजा.)

**फरगाद-त** स्त्री. आरमारी नौका; लढाऊ जहाज.

**फरगूट-ड** न. फडके; चिंधी; धडपा; चिरगूट.

**फरज** स्त्री. १. कर्तव्य; आवश्यक गोष्ट. २. एखादे काम करण्याची सक्ती.

**फरजंद** पु.१. मुलगा; पुत्र. २. मुलगी.　　[फा. फर्झन्द=मूल]

**फरजी** पु. (बुद्धिबळ) राजाचा वजीर.

**फरडा** वि. पटाईत; निष्णात; निपुण; कुशल (वक्ता, गवई, लेखक).

**फरडू** पु. (क.)(ठिकरीचा खेळ) बट्ट्या; अर्धवर्तुळाकृती दगडाची कपची; ठिकरी.

**फरडुक्या** वि. विनोदी, रसिकपणे बोलणारा; म्हणी, चुटके यांचा साठा जवळ असणारा व प्रसंगी त्याचा उपयोग करणारा.

**फरडूक, फरडुके** न.१. खुबीचे भाषण; नर्मोक्ती. २. चुटका; बोधपर गोष्ट; म्हण; दृष्टांत; सूक्त. ३. उपाख्यान; प्रस्तुत विषयातून निघणारे अप्रस्तुत, लहानसे कथानक; आडकथा; आख्यायिका.

**फरताळ** न. फडताळ.

**फरतोडा** पु. १.झाडाची फांदी. २. झाड तोडल्यावर त्याला फुटणारा अंकुर; फाटा; फरगडा.

**फरद, फर्द** पु.स्त्री.न.१. जोडीपैकी एक (विशेषतः शाली, धोतरे, विशिष्ट दागिने); एकपदरी वस्त्र.२. छोटा लेख; तक्ता; यादी.　　[अर. फर्द]

**फरदखजूर** पु. लहान बिया असलेला एका जातीचा खजूर.

**फरदड** न.पु. स्त्री. शेवटच्या वेचणीचा कापूस; उरलेल्या कापसाचा वेचा. (अहि.)

**फरदा** पु. १. तक्ता; फळी. २. दरवाजाचे, खिडकीचे एक दार, फळी. ३. चिठ्ठी :'घडी भरल्यावर यम काढिल कीं फरदा.' - देप १८६. ४. पहा : **फडदा**　　[अर. फर्द]

**फरप(फ)ट-टा-र, फरपटत** स्त्री.१.जमिनीवरून ओढत, घसटत नेल्याची खूण. २. तंगडी धरून जमिनीवरून फरफर ओढणे, ओढत नेणे. (क्रि. काढणे).३.(ल. व सामा.)माग; छडा. (क्रि. जाणे, मोडणे) ४. रीत, क्रम, वहिवाट; परंपरा. ५. ओढाताण.

क्रिवि.घसटत; खरडत; पोटावर, ढुंगणावर जमिनीवर सरपटत.

**फरप(फ)टणे** अक्रि. १. घसटत जाणे; सरपटत चालणे. २. पोटावर, ढुंगणावर सरपटणे.

**फरफर-रा** क्रिवि. पहा : **फराफर-रा, फरारा**

**फरफरणे** अक्रि. फरफर असा आवाज करणे, निघणे, होणे.

**फरफरमास** पु. कुळाकडून हक्काने येणारा नजराणा　　[फरमास द्वि.]

**फरफर** स्त्री. हगवण. (झाडी)

**फरफरव(वि)णे** उक्रि. आवाज होईल असे जमिनीवरून ओढणे, खेचणे.

**फरमा, फर्मा** पु.१.(मुद्रण.)मजकूर जुळवून त्याची चेसीमध्ये घट्ट बसवलेली, छापली जाण्याची पृष्ठे; ठशांचा संच.(क्रि. जमवणे).२. नमुना; प्रत. ३. साचा; प्रकार; पद्धत; रचना; आकृती; घडण.　　[इं. फॉर्म]

**फरमान-ना, फर्मान-ना** पु.न. राजाचा हुकूम, आज्ञा; सनद; आज्ञापत्र (वतन, नेमणूक यांसंबंधी).　　[फा.;हिं.फर्माना]

**फरमानबाडी** स्त्री. फरमान घेण्यासाठी ठरवलेली जागा, दरबार.

**फरमाव(वि)णे, फर्माव(वि)णे** उक्रि. (राजासारख्या मुख्य पदावरील व्यक्तीने) आज्ञा, हुकूम करणे, करायला सांगणे.　　[फा. फर्माना]

**फरमाश-स, फर्मास** पु. १.पहा : **फरमान**. २. भेट; वरिष्ठांना भेट दिलेली वस्तू.

पु.स्त्री. हुकमी वस्तू; पाठवण्याची आज्ञा केलेला, मागवलेला जिन्नस.

वि. अत्युत्कृष्ट; इरसाल. पहा : **फरमाशी**　　[फा. फर्माइश]

**फरमाशी-सी, फर्माशी, फर्मायशी** स्त्री.१.पहा: **फरमाश** २. २. मागणी : 'गांवगन्ना स्वार वसुलास गेले त्यांचा खर्च रोज व खुराकी किरकोळी फर्मासी वगैरे पांच हजार.' - मइसा ११.५९१४. ३. एक प्रकारचा कर.

वि. १. आज्ञा देऊन, सांगून करवलेला(जिन्नस); मुद्दाम काढलेले, बनवलेले (वस्त्र); सांगीचा; काढीव. २. पहिल्या प्रतीचा.　　[फा. फर्माइशी]

**फरमाशी मार** सडकून दिलेला चोप, मार.

**फरमिंदा** पहा : **फामिंदा**

**फर(रा)ल** न. माडाच्या बुंध्याचा उभा चिरलेला भाग.

**फरश-स-शी-सी** पु. कुऱ्हाड किंवा त्यासारखे अस्त्र; परशू.[सं. परशु]

**फरशी** स्त्री. १. पहा : **फरश**. २. मोठी पटाशी. (कु.)

वि. परशूचा ठसा असलेला (रुपया).

**फरशी-श** स्त्री.१. दगडी चीप. २. दगडी चिपांनी केलेली जमीन; फरसबंदी.

**फरस** पु. १. मोठी फरशी; दगडी चीप. २. फरशी केलेली जमीन; चिरेबंद भूमी. ३. नदीतून पलीकडे जाण्यासाठी केलेला, पाण्याच्या वर येणारा फरसबंदी रस्ता; सांडवा. ४. गच्ची. ५. बिछाईत.　　[अर. फर्श]

**फरसडी** स्त्री. खळ्यासभोवतीचे धांड्याचे आवरण. (व.)

**फरसता** वि. फरचे काम करणारा.

**फरसपेटी** स्त्री. (खडीकाम, विणकाम) वस्त्रांच्या काठावर काढलेली

विशिष्ट वेलबुट्टी, नकशी.

**फरसबंद क्षेत्र, क्षेत्रफळ** पहा : **चटईक्षेत्र**

**फरसबंदी** स्त्री. १. चिरेबंदी फरशीकाम. २. गवंडीकाम.
वि. १. फरशीचे. २. बांधकामाचे; गवंडीकामाने बांधलेले.

**फरसबी** न. श्रावणघेवडा. याचा श्रावण भाद्रपदात हंगाम असतो.

**फरसंग** पु. अंतर मोजण्याचे जुने फारसी माप; चार मैल अंतर.

**फरसाण** न.शेव, गाठी, पापडी इ.पासून बनवलेला तिखटमिठाचा खाद्यपदार्थ.

**फरसाव** पु. खोगीर वगैरे घोड्याचे सामान.

**फरसाळे** वि. वेगळ्या चवीचे, स्वादाचे (मिश्रण):'आणि गोड आंबट मिळे। तेथ रसांतर फरसाळें ।' – ज्ञा १८.२४५.

**फरळ** स्त्री. फांदी; डहाळी. (व.)

**फरळ** न. नाचणी, हरीक यांचा कोंडा; टरफल.

**फरा–रे** पु. १.खांद्याचे हाड; अंसफलक.२. मांडीचे हाड. ३. ओळ; रांग; शिस्तबद्ध रांग. (माणसे, जनावरे इ.ची) : 'संगे ऋषीचा फरा।'– आसी ९. ४. कपाळावर कसातरी ओढलेला कुंकवाचा पट्टा, फराटा. ५. मुलांच्या कपाळावर बांधायचा दागिना; पिंपळपान; पिंपळवन. ६. कोळ्यांकडील जाळे विणण्याचा काटा. (झाडी) [सं.फलक](वा.)० **काढणे**–माग काढणे (जनावरांचा वगैरे).

**फरा** पु. १. धान्य मापण्याचे साधन, माप; मण (१६ किंवा १२ पायलींचा). २. खडी, मुरुम, माती मोजण्याचे पंचवीस घनफुटांचे माप.

**फराकणे** अक्रि. निवळणे. (व.)

**फराक(ग)त** स्त्री. मुक्तता; स्वास्थ्य; आराम; सवड.
वि. मोकळा; रिकामा. (व.)
क्रिवि. १.स्वस्थपणाने. २. तपशीलवार. [अर. फराघत]

**फराकी** स्त्री. खोगिराचा स्वाराच्या मांडीजवळचा भाग; नीट बसता यावे म्हणून खोगिरावर घातलेली गादी; खोगीरगादी.

**फराख** वि. रुंद; विस्तृत; विपुल.

**फराट** पु.१. जमिनीत पेरलेले बी मातीने झाकून टाकण्याचे औत. २.ज्वारी पेरण्याचे एक तीन फणी लाकडी अवजार.

**फरा(रां)ट** वि.कुशल; कसबी. (अहि.)

**फरांटा** पु. (ल.)(सामा.) फरगडा; फाटा. (क्रि. ओढणे, फोडणे, काढणे.)

**फराडा** पु. फाडीचा दगड. (व.)

**फराडी** वि. गायब; दुसरीकडे निघून गेलेला. (अहि.)

**फराद** वीजमापनाचे परिमाण. [इं.फॅरेड]

**फराफर–रा, फरारा** क्रिवि. फाटणे, फाडणे, ओरपणे, ओढणे यांसारख्या क्रियांच्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व. फर]

**फरामोश–ष** वि. विसरलेले; विस्मृत. [फा.]

**फराया** स्त्री.अव. काट्या. (व.)

**फरार–रा** पु. पलायन; लपणे.

**फरारा–री** पु. १. पताका; निशाण; बावटा; फडकणारे निशाणाचे वस्त्र. २. लोंबणाऱ्या वस्त्राचा सोगा; फडफडणारे फडके. ३. कढी इ. पातळ पदार्थ पिताना होणारा आवाज.

**फरारी** वि.१.घर व जमीनजुमला सोडून गेलेला; देशत्याग केलेला; परागंदा. २. हाती न लागणारा; गुन्हा करून पळून गेलेला. [अर. फिरार]

**फरारी** स्त्री.१.अंतःकरणाची ओढ. २. आधिक्य; थोरपण. ३. भरभराट :'आणि पैं तयाची परी । जीविताची फरारी । देखोनि जो न करी। मृत्युचिंता ।'–ज्ञा १३.७३५. ४. भरमसाठ बोलणे; थापेबाजीची बडबड : 'जैसें बोले तैसें करी । त्यातें वंदिजे हरहरीं। येर ते बोलाची फरारी ।'– भाराबाल ३.२०. ५. गर्व. [सं. स्फर]

**फराल** न. माडाच्या बुंधाचा उभा चिरलेला अर्धा भाग. (कु.)

**फराश** जाजमे, सतरंज्या वगैरे अंथरण्याचे सामान. [फा.]

**फरा(रां)शी(सी,सि)स** पु. वि.फ्रेंच मनुष्य, शिपाई.

**फरास–शी** पु. १.बिछायती घालणे, तंबू ठोकणे, झाडून काढणे इ. कामे करण्यास नेमलेला श्रीमंताच्या घरातील नोकर. अस्तरणक. –राव्यको ३.२३. २. अठरा कारखान्यांपैकी एक. [फा. फर्राश]

**फरास(द)खाना** पु.१.तंबू, जाजमे, बिछायती इ. सरंजाम. २. हा ठेवण्याची जागा. अस्तरणागार. –राव्यको ३.२३. ३. तुरुंग. [फा. फर्राशखाना]

**फरासपेठ** स्त्री. लुगड्याच्या काठातील नक्षीचा एक नमुना, प्रकार. याचे चिक्की आणि गोड्डु असे दोन प्रकार आहेत. (बे.)

**फराळ** पु.१.अल्पाहार; थोडे खाणे. २. फळफळावळ, पोहे, पीठ या प्रकारचे पदार्थ; उपवासाचे पदार्थ. ३.(विनोदाने) लिहिण्यात, बोलण्यात, म्हणण्यात शब्द गाळणे. [सं. फलाहार]

**फराळा** पु.(धोतर, पातळ यांसारखे वस्त्र) बरेचसे फाटणे; चिंध्या ; फाळा.

**फरांटा** पहा : **फराटा**

**फरांडा** पु. झपाटा (चालण्याचा); फेक. (व.)

**फरांडी** स्त्री. चांभार ज्याच्यावर चामडे ठोकतात तो लाकडी ठोकळा.

**फरी** स्त्री. धान्य मोजण्याचे माप; अर्धा फरा; अर्धा मण.

**फरी–रा** स्त्री. लहान ढाल; व्यायामशाळेत तलवारीचे हात गदगा घेऊन शिकण्यासाठी या चामड्याच्या ढालीचा उपयोग करतात.

**फरी** स्त्री. गुरांची मांडी; फरा.

**फरीगदगा** पु. लाठी आणि लहान ढाल यांनी खेळण्याचे हात.

**फरीद** पु.१.ज्याला कुटुंब, नातेवाईक नाहीत असा मनुष्य; फटिंग; सडा.(प्रायः निंदा करताना म्हणतात. कारण याच्याशी आर्थिक व्यवहार करणे धोक्याचे समजले जाते.) २. मोकळा, रिकामा (कामाच्या वेळेखेरीज).

**फरे** न. फरेमरेच्या खेळात तीन घुला एका रेषेत, सांध्यावर आल्यास होणारा डाव.

**फरेब** पु. कुटिलता; लुच्चेगिरी; लबाडी. (व.) [फा.]

**फरेमरे** न.(मुलींचा) विशिष्ट आकृती काढून नऊ नऊ खड्यांनी खेळण्याचा खेळ. या खड्यांना घुला म्हणतात.

**फरेल, फोलेर** पु. दीपस्तंभ; दीपगृह. (गो.) [पो. फारोल]

**फरेवाड** वि. गुडघ्याच्या वर वाजवीपेक्षा जास्त वाढलेला. (माण.)

**फरेवान** स्त्री. किनारी; काठ; सभोवताली लावलेली पट्टी :'अस्तर पिवळा ताका चिलाई फरेवान हिरवी याप्रमाणे सिद्ध करून...'–मइसा ३.२५२.

**फरेंद्र** पु. ताडाचे झाड.

**फरोड** पु.१.विस्तार; पसारा; व्याप्ती (काम, विषय यांची). (क्रि. घालणे, पसरणे.) २. व्यास. (व.)

**फरोदस्त, फरोस्त** पु.(वादन)तेरा मात्रांचा व सहा अंतऱ्यांचा (विभागांचा) ताल.

**फर्कड** स्त्री. फटफट; तारांबळ. (झाडी)

**फर्कडा** पु. मातीची ढेकळे फोडण्याचे काम. (झाडी)

**फर्कोडा** पु. दळले न गेलेले तूस. (झाडी)

**फर्गोल** पु. रूदार पायघोळ अंगरखा : 'सकलाद् न मिळे यास्तव स्वामीचा फर्गोल पांघरता पाठविला असे.' – मइसा ८.१२०. [फा. फर्गुल]

**फर्ज** पु.कर्तव्य. [फा.]

**फर्ज(र्झ)द** पु. १. मूल. पहा : **फरजंद.** २. लेकवळा; दासीपुत्र. ३. गुलाम. (गो.) [फा.]

**फर्जित** वि. (सोंगट्यांचा खेळ)फुकटा; बिनहिशेबी.(क्रि. जाणे).

**फर्जी** पु. १.पहाः **फरजी.** २. वजीर; राजाचा मुख्य प्रधान.[फा. फर्झी]

**फर्जेत** (गो.) पहा : **फर्जंद**

**फर्डा** वि. १. पहा : **फरडा.** २. सुंदर.

**फर्डेबाज** वि. ऐटबाज; दिखाऊ.

**फर्डेशाही** वि. हात न उचलता लिहिलेले; पल्लेदार.

**फर्द, फर्दफर्माशी** पु.न.स्त्री.१. दोन वस्तू, माणसे यांपैकी एक. २. लेख; एकेरी पत्र :'येथें जागिरीची फर्द लिहून घ्यावी तरी आपणापाशी मोहरही नाही.'– मइसा ८.२१७. [फा.]

**फर्द, फर्दरद** पु. पांघरण्याचे रेशमी वस्त्र; शालजोडीचे पान; एकेरी वस्त्र.

**फर्दा, फर्मान, फर्मावणे, फर्माशी–स** पहा : **फरदा, फरमान** इ.

**फर्दी** स्त्री. १. लहान भिंत. २. संवादाची चोपडी. (झाडी) [अर. फर्द]

**फर्न** न. पाण्याच्या आश्रयाने वाढणारे, सुंदर पानांचे एक झुडूप. सोनेरी, रुपेरी अशा याच्या जाती आहेत. [इं.]

**फर्निचर** न. घरसजावटीचे खुर्च्या, टेबल, कपाटे इ.सामान. [इं.]

**फर्मा** पु. १.नमुना; प्रत; छापलेल्या मजकुराची काही पाने. पहा : **फरमा.** २. मेज; माप.– ऐको. ३. खडी मोजण्याचे साधन. (झाडी)[इं.फॉर्म]

**फर्माईश** स्त्री. मागणी.

**फर्माकार** पु. नमुना बनवणारा कारागीर.

**फर्मावि(य)शी** स्त्री. १. बंदोबस्त; ताकीद. २. आज्ञा. वि. सांगून करविलेले. (तंजा.)

**फर्मास** वि. झक्क; मस्त.

**फऱ्या** पु. १.गुरांचा एक स्पर्शजन्य, पटकी वगैरेचा आजार. २. मांडी.

**फर्रा** पु. चौकोनी कापडाच्या तुकड्याचा लंगोट.

**फर्राटेबाज** वि. ऐटबाज.

**फर्रास** वि. बोलण्यात पटाईत; अधिक बोलणारा; फर्डा.

**फर्लांग** पु. अंतर मोजण्याचे एक ब्रिटिश माप; मैलाचा आठवा हिस्सा.[इं.]

**फर्लो** स्त्री. काही वर्षांच्या नोकरीनंतर मिळणारी सवलतीची रजा. [इं.]

**फर्श** पु. कुऱ्हाड; परशू. पहा : **फरश** [सं. परशु]

**फर्श–र्ष,–र्स, फर्शी** पु.स्त्री. १. बैठक; बैठकीची मोठी सतरंजी; पांघरण्याचा रग. पहा : **फरस** ५. २. चिरेबंदीची जमीन.पहा : **फरस** २

**फर्शावा** पु. फरासखान्याचे सामान. [अर. फर्श]

**फर्शूल** न. लहान कुऱ्हाड. [सं. परशु]

**फल** न. १. पहा : **फळ** १–५,७. २. (गणित) त्रैराशिकातील दुसरे व चौथे पद; दिलेले प्रमाण, दर व उत्तर; प्रमाणांक व उत्तरांक. ३. वर्तुळाचे क्षेत्रफळ. [सं.]

**फलक** पु.१. फळा; सर्वांना वाचता यावे म्हणून नोटीस, माहितीपत्रक ज्याच्यावर लावतात ती फळी. २. आकाश. [सं.]

**फलकट** न. १.पोकळ धान्य. पहा : **फोलकट.** २.अशा धान्याची रास. वि. असार; व्यर्थ; फोल; खोटे; वायफळ.

**फलकणे** उक्रि. (वेळूचे) दोन भाग करणे; फाळणे.[सं. फल्= फाटणे]

**फलकयंत्र** न. जमिनीची पाहणी करण्यासाठी फिरता गोलाकार फलक असलेले साधन.

**फलकाई** स्त्री. फलफल पदर हलवत चालणारी स्त्री.

**फलकारा–वा** पु.१.पदराचा वारा.(व.)२. वाऱ्याने उडणारा पदर. (वा.)**फलकारे मारणे**–उगीचच इकडून तिकडे ये-जा करणे; मिरवणे.

**फलकोश** पु. वृषणावरचे कातडे.

**फलग्रंथ** पु. शकुन, मुहूर्त, लक्षणे यांची शुभाशुभ फले सांगणारा फलज्योतिषाचा भाग किंवा ग्रंथ.

**फलज्योतिष–ष्य** न. आकाशस्थ ग्रहांच्या स्थितीचे माणसाच्या आयुष्यावर होणारे परिणाम सिद्धांतरूपाने सांगणारे शास्त्र.

**फलटी** स्त्री. फळी. (को.)

**फलतंत्रशास्त्र** न. फळांवर त्यांचे मूल्य व टिकाऊपणा वाढावा या दृष्टीने प्रक्रिया करण्याच्या तंत्रांचे शास्त्र.

**फलत्यागी** वि. ऐनवेळी दगा देणारे; अवसानघातकी.

**फलद्रूप** वि.१.फायदेशीर, परिणामकारक झालेला; सफल.[सं.फलद्+रूप]

**फलन** न.१.(व.शा.) एका पुंयुग्मकाचे दुसऱ्या स्त्रीयुग्मकाशी मीलन होऊन बीजांकुरण होण्याची क्रिया. २. लैंगिक प्रजननक्रियेत नर आणि मादी यांच्या युग्मकांचे होणारे फलदायी मीलन; स्त्रीबीज व पुंबीज यांचा संयोग होणे. ३. (गणित.) एखादे चल पद घेऊन त्यावर गुणाकार, घात इ. क्रिया करून तयार झालेली पदावली.

**फलन्यास** पु. फलत्याग; निष्काम कर्म.

**फलप्रदान** न. विवाहातील एक विधी. वाङ्‌निश्चयाच्या वेळी नवऱ्याच्या वडिलांनी नवरीच्या ओटीत नारळ घालणे.

**फलप्रामाण्यवाद, फलवाद** पु. संकल्पनांचा अर्थ निश्चित करण्याची एक पद्धती.

**फलभित्ति–त्ती** स्त्री. फळावरील तिहेरी आवरण; फळांच्या बियांवरील आवरण.

**फल(ल्ल)म** पु. १.सोन्याचे लहान नाणे. हे पुतळीपेक्षा कमी किमतीचे म्हणजे सुमारे तीन रुपये किमतीचे असते. होनाचा दशांश. २. पूर्वी दक्षिण भारतात रूढ असलेले चांदीचे लहान नाणे; फनम. [हिं.]

**फलराशी** स्त्री. पहा : **फल** २

**फलवा** पु. एक औषधी वनस्पती. [हिं.]

**फलविज्ञान** न. फळाची उत्पत्ती, वाढ यांचा अभ्यास करणारी ज्ञानशाखा.
**फलशोभन** न. गर्भाधानविधी.
**फलश्रुति–ती** स्त्री. १.एखादे व्रत, स्तोत्रपठण यांसारख्या पुण्यकारक कृत्यांपासून मिळणारे फळ सांगणारे शास्त्र, ग्रंथविभाग. २. फायदा; निष्पत्ती.
**फलसंस्करण** न. फळे, फळांचे रस टिकवण्याची प्रक्रिया.
**फलक्षमन** न. एखादी क्रिया करण्याची, त्यातून लाभ मिळवण्याची क्षमता, योग्यता.
**फलं(लां)ग** स्त्री. उडी; टांग. (क्रि. मारणे)
**फलंदाज** पु. (क्रिकेट) 'विकेट'जवळ गोलंदाजाने टाकलेला चेंडू बॅटने अडवणारा किंवा मारून धावा काढणारा खेळाडू.
**फलंदाजी** स्त्री. (क्रिकेट) या खेळात बॅटने खेळून धावा काढणे.
**फलाकन** गोफण.
**फलाखी** स्त्री. वैपुल्य; समृद्धी. याउलट हलाखी. [फा.फराखी]
**फलाट** पु. आगगाडीच्या व बसच्या प्रवाशांची व मालाची चढउतार करण्यासाठी बांधलेली जमिनीपासून २–३ फूट उंच अशी जागा, कट्टा, धक्का; (इं.) प्लॅटफॉर्म.
**फलाटिण, फलानेल, फलानी–णी** स्त्री. लोकरी, मऊ वस्त्र, कापड. [इं.फ्लॅनेल]
**फलाणबिस्तान** न. १. सटरफटर वस्तू; अडगळ. २. निरर्थक, फालतू गोष्टी. [फा. फलान् द्वि.]
**फलाणा** पु. हिरवा चणा.
**फलाणा–ना** सना. अमुक; अमका; कोणी; काही (तुच्छतादर्शक शब्द). [फा. फलान्]
**फलाणाबिस्ताना** वि. अमुकतमुक; कोणीतरी.
**फलादेश,फलात्कार** पु. लाभ; प्राप्ती; फळ; परिणाम.
**फलानुमान** न. १.अटकळ. २. रोगाच्या चढउताराचा अंदाज.
**फलाफल** न. फायदा–तोटा; नफा–नुकसान.
**फलाफला** क्रिवि. लगबगीने; मिरवत.
**फलाहार** पु. थोडा उपाहार करणे.पहा : **फराळ**
**फलांडी** स्त्री. डोलीच्या उभ्या वाशाच्या टोकांना बांधलेले लाकडाचे आडवे वासे प्रत्येकी. (को.)
**फलिका** स्त्री. दुकाने, बँका वगैरे ठिकाणी देणारा व घेणारा यांमध्ये असलेली फळी; (इं.)काउंटर.
**फलित** न. गर्भित अर्थ; ध्वनी.
वि.१.फळ आलेला (वृक्ष, वेल इ.).२. फलद्रूप झालेला. ३. ध्वनित, गर्भित, अध्याहृत (अर्थ).
**फलित प्रेरणा** दोन किंवा अधिक प्रेरणांच्या इतकेच कार्य करणारी प्रेरणा; परिणत, फलोन्मुख प्रेरणा.
**फलिया** पु. डोक्याला बांधण्याचा फेटा. (भिल्ली)
**फली** स्त्री. तुरी; टाळी : 'स्थैर्येंसीं हाता फली। मेलौनि जाये।'–ज्ञा ६.१४३.
**फलुस** स्त्री. फळातील साखर. ही साध्या साखरेपेक्षा गोड व पचनास हलकी असते.
**फले** न. स्पर्धा : 'महाकालेंसिं फलें। कवण करी।' – ज्ञा ११.४००.
**फलोपभोग गहाण** गहाण ठेवलेल्या वस्तूचा गहाण स्वीकारणाऱ्याला उपभोग (वापर, सेवन इ.) घेता येतो असे गहाण.
**फलोपयोग** पु. दुसऱ्याच्या मालमत्तेचा उपभोग घेण्याचा अधिकार.
**फल्गु** वि.(ल.)१. क्षुद्र; तुच्छ. २. असार; निःसत्त्व. [सं.]
**फल्लर** वि. विस्तारलेले (झाड).(झाडी)
**फल्ला** पु. सोगा; डोक्यावरील रुमालाचा पाठीवर सोडलेला पदर.
**फवणे** क्रि. प्राप्त होणे; फावणे; मिळणे : 'माझी सुखसंगती न फवेची।'ह्व एभा १२.१६३.
**फवारणी** स्त्री. पिकावरील कीड नष्ट होण्यासाठी त्याच्यावर द्रवरूप कीटकनाशकांचा फवारा करणे.
**फवारा** पु.१. पाण्याचे उडणारे कारंजे; किणकिणी. २. कारंज्याचे तोंड, छिद्रे असलेले बोंड. ३. कारंज्याच्या छिद्रांवाटे उडणारा द्रव. [अर.फव्वारा]
**फशाळ–ळा** वि. १. फसवलेला; वंचित. २. लुबाडला गेलेला.
**फशाळी** स्त्री. फसवणे; ठकवणे; लबाडी करणे; फसवणूक; ठकवणूक.
**फशी** अ. जाळ्यात; फासात. (फासची अनियमित सप्तमी). (वा.) **० देणे, पाडणे**–फसवून संकटात, अडचणीत पाडणे; अडविणे; फसविणे. **० पडणे**– फसून संकटात सापडणे.
**फसकट** वि. उद्ध्वस्त.
स्त्री. गोंधळ.
**फसकटणे, फसकणे** अक्रि. निष्फळ होणे; सिद्धीस न जाणे (मसलत, योजना); फिसकटणे; सुटणे. [ध्व. फस]
**फसकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. धान्याच्या राशीत हात खुपसताना, फुटलेल्या पोत्यातून धान्य बाहेर सांडताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व. फस]
**फसकल** पहा : **फतकल** [हिं. फसकट]
**फसकली, ऊरुतली संगणक** लॅपटॉप; हातातून इकडेतिकडे नेता येणारा संगणक.
**फसकळ** वि. मऊ व दबणारा; एखादा पदार्थ फसकन आत जाईल अशी (दलदलीची जागा). [ध्व. फस]
**फसकी** स्त्री.१. भाजीपाला, धान्य या वस्तूंवर त्या विकणाऱ्याकडून सरकारी अधिकाऱ्याने वसूल केलेला कर (एका मणास एक पसा अशा तऱ्हेने घेतात); बाजारात विक्रीस ठेवलेल्या धान्यातील पसाभर धान्य उचलण्याचा हक्क. २.योग्य वजनावर किंवा मापावर दिलेले आणखी थोडेसे धान्य; वर्तावळा; केणे. ३. भाताचे माप घेताना मापाच्या मेहनतान्यासाठी, तसेच मापाच्या गणतीसाठी बाहेर काढण्यात येणारे दर मापागणिक एक ओंजळभर धान्य. खोताच्या नोकराला हा हक्क मिळतो. ४. काही विशेष प्रसंगी किंवा उजळणीच्या दिवशी शाळेतील विद्यार्थ्यांनी शिक्षकाला – पंतोजीला दिलेले ओंजळभर धान्य. ५. श्रावणी सोमवारी किंवा वर्षभरात प्रत्येक सोमवारी बायकांनी शिवाला वाहिलेली धान्याची मूठ. [हिं.]
**फसकी** स्त्री. दमडीच्या किंवा पैशाच्या चौथ्या हिश्श्याचे एक तांब्याचे नाणे.

**फसगत,फसगप(फ)त, फसगफलत, फसगयफ(ब)त** स्त्री. फशी पडणे; फसवणूक; लुबाडले, फसवले जाणे; गुंतून पडणे; गुरफटणे.

**फसण** स्त्री.१. चिखलाची रुपण, रुतण. २. जाळे; फासा; फसवणारी योजना; गोत्यात घालणारे काम..

**फसणी, फसणूक** स्त्री. १. चिखलात रुतणे. २. फसणे. पहा : **फसगत**

**फसणे** क्रि.१. रुतणे; गुंतणे; अडकून पडणे; फसकन आत जाणे (चिखल, रेती इ.मध्ये).२.(ल.) कारस्थानात सापडणे; संकटात, अडचणीत अडकणे.३. ठकविले जाणे.४. दिलेले कर्ज, ठेव बुडणे, नुकसान, तोटा होणे (धनको, व्यापारी यांचा). ५. (बेत, काम, उलाढाल, उद्योग इ.) प्रगती, भरभराट न होता मूळ पदावर असणे, राहणे; प्रतिकूल परिणाम होण्यासारखी स्थिती होणे. ६. अपयशी होणे. [हिं. फसना]

**फसफशी(सी)त** वि. १.स्निग्धता, चिकणाई नसलेला; सुका; भुसभुशीत (माती, पीठ, तपकीर, वाळू इ.). २. अतिशय ओला; थलथलीत; लबलबीत (पिठाचा गोळा, माती इ.). [ध्व. फस]

**फसफस** क्रिवि. लगोलग.

**फसफस-सा** क्रिवि. वाळूवरून किंवा दाट चिखलातून चालताना, पुष्कळ मुतताना, आंबलेल्या, फेस येणाऱ्या पदार्थांच्या होणाऱ्या फसफस आवाजाचे अनुकरण करून, होऊन.

**फसफसणे** अक्रि. १. फसफस आवाज होणे, करणे (फेस येताना किंवा जनावरे जोराने फळफळ मुतताना). २. आंबून फुगणे. ३. फेस येणे. ४. निराशा होणे. (कु.) ५. सिद्धीस न जाणे; फसणे (बेत, कार्य). [त. पोंगुदल्]

**फसमामला** पु. नुकसानीचा धंदा; फसवणूक, नुकसान होईल अशी गोष्ट.

**फसल, फस्ल** स्त्री. १. पिकाचा हंगाम, मोसम . २. पीक .३. घोड्यास पौष्टिक म्हणून दिलेला हरभऱ्याचा ओला चारा. ४. लहान मुलांचे पौष्टिक अन्न (तूप, खारीक). [अर. फसल्]

**फसल** स्त्री. कलम; परिच्छेद.

**फसली** स्त्री. १. बरगडी. २. एक प्रकारचा रोग. (झाडी)

**फसली, फस्ली** न. मुसलमानी कालगणनेतील वर्ष. याचा आरंभ मृगास म्हणजे ज्येष्ठात किंवा जून महिन्याच्या सुमारास होतो. फस्लीत मृगापूर्वी ५९१ व मृगानंतर ५९० मिळवले म्हणजे इसवी सन होतो. [अर., फा.फस्ली]

**फसवण-णी, फसवणूक** स्त्री. पहा : **फसगत**

**फसवा** वि. दिशाभूल करणारा; चुकीच्या मार्गाने नेणारा.

**फस(सा)विणे** उक्रि. ठगवणे; मोंदणे; अडकवणे.

**फसवेगिरी** स्त्री. (कायदा) ज्यात स्वार्थ असून दुसऱ्याचे नुकसान होण्याचा किंवा त्यास इजा होण्याचा संभव असतो असे कोणतेही वर्तन, कृत्य.

**फसाट** न. पु.अनिष्ट, वाईट परिणाम; नाश; घात. (क्रि. काढणे) (व.)

**फसाट** पु. पहा : **पसाट**; बैलगाडीच्या मागचा भाग. (ना.,व.)

**फसाटी** स्त्री. दोराला बांधलेला काट्यांचा भारा; फरळाचा फास (ज्वारीच्या पेरणीनंतर पडणारे वरम बुजवण्यासाठी). एका फसाटीत चार दोटे असतात.(व.)

**फसाडणे** उक्रि. फसणे; फसवणे.

**फसाती** वि. कत्तल झालेले.

**फसाद, फसादखोर, फसादी हे शब्द फिसादमध्ये पहा.**

**फसाफस-सा** क्रिवि. मोठ्याने फसफस करीत. पहा : **फसफस**

**फसालत** स्त्री. लबाडी; कपट; फिसाद.

**फसाव** पु. पहा : **फसण** १

**फसावा** पु. फसगत; फसविले जाणे.

**फसांडी** स्त्री. १. श्रमाने आलेला थकवा. (व.) २. फजिती.[ध्व. फस]

**फस्की** स्त्री.१. पहा : **फसकी**. २. बात; थाप. (गो.)

**फस्ट्** वि. चवचाल; एक शिवी.

**फस्त** स्त्री. १. इज्जत; अब्रू. २. भानगड. (गो.)

**फस्त** वि. पहा: **पस्त**; लुटणे, जाळणे, खाणे याप्रकारे पूर्ण विध्वंस, नाश झालेला; उद्ध्वस्त; ओसाड. [फा.]

**फस्त** स्त्री. न. शीर (नाडी) तोडून रक्त काढणे:'हकीमांनी फस्त सोडविली, तत्क्षणी प्राण निघोन गेला.' - दिमरा १.२५१. [अर.फस्द्]

**फळ** न.पु.१.झाडाला, वेलीला येणारे फळ. (याचे लक्षणेने बरेच अर्थ होतात.) २. (ल.) संतती; अपत्य; मूल. ३. फायदा; लाभ. ४. प्राप्ती; निष्पत्ती; कोणताही व्यापार, क्रिया यांपासून निष्पन्न होणारी गोष्ट. ५. परिणाम; शेवट. ६. भाला, बाण इ. शस्त्राचे टोक; हत्याराचे पाते. ७. नांगराचा फाळ. ८. पहा : **फलप्रदान**. ९. आषाढी अमावास्येला करतात तो उकडलेल्या पिठाचा अर्धगोलाकृती खाद्यपदार्थ.१०.कन्यादानाचा विधी; साडे. ११. तेलफळ :'तों निजगजरेंसीं फळ। यादव घेऊन आले तात्काळ।'- ह २४.१२६.१२.पहा : **फल** २,३.१३. कुंभाराचे थापडणे. [सं. फल](वा.)**फळास-फळां येणे** - फलद्रूप, सफल, सार्थक होणे; फायदा मिळणे; फायदेशीर होणे.

**फळकट-र** वि. फळण्याच्या वयात आलेली; गर्भधारणेच्या स्थितीस पोचलेली (गाय, म्हैस).

**फळक(ग)ट** वि.१. गबाळेपणाने घातलेला (पोशाख). २. अव्यवस्थितपणे चालवलेले (काम).३. भोंगळ; शिथिल; ढिले(आचरण). ४. हलके; निःसत्त्व; असार (भूस इ.). न. फोलकट; फोल; फलकट.

**फळकट** न. (तुच्छतेने) फळी.

**फळक(ग)टनेशा** वि.(पोशाखात) नीटनेटका नसलेला; अव्यवस्थित.

**फळकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. मूत्र, रक्त, दूध, पाणी, धान्य, वाळू यांसारख्या पदार्थांचा लोट अचानक बाहेर पडताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन.

**फळकर** वि. गाभण राहिलेली.

**फळकवणी** न. (निंदार्थी) पाणी जास्त झालेला पातळ पदार्थ (ताक इ.).

**फळकुटी-कूट, फळकुटणे** स्त्री.न. ढलपा; लहान फळी.

**फळण** स्त्री. जनावरांचा वर्षातील फळण्याचा काळ, हंगाम.

**फळणावळ** स्त्री. (गाय, म्हैस) फळवणाऱ्याला दिलेली किंमत, पैसा.

**फळणी** स्त्री. मादीचे फळणे; गर्भधारणा.

**फळणी** स्त्री.(दारे, खिडक्या) झाकण्याची क्रिया. (को.)

**फळणी** स्त्री. धूळ घातलेली लिहिण्याची पाटी; धूळपाटी. (गो.)

**फळणे** अक्रि. १.(शब्दशः व ल.)फळ येण्याच्या स्थितीत असणे. २. (ल.) लाभदायक; सफल होणे (काम, युक्ती).३. प्रसन्न होणे; पावणे (दैव). ४. समृद्ध, भाग्यवान होणे (मनुष्य).५. पुरे होणे; फळास येणे. ६. (गाय, म्हैस इ.मादी) नराकडून संभोगली जाणे; गाभण राहणे.

**फळणे** उक्रि. झाकणे; बंद करणे (दारे इ.).

**फळताड** पु. फळे धरणारे ताडाचे झाड. हे मादी प्रकारातले असते.

**फळपण** न. फळातील रस.

**फळपाक** पु. १. परिपक्वता: 'जेधवां द्राक्षी दूध घातलें । तेधवां वायां गेलें गमलें। परि फळपाकीं दुणावले।'- ज्ञा १५.५५८.२. परिणाम. ३. फळांचा साखर घालून शिजवून केलेला पदार्थ.

**फळ(ळा)फळ–ळा** पहा : **फळकण**

**फळपुसी** पुसीस फेड सांगणेचा हिशोब. – तंजा.

**फळफळणे** अक्रि. १.पुष्कळ आणि आवाज करून मुतणे (जनावर). २. भळभळ पाणी सोडणे. ३. घळघळ वाहणे; जोराने बाहेर येणे (पिशवीतून धान्य इ.). ४. प्रसन्न होणे; पूर्ण अनुग्रह असणे; उदयास येणे, उघडणे (दैव). ५. फायदेशीर असणे. [ध्व.]

**फळफळाट** पु. १. उत्कर्ष; भरभराट. २. सद्दी. ३. विपुलता; समृद्धी.

**फळफळावळ, फळफळोरा** स्त्री. (समुच्चयार्थी) अनेक प्रकारची फळे.

**फळफळीत** वि.१. कठीण व प्रत्येक कण वेगळा झालेला; फार मोकळा; फडफडीत (भात इ.). २. वाळलेला व भुसभुशीत (अपुरा भिजवलेला चुना, माती). ३. फार पातळ; पाणचट (ताक).

**फळभाग** पीक. (तंजा.)

**फळभाजी–शाक** स्त्री. ज्यांच्या फळांचा भाजीसाठी उपयोग होतो अशी भाजी. उदा. वांगी, भोपळा, दोडका इ.

**फळमूळ** न. फळाचा देठ.

**फळयेतण** न. गर्भाधान. (गो.)

**फळवला, फळोला** पु. वर्णांच्या क,च, ट, त, प ह्या वर्गांपैकी प्रत्येक.

**फळवाट** स्त्री. (चर्मकार.) चामडे कापण्याची फळी.

**फळा** पु.१.नांगराचा फाळ. २.दगड, लाकूड इ.ची शाळेत शिकवताना खडूने लिहिण्यासाठी वापरण्याची मोठी फळी. ३. (ल.) वाळल्यानंतर ज्याचा कागद होतो अशा द्रव्याचा (ताग इ.) थर. [सं.फलक]

**फळा,फळाटी** स्त्री. १. मडक्याच्या काठाजवळचा भाग ठोकायचे साधन, हत्यार; थापटणे. २. पळाटी.

**फळाफळ** स्त्री. दुकाने, दारे, खिडक्या घाईने बंद करणे.(को.)

**फळावणे** फुलणे; फलणे.

**फळिआ** पु. देवतांची सुखदुःखरूप फळे भोगणारा : 'या चौ मुक्ती मिळौनि फळीयांची चतुर्विध सुखें असति.' – अली १४९. [सं.फलिन्]

**फळी** स्त्री.१. लहान फळा; लाकडाची रुंद पट्टी; चेंडू मारण्याचे लाकूड; तक्ता. २. रंधलेली पट्टी. ३. दार, खिडकी इ.चे पान, झडप. ४, बाजू; पक्ष. ५. ओळ; रांग; दुसरा कोणी आत शिरू शकणार नाही अशा तऱ्हेने, मध्ये अंतर न सोडता केलेली रांग. (क्रि. धरणे, बांधणे, फुटणे, येणे.) ६. समूह; संघ; जूट; कंपू. ७. झोंबी; युद्ध. (क्रि. घेणे) : 'जया केसरी पाहतां अश्रु गाळी। करी मत्त त्यासी फळी घे शृगाळी।'– वामनविराट ७.८. ८. खेळ. ९. विणकाम ठासून बसण्याकरता ठोकण्याचे साधन. १०. धडक. ११. टाळी; तुरी : 'जी स्थैर्येसीं हाताफळी मेळौनि जाये।' –ज्ञा ६.४१३. १२. खेळी; डाव; स्पर्धा. १३. आकृती :'परमानंदाची फळी :चैतन्यें घडिली :'–शिव ३६७. (वा.) ० **घेणे**–युद्धास सिद्ध होणे. ० **फोडणे**–प्रतिपक्षाच्या पाटीत घुसणे. ० **मांडणे**–सैन्याची रांग युद्धास उभी करणे. [सं.फलिका]

**फळीघर** न. लाकडाच्या फळ्या वापरून बांधलेली खोली; (इं.) केबिन.

**फळे** न.१. सारीपाटाचा डाव; त्यातील खेळी :'फळें मोडैल : कां चेइल:' – लीचपू १९८. २. स्पर्धा.

**फळे** न.१.ओबडधोबड कापलेली फळी.(को.) २. साध्या फळीचा केलेला ओबडधोबड झोपाळा. ३. सुकाणू. ४.विहिरीत तळभागी बसवलेली लाकडी चौकट. ५. माती ओढण्याची फळी; शेतीचे एक प्रकारचे औत. (वा.)० **पडणे**–पिशाचबाधेमुळे बेशुद्ध पडणे. (कर्त्याची षष्ठी).

**फळेकार** पु.१.ढालधारी : 'कोतकार मोडले : फळेकार खोंचले:'ह्व रुस्व २६२६. २. एक पक्षिविशेष.

**फळॅं** न. फळी.(गो.)(वा.) **फळ्यार बसवप**–एका जागेवर गप्प बसवणे.

**फळ्यांचा खेळ** आट्यापाट्यांचा खेळ.

**फंगरूड, फंगाड** न.पु.१. कुत्सित कल्पना काढून आणलेली हरकत. २. भरकटलेले भाषण. ३. काही विचित्र किंवा पोरकट कल्पना.

**फंगस** न. बुरशी. [इं.]

**फंजट, फंजर(रू)ट, फंज्या** न.स्त्री.अव. पोचट. (विरू.)पहा: **पंजट**

**फंट** पु. मोठी फांदी. (झाडी)

**फंटी** स्त्री. शिंदीची मोठी झावळी.

**फंटूस,फंटोक** वि. लबाड; लुच्चा; लफंगा.

**फंड** पु. संपत्ती; पैसा; द्रव्यनिधी. [इं.]

**फंडगुंड** पु. भिकारी.

**फंद** पु. एक छंदासारखा दागिना.

**फंद** पु. घमेंड.

**फंद** पु. १. कट; बेत; बंड; कारस्थान (बहुधा वाईट गोष्टींचे, सरकारच्या विरुद्ध). (क्रि. रचणे, करणे, योजणे.) : 'वादभेद निंदा हे फंद काळाचे। गोवितील वाचे रिकामिकें ।'ह्व तुगा ३५७. २. दुर्गुण; व्यसन; वाईट सवय; ढंग (द्यूत, जुगार, परस्त्रीगमन इ.). ३. छंद; नाद; खोड :'दे टाकुनि हे छंद वावुगे । फंद विषयाची काय मजा।'–अफला ६१. ४. प्रेमसंबंध; चोरून परस्त्रीशी संबंध ठेवणे :'वाटतो तुशी करावा फन्द। गडे हा पूर्वीचा ऋणानुबंध ।'– पला ३२.५. धुंदी; उन्माद : 'यशाच्या फंदांत निमग्न झाले होते, तों गर्वाचें घर खालीं.'– भाब ८२. ६. फसवणूक. ७. थट्टा; कुचेष्टा.-शर. ८. ढोंग. (झाडी) [फा.]

**फंद** वि.कृत्रिम. (तंजा.)

**फंदतरु–रू** वि. फंदफितुरी, कारस्थान करणारे.

**फंदफितुरी–फितूर** स्त्री.पु. (व्यापक) बंड; दगलबाजी; कट; स्वामिद्रोहाचे कारस्थान.

**फंदफुरई** स्त्री. १. बंडखोरीबद्दल दंड. २.फंदफितुरी.

**फंदर** गहू ओले करून कांडप केल्यावर निघणारा कोंडा.

**फंदा** पु.१. फास. २. सूत जमणे. [हिं.]

**फंदी** वि.१. वाईट नाद असलेला; छंदी; व्यसनी. २. दगलबाज; फंदफितुरी करणारा:'दोघेही फंदी व मकरी.'– मइसा १९.१००.३. विलासी; शौकी; चैनी. ४. लुच्चा. (व.)

**फंदी** वि.नाटकीपणे वागणारा. (तंजा.)

**फंदीछंदी** वि. (प्र.) छंदीफंदी; दुष्ट, कारस्थाने रचण्याकडे प्रवृत्ती असलेला.

**फंदीफाकडा** वि. छानछोक; नखरेबाज; चैनी; विलासी.

**फाइ** क्रिवि. उद्या :'मग मना येईल तें कीजे । फाइचां दिवसीं ।'– क्रिपु २.१०.११७.

**फाइ(ई)ट** स्त्री.पु. ठोसा. [इं.]

**फाई(इ)ल** स्त्री.न. १.नोंदवही; कागदपत्रांची चोपडी; पत्रे, कागद, संदर्भ सुलभ रीतीने लावून ठेवण्यासाठी केलेले पुठ्ठ्यांचे आवरण. २. (संगणक.) एखाद्या विषयाची किंवा अनेक गोष्टींची एकत्रित माहिती, संकलन.[इं.] (वा.)० **करणे**– १. कागदपत्र; तक्रार नुसती ठेवून घेणे, त्यावर कारवाई न करणे, गोठवणे. २. दाखल, नोंद करणे.

**फाईलकरी** पु. फाइली लावण्याचे काम करणारा.

**फाउरी** स्त्री. आभास : 'नीळिमा अंबरीं । का मृगतृष्णालहरी । तैसा वायां चि फाउरी ।'ह्व ज्ञा १३.१०५.

**फाउंट, फाँट** स्त्री. मुद्राक्षराचा आकार.

**फाउंड्री** स्त्री. पहा : **फौंड्री**

**फाऊल** पु. चूक; दोष. (झाडी) [इं.]

**फाक** न. कोवळे फळ. पहा : **फ(फं)क**

**फाक** स्त्री. १. आंबा, खरबूज, कलिंगड यांसारख्या फळांचा किंवा सुरण इ. कंदांचा फुलाच्या पाकळीसारखा लांबट तुकडा,फोड.२. शिमग्यात बोंब मारण्यापूर्वी उच्चारतात ती बीभत्स वाक्ये, शिव्या. ३. घोणस किंवा फुरसे यांसारख्या सापांच्या अंगावरील पट्टे, डाग. ४. विस्तार:'हें बहु जें जें जल्पिजेल। तेथें कथेसि फांकु होईल।'– ज्ञा ५.१७३.

**फाक** वि. कफल्लक. (झाडी)

**फाक** पहा : **फाका** (फाके असे अनेकवचन प्रचलित).

**फाकट** न.साधारण, कसेतरी केलेले,ओबडधोबड झाप, दार, फाटक. वि. फाकलेले; इतस्ततः पसरलेले; रुंदावत गेलेले (पाय, शिंगे, फांद्या).

**फाकट** वि. फालतू; निष्फळ; व्यर्थ; निरुपयोगी; फाकड.

**फाकटणे** क्रि. लागणे.

**फाकटणे** अक्रि. पसरणे; (पाय, दुबेळके इ.) दोन अवयव मध्ये ताण बसेल असे दोहोकडे पसरणे. [सं.प्र+कृत्]

**फाकटी** स्त्री. पाय किंवा दोन अवयव फाकटल्यामुळे होणारी स्थिती; फेंगडेपणा, रुंदावलेली स्थिती; मोठा तणाव; ताण.

**फाकड** न. वाकडे, तिढ्याचे, हरकतीचे, वितंडवादाचे बोलणे; आडफाटा; हरकत; फंगरूड; फरडूक. [सं.फक्क; हिं. फाकी]

**फाकडा–डी–डू** वि. १. फक्कड; चलाख; पाणीदार; तडफदार. २. हुशार; कुशल; निष्णात. ३. ऐटबाज; अक्कडबाज. ४. सुंदर; गुलजार; मारू; फक्कड. [सं.फक्किका]

**फाकडी** वि. वितंडवाद घालणारे; हरकती असणारे, फाटे फोडणारे (भाषण, माणूस).

**फाकणे** अक्रि.१.निरनिराळ्या दिशांनी सर्वत्र पसरणे; विस्तार पावणे; सर्व जागा व्यापणे. २. विसकटणे. ३.भटकणे; सैरावैरा जाणे; एकाच ठिकाणी केंद्रीभूत न होता चहूंकडे पसरणे (दृष्टी, बुद्धी, ज्ञान, मन). ४. फुलणे : 'एऱ्हवीं जाईंचियां फुलां फांकणे ।'– ज्ञा १८.२५७. ५. विषयांतर करणे; पाल्हाळ लावणे. ६. दूर होणे; वियोग होणे.७. रुंदावणे; ताणले जाणे, असणे;वळण, बाक निर्माण होणे; रुंद व विस्तृत होत जाणे (पाय, शिंगे, फांद्या, रस्ते इ.). ८. मनात इच्छा निर्माण होणे; इच्छा दूरवर पोचणे, जाणे. ९. वितुळणे; आसरणे (घट्ट बेडका); पातळ होणे; द्रवणे (थिजलेले रक्त). १०. वाढणे; वृद्धिंगत होणे. ११. प्रकाशित होणे (दिशा). उक्रि. फोडी करणे; फाकी करणे. [सं. स्फातीकृत]

**फाकणे** उक्रि. हातात घेऊन तोंडात भरणे; फक्क्या मारणे (पोहे इ.). [सं. फक्किका]

**फाकताई** घोड्याचा रंग. – अश्वप १.२८.

**फाकरूट** न. वाक्य; परिच्छेद; कलम; निबंधातील एक पूर्ण भाग; प्रकरण.

**फाकरूट** न. चंद्रसूर्याभोवती पडणारे बरेच विस्तृत खळे.

**फाकविणे** क्रि. पळवून नेणे.

**फाकल(ळ)णे** अक्रि. तुकडे करणे.

**फाकळी** स्त्री.१. फाक; फोड; छकल; शकल; पाकळी. २. (लाकडी) पट्टी; फळी.

**फाका** पु. तोंडात बकाणा भरण्यासाठी हातात घेतलेला पदार्थ (पीठ, साखर इ.).

**फाका** पु. १. उपास; जेवणाचा खाडा. २. दारिद्र्य [अर.फाका=दारिद्र्य, अभाव] (वा.) **फाके मारीत बसणे**– उपाशी राहणे. वि. रिकामा; निरर्थक; फुकट; रिता; कोरा; कोरडा.

**फाकाटणे** अक्रि. फाकणे; वेगळे होत जाणे; एकमेकांपासून अलग असणे.

**फाकाफाक** स्त्री. विस्कटलेली, उधळून गेलेली स्थिती, अवस्था; दाणादाण, पांगापांग; अस्ताव्यस्त पसारा.

**फाकावा** पु.विकास :'अविद्या नाशी उन्मेखु। फांकावा तैसा।'–अमृ ६.६०.

**फाकी** स्त्री. १. पूर्ण वाक्य; पूर्ण सिद्धांत, विधान. पहा : **फक्किका**. २. प्रकरण; विभाग. ३. ओळ, पंक्ती (काव्याची).

**फाकी** स्त्री.१. वाघ, कांडर, मांजर यांच्या अंगावरील पट्टा. २.(चर्म.) अर्धे कातडे; अधोड.

**फाकी** स्त्री. गप्प. (गो.)

**फाकेकशी–सी** स्त्री. उपासमारी.

**फाकेकंगाल, फाकेमस्त** वि. भुकेकंगाल; अठरा विश्वे दरिद्री. (ना.)

**फाकेबाज, फाकेमस्त** वि.१. दारिद्र्याने गांजलेला असून बाहेर तसे न दाखवणारा. २. थोर मनाने पूर्वीप्रमाणेच वागणारा.

**फाकेशीर** वि. उपाशी.

**फाक्ता** पु. घोड्याचा रंग. – अश्वप १.२७.

**फाक्या** वि. १.उडाणटप्पू. २.फाजील; चैनी; चंगीभंगी; फक्कड. ३. निर्धन. (झाडी)

**फाग, फागडा** पु.१. होळीच्या उत्सवात म्हटली जाणारी गाणी; वेश्या-कंचनी म्हणतात ती शृंगारपर गाणी; लावण्या. २. शिमग्यातील अपशब्द; अश्लील वाक्प्रयोग; उखाणे. पहा : **फाक.** ३. (सामा.) होळीचा सण; शिमगा. [हिं.; सं. फल्गु]

**फाग** न.(विशेषतः काजूचे)कोवळे फळ; फक; फंक.

**फागल** न. एक कार्ल्यासारखी फळभाजी व तिची वेल.(कु.)

**फागवा** पु. धुळवड; शिमगा. (झाडी)

**फागुर** पु. अंकुर; फूट. (गो.,कु.) पहा : **पागोरा**

**फागोटा** पु. पोफळीच्या तुऱ्याचे वेष्टण; पोफळीवरील शिंपूट ज्या विरीच्या आतल्या बाजूला गुंडाळलेले असते त्याचे पातळ आच्छादन.(को.)

**फाजल** वि. विद्वान; शहाणा. [अर. फाझिल्]

**फाजील** वि.१. वाजवीपेक्षा जास्त, अधिक; जादा.२. उत्पन्नात वाढलेले (द्रव्य). ३. शिल्लक; उरलेले. ४. चावट; अतिप्रसंग करणारा; वायफळ बोलणारा; अशिष्ट. [अर. फाझिल्]

**फाजील** पु. कर्ज : 'उमेदसिंगाचे बंदुकांचा मजकूर लिहिला त्यास फाजील त्याजकडे येणे आहे.'- ऐलेसं ५८६९.

**फाजीलदार** पु. कर्जे किंवा उसन्या रकमा देणारे सावकार.

**फाट** न. (पटवेकरी) गोंड्यासाठी उपयोगात येणारे खरे रेशीम.

**फाट** स्त्री. (घाण्याला जुंपलेली बैलांची) जोडी.

**फाट** पु. बंदुकीचा बार; फट्; एकदम होणारा आवाज. [ध्व. फट्]

**फाट, फाटफट-टी** स्त्री. पहाट. (कु.)

**फाट** स्त्री. पाठ; मागील भाग. (गो.)

**फाट** पु.स्त्री.१.हरकत; अडथळा; आडफाटा. २. दोष; अपुरेपणा. (क्रि. घेणे).३. भाषणात, लेखनात पूर्वोत्तर पडलेला स्पष्ट विरोध, अंतर, फरक. ४. जुळत आलेल्या पंचायतीसारख्या व्यवहारात प्रतिकूल होणारा मनुष्य; (भागीदार किंवा मित्र यांचे) वेगळे होणे. ५. फूट; वियुक्तता; बिघाड; शत्रुत्व; परस्परभिन्नता. ६. भेग; उकल; तोंड; भगदाड; फट; अंतर. ७. (सराफी) मोत्याच्या वरच्या बाजूचा फुटका भाग; भेग.८. (गवंडीकाम) दरवाजे अगर खिडक्यांची दारे उघडण्याकरता सोडलेला भिंतीचा उतरता भाग; दारामागील पसरट भिंत.(बे.)(वा.) **० करणे**- फळी फोडणे : 'गिलच्या मागावर असता फाट करून जावयास निभाव कसा होईल ?' - भाकै २१.

**फा(फां)ट** पु.(नाविक) वल्ह्याने नावेचे तोंड फिरवणे, मागे चालवणे. (क्रि. धरणे, करणे.)

**फाटक** न. जुनेर; जुने, फाटके वस्त्र.(वा.) **फाटक्यात पाय घालणे, शिरणे,जाणे**-एखाद्या वाईट गोष्टीत दुसऱ्या वाईट गोष्टीची भर पडणे.

**फाटक** न.१. साधे, ओबडधोबड दार; झापड; कवाड (बाग, कुंपण यांचे).२. रस्ता बंद करण्यासाठी रोवलेली उभी-आडवी लाकडे. ३. शहराची वेस; मुख्य दरवाजा.[हिं.](वा.) **० मना करणे**- प्रवेश, राबता बंद करणे.

**फाटकन** अ. चटकन.

**फाटकर** वि. जीर्ण; फाटके (वस्त्र). (राजा.)

**फा(फु)टकळ** स्त्री. फाटक्यातुटक्या, सटरफटर, किरकोळ चीजवस्तू. वि. १.फाटके; तुटके; जुने; जीर्ण. २. पडके; मोडके; टाकाऊ.

**फाटका-ला** वि.१.फाटलेला; भोके पडलेला; विदीर्ण.२. (ल.) खराब झालेले; उतरलेले; रोड; कृश(शरीर, परिस्थिती).३. मोडकळीला आलेला; क्षुद्र; हलका झालेला; गरीब; हीन (धंदा, व्यवहार). ४. नंगा. (व.)

**फाटकातुटका** वि. फाटलेला व तुटलेला; मोडकातोडका.

**फाटकूल** न. गप्पा.(कु.)

**फाटके** न.पु. अव. फांद्या; तुकडे; फाटे. (अहि.)

**फाटणे** अक्रि.१. टरकणे; चरकणे; (ताण बसल्याने कापड इ.चे) दोन भाग होणे.२.(ल.) फुटणे; दुभंग होणे; वेगळे होणे; भिन्न होणे; (एकतंत्राने वागणाऱ्यांच्यात) भेदभाव होणे.३. (काळजी, भीती, दुःख यांनी हृदय, छाती, काळीज) उलणे, विदीर्ण होणे; मोठा धक्का बसणे. ४. इतस्ततः पळणे; दाणादाण होणे:'जिकडे जिकडे पाहे तिकडे तिकडे भयें चमू फाटे ।'- मोशल्य २.७६. ५. (डोळे, नजर, मन, इच्छा) फाकणे; भटकणे; परिभ्रमण करणे; सैरावैरा जाणे. ६. (कफ, रक्त) वितळणे; फाकणे; पाणी होणे. ७. पोहोचणे : 'येथ जिथेचा हात फांटे। तंव जेवितां गमे गोमटें ।'ह्व माज्ञा १८.२४९. ८. नासणे (दूध):'कथा...दूध फाटते तशी फाटली.' - मिख १०. [सं. स्फट्]

**फाटफूट** स्त्री. १. छेद; फूट; चीर; तडा; दोरा (नाणे, भिंत, जमीन यातला). २. (भागीदार, सैन्य यांच्यातील) फूट; वेगळे होणे; जूट न राहणे; भिन्न दिशांना जाणे.

वि. तडा, चीर, दोरा असलेले; तडकलेले; भेगाळलेले (नाणे इ.).

**फाटफूट** न. १. फटाके, बंदुका वगैरेंचा होणारा आवाज. २.(ल.) लढाई. [ध्व.]

**फाटबाजू** स्त्री. कमानीच्या दगडाची पुढची व मागची सोडून इतर बाजू.

**फाटा** पु.१.अंकुर; फूट. २. हात; शाखा; फांदी; ओघ; प्रवाह; विभाग; कांड (झाड, नदी, रस्ता, डोंगर यांचा). ३. काना; रेघोटी; फराटा (लिहिलेले अक्षर खोडण्यासाठी त्यावर मारलेला).४. विषयांतर; अवांतर कथा.(क्रि. घेणे).५. अतिशय बडबड. ६.गैरहजेरी; अनुपस्थिती.(क्रि. देणे).७. लाकडे; सरपण. ८. लांब लाकडी दांडी; वासा. (ना.) ९. (नंदभाषा) रुपयाचा सोळावा हिस्सा;आणा.(वा.) **० उठणे** - वाढणे; भर पडणे. **० फुटणे**-१.(मंत्रचळ, पिशाच यांनी) वेड लागणे :'वीरभद्र म्हणे तूं काय करिशी। मरणकाळीं फांटा फुटला तुजशीं ।'- नव ७.३९.२. फाकणे; प्रसार होणे : 'जैसे डोळ्यां अंजन भेटे । तो वेळीं दृष्टीसी फांटा फुटे।'-ज्ञा १.२३.३. एका कामातून दुसरे काम निघणे.**०भरणे**-१.ब्रहकणे; बडबड करणे :'स्वधर्ममार्गी चालावया नर । वेदू स्वर्ग बोले अवांतर । ते फाटां भरले अपार । स्वर्गतत्पर सकाम ।'- एभा २१.३१८. २. भटकणे :'भ्रमणाच्या मोडी वाटा । न भरें फाटा आडरानें ।'- तुगा ३३८४. **० मिळणे**- वगळले जाणे; काढले जाणे.

**फाटा** पु.१. मुख्य रस्त्यापासून दुसरीकडे वळणारा उपरस्ता.२. रस्त्यापासून दूर असणाऱ्या गावासाठी त्या रस्त्यावर असणारा उपथांबा. ३. दिशा; मार्ग.

**फाटा** पु.१.नाश. २. उणीव.

**फाटाफा(फू)ट** स्त्री. पहा : **फाटफूट** २

**फाटार** पु. काढा : 'पेरूचे बीज वाटून त्याचा चहा अथवा फाटार प्यावा.'– फचि १३४.

**फाटी–टे** स्त्री. रुंद व उघडी टोपली; पाटी; हारा.

**फाटी** स्त्री.१.डहाळी; फांदी; लहान शाखा; फूट; लहान फाटा (झाड, नदी, रस्ता यांचा). २. फाटा; टाळा : 'देउनि प्रपंचासी फांटी।'– व ५२३. ३. **फाटा** ७

**फाटुकले** न. महाबळेश्वरच्या आसपास डोंगरावर आढळणारे एक फूल. एप्रिल-मेमध्ये याचा हंगाम असतो.

**फाटे** न. ज़ळाऊ लाकूड; सरपण; काटकी; ओंडा; ढलपा.

**फाटोवाड** पु. १. मोठेपणा. २. स्पष्टता; वेगळेपणा. वि. १. पुष्कळ. २. स्पष्ट.

**फाट्या** वि. अडथळे, विघ्ने, हरकती आणणारा.

**फाड** पु.१.(एखादा अवयव, पोट, गळू) कापण्याची क्रिया; कापून पाडलेली चीर; भेग; जखमेचा छेद. २.(ल.) शंकेचे निरसन. ३. एखाद्या विषयातील बारीकसारीक गोष्टींसह तो विषय स्पष्ट करणे; स्पष्टीकरण; विवेचन; फोड. ४. (एखाद्या व्यवहारातील, कामातील) गुंता नाहीसा करणे; उलगडा पाडणे. ५. पृथक्करण. ६. मार्ग; वाट; फट; प्रवेश. स्त्री.१. फोड; तुकडा.(को.)२.अर्धा चिरा; एकाच बाजूने घडून सारखा केलेला दगड; बांधकामासाठी वापरायचा दगड. [सं. स्फट्]

**फाड** न. पाचांचा समुदाय. पहा : **फाडे**

**फाड** पु. मोठी बरणी. (गो.)

**फाडकण–कन–कर–दिनी–दिशी–शिरी** क्रिवि. गालावर मारणे, फटाका उडणे या वेळी होणाऱ्या आवाजाचे अनुकरण करून, होऊन; ताडकन; भाडकन.

**फाडणे** उक्रि. १.विदारणे; टरकावणे; तुकडे करणे; चिरणे; फाटेल असे करणे. २. काढणे. (ना.)[सं. स्फाटय्] (वा.) **फाडून खाणे**– एखाद्यावर तुटून पडून त्रास देणे; छळणे. **डोळे फाडणे, फाडफाडणे**– रागाने, आश्चर्याने डोळे वटारणे. **पट्टी फाडणे**– कुळांकडील वसुलीची यादी करणे.

**फाडा** पु. (उजळणीतील गुणाकाराचा) पाढा.

**फाडा** पु.१. वस्त्राचा तुकडा. (गो.) २. माडाच्या अगर पोफळीच्या कांडाचा, लाकडाचा तुकडा. ३. विभागणी.

**फाडाफाडी** स्त्री. कापणे; चिरणे.

**फाडी–डे** स्त्री.न. ठरावीक नगांचे माप; विशिष्ट नगांचा समुदाय. साधारण पाच नगांची फाडी होते.

**फाडीकाम** न. (स्थापत्य.) थरांचे खांडकी काम.

**फाडीव** वि.१. ज्याचा काही भाग फाडलेला आहे असे (कापड); फाडून उरलेले. २. मूळ नगापासून फाडलेला, कापलेला, तोडलेला (भाग, तुकडा).

**फाडीवाडी, फाडो(डा)वाडे, फाडोवाड** क्रिवि.१. स्पष्टपणे; मोकळेपणाने. २. अनेक प्रकारे; पुष्कळ : 'ऐसें धन सांचिलें फाडोवाडें।' –एभा २३.८७.

**फाडोवाड** पु. १. मोठेपणा. २. स्पष्टपणा; भिन्नता वि. १. विपुल. २. स्पष्ट.

**फाडोवाडे** न. फावडे; खोरे.

**फाणपट** स्त्री. शेतकीची अवजारे.

**फाण(णू,नु)स** पु.न. कंदील; झाकलेला, ज्याला वारा लागत नाही असा काच बसविलेला दिवा. [अर. फानूस]

**फाणाफाण** स्त्री. १. पांगापांग; दाणादाण. २. फोडाफोड; फितुरी.

**फात** पु. कुणगा; जमिनीचा तुकडा. [पोर्तु. फातिआ]

**फा(फां)तर–री, फातोर** १. पाथर; कपडे धुण्याचा, अंघोळीचा दगड. २. चटणी, पुरण इ. वाटण्याचा पाटा. [सं. प्रस्तर]

**फातर** १. फळांची साल. (ना.) २.(निंदाव्यंजक, ग्राम्य) मुले.

**फातारे** न. वरवंटा.

**फा(फां)ती** स्त्री.१. फुलांचा गजरा, वेणी. (गो.)२. पावाचा पातळ तुकडा. [पोर्तु. फातिआ]

**फातुल्ली–ळी** स्त्री. गोटा; गुंडा. (गो.)

**फाते** न. जुडी; जुडगा; बंडल.

**फात्या, फातेहा** स्त्री. १. कुराणाचा आरंभ; कुराणातील पहिला सुरा (मृताकरता वाचतात); फात्याचे पठण. (क्रि.फोडणे) २. शुभारंभ. ३. नैवेद्य अर्पण; बळी. ४. प्रार्थना. ५.(निंदार्थी) अर्थशून्य बडबड. (क्रि. मारणे, देणे, करणे, पाडणे.) ६. गयावया; विनवण्या. (क्रि. फोडणे). [अर. फातिहा](वा.) **हलवायाच्या घरावर फात्या देणे–मारणे**– दुसऱ्याची वस्तू उदारपणाने देणे.

**फात्या** वि.१. बडवलेला (बैल). (को.) २. दुर्बळ; अशक्त.

**फात्रॅल** न. रॉकेल; केरोसीन. (गो.)

**फात्रांवचे** सक्रि. दगड मारणे. (गो.)

**फानवटा** पु. उन्हाळ्यात गुरे बांधण्यासाठी शेतात, अंगणात, झाडाखाली घातलेला मांडव. (को.)

**फान(नू)स** पु. कंदील; फाणस. [अर. फानूस]

**फापटपसारा** पु. १.वस्तूंची अस्ताव्यस्त स्थिती; बोलताना, लिहिताना मूळ विषयाला सोडून लावलेले पाल्हाळ. २. धंद्याचा, उद्योगाचा अवाढव्य विस्तार; कामाचे अवडंबर.

**फापटी** स्त्री. मंजिष्ठ; मंजिष्ठाचा रंग.

**फापटी** स्त्री. जमिनीचा खूप कमी रुंदीचा, पण लांबच लांब पट्टा.(अहि.)

**फापडणे** उक्रि. पाखडणे.

**फापडा** पु. विड्याचे रुंद व पसरट पान.

**फापडा** पु.१. एक गुजराथी खाद्यपदार्थ; डाळीच्या पिठाच्या तळून काढलेल्या पट्ट्या.२.शंभर रुपयाची नोट; कोरी करकरीत नोट. (अहि.)

**फापर** न. पसरलेला व्रण, जखम; त्वचेवर पसरलेले , चिडलेले खरूज, बिब्बा यांमुळे झालेले क्षत. [हिं. फांपड]

**फापर(स)णे** अक्रि. चोळवटणे; घासटणे; चिरडणे; दुर्गंधयुक्त पू येणे. [सं. पर्द, स्पश्]

**फापरा, फापा** वि. तोतरा; चोचरा; अडखळत बोलणारा.[ध्व.फा फा]

**फापरी** स्त्री. कुंडीत वाढणारी एक वनस्पती.

**फापरे, फाफर** न.स्त्री.लाथ :'काळिया पहुडला मंचकावरी। जावोनी हाणितला फांपरीं। कृष्णनाथें ।'- श्रीकृच १३३.

**फापशी** स्त्री. कुंभ्याच्या सालीचा वाख.

**फापसणे** सक्रि. १. (खाद्यपदार्थ) चिवडणे; इतस्ततः टाकणे. २. रागे भरणे; त्याची खरड काढणे.

अक्रि. (शरीराची त्वचा)दगडावर घासली जाणे; खरचटणे.

**फापावणे** क्रि. विस्तारणे; लठ्ठ होणे.

**फापाळे** न.१. विहिरीतून पाणी काढताना पाय देण्यासाठी घातलेले आडवे लाकूड. (कु.) २. ओढा ओलांडून जाण्यासाठी त्याच्या काठावर घातलेले माड-पोफळीचे तुकडे. (गो.)

**फापुडचे-णे** क्रि.१. झाडणे; केर काढणे; झटकणे. २. फोडणे; पसरून टाकणे. (गो.)

**फापुडणी** स्त्री. केरसुणी. (गो.)

**फाप्या** स्त्री. अव.१. स्फुंदणे; हुंदके; आचके. २. हळहळ, कुरकुर करीत बसणे. (क्रि. मारणे, देणे, करणे, फुटणे.)

**फाप्सावचे, फाप्सुंचे** सक्रि. १. उद्ध्वस्त करणे.२. नखांनी ओरखडणे. (गो.)

**फाफट** वि. पसरट : 'गोमटी। मुह फाफट ।'-राजिमती ३.

**फाफ(प)लणे** अक्रि.१.अडणे; ठेचकाळणे; ठोकर खाणे. २. उद्योग न करता हिंडणे.

**फा(फां)फा(फां) जावप** क्रि. उघडकीस येणे.(कु.)

**फाफावणे** अक्रि. विचलित होणे : 'तेयाची फाफावली। बुद्धि जैसी ।'- अमृ ५०५.

**फाफू, फांफु** न. १.मंत्र घालताना फुंकर घालण्याचा आवाज.२. (ल.) मंत्रतंत्र; गौडबंगाल; टाणाटोणा; गारूड; छाछू.[ध्व.] **० असणे-** १.खूप ताप असणे. (व.). २. धापा टाकणे; मोठ्याने श्वास घेणे. **० करणे-** उधळपट्टीने, भरमसाठ खर्च करून संपवणे (धन, धान्य). वि. १. संपूर्ण विझलेला (अग्नी). २. संपूर्ण थांबलेले किंवा कार्यान्वित नसलेले (यंत्र, कारभार). (अहि.)

**फाम** स्त्री. चित्ताची स्थिरता; अवधान; देहभान; शुद्धी; समज;अक्कल. [अर. फहम्]

**फाम** पु. ख्रिस्ती लोकांचा उत्सव. (गो.) [पोर्तु. फामा]

**फामटणे** क्रि. दपटणे.

**फामिंदा** पु. तुरा लावणी गाणारा; प्रकृतीवर परमेश्वराचे श्रेष्ठत्व आहे, असे सांगणारा तुरेवाला.

वि.१. फुशारकी मारणारा; गर्विष्ठ (माणूस).२. अतिशय, अट्टल लबाड; इरसाल; पक्का. ३. हुशार; तरबेज. [फा. फह्मीदा]

**फामिंदा-दी** स्त्री. पुरुषाप्रमाणे धीट व अधिकार चालवणारी स्त्री.

**फायदा** पु. नफा; लाभ; किफायत.

**फायनाबाज** वि. ऐटबाज; सुंदर :'मास्तरचं चंचीचं काम फायनाबाज.' - रैत ४.

**फायश** स्त्री. प्रसिद्धी : 'हे पत्र एकांती वाचून ठेवावें फायश जाल्यानें येथें सेवकाची पत राहणार नाहीं.'-मदबा १.११९. [अर. फाश]

**फाया** स्त्री. अव. १.झोक्याच्या दोन्ही दोऱ्या. २. दोनपेक्षा अधिक पदर किंवा सर. (अहि.) ३. नामसप्ताहाची वर्गणी. (अहि.)

**फाया** पु. अत्तराचा बोळा; अत्तर, औषध लावण्यासाठी बारीक चोईच्या टोकाला कापूस लावून देतात ती काडी. [हिं.]

**फायारने** क्रि. बदलविणे.

**फार** न. (बंदूक, तोफ यांचा) बार; भर; पेट. (क्रि. सोडणे, सुटणे.) [इं. फायर]

**फार** पु. १. मुसळाचा, बत्त्याचा घाव, प्रहार. (क्रि. देणे, लावणे, घालणे.) (राजा.) २. आट्यापाट्यांच्या खेळातील मारहाण. (गो.) ३. हाताची थाप : 'हळु द्वारावरी फारू मारिती ।'- क्रिपु २.५३.३.

**फार** वि. १. प्रसृत; विकसित. २. स्पष्ट; उघड : 'कां दोरी लपतां सापें। फार होइजे ।'- ज्ञा १५.३१०. ३.बहुत; पुष्कळ; विपुल. [सं. स्फार] (वा.)**० करणे**-विस्ताराने सांगणे.

**फार(रि)क(ख)त-ती, फार्कतनामा** स्त्री.न. १. कर्जफेडीचा कागद; पूर्ण भरपाईची पावती. २. मालमत्तेच्या भागावरील सोडलेल्या हक्काचा दस्तऐवज; सोडचिठ्ठी; संबंध तुटल्याविषयीचा कागद; वाटेपत्र; वाटपपत्र. ३. ताटातूट; असंबद्धता; विलगपणा. [फा. फारिघ् + खत्ती]

**फारकाय** स्त्री. फेड. (गो.)

**फारफीर** स्त्री. थोडेसे फिरणे; शतपावली. (झाडी)

**फारफेर** पु. एकमेकांतील कमी-अधिकपणामुळे पडणारे अंतर; ठळक बदल. पहा : **फेरफार**

**फार(रं)वचे, फारवूचे, फारीवचे** क्रि.भोक पाडणे. (गो.) पहा : **टोपचे**

**फारशी-सी** पु. इराणचा रहिवासी; पारसीक; पारशी लोकांचे इराणातील मूळ पुरुष.

स्त्री. इराणमधील भाषा.

वि. इराणविषयक; फारशी भाषेतील, भाषेचा, भाषेसंबंधी. [फा.]

**फारसनीस** पु. फारशी भाषा जाणणारा कारकून, चिटणीस.

**फारसे** वि. उदंड. (तंजा.)

**फारावणे** क्रि. वश करून घेणे. (कु.)

**फारांवचें** क्रि. उखळात सडणे, कांडणे. (गो.) [सं.प्रहार]

**फारांवचें** क्रि. बंदूक मारणे. (गो.) [इं. फायर]

**फारिद** वि.१. मुक्त; मोकळा. २. कर्जातून मोकळा झालेला.

**फारिंग** न. एरंडाच्या पानासारखी पाने असणारे एक प्रकारचे झाड.

**फारी** स्त्री. १. गोणीचा एक भाग. २. अंथरी; ज्यूटची सतरंजी. (झाडी, व.)

**फारीक-ख** वि.१. फेडलेले (कर्ज). २. मिटलेला; समेट झालेला; बंद पडलेला (भांडणतंटा, चौकशी)३. खर्चलेला; संपलेला; खाल्लेला(पैसा, धान्य, अन्न).४.पावता; चुकता झालेला; आदा. [अर.फारिघ्]

**फारूनफेरून** क्रिवि. या बाजूचे त्या बाजूला करून; फिरवाफिरवी करून.

**फारोळ** स्त्री. भानगड. (व.)

**फारोळा** पु. फाळा; चिंधी; चिरफळी; चिंधोटी.

**फारोळा-ळे, फारुळा** पु. न. १.पाभरीच्या दात्याचे, फणाचे लोखंडी टोक; फाळ. २. पुढे आलेले व फटी असलेले दात.

**फार्म** पु. शेत; जमीन. [इं.]

**फ़ार्मास** स्त्री. दवाखाना. (गो.) [इं.फार्मसी]

**फार्स** पु. १. सोंग; बतावणी; थट्टेचा प्रकार. २. प्रहसन; हलके-फुलके, हसवणारे नाटक. [इं.]

**फालकुनो** न. चांभाराचे एक साधन.

**फालगीर** पु. ज्योतिष किंवा भविष्य सांगणारा.

**फालणे** सक्रि. फाडणे; विस्तृत करणे: 'तो आंग फाली ।' – ज्ञा १८.६५२.

**फालतू, फालतूक** वि. १. जास्त; शिल्लक उरलेले; अधिक; अनावश्यक. २. पहा : **वरकड**. ३. बिनमहत्त्वाचा; क्षुद्र; सामान्य (माणूस). ४.विनाकारण. (झाडी) [हिं.]

**फालशी** न. फालशाचे झाड; पळशी.

**फालस** न. खोटे, बनावट मोती.

**फालसा** पु. उत्तर भारतात जास्त प्रमाणात आढळणारा एक पानझडी वृक्ष व त्याचे फळ. याची पिकलेली फळे पिंपरीच्या फळांसारखी असतात.

**फालसी** वि. काळपट लाल(रंग).

**फाला** पु. सुताचे गुंडाळे. (झाडी)

**फालु(लू)दा** पु. गव्हाचे सत्त्व काढून त्याच्या केलेल्या शेवया; शेवयांची खीर. [फा.; उर्दू]

**फाले** न.१. पहाट. (बे.) २. उद्या. (कर.)

**फालेटू(टूं)**न. नांगराच्यां खुंटावर फाळ बसवल्यानंतर त्यावर ठेवतात तो निमुळता लाकडाचा तुकडा; लहान लाकडी फाळ.

**फाल्** स्त्री. सुपारीचा अर्धा काप. (झाडी)

**फाल्गुन** पु. १. मराठी वर्षगणनेतील बारावा, शेवटचा महिना. २. शिमग्याचा खेळ. [सं.]

**फाल्गुन वाद्य** बोंब; शंखध्वनी (फाल्गुन महिन्यात होळीच्या वेळी बोंब मारतात त्यावरून).

**फाल्गुनी** स्त्री. १. फाल्गुन महिन्यातील पौर्णिमा; होळी पौर्णिमा. २.पूर्वा व उत्तरा ही नक्षत्रे.

वि. शिवराळ; अश्लील; गलिच्छ.

**फाल्या** वि.१. फालतू. (व.) २. बाताड्या.

**फाव** पु. १. प्राप्ती; लाभ. २. अनुभव : 'तें सत्त्व हें आपैसें । फावासि ये।'– ज्ञा १७.३१६. [सं. प्राप्]

**फावटी** स्त्री. १.संधी; योग्य वेळ. २. पहा : **फावती**

**फावड** न. अडथळा.

**फावडा** पु. मोठे लाकडी फावडे, पावडे. पहा : **फावडी**

**फावडी** स्त्री. १. खोरणे; (शेण काढण्याचे) लहान लाकडी फावडे. २. जोगी, फकीर, महानुभाव वापरतात ती वाकडी किंवा आकड्याची काठी. हिला झोळी अडकवतात. ३. लोखंडी खोरे, पावडे. ४. उसाच्या रसावरील मळी काढण्यासाठी वापरतात ते लाकडी औत. ५. दंड किंवा जोर काढताना हात टेकवण्यासाठी वापरतात ते लाकडी ठोकळे, हत्ती. ६. शेतातील माती ओढण्यासाठी केलेले लांब दांड्याचे खोरे. ७. नांगर, कुळव, कोळपे यांच्या दांडीला आधार देणाऱ्या दोन काठ्या. ८. अनर्थकारक स्थिती; कष्टप्रद अवस्था; दैना; दुर्दशा. [हिं.]

**फावडे** न.१.(सामा.)पहा : **फावडी**. २. (ल.) आगलाव्या; त्रास देणारा इसम.(वा.)**(कामात, बोलण्यात) ० घालणे**– एखाद्याच्या कामात अडथळे आणणे; विषयांतर करणे.**० लावणे, फावड्यावर,फावड्याने पैसा ओढणे**– चिकार पैसा मिळवणे.

**फावडे** न. हट्ट; जिद्द.– ऐको.

**फावणे** सक्रि. १. सवड सापडणे; संधी, मोकळीक मिळणे. २. मानवणे. अक्रि. १. प्राप्त होणे; मिळणे : 'जें शब्दातीत स्वभावें । तें बोलींचि जरी फावे ।'–ज्ञा ५.६८.२. अनुभवास येणे; समजणे: 'मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे। आणि हृदयीं स्वयंभचि असे।प्रत्यक्ष फावों लागे तैसें। आपैसयाचि।'– ज्ञा ९.४९. ३. योग्य असणे. (कु., गो.) ४. योग्य, सोपे, सोईचे व्यवहार्य वाटणे. ५. जिंकले जाणे; लाभणे. ६. स्फूर्ती होणे : 'कां फावलीया मति। बोलिली ग्रंथवित्पत्ती'– ज्ञाप्र ११६६. ७. विस्तारणे. ८. प्रसन्न होणे.

**फावती** स्त्री. कामातून सुटका; गडबडीतून काढलेली फुरसत, मोकळीक.

**फावल** पु. सुस्वाद.

**फावंड** स्त्री. सबब; निमित्त; बहाणा : 'समजावया आले भरत भावंड तेथेंचि फावंड रचिलें तां ।'ह्व मध्व ७८.

**फावा** स्त्री. प्राप्ती. पहा: **फाव** [सं. प्राप्]

**फाविंदा** वि.१. पहा : **फामिंदा** २. संपन्न. ३. निपुण; निष्णात.

**फाशी** स्त्री.१. मरेपर्यंत फासावर चढवण्याची शिक्षा. २.फास; सुरगाठ; निसरगाठ; सरकफास.[सं.पाश](वा.)**० देणे**– अडकवणे; घोटाळ्यात घालणे, पाडणे.**० भरणे, येणे, लागणे**– गुंतणे; कचाटीत सापडणे.

**फाशी** स्त्री.१. वेळच्या वेळी पाणी न पाजल्यामुळे गुरांना होणारा संसर्गजन्य रोग. या रोगात फुफ्फुसे फुगतात. २. जनावराच्या शरीरातील एक भाग.

**फाशी गेट** फाशीची शिक्षा झालेल्या कैद्यांना फाशी देईपर्यंतच्या कालावधीत ठेवण्याचा तुरुंगातील विशेष विभाग.

**फास** स्त्री. कुळवाचा एक भाग. कुळवाला बसवलेली लोखंडी पट्टी; पास.

**फा(फां)स** पु.१.सरकगाठ; पाश.२.वाघर;वागुरा;(पशू, पक्षी पकडण्याची) फासकी; जाळे. ३.कुंपण घालताना काटे उचलण्यासाठी घ्यायचे लाकूड. (खा.) ४. फांद्यांचा, डहाळ्यांचा भारा. ५.काट्यांच्या १० ते १२ फसाट्या; काट्यांचा भारा, ढीग.(व.) ६.(ल.)पाय मागे ओढणारा, स्वतंत्र, मोकळा न राहू देणारा उद्योगधंदा, परिवार; लोढणे; मायापाश. [सं. पाश] (वा.)**फासी–शी पडणे**–मरण जवळ येणे.

**फासका–के** पु. (क.) फास; फासा; वेढा.

**फासकी** स्त्री. पशु–पक्षी पकडण्यासाठी केलेले जाळे.

**फासटणी, फासटाफासट** स्त्री. पायपीट; कंटाळवाणी श्रमाची चाल.

**फासट(ण)णे, फासाटणे** उक्रि. १. (शरीराला भस्म, भांड्याला राख) जोराने लावणे; फासणे; लपेटणे. २. पायपीट करायला लावणे; पाय झिजेपर्यंत चालायला लावणे. (राजा.) ३. (ल.) फसवणे; एखाद्या व्यवहारात लबाडीने गुंतवणे; भूलथापा देणे.

**फासडा** पु. गुंतागुंत; दोऱ्यांचा गुंता; गाठ; जाळे.

**फासडा** पु. खिडकी, दरवाजा भिंतीत घट्ट बसण्यासाठी मारलेली खुंटी.

**फासडे** न. नांगरलेल्या जमिनीतील ढेकळे फोडण्यासाठी वापरला जाणारा

लाकडी ओंडा, औत.

**फासण** स्त्री. धमनीतील ठणका, ठसठस. [ध्व.]

**फासणी-डी** स्त्री. तुंबडी लावण्यापूर्वी रक्त वाहण्यास सुरुवात व्हावी म्हणून केलेला बारीक छेद, घाय, चीर (बहुधा अनेकवचनी प्रयोग.) २. छेदन; कापणे. [हिं.फासू](वा.) **दुःखावर फासड्या टाकणे, मारणे**- अगोदरच दुःखी असलेल्याला अजून दुःख देणे.

**फासणे** उक्रि.१. घासणे; चोळणे; लावणे; फासटणे. २. पुसणे. (कु.) [सं. स्पर्श्]

**फासणे** अक्रि. गुरांना वेळेवर पाणी न पाजल्यामुळे ती गुदमरणे, घुसमटणे. उक्रि.(क.) १.(लेखणी, बोरू)पिचणे; पिंजणे; फासटणे. २. चिरणे; फासण्यांनी कापणे. [सं.प्र+अस्; हिं. फासना]

**फासफूस** स्त्री. धुसफूस; कुरकुर. [ध्व.]

**फासफूस** स्त्री. १. फोल; भूस. २.(ल.) गाळ; गळ्हाटा; कचरा.

**फासरी** स्त्री. फास; जाळे.

**फासला** पु. अंतर :'नवलूर म्हणोन गाव धारवाडापासोन एक कोसाच्या फासल्याने आहे.' - ऐलेसं ८.४३८९. [अर. फासिल]

**फासव, फासू** न.नदी, समुद्र इ.चा फाटा; खाडी; ओहोळ.

**फासळी** स्त्री. बरगडी.

**फासा** पु.१.पाश.२. पकड; अडकवण; आकडा (सरी, नथ यांसारख्या दागिन्यांचा). ३. अडकवण्यासाठी ठेवलेले छिद्र; कडे; डूल ज्यात घालतात ती कडी; अंगठी. ४. पशुपक्ष्यांना धरण्यासाठी केलेले जाळे; वागुरा. ५.(ल.) एखाद्या माणसाला फसवण्यासाठी केलेली युक्ती. ६. जबाबदारी. (झाडी) (वा.)० **ओढणे**- फाशीचा दोर ओढणे. ० **फिटणे**-संसारपाश संपणे.

**फासा** पु. सोंगट्यांच्या खेळात दान टाकण्यासाठी घेतात तो हस्तिदंती किंवा इतर प्रकारचा तुकडा. याच्या चारी बाजूंवर अनुक्रमे १, २, ५ व ६ असे ठिपके असतात.[सं. पाशकः] (वा.)० **उमगणे, जाणणे, समजणे**- गुप्त बेत, लबाडी, डाव ओळखणे. ० **उलटा पडणे**- प्रतिकूल गोष्ट घडणे.० **टाकणे**-१.आमीष दाखवणे.२.(खरेदी-विक्रीमध्ये) आपल्या सूचना करणे; भाव, मागणी सांगणे; आपले म्हणणे कळवणे. ० **टाकून पाहणे**-नशिबाची परीक्षा पाहणे; धाडस करणे. ० **पडणे**-फसणे. ० **सोयीचा पडणे**-अनुकूल गोष्ट घडणे. ० **हुंगणे**- १. अंतस्थ हेतू; डाव ओळखणे. २. खरी बातमी मिळवणे.

**फासा(सो)टी** स्त्री. फास; जाळे.

**फासाडणे** सक्रि.१.गुंतवणे; अडकवणे. २. तोंडाला पाने पुसणे; फसवणे.

**फासावणे** उक्रि. चिरणे.

**फासीगार** पु.वाटसरूला फास लावून मारून त्याचा पैसाअडका लुटणारा दरोडेखोर; ठग.

**फासूक** लहान खाडी.

**फासेपारधी** पु.१. पशुपक्ष्यांना जाळ्यात अडकवून पकडणारा. २. (ल.) दुसऱ्याला कपटाने पेचात धरणारा; फसव्या.

**फासोळी** स्त्री. बरगडी; फासळी.

**फास्क** स्त्री. सापळा. (गो.) [पो. फास्किआ]

**फास्की** स्त्री. चौकट. (गो.) [पो. फास्किआ]

**फाळ-ळा** पु.१. नांगराचा एक भाग; नांगराच्या शेवटी लावण्याचे लोखंडाचे पाते. २. (ल.) मोठ्या, जाड व रुंदट टोकाचा बोरू, लेखणी. ३. भाल्याचे टोक; फळ. ४. शेतसारा. [सं.फाल]

**फाळ** स्त्री. १. कुऱ्हाडीने काढलेला लाकडाचा मोठा तुकडा; ढलपा. २. चिंधी; चिरफळी; कापडाचा अरुंद, लांबट तुकडा. ३. भाग; तुकडा. [क.फाल]

**फाळकं(कां)ब** पु. नांगराचा आकडा व लोखंडी फाळ यांना जोडणारा लाकडी तुकडा; फाळेटू; फाळवंड.

**फाळका** पु.१. मोठा तुकडा (लाकूड, फळ यांचा). २. केळीच्या पानाचा (डांगेचा) एका बाजूचा तुकडा. हा जेवणासाठी घेतात. ३. (विणकाम) सुताची कळी उकलण्याचे, बांबूचे रहाटासारखे साधन. ४. नावेचा खालचा भाग. (कु.) ५. वस्त्र :'मनाचा फाळका फाळुनि केला बाउला।'- ज्ञागा ३९३.

**फाळकी** स्त्री. १.लहान फाळका.२. जमिनीचा अरुंद भाग; पट्टी.

**फाळट, फाळवट** न.१. फालेटू. २. (तुच्छतेने) नांगराचा फाळ.

**फाळटणे** अक्रि. नांगराच्या फाळाने कापले, घासटले जाणे (बैल इ.).

**फाळणी** स्त्री. १.तुकडे करण्याची क्रिया; विभाजन.२. विभागणी; वाटणी.

**फाळणी** स्त्री. जमिनीवरील धारा; शेताच्या उत्पन्नावर बसवलेला कर. [सं.स्फटन]

**फाळणे** उक्रि.१. फाडणे; टरकावणे. २. साऱ्याची रक्कम वाटून देणे; ठरवणे. ३. (सामा.) वाटणे; विभागणे. ४. टाकणे. [सं. स्फाटन, स्फल्]

**फाळवट** न. फाळका; केळीच्या पानाचा एका बाजूचा तुकडा.

**फाळवंड** न. फाळकांब; फाळेटू.

**फाळा** पु.१. फाडून काढलेला वस्त्राचा तुकडा; चिंधी; चिरफळी; धांदोटी. २. वाघडा; वाभारा. (क्रि. काढणे, निघणे, जाणे.) ३. कातलेल्या रेशमाची गुंडी; वळी; मोठी परती. ४. कर; सारा. ५. वाटपाचा भाग; हिस्सा; वाटा. (वा.)० **फाडणे**- साऱ्याची वाटणी करणे; वर्गणीची रक्कम विभागणे.

**फाळापट्टी** स्त्री. जमिनीचा सारा.

**फाळिये** न.अव. फेटे; पागोटी. [गु.]

**फाळी** स्त्री. १. लहान तुकडा. २. जमिनीची लहान पट्टी.

**फाळुके** न. फडके.

**फाळेटू, फाळोटा** न.पु. पहा : **फालेटू**

**फाळोरा-रे** पु.न. पाभरीच्या दात्याचे लोखंडी टोपण; टोक; फारोळे.

**फांगळा** पु. पांगलेली, पसरलेली, विस्कटलेली स्थिती, अवस्था.(क्रि. पडणे, पाडणे.) (प्रां.)

**फांज** स्त्री.१. शहर-गावाभोवती असणारा तट. (सामा.) भिंत; कोट. पहा : **फांजी** २.२. खार जमिनीतील पावसाचे पाणी वाहून जाण्यास मूळ बांधास ठेवलेल्या दरवाजाच्या दोन्ही बाजूंना बांधलेले दगड-चुन्याचे बुरूज प्रत्येकी. [सं.पाश]

**फांज-जी** स्त्री. एक प्रकारची भाजीची वेल; फांद. ही पावसाळी असून पाने लहान अळवाच्या पानासारखी असतात.

**फांजणे** उक्रि. १.टरकावणे; फाडणे; चिरणे; पिचणे; तोंड उकलणे. २. (मशाल चांगली जळावी म्हणून दिवटीचे) तोंड फाकणे; उमलणे; ज्योत मोठी करणे. ३. बी पेरण्यासाठी शेत तिफणीने साफ करणे. ४. (खोगीर इ.वर)निरनिराळ्या आकृती दोऱ्यांनी काढणे, विणणे. [सं. प्र+छो]

**फांजणे** उक्रि. पाजण लावून ताणा ताठ करणे. पहा : **पाजणी**

**फांजणे** पहा : **फांदणे**

**फांजर** न. काटेरी फांद्यांचा झुपका.

**फांजरी** स्त्री. पिंजरा :'आईबापाचं ग राज ती काट्याची फांजरी' – लोसाको.

**फांजी–ज** स्त्री. १.अडथळा; अडचण; प्रतिबंध. (क्रि. मारणे, पाडणे, पडणे.) २. नगरकोट; गावकुसू : 'उभारिती दुर्गे दारवंटे फांजी ।' – तुगा १००. ३.राणाई, सटवाई या नावाचे दैवत. – तंजा. ४. फांदी.

**फांट** न. काढा; अर्क (औषधी). [सं.]

**फांटी** स्त्री. झाडाची फांदी. (अहि.)

**फांढोरी** स्त्री. शेतकीची औते.

**फांते, फांतोड** न.स्त्री. पहाट. (गो., कु.)

**फांते** न. हिंदूंच्या घरी बकरी कापण्याचा मुसलमानी मुल्लांचा हक्क. कर्नाटकात हा एक बलुतेदार आहे. (बे.)

**फांत्का** वि.एक प्रकारचे कबुतर.(तंजा.)

**फांद** स्त्री. १. फांदी; शाखा. २. एक प्रकारची भाजी. पहा : **फांज–जी**

**फांद** स्त्री. तटाची भिंत; फांज. (को.)

**फांद** पु. १. पक्षी (तितर) पकडण्याचा विशिष्ट प्रकारचा फास. २. मासेमारी करायच्या मोठ्या जाळ्याचे एक घर, छिद्र. (अहि.) ३. एका फांदमध्ये चार चौकोनांत एक एक फास असतो. असे चार ते पाच फास असणारा ताटवा.

**फांद(दा)डणे** उक्रि.१.(क.)फाडणे; टरकावणे; दोन तुकडे करणे; चिरणे.२.(ल.)एखाद्यावरील प्रेम, लोभ नाहीसा करणे; मर्जीतून उतरवणे; बुद्धिभेद करणे; लुबाडणे; फसवणे.
अक्रि. (खडसलेल्या, छाटलेल्या झाडाला) फांद्या फुटणे.

**फांद(दा)डा** पु.१.(झाडाची) मोठी फांदी, शाखा. २. (अव.प्रयोग) (भाषणात) विषयांतर; अवांतर कथा; फाटे फोडणे. (क्रि. घेणे, फोडणे). ३. हरकत; आडकाठी.

**फांदणे** अक्रि. उडी मारणे; उधळणे(घोडा, हरिण इ.) . [सं. स्पंद]
उक्रि. पसरणे; विखुरणे.

**फांदलावचे** क्रि. (झाडाच्या फांद्या) सभोवार पसरणे; फांदणे. (गो.)

**फांदा** पु.१.झाडाची डेळकी; ज्या ठिकाणी दोन फांद्या फुटतात तो झाडाचा भाग. २. (ल.) अडचण; संकट; घोटाळा. (क्रि. घालणे, मारणे, करणे, पडणे.) ३. वंशाची शाखा.(झाडी) [सं. प्र+ स्कंद] (वा.)
० **मारणे**– एखादी वस्तू लुबाडणे; घबाड मिळवणे.

**फांदाड** न. मोठी फांदी.

**फांदाफांद** स्त्री. पहा : **पांगापांग**

**फांदी** स्त्री. (झाडाची) फांदी; शाखा; (दिवा वगैरे अडकवण्याकरता) भिंत, खांब यांना लावलेला आकडा. (वा.) **फांद्या फोडणे**-१. विषयांतर करणे; आडकथा सांगणे. २. पोकळ सबबी, अडथळे, हरकती आणणे.

**फांदीव** वि. सांधलेले. (झाडी)

**फांदेबाज** वि.पु. काहीही बेकायदेशीर धंदे करणारा.

**फांदोरी** स्त्री. डहाळी; लहान खांदी.

**फांफर, फांफरणे, फांफरा, फांफा, फांफ्या इ. शब्द फापर, फापरणे या शब्दांखाली पहा.**

**फांफळे** न. विहिरीतून पाणी काढताना पाय टेकण्याची फळी. (कु.)

**फिक(क्र)ट** वि.१. अंधूक ; पुसट. २. काहीसा फिका. ३. पिकुटलेला; बेचव. ४. तिखट नसलेला.

**फिकटणे** अक्रि. कमी होणे; निस्तेज होणे.

**फिकरा, फिक्रा** पु. लेख; मजकूर; पत्र; लिखित : 'त्या खात्यांतील फिकरा फारसी व त्याचा तरजुमा हिंदवी करून पाठविला आहे.'– मइसा १०.२२४. [अर.]

**फिका–क्का** वि. १. फिक्या रंगाचा; पिकूट; उभरा. २. चवीला कमी गोड; साधारण बेचव (अन्न, खाद्य). ३. कोमेजलेला; निस्तेज; म्लान. ४. पाणी, जोम नसलेला; मद्दड; गरीब; बावळट. ५. नीरस; परिणामकारक नसलेले (भाषण). ६. महत्त्वहीन; क्षुद्र. [हिं. फिक्का]

**फिकी(क)र** स्त्री. काळजी; कळकळ; आस्था; आच; चिंता; विचार. [अर. फिक्र]

**फिकी(क)रमंद** वि. चिंताक्रांत.

**फिक्कन, फिटकन** क्रिवि. उपहासाने (हसणे).

**फिक्र** स्त्री. कल्पना; तर्क.-ऐको.

**फिगारणे** उक्रि. फेकणे; टाकणे; झुगारणे.

**फिचकट** वि. किरकोळ; लुकडा.

**फिट** पु. विटीदांडूच्या खेळातला दांडू.

**फिट** वि.१. तंतोतंत; योग्य; मापात बसणारे; तंग; आवळलेले. २. पक्के; घट्ट; उघडता न येणारे. ३. धुंद; मद्याच्या नशेत. [इं.]

**फिट** स्त्री. फेपरे; अचानक बेशुद्ध पडणे.

**फिटकर–री** स्त्री. तुरटी. [हिं.]

**फिटणे** अक्रि.१. सुटे, सैल, ढिले होणे (वस्त्र, गाठ); सुटणे. २. (ऋण, देणे यांतून) मुक्त होणे; (कर्ज) फेडले जाणे. ३. क्षीण होणे. ४. उघडणे :'तंव ब्रह्मस्थानींचें बेगें । फिटले सहजे।'– ज्ञा ६.२७९. ५.(नवस, संकल्प) पूर्ण होणे; फेडणे. ६. (शंका, शपथ, उपकार) निरसन होणे : 'करूं हा रस सेवन वाणी। फिटे तो धणी तुका म्हणे ।'– तुगा ६९६.७. तृप्ती होणे. ८. समजणे.

**फिटन–नी** स्त्री. पत्ते वाटण्याची पाळी. (झाडी)

**फिटफिटे** वि. तुटणारे. ( गो.)

**फिटर** पु. वाहन दुरुस्त करणारा कामगार. [इं.]

**फिटंफि(फा)ट, फिटाफीट** स्त्री.न. परतफेड; देणे-घेणे समान होणे किंवा न उरणे.
वि. फेडलेले; उसने पूर्णपणे फेडलेला; निःशेष झालेला.

**फिटाल** वि. निस्तेज; फिका.(व.)

**फिटी** स्त्री. फेड :'आणि पाहून स्वयें कृपादृष्टि । मग दुःखलेशाची झाली फिटी ।'- नव २४.१३०.

**फिटी** स्त्री.१.भोक बुजवणारी खुंटी; दट्ट्या. २. पाचर; निमुळता लाकडी तुकडा; खिटी. ३. विटी. (राजा.)

**फिटुकनळी** पहा : **फटकफळी**

**फिटू** पु. विटी. (राजा.)

**फिट्टाप् पकड** (चर्म.) जोडे तयार करताना वापरतात ती विशिष्ट आकाराची पकड.

**फिडल** न. गजाने वाजवण्याचे पाश्चात्त्य पद्धतीचे एक तंतुवाद्य; व्हायोलीन. [इं.]

**फिणफिण** स्त्री.१.रागाची धुसफुस; फुणफुण. २. गुणगुण. ३. खदखद; फिदफिद. [ध्व.]

**फिणफिणणे** अक्रि. १. रागाने फणफणणे; जळफळणे. २. गुणगुणणे. ३. खिदखिदणे; फसफसणे (आंबलेला पदार्थ). ४. जळजळणे; धगधगणे (शरीर तापाने). [ध्व. फिण]

**फितणे** अक्रि. १. फितूर होणे. २. (लहान मूल खाऊ देण्याचे आमिष दाखवल्याने) फसले, ठकले जाणे. [अर. फित्न]

**फितनती** स्त्री. बंडाळी. [अर. फित्न]

**फितना** पु. पुष्कळ द्रव्ये मिसळलेली सुवासिक दारू; एक सुवासिक द्रव्य.

**फितवण-णी, फितावणी** स्त्री. फितूर करणे; एकीमध्ये भेद, फूट पाडणे.

**फित(ता)वा** पु. १.भेद; फूट. २. बंड; वैमनस्य; बिघाड. ३. फितुरी.

**फितवापांजरा- फांदडा, फितवाफांदा** पु. स्वामिद्रोह; फितुरी.

**फितविणे, फितावणे, फित्या(त्ये)विणे** अक्रि. एखाद्याला फोडणे, फितूर व्हावयास लावणे; अनुकूल करून घेणे.

**फितवी,ई** स्त्री. एक प्रकारचे जाकीट. [अर.फितूही]

**फितु(तू)रणे** उक्रि. फितूर होणे, करणे.

**फितुरी-ऱ्या, फितुरखोर,फितवेखोर** वि. फितूर होणारा; विरुद्ध पक्षाला जाऊन मिळणारा.

**फितूर, फितुरी** पु. स्त्री. १. फितवा; स्वामिद्रोह; स्वतःच्या पक्षातून बाजूला होणे; दगाबाजी. २. शैथिल्य; बेशिस्त.
वि. फितूरी केलेला; हरामखोर; स्वामिद्रोही.

**फितूरफांदा** पु. (व्यापक) फंदफितुरी.

**फित्ना, फित्नाफिसाद** पु. दंगा; उठावणी. [अर. फित्न+फसाद]

**फित्या(त्ये)वणे** पहा : **फितावणे**

**फित्रक** खोगीर आवळण्याच्या वाद्या.

**फित्र(त्री)त-ती** स्त्री. क्रांती; बखेडा; निर्नायकी. [अर. फत्रत]

**फिदफिद** स्त्री. वेडगळपणाने, मोठ्याने हसणे; दात काढणे. [ध्व.]

**फिदफिदणे** अक्रि.१.पहा : **फदफदणे**१ व २; चरचरणे; चटचटणे. २. वेडगळपणे मोठ्याने हसणे.

**फिदवी** पु. एकनिष्ठ सेवक.

**फिदा** वि.१. आसक्त; अत्यंत अनुरक्त झालेला . २. खूश; प्रसन्न. [अर.]

**फिदाई** स्त्री. अनुरक्ती; आसक्ती.
वि. अतिशय निष्ठावान; एखाद्या गोष्टीसाठी जिवावर उदार झालेला.[फा.]

**फिदारणे** क्रि. विस्तारणे; पिंजारणे.

**फिदालखोर** वि.१. वल्गना करणारा; फुशारकीच्या गोष्टी, प्रौढी सांगणारा. २. फिदीफिदी हसणारा. [ध्व. फिद]

**फिनफिन** न.लाकडाला समांतर खाच पाडण्याचे रंध्यासारखे हत्यार. (खा.)

**फिनाईल, फिने(नॉ)ल** न. एक दुर्गंधीनाशक, जंतुनाशक द्रव्य.[इं.]

**फिनिक्स** पु.स्वतःच्या राखेतून परत जिवंत होणारा ग्रीक दंतकथेतील पक्षी.

**फिपुली** स्त्री. १. फुलपाखरू. २. कमलपक्षी. ३. पतंग. (झाडी)

**फिरक** स्त्री.पु. १. गाण्यातील कंप; लकेर; आंदोलन : 'कंठ तुझा मंजूळ सुसंगित फिरक स्वरामधें स्वर फिरती ।'-प्रला २३६. २. इकडेतिकडे जाणे; सरकणे; हलणे.३. वळणे; अंग इकडे-तिकडे करणे; हालचाल. ४. हलण्याला किंवा फिरण्याला जागा. ५.मोकळीक; फुरसत. ६.(विणकाम) तारांची सांध कायम राहण्यासाठी दोन्ही बाजूंस कामट्या घालतात. त्या स्थिर राहाव्यात म्हणून ज्यात अडकवतात त्या 'ळ' आकाराच्या कड्या प्रत्येकी.

**फिरकणे** अक्रि. १. जाणे; फेरा, वळसा घेणे; हालचाल करणे; संचार करणे. २. सरकणे; अंग इकडे-तिकडे वळवणे. ३. येणे; भेटणे.

**फिरकं(कां)डा-डी** पु.स्त्री. १.(ल.) चक्कर; भ्रमंती; गिरकी. २. गोंधळ; घोटाळा; अडथळा (धंद्याचा, कामाचा, माणसाचा इ.). (वा.)
**फिरकंड्यात घालणे, पाडणे**- हेलपाटा, निष्फळ प्रवास होणे.

**फिरका** पु.१. (ग्रहाचा, परिस्थितीचा) फेरा. २. पहा : **फिरकंडा**

**फिरका** पु. पंथ; जमात; संघ :'मुसलमानांमध्ये बहात्तर फिरके असूनसुद्धां ते आपणाला एक समजतात.'- के २१.१०.१९३८.

**फिरकी** स्त्री.१. गाण्यातील लकेर; कंप; फिरक. २. नाचण्यातील गिरकी. ३. मळसूत्राचा एक अवयव; नर. ४. पाळणा, कठडा यांची कातीव खुंटी. ५. आसावर फिरणारी कोणतीही लहान वस्तू; किरकिरे; गिरगिरे, भोवरा. ६. दरवाजाच्या कुलपाची मूठ. ७. सोनाराचा लहान ताजवा. योग्य वजन दाखवणारा काटा. ८. कातणे गरगर फिरण्यासाठी त्याला लावलेले काटे असलेले चाक. ९. मराठ्यांच्या पागोट्याची कळी. १०. जमीनपाहणी खात्यातील एक भाग; जमीन-मोजणीदारांचा समूह. ११. बुरडी पंख्याची दांडी.-बदलापूर९४. १२. (जरतारधंदा) बारीक रीळ. १३. (मातकाम) मातीचे चित्र ठेवण्याची गोलाकार फिरणारी लाकडी चौकट. १४. (विणकाम) हातमागावरील ताण्याची सुते सरकू नयेत म्हणून घातलेला आडवा, जाड दोरा. १५. माळेला बांडी (लोटे) बांधण्यासाठी असते ती लाकडाची काठी; खापेकड. १६. क्रिकेटमध्ये चेंडू फिरवून टाकण्याची पद्धत. (वा.)० **घेणे**-१. चकित करणे. २. फसवणे; बनवणे. ३. कुरघोडी करणे. ४. (क्रिकेट) बाद करणे. ० **ताणणे**- चिडवणे; फजिती करणे.
वि. १.फिरणारी. २. फिरकीदार.

**फिरकीदार** वि. १. कळी असलेले.२. दुसऱ्याचा उपहास करणारे, द्व्यर्थी (संवाद).

**फिरगा** पु.१. फेरा; वळसा; यातायात.२. घोटाळा.

**फिरचेल** न. दोन वाशांमध्ये तुळईवर बसवलेली उभी फळी.

**फिरणे** अक्रि.१. वळणे; दुसऱ्या दिशेस तोंड करणे. २. परत येणे.

३. गोलाकार चालणे; गिरकी घेणे (चाक इ.). ४. चक्कर येणे; डोक्यात फिरल्यासारखे होणे. ५. इकडे-तिकडे, मागेपुढे जाणे, करणे; चालणे; हिंडणे; भटकणे. ६. प्रवास, देशाटन करणे; एकीकडून दुसरीकडे जात राहाणे. ७. नवी दिशा घेणे; वळणे. ८. पालटणे; बदलणे; फरक पडणे. ९. नाकारले जाणे; परत पाठवले जाणे. १०. (हुकूम, आज्ञा यांचा) प्रसार होणे; एकानंतर दुसऱ्यास दाखवणे. ११. उलटणे; विरुद्ध जाणे. १२. रस होणे; वितळणे. १३. देणे लागणे; हिशेब झाल्यावर देणे निघणे. [हिं.फिरना; सं. परि]

**फिरत** स्त्री. (संगीत) एखादा स्वरसमुच्चय द्रुतगतीने घेण्याचा तानेचा एक प्रकार.

**फिरता** वि.१. भोवती फिरणारा; गिरक्या, वेढे घेणारा. २. बदलणारा; लहरी; चंचल. ३. परत, पुन्हा, वरचेवर येणारा. ४. फिरतीवर असलेला; फिरस्ता. ५. सभोवार, इकडेतिकडे जाणारा, हिंडणारा. ६. कमी-जास्त प्रकाशामध्ये वेगवेगळा दिसणारा (रंग).

**फिरती** स्त्री. पर्यटन; दौरा; स्वारी; कामाच्या निमित्ताने केलेला प्रवास.

**फिरती घडी** लग्नसमारंभात वर-वधू पक्षाकडे दिले-घेतले जाणारे लुगडे किंवा पागोटे.

**फिरती पाळी** स्त्रीच्या मासिक पाळीच्या अगोदरचा काळ.

**फिरते** न. लाटणे. (वं.)

**फिरते भांडवल** इंधन, कच्चा माल इ. बाबतीत गुंतवले जाणारे, मालाची विक्री होताच परत मिळणारे व पुन्हा गुंतवले जाणारे भांडवल.

**फिरवणी-नी** स्त्री. १.फिरणे; बदलणे. २. (विणकाम) कापड गुंडाळण्याच्या लाकडाला (धुनी) अटक करण्याची खुंटी; खीळ. ३. निर्णय बदलणे.

**फिरवणे** क्रि.१.उलट करणे; बाजू बदलणे.२. हिंडवणे.३. नजर टाकणे.

**फिरवान** वि. उलटलेला: 'धन्यावर चाकर झाले फिरवान।'- अफला ६९.

**फिरवाफिरव** स्त्री.१. वरचेवर, कारण नसताना नेणे-आणणे, काढणे-घालणे, ठेवणे, उचलणे या क्रिया; फेरफार. २. (मुद्रण.) जुळवलेला मजकूर फिरवणे, खालीवर करणे.

**फिरविणे** सक्रि. १.आतील बाजू बाहेर करणे; उलटवणे; उलथून टाकणे. २. फरक करणे; बदलणे.

**फिरशे** न. १. जिवाणू; फुरसे. (गो.)२.(ल.) नसती भानगड.

**फिरस्त-स्ता-स्ती** पु. १.प्रवासी; परक्या ठिकाणचा, फिरता माणूस; यात्रेकरू. २. पहा : **फेरीवाला**. ३. सूची.

**फिरस्ताद** वि. पाठवलेला; नियुक्त : 'राघो विठ्ठल यास फिरस्ताद केले असत.' - पया ३८७. [फा. फिरस्तादन्]

**फिरंग** स्त्री. तलवार.

**फिरंग रोग** उपदंश; गरमी. हा रोग भारतात प्रथम फिरंगी लोकांकडून आला. त्यामुळे त्याला हे नाव मिळाले.

**फिरंगाण** न. पोर्तुगीज लोकांचा प्रदेश.

**फिरंगी** पु. (सामा.) युरोपियन मनुष्य; टोपीवाला; (विशेषतः) पोर्तुगीज; युरेजियन. (गो.) [फा.]

**फिरंगी न्याय** अगदी चेंगटपणे चालणारा व पुष्कळ खर्चाचा न्याय, खटला.

**फिरंगी बाभूळ** एक काटेरी झाड. याच्या फांद्या सुरूच्या झाडाप्रमाणे असून यास बारीक शेंगा येतात. साल सुवासिक असते.

**फिरंगी लोह** १. पोलाद; तिखे. २. तलवार.

**फिरंगूट** न. (तुच्छार्थी) फिरंगी.

**फिराद** पहा : **फिर्याद**

**फिरावण** वि. बेइमान; शब्द, वचन फिरवणारा.

**फिरीगघानी** स्त्री. कुरकुर. (अहि.)

**फिरू(रो)न** क्रिवि. १. परत; माघारी. २. दुसऱ्या वेळी; पुन्हा.

**फिरोझी** यश. [फा.]

**फिरोमोन** प्राण्यांमधील संदेशवाहक रसायने. प्राण्यांच्या लघवीत हे आढळते. याआधारे प्राणी आपल्या सीमारेषा निश्चित करतात.

**फिर्कुडी** स्त्री. पुटकुळी; लहान फोड. (झाडी)

**फिर्दोस** पु. स्वर्गीय उद्यान. [फा.]

**फिर्याद** स्त्री. १. न्यायाची मागणी; तक्रार; चौकशीअर्ज. २. (कायदा) ज्ञात किंवा अज्ञात मनुष्याने केलेल्या गुन्ह्याची न्यायाधीशाकडे किंवा पोलिसाकडे केलेली लेखी किंवा तोंडी तक्रार, निवेदन. [अर. फर्याद]

**फिर्यादी** वि. दावा करणारा; वादी; तक्रारदार.

**फिलजामीन** चांगल्या वर्तणुकीसाठी घेतलेला जामीन.

**फिलनाळा** स्त्री. हत्तीवरील तोफ. [अर.फील्+नाळ]

**फिलफिली रोखण** सुताराचे रोखण्याचे-लाकूड तासण्याचे हत्यार. (कु.)

**फिलसाण** कुजल्याची घाण, वास. (गो.)

**फिलसोज** मोठ्या काठीवर किंवा बांबूवर लावलेली दिवटी; खांबावरील दिवा.

**फिलॅमेंट** अगदी बारीक तंतू, तार (सामान्यतः धातूची). विजेचा बल्बमधील विद्युतवाहक. वितळणबिंदू फार मोठा असणारी व तापल्यावर प्रकाश देणारी बारीक तार. [इं.]

**फिलोक्षेरा** पु. द्राक्षावरील रोग. - कृषि ५१८.

**फिल्की** स्त्री. १.तुकडा. २. भेग. (झाडी)

**फिल्टर** न. द्रवपदार्थ गाळण्याचे साधन; गाळणी. [इं.]

**फिल्म** स्त्री.१. फोटो घेण्यासाठी केलेली सेल्युलॉईडची विशिष्ट पट्टी. २.चित्रपट. [इं.]

**फिशपाँड** पु. एखाद्या व्यक्तीला तिच्या दिसण्यावरून किंवा वर्तणुकीवरून गमतीने दिलेले नाव किंवा भेट किंवा टिप्पणी. [इं.]

**फिश(स)रत** स्त्री. विश्वासघात; हरामखोरी; द्रोह.
वि. बेइमानी; विश्वासघातकी. [फा. फिसरत]

**फिशंग** काडतूस.

**फिशाळ** वि. निष्णात; तरबेज; दर्दी.

**फिश्श-श्शो-स्** उद्गा. एखाद्या गोष्टीला महत्त्व नाही हे दाखवण्यासाठी करायचा आवाज; छत्; धुत्; उंः. [ध्व.]

**फिश्शी** वि. वेडगळ; मूर्ख; अर्धवट.

**फिसकटणे, फिसकणे** अक्रि.१.(मैत्री, निष्ठा इ.चा) त्याग करणे; प्रतिकूल, परावृत्त होणे; दूर जाणे.२. (करार, बेत, योजना) निरर्थक होणे; मोडणे; विरणे; फसणे; बिघडणे. ३. लाथा मारणे व दूध न देणे;

बिथरणे (गाय); बेफाम, अनावर होणे (घोडा). [सं. प्र+हिंष्क; ध्व.फसक्, फिस्]

**फिसकणे** अक्रि. मांजराचे फिसकारणे; फुसफुसणे; खिसणे. [ध्व.फिस्]

**फिसका, फिसकारणे, फिसकारा, फिसफिसणे, फिस्स हे शब्द फुसका इ. शब्दांमध्ये पहा.**

**फिसके** न. गळू; केसतूड; पुवाळलेली जखम; वर पापुद्रा असून आत पू, पाणी असलेले गळू.

**फिसफिस** स्त्री.१.मांजराचे फिसकारणे. २.(ल.) वसकन अंगावर येणे. [ध्व.]

**फिसफिस–सा** क्रिवि. वसदिशी; फणफणून; फिसकारून; चिडचिडेपणाने.

**फिसरा** वि. विश्वासघातकी; बेइमान; खोटा; बिनभरवशाचा.

**फिसाद, फसाद** स्त्री. १.बंड; दंगा. २. दंगाधोपा; अंदाधुंदी; तंटाबखेडा. ३. (कारकुनी) लिहिण्यात, हिशेबात तफावत, गफलत. ४. न जुळणे; गैरसमजूत. [अर. फसाद्]

**फिसादी, फिसादखोर** वि. १. बंडखोर; फितूर; उलटणारा; द्रोही. २. दांडगा; दंगेखोर; उच्छृंखल.

**फिसालत** स्त्री. १. कारस्थान. २. फितुरी. पहा : **फिसाद** [फा.]

**फिस्कारणे** क्रि. फुसकारणे :'तीं आकळिलिहीं पादीं । फिस्कारू करिती।'– गीता १४.९४.

**फिस्की** स्त्री. कुत्रीचे (मादी) पिलू.

**फिळकवणी** न. पहा : **फळकवणी**

**फिळफिळीत** न. पाणचट; पातळ (ताक).

**फिंगकपक्षी, फिंगी** पु. गलोल्या पक्षी.

**फिंगकपांगळी** स्त्री. हाताने सूत भरण्याचा रहाट.

**फिंदरी** वि. पसरट नाकाची.

**फिंदा(जा)रणे** उक्रि. १. पसरणे; मोठे करणे. २. पिंजारणे.[सं.स्फाय्]

**फी** स्त्री.१.मोबदला; मेहनताना; कामाबद्दलची ठरावीक रक्कम. २. शिकण्याबद्दल द्यावी लागणारी रक्कम. ३. कर; दस्तुरी; हक्क. [इं.]

**फी** स्त्री. कलाबतू. (गो.) [पोर्तु. फिओ]

**फीट** स्त्री. फेड (कर्ज, उपकार वगैरेची); परत करणे.

**फीट** स्त्री. दोरा गुंडाळण्याची पट्टी; कांबटी.
न. पाचर; फटीत बसवण्याचा, लाकडाचा, लांबट तुकडा. (राजा.)

**फीट** स्त्री.झीट; अपस्माराचा झटका; घेरी; चक्कर.

**फीत–ती** स्त्री. नाडी; पट्टी; लेस; रेशीम; सूत इ. विणून करतात तो दालीसारखा पट्टा; मगजी; अरुंद व लांब, कापडाची, रेशमाची, कागदाची पट्टी. [फा.; पोर्तु.फिता] (वा.)० **कापणे**– उद्घाटन करणे.

**फीत** स्त्री. स्फिती. पहा : **स्फीत**

**फीर** स्त्री. माघार; परावृत्ती; मागे, परत फिरणे.

**फील** पु. हत्ती. [अर. फील्; फा. पील्]

**फीव** पु. हार, माळ इ.च्या टोकाला किंवा फुले, मोती, मणी ओघळू नये म्हणून केलेला गोलक.

**फीस** कमजोर. पहा : **फुसका**

**फुआ** पु. आत्या (फुई)चा नवरा.(खा.) [हिं. फुपा]

**फुइजी, फुई** स्त्री.१. आत्या. २. नवऱ्याची आई; सासू. (खा.) [हिं. फुफी]

**फुई** स्त्री. तुषार; शिंतोडा.

**फु(फुं)क** पु. स्त्री. फुंकर; तोंडाने घातलेला वारा.

**फुकचे, फकफकचे** क्रि. छाती धडधडणे; भीतिग्रस्त होणे. (गो.)

**फुकट** वि.१. निरुपयोगी. उदा. फुकट श्रम.२. फुकटचा; मोफत.
क्रिवि. १.व्यर्थ; विनाकारण; निरर्थक. २. मोबदल्याशिवाय किंवा श्रमाशिवाय (मिळालेला, दिलेला). [क. पुक्कटे]

**फुकटखाऊ–खोर–चोट** वि. आयते फळ मिळावे म्हणून पुढे आलेला; निलाजरा (इसम); दुसऱ्याच्या जिवावर मजा मारणारा. पहा : **ऐतखाऊ**

**फुकटचा** वि.१. मोफत; श्रमाशिवाय, पैशांशिवाय मिळणारा. २.अनायासे, सहज घडणारे. ३.नफ्याविना; व्यर्थ.

**फुकटचोदू** वि. ऐतखाऊ. (झाडी)

**फुकटपसारा** वि. उगीचच हसण्याचा स्वभाव असणारा.

**फुकटफजिती** स्त्री. नुकसान, श्रम, तिरस्कार, अपमान याच गोष्टी ज्यात मिळतील असा धंदा.

**फुकटफाकट, फुकटवारी** क्रिवि. फुकट; मोफत; मोबदल्याशिवाय.

**फुकटबिसनी** वि. स्वत: खर्च न करता चैन, व्यसन करणारा.

**फुकटा–ट्या** वि.१. आयते; फुकटचे.२. (ल.) कुचकामी. ३.फुकटखोर.

**फुकटाई, फुकटशाई, फुकटेगिरी** स्त्री. मोफतपणा; फुकटेपणा.

**फुकटॉ** पु. फळी ठेवण्यासाठी भिंतीत पुरलेला लाकडी ठोकळा.

**फुकणी** स्त्री. वाण; ददात. (क्रि. पडणे) (व.)

**फुकणी–नी** १.पहा : **फुंकणी**. २. एक शिवी.

**फुकणे** पहा : **फुंकणे**

**फुकनी** स्त्री. वायबार. (अहि.)

**फुकफुक** पु. भीती; धाकधूक. (गो.)

**फुकवणी** स्त्री. लसूण, काळी मिरी, चिंच, नारळीचे दूध घालून केलेला बोंबलाचा पदार्थ.

**फुका, फुकाचा, फुकाफुकी** वि. क्रिवि. पहा: **फुकटचा**

**फुका** स्त्री.क्रिवि. १. फुसका. (व.) २. पहा :**फुकटचा** [दे.प्रा. फुक्का=मिथ्या]

**फुकापासरी** वि फुकट; फायदा करून न घेता.

**फुकार** पु. मंत्र फुंकणे; छा छू करणे.

**फु(फुं)की** स्त्री.(एकीबेकीच्या खेळात) रिकामी मूठ; मुठीत काही नसणे.

**फुक्टात महाग** निरुपयोगी. (झाडी)

**फुक्फाक्** स्त्री. मंत्रोपचार. (झाडी)

**फुग** पु. ताठा; गर्व: 'देवपणे फुग धरिसील गाढा'– ज्ञागा ८५९.

**फुगट** वि. फुगीर; किंचित फुगलेले, सुजलेले.

**फुगटणे** अक्रि. १. फुगणे; भरून येणे. २. (ल.) रागाने, गर्वाने फुगणे; ताठरणे (उपहासार्थी फुगणे या सर्व अर्थाने).

**फुगडी** स्त्री. १.मुलींचा एक खेळ. यात एकमेकींचा हात किंवा दंड धरून व पाय जुळवून फुगड फू म्हणत गरगरा फिरतात. २. (ल.) वेड्याप्रमाणे इकडे–तिकडे हिंडणे, फिरणे. ३. धांगडधिंगा.

**फुगणे** अक्रि. १. फुगीर होणे; फुगवटी येणे; वारा,वस्तू, पदार्थ आत भरल्यामुळे (पोट, पिशवी, गाठोडे इ.) आवरण ताणले जाऊन मोठे होणे. २.(अडथळे आल्यामुळे ओढा, नदी यातील पाणी) तुंबणे, चढणे. ४. रुसणे; रागावणे. ५. उन्मत्त होणे; फुशारणे; ताठा भरणे; तटाटणे : 'विषयांसीं संग घडो ज्या तें सेवुनि मदें। कुधी फुगती।'– मोअश्व १.५१. ६. प्रफुल्लित, आनंदित होणे : 'जो ध्यान सुखभरें फुगला।'– मोशांति ६.२९. ७. (जास्त माहिती घातल्यामुळे एखादे प्रकरण, ग्रंथ) आकाराने वाढणे. ८.लठ्ठ, स्थूल होणे. [सं. फूत्कृ; क. पोंगु]

**फुगरा** वि. फुगलेला; फुगीर.

**फुगराई** स्त्री. फुशारकी; शेखी; वटवट; बडबड.

**फुगरूड** पहा : **फगरूड**

**फुगवटा–टी–शी** स्त्री. १.सूज; उंच झालेला, वाढलेला भाग; फूग. २. फोपसेपणा. ३. तुंबलेली, चढलेली स्थिती (पाण्याची).

**फुगवण** स्त्री. पीठ वगैरे आंबून फसफसण्यासाठी त्यात टाकायचा पदार्थ.

**फुगवणी** स्त्री. १.अतिशयोक्ती; मोठे होणे; वाढ; फूग. २. अतिशय स्तुती करून चढवणे.
न. फुगलेले, तुंबलेले पाणी.

**फुगविणे** सक्रि.१. स्थूल, फुगीर, मोठा करणे; फुगावयास लावणे. २.(ल.) अतिशय स्तुतीने चढवणे; एकाचे दोन करून सांगणे.

**फुगा** पु.१. (भाजल्यामुळे येणारा) फोड. २. फुगारा; फुगवून केलेला आकार. ३. कोणतीही फुगलेली वस्तू. ४. बुडबुडा; लहान मुलांच्या खेळण्यातील तोंडाने फुगवायचा रबरी गोळा. ५. प्रवाहाचा तुंबलेला भाग; तुंबारा.६.हजारा, कारंजे इ.चा फुगीर मुखावयव. ७. राग; घुस्सा.८.(ल.)अभिमान; ताठा;उसना आव; खोटा मोठेपणा. ९. घोड्याच्या गुडघ्याखाली येणारी सूज. १०. खोटे,नकली मोती. ११. डिंकाची जात.– मुंव्या ४६. १२. सोने गाळण्यासाठी वापरण्यात येणारा चंबू; सुरईसारखी बाटली. १३. एक खाद्यपदार्थ.
वि. १.फुगलेला; फुगीर. २. (ल.) गर्वाने, अभिमानाने ताठलेला.

**फुगाई** स्त्री. राग.

**फुगार** वि. जाड व पोकळ :'झाडांच्या पोटात वारं घुसलं नि झाडं फुगार झाली.'– खळाळ २.

**फुगारणे** अक्रि. फुगणे; फुगीर होणे.

**फुगारमार** पु. तोंड दाबून बुक्क्यांचा मार.

**फुगारा** पु.१. पहा : **फुगा** १, २,५,७. २. फुगलेला भाग. ३. फुगलेपणा; फुगीरपणा (भाकरी इ.चा).४.ताठा; पोकळ डौल :'नको मानसीं ज्ञानगर्वे फुगारा ।'– दावि १७४.

**फुगारॉ** पु. गुदमरणे. (गो.) [पोर्तु. आफोगार]

**फुगाव** पु. (नाविक) गलबतातील स्वयंपाक करण्याची जागा.–किर्लो ऑक्टो. १९३८.२७४.

**फुगा(गां)व** पु.अव.कांजण्या; विस्फोटक.(गो.) [पोर्तु. फोगो]

**फुगावा** पु. (अर्थ.) चलनवाढ :'चलनाचे फुगावे व चढउतार.'– सप्तदशी १४९.

**फुगी–गु** स्त्री. (समासात उपयोग) फुगवटा.

**फुगीचे** वि.वातूळ. (को.)

**फुगीर** वि.१. आकाराने काहीसा मोठा झालेला. पहा : **फुगरा**. २. पुढे, बाहेर, वर आलेला; वाढलेला. ३. (ल.) घमेंडखोर.

**फुगीरचोट** वि.१.(अशिष्ट) फोपसा मनुष्य. २. गर्वाने फुगलेला.

**फुगीरदोडका** वि. बढाईखोर.

**फुगीरपण** न. ताठा; आढ्यता; अहंकार.

**फुगीव** वि. १. पहा : **फुगीर** १, २. २. तुंबलेले; साचलेले; बंधारा घातलेले (पाणी).

**फुगीवानस** न. भारतात सापडणारे एक वानस.–वनस्पती सृष्टी.

**फुगे** न.१. वाटोळे फिरणारे पाणी; भोवरा. २. प्रवाहाला घातलेला बांध; बंधारा. (क्रि. घालणे). ३. देवीचा फुगलेला फोड.

**फुगोटी–शी** पहा : **फुगवटी–शी**

**फुगोर** पु. रुसून बसणे. (गो.) पहा : **फुगारा**

**फुचूडा** पु. कपड्यावरील सुताचे टोक. (झाडी)

**फुट** पहा : **फूट**

**फुटक** क्रिवि. वेगळेपणाने; तुटकपणाने.
वि. १. चीर किंवा तडा गेलेले (नाणे, भांडे इ.). २. फुटलेला, भेगललेली, तडा गेलेली (भिंत, बांध).३. तुटके, मोडके (यंत्र).४. अपुरा; अर्धवट (संच, ग्रंथ). ५. एकाग्र नसणारे (मन). ६. फुटकळ. [सं. स्फुट्]

**फुटकर** न. फुटलेले भांडे.
वि. १. पहा : **फुटका**. २. फुटकळ; तुटक; किरकोळ; बारीकसारीक. ३. पांगलेले; विस्कटलेले; जूट नसलेले (सैन्य इ.).

**फुटकळ** वि.१.पहा : **फुटक** २. २. विभाग पाडलेले; गटातील; मोठ्या साठ्यातील एखादे, थोडे; घाऊक नसलेले; लहान प्रमाणाचे. ३.सामान्य हिशेबात न घेतलेल्या (खर्चाच्या बाबी). ४. अर्धवट; अपूर्ण; मालातील एखादादुसरा; सुट्टा; इकडला–तिकडला; किरकोळ.
क्रिवि. किरकोळीने; विभागशः (खरेदी, विक्री).

**फुटकळ** वि. पहा : **फटकाळ**

**फुटक(कु)ळी** पहा : **पुटकळी**

**फुटक(कु)ळ्याचा दांथर** अंगावर उठलेला पुरळ; पुटकुळ्या उठणे.

**फुटका** वि. असभ्य; अशिष्ट; ग्राम्य (भाषण, बोलणे).

**फुटका** वि.१.फुटलेला; छिन्नभिन्न.२. किरकोळ; हिशेबात नसलेला (वेळ, खर्चाची बाब). ३. टाक आत घुसणारा किंवा लिहिले असता शाई पसरणारा(कागद); लवकर फुटणारी, पसरणारी (शाई). ४. जाड व अस्पष्ट (लिखाण, अक्षर). ५. अंध; मंददृष्टी; अंधत्व आलेला (डोळा). ६. मुळीच नाही किंवा कमी ऐकू येणारा, बधिर (कान). ७. वाईट, अभागी (नशीब, दैव). ८. ऐन; टळटळीत (संध्याकाळ). ९. चंचल, अनिश्चित (स्वभाव).(वा.)० **डोळा काजळाने साजरा करणे**– युक्तीने अवगुण झाकणे.० **मणी, कवडी, फोड नसणे**– अतिशय दरिद्री, कंगाल असणे.

**फुटका कंदील** (ल.) आंधळा मनुष्य.

**फुटके कपाळ** (ल.) १. दुर्दैव. २. वैधव्य.

**फुटके जहाज** (ल.)निकामी वस्तू.

**फुटक्रिया** स्त्री. दैव; भाग्य; कर्म; संचित.

**फुटखोत** पु. फुटकळ, थोड्या भागाचा जमीनसाऱ्याचा मक्तेदार, खोत.

**फुटगुढ्या** पु. वसईच्या आसपास आढळणारी एक हलकी जात व तीतील व्यक्ती.

**फुटणावळ** स्त्री. एक वर्षपर्यंत झाडाचे उत्पन्न घेण्याबद्दल देण्याचा मोबदला.

**फुटणे** अक्रि.१. मोडणे; तुटणे; तुकडे पडणे; तडा जाणे; उकलणे; तडकणे; चीर पडणे; भंग पावणे; एकदम दुभंग होणे (सरळ व व्यापक अर्थी). २.अंकुर, कोंब, मोड येणे; रुजणे. ३. (दात) हिरड्यांतून बाहेर येणे. ४. (दही, दूध इ.) चौथापाणी होणे; घनांश व द्रवांश वेगळे होणे. ५. शाई पसरणे; ओल्या कागदाने शाई शोषणे, फैलावणे; अक्षर व लेख मोठे, अस्पष्ट उतरणे. पहा : **फुटका**. ६.रस्त्याला फाटे, शाखा फुटणे; विभागला जाणे. ७. फूटविकाराने, संधिवाताने आजारी पडणे; ताप येण्याच्या वेळी अंग मोडून येणे, ठणकणे. ८. घमघमणे; दरवळणे (वास). ९. (गुप्त गोष्ट) प्रसिद्ध, जाहीर होणे. १०. फूट पडणे; विसकळीत होणे; पांगणे (सैन्य, संस्था इ.). ११. भांडण होऊन वेगळे होणे; बिघाड उत्पन्न होणे. १२.(खांडूक, गळू) तोंड पडून वाहू लागणे. १३. बाहेर पडणे; उगवणे; दिसू लागणे (कांजण्या, पुळ्या इ.); उगवणे; बाहेर येणे. १४.(आवाज, गळा) घोगरा होणे; चिरकणे; बदलणे. १५. बोलता येऊ लागणे; वाचाळता उत्पन्न होणे. १६.(हात, पाय, ओठ) तडकणे; भेगा पडणे. १७. (नारळ, फणस, पोफळ) पूर्ण वाढ होऊन फळे दिसू लागणे. १८.(डोळे, कान) आपापले काम करण्यास असमर्थ होणे. १९.(मन, विचार इ.) एका ठिकाणी न राहणे. २०. मर्यादा सोडून बाहेर येणे; अमर्यादा होणे. उदा.मनाचा बांध फुटला. २१.बाहेर निघणे; वेगळे होणे; अलग होणे. २२. सरणे; सरकणे :'फुटे न पद कंचुकी भिजलि अंग रोमांचिलें।'- रअकक २.१६७. २३. तहानेने घाबरे होणे; घसा सुकणे.२४. दूर करणे. २५. द्वैत असणे. २६.विसकटणे. २७. मरणे. २८. पळ काढणे.[सं. स्फुट्; हिं. फुटना] (वा.) **फुटाची गोळी घेणे**- पसार होणे.

**फुटफाट** स्त्री. (क्र.) पहा: **फाटाफूट**

**फुटबॉल** पु. पायांनी उडवून खेळण्याचा मोठा रबरी चेंडू; अशा चेंडूने खेळण्याचा खेळ. [इं.]

**फुटरा** वि.१.एकदम, सतत मोडणारा; तुकडे पडणारा. २. थंडीमुळे फुटणारा; चिरा, भेगा पडणारा (पाय, अंग). ३. फुटून लाह्या बनणारे (जोंधळा, वरी वगैरे धान्य). ४. सतत पू वाहत असणारा (कान).

**फुटवण** न. मसालाविरहित मांसरस. (कु.)पहा : **फुंटॉ**

**फुटवणे** क्रि. हाकलणे; घालवून देणे; बाहेर काढणे :'त्या पोराचीच मामूला फुटवायची आयडिया असली पाहिजे.' -वासूनाका ५२.

**फुटवा** पु.१.नवी पालवी; फूट. (को.) २. कृत्रिमरीत्या उत्पन्न केलेला सजीव प्राणी (क्लोन).

**फुटळ** स्त्री. कण्या; तांदूळ सडताना झालेले धान्याचे तुकडे. (राजा.)

**फुटा** पहा : **फुटकळ**

**फुटा** न. एक रेशमी वस्त्र. [सं. पट]

**फुटा** वि. नुसता; दूध न घातलेला.

**फुटाणगार** पु. फुटाणे भाजणारा.

**फुटाणा** पु.१.भिजवून भाजलेला हरभरा. २. (ल.) चलाख, तीव्र बुद्धीचा, चपळ मुलगा; तरतरीत, तडफदार मुलगा. [सं. स्फुटन] **फुटाणे उडणे, फुटणे; (भाषणाचे, शब्दाचे, वाणीचे) फुटाणे भाजणे**-जोराने, ताड-ताड बोलणे,उत्तरे देणे. **फुटाणे करणे**-एखाद्याला अतिशय भारी, वरचढ असणे; एखाद्याला विकत देण्याघेण्याजोगा असणे. **फुटाणे भाजणे**- जुलूम करणे; गांजणे. **फुटाण्यासारखा उडणे**-१.रागाने, गर्वाने जोरदार रीतीने अंगविक्षेप करणे. २. फार चिडणे; रागामुळे पटकन एखादे काम करण्यास उद्युक्त होणे.

**फुटाणी** स्त्री. १. ठिपक्याठिपक्यांची, बुट्ट्यांची पैठणी; उंची रेशमी वस्त्र. २.(विणकाम) फणीतील दोन ताणे काळे, दोन तांबडे व आडवणही तसेच, किनार कोणत्याही प्रकारची या विणीचे लुगडे.
वि. फुटाण्यासारखे ठिपके असलेले (चीट इ.); चौकोनी खाणे असणारे (कापड). (अहि.)

**फुटाणेकार** पु. फुटाणे भाजणारा भोई; भडभुंजा.

**फुटान्या** वि. रंगीत ठिपक्यांचे (लुगडे). (झाडी)

**फुटाफू(फा)ट** स्त्री. १.संघातून, संस्थेतून एकेकाने वेगळे होणे; फूट; भेद.२. पांगापांग; दाणादाण (सैन्याची). ३. मोडतोड; फूटतूट.

**फुटा(डा)र** वि. भावी; पुढचे. (गो.)

**फुटारना** क्रि. १. बैलजोडीने मार्ग सोडणे. २. गोंधळणे; बुजणे. (झाडी)

**फुटारू** वि. चांगले फुटणारे (चणे). (झाडी)

**फुटाळ** न. झाडावरून पडून फुटलेले (विशेषतः आंब्याचे) फळ.

**फुटाळी** स्त्री. भेग.

**फुटाळू** वि.१.लाह्यांसाठी भाजले असता सहज फुटणारे (धान्य). २. ठिसूळ (लाकूड, दगड).

**फुटी** स्त्री.१.तेज; विकास; दीप्ती. २. भेद; फूट. ३. बाजू; कूस :'मग फुटि (पुटि) वळिली : आणि तेणें तैसेंचि देह ठेवीलें:।' - लीच ४.३७.

**फुटी** स्त्री. नागफडी. - भाप्र.

**फुटीर** वि.१. पहा : **फुटरा**. २. उकललेला; दुभंगलेला. ३. जीर्ण; ज्यावरील सोने किंवा चांदी निघून आतील रेशीम दिसते असा (कलाबतू). ४. फटी पडलेले, मोडलेले, तुटलेले (कुंपण). ५. एक पक्ष सोडून दुसऱ्या पक्षास जाऊन मिळालेला.[प्रा.फुट्टिर; सं.स्फुटितृ]

**फुट्ऱ्या** स्त्री.अव. सुरकुत्या. (झाडी)
वि. १.सुरकुतलेले. २. फाटलेले (दूध). (झाडी)

**फुडके** न. तुकडा; चोंढा; भाताच्या शेताचा तुकडा; चार बांधांमधील भाताचे शेत.

**फुडचा-ला, फुडा-डां, फुडार-री, फुडी, फुडील, फुडे, फुडून हे शब्द 'पुढचा' इ.मध्ये पहा.** (ही रूपे दक्षिण कोकणात, कुडाळ प्रांतात प्रचलित आहेत.)

**फुडत-ती, फुडताई** स्त्री. घाई; जलदी. (व.)

**फुडवट** वि. पहिलारू; पहिल्या विणीची, वेताची (गाय, म्हैस).

**फुडा-डे** क्रिवि.१.पहा : **पुढा**.२. उघड; स्पष्ट; निश्चित; खरोखर; पक्के :

'यन्हवी ज्ञान फुडे जालेयां।'- ज्ञा १३.६५२.
वि. प्रमुख.

**फुडिया, फुडे** क्रिवि. खरोखर : 'इये पदें नव्हती फुडिया । गगनाचियाचि घडिया।'- ज्ञा ७.१९५.

**फुडी** वि.१.स्पष्ट; खरी :'जाणीव असोनि फुडी ।'-ज्ञाप्र २२९.२.पक्की; पूर्ण; निर्धाराची: 'तेव्हेळी आसु जाली फुडी। जिआवेआची ।'-ऋ १०२. [प्रा.फुड; सं.स्फुट]

**फुडेपण** न. निश्चय : 'परिस आतां फुडेपणें । मन तें ऐसें ।'-ज्ञा १३.१०३.

**फुण–न** क्रिवि. पुन्हा; पुनरपि. [सं. पुनर्]

**फुण(न)का** पु. वाटल्या डाळीचा उकडून केलेला वडा.

**फुण(न)गा–गी** पु.स्त्री.१. ठिणगी. २.(ल.) भांडणाचे मूळ; कलागतीचा पाया. (क्रि. टाकणे). ३.(ल.) जहाल स्त्री, मुलगी. [सं. स्फुलिंग]

**फुणफुण** स्त्री.१.दंश, दाह यांचे मुख्य दुखणे थांबल्यानंतर त्या दुःखाच्या जागी होणारी जळजळ, आग; चुरचुर; फणफण. (क्रि. लागणे, होणे, करणे.) २. हलक्या आवाजातील नापसंती; कुरकुर. [ध्व.]

**फुणफुणणे** अक्रि. १.रागाने संतापून, डोळे लाल करून, नाक फेंदारून सुस्कारे टाकणे; फणफणाट करणे; जळफळणे. २. (विंचू चावल्याने, कडक औषधाने) जळजळणे; दाह होणे; भणभणणे. ३. (फोडणीचा) खमंग, सणसणीत वास, भपकारा सुटणे. [ध्व.]

**फुणफुणाट** पु. अतिशय दाह; जळजळ; फुणफुण.

**फुणविणे** क्रि. ठिणगी उडणे.

**फुतके** न. ताडीचे भांडे; बुदले.

**फुतफुत** स्त्री. गुजगोष्ट; कुजबूज. (गो.)

**फुतफुतणे** अक्रि. कुजबुजणे; कानगोष्टी करणे. [ध्व.फुत्]

**फुती** स्त्री. तळ्यात आढळणारे बारीक कंद. (झाडी)

**फुतु** पु. स्फुलिंग; ठिणगी. [ध्व.फुत्]

**फुदी** स्त्री. स्त्रीची योनी.

**फुनक** हळद लागल्यावर काढलेली नवरदेवाची वरात. (अहि.)

**फुनकाटणे** क्रि. रागावणे. (कर.)

**फुनगानी** स्त्री. १.विस्तवाची ठिणगी.२. (ल.) चहाडी.

**फुनसी** स्त्री. (ल.)लहान पुटकुळी; पुळी.

**फुन्ना** पु. (रेशमाचा)गोंडा; झुपका. [हिं.]

**फुपणे, फुंफणे** अक्रि.१.(फुंकणीतून) फुंकणे. २. सापाचे फूत्कार करणे; फुसकारणे; फुसफुसणे. ३. घोड्याचे फुरफुरणे. ४. तापाने, रागाने फणफणणे. ५. धापा टाकणे.

**फु(फुं)पा(फा)ट–टा** पु.१.विस्तव विझल्यानंतरची राख; चूल, शेगडी यांतील फार तापलेली राख.२. उन्हाने तापलेली वाळू, खडे. ३. (ल.) हलकी, सुकी, भुसभुशीत राखेसारखी जमीन. ४. रस्त्यावरील धुरळा, धूळ. ५.(ल.) फुशारकी; बढाई; भपका; पोकळ देखावा. (क्रि. करणे). ६. चटका.

**फुपात** पु. फूत्कार :'तो फुंपातेनि जृंभानास्त्रें । पीसा केला।'- शिव ४५७.

**फुपा(फा)वणे** अक्रि. कडकडणे; ताशेरा झाडणे; रागावणे.

**फुफणे** अक्रि. फुसकारणे.

**फुफरट** वि.निर्विष (साप). (व.)

**फुफा** स्त्री. फन्ना; फडशा; पूर्ण नाश (द्रव्य, अन्न यांचा).
वि. राखेसारखा उडून जाणारा.
क्रिवि. उधळून. [ध्व. फु ! फु !]

**फु(फुं)फाट** पु. फूं फूं, फो फो असा आवाज, शब्द : 'नरनाथ कामनासर्पू। फुंफाट करीत उठला ।'ह्र मुहआ ७९.
क्रिवि. फोफाट्याने, फुगून जोराने आवाज करीत.

**फुफाटणे, फुंपणे** पु.१.जोराने फुस्कारा सोडणे; ओरडणे. २. पहा : **फुपावणे**

**फु(फुं)कारा** पु. फूत्कार :'क्रोध काळिया नाग होय खरा। दत द्वेषाचा फुंफारा।'- एभा ५.१००. [ध्व. फु ! फु !]

**फुफु** स्त्री. फुसकारा. [ध्व.] (वा.) ० **करणे**- थट्टेने उडवून देणे.
क्रिवि. १.फुसकारून; फुसफुसून. २. फणाफणाटाने. ३. फुंकर घालून.

**फुफुवात** पु. गर्जना:'तो फुफुवातेंनि जृंभणास्त्रें । पिशा केला तुआं।'- शिव ४५७.

**फुफ्फुस** न. शरीरातील श्वासयंत्र; रक्त शुद्ध करणारे इंद्रिय. ही दोन असून छातीच्या आतील बाजूला असतात.

**फुफ्फुसदाह** पु. फुफ्फुसात कफ साठल्यामुळे होणारा रोग; न्यूमोनिया.

**फुभंडा** पु. भांडण; गलबला. (अहि.)

**फुमकारा** पु. फूत्कार : 'पेटारीचा नाग त्यानं फुमकारा दिला.'- लोसाको.

**फुर(रो)ई** स्त्री. दंड; कर; दंडासाठी आणलेली वसुली. पहा : **दंडफुरई**

**फुरक(कू,गू)ट** न.१.रुसवा; रोष. २.ताठा; अभिमान.

**फुरक(कू,गु)टणे, फुरंगटणे** अक्रि. १.मनात कुढणे; रुसून बसणे; दुर्मुखणे. २. गर्वाने फुगणे; मदोन्मत्त होणे; चढेलपणाने वागणे :'बहु फुरकटलासे बोल बोले उताने।' -अकक २ कृकौ १५.

**फुरकणे** अक्रि. रुसणे. पहा : **फुरकटणे**

**फुरकणे** अक्रि.१. भुरकणे; फुर्र असा आवाज काढून भुरके मारणे; ओरपून खाणे. २. ओठ मिटून फुर्र् असा तोंडाने आवाज काढणे; फुरकी वाजवणे.

**फुरका** पु. १. भुरका; भुरक्यासाठी हातात घ्यायच्या पेयाचे, द्रवाचे प्रमाण. (क्रि. मारणे) २. ओरपताना, भुरकताना होणारा आवाज.[ध्व.फुर्र्]

**फुरकी** स्त्री. १. लहान मुलांनी ओठ मिटून तोंडाने काढलेला आवाज. २. फुरका; भुरका. [ध्व.फुर्र्]

**फुरकू(गू)ट** न.१.उत्पन्न केलेले विघ्न; काढलेली अडचण, उपाधी, लचांड.(क्रि. फोडणे) २. अवांतर, भाकड कथा; विषयांतर. (क्रि. काढणे)

**फुरकू(गू)ट** न. रुसवा. (क्रि. येणे, चढणे) पहा : **फुरकट**

**फुरक्या–का** वि.१. भुरकणारा. २. फुरकी वाजवणारा.

**फुरगुले** न. तव्यात फुलवलेली लाही. (हेट.)

**फुरडा–डी** पु.स्त्री. कसर; पाण्यात वाढणारा खाण्याच्या उपयोगी कंद.

**फुरडूक, फुरडुके–क्या, फुर्डुक** पहा : **फरडूक** इ.

**फुरडे** न. नागरमोथा नावाचे सुगंधी गवत; मुस्ता.

**फुरण, फुरणे** पहा : **स्फुरण, स्फुरणे** [सं. स्फुर्]

**फुरणे** अक्रि. आचके येणे. [सं. स्फुरति]

**फुरताई** स्त्री. जलदी; घाई; चपळता. (व.) [हिं.फुर्त=चपलता; ध्व.]

**फुरफुर** स्त्री.१. फुरफुरणे.२. करवंटी वगैरे जळताना होणारा आवाज; तडतडणे. ३. स्फुरण; आवेश. ४. पावसाची रिपरिप. (अहि.)

**फुरफुरणे** अक्रि. १. (घोड्याने, गाढवाने) खेकाळणे; श्वास जोराने सोडणे. २. (करवंटीसारखा तेलकट पदार्थ जळताना) तडतडणे; फुर्र असा आवाज होणे. ३. तोंडाने फुर्र असा आवाज करणे; फुरकी वाजवणे. ४. स्फुरणे; (डोळा)लवणे. ५.(ल.) अत्यंत उत्सुकतेमुळे हात, पाय, तोंड इ. मारणे, धावणे, बोलणे यासाठी स्फुरण पावणे. ६. उतावीळ होणे.

**फुरफुराट** न. जोराची फुरफुर; फुरफुरण्याचा, फुरकीचा मोठा आवाज. [ध्व.]

**फुरफुरी–रे–रं** स्त्री.न. हरभऱ्याच्या पिठाचे तळून केलेले तोंडीलावणे.

**फुरबा** पु. धानाची ओंबी.

**फुरवंट** वि. (बे.) पहा : **फुडवट**

**फुरशीस** पहा : **पुरशीस**

**फुरसणे** अक्रि. मलिन होणे :'स्त्रीमूर्ति फुरसैली.' – लीचउ ६०१.

**फुरस(सू)त, फुर्सत–ती–द** स्त्री.१. रिकामपण; सवड; (कामापासून) मोकळीक. २. रिकामा वेळ. ३. पाहिजे असलेला जास्त वेळ; अवधी; अवकाश. ४. संधी; काबू. [अर. फुर्सत]

**फुरसत चिठी** मुदतचिठी; विशिष्ट काम उरकण्यासाठी दिलेल्या अवधीची लेखी चिठी.

**फुरसे** न. कोकणातील अतिविषारी साप. रंग पिंगट किंवा भुरकट असून डोक्यावर त्रिशूळासारखे पांढरे पट्टे असतात. [ध्व.]

**फुरार** वि.(नाविक) दोरी झिजू, काचू नये म्हणून जिथे काचण्याची शक्यता असते तिथे बारीक दोरीने विशिष्ट तऱ्हेने केलेली गुंडाळी. (को.)

**फुरारणे** पहा : **फुरफुरणे**

**फुरुकटणे** अक्रि.नटणे; मुरडणे:'ऐसी फुरुकटैजे : खोबैजे :'–लीचपू ५२३.

**फुर्लेर** न. फुललेले अळंबे. (गो.)

**फुर्सदगी** स्त्री. भरपगारी रजा. [अर.]

**फु(फो)लकट** वि.क्षुद्र; व्यर्थ :'मी जें जें करी तें तें फुलकट.'– संगीत उःशाप ४६६.

**फुलकडा** पु. वेळवांच्या कांबीचा तट्टा.

**फुलकणी** स्त्री. बारीक कणी. (तंजा.)

**फुलका–की–गी** पु.स्त्री. लहान व बिनघडीची भाकरीप्रमाणे थेट विस्तवावर भाजली जाणारी पोळी. [अर. फुल्क; सं. फुल्ल]

**फुलकारी** न.पंजाबात केले जाणारे कापडावरील फुलांचे नक्षीकाम, भरतकाम.

**फुलक(का)री** पु. माळी.

**फुलकारी** स्त्री.१.प्रत्येक अक्षरापूर्वी 'फुल' शब्द जोडून उपरोधिक बोलण्याची, लिहिण्याची सांकेतिक भाषा. २. ज्यावर रंगीत रेशमी बुट्ट्या विणल्या आहेत असे मलमली कापड. ३. पंजाबी भरतकामाचा एक प्रकार.

वि. ज्यावर फुलाच्या आकृती आहेत असे (कागद,कापड).

**फुलकोबी** स्त्री.कोबीचा एक प्रकार; (इं.) फ्लॉवर.

**फुलके** न.१. एक फूल. २. फोल धान्य.

**फुलगा** पु. शिजवलेला भात; फुलग्या (मालवणी).

**फुलगा** वि. नेहमी नवीन पोशाख करणारा; हौशी. (गो.)

**फुलगुडे** पु.अव. हळदीकुंकू लावून पानाच्या द्रोणातून फळफळावळ वाटण्याचा सौभाग्यलक्षणाचा प्रकार; फुलविडे.(गो.)

**फुलगोटा** पु. एक प्रकारची रवाळ पिठीसाखर.

**फुलचुकी–खी, फुलचूष** न. अंजिरी माथ्याचा, तपकिरी व हिरव्या रंगाचा अंगठ्याएवढा पक्षी.

**फुलचेरी** होनाचा एक प्रकार.

**फुलचोचे** पु.अव.स्त्री. तुंबडी लावण्याच्या जागेवर मारतात त्या फासण्या. (क्रि. घेणे, देणे, मारणे.)

**फुलछडी** स्त्री. १.निशिगंध. २. फुलांनी लगडलेली फांदी.

**फुलजी** वि. पु.१. गर्वाने ताठलेला, अहंमन्य माणूस.२.स्तुतीने खुललेला, अनुकूल झालेला. ३. शेखोजी; प्रतिष्ठित. ४. ठाकठीकपणा; सुरक्षितता. – ऐको.

**फुलझगरे** न. गोवऱ्यांचा विस्तव; जळते निखारे.

**फु(फू)लझडी** स्त्री.१.(कुस्ती) कौशल्यावरून निर्णय लावायची कुस्ती. २. (लाठी) पूर्वसंकेतानुरूप चढाईच्या व बचावाच्या साखळ्या करण्याचा प्रदर्शनी प्रकार. यास 'घाई' असेही म्हणतात. ३. फुलबाजी; एक प्रकारचे शोभेचे दारूकाम. ४. (ल.) नाजूक स्त्री : 'कंठामध्यें पिक दिसे अशि ग तूं रूपसुंदर फुलझडी ।'–होला १०४. (वा.)

**फुलझड्या पडनं**– सुखाचा वर्षाव होणे. (व.)

**फु(फू)लझाड** न.१.ज्याला मुख्यत्वे फुलेच येतात असे झाड (कण्हेर, जास्वंद इ.). २. एक प्रकारचे शोभेचे दारूकाम.

**फुलझाडणी** स्त्री. केरसुणी. (ना.)

**फु(फू)लटोच्या–चोख्या** पु. झाडाचे खोड टोचणारा पक्षी.

**फु(फू)लडो(डौ)ल** पु. फुलांनी सजवलेल्या डोलाऱ्यावर काढलेली देवाची मिरवणूक.

**फुलणी** स्त्री. १.फुलणे; फुगणे; विकसित होणे. २. कपडा साफ व खळ घालून घट्ट करण्याचा व्यवसाय करणारा.

**फुलणे** अक्रि.१.(कळी) उमलणे; विकसणे. २. फुलांचा बहर येणे; मोहर येणे. ३. (भात, जोंधळा इ.ची) लाही होणे. ४. (काळी जमीन, चुना, धान्य इ. भिजल्याने) फुगणे. ५. अवयव सुजणे. ६. (सूर्य उगवताना दिशा) उजळणे; फाकणे. ७. अभिमानाने किंवा गर्वाने फुगणे; ताठा भरणे; हर्षाने, स्तुतीने चढून जाणे. ८.चेहरा आनंदी, प्रफुल्लित दिसणे. ९.हातोड्याने ठोकल्यामुळे खिळ्याचे डोके पसरट होणे. १०. (प्राणी, मनुष्य इ.च्या) अंगावर पांढरे ठिपके उठणे; (एखाद्या माणसाचे) देवी, कोड,फोड इ.नी सर्व अंग व्यापणे. ११. गर्दीने, माणसांनी जागा, मैदान भरून जाणे. १२. कापडावर तंतूच्या बारीक–बारीक गुठळ्या होणे. १३. म्हातारपणामुळे केस पांढरे होत जाणे. १४. विंचरल्याने केस मोकळे होणे; जटा नाहीशा होणे. १५. मांजराच्या शेपटीप्रमाणे केस, पिसारा इ. वर उभे राहणे. १६. विस्तीर्ण होणे; फाकले जाणे (राग, लोभ, आनंद यांनी डोळे,

नाकपुड्या). १७. उत्साहित होणे; खुलणे; स्फुरण येणे.

**फु(फू)लधर** पु. माळी.

**फु(फू)लदाणी** न.स्त्री.घरसजावटीमध्ये फुले भरून ठेवायचे भांडे.

**फु(फू)लपगडी** स्त्री.१.लहान, सुंदर व भारी किमतीचे पागोटे.२. (ल.) हलकी, क्षुद्र वस्तू.

**फु(फू)लपगर** न. डोक्यात घालण्याचा फुलाच्या आकाराचा दागिना.

**फुलप(पै)णे** अक्रि. फुलावर येणे; फुललेले असणे (शेत).

**फु(फू)लपाखरू** न. लहान आकाराचा, रंगीबेरंगी पंख असलेला, फुलांवर उडत असणारा कीटक.

**फु(फू)लपात्र** न. पाणी पिण्याचे भांडे; रामपात्र (हे पितळी असून याचा आकार साधारणतः फुलासारखा असतो.).

**फुलफणी** स्त्री. केळीच्या घडाची सर्वांत शेवटची, बारीक केळी असणारी फणी. [सं.; प्रा. फुल्ल]

**फुलफासणी** पहा : **फुलचोचे**

**फुलफुल** स्त्री. एखाद्या गुप्त गोष्टीची वाच्यता. [सं. स्फुट्]

**फुलफुलणे** पहा : **फुलणे**

**फुलबडी–बरडा–बर्डा** स्त्री.पु.झाडावरून कच्ची काढून, शिजवून, वाळवलेली सुपारी.

**फुलबडुआ–बडवा** पु. देवाला फुले वाहणारा सेवक.

**फुलबाजा** पु. (ठाकरी) नाचाची काठी व नाच. याला कोळिणीचा नाच असेही म्हणतात.

**फु(फू)लबाजा–जी** १.पहा: **फुलझडी** १. २. (थट्टेने) तंबाखूची विडी.

**फुलबाण** पु. भुसनळा.

**फुलबा(वा)सन** न. उंची जिन्नस, कापड मळू नये म्हणून त्याला गुंडाळलेले साधे कापड.

**फुलबिसणा–णी–नी** वि. १.अतिशय नाजूक, कोमल. २. पोशाखी; नुसती ऐट मारणारा; मिजासी; अक्कडबाज; छेलछबेला.

**फुलमेंगा** पु. षंढ; नपुंसक; हिजडा.

**फुलरवा** पु. बारीक रवा. – पाकसिद्धी.

**फुल(ला)वणी** स्त्री. प्रफुल्लितपणा.

**फुलवर** पु.१. फुलकोबी. २. पत्त्यातील एक काळा रंग; किलावर.

**फुलवरा, फुलोरा** पु. १.फुलांची माळ. २. धान्याला येणारा मोहोर. ३. देवावर टांगलेली फळे, खाद्यपदार्थ यांची माळ.४. सणात देवावर फळे, करंज्या, लाडू वगैरे टांगून ठेवण्याची लोखंडी अगर कामटीची चौकट.

**फु(फू)लवात** स्त्री.निरांजनात लावण्याची फुलाच्या आकाराची कापसाची वात.

**फु(फू)लविडे** पु.अव. हळदीकुंकवाचा समारंभ. (गो.) पहा :**फुलगुडे**

**फुलविणे** सक्रि. १.(विस्तव) वारा घालून प्रदीप्त करणे. २. एखाद्याची फार स्तुती करणे. ३. लाकडात ठोकलेल्या खिळ्याचे दुसऱ्या बाजूचे टोक पसरट करणे.

**फुलशा** वि.खुशालीच्या; बढाईच्या; फुलवलेल्या.

**फुलसर** पु. फुलांची माळ.

**फुलसा** वि.१.पांढरा; शुभ्र.(व.,ना.) २.स्वच्छ; निर्मळ; पुसून साफ केलेला.

**फुलसाखर** स्त्री. आटून आळलेला उसाचा रस मडक्यात भरून ठेवल्यानंतर त्यातील रस गळून वरील भागात तयार होणारी साखर.

**फुलसावर** स्त्री. मऊ सावरीच्या कापसाचे झाड.

**फुलसांत** पु. फुलांचा बाजार :'तेथ दाटत श्रृंघारियांची मांदी : पेठे फुलसांतेचां:' –रुस्व ४७७.

**फुलस्केप कागद** तावाच्या आकाराचा, साधारण ३००x२०० मिमी कागद.

**फुला** स्त्री. गतिप्रकार. –अश्वप १.१८५. पहा : **पुलका**

**फुला** पु. अस्थी. (झाडी)

**फुलाई** स्त्री. कपड्याला खळ घालणे.

**फुलार** वि.१. फुलासारखा हलका; सैल; न दाटणारा. २. हलकी व फुगीर (भाकरी इ.). ३. हलक्या जातीचे, दर्जाचे (सूत). ४. हलका; दिखाऊ; नाजूक. ५. गोटे (तांदूळ) उत्तम प्रकारे शिजलेली (पेज). ६. फुललेल्या; बहरलेल्या.

**फुलारणे** उक्रि.१.(माप, पोते, गाठ इ.) सैल भरणे. २.(फुशारकीने, स्तुतीने) फुगणे; फुगवणे; लाडावणे; चढवणे.

**फुलारमाळी** पु. फुलबागा तयार करणारा, फुलांचा धंदा करणारा माळी जातीतील मनुष्य. माळ्यांत्तील एक जात व तीतील व्यक्ती.

**फुलारी** पु. फुलमाळी.

स्त्री. पहा :**फुलकारी**

**फुलावट** स्त्री. पुष्पबंध; फुलांची मांडणी, सजावट; पुष्परचना.

**फुलिका** स्त्री. १.टिकली; चमकी. २. विकास. [सं.फुल्लक]

**फुलिया** पु.१.कपड्यावरची सुतांची टोके, फुले वर काढून कापड फुलवणारा. २. पिंजारी; कापूस पिंजणारा.

**फुलियाण** न. एक

**फुलिंग** न. स्त्री. ठिणगी. [सं.स्फुलिंग]

**फुली** स्त्री. १.कागद, कापड, धातू इ.वर काढलेले फूल; पुष्पाकृती. २. बिब्ब्याची एक आडवी-उभी रेघ. ३. एकमेकांना छेद देणाऱ्या दोन तिरकस रेघांचे चिन्ह; चौफुली. ४. फुलण्याचा भर.-हंको. ५.उत्साह. ६. संयोग :'परी ते फुली जंव नुघडे। मेघांनदींची।'– ज्ञा १५.१२०. ७. अवस्था; दशा :'नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मियां अदानवीं सृष्टि केली।'– ज्ञा १०.२८९. ८. फुलाच्या आकाराचा नाकात घालण्याचा दागिना. ९. गवताची एक जात.(गो.) १०. मिरच्यांची लागवड करताना ठरावीक अंतरावर रोपे लावली जावीत यासाठी उपयोगात आणायची लांब दोरी. या दोरीला विशिष्ट अंतराने खुंट्या लावलेल्या असतात. ११. फोड फुटून पडलेली खूण वा व्रण; गोल जखम. (अहि.)[सं.फुल्ल](वा.)० **घालणे, पाडणे**–१. विघ्न आणणे; गती खुंटवणे. २. खोडणे; चूक धरणे. ० **देणे**–डाग देणे. ० **भरणे**–(चर्मकार.)ढोपर व शेंडी यांच्या मध्यभागी रेशीम भरणे. ० **मारणे**– पाट, दार वगैरेस धातूचे फुलाच्या आकाराचे पत्रे ठोकणे. **फुल्या पाडणे**–(सोनारी) सोने गाळण्यापूर्वी हिणकस सोने व चांदी मिसळून त्यांचा रस पाण्यात पाडणे.

**फु(फू)ली** स्त्री. खर्च; चाट; नुकसान; तोटा.

**फुली** कागदाचे पाच ताव; पंचकडी.

**फुलीफाटा** पु. खोडल्याची खूण म्हणून मारलेली फुली; बाद करणे.

**फुले** अव. १. मेलेल्या माणसाची प्रेतदहनानंतर गोळा केलेली हाडे. (ना.) २. (सोनारी) ठुशीचा भाग. (बे.)

**फुलेकाठी** स्त्री. एक काटेरी झाड.

**फुलेरी वाडी** फुलासह असलेला ऊस. हा बियाण्यासाठी अयोग्य असतो. (झाडी)

**फुले(लो)ल** न.१. अत्तर; सुगंधी तेल; फुलांनी सुगंधित केलेले तेल. २. तिळाचे तेल. - सको.

**फुलोडी** स्त्री. फुलपाखराप्रमाणे चंचल, नाजूक स्त्री.

**फुलो(लौ)रा, फुल्लर** पु.१.पहा:**फुलवरा**. पुष्पगुच्छ. २.फुलांची परडी.

**फुल्‌गुपनी** स्त्री. खाटेची पायाकडे गुंफलेली दोरी. (झाडी)

**फुल्‌फुल्‌ना, फुसल्‌ना** क्रि. हुरळून जाणे; भुरळ पडणे. (झाडी)

**फुल्ये(ले)ण** न. जनावरांच्या उपयोगाचे आणि चांगले गवत (शाकारणीच्या गवतापेक्षा वेगळे). (को.)

**फुल्ल** वि. अतिशय; फार (पांढरा). (गो.)

**फुल्लट** स्त्री. पहिलटकरीण. (गो.)पहा : **फुडवट**

**फुल्ला** वि. शरीरावर पांढरे ठिपके असणारा (घोडा).-अश्वप १.२७.

**फुल्लार** न. १.पुष्प; फूल. २.कमळ : 'सहस्रदळीं नव फुल्लारें । विकसलीं तेथें झुंकारें ।'- मुआदि १८.३. २. देवपूजा.
वि. १. विकसित; फुललेले; उमललेले. २. पहा : **फुलार**

**फुल्लारकर** पु. देवपूजेचा पसारा मांडणारा.

**फुल्लारी माता** इष्टदेवता.

**फुल्लेदार** वि. फुलासारखी विस्तृत, पसरलेली :'फुगडी फुल्लेदार । भाई शिलेदार ।'- मसाप २.२३३.

**फुल्हार** पु. फुलांचा बहर.

**फुशडा** पु. गुधडा. (मुंबई)

**फुशारकी, फुशारी** स्त्री.१. शेखी; बढाई; स्वतःचा मोठेपणा सांगणे. २. पोकळ डामडौल, प्रतिष्ठा; बडेजाव; देखावा.

**फुशारखोर** वि. १. पोकळ बढाई मारणारा. २. रिकामा डौल, देखावा करणारा.

**फुशारणे** अक्रि. फुशारी सांगणे, मिरवणे; ऐट चढणे.

**फुसकट** न. कोंडा; भूस; फोलकट; निःसत्त्व धान्य; फुसका पदार्थ. (वा.)० **काढणे, पाडणे**-दुर्दशा करणे; रग जिरवणे.
वि. पहा : **फुसका**

**फुसकणे** अक्रि.१.(दोरी, काठी इ.) फसदिशी मोडणे, तुटणे. २. बिनसणे; अपुरी राहणे; मोडणे (योजना, व्यवहार). ३. (बंदूक) न उडणे; नेम चुकणे.४.(सामा.) हुकणे; चुकणे (नेम, वार, यत्न इ.). [ध्व.]

**फुसकन-कण-कर-दिनी-दिशी** क्रिवि. १. फुसक्या पदार्थांचे मोडणे, तुटणे, फुसकुली सोडणे इ.वेळी होणाऱ्या आवाजाचे अनुकरण करून. २. कोणत्याही गोष्टीतील आकस्मिक अपयशाचा द्योतक शब्द. ३. बंदूक, तोफ यांचा बार न होता फुसका आवाज होऊन. [ध्व.]

**फुसका, फुसकापुरी, फुसनुल-ला** वि. १.सहज, फसकन तुटणारा, मोडणारा. २. कमजोर; ठिसूळ; भुसभुशीत; निर्जीव. ३. निःसत्त्व; पोकळ; नीरस; निकस (माणूस, पदार्थ, भाषण इ.).

**फुसकाई, फुसकाईचा अंबारा** (विटीदांडूचा खेळ) टोला हुकणे (ल.)चुकणे; अपयश; निष्फळ यत्न.

**फुसकारणे** अक्रि.१.(सापाने)फूत्कार करणे. २. (रागावलेल्या मांजराने) फिस्कारणे. ३. मोठ्याने धापा टाकणे; धापलणे.[त. शी(ची) रुदल्]

**फुसकारा** पु. १. फू, फूं असा आवाज; फूत्कार; फिस्कारा. २. धाप; सुस्कारा; जोराने श्वास टाकणे. (क्रि. देणे, टाकणे.)

**फुसकी, फुसकुली** स्त्री. १.फुसकुला; हळूच सोडलेला अपानवायू; बारीक पाद. (क्रि. सोडणे).२. (ल.) आडून, हळूच केलेली निंदा. [ध्व.]

**फुसकुली** स्त्री. क्षुद्र गोष्ट. (गो.)

**फुसडा, फुसाड-डा** पहा : **भुस(सं)डा**

**फुसडी** स्त्री. १.चाबकाची दोरी; वादी. २.लोंबता किंवा सुटलेला (कापडाचा) दोरा. ३. (लाकडाची) ढलपी.

**फुसफुशीत** वि. १.कमजोर; फुसका; लवकर मोडणारा, तुटणारा. २. भुसभुशीत; वाळवंटी (जमीन). [ध्व. फुस! द्वि.]

**फुसफुस** स्त्री.१. फूत्कार; फुसफुसणे. २. कुजबुज; कानगोष्ट. ३. मुळूमुळू रडणे; मुसमुस. ४. धुसफुस; चरफड. [ध्व.]

**फुसफुसणे** अक्रि. १. फुसकारणे; फिसकारणे; सळाळणे; फूत्कार करणे (साप, मांजर इ.नी). २. चिडून अंगावर येणे; खेकसणे. ३. कुजबुजणे; कानगोष्टी करणे. ४. हळूहळू रडणे; मुसमुसणे. ५. चरफडणे; धुसफुसणे. ६. (ओले लाकूड जळताना) फुरफुरणे. [ध्व. फुस्]

**फुसलावणी** स्त्री. लालूच; आमिष. (क्रि. देणे, करणे, लावणे.)

**फुसलाव(वि)णे** उक्रि.१.(खोटी स्तुती, लालूच इ.नी) वश करून घेणे; आपलासा करणे; आपल्या बाजूला वळवणे. २. समजूत घालणे; बाबापुता करणे. [क. पुसलायितु; हिं. फुसलाना]

**फुसाटणे** अक्रि. जोराने श्वास सोडणे.

**फुसाड** वि. दम नसलेला; नपुंसक.

**फुसांडणे** अक्रि. १. स्फुंदणे; दुःख करणे. (ना.) २. जनावराने जोराने श्वास सोडणे; तसा आवाज करणे. ३. जोराने पुढे घुसणे; मस्तवालपणे अंगावर येणे.

**फुसूक** स्त्री. फुसकन निघून जाणे. पहा : **हुसूक** [ध्व. फुस्]

**फुस्कारणे** अक्रि.पहा : **फिसकारणे** [ध्व. फुस्]

**फुस्कांवचे** अक्रि. ओढणे; शिलगावणे (विडी इ.). (गो.)

**फुस्स** उद्गा. (साप, मांजर इ.चे) फुस्कारणे याचा ध्वन्यनुकारी शब्द.

**फुळकवणी** पहा : **फळकवणी, फिळकवणी**

**फुंक** पु. फुंकर.

**फुंकण-णू** न. फोल दाणा (विशेषतः तांदळाचा); आतील अंश किडीने खाल्ल्यामुळे पोकळ, हलके झालेले धान्य. (राजा.)

**फुंकणी** स्त्री. १.फुंकून विस्तव फुलविण्यासाठी बांबू, धातू इ.ची नळी. २. सर, माळ इ.साठी सोन्याचा अगर काचेचा नळीच्या आकाराचा मणी, तुकडा. ३.फोल धान्य; फुंकण.(वा.)**(हातापायाच्या,**

**हाडाच्या)फुंकण्या होणे**–अतिशय बारीक होणे.

**फुंकणे** सक्रि. १.फुंक मारणे; तोंडाने फूं फूं करणे; फुंकर घालणे. २. सनई, कर्णा इ. मुखवाद्ये वाजवणे. ३. चेतवणे; पेटवणे; जाळून भस्मसात करणे (देश, गाव, तमाखू, रसायन इ.). ४.भाता चालवणे; आतून वारा येईल अशा रीतीने हलवणे; वारा भरणे.५ (पैसे, दौलत) उधळणे; उधळपट्टी करणे. ६. मंत्राची फूक मारणे; मंत्र घालणे. ७. विधियुक्त कर्म न करता प्रेताची कशीतरी विल्हेवाट लावणे. ८. अतिशय कमी किमतीला विकणे. [सं. फूत्+कृ](वा.) **फुंकून पाय टाकणे**- दूरदृष्टीने, खूप विचार करून वागणे.

**फुंकर,फुंका, फुंकारा** १.तोंडाने घातलेला वारा; फुंक. (क्रि. मारणे). २. फूत्कार.

**फुंक(का)रणे** सक्रि. (अग्नी, कढत अन्न इ.वर) फुंकर मारणे. अक्रि. दम लागणे; धापा टाकणे (जनावराने).

**फुंकवाद्य** न. पोकळ वाद्य; तोंडाने वाजवण्याचे वाद्य–सनई, बासरी इ.

**फुंकार, फुंकरा** पु. पहा : **फुंकर**

**फुंकी** स्त्री. फुंकणी.

**फुंके** (गो.) पहा : **फुकट**

**फुंग–ज** पु.अभिमान; फुगारा; ताठा; गर्व :'रागद्वेष मनीं जाणिवेचा फुंग। न धरिजे संग अधर्माचा।'– ब ४६७.

**फुंज(ड)णे** अक्रि.१.स्फुंदणे : 'आक्रंदे रडे आणि फुंजे।'– दास ३.८.२६. २. गर्वाने फुगणे :'जालियाचेनि आनंदें । फुंजों नेणें ।'– ज्ञा १८.५९२. [सं.स्फुन्द्]

**फुंजारणे** उक्रि. पहा : **फिंदारणे**

**फुंट** (गो.) पहा : **फूट**

**फुंटोकडी** स्त्री. नारळाचे दूध नसलेली कढी. (गो.)

**फुंटॉ** वि. नुसता; साधा; दूध नसलेला (चहा).

**फुंद** पु. १. हुंदका; दाबलेले रडे. २. अभिमान; गर्व; ताठा; आढ्यता; प्रौढी; मिजास.
वि. १. फुगलेला; फुगीर. २. गर्वाने ताठलेला. [सं.स्पंद्, स्फुंद्]

**फुंदणा** पु. घोड्याच्या मानेवरील शोभेचा गुच्छ.

**फुंदणे** अक्रि.१. हुंदके देत रडणे; स्फुंदणे; उसासे टाकणे. २. घमेंड करणे.

**फुंदफुंद, फुंदुफुंदु, फुंदेफुंदे** क्रिवि. स्फुंदून स्फुंदून.

**फुंदेल** न. दिवा. (को.)

**फुंपवणे** अक्रि. पहा : **फुपा(फा)वणे**

**फुंपाट** पु. फोफाट; फुस्कारा; फो फो असा आवाज. पहा : **फुपाट**

**फुंपाटणे** अक्रि. फुस्कारणे. पहा : **फुपणे**

**फू, फूं** स्त्री. १. फूत्कार; रागाचा सुस्कारा. २.फुगडीच्या खेळातील फुगडीचा शब्द. ३. फुंकर घालताना होणारा आवाज. [ध्व.] (वा.) **० उडविणे**- एखादी गोष्ट (फुंकरीनेदेखील उडवण्याइतकी) हलकी, कःपदार्थ मानणे. **० करणे, उडवणे, करून टाकणे** – उधळपट्टी करणे. **० पडणे, होणे** – १. तापात जोराने श्वास चालणे, टाकणे; सुस्कारे टाकणे; कण्हणे. २. फुरफुरणे (घोडा). **० होणे** – १. उधळले जाणे; खलास होणे.२. रुसून, फुगून बसणे. ३. गर्वाने ताठणे.
उद्गा. (सर्पादिकांच्या) फूत्काराच्या आवाजाचा ध्वन्यनुकारी शब्द. क्रिवि. फुस्कारण्याच्या आवाजाने.

**फूक** पु. १.वाऱ्याची झुळूक. २. मंत्रोपचार. (झाडी)

**फूकन–कर–दिशी** क्रिवि.झट्कन; चटकन; क्षणात.(क्रि. उडणे, पळणे.)

**फूग** स्त्री.१. सूज; फुगवटा; फुगारा; फुगणे. २. वाहते पाणी तुंबावे म्हणून घातलेला बांध. (को.)

**फूट** स्त्री.१. तड; भेग; चीर (दगड, भांडे, नाणे यांच्यावरील). २. सडताना मोडलेले तांदूळ इ. धान्य; कणी. ३. (सोनारी) मिश्रणाने ठिसूळ झालेल्या सोन्यास तापवताना पडलेली भेग.
स्त्री.न. १.लोणच्यासाठी योग्य असा कोवळा आंबा; कैरी. २. (सामा.) आंब्यास तुच्छतादर्शक शब्द : 'पन्हें फुटाचें मठ्ठा मिठ्ठा ।'– अमृत ३५. ३. झाडावरून पडून फुटलेले फळ. ४. वातविकाराने होणाऱ्या तीव्र वेदना. (क्रि. लागणे).५.भेद; पृथकत्व (एखाद्या पदार्थातील अवयवांचे); बेबनाव; दुही; वेगळे होणे (संघ, संस्था इ.तील).६.(गुप्त गोष्टींची) परिस्फुटता; वाच्यता; फैलाव. ७. नवीन फुटलेली पालवी; अंकुर; कोंभ, धुमारा. (क्रि. फुटणे).८. एक वर्ष फळ घेण्याच्या कराराने घेतलेले झाड. (राजा., कुण.)
न. शेंदाड, चिबूड, चिभूड इ. खरबुजाची हलकी जात. [सं. स्फट्]

**फूट** वि. फुटकळ; कुठल्याही कंपूत नसलेले.

**फूट** न. पाठीचे मांस. [सं. पृष्ठ]

**फूट** पु. लांबी मोजण्याचे एक माप; बारा इंच. [इं.]

**फूटअंमल** पु.१.अनेक अधिकाऱ्यांची सत्ता; बारभाई अंमल; अधिकाराची विभागणी. २. गावातील विभाजित सत्ता; एकाच प्रजेवर विभागलेला निरनिराळा सारावसुलीचा हक्क. पहा : **अंमल**

**फूटगाव** पु.न. १. ज्यात वस्तू, घरे पांगलेली आहेत असे गाव. २. ते ज्या जिल्ह्यात आहे त्या जिल्ह्याच्या अधिकारात नसलेले गाव. ३. एका बाजूला पडलेले, वसलेले गाव.

**फूटतूट** स्त्री.१. मोडतोड; फुटलेपणा; तुटलेपणा इ. रूप दोष. २. मालाच्या मोडतोडीबद्दल गृहीत धरलेली रक्कम. ३. फुटलेल्या वस्तूंचा ढीग.

**फूटपट्टी** स्त्री. अंकणी; संख्यापट्टी; मापक; मोजपट्टी; मोजमापाचे साधन.

**फूटपाथ** पु.पायरस्ता; मोठ्या रस्त्याच्या दोन्ही बाजूला पायी चालणाऱ्यांसाठी ठेवलेला फरसबंदी रस्ता. [इं.]

**फूटबोर्ड** पु. आगगाडी, बस इ.मध्ये चढण्या–उतरण्यासाठी वाहनालाच असलेली लहान पायरी. [इं.]

**फूटलाइट** पु. (नाट्य.) रंगभूमीच्या समतल, पात्रांच्या पायासमोर असलेले दिवे; तळदिवा. [इं.]

**फूत्कार** पु.१. रागाचा आवेशयुक्त फुंकार, सुस्कारा. २. फुसफुस आवाज; फुसफुसणे; फुसकारणे(साप, मांजर, म्हैस इत्यादींनी रागाने).

**फूत्कारणे** अक्रि. फुसकारणे.

**फूद** स्त्री. स्त्रियांचे गुह्येंद्रिय; योनी; फोदा. (गो.)

**फूनक** हरभऱ्याच्या डाळीपासून केलेला खाद्यपदार्थ. (अहि.)

**फूम** स्त्री. गिलीट; मुलामा. [पोर्तु. फ्युमो]

**फूर** पु. सद्दी; बडेजाव.

**फूल** न. १. वनस्पतींमध्ये प्रजननाचे कार्य करणारा अवयव; पुष्प; मोहर. २. ठिणगी (विशेषतः लोखंडाची); शोभेच्या दारूकामात फुलाच्या आकाराच्या पडणाऱ्या ठिणग्या. ३. कापडावरील बारीक लव, केस, तंतू. ४. (अव. प्रयोग) गाय, घोडा इ.च्या अंगावरील पांढरे ठिपके. ५. पावसाळ्यात दगडावर, लाकडावर उगवणारी छत्रीसारखी वनस्पती. ६. बुबुळावर दिसणारा पांढरा ठिपका; शुक्ल. हा एक नेत्ररोग आहे. ७. एक विशिष्ट रानवनस्पती. ८. उदाचे धुरकट; उदाचा जमलेला धूर. ९. जस्त, तुरटी यांची लाही. १०. चांगली कातरलेली सुपारी. ११. बिब्बा पेटवून त्याच्या तेलाचा पाडलेला थेंब. १२. ओव्यापासून बनवलेले एक औषध. १३. अंडाशय; ज्यात गर्भ तयार होतो तो पोटातील अवयव, भाग. (सामा.) गर्भाशय. (क्रि. वाकडे पडणे, चळणे.). १४. घाण पाण्यात झालेले चक्राकार किडे. (को.) १५. स्फटिक. -शर. १६. देशी दारू. (खा.) १७. घनस्वरूपातून द्रव स्वरूपात न जाता वायुरूपात गेलेला पदार्थ. १८. तलवारीच्या मुठीच्या वाटीवर असणारा वाटोळा भाग. यालाच बतासा म्हणतात. १९. कोनाडा. (व.)[सं. फुल्ल= विकसित] (वा.)० **देणे**- १. दिवा मालवणे. (संस्कृत काव्यात दिवा मालवण्यासाठी त्यावर फूल टाकीत असा उल्लेख येतो.) २. एखाद्यास खुशामतीने चढवणे. ० **ना फुलाची पाकळी देणे**-आपल्या ऐपतीप्रमाणे, यथाशक्ती देणे. (भरपूर, योग्य रक्कम, मोबदला देण्याची ऐपत नसल्यामुळे काही थोडा भाग देणे). ० **बाहेर पडणे, निघणे**- (गुप्त गोष्ट) बाहेर फुटणे; जाहीर होणे. ० **येणे**-उन्हाने तापून जमीन सकस होणे. (वाई) ० **लावणे**- मोठेपणा देणे. ० **वाहणे**- लग्नात मुलगी वरास अर्पण करणे; कन्यादान करणे. **फुलात घालून ठेवणे, राखणे, जपणे**-अत्यंत काळजीपूर्वक व दक्षतेने ठेवणे. **फुला माळप**-१.पहा: **फुले माळणे**.२. प्रशंसा करणे; भुलवणे. (गो.) **फुले चढवणे** - मुंडावळ्या बांधणे. -बदलापूर १४७. **फुले देणे**- वर वर (मनापासून नव्हे) मान्यता देणे, सन्मान करणे :'मसलत ठीक केली, आणि उगेच फुलें द्यावी म्हणोन शिंदे, होळकर व सूरजमल जाट यांस विचारणा केली.'- भाब ११६. **फुले माळणे**- १.पहिल्या गरोदरपणात स्त्रीची पाचव्या महिन्यात ओटी भरणे.(कु.) २. फुलांची माळ करणे. **फुले विकली (वेचली) तेथे गोवऱ्या विकणे**- वैभवाचा काळ जाऊन दारिद्र्य येणे; जेथे वैभवात दिवस घालवले तिथे दारिद्र्यात दिवस घालवावे लागणे.

**फूल** पु. खांबाच्या वरच्या भागात तयार केलेली टोपलीच्या आकाराची मातीची आकृती. (अहि.)

**फूल** न.पु. स्मशानातील प्रेत जाळायची लाकडे. (अहि.)

**फूलउठावणी** स्त्री. कापडावरील सूत फुलवणे.

**फूलछडी** स्त्री. फुलांचा छडीदार गुच्छ.

**फूलझाड** पहा : **फुलझाड**

**फूलधर** पु. माळी.

**फूलदान** पहा : **फुलदाणी**

**फूलबकोट** पु. क्रौंच जातीचा विलायती पक्षी.

**फूस** स्त्री.१.वाईट काम करण्यास चोरून, गुप्तपणे दिलेले उत्तेजन , मदतीचे आश्वासन (विशेषतः दाब ठेवण्याची, शिक्षा करण्याची ज्याच्यावर जबाबदारी आहे त्याने दिलेले); वाईट कृत्याकडे केलेला कानाडोळा. (क्रि. देणे, लावणे.) २. संधी; अनुकूल वेळ; मोकळीक; सवड. पु.न.१.रद्दी सामान; सटरफटर; अडगळ.२. आळसाचे कृत्य, भाषण. पु. मोड आलेला नारळ किंवा ताडफळ यांच्या पोटात असलेला फुसफुशीत अंश, गर. वि. १.फुसका; ठिसूळ. २. लेचापेचा; क्षुद्र.[ध्व.]

**फूस** पहा : **फुसकन**

**फूसफास** वि.रद्दी; टाकाऊ; भिकार; पोकळ(माणूस, जनावर, वस्तू इ.). स्त्री. १.पोरचेष्टा; पांचट भाषण. २. क्षुल्लक, टाकाऊ गोष्ट. ३. मुसमुसणे; चरफड. [ध्व.]

**फे** अ. १. तुच्छता, तिरस्कार दाखवणारे अव्यय. २. दमणूक, हताशपणा किंवा शरण आल्याची कबुलीदर्शक उद्गार. पहा : **फेफे**

**फे(फो)क** अ. पांढरा या रंगाचे आधिक्य दाखवणारा शब्द. उदा. पांढराफेक.
स्त्री. १.संवाद म्हणतानाचा जोरदारपणा; घोडा पळवण्यातला जोम, वेग. २. भाला किंवा त्यासारखे शस्त्र फेकण्याची क्रिया.

**फेक** पु. फेस.

**फेकजाळे** न. मासे पकडण्याचे फेकून पाण्यावर टाकण्याचे जाळे.

**फेकणे** उक्रि.१.झुगारणे; दूर टाकणे; उडवणे; प्रक्षेप करणे; झोकणे; भिरकावणे.२. (घोडा) जोराने पळवणे, दौडत चालवणे, भरधाव सोडणे. ३. (जासूद इ.) जलदीने पाठवणे; वेगाने, ताबडतोब रवाना करणे. ४. (पागोटे) हलवणे; ऐटीत डोक्यावर घालणे. [सं.प्र+क्षिप्]

**फेकफाक, फेकाफेक** स्त्री. वस्तू इतकडेतिकडे फेकणे.

**फेकार** पु. कोल्हा, खोकड यांचे ओरडणे.

**फेकूला** वि. नीच; हलकट. (झाडी)

**फेगडणे, फेगडा** पहा : **फेंगडणे, फेंगडा**

**फेट** पु. घोळ; काठ; किनार (विशेषतः ल. उपयोग).[हिं. फेंट] (वा.) ० **गळ्यात घालणे**- पकडणे; घट्ट धरणे. ० **धरणे**- रागाने पकडणे. न. लाकडाची निमुळती पट्टी.

**फेट** अडजातीचे. - तंजा.

**फेटरा** स्त्री. काटेरी झुडपाचा एक प्रकार.

**फेटा** पु. लहान पागोटे; पटका. १०-१५ हात लांब व अर्धा-पाऊण हात रुंद असे डोक्याला बांधण्याचे वस्त्र. [हिं.; सं. पट]

**फेटाळ** वि. व्यसनी; बाहेरख्याली (पुरुष, स्त्री).

**फेटाळणे** सक्रि.१.हाकलणे. २. धुडकावणे; विचारात न घेणे; हाणून पाडणे (अर्ज, ठराव). [हिं.फेंटना; सं. स्फिट्]

**फेटे** न.अव.हरकत; वांधा; अडचण :'विमा कंपन्या मयताच्या वयाचा दाखला वगैरे पुरावा मागून नसती फेटें काढतात.'-विवृ१५ ऑ. १९३७.

**फेड** स्त्री. १. (कर्ज, उपकार इ.चा) परत मोबदला देऊन टाकणे; निरास करणे; कर्जफेड. २. पूर्ती (नवस, वचन इ.ची).

**फेडणे** सक्रि. १.(नेसलेले वस्त्र, बांधलेली गाठ) सोडणे; सैल करणे. २.उतरणे; हरण करणे :'जें एकें वळें फेडावा भारू । उमपपणाचा।'-

शिव ७५. ३.(कर्ज, उपकार, नवस, शंका) बाकी न ठेवणे; न उरवणे. ४.कातरणे; काढणे : 'तंव त्याचिं नखें फेडावया वारिकु घरासि आला।'- पंच ५.१. ५. दूर, नाहीसे करणे; उघड करणे : 'फेडिला डोळियांचा कवळ। धुतला गुणदोषांचा मळ ।'- तुगा ७१२. ६.स्वच्छ करणे; शिंकरणे; धुणे; काढून टाकणे (नाक, शेंबूड, घाण). ७.एका भांड्यातून दुसऱ्या भांड्यात घालणे, ओतणे. ८. पराभव करणे. ९.(वेळ) घालवणे. [सं.स्फिटित]

**फेडा** पु. मृदंगाचा पुडा; नडघे; बोंडी; पूड.

**फेडी** वि.१.चक्राकार. २.(ल.) श्रीमंती; वैभवशाली. -लोसाको.

**फेडीवेढी** स्त्री. वस्त्रांतर करणे.

**फेण-न** पु.१.फेस; फेन. २.(ल.)विष : 'बचनाग सोमल अहिफेण ।'- पांप्र ८.१०२. [सं. फेन]

**फेणणे** अक्रि. फेसणे; फेस येणे; फेसळणे. [सं.फेन]

**फेणी** स्त्री. १.उकळणाऱ्या उसाच्या रसावरील फेसाळ मळी. २. हलकी, कमी प्रतीची दारू; माडाची, काजूची दारू. [सं.फेन]

**फेणी** स्त्री.१. पापडी; पापडीसारखा बनवलेला तांदळाचा एक पदार्थ. २. तारफेणी; एक खाद्यविशेष. ३. मोठा बत्तासा. [गु.]

**फेणीचे तेल** खोबऱ्याचे हातघाण्यावर किंवा किसून हाताने काढलेले तेल.

**फेणो** पु. केळ्यांची फणी. (गो.)

**फेणोरी** स्त्री. फेंडोरी; एक प्रकारचे पक्वान्न; पोळी. [सं.फेन+पुरी]

**फेतका** पु. पो; गुराने टाकलेले शेण. (तंजा.)

**फेती** स्त्री. कारागिराची मजुरी; घडणावळ. (गो.) [पोर्तु.]

**फेतीस** न. पत्त्यांच्या खेळातील लबाडी. (कु.)

**फेत्का** पु. पेंड. (व.)

**फेदका** पु. शेंबडाचा लोळा. (ना.)

**फेदड** न. चिपड; डोळ्यातून येणारा पू.

**फेदरे** न.पु. गाई, म्हशीच्या चिकाचा गूळ टाकून केलेला पदार्थ; खरवस. (अहि.)

**फेदी पडणे** काम रेंगाळणे.

**फेन** पु. फेस.

**फेन काच** जिच्यातून पलीकडचे दिसत नाही पण प्रकाश आत येतो अशी सफेद रंगाची काच.

**फेना** पु.अंग घासण्यासाठी वापरला जाणारा खरबरीत असा दगडाचा तुकडा. (अहि.)

**फेनिल** पु. रिठ्याचे झाड. याची फळे साबणाऐवजी वापरतात. वि. फेसयुक्त; फेसाळलेला. [सं.फेन]

**फेपणा-टा, फेफटा** वि. चपट्या, बसकट नाकाचा.

**फेपरा** वि. रुंद नाकाचा; फेंदरा.

**फेपरा** वि. फेपरे, घुरे येत असलेला; फेपरेकरी.

**फेप(फ)राई** स्त्री. (उप.) तोतरेपणा.

**फेपरी-डी** स्त्री. १.एखाद्याच्या बोलण्याला रागाने व तिरस्काराने योजावयाचा शब्द; बडबड; जल्पना. २. अडखळत, गडबडल्याने बोबडे बोलणे. (क्रि. वळणे)

**फेप(फ)रे, फेफरेधावरे** न. १.अपस्मार रोग; तोंडाला फेस व अंगाला कंप अशा रीतीने येणारी मूर्च्छा; झटका. २. पिशाचबाधेमुळे येणारा अशा प्रकारचा झटका. (क्रि. येणे, लागणे.) [ध्व.]

**फेप्डा** पु. १. खाकरा. २. फुफ्फुस. (झाडी) [हिं.]

**फेप्रा** पु. १.शेंबडाचा गोळा. २. तोंडातील फेस.

**फेफे** स्त्री.१.त्रेधातिरपीट; शरणागताची असहाय स्थिती; बें बें. २. अपमानास्पद स्थिती.
अ. अतिशय श्रम, अगतिकत्व, दुबळेपणा दाखवणारा उद्गार.

**फेर** पु.१.रिंगण; वर्तुळाकार दौड करीत किंवा इकडे-तिकडे फिरणे (घोड्याने); फेरफेटका. २. फरक; भिन्नता; असमानता; भेद; विसंगतपणा. ३. फरक; बदल; पालट. (क्रि. पडणे).४. वाक; वळण; बाक (रस्ता, काठी इ.चा). ५ .गाण्यात निरनिराळे स्वरभेद, खाचाखोचा दाखवण्याची शक्ती, क्षमता. ६. वर्तुळाचा परीघ. ७. घेर; घोळ; काठ (परकर, अंगरखा यांचा). ८. वाटोळे गुंडाळणे; वळसा; विळखा; वळ; पीळ (दोरीचा, कापडाचा-काठीभोवती, स्वतःभोवती). ९. बकऱ्याच्या पोटातील एक भाग. १०. फेरा (जन्ममृत्यूचा). (वा.) ० **उलटणे**-(चर्मकार.) उलटा शिवलेला जोडा सुलट करणे. ० **करणे**-बदला घेणे; उट्टे काढणे. ०**घेऊन मुतणे**- वाईटपणात (शिकवणीवर) वरताण करणे. ० **घेणे, जुंपणे**-(चर्मकार.) तळ व तजा एके ठिकाणी शिवणे. ० **देणे**- फिरवून आणणे.
क्रिवि. पुन्हा; परत; माघारी.

**फेर** पु. डाव; फेरी : 'पाउगीयापासौनि फेरू घेतला.' - लीचपू २८.
अ.परत; उलटून; पुन्हा.

**फेरकरवत** पहा : **आढ्याकरवत**

**फेरगोष्ट** स्त्री.(कनिष्ठ दर्जाच्या मनुष्याने दिलेले) दांडगाईचे,उलट उत्तर. (क्रि. करणे)

**फेरघोडी-डे** स्त्री.न. १.पहा : **फेरगोष्ट**. २. पुन्हा हल्ला; उलट खाणे (पराभूत शत्रू, परावृत्त संकट यांनी); प्रत्यपकार; सूड. (क्रि. घेणे).

**फेरघोंगडे** न.१. (एखाद्याची घोंगडी त्याच्या अंगावरून काढून ओढाताण करणे, फाडणे, हिसकणे इ.रूप) अवहेलनेने, अपमानाने वागवणे. २. अशा तऱ्हेने वागवलेल्या मनुष्याची स्थिती. (क्रि. करणे, होणे).

**फेरणी** स्त्री. १. पहिल्यापासून शेवटपर्यंत परत पाळी येणे; पुन्हा पुन्हा आवृत्ती. २. फेरफटका.

**फेरणे** सक्रि. १. (घोड्याला) रंगणावर,वाटोळे, इकडे-तिकडे फिरवणे, दौडत नेणे. २. इकडून तिकडे, खालवर काही काळ चालणे, चाळवा देणे. ३. शाकारणे. ४. बदलवणे. [हिं.फेरना]

**फेरदेणा** पु. परतफेड.

**फेरप(ब)गडी** स्त्री.१.पहा : **फेरघोडी**.२. (वाईट अर्थी) सामना; स्पर्धा; चढाओढ. ३. कबूल केलेली गोष्ट न पाळणे. ४. मन फिरणे (वाईट तऱ्हेने). ५. वाईट मार्गाला लागणे. ६. (शब्दशः) अदलाबदल.

**फेरपत्र** न. पत्राचे उत्तर; पत्रोत्तर.

**फेरपाळी** स्त्री. एकावरून दुसऱ्यावर अशा क्रमाने येणारी पाळी.

**फेरफटका** पु. १. चक्कर; रंगण; घोड्याची रपेट; इकडेतिकडे दौडणे. २. हिंडणे; भटकणे; फिरणे. [क. फेरुफुटका]

**फेरफार** पु. दुरुस्ती; पालट; मजकुरात केलेला महत्त्वाचा बदल.

**फेरफारपत्रक** न. जमिनीवरील हक्कांच्या बदलांची नोंद ज्यात केली जाते ते पुस्तक.

**फेरबदल** पु. फरक; पुन्हा केलेला बदल.

**फेरबदली** स्त्री. १. अदलाबदल; आलटापालट. २. फौज, तुकडी यातील शिपायांची आपसातील बदली, पालट; एकाने येऊन दुसऱ्यास मोकळीक देणे. (वा.) **फेरबदलीची गोष्ट** – विश्वासघात.

**फेरमोब(बा)दला** पु. नगास नग देऊन घेणे; अदलाबदल; विनिमय.

**फेरवई, फेरवै** स्त्री. बटाटेवडा.-गृशि १.८१.

**फेरवट** स्त्री. कडोसरी.

**फेरा, फेराटी** पु.स्त्री. १.वेढा; वळसा; विळखा; पीळ; घेर. २. चक्कर; प्रदक्षिणा; वर्तुळाकृती मार्ग; गिरकी. ३. (रस्त्याचे, नदीचे) बाकदार वळण; वाकण; वळसा. ४. हेलपाटा; चक्कर; फेरी; व्यर्थ येरझार. ५. (ल.) अडचण; संकट; घोटाळा; पाश (या अर्थी सप्तमी विभक्तीत प्रयोग. जसे :- फेऱ्यात). (क्रि. घालणे, पडणे, सापडणे.) ६. वर्तुळाचा परीघ. ७. चौऱ्याऐंशी लक्ष योनींत जन्ममरण.

**फेराची आरी** (चर्मकार.)खालचे तळ व वरचे तळ शिवण्याचे हत्यार.

**फेरामापी** पु. गाडीने किती अंतर कापले हे दाखवणारे यंत्र.

**फेरावणे** अक्रि. अदलाबदल होणे : 'वस्त्रें वेढितां घाबिरपणीं । फेरावली लगबगा।' – मुमआदि १८.०८.

**फेरावर** अ. एकाची मुलगी दुसऱ्याला, दुसऱ्याची तिसऱ्याला असा अप्रत्यक्ष साटेलोटे संबंध. (झाडी)

**फेरि(री)स्त** न. टाचण; यादी; सूची; अनुक्रमणिका; फाईल; फर्द; पट; फर्दा : 'हे दप्तर प्रांतवार.... लावून फेरिस्त तयार करण्यास्तव अमानतदार यांचे स्वाधीन केले.'– इनाम ५९. [फा. फिह्‌रस्त]

**फेरिस्ता** पु. प्रभुप्रेषित; पैगंबर; देवदूत. [फा.फिरिश्त]

**फेरिस्ता** वि. भटके.

**फेरी** स्त्री. १.चक्कर; प्रदक्षिणा; वळसा; एखाद्या वस्तूच्या भोवती दुसऱ्या वस्तूने फिरणे.२. फिरून एका ठिकाणी येणे; गिरकांडा; फेरफटका. ३. पाळी; बारी. ४. गस्त; घस्त; एकसारखे शहरातून किंवा सभोवार पहाऱ्याकरिता फिरणे. ५.वर्तुळ; मंडल.६. तर. (को.)७. बेडा.-तंजा.

**फेरीवाला, फेरेकरी** पु.१. फिरस्ता; फिरणारा. २. विक्रीचा माल घेऊन दारोदार हिंडणारा. ३. फिरता भिकारी.

**फेल** न. ज्यामधला दाणा पोसलेला नाही अशी पोचट शेंग; वाल, हरभरा इ.चा पोचट घाटा, शेंग. (को.)

**फेल्ट** स्त्री. लोकर, केस इ. दाबाखाली घालून तयार केलेले कापड; बुरणूस.

**फेस** स्त्री. फाक; फाकळी; फोड; लांबट तुकडा. (राजा.)

**फेस,फेसाटी** पु. फेन; फेण; साबणाचे पाणी, दूध, मध इ. द्रवपदार्थांवर येणाऱ्या असंख्य लहान बुडबुड्यांचा समूह. [सं. फेन]

**फेस** पु. बाभळ इ.च्या शिऱ्यांचा, काटक्याकुटक्यांचा भारा, ओझे; काटेरी फांद्या-डहाळ्यांचा भारा.(कर.) पहा : **फास**

**फेस** पु. तर्र; लास; धुंद : 'बंधुजी फेस होऊन पडला.'– आआशे १८१.

**फेसक(कू)ट** न. (तुच्छतार्थी, तिरस्कारार्थी) फेस.

**फेसणी, फेसळणी** स्त्री.फेस आणण्याची क्रिया; फेसाळणे.

**फेसणी** स्त्री. फोडी, तुकडे करणे (भोपळा इ.च्या भाजीचे). (राजा.)

**फेसणे, फेसलटणे, फेसळ(ल)णे** अक्रि. फेस येणे; फेसाने युक्त होणे. उक्रि. फेस आणणे; हलके होण्यासाठी घोटणे (तूप इ. पदार्थ).

**फेसा** पु. बुलबुल पक्षी.

**फेसाटणी** स्त्री. पेरलेल्या शेतात फेसाटी फिरवून पेरलेले बी मातीने झाकण्याची क्रिया.

**फेसाटी** स्त्री. १.तोड केलेल्या काटेरी झुडपांचा भारा. २. पेरलेल्या जमिनीतील बी झाकण्यासाठी त्यावरून फिरवण्याचा काटेरी भारा; काटेरी झुडपांचा बनवलेला कुळव.३. पहा : **दाताळे**. ही फणीसारखी असून जमीन नांगरल्यावर डिखळे फोडण्यास हिचा उपयोग करतात. (वा.) **(गाड्याचा माग)फेसाटीने मोडणे**- युक्तीने मागमूस नाहीसा करणे. (गाड्याच्या मागे काटेरी झाडांच्या फांद्या दोरीला बांधून नेतात. त्यामुळे गाड्यांच्या चाकांची खूण रस्त्यावरून पुसत जाते.)

**फेसाड** स्त्री. १. धांदल; तिरपीट; त्रेधा. (ना.) २. तकलीफ; श्रम.(व.)

**फेस्क** न. आगपेटी.(गो.) [पोर्तु. फॉस्फोरो]

**फेस्त** स्त्री. ख्रिस्ती लोकांचा सण. [पोर्तु. फेस्ता]

**फेंकटी** स्त्री. कटिभाग. (गो.)

**फेंकारणे** क्रि. हलणे; फडफडणे : 'फेंकारते कुंचें जंवदंड। दळवेंयाचें।'– शिव ५२८. [सं. प्रेक्षण]

**फेंगडणे** क्रि. वाकडे, फेंगड्यासारखे चालणे. [सं.प्र+इंग]

**फेंगडा, फें(फे)गडा पावडा, फेंगडुधीन्** वि.१. वाकडा (पाय). २. धनुष्याकृती पाय असलेला; पाय वाकवून, फाकून चालणारा.

**फेंगडे** न. भारवाही गिड्डे तट्टू.

**फेंच,फेंचाक** बुलबुल.

**फेंट** न. कुर्ली(खेकड्या)चा एक लहान प्रकार.(कु.)

**फेंट** न.पाचरेप्रमाणे उपयोगी पडणारा , लाकडाचा निमुळता तुकडा. (राजा.)

**फेंटण** न. किल्ला, भिंत फोडण्याचे यंत्र; लोलगदायंत्र.

**फेंटोल** पु. मुलांचा एक मैदानी खेळ. (ना.)

**फेंड, फेंडर** पु. फेस. (गो.)

**फेंड–डा–डी** स्त्री. ढुंगण; कुल्ला; टिरी.

**फेंडकाड** स्त्री. (तुच्छतादर्शक) पहा : **फेंड**

**फेंडोरी** (गो.)पहा : **फेणोरी**

**फेंड्जोड्** पु. मध्ये उंचवटा असलेली उसाची लावणी. (झाडी)

**फेंद** पु. तफावत; फरक (हिशेब, हकिकत इत्यादींमधील). (क्रि. पडणे) [सं.स्पंद] (वा.)**फेंदीत, फेदीस पडणे**-वांध्यात, दिरंगाईस पडणे; नुकसान होणे.

**फेंद** (प्र.) फंद.

**फेंदडणे** सक्रि.१.फितवणे; भुलवणे; मन फिरवणे. (प्रां.) २. कामावरून काढून टाकणे; कमी करणे.

**फेंदड(र)णे** अक्रि. चपटे होणे, असणे; रुंद असणे, होणे, करणे.

**फेंदड(र)णे, फेंदाड(र)णे** उक्रि. (नाक) रागाने फुगवणे, पसरणे, वर करणे, मुरडणे. [सं.स्फाय्]

**फेंदणे** अक्रि.१.हलके सरकणे; सरपटत जाणे. २. (ल.) रेंगाळणे; सावकाश चालणे.

**फेंदरट, फेंदरा** वि.१.बसके; चपटे; शिमरे (नाक). २. बसक्या नाकाचा.

**फेंदी** स्त्री. फेंगडी : 'माहादी फेंदी दर्भेयाची दर्भी :'– गोप्रच १२१.

**फेंदू** वि. लठ्ठ व आळशी; ताकद नसून नुसता फोपशा.

**फेंदू** पु.१. झुरळ, विंचू असे कीटक चिरडल्यामुळे झालेला चेंदा, लगदा. २. मांस, फळे यांसारखे पदार्थ कुजून लिबलिबीत होणे व त्याला पाणी सुटणे;-(विरू.) मेंदू. पहा : **बेंदू**

**फेंफळ** स्त्री. प्रतिज्ञा.– मनको.

**फॅक्स मशीन** मजकूर, चित्रे, आराखडे, तक्ते रेडिओलहरींद्वारे पाठवून पुन्हा त्वरित त्यांचे मूळ स्वरूप तयार करणारे यंत्र. [इं.]

**फॅड** न. सवय; लहर; काही काळ टिकणारी विक्षिप्त आवड. [इं.]

**फॅदम** न. समुद्राची खोली मोजण्याचे यंत्र. (१ फॅदम=१.८ मीटर) [इं.]

**फॅन्सी** वि.१. सुबक; सुरेख; सुंदर.२. नकली; दिखाऊ. [इं.]

**फॅरनहीट** न. उष्णतामान मोजण्याची पद्धत. या पद्धतीप्रमाणे पाण्याचा बाष्पबिंदू २१२° फॅ.ही. व थिजण्याचा ३२° फॅ.ही. असतो. [इं.]

**फॅशन** स्त्री. नवीन चाल, रीत, ढंग, प्रथा, प्रचार. [इं.]

**फॅसिस्ट** पु. पहिल्या महायुद्धाच्या काळात इटलीमध्ये निर्माण झालेली कम्युनिस्टविरोधी संघटना. [इं.]

**फैटण** स्त्री. एक प्रकारची चार चाकाची घोड्यांची गाडी. [इं. फाएटन]

**फैन(ना)बाज** वि.१.विशेष प्रकारे सजलेली; उत्तम. २. (ल.) चमत्कारिक; वेडेवाकडे : 'अशा फैनबाज सडकेने मला हा आडगावचा प्रवास नकोसा झाला.'– आपा ५३.

**फैना** वि. उत्तम; उत्कृष्ट; चांगले.

**फैर** स्त्री. (बाण, बंदूक, तोफ इ.) शस्त्रांचा सारखा मारा.[इं. फायर] (वा.) **फैरी झाडणे**– युद्धाला तोंड फुटणे, फोडणे.

**फैल** पु. स्त्री. १.कार्य. २.अंमल; सत्ता :'यात जो फैल मजबुदीनें कर्तव्य तो करणे.'–ऐच ११५.३. मोकाट वर्तन; बदफैल; रंगढंग. (क्रि. करणे, मचवणे.) ४. दंगा; तंटा; बखेडा.–शिदी ८३. ५. कारस्थान.– ऐको. [अर. फिअल](वा.)**फैलावर घेणे, धरणे**–१.सारखे कठीण कामाला जुंपणे; शिक्षा करणे.२. कानउघाडणी करणे. ३. अडचणीत पकडणे. ४. (कायदा) दावा पुन्हा न्यायालयात दाखल करून घेणे:'तो दावा सुदैवानें पुन्हा फैलावर घेण्यांत आला.'– आत्मवृत्त १२५.

**फैल** पु. १. टोळी; समूह.२. मजुरांची स्टेशनजवळची वस्ती. ३.ओळ. [इं.फाईल]

**फैलजामिनकी, फैलजामिनी** स्त्री. फैलजामिनाची हमी; जमानत.

**फैलजामीन** पु. दुष्कृत्य, दुर्वर्तन याबद्दलचा जातमुचलका; शांततेने वागण्याबद्दलचा जामीन. [फा. फिअल–इ–झामिनी]

**फैलाव–वा** पु.१. (शब्दशः व ल.) प्रसार; विस्तार (जखम, वंश, लागण, व्यवहार, विषय, भाषण इ.चा) २. व्यापन; मांडणी ३.लांबण–ड लावणे; दिरंगाई करणे. [हिं.]

**फैलावणे** उक्रि. पसरणे; दूरवर जाणे–नेणे; विस्तारणे.

**फैसल–ला–ल्ला** स्त्री.न.१.निवाडा; निकाल; न्यायाधीशाने कारणासह दिलेला निर्णय. २.कर्जाची परतफेड. (क्रि. करणे). [अर. फैसला]

**फैसलनामा** पु. भांडणाचा लेखी निर्णय; वादाबाबत सरकारी हुकूम.[फा.]

**फोक** पु.१.सरळ ओली फांदी; फाटे; गाठी वगैरे नसलेली लहान डहाळी; शिरपुटी. २. लांबसडक छडी; पाने काढलेली शिंदीची फांदी (हाकणे, मारणे यासाठी उपयोग).
वि. १.सडपातळ पण मजबूत याअर्थी तरुण शब्दापुढे योजतात. उदा.तो नवा तरणा फोक आहे. २. सडपातळ:'पातळ पुतळी फोक तनुशेंग सडक चवळी।' – प्रला १७०.

**फोक** पु. पातळ व पुष्कळ हगणे; रेच; ढाळ.(क्रि. जाणे)

**फोक** पु. एका वेळेला कोंबडीने उबवून काढलेल्या पिलांचा समूह : 'माझा फोक मेल्यांनां पहावत नाय.' – आआशे १५४–१५५.

**फोकट** वि. फोल; खोटा.

**फो(फों)कणी** स्त्री. विरळ पेरणी; बी उडवून, फेकून पेरणे (कोकणातील भातपेरणीप्रमाणे).

**फोकणे** उक्रि. १.बी विरळ पडावे म्हणून पसरून, फेकून पेरणे. २. बातमी इ. सर्वत्र प्रसिद्ध होईल असे करणे. ३. फोकाने किंवा शिपटाने मारणे.

**फोकनाड** स्त्री. थाप; वायफळ बोलणे. (क्रि. सोडणे).(ना.)

**फोक(का)रणे, फोकरवणे** सक्रि. १. पुकारणे; हाक मारणे :'धांवा फोकरीतु बोले तैसें। दीशांप्रति।'–ऋ ३७.२. प्रगट करणे :'तैसा दृष्टादृष्टाचा सखा। धर्मु जाला तो फोकारिजे देखा।'– ज्ञा १६.२२२. ३. वर्णन करणे. [सं. पूत्+कृ]

**फोकलणे** अक्रि. हगवण लागणे; ढेंढाळणे.

**फोकल(ळ)णे** सक्रि. फोकाने मारणे.

**फोकली** स्त्री.(अश्लील) स्त्रीचे जननेंद्रिय. शिवीत उपयोग.

**फोकवण** स्त्री. ढाळ, रेच होणे; पाण्यासारखे शौचास होणे; ढेंढळ.

**फोकस** पु. केंद्र; प्रकाशकेंद्र; भिंगातून जाणारी किरणे ज्या बिंदूत एकत्र होतात तो बिंदू. [सं.]

**फोकाई** स्त्री. पेरणे. (झाडी)

**फोकाटणे** उक्रि. फोकाटीने मारणे.

**फोकाटा–रा** पु.१.फोक. (ना.)२. खूप उंच मनुष्य; शेकाटा.

**फोकाटी** स्त्री.१.लहानसा फोक; शिपटी; डहाळी;छडी.२.(ल.) सडपातळ, नाजूक मनुष्य.

**फोकाड्या, फोकायत्या** स्त्री.अव. गप्पा; बाता. (क्रि. सोडणे) (व.)

**फोकार** पहा : **फुफाटा**

**फोकारनं** क्रि. हुसकावून लावणे; हाकलून देणे; घालवणे. (अहि.)

**फोकांडा–डी** पु.स्त्री. जोराचा ढाळ, रेच. (क्रि. लागणे, जाणे.)(व.)

**फोकिणे** क्रि. फिरवणे.

**फोकी–गी** स्त्री. गलबताच्या नाळेवर असणारे त्रिकोणाकृती शीड.

**फोकोटी** स्त्री. वाढ होण्यापूर्वीच गळलेली सुपारी.

**फोक्टी** स्त्री. काठी; दांडी. (झाडी)

**फोखूत्** वि. विकलेले. पहा : **फरोक्त**

**फोग** पु.१.शोभेचे दारूकाम.(गो.) २.(ल.) खरडपट्टी. (गो.)[पोर्तु. फोगो]
**फोगदर** वि. लठ्ठ स्त्री. (गो.)
**फोगी** स्त्री.खेचून घेण्यासाठी असलेली लहान पुली किंव कप्पी.
**फोगेट-त, फोगोट-ती** स्त्री.१.फटाकडा; फटाका.२.(ल.) खरडपट्टी; खडसावणी. (वा.) **फोगोत्यान वाट मार** -कष्टसाध्य गोष्ट सहजासहजी साध्य करण्याचा आव आणणे.
**फोगेर** पु. दारूसामान बनविणारा. (गो.)
**फोट** पु.१. टाचेमधील चीर; भेग. २. फोड; गळू. [सं.स्फोट]
**फोटो, फोटोग्राफ** पु. प्रकाशाच्या साहाय्याने कॅमेऱ्याने काढलेले छायाचित्र. [इं.]
**फोटो झिंको मुद्रण** कॅमेऱ्याचा वापर करून, पत्र्यावर फोटो उठवून मुद्रण करण्याची कला.
**फोड** पु. १.गळू; उठाणू; व्रण; भाजल्यामुळे किंवा खरजेसारख्या रोगाने शरीरावर उठणारे बुडबुड्यासारखे आकार. २. पापड-पापडच्या भाजल्यावर त्यावर आलेले फुगारे. ३. वाच्यता; गुप्त गोष्ट बाहेर फुटणे. ४. विशद करून सांगणे; स्पष्टीकरण; खुलासा. पहा : **फाड** ३ स्त्री.१.तुकडा; फोडून केलेला भाग; फाक; शकल (फळे, कंद इ.चे). २.ओबडधोबड तुकडे. ३. भेद; वियुक्तता. [सं.स्फोट; क.पोक्कु]
**फोडणी** स्त्री.१.तेल किंवा तूप तापवून त्यात हिंग, मोहरी, कारळे, मेथ्या, हळद इ.पदार्थ तळून केलेला चुरका. भाजी, आमटी इ.पदार्थांस खमंगपणा, स्वाद आणणारे पदार्थ. २.(ल.) विडा. (यात लवंगा वगैरे फोडणीचे काही पदार्थ असतात.) ३. फोडणे; विभागणी; भाग, तुकडे करणे. [सं.स्फोटनी](वा.)० **देणे**-झाडून टाकणे; रागाने बोलणे.
**फोडणीदाना** पु. चिवडा. (काशी)
**फोडणे** उक्रि.१.चिरणे; तुकडे करणे; जोराने वेगळे करणे; विध्वंस करणे. २. (घराला, भिंतीला, पेटीला) फट, भगदाड, भोक पाडणे. ३. (घाव घालून) तोडणे; भेदणे; तुकडे करणे; खांडणे; छेदणे. ४.(फोड, गळू इ.) फाडणे; भोक पाडून पू वगैरे बाहेर काढणे. ५.(डोळे) बाहेर काढणे; दृष्टी नाहीशी करणे. ६. (गुप्त गोष्ट) उघडकीस आणणे; प्रसिद्ध करणे. ७. स्पष्ट करणे. ८. (ताक) विस्तवावर तापवून त्याचे चोथापाणी करणे. फोडणे याचा क्रियेची आकस्मिकता व सपाटा दाखवण्यासाठी उपयोग करतात. ९. मारणे. १०. शत्रुपक्षातील व्यक्तीला फितवणे. [सं.स्फुट्]
**फोडणे** अक्रि. १.अतिशय दुखणे :'माझीहि दाढ कधी कधी भयंकर फोडायची.'- सनई ४. २. जोरात चावा घेणे (साप, कुत्रा वगैरेंनी.)
**फोडती** पु. किल्ला. -वसमो.
**फोडनिशी, फोण्णिशी** स्त्री. स्पष्टीकरण; विवेचन. पहा : **फोड**
**फोडशी** स्त्री. रानात उगवणारी एक प्रकारची पालेभाजी. कांद्याच्या पात्यासारख्या हिला पाती असतात.
**फोडसे** न. फुरसे :'गुणियासि नागवे । फोडसें जैसें।'ह्रज्ञा १३.७२५.
**फोडाळ, फोडेला** वि. फोडांनी, पुळ्यांनी भरलेला.
**फोडा** पु. सौभाग्यवती स्त्रियांनी हातात घालण्याचा दागिना.(तंजा.)
**फोडाळणे** न. गुरांना होणारा एक रोग.
अक्रि.फोड, पुटकुळ्या उठणे.
**फोडी** स्त्री.१. सुपारीचे खांड. २.कवडी. ३. देवीच्या रोगात येणारी पुटकुळी, पुळी, फोड.
**फोडीव** वि.१.फोडलेले, तुकडे केलेले (लाकूड इ.).२. प्रकृतीला अपायकारक. (झाडी)
**फोडू** वि. फितुरी, भेद करणारा : 'मागती वाड्यांतील लोक फोडू वाडा बदलावा.'- पेद २४.१७.
**फोडे** पु.अव. देवी; देवीची लस :'मुलीस फोडे काढले होते.'- माडसंवा २२८.
**फोड्भक्ती** स्त्री. कानउघाडणी; उलटतपासणी. (झाडी)
**फोड्या** पु. फोड; दुःख. (झाडी)
**फोड्याफुंसी** स्त्री. त्वचेचे आजार.
**फोणी** स्त्री. शिडाची दोरी ओढून घेण्यासाठी लावलेली लहान कपी.- आंघइ ३७९.
**फोतड** स्त्री. फजिती. (व.) (क्रि. उडणे)
**फोतर-रे** न. १.फोलकट; सालपट; साल; पापुद्रा. (ना.,व.) २.मुलांना लावण्यात येणारा निंदाव्यंजक शब्द.
**फोतरी** स्त्री. टिंगल.(व.)
**फोती** मयत.
**फोतूल** न. शेणाचा पो.
वि. लठ्ठ व पिसपिशीत अंगाचा. पहा : **फतकल**
**फोत्री** स्त्री. १.फजिती. २. टिंगल. (झाडी)
**फोदरी,फोदा,फोद्या** स्त्री.(अश्लील) स्त्रीचे जननेंद्रिय (शिमग्यात उच्चारतात).
**फोद(दा)लणे, फोद(दा)ळणे** क्रि. (फोदा शब्दापासून बनवलेल्या) अचकटविचकट शिव्या देणे; झंबाडणे; झवणे.
**फोद(दा)लपट्टी** स्त्री.अचकटविचकट शिवीगाळ करणे; भोसडणे.
**फोदा** स्त्री. स्त्रियांचे गुह्येंद्रिय; योनी.
**फोदाड्नी** स्त्री. १. बडेजाव; मानसन्मान. २. अतिशयोक्ती. (झाडी)
**फोदेपिसाट** वि.(अश्लील) अतिशय विषयी, कामी; नेहमी बायकांमागे फिरणारा; स्त्रियांचे वेड लागलेला.
**फोदेव** पु. हुर्यो; विजयोत्सव. (व.)
**फोन** स्त्री. दूरध्वनी यंत्र; दोन लांब अंतरावर असणाऱ्या व्यक्तींचे बोलणे एकमेकांना ऐकता यावे यासाठी असणारे यंत्र.
**फोनो, फोनोग्राफ** पु.१.बोलणाऱ्याच्या ध्वनीसारखा हुबेहूब ध्वनी काढणारे, गाणारे यंत्र. ज्यावर तबकडीच्या साहाय्याने गाणे वाजवले जाते असे यंत्र; ध्वनिलेखन यंत्र. २.(ल.) एकसारखी टकळी लावणारा माणूस. [इं.]
**फोपणा** पु. फोदा; स्त्रीचे जननेंद्रिय. (व.)
**फोपनीस** न. पपनस; लिंबासारखे, लिंबूवर्गातील एक मोठे फळ. (को.)
**फोपय** पु. पपई (झाड व फळ).
**फोप(पु)ला** पु. भाजल्यामुळे येणारा किंवा देवीचा फोड.(व.) [हिं. फफोला]
**फोपशा-सा** वि. स्थूल; पोकळ; लठ्ठ, फुगीर अंगाचा पण अशक्त. [क. बोंपळे]

**फोपशी** स्त्री. हाडे मऊ होत जाण्याचा रोग.

**फोपस** वि. पोकळसर; फुसका :'ऋतुकाळावीण फोपस । मेघ जैसे।'- कथा ५.१३.१९.

**फोपसे** न. फुफ्फुस.

**फोपा** पु. १. घाईने वेडीवाकडी बनवलेली भाकरी; आरोळी; फूपी. २. ओबडधोबड लावलेली गोवरी, शेणी. ३.फोपशा, फुगलेला, लठ्ठ इसम.

**फोपंडा** पु. बुडबुडा.

**फोपाटणे** अक्रि. श्वासोच्छ्वास करणे; धापा टाकणे.

**फोपा(फा)टा** पु. कढत राख, धूळ. पहा : **फुपाटा**

**फोपाळे** न. लाठीचे, पाय ठेवण्याचे आडवे लाकूड.

**फोपिज** न. लालसर रंगाचे फुफ्फुस.(तंजा.)

**फोपी** स्त्री. रव्याची लहान पुरी; पोपी. (कर.)

**फोपीस** न.पु. फुफ्फुस. [सं. फुफ्फुस]

**फोपू** पहा: **फोपा(फा)टा**

**फोपेटा** पु.१.फुपाटा. २. घासटून किंवा भाजल्यामुळे निघालेला कातडीचा तुकडा. (क्रि. जाणे) (राजा.)

**फोपे(फे)टी** स्त्री.एक प्रकारची वनस्पती; काही भागात हिला कपाळफोडी म्हणतात.

**फोपे(फे)टी** न. फोपेटीचे फळ.

**फोपेणे** अक्रि. फोड उठणे; फोड आल्यामुळे कातडी फुगणे; बिब्बा, शेराचा चीक लागल्यामुळे फोड येणे.

**फोपेरे** न.अळू, सुरण इ.काची देठी. हे पोकळ असून बासरीप्रमाणे वाजवितात.

**फोप्यौंचे** क्रि. झाडाचा चीक लागल्यामुळे कातडी जाड होणे. (गो.)

**फोफशी-सी** स्त्री. सूज; फूग.
वि. पहा : **फोपशा-सा**

**फोफळा** पु. ज्यात पाणी होते असा फोड.

**फोफारा** पहा : **फोपा(फा)टा**

**फोफावणे** अक्रि. १.फो फो करीत जाणे (बाण, बंदुकीची गोळी, फटाका इ.). २. फुसकारणे (सापाने); फुंपणे. ३. फुगणे; लठ्ठ, पुष्ट होणे. ४. (नदी) भरून फो फो वाहत जाणे. ५. लवकर कोंब फुटणे; भराभर वाढणे (झाड). ६. घोंगावत वाहणे (वारा). ७. विस्तारणे; फैलावणे. [ध्व.फो! फो!]

**फोफे** न. जिभेवरील तोंडाची पोकळी; टाळा; आटळा; तालु. (गो.)

**फोफो** पु. नारळीचा, पोफळीचा उभा चिरलेला तुकडा. (को.)

**फो फो** क्रिवि. जोरात आवाज होऊन (श्वास चालणे, नाग पळणे इ.).

**फोमणी** स्त्री. (अश्लील) योनी; स्त्रियांचे जननेंद्रिय.

**फोर** १.छत; आच्छादन. २. गोव्यातील ख्रिस्ती बायका गळ्यात घालतात तो विशिष्ट प्रकारचा दागिना. हा सोन्यात लाल खड्यांच्या माळेत गुंफलेले हिरव्या खड्यांचे पदक अशा प्रकारचा असतो. [पोर्तु. फोरो]

**फोर** पु. (नाविक) रोजाच्या खालच्या बाजूस जोडतात ते रोजाच्या आकाराचे दुसरे लाकूड.

**फोरमन** पु. मुकादम; यंत्रकामगारांवरचा प्रमुख. [इं.]

**फोर्जिंग** न.एखाद्या धातूला प्रचंड दाबाखाली विशिष्ट आकार देणे. [इं.]

**फोल** न.१.हलका, पोकळ दाणा. २. टरफल; आतील दाणा काढून घेतल्यावर राहिलेले दाण्याचे (भात, हरभरा इ.) साल; कडधान्याच्या दाण्यावरील साल. ३. कोंडा; भुसा; तूस. ४.(ल.) पोकळ व अविश्वासाने बोलणे; निरर्थक बडबड. (क्रि. पाखडणे) ५. निष्फळ श्रम; प्रयत्न.
वि. खोटे; व्यर्थ; कोरडे; निःसत्व. [क.पोळ्ळु]

**फोल-ली-लो** स्त्री. कागदाचा ताव; बंद; चार पृष्ठांचा फर्मा. [पोर्तु. फोल्हा; इं. फोलिओ]

**फोलकट** न.टरफल; हलके, पोकळ, पोचट धान्य.
वि.व्यर्थ; पोकळ.

**फोलकाप** पु. कागदाचा लखोटा. (गो.)

**फोलणे** उक्रि. टरफल, साल काढणे; धान्य, सडून, भरडून वरील फोलकट, कोंडा काढणे; सोलणे.(वा.) **फोलून, फोलून खाणे**- युक्तीने व दुसऱ्यास न समजू देता त्याच्यापासून हळूहळू गुप्त, मौल्यवान गोष्ट काढून घेणे; सत्ता हिरावून घेणे.
अक्रि. पडसे, थंडी-खोकला जाणे.

**फोलार** पु.१. फूल; पुष्प. पहा : **फुल्लार.** २.फुलासारखा दागिना.
वि. फुलासारखा हलका; सैल; पोकळ. - लोसाको.

**फोलीण** न. टीनच्या पत्र्याची पेटी. (गो.)

**फोल्डर** पु. सुटे कागद ठेवण्यासाठी केलेले जाड पुठ्ठ्याचे वा प्लॅस्टिकचे फाईलवजा आवरण. [इं.]

**फोव** पु. पोहा. (गो., राज., कु.)

**फोव घालणे** बकरी विणे.- बदलापूर २५९.

**फोवा** पु. सुगंधी तेल,अत्तरे इ.चा बोळा; फाया. (ना.)

**फोवांडपख** पु. दिवाळी (दिवाळीत फराळाला पोह्यांचे निरनिराळे प्रकार करण्याची रीत आहे. त्यावरून ख्रिस्ती लोकांत हा शब्द रूढ आहे).(गो.)

**फोवो** पु. नाचणीचा कोंडा.

**फोस-से, फोसकट** वि.१.फुसका; फोल; पोकळ; व्यर्थ; कमकुवत; निरुपयोगी :'विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडेची बोल फोस वांझे।'- तुगा १०८३. २. मऊ; लवकर झिजणारे. (अहि.)

**फोसंड** वि. १.पोकळ. २. निःसत्त्व. ३. अशक्त. (झाडी)

**फोसूतोर** पु. बायकांच्या पायाच्या बोटातील मुदी. (झाडी)

**फोंड, फोंडकूल** पु.न.१.खळगा; खड्डा; पाण्याची खळी; डोह.(राजा., गो.)पहा : **पोंड-ढ.** २. थडगे :'म्रुतेआंचे फोंड अफार ।'- क्रिपु २.५०.३.

**फोंड** स्त्री. टक्कर; धडक. - ऐपो ५१५.

**फोंडवळी** स्त्री. १. डोक्यावरील केस मानेपाशी जिथे संपतात तिथे मानेच्या मध्यभागी असणारी लहानशी खळी. २ (सामा.) लहान खळी, खळगा.

**फोंडसावंती** स्त्री.(सावंतवाडी करारावरून) अरेरावी; अंदाधुंदी (फोंड सावंत हे आडनाव आहे, त्यावरून ल.).

**फोंडळणे** क्रि. खोल जाणे (उपासाने पोट).

**फोंडारा** पु. लहान डोह; खड्डा. पहा : **फोंड**
**फोंडी** स्त्री. दोन शिंगांमधील जागा.
**फोंत** स्त्री. पोत. (गो.) [पोर्तु.]
**फोंतकरप** दंड, मांडी यांसारख्या शरीराच्या विशिष्ट भागी मुद्दाम फोड काढून तो फोडून त्यावर हळद लावतात. या व्रणांतून दररोज शरीरातील दूषित रक्त वाहून जाऊन प्रकृती निरोगी राहते. शरीरातील दूषित रक्त काढण्याचा एक प्रकार. (वा.)**फोंतीर पान मारप**– ज्याने अगोदर त्रास झाला आहे, तोच विषय धरून बोलणे. (गो.)
**फोंपी** स्त्री. फणसाच्या गऱ्यामध्ये असणारी पात. (गो.)
**फोंपूट** न. ओठाला किंवा तोंडात येणारा फोड, फुगा. (गो.)
**फॉरसेप्स** पु.अव. वैद्यकीय व्यवसायात वापरले जाणारे चिमटे. [इं.]
**फॉर्म** पु. १.शेतजमीन.२. छापलेला नमुना. ३. काँक्रीट ओतण्याची चौकट.
**फॉसिल** न. मृत प्राणी, पाने, फुले यांचा पृथ्वीच्या आवरणाखाली मिळणारा ठसा. [इं.]
**फॉस्फरस** पु. अंधारात चकाकणारे एक मूलद्रव्य. खत व आगकाड्यांसाठी उपयोग. [इं.]
**फॉस्फेट** न. फॉस्फरिक ॲसिडपासून मिळणारा एक क्षार. खते व फसफसणारी पेये यांत उपयोग. [इं.]
**फॉंट** पु. मुद्रणाकरिता तयार केलेले विशिष्ट वळणाच्या अक्षरांचे संच.[इं.]
**फॉंपळ** न. सुपारी; पोफळ. (गो.)
**फौक** पु. श्रेष्ठता; उच्चता.
शअ. वर; पलीकडे. – मुधो. [अर.]
**फौकारणे** अक्रि. कीर्ती सांगणे. – मनको.
**फौज** स्त्री. सैन्य; पलटण; सैन्याची तुकडी; घोडेस्वार. [अर. फौज्]
**फौजदार** पु. १.चोरी, शिंदळकी, मारामारी इत्यादी गुन्ह्यांची चौकशी करण्यासाठी ठेवलेला सरकारी अधिकारी; पोलीस अधिकारी. पोलीसपाटील(को.). २. सैन्यावर हुकूम चालवणारा किंवा ज्याच्याजवळ सैन्य आहे असा मनुष्य. ३. महात; महातावरील मुख्य. [फा.]
**फौजदारी** स्त्री. १.फौजदाराचा अधिकार. २. खून इ.गुन्ह्याबद्दल खटला.
वि. गैरमुल्की गुन्ह्यासंबंधी; दिवाणी नव्हे असा; चोरी, मारामारी, शिंदळकी, खून इ. गुन्ह्यांसंबंधी (खटला, कोर्ट, कायदा इ.).
**फौजदारी कायदा** १.ज्या कायद्याने गुन्हेगारांना गुन्हा करण्याबद्दल शिक्षा सांगण्यात येते किंवा गुन्हे कोणते हे ठरविण्यात येते तो कायदा. २. फौजदारी फिर्याद; दावा; लोकांच्या हक्कांना बाधक असा गुन्हा केल्याबद्दल भरलेली फिर्याद किंवा केलेला दावा.
**फौजफाटा** पु. सैन्य व त्याबरोबर असणारे, लागणारे साहित्य; फौज, तोफखाना, शिबंदी वगैरे; सैन्य; जमाव.
**फौजबंद** वि. खडी फौज ज्याच्याजवळ आहे असा; लढाईस सज्ज असे सैन्य ज्याच्याजवळ आहे असा; ससैन्य.
**फौजबंदी** स्त्री. लढाईसाठी सैन्य घेऊन सिद्धता, तयारी; फौज तयार करून राज्यांचे संरक्षण करणे. [फा.]
**फौजसरंजाम** पु. फौजेच्या खर्चासाठी व किल्ल्याच्या व्यवस्थेसाठी दिलेली नेमणूक.
**फौजसलतनत** पहा: **फौज**
**फौजी** वि. सैन्यविषयक; लष्करी. [हिं.]
पु. सैनिक.
**फौत** पु. मृत्यू :'एका रोजीचें खावयास नाहींसें जालें अजीं सबब आपला भर्तार् रानोजीराव फौत जाहला.'– मइसा १७.१.
वि. मृत.
**फौरन्** स्त्री. जरुरीचा हुकूम. (व.)
क्रिवि. सत्वर; लवकर. (व.) [अर.]
**फौंड–डी** स्त्री. वखर, तिफण, फराटा अगर डबर याला पुढच्या बाजूला लावलेले लाकूड. – मसाप २.२५३.(व.)
**फौंड्री** स्त्री. धातूच्या ओतकामाचा कारखाना, विशेषतः छापण्याचे खिळे पाडण्याचा कारखाना; मुद्राक्षर–ओतशाळा. [इं.]
**फ्या फ्या** उद्गा. पहा : **फे फे**
**फ्यांट** स्त्री. अडचण. (कर.)
**फ्यूज** पु. विजेचा दाब वाढून किंवा शॉर्टसर्किटमुळे फार नुकसान होऊ नये म्हणून, विजेच्या प्रवाहात बसवलेली व विशिष्ट मर्यादेच्या बाहेर विजेचा प्रवाह गेल्यानंतर वितळणारी कथलाची किंवा शिश्याची बारीक तार. [इं.]
**फ्रीज–झ** पु. कृत्रिम तऱ्हेने उष्णतामान कमी केल्याने दूध, भाज्या, फळे इत्यादी वस्तू ज्यामध्ये दीर्घकाळ टिकून राहतात अशी पेटी. [इं.]
**फ्लर्ट** वि. केवळ करमणुकीसाठी मैत्री किंवा प्रेम करणारी (व्यक्ती).[इं.]
**फ्लॅट** पु. मोठ्या इमारतीतील स्वतंत्र राहण्यालायक भाग (घर); सदनिका. [इं.]
**फ्लॉपी** स्त्री. माहिती साठवून ठेवण्यासाठी प्लॅस्टिकपासून बनवलेली व 'आयर्न ऑक्साइड'चे रोगण लावलेली संगणकक्षेत्रात वापरली जाणारी तबकडी. [इं.]
**फ्लॉवर** स्त्री.पु. फुलकोबी. [इं.]
**फ्ल्यू** पु. तापाचा एक प्रकार. यात पडसे व खोकला येतो. अंगही फार दुखते. [इं.]





**ब** मराठी वर्णमालेतील अडतिसावा वर्ण व तेविसावे व्यंजन.

**ब** पूर्वगामी अव्यय. सह. [फा.]

**ब,बि** पूर्वगामी अव्यय १. ला; सह. २. ने; प्रमाणे. [अर.]

**बइसिक** स्त्री. सभा; बैठक : 'स्रिंगणनाथा देवाचां देउळि बइसिके नगर समस्ता मेळलेयाचा विवरू '- खाटेग्राम ताम्रपट १-३.४. [सं. उपवेशिका]

**बई** स्त्री. वेडी. (झाडी) [सं.बधिर]

**बईडंडार-दिवारी** स्त्री. अव्यवस्थित कारभार. (झाडी)

**बईलखाटी** पु.अव. गुरेढोरे. (झाडी)

**बईलफेर** पु. डावीकडून वळणे. (झाडी)

**बक** पु. बगळा. [सं.]

**बक** पु. मूल; पिल्लू (माणसाचे, पशूचे). [सं.अर्भक]

**बक** स्त्री. वटवट; लेखी प्रमाण नसलेले तोंडी भाषण; बाजारगप्प. [हिं. सं.वच्]

**बकई** स्त्री. वस्तऱ्याप्रमाणे असलेला चाकू. [सं.वक्र]

**बककणे** अक्रि. बकाणा भरणे; मुठीमुठीने तोंडात घालणे. [सं.भक्ष् ]

**बकच्छायो** स्त्री. थट्टा. (गो.)

**बकट भैरू** वि. मंद बुद्धीचा माणूस; मठ्ठ; ठोंब्या; (ग्राम्य) खुळचोट.

**बकटमोडीचा** वि. एक शिवी.

**बकटे** न. (ग्राम्य) पुरुषाचे जननेंद्रिय.

**बकणी-णा** स्त्री. पु. १. तोंडात घालण्यासाठी घेतलेली पीठ वगैरेची मूठ; फक्की; कोरड्या खाद्यपदार्थाचा घास. २. कोरड्या खाद्यपदार्थाचा बोकाणा.

**बकणे** अक्रि. अहंकाराने बडबडणे; वटवटणे; पुष्कळ व पोकळ बाता मारणे; तोंडाला येईल ते बोलणे. [सं.भष्, बष्क्]

**बकतणे** अक्रि. राहणे.- शर.

**बक(ख)तर** न. लोखंडी जाळीचे किंवा लहान-लहान कड्यांचे चिलखत. [फा. बग्तर]

**बकध्यान** न. (बगळा डोळे मिटून तळ्याच्या काठी ध्यानस्थ बसल्यासारखा दिसतो. पण त्याचे ते ध्यान तळ्यातील मासे इ. भक्ष्याकडे असते. यावरून ल.) बोकेसंन्यास; साधुत्वाचे ढोंग; कार्यसिद्धीसाठी पोटात लोभ ठेवून बाहेरून शांतपणा दाखवणे.

**ब(बं)कनळी** स्त्री. (सोनारी) तोंडाला बगळ्याच्या मानेसारखी बाक घेतलेली, जोडकामात उपयोगी पडणारी, बारीक पितळी फुंकणी.

**बकपात्र** न. प्रयोगशाळेतील उंच नळीचे तोंड असलेले काचेचे उपकरण.

**बकबक** स्त्री. बडबड; वटवट; निरर्थक भाषण, गप्पा. [हिं.;ध्व.]

**बकबक-का** क्रिवि. १. घाईने; उतावीळपणाने; खाताना किंवा ओकताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; अधाशीपणाने. २. निरर्थकपणे; वचावचा (बोलणे).

**बकबक** स्त्री. खा खा (क्रि.उठणे); भुकेचा अतिशय.

**बकबकणे** अक्रि. बडबडणे; वटवट करणे.

**बकबंधनन्याय** पु. सरळ रीतीने करता येणाऱ्या गोष्टीसाठी भलत्या मार्गाचा अवलंब करणे. (बगळ्याला धरायचे असले तर एकदम न धरता प्रथम त्याच्या डोक्यावर लोणी टाकून ते त्याच्या डोळ्यात उतरून त्याला दिसेनासे झाल्यावर धरतात त्यावरून).

**बकमा** पु. रपाटा; धपाटा : 'घातल्या चार शिव्या. तेवड्यावरबी भागंना तवा दिले दोन दोन बकमे.'- वाळवण ६.

**बकमार-ल** स्त्री. मोठ्या तोंडाची लहान बंदूक; मोठे पिस्तूल.

**बकर** पु. स्त्री. गाय; बैल. [अर.]

**बकरकसाई** पु. बकऱ्याचे मांस विकणारा.

**बकरकुदाई** स्त्री. १. बकऱ्याप्रमाणे नाचणे, उड्या मारणे. (क्रि. करणे.) २. कज्जा इ. प्रसंगी दुर्बळ मनुष्याला अनेकांनी बकऱ्याप्रमाणे बुकलून मारणे.

**बकरकुदी** स्त्री. १. पट्ट्यांच्या खेळातील एक प्रकार. २. पाण्यात उडी मारण्याचा एक प्रकार. ३. बकऱ्याप्रमाणे वर उठून पुढे उडी घेणे, घुसणे. [अर. बकर + हिं. कुदी](वा.) **बकरकुदीवर येणे** - लढण्यासाठी निकरावर येणे. (व.)

**बकरखाद** स्त्री. (बागेवर, मळ्यावर) बकऱ्याची झांबडणी, धाड.

**बकरतान** स्त्री. बकऱ्याच्या बें-बें अशा ध्वनीसारखे गाणे; बेचव व नीरस तान घेऊन गाणे.

**बकरम** न. एक जाड कापड. (पुस्तकबांधणी, कॉलर शिवणे इ.साठी याचा उपयोग करतात.) (ना.) [इं.]

**बकरमोड** स्त्री. (मल्लविद्या) एका हाताने हनुवटीला व दुसऱ्या हाताने जिकडे मान मुरगळायची असेल त्या बाजूच्या कानावर हात ठेवून मान मुरगळून पाडणे.

**बकरसट-ठ** स्त्री. मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी; चंपाषष्ठी. या दिवशी खंडोबापुढे बकरा बळी देतात.

**बकरा** पु. बोकड.[सं.बर्कर,वर्कर] (वा.) **बकऱ्यांची दावण वाहणे** - एखाद्या देवाला १०-१२ बकरी एकदम बळी देणे.

**बकरा** वि. क्रिवि. जरा; थोडासा; थोडे. (कु.)

**बकरी** स्त्री. शेळी. [सं.बर्कर] (वा.) ० **पडणे** - बकरी कापणे.

**बकरी,बकरेपट्टी** स्त्री. भेटबकरे. (ही पट्टी गावाकडून मेजवानी म्हणून लष्कराचे लोक वसूल करीत.)

**बकरी ईद** मुसलमानांचा एक सण; मुसलमानी जिल्हेज महिन्याची दहावी तारीख; बलिदानाचा दिवस. [फा.बक्कर + ईद]

**बकरे** अठरा कारखान्यांपैकी एक.

**बकल** न. १. कचकल; पट्ट्याची कडी. २. गळ्यातील पट्ट्यावरचा बिल्ला : 'अंमलदारांचीं बकलें चांदीचीं करण्यास हरकत नाही.'- (बडोदे) खानगीखाते १०५. [इं.]

**बक(का)लणे** सक्रि. १.बखलणे; कुटणे. २. खूप खाणे; गट्ट करणे.

**बकलम** स्त्री. स्वाक्षरी. [फा.; हिं.]

**बकली-ह्ली** स्त्री. निरर्थक, अशिष्ट बडबड. (अहि.)

**बकवरी** स्त्री. एक प्रकारचे तृणधान्य.

**बकवा, बकवाद** पु. स्त्री. १. पहा : **बकबक.** २. (ल.) भांडण; वाद; गोंधळ : 'उठावयाला तकवा नाहीं बकवा सारा धनि चाकर झुंझती ।'- ऐपो ३६६.

स्त्री. अफवा; पोकळ बातमी. [हिं.]

**बकस-स्** स्त्री. द्वेष; आकस; द्रोह. (क्रि. बांधणे, धरणे, बाळगणे.) [फा.बरअकस]

**बकंदी** स्त्री. ठोसा. पहा : **बकांदा**

**बका** पु. बाहू. [फा. बगल]

**बका** पु. तोंडात घातलेला मोठा घास; बकाणा. (झाडी)

**बका** पु. मुका; चुंबन : 'तो वारिकु मित्र म्हणौनि प्रेमें बका दीधला'- पंचो १६५.१०.

**बकाट** न. खांद्याचे हाड; फरा; खवाटा.

**बकाण-णा** पु. लिंबाची एक जात. हा मोठा असून पाने कडुनिंबासारखी पण थोडी मोठी असतात. याचे लाकूड इमारतीला उत्तम. हा खानदेशात अधिक आढळतो; कवड्या निंब. [हिं.बकायन;गु.बकान]

**बकाणा** पु.१. पहा : **बकणी-णा.** २. तोंड किंवा भोक बंद करण्यासाठी घातलेली किंवा भरलेली कोणतीही वस्तू; गुडदी. [क.बोक्कण]

**बकाद्या** स्त्री. अव. बडबड : 'हा लोक हो कसमसा करितो बकाद्या.' - अहमु रामार्यांचे भाषांतर २६. [ध्व.]

**बकान** पु. बकुळीचा वृक्ष. (झाडी) [सं.बकुल]

**बकाबक-का** पहा : **बकबक-का**

**बकाया** पु. शेष; बाकी; येणे असलेली रक्कम. [हिं.]

**बकार** पु. (उप.) कामावरून काढणे; बडतर्फ करणे. (क्रि.देणे) (बरतरफीचे आद्याक्षर ब यावरून).

**बकारा** पु. गस्त घालणाऱ्यांचा शब्द; आवाज. [हिं.]

**बकारी** स्त्री. वखार; धान्य ठेवण्याची धाब्यावरील खोली. (झाडी)

**बकारी** वि. कामावरून काढून टाकलेला; बडतर्फ केलेला; बेकार. [फा.बेकार]

**बकाल** वि. गलिच्छ.

**बका(क्का)ल,बकाळ** पु. दुकानदार; व्यापारी; उदमी; धान्य, किराणा माल, कपडा इ.चा व्यापारी. बहुधा वाणी शब्दाला जोडून प्रयोग. याचा एकेरी प्रयोग तिरस्कार दर्शवतो : 'दुकाळ त्यामधिं बकाळ मंडळी ठकपरिस ठक भली।'- ऐपो ३७१.२.

न. दुकानदारांची मंडळी, कंपू, समुदाय. [अर. बक्काल]

**बकालवस्ती** स्त्री. दुकानदार व व्यापारी लोकांची वस्ती.

**बकाली** स्त्री. दुकानदारीचे काम; व्यापारपेशा; दुकानदारी.

वि. १. दुकानदारासंबंधी. २. अव्यवस्थित (दुकानदाराची वही). ३. गचाळ; असंस्कृत; बिन टापटिपीचा (मनुष्य, जागा, काम).

**बकासन** न. (मल्लखांब) घोड्याचा फरारा करून मल्लखांबावर पाय टेकून केलेले आसन. - व्याज्ञा ३.२९९. [सं.]

**बकासुर** पु. १. एक राक्षस. २. (ल.) अतिशय खादाड, अधाशी मनुष्य. [सं.]

**बकाळी** स्त्री. एक जंगली फुलझाड.

**बकांदा-दी** पु.स्त्री. मुष्टीचा, बुक्कीचा मार.

**बकुल-ळ-ळी** पु. स्त्री. एक फुलझाड व त्याचे फूल; ओवळ; याची पाने आंब्याच्या पानासारखी. फुले लहान, पांढरी, चक्राकृती व मध्ये छिद्र असणारी. वास मधुर. फळे बदामाएवढी, किंचित गोड व तुरट. फुलांचा अत्तरासाठी व सालींचा औषधासाठी उपयोग. लाकूड गलबताच्या उपयोगी. [सं.बकुल]

**बकुळीचे फूल** मुलींचा एक खेळ. - मखेपु ३०७.

**बकोटी अढी** (मल्लखांब) मल्लखांब बगलेत धरून मारावयाची उडी.- व्याज्ञा ३.५२.

**बकोरा** स्त्री. इरल्याच्या आतील जाळी. (बे.)

**बकोरा** न. एक झुडूप; कोकणात आढळते. सुंदर फुलांमुळे बागेत उपयोग.

**बकोळी** स्त्री. हिरव्या रंगाची सुरवंटाची जात.

**बक्कल** पु.न. अडकवणे; बटण, हूक इ. अडकवण्याची जागा.

**बक्कल** वि. जाड.(झाडी) [सं.वल्कल; हिं.बकल]

**बक्कळ** वि. पुष्कळ; भरपूर. [क. कवळ = मूठ भरून]

**बक्का मारणे** क्रि. तोंडात एकदम काहीतरी टाकणे. (व.)

**बक्की** स्त्री. कातड्याआतील कातडे. (तंजा.)

**बक्त(ख्त)र** पहा : **बकतर**

**बख** पु. स्त्री. बाजू; कूस.

न. बगल. [सं.वक्ष]

**बखत, बक्त-ख्त** पु. १. वेळ; काळ; प्रसंग; २. (सर्व अर्थी) पहा: **वेळ.** ३. हंगाम. ४. (ल.) भाग्य; सुदैव. [अर.वख्त]

**बखया** स्त्री. रिकामी, मोकळी जागा (खेड्यातील घराभोवतालची इ.).

**बख(खे)र** स्त्री. १. देशी भाषेत लिहिलेला गद्यमय इतिहास, कथानक अगर चरित्र. २. हकिकत; बातमी : 'बखेर पादशाहास लेहून.'- मइसा १५.१३. ३.(ल.) अर्ज. [अर.खबर]

**बखरणे-डवरणे** न. नांगरणे इ. शेतीची कामे करणे : 'शेतकरी आपल्या बखरण्या डवरण्याच्या कामांत गुंतलेले असतात.' - भास २.

**बखल** न. १. फुटके, पोचटलेले धातूचे भांडे. २. कपची; ढलपी; तुकडा. (को.)

**बखल** स्त्री. १. खोलगट जागा. २. तळ; बूड. ३. पोकळी.

**बखलणे** सक्रि. १. बुक्क्या मारणे; बुकलणे; चेंदामेंदा करणे; कुमलणे. २.ढकलणे : 'ब्रह्मादिकांचिया वरिपडी । बखलुनि कवणाचें ताट काढीं।'- भाए १३२.

**बखला** पु. १.निराळा केलेला पापुद्रा. २. साल, कवची काढणे; सोलणे.

**बख(ख्ख)ळ** स्त्री. १. उघडी मोकळी जागा; अंगण. २. बांधकाम किंवा लागवड न केलेली, पडीक जमीन. ३. पडक्या घराची जागा; ओसाड जागा. ४.(ल.) विस्तीर्ण व वैराण प्रदेश. ५. घरातील, घराभोवतालची रिकामी जागा. ६. (विरू. भकाळी-टी) उपासामुळे पोटाला पडलेला खळगा. (क्रि. पडणे, बसणे). ७. छप्पर, जमीन इ. वरील पोकळ, खोलगट जागा. (क्रि.पाडणे,पडणे).

वि. १. खुली, स्वच्छ (जागा). २. पुष्कळ; विपुल; मुबलक (संख्येने,

परिमाणाने). [क. बक्कल]

**बखं(खां)दणे** सक्रि. खांद्याने धक्के देणे.

**बखं(खां)दी** स्त्री. खांद्याने मारलेला धक्का; दंडाने मारलेला रट्टा.

**बखा** स्त्री. वजन; महत्त्व; प्रतिष्ठा; किंमत; पाड. [अर.बका]

**बखाड** पु. अवर्षण. (व.) [सं.वर्षाव]

**बखाडी–टी** स्त्री. शरीराची एक बाजू; मुख्यत्वे बरगड्यांखालचा भाग.

**बखारी** स्त्री. सामान, अडगळ, धान्य इ. ठेवण्यासाठी भिंतीत, जोत्याखाली केलेले तळघर; बळद.

**बखेडा** पु. १. कलह; वाद; भांडण; कटकट. २. त्रासदायक, चीड आणणारे काम. ३. सुरळीतपणे चाललेल्या कामात आलेली अडचण, विक्षेप. ४. दुर्दशा. [हिं.]

**बखोटा** पु. खांद्याचा सांधा; बाहुटा.

**बख्ती** पु. दोन मदारींचा उंट.

**बग** स्त्री. बाजू; बगल. मुख्यत्वे विभक्तिप्रत्यय लागून उपयोग : 'तैसा सैन्याचा एया बगा। मोडतां वेळु न लगे पैं गा'– ज्ञा ११.४६३.
वि. पंख न फुटलेला.

**बगट** न. (गाईच्या) मानेखालचा भाग : 'उचलूनि बगटें श्रीकृष्ण पांती नृप'– गरा ३१२. [क. बगटु]

**बगड** स्त्री. १. असडीक, न कांडलेले तांदूळ; करड. २.भाताचा कोंडा. ३. लहान बैलगाडी.

**बगड–डा** न. पु. कमर; पाठीचा कमरेजवळचा भाग. याचा प्रयोग पेकट, पेकाड, खट्टा या शब्दांप्रमाणे मोडणे, ढिला किंवा मोकळा करणे – होणे, (सामर्थ्य, दम, गर्व इ.) मोडणे या क्रियापदांशी जोडून तिरस्कारार्थी होतो. [क.बगरु]

**बगडमोड्या** वि. (निंदार्थी, अशिष्ट) मोडलेल्या पाठीचा; कमर कमजोर झालेला.

**बगडा–ड्या** वि. १. मुरडलेला, वाकडा झालेला (हात). २. हात वाकडा झालेला (मनुष्य). ३. सुंदर; देखणा; सुबक. ४. सुरकुतलेले (अंग).

**बगदा** पु. १. पीठ; भुगा; लगदा. (व.) २. टरफलमिश्रित धान्य. ३. कचरा. (झाडी)

**बग(गै)र** शअ. शिवाय; खेरीज; वाचून; विना. [फा. बिघैर]

**बगरना** अक्रि. पाघळणे; पसरणे. (झाडी)

**बगरा** पु. भाताबरोबर पिकणारा भातजमिनीतील जोंधळा. (बे.)

**बगल** स्त्री. १. काख; खांद्यापासून कमरेपर्यंतचा भाग, बाजू. २. अंगरखा, बंडी इ. च्या बाहीला लावलेली कळी किंवा त्रिकोणी, चौकोनी पट्टी. ३. लंगड्या माणसाची कुबडी. ४. (मल्लविद्या) जोडीदाराच्या उजव्या बगलेतील खड्ड्यात जंबियाने मारणे.
न. बाजू.[फा.बघल] (वा.) ० **दाखवणे, बगल–ला वर करणे** – आपल्याजवळ काही नाही हे सिद्ध करण्यासाठी हात वर करून दाखवणे; दिवाळे वाजल्याचे जाहीर करणे. ० **देणे** – एका बाजूला होणे, सरणे; टाळणे. ० **मारणे** – १. सैन्याची एक बाजू पराभूत करणे, कापणे. २. एका बाजूला होणे; वाट देणे. **बगलेत असणे** – १. (एखाद्याच्या) आश्रयाखाली, वशिल्याचा असणे. २. अंकित असणे; मुठीत असणे. **(एखादी वस्तू) बगलेत घालून चतु:समुद्राचे स्नान करून येणे** – एखादी वस्तू आपल्या खिजगणतीत नाही असे धरून वागणे. **बगलेत धरणे** – आपल्या आश्रयाखाली घेणे. **(एखादी गोष्ट) बगलेतून काढणे** – खोटी गोष्ट बनवून ती खरी करून सांगणे.**बगलगीर करणे** – बगलेला बगल भिडवून भेट घेणे.

**बगलगिरी** स्त्री. विशिष्ट पाहुण्यांना देण्यात येणारा आलिंगनाचा मान.

**बगलचीर** स्त्री. बगलेमध्ये खालून वर मारीत नेलेला मार – मवि ९.११.

**बगलडूब** स्त्री. (कुस्ती.) एक पेच; प्रतिपक्षाच्या बगलेतून डोके काढून त्याच्या पाठीमागे येणे.

**बगलदंड** पु. दंडाचा एक प्रकार. यात जोर काढल्यावर डोके क्रमाने उजव्या–डाव्या बगलेत न्यावयाचे असते. – व्याज्ञा ४.५३.

**बगलबच्चा** पु. १. सर्वस्वी दुसऱ्यांच्या तंत्राने चालणारा; दुसऱ्याचा हस्तक. २. वशिल्याचा माणूस.

**बगलबंडी** स्त्री. बाराबंदी; बगलेत बंद असणारी बंडी.

**बगलबंद** पु. (अंगरखा इ.चा) काखेखालचा आवळण्याचा बंद. [फा.]

**बगलबिल्ली** स्त्री. १. लाडिकपणे वागवलेले, आवडते मूल. २. काखमांजर. ३. (ल.) वशिल्याचा मनुष्य. [हिं.]

**बगलभावार्थी** पहा : **बगल्या चोर**

**बगलभिस्ती** स्त्री. १. चामड्याची पाण्याची पिशवी, पखाल बगलेत वाहून नेणारा. २.(विनोदाने) शिजलेला परंतु अधिक दिवस ठेवल्यामुळे नासलेला भाजीपाला, दही इ. पदार्थ. [हिं. बगल + बहस्ती]

**बगला** पु. विशिष्ट आकाराची अरबी नाव; होडी; व्यापारी गलबताचा एक प्रकार.

**बगला, बगलेक** अ. पाशी; जवळ; कडे.

**बगलाट–ठ** न. १. तोहमत; आळ; वृथा आरोप. २. भरकटलेला विचार.

**बगला मारणे** (कृषि.) डोळे, मोड, अंकुर पुसून काढणे; डोळे काढून टाकणे.

**बगलावणे** सक्रि. चोरलेला माल बगलेत मारून चालते होणे.

**बगली** स्त्री.१. छातीला मांडीच्या घर्षणामुळे पडणारे क्षत, व्रण. २.(बगलेखाली आणून) मुद्गल खेळण्याचा एक प्रकार. ३.कुस्तीतील एक डाव; आपला एक हात जोडीदाराच्या मानेवर ठेवून दुसऱ्या हाताने त्याच्या हाताचा पंजा धरून तो वर करून बगलेखालून जाऊन त्याला चीत करणे. ४. पाय घसरल्याने उंटाला होणारा रोग. ५.मल्लखांबाची एक उडी.
वि. १. वरीलप्रमाणे घसरणारा (उंट). २.खोटी (गोष्ट). (अहि.)

**बगली** स्त्री. दाराच्या चौकटीजवळ हात जाण्यासारखे पाडलेले भोक. (बेरडी)

**बगलूस** पु. बगल : 'आपले बगलुसांतून मोरआंवळ्याचा डबा काढून...' – मौनयौवना ४५.

**बगल्या** वि. दुसऱ्याची चाकरी करणारा; हस्तक; मुठीत असणारा; होयबा.

**बगल्या चोर** बाह्यत: प्रतिष्ठेने वागून संधी मिळाली की बगलेत मारून न्यायला म्हणजे चोरी करायला तयार असलेला माणूस.

**बगल्या वकील** बिनसनदी, मुखत्यार वकील; वकिलाचा हस्तक : 'तिच्या मावशीचा नवरा कायसा बगल्या वकील आहे.'- आपव.
**बगवे** न. लाकडी लहानशी पेटी, करंडा ( रत्ने इ. ठेवण्यासाठी) : 'कापुराचें बगवें केलें पुढारें'- नरुस्व ३९७. (व.)
**बगळला** वि. इतरांचा अंकित : 'बगळलयां देवां रणीं रणमल्लु'- मूप्र २६०३. [म. बगल]
**बगळा** पु. एक पक्षी. लहान कीटक, मासे खाणारा,पांढऱ्या रंगाचा, काळसर लांब पाय असणारा, सडपातळ, मान व डोके, चोच पिवळी असणारा पक्षी. [सं.बक]
**बगळाउ** पु. पहा :- **बगाड** न. १ : 'वीर असति बगळाउ खेळत'- शिव १०४९.
**बगा** पु. १. प्रकार : 'परि तें एकबगी थोडें ।'- ज्ञा ११.४०४. २. आकार : 'तैसा सैन्याचा यया बगा । मोडतां वेळू न लागेल पै गा।' – ज्ञा ११.४६८. ३. संबंध : 'आणिक पै दैवबगें । चित्त देती सांख्ययोगें ।'- ज्ञा १३.१०३९. ४. मार्ग : 'परी चोखी ते कैसी सांगे। पै घेवों जातां बोलबगें ।'- ज्ञा १८.७६९. ५. देखावा : 'कां गंगायमुना उदक । वोघबगें वेगळिक।' -ज्ञा १८.५२. ६. पक्ष. ७. उपाधी.
**बगाड** न. १. नवसाचा गळ; जमिनीत पुरलेल्या, चालत्या गाड्यात पक्क्या बसवलेल्या खांबावरील आडव्या लाकडात असलेला आकडा पाठीत खुपसून त्यावर लोंबकळणे. (क्रि.घेणे, लागणे). खंडोबा इ. देव नवसाला पावल्यावर नवस फेडण्यासाठी देवापुढे हा विधी करतात. हल्ली हा विधी बंद केला आहे. २. वरील प्रकारचा नवस.
**बगाड, बखाडी** स्त्री. १. खाटेचा सांगाडा. (व.) २.मोट ओढण्यासाठी जिच्यावर चाक बसवलेले असते अशी विहिरीवर लावलेली लाकडी चौकट. (व.) ३. जाडे गवत.
**बगाडपाटी** स्त्री. खांबांवरील आडवे लाकूड; कडीपाट : 'रत्नांचिया बगाडपाटिंया'- शिव २५३.
**बगाडा** पु. विहिरीतून पाणी काढण्याची तरफ. (झाडी)
**बगार, बगारणी** पहा : **बघार, बघारणी**
**बगार** न. पहाडातील खोरे.
**बगारं** पु. मोठे छिद्र. (अहि.)
**बगालभैरव** पु. (संगीत) एक राग. गानसमय प्रात:काळ.
**बगावत** स्त्री. बंड. [अर.]
**बगास** पु. उसाचे चिपाड.
**बगी** स्त्री. एक किंवा दोन घोड्यांची, दुचाकी किंवा चौचाकी गाडी, टांगा. [क.बगि; हिं.बग्घी]
**बगी** पु. लिंगायत लोकांतील जंगमेतर लोक.
**बगीचा** पु. लहान बाग. [फा. बाघीचा]
**बगुणा-णे** पु. न. मोठ्या तोंडाचे, स्वयंपाकाच्या उपयोगाचे पातेलीसारखे धातूचे भांडे.
**बगुणी** स्त्री. पातेली; लहान बगुणे. [सं.बहु + गुण]
**बगो(को)टा-टे** पहा : **बखोटा**
**बगो(को)टी-टे** स्त्री. न. मान किंवा मानेचा मणका; नरडे; मानगुटी. (को.) (वा.) ० **धरणे, बगोटीस बसणे** - पिच्छा पुरवणे.
**बघणे** सक्रि अवलोकणे; पाहणे.
अक्रि. नजर लावणे, फेकणे. [सं.वक्ष्]
**बघाटी** स्त्री. (ढोरकाम ) मोटेच्या घेरात पोटव्याच्या बाजूला कमी पडणाऱ्या भागाला लावलेले कातडे.
**बघार, बघारणी** पु. स्त्री. भाजी इ.ला मसाला वगैरे घालून शेवटी देण्याची तापलेल्या तेलाची, तुपाची फोडणी. (व.) [हिं.बगहार]
**बघारणी** स्त्री. फुगवून सांगणे; अतिशयोक्ती. (व.)
**बघारणे** सक्रि १. बढाई, बाता मारणे. २.(अन्न इ.) शिजवून तयार करणे.
**बघाऱ्या** वि. बढाया मारणारा. (व.)
**बघ्या** पु. नुसता पाहणारा; केवळ गंमत पाहण्यासाठी आलेला.
**बच** न. वेखंड.
**बच** स्त्री. चिनई मोत्यांच्या १२ लडी. (एका लडीत ५० ते २०० पर्यंत दाणे असतात). - मुंव्या १२१.
**बचक, बचकण, बचका** स्त्री. पु. १.(राशीतून धान्य इ. घेण्यासाठी) केलेली हाताची ओंजळ; हाताचा कवळा. (क्रि. मारणे). (राजा.) २. भरलेली मूठ; बचक्यातून आणलेला पदार्थ (परिमाण). (वा.) **बचकेत पाणी धरणे** - अयशस्वी प्रयत्न करणे; अशक्य गोष्ट करू पाहणे.
**बचकणा-णी** वि. लहान; छोटेखानी; लहान मुलाला योग्य (वस्त्र, जिन्नस). [हिं.बचकाना]
**बचकणी** स्त्री. १. लहान मुलांचा रेशमी धोतरजोडा. २. मद्याचा शिसा. (को.) [हिं.बचकाना; क.बच्चकणी]
**बचकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. पाय चिखलात बुडताना, घसरताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]
**बचकपट्टी** स्त्री. लहानसे नुकसान, उणीव भरून काढण्यासाठी बसवलेला हलका कर, पट्टी.
**बचका** पु. १.(राजा.) पहा : **बचक.** २. पालथा हात. (झाडी)
**बचकाभर** वि. गरजेपेक्षा अधिक. (झाडी)
**बचकुटी** स्त्री. गाल. (गो.)
**बचकेपण** न. कुचिती; वाईट विचार. (तंजा.)
**बचत** स्त्री. शेष; उर्वरित भाग; बाकी. [सं.बच्; हिं.]
**बचतखाते** न. बँक, पोस्ट यांमध्ये शिल्लक असलेल्या रकमेवर ठरावीक दराने व्याज दिले जाते असे खाते.
**बचतठेव** स्त्री. जिच्यावर व्याज मिळते व चेकने पैसे काढता येतात अशी ठेव.
**बचतपत्र** न. बचत वाढवण्यासाठी सरकारने काढलेल्या विशिष्ट योजनेअंतर्गत बचतीचे पैसे गुंतवल्यावर पोस्टाकडून मिळणारा दाखला.
**बचतुर** पु. मूर्ख; बेअक्कल. (गो.)
**बचना** क्रि. १.जिवंत राहणे. २. उरणे. (झाडी) [हिं.]
**बचनाग** पु. एक विषारी झाड व त्याचे मूळ. ही वनस्पती डोंगरात किंवा ओढ्याच्या कडेला होते. मुळ्या फार विषारी. बचनाग शुद्ध करून

रसायनात वापरतात.[हिं.; सं. वत्सनाभ](वा.) **बचनागाची कांडी** – उपद्रवी माणूस.

**बचबच, बचमंगळ** स्त्री. १. गोंधळ; घाण; अव्यवस्था; गडबडगुंडा; बजबजपुरी; बेबंदशाही (काम, वस्तू, मनुष्य यांची); अपमानास्पद दशा; हास्यास्पद अवस्था : 'अवघे बचमंगळ केलें । म्हणती एकाचें आपुलें ।'– तुगा ६२१. २. बोभाटा . [ध्व.]

**बचबचीत** वि. पचपचीत; गिलगिलीत (चिखल, भात, तोंडी लावणे, फळ). [ध्व.]

**बचलबचल** स्त्री.विनाकारण बडबड. (व.)

**बचानना** सक्रि. गोंधळणे; भूल पडणे. (झाडी)

**बचाव** पु. १.संरक्षण; तारण. २. सुटका; मुक्तता; तगणे; सुरक्षितपणे (संकटातून) पार पाडणे; निभाव. ३. समर्थन. ४. उपाय.[हिं. बचाऊ]

**बचावणी** स्त्री. रक्षण; बचाव; निभाव.

**बचावणे** सक्रि. राखणे; तारणे; सांभाळणे.
अक्रि. वाचणे; सुरक्षित राहणे. [हिं.बचाना; सं.विच्छु]

**बचे(छ–छे)री** स्त्री. फजिती; बेअब्रू; अपमान; उपहास; पच्ची. (क्रि. करणे, होणे).

**बच्चल** वि. बडबड्या. (व.)

**बच्चा** पु. १. लहान पोर; पिल्लू. २. घेर वाढवण्यासाठी अंगरखा वगैरेंना लावलेला कापडाचा तुकडा; कळी; जोड. ३. जमिनीत खळी करून कवड्या, पैसे इ. खेळतात. त्या खेळातील एक शब्द. ४. गाडीच्या चाकाच्या मोठ्या झालेल्या भोकात बसवलेला ठोकळा. ५. (ल.) पागोटे मोठे दिसण्यासाठी किंवा त्याला घाम लागू नये म्हणून वरील पागोट्याच्या खाली घातलेले जुने अथवा लहान पागोटे. [फा. सं.वत्स; ]

**बच्चा** पु. नदीकाठचे, सतत पाण्यात जगणारे एक झाड.-चित्रकृषि २.६.

**बच्चा** पु. (गोट्यांचा खेळ) बल्ल्या; दंड म्हणून घेतलेली गोटी. (कर.)

**बच्चा** पु. तोफेचा एक प्रकार : 'लोक व तोफ बचीयाच्या लहान दोन...येऊन पोहचले.'– पेद ३३, पृ. ३४६.

**बच्चाजी, बच्चाराम, बच्चमजी** उद्गा. (उपहास, तिरस्कार या अर्थी) राजश्री! बेट्या!

**बच्चेबाज** पु. गुदमैथुन करणारा.

**बच्चेबाजी** स्त्री. गुदमैथुन; पुंमैथुन. [फा. बच्चा + बाज]

**बच्छान** स्त्री. दुःखकारक स्थिती; गळाठा; दैना. [फा.बद्शान]

**बच्या,बच्चा** पु. ठुशीच्या किंवा वज्रटीकेच्या पेटीचे सर सांधेसूत बसवण्यासाठी माळेच्या मधोमध घालण्याची विशिष्ट पेटी. (ठुशीचा बच्या मापट्याच्या आकाराचा व वज्रटीकेचा चार गोलाकार मण्यांच्या पेटीसारखा असतो.)

**बछ(छे)डा–डी–डे–रा–री–रे** पु. स्त्री. न. १. सामान्यतः गाय, घोडी, म्हैस इ. चे पोर; शिंगरू; वासरू. २. (लडिवाळपणे) मूल. [सं.वत्स; हिं. बचहिडा–हरा]

**बजडा–रा** पु. एक प्रकारची नाव. (काशी) [हिं.बजरा]

**बजबज** पु. घोटाळा; अनवस्था.

**बजबजपुरी** पहा : **बचबच**

**बजरबट्टू** पु. १. ताडाचे झाड. हे श्रीलंका-मलबारकडे होते. पाने मोठी असून त्यांच्या चटया, पंखे करतात. २. त्या झाडाचे फळ किंवा बी. यांचे मणी इ. करतात. हे औषधी आहे.

**बजरबट्टू** पु.१. हनुमान. २.(ल.) खुटखुटीत व चलाख मुलगा; काळा कुळकुळीत, बुटका व लठ्ठ मनुष्य. [सं.वज्रबटु; सिं.भचरबटूं]

**बजवय्या** पु. वाद्ये वाजवणारा.

**बजाख–ग–गी** वि. १. रागीट; तामसी. २. भांडखोर; कजाग; भांडकुदळ : 'त्वरित उठ म्हणे हे कन्यकेला बजागी।'– सारुह ४.६१. ३. धीट. (तंजा.) [हिं.बजाक = एक साप]

**बजाज** पु. कापडाचा व्यापारी. [अर.बझ्झाझ]

**बजाजी** स्त्री. कापडाचा व्यापार.
वि. १. बजाज, त्याचे काम यासंबंधी. २.(आपल्या मालाची स्तुती करण्याच्या कापडविक्रेत्यांच्या चालीवरून) दिखाऊ; डामडौली. [फा. बझ्झाझी]

**बजाडणे** सक्रि. १. वाजवणे. (व.) २.(ल.) मार, चोप देणे. [ सं.वादन;हिं. बजाना]

**बजाडनं** सक्रि. विवाहप्रसंगी आहेर देणे. (अहि.)

**बजार** पु. फोडणी. पहा : **बघार** : ' जरा बजारा चुरा न परि तुज उरावयाचा ।'– अमृत ५३. [हिं.बघारी]

**बजारपट्टा** पु. बाजारपेठ.(अहि.)

**बजारवणे** सक्रि. वाजविणे; झाकणे; बार काढणे : ' बार जोडगोळ्याचा बजारवावे...'– सब पृ. ३१.

**बजावणी** स्त्री. वाद्य वाजवणे.

**बजावणी** स्त्री. १. संपादणी; कार्यपूर्ती. २.आज्ञा; ताकीद. ३.अंमलबजावणी; तामिली. ४.(गुन्हा) पुराव्याने सिद्ध करणे.

**बजावणे** सक्रि. १.संपादणे; करून टाकणे; करणे : 'सुज्यायद्दौला यांनी खुर्निशात बजावून.'– मइसा ३.१८६. २. हडसून खडसून सांगणे; निक्षून फर्मावणे; फक्त आज्ञा करणे; ताकीद देणे. ३. स्वारी, चढाई करणे. ४. (कायदा) हुकमाप्रमाणे करणे; अमलात आणणे (हुकूम, नोटीस इ.). ५. आठवण देऊन अंगी लावणे (दुष्कृत्य, गुन्हा). ६. दुर्घट काम अंगावर घेऊन पूर्ण करणे. ७. (वाद्य) वाजवणे. [हिं. बजाना; फा.बजा + आवर्दन]

**बजावर्द** पु. पत्राच्या आरंभीचा फार्शी मायना. [फा.]

**बजिदगी, बजि(जी)दी** स्त्री. १. अजीजी; आर्जव : 'लाटसाहेब बहादुराने तमाम बजिदगीनें लिहिलें.' – मइसा १०.२५२. २. विनवणीचा आग्रह : 'सत्वर येणें येविसी बहुत बजीदी केली.'– पेद १८.८८.

**बजिन्नस** क्रिवि. १.धडधडीत; हटकून; साफ; उघडउघड. २. तात्पुरता. ३. मुद्दाम; दाटून. ४. खुद्द; स्वतः जातीने; प्रत्यक्ष : 'त्यासी ब-जिन्नस नजरबेगखांजी यांणीही पत्र सेवेसी लिहिले आहे.'–मइसा ८.२११. ५. प्रत्यक्ष; हुबेहूब : 'लिहिलें आलें त्याची ब-जिन्नस नक्कल करून पाठविली आहे.'–ऐलेसं ५.२२९८.

वि. १. अस्सल; खरा; अकृत्रिम; चोख (सही, दस्तऐवज, पावती, रुजवात, जमाखर्च, खाते इ.). २. सोदा; लुच्चा; लबाड; चोर; हरामी. [फा.ब-जिन्स्]

**बजी** स्त्री. बच; वेखंड.- मसाप ४५.३.

**बजेट** न. पुढील जमाखर्चाचे अंदाजपत्रक; वर्षाच्या आगाऊ जमाखर्चाचे तपशीलवार अंदाजपत्रक. [इं.]

**बज्जात-द** वि. बदमाश; हलकट. [फा.बे-इज्जत]

**बट** स्त्री. १.(अंबाडी, कुंभ्याची मुळी, ताग इ.चा) एकत्र केलेला किंवा विकण्यासाठी तयार केलेला तंतूंचा समुदाय; पेड. २. केसांच्या जटा; वेणीचे पेड आवळणारे केस.

पु.स्त्री. अव. डोक्यावरील लहान व आखूड केस.

न. १.एक प्रकारचे लोखंड. २.पाथरवटाच्या सुतकीची पोलादी अणी; छिन्नी. [सं.वट]

**बट** पु. उडदाच्या शेंगांमध्ये आढळणारी आखूड व जाड पांढरी अळी. (अहि.)

**बट** स्त्री. नाणेफेकीतील एक बाजू.(अहि.)

**बट** पु. १. फाटा; टाळा; अभाव. २. सोने,चांदी इ. चे वजन करण्याचा दगड. (व.)

**बट** पु. १. लहान तट्टू. २. खेळण्याची मोठी गोटी. (को.)

वि. लहान पण मजबूत. [सं.बटु]

**बट,बटला, बटल(लु,लो)ई** पु. १. लहान लोटा; वाटोळ्या बुडाचे, लहान, घडीव भांडे; चरवी; कासंडी. (व.) २. बुटकुली. [सं.बटु]

**बटई** स्त्री. १. एकाचे भांडवल व दुसऱ्याचे श्रम याप्रमाणे मिळून शेती करण्याची पद्धत. २. खर्च व उत्पन्न दोहोंचा समसमान वाटा घेणे. ३. शेतीबद्दलची पाती; निम्मा हिस्सा. [हिं.बाटना]

**बटकी,बटिगी** स्त्री. १. दासी. २. शिष्या : 'बटकींआंतु खेळिजे : तैसें बटीकांआंतु खेळों नैए कीं'-लीचउ ३२५. [सं.बटु]

**बट(टा)की** स्त्री. टिमकी; दवंडी : 'गावात बटकी वाजवून जाहीर दवंडी पिटीत.'- वका २०९. [ध्व.]

**बटकीचा** पु. (ग्राम्य शिवी) दासीपुत्र.

**बटक्या,बटुकरा-ऱ्या** पु. दासीशी संभोग करणारा.

**बटछपन्नी** पहा : **बटछपाई** १

**बटछपाई** स्त्री. १. वजने, मापे व नाणी यांवर ती खरी आहेत याबद्दल सरकारी अधिकाऱ्याने मारलेला शिक्का किंवा छाप. २. असा छाप मारण्याबद्दल देण्याचा कर : 'मापें तेलांचीं व गज याचें बटछपाईचें काम.'- वाडसमा ३.२३३. ३. वरील शिक्का मारण्याचा हक्क.[हिं.]

**बटण** न. काच, शिंप, लाकूड इ. ची गुंडी; बिरडे. [इं.बटन]

**बटणावळ** स्त्री. बट्टा; चलनी नाण्यांचा वर्तावळा; अदलाबदलीची किंमत. [हिं.बट्टा]

**बटणे** अक्रि. (नाण्यांची) अदलाबदल होणे.

**बटबट करनं** १.कुजलेल्या द्रवावर बुडबुडे येणे. २.गलिच्छ असणे. (अहि.)

**बटबटीत** वि. मोठाले व विद्रूप (डोळे).

**बटमोगरा-री-रे** पु. मोगऱ्याची एक जात व त्याचे फूल.

**बटलर,बुटलेर** पु. वरिष्ठ अधिकाऱ्याच्या घरी स्वयंपाक्याला मदत करणारा, खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवणारा नोकर; वाढपी. [इं.]

**बटली** वि. हिणकस; निकृष्ट; बट्टा पडणारे (नाणे).

**बटवटणे** अक्रि. पांचटपणे बोलणे; शुष्क व नीरस बोलणे.

**बटवडा** पु. वाटणी; वितरण; वाटणे; (मजुरी व पगार) देणे. [हिं.बाटना; त. पहुवाडा]

**बटवडेपत्रक** न. पगाराचा, वाटणीचा तक्ता, पत्रक.

**बटवणी** स्त्री. नाण्यांची अदलाबदल.

**बटवा** पु. सुपारी इ. ठेवण्यासाठी चार-पाच कप्प्यांची छोटी पिशवी. हिला झाकदोरा व उघडदोरा लावलेला असतो. पैसे ठेवण्याचा कप्पे असणारा कसा; झोळणा. [क.बटवे; हिं.]

**बटवाळ-ल** वि. भ्रष्ट; दोषी; अनाचारी : 'बटवाल कुबुद्धी।'- दास २.३.३०.

**बट(टा)विणे** सक्रि. एका प्रकाराचे नाणे देऊन त्याच प्रकाराचे पण हलक्या किंवा भारी किंमतीचे नाणे बट्टा देऊन घेणे; नाण्यांची अदलाबदल करणे.

**बटवेणी** स्त्री. कानशिलांच्या जवळच्या केसांच्या घातलेल्या दोन वेण्या प्रत्येकी.

**बटंग** पु. (सोनारी) सल्ले, अंगठी इ. वर नक्षी करण्याचे साधन. एक प्रकारचा लोखंडी हातोडा.

**बटाई** पहा : **बटणावळ**

**बटाई** स्त्री. १. ऐनजिनसी सारा; निम्मे उत्पन्न स्वत:साठी ठेवून बाकीचे निम्मे सरकारला, मालकाला देण्याचा ठराव. अर्धेलीने घेणे.- मसाप २.१४०. २. वाटा : 'त्या गांवीची बटाई करावी.'-वाडबाबा १.२०७. [हिं.]

**बटाटा-टे** पु. एक कंद. उत्पत्तिस्थान - दक्षिण अमेरिका. तेथून याचे बी युरोप व भारतात आले. [इं. पोटॅटो]

**बटाटे(टा)वडा** पु. शिजलेला बटाटा, मिरची, कोथिंबीर, लसूण, आले, हळद इ. घालून, तसेच कढीनिंब, मोहरीची फोडणी देऊन त्या मिश्रणाचा डाळीच्या पिठात बुडवून मग तळलेला गोल, खमंग पदार्थ.

**बटायंदा** पु. भरणा; जमा: 'शेतसारा... पूर्णपणे बटायंदा करावा.'- ज्ञाप्र ८.४.१९४२. [अर.]

**बटाव-ऊ** पु. १.पहा : **बटणावळ**. २. बट्टा घेणारा.

वि.स्वैर; सोदा; दुराचारी; बदफैली. (मुख्यत्वे गाण्यात, लावणीत रूढ). [हिं.बटाऊ]

**बटांगा** पु. (सोनारी) मणी करण्यासाठी केलेले अर्धाले भाग. हे खाळग्याने करतात.

**बटिकु(क)र** न. शिष्य; सेवक: 'आरे आरे बटिकरे हो'-लीचपू ५०. [सं.बटु]

**बटीक** स्त्री.दासी; बटकी. [सं.वृत्तिकरी]

**बटीक** पु. १. सेवक. २. शिष्य : 'आजि तो बटीकु देखों नां?'- लीचउ २६९. [सं.बटु]

**बटु,बटुक** पु. १. मुंजीपासून सोडमुंजीपर्यंतच्या वयात येण्यापर्यंतच्या वयातील ब्राह्मणाचा मुलगा; ब्रह्मचारी. २. लहान मुलगा. [सं.]

**बटुकरण** न. उपनयन संस्कार; मुंज. [सं.]

**बटुरी** स्त्री. वटवाघूळ. [सं.वट]
**बटुवस्त्र** न. मुंजीच्या वेळी बटूला अंगावर घेण्यासाठी दिलेले वस्त्र.[सं.]
**बटुंग** पु. खाजे. (झाडी) [सं.बटु]
**बटेर** पु. होला हा गोजिरवाणा पक्षी. रंग गवतासारखा असून अंगावर काळ्या रेघा असतात.
**बटेल** वि. व्यंग असलेला बैल.(झाडी) [हिं.]
**बटो** पु. डाग; काळिमा.(कु.)
**बटोडोऱ्या** वि. १. मोठ्या डोळ्यांचा. २. एक शिवी.(झाडी)
**बट्ट** पु. मानेचा उंच भाग. [सं.अवटु]
**बट्ट** न.पु. मसाल्याची भाजी; तिचा रस्सा.(अहि.)
**बट्टा** पु. १. नाण्यांची बटाई; बटाव. २. डाग; कलंक; दोष; वैगुण्य. ३. साबणाचा तुकडा. ४.माणिक, मोती, रत्ने इ. बांधण्याचे लहानसे फडके. [सं.वर्तन; हिं.]
**बट्टा** पु. कापडाचा लहानसा तुकडा; चिंधी (रत्ने इ. गुंडाळण्यासाठी घेतलेला). [हिं.बस्ता;सं.वस्त्र]
**बट्टाखाऊ, बट्टेखोर** वि. १. दर्शनी किमतीपेक्षा कमी किमती, बट्टा देणे भाग असलेले (नाणे). ३. काळिमा, कलंक लागलेला (माणूस, वंश, कूळ).
**बट्टाखाते** न. बटावाचा हिशोब; नाणेपारखणावळ; चेक वटवण्याची कसर.
**बट्टासट्टा** पु. चलनी नाणी बदलून देणे, घेणे.
**बट्टी,बाटी** स्त्री. एक पक्वान्न; रानशेणीत भाजलेले कणकेचे गोळे. हे कुसकरून, तूप साखर घालून, त्याचे लाडू करून किंवा वरणाबरोबर खातात. (खा.) [सं.वटिका]
**बट्टी** स्त्री. १. वडी; थापटी (गूळ इ. ची). २. खोबऱ्याची वाटी. ३. चांदीची चीप. ४. लहानशी वाटी.
**बट्टीदार** वि. (फळ इ.) भरीव. (ना.)
**बट्टेबाज** वि. १. कलंकित; डागाळलेला. २. शठ; सोदा; आपमतलबी; लुच्चा. ३. पहा : **बच्चेबाज**
**बट्टेबाजी** स्त्री. १. रंडीबाजी; छिनाली; स्वैरता. २.सोदेगिरी; शाठ्य. ३. बच्चेबाजी; गुदमैथुन.
**बट्टे होणे** अक्रि. नासणे. (बे.)
**बट्ट्याबोळ** पु. १. गडबड; गोंधळ इ. २. त्रास. (कर.)
**बट्या** पु. पत्त्यांतील गुलाम.
**बठनं** क्रि.१. वाढ खुंटणे. २. खाली येणे; खचणे. ३. शिक्षण, नोकरी सोडणे. (अहि.)
**बठाडनं** सक्रि. १.कामावर जाऊ न देणे. २. शिक्षणातून काढणे. ३. प्रतिमेची स्थापना करणे. (अहि.)
**बठाण** न. खोली. [सं.उपस्थान; हिं.]
**बठांगू** वि. चालताना मध्येच बसणारा (बैल.) (व.)
**बठ्ठ** वि. १. मंद व आळशी; मठ्ठ. २. सुस्त.
**बठ्ठर** वि. टणक; कडक; जून; निबर. (व.)
**बठ्ठा** पु. धरणे घेऊन बसणे; ठाण मांडणे. (क्रि.घेणे.) [हिं.बैठा]
**बठ्या** वि. १. पहा : **बठांगू**. २. (ल.) काम न करता खाणारा. (व.) [हिं.बैठा]
**बड** पु. चव काढण्यासाठी सारख्या आकाराच्या मोत्यांचे वेगवेगळे वजन करण्याची क्रिया.
**बडक** न. म्हातारे, मरायला टेकलेले जनावर. (गो.)
**बडक-ग** न. गाईचे प्रेत. (गो.)
वि. अतिशय रोडावलेला.
**बडका** पु. बेडका; कफासहित थुंकी. [ध्व.]
**बडकुंचे** क्रि. कृश होणे. (गो.)
**बडखुळा** पु. एखाद्याच्या हाताखालचा निरुपयोगी मदतनीस; धेडा. (राजा.)
**बडगरा** वि. गचाळ; घाणेरडा. (व.)
**बडगा** पु. सोटा; दंडुका.[क.बडिगे] (वा.) ० **दाखवणे** - स्वतःचे काम साधून दुसऱ्याला ठकवणे.
**बडगा** पु. पोळ्याच्या दुसऱ्या दिवशी एका मडक्यात कपडा, बिब्बे, केस, फुले, डास, पिसवा, हळदकुंकू घालून ते मोठ्या पहाटे कोणाला न दिसता दूर गावाबाहेर नेऊन फोडतात व आतील पदार्थ जाळून टाकतात. हा विधी केल्याने कोणतीही पीडा, रोग इ. होत नाही असा समज आहे.
**बडगा-गी** पु. स्त्री. चवळी धान्य. ही गोमंतकात पिकते. दाणा उडदाएवढा व रंग तांबूस.(कु.)
**बडगी** पु. सुतार.(बे.)
**बडण** पहा : **बोडण**
**बडतर्फ** वि. पदच्युत; काढून टाकलेला. [फा.बर्तरफ्]
**बडद** स्त्री. जहाजावरील तोफ ठेवण्याच्या ठिकाणाचे पारिभाषिक नाव.
**बडदा** पु. १. जिभेला झोंबणारा एक पांढरा कंद. हा डांग प्रांतात होतो. २. शेवगा. (तंजा.)
**बडदासी** स्त्री. काळापाणी यार्डात सफाईसाठी येणाऱ्या कैद्यांना बडदासी म्हणत.-एपिआ.
**बडदास्त** स्त्री. १. आदरसत्कार; पाहुणचार; पाहुण्यांचा सत्कार इ. २. निगा; देखरेख;जोपासना;व्यवस्था ; शुश्रूषा. [फा.बर्दाश्त]
**बडबड** स्त्री. १. वटवट, निरर्थक भाषण; टकळी चालवणे. २. झोपेतली बडबड; बरळणे.
**बडबडगीत** न.लहान मुलांसाठी रचलेले छोटे गाणे; बालगीत.
**बडबडा** पु. गवताची एक जात. (व.)
**बडबडीत** वि. पीठ अधिक झाल्यामुळे स्वादरहित झालेले, बिघडलेले (कढी, सांबार इ.).
**बडबीज** न. १. कमळाच्या एका जातीचे बी; मकाणा. २.(लहान बीजांमधून विस्तृत होणाऱ्या वटवृक्षावरून ल.) मोठा विस्तार; अतिविस्तृत स्वरूपाचा धंदा किंवा अतिशय गुंतागुंतीचे व त्रासदायक काम. ३. अधिक उत्पन्न देणारी काही विशिष्ट धान्ये. ४.आया-बहिणींना शिव्या देणारा, निर्लज्ज मनुष्य.
**बडम** न. १. पाच-सहा भाज्या एकत्र शिजवून तयार केलेली पातळ भाजी. २. अनेक खाद्य- पेयवस्तूंचा संग्रह. (कर.)
**बड(ड)मी** स्त्री. लहान रास, गंजी (गवत, कडबा इत्यादीची).
**बडवणी** स्त्री. १. मारणे; झोडपणे; आपटणे. २. बडवण्याचे, मारण्याचे

हत्यार. ३. जोंधळ्याची इ. कणसे बडवून दाणे काढणे. [ध्व.]

**बडवणे** न. बडवण्याचे साधन; ठोकणे; चोपणी; सोटा.

**बडवणे** सक्रि. १. चिरडणे; ठोकणे. २. झोडपणे; मळणे (धान्य). ३. काठीने मारणे; दांडकणे. ४. खच्ची करणे. (बैलांचा अंड एका भक्कम दोरीने आवळतात आणि दोराच्या दोन्ही बाजूंना दोन मुसळे बांधतात, वृषणाच्या खालच्या मुसळावर पाय ठेवून वरचे मुसळ वर ओढतात. पहारीने वृषणाच्या शुक्रवाहिनी शिरा ठोकतात, त्यामुळे वीर्यस्तंभन होऊन वृषण बारीक होते). ५. जोराने आपटणे (चिरगुटे दगडावर धुताना). ६. लांब, लंबे करणे. [सं.वृध्; क. बडि]

**बडवण्या** स्त्री. अव. (जोराने पडणाऱ्या सरीवरून) मूळ नक्षत्रावर पडणारा पाऊस.

**बडवा-व्या** पु. पंढरपूरच्या विठोबाचा ब्राह्मण पुजारी. [क.बडि,बडिगे; सं. भट, बटु]

**बडवा(वे)चार** पु. बढाई; बडेजाव; आढ्यता. (गो.)

**बडव्याचा** वि. झोडलेला; काठीने बडवलेला (धान्य, दाणा). (याउलट खळ्याचा = तुडवलेला).

**बडस** पु. कफाचा, शेंबडाचा बेडका.

**बडसचे-चे** क्रि. मेजवानी देणे.(गो.)

**बडहंस** पु. (संगीत) सारंग रागाचा एक प्रकार. गानसमय मध्यान्ह. [सं.]

**बडंबा** पु. व्यर्थ गलबला; कोलाहल; बडबड : 'मग नामरूपाचा बडंबा। करिती वायां।'-ज्ञा १५.२७६. [सं.वाक्]

**बडा** वि. १. मोठा; थोर. २. जंगी. [हिं.;सं.वृद्ध]

**बडि-डी,बडिया, बडियाना, बढिनाग** पु. कवड्या साप: 'दोराचिया सापासी। डोंबा बडीना गव्हाळा ऐसी ।'- ज्ञा ७.१६३.

**बडि(डी)याळे** न. मधाचे लहान पोळे. (गो.)

**बडिवार** पु. १. थोरवी; वैभव; तेज; महत्त्व; श्रेष्ठता; कीर्ती. २. निंदा करायची असताना अतिशयोक्तीने वर्णिलेला मोठेपणा; प्रौढी. ३. डौल. [फा.बडि + वार]

**बडिश** न. मासे धरण्याचा गळ. [सं.]

**बडी** स्त्री. १. आकडी; शेकाटी-टा (फळे,फुले काढण्याची-चा). २. काठी; छडी. (को.) ३. दांडी (सोवळे वाळत घालण्याची). (कु.) ४. गवत गोळा करण्याची टोकदार काठी. (वा.) ० **हातात घेणे** -मारायला हात उगारणे.

**बडीव** वि. बडवलेला; सूत भरण्यासाठी बडवून साफ केलेला (जोठ इ. वस्त्र).

**बडीशे(शो)प** स्त्री. एक औषधी धान्य. या झाडाची पाने बारीक कोथिंबिरीसारखी असतात. झाडाच्या तुऱ्याला दाणे येतात, ते मसाल्यात वापरतात. अर्क आमांशावर गुणकारी. [हिं.बडी सौंफ]

**बडी स्वारी** (ल.) ढेकूण. - राको.

**बडेजाव** पु. स्त्री. प्रतिष्ठा; उत्कर्ष; मोठेपणा; आढ्यता. अ. राजाच्या मिरवणुकीतील चोपदारांची 'पुढे चला! वाढा ! वैभवात नांदा!' इ. अर्थाची ललकारी. [हिं.बढेजाव]

**बडोदा** पु. बरगा; दोन्ही भिंतींपर्यंत असलेला अखंड वासा. (कर)

**बड्डी** वि. मुरमी; खडकाळ (जमीन). (झाडी) [ते. बरडु]

**बड्या बाजेचा ढेकूण** (ल.) स्वतःची लुच्चेगिरी, ढोंग नाकबूल करण्यात शेखी मिरवणारा; शेंदाडशिपाई.

**बढ(ढा)ई** पु. सुतार. [क.बडिगे]

**बढत** स्त्री. (संगीत) लहान-लहान स्वरसमुदायांनी एक-एक, दोन-दोन स्वर नवे घेऊन तयार केलेली तान; आलाप. [हिं.]

**बढती** स्त्री. १. वाढ; वृद्धी; चढती कळा. २. प्राप्ती; लाभ. [हिं.]

**बढया** पु. १. शिपाई. २. गाडीच्या दांड्या उचलून ज्यावर ठेवतात ते शिपाई प्रत्येकी; घोडा. - मसाप २.२५२.

**बढाई-व,बढाई(य)की** स्त्री. पु. आत्मस्तुती; फुशारकी; प्रौढी. [हिं.;सं.वर्धकि]

**बढाईखोर** वि. शेखीबाज; फुशारकी मारणारा; नसती प्रौढी सांगणारा.

**बढे(ढ्ये-डे)ल** न. १. वडे, घारगे तळून कढईत राहिलेले तेल. (को.) २. फोडणी दिलेले तेल. (व.) वि.तापवलेले (खाण्याचे तेल). (व.)

**बढ्या** पु. आखूड व घणसर लाकडाचा तुकडा; सोटा; दांडके. (को.)

**बणक** स्त्री. केवड्याचे झाड व पान. (गो.)

**बणगी-बी** स्त्री. १. बाजरीचे गोंड; कचोळे. २. बाजरीचा बारीक दाणा. ३. अशा दाण्यांची लहान रास; ढीग. ४. लहान उडवी, गंजी (भात, गवत, वरी इ. च्या पेंढ्यांची). (को.) ५. सजगुऱ्यांची लुंगी. [क.]

**बणबी** पु. वणवा.

**बणवणे** क्रि. अनुभवाला येणे : 'क्षुधा न बणवे।'- ज्ञा १८.६३७.

**बणा** पु. उसाच्या शेताचा भाग. (बे.)

**बणीम** पु. कडब्याचा एकत्र रचलेला ढीग. (माण.)

**बण्ण** सोन्या-चांदीची झिलई. (तंजा.)

**बण्या** पु. बाणदाराचे हत्यार.

**बत** न. ऊन; सूर्याचे प्रखर किरण.-शर.

**बत** पु. खेद. [सं.; प्रा.]

**बतक** स्त्री. एक प्रकारचे पाण्याचे भांडे (मातीचे, काचेचे).

**बतकाठी** स्त्री. अंगात संचार झालेल्या माणसाने हातात घेतलेली काठी.

**बतणे** अक्रि. (गोट्यांचा खेळ) एका गोटीपासून दुसरी गोटी अमुक अंतरावर राहावी हा नियम मोडून तिचे अंतर सुटणे, खेळण्याच्या उपयोगी नाही अशा जागी येणे. वीत, पाऊल इ. च्या अंतराने गोट्यांचे बतणे होते.

**बतना,बताडा-णा-ना** पहा : **बच्चा** ; मोठ्या पागोट्याच्या आत घालण्याचे लहान पागोटे. [क.बट्टे]

**बतमतेल** न. बुंदाचे, कॉफीचे तेल. - अश्वप २.१०८.

**बतरावने** क्रि. झोपेत बडबडणे. (व.)

**बतवा** स्त्री. अव. बाता; गप्पा. (कु.)

**बताजाव** पु. लष्करी पलटण. (गो.) [पोर्तु.बटॅल्हो; इं.बटॅलियन]

**बताल्या** पु. बडबड्या. (व.)

**बतावणी** स्त्री. १. अभिनय करणे; सोंग घेणे, आणणे; वेष धारण

करणे. २. हावभाव; अभिनय; भाषण. ३. सोंग; ढोंग; बहाणा; थाप. ४. बजावून सांगितलेली गोष्ट. ५. कीर्दीवरून केलेली जमाखर्चाची कच्ची खतावणी. [हिं.]

**बतावण्या** वि. नट; मुख्यत्वे रंगतदार अभिनय करून हास्योत्पादक सोंग आणणारा; सोंगाड्या.

**बतावि(व)णे** सक्रि.१. अभिनय करून सोंग आणणे. २. तिखटमीठ लावून, अतिशयोक्तीने, सजवून वर्णन करणे. ३. दाखविणे. ४. धमकी देणे. [हिं.बताना]

**बतासा** पु. तलवारीच्या मुठीच्या वाटीवरील वाटोळा भाग.

**बतेला** पु. १. पन्नास ते पाचशे खंडी वजन नेणारे जहाज, गलबत; कच्छी, खारवी इ. लोकांचे गलबत: 'बतेला सावकारी रूपारेल इंग्रज मुंबईकर याजकडील.' – वाडसमा २.६१. २. पडाव. (को.) [पोर्तु. बातेलॉ]

**बत्ता** पु. १. कुटण्याचे, खलण्याचे दगडी किंवा लोखंडी साधन; दस्ता. २. गोट्यांच्या खेळातील एक शब्द. ३. (भाताचे, वरणाचे)मोठे तपेले. ४.(ओतकाम) पोकळ समईच्या मधला भाग ओतण्यासाठी उपयोगात आणलेला लोखंडी बार. ५. कापलेली तुळई. (झाडी) [फा.]

**बत्ताडा** वि. मोठा; रुंद.

**बत्ता(ता)सा** पु. फुग्यासारख्या आकाराची साखरेच्या पाकाची मिठाई. [क.बत्तासु;हिं.]

**बत्तिशी** स्त्री. १.बत्तिसांचा समुच्चय; (ल.)दातांची कवळी. २. बोलणे; भाषण; भविष्य. ३. स्त्रियांचे बत्तीस पौर्णिमा हे व्रत. (वा.) **० दाखवणे** – हसणे (हसताना दात दिसतात, यावरून). **० पाडणे, हलवणे** – थोबाडीत मारून दात पाडणे; सारे दात पडतील इतक्या जोराने थोबाडीत मारणे. **० रंगवणे** – १. दातांतून रक्त निघेल इतक्या जोराने थोबाडीत मारणे. २.विडा खाऊन तोंड व हिरड्या रंगवणे. **० लवणे, हालणे, हलविणे** – (वाईट गोष्टीचे) भाकीत करणे. **० वठणे** – एखाद्याने बोललेली अशुभ गोष्ट घडून येणे.

**बत्तिशी मसाला** घोडे, उंट इ. ना देण्याचा बत्तीस औषधे एकत्र करून तयार केलेला मसाला.

**बत्तिसा** पु. १. पहा : **बत्तिशी मसाला.** २. बत्तीस औषधींचा बाळंतिणीला देण्याचा काढा. ३.(ल.) पुष्कळ पदार्थांचे मिश्रण.

**बत्ती** स्त्री. १. वात (दिव्याची, मेणबत्तीची). २. (ल.) दीप; दिवा. ३. (फटाका, बाण, हातनळा इ.च्या) वातीचे तोंड. ४. वात (जखमेत घालण्याची); पोत. ५. उभे फाडलेले अर्धे पागोटे; अरुंद पन्ह्याचे पागोटे; अरुंद व ७५ ते १२५ हात लांबीचे पागोटे. ६. दारूची, डांबरी वात (सुरुंगासाठी). (क्रि. घालणे, पसरणे). ७. छपरबंदांचा तिघांचा संच. यातील एक पाने अंथरतो, दुसरा त्यावर गवत घालतो व तिसरा त्यावर कांबीट ठेवून ते सर्व बांधून आवळतो; बांबूची काठी; कांबीट. ८.पेट्रोमॅक्स. [सं.वर्तिका;हिं.] (वा.) **० देणे** – पेटवणे; शिलगावणे. **० लागणे** – १.(कामाला, घराला, संपत्तीला, रोजगाराला इ.) आग लागणे, जळणे. २. वैमनस्य उत्पन्न होणे. **तिच्या पोटी पाठी बत्ती लागो** – एक शिवी. (एखादीच्या) संततीला व भाऊबंदांना लवकर मरण येवो.

**बत्तीस** वि. ३२ ही संख्या; तीस अधिक दोन. [सं.द्वात्रिंशत्] (वा.) **० राम पळौप** – पुष्कळ काळ जगून पुष्कळ अनुभव घेणे.(गो.)

**बत्तीसलक्षणी, बत्तीसगुणी** वि. सर्वगुणसंपन्न; शास्त्रात सांगितलेल्या बत्तीसही शुभलक्षणांनी युक्त.

**बत्सर** पु. लोखंडी कड्याचा चोगा. (तंजा.)

**बथ(थु)वा, बाथला** पु. चाकवताची भाजी. [हिं.]

**बथ्थड** वि. मंद बुद्धीचा; बुद्धिहीन.

**बद** पु. न. १. गर्मीमुळे होणारे गळू; उठाणू. २.(गोट्यांचा खेळ) गोटी टाकण्यासाठी केलेली लहानशी खाच; गल. ३. सखल जागा. (व.) स्त्री. (विटीदांडू) पाचव्या दांडूचे अंतर किंवा टोला. (क्रि. मारणे). [हिं.]

**बद** क्रिवि. पुरतेपणी; पुरा होईतो; काठोकाठ इ. [ध्व.बद्]

**बद** न. भुकटी; पीठ. (व.)

**बद** वि. वाईट; नीच. (विशेषत: समासात उपयोग.) [फा.बद्]

**बद** फार्शी उपसर्ग. नकार, वाईट. उदा. बदनजर. [फा.]

**बदअम(म्म)ल–ला, बदमल** पु. स्त्री. १. दुष्कर्म; व्यभिचार; अनैतिक वर्तन: 'सन्तु जाधवीण, तिनें बद-अमल केला.'–ऐलेसं ८.४२१३. २. हरामखोरी : 'बद-अमली करून बसल्यास रुपये श्रीमन्तांचे सुटतात असें नाहीं.'– ऐलेसं ७.३७५५. ३. गैरवर्तणूक; बेबंदशाही : 'मुलकांत बद-अमली जाली आहे.' –दिमरा १.२२४. [फा.]

**बदक** न. एक पाणपक्षी. पाणथळीजवळ राहणारा, दाट पिसांचा, रुंद चोचीचा, पायांना कातडीने जोडलेली तीन पुढची व एक मागचे अशी चार बोटे असणारा, सामान्यत: पांढऱ्या रंगाचा पक्षी. [फा. बतक्]

**बदकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. मृदू व थलथलीत पदार्थांचा कठीण पदार्थांशी संबंध होताना, लोणी, शेण इ. चा गोळा पडताना, चिखलात पाय घसरताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ ध्व.]

**बदकशा(श्या)म** पु. (शुभकारक) घोडा : 'परम रागीट कुमाईत। बदकश्याम स्थिर चालत।'– ह २२.४५. (बदकशान या नावाच्या शहरावरून)

**बद(त)का** पु. १. ठोसा; गुद्दा; मुष्टिप्रहार. २.(लोणी, शेण, चिखल इ.) मृदू पदार्थांचा गोळा. [सं.बद् ;ध्व.]

**बद(त)खल** न. खोलगट किंवा सखल जागा, तळ, पात्र; लवण. स्त्री. फतकल; ऐसपैस घातलेली मांडी.
वि.१. खोलगट (जमीन). २.ठेंगू. ३. बसकट (ताट, इमारत इ.).

**बदगुले** न. (तिरस्काराने) लठ्ठ माणूस; लठ्ठंभारती.

**बदगे** न. १. फोल; कचरा; सालपट (प्राय: धान्य, फळे इ.चा). २. रेव; माती; गाळ; खडा; गदल (धान्य, साखर, दारू इ.तील). ३. क्षतातील, जखमेतील पू, लस. ४. उष्टे; पानात, ताटात उरलेले अन्न.

**बदचाल** स्त्री. वाईट चाल; गैरशिस्त वर्तन; गैरवर्तन.

**बदचे** सक्रि. १. दर, किंमत ठरवणे. २. परवडणे. ३. वश होणे. ४. जुमानणे. (गो.)

**बद(दा)डणे, बदणे** सक्रि. चोपणें; मारणे. [सं.बंधू]
**बददिली** स्त्री. १. भ्याडपणा. २. संशयीपणा. [फा.]
**बददुवा** स्त्री. शाप. [फा.]
**बदन** न. १. शरीर; छाती. (अहि.) २.किल्ल्याची तटबंदी. [फा;हिं.]
**बदनग** पु. दुर्लौकिक; बट्टा : 'आम्हा लोकांत प्रथम जेथे शब्द गुंतल तो शरीरसंमंध अगत्यरूप करावा न केल्याने जातीमधें बदनग आयेब लागतो.'– ऐको. [फा.बदनक्ष]
**बदनजर** स्त्री. १. वाईट दृष्टी; कुवासना. २. वैर. ३. बेभरवसा. [फा.]
**बदनाम** वि. बेअब्रू झालेला; कुप्रसिद्ध. [फा.]
**बदनियत, बदनेक–त** स्त्री. पु. स्वामिद्रोह; हरामखोरी.
**बदफैली** स्त्री. १.कुकर्म; रंडीबाजी; सोदेगिरी. २.गैरवर्तन.
वि. कुकर्मी; व्यभिचारी; पापी. [फा.बद+अर.फिअल्=कर्म]
**बदबद–दा** क्रिवि. सरबरीत पदार्थ (दही, आमरस इ.) ओतताना किंवा बाहेर पडताना, ढिला किंवा फुटका मृदंग वाजवताना, बदका मारताना, पोकळ जमिनीवरून चालताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; धपाधप.
**बदबदणे** अक्रि. १. बदबद आवाज होणे (फुटका नगारा इ. चा). २. (गळू, उठाणू इ. तील) पू पिकणे. ३. पडशामुळे (डोके, नाक) जड, होणे. [सं.बद्;ध्व.]
**बदबदीत** वि. बदबद आवाज करणारा (फुटलेला मृदंग, भांडे इ.).
**बदबद्या** वि. लठ्ठ माणूस. (झाडी)
**बदमस्त** वि. १. मग्रूर; गर्वाने उन्मत्त झालेला. २. बंडखोर. [फा.]
**बदमामला** पु. १. कहराचे, दंडेलीचे वर्तन; दांडगाई. (मुख्यत्वे पैशांच्या मागणीचा प्रतिकार करणाऱ्यांचे). २. अन्याय: 'साष्टीचें ठाणें इंग्रजानें बदमामली करून घेतले.'– वाडसमा २.१९. ३. हरामखोरी; बेइमानी. ४. गोंधळ; अव्यवस्था. ५. भित्रेपणा.
वि. लुच्चा; हरामखोर. [फा.]
**बदमाश–ष–स** वि. १. वाईट रीतीने उपजीविका करणारा. २. (ल.) दुराचरणी; गुंड; पुंड. [फा.बद + मआष]
**बदर** वि. १. जून; निबर.(व.) २. अजीर्ण करणारे. – शर.
**बदरक–का** पु. १. सोबत व संरक्षण करण्यासाठी घेतलेला सरकारी शिपाई- प्याद्यांचा पहारा. २. सोबती. ३. तंबूच्या खांबावरील टोपण. [फा.]
**बदरंग** पु. १. नष्ट, भग्न झालेला मान, ऐश्वर्य, थाटमाट. २. ऐश्वर्य गेल्याने होणारा अपमान; मानखंडना; उपहास. ३. बेरंग.
**बदरा** पु. एक प्रकारची होडी, नाव, गलबत. [हिं.बजरा]
**बदरा–री** पु. स्त्री. १. (सराफांची) पैसा ठेवण्याची पिशवी. २. कोथळा. ३. घोड्यावरील गोणी. ४. तेल, तूप ठेवण्याचा कातडी बुधला, पिशवी. [अर.बद्रा]
**बदरिखा** पु. नियम; नेम : 'ऐसा बदरिखा लाविला होता'– गोप्र २६२.
**बद(द्द)ल** पु. स्त्री. १.पालट; फेर; फरक; अंतर. २. मनाचा पालट, फेर. (क्रि. घेणे) ३. आपल्या वचनापासून फिरणे; माघार; पलट. (क्रि. खाणे) ४. मोबदला.
वि. उलट; भलते: 'इकडून ऐवज पावला असतां बदल गोष्ट सांगितल्यास ऐवज माघारा घ्यावा.'–ऐलेसं ११.५६६०.
शअ. १. करिता; बदला; विनिमयाने. २. जागी; ऐवजी. ३. कारणे; साठी. ४. मुळे : 'पावसाबद्दल हत्ती, घोडे, उंटे बहुत मेली.'– मराचिथोशा ६२. [अर.बदल]
**बदल, बदलावरण, बदलाचे लग्न** साटेलोटे; दोन घराण्यांनी परस्परांच्या घरी मुली देणे.
**बदलणे** सक्रि. १. पालटणे; फेरफार करणे. २. फिरविणे; परतणे; वेगळे बनवणे. ३. एक सोडून दुसरे घेणे.
अक्रि. १.(सामान्यत: व ल.) बदल होणे. २. उलटणे; बंड करणे. ३. नाकबूल होणे. ४. (प्रतिज्ञेपासून, कृत्यापासून) परत फिरणे.
**बदलमुशारा** पु. रोख, ऐनजिनसी, जमिनीच्या रूपाने सरकारी नोकराला दिलेला पगार.
**बदला** पु. १. बदलून घेण्यासाठी परत केलेले नाणे; एकाच्या ऐवजी दुसरे घेणे. २. सूड; फेड; उट्टे; प्रतिक्रिया. ३. मुशारा; वेतन. ४. रोख्याची किंमत वाढेल या अपेक्षेने 'बैल'ने तो खरेदी केला असता पटावटीच्या वेळी व्यवहार पुढे ढकलण्यासाठी द्याव्या लागणाऱ्या व्याजाचा दर. – वागोकाव्याउ.
शअ. करिता; जागे; कारणे.
**बदला** पु. (अडत) आखे वजनावर चढवताना निरुपयोगी म्हणून काढलेला माल.
**बदला** वि. कमी गोलवट; चपटे किंवा थोडे लांबट आकाराचे; हलक्या जातीचे; ढबदार (मोती).
**बदलाई** स्त्री. उलटापालट. (वा.) ० **करणे, बदलाईस येणे** – १. माघार घेणे; (कर्तव्यापासून) परत फिरणे. २. प्रतिकूल होणे; (हक्क इ.) नाकबूल करणे.
**बदलाबदल–ली** स्त्री. विनिमय; अदलाबदल; उलटापालट.
**बदलामुबादला** पु. चलन, पैसे बदलणे; सराफी.
**बदलाव** पु. बदल; परिवर्तन. (झाडी) [हिं.]
**बदली** पु. स्त्री. १. बदलणे; फिरवणूक; पालट (संरक्षक, पहारा, सैन्याची तुकडी इ. चा). २. तात्पुरती सुटका करण्यासाठी दिलेला मनुष्य, टोळी. ३. बदल्या; एकाबद्दल दुसरा दिलेला मनुष्य. ४. दुसऱ्या गावी, ठिकाणी नेमणूक. ५. मोबदला; विनिमय. [हिं.]
**बदली** स्त्री. ढगाळ वातावरण; मळभ. (झाडी)
**बदलूनबदलून, अदलूनबदलून** क्रिवि. आलटून पालटून.
**बदल्याचा गाळा** बदला करून घेण्यासाठी द्यावा लागणारा फरक: 'तीन टक्क्याच्या नोटेचा बदल्याचा गाळा तीन ते चार टक्के होता.'– के २१.१.१९३६.
**बदल्याचा धंदा** एका बाजारात वायदा विकत घेऊन दुसऱ्या बाजारात तितकीच बेचाण करणे. (इं.) स्ट्रेंडल.
**बदसलूक–की** पु.स्त्री. गैरवर्तन; अन्याय. [फा.]
**बदाड** स्त्री. सखल जागा. (व.)
वि. पुष्कळ.

**बदाडणे** न. झोडपण्याचे, मारण्याचे हत्यार.

**बदाबद-दा** पहा : **बदबद-दा**

**बदाबदी** स्त्री. १. अनेकांनी एकमेकांना बुक्क्यांनी मारणे; बुकलाबुकली. २. सोंगट्यांचा, चेंडूचा एक खेळ.

**बदाम** पु. न. १. कठीण कवच असणारे एक पौष्टिक फळ व त्याचे झाड. कडवा व गोडा या दोन जाती. साल जाळून दंतमंजन करतात. तेल औषधी. २. (पत्त्यांचा खेळ) बदामाच्या आकृतीचे तांबड्या रंगाचे पान. [फा.बादाम]

**बदामपाक-रोटी** पु. स्त्री. बदाम आणि इतर मसाला घालून केलेली पौष्टिक बर्फी व तशीच रोटी.

**बदामी** वि. १. बदामासारखा (रंग). २. बदामी रंगाने रंगवलेले (वस्त्र). ३. बदामाच्या आकाराचा (पदार्थ).४.बदामाचा.

**बदामी खरवाई** (सोनारी) विशिष्ट घाट देण्यासाठी उपयोगी, गाडीच्या आखासारखी बदामी आकाराच्या टोकाची कांब.

**बदामी-म हलवा** बदाममिश्रित हलवा.

**बदी** स्त्री. १. आळ; निंदा; बदनामी; आरोप. २.कपट : 'त्याच्या मनांत बदी नाही.' - चिमा ३६. [फा.बद]

**बदी-दू** स्त्री. पु.गल्ली; जमिनीत खणून केलेला खळगा; गल.- मखेपु पृ.२८.

**ब(बु)दीक** न. १. कुणगा.(गो.) २. डोंगरी धान्ये.

**बदोडा** पु. मातीचा लेप लावलेले मडके.(झाडी)

**बद्द** क्रिवि. पूर्णपणे; अगदी; चरचरीत; थेट. [सं.बद्ध]

**बद्द** वि. १. न वाजणारा (रुपया इ.). २. निंद्य. [सं.अवद्य]

**बद्दू** वि. १. बेअब्रूचा; दुर्लौकिकाचा; वाईट. २. दुर्गंधीचा; बेचव; खराब झालेला. ३. डाग लागलेला; कलंकित. [फा.बद]

**बद्दू** वि. (अपराधामुळे, लाजेमुळे)प्रतिबंध केलेला; दाबलेला; दरारा बसलेला; वाईट मानला गेलेला. [सं.बद्ध]

**बद्ध** वि. १.बांधलेला; जखडलेला. २.(ल.) तयार; एखाद्या कामासाठी सज्ज. [सं.]

**बद्धक** पु. १. मलावरोध; बद्धकोष्ठ. २. जाचणारे कृत्य; दुष्ट कर्म.
वि. १. कोंडणारा; अडविणारा. २. त्रासदायक; उपद्रवी. ३. बद्धकोष्ठ झालेला. ४. कृपण; चिक्कू : 'न विसंबे भांडारा । बद्धकु जैसा ।' - ज्ञा १३.५०१. [सं.]

**बद्धकटाक्ष** न. १. (रोखलेली, क्रोधाची दृष्टी) कायम व प्राणांतिक वैर; हाडवैर; वैमनस्य. २. एकाग्र दृष्टी, लक्ष.
वि. असला द्वेष, असे लक्ष असणारा. [सं.]

**बद्धको(कु)ष्ठ** न. शौचाला साफ न होण्याची सवय; मलावरोध; साखळा.
वि. कोठा साफ नसलेला. [सं.]

**बद्धता** स्त्री. बंधन; बंधनात असण्याची स्थिती. [सं.]

**बद्धपद्मासन** न. आसनाचा एक प्रकार. पद्मासन घालून हात पाठीकडून फिरवून उजव्या हाताने उजव्या पायाचा व डाव्या हाताने डाव्या पायाचा अंगठा धरणे. [सं.]

**बद्धभौमिचारी** न. (नृत्य.) पोटऱ्यांचे स्वस्तिक करून उभे राहणे व मांड्या हलवणे. [सं.]

**बद्धमुष्टी** वि. १. मूठ मिटलेला. २. (ल.) कृपण; कंजूष, चिक्कू. [सं.]

**बद्धमूळ** वि. १.खोल व सुदृढ मुळे असलेला; मुळे खोल गेलेला. २. पक्का; दृढ व सुरक्षित झालेला (वृक्ष, रोग, अधिकारी). [सं.]

**बद्धान्न** न. पचायला कठीण पदार्थ (गहू, उडीद, हरभरा इ.). [सं.]

**बद्धांज(जु)ली-ळी** वि. हात जोडलेला (विनंतीसाठी, आदर दाखवण्यासाठी).
स्त्री. हात जोडण्याची क्रिया.

**बद्या, बधी, बोड्या, केडम्या** पु. बकरीएवढा लहान, ठेंगू बैल.(व.)

**बद्री** स्त्री. दगडाचे बारीक तुकडे; खडी. (झाडी)

**बध-द** पु. शरीरावरील खड्डा; खोल जखम. (अहि.)

**बधज** स्त्री. छंद:शास्त्रातील श्लोकरचनेची पद्धत.

**बधणे** अक्रि. १.मताप्रमाणे, इच्छेनुसार करणे; अनुकूल, वश होणे : 'द्यावा कुठारकल्पद्रुमसा हा वर मला बधोपाय।'- मोभीष्म १.८५. २. जुमानणे; आवरणे; ऐकणे. ३. घडणे; घडून येणे; जमणे : 'संबंध त्यासीं तुजशीं बधावा।'- सारुह ३.७. ४. पड घेणे; कचरणे. ५. बाधा होणे : 'जैसा मंत्रज्ञु न बधिजे । भूतबाधा ।'-ज्ञा २.२३४१. [सं. बध्]

**बधवणे** सक्रि. १. घडवणे; साधणे; संपादणे. २. समजावणे. ३. अनुकूल, वश करणे. ४. मालाची परीक्षा करून किंमत, भाव ठरवणे. (ना.) ५. नमवणे. (व.)

**बधा** पु. पहा : २ **बदी**

**बधाई** स्त्री. १. धन्यवाद; प्रशंसा. २. बक्षिसी; (इं.) बोनस. [सं.वृद्धि]

**बधाबधा** पु. मुलांचा एक खेळ. यात बनवलेल्या खड्ड्यात गोट्या फेकून खेळतात. (अहि.)

**बधिर** वि. १. बहिरा. २. संवेदनाशून्य; सुन्न; जड. [सं.]

**बधिरीकरणशास्त्र** न. शस्त्रक्रिया करताना भूल किती, कशी द्यावी, त्यासाठी रसायने, तंत्रे कोणती वापरावीत याचा अभ्यास करणारे शास्त्र.

**बधीया** पु. ज्वारी, बाजरी, ऊस इ. वर पडणारा रोग.

**बन** न. झाडी; जंगल; अरण्य; राई; फड; आगर.
पु. गोसाव्यांचा एक पंथ व त्यातील व्यक्ती. [सं.]

**बनई** स्त्री. निरगुडी.- राको.

**बनकटी** स्त्री. रानातील झाडांची तोडणी : 'हावभावाचां हातेरी : वैराग्य वनीची बनकटी करी'- मूप्र २१४०. [सं.वन + कर्त्]

**बनकर** पु. माळी; फुलझाडे इ. लावून त्यांची देखभाल करणारा.

**बनकरी** पु. अरण्यात राहणारा; त्यात वारंवार जाणारा; ते तोडणारा, राखणारा.

**बनकेळ** स्त्री. रानकेळ; केळीची एक जात.

**बनगत** स्त्री. १. रचना; कारागिरी. २. घडणावळ. (झाडी) [सं.बनगति]

**बनगी** स्त्री. १.(सामा.) बणगी. २. लहान फाटा. (व.)

**बनगूर** न. बाजरीची मळणी झाल्यावर उरणारी पोकळ बोंडे. (अहि.)

**बनचुका** वि. शेफारलेला; केलेल्या चुकीबद्दल काहीही न वाटणारा.

**बनछोड** पु. आंब्याची एक जात.पुणे जिल्ह्यात कडूस, धायरी येथे होतो. झाड सरळ वाढते.

**बनड** पु. लहान मुलाला आळवण्याचा शब्द. (व.,घाटी)

**बनणे** अक्रि. १. केले जाणे; घडून येणे; सिद्ध होणे; साधले, संपादले जाणे; अनुकूल होणे. २. फुरसत मिळणे. ३. (भांडण इ.) जुंपणे; पेटणे. ४. एखाद्या स्थितीत येणे; केले-उतरले जाणे, होणे. ५. लठ्ठ व बळकट होणे; द्रव्यवान, भाग्यवान होणे. ६.जुळणे; जमणे; पटणे. ७. नटणे. ८. (हमाल, गडी यांनी) खांदा बदलणे. ९. योग्य स्वरूपात, स्थितीत येणे (नोकरी, व्यापार, हाती घेतलेले काम, चालू विषय). १०.(ल.) फसणे.[हिं.बनना] **बनी बनणे** - १. सजणे. २. सज्ज; तयार होणे; कंबर कसून (कामाला) तयार असणे.

**बनतगर** स्त्री. रानतगर; तगरीची एक जात.

**बनपट्टी** स्त्री. जुवाचे लाकूड उलू वा फुटू नये म्हणून दोन ते चार ठिकाणी त्या जुवावर ठोकलेली पत्र्याची पट्टी.(खा.)

**बनबनकी लकडी** (अनेक भिन्न वनांतील लाकूड) (ल.)एकाच कामात स्वतंत्रपणे गुंतलेली भिन्न मतांची, विचारांची माणसे. [हिं.]

**बनवा** पु. १. श्रीमंत; तवानगर; दौलतमंद. २. बिछायत.

**बनवि(व)णे** सक्रि. १. सजविणे; नटविणे. २. तयार करणे; नमुनेदार घडणे, वळविणे. ३. थाटाने मांडणे, निघणे. ४. विस्ताराने, अलंकारिक व स्तुतिपर बोलणे, सांगणे; तिखटमीठ लावून सांगणे. ५. (ल.) फसवणे.

**बनशिळी** स्त्री. वाचाळ बायको.

**बनशी-सी, बन्शी** स्त्री. मुरली.

पु. कृष्ण.

वि. गव्हाची एक जात. याचा दाणा मोठा, पिवळा जर्द व तेजदार असतो. [सं.वंश, वन ]

**बनाई** स्त्री. सोयरीक.

**बनात** स्त्री. १. सकलाद; एक प्रकारचे लोकरीचे वस्त्र. २.लोकरीची बैठक : 'ईवाय पावन्यानं सारी भरली वसरी, जावईबुवांना टाका बनात दुसरी.'- लोसाको.

**बनाव** पु. १. परस्परांचा चांगला समज; ऐकमत्य; मेळ; जम; संघटितपणा; अनुकूल भाव; सख्य. २. भव्य रचना; थाटमाटाची मांडणी. ३. प्रसंग. ४. तहाचे बोलणे.५.ढोंग. [हिं.]

**बनावट, बनोट** स्त्री. १. मांडणी; रचना; घाट; बांधणी; धाटणी (इमारतीची, कवितेची इ.) : 'कवनीं ज्यांच्या बंद बनोटे ।'- ऐपो २२७. २. सूत; वीण; पोत (कापडाचा). ३. मांडण्याची पद्धत; व्यवस्था; करण्याचा अनुक्रम (काम, विधी, उत्सव यांचा). ४. बनावणी; सजवणूक; नटणे; भव्य पोशाखाने निघणे. ५. वक्तृत्वाच्या डौलाने व अलंकारिक रीतीने केलेले कथन. ६. (ल.)कुभांड; थोतांड; कृत्रिम, बनावट गोष्ट. [हिं.]

**बनावट, बनीव** वि. १. खोटी सही करून, खोटी मोहर लावून, लबाडीने फेरफार करून इ. केलेला (लेखी मजकूर). २. रचलेला; केलेला; घडवलला. ३. खोटी, रचलेली, पदरची (गोष्ट). ४. कृत्रिम; नकली. ५. थाटलेला; नटलेला. ६. अलंकारिक, भारदस्त भाषेने व मोहक अभिनयाने अलंकृत (दंतकथा, व्याख्या, निवेदन, भाषण).

**बनावणी** स्त्री. बनवण्याची क्रिया; अलंकृत, सुघटित करणे.

**बनासकुपी** पु. भाताचे एक वाण. (झाडी)

**बनियन,बन्यान** पु. जाकीट; कबजा; घामोळे; बिनबाह्यांचा गंजिफ्रॉक. [सं.वणिक्; म. वाणी; गु. बनिया. हे वापरतात त्यावरून]

**बनिया** पु. व्यापारी; हिशेबी वृत्तीचा माणूस. [गु.]

**बनिस्ती** स्त्री. १. बंदिस्ती; सुव्यवस्था. (गो.) २. (निंदार्थी) निकाल; मोक्ष.

**बनेटी** स्त्री. दोन्ही टोकांना चिंध्यांचे बोळे पेटवून खेळण्याची काठी; बंधाटी. [हिं.]

**बनेल** वि. १. स्वयंसिद्ध; उघड; स्पष्ट; कायम टिकणारा. (ना.) २.ढोंगी.

**बनेल-ळ** स्त्री. जंगली केळ. [सं.वन]

**बनोसी-से** वि. फिक्क्या डाळिंबी रंगाचे (पागोटे).

**बन्नाखाली बसून सांगणे** शपथपूर्वक, ईश्वरसाक्ष सांगणे.(ना.)

**बन्नावणे** सक्रि. मारणे. (व.) [हिं.बनाना]

**बन्नी-नी** पु. वर्षभर टिकणारा कापूस.- कृषि ३८४.

**बन्नी** पु. शमीचे झाड. (कर्ना.)

**बन्नूसी** वि. (विणकाम) लुगड्याच्या किनारीचा एक प्रकार. वहीतील तीन ताणे जांभळे व एक पांढरा असे उभार व एक पांढरा व तीन ताणे तांबडे अशी आडवण या प्रकारची परतनी (किनार).

**बन्नोट** पु. कारागीर; कलाकार. (व.)

**बन्हाटी** स्त्री. लांब व सरळ अशा झाडाच्या ओल्या काड्या.(अहि.)

**बन्सी** पहा : **बनशी**

**बपरना** क्रि. रागावणे. (झाडी) [हिं.]

**बप्पय** पु. चातक पक्षी.

**बफर** स्त्री. (अभियांत्रिकी) दोन वस्तूंचा एकमेकांवर होणारा आघात सहन करण्यासाठी केलेली व्यवस्था. त्यामुळे दोन्ही वस्तूंची झीज होत नाही.

**बफान्या** स्त्री. अव. बढाया; खोट्या गप्पा. (अहि.)

**बफावणे** अक्रि. चिडणे; रागावणे. (व.)

**बबडवणे** अक्रि. अतिशय मारणे; मार-मार मारणे. (कर.)

**बबब** उद्गा. अबब; चमत्कारासंबंधी उद्गारवाचक शब्द. [ध्व.]

**बबरची-जी, बबर्जी** पु. आचारी; स्वयंपाकी (विशेषत:) मांसाचे पदार्थ बनवणारा; (इं.) बट्लर. [फा. बावर्ची]

**बबी** पु. स्त्री. लहान मुलगा-गी. [इं.बेबी]

**बब्बेल** न. बिब्याचे तेल. (गो.)

**बभुत, बिभूती** स्त्री. विभूती; भस्म. [सं.;हिं.विभूति]

**बभ्रा** पु. १. गवगवा; बोभाटा; गुप्त गोष्टीची प्रसिद्धी; स्फोट. २.उपहास; दुर्लौकिक.

**ब(बो)म** वि. पूर्ण; काठोकाठ; गच्च. (अहि.; झाडी)

**बमकाडनं** सक्रि. चोप देणे; मारणे; ठोकणे. (अहि.)

**बमठस्** वि. मूर्ख; अक्कलशून्य; मूढ. (ना.;व.)

**बम्मे** वि. पुष्कळ. (व.)

**बय** स्त्री. आजी. (व.;खा.)

**बयकनं** अक्रि. सुधारणे; बळावणे; प्रगती होणे. (अहि.)

**बयकू** पु. बोळके. (व.)

**बयगन्या** वि. नेभळट; बावळट; मूर्ख.(व.)

**बयचांदी** स्त्री. एक औषधी कंद. (झाडी)

**बयतन** न. सरपण; जळण.(व.;खा.)

**बयते-त्या** (को.) पहा : **बलुते-त्या**

**बयद** स्त्री. १. भुयार; लादणी. (व.) २. धान्याचे भिंतीतील कोठार. (अहि.)

**बयद** पु. लुटारू. (तंजा.)

**बयनं** क्रि. १. जळणे : 'मोठं मन्हं घर दिवा बये मशालीना...'- लोसाको. २. झाड न जगणे,त्याची खाक होणे. ३. मत्सर करणे. (खा.) [सं.ज्वल्;गु.बळंवु]

**बया** पु. एक पक्षी.

**बया, बयाड** वि. वेडा. (झाडी) [सं. बधिर]

**बया** स्त्री. १. आई, प्रौढ बाई यांना आदराने हाक मारण्याचा शब्द : 'आई आई बयाबया म्हणती ।' - नव १०.९२. २. (लाडिकपणाने) लहान मुलगी. ३. धिंडका; आकाबाई.

**बयाज** पु. सविस्तर हकिकत; तपशील : 'यांचा बयाज सबनिसांनी बोलून त्याहावा.'- वाडबाबा १.१८१. [फा.]

**बयाणा-णो-ना** पु. १. सचकार; विसार; आगाऊ दिलेला पैसा. २. निवेदन; हकिकत; खरी गोष्ट सांगणे. ३. सबब; समजुतीसाठी सांगितलेली कंटाळवाणी गोष्ट. (क्रि. वाचणे, सांगणे). ४. राजेरजवाडे थाटाने चालले असताना त्यांच्या पुढे चोपदारांनी म्हणण्याचे स्तुतिपर वाक्य. ५. उखाणा. (चि.;कु.)[फा.बयान; अर. बैआन] (वा.) ० **बांधणे** - विक्रीच्या जिन्नसांवर (मुख्यत्वे दागिने इ. वर) आपली मोहोर, शिक्का उठवणे, करणे. (मोहोर करणाऱ्याने दिलेल्या किमतीपेक्षा जास्त किंमत दुसरीकडे न मिळाल्यास ते त्यालाच द्यायचे अशा खुणेकरता).

**बयाद-ज, बयावल** पु. स्त्री.न. १. तपशीलवार हकिकत. २. सबब; निमित्त; आक्षेप. [अर.बयाज]

**बयादखोर** वि. कंटाळवाण्या पुनरावृत्तीची, रटाळ स्पष्टीकरणाची खोड, सवय असणारा; दीर्घसूत्री; सबबी सांगणारा.

**बयादवार** क्रिवि. तपशीलवार; सविस्तर; व्यवस्थित.

**बयान-ण** पु. १. पहा : **बयाज.** २. वर्णन; तारीफ : 'रावजी शेवटचे ऐसे जे जाले त्यांचा बयान काय लिहू?' - मइसा १०. १३९. ३. जबानी; म्हणणे. (ना.) ४. संभव. (झाडी) [अर.बयान]

**बर** स्त्री. बरगडी. (गो.) - ख्रिपु.

**बर** पु. स्त्री. न. पूयप्रधान द्रव; रक्तमिश्रित पू.

**बरईक** स्त्री. चांगले नाव; कीर्ती.

**बरक** न. मेंढ्यांची लोकर आणि बोकडाचे केस यांच्या मिश्रणापासून विणलेले वस्त्र. अधिक बारीक व तलमदार बरकाला कुर्क म्हणतात.

**बरकण-कन-दिनी-दिशी** पहा : **बदकन** इ.

**बरकणी-ता,बरकीण** स्त्री. एक प्रकारची लहान होडी; क्रीडानौका. [पोर्तु.बरकिन्हा, बरकेता]

**बरक(ख)त, बर्कत** स्त्री. १. सिद्धी; यश; सुपरिणाम; लाभ. २. यशस्विता; भरभराट; भाग्यशालित्व. ३. कल्पनेपेक्षा अधिक नफा, प्राप्ती, फायदा. ४. कोणतीही गोष्ट मापताना एक या संख्येसाठी मंगलार्थ उच्चारतात; लाभ. ५. तिजोरीतून सर्व पैसे काढून न घेता शिल्लक ठेवलेले धन. ( अहि.)[सं.भृ,भर; अर. बरकत] (वा.) ० **सोडणे** - (शेताने) आपला सुपीकपणा गमावणे, टाकणे.

**बरकता-त्या, बरखत्या-ट्या** पु. भाताची पेंढी बांधण्यासाठी भात्याणाचा, गवताचा केलेला बंद, दोर. (को.)

**बरकशी-सी, बर्कशी** स्त्री. १. स्पर्धा; चढाओढ; भांडण. २. आकस; चुरस; वैर; शत्रुत्व :'माझ्या घरच्याची तुझी आधींच किरे बरकशी।'- राला ६३. ३. मनस्ताप. (तंजा.) [फा. बर्‌आकस]

**बरकंदाज, बर्कंदाज** पु. बंदूकवाला शिपाई; बंदुकीने नेम मारणारा, गोळीबार करणारा इसम. [फा.बर्कअंदाज]

**बरकंदाजी** स्त्री. तोड्याची बंदूक सोडणे; निशाण मारणे; गोळ्यांचा भडिमार. [फा.]

**बरका** वि. १. मऊ; बिलबिलीत; घट्ट नसलेला ( एक प्रकारचा फणस, त्याचे झाड, फळ व गरा); बरकय (गो.). २. पिठूळ चिभूड.[क.बक्के]

**बरका** पु. कफ; बेडका. (कु.)

**बरकाळी** स्त्री. धांदोटी; चिंधी; धुडका.

**बरखा-खी** पु. स्त्री. गोवारी; गोवारीण; गवळी.

**बरखाड** स्त्री. न्यूनता; वाण. (व.)

**बरखा(का)स-स्त, बर्खास्त-स** वि. विसर्जित; उठलेली, मोडलेली, समाप्त झालेली (सभा, कचेरी इ.). [फा.बरखास्त]

**बरखुरदार, बर्खुर्दार** वि. १. फळ खाणारा; उपभोक्ता. २. चिरंजीवी. - राव्यको ८.४५. [फा.बर्खुर्दार]

**बरग** पु. न. एक धान्य; ज्वारी, बाजरी, नाचणी इत्यादींचे बीज : 'बरगासाठीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ।'- तुगा ३११९. पु. १.(ल.) केसांमध्ये गोचिड्या, उवा पडणारा, गुरांना होणारा मसुऱ्या रोग; गोचीड; ऊ : 'बरग पडोनि मेलीं गुरें ।'- भवि ४९.९३.२. लाकडाचा भुसा करणारा कीटक. (गो.)

न. १. न कुजलेले लाकूड. (गो.) २. दुष्काळ; अवर्षण : 'बरग पडिलें कव्हणी एकीं वरुषीं ।- भाए ४२०.

**बरगडी-डा-ळा** स्त्री. पु. फासळी; छातीचे हाड.[फा.बरकी] (वा.) **बरगड्या-डे-ळे मोडणे** - १. अतिश्रम करणे; अतिश्रमाने दमणे, थकणे. २. नम्र, विनीत, नरम करणे; खोडकी जिरवणे; अभिमान उतरवणे (हाडे घुसळून, यथेच्छ ठोकून).

**बरगण** स्त्री. नुकसान; तोटा. (व.)

**बर(रं)गळ** वि. दूरदूर; विरळ; सैल विणीचा (कपडा, चटई, वीण, दात, ओळ).

**बर(रं)गळणे** अक्रि. १. विरळ विणीचा, रचनेचा, ठेवणीचा होणे (कपडा, दात इ.). २. बहकणे; विसंगत बोलणे.३. उत्कंठित, अधीर होणे. ४. (प्राय: बारगळणे) भडकणे. [सं.भ्रम + गल्]

**बरगळभूत, बरगळले-गळेल,बरगेल-ळ भूत** भुकेले माणूस; भुकेने, उत्कंठेने कावराबावरा, उतावळा झालेला मनुष्य.

**बरगा** पु. १.इमारती लाकडाचा चौकोनी तुकडा; दोन तुळ्यांवरील आडवी कडी, वासा इ. २. भिंतीत बसवलेला खांब. [हिं.]

**बरची-छी-शी,बर्ची-र्छी-र्शी, बर्चा** स्त्री. पु. एक प्रकारचा लहान

भाला; अंकुश. डोक्यापेक्षा जास्त उंचीचे, लोखंडी दांड्याचे व शेवटी त्रिधारी गुप्तीप्रमाणे केलेले भोसकण्याचे शस्त्र. [हिं. बरछी]

**बरज** (राजा.) पहा : **बरग**

**बरजोर** पहा : **बळजोर** इ.

**बरट–टा** पु. चिखल : 'मग दु:खाचेन बरटें बोंबले ।'–माज्ञा ७.८८. (वा.) ० **वोबळणे** – सारवणे.

**बरटी–ड** स्त्री. पु. भातशेतातील एक तृणधान्य; पांढरे, बारीक वरी, राळ्यासारखे असणारे धान्य. याचे कणीस नागलीसारखे असते.

**बरड–डा–डी, बरडखरड** स्त्री. १. माळजमीन; भरड. २. भाताचे आवण काढल्यावर पुन्हा आवणासाठी दुसऱ्या वर्षापर्यंत पडीत टाकलेली जमीन.

वि. १. आत मुरूम, गोटा, वाळू व तांबडी माती असणारी; ओसाड; नापीक; निकस (जमीन). २. भाकड : 'कीं कामधेनु पय:पान । बरड गायीस मागतसे ।'– भवि १०.१२२. ३. ओबडधोबड; खडबडीत : 'कीं बरड गोटे चिंतामण । परी अभंग जाहले कीं।'– भवि १०.५.४. (ल.) देवीचे वण असलेला (चेहरा). [त.बरडु]

**बरड** पु. धान्य, लाकूड वाया घालवणारा, खराब करणारा किडा.

**बरडगोटे** पु. अव. द्रवरहित गारा. (तंजा.)

**बरडणे** अक्रि. १. (धान्य, लाकूड इ.) किडणे; पोखरले जाणे. २. देवीचे वण, खळ्या पडणे.

**बरड बोंबल्या** वि. गुप्त ठेवण्याची गोष्ट सांगत सुटणारा; बोंबाबोंब करणारा. (व.)

**बरडा** पु. १.उवेचे अंडे; लिखा. (व.;कु.) २. खडा. (तंजा.)

**बरडा–डी सुपारी** जून पोफळे शिजवून, वाळवून तयार केलेली सुपारी.

**बरडेल** न. वडे तळून राहिलेले तेल. (वा.) ० **काढणे** – मारणे.

**बरणी** स्त्री. चिनी मातीचा लांबट घट, उभट भांडे.

**बरताव** पु. स्वभाव; वागणूक. (व.) [फा.बतवि]

**बरतावा** पु. कारभार; कारकीर्द. (व.) [हिं.]

**ब(बा)रदार, बर्दार** वि. वाहणारा; नेणारा. मुख्यत्वे हिंदी व फार्शी शब्दांशी फक्त समासात प्रयोग. उदा. बेले बरदार, शिर्के बरदार, निशाण बरदार (निशाण नेणारा). [फा.]

**बरदास्त, बर्दास्त** स्त्री. पहा : **बडदास्त**

वि. सह्य; खपण्याजोगे. [फा.बर्दाश्त]

**बरप** क्रि. लिहिणे.(गो.) [क.बरिदु]

**बरपी** पु. लेखक; लिहिणारा. (गो.)

**बरबट** पु. न. १. आंबे, चिंचा इ. कोळून दाट केलेले पाणी, ताक इ. आंबट पाणी; पन्हे; रायते. (व.) २. बकऱ्याच्या मांसाचा रस्सा, सांभारे. ३. चिखल : 'मग दु:खाचेनि बरबटें बोंबले ।'– ज्ञा ७.८८.

**बरबटणे** अक्रि. बरबट, चिखल इ. नी माखले जाणे.

सक्रि. शेणाने, मातीने सारवणे. (ना.) [सं.पर्पटी]

**बरबटी** स्त्री. चवळीच्या शेंगेसारखी एक शेंगांची जात. (व.)

**बरबडा–डी–डे** पु.स्त्री.न. एक जंगली झाड व त्याचे बी; एक तृणधान्य व त्याचे गवत. याच्या बियांची भाकरी होते.

**बरबर–रा** क्रिवि. निचरेल, वाहेल, गळेल, स्रवेल अशा रीतीने. (क्रि. वाहणे, चालणे, शिंकरणे).

**बरबरणे** अक्रि. १.पूमय होणे; पू, रक्त गळत असणे (क्षते, फोड इ. तून); शेंबूड गळणे. २. अति पिकल्याने किंवा कुजण्याने स्रवणारे, पचपचीत होणे (लिंबू, फणस इ.). [ध्व.]

**बरबरीत** वि. १. गलगलीत; बिलबिलीत; स्रवणारे; मऊ (पातळ शेण, चिखल, नासके फळ). २. बरबरलेले; शेंबूड गळणारे (नाक). ३. लाळ,रक्त इ. गळणारे (तोंड, क्षत).

**बरबाद, बर्बाद** वि. १. बिघडलेले; नाश पावलेले; नष्ट; ओसाड; वाताहत झालेले. २.रद्द, बंद केलेला : 'पुढील तहनामा झाल्यानंतर मागील तहनामा बर्बाद होतो.'– मइसा ७३. [फा. बर्बाद]

**बरमदंडा** पु. काटेचुबक; एक काटेरी झुडूप. [सं.ब्रह्मदंड]

**बरमा–म्हा, बर्मा** पु. १. दोरीने ओढून फिरवून भोक पाडण्याचे यंत्र; सामता; वेधन; गिरमिट.२.दारूच्या बाणाचे तोंडाकडील भोक. [फा.]

**बरमुडा** पु. गुडघ्याच्या थोडी खाली येणारी पँट. [इं.]

**बरव** स्त्री. शोभा : 'जैशी नाकेवीण बरव । कां शिरेंवीण अवयव ।'– एभा १४.२५७. [सं. वरम्; म. बरवा]

**बरव(वं)ट–टा, बरंवटा** वि. १. गोजिरवाणे; सुंदर; चांगले; देखणे; सुरेख; उत्कृष्ट; उत्तम : 'ठाइं ठाइं बरवट । निवृत्त मंडीत घाट ।'– ऋ १८. २.(ल.) पतिव्रता; अव्यभिचारी : 'आम्ही गौळणी बरवंटा । जातो मथुरेच्या हाटा ।'– होला ९.

**बरवणे** अक्रि. शोभणे : 'प्रतिबिंब किंवा अनुमापक । तैसें द्वैतमिसें येक बरवतसे ।'– अमृ १.२६.

**बरवते** वि. दिसायला बरे : 'बरवते आहाति ।'– ज्ञा ११.४५३.

**बरवा** वि. १. चांगला; छानदार. २. सुंदर; नामी; निवडक इ. ३. अनुकूल; भरभराटीचा.

**बरवा** पु. स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय सर्व काळ.

**बरवाळणे** अक्रि. फिरणे : 'सज्जूनि आपुलाले भार । बरवाळले संग्रामा ।' – मुआदि २३.११७.

**बरस** वि. टाकाऊ; निरुपयोगी.

**बरसकाळा** पु. पावसाळा. (ना.) [सं.वर्षाकाल]

**बरस(सा)न** न. १. मस्तकातील थंडी; शैत्य; पडसे. २. पडशामुळे नाक गळणे. [सं.वर्षण]

**बरसात** स्त्री. १. पावसाळा. २. वर्षाव; वृष्टी. ३. घोड्याला होणारा शैत्य रोग; घोड्याच्या चार खवाट्यांवर होणारे दर्द. – अश्वप २.२४०. ४. (पावसाळ्यात) घोड्याच्या डोळ्यांच्या संरक्षणासाठी केलेली कातडी झापड, पडदा. [सं.वर्षर्तु, वृष्]

**बरसाती–दी डगला** पावसाळ्यात पोशाखावर वापरण्याचा डगला. (इं.) रेनकोट.

**बरहुकूम** क्रिवि. आज्ञेप्रमाणे; सांगितल्याप्रमाणे. [फा.बरहुक्म]

**बरळ** न. भरड दळलेले पीठ.

वि. १. विरळ विणीचा; अतिशय जाडा भरडा (कपडा). २. भरड दळलेले (धान्याचे पीठ).

**बरळ** स्त्री. १. विसंगत भाषण (झोप, ताप, दारूची नशा यांत). २.निरर्थक बडबड; वटवट; जल्पना.
वि. १.मूर्खपणाने,असंबद्ध बोलणारा; भ्रमिष्ट. २. भटकणारा; छांदिष्ट. ३. भ्रांत : 'जीव आधींचि समळ। वरि विषये-संगें होति बरळ।'- भाए ६२१. [ध्व.;सं. प्र + लप्]

**बरळणी** स्त्री. (झोपेतील) बडबड.

**बरळणे** अक्रि. १. (झोपेत, तापात, नशेत) भलभलते,असंबद्ध बोलणे. २. बडबडणे; चावळणे. ३.स्वच्छंद फिरणे; भटकणे; भलत्या मार्गाला लागणे, जाणे : 'इंद्रियें बरळों नेदावीं।' - ज्ञा ३.११६. ४.बाजूला सरणे. ५.चाचरणे; मंत्र म्हणताना चुकणे : 'देखा मंत्रज्ञु बरळु जाय।'- ज्ञा १.१९०.

**बरं माठं** वि. अयोग्य; कसेतरीच; घाईने उरकलेले. (अहि.)

**बरा** पु. कोवळा दुंबा; लठ्ठ शेपटीचा मेंढा.

**बरा** वि. १. चांगला; गुणी; मध्यम वर्गाचा; चालण्याजोगा; योग्य. २.चांगले आरोग्य असलेला; निरोगी. ३. सुमाराचा; बराच; पुरेसा. ४. (ल.) शहाणा : 'केवळ बाळचि इच्छी विधुसि धरायासि कां बरा इच्छी ।'- मोउद्योग १०.३.
क्रिवि. १. वेळेवर; वक्तशीर. २. चांगल्या, नीट रीतीने: 'देव म्हणे बैस बरा।' - मोभीष्म ४.१९.[सं.वरम्] (वा.) ० **घेणे** - चांगल्या तऱ्हेने, खूप देणे (मार, ठपका इ.); खरडपट्टी काढणे. **बऱ्यावर असणे** - एखाद्याचे चांगले इच्छिणे. **बऱ्याशा झाडाची साल काढून ऱ्हावप** - चांगल्या माणसाच्या आधाराने राहणे.(गो.)

**बराक** स्त्री. चाळ; खोल्यांची रांग; छावणी. [इं. बरॅक]

**बराकिण** न. एक प्रकारचे गलबत.

**बराड** वि. बिनडोक्याची(चूक, खिळा).

**बराडणे** अक्रि.फार आशावंत होणे. (तंजा.)

**बराडी** वि. १. खादाड: 'जाला बराडी देवराव'- नाम १४४९. २. हावरा; आशाळभूत 'कृपा कराल ते थोडी । पायां पडिलों बराडी ।' - तुगा ५५१.

**बराडी** स्त्री. ताग काढून घेतलेली काडी; सणकाडी.(व.)

**बराडी** स्त्री. माची; मेटे : 'पायेचे माणूस. सोभागसिंग घेऊन किल्ल्याचे बराडीस जाऊन तीतर्फा मोर्चेबंदी केली.'- पेद २८.१२.

**बराडोल** पु. भोक पाडण्याचे हत्यार.- राको.

**बरात** पु. १. चंगकांचनी नावाच्या गंजिफाच्या खेळातील तिसरा रंग.
स्त्री. १. खजिन्यातील पैशाची मागणी; हुंडी. २.(चुकीने) लग्नाची वरात. [फा.बरात]

**बराद** स्त्री. पत्त्यांचा संच. (गो.) [पोर्तु. बराथो]

**बरामद** स्त्री. १. व्यवस्था; निकाल : 'कामाची बरामद होईल.'- मइसा १०.१८३. २. निर्गत मालावरील जकात. [फा.]
वि. १. आलेला; आगत : 'मागती नबाब बरामद होऊन इंग्रजी सहा सर्दार यांची मुलाजमत झाली.'- मइसा ५.१४१. २. अधिष्ठित : 'कुर्सीवर नबाब बरामद जाले.'- मइसा ७.८४. [फा.]

**बरावर्द** स्त्री. १. अंकगणिताच्या सरणीने बेरीज इ. करणे प्रत्येकी. २. कचेरीतील कारकून इ. च्या पगारांचा तक्ता. ३. सरासरी, कमी-जास्तपणाची.

**बरास** न. १. शंभर चौरस फूट अथवा दहा फूट लांब व दहा फूट रुंद जागा. (व.) २. शंभर घनफूट. ३. पंचवीस घनहात. (गो.) [पोर्तु.]

**बरासकापूर** पु. कापराची एक जात.- मुंव्या १५५.

**बरी** स्त्री. अंगरख्याच्या घोळाची एक बाजू होणाऱ्या दोन तिकोनी तुकड्यांपैकी पुढचा तुकडा; पेषकळी : 'भवताले घोंस जरीचे । सारे पडदे एक बरीचे ।' - प्रला १६६.

**बरी** पु. उडदाचा वडा वगैरे. (माळवी)

**बरी-रै** स्त्री. धन,माल वाहून नेणारी सांडणी : 'दुसाचीया सामग्रीया अपार: घालिती बरियांवरी'- नरुस्व १३९२; 'चोडा रायाचीया बरै बैसलीयां'- लीचपू ५४८.

**बरीक** क्रिवि. वाक्यालंकारार्थी प्रयोग. जेव्हा सजातीय पदार्थसमुदायातून विवक्षित गुणांचा एकच पदार्थ अपेक्षित असतो, तेव्हा उपयोगात आणतात. मात्र; तेवढा; सत्यत:; खात्रीने; वास्तविक; तत्त्वत:; गृहीत धरून; अंगीकार करून; परंतु : 'तद्रीति सम कवि म्हणो ग्रामहरीच्या बरीक रीतीतें।'- मोसमा ५.३१.

**बरू** पु. बोरू; तृणविशेष; ज्याची लेखणी करतात असे ताट: 'नाना देसीचे बरू आणावे।'- दास १९.१.१६. [प्रा. बरुअ]

**बरोद** पु. तुळईवर ठेवण्याची लाकडी कडी : 'यांत फरशा बरोदावर ठेवतात.'- मॅरट ५६.

**बरो(रा)बर** वि. १. सम; तुल्य; सारखा; समान. २. अचूक; तंतोतंत; कमी-जास्त नसलेला (हिशेब, हकिकत). ३. योग्य; न्याय्य; रास्त; चांगला. ४. सपाट; सारखा; सम; सरळ. ५. नियमित; व्यवस्थित; यथायोग्य.
क्रिवि. १. समवेत; मिळून; एकाच वेळी. २. समान पातळीत; तंतोतंत. ३. नीटपणाने; नेमक्या रीतीने. [फा.बराबर]

**बरोबर(री)चा** वि. १. सारखा; सम; तोलाचा. २. एकाच वेळेचा, पदवीचा. ३. सोबतीचा; संगतीचा; सांगाती.

**बरोबरी** स्त्री. १. समता; सारखेपणा. २.(बुद्धिबळाचा खेळ) एका बाजूची दुसऱ्या बाजूवर मात होणे ; (कोणत्याही खेळात) एका बाजूसारखा दुसऱ्या बाजूचा डाव होणे. ३. नियमितपणा. ४. (व्यापारातील नफ्यातोट्याची वगैरे) समानता. ५. तुलना; स्पर्धा. [फा.बराबरी]

**बरोबरीचा होणे** अक्रि. १. साफ जाणे; पूर्णपणे संपणे, व्यय होणे. २. चिरडले जाणे; चुराडा, तुकडे-तुकडे होणे; उद्ध्वस्त,नष्ट होणे.

**बरौंचे** क्रि. लिहिणे. (गो.) पहा : **बरप**

**बर्करार-री** पु.स्त्री. निश्चितपणा; कायमपणा : 'बर्करारीचीं वचनें शिवाजीमहाराजांस सांगावीं.'- चित्रगुप्त ९. [फा.]

**बर्का** पु. हरळीसारखें गवत. (वाई) - मसाप ३.३.
वि. रसाळ (फणस).

**बर्खास** क्रिवि १. खास; स्वत:ची. २. मुद्दाम :'बर्खास चिठ्ठी घेऊन पाठविली पाहिजे.'- मइसा १०.४२२. [फा.]

**बर्गा** पु. लुटारू; गनीम: 'बर्गे लोकांची चाल लढण्यास तोंड द्यावें...'- भाब १०९.

**बर्गेवचे** अक्रि. लाकडाचा भुगा होणे. (गो.)
**बर्चा** पु. भाला. [हिं.;पं.]
**बर्जा** वि. मान्य; योग्य : 'दुतर्फा दोस्ती चालावी हें बर्जा.'- मइसा १०.१२८. [फा.]
**बर्जेस** पु. (छापखाना) बारीक टाईप. हा टिपांच्या उपयोगी असतो. [इं.]
**बर्तर** वि. श्रेष्ठ; उच्चतर : 'पादशाही हुकूम बर्तर म्हणोन.'- चित्रगुप्त ७०. [फा.]
**बर्ताव-वा** पु. वागणूक; चाल; रीत; पद्धत.(व.) [हिं.]
**बर्थ** पु. आगगाडीतील बाक (झोपण्यासाठी विशेषत:). [इं.]
**बर्निश** पु. (सोनारी) भांड्यावर पॉलिश करण्याचा गोल रंधा. [इं.]
**बर्पा** क्रिवि. उभा; सुरू असलेला : 'हंगामा बर्पा केला.'- ऐलेसं ७.३५६७.
**बर्फ** न. १. निसर्गत: किंवा कृत्रिम रीतीने थिजलेले पाणी. २. हिम; नीहार. ३.(ल.) त्वचेवर उठलेल्या बारीक पुटकुळ्या; मसुऱ्या; पुरळ. ४. दाट उगवणारे गवत, झाडपाला, केस इ. [फा.]
**बर्फदाणी** स्त्री. बर्फ ठेवण्याची पेटी.
**बर्फी** स्त्री. १. निसर्गजन्य बर्फाची वडी. २. मिठाईचा एक प्रकार. [फा.]
**बर्फी चुरमा** तळलेले रव्याचे मुठे पाट्यावर वाटून भुगा करून त्यात तूप, साखर, खवा व बदाम, पिस्ते इ. घालून त्याचे कापून बर्फीप्रमाणे केलेले तुकडे - गृशि १.४४३.
**बर्बटाण** स्त्री. उग्र वास. (गो.)
**बर्बर** पु. मुसलमानांतील एक जात व त्या जातीतील व्यक्ती.
**बऱ्या बोलाने, वाजीने** क्रिवि. गोडीगुलाबीने.
**बर्ल-ल्ल** न. १. भुईनळा. (गो.) २. पीप. ३. शिरी. (बे.)
वि. (निंदार्थी) अतिशय दारू पिणारा. [पोर्तु.बॅरील]
**बर्सी** स्त्री. सुरी.(झाडी) [फा.बरची]
**बऱ्हाड** वि. १.सामान्य; गरीब. २.वाह्यात. (व.)
**बऱ्हाणपुरी** वि. बऱ्हाणपूर शहरचे (कापडे, जरतार इ.).
**बऱ्हाना-नी** वि. मूर्ख; बावळट; वेडा; अव्यवहारी.(अहि.)
**बर्हि** न. मोर; मयूर. [सं.]
**बर्हि** न. दर्भ; दर्भमुष्टी. श्रौत व स्मार्त यागांत दर्भमुष्टी पसरून त्यावर हवनीय द्रव्य ठेवतात. [सं.]
**बल-ळ** न. १. सामर्थ्य; जोर; शक्ती; कुवत; क्षमता. २.सैन्य; फौज; दल-ळ : 'त्यावरि दुर्योधन बल पंचविस सहस्र पाठवी राजा।'- मोभीष्म ५.११. ३. (ल.) शब्दाला, मताला असणारे महत्त्व. [सं.]
**बलक-ब** पु. १. चीक; चिकट पदार्थ (अंडे इ.तील). २. गूळ इ.चा द्रव. ३. मगज; गीर. [हिं.]
**बलक** वि. क्रिवि. (ग्राम्य) थोर; मोठा; पूर्ण; चरचरीत; तब्बल; जबर; बळकट; बद्द (कोस, मजल, माप, ओझे, शेर इ.).
**बलका** पु. घास; एकावेळी तोंडात मावेल इतका अन्नपदार्थ. (अहि.)
**बलकाव** न.१. सोपा.(गो.) २. घरापुढील दारासमोर दोन्ही बाजूला बसण्यासाठी केलेली उंच जागा, कट्टा. [पोर्तु.]
**बलकी** स्त्री. खांबाच्या कोपऱ्यावरची खोबण किंवा त्यावर कोरलेली पन्हळ.
**बलकुबल-ळ** स्त्री. धोक्याचा व अडचणीचा काळ, संकटसमय; परीक्षेची वेळ.
क्रिवि. धोक्याच्या, अडचणीच्या वेळी.
**बलग(गा)ट** न. आरोप; बालंट; किटाळ; संकट. (चि.)
**बलगम** पु. (युनानी वैद्यक) कफ.
**बलगी,रणबलगी** स्त्री. एक वाद्य. - शिदि ५७.
**बलछडा** पु. १. लाकडाचा जाड व लांब वासा (शिडी इ.साठी). २. भाल्याचा दांडा. ३.(ल.) भाला.
**बलठा** पु. बळ; शक्ती.
वि. बळकट; सशक्त; बलाढ्य.
**बलडं** न. टेकडी; डोंगर.
वि. डोंगराळ भागाची, खडकाळ (जमीन). (अहि.)
**बलडी** स्त्री. लहान फाटा. (व.)
**बलदंड** वि. मजबूत; बळकट.
**बलफल** पु. नेट; जोर :'परंतु आली महमदखान वगैरे पठाणांहि बलफल धरला.'- पेद २१.३१.
**बलबल, बलबलपुरी** पहा : **बजबज, बजबजपुरी**
**बलबलीत** वि. मऊ; दबणारे; बिलबिलीत; गिजगिजीत व चिघळणारे (फळ इ.). [ध्व.]
**बलबाड** न.सामानसुमान.
**बल(ल्ल)म** पु. आखूड भाला.
**बलवत्तर, बलोत्तर** वि. अतिशय बळकट; मजबूत; समर्थ; शक्त; बलाढ्य. [माणूस; दैव; वेळ; परिस्थिती]
**बलवरुता** स्त्री. बलवत्तता; जबरदस्ती; बळकटी : 'शिंदे यांचीं पत्रें आलीं त्यांत अती बलवरुता होळकराची लिहिली आहे.'- ऐलेसं ८३०१.
**बलवा** पु. १. गलबला; दंगल; तंटा; तक्रार; बंड. २.(ल.) कुप्रसिद्धी. ३. (काम, हिशेब, व्यवहार यांची) अव्यवस्था. ४. उपद्रव. [हिं.]
**बल(ळ)वान-वंत** वि. शक्तिशाली; बळकट; सशक्त.
**बलवान ग्रह** (फ.ज्यो.) जन्मकुंडलीत पहिल्या, चौथ्या, सातव्या व दहाव्या राशीत असलेला किंवा पंचम व नवम या दोन त्रिकोणस्थानात असणारा ग्रह.
**बलवार** पु. छप्परबंदांची जात व त्यातील व्यक्ती.
**बलसमीकरण** न. एकक बल = एकक वस्तुमान x एकक त्वरण.
**बलहा** स्त्री. घाई. (व.)
**बलहीन** वि. (फ.ज्यो.) जन्मकुंडलीत ६,८,१२ व्या स्थानी असलेला ग्रह.
**बलक्ष** पु.शुद्ध पक्ष. [सं.]
**बलक्षय-क्षयवात** पु. शक्तिपात करणाऱ्या वातविकाराच्या क्षोम [सं.]
**बला** स्त्री. भिस्त; आधार : 'पक्षकाराची बला वकिलावर.'- मौज अं.३ (१९३५). [सं.बल]
**बला,बलाई-य** स्त्री. १. संकट; इडापिडा, त्रास; दु:ख; पीडा. २. आळ; बालंट; आरोप. [अर.बला]
**बलागत** पहा : **बलामत**

**बलाग(गी)र होणे** सरशी होणे.
**बला-च्या घेणे** इडापिडा घालवण्यासाठी बोटे मोडून दृष्ट काढणे.
**बला(लां)ट-ड** पहा : **बालंट**
**बला(ळा)ढ्य** वि. बलवान; सशक्त [सं.]
**बला(ल्हा)णी, बलावणी** स्त्री. १. देवळाच्या गाभाऱ्याच्या, सभामंडपाच्या भिंतीला लागून असलेला ओटा : 'वरी बलाणी इंद्रनीळाची।'- कथा ४.१८.२१६. (राजा.) २. रहाटगाडगे फिरवणाराची बसण्याची जागा. (को.) [दे.]
**बलात्कार** पु. १. जबरदस्ती; जुलूम. २. बळजबरीने केलेला लैंगिक अत्याचार. [सं.]
**बलादुरी** स्त्री. संकट दूर होण्यासाठी ओवाळून टाकलेला पदार्थ : 'बायकांनी... बला-दुरी व सतगें करून ओवाळिलें.'- चित्रगुप्त ११४.
**बलाबल** न. १. अन्योन्य शक्तता व अशक्तता. बळाची तुलना (वादी पक्षांची; वादगस्त गोष्टीच्या कारणांची). २. शक्ती; उपाय; साधन. ३. सामर्थ्य; आंगची शक्ती; उत्कृष्टता (वस्तू-मनुष्यातील.) [सं.]
**बलामत** स्त्री. १. मिथ्या आरोप. २. आकस्मिक संकट; लचांड; त्रासदायक मनुष्य, काम इ. [फा.बरामद; अर.]
**बलाय, बलायकी** स्त्री. बल; आरोग्य. (गो.)
**बलाय(ई)बत्तर** न. १. सटरफटर वस्तू. २. लबाडीने केलेली मिळकत (जमाखर्चातील).
**बलारिष्टयोग** पु. (फ.ज्यो.) आयुष्यमर्यादा आठ वर्षापर्यंतच आहे, असे दाखवणारा जन्मकुंडलीतील योग.
**बलाव** न. कोडबीपेक्षा मोठी होडी. (हेट.)
**बला(ळा)हक** पु. मेघ; ढग. [सं.]
**बलांडा** वि. बलवान; विद्यादी गुणांनी मोठा. (को.) [सं.बलाढ्य]
**बलांडी** स्त्री. खोडी; पुंडावा; मग्रुरी.
**बलांढी** वि. आडदांड; धृष्ट; मुजोर.
**बलि-ळी** पु. १. देव, पिशाच्च यांना अर्पण करायचे अन्न, पशू, पक्षी इ. २. बलिदानाच्या वेळचे देवपूजेचे साहित्य.
वि. बळकट; सशक्त. [सं.]
**बलिदान, बलिप्रदान** न. १. बळी अर्पण करणे; दान; शांती इ. च्या वेळी उडीद मिसळलेल्या भातावर किंवा कोहाळ्यावर गुलाल टाकून त्यावर जळता काकडा लावून तो शिप्तरात ठेवून तो मनुष्यावरून वगैरे ओवाळून देवताना अर्पण करतात ते भक्ष्य. २. नजराणा : 'कांहीं बळिदान अंगीकारा माझें।'- एभा ४.१००. [सं.]
**बलिप्रतिपदा** स्त्री. कार्तिक शुद्ध प्रतिपदा. [सं.]
**बलिष्ठ** वि. प्रबल; अतिशय बळकट [सं.]
**बलिहरण** पहा : **बळीहरण**
**बलीवर्द** पु. अंडिल, न बडवलेला बैल. [सं.]
**बलीवर्दयंत्र** न. माती, मोठे दगड इ. हलवण्याचे यंत्र; (इं.) बुलडोझर.
**बलु(लो)ते** न. १. गावातील बारा वतनदारांना किंवा हक्कदार कारूंना शेतांवर त्यांच्या हक्काबद्दल गावकऱ्यांनी नेमून दिलेला धान्याचा, बागाइताच्या उत्पन्नाचा वाटा; गावकऱ्यांच्या गरजा भागवण्यासाठी कारूंना कुणब्यांकडून मेहनताना म्हणून मिळणारा पिकाचा वंशपरंपरागत वाटा. २. (काही ठिकाणी) पाटील, कुलकर्णी इ. गावच्या पिढीजात कामगारांचा हक्काचा वाटा. ३.वरील बारा वतने. [क.बल=उजवा, कुड= देणे, बलुता= उजव्या हाताचा हक्क म्हणून देणे.]
**बलु(लो)तेदार, बलु(लो) त्या, बलु(लो-लौ) ता** पु. बलुत्यावर हक्क असणारा गावचा वतनदार; सरकारी कामगार, पाटील, कुलकर्णी इत्यादींहून हे भिन्न असून बारा आहेत.
**बल्की-ल्कि-ल्के** क्रिवि. निदानी; किंबहुना; देखील; इतकाच नव्हे तर आणखी.
**बल्ब** पु. विद्युद्दीप; विजेवर चालणारा दिवा. [इं.]
**बल्ल** न. पीप; पिंप. (गो.)
**बल्लव** पु. १. गोपाळ; गवळी: 'वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे।'- वावन १.१६. २. आचारी. [सं.]
**बल्ला** पु. १. सापळा. (बे.) २. फासा. [क.बळळी]
**बल्लाळताटी** स्त्री. वाळ्याची ताटी, कनात: 'गाडेयाचिया निहटी । घातली बल्लाळताटी।'- शिव ५६९.
**बल्ली** स्त्री. १. उथळ पाण्यात होडी पुढे लोटण्याची काठी; ताज. २. तावेची डोलकाठी. ३. लाकडी दांडी; वासा; लांब, सरळ लाकूड. (व.) ४. टेकडी.(अहि.)
**बल्ल्या** पु. बच्चा (कर.); (मुलांत रूढ) दंडादाखल देण्याची गोटी.
**बल्वज** पु. लव्हाळे : 'पैं बल्वजाचेन महामारी पिंपळवडाचिया परी'- ज्ञा १५.५८. [सं.]
**बल्हारी** स्त्री. सामर्थ्य; थोरपणा; मोठेपणा. (व.) [हिं.;सं.बलिहारी]
**बल्हो** पु. बोल; एकसारखे बोलणे; अस्खलित भाषण; विस्ताराचे बोलणे.
**बव** न. (ज्यो.) अकरा करणांपैकी पहिले. [सं.]
**ब-वजूद** क्रिवि. असूनही; शिवाय : 'ब-वजूद टॉमस मोष्टीन पुण्यांत आला असतां...'-ऐटि १.५८. [फा.बा-वजूद]
**बवर्ता** पु. सफेत व काळ्या केसांत लाल केस असलेला घोड्याचा एक रंग. - अश्वप १.३२.
**बवाशि(सी)र** स्त्री. मूळव्याध. - अश्वप २.१९५. [हिं.]
**बशा-श्या** पु. १. मालकाच्या गैरहजेरीत घराच्या, शेताच्या राखणीला ठेवलेला महार. २. बसून वेळ फुकट घालवणारा; आळशी. ३. धास्ती; संदेह; भीती : 'अलीकडे हिंदुस्थानच्या मसलतीत संस्थानचा अगदींच उच्छेद करणें यावरून अवघ्यास बशा पडला आहे.'- मर्शियांका पृ. ७०७. (वा.) **० खाणे** - १. अडकून बसणे; बोलणे सोडून अडून बसणे; आड घालणे. २. बदलणे, फितूर होणे.
**बशारत** स्त्री. शुभवार्ता; खुशखबर : 'अशी आम्हास बशारत जाली आहे.'- मइसा १.६३. [अर.]
**बशाह** पु. ससाणा.
**बशी** स्त्री. लहान ताटलीसारखे पसरट भांडे (विशेषत: चहा पिण्याचे); काचेचे तबक. (गो.) [पोर्तु.बसिया; हिं.वासन]
**बस** स्त्री. भाडोत्री वाहतूक करणारी मोठी गाडी. [इं.]
**बस-स्स** क्रिवि. पुरे; पुरेसा; ठीक.

स्त्री. वैपुल्य; रेलचेल; कमाल. [फा.बस्] (वा.) ० **करणे** – थांबणे.

**बस** पु. १. दृढता; निश्चितपणा; कायमपणा. २. स्थिरस्थावरतेची स्थिती; जम; वजन; छाप; पगडा; प्रभाव; कायमची व्यवस्था; बसोटी. (व.) (क्रि. बसणे). (वा.) **बसात आणणे** – स्वतःच्या ताब्यात आणणे.

**बसई** वि. जिंकण्यास कठीण; मजबूत : 'अन्यथा वसई बसई होती.'–ब्रप.

**बसक** स्त्री. १. आसन; आस्तरण; बैठक; बिछाईत (जाजम, खुर्ची इ.). २. बैठक; खुर्ची; तळखडा; (सामा.) आधार. ३. बसकी; तळ; बूड; पाय; बुंधा; अडणी. ४. बसकी; बाजारात घातलेल्या दुकानावरील पट्टी, कर. ५. पहा : **बदखल**. ६.जमिनीचा खोलगट भाग; लवण. ७.जमिनीवर ठाम बसून राहणे (थकव्यामुळे, हट्टाने). वि. सखल; खोलगट (जमीन).

**बसकट** स्त्री. दमल्यामुळे, हट्टाने, एखाद्याला रोखण्यासाठी जमिनीवर फतकल घालून, हातपाय मोकळे सोडून बसणे; बैठक.
वि. पहा : **बसकल**

**बसकण** न. १. आस्तरण; बैठक इ. २. पहा : **बसकट.** (वा.) ० **घेणे, मारणे** – काम तडीस न जाण्याच्या निराशेने हाती घेतलेले काम सोडून देणे.

**बसक(का–कू)र, बस्क(स्का)र** स्त्री. न. हातरी; चटई; जाजम; घडवंची; मुलांनी शाळेत बसायला आणलेले गोणपाट इ. आसनाप्रमाणे पसरलेली, ठेवलेली कोणतीही वस्तू. [सं.विष्टर]

**बसकल** स्त्री. न. बसायला फुरसत, वेळ; संधी (बहुधा नकारार्थी प्रयोग). वि. १. कमी उंचीचे; आखूड व पसरट; ठेंगणे व सपाट. २. बसके, फेंदरे, नकटे (नाक). ३. खोलगट, खालपट (जमीन).

**बसकल** स्त्री. माशांची एक जात. हे ऑक्टो–नोव्हें. मध्ये पकडतात. (को.)

**बसका** स्त्री. १.बैठक; खुर्ची; आसन. (राजा.) २. तळ; पाया (वस्तूचा). वि. १. बेताच्या उताराचा; आडव्या घाटाचा. २. सपाट; थबकल.

**बसका** स्त्री. एक धार्मिक विधी: 'सांतेरी देवस्थानांत श्रावण महिन्यांत बसका नांवाचा एक तीन दिवसांचा कार्यक्रम असतो.' – अंवा.

**बसकार** १. न्यायपीठ; न्यायकोर्ट. २.निवाड्यासाठी न्यायासनाची मागणी.

**बसकी** स्त्री. १. विटीदांडूच्या खेळातील शब्द. २. पहा : **बसका** १, २. ३. चुंबळ.
वि. चुंबळीसारखे बसकट (पागोटे): 'तिवट बस्की साधें.'– समारो १.२०१.

**बसकीचा** वि. १. तळ, पाया, बैठक असलेला. २. बसण्यालायक (घोडा, बैल, गाढव).

**बसकेचा** वि. पहा : **बसकीचा** १

**बसकोळी** स्त्री. वि. मातीची बसकट घागर : 'यथाविधीनें त्या येरी । बसकोळ्या घागरी।'– तुगा २८०.

**बसण** स्त्री. बसण्यासाठी घेतलेली लाकडी वस्तू.

**बसणी** स्त्री. १. बसणे; बैठक; मांडी ठोकून बसणे. २. बूड; आसन. ३. लहान पाट. (को.)

**बसणे** अक्रि. १. बैठक मारणे. २. ढुंगण, गुडघा, घोटा इ. वर टेकणे. ३. खाली बूड टेकणे; बसक घेणे; पंख आकुंचित करून राहणे; विश्रांतीसाठी खाली टेकणे (पशू, पक्षी यांनी). ४. उद्योगधंदा, काम इ. नसणे; रिकामटेकडा, निरुद्योगी असणे. ५. वेळ फुकट घालवणे. ६. खुर्ची इ. बैठकीवर अधिष्ठित होणे. ७. (शब्दशः व ल.) वर पडणे, असणे. ८. (विशेषतः ल.) एखाद्याला भारभूत होणे; एखाद्यावर अवलंबून असणे. ९. तळी जाणे; स्थिरावणे. १०. खालावणे; (नदीचे, विहिरीचे पाणी) कमी होणे. ११. बोथट होणे. १२. स्थिरावणे; (ल.) रमणे : 'तदुपरि मग तीचें चित्त कोठें बसेना।' – सारुह ३.५९. १३. (पाऊस, उष्णता, ताप) स्थिरावणे. १४. ऱ्हास, अपकर्ष होणे; खालावणे; काढते घेणे; श्रेष्ठता गमावणे; वैभव कमी होणे. १५. सवयीने निष्णात किंवा तरबेज होणे; चांगले समजणे. १६. (ल.) अंगावर येणे, पडणे. १७. योग्य होणे; अपेक्षित रीतीने जुळणे; मिळणे; पटणे; जडणे; बरोबर लागू होणे. १८. खचणे; बुडणे; बिनफायद्याचा होणे, नासणे; तोटा होणे. १९. घोगरा, बदसूर, खोल व अस्पष्ट होणे; (घसा, आवाज) बिघडणे. २०. (अम्मल, सत्ता) स्थापित होणे. २१.जोम, जोर मिळवणे (पिकाने). २२. पार जाणे; समूळ नाहीसे होणे. २३.दबणे; कमी होणे; (गळू) चेपणे. २४. आरंभ करणे. २५. प्रमाण ठरणे. २६. प्रहार लागू पडणे; फटकारा लागणे. [सं.उपविश्]

**बसणे** न. बसण्यासाठी ठेवलेले आसन.

**बसता** वि. बसण्याच्या उपयोगी (घोडा, बैल इ.).

**बसन** न. जनावराच्या मागील फऱ्याची जागा, चौक.

**ब(बे)सनेकड** न. सुळकुंब्यामध्ये घातलेला दांडा. रहाटाला बैल लावायचा नसल्यास ह्या दांड्याने रहाट फिरवतात. सुळकुंब्याजवळ बसनेकडाशी काटकोनास जोखड बांधतात.

**बसफुगडी** स्त्री. बसून फुगडी घालण्याचा मुलींचा खेळ.

**बसमेदार** वि. बस्मी, रंगीत छटा असलेले : 'आबा सेलूकराणे मदारुलमाहास कंठी सेला पागोटे बसमेदार दिल्ही.' – पुणे अखबार भाग ३, पृ. १४८.

**बसर** वि. हार गेलेला; पराजित. (व.)

**बसराई** वि. १. बसरा शहरची (रेशमी वस्त्रे, मोती, फळे). २. केळीची एक जात. हे केळे बारीक व लांब असते. याचे बी बसऱ्याहून आलेलें आहे.'– कृषि ४८८.

**बसला वाटा, भाग** फाळ्यासहित उत्पन्नातील मालकीचा विशिष्ट भाग (खर्चवेचारहित). हा कडधान्यापुरताच असतो. (कर.)

**बसवण्णा, बस्वण्ण–ण्णा, बसवा** पु. जंगमांच्या देवळातील पूजेचा नंदी; बैल.

**बसवंत** न. उपास्य दैवत : 'सांडी या विषयाची घाई रे । येणेंचि खळे बसवंत होसी।'–तुगा २४३.

**बसविणे** सक्रि. १. बसायला लावणे. २. पक्के, स्थिर करणे; बांधणे. ३. माथी मारणे; सोपवणे; लादणे. ४. थंड करणे; शमवणे; स्थिर करणे; विश्रांती घ्यायला लावणे. ५.भोगायला लावणे; गुदरविणे. ६. योग्य करणे; जमवणे; लावणे; जुळवणे; मिळवणे. ७. स्थापन करणे. ८. (बायकी) न्हाणवलीला (गर्भाधानाच्या वेळी) मखरात ठेवणे.

**बसवी** स्त्री. जंगम मताची कसबीण. – शारमार्का

**बसवी** स्त्री. १. वेश्या; कसबीण; निर्लज्ज स्त्री. २. देवदासी; मुरळी; देवाशी लग्न झालेली स्त्री. [क.;ते.वसिदी]

**बसस्टँड** पु. जेथे प्रवासी गाड्या काही वेळ थांबतात आणि प्रवाशांना खाण्यापिण्याची, स्वच्छतागृहाची सोय असते ते ठिकाण. [इं.]

**बस होणे** शह बसणे : 'उभये पक्षी थोरले बाईचा बस जाला आहे.'– पेद २८, पृ. १३२.

**बसळा** पु. पोई; पाणपोई; उपोदका.

**बसंती** पु. एक प्रकारचा पांढुरका तांबडा रंग.

**बसाबस**-स्त्री. जम; बस्तान.

**बसु(सो)ला–ली** पु.स्त्री. १. सुताराची तासणी; वाकस. २. दगडाला टाचे मारण्यासाठी पात्याच्या दोन्ही बाजूंना अणकुचीदार, अर्धा पौंड वजनाची हातोडी, टिकाव.

**बसोबस** पु. जमिनीवरील कराखेरीज दर रुपयाला एक आणा या दराने दर नांगरामागे गावच्या स्थायिक शेतकऱ्याकडून उकळण्यात येणारा एक कर. हा कर बेकायदा आहे.– ऐको.

**बसोल** पु. मढवणारा. (व.)

**बस्टुक** (हेट.) पहा : **बसक(का–कू)र**

**बस्त** पु. बोकड : 'कंस दैत्य हे बस्त सकळ। बळी घेसी तयांसी ।'– ह १४.७. [सं.]

**बस्तनी** स्त्री. वेष्टनी. – राव्यको ८.११०; अभ्रा; खोळ. [फा.]

**बस्तर** वि. खराब, वाईट, बोथट, धार नसलेले शस्त्र.

**ब(बि)स्तरवार** पु. बृहस्पतिवार; गुरुवार. (ना., खा.)

**बस्ता, बस्ता(स्त)न** पु. १. (कापूस,कापड, कागद इ.चा) गठ्ठा : 'त्याचा बस्ता भरून ठेवावा स्वामीसी।'– रामदासी २.५७. २. थैली; गाठोडे; सदरा. [फा.बस्तह्]

**बस्ता** पु. कमरेभोवती गुंडाळण्याचे एक वस्त्र. [फा.]

**बस्ता(स्त)न** न. १. रचना; व्यवस्था; बेत; बस; जम. २. बंदोबस्त; स्थिरावलेपणा; निश्चिती; कायमची जागा घेणे, धरणे. ३. ठरणे; पडणे (प्रमाण); सरासरी; मध्यम प्रमाण; वाटणीचे प्रमाण, दर. ४. जम; ताळा (हिशेब, हकिकत यांचा); खऱ्या गोष्टीशी मेळ (बातम्यांचा, इतिहासांचा, वर्णनांचा); योग्य, ठीक होणे (सामान्यत:). (क्रि. बसणे, जमणे, मिळणे). ५. संबंध; प्रमाण : 'आकाशांतील गोलाच्या गतीवर मनुष्यास होणाऱ्या इष्टानिष्ट गोष्टींचे बस्तान असण्याचा संभव किती.'– नि २३९. [फा.बस्तन्]

**बस्तानी** स्त्री. टोकाला दोरी बांधलेली काठी; मुलांना शिक्षा करण्याचे गुरुजींचे साधन.

**बस्ति–स्ती** स्त्री. पु. कोठा; खालचे पोट; ओटीपोट; मूत्राशय. न. स्त्री. १. बस्तीची नळी; बस्तियंत्र.२. पिचकारी. ३. गुदद्वारात पिचकारीने पाणी सोडून मलोत्सर्ग करविण्याची क्रिया. [सं.]

**बस्ती** स्त्री. वेष्टन; रुमाल. [फा.]

**बस्ती** स्त्री. जैन लोकांचे देऊळ. [सं.वस्; क. बस्ति]

**बहकणे** अक्रि. १. रस्ता चुकणे; भटकणे; भलत्या वाटेला लागणे. २. (ल.) नीतिभ्रष्ट होणे; पाऊल वाकडे पडणे. ३. चुकणे; घसरणे. ४. बेसुमार वाढणे; अमर्याद होणे; (किंमत, करार) आटोक्याबाहेर जाणे. ५. सर्वत्र पसरणे; फाकणे; (सुगंध) दरवळणे. ६. बरळणे; वाहवणे (भ्रमात). [हिं.बहकना]

**बहक(का)वणी, बहकणी** स्त्री. चुकणे; भटकणे; भुलवणी.

**बहका** पु. घोटाळा; धांदल. (ना.)

**बहक्** स्त्री. बिघाड. (झाडी) [हिं.]

**बह(हं)गुण** न. रुंद तोंडाचे पातेले.(व.)

**बहडणे** अक्रि. १.वाढणे. २.पुढे होणे. (ना.) [हिं. बढना; सं.वर्धन]

**बहडवनी–ती** स्त्री. १. अतिशयोक्ती. २.बढाई. ३. बडेजाव. (झाडी) [हिं.बढाना]

**बहयताड** वि. मूर्ख; बावळट. (व.) [हिं.बहकना]

**बहर** पु. स्त्री. १. हंगाम; वैपुल्याचा काळ; भर; सुगी; जोम; उत्कर्षाची पूर्णता; तजेला (उत्पन्न, तारुण्य, आरोग्य, मान, संपत्ती, खेळ, उद्योग यांचा). २. पराकाष्ठेची मौज (नृत्य इ.ची). ३. वसंत ऋतू.[फा.बहार] (वा.) **० मारणे** – पूर्ण सुखोपभोग घेणे.

**बहरणे** अक्रि. बहार, भर येणे; झाडाला फुले येणे.

**बहलव्ना** क्रि. १. भलामण करणे. २. मन रमवणे. (झाडी)[हिं.बहलाना]

**बहव(व्ह)स** वि. १. ओढाळ; उच्छृंखल. २.बेकायदा; बेबंद; जुलमी.

**बह(हे)स** स्त्री. चर्चा. [फा.बहस]

**बहळ–ल** वि. १. प्रचुर; विपुल; पुष्कळ : 'आनंदामोद बहळ । सात्त्विकांचें मुकुळ ।'– ज्ञा १५.६. २. पुष्ट : 'चिन्मात्र तेजें बहळ । नित्य निर्मळ सदंशें ।'– एभा ९.२०७. ३.विस्तृत; प्रशस्त; विस्तीर्ण; मोकळी. [क.बाहळा; सं.बहल]

**बहंगी** स्त्री. सामान खांद्यावरून वाहून नेण्यासाठी काठीच्या दोन टोकांना दोन शिंकी इ. बांधून केलेली रचना; कावड; त्यातून वाहून नेलेले सामान.

**बहाईपंथ** पु. एक मुसलमानी धर्मपंथ. हा १८४४-४५ मध्ये इराणात उदय पावला. संस्थापक – मिर्झाअल्ली महंमद.

**बहाचर** वि. १. वात्रट. (व.) २. लावालावी करणारा.

**बहाड–र** न. समुद्र, खाडी यांच्या काठची भरतीची, खारी जमीन.

**बहाडा** वि. काळसर लाल ठिपक्यांचा. (व.)

**बहाण** स्त्री. नावेचा काठ; कड; बाण-णी. (को.)

**बहाणा–ना** पु. ढोंग; मिष; खोटी सबब; निमित्त. [फा.बहाना]

**बहा(हि)णा** वि. लाडक्या मुलीसाठी संबोधन. (व.,घाटी)

**बहाणे** पहा : **बाहणे**

**बहात्तर** वि. सत्तर आणि दोन; ७२ ही संख्या. [हिं.]

**बहात्तर खोडी** घोड्याचे बहात्तर दोष, वाईट लक्षणे.

**बहात्तर जुलूम** पराकाष्ठेचा अत्याचार.

**बहात्तर भोवरे** (घोड्याची) केसांची बहात्तर वलये. यांपैकी बासष्ट अशुभ व दहा शुभ मानली जातात.

**बहाद(दु–द्द)र** वि. १.धीट; धाडसी; शूर. २.प्रवीण; निष्णात; निपुण; हुशार; वस्ताद; पटाईत. [फा.]

**बहाद(दु–द्द)री** स्त्री. शौर्य; पराक्रम. [फा.]

**बहाद(दा)री** स्त्री. बाहीदारी; हमी; जिम्मा.
**बहादुरखानी कागद** एक जातीचा दौलताबादी कागद.
**बहादुराई** स्त्री. शाबासकी; बक्षीस: 'खंडेराव महाराजास मिळाली बहादुराई।'- गापो ५.
**बहादुरी तोडी** (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.
**बहानक्त** न. तसर व फरोक्त यांच्या वजावटीनंतर ऐनजिनसी धान्यरूपी साऱ्याची नक्त, रोख किंमत; वसुली गल्ल्याची नाण्यांत किंमत. [फा.बहानकद]
**बहानचोद-त** वि. एक शिवी. [हिं.बहेन + चोदना]
**बहार** पहा : **बहर**
**बहार** पु. वसंत ऋतू. [अर.]
**बहार** स्त्री. कमाल; उत्कृष्टता.
**बहार** पु. (संगीत) एक राग. गानसमय वसंतऋतूतील रात्रीचा तिसरा प्रहर. [फा.;सं.विहार]
**बहारदारी** स्त्री. सौंदर्य : 'हिमालयादि स्थानांचे वर्णनांत बहारदारी बरीच दिसून येते.'- विवि ८.७.१२३.
**बहारवाटिया** पु. वाटमारू; दरोडेखोर; काठेवाडातील लुटारू.- के १३.५.१९३४.
**बहा(ह)री** वि. १.मेजवान्या, खेळ, आनंद व सुख यांत रमणारा. २. वासंतिक.
**बहाल, भाल** न. १. तुळई; सरा. २. अवेलापासून चूल निराळी करणारा चुलीचा भाग.
**बहाल** वि. १. प्रसन्न; खूष. २. पूर्ववत कामावर नेमलेला. ३. क्षमा केलेला. ४. बक्षीस दिलेला. ५. पुन्हा स्थापिलेले; परत दिलेले : 'वतन बहाल वजाचरी.'- थोमारो १.६५. ६. कायम असलेला, टिकलेला. (व.)
क्रिवि. पूर्ववत : 'याजकरितां लाडाचे चौथे दफेची इमारत ब-हाल ठेवणें जरूर.' - मइसा ७.९२. [फा.बहाल]
**बहाला-वा बहाळ-ळी इ. शब्द 'बाह' मध्ये पाहावेत**
**बहिणीस** स्त्री. बहीण. (को.)
**बहिणुली** पु. लाडकी बहीण.
**बहिणोई** पु. बहिणीचा नवरा; मेहुणा.(व.) [हिं.बहनोई]
**बहि(हे)दा, बैदा** पु. बंड; दंगा; गोंधळ; दैना. [हिं.]
**बहिनमायचा** वि.एक शिवी.
**बहिरक, बैरक** स्त्री. निशाण; ध्वज; एका निशाणाखालील टोळी (अरबांची) : 'शिबंदीचे लोक पोलीसखात्यांत गेल्यानें त्यांचे बेडे व बहिरकी राहिल्या नाहींत.'- (बडोदे) ऐरा, प्रस्तावना ९५.
**बहिरम-व** पु. भैरव. (व.) [सं.भैरव]
**बहिरवसा** पु. बाहेरची (भूत-पिशाचांची) बाधा.
**बहि(ही)रवास** पु. १. बाहेर राहणे. २.बाहेरच्या उपयोगाचे नेसण्याचे वस्त्र : 'चोखट बहिरवास वेढीति ।'- पूजावसर. [सं.]
**बहिरंग** न. बाह्य स्वरूप.
वि. १. परका; अपरिचित; दूरचा; आपल्या कुळाच्या, अनुयायांच्या विस्तारात नसलेला. २. वरवरचे. [सं.]
**बहिरंगोपासना** स्त्री. बाह्य उपासना; कर्मभक्ती. संपद्विधी, आरोपविधी, संवर्गविधी व अध्यासविधी असे याचे चार प्रकार.
**बहिरा, बहिरट** वि. १. फुटका (कान). २. ज्याला मुळीच ऐकू येत नाही किंवा कमी येते असा. ३. सुन्न; संवेदनारहित (अवयव). [सं.बधिर]
**बहिरानी** क्रिवि. उघड्या मैदानात, मोकळेपणाने (भटकणे).
**बहिरायाम वात** एक प्रकारचा धनुर्वात. यात रोग्याची छाती पुढे येऊन पाठीकडे कमान होते.
**बहिरावणे, बहिरणे** अक्रि. १. बधिर होणे : 'दिशाचक्र बहिरैले । घाई निशानाचां ।'- शिव ५८५. २. सुन्न होणे.
**बहिरी परिंद्याचे शिकारी** बहिरी ससाणा या पक्ष्याच्या साहाय्याने शिकार करणारे शिकारी.
**बहिरी, बहिरी ससाणा** पु. १. ससाणा; एक मांसभक्षक पक्षी. पाठीचा रंग पारव्यासारखा असून मध्ये काळे ठिपके असतात. इतर पक्ष्यांची शिकार करण्यासाठी हा पाळतात. २. (ल.) हुषार; धीट माणूस.
**बहिरीबोका** चलाख, वस्ताद, छाप बसविणारा इसम.
**बहिरीव्यथा, बहिरी** स्त्री. सुनबहिरी नावाचा, त्वचा बधिर होण्याचा रोग.
**बहिरोबा** पु. १. भैरव देव. २.(ल.) बहिरा मनुष्य.[सं. भैरव] (वा.)
**बहिरोबाची सेवा असणे** - बहिरा असणे.
**बहिर्ग्रह, बहिर्वर्ती ग्रह** (ज्यो.) पृथ्वीच्या भ्रमणकक्षेच्या बाहेर असणारे मंगळ, गुरू, शनी, हर्षल, नेपच्यून व प्लुटो हे ग्रह.
**बहिर्जकात** स्त्री. परदेशी निर्यात होणाऱ्या किंवा तेथून आयात होणाऱ्या मालावरील जकात; (इं.) कस्टम्स. [सं.बहिः + अर. झकात]
**बहिर्दाह** पु. शरीराची काहिली. [सं.]
**बहिर्दिशेला, बहिर्भूमीला जाणे** शौचाला जाणे.
**बहिर्द्वार, बहिर्व्यसन** न. व्यभिचार; रांडबाजी.
**बहिर्बुणगे, बहिरी** न. फौजेतील बाजारबुणगे; गर्दी: 'भले भले सरदार ह्यांनीं बहिरींत तोंडे घातलीं।' -ऐपो २७९. [हिं. बहीड बुन्गाह]
**बहिर्भाव** पु. देखावा; डौल; बाह्य हेतू. [सं.]
**बहिर्भूत** वि. बाह्य; बाहेरील.
**बहिर्भूमीची व्यथा** (ल.) हगवणीचा उपद्रव; त्रास.
**बहिर्मुख** वि. १. बाहेर तोंड असलेला. २. (ल.) बाह्य, प्रापंचिक गोष्टींकडे कल असलेला; विषयासक्त.
**बहिर्लंब** वि. विशाल कोनाचा.
**बहिर्लापिका** स्त्री. कोडे; गूढ; ज्याच्या अर्थपूर्तीसाठी बाहेरचे पद इ. घ्यावे लागते अशी कूट कविता.
**बहिर्वक्रपृष्ठ** न. गोलाचे पृष्ठ बाहेरच्या बाजूने पाहिले असता दिसणारा आकार.
**बहिर्वर्ती** वि. १. बाहेर राहणारा, असणारा. २.पहा : **बहिर्ग्रह** [सं.]
**बहिर्विकार** पु. १. बाह्य, शारीरिक आजार. २. उपदंश; गर्मी.
**बहिष्कार** पु. १. जातीबाहेर, वाळीत टाकणे. २. (सामा.) बाहेर ठेवणे;

असहकारिता: 'विनवणीस बहिष्काराची पुरवणी देऊन...'– टि ३.१०. ३. त्याज्य ठरवणे; स्वीकार न करणे. [सं.]
**बहिष्कारणे** सक्रि. वाळीत टाकणे : 'असो जैसा पुत्र भ्रष्टला। तो सर्वीं जैसा बहिष्कारिला।'– ह २०.८६. [सं.]
**बहिष्कृत** वि. १. जातीबाहेर, वाळीत टाकणे. २. बाहेर ठेवलेला; वर्ज्य केलेला. [सं.]
**बहिस्त्रिक(करण)** न. नृत्याचा एक प्रकार.
**बहि:** क्रिवि. बाहेर; बाहेरच्या बाजूला. उदा. बहिष्कार इ.
**बहि:प्रकृति** स्त्रीअव. राज्यकारभाराचे एक अंग. कोश, राष्ट्र, दुर्ग, बल आणि प्रजा इ.
**बहि:शाल,बहि:स्थ** वि. (शिक्षण) प्रत्यक्ष शाळेत रोजच्या रोज न जाऊ शकणारा पण अभ्यासक्रम पूर्ण करून बाहेरून परीक्षेला बसणारा विद्यार्थी.
**बहि:सर्जक** वि. आत नको असणारी वस्तू (हवा, पाणी इ.) बाहेर सोडणारा (पंखा इ.).
**बहि:स्रावी** वि. ज्या पेशीतील स्राव नलिकांद्वारे शरीरात नेला जातो अशी (पेशी).
**बहीण** स्त्री. १.स्वत:च्या आई-वडिलांची मुलगी; भगिनी. २. चुलत-आते-मामे बहीण इ. ३. वडील बहीण. ४. (निंदार्थी) गुण, वागणूक इ.त एखादीची बरोबरी, वरचढपणा करणारी स्त्री. [सं.भगिनी]
**बहीणती(बी)ज** पहा : **भाऊबीज**
**बहीणपणा** पु. मेहुण्याचे नाते : 'ऐसा कष्टविला आमुचा पति । त्या बहिणपणा आग लागो ।'– जै ७१.१०१.
**बहीणभावंडे** न. अव. बहिणी व भाऊ (समुच्चयाने).
**बहीणभावा** पु. एकाच आईकडून भावंडाचे नाते; सहोदरपणा. (राजा.)
**बहीफळ** न. श्रीफळ; नारळ. [हिं.]
**बहीर** स्त्री. आघाडीचे सैन्य; बिनी.
**बहु** वि. क्रिवि. पुष्कळ; अतिशय; अनेक. (समासात)बहुगुणी इ.
**बहुकोण** पु. चारपेक्षा जास्त बाजूंची सरलरेषाकृती.
**बहुगुणित** वि. अनेक मिळून एकाप्रमाणे दिसणारा. –ज्योमू.
**बहुगुणी** वि. १. पुष्कळ गुण असणारा; पुष्कळ गोष्टी ज्याला करता येतात असा; पुष्कळ कामी येणारा. २. श्लेषात्मक रचना; ठोंब्या; बईल. उदा. 'बहुगुणी ईश्वरभजनीं लक्षाचा मनुष्य मोटेयोग्य.' या वाक्यातील पहिल्या तीन शब्दांतील आद्याक्षरे घेतल्यास बईल असा शब्द बनतो व तो मोटेयोग्य म्हणजे मोट ओढण्यास योग्य ठोंब्या असा श्लेष यात आहे. [सं.]
**बहुचक** वि. १.वाचाळ; बडबड्या : 'बहुचकासीं करूं नये । मैत्री कदां।'– दास २.२.२५. २. भ्रमिष्ट; बहकलेला. [सं. बहुवाचक]
**बहुचकै** स्त्री. भ्रमिष्टपणा; चावटी; बहकलेपणा : 'बहुचकै ज्ञातया । आणिली जेणें।'– ज्ञा १८.५३९.
**बहुजन समाज** पु. भारतीय समाजातील शैक्षणिक व आर्थिक बाबतीत अन्य वर्गांच्या तुलनेत मागासलेला लोकसमूह, समाज.
**बहुजिन(न्न)सी** वि. आत पुष्कळ जिन्नस असणारा; अनेक प्रकारचा.
**बहुड-डा** पु. (कृपादृष्टीचा) वर्षाव : 'हे भेटी नव्हे बहुडा । मेघाचा केला ।'– ज्ञा ११.६७०.
**बहुडणे** अक्रि. १. मागे फिरणे, सरणे : 'वृद्धाप्य तरी बहुडे ।'– ज्ञा ६.२६०. २. उडणे. ३. (प्रयो. – बहुडविणे). निरोप देणे; परत पाठविणे : 'गरुडा आळंगूनी बहुडविलें.'– तुगा ५२.[सं.अव + हूड्]
**बहुडा** पु. बदलण्यासाठी खजिन्यातून परत पाठविलेले पैसे; बदला; परत : 'प्रेम देउनि बहुडा झाला।'– तुगा २७६. [गु.]
**बहुडा** पु. निरोप; रजा; रवानगी. (क्रि. देणे) : 'येणें प्रमाणें उभयतां अग्रवादी व पश्चात्वादी यांचे राजीनामे लिहून घेतले आणि उभयतांस बहुडा दिला.'– सनदा ११७.
वि. १. खलास; समाप्त: 'त्यावर दरबार बहुडा होऊन राजश्री वाड्यांत गेले.'– पेद १२.७६. २. खोटे; हिणकस: 'राजश्री राघोपंत रुपये १९८० पाठविले. त्यापैकीं. वजा बहुडा रुपये २० बाकी जमापोत रुपये १९६०.'– मइसा पृ. १६२.
**बहुडाविणे** अक्रि. कृपेचा वर्षाव करणे; मोठेपणा देणे; मानसन्मान करणे : 'साहेबीं... तश्रीफ देऊन बहुडाविलें.'– सनदा ६२. [सं.बहु]
**बहुढंगी** वि. जेथे विविध ठिकाणचे, विविध भाषा बोलणारे, विविध धर्मांचे लोक राहतात असे (ठिकाण): 'हे शहर बहुढंगी - Cosmopoliton आहे.'– मलेशिया इंडोचायना पृ. १४२.
**बहुत** वि. पुष्कळ; प्रचुर; फार; अनेक. [हिं.;सं.बहु, प्रभूत]
**बहुत काळी, दिवशी** वि. जुना; पुरातन; पुष्कळ दिवसांचा.
**बहुतवीणी** वि. पुष्कळ अपत्ये जन्माला घालणारी : 'म्हणौनि पहिलेयाचि वेळा । बहुतवीणि जाली ।'– उगी ३१४.
**बहुतावे** न. (एखाद्या कामात) वाजवीपेक्षा जास्त व्यवस्थापकांचा, कर्त्यांचा संबंध असणे; बारभाईपणा.
**बहुतेक** वि. अनेक; कित्येक; पुष्कळ.
क्रिवि. बहुतकरून; पुष्कळ अंशी; हजार वाटांनी.
**बहुतेरे** वि. अनेक प्रकारचे; निरनिराळे : 'बहुतेरे उपाय केले.'– भारतवर्ष पत्रे यादी ७. [हिं.]
**बहुत्र** क्रिवि. पुष्कळ मार्गांनी, ठिकाणी.
**बहुत्व** न. १. विपुलता. २. (संगीत) (प्रबंध) रागालापात एखादा स्वर अनेक वेळा घेणे.
**बहुधा** वि. नाना प्रकारचा.
क्रिवि. १. पुष्कळ मार्गांनी. २. बहुतकरून; बहुश; बहुतेक.[सं.]
**बहुधाकार** पु. अव. अनेक प्रकारचे आकार.
न. (ल.) जग.
**बहुधानक** स्त्री. माया; प्रकृती : 'गुणत्रयरूपी पदार्थभेदाचीं बीजें तींत आहेत म्हणून बहुधानक.'– गीर १५८.
**बहुधान्य** पु. न. साठ संवत्सरांपैकी बारावे संवत्सर.
**बहुनायकी** स्त्री. एकापेक्षा जास्त व्यक्तींचे राज्य, सत्ता; (ल.) अंदाधुंदी. पहा : **बारनायकी**
**बहुपदी** वि. (बीजगणित) अनेक पदे व वेगवेगळे घातांक असलेली (राशी).
**बहुबेटी** स्त्री. १. सूनलेक. २. मूलबाळ : 'भल्याची बहुबेटी । काय तुझ्या रे बापाची।'– वलो ७.१. [हिं.]

**बहुभाग्य** न. (राज्य, कुटुंब इ. ना कारण असे) पुष्कळांचे दैव.[सं.]

**बहु(ऊ)भात** पु. बंगाली लोकांत विवाहहोमाच्या दुसऱ्या दिवशी वरपक्षाच्या जेवणावळीत वधूने भात वाढणे.

**बहुभाष-षी** वि. १. अतिशय बोलणारा; बडबड्या. २. पुष्कळ भाषा बोलू शकणारा. ३. दुभाषी. [सं.]

**बहुभाषाभिज्ञ** पु. अनेक भाषा जाणणारा.

**बहुमत** न. साधारणतः अधिक लोकसंख्येचे मत; अर्ध्यापेक्षा अधिक मते. वि. पुष्कळांना मान्यः 'भीष्म म्हणे बा ! बहुमत साधुचि, न तसे सदा असु ज्ञात्या।'-मोभीष्म १.८१. [सं.]

**बहुमान** पु. आदर; मान; सन्माननीय आगतस्वागत. [सं.]

**बहुमूत्रता,बहुमूत्रमेह-रोग** स्त्री. पु. बेसुमार मूत्रस्राव होणारा रोग; मधुमेह. यात कृशत्व, घाम येणे, तोंडास दुर्गंधी, जीभ, डोळे व कान यांना ओलसरपणा, खोकला, अरुची, कोरड, दाह, थकवा इ. विकार असून लघवी पिवळी होते. [सं.]

**बहुमूल्य-मोल** वि. मौल्यवान; उंची.

**बहुये-वे** वि. बहुतः 'तेथ परिवारु बहुये । अघडता कीं।'- अमृ ९.३८. [सं. बहु]

**बहुरणी** स्त्री. गाभणे जनावर.
वि. गाभण (गाय, म्हैस इ.).

**बहुरंगी** वि. १. नाना रंगांचे; चित्रविचित्र. २. बहुगुणी; हरहुन्नरी. ३. प्रसंगानुवर्ती, वेळ पडेल तसे वागणारा. [सं.]

**बहुराशिक** न. (गणित.) संयुक्त व साधे गुणोत्तर यांचे समीकरण. [सं.]

**बहुराशिप्रमाण** न. एखाद्या परिमाणाचे दोन किंवा अधिक परिमाणांशी असणारे प्रमाण. [सं.]

**बहुरूप** न. १. नाट्य; अभिनय; सोंग घेणे; विडंबन इ. २. विश्व : 'जो भेटतखेंव सरे। बहुरूप हें ।'- अमृ २.९.

**बहुरूपत्व** न. (रसा.) अनेककारकत्व. (इं.) ऑल्ट्रोइझम, आल्ट्रोपी यांना प्रतिशब्द.

**बहुरूपी** न. नाचणारे, सोंग आणणारे, नकले इ. लोकांच्या वर्गातील एक व्यक्ती; नाना प्रकारची सोंगे घेऊन उपजीविका करणारा.

**बहुल-ळ** पु. मराठी (चैत्र इ.) महिन्यांतील वद्य, कृष्ण पक्ष.
वि. १. वद्य (पक्ष). २. पुष्कळ; फार; अतिशय. [सं.]

**बहुलस्वर** पु. (संगीत) रागातील वादी स्वर.

**बहुली** वि. सुंदर.

**बहुली** स्त्री. नाचणीची हलकी जात.

**बहुले** पहा : **बोहला** : 'ऐसें संवादाचा बहुला । लग्न दोघांचिया आंतुला ।'-ज्ञा १८.१५७८.

**बहुवचन** न. (व्या.) अनेकवचन; अनेकत्ववाचक वचन. [सं.]

**बहुवस** स्त्री. १. वेश्या; कसबीण. २. गवगवा; बोभाटा; गाजावाजा.
वि. १. वाचाळ. २.मोठा; बहुत; फार; नानाविध; व्यापक; विस्तृतः 'तैसा बहुवस संसार ।'- एभा २२.४६०.
क्रिवि. १. पुष्कळ अंशी. २. (प्रायः बहवस) बेबंद; स्वैर इ. ३. सर्वज्ञ.- मनको.

**बहुवसपण** न. १. सर्वज्ञता : 'आपुलेनि बहुवसपणें । श्रीकृष्ण म्हणें ।' - ज्ञा ६.१०७. २. व्यापकत्व; सर्वत्र राहण्याचा धर्म.

**बहुवार-डे** क्रिवि. पुष्कळदा; अनेक वेळा; अनेक प्रसंगी : 'प्रियाकुचतटीं जिही न बहुवार पत्रावळी ।'- केका ७. [सं.बहुवार]

**बहुवारिके** न. अव. प्लॅस्टिकमध्ये विशिष्ट रेणू एकमेकांना जोडल्याने तयार होणाऱ्या साखळ्या; (इं.) पॉलिमर.

**बहुव्रीही** पु. (व्या.) एक समास. यात कोणतेही पद प्रधान नसून सबंध सामासिक शब्द त्याहून निराळ्या अशा नामाचे विशेषण असतो. उदा. चतुर्भुज, शशिशेखर इ. [सं.]

**बहु व्हनं** १. माजणे; मग्रूर होणे; श्रीमंतीची नशा चढणे. २. कंटाळणे; थकणे. (अहि.)

**बहुशः-शा,बव्हंशी** क्रिवि. पुष्कळअंशी; बहुतकरून; बहुधा. [सं.]

**बहुश्रुत** वि. १.ज्याने पुष्कळ ऐकले आहे असा. २. पुष्कळ गोष्टींचे थोडेथोडे ज्ञान असणारा, सामान्य माहिती असलेला. [सं.]

**बहुसाल-ळ** क्रिवि. १. पुष्कळः 'बहुसाल मारिले भुरके।'- मोउद्योग ७.७७. २. नित्य; नेहमी; सदोदित; वारंवार. ३.पुष्कळ वर्षांपर्यंत; बराच काळपर्यंत.

**बहुसालपण** न. नानाप्रकार : 'गुरु ऐसें जें म्हणणें । तेंही आहे बहुसालपणें ।'- एभा ३.२७५.

**बहुसुखवाद** पु. (तत्त्वज्ञान) आधिभौतिक सुखवादातील एक श्रेष्ठ पंथ; जनहितवाद; पुष्कळांचे पुष्कळ सुख, हित ज्यामुळे होईल तसे करणे अशी नीतीः 'बेंथाम, मिल्ल वगैरे पंडित 'बहुसुखवाद' पंथाचे पुरस्कर्ते आहेत.'-ज्ञाको (व) ६७.

**बहुळणे** अक्रि. व्याकूळ होणे.

**बहेवल, बह्या, बह्याड, बह्याताड** पहा : **बहयताड**

**बळ** पहा : **बल**[सं.बल] (वा.) ० **करणे** - १. जोरावर येणे; जुलूम-जबरीचे उपाय योजणे. २. सर्व शक्ती लावणे. ० **धरणे,बांधणे** - नेट धरणे; दम धरणे; शक्ती मिळविणे.

**बळ** स्त्री. १. पहा : **बलि-ळी** : 'देवास माणसाची बळ द्यावी.' - विधवाविवाह पृ. १३.
न. लक्ष्मीदेवतेसाठी मारलेल्या रेड्याचे शिर गावाभोवती फिरवणे. [सं. बलि]

**बळई** पु. गावच्या सीमा दुरुस्त करणे, गावाला सरपण पुरवणे इ. कामे करणारा महार. [हिं. बलई]

**बळकट** वि. १. मजबूत; दृढ. २. जोराचा; झपाट्याचा (पाऊस). ३. भयंकर; प्रचंड मोठा :'धावे कुरुपति तेव्हां राया ! संग्राम होय बळकट कीं।'- मोशल्य ३.११.
क्रिवि. १. झपाट्याने; पूर्णपणे; अतिशय. २. घट्टक; पक्केपणाने. [सं.बल + क. कटु]

**बळकटी** स्त्री. १. सामर्थ्य; शक्ती. २. दृढता; जोर; टिकाऊपणा; मजबुती; सहन, प्रतिबंध करण्याची शक्ती.

**बळकावणे** सक्रि. बळजोरीने हस्तगत करणे.

**बळग** न. आप्तेष्ट; सोयरेधायरे. (बे.)

**बळगं(बं)ड** वि. दांडगा.
**बळगाढा** पु. वि. बलिष्ठ; बलाढ्य.
**बळगार** पु. कासार. (बे.)
**बळगी** स्त्री. जाडेभरडे, हलक्या किमतीचे लुगडे.
वि. भिकार; टाकाऊ :' मग भलतीशीं बळगीं दोन घोडीं होतीं.'- भाब ७१.
**बळगे** न. पाठबळ; शक्ती. (गो.)
**बळचे** क्रि. पसरणे. (गो.)
**बळजबरी, बळजोरी** स्त्री. १. बलात्कार. २.जुलूम; दांडगाई. ३. (कायदा) एखाद्या माणसाला गती येण्यासाठी, बदलण्यासाठी, बंद होण्यासाठी अंगबळाने कारण होणे; (इं.) फोर्स.
**बळताड** पु. नर जातीचे ताडाचे झाड.
**बळद-त** न.१. धान्य साठवण्याची भिंतीतील पोकळ जागा; कोठार. यात वरून धान्य ओतून खालच्या बाजूला असलेल्या भोकातून ते काढतात. २. भुयार; जमिनीतील पोकळ जागा. ३. लाकडे इ. अडगळ ठेवण्याची जागा. ४. सोवळ्याचे सामान, खरकटे पदार्थ, खरकटी भांडी ठेवण्याची आतून बांधून काढलेली जागा. ५.गुरांची वैरण साठवण्याची जागा. (व.) [क.;सं.बिल]
**बळदणे** सक्रि. सावरणे; भरणे.
**बळपोची** स्त्री. हाताची शक्ती.
**बळभद्र-द्र्या, बळि(ळी)भद्र** पु. १. बळिराम; कृष्णाचा थोरला भाऊ. २. शिवाचा एक गण. ३.(ल.)मजबूत मनुष्य.
वि. (ल.) कपाळकरंटा; कुलक्षणी : 'स्वप्नीचा अनुग्रह गुरु केला शुद्र । तोही बळिभद्र ज्ञानहीन ।'- ब ४६. [सं. बलभद्र]
**बळमोड** पु. स्त्री. (प्राणी, वनस्पती, रोग इ.च्या) शक्तीचा ऱ्हास.
वि. कमजोर; शक्ती गेलेला.
**बळलिक** स्त्री. अशक्तता व आजार: 'ऐकु मनुक्शु एकुणचाळीस वरुसे वेळी बळलिके पडुनु रेंगत होता.'- ख्रिपु २.२७.
**बळवणे** पहा : **बळकावणे**
**बळवंडे** क्रिवि. जबरदस्तीने : 'मज बळवंडें पाप घडवीता:'- वृद्धाचार१.
**बळवाय** पु. दंगा. पहा : **बलवा** : 'प्राणाचे गिऱ्हाईक भेटलियावरी बळवाय आम जाला.'- मइसा ६.३७७. [हिं.बलवा]
**बळस-से** पु. न. जन्माच्या वेळी बालकाच्या, पशूच्या तोंडातून निघणारा पांढरा व चिकट द्रव; नाकातोंडातून निघणारा फेस, मळ.
**बळस खोळणे** जनावर वोपेला येणे; जनावराला संभोगेच्छा होणे.
**बळसट** न. १. घट्ट कफ; चिकट रक्ताचा साकळा. २. कोणताही आजार, रोग, साथ इ.ची मिरवणूक काढून त्यांना गावाच्या वेशीबाहेर पोचवणे.
**बळसोय** स्त्री. बळाचा आविष्कार : 'वृक्षाचेनि घायें मारिले उपाये । ऐसी बळसोय दाखवीत'- नाम ३३९.
**बळाणा** न. बळद. (चि.) - मसाप २.४.३६६.
**बळा(ला)णी** स्त्री. बसण्याकरिता (बाकाप्रमाणे केलेला) चिरेबंदी ओटा. (चि.) - मसाप २.६.३६६.
**बळाधिक** वि. बलाढ्य; बळवंत. (गो.)
**बळार** स्त्री. मोठा बगळा. (गो.)
**बळार्थ** पु. पराक्रम; बळाचे काम : 'वयसा तरी येतुलेवरी । एऱ्हवीं बळाचा बळार्थ करी ।'- ज्ञा ६.२६१.
**बळावणे** अक्रि. बळकट, जोरदार होत जाणे; जोराने, झपाट्याने जोमाने, अतिशयाने वाढत जाणे.
सक्रि. बळकट करणे : 'दाटुनि कीं हो । बळाविला बंध ।'- मोशल्य ३.१७.
**बळावळ** स्त्री. (माणसे, पैसा, सैन्य इ.ची) विपुलता; जोर; शक्ती.
**बळिआ-या** पु. बलवान मनुष्य.
वि. बलिष्ठ; बलाढ्य: 'बापु बळिआ अभिमानु । कांई एकु न करवी ।' - शिव ७४२.
क्रिवि. दृढपणाने.
**बळियाड** न. शिपाई : 'सांचळ होतां बळियाडें । धांवणियासि निघाले।'- देसं ९.
**बळियाडा-ढा** वि. बळकट; बलाढ्य; दृढनिश्चयी : 'पायाचे प्रचंड बळियाडे ।'- कृमुरा २५.८.
**बळियावणे** पहा : **बळकावणे**
**बळिवंडे** क्रिवि. मुद्दाम; बळेच : 'परि बळिवंडें सूइजति । तेया चि माझि।'- ज्ञा ३.२३१.
**बळी** पु. दलदलीत राहणारा एक पक्षी. (को.)
**बळी** स्त्री. रेशमाची पट्टी. (बे.)
**बळी** पु. स्त्री. १. पहा : **बलि-ळी**. २. (ल.) आहुती; होम : 'जीववधें साधूनि बळी। भूत-प्रेत कुळें मैळीं ।'- ज्ञा १७.८०.
पु. कर; पट्टी : 'इतरांची काय कथा? जे देणार त्रिखर्व बळि बागा।' - मोसभा ३.३१.[सं.बलि] (वा.) ० **देणे** - भक्ष्य म्हणून अर्पण करणे. ० **पडणे** - १.भक्ष्यस्थानी पडणे; नाश पावणे; मरणे.२. शरण जाणे (आग्रह, इच्छा इ. ला); प्रतिवाद न करता मान्य करणे.
**बळी** वि. १.बळकट; बळवान : 'एकसरें गिरी धरिला गोपाळीं । होता भाव बळी आम्हीं ऐसा ।'- तुगा ७०. २. बुद्धिबळे खेळण्याचा एक प्रकार; जोरी डाव.
**बळीकरण** न. १. बळकट, निरोगी करणे : 'आता कदर्थवित व्याधि । बळीकरणाचिया आधी ।'- ज्ञा १६.१४१. २. उतार; कमजोर, कमी होणे.
**बळीराणा** पु. प्रसूतीच्या अकराव्या दिवशी करण्याची पूजा.
**बळीहरण** न. १. भूतयज्ञ; देवतांना रोज भूमीवर दिलेल्या भाताच्या मंडलाकार आहुती. या भूमीवर विशिष्ट क्रमाने घालतात. २. (ल.) पोथीच्या समासाभोवती टिप्पणीवजा किंवा चुकीच्या दुरुस्तीसाठी लिहून सर्व पोथी चिताड करणे. (क्रि. घालणे.) [सं.बलिहरण]
**बळू** स्लेटपेन्सिलीसारखा लिहिण्याचा मातीचा तुकडा. [क.]
**बळूखार** पु. एक खार.-मुंव्या १३८.
**बळे** क्रिवि. १. जोर,जुलूम, जबरी, सक्ती यांनी. २. दाटून; बुद्धिपूर्वक; मुद्दाम; जाणूनबुजून : 'उदारपण वानिलें अजि गुरूपहासा बळें ।' - केका ७०. ३. दृढ प्रयत्नांनी. ४. आश्रयाने : 'तरेन तुमच्या बळें

बांधावी कांस आणि कोणाची धरूं नये आस.'- नि ४३१.

**बळेच-चा, बळे(ळ्या)बळे(ळ्या)चा** वि. बळाने काढलेला; ताणलेला; ओढून आणलेला; मनापासून नव्हे असा; कृत्रिम; अस्वाभाविक (अर्थ, वर्तन). [बळे द्वित्व]

**बळेबळे** क्रिवि. ओढूनताणून; कसेबसे; जोर धरून.

**बळोवळी** क्रिवि. एकसारखे; नेटाने : 'क्षिरसागरीं घरडहुळी । देव न करिते बळोवळी ।'- भाए २२२.

**बक्षी-क्शी-ख्शी** पु. १. सेनापती; सेनाध्यक्ष. २. उमेदवारांची शिफारस करून मन्सब देवविणारा. ३. सैन्यातील शिपायांना पगार वाटणारा. [फा. बख्शी]

**बक्षी** न. लवकर तयार होणारी विड्याच्या पानांची एक जात. (नाशिक)

**बक्षीस-शी** न. स्त्री. १. पारितोषिक; इनाम; देणगी (कमी दर्जाच्या किंवा हाताखालच्या माणसाला दिलेली). (क्रि. करणे). २. क्षमा; माफी: 'तिचे पायावर डोई ठेऊन झाले अन्याय बक्षीस करून घेणे.'- ब्रप २८७. ३. (कायदा) दान; देणगी. - घका ४६.

**बक्षीसपत्र, बहालपत्र** न. बक्षीस दिल्याचा लेख.

**बं** अ. शिखाला हाक मारण्याची खूण. [ॐ]

**बंक** स्त्री. १. चौकी; पहाऱ्याची चौकी. २. अटक; पहारा: 'तुला कोठेंही बंक अटक नाही।'-र २६. [फा.बंकी]

**बंकवरी** स्त्री. एक तृणधान्य; वरीचा एक प्रकार.

**बंका** पु. पहारेकऱ्यांची अथवा चौकीदारांची रांग (किल्ल्याभोवतालची): 'बंकीं रिघे तव तया दिसताति बंके.'- र ३९.

**बंकाईत** पु. चौकीपहारा करणारा शिपाई; राजाच्या तंबूभोवताली पहारा देणारा शिपाई.

**बंगई** स्त्री. झोपाळा; पाळणा.(खा.) [हिं.]

**बंगड** स्त्री. १.असडीक, न कांडलेले तांदूळ; करड. २.भाताचा कोंडा. ३. लहान बैलगाडी.

**बंगडी, झाड बंगडी** मध्य आणि काठ यांच्या दरम्यान पैठणीवर काढलेले जरतारीचे नक्षीकाम किंवा वेलबुट्टी.

**बंगला** पु. १. उन्हाळ्यात राहण्याचे घर. २. विलासमंदिर. ३. टुमदार व चारी बाजूंनी मोकळे असलेले, एक किंवा दोन मजली घर. ४.माडीवरील पुढील दिवाणखाना. - स्मृतिचि १.१०. (नाशिक)

**बंगला** पु. उत्तर हिंदुस्थानात होणारी एक विड्याच्या पानांची जात. ही पाने फार तिखट व उष्ण असतात.

**बंगलागाडी** स्त्री. अंबारीवजा छप्पर असलेला जुना रथ. - ऐरापुप्र ९.५१५.

**बंगलाट-ठ** न. १.खोटा आरोप; कुभांड; आळ.(क्रि.घेणे, घालणे, आणणे, उचलणे). २.धाडसाची उलाढाल किंवा मसलत (पैसा मिळवण्याकरिता केलेली).

**बंगलांटी-ट्या, बंगला ठकार** १. कुभांडखोर; खोटे आरोप करणारा. (राजा.) २.खोटे बोलणारा. (गो.) ३. साहसाच्या मसलती करणाऱ्यांशी संबंध ठेवणारा आणि स्वत: त्या करणारा.

**बंगाली** वि. बंगालसंबंधी; बंगाल प्रांतातील (वस्तू इ.). [हिं.]

**बंगाली केळ** केळीची एक जात. गोड व सुवासिक, पिकल्यावर काळसर पिवळा रंग; सालीवर ठिपके.

**बंगाली सन** हा सन मेषसंक्रांतीला सुरू होतो. त्या दिवशी सुरू होणाऱ्या महिन्याला वैशाख म्हणतात. दक्षिणेत यालाच चैत्र म्हणतात. हा सन ख्रिस्ती/इसवी सनानंतर ५९३ वर्षांनी सुरू झाला.

**बंगाले** न. मोठे व लांबोळ्या जातीचे वांगे; ह्याच्या देठाला काटे नसतात.

**बंगाले** न. नक्षत्रमाळा (लग्नात वधूवरांच्या मिरवणुकीत नेण्याच्या).

**बंगाळी** स्त्री. शूद्र लोकांच्या लग्नात वधूवरांच्या मिरवणुकीत उंच काठीच्या वरच्या टोकाला बांधून खाली लोंबते सोडलेले पागोटे.

**बंगी** स्त्री. १. खांद्यावरून सामान इ. वाहण्याची कावड. २. बाहेरगावी रेल्वे-पोष्टामार्फत पाठवण्यासाठी माल भरून तोंड शिवलेला करंडा, पुडके. ३.करंडी; टोपली; पेटारा : 'ममईस इंग्रजाचे वकिलानी काही मेवा वगैरेच्या बंग्या पाठविल्या.'- पुणे अखबार भा ३, पृ. ५८. ४. मुलांना शाळेत पुस्तकें वगैरे नेण्यासाठीं शिवलेली पिशवी.'- गतगो ११५; (इं.) बॅग.

**बंजारी** पु. वणजारी; एक जात व त्यातील व्यक्ती. (व.)

**बंट** पु. १. देवीची प्रतिमा व मोरपिसांचा गुच्छ घेऊन घाडीपण करणारा. २. (ल.) फटिंग. (गो.)

**बंठ्या** पु. गब्रू; लठ्ठ. (व.)

**बंड** न. धरण; बांध; बंधारा. [इं.]

**बंड** न. १. सरकारविरुद्ध उठावणी; दंगा; बैदा. २. टोळी; कंपू. ३. साधुत्वाचे सोंग, ढोंग; थोतांड : 'ज्यासी माझे प्राप्तीचें कोड । तो वांछी बंड । ऋद्धिसिद्धीचें ।'- एभा १५. १८५. ४. पाखांड मत: 'भेदावीं स्वानुभवें वेदांतज्ञे जसीं सुखें बंडें ।'- मोअश्व ३.७७. ५. आघात. - मनको.

पु. १. दंगेखोर; राजद्रोही; पुंड; लुटारू. २. तोतया; खोटे सांगून अधिकार बळकावणारा. ३.आडदांड, हट्टी, खट्याळ, दांडगाई करणारा मुलगा. ४. उन्मत्त, मस्तवाल मनुष्य. ५. खूळ.[फा.बंद]

**बंडखोर** वि. दंगेखोर; राजद्रोही.

**बंड(डे)फरोशी** वि. १. पहा : **बंडखोर.** २. द्वाड; फार त्रास देणारा. [फा.]

**बंडरिण** न. तलाव बांधण्यासाठी काढलेले कर्ज.

**बंडा** पु. १. एका जातीच्या अळवाचा कांदा. २. इटकर; टोला; रोडा. ३. धान्य साठवण्याची जागा. (व.)

**बंडाई** स्त्री. राजद्रोहाची, पुंडाईची, कायद्याविरुद्ध कृत्ये.

**बंडाळ-ळी** स्त्री. १. क्षोभ; हूल; सार्वजनिक अव्यवस्था. २. गोंधळ; दंगल (कामाची, माणसांची). ३. (एकमत नसल्यामुळे, पैशांच्या अभावामुळे) दु:ख, अडचण, ओढघस्ती, तारंबळ, गैरसोय, हयगय. वि. ओढगस्त: 'या नात्याच्या गुंडाळ्यानें गुंडाळुनि बंडाळचि झालो.'- अमृत १६.

**बंडी** स्त्री. एक प्रकारची बैलगाडी; लढे. (ना.)

**बंडी** स्त्री. १. बंददार व घोळ नसलेला कमरेपर्यंतचा अंगरखा; बारबंदी-डी. २. परकर नेसल्यावर डोक्यावरून पदर घेण्याचे वस्त्र.(खा.)

**बंडी** स्त्री. एक प्रकारचा लांब गाडा; दमणी; छकडा; सामानाची गाडी.

ह्याला लहानगड असेही म्हणतात. (व.) [सं. भण्डि]

**बंडी-ड्या** वि. १. बंडखोर; त्यांच्या टोळीचा पुढारी होण्यास सदैव तयार असणारा; नवेच लचांड उठविणारा. २.अवखळ; स्वच्छंदी; हट्टी; दुराग्रही (मूल.)

**बंड्या** पु. टेकडीच्या माथ्यावरील खडक, पठार. [क. बण्डे]

**बंद** पु. १. बांधण्याचे साधन; दोरी; फीत; नाडी. २. बंध; बंधन; मर्यादा; शिस्त. ३.(ल.) बेडी; शृंखला; आळा; कोंडी. ४. अटक; कैद. ५. अंगरखा, बंडी इ. ला बांधण्यासाठी लावलेला कसा. ६. नियम; कायदा; अट; शासन :'...लिहिण्यास कांहीं नियम व बंद असतील असें सांप्रतचे दफ्तराचे स्थितीवरून वाटत नाहीं.'- इनाम ४८. ७. संधी; बोटांचा सांधा; पेरे. ८. देशी कागदाच्या तावाची घडी; दोन वरखी कागदाचा ताव; कागद दुमडल्यावर त्याचे प्रत्येकी होणारे दोन भाग, घड्या. त्यावरून दुबंदी, तिबंदी, चौबंदी इ. ९. (गंजिफांचा खेळ) हातांतील एक रंगातील अगदी खालचा हुकूम; राजा, वजीर यांच्याशिवाय वरच्या दर्जाचे पान. १०. (ल.) जमाव; रांग; टोळी : 'बंद कापिला गोसाव्याचा ।'-ऐपो ३९२. ११.(इमारत.) भिंतीच्या रुंदीचा एक दगड किंवा वीट. (इं.) हेडर. - मॅरट ४६. १२. (बैलगाडी) सुंभाची दोरी. १३. भरती. - शर. १४. एखाद्या उपद्रवाला दैवताकडून प्रतिबंध करणे. (हिं.) [सं.बन्ध; फा. बन्द] (वा.) **भरल्या बंदांत, बंदांखाली बसणे** - १.जाणूनबुजून, नांदत्या घरात, भरल्या घरात बसून, वचन पुरे न केल्यास, खोटे बोलल्यास अनिष्टाचा प्रसंग येणार असे माहीत असूनही शपथ घेणे, वचन देणे इ. २. वचनात बांधले जाणे.

**बंदखण-खाना** पु. बंदीखाना; कैदखाना; तुरुंग.

**बंदख(खु) लास-सी** पु. बंधन, कैद यांतून मुक्तता.
वि. कैदेतून सोडलेला; बंधमुक्त : 'अगोदर... गुलामाची बंदखलासी करून.'- दिमरा १.३०७. [अर.खलास्]

**बंदगी** स्त्री. १. दास्य; सेवा; चाकरी; गुलामगिरी. २. मायन्यातील आरंभीचा स्तुतिवाचक शब्द: 'बंदगीस अर्ज रोशण होय.'- मइसा ६.१५७. ३. वंदन; नमस्कार; सलाम. [फा.]

**बंदगी, बंगी** स्त्री. गाठोडे; पार्सल : 'दोन बंदग्या दालिंबें गुजरली.' - मइसा ७.१३३. [फा.बुन्‍ना,बंद]

**बंद पिन** वस्तू एकत्र बांधण्यासाठी वापरली जाणारी, बंद अवस्थेत टोक लागू नये म्हणून टोपी असणारी लवचिक तार; टोचणार नाही अशी व्यवस्था असणारी पिन. (इं.) सेफ्टीपिन.

**बंदर** न. गलबते इ. काठाला लावण्यासाठी व मालाची चढ-उतार करण्यासाठी सोईची, समुद्रकिनाऱ्यावरील, खाडीतील जागा; धक्का. [फा.] (वा.) ० **करणे**- १. मधल्या बंदरात नांगर टाकून जहाज तात्पुरते थांबवणे. २.बंदरात किंवा कोठेही जहाज नांगरणे. ० **वहाणे** - तुफानामुळे बंद झालेले बंदर खुले होणे, असणे.

**बंदर** न. १. वानर; माकड. २. (ल.) हुशार; धूर्त; चाणाक्ष; डावपेचांत चलाख. [हिं.]

**बंदरकाठ, बंदरकिनारा** पु. समुद्रकिनारा.

**बंदरपकड** स्त्री. (मल्लखांब) एक हात जमिनीवर ठेवून व एका हाताने मल्लखांबास धरून मारावयाची वांदरासारखी उडी - व्याज्ञा ३.६०.

**बंदरवाट** स्त्री. समुद्राच्या, खाडीच्या बाजूने असलेला रस्ता.

**बंदरवाला** पु. वानर, बोकड यांचे खेळ करणारा मुसलमान.

**बंदरसई-ही** वि. इच्छित बंदरात पोचलेला; जलमार्गाने, खुष्कीने बंदरात दाखल झालेला (माल इ.).

**बंदरी** वि. १. बंदरात आलेला; आयात (माल). २. बंदरासंबंधी. ३.हुशार; धूर्त; जाणता. (कु.)

**बंदरी जिन्नस** १. परदेशी माल. २. (सांकेतिक) मासळीचा कुट्टा.

**बंदरीमेवा** बदाम, बेदाण्या इ. सुकामेवा.

**बंदरी वजन** रत्तली वजन.

**बंदलेख** पु. नियम, कायदे यांचा ठरावाचा तक्ता.

**बंदसया** पु. मांडीपाशी हुक्क्याप्रमाणे दिसणारे घोड्याचे एक हाड. - अश्वप २.३१८.

**बंदा** पु. १. दासीची पुरुषसंतती; रखेलीची संतती (गो.). २. आवडता दास; सेवक; गुलाम. ३. दासासारखा वागणारा; देवळी. (गो.) ४. गाणाऱ्यांची एक जात. (गो.) ५.बांडगूळ; बांदी.
वि. उपकृत; मिंधा; उपकारबद्ध. [फा.बन्द]

**बंदा** वि. १. लहान नाण्यात न मोडलेला; अखंड; सबंध (रुपया, मोहोर, अधेली इ.). २. निश्चित; नियमित; ठरावीक; नेमलेली (चाकरी, कर्तव्य, वेतन). [फा.बन्द]

**बंदाटणे** सक्रि. बांधणे.(कर.)

**बंदाटी** स्त्री. १. एक खुजे व झुपकेदार झाड. माशांना घाबरवण्याकरिता हे नदीच्या पाण्यावर आपटतात. (व.) २. बंद; बांधण्याचे साधन. ३. वेळूची काठी. (वा.) ० **घालणे** - (मारकट गाई-म्हशींची धार काढताना) काठीला दोरी बांधून ती त्याच्या शिंगाला अडकवणे.

**बंदाष्टमी** स्त्री. पौष शुद्ध अष्टमी. या दिवशी बनशंकरीचे नवरात्र सुरू होते.

**बंदिश** स्त्री. (संगीत) ख्यालगायनातील स्वर-तालबद्ध गीत.

**बंदिस्त-स्ती** स्त्री. १. सामान्यत: इमारत; इमला. २. रचना; बांधणी; घडण (इमारत इ.ची). ३.व्यवस्थित, नियमित रचना. ४. बंदोबस्त : 'सदर किल्ल्याची व कोटाची बंदीस्ती करून.'- मसाप २.१४०. ५. फाइलसच्या, कागदांच्या पुडक्यांच्या मुखपृष्ठावर अंक, खूण घालून त्यांचे अंकन, हिशेब करणे.
न. ठरावीक वेतन, पगार. [सं.बंध;फा.बंदश्]

**बंदिस्त** वि. १. कुडलेला; गवंडीकामाने बंद केलेला; बांधलेला. २.तोंडाच्या जागी गवंडीकाम असलेली (विहीर, तळे, बंधारा); भोवती भिंती घातलेले; तटबंदी,बांधून सुरक्षित केलेले (घर, आवार इ.). ३.ठरावीक; नियमित; निश्चित. ४. बंद; निगडित; निरुद्ध. ५.तुरुंगात टाकलेला; कैद केलेला. ६. स्त्रीसंभोगरहित; नैष्ठिक ब्रह्मचर्य धारण करणारा. ७. सुव्यवस्थित- रचित- नियमित- शासित (राज्य, सैन्य, संस्था). ८. चोख; चांगल्या रीतीने ठेवलेला, चालवलेला, आटोपलेला (हिशेब, खटले, काम). ९.सुशिक्षित; आकलित; शासित.

**बंदिस्त लेख** पुस्तकातील लेख.

**बंदी** पु. राजादिकांची स्तुती करणारा; स्तुतिपाठक; भाट; वैतालिक.[सं.]

**बंदी** स्त्री. १. अडथळा; प्रतिबंध; मनाई. २. उपरम; बंद ठेवणे; थांबवणे. ३. रतीब; (दूध इ.चा) उकाडा. ४. तुरुंग; कैद; बंधन. (क्रि. घालणे). पु. कैदी; तुरुंगात डांबलेला. [सं.बंध; फा.]

**बंदीखाना-शाळा** पु. स्त्री. कारागृह; तुरुंग.

**बंदीपाल** पु. तुरुंगाधिकारी; (इं.) जेलर.

**बंदीवान** पु. कैदी.

**बंदूक** स्त्री. १. दारूच्या योगाने गोळी मारण्याची लोखंडी नळी किंवा दस्ता असलेले यंत्र; नलीयंत्र. २. तोड्याची बंदूक. [फा.;तुर्की] **० उडणे** - बंदूक पेटून त्यातील गोळी जोराने सुटणे. **० डांभणे** - मारलेल्या जनावराला खाण्यासाठी वाघ परत येईल तेव्हा बंदूक उडावी म्हणून ती त्या मारलेल्या जनावराजवळ पुरणे. **० मारणे** - १. अफवा पसरवणे. २.एखाद्या गोष्टीचा विचार सोडून देणे.

**बंदेज-स** न. वि. पहा : **बंधेज**

पु. बंध; बंदोबस्त: 'राज्याचा खर्चवेच बंदेज बांधून.'- गोबुकै २३. [फा.बंदिश्]

**बंदेश** पु. कुस्तीतील व लाठीतील एक डाव. प्रतिपक्षाचा मार लाठीने बंद पाडून. त्याच्या हातातील लाठी हिसकावून घेणे.

**बंदेशेट** पु. सोनारजातीपैकी लेकवळे. (गो.)

**बंदेस्ती** स्त्री. बांध घालून शेताची व्यवस्था करणे; पेटाऱ्याने - लोखंडी, सुपासारख्या आडताने माती ओढून जमीन सारखी करणे वगैरे.

**बंदोबस्त-स्ती** पु. स्त्री. १. ठरवणूक; ठाकठिकी; व्यवस्था. २. आळा; नियमन; शासन. ३. तजवीज. ४. कैद; शिकस्त. ५. चालीचा व्यवस्थितपणा. ६. मर्यादशील वर्तणूक, आचरण. ७. योग्य मांडणी; सुव्यवस्थित स्थिती; पद्धतशीरपणा. ८. निकाल. [फा.बंदुबस्त्]

**बंध** पु. १. नियम; कायदा; शासन; करार. २. (व्यापक) आळा; निर्बंध. ३. मर्यादा; सीमा; हद्द; इयत्ता. ४. श्लोक लिहिण्याची पद्धती; विशिष्ट आकृतीच्या कोठ्यात विशिष्ट प्रकारे याची अक्षरे लिहितात. उदा. पद्म, वापी, चक्र, गोमूत्रिका इ. बंध. ५. दोरीचा, फितीचा तुकडा; बंद; बांधण्याचे साधन. ६. (मंत्र.)बंधन. ७. (ल.) साखळी; बेडी; अडथळा; विरोध. उदा. मोह-माया-भवबंध. ८. कैद :'तोडावे बंध सबळ सोडावे भूप हात जोडावे।'- मोसभा १.१०६. ९. रचना; बांधणी: 'मुगुटावरी स्तबक । ठायीं ठायीं पूजाबंध अनेक।'- ज्ञा ११.२२०. १०. (योग.) विशिष्ट मुद्रा. उदा. मूलबंध; उड्डियानबंध. ११. (बुरडी) सुपाची सळई व वीण ज्या कामटीने विणतात ती कांब. १२. महाभाष्य. [सं.]

**बंध** वि. अखखा; अखंड; संपूर्ण; सुटा न केलेला.

**बंधन** न. १. गाठ देणे; न हालेसा करणे; बांधणे; जखडणे. २. गाठ दिलेली, बांधलेली स्थिती. ३.निर्बंध; बंद; बंधारण; (शब्दशः व ल.) बंध. ४. लग्नानंतर होणारा वधूवरांचा एक सोहळा. आठ,दस, सोळ, मास या शब्दांना जोडून उपयोग. [सं.]

**बंधनकर्ता** पु. ज्याच्याशी उपकार, करार किंवा शपथपत्र केले आहे असा मनुष्य.

**बंधाटी** स्त्री. १. दोरीचा, चऱ्हाटाचा तुकडा. २. लवचीक फांदी. ३. (सामा.) बांधण्याचे साधन. ४. पावसापासून भिंतीचे रक्षण व्हावे म्हणून गवताने आच्छादलेली काठ्यांची ताटी; तट्टी. ५. छपराचे वासे, गवत वगैरेला आधार म्हणून बांधलेल्या आडव्या काटक्या. [सं.बंध]

**बंधान** न. १. ताबा; सत्ता : 'बंधान राज्याचें चहुंकडे ।'- दावि २१०. २.(ल.) आक्रमण: 'केलें बंधान राष्ट्राचें ।' - दावि १६०. [सं.बंधन]

**बंधानी** पु. तोफखान्यावरील कामगार.

**बंधारण** न. १. कायदा; शासन; कानू; विधी. २. नियम; मर्यादा; ठराव : '... दुमाले गांव किती व नक्त खर्च किती या विषी बंधारण करून...'- इनाम ५०. ३. धारा. (गु.) ४. गोठवण. (गु.) ५.व्यसन. (गु.) ६. पाटा. (गु.) [सं.बंध + धारण]

**बंधारा** पु.१. बांध; धरण; धक्का. २. शेताचा बांध. ३. वाहते पाणी थोपवणे. ४. थोपविले गेल्याची स्थिती. (क्रि. घालणे, करणे, होणे). [सं.बंध]

**बंधु-धू** पु. १.सख्खा किंवा चुलत भाऊ. २. स्वजन; नातेवाईक; आप्त; बांधव; संबंधी. ३. (चुलत, आते, मामे, मावस या शब्दांना जोडून) चुलत्याचा, आत्याचा, मामाचा, मावशीचा मुलगा. ४. सोबती; सवंगडी; सहाध्यायी; सहव्यवसायी. उदा. गुरु बंधू इ. ५. (समासात) संरक्षक; पालक; मित्र; उपकारकर्ता. उदा. दीनबंधू.

**बंधुत्रय** न. मावस-मामे -आतेबंधू असे भावांचे त्रिकूट. [सं.]

**बंधुत्व** न. १. भावाचे नाते. २. पराकाष्ठेचे सख्य; भाऊपणा; मैत्री.[सं.]

**बंधुला** पु. दासीपुत्र. [सं.बंधुलक ]

**बंधुवा** पु. (बायकी) भाऊ; बंधू : 'जरी कृपा आली बंधुवा । तरी एवढें सोडिल।'- ह २.१६५. [हिं.बंधवा]

**बंधे(दे)ज** पु. आळा; धरबंध; आडकाठी.

न.अ.१. अनिश्चित व प्रमाणाबाहेर होणाऱ्या वीर्यस्खलनाचा निग्रह करणारे, वीर्यस्तंभक औषध. २. स्त्रियांपासून पूर्णपणे, पुष्कळ अंशी दूर राहणे; स्त्रीसंगपराङ्मुखता; ब्रह्मचर्य.

वि. १.स्तंभक; निग्रह करणारे (औषध). २. ब्रह्मचारी. [हिं.]

**बंपर** पु. पाणी पिण्याचा पेला. [इं.]

**बंपार** न. ईडलिंबाचे फळ व त्याचे झाड.

**बंपारा** पु. पपनस.

**बंफाळा** वि. ओबडधोबड.(व.)

**बंब** पु.न. बी पेरण्यापूर्वी शेतात उगवलेले एक गवत; मागील वर्षाच्या राहिलेल्या बियांचे उगवलेले रोप. (बे.)

**बंब** पु. १. आग विझवण्याचे, खोलातून पाणी वर काढण्याचे यंत्र. (इं.) पंप. २. संबळापैकी धूम नामक एक भाग. (दुसरा-झील); चौघड्यातील मोठे वाद्य. ३.अपकीर्ती; कुप्रसिद्धी. ४. पाणी तापविणे, रंग साठविणे इ. चे एक विशिष्ट आकाराचे मोठे धातू पात्र. ५. रंग

उडविण्याची पिचकारी : 'धुमधार अनिवार मार भर बंबाच्या फटकाऱ्यांचा.' - ऐपो १९९. ६. धुराई उदा. आगगाडीचा बंब. [हिं बंब, पोर्तु. पॉम्प] (वा.) ० **वाजणे** – फजिती, दुलौकिक होणे; शेवटी काही नाही असे होणे.
वि. स्थूल; लठ्ठ; बळकट; मोठा; अगडबंब.
क्रिवि. कडेपर्यंत; काठोकाठ; पूर्व; तुडुंब

**बंबमहादेव** उद्गा. भिक्षा मागताना म्हणण्याचा गोसाव्यांचा शब्द.
वि.(ल.) दांडगा (मनुष्य).

**बंबाड** वि. पुष्कळ. (व.)

**बंबा(भा)ळ–ळे** पु.न.१. समुदाय. २. गोंधळ; गर्जना. ३. भपकारा. ४. मोठा, जोराचा प्रवाह.

**बंबाळ** वि. १. जंगी; अफाट; अजस्र; मोठा. २. उधळपट्टी करणारा; उधळ्या. ३.(रक्ताने) भरलेले. ४. तेजोमय; लखलखीत: 'पांचही दिवटिया बम्बाळ।'–मुआ १४.१४९.

**बंबाळी** स्त्री. १. जंगीपणा; अफाटपणा; विस्तृतता. २. पराकाष्ठेचे वैपुल्य; (मेजवानीच्या वेळची अन्नाची) चंगळ. ३. धुमश्चक्री; धुमाळी; स्वैर वर्तन. ४. बेपर्वाई; चैन; उधळपट्टी (खर्चाची).

**बंबुऱ्या, बंबू–ब्या** पु. (ल.) पुरुषाचे जननेंद्रिय.

**बंबू–ब्या** वि. मूर्ख; वेडा.

**बंबूचा खिळा** बोंड, माथा असलेला खिळा; गुलमेख.

**बंब्या** पु. बंद केलेल्या, शिवलेल्या पोत्यातील धान्य, माल यांचा नमुना पाहण्यासाठी उपयोगात आणण्याचे साधन. याला लाकडी मूठ असून पुढे टोकदार व पन्हळ असलेला लोखंडी भाग असतो.

**बंब्या** वि. १. ठोंब्या; धष्टपुष्ट पण विद्यारहित. २. बंबू.

**बंभर** पु. भुंगा : 'पीतां मरंद उदरंभर बंभराचें ।'- र ९.[सं.भ्रमर अपभ्रंश]

**बंभोला** पु. ब्रह्मरूपी भोळा शंकर; गोसाव्यांचा म्हणण्याचा जयघोष.

**बा** स्त्री. आई; म्हातारी स्त्री. (गो.)

**बा** पु. १. बाप; जनक; वडील.(कुण.) २.(लहान मुले किंवा तरुणांसाठी प्रेमाने योजण्याचे) संबोधन. उदा. बाबा! बा ! ३. बहुमान दर्शवणारा, मनुष्य, देव यांच्या नावापुढे जोडण्याचा शब्द, प्रत्यय. उदा. गणोबा, विनोबा. ४. थट्टेने पण आदरपूर्वक नामाला जोडण्याचा प्रत्यय. उदा. वाघोबा, नागोबा इ.[सं.पाद –श्रेष्ठतादर्शक पदवी. उदा. गोविंदपाद] (वा.) **मागून पुढून बाच नवरा** – १. मुलाचे लग्न करण्याची वेळ आली असताना स्वत:चेच लग्न लावणाऱ्या विधुर बापाबद्दल योजतात. २. (ल.) आपमतलबी मनुष्य.

**बा** स्त्री. भुरळ; ध्यास. (झाडी) [सं.भ्रम]

**बाआगळा** वि. (त्यापेक्षा) वरच्या दर्जाचा; अधिक चांगला; उत्तम.

**बाइट** (संगणक.) संगणकात साठवल्या जाणाऱ्या माहितीच्या स्मृतीचे एकक. [इं.]

**बाइणी** स्त्री. कर्जाच्या परतफेडीची मागणी; वायदा; तगादा : 'जैसा समर्थु आणि ऋणिया मागों आला बाइणिया ।'- ज्ञा १८.२५२. [सं.विभानु]

**बाइलीचे पान** विड्याच्या पानाची एक जात.

**बाई** स्त्री. १.स्त्रियांच्या नावापुढे आदरार्थी लावण्याचा शब्द. २. वडील जाऊ; मोठी बहीण; आई; परकी प्रतिष्ठित स्त्री. ३. स्त्रीशिक्षक; मास्तरीण. ४. मैत्रीण; सखी. ५.(बायकी) पादपूरणार्थक उद्गार. ६. (ल.) रखेली.
स्त्री. अव. अंगावर उठणाऱ्या देवी; फोड्या. (क्रि. येणे) [सं.भगवती, भवती]

**बाईबटा** वि. बाई, बेटा अशा नावाने हाक मारण्याइतपत लाडके, प्रीतीचे निदर्शक नाव : 'लाडकी माही लेक चुलत्याची बाईबटा भरला खाज्यांनीं ओटा '- लोसाको. (व.)

**बाईबाई** उद्गा. (बायकी) आश्चर्य, जिकीर, कमाली दाखवण्याचा उद्गार.

**बाई(य)ल** स्त्री. १. पत्नी; बायको; लग्नाची किंवा पाटाची स्त्री. २. रखेल; ठेवलेली स्त्री; रक्षा. [सं.वापिका] (वा.) **बायलेक येवप** – तारुण्य प्राप्त होणे. (गो.) **बायलेचो भावोजी** – बाईलवेडा. (गो.)

**बाईलकाम** न. बाईचे, गृहिणीचे काम; घरकाम.

**बाईलकाम्या** वि. केवळ घरकाम किंवा बायकी काम करणारा, त्यात हुशार असणारा (पुरुष).

**बाईलखाट्या–द्या** वि. १.स्त्रीलंपट; अतिसंभोगी; रंडीबाज. २. ज्याच्या पुष्कळ बायका मेल्या आहेत असा.

**बाईलगाठ** स्त्री. बायकी, सामान्य, साधी गाठ.

**बाईलपिसे–वेड** न. अत्यंत स्त्रीलंपटता, संभोगाबद्दलची आसक्ती; रंडीबाजपणा.

**बाईलबडगा–भिडंग** पु. न. (व्यापक अर्थी) मुलेबाळे, गुरेढोरे, चीजवस्तू इ. मोठे कुटुंब, खटले, पसारा.

**बाईलबदा–बांध्या–बुद्ध्या** वि.बायकोच्या तंत्राने चालणारा; स्त्रीवश; बायकोचा गुलाम असणारा.

**बाईलबुद्धी** स्त्री. १. बायकी ज्ञान, अक्कल, समजूत. २. बायकी मसलत, सल्ला, बेत, विचार. ३. (ल.) कोते व अपरिपक्व विचार.

**बाईलभाड्या** वि. बायकोवर पैसे, नोकरी मिळवणारा.

**बाईलमाणूस,बाईमाणूस** न. १. बाई; स्त्री. २. रंडीबाज. ३. षंढ; नपुंसक.

**बाईलमाऱ्या** वि. १. बायकोचा जीव घेणारा. २. पहा : **बाईलखाट्या**२

**बाईलवेडा–पिसा–भुला** वि. १. स्वत:च्या बायकोचा आसक्त. २. रंडीबाज.

**बाईस** स्त्री. कारण. [अर.बायेस]

**बाउ(हु)ली देणे** दुष्कृत्याला प्रवृत्त करणे, प्रोत्साहन देणे, भर देणे : 'राजीयास बाउली देऊन मग राज्यास धक्का द्यावां.'- पेद ३०, पृ.५७.

**बाऊ** पु. भीतिदायक वस्तू; लहान मुलांना ज्याची भीती वाटते अशी कोणतीही वस्तू, प्राणी इ. उदा. साप, विंचू, बागुलबोवा इ. (वा.) **० करणे, करून ठेवणे, सांगणे, दाखवणे** - भीती घालण्यासाठी हलकी गोष्ट फुगवून सांगणे.

**बाऊट** स्त्री. वृक्षाची सावली; ढगाची छाया; आभुट. (कु.)

**बाऊल** पु. १. रानमांजर; जंगली मांजर. २. पहा: **बाऊ**

**बाऊस** न. खांदा; बाहुमूल; बाहुवटा; बाहुटा. [सं.बाहु]

**बाऊळ** स्त्री. डोंगरावर, खडकावर बरीच माती असलेली सखलवट व फक्त भातपिकाची जमीन.हिची भाजावळ करावी लागते; बावीळ; खारी. (राजा.)
न. नदीकाठची भाजी–पाला करण्याची मळईची जमीन. (कु.)

**बाएस** स्त्री. बायको; पत्नी. (राजा.,चि.)

**बाक, बांक** पु. न. १.वक्रता; वळण; वाकण; वाक. २. डोंगरावरील वळणे असलेला रस्ता. ३. (ल.) भांडण; मनातील तेढ; बिघाड; बेबनाव. ४.एक प्रकारचा खंजीर; पिस्तुलाचा एक प्रकार.[सं. वक्र; हिं. बांक] (वा.) ० **काढणे** – वाट काढणे; उपाय शोधणे : 'येविसी पूर्वीच विनंती केली होती की हरएक जागीं मसलतशीर करून बांक काढावी...'– शिप्रब. पृ. ११३.

**बाक** पु. न. बसण्याची लांबट, ठेंगणी चौकी; बसण्याचे साधन. [स्वीडिश, जर्मन बांक; पोर्तु. बँको]

**बाक** स्त्री. आरोळी; (कोंबड्याचे) आरवणे. (घाटी)

**बाक देनं, वढनं** शोभून दिसणे. (अहि.)

**बाक** न. नदीच्या भाटीवर होणारे दाट पानांचे एक झाड.

**बाककांड** न. उलंडीचे आडवे, लांबट लाकूड.

**बाकडा** वि. धाडसी; साहसी; बाका; दंडेल; उरफाट्या काळजाचा; भीती न बाळगणारा; दबला न जाणारा.

**बाकणे** अक्रि. १. वाकणे; बाक येणे, असणे; खाली झुकणे; ओणवे होणे; नमणे. २. (ल.) बेमुर्वतखोरपणे वागणे; मित्रत्व सोडून असणे; वाकडे अगर वैमनस्य असणे. (वाक्यात या क्रियापदाला 'ऊन' प्रत्यय लागून पुढे दुसरे क्रियापद येते. उदा. बाकून असणे– वागणे– चालणे इ.). [ हिं. बांकना]

**बाकबुक** स्त्री. धाकधूक; छातीत धडधडणे. [ध्व.]

**बाकर–रा–रा** वि. जरा; थोडे; थोडा वेळ. (चि.,को.)

**बाकरवडी** स्त्री. खोबरे, कोथिंबीर, तीळ इ. चे सारण घालून केलेली बेसनाची चिरोट्यांच्या आकाराची तिखट वडी; पक्वान्न; करंजी.

**बाकरू** पु. विनोद : 'तुजसी केला बाकरू।'– धवळे उत्तरार्ध १०.

**बाकस** स्त्री. चिपाड; चोईटी; चोथा : 'रस चोखून घेईजे । बाकस थुंकोनि सांडिजे ।'– एरुस्व १४.१२८.
वि. नि:सत्त्व; रसहीन; बेचव; कमजोर; निकस; गुणहीन.

**बा(बां)का** पु. कर्णा नावाचे वाद्य; काहला. [सं.वक्र]

**बाका–का** वि. १. धाडसी; शूर; धीट; पटाईत. २. आणीबाणीचा प्रसंग. ३. बळकट; असाध्य; अवघड. [हिं.]

**बाकाईत, बाकेकरी** पु. कर्णा वाजवणारा. ( हा देवळात किंवा राजा अथवा मोठ्या माणसाजवळ असतो.).

**बाकाबाकी** स्त्री. भांडण; तंटा; बोलाचाल.

**बाकाळी–ळ** स्त्री. एक रानटी फुलझाड; बकाळ.

**बाकी** स्त्री.१. शेष; शिल्लक. २. उरलेली, शिल्लक राहिलेली रक्कम; शिल्लक भाग.[अर.] ( वा.) ० **ओढणे** १. कर्जाची देणे असलेली रक्कम मागील वहीवरून चालू वहीवर घेणे. २. अडखळत बोलणे.(व.) ० **ठेवणे** – मर्यादेत असणे; ताब्यात राखणे.० **न ठेवणे** – भीड-मुर्वत न ठेवणे; मर्यादा न राखणे; सर्व काही करून चुकणे.
वि. राहिलेला; उरलेला; आणखी.

**बा(बां)की** स्त्री. लहान कर्णा.

**बाकीदार** वि. ज्याकडे येणे बाकी आहे असे (कूळ, रयत).

**बाकीसाकी** स्त्री. शिल्लक (रक्कम).

**बाकुटणे** अक्रि. कोमेजणे; सुकणे; टवटवी नाहीशी होणे. (राजा.)

**बाकुल** पु. फोक; फांदी. (व.)

**बाकू** पु. तांबडा बगळा. (गो.) [सं.बक]

**बाकेराव** वि. बढाईखोर; फाकडा; डौलाने वागणारा, चालणारा.

**बाक्का** वि. चांगला. (झाडी) [हिं.बांका]

**बाखड** न. बासरी. (व.)

**बाखर** पु. १. पहा : **बाकर.** २. पाटवडीत, करंजीत भरण्याचा मसाला; मक्याचे दाणे किसून केलेली उसळ किंवा कोहाळ्याच्या मोठ्या फोडींची मसालेदार भाजी. (व.)

**बाखरवडा** पु. हरभऱ्याच्या पिठाचे सारण घालून तळलेला वडा. (व.)

**बाखल्ल–ल्ले** न. अडगळ ठेवण्यासाठी भिंतीत किंवा भिंतीखाली ठेवलेली पोकळ जागा; बळद; अंबार. (गो.)

**बाखळा** पु. जादूचे सामान. (व.)

**बाखूल** न. मोठी चिंच. (व.)

**बाग** न. बाक; वळण; वक्रता; लवण: 'फडा पुच्छ वांकुडा बाग ।'– एभा १२.३८३. [सं.वक्र]

**बाग** पु. स्त्री. लहान मुलांना खेळण्यासाठी, माणसांना फिरण्यासाठी वगैरे फुलझाडे लावून, विशेष रचना करून तयार केलेली रम्य जागा; बगीचा; उद्यान; उपवन; मळा.
न. १. माडांचे भाट; नारळीचे आगर. २. पुणे येथील मंडईतील गाळेवाले दरवर्षी फाळापट्टीने करतात ते एक जेवण. [फा. बाघ्] (वा.) ० **कापणे** – नुकसान करणे. ० **पाडणे** – बागेतील सर्व माडांवरील नारळ काढणे.

**बाग** पु. १. मार्ग; वाट; रीत : 'निगें ऐसा बागु पडतां कां देवा ।' – अमृ ४६८. २. बाजू : 'जासलट होईजे जेण्हें आगें । तेयासी बैसक तेव्हेंचिबले।' – विसिं १६.७४ [क. बगे = रीत, मार्ग]

**बागई** वि. लहान–मोठे : ' तर्फ नांदगांव मरूड येथील बागई घरटिपेची पाहाणी.'– वाडबाबा १.२०९.

**बागट** न. तलवारीला तुच्छतादर्शक शब्द.

**बागड** न. पु. मिसळण. (व.)

**बागडणे** अक्रि. आनंदाने नाचणे; उड्या मारणे; (कुत्री–मांजरीची पिल्ले इ. चे) खेळणे. [वैसं. वल्गूय; सं. व्याघुय्य]

**बागडा** वि. १. खेळकर; नाचणारा; उड्या मारणारा : 'वेडीं बागडीं भाविकें भणगें।'– मुसभा ७.१०. २. कुबडा: 'एक वेडे बागडे दिघडे'– वच्छाह २८६. [सं. व्याघुच्च]

**बागडा** वि. शेलका; वेचक; उत्कृष्ट : 'बारारी घोड्यामधी:... वेडाबागडा :'– ओवी.

**बागडिया** न. गाणे; गीत: 'दिंडी पताका मकरंद । नाना बागडियांचे छंद।'– ज्ञागा २२१.

**बागडी** स्त्री. चेष्टा; चाळे; क्रिया; खेळ; क्रीडा; सोंग : 'पायां पडती वेंगडी । हात वळती मुरकंडी । बरवेपणा बागडी । नाचविजैल ।'– ज्ञा १५.५७०. पु. माकडाचे खेळ करणारा इसम; बहुरूपी.

**बागडोर** पु. लगाम; कासरा. (व.) [हिं]

**बागणे** अक्रि. वाकणे; खाली लोंबणे; नम्र होणे : 'बागल्या फांद्या खालीं ।'–वलो २१. [सं. वक्र]

**बागदार** स्त्री. १.गुप्ती. २. विळी. [फा.]

**बागधारी** स्त्री. घोड्याची चाल. – अश्वप १.१९४.

**बागनेट** स्त्री. बंदुकीला खोचण्याची संगीन. [इं. बायोनेट]

**बागबगी(गि)चा** पु. फुलबाग; मळा; आगर. [फा.बाघ्]

**बागलकोटी** वि. बागलकोट येथील (रुपया, नाणी, वस्त्रे).

**बागला** पु. गलबताचा एक प्रकार.

**बागवान–ला** पु. १.बागाईत करणारा माळी; बागेचे काम करणारा. २. फुले, फळे, भाजी इ. तयार करून व विकून त्यावर आपला निर्वाह करणारी जात. ३. एक मुसलमानांची जात (बाटलेली). –के ३.६.१९४१. [फा.]

**बागशाई** स्त्री. घराभोवती केलेली लहानशी बाग.

**बागा** पु. १. आकार; मार्ग; कृती : 'जाणिजे आचरितेनि बागें ।' – माज्ञा ३३.२४४. २. संबंध : 'परि वोघाचेन मेळें ।... तोय बागें ।' – माज्ञा १५.३३८. [क.बगे]

**बागा** पु. वेश. (झाडी) [हिं.]

**बागाठी** स्त्री. बकोटी : 'टवकारिला पर्णकुटी । उचलोनिया बागाठी ।'– भारा बाला २२७.

**बागाय(ई)त** स्त्री. न.१. विहिरीच्या किंवा पाटाच्या पाण्यावर केलेली फुलझाडांची, फळझाडांची, भाजीपाल्याची लागवड;बागेतील उत्पन्न. २.पाटस्थळ; बागेची जमीन; लागवडीला योग्य जमीन. [फा.बाघात्, बाघ् अव.]

**बागाय(ई)तदार** पु. बागांची लागवड करणारे, बागांचे मालक.

**बागायती** वि. १. फळझाडे व भाजीपाला यांची लागवड केलेली किंवा लागवडीला योग्य असणारी जमीन. २. सभोवार पुष्कळ बागायत जमीन असलेला (गाव). ३. बागाईत जमिनीवर काढलेले (पीक). ४. बागेच्या जमिनीसंबंधी.

**बागी** स्त्री. वळण; बाक.

**बागी** वि. बंडखोर; स्वामिद्रोही; उपद्रवी; दरोडेखोर. [अर.बाघी]

**बागीबळ** न. कंप; कापरे 'माथा आदरी सिरें । बागीबल ।'– माज्ञा १३.७५७.

**बागीव** वि. वाकलेला; वाकडा.

**बागीवणे** सक्रि. वाकवणे.

**बागुरडा** पु. एक किडा; झुरळ.

**बागुल** पु. स्वंथ. (व.)

**बागूल** पु. रानमांजर; बाऊल.

**बागूल, बागुलबु(बो)वा** पु. १. मुलांना भीती दाखवण्यासाठी कल्पिलेला एक भयंकर प्राणी किंवा त्यासाठी उभा केलेला पुतळा, आणलेले सोंग. २. (ल.)पोकळ भीती. ३. बागूल, बगुल्या इ. लहान मुलांचे प्रेमाने ठेवलेले टोपण नाव. [स्लाव्हानिक बोगु = देव, बग् = भूत]

**बागे** क्रिवि. योगाने; मुळे : 'विधीचेनि बागे :'– ज्ञाप. ८२६.

**बागेश्री, बागेस(श्र)री** स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय मध्यरात्र.

**बागेसरी** स्त्री. सोनाराची शेगडी : 'मध्वनाथ म्हणे बागेसरीपुढें । सेनें बरवें कुडें निवडतें ।'– मध्व ४९८. [सं.व्याघ्रेश्वरी] (वा.) ० **धारजणी असणे** – विशेष परिश्रम किंवा बुद्धिमत्ता यांच्याशिवाय श्रीमंत होणे.

**बागोंवचे, बागौंचे** सक्रि. वाकविणे. (गो.) [सं.वक्र]

**बाग्या** वि. मूर्ख; कोणाकडूनही सहज फसणारा; भित्रा. (व.)[हिं. भागना]

**बाघेकरी** वि. पूर्वापर काही हक्कसंबंध नसून नवीन येऊन गावात राहिलेला; वतनदार नसणारा; उपरा.

**बाघोडा** पु. मुलांचा एक खेळ.

**बा(बां)च** पु. १. भयाची धडकी; भीती; दरारा. (क्रि. खाणे). २. आदरयुक्त भीती; दरारा. (क्रि. खाणे, घेणे).

**बाच(चु)कणी** स्त्री. एकदम भीती घेणे; दचका; गोंधळात पडलेली स्थिती; बुचकळ्यात पडणे.

**बाच(चु)क(ट)णे** अक्रि. घाबरणे; दचकणे; भीती, दरारा, तिटकारा इ.चा परिणाम मनावर एकदम होणे; गोंधळात, बुचकळ्यात पडणे; चकित होणे; बिचकणे.

**बाचकुटणे, बाचु(चो)टणे** अक्रि. १.नासणे; कुजणे; बिघडणे; आंबणे (फळे, दूध, खाद्यपदार्थ). २. कुपथ्यामुळे दुखण्याचा प्रकोप होणे; एखाद्या विकाराने इतर अवयव अधिक दुखणे.

**बाचके** न. १. रुंद तोंडाचे गाडगे, मडके.(माण.) २. गाठोडे; बाजके; बोचके. ३. लहान पोते, गठ्ठा.

**बाचट, बाचटणे** पहा : **बाचोट, बाचेटणे**

**बाच(स)टु** पु. १. धक्का. २. (ल.) परिणाम; टोला : 'या बोलाचा बाचटु । न सांहेच उद्धवदेव सुभटु ।'– भाए ७१.

**बाचडा** पहा : **बासडा**

**बाचणूक, बाचणी** स्त्री. १. कज्जा; कलामत; बाचाबाच. २. बरळणे; भलतेसलते बोलणे; बडबड. [सं.वाक्, वच्]

**बाचणे** अक्रि. १. भांडणे; आरडाओरड करणे; तंडणे; खडाजंगी करणे. २. बरळणे; बावचळणे; असंबद्ध बोलणे. [सं. वच्]

**बाचरट–ठ, बाचारा** वि. बडबड्या; बोलका; पाल्हाळ लावणारा; बोलण्यात ताळतंत्र नसलेला.

**बाचळ(ल)णे** अक्रि. १. देहभान विसरणे; गोंधळून जाणे; शुद्धी न राहणे. २. निसवणे; स्वच्छंद व बदफैली होणे. ३. झोपेत बरळणे; अद्वातद्वा बोलणे. [सं.वाचाल]

**बाचाबाच–ची** स्त्री. जोराचे भांडण; हमरातुमरी; वाग्युद्ध; उत्तर-प्रत्युत्तर.

**बाची** स्त्री. लाकूड तासण्याची तासणी; वाकस. (बे.)

**बाचो(चू)ट** न. १. कुपथ्य; अपथ्यकर खाणे. २.कुपथ्याचा दुष्परिणाम; कुपथ्याने वाढलेला विकार. ३. (धुरामुळे) दृष्टीचा मंदपणा.

**बाज** स्त्री. १. खाट; खाटले; बाजले. २. पलंग. (गो.) [सं. वह्]

**बाज** पु. पहा : **बाच** :'बंड मनुष्यें आणील बाजा (खाटा)। मार देतील टाकून बाजा (भीती)।'- अफला २४.

**बाज** पु. बहिरी ससाणा; श्येन पक्षी. [फा. बाझ]

**बाज** पु. पीक (विशेषत: फळे, फुले यांचे); बहार; बहर; बार. [वै.सं. वाजयति]

**बाज** न. (नाविक) तीन ते पाच शिडे असणारे गलबत. (हेट.)

**बाज** न. तंतुवाद्यातील मुख्य तार. या तारेवर डाव्या हाताची बोटे ठेवून वाद्य वाजवतात. [सं.वादन]

**बाज** स्त्री. तबला, सारंगी वगैरे वाजवण्याची पद्धत, सारणी.

**बाज** प्र.कर्तृत्व दाखवणारा प्रत्यय; करणारा. हा हिंदी व फार्शी शब्दांना लागतो. उदा. दारू- कुर्रे-दगल-बाज. [फा.बाझ]

**बाज** क्रिवि. पुन्हा, फिरून. [फा.बाझ] (वा.) ० **खाणे** - झोके, पलटी, हिसके खाणे : 'चहूंकडील राजकारणें येऊन बाज खात आहेतच' - पेद ३८.१३५. [फा.बाझ]

**बाजई** स्त्री. विहिरीच्या बगाडावर थारोळ्याला लावलेल्या दगडी तुळ्या किंवा लाकडी खांब; माचाडाचा आधार.
अ. बाजू. (व.)

**बाजके** न. लहान गाठोड्यासारखा बांधून, बंद करून पाठवायचा किंवा आलेला माल. पहा : **बाचके** २

**बाजगीर** पु. कर वसूल करणारा.

**बाजट-ले** न. लहान खाट.

**बाजट** वि. अहंकारी.

**बाज(झ)णे** अक्रि. बहार पीक येणे; फळे धरणे; फुलणे.(को.)

**बाजणे** अक्रि. ईर्षा, चुरस पडणे : 'रत्नाकर विठ्ठल याची व आमची बाजली आहे.'- पेद.

**बाजरवाडा** पु. अफूचे पीक काढण्यापूर्वी ज्या जमिनीत बाजरीचे पीक काढतात ती जमीन.

**बाजरा-री** पु. स्त्री. बाजरीच्या मोठ्या दाण्याला बाजरा व लहान दाण्याला बाजरी म्हणतात; एक खाद्य धान्य; सजगुरा. [हिं.]

**बाजले, बाजवट** न. १. लहान खाट. २. बाजेची दोरी.
(वा.) **बाजल्यात पाय घालून उलटे बाजले करणे** - खाटमार करणे. (खाटमार हा होळकरांच्या दंग्यात छळाचा प्रकार म्हणून विशेष प्रसिद्धीला आला). अतिशय शारीरिक छळ करणे.
पु. चौरंग. (को.)

**बाजवट** पु. बाजूबंद.

**बाज(झ)वट** वि. भरपूर पिकणारे; बहारदार; खूप फळणारे (झाड, पीक). (को.)

**बाजवाला** पु. वाद्य वाजवणारा.

**बाजसुपवती** स्त्री. खाट आणि गादी : 'बाजसुपवतीएवरि पहुडु जाला'- लीचपू २६.

**बाजा** पु. १. वाद्ये वाजवणे; सूरसनई, समेळ इ. वाद्यांचे एकदम वादन किंवा गजर. २. बेंडबाजा. [सं.वाद्य; हिं.] (वा.) ० **करणे** - बोंब मारणे; ओरडणे.

**बाजागारी** स्त्री. १. जादू; गारूड. २. लबाडी; धूर्तता.

**बाजाची पेटी** (संगीत) एक सर्वपरिचित, लांबट, खोक्याच्या आकाराचे, पट्ट्या व रीड्स असलेले, हवा भरण्यासाठी भाता व सोडण्यासाठी खुंट्या (स्टॉप्स) असलेले वाद्य; (इं.) हार्मोनियम.

**बाजार** पु. १. जेथे दुकाने मांडून खरेदी-विक्री चालते ते स्थान; मंडई; हाट; पेठ; गंज. २. खरेदी-विक्रीसाठी जमलेला समुदाय. ३.(ल.) प्रसिद्धी; बोभाटा; बभ्रा; गवगवा. ४. (ल.) गोंधळ; पसारा; अव्यवस्था; अव्यवस्थित कुटुंब, घर; कलकलाट. (क्रि. मांडणे, करणे, भरणे).५.(ल.) मासळी. (कु.) [फा. बाझार] (वा.) **०भरवणे** - अनेक माणसे (ज्यांचा उपयोग तर नाही, पण ज्यांच्यामुळे घोटाळा तर होतो अशी) एके ठिकाणी गोळा करणे. **बाजारच्या भाकरी भाजणे** - नसत्या उठाठेवी करणे; संबंध, फायदा नसताना इतरांची कामे करणे. **उभ्या,भर बाजारात** - सर्वांसमक्ष (जाहीर करणे). **गेला बाजार तरी** - किमानपक्षी; निदान; कमीत कमी. **वेड्यांचा बाजार पिकणे** - सर्वच मूर्ख माणसे जमणे.

**बाजारअफवा-अवाई-गप्प-बातमी** स्त्री. निराधार बातमी; कंडी; चिलमी गप्प. [फा.बाझार + अर. अफवा, अदवाई गप्प]

**बाजारकरी** वि. बाजारात विकणारा किंवा विकत घेणारा; दुकानदार; गिऱ्हाईक.

**बाजारखोर** वि. जगाला तमाशा दाखवणारा; खाजगी गोष्टी चव्हाट्यावर आणणारा. [फा.]

**बाजारचलन-नी** वि. बाजारात चालू असलेले, चालणारे (नाणे).

**बाजारधारणा** स्त्री. बाजारभाव; बाजाराचे धोरण.

**बाजारनिरख** पु. बाजारभाव; बाजारातील दर.
वि. अट्टल; बिलंदर.
क्रिवि. जाहीरपणे; सर्व लोकांत गाजावाजा करून, बेइज्जत करून. (नेहमी वाईट अर्थाने उपयोग.). (क्रि. करणे.).

**बाजारपट्टा** पु. (गुळाची अडत) कसर; दरशेकडा साधारणत: १२ आणे-प्रमाणे कापलेली रक्कम.

**बाजारपेठ-डा** स्त्री. पु. बाजार भरण्याची जागा; जेथे ठेवलेला माल लवकर खपतो, विकला जातो ते ठिकाण.

**बाजारफसकी-गी** स्त्री. बाजारात विक्रीसाठी येणाऱ्या मालावरील सरकारी पट्टी (पसाभर धान्य घेणे).

**बाजारबट्टा** पु. प्रमाण मानलेल्या नाण्याशी बाजारातील इतर नाण्यांचे दर, प्रमाण.

**बाजारबसका** पु. बाजारातील दुकानांवरील कर. - वाडमा ९.७०.

**बाजारबसवी-बसणी-बुणगी-बुंदगी, बाजारची खाट, बाजारीण** वि. वेश्या; कसबीण. [फा. बाझार+क. बसवि]

**बाजारबसव्या** वि. (ल.) निर्लज्ज; अडाणी व दांडगा; शिवराळ व भांडखोर; असभ्य.

**बाजारबुणगे** न. १. फौजेबरोबर असणारे दुकानदार इ. गैरलढाऊ लोक, कतवार. २. कामाशिवाय जमलेला लोकसमुदाय. ३. (ल.) फटकुऱ्यांचा अगर चिंधोट्यांचा गठ्ठा; सामग्री. [फा. बाजारबुनाह;]

**बाजारबैठक** स्त्री. बाजारातील किंवा यात्रेतील दुकानांवरील कर.

**बाजारभरणा–ती** पु. स्त्री. १. बाजारात फक्त ठेवण्याच्या उपयोगाची, कुचकामी वस्तू; खोगीरभरती. २.(ल.) नीच व निरुपयोगी मनुष्य.

**बाजारभाव** पु. बाजारात चालू असलेला दर.

**बाजारवाडा** पहा : **बाजार** १,४

**बाजारशिरस्ता** पु. बाजारातील सामान्य वहिवाट, चाल, रिवाज (दर इ. चा).

**बाजारहाट** स्त्री. १.बाजारपेठ. २.बाजारखरेदी.

**बाजारी** वि. १.बाजारासंबंधी; बाजारचा. २. ऐकीव. ३.(ल.) ४. सामान्य; साधारण; भिकार; वाईट(वस्तू).

**बाजारू** वि. केवळ पैशासाठी काहीही (चांगल्या–वाईटाचा विचार न करता) करण्याची वृत्ती असणारा; भाडोत्री वृत्तीचा (माणूस);नीच; हलकट; लुच्चा.

**बाजांगूळ** स्त्री. न. (को.) पहा : **बांडगूळ**

**बाजिदी** स्त्री. लाचारी; दीनपणा.

**बाजिंदा** वि. १.खेळाडू; लुच्चा; हट्टी; खोडकर : 'रडे एकचि हा हरि मोठा बाजिंदा।'– निर्गुणाचा पाळणा. २. धूर्त;निष्णात; निपुण; फसवणूक करणारा. (निंदार्थी) फर्डा; बहाद्दर; जहाँबाज. ३. बजवय्या. [फा.बाझन्दा]

**बाजी** स्त्री. १. पत्ते, गंजिफा, सोंगट्या यांचा खेळ, क्रीडा. २. (ल.) सरशी; बाणा; बाजू; डाव. ३. (पत्त्यांचा खेळ) रंग; बाजू. ४. हात किंवा वाटलेले पत्ते; जिंकलेला डाव. ५. खेळाची समाप्ती. ६. (ल.) मसलत: 'यासाठीं अवघ्यांनीं साहित्य पुरवून बाजी सेवटास न्यावी.'– पेद ५.२४. ७. (ल.) बाणा. ८. घोड्याची एक चाल. (क्रि. धरणे, चालणे, येणे, जाणे, उभारणे). ९. (ल.) सवय, व्यसन अशा अर्थी शब्दाला जोडून उपयोग. उदा. दारू–सट्टे–बाजी इ. [फा.बाझी] (वा.) ० **अंगावर येणे, देणे** – हरणे, हरवणे. ० **वोछा पडणे** – अब्रू जाणे; जय, यश हातून निसटणे. ० **शिरे करणे** – आपली सरशी करणे; आपला पक्ष प्रबळ करणे. **बाजीस चालणे** – बाजूस, बरोबर, परिवारात चालणे.

**बाजी** पु. १. एक नाव. २. धनगराला मारण्याची हाक. (कु.)

**बाजीकार** वि. १. कर्ता; उत्पादक : 'सर्वांचे सम्मते या करण्याचे बाजीकार रघुनाथ बिडवई.'– मइसा ७.३९. २. कारस्थानी घालमेल करणारा; मुत्सद्दी. [फा.]

**बाजीग(गा–का)र** पु. गारुडी; जादूगार.
वि. उलटणारा : 'माष्टीन बाजीगार होऊन...'– ऐलेसं ३५७०. [फा.बाझीगर]

**बाजी(जे)ग(गा–गी)री** स्त्री. १. गारुडविद्या; चेटूक; मंत्रतंत्र; नजरबंदी; हातचलाखी; इंद्रजाल. २. पत्ते, सोंगट्या खेळणे; द्यूत; जुगार.
वि. १.रिकामा; कुचकामी; निकस; वाईट (वस्तू, पदार्थ). २. (ल.) निरर्थक; पोकळ; मूर्खपणाचे (भाषण, वागणूक, उद्योग); वरकरणी; ढोंगी; बेजबाबदार. [फा.बाझीगरी]

**बाजीराई–वी** स्त्री. दुसऱ्या बाजीराव पेशव्याप्रमाणे थाटमाट आणि विलास.

**बाजीराई–वी धोतरजोडा** हात–हात रुंद रेशीमकाठी धोतरजोडा.

**बाजीरावनाना** पु. (ल.)श्रीमंत मनुष्य. (को.)

**बाजीरावाचा नातू** (थोरल्या बाजीराव पेशव्यांचे नातू दुसरे बाजीराव यांना आयते राज्य मिळाले असता त्यांनी ते घालवले. यावरून ) श्रीमंत परंतु मूर्ख, नाकर्ता व मिजासखोर माणूस.

**बाजीरावाचा बेटा** (श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या नावावरून) (ल.) गर्भश्रीमंत.

**बाजु(जू)बंद** पु. १. दंडाला बांधण्याचा स्त्रियांचा दागिना. २. (फुलमाळी) दंडाला बांधण्यासाठी केलेली फुलांची माळ.

**बाजू** स्त्री. १. बाहू; भुज. २. भाग; पैलू (वस्तूचा); कड; काठ; किनारा मर्यादा. ३. एखाद्या पदार्थाचा कोणत्याही एखाद्या विभागाच्या विरुद्ध असलेला भाग. ४. (ल.) पक्ष; फळी; कड; तर्फ; चढाओढीच्या सामन्यातील एक पक्ष. (क्रि. राखणे, मारणे, सांभाळणे). ५. मोठी सतरंजी; जाजम. ६. नाव; अब्रू; पत; लौकिक. ७. मदतनीस; साहाय्यकर्ता; आश्रयदाता; साहाय्यक : 'यशवंतराव बाजू सांग ज्या मर्दाला।'– ऐपो ७९. ८. (पत्त्यांचा खेळ) खेळातील रंग; हात; गंजिफातील एका रंगाची १२ पाने; बाजी. ९. गाडीच्या साटीची लांबीच्या बाजूला असलेली दोन लाकडे. याउलट करोळे = साटीतील रुंदीची लाकडे. १०. संकट; अडचण; विघ्न; पेच. [सं.बाहु;फा.बाझ] (वा.) ० **वर बेतणे, अंगावर येणे** – फजितीची पराभवाची वेळ येणे.

**बाजूस–ला** क्रिवि. एकीकडे.

**बाजे** वि. काही; अवांतर; इतर; वरकड; किरकोळ : 'बाजे मरातब कृष्णराव यास कलमी केले.'– मइसा १०.१६७. [फा.बअझि]

**बाजे बाजे** क्रिवि. निरनिराळे; मधूनमधून; वेगवेगळ्या ठिकाणी. [फा. बअझि]

**बाजे लोक** लष्करातील बिनलढाऊ, सटरफटर लोक.

**बाजे वतनदार** जोशी, उपाध्या, जंगम, सेट्या, पोतदार, काजी, मुलाणा, पाटील, मुजावर, कुंभार, सुतार, कासार, न्हावी, तेली, महार,चांभार, मांग, परीट, मेहतर इ. वतनदार. – मसाप २.१३८.

**बाजोट** न. पलंग. हा नवारीने विणलेला किंवा रिफांचा असतो. (खा.)

**बाजोड** पु. ढेकूण; खटमल. (व.)

**बाझ** खेळणारा. [अर.]

**बाट** पु. १. अपवित्रपणा; विटाळ; बाटवणूक; स्वजातीत वावरण्याची अयोग्यता (बाटण्यामुळे).२.डाग; कलंक; ठपका; दोष देण्याचा प्रसंग.
वि. १. लबाड; लुच्चा; धूर्त : 'उलीसेंच पोर बाट मोठें । थोरपण असून चहाड खोटें।'–भज १०५.२.बाटगा; दांडगा; उच्छृंखल; शिरजोर; आवरण्यास कठीण (मनुष्य, बैल इ.). [सं.भ्रष्ट;हिं.]

**बाट** न. मोती तोलण्याचे वजन व त्यांचा समूह. उदा. १ आणा = १ तांदूळ वजनाइतका, ४ आणे = पाव रती. इ.

**बाट** पु. गंज; संच (वस्तूंचा). – के ११.१०.३५.

**बाटगा, बाट(ड)गेला** वि. पहा : **बाडगा**
**बांटगी** वि. १. बाटलेली. २. व्यभिचारिणी.
**बाटणूक, बाटणी** स्त्री. भ्रष्टता; बाटण्याची किंवा बाटवण्याची क्रिया; विटाळ.
**बाटणे** अक्रि. १. धर्मभ्रष्ट होणे; (दुसऱ्या जातीच्या, धर्माच्या मनुष्याशी शरीरसंबंध, अन्नव्यवहार, निषिद्ध पदार्थांचे सेवन यामुळे) स्वतःच्या जातीशी व्यवहार करण्यास अपवित्र, अयोग्य होणे. २.एखादी वस्तू उपयोगाला अयोग्य, अपवित्र होणे. ३. सुकणे; कोमेजणे (फूल).
**बाटनाट** पु. विटाळ; बाटगेपणा; भ्रष्टता. (क्रि. असणे, पडणे, होणे).
**बाटली** स्त्री. काचेची शिसी; कुप्पी. [इं. बॉटल]
**बाटवडा, बाटोडा, बाटाबाट** पु. स्त्री. सर्वत्र भ्रष्टाचार; जिकडेतिकडे झालेली भ्रष्टता; (सामा.) बाटणूक.
**बाटवणे** सक्रि. विधिपूर्वक धर्मभ्रष्ट करणे; दुसऱ्या धर्मात नेणे; अमंगलता आणणे; भ्रष्ट करणे.
**बाटा** पु. विटाळ. (व.)
**बाटी** स्त्री. निर्माल्य झालेली माळ : 'जि तुझिये मुगुटीचिया बाटी।'- भाए १५७.
**बाटी** स्त्री. मैदा, दूध, मीठ, तूप यांचे मिश्रण मळून त्याची गोवरीच्या विस्तवावर भाजलेली आहारोळी; गाखर. (माळवी)
**बाटीव, बाट्या** वि. पहा : **बाट** १
**बाटु(टू)क** न. जोंधळ्याचे कणीस निसवण्यापूर्वीचे ओले ताट; चिपाड; ओला कडबा.
वि. आखूड; बुटके. (व.)
**बाटुक** पु. खाऊ. (व.)
**बाटुर** न. कोकरू. (व.)
**बाठ** स्त्री. (नाविक) मोठे मडके; रांजण.
**बाठ-टी-ठी** स्त्री. आंब्यांतील कोय (आतील बीजासह कवच).[हिं.]
**बाठ** स्त्री. आंब्यातील कोयीचे नुसते कवच. (को.)
**बाठणे** अक्रि. कोय बांधणे. [सं. बद्ध+ अष्ठि]
**बाठळ, बांठ(ठा-ठ्या)ळ** वि. बाठ झालेला; कोय पक्की झालेला (आंबा).
**बाठळणे, बांठाळणे** अक्रि. आंब्यात बाठ पूर्ण तयार होणे; आंबा पक्का होणे.
**बा(बां)ठा** पु. १. आंब्यातील कोय (कवच व बीजासहित). (को.) २.(ल.)आघातामुळे शरीराला आलेले टेंगूळ. ३. जटा; गाठ; केसांचा किंवा तंतूंचा झालेला गुंताडा; काथ्याकरिता कुजत घातलेल्या चोडात राहिलेला कठीण भाग.
वि. धट्टाकट्टा; दांडगा; मजबूत; दृढ; निर्ढावलेला. [क. ओट्टे]
**बाठा** पु. खेकडा (नर). (जुन्नरी)
**बाठूक** न. आंब्याच्या बाठीसारखे बळकट, जोरदार व ठेंगणे माणूस, जनावर; बळकट, कसलेले शरीर. (को.)
**बाड** न. टाचणांची वही; सारग्रंथ; निरनिराळ्या शास्त्रीय (वैद्यक, ज्योतिष इ.) ग्रंथांतील निवडक भागांचे किंवा उद्धृत केलेल्या वेच्यांचे पुस्तक. [सं. बाढ]
**बाड** स्त्री. कड किंवा धार (शस्त्राची, हत्याराची); (मूळची धार असल्यास क्रि. देणे, चिरणे इ. व पुन्हा धार तीक्ष्ण करणे अशा अर्थी क्रि. लावणे.)
स्त्री. न. १. (ल.)कड; हद्द; तंबूभोवतालचे आवरण (शेर, निवडुंग इ.चे किंवा कनातीचे); तंबूची कनात, पडदा; तंबू. (क्रि. चिरणे). सामान्यतः कुंपण. (क्रि. घालणे). २. शिपायांची रांग. ३. कुटुंबकबिला; जनानखाना.
**बाड** स्त्री. पु. न. (ल.) एखादे वाईट कृत्य करण्यासाठी खोट्या आश्वासनांनी एखाद्याला उत्तेजन देणे, चेतवणे. (क्रि. देणे).
न. १. तरवार इ. चे म्यान. २. थाप; गप्प; निरर्थक गोष्टी; चकाट्या; थापा.
**बाड** न.(कापूस वटण्याचे जिनिंग मशीन येण्यापूर्वी अशा जागी पूर्वी हतरीवर कापूस वठीत असत. परंतु हल्ली गुरे बांधतात यावरून) बखळ; आवार; मोकळी जागा; गोठा; कापसाचे आखे दाबण्याची जागा. (व.)
स्त्री. स्थावर संपत्ती. (गो.)
**बाड** वि. धूर्त; लबाड. [अर.बयाझ़; हिं.]
**बाड** पु. लाकडाचा मोठा तुकडा. (झाडी) [हिं.]
**बाड असणे** गाडीचे चाक चाकोरीच्या बाहेर असणे. (व.)
**बाडकीन** न. (मुद्रण.) अशुद्ध टाईप काढण्याकरता वापरण्याचे दाभणाच्या आकाराचे एक हत्यार. [इं.]
**बाडगं** न. (अहि.) पहा : **बाडगी**
**बाडगा** वि. १. उर्मट; निर्दय; आडदांड; जुलमी; उन्मत्त; अत्याचारी; शिरजोर : 'जावा नणदा बाडग्या सासरासासु मोठी निर्दय ।'- होला ९९. २. आवरण्यास कठीण; उच्छृंखल; स्वैर हट्टी (मनुष्य, पशू). ३. बाटगा; बाटलेला; भ्रष्ट.
**बाडगी** स्त्री. १. स्वयंपाकाच्या उपयोगी, ताटाच्या आकाराचे लाकडी, मातीचे भांडे; खापराची पणती; शिकोरी. २. (निंदार्थी) तोंड. [हिं.]
**बाडगेला** वि. (अशिष्ट) दांडगा.
**बाडणे** अक्रि. कोमेजणे. (बे.)
**बाडबिछायत-बिछाना-बिस्तरा-बिछा(शा)द** स्त्री. पु. स्त्री. एकंदर सामानसुमान; चिरगूट-पांघरूण; सटरफटर वस्तू; डेरे-राहुट्या इ. [हिं.]
**बाडस** पु. खांबाचा टेकू; स्तंभपीठ.
**बाडा** पु. कनातीचा परीघ : 'बाडा बारा तेरा कोसांचा बसला.'- मइसा ७.१०८.
**बाडी** स्त्री. १. आवार; परसू; पडीत जमीन. २. कुंपण; तट; भिंत. ३. मळा. (व.) [सं.वाटिका; हिं.]
**बाडी** वि. १. बाडविषयक- संबंधी (औषध, वही). २. शास्त्र पूर्णपणे न शिकता नुसते त्यातील उतारे पाहून तुटपुंजे ज्ञान संपादन केलेला (विशेषतः ज्योतिषी, वैद्य).
**बाडे** न.वाकडेपणा; शत्रुत्व; वाकुली. (ना.,व.)

क्रिवि. वाकडे; रस्ता सोडून.

**बाड्डा** पु. रानबदक. (झाडी)

**बाढ-ढे** वि. १. अत्यंत; दृढ; पुष्कळ; थोर : 'वक्तृत्व जरी बाढ केलें ।'- मुआदि १२.२. २. मोठी; नाव घेण्यासारखी: 'तुम्ही मर्जी राखून आपली बाढे मेहनत मर्दुमीची अधिक करावी.'- ऐलेसं पृ. ३७. [सं.बाढम्]

**बाढ** स्त्री. पूर. [हिं.]

**बाढचीर** स्त्री. रुंद तलवार.

**बाण** पु. १. धनुष्याने मारण्याचा तीर; शर. २. अग्निनलिका; लोखंडी, कागदी किंवा कळकाच्या नळीत दारू भरून तिला काठी बांधून तयार केलेले आयुध, कळकी बाण; आतषबाजीचा एक प्रकार. ३. शिवलिंग. नर्मदा नदीत सापडणारा गोटा. याची शिव समजून पूजा करतात. ४. गलबताची वरची कड; बहाणी; बहाण. ५. दिशादर्शक खूण.

स्त्री. १. होडीचा काठ. २.(सांके.) पाच ही संख्या. (मदनाचे अरविंद, अशोक, चूत, नवमल्लिका व नीलोत्पल हे पाच बाण आहेत, त्यावरून). ३. क्रांतिवृत्तापासून अंतर. ४. पंचा, धोतर यांचा रंगीत काठ. ५. (ल.) सूर्याचा प्रत्येक किरण : 'उगवला दिनराज बाण आले चौबारा।'- ब ६०५. ६. (ल.) महत्त्वाचा मुद्दा. (क्रि. गमावणे) वि. सडेसोड; घरदार सोडलेला; निर्बाण (माणूस). [सं.]

**बाट्यौंचे** सक्रि. (पदार्थावर) बुरा येणे. (गो.)

**बाणअंदाज** धनुष्यातून बाण सोडल्यावर तो ज्या अंतरावर पडेल त्या टप्प्यावर, तितक्या अंतरावर.

**बाणक,बाणक रेशीम** एक हलक्या जातीचे रेशीम.

**बाणकोट** पु. गलबताचा एक प्रकार (बाणकोट येथील). (व.)

**बाणगी** स्त्री. दुसऱ्याचा अंदाज काढण्यासाठी केलेली सूचना.

**बाणगुप्ती** स्त्री. लष्करी पोशाख व सरंजाम (मुख्यत्वे अधिकाऱ्यांचा). (वा.) ० **जाणे, देणे, सांडणे, हरणे, घेणे, आणवणे, जप्त करणे** - लष्करातून कमी करणे; पहाऱ्यात ठेवणे; कैदेत ठेवणे.

**बाणणे** अक्रि. १. बिंबणे; प्रवेशणे; चिकटणे; अनुभवास येणे; पटणे; मनावर ठसणे. २. परिधान करणे; अंगात घालणे. ३.शोधणे; योग्य दिसणे; ठीक बसणे: 'सांबासी स्त्रीनट । अतिवरिष्ठ बाणला।'- एभा १.३४६. ४. स्वीकारणे : 'कीं भक्ति सुखालागीं।... सेवकै बाणी।'- ज्ञा १२.१८६. ५. स्थिरावणे; शमणे : 'प्राप्तभोगें तृष्णा न बाणें ।'- एभा १७.२२६. ६. बाणा बाळगणे. [सं.वर्ण]

**बाणदार, बाणाईत** पु. (दोन्ही प्रकारचे) बाण बाळगणारा, बाण फेकणारा शिपाई.

**बाणा** जाड काठी. (तंजा.)

**बाणा** पु. १. अभिमान; शेखी; आढ्यता; डौल (एखाद्या विशेष गुणाचा, अधिकाराचा इ.). २. पोशाख; वेष; वस्त्रे घालण्याची तऱ्हा. ३.एक प्रकारचा दारूचा बाण. ४. (विणकाम) वस्त्रातील आडवा धागा; आडवट-ण. ५. (जरतारी धंदा) बिन वळलेले रेशीम. ६. लाकडी मूठ व जाड धारेचे पान असलेला पट्टा; एक हत्यार. [हिं.]

**बाणाईत, बाण्या(णी)चा** वि. प्रतिष्ठा मिरवणारा; आढ्यता बाळगणारा; मोठा दिमाख दाखवणारा.

**बाणांचा चोथवा** दारूच्या बाणांची नळकांडी : 'दारू वीस मण सांपडली व बाणांचे चोथवे कांहीं सापडले.'- ऐको.

**बाणी** स्त्री. १. बाणा; अभिमान; शेखी; डौल. २. आणीबाणीची वेळ; निकराचा प्रसंग. ३. जन्मस्वभाव; मन:स्थिती. (वा.) ० **वर येणे** - आपला रागीट स्वभाव दाखवणे; चिडून जाणे; रागावणे.

**बाणी** स्त्री. १. कड; तीर; काठ; किनारा. २. होडीचा काठ. पहा : **बाण** १ : 'दोनी तारुवें भरिती । बाणी उदकासी मेळती।'- ख्रिपु २.२५.३६.

**बाणी** स्त्री. स्तुतिपर कवन, गीत : 'या वेळी ठाकर हिंदुस्थानी भाषेंत रामकृष्णादिकांच्या बाण्या म्हणत असतो.' - भात्रै ९४.८. (हिंदी)

**बाणी** स्त्री. पद्धत; रीत (गाणे, वाचन,ध्रुवपद इ.ची). [सं.वाणी]

**बाणीकार** वि.पु. १. लेखक. २. अभिमानी. ३. प्रेरक. ४. शिल्पकार.

**बाणीचा** वि. चांगल्या आवाजाने पुराण इ. सांगणारा, गाणारा.

**बाणीदार** वि. मोहक, आकर्षक (गायन, वाचन इ.).

**बाणे** उद्घोष; दवंडी : 'मग राजाधिराज बिंबदेव राणा' ऐसे बाणे भाट बोलिला.'-ऐको.

**बाणे(णी)दार** वि. १. पहा : **बाणाईत, बाण्या(णी)चा.** २. रोखठोख; निर्भय.

**बात** स्त्री. गप्प; निरर्थक गोष्ट; पोकळ बोलणे; थाप. [हिं.;सं.वार्ता]

**बात** क्रिवि. लवकर; जलद. (व.)

**बातखपाल्या-फर्राक्या** वि. गोष्टीवेल्हाळ.

**बातचित** स्त्री. संभाषण; गप्पागोष्टी.

**बातमी** स्त्री. खबर; वार्ता; हकिकत; वर्तमान.[सं.वार्ता; क. वातिमे] (वा.) ० **ठेवणे, राखणे** - खबर मिळण्याचे साधन ठेवणे; लक्ष ठेवणे; टेहेळणी करणे.

**बातमीदार** वि. १. बातमी लिहून पाठवणारा; वर्तमानपत्रे, दूरदर्शन इ. प्रसिद्धीमाध्यमांना बातम्या पुरवणारा. २. परराज्यातील, शत्रुराष्ट्रांतील बातमी पुरवणारा; गुप्तहेर.

**बातमीपत्र** न. १. संस्थेच्या सभासदांना विशिष्ट माहिती देणारे छापील पत्र. २. नियतकालिक.

**बात(ती)ल** वि. १. खोटी; निराधार; रद्द; पोकळ, व्यर्थ. २. थापा मारण्याची आवड असलेला; एखादी गोष्ट अतिशयोक्तीने सांगणारा. [अर.बातिल]

**बाताड्या** वि. पु. थापाड्या. [क.माताळि]

**बातुला** वि. खोटे.

**बातेखानी** वि. गप्पीदास.

**बातेरी** स्त्री. १. तोफखाना. २. पहा : **बॅटरी** [इं.बॅटरी] **बातेऱ्या खणून राहणे** - भोवती खंदक खणून तोफांच्या बातेऱ्या उभारून राहणे.

**बातेला** पु. लहानसे आरमार; आरमारी जहाज.

**बाथ** स्त्री. प्रवासाच्या वेळची शिदोरी, अन्न : 'तूं बाथे वीण हृषीकेषी। जीवा जातां सीं ।'- शिव ९८.

**बाथोर** न. गलबताचा एक प्रकार.

**बाद** क्रिवि. १. काढून टाकलेला; वजा, कमी केलेला (पट, यादी, संख्या यांतून); (खेळातून) बाहेर गेलेला. २. नंतर; पश्चात. [अर.बअद्]

**बाद** पु. शीण; बाधा. (गो.)

**बादखासा** वि. १.मध्यम प्रतीचा; खाशांसाठी नसलेला (मुख्यत्वे विडा). २. कच्चेही नाही व पूर्ण पिकलेलेही नाही असे (विड्याचे पान).

**बादणे** अक्रि. बहर येणे.

**बादपडावल** पु. खूण; चिन्ह.

**बादबाकी** स्त्री. १. वजा केल्यावर उरलेली बाकी; वाशीलबाकी. २. वजाबाकी. ३. हिशेब पुरा करणे; (कर्ज, अपराध इ.ची ) बाकी काढून टाकणे.

**बादरख-खा-स** स्त्री. तंबूच्या मधल्या खांबावरील लाकडी टोपण किंवा लाकडी वाटोळा तुकडा; या खांबाला असलेले भोक; भोकाला बळकटी देणारा कातड्याचा वर्तुळाकार तुकडा. [फा.]

**बादरन** स्त्री. ढगाळ वातावरण. (झाडी) [हिं.बादल]

**बादरायण संबंध** अति दूरचा, ओढून-ताणून काढलेला संबंध. (एकदा एक लुच्चा माणूस एका माणसाकडे जाऊन ' मी तुमचा संबंधी आहे' असे म्हणू लागला असता संबंध विचारल्यावर त्याने पुढील श्लोकाप्रमाणे संबंध सांगितला - 'अस्माकं बदरीचक्रं युष्माकं बदरीतरुः। बादरायणसम्बन्धात् यूयं यूयं वयं वयम् ।।'= आमच्या गाडीला बोरीच्या लाकडाचे चाक आहे व तुमच्या दारात बोरीचे झाड आहे. हा बादरायण संबंध.).

**बादल** पु. ढग; मेघ; अभ्रपटल. [फा.]

**बादलं** न. उंच पातेले; गंजी-ज. (अहि.)

**बादला** पु. सोन्याची किंवा चांदीची तार; मुलामा दिलेली रुप्याची तार; विस्तवावर पिवळी केलेली तांब्याची तार (कलाबतूसाठी काढलेली व चपटी केलेली). [हिं.]

**बादला-ले** पु. न. पाणी भरण्याची कातड्याची एक मोठी पिशवी. ही पखालीच्या अर्धी असून बहुधा तिकाटण्यावर बसवलेली असते : 'खांद्याला पडले घट्टे बादले वाहतां ।'- पला ८०.

**बादली** वि. सोने, रुपे, तांबे यांच्या तारांचे; काही सूत, रेशीम व काही जर मिळून विणलेले; मध्ये जरीच्या काड्या असलेले; भरजरी : 'बेगमेनें श्रीमंतास उंची पोशाख देऊन एक बादली वस्त्र दिलें.'- थोमच, पृ. २६.

**बादली** स्त्री. पाणी काढण्याचे भांडे; बालडी.[क. बकीट्ट; हिं. बालटी]

**बादली** वि. निळ्या, अस्मानी रंगाची.

**बादल्याचा तुरा** जुन्या जरीच्या तुऱ्यापासून तयार केलेल्या टिकल्या.

**बादशहा, बाच्छा** पु. पातशहा; राजाधिराज; सार्वभौम राजा. (मुसलमान, परकीय राजासंबंधीच फक्त उपयोग.). [फा.बादशाह] (वा.) **बादशहाची ओळख देणे** - लाच देणे (रुपयावर बादशहाचा छाप असतो त्यावरून).

**बादशाह** पु. खंजीराचा एक पवित्रा. - प्रश १८.

**बादशाही, बाच्छाई** स्त्री. पातशाही; राजपद; राजकीय अधिकार; बादशहाचा अधिकार, पद.

वि. १. बादशहासंबंधी; राजकीय. २. मुसलमान बादशहाने दिलेली (सनद, शिक्का इ.). ३. (ल.) उत्तम; भव्य; उच्च प्रतीचा; विलासी; सर्वश्रेष्ठ.

**बादाडी** स्त्री. १. वल्हे अडकविण्याच्या खुंटीला बांधण्याची दोरी. (को.) २. होडीवरील आच्छादन. (गो.)

**बादाबु(बा)दी** स्त्री. १. हिशेबाची बाकी काढणे; राहिलेली शिल्लक. २. वजाबाकी.

**बादामचिनी** स्त्री. एक औषधी.

**बादिकार** पु. बाधा. (गो.)

**बादियान** पु. एक प्रकारचे झाड व त्याचे फूल. ही वाळलेली फुले मसाल्यात घालतात.

**बादी** स्त्री. वस्त्राची दशी. - मसाप ४५.६.

**बादीक** वि. अपायकारक. (झाडी)

**बादीर** पु. वि. गुराखी. (डा.)

**बादोड** पु. ढेकूण. (खा.)

**बाद्या** पु. बैदूल खेळण्यासाठी जमिनीत केलेली खाच; गल. (ना.)

**बाध** पु. १.हरकत; प्रत्यवाय; प्रतिबंध; दोष; अडथळा; विरोध; शब्दादी प्रमाणांनी एखाद्या कृत्याला असणारा प्रतिषेध, मनाई. (हा शब्द दोष, दोषत्व या अर्थीच वापरला जातो.). २. निराकरण; नाश. [सं.]

**बाधअवई** स्त्री. बाजारगप्प; केवळ ऐकीव व अर्धवट माहिती. [सं. बाधा + फा. आवई]

**बाधक** न. १. अडथळा; प्रत्यवायकारण; आक्षेप; हरकत; दोष. २. आरोप : 'बाधकें ठेउनि नव्हतीं । राउळें नेली सर्व संपत्ति।'- भाए ७२६.

वि. अडथळा, बाधा आणणारे; प्रतिरोधक; प्रतिकूल; जाचणारे.[सं.]

**बाधणे** उक्रि. १. बाधा, अपकार करणे; दूषित करणे; दुःख देणे. २. खाल्लेले अन्न, केलेले कर्म न पचणे; त्यापासून पीडा उत्पन्न होणे; रोग, दुःख यांची पीडा होणे. ३. पिशाच्चाने पछाडणे; झपाटणे; (विष, शाप, मंत्रतंत्र, स्वतःचे दुष्कृत्य किंवा पाप यांचा) दुष्परिणाम होणे; इजा पोहोचणे. ४. प्रतिकार करणे; मोडा घालणे; अडचण आणणे. ५. अपकार होईल अशा तऱ्हेने वागणे; इजा पोहोचणे, पोहोचविणे. ६. निरसणे; निराकरण होणे : 'अहो आत्मेनि जें बाधे । तेंचि आत्मेनसि नांदे।'- अमृ ७.३०. [सं.बाध्]

**बाधन** न. प्रतिकार; अडथळा; मनाई; मोडा. (विशेषत: तर्कशास्त्र व व्याकरणात).

**बाधवाई** वि. अवास्तव; वाजवीपेक्षा जास्त. (व.)

**बाधा** स्त्री. १.पीडा; त्रास; दुःख; विकार. २. भूत-पिशाच्चांपासून होणारा त्रास, दुःख. ३. दोष; पाप : 'एवं एका स्तुती एका निंदा। करितां

आदळे अंगीं बाधा ।'-एभा ३.५३९. ४. निरास.[सं.बध्, बाध्]

**बाधा** पु. गुजरातमधील विवाह करूनही स्त्रीसमागम वर्ज्य करून राहण्याचा एक प्रकार.

**बाधित** न. दोष; पाप; निषिद्ध कर्म.
वि. १. विरुद्ध; कुंठित; प्रतिषिद्ध; अडवलेले; बाध आलेले. २. मिथ्या; खोटे : 'गुरुकृपें जो सज्ञान । त्यासि देहाचें बाधित भान।'- एभा १३.४७१.

**बाधिया** पहा : **बधीया**

**बाधे** न. मालक नसल्यामुळे गावजमिनीत सामील केलेली पडीत जमीन. (को.)

**बा(बां)धेकरी** पु.१. राहत्या गावात बापजाद्यांचे किंवा स्वत:चेही वतन किंवा जमीन नसलेला मनुष्य. २. एका गावात राहून दुसऱ्या गावची जमीन कसणारा मनुष्य : 'गांवचा वतनदार असोन खोत परागंदा जाहला आहे आणि गांवची खोती बांधेकरी करीत असेल त्यास स्वामित्व करार करून घ्यावें.'- वाडथोमारो २.४४. ३. नवीन वस्ती करणारा किंवा पडीत जमीन लावणारा शेतकरी.

**बाध्य** वि. प्रतिबंध, प्रतिकार करण्यास योग्य; दूष्य; दूषणीय; बाध करण्यास योग्य; बाधणारा. [सं.]

**बाध्यस्त** वि. जबाबदार.

**बानकोट** न. गलबताचा एक प्रकार. (व.)

**बानगी** स्त्री. पहा : **बोहनी**

**बानगे** न. एक वर्षाच्या आतील बकरा. (माण.)

**बानट** वि. बावळट; मूर्ख. (अहि.)

**बाना** बाणा; वस्त्रातील आडवे सूत, रेशीम; आडवण.

**बाना** मोठे, रुंद तोंडाचे मडके. (तंजा.)

**बानासाधा** पु. लाठीचा एक प्रकार. हा जाड वेताचा किंवा भरीव बांबूचा असून त्याला तीन गट्टू, लट्टू बसवलेले असतात. - संव्या ६७.

**बाना हत्याराचा** एक हत्यार. याची लांबी (दांडा व पाते मिळून) पन्नास इंच असते. याची पात एकाच खुळींत बसविलेली असते. पान १९ इंच लांब असून खुळीपासून खालीं अरुंद होत जाऊन शेवटास टोंक असतें.- संव्या ६७.

**बानी** स्त्री. गुऱ्हाळात उसाचा रस साठवण्याचे लोखंडी भांडे, कोळगे. (बानी साधारणपणे १६ घागरींची असते व अशा दोन बान्या रस एका काहिलीत घालतात.)

**बानी** स्त्री. चुरस; ईर्षा. (झाडी) [हिं.]

**बानू** स्त्री. पत्नी; स्त्री. (अहिं.) [गु.]

**बान्ना** न. ओटीपोट; बेंबीखालचा पोटाचा भाग. (गो.)

**बान्शी** स्त्री. दाते असलेला विळा लावलेला बांबू. - गुजा ६८. (कोळी) [सं.वंश]

**बाप** पु. १. पिता; वडील. जनक. २.(बापासारखा) चुलता: (धृतराष्ट्र भीष्माला म्हणतो) 'कीं माझा वधिला शिखंडिनें बाप ।'- मोकर्ण १.१२. ३. अनुकंपा दर्शवणारे संबोधन. (लहानाला किंवा सत्कारार्थी योजतात.) : 'जरी स्वधर्मैकनिरत । वर्तील बापा ।'- ज्ञा ३.१०२. [सं.पिता; प्रा. बप्प-प्पो; क. बाप्प; पोर्तु. जि. पतरों, पात; आर्मेजि. बाप] (वा.) ० **होऊ लागणे, म्हणविणे, बाप होऊन करणे, बोलणे** - बापाची, मोठेपणाची जागा घेणे; मोठेपणा मिरविणे. **(एखाद्याचा) बाप होणे, बाप लागून राहणे** - एखाद्यापेक्षा वरचढ असणे, त्रास देणारा असणे. **बापाचा माल** - एक शिवी; कोणी उधळेपणाने दुसऱ्याचा माल खर्चू लागल्यास त्यास म्हणतात. **बापाची बाभळ बुडणे** - नुकसान होणे. **बापावरून पावणे** - बापाच्या नावाने, बापावरून शिव्या देणे. **बापास बाप न म्हणणे** - वाजवी गोष्टीत कोणाचीही मुर्वत न धरणे. **बापशेटीची पेंड** - हवी त्याने हवी तशी न्यावी अशी वस्तू; फुकट मिळालेली व वाटेल तशी खर्चिली जाणारी वस्तू, संपत्ती; विपुल व सुसाध्य वस्तू.
वि. फार; पुष्कळ; मोठा : 'बापु उपेगी वस्तु शब्दु।'- अमृ ६.१.
उद्गा. आश्चर्य, दु:ख यांचे दर्शक.

**बापई** पु. बाप्या; वयात आलेला पुरुष.

**बापघर** न. माहेर : 'मग आप-घर त्यागूनि बापघरीं केली बस्ति।' - सप्र ११.४९.

**बापजन्मात, बापजन्मी** क्रिवि. सर्व आयुष्यात; जन्मापासून आजपर्यंत.

**बापजा(दा)दे** पु. अव. वाडवडील; पूर्वज. [फा. बाबू = पिता + अर. जद्द = आजोबा]

**बापडा, बापडीक** वि. १. गरीब; बिचारा; सौम्य; निरुपद्रवी. २. मूर्ख; वेडगळ; दुर्बळ; दीनवाणा; अनाथ. ३. बाप नसल्याने पोरका.
उद्गा. औदासीन्य, निष्काळजीपणा दाखवताना योजतात. [देप्रा. बप्पुड; गु. बापुडुं]

**बापपण** न. सामर्थ्य; वडीलपण: 'तरि बापपण आपुलें कां दाखविजेना।' - ऋ ३४.

**बापभाऊ** पु.भाऊबंद; नातेवाईक; वडिलोपार्जित मालमत्तेतील वाटेकरी.

**बापभावकी** स्त्री. १. भावकी; नाते. २. दाट परिचय; परमस्नेह.

**बापया-य** पु. बाप्या; पुरुष.

**बाप(पि-पे) या, बापू** पु. चातक पक्षी.

**बापरोटी, बापु(पो)ती** स्त्री. वडिलोपार्जित वतनवाडी, मालमत्ता.

**बापा** पु. १. बाप. (खा.) २. बापाचे संबोधन; (आदरार्थी हाक मारताना) अहो! अरे! : 'अर्थाचा दास पुरुष अर्थ नव्हे पुरुषदास बापा हें ।'- मोभीष्म १.९०. ३. एक पिशाचदेव; बापदेव. (को.)

**बापाजी** पु. (संबोधन) मोठ्या माणसाला हाक मारताना म्हणतात.

**बापाला** पु. मावशीचा नवरा. (गो.)

**बापिक** पु. कुलपरंपरागत धर्म; हव्यकव्य; कुळधर्म.
वि. कुळपरंपरागत; कुळातील : 'एथ स्वामीचें काज । ना बापिके व्याज ।'- ज्ञा १२.६७.

**बापु-पू** वि. मोठा.
उद्गा. अरे बापरे ! बापरे !: 'बापु ! कळा वानु कैसी ।'-ऋ ६.

**बापुडवाणा-णी** वि. १. गरीब; निराधार; निराश्रित. २. केविलवाणा; कीव येण्याजोगा (आवाज, भाषण).

**बापुडवाणा-णी** वि. वंशपरंपरा : 'बापूरजदा घेत जाऊन...'- वाडथोमारो २.१०६.
**बापु(पो)लभाऊ-व** पु. चुलतभाऊ. (गो.)
**बापु(पो)लयों** पु. चुलता. (गो.)
**बापुला, बापु(पू)य-स** पु. बाप. (गो., कु., को.)
**बापू** पु. पुरुषाला आदरार्थी म्हणतात.
**बापूजी** पु. दिरासाठी संबोधन. (झाडी)
**बापूया** पु. 'पेरते व्हा' असा आवाज काढणारा पक्षी. (व.)[सं.वप्]
**बाप्तिस्मा** पु. ख्रिस्ती धर्माची दीक्षा; पिता, पुत्र व पवित्र आत्मा ह्यांच्या नावाने करण्यात येणारा प्रक्षालनविधी. [ग्री. बॅप्टिडझो; इं. बॅप्टिझम्]
**बाप्पा** पु. १. बापा; पिता. २. वडील मनुष्य; आदरणीय व्यक्ती, देवता यांना उद्देशून लावतात.
**बाप्या-प्यो** पु. बाप होण्याच्या वयात आलेला पुरुष; प्रौढ.
**बाप्या** वि. लाडका. (व.)
**बाप्यामाणूस** पु. पुरुष.
**बाफलनं** सक्रि. स्वयंपाक करणे; उकडणे; वाफवणे. (अहि.)
**बाफलाई जानं** अक्रि. हुरळून जाणे; अतिउत्साहात चुकीचे वागणे.
**बाफ(प)ळी** स्त्री. १. एक पालेभाजी व तिचे बी. ही भाजी वातहारक असून झाड लहान व बी चपटे, हुलग्यासारखें असते. त्यापासून तेल काढतात. - वगु ४९५. २. सह्याद्रीत आढळणारी बहुवर्षीय औषधी वनस्पती. खोड सरळ, करंगळीएवढे, पाने संयुक्त व पिसासारखी, फळ शुष्क, लांबट गोलसर, लहानसर. फळे औषधात वापरतात. ३. जायफळाचे झाड.
**बाफळ्या** न. फोलकट; धान्याचा सत्त्वांश काढल्यावर राहिलेला भाग. (व.)
**बा(वा)फो(फ)र,** पु. वाफेवर चालणारी लहान आगबोट. (गो.) [पोर्तु.]
**बाफ्ता** पु. एक प्रकारचे रेशमी कापड: 'पंचवीस बाफ्ते उंच खाशा पोशाकायोग्य.'- वाडबाबा २.१५३. [फा.]
**बाब,बाबत** स्त्री. १. कलम; मुद्दा; प्रकरण; भाग. २. क्रम; प्रकरण; गोष्ट; विषय (विशेषत: साध्या व कचेरीसंबंधी कागदपत्रात योजतात). ३. कर; पट्टी; रक्कम; खंडणी; जकात : 'युद्धांत जिंकुन नबाब बसविली बाब करून धुळधाणी ।'- ऐपो ४१७. ४. रिवाज; रीत. (गो.) [अर.बाब्]
**बाब** पु. बाबू; नावापुढे आदरार्थी योजतात. उदा. बाकीबाब. (कु.)
**बाबडली, बाबडी** वि. कुजट; न शिजणारी. (व.)
**बाबडा** वि. १. मुलासंबंधी लडिवाळपणे 'बाबा' याच्या ऐवजी योजण्याचा शब्द. २. बापडा; गरीब; बिचारा; दुर्बळ. (को.)
**बाबडे** वि. १. भाजलेले; अंकुर न फुटणारे (बी) : 'बाबडें बीज पेरिल्या शेतीं । पिकास नाडलें निश्चितीं।'- एभा २१.३१२. २. निष्फळ; निकामी. (व.)
**बाबत-द** स्त्री. १. कलम; बाब; मुद्दा; प्रकरण; लक्षात ठेवण्याची गोष्ट. २. खर्चाचा सविस्तर हिशोब; पाल्हाळ; सबबींची, नियमांची मालिका. क्रिवि. मुळे; करिता; बद्दल; विषयी. [फा.]
**बाबत** वि. १.टाकाऊ; हलका. २.मूर्ख. (गो.)
**बाबतवारी** स्त्री. हिशोबात किंवा नोंदणीपुस्तकात लिहिली गेलेली कोणतीही वस्तू, मालमत्ता; कर किंवा जमीनमहसुलाची यादी.
**बाबती** स्त्री. १. वसुलाची कोणतीही बाब; एखाद्या विशिष्ट बाबीवर बसवलेला जादा कर. २. (अव.) देशमुख, देशपांडे इ. चे मुलखावर असणारे हक्क. मराठ्यांची चौथाई. पहा : **चौथ** [फा.]
**बाबनाऊ** वि. ब्राह्मणी. (झाडी)
**बाबर** पु. १. बाबरझोटिंग; एक पिशाच : 'खेळतां बाबर धावोनि येती । तेही देती आशीर्वचन ।'- नव १०.२८. २. (ल.) विस्कटलेले केस; झिंज्या. [सं.बर्ब; प्रा. बब्बरी]
**बाबर** स्त्री. न. चिरमुटलेला किंवा आकुंचन पावलेला, द्विदल धान्याचा दाणा किंवा अशा धान्याचा ढीग.
वि. चिरमुटलेले; विस्कळीत झालेले.
**बाबरझोटी दाढ विक्राळ** अक्राळविक्राळ माणूस.
**बाबरणे** अक्रि. द्विदल धान्य चिंबणे; चिरमुटणे; पूर्ण वाढ न होणे.
**बाबरणे** अक्रि. वाकडे-तिकडे चालणे.
**बाबरहो(हों-ओं)ट-ठ** पु. जाड ओठ.
**बाबरी** स्त्री. १. कडधान्य; एक प्रकारचे भात. (गो.) २.अजवला; पर्णास वृक्ष.
वि. अर्धवट पिकलेली (फळे). (गो.)
**बाबरी** स्त्री. मोकळे सुटलेले केस; झिपरी; झुलपे.
**बाबरू** वि. बारा. (नंदभाषा)
**बा(बां)बल-ळ** न. १. दाट वन; वनसमूह: 'ना तरि देखौनि रविमंडळ । विकाशे कमळांचें बांबळ ।'- भाए १८. २. वृद्धी; आधिक्य : 'तेथ बांबळ पडे अभिनव । विकारांचें। ' - ज्ञा १५.१०१. (क्रि.पडणे)
**बा(बां)बल(ळ)णे, बा(बां)बळ(ळे-ळै-ले)जणे** सक्रि. १. बांबळ पडणे; वृद्धी होणे; झाडाला पुष्कळ पालवी फुटणे : 'डिरिया निघती निमिखें बाबळैजुनी।' -ज्ञा १५.१८५. २. विस्तारणे; पाल्हाळणे. [सं.बल + यस्]
**बाबला-ल्या** वि. लाडका. (लहान मुलांना लाडिकपणे किंवा तुच्छतेने म्हणतात.)
**बाबा** पु. १. बाप किंवा वडील माणूस, वडील भाऊ याबद्दल आदराचा शब्द. २. मुलगा; बाळ (लाडिकपणे). (वा.) **बाबापुता करणे** - गोंजारणे; लाडीगोडी लावणे; हातापाया पडणे.
**बाबागाडी** स्त्री. लहान मुलांना बसवून फिरवण्याची गाडी.
**बाबालोक** पु. मुले. (युरोपियन लोकांचे एतद्देशीय चाकर युरोपियनांच्या मुलांना म्हणत).
**बाबावाक्य** न. वाडवडिलांचे, जाणत्या लोकांचे मत: 'ज्या इतिहासकारांचे लेख कसोटीला लागले नाहींत तेही त्याच प्रतींतील मानून त्यांचे लेखांस बाबावाक्यांची योग्यता देणें प्रशस्त नाहीं.' - विवि ८.८.१४४. [सं.वच्]
**बाबाशाही** वि. पूर्वी बडोद्याला प्रचलित असलेले (नाणे).

**बाबिन–ण** स्त्री. सूत गुंडाळण्याची लाकडाची अगर पत्र्याची पोकळ कांडी; फिरकी. [इं.]

**बाबियाॅ–यो** पु. एक प्रकारचा कलमी, मोठा आंबा.

**बाबी** स्त्री. लाडक्या मुलीला म्हणतात. [इं.बेबी]

**बाबीपंथ** पु. इराणच्या मिर्झा अली मुहम्मद यांनी १८४४ साली अदृश्य असलेल्या बाराव्या इमामाचा संदेश लोकांपर्यंत पोहचवण्यासाठी स्थापन केलेला पंथ. पुढे याचेच बहाई धर्मात पर्यवसान झाले.

**बाबुना** पु. एक औषधोपयोगी वनस्पती. [फा. बाबुनाह्]

**बा(बां)बुळ–ळी** स्त्री. शेवाळ; गोंडाळ: 'परी उदकीं जाली बाबुळी । ते उदका तें जैसी झांकोळी ।'– ज्ञा ७.६०.

**बाबू–बु** पु. १. मुलाला लडिवाळपणे म्हणतात. २. सभ्य गृहस्थ. (बंगालमध्ये सन्मान्य गृहस्थाला या नावाने हाक मारतात.) ३. लहान मूल; बाहुला; भावला. [बं.;क.; हिं.]

**बाबे** शअ. करिता; बाबत; साठी; संबंधाने; बद्दल : 'तुमचे बाबे लक्ष्मण बल्लाळ याणी...'– वाडसमा १.७.

**बाबेलचा मनोरा** (बाबेल म्हणजे बाबिलोन शहरातील एक मोठा मनोरा. हा होऊ नये म्हणून परमेश्वराने येथील कामगारांच्या भाषाबाहुल्याने घडवून आणलेल्या गोंधळाने अर्धवट पडला, अशी बायबलमध्ये गोष्ट आहे. यावरून) गोंधळाची स्थिती; अर्धवट अवस्था; बजबजपुरी.

**बाब्या** (को.) पहा : **बाबला–ल्या**

**बाब्री** स्त्री. बांबू, देवनळ इ. वनस्पतींचा एक प्रकार. यांना दूरदूर पेरे असतात. (गो.)

**बाभू(भ)ळ–ळी** स्त्री. एक काटेरी वृक्ष. भारतात सर्वत्र होतो. वाढ कोरड्या हवेत होते. याची गोंद, साल, लाकूड इ. उपयुक्त. जाती चार – देवबाभूळ, किंकर, पुळाटी, रामकाटी.[सं.बब्बुल] (वा.) **० बुडणे** – तोटा होणे; दुसऱ्याच्या कृत्यात विनाकारण ढवळाढवळ करणाऱ्याला धुडकावून लावताना योजतात. **बाभळीचा काटा** – आरंभी धीट व फुशारकीच्या गोष्टी सांगणारा परंतु लवकरच कच खाणारा, माघार घेणारा इसम; आरंभशूर. **बाभळीस काटा लावणे** – बदमाषाला बदमाष म्हणणे.

**बाम** स्त्री. १. एक प्रकारचा मासा; वांब. २. एका झाडाचे नाव. पु. पिकाची नासाडी करणारा एक कीटक. (गो.)

**बाम** पु. शरीराच्या दुखऱ्या भागावर चोळण्याचे एक मलम. [इं.]

**बामण** पु. १. ब्राह्मण. २. बामणजाई; ब्राह्मणांतील एक हलकी जात. ३. सारस्वत ब्राह्मण. (गो.)

**बामणजाई** पु. ब्राह्मणापासून झालेला विदूर, मिश्रसंतती. (व.) [सं. ब्राह्मण + जात]

**बामणदंड** पु. ब्राह्मणांवर बसवलेला कर. (हा कर एके काळी कुडाळदेशकर आद्य गौड ब्राह्मणांवर पाच वेळा बसवण्यात आला होता.)

**बामणबुद्ध** स्त्री.(ल.) धूर्तता; मुत्सद्दीपणा. (गो.)[सं.ब्राह्मण + बुद्धि]

**बामणी** वि. १.पांढरा. (कित्येक झाडे, प्राणी यांच्या पांढऱ्या जातींबद्दल योजतात.) उदा. बामणी काकडी– सरडा– पाल इ.२. ब्राह्मणाचे; ब्राह्मणाविषयीचे.

**बाम(म्ह)ण–णी हुरडा, बामण वरडा** ब्राह्मणाला दान म्हणून देण्याचा जून झालेला आणि भाजण्यास कठीण असा हुरडा; निरुपयोगी जोंधळे.

**बाम(म्ह)णी** स्त्री. एक लहान झाड. (याचे लाकूड मांसाहारी पदार्थ शिजवण्यासाठी जाळत नाहीत.)

**बामणी कावा** चातुर्याने केलेली लबाडी. (ब्राह्मण हुशार असतात व त्यामुळे ते बुद्धीने कारस्थाने करून फसवतात अशा इतर जातीयांमधील समजुतीवरून).

**बामणी कासोटा** निऱ्या करून घातलेला सैल कासोटा; पोकळ कासोटा. गबाळपणा, दुर्बलपणा याचा द्योतक.

**बामनमोळा** पु. ब्राह्मणाप्रमाणे, ब्राह्मणी आचार, वर्तन.

**बामुरडा** पु. (तुच्छतेने) ब्राह्मण.

**बा(बां)य–यं** स्त्री. विहीर; बाव. (गो.) [सं.वापी]

**बाय–यें** स्त्री. १. आई. (राजा., कुण.) २. ताई. (गो.) ३. बाई.

**बायक–ख** पु. गंजिफाच्या डावातील हुकूम.

**बायकांचे शास्त्र** (चेष्टेने) स्त्रियांमध्ये चालू असणारे पण धर्मशास्त्रात नसणारे नेम, विधी.

**बायकांडे** न. (नाविक) उलांडीच्या दोन्ही बाजूंना बांधण्याचे दांडे.

**बायकी** वि. बायकांसंबंधीचे; बायकांना शोभणारे.

**बायको** स्त्री. १. स्त्री; नारी; अबला; बाई. २. पत्नी; लग्नाची स्त्री. ३. झाडातील जे दोन भेद आहेत, त्यातील फळ देणारे झाड. (वा.) **बायकोजवळ पट्टा खेळणारा** – फक्त घरामध्येच फक्त शौर्य दाखवणारा.

**बायकोमाणूस** न. बाई; स्त्री. पहा : **बाईलमाणूस**

**बायकोवेल्हाळ** वि. बाईलवेडा; स्त्रीलंपट; बायकोविषयी आसक्त.

**बायक्या–ल्या, बायजण** वि. १. नेहमी बायकांत राहणारा; बायकोच्या आज्ञेत वागणारा. २. नपुंसक; नामर्द; स्त्रियांप्रमाणे चालणे, बोलणे, वागणे असणारा.

**बा(बां)यखुरी** स्त्री. बाजूबंद; वाकी. (गो.)

**बायणी** स्त्री. वायदा: 'भोग डांका भाका बायणियां ।'– स्वादि २.२.३.

**बायबल** न. १. ख्रिस्ती लोकांचा धर्मग्रंथ; पवित्र शास्त्र; याचे दोन विभाग आहेत : जुना करार – याचे ३९ भाग असून हा मूळ हिब्रू भाषेत लिहिलेला आहे; नवा करार – याचे २७ भाग असून हा मूळ ग्रीक भाषेत लिहिलेला आहे. [इं.]

**बायमाट्या** वि. वेडा. (व.)

**बायरावणे** सक्रि. वेगळे करणे.

**बायरू** स्त्री. बटिक.

**बायल** स्त्री. बायको; बाईल; (वा.)बायलेक येवप – तारुण्य प्राप्त होणे. (गो.)

**बायशा** वि. हट्टी; नादिष्ट. (वा.)

**बायलगोवो – धॉवा, बायलेचो भावोजी** बाईलवेडा. (गो.)

**बायसिकल** स्त्री. पायाने चालवण्याची दुचाकी गाडी; सायकल. [इं.]

**बाया** पु. १. ज्याला शाई लावलेली नसते ते तबल्याचे अंग; बाह्या.

२. पानाशी पान जोडून घरटे करणारा पक्षी.

**बाया** स्त्री. १. बाई; आई; आईसारखी स्त्री. (राजा.) २. देवी; फोड्या.

**बायो** स्त्री. बाई; स्त्री. (को.)

**बायोनेट** न. बागनेट; संगीन. [इं.बेयोनेट]

**बार** स्त्री. परवानगी : 'तुमचें मन बार देत नसिलें तरी...'- मइसा १५.३६७.

**बार** स्त्री. १. खेप; पाळी : 'मशीं पोरा घे रे बार ।'- तुगा २५६. २. चढाओढीने श्लोक इ. म्हणण्याची मुलांची क्रिया,घोष. (क्रि. घालणे, टाकणे). ३. छंद; हव्यास; नाद : 'पहिले पहारा रंगासी आले । सोहं सोहं सें बार घेतलें ।'-तुगा २५७. ४. फुलांचे अत्तर किंवा सुवासिक तेले काढण्यात जे अनेक संस्कार करतात ते प्रत्येक.

क्रिवि. (आवृत्तिदर्शक) वेळा; वार; बहुधा संख्याविशेषणाशी जोडून उपयोग. उदा. एकबार, दुबार इ. [हिं.]

**बार** पु. १. बंदुकीत ठासलेली दारू. २. दारूचा स्फोट, धमाका. ३. स्फोटाचा आवाज; बंदुकीचा आवाज; मोठा आवाज. ४.बंदूकवाला शिपाई; पायदळ. ५. घास; बोकाणा. ६. (सोनारी) हत्यारांचा संच. [सं.भृ] (वा.) ० **उडवणे** - १.अकल्पितपणे कठीण काम फत्ते करणे. २. लग्न लावणे. ० **देणे** - मान्य करणे. ० **देणे, ठासणे** - १. पढवून ठेवणे; अमक्या प्रश्नाला अमके उत्तर दे असे बजावणे. २. काहीतरी हेतू साधण्यासाठी गुप्तपणे सर्व संधाने किंवा वशिले बांधून ठेवणे. ० **भरणे** - १. बंदुकीत दारू ठासून ती उडवण्यासाठी तयार करणे. २. चिलमीत तंबाखू भरणे; विडा, तंबाखू इ. खाणे. ३. पहा : **बार देणे, ठासणे**

**बार** पु. फळा-फुलांना येणारा बहर; भर : 'मी नार । फार सुकुमार । बार काय जाहाला ।' - प्रला २१८.

**बार** पु. नोंद; लेख्य.- राव्यको. [फा.] (वा.) ० **करणे** - १. कीर्दीतील रकमा खतावणीत ज्या त्या खात्यात दाखल करणे. २. संपविणे; पूर्ण करणे.(ना.)

**बार** पु. चाबूक; चामड्याची वादी. (बे.) [क.बारू]

**बार** पु. १. ओझे. (को.) २. भार; जडपणा; वजन.

न. १. तुळई; बहाल. २. विटीदांडूच्या खेळातील दांडू. (कु.)[सं.भार]

**बार** पु. १. धातूचा, लाकडाचा, साबणाचा वगैरे लांबट तुकडा; कांडी; दांडी. २. खेळाचे साधन, सळई अगर काठी. [इं.]

**बार** पु. १. कोर्टातील वकिलांची बसण्याची खोली. २. हॉटेलमध्ये मद्य पिण्यासाठी असणारे स्वतंत्र दालन. [इं.]

**बारई** पु. तांबोळी; बारी. (व.)

**बार(रे)करी** पु. शेतातील पाटाचे पाणी वळवणारा. (खा.) [सं.द्वार]

**बारकश-स,भारकस** न. मोठे व्यापारी गलबत; महागिरी. [फा.बारकश्]

**बारकशी** स्त्री. बाराबंदी. (व.)

**बारकस** वि. अधिक बारीक; नाजूक (धान्य, पीठ, साखऱ्या इ.).

**बारका** वि. १. बारीक. २. लहान; धाकटा.

**बारकाई, बारकी** स्त्री. १. बारकावा; सूक्ष्म दृष्टी; बारीकपणा; गुप्तपणा; चौकसपणा; नाजूकपणा. २. कंजूषपणा; कृपणता. [फा.]

**बारकावणे** अक्रि. कृश, बारीक होणे.

**बारकावर** वि. मध्यम; बारीक (सूत, धान्य इ.). (कु.)

**बारकावा** पु. बारकाई; चौकसपणा.

**बारकीण** स्त्री. गलबताचा एक प्रकार.

**बारके** न. बारांचा समुदाय; एक डझन.

**बारकोल** पु. चाबूक. (बे.) [क.]

**बारखण** स्त्री. अव. वाळूच्या निक्षेपणाने, वाळू फेकली गेल्याने झालेल्या चंद्रकोरीच्या आकाराच्या टेकड्या.

**बारखळी** स्त्री. इनाम, बक्षीस वगैरे रूपाने दिलेली जमीन. या जमिनीवर कर माफ असतो.

**बारखी** स्त्री. मोठा वासला, वासा. (व.)

**बारखू(खो)ण** स्त्री. सर्दी; शैत्यविकार. (गो.)

**बारगण** न. तांबोळ्याची विड्याच्या पानांची पाटी. (व.)

**बारगळ, बारगा** वि. १. उनाड; भटक्या; स्वच्छंदी; आवरण्यास कठीण; उच्छृंखल. २. बेकायदेशीर; बेतालपणाचे; अनियंत्रित (वर्तन इ.).

**बारगळणे** अक्रि. १. (एखादी योजना, बेत इ.) अर्धवट राहणे, बंद पडणे. २. स्वच्छंदीपणाने वागणे; ताबा झुगारून देणे. ३. निकामी, भ्रष्ट होणे; मध्येच नाहीसा होणे. ४. खेळताना हद्दीच्या बाहेर जाणे. [सं.अपार्गल]

**बारगीर** पु. धन्याने दिलेल्या किंवा सरकारी घोड्यावर बसणारा लष्करातील शिपाई.

वि. दुसऱ्याचे मागून आणलेले : 'कासया मी आतां वचूं हें शरीर । आहे बारगीर जायजणें ।'- तुगा १७९१. [फा.बार्गीर]

**बारगो** वि. बाहेरख्याली; उडाणटप्पू. (गो.) [सं.गम्]

**बारगोळी** स्त्री. मेहनत. (व.)

**बारघऱ्या** वि. घरोघरी फिरणारा. (अहि.)

**बारजा** पु. एक प्रकारचे गलबत.

**बारजो** पु. होडी. (मालवणात हा शब्द फक्त तांबड्या कंदिलाच्या होडीला लावतात.) (कु.) [इं. बार्ज]

**बारड** वि. वयस्क; प्रौढ. (व.)

**बारडी** स्त्री. घुसळखांबाची दोरी; पारडे.

**बारडी** स्त्री. एक जातीचे गवत. - चित्रकृषि २५.

**बारडी** स्त्री. बादली. [इं.बकेट]

**बारणी** स्त्री. चामड्याची पट्टी. (बे.)

**बारणी** स्त्री. खंड; खंडणी. (गो.)

**बारणी** स्त्री. वारी; खेप; पाळी.

**बारणे** सक्रि. (अक्षरश: व ल.)ओझे घालणे; वजन लादणे; दंड बसवणे: 'घर्मबिंदु बारेले हृदयींच ।'- स्वादि ६.२.१९. [सं. भार]

**बारतिडा** पु. बाळाचा नामकरणविधी. (झाडी)

**बारदान** न. १. (माल साठवण्याचे) पोते, डबा, पिंप, गाठोडे इ. २. जहाजावरील माल, माणसे इ. ओझे; भरगत; भरताड; (जहाज, गाडी, पशू इ. चे) भरत. (को.) ३. तरट; गोणपाट; गठ्ठ्याचे वेष्टण;

रिकामे पोते. ४. कापसाच्या गाठीची बोंदरी. (व., खा.) ५. (ल.) भांडवल; कार्याचा पसारा; मालमत्ता इ. [फा. बार्दान]

**बारदानी** वि. माल वाहणारी.

**बारदानी** स्त्री. (नाविक) पावसाळी वारा.

**बारदार** पु. सैन्यातील बंदूकवाला शिपाई; बरकंदाज.
वि. १. फळे येण्याच्या पूर्ण भरात असणारे; लागलेले बहरलेले (झाड). २. ओझे वाहून नेणारा. [सं.भार; फा.बार]

**बारदार** वि. पाळी किंवा बारी घेणारा बारीदार (विशेषत: महार).

**बारना** अक्रि. विझणे; मालवणे (दिवा इ.). (झाडी) [हिं.]

**बारनायकी** स्त्री. १. अव्यवस्थित राज्य; बंडाळी; अराजकता. २. शिरजोर लोकांच्या कारभारामुळे कामात होणारा घोटाळा.

**बारनिशी-सी** स्त्री. १. नोंद; टिपण; नोंदी करण्याचे काम. २. बारनिसाचा हुद्दा; कागदपत्र, हुंडी इ. बार करणे; सरकारी आवक-जावक दप्तरात टिपून ठेवणे व त्यावर बार असा शब्द लिहिणे वगैरे त्याचे काम. [फा.बारनविशि]

**बारनीस** पु. बारनिशी करणारा सरकारी अधिकारी. [फा.बार् + नविश्]

**बारबंड-डा-ड्या, बारबुं(पुं)डा-डी** वि. बारगळ; बेशिस्त वागणारा; खट्याळ.

**बारबार** क्रिवि. वारंवार; पुन:पुन्हा. [हिं.;सं.वारंवार]

**बारबाला** स्त्री. हॉटेलमधील मद्यदालनात काम करणाऱ्या सेविका.

**बारभाई** स्त्री. (ल.) १. वेगवेगळे उद्देश असणारी व भिन्न-भिन्न स्वभावांची परंतु एकाच कार्यासाठी एकत्र झालेली माणसे. २.अशा लोकांनी केलेले काम. ३. अनेक लोकांच्या हाती असलेली सत्ता. ४. गोंधळ; अव्यवस्था.

**बारभाईचा कारभार, कारखाना** १. अव्यवस्थित, गोंधळाचा, ताळमेळ नसलेला कारभार, स्थिती. २. (नारायणराव पेशव्यांच्या वधानंतर नाना फडणवीस, सखाराम बापू इ. बारा मुत्सद्यांनी कारभार चालवला. लोकप्रतिनिधींचा कारभार. ३. (ल.) गोंधळ; ज्या कामात, उद्योगात पुष्कळ मंडळींचा सहभाग असतो व प्रत्येक जण यजमानासारखे हुकूम सोडीत असतो, परंतु त्या हुकमांची अंमल बजावणी मात्र कोणी करत नाही अशा प्रकारचा गोंधळ.

**बारभाईची गाडी** उतारूंची व टपालाची घोडागाडी. (ईस्ट इंडिया कंपनीच्या पहिल्या अमदानीत ही गाडी मुंबई-पुणे यांच्या दरम्यान होती.)

**बारभाईचे कारस्थान** नारायणराव पेशवे मारले गेल्यानंतर राघोबादादांच्या विरुद्ध कारभारी मंडळींनी केलेला कट; अगदी भावासारखे, एकमताने वागणाऱ्या मंडळींनी केलेले कारस्थान.

**बारमास-महा-माही** क्रिवि. वर्षभर; बाराही महिने; सतत.
वि. बारा महिन्यांचे.

**बारयाब** वि. प्रवेश मिळालेला; सन्मुख; समोर; दरबारप्रविष्ट.

**बारव** स्त्री. पायविहीर; पायऱ्यांची विहीर : 'बारव आहे वरल्या रानीं।'- मध्व ४०२.

**बारवर्षी सोळवर्षी, बारावर्षे सोळावर्षे** (बारा वर्षांचे व सोळा वर्षांचे) अननुभवी तरुणांची सभा; ज्या व्यवहारात एकही प्रौढ मनुष्य नाही व सर्व एकजात तरुण आहेत अशी मंडळी.

**बारशिंगा** पु. बारा शिंगे असणारा, सांबरासारखा दिसणारा, तराई व मध्यप्रदेशात आढळणारा सस्तन, चतुष्पाद प्राणी.

**बारस-शी** स्त्री. १. कोणतीही द्वादशी तिथी (विशेषत: कार्तिक शुद्ध). २. सावज मारल्यानंतर बाराव्या दिवशीचा समारंभ.

**बारसना** अक्रि. गाईचे दूध निवळणे. (झाडी)

**बारसावळी** स्त्री. बारसे. (घा.)

**बारसे-सा** न. पु. मुलाच्या जन्मापासून बाराव्या दिवशी करण्याचा नामकरणविधी. (वा.) **(एखाद्याच्या) बारशाला जेवणे** - एखाद्यापेक्षा वयाने मोठे असणे; एखाद्यापेक्षा जबरदस्त, सरस, हुशार, अधिक अनुभवी असणे; (एखाद्याच्या) डावपेचांना न फसणे.

**बारसो** न. दत्तकविधान. (गो.)

**बारा** पु. १. कुंभाराच्या भट्टीचे खालचे तोंड. २. बंदराच्या समोरचा भाग. [सं.द्वार]

**बारा** वि. कोवळे रोप. (झाडी)

**बारा** वि. १२ ही संख्या.[सं.द्वादश] (वा.) ० **करणे; बाराचे करणे, म्हणणे; बाराचा फाडा-पाढा वाचणे; बाराचे लेख वाचणे** - टाळणे; सफाईने, धूर्तपणाने पळून जाणे; पोबारा करणे. ० **गावचा, पिंपळावरचा मुंज्या** - एके ठिकाणी न राहता सदैव भटकत असणारा. ० **गावचे, बंदरांचे पाणी प्यालेला** - लफंग्या; वस्ताद; चवचाल; फार फिरल्यामुळे चतुर, धूर्त बनलेला. ० **गोष्टी, कथा करणे, गाणे, सांगणे; बारापंधरा करणे, सांगणे; बाराबत्तिशा लावणे** - असंबद्ध, काहीतरी, धरसोडीचे बोलणे; उडवाउडवी करणे; भाकडकथा सांगणे. ० **घरचे बारा** - विविध ठिकाणचे विविध स्वभावांचे एकत्र जमलेले लोक;परस्परांशी कोणताही नाते संबंध नसलेले लोक. ० **बांधनं**- काहीही वाईट करू न शकणे.(अहि.) ० **बैलेस्नी पात मोडनं** - कामाला टाळाटाळ करणे; कामातून अंग चोरणे. ० **भाऊची बोडद**- अव्यवस्था; गोंधळ. (झाडी) ० **मांडवांचा वऱ्हाडी** - सदैव अनेक ठिकाणी अनेक प्रकारची कामे असणारा इसम. ० **वाजणे** - उतरती कळा लागणे; समाप्ती; नाश होणे; दिवाळे निघणे. ० **वाटा उधळला जाणे** - पैसा, संपत्ती, साठा इ. खर्च होणे. ० **वाटा करणे** - उधळून लावणे; उधळणे. ० **वाटा पळणे, होणे** - १.अजिबात नाहीसा होणे. २. चारी दिशांनी सैरावैरा पळणे; दाणादाण होऊन पळत सुटणे (सैन्य इ.). ० **वाटा मोकळ्या होणे** - मन मानेल तसे वागण्यास पूर्ण मोकळीक असणे. **बारावे वर्ष पालटणे, लागणे** - बारा वर्षांच्या मुलाप्रमाणे वर्तन करणे.

**बारा अक्षरी** १. रेशमाची एक जात. २. बाराखडी.

**बारा आणे** (ल.) नपुंसक.

**बाराकशी** स्त्री. बाराबंदी-डी.

**बाराखडी** स्त्री. व्यंजनापासून १२ स्वरांच्या मिश्रणाने पूर्ण होणाऱ्या अक्षरांची मालिका.

**बारागणी** स्त्री. जमीन मोजण्याचे साठ बिघ्यांचे एक माप.
**बारागाड** स्त्री. कानउघाडणी. (झाडी)
**बारागाड बोंबे** असमर्थता. (झाडी)
**बारागि–गीरी** बारा कोनी बारा रंगाचे तळे. (तंजा.)
**बारा जन्म** क्रिवि. बारा जन्मात; कधीही.
**बाराजिभ्या** वि. अतिशय खोटे बोलणारा; बडबड्या; विसंगत बोलणारा.
**बाराडेऱ्या** पु. बारशिंगा; सांबर.
**बारा टक्क्याचा दुष्काळ** भयंकर दुष्काळ. कोणतीही गोष्ट बारा टक्क्यांशिवाय मिळत नाहीशी होणे : 'बारा टक्क्याचा दुष्काळ पडला. माणसास अन्न खावयास मिळेना, माणसें मेलीं.'– सनदा १४४.
**बारातेरा** पु. भाषणातील, बोलण्यातील असंबद्धपणा. (क्रि. लावणे, सांगणे, बोलणे).
**बारादा(द्वा)री** स्त्री. १. बारा दारे असणारा, उन्हाळ्यात राहण्याचा, हवेशीर बंगला; बारा पायवाटा असलेली विहीर. २. (ल.) धंदा–उद्योगातील अव्यवस्थितपणा, पसारा. [हिं. बारादारी]
**बारापाच** पु. कुडाळदेशकर ब्राह्मण राजवटीतील बारा नाईक व पाच देसाई मिळून एकंदर सतरा मानकरी.
**बाराब(व)ळी** पु. जन्मापासून बाराव्या दिवशी करायचा एक विधी; बारसे : 'गरोदरेसि प्रसूति होये। पुत्रजन्में सुखावली ठाये। तेही बाराबळी जैं पाहे। तैं भौगूं लाहे पुत्रसुख।'– एभा १२.६०३.
**बाराबंदी, बारबंदी–डी** स्त्री. बारा बंद असलेला अंगात घालण्याचा एक कपडा; बारकशी.
**बारा बाबती** १. वसुलापैकी वरिष्ठ किंवा मुख्य अधिकाऱ्याचे बारा हक्क. २. विवाह किंवा मोहतूर इ. च्या वेळचे पाटलाचे बारा हक्क (विडा, टिळा, शेला, गणसवाशीण इ.). ३. शेतकरी किंवा महार यांचे लग्न इ. बाबतीतील बारा (अनेक) लंगड्या सबबी; पाल्हाळिक व मूर्खपणाचे भाषण; गडबड गुंडा. (क्रि. सांगणे).
**बारा बाविशा** ग्रामाधिकाऱ्यांचे हक्क.
**बारा बोड्याचा** वि. एक शिवी; जारज; अनैतिक संबंधातून जन्मलेला. (कुण.)
**बारा भट** वि. सदोदित आगंतुकी करणारा.
**बारा भुजा, बारा भुजां बळ** पुष्कळ शक्ती. (गो.)
**बारा महाल** राज्यकारभाराच्या सोयीसाठी केलेली सरकारी कामांची निरनिराळी बारा खाती (पोते, कोठी, पागा, दरजी, टंकसाळ, सौदागिरी, इमारत, हवेली, पालखी, थट्टी, चौबिना, शरीमहाल).
**बारा माशी–ही** वि. वर्षाच्या सगळ्या महिन्यांत येणारे, असणारे.
**बारा रांड्या** वि. रंडीबाज (मनुष्य).
**बारावडी** स्त्री. अनेक सबबी.– लोसाको.
**बारावफात** पु. रबिउलावल महिन्यातील बारावा दिवस. या दिवशी पैगंबराची पुण्यतिथी असल्याने हा दिवस मुसलमान लोक सण म्हणून साजरा करतात. [अर. वफात्]
**बारावा** पु. माणसाच्या मृत्यूच्या बाराव्या दिवशी करण्याचा श्राद्धादी विधी. वि. अनुक्रमाने मोजले असता अकराव्याच्या पुढील. (वा.) **बारावा बृहस्पती असणे–** वैर असणे; उभा दावा असणे (जन्मराशीपासून बाराव्या राशीत गुरू असल्यास तो त्या माणसाला फार दु:ख देतो त्यावरून).
**बारा वादी** चपलांची, वहाणांची एक जात, प्रकार.
**बारा सहस्री** बारा हजार फौजेचा सरदार : 'आटोळे सेना–बारा सहस्री।'– मराचिथोरा ५२.
**बारा सोळा** सूर्याच्या बारा व चंद्राच्या सोळा कळा : 'आटूनियां हेमकला। आटणी आटल्या बारासोळा।'– एरुस्व ७.५०.
**बारा हक्कदार** हक्क असलेले खेड्यातील वंशपरंपरेचे बारा हक्कदार (देशमुख, देशपांडे इ.).
**बाराक्षरी** पहा : **बाराखडी** : 'बाराक्षरि एकासारखी।'– ऋ ७६.
**बाराक्षार** पु. अव. विशिष्ट पद्धतीने तयार केलेले बारा ऊतक क्षार; समान रचना व कार्य असलेल्या कोशिकांच्या – समूहात आढळणारी लवणे.
**बारिणी** स्त्री. छत्र धरणारी : 'सिरगिरी धरी बारिणी। मयूरिका।'– नरुस्व १०२. [सं. वारणम्]
**बारिदगी** स्त्री. घोड्याचा एक रोग. यांत गुद लाल होऊन त्यावर फोड उठतात व रक्त वाहते.– अश्वप २.१९४.
**बारी** पु. विड्याची पाने विकणारा; तांबोळी. [सं.]
**बारी** स्त्री. १. दोन डोंगरांमधील धोक्याची खिंड. २. रानातील धोक्याची वाट. ३. कुंपणातून केलेली अडचणीची वाट. ४. खिडकी; कपाट. (खा.) ५. समुद्राचा धक्का; बंदर. [सं. द्वार; हिं.;गु. आर्मे; जि. बर]
**बारी** स्त्री. १. वेळ; खेप; पाळी. २. कामाची पाळी, पालट (महाराची, गावकामाची). ३. सोंगट्यांच्या खेळातील एक डाव. ४. साप अंगात आणण्याचे गाणे; मंत्र; नागपंचमीला म्हणण्याचे नागोबाचे गाणे; अंगातून सापाचे विष उतरवण्याचा मंत्र. (व.)
**बारी** स्त्री. डवूर फिरवण्यासाठी डवूर मुसळाच्या भोकात घातलेला वासा. पहा : **डवर, डवूर मुसळ**
**बारी** पु. माळी. (व.)
**बारी** पु. १. छत्र धरणारा : 'मीचि बारी मी कन्हेरी।'– एभा १२.५६१. २. चामर ढाळणारा : 'इंद्र बारी चंद्र छत्रधारी।'– भारा अयो ३.५.
**बारीक** वि. १. सूक्ष्म; ज्याची जाडी कमी आहे असा; पातळ; कृश (खांब, अवयव, सूत इ.). २. एकंदरीत आकाराने लहान असलेला (दाणा, सुपारी, लवंग, डोळा इ.). ३. तलम सूत असलेले (वस्त्र इ.); तलम, पातळ (कण, अवयव); जाड, भरड नसलेले (पीठ इ.). ४. (ल.) गुप्त; गूढ (बातमी). ५. (ल.) एकदम लक्षात न येणारा (भेद, अर्थ). ६. कमी; रुष्ट; खप्पा : 'श्रीमंत स्वामींची बहुतच मर्जी बारीक जाली आहे.'– मइसा १.२२८. ७. बारकाव्याची, काटेकोर, अत्यंत हिशोबी (दृष्टी, वृत्ती). [फा. बारीक्] (वा.) **० कातणे–** १. हिशेबात वागणे; अति चोखपणा करणे. २. अत्यंत कृश, किडकिडीत होणे. **(एखाद्यावर) ० कातणे–** गोड गोड बोलून फसवणे; दयाळुपणाचा व सभ्यतेचा आव आणून एखाद्याला बुडवणे, त्याचा नाश करणे. **० पाहाणे–** चिक्कूपणा करणे.
**बारीक कुटाळ** सभ्यपणाचा आव आणून निंदा करणारा; धूर्तपणाने व

गुप्तपणाने बालंट घेणारा; आळ घालणारा (उपरोधिक बोलण्याने).
**बारीक कुटाळी** धूर्तपणे, गुपचूपपणे घेतलेले बालंट.
**बारीक जोर** क्षयरोग. (गो.) [फा. बारीक्+सं.ज्वर]
**बारीकराव** पु. काडीपहिलवान; सडपातळ, कृश मनुष्य.
**बारीकसाण-य** स्त्री.चौकसपणा; सूक्ष्म दृष्टी. (गो.)
**बारीकसा(नि,शि)रीक** वि. किरकोळ; बारीक. [बारीक द्वि.]
**बारीदार, बारेकरणी** पु. स्त्री. पाळीचे नोकर; निरनिराळ्या ठरावीक वेळी काम करणारे नोकर.
**बारीश** स्त्री. वृष्टी; पाऊस. [फा. बारीश्]
**बारु(रू)द-त** स्त्री. बंदुकीची दारू. [फा. बारूत्]
**बारुदखाना** पु. बंदुकीचा व तोफेचा दारुगोळा ठेवण्याची कोठी.
**बारुला** पु. मातीचे भांडे. (झाडी)
**बारुला-ली, बारोला-ली-ळी** वि. बारा पायल्यांचा (मण, खडी, माप).
**बारे** न. १. पाणी वाहण्यासाठी बांधांमध्ये पाडलेले भोक, द्वार; पाण्याच्या पाटातून बाजूला फोडलेला बारीक प्रवाह; सामान्यत: लहान द्वार, वाट. २. शेत; नंबर. (व.) [सं. द्वार]
**बारे** न. रेतीचा बांध; वाळूचा दांडा.(वा.)(दरबारात किंवा दरबारचे इ.) **बारे बांधणे**-आपल्या दुष्कृत्यांविषयीची ओरड थांबवणे (लाच देऊन, उपकार करून इ.).
**बारेकरी** पु. शेताच्या वाफ्यातून पाणीपुरवठा करणारा; पाटाचे पाणी शेतात सोडणारा.
**बारेजना** अक्रि. मोहर येणे. (झाडी)
**बारोटि(टी)आ** पु. दरोडेखोर; डकाईत : 'एखाद्या काठेवाडी बारोटीआनें गिरनारच्या रानांत आपणांस पकडिलें-' नीति २२५. [गु.]
**बार्क** न. तारू; जहाज; फत्तेमारी. (गो.)[पोर्तु.; इं. बार्ज; फा. बार्कश]
**बार्कस** न. व्यापारी मालाच्या वाहतुकीचे जहाज. [फा. बार्कश्]
**बार्बरदारी** स्त्री. भार वाहणे : 'बार्बरदारीचे उष्ट्र.'- ऐको.
**बाऱ्हाट** न. स्वैर हत्या : 'पोटें फाटत जांघवा निवटतां बाऱ्हाट चौहीकडे'- गरा १५६. [सं. बर्ह]
**बाल** पु. १. केस. (ना.) २. (सोनारी) हातोड्याचा वरच्या बाजूचा पाचरीसारखा भाग. (याने कोणताही धातू ठोकून जलद वाढवता येतो.) [सं. वाल; हिं]
**बाल, बालक** न. लहान मूल; अर्भक; अज्ञान मूल.
पु. मुलगा (दात आल्यापासून सामान्यत: आठ वर्षांपर्यंत वयाचा).
वि. (समासात) लहान; अल्पवयीन; अज्ञानी; कोवळा; नुकताच उगवलेला (सूर्य इ.). [सं.]
**बालअपचारिता** पहा : **बालगुन्हेगारी**
**बालकमंदिर** न. ३ ते ५ वर्षे या मुलांची शाळा; किंडरगार्टन, बालोद्यान शाळा. (किंडर गार्टन हा जर्मन शब्द. अर्थ - मुलांची बाग. ही नवी बालशिक्षणपद्धती फ्रेडरिक फ्रोबेलने काढली.)
**बालकमान** स्त्री. मनगटी घड्याळातील बॅलन्सव्हीलचे नियंत्रण करणारी केसाइतकी बारीक स्प्रिंग.
**बालकाठी** स्त्री. लहान मुलांसाठी हातात अडीच फूट लांब काठी धरून करावयाची कवायत व व्यायाम.- व्याज्ञा ४.४१९.
**बालक्रीडा-लीला** स्त्री. लहान मुलांचे खेळ.
**बालकेंद्रित शिक्षण** (शि.क्षे.) मुलांच्या भावनांना प्राधान्यक्रम देऊन त्या अनुषंगाने देण्यात येणारे शिक्षण.
**बालगर** वि. भटक्या; निष्कारण फिरणारा. (व.)
**बालगीत** न. बडबडगीत.
**बालगुन्हेगारी** स्त्री. १६ वर्षांखालील मुलांनी केलेले गुन्हे.
**बालगुंडा** पु. शक्ती अजमावण्यासाठी मल्लांनी उचलण्याचा गुंडगोळा; गोटी.
**बालगोपाळ** पु. अव. लहानमोठी मुले.
**बालग्रह** पु. अव. १. लहान मुलांना पीडा, त्रास देण्यात आनंद मानणाऱ्या नऊ देवता. २. आकडी; एक रोग.
**बालचमू** पु. विशिष्ट उद्देशाने एकत्रित आलेला लहान मुलांचा संघ, समूह.
**बालचंद्र** पु. शुक्ल पक्षातील पंचमी-षष्ठीचा चंद्र.
**बालचित्रवाणी** स्त्री. प्राथमिक व माध्यमिक शाळेतील विद्यार्थी व शिक्षकांसाठी दृक्श्राव्य माध्यमातून शैक्षणिक कार्यक्रमांची निर्मिती करणारी राज्य-शैक्षणिक-तंत्रज्ञान संस्था. अध्ययन-अध्यापन प्रक्रिया आनंददायी करणे व विद्यार्थ्यांना ज्ञान संपादन करताना अध्ययन-प्रक्रियेतून आनंदाची अनुभूती देणे हे संस्थेचे मुख्य उद्दिष्ट.
**बालचीर-फूट** स्त्री. १. (नाणे वगैरेंमधील) केसासारखी बारीक चीर, तड. २. दगडाची लांबट पट्टी.
**बालच्या** पु. तोफेच्या गाडीला अडकवलेली पाण्याची कातडी पिशवी, बादली.
**बालजबूल** पु. (ख्रि.) सैतान; भूतांचा राजा : 'भूतांचा अधिपति बालजबूल याच्या योगानेच हा भूते काढतो.'- मत्त १२.२४.
[हिब्रू. बालझबूब= माशांचा स्वामी, नरकाचा प्रभू]
**बालतीम** पु. ख्रिस्ती धर्मदीक्षा. (गो.) [पोर्तु. बॅप्टिझम]
**बालत्व** न. बाल्य; बालपणा.
**बालदार** वि. पिळदार(पगडी).-शर.
**बालदिन** पु. दरवर्षी १४ नोव्हेंबरला पं. जवाहरलाल नेहरूंच्या जन्मदिवशी मुलांसाठी पाळण्यात येणारा दिवस.
**बालदी-टी-डी** स्त्री. १. गलबतावर उपयोगात आणतात ते चामड्याचे, पाणी उपसण्याचे भांडे. २. पाणी काढण्यासाठी, ठेवण्यासाठी उभट आकाराचे, कडी असलेले भांडे; बादली. [इं. बकेट]
**बालधोंड** स्त्री. १. अतिशय मोठा खडक किंवा दगड. २. (ल.) मोठी पीडा; त्रास; बालंट; खोटा आरोप.
**बालपरवेशी, बालपर्व(र्वे)शी** स्त्री. १. लढाईत पडलेल्यांच्या कुटुंबाला मुलांच्या संगोपनासाठी सरकारने दिलेला पगार, वर्षासन, नेमणूक इ. २. लहानपणापासून जोडलेली चाकरी, मित्रत्व, आश्रितत्व इ. चा संबंध किंवा तत्संबंधी चाकर, मित्र, आश्रित इ.
[सं.बाल+फा.परवरिश्]
**बालफूट, बालफुटका** वि. केसाइतकी बारीक चीर असणारे नाणे.
**बालबाल** वि. पहा : **बालंबाल** [सं.] (वा.) ० **खूष होणे-** अतिशय

प्रसन्न, संतुष्ट होणे. ० **बोलणे, सांगणे–** एकसारखी बडबड करणे, वटवट लावणे.

**बालबीज** न. मुद्रा, कासलीचे बी.

**बालबुद्धी** स्त्री. पोरबुद्धी; पोरसमजूत.
वि. अज्ञानी; पोरकट समजुतीचा.

**बालबोध** इ. पहा : **बाळबोध** इ.

**बालब्रह्मचारी** पु. लहानपणापासून ज्याला स्त्रीसंग घडला नाही व ज्याचे लग्नही झालेले नाही असा मनुष्य.

**बालभाषा** स्त्री. १. लहान मुलांची भाषा; त्यांची बोलण्याची पद्धत. उदा. हम्मा=गाय, प्पापा =भाकरी, पोळी इ. २. एखाद्याची लहानपणापासून बोलण्याची भाषा; मातृभाषा. ३. संस्कृत भाषेची अपभ्रंश होऊन झालेली भाषा. (ही संस्कृत नाटकांमध्ये स्त्रिया व हलक्या दर्जाची पात्रे यांच्या तोंडी घातलेली असते.)

**बालमखिरा** पु. खिऱ्याची, काकडीची एक जात; वाळूक. [हिं.]

**बालमजूर** पु. पैशासाठी नोकरी, मजुरी, कष्ट करणारे अल्पवयीन मूल.

**बालमानसशास्त्र** न. लहान मुलांच्या विविध समस्यांचा (उदा. तोतरेपणा, बुजरेपणा, मतिमंदपणा, पुंडाई इ.) अभ्यास करून त्यावर उपाययोजना करण्याच्या प्रश्नांचा विचार करणारी मानसशास्त्राची शाखा.

**बालमित्र** पु. १. लहानपणापासूनचा, लहानपणी असलेला मित्र. २. नुकताच उगवलेला, कोवळ्या किरणांचा, सकाळचा सूर्य.

**बालर** पु. (मुद्रण.) टाइपाला शाई लावणारा; हँडमशीन हाताने फिरवायचे असेल त्यावेळी ते फिरवण्याचे काम करणारा. [इं. बॉल]

**बालरोगचिकित्सा** स्त्री. लहान मुलांना होणारे विकार व त्यावरील उपाय, उपचार यांचे अध्ययन करणारी वैद्यकशास्त्राची एक शाखा.

**बालव** न. (ज्यो.) सात करणांपैकी दुसरे करण. [सं.]

**बालवाडी** स्त्री. लोकवस्तीत जाऊन ३ ते ६ वर्षांच्या मुलांसाठी त्यांच्या नित्याच्या जीवनातून शिक्षण देण्याची पद्धत.

**बालविधवा, बालरंडा–रांड** स्त्री. लहान वयात, नहाण येण्यापूर्वी जिचा नवरा मेला अशी स्त्री. [सं.]

**बालवीर** पु. ११ ते १८ वर्षे वयातील, बालवीर चळवळीत सामील झालेला मुलगा. या चळवळीतील मुलांना स्वावलंबनाचे, इतरांना मदत करण्याचे वळण लावले जाते.

**बालसभा** स्त्री. प्रत्येक वर्गाने निवडलेल्या प्रतिनिधींची सभा. शिक्षकांच्या मार्गदर्शनाखाली मोठमोठ्या समारंभांचे नियोजन करणे हे मुख्य कार्य.

**बालसरस्वती** पु. लहानपणापासून अत्यंत बुद्धिमान असलेला पुरुष.

**बालहक्कांची सनद** १९५९ साली संयुक्त राष्ट्र संघटनेने प्रसिद्ध केलेली सनद. सर्व मुलांना शिक्षणाची संधी मिळाली पाहिजे, ती कुपोषणाला बळी पडू नयेत, त्यांचा शारीरिक छळ होऊ नये असे प्रमुख हक्क या जाहीरनाम्यात समाविष्ट केले होते.

**बालहरीतकी** स्त्री. कोवळे कोवळे वाळलेले हिरडे, बाळहिरडा. [सं.]

**बालं** न. चित्र; बाहुली; खेळणे. (व.) [सं.बहुल्ली]

**बालंजी** वि. १. प्रतिष्ठित. २. एक शिवी. (झाडी)

**बालं(ल–लां)ट** न. खोटा आरोप; आळ, कुंभाड.
वि. खोटा; वात्रट : 'मतिमंद व्यापारी पोर मी बालट ।'– दावि २०७. (व.) (वा.) **बालंटास, बालटावर येणे, सरणे –** एखाद्याचे वचन किंवा करार मोडणे.

**बालंटखोर, बालंटी–ट्या–ड–डी** वि. खोटा आरोप करणारा; कुंभाडी.

**बालं(ली)बाल** वि. पूर्ण; संशय घेण्यास केसभरही जागा नाही इतकी; पक्की.

**बाला** पु. नाण्यांचा ठसा; शिक्का; नाण्यावरील ठशाने उठलेला छाप.

**बाला** वि. विभक्त; उंच; अलग. [फा.] (वा.) ० **देणे, मारणे, हाकणे–** फसवून पळून जाणे; फसवणे.

**बाला** स्त्री. १. पाच ते सोळा वर्षांची मुलगी. २. तरुण स्त्री. [सं.]

**बाला(ले)खणी, बालाखाना** स्त्री. पु. धाब्यावर, वरच्या मजल्यावर बांधलेली खोली.

**बालागणित–क** क्रिवि. १. केसागणित; प्रत्येक केसाला. २.(ल.) अविरत: एकसारखे (शिव्या देणे, खोटे बोलणे इ.).

**बालाजी** पु. धान्याची रास करण्याचा विधी. (अहि.)

**बाला(ले)तंगी–ग** स्त्री. खोगीर आवळण्याचा पट्टा. [फा.]

**बालापोष** पु. ओव्हरकोट.

**बालाबग(गु)ला** स्त्री. एक क्षुद्र देवता.

**बालाबंद** पु. एक पट्टा (बहुधा शिरोवस्त्रावर बांधण्याचा) . [क.]

**बालासुंदरी** स्त्री. दारू. (झाडी) [सं.]

**बालाहिसार** पु. बालेकिल्ला : 'इतर इमारतीचे पडीत भाग सर्वत्र पसरले आहेत फक्त बालाहिसार मात्र अद्यापि टिकला आहे.'– ज्ञाको (ग) २३७.

**बालांडचे** सक्रि. ओलांडणे. (गो.)

**बालांडॉ** पु. देवळाचा सोपा. (गो.) [पोर्तु. इं. व्हरांडा]

**बालांत** न. बं, भं, मं, यं, रं, ल या 'ब' पासून 'ल' पर्यंत सहा वर्णांनी चिन्हित अशा सहा पाकळ्यांचे स्वाधिष्ठान चक्र. हे लिंगस्थानी आहे.याची अधिष्ठात्री देवता ब्रह्मा होय:'लिंगीं स्वाधिष्ठान षड्दळान्विता तेथ बालांत सा मातृका विराजित ।' – स्वादि ९.३.५५.

**बालिका** स्त्री. मुलगी. [सं.]

**बालिची** स्त्री. एक प्रकारची साडी. (व.)

**बालिश** वि. अज्ञानी; अननुभवी; अल्पवयी; पोरकट; मूर्ख.

**बालिस्त–लीस** स्त्री. उशी; तक्क्या :'लोडें बालिस्तें पलंग सुपत्ति । परी नाही लंगोटी नेसावया ।'– तुगा २१२८. [फा. बालिश्त्–श]

**बालिंगा** पु. लठ्ठ, पोसलेला, मस्तवाल मेंढा. याची शिंगे दणकट, पिळदार व कानाजवळ गोलाकार होऊन पुढे आलेली असतात.

**बाली** स्त्री. भारी लुगड्याचा एक प्रकार.

**बालेकिल्ला** पु. डोंगरी किल्ल्याचा उंच पोटकिल्ला, सर्वांत वरचा भाग; उपरकोट. [फा. बाला]

**बालेखणी** स्त्री. सज्जा; (इं.) बाल्कनी.

**बालेघाट** पु. घाटमाथा; घाटावरील प्रदेश. [फा. बाला+घाट]

**बालेभिंत** स्त्री. मुख्य भिंत, चांदई. हिच्यावर सर्व घराचा भार अवलंबून असतो.

**बाले(ल)भोक** पु. लांब मानेचा, बारीक पायांचा, फिकट काळ्या पंखाचा, नदीकाठी आढळणारा, कोकणांतील एक पक्षी.– ज्योत्स्ना ऑक्टो १९३८.

**बालोद्यानशाळा** स्त्री. पहा : **बालकमंदिर**

**बालोपचार** पु. लहान मुलांना योग्य असे औषध किंवा औषधाची योजना; हलके व सौम्य औषध; उपचार इ. [सं.]

**बालोभा जोडा** मारवाडी जोडा.

**बाल्दी** न. बैलाचे कातडे.

**बाल्य, बाल्यावस्था** न. स्त्री. १. बालपण; वयाच्या पाच वर्षांपर्यंतचा काळ. २. कौमार्यावस्था; तारुण्यप्राप्तीपर्यंतचा (सोळा वर्षांपर्यंतचा ) काळ. [सं.]

**बाल्या** पु. कुणबी वगैरे जातीतील घरकाम करण्यासाठी ठेवलेला मनुष्य; पोऱ्या. (को. ) [सं.बाल]

**बाल्होऱ्या** वि. लुडबुड्या. (व.)

**बाव** पु. व्रण. (गो.)

**बाव** पु. मुलींचा एक खेळ.

**बाव, बावडी–ली** स्त्री. विहीर; मोठ्या तोंडाची, पायऱ्या असलेली विहीर. [सं.वापी; क. बावी; गु., हिं. बावडी; सिं. बाइ; पं. बाड(डी)]

**बाव उपसणे–उसपणे** न. विहिरीतील चिखल, गाळ इ. काढण्यासाठी उपयोगी अशी टोपली, बादली, एखादे भांडे.

**बावका** वि. कोमेजलेला; सुकलेला; वाळून गेलेला; बावलेला. (कु.)

**बावकांड** न. (नाविक) होडी समतोल राहण्यासाठी बांधलेली उलांडी ज्या दोन किंचित बाकदार वाशांनी बांधतात त्यांतील प्रत्येक.

**बावकूफ्** वि. शहाणा. [फा.]

**बावकॉ–को–गा** पु. रानमांजर. (गो.)

**बावखं(क,ख)ड, बावख–ट, बावकडा** पु. न. १. खांद्याच्या वरचा भाग; बाहुमूल. २. गाडीच्या साटीतील चार लाकडांपैकी लांबीची दोन लाकडे; गाडीच्या वरच्या बाजूच्या लाकडी बाजवा; कठडा; लोखंडी आसाच्या वर–खाली असणाऱ्या लाकडांपैकी वरचे लाकूड. ३. पहा: **बावकांड** [सं. बाहु+काष्ठ–खंड]

**बावखैराती** वि. स्वैर; भटक्या; स्वैर वर्तनाचा.
क्रिवि. स्वैरपणाने; स्वच्छंदीपणाने; मोकाटपणाने.

**बावखोल** स्त्री. कोरडी पडलेली, केरकचरा पडून बरीचशी बुजलेली विहीर.– ऐको.

**बावचळ** पु. वायचळ; वेडगळपणा; विक्षिप्तपणा.

**बावचळणे** अक्रि. १. बडबडणे; बरळणे. २. (ल.) भ्रमिष्ट होणे; घाबरणे; गोंधळून जाणे; वायचळणे; बेभान होणे. ३. गैरशिस्त व दुराचारी मार्गाने चालणे व वागणे. [सं. भावचलित]

**बावचा, बावचळा** पु. १. विचका; विसकट; घोटाळा. २. वहीम; तर्क; संशय. (क्रि. जाणे, पडणे, होणें, वाटणे, भासणे).

**बावची** स्त्री. १. एक झाड, उंची दोन हात, पाने साधारण लहान, बी काळसर व मिऱ्याहून बारीक. त्याचे तेल काढतात. उपयोग सुगंधी पदार्थांत व अंगाला लावण्याच्या उटीमध्ये करतात. २. बावचीचे बी. ३. गवारी; गवारीच्या शेंगा. (को.) ४. एक प्रकारचे गवत; लव्हाळा. [सं. बाकुची; क. वाऊचि; हिं.;गु.]

**बाव(व्ह)टा** पु. १. निशाण; ध्वज; झेंडा. २. बाहुटा; हाताचा वरील भाग. [सं.बाहु; हिं.; क. बावटे; त. बावट्टा] ० **हकारणे –** (नाविक) आपले निशाण दाखवणे.

**बावटा** वि. साम्यवादी; कम्युनिस्ट. (व.)

**बावटा** पु. दंडावरील अलंकार; बाजूबंद. (झाडी) [हिं.]

**बावटी** वि. जबाबदार : 'रखमाबाई मृत्यु पावताच रखमाबाईचा ऐवज लक्षा दीड लक्षाचा लुटला. याचे बावटी कोण आहेत ?'– ऐको.

**बावट्या** स्त्री. अव. गैरलागू उत्तरे; सरळ प्रश्नांची वाकडी व विसंगत उत्तरे.

**बावडा–ळा** पु. ढेकूण. (ना.,व.)

**बावडा** वि. १. बापडा; दीनवाणा; गरीब; वेडगळ; मूर्ख. (को.) २. सौम्य; निरुपद्रवी.

**बावडी** स्त्री. स्त्रियांचे उरोवस्त्र; ब्रा; ब्रेसिअर. (अहि.) [इं. बॉडीस]

**बावणे, बावडणे** अक्रि. १. कोमेजणे; सुकणे; खराब होणे; टवटवी नाहीशी होणे. २. मावळणे : 'पश्चिमे बावडे दिनकरू।'– ख्रिपु १.३४.१०१.

**बावतं** न. तान्ह्या मुलाचा लंगोट इ. कपडा. (व.) [म.बाळवते]

**बावधनी** वि. लुगड्याचा एक वाण; याची किनार रेशमी, मोठी व चारकोयरी असते.

**बावन** न. पु. उत्तम, बावनकशी सोने : 'बावनासि केवी कसवटी। उणें करू शके।'– कथा ४.१६.१३. [सं. पावन]

**बावन–न्न, बावनचंदन, बावनया, बावना** न. उत्तम प्रकारचे चंदन; मैलागरु चंदन : 'मोळिकारा धांडोळितां रानें। जेविं मोळिए जोडिलें बावनें।'– ऋ १०.

**बावन–न्न** वि. ५२ ही संख्या.

**बावनकशी** वि. १. अतिशय शुद्ध व उत्तम; बावन्न वेळा शुद्ध केलेले; (सोन्याच्या शुद्धतेचे बावन कस धरले तर) बावनही कस ज्याचे उतरतात असे. २. (ल.) पवित्र; निर्दोष; प्रामाणिक (मनुष्य, पदार्थ इ.).

**बावनकस** न. उत्तम सोने : 'बावनकसाची नाणीं।'– वेसीस्व ७.५७.

**बावनख(खा)णी** स्त्री. वेश्यांची गल्ली (पुण्यातील शुक्रवारपेठेत बावनखणांची एक चाळ होती. तिथे वेश्या राहत असत, त्यावरून).

**बावनबत्तिशा–बाविशा** पहा : **बाराबाविशा**

**बावन मातृका** ॐकारापैकी अ, उ, म या तीन मात्रा व वरील बिंदू ही अर्धमात्रा मिळून साडेतीन मात्रा व त्यापासून पुढे बावन (१६ स्वर व ३६ व्यंजने मिळून) मातृका; ॐकार आणि स्वर व व्यंजने मिळून ५२ मुळाक्षरे.

**बावन मुद्रा** चंदनाच्या, गंधाच्या मुद्रा, ठसा : 'बावनमुद्रा बुद्धिसमुद्रा परखुणमुद्रा सुवर्णमुद्रा दे आमुच्या।'– पला ४.

**बावनवीर** पु. १. एक देवतासमूह. २.पराक्रमी किंवा हुशार मनुष्य. ३. (निंदार्थी) शूर; पराक्रमी. (ना.)

**बावनी** स्त्री. काटेरी लहान झाड (दामोट्यापासून उगवलेले). (व.)

**बावन्नी** स्त्री. पत्त्याच्या खेळात तेरा हात करून मिळालेला विजय.

**बावबंदी** स्त्री. स्वैरपणा; उनाडपणा.
वि. स्वच्छंदी; उनाड.

**बावर** पु. १. अनिष्टासंबंधी शंका; संशय. (क्रि. जाणे.) २. कल्पना; विचार. (क्रि. येणे.) ३. संभ्रम; भुरळ : 'नवतीची नारी तुझी नवती आवर तुझ्या बोलन्यानं पडला सख्याला बावर.'– लोसाको. [सं. भ्रम]

**बावरणे** अक्रि. घाबरणे; गोंधळणे; गडबडून जाणे (भय, दुःख, आश्चर्य, पिशाचबाधा यांनी).

**बावरा** वि. घाबरलेला; गोंधळलेला; भांबावलेला.

**बावराव** पु. बोभाटा.

**बावर्त** न. घोड्याचा एक रंग.– अश्वप १.२८.

**बावली** स्त्री. चित्त्याने केलेल्या शिकारीचे मांस.– चिमा ३७.

**बावले** न. (नाविक) डोलकाठी सरकू म्हणून तिला दोन बाजूंनी लावलेली लाकडे.

**बावसा** पु. १. धाक; भीती; दरारा. (क्रि. पडणे) २. भय किंवा दराऱ्याचा परिणाम; दचका. (क्रि. खाणे, घेणे, धरणे, बसणे.) ३. पहा: **बावचा २**

**बावसा** पु. निमंत्रण. (झाडी)

**बावस्या** पु. निमंत्रण पोहोचवणारा. (झाडी)

**बावळा** वि. १. बेडसर; मूर्ख; खुळचट. २. साधा.

**बावळा–सा** पु. बाहुटा; खांदा. [सं.बाहु]

**बावळे** न. छाया; सावली.

**बावा, बावाजी** न. १. तपस्वी, जोगी, गोसावी, गुरू, बाप, विद्वान किंवा वडीलधारा मनुष्य इ. च्या पुढे हा शब्द लावण्यात येतो. २. लहान मुलाला लाडिकपणे लावण्याचा शब्द. (को.) ३. मोठा भाऊ. (गो.)

**बावा–व्हा** पहा : **बाहवा**

**बावाकाठी** वि. लुगड्याच्या किनारीचा एक प्रकार. (तंजा.)

**बावांचे** पु. अव. गैरलागू उत्तरे; बांवट्या; भावास्रे; गोंधळून सांगितलेल्या सबबी; ढोंगी किंवा मानभावी उत्तरे. (क्रि. फोडणे, लावणे, घेणे.)

**बाविशी** स्त्री. मूळव्याध. (खा.) [फा. बवासीर]

**बावी** स्त्री. बाव; पायविहीर; शेतातील विहीर : 'असो हें पोखरणी बाबी। जेआ श्रीचरणकमळें बरवीं।'– ऋ १८. [सं. वापी]

**बावीस** वि. २२ ही संख्या. [हिं. बे+वीस; सं द्वाविंशति]

**बावीळ** स्त्री. कातळावर माती टाकून बनवलेली किंवा कातळावरील खळग्यात माती साचून झालेली शेतजमीन. पहा : **बाऊळ**

**बावे** न. सुकाणू हातात धरण्याचा दांडा; बावा.

**बाशा** पु. १. धडका; दचका; भीती. २. अंदेशा; वहीम; संशय.
पु.स्त्री. प्रकृतीत थोडासा बिघाड; किंचित दुखणे.

**बाशिंग** न. १. लग्नात नवरा–नवरीच्या कपाळावर बांधण्याचे कागदी बेगडाचे, तुरा असणारे आभूषण. २. पोळ्याच्या वेळी बैल शृंगारताना त्याच्या कपाळावर बांधण्याची बेगडी व कागदी भूषणे. ३. घोड्याच्या कपाळावरील त्रिकोणाकार तीन भोवरे. हे शुभलक्षण आहे. ४. (ढोरांचा धंदा) घोड्याच्या कपाळाला बांधलेला वाद्यांचा झुपका. ५. बाशिंगी झाडाचे पान. [सं. भाल+शृंग] (वा.) **कामाचे बाशिंग कपाळी असणे –** एखादे काम करण्याची विशेष योग्यता असणे; एखादे काम एखाद्यानेच करावे असे ठरलेले असणे.

**बाशिंगबळ** न. एखाद्याचा विवाह होण्यासाठी लागणारी दैवाची अनुकूलता.

**बाशिंगा** वि. १. पुरुषाहून प्रकृती श्रेष्ठ मानणारा व कलगी (लावणी) म्हणणारा. २. बाशिंग नावाचे शुभचिन्ह कपाळी असलेला (घोडा).

**बाशिंगी** स्त्री. आंब्याच्या झाडावरील बाशिंगाकार पानाचे बांडगूळ. ही एक औषधी आहे.

**बाशी** वि. शिळी; कोमेजलेली; निर्माल्य झालेली. [सं. वस; हिं. बासी]

**बाशी–सी** स्त्री. ताट; ताटली; बशी. [पोर्तु.; इं. बेसिन]

**बाशी बावन** अपचनामुळे सकाळी येणारी ओकारी, उलटी.

**बाष्कल** ऋग्वेदाची एक शाखा.

**बाष्कळ** वि. १. (बाष्कल या शाखेचे विरोधक त्यांना दूषण देण्यासाठी हा शब्द योजत. त्यावरून) स्वैर; स्वच्छंदी; वागण्यात व बोलण्यात ताळतंत्र नसलेला; चावट. २. वायफळ; वायफट; असंबद्ध (बोलणे, आचरण इ.). ३. खोटे; अप्रामाणिक.– हंको. ४. अनिष्ट; प्रतिकूल; दोषयुक्त; चुकीचे. ५. (ल.) अखाद्य; मांसाहारी. [सं.बाष्कल, वस्क]

**बाष्कळणे** अक्रि. मनाला येईल तसे वागणे; बाष्कळ होणे.

**बाष्कळपंत** पु. विदूषक : 'विवाहसामग्री करायाला अनामधेय बाष्कळपंत येतो.'– कल्याणनाटक.

**बाष्ट** वि. ओशट; बासट : 'नखविष आणि हिंगुर्डे। बाष्ट आणि वावडें।'– दास ३.६.४८. [सं. वास]

**बाष्प** न. पु. १. वाफ. २. कंठ भरून येण्याची, गहिवरल्याची अवस्था. (क्रि. दाटणे.) [सं.]

**बाष्पक** न. पाण्याची वाफ करण्यासाठी वापरले जाणारे दंडगोलाकार भांडे.

**बाष्पनपात्र** न. प्रयोगशाळेत द्रवाची वाफ करण्यासाठी वापरले जाणारे भांडे.

**बाष्पमापक** पु. वातावरणातील पाण्याच्या वाफेचे प्रमाण मोजणारे उपकरण.

**बाष्पस्नान** न. चांगला घाम येण्यासाठी वाफेच्या खोलीत किंवा वाफ असलेल्या भांड्यात काही वेळ बसणे; अंगाला वाफारा देऊन घाम काढणे.

**बाष्पानयन** न. एखाद्याचे अश्रू पुसणे; एखाद्याशी समदुःखी होऊन त्याचे अश्रू पुसणे.

**बाष्पित्र** न. इंधनाच्या ज्वलनामुळे उत्पन्न होणारी उष्णता बंदिस्त दाबपात्रातील द्रवाला देऊन अखंडपणे दाबयुक्त बाष्प निर्माण करण्याचे साधन; (इं.) बॉयलर.

**बाष्पीभवन** न. वाफ, बाष्प होण्याची क्रिया; विशिष्ट उष्णतामानाच्या खाली उष्णतामान असताना एखाद्या पदार्थाचे वायुसदृश अवस्थेत रूपांतर होऊ लागणे.

**बास** पु. १. कळक; बांबू. २. उसाची एक जात; हा कळकासारखा असतो. ३. (चर्म.) पशूच्या पाठीच्या कण्यावरील कातडे. [हिं.;सं. वंश]

**बास** उद्गा. बस्स; पुरे; अधिक नको.

**बासकरी** स्त्री. सोनाराची शेगडी.(खा.) पहा : **बागेसरी**

**बासगा** न. बाशिंग : 'त्यानंतर बासगां बांधून झाल्यावर कूळ ठेवणारें जोडपें कन्यादान करतें.'- मसाप ४.५५५ (राजा., कुण.)

**बास(ज)चे** अक्रि. खोटे बोलणे; कबूल न होणे; बाचाबाची करणे; बाचणे.(गो.)

**बास(सू)ट** न. १. ज्या पदार्थावर एखादा पदार्थ खाल्ला तर दुसऱ्या खाल्लेल्या पदार्थात विकार होतो असे परस्परविरोधी मिश्रण. उदा. पुरणपोळीवर ताक बासट आहे. २. कुपथ्यामुळे नवीन उत्पन्न झालेला विकार. ३. विष; कालकूट; पुष्कळ विषे एकत्र करून बनवलेला पदार्थ :- 'नाना विषवर्गु एकवटु । तया नांव जैसा बासटु ।'- ज्ञा १६.२१६.

वि. १. परस्परविरोधी; अपायकारक. २. ओशट; बेचव; वास मारणारे; आंबलेले; शिळे. ३. बेचव; नीरस; न रुचणारे (भाषण). [हिं.]

**बासटणे** अक्रि. १. बाचकुटणे. २. माखणे; चोपडणे; विषात घोळणे : 'तया द्वेषाचेनि काळकुटें । बासटोनि तिखटें ।'- ज्ञा १६.४०४. [सं. वि+भा+सज्]

**बासटे** पहा : **बासट**

**बास(सं)डा** पु. १. बास; वासा; बांबू; लांब कळक. २. भाला : 'पेंढार बासडेवाला होळकरं शत्रूला दबदबा ।'- ऐपो २३३. [सं.वंश; हिं. बांस]

**बासतरंग** पु. एक वाद्य; बांबूच्या नळ्यांचे वाद्य.

**बासन** न. १. आच्छादन; आवरण; गाठोडे किंवा पोथी बांधण्याचा रुमाल; बासाण. (गो.). २. गाठोडे; कपडे बांधून ठेवलेले बोचके. ३. (ल.) प्रचंड, अवाढव्य, विस्तीर्ण किल्ला, शहर, तोफ, कारखाना, खाते, पेढी इ. : 'सरस बासन वजनदार, पाहुणें मेले बहुत फार ।'- ऐपो १८५. ४. (ल.) प्रतिष्ठित मनुष्य; बडे प्रस्थ; दुढ्ढाचार्य. ५. दागिना. (व.) [सं. वसन, वस्; क. बासनि]

**बासन-णे** न. १. भांडे; मोठे भांडे : 'किस्मतगार हांडाबासन संभाळावयास गुंतले'- भाब ९७. २. वाद्य. (व.) ३. रखेली. [सं.भाजन]

**बासर** वि. १. भटक्या; स्वच्छंदी; अमर्यादित; ओढाळ : 'पाय सांडूनिया फिरतो बासर । स्वामिसेवा चोर होऊनिया ।'- तुगा ११०२. २.उर्मट. ३. बासे; शिळे.

**बासर-री** स्त्री. चरवी; घागर.

**बासरी** स्त्री. मुरली; पावा; अलगुज. [सं.वंश]

**बासष्ट** वि. ६२ ही संख्या. [सं.द्विषष्टि]

**बासा-शा** पु. मृत्यू. - ऐको.

**बासा, बासडा** पु. बास; वेळू; कळक. (ना.,व.) [सं.वंश]

**बासिक** वि. उंच.

**बासी** स्त्री. पावसाळ्यातील भातरोपांची नांगराने कोळपणी. [सं.वर्षा]

**बासी** स्त्री. पारडी. [सं.वत्सतरी]

**बासी उलटी** पहा : **बाशीबावन**

**बासुंदी** स्त्री. दूध आटवून त्यात साखर, सुकामेवा इ. मसाला घालून केलेले पेय पक्वान्न.

**बासे-सा** वि. १. शिळे (अन्न). २. कोमेजलेले (फूल). (को.) [सं.वस्-वास; हिं. बासी]

**बासेजना** अक्रि. अन्न विटणे, नासणे. (झाडी) [सं.पर्युषण]

**बास्स्याभोग** पु. भाताचे एक वाण. (झाडी)

**बाह-हा-ही-हे** स्त्री. बाहू; हात : 'आदिशून्य तरोनि जावें । केउतें बाही ।'- ज्ञा १०.१७८. [सं. बाहु]

**बाहणे** सक्रि. बोलावणे; हाक मारणे : 'धेनुवत्सें तुला बाहती माधवा ।'- भूपाळी.

अक्रि. आरोळी मारणे, देणे; ओरडणे. [सं.आह्वान, वि+आ+ह्वे]

**बाहणे** सक्रि. पेलणे; वाहणे : 'मत्स्ययंत्र गगनोदरीं धनुष्य वाहूनि भेदन करी' - मुआदि ३९.८०. [सं. वह=वाहून नेणे]

**बाहत्तर** वि. ७२ ही संख्या. [सं. द्विसप्तति]

**बाहप** न. अश्रूंमुळे येणारा गदगद : 'तेणें दाटतसे बाहप : कंठी येउनि'- ज्ञाप्र ९२४. [सं. बाष्प]

**बाहरी** स्त्री. वि. बहर; बहरी; बहार. (व.)

**बाहलकंचन** वि. मानेच्या दोन्ही बाजूंना आयाळ असलेला (घोडा).

**बाहवा** पु. एक औषधी झाड. याला पिवळी फुले व हातभर लांबीच्या काळ्या शेंगा येतात. शेंगांतील मगज काळा व चिकट असून औषधी आहे. झाडाची सालही औषधी व कातडी कमावण्याच्या उपयोगी आहे. [सं.आरग्वध]

**बाहवा-वे पंचक** काढ्यात घालण्याची बाहवा इ. पाच औषधे.

**बाह(हा)ळ** स्त्री. उपरणे, पासोडी इ. अंगाभोवती गुंडाळून डाव्या खांद्यावर त्याचा शेवट घेण्याची पद्धत. [सं.बाहु]

**बाह(हा)ळ** पु. विस्तार : 'तो गीतेचिया बाहळीं । वेदबीज गेलें पाहाळीं ।'- ज्ञा १८.१५११.

वि. १. पुष्कळ. २. तापवून पातळ केलेले (तूप, काकवी, मध इ.). [सं.वह्]

**बाह(हा)ळणे** अक्रि. बाहळ किंवा उष्णतेने पातळ, द्रवरूप होणे.

**बाहळा** वि. बांडा; अंगावर ठिपके किंवा पट्टे असलेला (बैल, कुत्रा).

**बाहाकणे** अक्रि. स्फुरणे; भरून राहणे : 'बाहाकाति आणु आणी परिमळीं ।'- दाव १५९.

**बाहारी** स्त्री. सून. (खा.)

**बाहा(हि)ळी** स्त्री. १. साजूकपणा. २. महत्त्व. ३. अतिशयपणा; बाहुल्य; भर : 'तेथ सप्त पौळीं । रत्नतेजाची बाहाळी ।'- शिव ३२२. [सं.बहुल]

**बाहिजु** क्रिवि. बाहेर : 'बाहिजु भीतरी ये दोन्ही नाहीं ।'- ज्ञागा २९५. [सं. बाह्य+ऋजु]

**बाहिजे** क्रिवि. बाहेरील; वरचा : 'बाहिजे दृष्टीं प्रियारूं । भीतरूं कुडा ।'- ज्ञाप्र ७४९.

**बाहिया** पु. आश्रयस्थान; आधार : 'परशास्त्राचा बाहिया देखा'- मूप्र २८४३.

**बाहिर** व्यक्त - ऐको.

**बाहिरभूमिस** क्रिवि. शौचास; परसाकडेस : 'तंव तो तपोधन मात्रा ठेउनि । बाहिरभूमिस दूरिं गेला ।' - पंच १.२८.

**बाहिरमुदी** वि. नकली; खोटे : 'भणौनि देवतासाध्यें फळें...बाहिरमुदीं' – ज्ञाप्र ५८८. [सं. बहिस्+मुद्रा]

**बाहिरलू** वि. बाहेरचा : 'आंगौनि एकुणा झोलु । फेडितांचि तो बाहिरलू ।' – अमृ २.४८.

**बाहिरिते** न. हगवणीने भरलेले वस्त्र : 'बाहिरितीं फेडितीं' – लीचपू ५१. [सं.बाह्य]

**बाहिरा** पु. १. (लाठी.) प्रतिपक्षाच्या उजव्या कानशिलावर मार. – मावि ९.११. २. फरी गदक्याचा कानशिलावर वार. – व्याज्ञा ४.२८४.

**बाहिरीबाहिरी, बाहिरबाहिरा** क्रिवि. परभारा; बाहेरचे बाहेर.

**बाहिरो** पु. धनगराचा लग्नविधी. – संशोधन, ऐलेच पृ. २६८. (खा.)

**बाही** स्त्री. १. (खांद्यापासून मनगटापर्यंतचा) सबंध हात. २. अंगरख्याचा हात; अस्तनी. ३. दाराच्या चौकटीचे दोन बाजूंचे दोन उभे खांब : 'दारापासीं येवोनि त्वरित । बाह्यांसी लाविले दोन्ही हस्त ।' – महिकथा ५.२३. ४. बाजू : 'कुंचे ढळती दोन्हीं बाहीं ।' – तुगा २७८. ५. मत; बाजू. (व.) (वा.) **०देणे–** १. खांदा देणे; मदत करणे; हातभार लावणे. २. पीक कोळपून काढणे. (खा.) **० धरल्याची लाज धरणे–** आश्रयाला आलेल्याचे धर्मबुद्धीने रक्षण करणे. **बाह्या–ही थापटणे, पिटणे, मारणे –** लढण्यासाठी तयार असल्याबद्दल दंड थोपटणे; कुस्तीला तयार असणे. **बाह्या–ही फुरफुरणे, फुरारणे, उसासणे, उडणे–** १. अंगात लढण्याची खुमखुमी येणे; मारामारीला उत्सुक असणे. २. भेटीला उत्सुक होणे; त्यासाठी शुभशकुन होणे.

**बाही** स्त्री. बैलगाडीच्या कठड्याची एक बाजू.

**बाहीचा वसूल** गाववसुलाच्या, पोत्याच्या रकमेपेक्षा खजिन्यात अधिक येणारी रक्कम. यातूनच पाटील व कुलकर्णी यांचे पगार देत असत.

**बाहीदार, बाही–ह्या** वि. १. पाठीराखा; मदत करणारा; बाजू घेणारा. २. हमी देणारा; जामीन होणारा, राहणारा.

**बाहीदारी** स्त्री. १. मदत; पाठिंबा. २. जामीनकी; हमी; जिम्मेदारी.

**बाहीदुट्टा** पु. १. चोळीच्या बाह्या होण्याइतका खणाचा किंवा कापडाचा तुकडा. २. चोळीच्या दोन्ही बाह्या, अस्तन्या.

**बाहीबुटी** स्त्री. बंडीचे सामान. (व.)

**बाही(हे)र** स्त्री. अव. सैन्याबरोबरचे बिनलढाऊ लोक; बाजारबुणगे.

**बाहीरवास** न. उपवस्त्र; अंगावर पांघरण्याचे वस्त्र. [सं.बहिः+वासस्]

**बाहु–हू** पु. १. सबंध हात; भुज. २. वरचा हात; दंड. ३. सरळ रेषांनी बनलेल्या आकृतीची, बहुकोणाची बाजू. ४. काटकोन त्रिकोणाचा पाया. ५. पहा : **भुज** ५. ६. (नृत्य.) खांद्यापासून मनगटापर्यंतचा भाग. याच्या आधारे दहा प्रकारचे अभिनय सांगितले आहेत. [सं.]

**बाहुज** पु. क्षत्रिय : 'प्रभु बाहुजकुलमणि ।' – आय २८.

**बाहु(व)टा** पु. निशाण; ध्वज; पताका. [हिं.]

**बाहुटा–टे** पु. न. १. काखेपासून कोपरापर्यंतचा हात. २. खांद्याच्या सांध्याचा भाग; बखोटा. ३. स्त्रियांचे एक बाहुभूषण; वाकी.

**बाहुटी** स्त्री. कोपरखळी. (व.)

**बाहुदंड** पु.पहा : **बाहु** १,२ : 'हीरांगदें शोभति बाहुदंडी ।' – सारुह ८.१५२. [सं.]

**बाहुबल–ळ** न. शरीरसामर्थ्य; केवळ शारीरिक शक्ती. [सं.]

**बाहुमूल** न. खाक; काख; बाखोटा. [सं.]

**बाहुयुद्ध** न. द्वंदयुद्ध; मल्लयुद्ध; कुस्ती. [सं.]

**बाहुला** पु. १. कापड, लाकूड, माती यांचा बनवलेला पुतळा, पुरुषाची प्रतिकृती (विशेषतः मुलींच्या खेळण्यात); भावला. २. बुजगावणे : 'कां तृणाचा बाहुला । मानिजे ना ।' – ज्ञा १८.४३८.

**बाहुली** स्त्री. १. पुतळी; खेळण्याची भावली. २. डोळ्यातील पुतळी; डोळ्यात दिसणारे प्रतिबिंब; त्या प्रतिबिंबाची जागा. ३. मोटेचा चाकदांडा ज्यांवर बसवलेला असतो ते दोन खांब; बुटली. ४. तसबीर. (व.)[दे.ब(बा)हुल्ली] (वा.) **०देणे–** दुष्कृत्य करण्यास प्रवृत्त करणे; दुष्कृत्याला प्रोत्साहन देणे.

**बाहुले** पहा : **बाहुली** १,३

**बाहुलेभोरपी** पु. कळसूत्री बाहुल्यांचा खेळ करणारा मनुष्य.

**बाहुलेभोरीप** न. कळसूत्री बाहुल्यांचा खेळ.

**बाहुल्य** न. विपुलता; समृद्धी; अतिशयता. [सं.]

**बाहे** पु. परस्परांच्या दंडाला धरून ढकलण्याचा व्यापार. – व्याज्ञा ४.१०७.

**बाहे** स्त्री. बाजू; पक्ष : 'आपण बाहे धरली आहे तों सर्व यथास्थित आहे.' – भारतवर्ष पत्रें यादी १०२.

क्रिवि. बाजूने; तर्फे.

**बाहेजमा** स्त्री. मूळ रहिवासी नसणाऱ्या, उपऱ्या लोकांवर बसवलेला कर. [सं.बाह्य+अर. जमा]

**बाहेर** क्रिवि. १. आतल्या बाजूहून भिन्न ठिकाणी; आत नव्हे असे. २. विशिष्ट देश–कालमर्यादा ओलांडून; शिवाय; वेगळा. ३. स्त्री आपल्या नवऱ्यासंबंधी बोलताना हा शब्द पूर्वी योजत असे. याउलट नवराही पत्नीविषयी बोलताना घरात हा शब्द वापरत असे. [सं.बहिस्] (वा.) **०करणे–** विकून, काढून टाकणे (जिन्नस, मालमत्ता इ.); दूर करणे. **०काढणे–** हद्दपार करणे. **०जाणे–** १. (बायकी) लघवीला जाणे. २. परसाकडे जाणे. **०निघणे, पडणे–** विवाहित स्त्रीने आपला नवरा सोडून परपुरुषाकडे जाणे; घर सोडणे; गृहत्याग करणे. **०बसायला जाणे–** १. मित्राच्या घरी बसण्यासाठी जाणे. २. शौचाला जाणे. **बाहेरचा पाय** – नित्य प्रवास. **बाहेरवाटेची असणे–** व्यभिचारी, बाहेरख्याली असणे.

**बाहेरकोट** पु. १. बाहेरील तट किंवा किल्ला; आतल्या तटाच्या बाहेरील तट. २. आतील तट व बाहेरील तट यांच्या दरम्यानची जागा. ३. किल्ल्याच्या बाहेरचा प्रदेश.

**बाहेरख्याल–ली** पु. स्त्री. रंडीबाजी; बहिर्व्यसन. [फा.खियाल]

**बाहेरख्याली** वि. छिनाल; रंडीबाज; बदफैली; व्यभिचारी.

**बाहेरगाव** पु. न. मोठ्या गावाच्या बाहेर असलेला लहान गाव; उपग्राम.

**बाहेरचा** वि. १. बाहेरील बाजूचा; बाहेरील. २. परका; तिऱ्हाईत; कुटुंबातील नसलेला (नोकर इ.). ३. हलक्या जातीचा. ४. न्हावी (ब्राह्मण विधवा स्त्रियांच्या भाषेत).

**बाहेरचार** पु. स्वैराचार; रंगेलपणा; बदफैली वृत्तीने राहणे.

**बाहेरचारी** पहा : **बाहेरख्याली**

**बाहेरचाल-ली, बाहेरची चाल** ज्योतिषशास्त्रविषयक वेळ, काळ नक्षत्रांची विशिष्ट संज्ञा. सूर्यनक्षत्रापासून चालू नक्षत्रापर्यंतच्या सात-सात नक्षत्रांचे गट करून त्यातील पहिल्या चारांना आत चालीची व नंतरच्या तिघांना बाहेरचालीची नक्षत्रे म्हणतात.

**बाहेरची** वि. (बायकी) विटाळशी. (क्रि. होणे, बसणे).

**बाहेरची पीडा** उपदंश; गर्मीचा रोग.

**बाहेरची बाधा, बाहेरबाधा, बाहेरचे** भूतबाधा, पिशाचाने झपाटणे.

**बाहेरपण** न. विटाळसपण; अस्पर्श अवस्था.

**बाहेरबट्टा** पु. नाण्यांची देवघेव करताना मिळालेला फायदा; नाण्यांच्या अदलाबदलीच्या वेळी द्यावयाची वटणावळ. (याउलट आतबट्टा.)

**बाहेरभी(भि)तर** क्रिवि. बाहेर किंवा आत; बाहेरच्या किंवा आतल्या बाजूला; आतबाहेर; कोठेही किंवा कोणत्याही ठिकाणी. [हिं.]

**बाहेरमुदी** स्त्री. बाह्यशोभा; देखावा; बहिरंग.
वि. बाहेरून डौल करणारा : 'तुका म्हणे बाहेरमुदी। आहाच गोविंदी न सरती।'- तुगा २८८०. [सं.मोद्]

**बाहेरव, बाहेररव, बाहेरव(वा)सा** पहा : **बाहेरची बाधा**

**बाहेरला, बाहेरील** वि. १. पहा : **बाहेरचा.** २.पृष्ठभागावरील

**बाहेरले** न. १. भूतबाधा. २. (ल.) नपुंसक. (व.)

**बाहेरवट्या-टा** वि. वाटमाऱ्या; लुटारू; दरोडेखोर.

**बाहेरवाटेची** वि. व्यभिचारी; बाहेरख्याली.

**बाहेरवार** न. बाहेरील आवार, बाजू, प्रदेश; अंगण. (राजा.)

**बाहेरसवडी** स्त्री. बाह्यदृष्टी : 'हेंचि पहावयालागीं। नावेक बोलिलों बाहेरसवडिया भंगीं।'- ज्ञा १०.३२६.
क्रिवि. बाह्यत:; वरपांगी.

**बाहेरा** पु. आपल्या हातातील जंबियाने जोडीदाराच्या उजव्या कानशिलावर केलेला वार.

**बाहेरील टांग** (कुस्ती) आपल्या एका हाताने जोडीदाराचा हात आपल्या बगलेतून घेऊन आपल्या दुसऱ्या हाताने त्याचे मनगट धरावे. आपल्या ज्या बगलेत जोडीदाराचा हात धरलेला असेल त्याच बाजूच्या आपल्या पायाने जोडीदाराचा गुडघ्यापासून घोट्यापर्यंत पाय अडकवून त्याला झोका देऊन पाडणे.

**बाहेरून** क्रिवि. बाहेरच्या बाजूने, बाजूकडून.

**बाह्य** पु. १. नाक इ. इंद्रियांनी कळणाऱ्या गोष्टी; इंद्रियगम्य विषय; जड द्रव्य : 'जयांतें बाह्याची भाषा। नेणेजेचि नि:शेष।'- ज्ञा ५.१३०. २. इंद्रिय.
वि. बाहेरील; बाहेरचा. (बाह्य शब्द उत्तरपदी येऊन बाहेरील, पलीकडचा, विषय नसलेला इ. अर्थी इतर पुष्कळ समास होतात. उदा. आचार- इंद्रिय-पंथ-जाति-धर्म-लोक-शास्त्र इ. बाह्य.
क्रिवि. बाहेरच्या बाजूला : 'नाना परींच्या घेतल्या बुंथी। तरी अंतर-शोभा बाह्य फांकती।'- रुस्व १५.३७. [सं.]

**बाह्यकर्ण** पु. कानाची पाळी व पडदा यांच्यामधील ध्वनिलहरी जमा करणारी पोकळी.

**बाह्यकंकाल** पु. अव. उभयचर प्राण्यांना कूर्चेचे किंवा अस्थिमय असणारे खवले.

**बाह्यकारके** न. अव. नदी, वारा, सागरी लाटा इ. बाह्यशक्ती.

**बाह्यकोन** पु. बहुभुजाकृतीची एक वाढवलेली बाजू आणि तिच्याशी संलग्न असणारी, न वाढवलेली बाजू यांच्यामधील कोन.

**बाह्यगोल** वि. ज्याचा पृष्ठभाग गोल असून बाहेर आलेला आहे असा.

**बाह्यप्रयत्न** पु. शब्दोच्चार करण्यात श्वासाच्या होणाऱ्या दोन मोठ्या क्रियांपैकी दुसरी- ओठाबाहेर पूर्ण शब्दोच्चार होण्याची- वागिंद्रियाची क्रिया. हे प्रयत्न अकरा आहेत.

**बाह्यलांग** न. बाह्यांग. (गो.)

**बाह्यवटे** क्रिवि. बाह्यात्कारी.

**बाह्यश्वसन** न. हवेतील ऑक्सिजन रक्तात मिसळण्याची व रक्तातील कार्बन डाय ऑक्साइड बाहेर पडण्याची क्रिया.

**बाह्यस्फूर्ति-र्ती** स्त्री. बाहेरील वस्तूचे अस्तित्व समजण्याचे ज्ञान; बाहेरील वस्तूंचा भास, बाह्यज्ञान. [सं.]

**बाह्या** पु. डग्गा, पखवाजाची धुमाची बाजू; धुमाडा. हा डाव्या हाताने वाजवतात म्हणून हे नाव. हा लाकडी किंवा बहुधा तांब्या-पितळेचा असतो. वरचे मोकळे तोंड कातड्याने मढवलेले असून त्यावर तसूभर व्यासाची वर्तुळाकार शाई घातलेली असते. [हिं.बाय; सं.वाम]

**बाह्यात्कारी** क्रिवि. १. बाहेरील बाजूला; बाहेरून. २. (ल.) उघडपणे; मोकळेपणाने. ३. बाह्यत:; वरवर; वरपांगी.

**बाह्यांबर** न. दलांबरापेक्षाही वर असलेला, भूपृष्ठापासून सुमारे ४०० किमीहून जास्त उंचीवरील वायूचा थर.

**बाह्योपचार** पु. (वैद्यक.) पोटात औषध न घेता शरीराला बाहेरून करण्याचा इलाज, उपचार, औषधयोजना. [सं.]

**बाळ** न. लहान मूल; बालक.
पु. मुलगा; शिशू : 'जसा वारावा चपळ बाळ बापानें।'- मोभीष्म ११.६९.
वि. १. लहान; अल्पवयीन. २. (ल.) मूर्ख अजाण : 'पंडित न गमसि जरि बहु पांडित्यहि करिसि दिससि बाळ मला।'- मोकर्ण ४१.१८.
३. कच्चा (आंबा). [सं.बाल]

**बाळकडू** न. १. लहान मुलांना किराईत वगैरे कित्येक कडू औषधे (विशेषत: सकाळी) उगाळून पाजतात ती गुटी. २. (ल.) लहानपणी मिळालेले शिक्षण, लागलेले वळण. ३. (ल.) उपजत प्रवृत्ती, गुण, गोडी.

**बाळका** पु. गोसाव्याचा शिष्य.

**बाळकी** स्त्री. उचकी. (गो.)

**बाळके** न. १. छाया. २. प्रतिबिंब.- मनको.

**बाळखुंट** पु. केळीच्या खुंटाला नवीन फुटणारा कोंभ; मोना.

**बाळगण** स्त्री. (मुले, गुरेवासरे यांची) जोपासना.

**बाळगणे** सक्रि. १. सांभाळणे; वाढविणे; काळजी घेणे; पालन करणे. २. राखणे; पदरी ठेवणे; आश्रय देणे (सैन्य, परिवार इ.). ३. धरणे; राखणे; जवळ असणे; ठेवणे (अभिमान, गर्व, कर्ज इ.).

**बाळगळा** पु. लहान मुलाचा बारीक आवाज; न फुटलेला आवाज.

**बाळगील** स्त्री. १. मुले, गुरे इ. सांभाळण्याचे काम, कष्ट. २. (ल.) जी सांभाळण्याची जबाबदारी आपल्यावर आहे व जी सांभाळण्यात फार श्रम, त्रास होतो अशी मुले, गुरे इ. समुच्चयाने.

**बाळगोपाळ** पु. अव. १. (कृष्णाचे खेळगडी, गवळ्यांची पोरे यावरून) लहान मुले; एकत्र जमलेली लहानमोठी मुले. २. एकत्र जमलेली गावातील लहानथोर माणसे.

**बाळटे** वि. लटके. (तंजा.)

**बाळटोळ** पु. लहान व हिरवा टोळ.

**बाळटोंक–ढोक** पु. बगळा.

**बाळणे** सक्रि. (कापडाचे दुकान) विकलेली वस्तू विकत घेणाऱ्याला देणे, त्याच्या स्वाधीन करणे; विकणे; आफळणे. [सं.वि+आ+आल्]

**बाळणे** सक्रि. जाळणे (कापूर, ऊद, उदबत्ती, राळ इ.). (व.) [गु.]

**बाळणे, बाळंदा** न. पु. देवळासमोरच्या मंडपाला दोन्ही किंवा चारी बाजूंनी बसण्यासाठी केलेला चिरेबंदी कट्टा; बलाणी. यावर मतमानकरी बसतात. (गो., कु.)

**बाळताड** पु. नरजातीचा ताड. याला फळे येत नाहीत.

**बाळदात** पु. अव. लहानपणचे, पहिले, दुधाचे दात.

**बाळदिंड** न. केळीचे काले. (तंजा.) [क. बाळेदिंडु]

**बाळदी** वि. बैल, गाय यांच्या कातड्याचा जोडा. याउलट म्हसरी.

**बाळदी जोडा** उंची, अधोडी जोड्याहून उच्च प्रतीचा जोडा.

**बाळदृष्टी** स्त्री. तारुण्यातील बारीक व लांबची वस्तू जिने दिसते अशी, जोमदार दृष्टी.

**बाळपणचे लोणी** प्रथमच व्यालेल्या गाईच्या किंवा म्हशीच्या दुधावरील लोणी.

**बाळपाठ** पु. लहानपणी शिकलेली, लहानपणची विद्या, शिकवण.

**बाळफूट** न. १. कच्चा, हिरवा आंबा. २. पहा : **बालचीर–फूट**

**बाळफोक** पु. (नाजूक, कोवळी फांदी यावरून) तरुण; तरणाबांड.

**बाळबोध–बद** स्त्री. देवनागरी लिपी (मुलांनाही समजण्यासारखी). याउलट मोडी लिपी.

वि. १. साधा; निरुपद्रवी; प्रामाणिक; शुद्ध. २. स्पष्ट; सरळ; खुल्या दिलाचा; जुन्या चालीचा (व्यवहार, भाषण, वर्तणूक, वळण). ३. मुलांना शिकण्यास सोपी (भाषा, लिपी इ.).

**बाळबोध कित्ता** (ल.) उदार धोरण : 'मी मुंबई इलाख्याचा कारभार चालविताना.... एल्फिन्स्टन यांनी घालून दिलेला बाळबोध कित्ता वळवीन.'– टिळे १.४३६.

**बाळभूक** स्त्री. (मुलांची भूक. यावरून) वरचेवर लागणारी भूक.

**बाळभोक** न. १. बगळा; बाळढोक. २. (ल.) लांब मानेचा इसम.

**बाळभोग** पु. १. सकाळची पूजा झाल्यानंतर देवाला अर्पण केलेला उपाहार. २. (ल.) लहान मुलांचा सकाळचा फराळ. ३. असे नैवेद्याचे, फराळाचे पदार्थ. ४. (सामान्यत:) हिस्सा; वाटा; भाग.

**बाळमायणी** स्त्री. गाडीच्या चाकाच्या आतील बाजूचा वसू, आतील वसवी; कणा आखरीत भक्कम करण्याची लोखंडी चाकी.

**बाळमुकी** स्त्री. १. मेजवानीच्या, फराळाच्या वेळी गुपचूप वानगी म्हणून राखून ठेवलेला एखादा जिन्नस; पदार्थ, घास. २. असा राखून ठेवलेला नसेल तर त्याला दंड द्यावा लागणे किंवा दिलेला दंड. (क्रि. लागणे.)

**बाळमुंज्या** पु. मोठा झाला तरी अविवाहित असलेला मनुष्य.

**बाळराजा** पु. (लाडाने)पुंड, धीट किंवा दांडगा मुलगा.

**बाळलेणे** न. लहान मुलाच्या अंगावर घालण्याचे बिंदली इ. दागिने.

**बाळवणे** सक्रि. चोरणे. (व.) [फा.बाला]

**बाळवाटी** स्त्री. पहा : **बाळभोग** १,४

**बाळवांगी** पहा : **बेलवांगी**

**बाळवैद्य** पु. लहान मुलांचा वैद्य.

**बाळशिरे** न. बाळंतिणीला तिच्या मुलासाठी धर्मार्थ दिलेले दूध, भांडी व इतर आवश्यक वस्तू इ. (को.) [सं.बाल+क्षीर]

**बाळसंतोष** पु. भिकाऱ्यांचा एक वर्ग; त्यातील एक व्यक्ती. हे भिकारी प्रस्तुत शब्द मोठ्याने उच्चारून जुने कपडे मागतात. यांच्या अंगावर नाना रंगांची वस्त्रे असतात. [सं.बालसंतोष] (वा.) **उघडाबोडका बाळसंतोष–** १. निर्धन. २. ज्याला मागेपुढे कोणी नाही असा.

**बाळसावणे, बाळसणे** अक्रि. १. गुबगुबीत, लठ्ठ होणे; (तान्ह्या मुलाला) बाळसे येणे. २. (विशेषत: बाळसणे) माता होणे; (ल.) मूल होणे. ३. पोरकटपणा करणे; मुलासारखे वागणे.

**बाळसांगाडा** पु. (मल्लविद्या) आपल्या एका पायावर जमिनीवर असलेल्या जोडीदाराचा घोटा धरून पाय उचलून आपला पाय जोडीदाराकडील पायाच्या आतील घोट्याकडील बाजूने घालून जोडीदाराच्या पायाचा पंजा आपल्या जांगाड्यात धरून व आपला गुडघा जमिनीवर टेकून जोडीदाराला मारणे.

**बाळसे** न. १. मूल साधारण एक वर्षाचे होईपर्यंत त्याच्या अंगावर दिसणारी पुष्टता; तान्ह्या मुलांचा गुबगुबीतपणा. २. (ल.) टवटवी; तजेला; नवीनपणा; कांती. [सं.बालसू,बालिश]

**बाळसेदार** वि. बाळसे घेतलेला; गुटगुटीत; लठ्ठ; गोंडस.

**बाळस्वार** वि. १. लहानपणापासून घोड्यावर बसणारा. २. (ल.) लहानपणापासून एखाद्या शास्त्रात किंवा उद्योगधंद्यात प्रवीण असलेला.

**बाळह(हि)रडा–डी** पहा : **बालहरीतकी**

**बाळंत** स्त्री. १. नुकती प्रसूत झालेली स्त्री. २. आपली फाजील काळजी घेणारा, स्वत:चे नेहमी कोडकौतुक करणारा मनुष्य. [क.बालवती]

**बाळंतकाढा** पु. बाळंतिणीला वैद्यकात सांगितलेला काढा. [सं.बाणंतिगे]

**बाळंतखोली** स्त्री. बाळंत होण्याची खोली; ज्या खोलीत बाळंतीण असते ती खोली.

**बाळंतघर** न. १. ज्या घरात स्त्री बाळंत झाली आहे त्या घराला सोयर, सोहेर फिटेपर्यंत (दहा दिवस) म्हणतात. २. पहा : **बाळंतखोली**

**बाळंत** स्त्री. १. नुकती प्रसूत झालेली स्त्री. २. आपली फाजील काळजी घेणारा, स्वत:चे नेहमी कोडकौतुक करणारा मनुष्य. [क.बालवती]

**बाळंतकाढा** पु. बाळंतिणीला वैद्यकात सांगितलेला काढा. [सं.बाणंतिगे]

**बाळंतखोली** स्त्री. बाळंत होण्याची खोली; बाळंतीणीला ठेवतात ती खोली.

**बाळंतघर** न. १. ज्या घरात स्त्री बाळंत झाली आहे त्या घराला सोयर, सोहेर फिटेपर्यंत (दहा दिवस) म्हणतात. २. पहा : **बाळंतखोली**

**बाळंतचुडा** पु. बाळंतिणीचा सोहेर फिटल्यानंतर तिला भरण्याच्या बांगड्या.

**बाळंतनिंब** पु. निंबाची एक जात; कडुनिंब.

**बाळंतपण** न. १. प्रसूती. २. बाळंतिणीची चाकरी, शुश्रूषा. ३. (ल.) एखादे कार्य होऊन गेल्यावर त्यासंबंधी पुढे करण्याची व्यवस्था.

**बाळंतबोळ** पु. काळा बोळ; हा एका झाडाचा वाळलेला डिंक असून तो बाळंतिणीला देतात.

**बाळंत(ते-टे)र** पु. न. बाळंतपण. (गो.)

**बाळंतरोग** पु. बाळंतिणीला होणारा क्षयरोग; सूतिकारोग. याची लक्षणे- ज्वर, अतिसार, ग्लानी, शूळ, अशक्तपणा इ. हा रोग कष्टसाध्य आहे.

**बाळंतविडा** पु. बारशाला किंवा त्यानंतर बाळंतिणीला तिच्या इष्टमित्रांनी, नातेवाइकांनी द्यावयाचा विडा, ओटी, खण, कुंची, बाळलेणे इ.

**बाळंतशे(शो)प** स्त्री. शेपेचा एक प्रकार. यापासून औषधी तेल निघते. ही स्निग्ध व गोड असते. पानथरी, जंत व मूळव्याध या रोगांवर व वातकफावर उपयोगी. [सं.शतपुष्पिका; हिं. सोयासोयेके बीज]

**बाळंतीण** स्त्री. नुकतीच प्रसूत झालेली स्त्री. [क.बाणंति]

**बाळं(ळां)ते, बाळवते** न. अव. बाळंतिणीची व तिच्या बाळाची वस्त्रे इ.: 'बाळांत्याचे पांघरवीजे लुगडें वो।'- मध्व २३.

**बाळंदा-धा** पु. १. मुले वाढवण्यात, त्यांची जोपासना करण्यात भोगावा लागणारा हरएक प्रकारचा त्रास किंवा काढाव्या लागणाऱ्या खस्ता. २. हरएक प्रकारचा त्रास देणारी मुले, गुरे, बायका इ. खटले. ३. लहान मुलांचे लेणे; अंगावर घालण्याचे दागिने. [सं.बाल+धा]

**बाळंबोळ** क्रिवि. तोंडोतोंड; काठोकाठ; पूर्ण माप भरून. (क्रि. घालणे, भरणे, मोजणे, मापणे.)

**बाळा** स्त्री. बैलाला लडिवाळपणाने किंवा प्रेमाने लावण्यात आलेला शब्द. (वा.) **बाळ्या देणे, मारणे, हाकणे-** धावणे; पळणे. (मोटकरी मोट भरली म्हणजे बैलांनी ती ओढावी म्हणून बाळ्या असा खुणेचा शब्द उच्चारतो त्यावरून.- मोल.)

**बाळा** स्त्री. अव. क्षुद्र दैवते : 'जाखमाता मायराणी। बाळा बगुळा मानविणी।'- दास ४.६.१६.

**बाळा** पु. कानाच्या चाफ्याच्या भोकात घालण्याचा चंद्रकोरी आकाराचा, दोन्ही बाजूंनी रत्नजडित असा पुरुषाचा दागिना.

**बाळाणे** न. खिडकी; झरोका.

**बाळाणे, बाळी** स्त्री. एक जातीचे लुगडे. (व.)

**बाळाणेनसी** क्रिवि. सज्जामध्ये; गॅलरीत; माडीवर : 'करूनि शृंघाररचना। बैसली बाळाणेनसी।'- भाए ३७८. [सं.अलिंद]

**बाळायती** वि.बाळ; लहान : 'त्या बाळायती गोपीतें। हरिलें दैत्य वेषें तेथें।' - रास २.३६०.

**बाळांदर** न. झाडावर राहणारा मुंगसासारखा प्राणी. हा कुशीला असलेल्या पातळ चामडीच्या योगाने पक्ष्यासारखा उडून जातो. (गो.)

**बाळिंगा** पु. १. पहा : **बालिंगा**. २. (ल.) जवान; तरुण. ३. (ल.) खूप मोठा दगड.

**बाळी** स्त्री. १. कन्या; मुलगी. २. तरुणी : 'नेऊं पाहसी भीमकबाळी।'- एरुस्व ८.२७. [सं.बाला]

**बाळी** स्त्री. कर्णभूषण; कानातील अलंकार. [सं.वलय; हिं.बाली; क.बावलि; त.वाळिंगे]

**बाळीबुगडी** स्त्री. बाळ्या, बुगड्या इ. बारीकसारीक दागिने.

**बाळीभोळी** वि. भाबडी : 'तेथें जावें तें बाळींभोळीं।'- दावि २८१.

**बाळे** न. म्हातारचळ; म्हातारपणचे भ्रमिष्टासारखे वागणे. (राजा.)

**बाळेणे** अक्रि. खुळावणे; म्हातारचळ लागणे; वेडा होणे; झोपेत बडबडणे.

**बाळेणे** अक्रि. विस्तार पुष्कळ होऊन फळे कमी लागणे.

**बाळेबंदी** स्त्री. पहा : **बालाबंद**

**बाळेला** वि. वेडसर झालेला : 'शोधी वर्नी, प्रभु गमे श्रीविरही जेंवि वृद्ध बाळेला।'- मोवन ११.५८.

**बांग** स्त्री. १. कोंबड्याचे (विशेषत: सकाळचे) आरवणे. २. गुराख्याचा एक खेळ. ३. (मुसलमानी) प्रार्थनेला बोलावण्यासाठी, नमाजासाठी केलेला पुकारा. [फा.]

**बांगड** पु. बांगड्या विकणारा; कासार.

**बांगडखार** पु. काच वितळवण्यासाठी, बांगड्या करण्यासाठी उपयुक्त खार.

**बांगडा** पु. समुद्रातील लहान व पांढरा मासा. याच्या जाब व करटा या दोन जाती.

**बांगडी** स्त्री. १. चुडा; कंकण; बायकांनी हातात घालण्याचे काचेचे किंवा सोन्याचे वलय. २. दोरीचे वेटोळे, कडोळे. ३. मळसूत्राचा पेच; उसाच्या चरकातील नवरी. ४. भिक्षेकऱ्यांची एक जात; त्यातील एक व्यक्ती. ५. बैलगाडीच्या चाकाच्या तुंब्याच्या दोन्ही तोंडांना बाहेरून बसवलेली लोखंडी मायणी. ६. बटाट्यातील एक रोग; चक्र. ७. उसाची एक जात. ८. फोनोग्राफची तबकडी, प्लेट. (वा.) **०फुटणे-** १. (नवरा मेला असता स्त्रिया बांगड्या फोडतात त्यावरून) नवरा मरणे; वैधव्य येणे. २. माणसे मरणे. ३. फजिती होणे; नक्षा उतरणे; हानी होणे. **०बंद होणे-** अत्यंत शांतता होणे (बायकांची निजानीज होणे). **बांगड्या भरणे-** नामर्द होणे; पराक्रमशून्य असणे. **बांगड्या वाढणे, वाढवणे-** पहा : **बांगड्या फुटणे. दुसऱ्याच्या बायकोला बांगड्या भरणे-** उसन्या वस्तूवर पैसा खर्च करणे; काहीही परत मिळणार नाही अशा ठिकाणी पैसा खर्च करणे.

**बांगडी मखर** मध्ये एक व बाजूला चार मिळून पाच-पाच बांगड्यांची किनारी असणारे मखर.

**बांगडी सिंगापुरी** रेशमाची एक जात.

**बांगडुली** स्त्री. लहान बांगडा मासा. (गो.)

**बांगडो मारणे** (यात्रेकरूंच्या बोलण्यात रूढ) टिचकणे; टिचकी मारणे. (काशी)

**बांगड्या भरलेला चौक** बांगड्यांचा लहानसा ओटा : 'महाराणीसाहेब यांचें नहाणें झाल्यावर स्वारी बांगड्या भरलेल्या चौकावर श्रीमहाराज सरकार यांजसमवेत बसते.'- प्रसृतिकृत्यादर्श पृ. ८.

**बांगर** पु. अंड न बडवलेला बैल, रेडा; सांड. (राजा.)

**बांगरसट-ठ** स्त्री. चंपाषष्ठी; मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी.

**बांगराळे** न. बांगडीला वर्तुळाकार करणारा लाकडी ठोकळा.

**बांगरी** स्त्री. १. डहाळी. २. हरभऱ्याचा गुच्छ. (झाडी)

**बांगा** स्त्री. वांग; वांब; अंग आखडणे; चमक निघणे.

**बांगी** पु. बांग देणारा; मुसलमानांना नमाजासाठी मशिदीत हाक मारणारा.

**बांगुली** स्त्री. मातीचे लहान भांडे. (झाडी)

**बांड** वि. १. रोगामुळे चेंबलेले व खुरटलेले (पीक); बारीक झालेले (धान्य, डाळ इ.). २. बळकट; तेजस्वी; धट्टाकट्टा; जवान. ३. जाडेभरडे (कापड). ४. (प्राय:) बंडखोर; बंड. ५. वांझ, दाणे न भरलेले (कणीस). [क. उंडिग, उंडिगी, उंडगा]

**बांड** पु. १. सुती व हलक्या किमतीचे लुगडे; सुताडा; उणाख लुगडे (किनार सुती असलेले). २. कांदा, नागदवण इ. झाडांना येणाऱ्या तुऱ्याचा दांडा; पोंगाडा (फुलांचा किंवा झाडांचा). ३. बाटूक; कणसावाचून असलेले जोंधळ्याचे ताट; ज्यावर रोगामुळे कणीस आले नाही किंवा ज्याचे कणीस गुरांनी खाल्ले आहे किंवा कापले आहे असे जोंधळ्याचे अगर बाजरीचे ताट. ४. जळाऊ लाकडाचे वाटोळे तुकडे; न फोडलेले लाकडी ओंडके.

स्त्री. १. धान्य न होता केवळ कडबाच होणारी जमीन. ज्यातील पीक खराब आले आहे किंवा गुरांनी खाल्ले आहे असे शेत, पीक. २. वांग्याची एक जात. [हिं.]

**बांडखी कढी** हळद न घातलेली कढी. (व.)

**बांडगा-गे** पु.न. खोगिराचा किंवा मुठीचा पाठीवरून बांधावयाचा पट्टा; पाटबंद. याउलट उराटी-ठी.

**बांडगूळ** न. १. झाडावर वाढणारे दुसरे लहान झुडूप; परोपजीवी वनस्पती; झाडाचे करट. २. (ल.) ऐतखाऊ; फुकट्या. [सं.बंदा]

**बांडफरीद** पु. १. (निंदार्थी) ब्रह्मचारी. २. सोदा, लुच्चा, भटकभैरव, उडाणटप्पू माणूस. [ हिं. बांडा+अर.फर्द]

**बांडा** वि. १. पांढऱ्या, काळ्या किंवा तांबड्या रंगाचा, परंतु वर निराळ्या रंगाचे पट्टे किंवा ठिपके असलेला (पशू, कपडा); काळा-पांढरा. २. (सामा.) बंड; बंडखोर; बंड्या. ३. आखूड; तोटका. [हिं.]

**बांडा, बांडेभाई, बांडुकला** पु. (निंदार्थी) मुसलमान. (ना.)

**बांडाभुरका** वि. काहीसा बांडा; किंचित बांडा.

**बांडाळ** वि. नाठाळ; उनाड. (व.)

**बांडी** स्त्री. १. पिकाची खराबी; नुकसानी; नापिकी. २. कणीस बाहेर न पडता वांझ राहिलेले ताट; बांड. (व.) ३. तूट; टंचाई; नपूर. (व.) ४. कमरेपर्यंत लांब व अर्ध्या बाह्यांचा कोट. (ना.) ५. पोहरा; मडके; ताडी साठवण्याचे मडके. (ठाणे) ६. सुताची लाथी. (व.) ७. (ल.) रूपे.- गुजा. ८. उसाचा सर्वांत वरचा बेचव भाग. (अहि.) ९. आखूड टोक. (अहि.)

**बांडी मोडणं** देणे देऊन मोकळे होणे; ऋणमुक्त होणे. (अहि.)

**बांडुक** पु. बेडूक. (कु.) [सं.मंडूक]

**बांडुकलं** वि. आखूड; तुटक्या शेवटाचे. (व.)

**बांडेले** वि. कणसे न आलेले : 'बांडेल्याचें जागां जालें पीक।'- तुगा ३०४६.

**बांद** स्त्री. बंदोबस्त; घटना; घडण : 'ते तुम्ही येकरूप जालियाणे कामाची बांद येथास्थित होईल.'- पेद २४.२६१. [सं.बन्ध्]

**बांदन** न. पोट; मुख्यत्वे बस्तीचा भाग; ओटीपोट.

**बांदबंदिस्ती** स्त्री. शेतातील धुरापाळीची कामे. (झाडी)

**बांदर** पु. वानर. (व.) [उदू बंदर]

**बांदरा** वि. गचाळ; घाणेरडा. (व.)

**बांद(दा)री** स्त्री. १. क्षितिज. २. सह्याद्रीचा पश्चिमेकडील पायथ्यापासून शिखरापर्यंतचा सर्व भाग.

**बांदरी** स्त्री. हमी; जामीनकी; जिम्मा. (क्रि. देणे)

**बांद(ध)वडी, बंदिवाडी, बांदो(दौ,धौ)डी** स्त्री. १. बंदिखाना; तुरुंग; बंदिवास : 'दु:ख बांदवडी आहे हा संसार।'- तुगा ३६.५५. २. पारतंत्र्य; अधीनता.

वि. अधीन; अवलंबून असलेला; बंदा; ताबेदार.

**बांदवडी** स्त्री. शेताचा बांध. [फा.]

**बांदाई** स्त्री. भाताचे भारे बांधण्याचे काम, मजुरी. (झाडी)

**बांदागूळ, बांदूळ, बांदे** स्त्री. न. बांडगूळ; बांदा. (कु.)

**बांदा(दो)टी, बांधोळी** स्त्री. लहान बांध; धरण. (को.)

**बांदाड** न. १. शेताचा न नांगरलेला भाग; बांध; कड. २. (ल.) अशा जमिनीवर वाढणारे गवत. ३. शेताच्या कडेने सोडलेली वाट.

**बांदाबुंदी** स्त्री. पावसाची भुरभुर.

**बांदी** स्त्री. दासी; बटीक; गुलाम स्त्री. [हिं.]

**बांदी** स्त्री. बंदा; वृक्षादनी; जीवंतिका; एक वनस्पति; बांडगूळ.- मसाप ४५.३.

**बांदी** पु. खाजणाचा एक भाग. (गो.)

**बांदीचा** पु. दासीपुत्र; लवंडीचा : 'एकासी म्हणे मी तुझे बांदीचा।'- तुगा ३०५७. [सं.बंदी]

**बांध** पु. १. बंधारा; धक्का; धरण; ताल. (क्रि. घालणे) २. शेताची उंच केलेली हद्द; मर्यादा; शेताच्या काठावरून बाजूने असलेली वाट. ३. बंधन; बांधणे; आवळणे. ४. बंद; दोरीचा, नाडीचा तुकडा; कोणतेही बांधण्याचे साधन; बंधन. ५. (ल.) बेडी; शृंखला. ६. बांदाड. [सं.बंध]

**बांधकाम** न. दगड, विटा, चुना, माती इ.नी एकत्र बांधलेली भिंत, तट इ.

**बांध(धा)टणे** अक्रि. बाठळणे; बाठ, आंबा पूर्ण तयार होणे. (राजा.)

**बांधण** न. १. नदीचा थोडासा प्रवाह किंवा ओढा ज्या जमिनीतून वाहतो व जिला बांध घालून पाणी व त्याबरोबर आलेली मळी जिच्यात अडवून धरतात ती जमीन. विशेषत: भाताचे शेत.

न.स्त्री. १. शेतातील माती पाण्याच्या प्रवाहाने वाहून जाऊ नये म्हणून आडवा घातलेला बांध. २. पाटाच्या पाण्यासाठी बांध घालणे. (क्रि. करणे, घालणे.) ३. बंद; बंधन; बांधणे. ४. दागिन्याला तारेच्या कडीत लोंबत्या बांधलेल्या रत्नाचे काम.- जनि परिभाषा १.१०. ५. निरण. (को.)

**बांधणावळ** स्त्री. १. (इमारत इ.) बांधण्याबद्दलची मजुरी. २. बांधणी; बांधण्याची तऱ्हा, पद्धत.

**बांधणी** स्त्री. १. सुट्या वस्तू दोऱ्याने एकत्र बांधण्याची क्रिया. २. बांधकाम. ३. मांडणी; रचना. ४. बांधण; बांध; बंधारा; ताल. (को.) ५. (ल.) विहित, ठरावीक मार्ग. ६. शेतातील मधला, कडेचा मार्ग; पायवाट. ७. बांधण्याचे साधन.

वि. बांधणासंबंधी; बांधणातील पिकासंबंधी.

**बांधणी** स्त्री. प्रथम वस्त्राला विशिष्ट प्रकारे गाठ मारून मग रंग देण्याची

परंपरागत भारतीय कला. असे वस्त्र उठावदार दिसते. त्यापासून साडी, दुपट्टा, फेटा इ. तयार करतात.

**बांधणीकार** पु. कागद एकत्र शिवून (वह्या, पुस्तके इ.) बांधणारा मनुष्य.

**बांधणीशाळा** स्त्री. पुस्तकांची बांधणी करण्याची जागा.

**बांधणे** न. पाण्याच्या प्रवाहाची दिशा बदलण्यासाठी घातलेला बांध; त्यासाठी वापरलेले गवत, गाळसाळ वगैरे. (राजा.) [सं.बंध]

**बांधणे** सक्रि. १. आवळणे; एकत्र करणे; तांगडणे; अडकणे. २. गाठ देऊन आवळणे; गाठ मारणे. ३. नाल मारणे; (घोड्याला) पायबंद घालणे. ४. (पागोट्याला) घड्या घालून नीट आकार देणे; गुंडाळणे. ५. (बांध घालून पाणी) अडवणे. ६. (नियम, कायदे, रीत, वेळ इ.) योजणे, स्थापन करणे, प्रचारात आणणे. ७. (कायद्याने, नियमाने) बांधून घेणे; रोधणे; जखडून टाकणे. ८. (घर, भिंत, जहाज इ.) रचणे; उभारणे; बनवणे. ९. (धरण, रस्ता इ.) बांधून पक्का करणे. १०. (काव्य, व्याख्या, ग्रंथ) रचणे; रचना, जुळणी करणे. ११. (तर्क, कल्पना, बुद्धी, युक्ती) योजणे, रचणे, बनवणे; एकत्र करणे. १२. बनवणे; (जोडे, मिठाई इ.) वस्तूंना आकार देणे. १३. (वैर, मत्सर, द्वेष) धरणे, बाळगणे, मनात ठेवणे. १४. मंत्राने ताप न येईल किंवा न दिसेल असे करणे; मंत्राने थांबवणे; बंद करणे. [सं.बंध्]

**बांधप** न. बांधण्याचे सामान, साधन; घराचे ओंबण इ. बांधण्यासाठी लागणारे सुंभ, दोर इ. (राजा.)

**बांधरा** पु. बांध; धक्का; मोर्चा : 'तया बांधले बांधरे । मदनें मेळैनि पैं ।'- नरुस्व ५२४. [सं.बन्ध]

**बांधरीनाख** वि. दोन्ही कानांमध्ये आणि डोक्यावरील केसात भोवरा असलेला (घोडा).- अश्वप १.१०१.

**बांधली गाठ** बंद केलेली पैशांची पिशवी; राखून ठेवलेले, साठवलेले पैसे; साठा; संचय.

**बांधल्या कमरेचा** वि. कमरबंद; तयार; (ल.) सावध.

**बांधव** पु. भाऊबंद; सोयरेधायरे. [सं.]

**बांधवरो(रू)ळी** स्त्री. शेताची मर्यादा दाखवणारा प्रत्येक कोनावरील मातीचा ढीग; ओटा.

**बांधवळ** स्त्री. इमारत बांधण्याचे कौशल्य; बांधणी.

**बांधवाट** स्त्री. १. भाताच्या शेताच्या बांधावरील वाट. २. फरशी केलेला, बांधलेला रस्ता.

**बांधा** पु. १. शरीराची ठेवण; ढब; आकार; रूप; बनावट; घडण; रचना. २. गुळाची ढेप; खडा; भेली.

वि. १. बंदा; न मोडलेला; सबंध (रुपया इ.). २. (ल.) कायम; निश्चित; बांधलेली (नोकरी, काम).

**बांधाटी** स्त्री. १. बंधन; दोर : 'मेणसूत्राच्या बांधाटी । आवळावें सुबुद्ध ।'- मुआदि ३५.५५. २. ओंबण वगैरेला बळकटी आणण्यासाठी त्याला मध्ये मध्ये बांधलेल्या उभ्या काठ्या प्रत्येकी. ३. शेताच्या बांधावरून बाजूने किंवा मधून जाणारा रस्ता, पायवाट.

**बांधाबांध-धी** स्त्री. आवराआवर; प्रवासाची तयारी; (गाठोडी, बोचकी, वळकट्या इ.) घाईने बांधणे. [बांधणे द्वि.]

**बांधा(धे)रा** पु.१. शेताच्या कडेला घातलेला बांध. २. प्रवाहाला अडवण्यासाठी घातलेला बांध; धरण. ३. बांध घातल्याने फुगलेले पाणी.

**बां(बा)धारी** पु. १. डोंगरावरचा प्रदेश; शिखरांची, किल्ल्यांची रांग : 'रांगणा किल्ला व कोकणबांधारीचे किल्ले... ।'- मराचिथोशा ४१. २. बंधन; बंधारा.

**बांधावळ** स्त्री. १. बनावट; घडण; रचना; बांधणी (घराची इ.). २. रचना, जुळणी, मांडणी (लेख, ग्रंथ, कविता इ.ची).

**बांधी** स्त्री. १. बंधन; नियम : 'अधिकें जंवजंव औषधीं । सेवेची मांडे बांधी ।'- माज्ञा १८.५५५. २. शेताला घातलेला बांध.

**बांधी** स्त्री. कातकाम करताना एखाद्या पदार्थावर जसे काम करायचे असेल तसा तो पकडणे. (क्रि. करणे).

**बांधील** स्त्री. भाताची कापणी (लाणी) झाल्यानंतर त्याचे भारे बांधण्याची क्रिया. (को.)

वि. अंकित; ओशाळा; केलेल्या कृपेमुळे बांधलेला; उपकाराचे बंधन असलेला.

**बांधीव** वि. १. बांधलेला; रचलेला; मुद्दाम बांधलेला; पक्का (रस्ता, तळे, विहीर). २. सांगीचा; मापाप्रमाणे, नमुन्याप्रमाणे बनवलेला (जोडा, वहाणा इ.). ३. चांगल्या आकाराचा किंवा बनावटीचा (जोडा, वहाण इ.). ४. मध्ये शिसे इ. हलक्या किमतीचा धातू घालून बनवलेले (सोन्याचे, रुप्याचे नाणे, लगड).

**बांधे, बांधाळे** न. बांडगूळ. [सं.बंदा]

**बांधेसूद** वि. चांगल्या, रेखीव, आटोपशीर बांध्याचा, शरीराचा.

**बांधोडी** पु. गुलाम. (व.)

वि. बांधलेले; नेमके; मोजके. (व.)

**बांधोरा** पु. आकर्षक बांधणी. - लोसाको.

**बांधोळी** स्त्री. लहान बांध.- चित्रकृषि २.५.

**बांब** स्त्री. एक औषधी वनस्पती. पाणथळ जागेत, नदीकाठी होते. पाने लहान, कडू व थंड. रंग तांबूस, हिरवा. याचा घट्ट कल्क होतो.

**बांब** पु. पीक, धान्य यांचा नाश करणारा किडा. हा हरभऱ्याच्या डाळीप्रमाणे पिवळसर रंगाचा असतो. (को.)

**बांबट** स्त्री. पावसाळी हवा; ढगामुळे आलेला अंधार; वांभळ. (राजा., कु.)

**बांब(बा)र** न. दलदल; नेहमी चिखल असणारी जागा. (कु.)

**बां(बा)बल-ळ** न. १. दाट वन; वनसमूह : 'ना तरि देखौनि रविमंडळ। विकाश कमळांचे बांबळ ।'- भाए १८. २. आधिक्य; वृद्धी ( क्रि. पडणे): 'तेथ बांबळ पडे अभिनव । विकारांचें ।'- ज्ञा १५.१०१.

**बां(बा)बल(ळ)णे, बां(बा)बळ(ळे,ळै)जणे** सक्रि. १. बांबळ पडणे; वृद्धी होणे; (झाडाला) पुष्कळ कोवळी पालवी फुटणे : 'डिरिया निघती निमिखें । बाबळैजुनी ।'- ज्ञा १५.१८५. २. पाल्हाळ लावणे.

**बांबवना** सक्रि. दृष्ट लावणे. (झाडी)

**बांबुटणे** अक्रि. विडुळणे; फळ न पिकता पिवळे होऊन कुजू लागणे.

**बांबुर्डा** पु. कुर्लीचे (खेकड्याचे) लहान पोर, पिल्लू. (कु.)

**बां(बा)बुळ-ळी** स्त्री. शेवाळ; गोंडाळ : 'परी उदकीं जाली बाबुळी । ते उदकातें जैसी झांकोळी ।'- ज्ञा ७.६०.

**बांबू** पु. काष्ठमय, आतून पोकळ, पेरे असणारी व उंच वाढणारी वनस्पती. याचा दांडा सरळ व लांब असतो. याच्या अनेक जाती आहेत. उपयोग घरबांधणी, चटया व बुरुडकाम, कागद बनवणे इ. मध्ये. [क.बम्बु;इं.]

**बांबूट** स्त्री. विडुळलेला, जून न होता पिकलेला आंबा. (को.)

**बांबो(ब)ट** स्त्री. उथळ पाण्यात चालणारी वाफेची, बंब असणारी नाव. [पोर्तु.बँबोट]

**बांभुरडा** पु. ब्राह्मण शब्दाचे तुच्छतादर्शक रूप.

**बि** अ. सुद्धा; ही. (कुण.) [सं.]

**बिअर** माल्ट आंबवून तयार केलेले मद्य.

**बिई, बी** न. बेळ, फाटा असलेला खांब. इंग्रजी वाय (Y) सारखा झोपडीचा खांब. (अहि.)

**बिक** न. १. बळ; सामर्थ्य; शक्ती : 'गुणां सगुणपणाचें बिक। बहुवस एथ।'- ज्ञा १.३८. २. सौंदर्य; शोभा : 'योवनभारभरें बिक दाटे। संपन्न योगलीळा।'- दावि ११. ३. डौल; ऐट: 'हय रथ गज वहनादी उष्ट्र बसुनि मिरविसी बिके।'- देप ६७. ४. रंग; वर्ण. (तंजा.) [सं.अभिख्या-भिख्या-बिक-राजवाडे]

**बिकट** वि. १. कठीण; अवघड. २. त्रासदायक. ३. दुर्बोध. ४. अजिंक्य. ५. दुःसाध्य. ६. भयंकर; निकराची; रसाकसीची (झुंज, लढाई इ.): 'अमृतरायाच्या लोकांनी। बिकट केली खणाखणी।'- ऐपो ८६. [सं.विकट; क.बिक+कटु]

**बिक(के)ण** न. स्त्री. फणसाच्या गऱ्यातील बी; फणसाची आठोळी; बिंगट. (गो., कारवारी)

**बिकणी** स्त्री. वायंगणात बी विस्करण्याची क्रिया. (गो.)

**बिकलम** न. १. लेखक-कारकुनाकडून लिहवलेल्या पत्रावर शेवटी यजमान स्वतः सहीवजा जी चार अक्षरे, रेघ इ. काढतो ते मालकाचे हस्ताक्षर. २. कधी-कधी लेखाच्या, पत्राच्या शेवटी लेखक हा शब्द लिहितात. क्रिवि. कलमवार; तपशीलवार. [फा.]

**बिकुण-ड** पु. ढेकूण. (गो.) [ढेकूण द्वि.]

**बिगटणे** पहा : **बिलगणे** [क. बिगिट]

**बिगट्या** वि. हेकट; तिरसट; व्यवहाराला कठीण.

**बिगर** शअ. शिवाय; खेरीज; वाचून. [अर.फा.ब-घैर; हिं.]

**बिगर इयत्ता** (इयत्तेवाचून) उजळणी शिकणाऱ्या मुलांचा वर्ग; बालवर्ग; शिशुवर्ग; बिगारी.

**बिगार** स्त्री. १. मोबदला किंवा मजुरी न देता सरकारने किंवा सरकारी अधिकाऱ्याने करवून घेतलेले काम; वेठ. २. सक्तीने काम करायला लावलेल्या इसमाने, जनावराने वाहून नेलेले ओझे. ३. (ल.) निष्काळजीपणाने कसेबसे केलेले काम; इच्छा नसताना केलेले काम. ४. सक्तीने, नाखुषीने केलेला उपकार. [फा. बेगार-री]

**बिगारखाते** न. बिगारीने करवलेल्या कामाचा, बिगारी लोकांचा हिशेब ठेवणारे खाते.

**बिगारधन** वि. फालतू. (व.)

**बिगारी** पु. १. वेठीला धरलेला माणूस; सक्तीने कोणतेही काम करायला लावलेला माणूस. २. हमाल; मजूर; कुली.

**बिघडणे** अक्रि. १. खराब होणे; नुकसान होणे; सडणे; नासणे. २. (ल.) वैमनस्य, बेबनाव उत्पन्न होणे; सोईने न वागणे. ३. (प्रकृती) नादुरुस्त होणे. ४. वेगळे होणे : 'ते दोन्ही जडतां न ते बिघडती आश्चर्य वीरोत्तमा।'- आसेतु ३४. [सं.वि+घट्]

**बिघडाबिघड** स्त्री. १. सर्वसाधारण खराबी; नुकसान. २. खराब झालेली, नाश झालेली अवस्था (वस्तू, मसलत, काम इ.ची).

**बिघा** पु. १. जमिनीच्या मोजणीचे परिमाण; वीस पांड किंवा चारशे चौरस काठ्या. हे परिमाण सर्वत्र वेगळे आहे. २. वीस पांड जमीन; ३० गुंठे जमीन. (अहि.) [सं.विग्रह]

**बिघा(घ)ड** पु. १. खराबी; नाश; नासाडी; वाईट, नुकसानकारक स्थिती. २. बेबनाव; भांडण; वितुष्ट; वैमनस्य. [सं.वि+घट्,विग्रह]

**बिघावणी, बिघवण** स्त्री. १. बिघ्याच्या मापाने केलेली जमिनीची मोजणी. २. बिघ्याच्या मापाने बसवलेला शेतसारा, फाळा, तरमबंदी.

**बिघोटी** स्त्री. बिघ्याच्या उत्पन्नावरील आकारणी.

**बिचकटणे** उक्रि. १. (जमीन) वरवर उकरणे, खणणे. २. विचकटणे.

**बिचकणे, बिचकटणे** अक्रि. घाबरणे; दचकणे; बुजणे; एकदम भीती वाटणे; भयभीत होणे. [सं.वि+चक्;हिं.बिचकना]

**बिचका-क्या** वि. सहज बिचकणारा; दचकणारा; बुजरा.

**बिचकावणी, बिचकणी** स्त्री. एकदम भिववणे; भ्रांत स्थिती.

**बिचबा-वा** वि. १. तल्लख; हुशार; तरतरीत (मूल). २. चपळ; चलाख; तुरतुर धावणारे (घोडे). ३. (व्यापक) जलद, भरभर चालणारी; फर्डी (लेखणी).

**बिचल** स्त्री. पु. १. बिघाड; (चांगल्या गोष्टीचा वाईट गोष्टीत) बदल; फेरफार. २. माघार; कच. (क्रि. खाणे) [सं.वि+चल्]

**बिचलणी** स्त्री. १. रस्ता सोडणे; आड जाणे; बाजूस वळणे. २. योग्य, सरळ किंवा सभ्य सरणी सोडून त्याच्या विरुद्ध सरणीस लागणे.

**बिचलणे** अक्रि. १. सरळ मार्ग सोडून वाईट मार्गाने जाणे; गैरशिस्त, दुर्वर्तनी बनणे; बिघडणे. २. भ्रमिष्ट, वेडसर होणे; खुळावणे. ३. माघार घेणे; वचनभंग करणे; करार सोडून मागे हटणे. ४. बिथरणे. [सं.विचलन; हिं. बिछलना]

**बिचवा,बिचोबा-वा** पु. मध्ये खांब नसणारा डेरा, तंबू. [फा.बीचोबा]

**बिचवा** पु. १. विंचवाच्या आकाराची लहान, वाकडी कट्यार. २. (ल.) लहान पण भरभर चालणारी लेखणी (मुलांत रूढ). ३. लहान पण हुशार, तरतरीत मनुष्य. ४. पायाच्या अंगठ्यात घालण्याचे वळे. ५. डोंगराळ प्रदेशात होणारे लहान झाड. याचा आकार विंचवाच्या नांगीसारखा असतो. (ठाकूर लोक त्याला कोंबडा म्हणतात.) [सं.वृश्चिक; हिं.बिछुआ]

**बिचारा** वि. १. गरीब; अनाथ; दीन. २. दुर्बळ; बापडा; कीव करण्याजोगा. ३. क्षुद्र; पामर. ४. निरपराधी. [फा.]

**बिछवणे** सक्रि. १. जमीन, पलंग इ.वर (सतरंजी, जाजम, गादी इ.) पसरणे, अंथरणे. २. पाडणे; चीत करणे; लोळवणे; जमीनदोस्त करणे. ३. संपवून टाकणे; खलास, फडशा करणे. [हिं.बिछाना,बिछवाना]

**बिछा(छो)ना, बिछाली** पु. निजण्यासाठी पसरलेली गादी, रुजामा इ.

अंथरूण; शेज; शय्या. [सं.वि+स्तृ; हिं.बिछोना] (वा.)
**बिछोन्यासच जिरणे** - रोगी अतिशय अशक्त होऊन त्याला उठण्याबसण्याची शक्ती नसणे; अंथरुणाला खिळणे. (व.)

**बिछाने मजला** (नाविक) खलाशांच्या उपयोगासाठी झुलते बिछाने टांगण्याचा मजला. हा तोफखान्याखाली असतो. [इं.बर्थडेक]

**बिछायत, बिछाय(इ)ती** वि. १. दुकान न घालता आपला माल पेठ, बाजार यात विकायला नेणारा. २. रस्त्याच्या कडेला किंवा घराच्या पायरीवर माल मांडून विकणारा; फेरीवाला. ३. माल खरेदीसाठी गावोगाव फ़िरणारा अडत्या दलाल. ४. (अडत) ज्याला उसाकरता पेंड वगैरे घेण्यासाठी आगाऊ पैसे देतात तो (शेतकरी).
वि. अशा तऱ्हेच्या व्यापाऱ्यासंबंधी (माल इ.).

**बिछायत** स्त्री. १. बसण्यासाठी अंथरलेले जाजम, सतरंजी इ. बैठक. २. मालमत्ता. ३. शेज; बिछाना. ४. घराच्या भिंती सोडून घेतलेले खोलीच्या जागेचे माप; (इं.) कार्पेट एरिया. [अर.बिसात]

**बिछावणी** स्त्री. (सतरंजी, जाजम इ.) जमिनीवर पसरणे, अंथरणे. [हिं.बिछाना,बिछवाना]

**बिजक** न. (मालाबरोबर बांधलेली) किंमत इ. ची तपशीलवार चिठ्ठी; अंकपट्टी; आंखपट्टी. [सं.बीजक]

**बिजणे** न. बीज रुजत घालणे.- मनको.

**बिजन** न. स्त्री. कत्तल; नाश; कतलाम.
वि. निष्प्राण; ठार: 'आपल्या साठ बायकांस एकएकीस बोलावून आणून तर्वारीने छाटून बिजन केल्या.'- ऐस्फुले ६४. [फा.बी+जान्]

**बिजबंद** पु. सबजाचे बी.- मुंव्या ११०.१५७.

**बिजली** स्त्री. १. वीज; विद्युत. २. (ल.) विजेसारखी तेजस्वी, तडफदार व सुंदर स्त्री. [सं.विद्युत्;हिं.]

**बिजली** स्त्री. मुलांचा अकटेदुकटे नावाचा खेळ खेळताना आखलेल्या घरात टाकण्यासाठी घेतात ती दगडाची चीप, खापरी किंवा लाकडाचा तुकडा.

**बिजवई** स्त्री. बी-बियाणे.(खा.)

**बिजवट** न. १. पुरुषाचे प्रजोत्पादक वीर्य; रेत. २. बीज; ताणा; उत्पत्तिकारण. ३. संतान; संतती; थळ-ळी; (घोडा, बैल इ.ची) अवलाद. [सं. बीज+वट प्रत्यय]

**बिजवड** न. १. ज्याच्या बीजापासून जो झाला तो (आंबा, वेल इ.). २. पहा : **बिजवट**
पु. शेताची पुन्हा पेरणी; एक पीक कापून घेतल्यावर पुन्हा त्यावरच केलेले पीक. (क्रि. करणे)
पु.न. एकाच जमिनीत काढलेल्या पहिल्या पिकाचा दुसऱ्या पिकावर होणारा साधकबाधक परिणाम ; पूर्वीच्या पिकाचा जमिनीत शिल्लक राहणारा गुणधर्म; बिवड.

**बिजवर** पु. १. दुसऱ्यांदा लग्न करणारा, केलेला पुरुष. २. ज्याचे लग्नाचे वय होऊन गेले आहे असा, पूर्ण प्रौढ मनुष्य.

**बिजवरा** पु. (बिजेच्या चंद्राप्रमाणे) लहान मुलांच्या व स्त्रियांच्या कपाळावर घालण्याचा एक दागिना. (याला जोडून बिंदी शब्द येतो.)

**बिजंबत्ती** स्त्री. मार; मारकूट. (व.)

**बिजा** वि. दुसरा. [सं.द्वितीय; गु.बीजो]

**बिजाईत** वि. दोन वेळा व्यालेली (गाय, म्हैस इ.); दुजाईत. [गु.]

**बिजाकार** पु. बिजवट; खाण; उत्पत्तिस्थान; उगम. [सं.बीज+आकार]

**बिजागरी-रे** स्त्री. न. दार, खिडकी, पेटी इ. चे झाकण उघडता व लावता येईल अशा रीतीने ते जोडण्याची सांधेपट्टी; ही नरमादीहून भिन्न असते.

**बिजावळी** स्त्री. वेगळेपणा; भेद; भिन्नता; अंतर : 'तैं तन्हिं गा सुवर्मा। बि(वि)जावळी आत्मया कर्मा।'- माज्ञा १८.२६९.

**बिजाळू** वि. बी पेरून केलेले, कलमाने तयार न केलेले (झाड, रोप).

**बिजि(झि)क** न. पत्त्यांच्या खेळाचा एक प्रकार; पाट. यात दोन, चार किंवा सहा माणसे खेळतात व दोन किंवा चार पत्त्यांचे जोड घेतात. [फा.बाझीचि; इं.बेझिक्]

**बिजे** न. १. आगमन; येणे. (क्रि. करणे) : 'तुवां मित्रापाशीं केलें बिजें।'- कृमुरा ५.१७. २. गमन; जाणे : 'देवें एथ केलें बिजें।'- शिव ७२५. [सं.व्रज्;गो.वचणें]

**बिजेबारे** न. १. वधू आणि वर यांच्या राशीत संपूर्ण राशिमंडलाचे- बारा राशींचे अंतर असणे; द्विर्द्वादशक. २. (ल.) हाडवैर; उभा दावा.

**बिजोर** वि. (द्वितीयेच्या चंद्राप्रमाणे) सुंदर.- लोसाको.

**बिझाईत** स्त्री. मालमत्ता. [अर.बिझाअत्,बिसात्]

**बिट** पहा : **बिट्टा**

**बिटका** पु. वायुविकृतीमुळे हात, पाय इ. मध्ये येतो तो पेटका, वळ.

**बिटका** वि. १. अगदी लहान आकाराचा; बुटका (आंबा, पेरू, कणीस इ.). २. लहानसा; टुमदार; लहान व सुरेख; छकुला; चिमणा; पिटुकला; बिट्टा (मूल). ३. अगदी लहान भांडे. - लोसाको. (को.)

**बिटकी** स्त्री. गू, शेण इ. दुर्गंधयुक्त पदार्थांचा लहानसा गोळा. [सं.विष्ठा; हिं.बीठ; क.बोढ.]

**बिटकी** स्त्री. १. (गहू, ज्वारी, बाजरी, मका इ.चे) लहान कणीस, तुरा. २. अगदी लहान जातीचा आंबा. ३. लहान आंबा, पेरू इ. फळ. ४. अगदी ठेंगू मनुष्य; बुटका. ५. दूध विरजण्याचे अगदी लहान मडके. (खा.)

**बिटकी** स्त्री. प्रवासी सामानसुमान. (गो.)

**बिटारणे** अक्रि. १. खोडकर, व्रात्य, द्वाड होणे. २. नाश पावणे, बिघडणे; अव्यवस्थित होणे (कारभार, जमीनजुमला इ.).[सं.विष्ठा; म. बिट्टा]

**बिटिंग बांधणे** (सोनारी) मण्यांची दोन टरफले एकमेकांवर अशा रीतीने बसवणे की त्यांचे सांधे एकमेकांशी भिनतील व अशा रीतीने जुळवल्यावर ती सवाण्यात धरून स्लेटपाटीवरच्या चऱ्यात फिरवून दाबून घेणे.

**बिटी-ट्टी** स्त्री. १. पहा : **बिटकी**. २. सागरगोट्यांच्या खेळात एक सागरगोटा वर उडवून जमिनीवरून एकदम उचलून घेतलेल्या दोन सागरगोट्यांची जोडी. ३. शंभर. (नंदभाषा) ४. दारूने भरलेली कागदाची सुरळी. ५. एकावर एक रचलेल्या नाण्यांचा एकत्रित समूह; चळत : 'विसाविसाच्या बिट्ट्या लावल्या.'- चैत्रावळ (महाराष्ट्रशारदा जून १९३५). ६. कागद वगैरेंच्या विशिष्ट संख्येची गड्डी. ७. पिवळ्या कण्हेरीच्या फळांतील बी.

**बिटे,फक्टं** वि. पावशेराचा चौथा भाग मोजण्याचे माप. (अहि.)
**बिटो–ट्यो** स्त्री. मुलींचा एक खेळ. (गो.)
**बिटोरी** स्त्री. १. पहा : **बिटकी**. २. पहा : **बिटी** ४. ३. (विटीदांडूचा खेळ) लहान विटी. ४. शेणाचा लहान पोहो. ५. लहान लेखणी इ.
**बिट्टा** पु. मलविसर्जनाची इच्छा, प्रयत्न नसताना भीती, अति कष्ट इ. कारणाने गुदावाटे बाहेर पडलेला मळ. [सं.विष्ठा] (वा.) **०वासणे, ताणणे, मोकळा होणे, बाहेर पडणे, निघणे –** (हगणे.) गाळण उडणे; अति श्रम, भीती इ. ने सुचेनासे होणे; जीव नकोसा होणे; खंगणे.
**बिट्टा** वि. लहान; छोटा. विशेषत: लहान मुलांना म्हणतात.
**बिट्टी** स्त्री. १. कणकेचा जाड पानगा; बट्टी. (व.) २. घंटीच्या फळाची कोय. ३. जळाऊ लाकडांचा ढीग. (झाडी)
**बिट्टी** स्त्री. वेठ; बिगार. [सं.विष्टि]
**बिठ्ठा** पु. गठ्ठा. [सं.वृन्त]
**बिडगौ** पु. १. दुर्ग. २. समूह : 'शमदमाचा करूनि मेळावा। इंद्रियाचा बिडगौ जिणावा।'– उगी २१२. [क.बिडिय]
**बिडती** स्त्री. १. पेच; पंचाईत; अडचणीची स्थिती; संकट; कचाटी. २. दोन्हीकडून संकटप्रसंग येणे. [क.बिडते]
**बिडबिडणे** अक्रि. गिडबडून जाणे; लिडबिडणे : 'तैसीचि यें नाकाडें। बिडबिडती।'– ज्ञा १३.५६२.
**बिडलवण** न. काळे मीठ; पादेलोण. [सं.विटलवण]
**बिडवई** पु. १. तळाचा रक्षक; छावणीचा अधिकारी. २. तारक; हितकर्ता; कैवारी : 'जन्मा येऊनि तया लाभ झाला। बिडवई भेटला पांडुरंग।'– तुगा २३३६. [क.बीडु]
**बिडवै** पु. व्यापारी. (तंजा.)
**बिडाल–ळ, बिडाल(ळ)क** पु. मांजर : 'कीं मूषकालागीं बिडालक। बैसे टपत तयापरी।'– रावि १.१०८. [सं.बिडाल, बिडालक]
**बिडी** स्त्री. १. पहा : **बेडी**. २. चाकात ठोकतात ते वाटोळे, लोखंडाचे पंचपात्र; वसवी. (कुलाबा) [हिं.]
**बिडी** स्त्री. धूम्रपानासाठी केलेली, तंबाखू भरलेली टेंभुर्णीच्या पानाची, कागदाची नळी; (विरू.) विडी. [सं.बीटि–टी,विटिका]
**बिडी** वि. बीड धातूची बनवलेली (वस्तू) : 'तिनशें तोफा थोर अखंडी। पंचरशी आणि बिडी लोखंडी।'– ऐपो २२५.
**बिडी** वि. बीड शहरासंबंधीचे (कापड इ.).
**बिडीस** न. १.आमिष. २. भात. [सं.बडिश]
**बिढा(डा)र** न. घर; वसतिस्थान. पहा : **बिऱ्हाड** : 'आणि वायूसि एके ठायीं। बिढार जैसें नाहीं।' – ज्ञा १२.२११. [क.बीडार]
**बिढा(डा)रकर–रू, बिढारी** पहा : **बिऱ्हाडकरू**
**बिणकूल** न. बारीक भोक. (गो.)
**बिणद** पु. १. रस्ता; बिदी; वाट; मार्ग. २. (ल.) जवळपणा; सान्निध्य; समीपता : 'म्हणौनि कव्हणाचां बिणिदीं। न रीगावें तुवां।'– भाए १८५.
**बितू बितू करनं** ताटकळून वाट पाहणे, मानसिक उलथापालथ करणे.
**बितैन, बितानबीत** स्त्री. (कारकुनी) बंदाच्या चार रकान्यांपैकी पहिल्या रकान्याच्या मध्यापासून चवथ्या रकान्याच्या मध्यापर्यंत ओढलेली आडवी रेघ.
**बित्तंबातमी** स्त्री. १. नक्की बातमी. २. सविस्तर, पूर्ण माहिती; बातमी. [क. बित्तु]
**बित्तू** पु. एक कवड्यांचा खेळ.– मखेपु १२५.
**बिथर** वि. गैर; बेशिस्त; अव्यवस्थित (भाषण, वर्तन).
**बिथरणे** अक्रि. १. प्रतिकूल होणे; बिघडणे; उलटणे; फिसकटणे. २. (ल.) गैरशिस्तपणे वागणे; वाईट मार्गाला लागणे. ३. (सोईने वागण्याचा) चांगला स्वभाव सोडून दुर्वर्तनी, खोडसाळ बनणे (जनावर).
सक्रि. प्रतिकूल करणे; (स्नेह, आज्ञाधारकता, पुण्यमार्ग इ.पासून) पराङ्मुख करणे; वाईट छंदास लावणे. [हिं.बिथरना;सं.वितर्क,विस्थल्]
**बिदवा** पु. धाब्यावर पसरण्याची (विशेषत: विटांच्या भट्टीतील) माती, धूळ, धुराळी.
**बिदा** वि. १. पाठवलेला; रवाना केलेला. २. जाण्याला परवानगी दिलेला (पाहुणा). (क्रि. करणे) [अर.बिदाअ]
**बिदा, बिदाई–की–गी, बिदायकी–गिरी** स्त्री. १. रवानगी; पाठवणूक, निरोप देणे; बोळवण. २. निर्यात; बाहेर पाठवणे. ३. निरोप देताना, पाठवणी करताना संभावना म्हणून दिलेले पारितोषिक, देणगी, अहेर; बोळवणी. ४. गुणवंतांना त्यांच्या गुणांची कदर करण्यासाठी दिलेले बक्षीस; देणगी. [अर.बिदाअ]
**बिदी** स्त्री. १. (खेड्यातील, गावातील) रस्ता; गल्ली : 'इंद्रियग्रामींचे राजबिदीं।'– ज्ञा ७.१०६. २. (ल.) गावातील रस्त्यातून वाहणारे घाणेरडे पाणी : 'परि गंगेच्या संबंधीं। बिदी आणि महानदी।'– ज्ञा १८.१२५२. [सं.वीथ; क.बीदि]
**बिदोबिदी** क्रिवि. १. रस्तोरस्ती; गल्लोगल्ली : 'हरिच्या ह्या कैशा पडियल्या छंदी। हिंडली बिदोबिदी बाजारेंसी।'– ब २९४. २. सर्वत्र; चोहीकडे: 'नंद धांवे बिदोबिदीं। गौळी हुडकती सांदोसांदी।'– ह २.१२४.
**बिन** क्रिवि. १. शिवाय; खेरीज; वाचून; विना; अनेकदा नामाच्या मागे लावतात. उदा. बिनघोर–तोड–दिक्कत इ. २. क्रियापदाच्या भूतकाळाच्या रूपापुढेही वापरतात. उदा. मी पैसे घेतल्याबिन जाणार नाही. ३. कधी कधी निरर्थक वापरतात. उदा. बिन पैशावाचून मौज. [सं. विना; फा.]
**बिनकद(दे)ली** स्त्री. दुफाशी खेळात जुगल्यानंतर कदली न पडल्याने झालेला पराजय.(वा.) **बिनकदलीवर येणे**– भांडणाला सुरुवात करणे; चिरडीला जाणे; तिरगीमिरगीवर येणे.
वि. ज्याला कदली पडली किंवा पडत नाही असा (खेळ, खेळणारा).
**बिनखोट** क्रिवि. १. नि:संशय. २. बिनधोक.
**बिनगा–गी** पु. स्त्री. मातीची, धातूची विशिष्ट आकाराची, लहान कळशी.
**बिनघोर** क्रिवि. भीती, शंका, कचर न बाळगता; निश्चित.
**बिनचूक** क्रिवि. न चुकता; अचूक; नेमके.
**बिनजोड** वि. १. जोड नसलेले; एकसंध. २. अद्वितीय.
**बिनजोरी** वि. १. (बुद्धिबळ) दुसऱ्या मोहऱ्याचा, प्याद्याचा आधार नसलेले. २. मारामारीचा (डाव).

**बिनटीक** वि. टीप, स्पष्टीकरण दिल्याशिवाय.

**बिनडाकिल** वि. १. डाक नसलेले; अखंड; एकसंध. २. (ल.) शुद्ध : 'बिनडाकिल दागिने अमोलिक प्रभाकराचे ठरले।'– ऐपो २२७.

**बिनतारी यंत्र** हवेतून संदेश पाठवण्याचे साधन.

**बिनतोड** स्त्री. सोंगट्यांच्या खेळातील दुसऱ्याची एकही सोंगटी न मारता येणारी हार; पराजय.

वि. १. ज्यावर उपाय, इलाज चालत नाही असा; आणीबाणीचा. २. बरोबर लागू पडणारे; बिनचूक. ३. सर्वोत्कृष्ट; अप्रतिम.

**बिनदिक्कत** क्रिवि. १. बेधडक; अविचाराने; बेलाशक. २. बेफिकीर.

**बिनधोक** पहा : **बिनघोर**

**बिननाव्या** पु. भाताची एक जात. (झाडी)

**बिनपगारी** वि. पगार न मिळता; अवेतन (रजा इ.).

**बिनपोटी** वि. पगार, मजुरी घेतल्यावाचून केलेली (नोकरी, मजुरी).

**बिनबेगडाचा कानोबा** ऐतखाऊ; ऐदी. (झाडी)

**बिनबोभाट** क्रिवि. आरडाओरड, गाजावाजा न करता; निमूटपणे.

**बिनभाड्याचे घर** (उप.) तुरुंग; कैदखाना.

**बिनमजुरी** वि. १. पगार न घेता केलेली; बिनपगारी (नोकरी). २. श्रमाचे काम, मजुरी इ. माफ असलेली साधी (कैद, सजा).

**बिनमोजबा–बी** वि. १. ज्याबद्दल हिशेब द्यावा लागत नाही असे. २. सरकारात रुजू न झालेले, न नोंदलेले (घर, शेत इ.). ३. बेजबाबदार; बिनहिशेबी (बदली माणूस).

**बिनशर्त** क्रिवि. काही अट न घालता.

**बिनशाई** स्त्री. शिसपेन्सिल. (ना.,व.)

**बिनसणे** उक्रि. १. बिघडणे; नुकसान, दुखापत, खराब होणे. २. (ल.) नादिष्ट बनणे; तऱ्हेवाईक, स्वैर होणे. ३. वाईट मार्गात शिरणे; दुर्वर्तनी होणे. ४. वाकडे, वितुष्ट येणे; वांधा येणे; बिघाड, बेबनाव होणे. ५. निष्फळ, व्यर्थ होणे; फसणे; फिसकटणे (युक्ती, बेत, उद्योग, योजना). [सं.वि+नश्; हिं.बिनास]

**बिनसूट** क्रिवि. (बे.) पहा : **बेछूट**

**बिनहुली** स्त्री. वि. फाशांच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द; हूल म्हणून सोंगट्या खेळण्याचा एक प्रकार आहे.

**बिना** पु. समासामध्ये, बाजूच्या कोऱ्या जागेत लिहिलेली टीप; प्रकरणाचा मथळा. [अर.]

**बिनाखी** स्त्री. १. काळजीपूर्वक व बारकाईची पाहणी; तपासणी, चौकशी. (क्रि.करणे) : 'इमला अजमासें बिनाखीं।'– वाडमा २.१७५. २. अशी चौकशी करून झालेला निश्चय, ठराव. ३. (किंमत, खर्च इ. चा) अजमास, किंमत. (क्रि. करणे) [फा.बीनाई]

**बिना बोकड्या** वि. शेळीच्या फलनासाठी पोसलेला बोकड; एक शिवी. (अहि.)

**बिनी** स्त्री. १. सैन्याची आघाडी; म्होरप; बिंदी. २. पागोट्यांचे केळे; कपाळावर येणारा पुढचा भाग. ३. दार, खिडकी इ. च्या चौकटीचा वरचा भाग. ४. दार, खिडकी इ. च्या दोन फळ्यांतील फट बुजवण्यासाठी एकीला ठोकतात ती उभी पट्टी. ५. समासात लिहिलेला सारांश किंवा प्रकरणाचा लहान मथळा. ६. नाकावरची टोपी; नासात्राण : 'टोपास बिन्या वगैरे बावन्न बिरदे सिद्ध होऊन गोटाबाहेर निघालें.'– भाव ५६. [फा.बीनी]

**बिनीचा** वि. १. पुढचा; आघाडीचा. २. (ल.) मुख्य; अग्रगण्य; पहिल्या प्रतीचा (सैनिक, गवई, चोर इ.).

**बिनीदार** वि. (नाक असलेले) वळीच्या खालच्या बाजूला पुढे आलेला भाग असलेले; बिनी किंवा केळ असलेले (पागोटे). [फा.]

**बिनीपट्टी** स्त्री. नासात्राण; घोणात्राण.– राव्यको. पहा : **बिनी** ६

**बिनीवाला** पु. १. बिनीतील शिपाई, इसम. २. सैन्याच्या हालचाली व तळ देण्याच्या संबंधाने मराठ्यांच्या सैन्याच्या आघाडीवरील अधिकारी.

**बिनोली** स्त्री. सरकी.

**बिन्नी** स्त्री. पागोट्याचे बूड. (तंजा.)

**बिप्पत** स्त्री. खोळंबा; अडचण; पंचाईत. (अहि.)

**बिफरणे** अक्रि. १. स्वैर व स्वच्छंदी बनणे; भडकणे; मोकाट सुटणे. २. बेशिस्त, अव्यवस्थित बनणे. ३. बुडित होणे; ऱ्हास पावणे. [हिं.बिफरना]

**बिबट** न. १. बिब्ब्याचे तोंड. २. बिब्ब्याच्या आकाराचा व वर्णाचा ठिपका (बिबळ्या वाघाच्या अंगावरील). ३. चित्ता; बिब्या वाघ.

**बिबटा** वि. बिब्ब्याप्रमाणे अंगावर ठिपके असलेला (वाघ, चित्ता, मांजर).

**बिबटे** न. १. बिब्ब्याप्रमाणे दिसणारा ठिपका. २. बिब्ब्याचे बी.

**बिबिड्या** स्त्री. अव. खारोड्या; तिखट पापड.

**बिबत** स्त्री. राख; बिबुत; विभूत. (कु.)

**बिबवा, बिब्बा** पु. एक प्रकारचे औषधी फळ. ह्याचे तेल अंगाला लागले असता उतते. ह्या तेलाने परीट खुणा करतात. (क्रि. उतणे) [सं.भल्लातक](वा.) **(कामावर) ०घालणे–** मार्गात विघ्न आणून काम बिघडवणे; कामात हरकत आणणे; कुंठित करणे; मोडा घालणे.

**बिबवी, बिब्वी** स्त्री. बिब्ब्याचे, बिबव्याचे झाड.

**बिबवेल, बिबेल** न. बिबव्याचे तेल.

**बिबव्याचे शेवते देणे** बिब्बा दिव्यावर जाळून त्याच्या तेलाचे काही थेंब दुधात किंवा लोण्यात पाडून देणे. जुलाब थांबवण्यासाठी हे देतात.

**बिबळा, बिबळा(ळ्या) वाघ, बिब्यावाघ** पहा : **बिबटा**

**बिबी–ब्वी** स्त्री. एक झाड. याच्या साला–पानांपासून डिंक निघतो व तो कातडी कमावण्याच्या उपयोगी आहे.

**बिबी–ब्बी** स्त्री. १. कुलीन मुसलमान स्त्री. २. थोर मुसलमान गृहस्थाची बायको. [फा.बीबी]

**बिबुड** स्त्री. पेरलेले बी न उगवणे. (तंजा.)

**बिबुत** स्त्री. अभिमंत्रित राख; अंगारा; भस्म. (कु.,गो.) [सं.विभूती]

**बिबोटी** स्त्री. बिब्याचे बोंड.

**बिबॉ–बो** पु. सुकण्यापूर्वीची काजूची बी; कोवळा, ओला काजूगर. (गो.)

**बिबॉ** पु. लुगड्याचा लहान चौकोन, घडी. (गो.)

**बिब्बा** पु. १. पहा : **बिबवा**. २. (ल.) चिडखोर गृहस्थ. [सं.भल्लातक](वा.) **०चिडणे–** रागावणे. **०फासणे–** मोडा घालणे.

**बिभास** पु. (संगीत) एक राग. गानसमय प्रात:काळ.

**बिभिस्त** वि. भित्रा : 'तीं बिभिस्त माणसें बाचकलीं!'- उअं ३१.[सं.भी]
**बिभीतक** पु. बिब्बा व त्याचे झाड. [सं.]
**बिभीषा** स्त्री. धाक; दरारा : 'त्याजवरून बिभीषा जाली कीं हें... रात्री दगा करतील.'- पेद २६.१५१. [सं.भी]
**बिभूत** पहा : **बिबुत**
**बिम** पु. एक प्रकारचे गवत. (गो.)
**बिमारी** स्त्री. आजार; बेमारी. [फा.बीमारी]
**बिमुखी** स्त्री. दुतोंडी जातीचा एक साप; माडुळ. [हिं.बे-बी+मुख]
**बियवणी** न. पिकलेल्या कोकंबातील गराचे सार, पन्हे. (राजा.)
**बियाडक, बियार्क** न. कोंब आलेला नारळ. (गो.)( ल.)
**बियाणे** न. १. मुद्दाम चांगली म्हणून पेरण्यासाठी ठेवलेली बीजे; बी. २. लागणीसाठी ठेवलेले उसाचे कांडे; बेणे. ३. (वंशात गुणदोष उत्पन्न करणारे) मनुष्य, पशू वगैरेंचे बीज.[सं.बीज] (वा.)**बियाण्यास नसणे-** १.पूर्णपणे संपणे. २. खलास होणे; फन्ना होणे.
**बियाणे, बियावळ** न. स्त्री. पहा : **बियाणे** १
**बियांचा, ब्यांचा** वि. १. पेरण्यासाठी बाजूला काढून ठेवलेले (धान्य, दाणे, फळ इ.). २. मूळच्या उत्तम बीजाचा, वीर्याचा; अस्सल; शुद्ध. ३. अस्सल; अट्टल; पक्का (भामटा, चोर). ४. ज्यात फार बिया आहेत असे (फळ).
**बिरकांडी** स्त्री. (विणकाम) विणकऱ्याचा धोटा.
**बिरकूल** न. १. लहान तोंडाची व फुगीर पोटाची बांबूची पाटी. २. पहा: **बुरकूल**
**बिरखडणे** उक्रि. (कागद, भिंत इ.) ओरखडणे; रेघोट्या, चित्र इ. काढून चितारणे.
अक्रि. घाईघाईने वेडेवाकडे लिहिणे; (श्लोक, वाक्य) खरडणे.
**बिरख(खु)डी** स्त्री. १. निष्काळजीपणाने काढलेले चित्र, आकृती; कागद इ. वर ओढलेली रेघोटी : 'नकाशावर बिरखुड्या ओढल्या.'- बाळ २.४०. २. ज्याला वळण नाही असे घाईघाईने लिहिलेले वाकडेतिकडे अक्षर; भरकटून लिहिणे.
**बिरखुंड-डे** न. १. गाभा; भेंड; (बोरू, जोंधळ्याचे ताट इ. मधील) गीर; मगज. २. दाणे काढून घेतलेले मका, जोंधळा, वगैरेंचे कणीस.
**बिरगावणे** अक्रि. रागावणे; बिथरणे. (व.)
**बिरजणे** अक्रि. येऊन ठेपणे; तयार होणे.(व.) [सं.वि+राज्]
**बिरजुमाल-ली** क्रिवि. वि. एकत्र; एकवट; सामाईकीत असलेले (शेत, जमीन, मालमत्ता इ.). [अर.बर्र+जुम्ला]
**बिरड** वि. अपूर्व ठेवा; श्रेष्ठ; गुणी.- लोसाको.
**बिरडी-ढी** स्त्री. भिजत घालून मोड आणलेला पावटा, वाल.
**बिरडी** स्त्री. १. घुसळण्याची दोरी : 'वासुकीची यास बिरडी। मग समुद्र मंथिला कडोविकडी।'- ह ७.१८४. २. गुंडी; बिरडे.
**बिरडे-ढे** न. १. मोड आलेल्या वालांची उसळ. २. (यावरून) कोणतेही पातळ कालवण.
**बिरडे-ढे** न. १. (अंगरखा, सदरा इ. ची) गुंडी किंवा गुंडी घालण्याचे भोक, काजे, वळसा. २. (दावे इ.च्या) वळशात अडकवण्याची गाठ. ३. (चोळीची) गाठ. ४. घोटाळा; कोडे : 'हे प्रकृतिपुरुषांचे बिरडें। तुजवेगळें निवाडें निवडेना।'- एभा २२.२३८. ५. लहान आकाराचे कडबोळे. (हेट.) ६. पहा : **बिरडी**. ७. गाठ मारून बंद करण्याचा तुकडा.( तंजा.) [क.बिरडे]
**बिरडे** न. समूह; थवा : 'मागें पावलें बिरडें राक्षसांचें।'- गीता २.२१५.
**बिरदंगी** स्त्री.भिरकावून मारण्याचे चपटे, वाकडे, लाकडी हत्यार. (तंजा.)
**बिरदाईत** वि. विशिष्ट विद्या, गुण इ. मध्ये वाकबगार (पंडित, पुराणिक, गवई इ.); काही श्रेष्ठ गुणांबद्दल चिन्ह धारण करतो तो. [सं.बिरूद]
**बिरनजी, बिरंजी** स्त्री. बारीक खिळा. (झाडी)
**बिरबल** पु. १. अकबर बादशहाचा एक हुशार व चतुर प्रधान. २. (ल.)चतुर व धोरणी मनुष्य. ३. नकटा. (कु.)
**बिरबली** स्त्री. युक्ती; खुबी.
**बिरबाहुटी** स्त्री. १.कुंकवाचा किडा; सोनकिडा. २. (ल.) छानछबेली : 'ज्ञान अंजन घालून डोळां बनली बिरबाहुटी ।'- पला १३.९५. [हिं.बीरबहुट्टी]
**बिरबिटी** स्त्री. बिरबिरीत शेण, लोणी, कालवलेले पीठ इ. कोणताही लिबलिबीत पदार्थ.
**बिरबिरीत** वि. ज्याचा गोळा बनवता येत नाही पण जे साधारणपणे घट्ट असे; पातळसर; लिबलिबीत.
**बिरमत** स्त्री. ब्रह्महत्या. (गो.) [सं.ब्रह्महत्या]
**बिर(रा)मत** न. लचांड; आळ. (कु.) पहा : **बिलामत**
**बिरमुटा** पु. मुलगा : 'त्या बिरमुट्याचे शब्द मला झणझणलें'- वेटिंगरूम.
**बिरमुटी** स्त्री. चितूर; एक प्रकारचा किडा. (को.,गो.)
**बिरवण** स्त्री. आकृती; नक्षीकाम; कोरीवकाम. (को.)
**बिरविणे** सक्रि. (सोने, चांदी, सोन्याची तार, रेशीम इ.च्या) नक्षीकामाने सजवणे; (वस्त्र इ. ला) शोभा आणणे.
**बिरसुडणे** उक्रि. १. (खोड, फांदी इ. ची) पाने तोडून, ओरबाडून काढणे. २. किडींनी पाने खाऊन फांद्या पर्णरहित करणे.
**बिरंजी** स्त्री. मुसलमानांतील (साखरभातासारखे) एक पक्वान्न.
**बिराणा** पु. बंदुकीच्या दारूचा दाणा, कण. [हिं.बिरनी]
**बिराणा** पु. वीरपुरुष; वीरभद्र.
**बिराणा** पु. (गवई लोकांत रूढ) तबल्यावरच्या शाईमध्ये पडणारी चीर. [क.बिरी]
**बिराणा-ना** वि. परका; तिऱ्हाईत; अनोळखी; एखाद्याचे कुटुंब, नाते, देश इ. तील नाही असा. [हिं.बिराना]
**बिरादर** पु. भाऊ; भाऊबंद. [फा.]
**बिरादरी** स्त्री. १. बंधुसमाज; जमात. २. भाऊपण; बंधुभाव. ३. भाऊबंदकी. [फा.]
**बिरार** पु. विकार.
**बिरार** पु. स्पर्धा : 'मुदियां चे हीरे। आंगुळियां तेजा चे वानसरे। करितांति बिरारें। एकमेकें सी।'- शिव ४०३.
**बिरी** स्त्री. स्त्रियांचा कानातील एक दागिना. [हिं.बीर]
**बिरी** स्त्री. पोवली; पोफळीच्या पोयेचा द्रोण. (गो.) पहा : **विरी**
**बिरीज बिरीज होणे** टेकीस येणे; त्रास, कष्ट पडणे. (व.)

**बिरूद** न. १. विद्या, कला इ. गुणांमध्ये श्रेष्ठत्व असल्याचे चिन्ह म्हणून हात, दंड इ. ला बांधतात तो दोरा, गंडा; बाहुभूषण. २. ब्रीद; बाणा; प्रतिज्ञा; अंगी असलेल्या गुणाबद्दल वाटणारा अभिमान. ३. चिन्ह. ४. कीर्ती; नावलौकिक. [सं.]

**बिरुदवंत** वि. यशस्वी.– शर.

**बिरुदाई(यि)त** वि. बाणेदार; प्रतिज्ञा करून पाळणारा.

**बिरुदावली–ळी** स्त्री. बिरुदांची माळ. [सं.बिरुद+आवली]

**बिरुस** वि. कठीण. (बे.) [क.बिरसु]

**बिरोजा** पु. निळ्या, हिरव्या रंगाचा एक पाषाण. याला रत्न म्हणतात. यात भविष्य समजण्याचा अद्भुत गुण आहे अशी समजूत आहे.

**बिर्ज** पु. माशाची एक जात. हे ऑक्टोबर–नोव्हेंबर महिन्यात पकडतात. (को.)

**बिर्मुट–टी** स्त्री. एक प्रकारचे फुलपाखरू. (गो.)

**बिर्मुट–टी** स्त्री. दांडू मारण्याचा एक प्रकार. [सं.वीरमुष्टि]

**बिर्वा** पु. १. पोळ्यातील गाणे. २. घोडा नाचवताना गाण्याचा दोहा. (झाडी)

**बिऱ्हा** पु. एका जातीचे फळझाड. याची लागवड सातारा जिल्ह्यात होते. (इं.) ब्वीनी.– के. २६.३.१९३७.

**बिऱ्हाड** न. १. राहण्यासाठी भाड्याने घेतलेली जागा, घर इ. २. एखाद्या ठिकाणी उतरून काही काळ राहणे; मुक्काम; वस्ती; वास्तव्य. ३. बिऱ्हाडकरूंचे सामान, संसार, चीजवस्तू इ. ४. तळाचा किंवा व्यापारी मंडळीच्या फिरत्या स्वारीचा निराळा भाग; एकाच व्यापाऱ्याच्या सामानाचा (माल, तंबू, गुरे इ.चा) वेगळा, स्वतंत्र समुदाय (तळावरील किंवा वाटेवरील). ५. भाड्याने, भाडेकऱ्याप्रमाणे राहणे. (क्रि. करणे) ६. भाड्याने दुसऱ्यांच्या घरात राहणारे कुटुंब; भाडेकरू. ७. गुप्तपणा; स्पष्टपणे न बोलता चोरून ठेवलेला मुद्दा, मजकूर. (वा.) **० करणे–**कायमचे वास्तव्य करण्याच्या उद्देशाने आपल्या सामानासह, कुटुंबासह एखाद्या ठिकाणी राहणे; एखाद्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्या घरात, शरीरात (रोगाने) ठाणे करून राहणे. **०गोल करणे–** १.उचलबांगडी करणे; हुसकावणे. २. निघून जाणे. **विंचवाचे बिऱ्हाड पाठीवर–** फारसे लटांबर, सामानसुमान जवळ नसणे.

**बिऱ्हाडकरी–रू, बिऱ्हाडू** पु. १. भाड्याने बिऱ्हाड करून राहणारा. २. बिऱ्हाडाचा मालक.

**बिऱ्हाडबाजले** न. बाडबिस्तरा; सामानसुमान; चीजवस्तू; बोचके (प्रवाशांचे); खटले. (वा.) **०सांगातीच असणे–** घर, बायकामुले इ. पासून अलिप्त, मोकळे असणे; सडेसोट असणे.

**बिर्याणी** स्त्री. १. मांसमिश्रित मसालेभात; एक मुसलमानी पक्वान्न. २. विविध भाज्या घालून केलेला मसालेभात.

**बिल** न. १. विकलेल्या वस्तूंची किंवा केलेल्या कामांची यादी व त्याबद्दलच्या पैशाची मागणी; संबंधित मजकूर लिहिलेला कागद. २. विधिमंडळासमोर चर्चिला जाणारा कायद्याचा मसुदा, खर्डा. ३. पत्रक; याद; तपशील. [इं.]

**बिलकावणे** अक्रि. ऐटीने रिकामे फिरणे; चैन करणे. (कु.)

**बिलकु(कू)ल** क्रिवि. १. शिल्लक न राखता; पूर्णपणे; एकूण एक. २. अगदी; मुळीच (नाही). [अर.बिल्कुल्]

**बिलग** वि. वेगळा. पहा : **विलग** [सं.विलग्न;हिं.]

**बिलगणी** स्त्री. चिकटणे; भिडणे इ.

**बिलगणे** अक्रि. १. चिकटणे; अगदी जवळ राहणे, जाणे. २. कवटाळणे; मिठी मारणे; घट्ट धरणे; आवळणे. ३. (ल.) निश्चयाने चाल करणे; धावून जाणे; (मार, लूट इ. कारणांसाठी) एखाद्याच्या अंगाला झोंबणे. [सं.विलग्न; हिं.बिलगना]

**बिलदी** स्त्री. गाण्यातील एक ताल. [फा.बुलंदी]

**बिलबिल** अ. मांजराला बोलावण्याचा शब्द. (गो.) [ध्व.]

**बिलबिलणे** अक्रि. अगदी मऊ, नरम, बिलबिलीत होणे (फळ इ.).

**बिलबिला, बिलबिलीत** वि. १. नरम; चेपण्याजोगा; लिबलिबीत; शिळे झाल्यामुळे; अतिशय पिकल्यामुळे, चोळवटल्यामुळे फारच मऊ झालेले (फळ, गळू) इ. २. (ल.) कष्टाच्या कामांमुळे दीन, गरीब, निर्वीर्य झालेला (माणूस, जनावर इ.).

**बिलमोगरा** पु. बटमोगरा : 'फोडीन मोती । घालीन चारा । हाकलीन वारा । बिलमोगरा बिलमोगरा ।'– मसाप २.२३३.

**बिलवर, बिलो(ल्लो,ल्व)र** पु. १. उंची काच; स्फटिक. २. एक खनिजविशेष. ३. उंची काचेची एक प्रकारची बांगडी. ४. साधारण लांबट आकाराचे पैलू पाडलेली सोन्याची बांगडी. [अर.बिल्लौर]

**बिलवरखाना** पु. काचेचे सामान सांभाळण्या–ठेवण्याचे खाते.

**बिलवरी, बिलो(ल्व)री** वि. काचमण्यांचे; स्फटिकाचे; काचेचे. [फा.बिलौरी]

**बिलवा** पु. बिब्बा.

**बिलंगर** वि. नांगर टाकलेले; नांगरलेले : 'हे बारा जहाजे बिलंगर करून देवणापाटणा समीप राहिले.'– पद २८.८७.

**बिलंदर, बिलंद–दी** वि. १. मुख्य; प्रधान; श्रेष्ठ; पहिल्या प्रतीचा. २. उंच; दुर्गम; बेलाग : 'अशीरगड किल्ला, मातबर बिलंद आहे.'– पारसनीस ब्रप ६४. ३. (ल.) पक्का; अट्टल; ठकबाज. [फा.बुलंद]

**बिलंपद** न. विलंबकालात तंतुवाद्य वाजवण्याचा एक प्रकार. – कला १३७. [सं.विलंबित]

**बिलंबी** स्त्री. एक फळझाड.

**बिला** अ. वाचून; विरहित; शिवाय; विना. [अर.]

**बिलामत** स्त्री. खोटा आरोप; आळ; कुंभाड; बलामत. [फा.बर्+आमद्]

**बिलायती** पु. पिवळा धोतरा; याच्या मुळ्या औषधी असतात. (व.)

**बिलावर–ल** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर. [हिं.]

**बिलावल** पु. (संगीत) एका थाटाचे नाव.

**बिलावलसप्तक** पहा : **स्वरसप्तक**

**बिलासखानी तोडी** (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.

**बिलिमारो** पु. जत्रेत पैशासाठी तळी घेऊन फिरणारा एक नट. (गो.)

**बिलू** न. लहान मांजर. (कु.,गो.) [सं.बिडाल; हिं.बिल्ला]

**बिलोरी** वि. १. घोड्याच्या रंगांपैकी एक.– अश्वप २८. २. पहा : **बिलवर**

**बिलोरी धोतरा** धोतऱ्याचा एक प्रकार.

**बिल्कु(ल्कू)ल** अ. सर्वस्वी; मुळीच; अगदी; बिलकूल.

**बिल्डं-ल्ळ** खुंट्याला बांधताना बकऱ्यांच्या किंवा लहान गुरांच्या गळ्यात अडकवतात तो दोरीचा गळ्याच्या मापाचा गोल. (खा.)

**बिल्याण, बिलियाण** पु. विवक्षित आकाराचा व पैलू पाडलेला विलायती हिरा; तरतरा. [इं.ब्रिलियंट; फ्रें.ब्रिलां]

**बिल्ल(ल्ला)स** स्त्री. वीत. (ना.,व.) [फा.बिलिश]

**बिल्ला** पु. १. शिपायाच्या पट्ट्याला छातीच्या भागावर असलेली धातूची तबकडी; चपरास; छातीवर लावण्याचे पदक. २. खूण; निशाणी; तिकीट. [हिं.]

**बिल्ली** स्त्री. भाटी; मांजर. [हिं.]

**बिल्व** पहा : **बेल**

**बिल्वपत्र** न. १. बेलाचे तीनपानी दल. २. (खडीकाम) वस्त्रावर खडीने काढलेली बेलाच्या पानाची आकृती. [सं.]

**बिवड** पु. १. बीज; कोंब; वीर्य. २. बीजापासून झालेला माणूस, प्राणी, झाड इ. ३. मुख्य धान्य पेरण्यापूर्वी काढलेले आडपीक. ४. खत. ५. पिकांचा क्रम; पाळी. ६. खत किंवा पहिले पीक यामुळे तयार झालेली उत्तम जमीन : 'आतां श्रीकृष्णवाक्यबीजा निवाडु। आणि संजय सात्विकाचा बिवडु।'– ज्ञा ९.५३३. ७. पहा : **बेवड** [सं.बीज+वृध्]

**बिवडी** स्त्री. हिरव्या कांबीची टोपली. [सं.विवर]

**बिवलकरी** वि. १. (पेशवाईअखेर फडातील बिवलकर नावाच्या कारकुनाने घालून दिलेले अक्षराचे वळण. हे सोपे व सुंदर होते. त्यावरून) बिवलकराच्या प्रमाणे काढलेले साधे, गोंडस (अक्षर, कित्ता, वळण, लिहिणे इ.). बिवलकरी वळणाची मोडी अक्षरे साधी व गोल असून गोंडस दिसतात. हे वळण जनोबाभट्टी वळणापेक्षा निराळे आहे. २. (ल.) साधी, सरळ, बाळबोध वागणूक, वळण.

**बिवळा** पु. १. (रुजण्यासाठी जमिनीत पुरलेले) नागवेलीचे वेटोळे, केळीचा खुंट; वाढते कलम. २. पानवेल. (को.) ३. दोन ते सहा कुडव धान्य मावेल एवढी बियाण्यासाठी राखून ठेवलेल्या बीजांची भातेण इ. मध्ये बांधलेली मुडी. पहा : **मुडी** (वा.) ० **उतरणे–** एखाद्याचे फुगलेले पोट ओसरणे, उतरणे.

**बिवाडा** पु. (नाविक) गलबताच्या काठाच्या आतील भागाला ठोकतात तो जास्त जाडीचा व कमी रुंदीचा दुरमीण. (को.)

**बिवाळो** पु. लहान मुडा; मुडी. (कु., गो.)

**बिशप** पु. १. ख्रिस्ती धर्माध्यक्ष, धर्माधिकारी. २. बुद्धिबळाच्या खेळातला उंट. [इं.]

**बिशा(सा)द-त** स्त्री. १. मालमत्ता; सामान; सामग्री : 'नाहींतरी मालबिसातीची तमा न धरितां.... सलाबत पाडावी.'– मराआ ३८. २. पैसा; पत; भांडवल. ३. किंमत; मोल; महत्त्व. ४. सामर्थ्य; हिंमत. [अर.बिसात्]

**बिशी** स्त्री. १. होणारा खर्च सारखा वाटून घेऊन एकत्र भोजन करणाऱ्यांचे मंडळ; (इं.) क्लब. २. खाणावळ. ३. मंडळातील सर्व सभासदांनी आपापले दरमहा पगार आळीपाळीने एकाच्या स्वाधीन करणे. (क्रि. करणे) पहा : **भिशी** [गु.वीसी]

**बिस** न. कमळाचा देठ. [सं.]

**बिसकुसणे** अक्रि. फिसकटणे : 'भेटी बिसकुसे'– चांपा ४२. [सं.कुस्]

**बिसखपरा** पु. एक औषधी वनस्पती. [हिं.]

**बिसगपरिया** स्त्री. कुर्डू.– मसाप ४५.५.

**बिसतंतु-तू** पु. १. कमळाच्या देठातील धागा. २. पहा : **बिस**

**बिसनी** पु. १. लोकांच्या पैशाने चहा, तंबाखू इ. व्यसने भागवणारा माणूस. २. वेश्येकडे उपभोगार्थ गेलेला पुरुष; तो त्यावेळचा बिसनी. ३. व्यसनी; दुराचारी; व्यभिचारी; हलकट; बाहेरख्याली : 'तेवढ्यांतच नथ मुरकी। बिसनीची नजर तरकी।'– प्रला १११.
वि. चांडाळ. (बे.) [सं.व्यसनी]

**बिसल(लू)टा** पु. लग्नापूर्वी वरपक्षाला दिलेले वधूगृही जेवणाचे आमंत्रण. (तंजा.) [क.बिसलू]

**बिसा** वि. सुस्वभावी; सुशील. (व.) [फा.बेश]

**बिसाट** वि. १. अनियमित; सामान्य यदृच्छेने होणारे : 'तेवीं कारण हेतुयोगें। जें बिसाट कर्म निगे।'– ज्ञा १८.३७५. २. भलते; स्वैर उच्चारलेले : 'तयाचें बिसाट शब्द। सुखें म्हणों येती वेद।'– ज्ञा १८.१६४५.

**बिसाट(र)णे** अक्रि. पसरणे; फाकणे; फैलावणे : 'आपुला वसौटा जाळुनी। बिसाटे वन्ही।'– ज्ञा १८.६२४. [सं.विस्तृत]

**बिस्कि(स्कू)ट** न. धान्यांच्या, विशेषत: गव्हाच्या पिठापासून केलेले वड्यांप्रमाणे हलके खाद्य. [इं.बिस्किट]

**बिस्तरा** पु. पथारी; अंथरुणासाठी साधन. [फा.]

**बिस्म, बिस्मत** स्त्री. (शाप.) एक औषधोपयोगी धातू. [इं.बिस्मथ]

**बिस्मिल्ला** पु. १. मुसलमानांमध्ये मुलाच्या किंवा मुलीच्या पाचव्या वर्षी घोड्यावरून मिरवणूक काढून मशिदीत नेऊन बिस्मिल्ला इ. कुराणाचे कलमे पढवतात तो विधी. २. मंत्र म्हणून विधिपूर्वक हत्या करणे. ३. कार्यारंभी परमेश्वराला नमस्कार. [अर.]

**बिस्वक, बिस्वा** पु. पांडाचा किंवा पादाचा विसावा भाग; एक चौरस काठी. पाद = बिघ्याचा २०वा भाग : '**आणि** गढीकोट जिमी– बिस्वा– जागा तनखा वगैरे बराबर वांटून द्यावा.'– वाडबाबा १.२२. [सं.विंशति; हिं.बिस्व; म.विस्वा]

**बिहरी** वि. दुसरी : 'तिर्यी बिहरी थेय्यी पोयरों चोई लिईन आर्ली'– भि २३. (भि.)

**बिहाग** पु.(संगीत.) एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**बिहागरा** पु.(संगीत.) एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**बिहावा** पु. भीती.

**बिहांबा-बी** स्त्री. मिठात मुरलेला आंबा; बेहंबी.

**बिही** न. एक फळझाड; पेरू. [हिं.]

**बिहीक, बिहो** स्त्री. पु. भय.– मनको. [सं.भी]

**बिळगा** वि. काळापांढरा मिश्र. [क.बिळी]

**बिळूक** न. भोक; बीळ.

**बिंग** न. (शब्दश: व ल.) १. दोष; उणीव; उणेपणा; व्यंग; न्यून; कमतरता. २. गुप्त गोष्ट; रहस्य; गुह्य (वाईट अर्थाने). [सं.व्यंग] (वा.) ०**बाहेर काढणे, पडणे–** गुप्त गोष्ट, रहस्य उघडकीस आणणे, येणे.

**बिंगजीवी** वि. पैसे मिळवण्यासाठी एखाद्याला त्याची गुप्त, लज्जास्पद गोष्ट

सर्वांना कळवून देण्याची धमकी देणारा (मनुष्य); (इं.) ब्लॅकमेलर.

**बिंगट** न. फणसाची आठोळी.

**बिंगळी** स्त्री. (ठाकरी) एक चवळीएवढे (आंबट) फळ.

**बिंगा** वि. सदोष; अपूर्ण; उणा; व्यंगयुक्त : 'कांहीं कर्नाटदेश तेलंगा, जगला परि बिंगा।'- राला १०५. [सं.व्यंग]

**बिंगे** न. १. पहा : **बिंग** १. २. कोणतेही गैरशिस्त, नीतिभ्रष्ट वर्तन. ३. वाकडे, वर्मी झोंबणारे औषध. [सं.व्यंग]

**बिंड** पु. न. स्त्री. घराच्या गवती छपराच्या कोपऱ्यांना पाने, गवत इ. चा घातलेला पेंढा. (क्रि. बांधणे) [सं.पिंडा]

**बिंडका** पु. गठ्ठा; भारा.

**बिंडके** न. गवत, रोपटी, काटक्या इ. चे जुडगे; लहान बिंडा.

**बिंडल** वि. आडदांड; उनाड.

**बिंडल** स्त्री. बांगडी; कंकण.- लोसाको.

**बिंडा** पु. १. (दोरी, सूत इ. चे) वेटोळे; भेंडोळे. २. (गवत, काटक्या इ.चा) भारा; पोहायला शिकणाऱ्या मुलाला पाण्यात ढकलण्यापूर्वी पाठीवर बांधतात तो गव्हाच्या पोकळ काडांचा, ढोलकीच्या आकाराचा पोकळ गठ्ठा. ३. खडक, जमीन इ.वरचा उंचवटा; टेकाड. ४. डोंगराचा सुळका; कडा. ५. सौंदर्यवाचक पद. उदा. राजबिंडा. ६. शेतात विशिष्ट पद्धतीने रचून ठेवलेल्या गोवऱ्यांचा ढीग. (अहि.)[सं.पिंड; हिं.बींडा]

**बिंद** पु. १. बिंदू; थेंब. २. पुरुषाचे वीर्य किंवा त्याचा एक थेंब. ३. अश्रू. [सं.बिंदु]

**बिंद** न. प्लेगची गाठ. (बे.) [सं.पिंड; म.बिंड]

**बिंदगा** पु. पाणी भरण्याची लहान घागर, कळशी. [क.बिंदगी]

**बिंदडी-ली** स्त्री. १. (कापड, कापूस इ.चा) लहान गठ्ठा; गाठोडी; बस्ता. २. (गवत, काटक्या इ.चा) लहान भारा. [बिंडा अल्पार्थी; सं.बिंदु]

**बिंदडे** न. (व्यापाऱ्यांत रूढ) लुगडी, कापड इ. चा गठ्ठा. (क.)

**बिंदले-ली** न. स्त्री. १. लहान मुलाच्या मनगटात घालण्याचा पाटलीसारखा सोन्याचा दागिना. २. लहान बिंदू; अनुस्वाराचे, विसर्गाचे टिंब. (राजा.)

**बिंदाण-णे** न. दोन गावांची हद्द : 'खोर सुपे बिदाण थोटवड तरडादेवीचा त्रिशुल दाखविला'- मइसा १८.४.

**बिंदावनी, बिंदी, बिनी** स्त्री. १. कपाळपट्टी. (को.) २. दाराला दिलेली वरची आडवी पट्टी. ३. दाराची मधली पट्टी.

**बिंदी** स्त्री. १. स्त्रियांच्या कपाळावरील मोत्यांचा एक अलंकार. २. सैन्याची आघाडी; बिनी. [फा.बीनी; सं.बिंदु]

**बिंदु-दू** पु. १. थेंब; टिंब; लेखणी इ. नी उठवलेला ठिपका; अनुस्वार किंवा विसर्गबोधक चिन्ह. २. मध्यबिंदू; केंद्र. ३. (भूमिति.) ज्याचे भाग करता येत नाहीत किंवा ज्याला स्थिती असून लांबी, रुंदी इ. नाही तो. ४. घोड्याच्या कानाच्या खाली सहा बोटांवर असणारा भाग; कानाचा पृष्ठभाग. [सं.]

**बिंदुकली-ले** स्त्री. न. १. बिंदू; थेंब; वाटोळे चिन्ह. २. चंद्रबिंदू.

**बिंदुकली** स्त्री. १. झाडाच्या फांदीवर उगवणारी दुसऱ्या प्रकारची वनस्पती; बांडगूळ.- कृषि ९९३. २. (मोहोरलेली) डिकशी. (को.)

**बिंदुपथ** पु. (भूमिति.) दिलेल्या अटी पूर्ण करणारा बिंदूंचा संच.

**बिंदुमुद्रा** स्त्री. ब्लॉकवरून फोटोतंत्राचा उपयोग करून ज्यात करड्या रंगाच्या छटा, लहानमोठ्या बिंदूंच्या आधारे दाखवलेल्या असतात अशी प्रत.

**बिंदुचा सिंधू** अतिशयोक्ती; फुगवून सांगितलेली गोष्ट.

**बिंदूल, बिंदलॉ** न. पु. मातीचे भांडे. (गो.)

**बिंदोरी** स्त्री. पालखी इ. वाहनातून मूर्तीची मिरवणूक. (खा.)

**बिंद्र** न. राजचिन्ह; चिन्ह.- शर. [सं.बिरुद]

**बिंद्रावनी सारंग** (संगीत) एक राग. गानसमय मध्यान्ह.

**बिंब** न. १. चंद्र, सूर्य, ग्रह इ. चे मंडळ. २. सूर्यमंडळ. ३. आरसा, पाणी इ.च्या पृष्ठभागावर ज्याचे प्रतिबिंब दिसते तो पदार्थ. ४. राज्यादी अधिकारावर असता पराक्रमादी गुण असोत किंवा नसोत, पण ज्याच्या उपस्थितीमुळे खालच्या माणसांना शोभा येते, आवेश चढतो असा पुरुष. ५. (साहित्य.) दृष्टांत, प्रमाण इ.नी प्रतिपादन करण्याचा विषय; प्रतिपाद्य अर्थ. ६. मूर्ती; प्रतिमा : 'तो चालतें ज्ञानाचें बिंब।'- ज्ञा १०.७७. ७. ओंकाराची अर्धमात्रा : 'मग लम्रीं जेविं ॐकारु। बिंबीचि विलसे।'- ज्ञा ८.११६. ८. प्रतिबिंब; प्रतिच्छाया. ९. (पिकलेले) तोंडले. [सं.]

**बिंब-बी** न. स्त्री. नागरमोथा; भातखाचरात, दलदलीत उगवणारे त्रिधारी गवत.

**बिंबणे** अक्रि. १. (ज्ञान, शिक्षण इ. मनात) ठसणे, उतरणे, परिणामकारक होणे. २. भासणे; उत्पन्न होणे : 'तैसें सकळ हें मूर्त। जाण पां मायाकरित। जैसें आकाशीं बिंबत। अभ्रपटळ।'- ज्ञा २.१६८. ३. उमटणे.

**बिंबदान** न. ग्रहणाच्या वेळी जन्मराशीत रवी किंवा चंद्र असता शांत्यर्थ करण्याचे सोन्यारुप्याचे दान.

**बिंबप्रतिबिंबभाव** पु. बिंबभूत व प्रतिबिंबभूत अर्थाचा परस्परसंबंध.

**बिंबला-ली** पु. स्त्री. एक झाड.

**बिंबली** स्त्री. एक प्रकारचे रानगवत. (कु.)

**बिंबले** न. बिंबल्याचे फळ. हे आंबट असून याचे लोणचे घालतात.

**बिंबाधर, बिंबोष्ठ** पु. पिकलेल्या तोंडल्याच्या फळाप्रमाणे असलेले ओठ (लाल व रसरशीत).

**बिंबाणू** पु. वर्तुळाकार, रंगहीन व बहुसंख्येने रक्तात आढळणाऱ्या व रक्त गोठवण्याशी संबंधित असणाऱ्या अतिसूक्ष्म पेशी; रक्तबिंबिका; (इं.) प्लेटलेट्स.

**बी** स्त्री. १. बीज; फळाच्या आतील कठीण अंश. २. अंड; वृषण. ३. गळू इ. तील आतील भाग, गाभा. ४. लसणीची पाकळी. [सं.बीज] (वा.) **०मोडणे-** समूळ उच्छेद करणे; अगदी नाहीसे करणे. **०रुजणे-** परिणामकारक, यशस्वी होणे; फलद्रूप होण्याच्या मार्गाला लागणे. **०रुतणे-** (हुद्दा, अधिकार, जागा, धंदा इ.त) प्रवेश होणे.

**बी** न. १. (समुच्चयार्थी) बीजे; (भाजी, गवत इ.चे) रोपे. २. पेरण्यासाठी राखून ठेवलेले धान्य; पेऱ्याचे बियाणे. ३. ज्यापासून तशीच नवी वनस्पती निर्माण होऊ शकते असा वनस्पतीचा भाग; बिया, दाणे, क्षुद्र फळे, आठळ्या, मुळे, कलमे, पाने इ. उत्पादनाचे मूळ म्हणून मानलेली वस्तू. ४. कापसासारखे ढग; कसर; खार. (क्रि. निघणे, विरणे, वाहणे.) [सं.बीज]

**बी** स्त्री. द्वितीया; बीज. (गो.) [हिं.]

**बी** अ. १. सुद्धा; देखील; ही. २. शिवाय; तसेच; आणखी. [सं.अपि]

**बीक** न. १. आवड; गोडी : 'वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनि ।'– ज्ञा ६.१५. २. पहा : **बिक** १. ३. भूषण : 'सज्जनपणाचें अंगीं । बीक जया ।'– ज्ञाप्र १०८.

**बीच** अ. मध्ये; आत; मधील. [हिं.]

**बीज** स्त्री. द्वितीय; शुक्ल किंवा कृष्ण पक्षातील दुसरी तिथी; भाऊबीज. [सं.द्वितीया; गु.बीजु]

**बीज** न. १. पहा : **बी** १. २. खाण; कूळ; बिजवट बी. ३. पुरुषाचे वीर्य; रेत. ४. मूळ किंवा कारणीभूत मुद्दा, गोष्ट, क्रिया; मूळ कारण; उगम; आधार; निमित्त. ५. खोल हेतू ; भाव; इंगित; वर्म; अभिप्राय; गूढ अर्थ : 'नातरी अर्जुन । हे बीज । पुढति सांगिजेल तुज ।'– ज्ञा ९.३४. ६. संख्या किंवा परिमाणे यांच्याबद्दल अक्षरे योजून करण्याचे गणित, बीजगणित. ७. गूढ मंत्राक्षर. ८. परमेश्वर. [सं.]

**बीजक** न. १. कापड इ. च्या गठ्ठ्यात घालतात किंवा वर लावतात ती किंमत, वजन, जात इ. ची चिठ्ठी; आकडा; (इं.) लेबल. २. यादी; पट्टी; टाचण. ३. मालगाडीने, बोटीने, विमानाने पाठवण्याच्या मालाची यादी व किंमत दाखविणारा कागद.

**बीजकोश, बीजाशय** पु. फुलातील एक भाग; बीजांची पिशवी.

**बीजखवाई** स्त्री. बियांसाठी व खाण्यासाठी धान्य, दाणादुणा इ.

**बीजगणित** न. अंक व अक्षरे यांचा उपयोग करणारी गणिताची एक शाखा.

**बीजगर्भ** वि. स्वाभाविक; प्रकृतिज : 'बीजगर्भ गुण अर्थात् आपल्यामध्यें संक्रांत होतात.'– नीति ३२१.

**बीजगुणन** न. बियाणे तयार करण्याची क्रिया.

**बीजन** पहा : **बिजन**

**बीजयंत्र** न. पहा : **बीजाणू**

**बीजपूरक** पु. एक औषधी. महाळुंगी, लिंबुणी किंवा कोकंबी. [सं.]

**बीजप्रक्रिया** स्त्री. ठरावीक उद्दिष्टे ठेऊन पेरणीपूर्वी बियाण्यावर करण्यात येणारी प्रक्रिया (संस्कार).

**बीज(च)बंद** वि. मध्यभागी पेच घालून धागा बांधलेली (विडी). [हिं.बीच]

**बीजबेंदूर** पु. १. शेतकऱ्यांचे विधी, उत्सव, चाली, संप्रदाय इ. समुच्चयाने. (क्रि. करणे) २. शेतकरी लोक पाटील, देशमुख वगैरेंना देतात ते शेंदूर, गूळ, बैलांची चित्रे, फुलांच्या माळा इ. चे नजराणे.

**बीजभाव** पु. (तत्त्व.) बीजरूप अव्यक्त : 'जयासी कां बीजभावो । वेदांतीं केला ऐसा आवो ।'– ज्ञा १५.५१२.

**बीजभाषण** न. एखाद्या चर्चासत्राच्या सुरुवातीला चर्चाविषयाचे दिग्दर्शन करणारे भाषण (याच्या आधारे पुढील चर्चा व्हावी अशी अपेक्षा असते).

**बीजभांडवल** न. नवीन उद्योगधंदा सुरू करण्यासाठी लागणारे कमीत कमी भांडवल.

**बीजमुद्रा** स्त्री. बीजाचा आकार : 'कां बीजमुद्रे आंतु । थोके तरू समस्तु ।'– ज्ञा १३.९५.

**बीजसंस्कार** पु. एखाद्या प्राचीन, सर्वमान्य ग्रंथांत वगैरे अधिक–उणा फरक करणे : 'त्यानें पूर्वीच्या ग्रंथांत सुधारणा केली आहे...कोठें बीजसंस्काराच्या रूपाने सांगितली आहे.'– टि ४.४२२.

**बीजाकार** पु. बीजोत्पन्न; उद्भवलेला : 'तर राणोजी शिंद्याचा बीजाकार.'– पेद २९.२१५.

**बीजाचा** वि. अवलादीचा; रक्ताचा; वीर्याचा; औरस.

**बीजाणुधानी पुंज** नेचाच्या पानांच्या खालच्या बाजूच्या कडेला असणारे तपकिरी ठिपके.

**बीजाणू** न. सपुष्प वनस्पतींची नेहमीपेक्षा वेगळ्या आकाराची पाने; यांच्यामध्ये पराग व बीजांडकोश असतात व त्यांच्यापासून वनस्पतीची पुनरुत्पत्ती होते; बीजपत्र.

**बीजावळी** स्त्री. भिन्नता.– हंको. [हिं.बीजा]

**बीजाक्षर** पु. १. मूळाक्षर. २. मंत्राक्षर. पहा : **बीज** ६

**बीजांकित** वि. बीजाक्षराने अंकित, लांछित, परिवेष्टित. [सं.]

**बीजांकुरन्याय** पु. १. परस्परांतील कार्यकारणभाव–संबंध. उदा. बीजापासून अंकुराची उत्पत्ती व अंकुरापासून बीजाची उत्पत्ती. २. जसे बी तसे फळ; जसे कर्म तसा परिणाम हा नियम. [सं.]

**बीजांड** न. बीजकोशातील दाणेदार घटकद्रव्य; स्त्रीच्या पुनरुत्पादन संस्थेतील स्त्रीबीज असणारा भाग.

**बीजांडकोश** पु. स्त्री–शरीरातील दोन बीजोत्पादक ग्रंथी.

**बीजिका** स्त्री. बीज; बी : 'जे भवद्रुमबीजिका । जे प्रपंचाची भूमिका ।'– ज्ञा १५.८२.

**बीजुक** न. कवचाचे बीज.

**बीजे** पहा : **बिजे**

**बीट** पु. एक कंदमूळ; द्विवर्षायू, थंड हवेत वाढणारी औषधी वनस्पती. कंद मांसल रसाळ व रंग लाल किंवा तांबूस. लागवडीत विविध प्रकार. यापासून साखर होते.

**बीट** पु. विभाग; तुकडा. [इं.]

**बीट** पु. पुकारा; लिलाव. (क्रि. करणे) [इं.बिड्]

**बीट** न. (सुतारी) एक हत्यार; गोलची; डोळमीट. (क्रि. मारणे) (को.) [इं.बिट]

**बीटा कण** बीटा प्रारणातील विद्युतप्रभारित कण; (इं.) इलेक्ट्रॉन.

**बीटा किरण** प्रभारित अणूंच्या विघटनापासून मिळणारे, अल्फा किरणापेक्षा अधिक दूर पोचू शकणारे पण कमी हानिकारक किरण.

**बीटा प्रारण** न. धनपट्टीकडे विचलित होणारे प्रारण.

**बीड** न. १. अशोधित, अशुद्ध लोखंड. २. ओतीव लोखंड; (इं.) कास्ट आयर्न. ३. तांबे इ. चे पत्रे ज्यावर वाढवतात, घडवतात तो ठोकळा; ऐरण; मोठा चौरस तुकडा. ४. एक क्षार; काळे मीठ; बिडलवण. [सं.व्यंड]

**बीड** पु. १. एकाच वेळी केलेला फळांचा तोडा. २. तो करण्याची वेळ, पाळी.

**बीड** स्त्री. न. गाड्यावर भरलेले गवत इ. आवळण्याची जाड दोरी. (को.)

**बीड** न. १. नमुना; माप; परिमाण. २. जात. पहा : **वीड**

**बीड** स्त्री. गवत वाढलेली पडीत जमीन. (व.)

**बीण** न. भोक. (गो.)

**बीत** स्त्री. मुलगी; कन्या; कागदपत्रांत बापाच्या नावापूर्वी योजतात. [अर.बिंत्]

**बीत(ओळ)** स्त्री. (जमाखर्च) कागदाच्या दोन्ही अंगांना सारखी कोरी जागा सोडून काढलेली रेघ.

**बीत-द** स्त्री. जम; बस्तान : 'फार मेहनत बीत बसावयास लागली.'- पेद १९.६१.

**बीद-ध** स्त्री. १. रस्ता; गल्ली; मार्ग (गाव, खेडे इ.तील). २. गटार. (को.) ३. विटीदांडूच्या अगर गोट्यांच्या खेळातील लहान खळगा; गल. (कु.) [सं.वीथी; हिं.बीद]

**बीन** पु. न. (संगीत) एक तंतुवाद्य. यांच्या दांडीच्या दोन टोकांना दोन भोपळे असतात व मध्ये दांडीवर वीस पडदे असतात. [सं.वीणा;हिं.]

**बीन** स्त्री. लेखाचा मथळा; एका बाजूला, समासात दिलेला सारांश.

**बीनकार** पु. बीन वाजवणारा.

**बी-बियाणे,बिरवण,बेणे,ब्याणे,भरण,भरणा,बिबळा** न. पु. पेरण्यासाठी किंवा रोपे लावण्यासाठी राखून ठेवलेली बीजे,मुळे,कांदे,इ.

**बीबिर** पु. एक हिंस्र पशू.

**बीबिवळा** पु. १. बी-बियाणे. २. मुडी.

**बीबुडी-बूड** स्त्री. १. बियाण्यापुरतेही न पिकणे; पीक नष्ट होणे, बुडणे. २. (ल.) नायनाट; उच्छेद; कुलक्षय.

**बीभत्स** पु. (साहित्य.)नवरसांपैकी एक रस. किळस उत्पन्न करणाऱ्या वर्णनात हा रस असतो.
वि. १. किळसवाणे; ओंगळ; घाणेरडे; अभद्र. २. भीतिप्रद; भयानक; राक्षसी; क्रूर. ३. (कायदा) ज्यामुळे मन अपवित्र, दुराचारी बनेल असा (मजकूर, कृत्य). [सं.]

**बीमार** वि. १. पहा : **बेमार.** २. दु:खित; व्यथित. [फा.]

**बीर** पु. हिंदुस्थानी भाषेतील एक छंद : 'नाना पदें नाना श्लोक । नाना बीर कडक ।'- दास १२.५५. [सं.वीर]

**बीर** पु. १. मंत्रसाध्य पिशाचदेवतांचा एक वर्ग किंवा त्यातील व्यक्ती : 'रामसूर्यादिमहादेव । बावन्न बिरादि पै गेले ।'- नव १०.३८. २. (ल.) भर; चढ : 'यासाठीं कोणता बीर भरतील न कळें'- पेद २०.८९. [सं.वीर] (वा.) **०मरणे-** एखाद्याच्या अंगात भुताचा संचार करवणे. **०भरणे, देणे-** एखाद्याला उत्तेजन देणे, चेतवणे, उठवणे (भांडण, दुष्कृत्य करण्यासाठी).

**बीरकंगन** न. दंडाला बांधण्याचे कंकण; वीरकंकण. (व.)

**बीरबाव(हु)टा** पु. कुंकवाचा किडा. पहा : **बिरबाहुटी**

**बीरविद्या** स्त्री. हातचलाखीची विद्या.

**बीरमाल** पु. पवाडा; शौर्यगीत : 'बीरमाल राजाचा गाइला.'- ऐपो २२. [हिं.; सं.वीर+माला]

**बीरवांगे** न. टोमॅटो; बेलवांगे. (व.)

**बील** पु. १. अंड्यातील गिलगिलीत पदार्थ; बलक. २. मऊ व रसाळ फळातील गीर; नासलेल्या फळातील बिलबिलीत भाग.

**बीवळ** पहा : **बीज**

**बीव्हर** पु. कृतंक वर्गातील एक प्राणी, उभयचर, बुटका, शेपटी लांब व चपटी, फर मौल्यवान.

**बीहामी** न. सप्ताळूची एक जात.- कृषि ७२८.

**बीळ** न. टोपली, सूप, शिपतर इ. करण्यासाठी काढलेली बांबूची पातळ पाती. (राजा.)

**बीळ** न. १. उंदीर, घूस, साप इ. चे राहण्याचे ठिकाण; भोक. २. वाघ, सिंह यांची गुहा. [सं.बिल] (वा.) **० उघडणे-** १. घरटे, पोळे इ. उघडे पडणे, खुले होणे. पहा : **पेव फुटणे. ० पाडणे -** काही हेतू साधण्यासाठी संधान जुळवणे.

**बुआड** स्त्री. बोबडी : 'एके एके स्थळीं चौऱ्याशी लक्ष वेडी । सांगता बुआड वळी ।'- योसं २०९.

**बुक** न. १. पुस्तक; ग्रंथ. २. (ल.) इयत्ता; कक्षा. [इं.]

**बुकटी** स्त्री. निकड. (गो.)

**बुकडुल** पु. माशाची एक जात. हे ऑक्टो.-नोव्हें. महिन्यात पकडतात. (को.)

**बुकण** न. बाजरीच्या कणसातील दाण्याभोवतालचे तूस; गोंडण; गोंड.

**बुकणा-टी** पु. स्त्री. (औषध इ.चे) चूर्ण, पूड; भुकी. [हिं.बूकना]

**बुकणा** पु. (अशिष्ट) ढुंगण; कुल्ला; बोचा; मागचा भाग. (को.)

**बुकणा हत्ती, बुकणा** पु. १. बाहेर दिसणारे सुळे नसलेला हत्ती. २. (ल.) ठेंगणा; ढेरपोट्या; लठ्ठ पुरुष किंवा स्त्री.

**बुकणी** स्त्री. १. पूड; चूर्ण. २. चहापूड. ३.अबीर; बुक्का.

**बुकणी** स्त्री. जनावरांनी डोक्याने दिलेला धक्का; ढुसणी. (गो.) [हिं.]

**बुकपंडित** पु.(उप.) निव्वळ पुस्तकी ज्ञान असणारा विद्वान.

**बुकमार्क** पु. १. पुस्तक वाचताना मध्येच थांबावे लागले तर पुढील वाचन कुठून करावे यासाठी केलेली खूण. २. (संगणक.) संगणकावर अनेक वेबसाइट्स पाहणाऱ्या लोकांना आपण कुठल्या वेबसाइटवर होतो हे मागे वळून पाहायचे असेल तर त्यासाठीचे चिन्ह. [इं.]

**बुक(का)लणे, बुकणे** उक्रि. बुक्क्यांनी मारणे.

**बुकलाबुकल** स्त्री. लाथाबुक्क्यांनी बेदम मारणे. [बुकलणे द्वि.]

**बुकलेट** न. मुख्य पिकात मिसळलेले दुसऱ्या जातीचे पीक; उतवडा.

**बुकलो** पु. बोका. (गो.) [हिं.बिल्ला]

**बुकाडा** पु. १. मोठी मूठ. (कु.) २. फार जोराचा बुक्का; धपका.

**बुकार्ल-ल्ल-ल्लु** न. १. टोपडे; कुंचडे. (गो.) २. शेंबी.[पोर्तु.बोकिल्हा]

**बुकांडो** पु. मानगुटी. (कु.) पहा : **बोकांडी**

**बुकांदो** पु. एक औषधी कंद. (गो.) पहा : **कोळकांदा**

**बुकिश नाटके** इंग्रजी नाटकांच्या धर्तीवर रचलेली गद्य नाटके.

**बुकेफरोष-स** वि. १. सुगंधी; सुवासिक. २. सुगंधी वस्तू विकणारा; गंधी.

**बुक्का-क्की** पु. स्त्री. १. बुकणी; चूर्ण. २. काळ्या रंगाचे एक सुगंधी चूर्ण. पहा : **अबीर** [हिं.बुकना; क.बुक्किटु,बुक्कणि; गु.बुक्की] (वा.) **० लावणे-** १. (कथेकऱ्याने पूर्वरंग संपवला म्हणजे त्याला बुक्का लावतात. यावरून) रजा, निरोप देणे; घालवणे. २. फसवणे; बनवणे.

**बुक्का-क्की-का-की** पु. स्त्री. १. मूठ; मुष्ठी. २. ठोसा; गुद्दा. ३. नाश.

**बुक्काभेट** स्त्री. रुखवताच्या वेळी वरमातेचा वधूमातेकडून सन्मान होऊन

त्यावेळी बुक्का उधळला जातो. त्यास म्हणतात.- लविसो १३३.

**बुगडी** स्त्री. १. स्त्रियांचे एक कर्णभूषण. २. मिरचीची एक जात. ३. वस्त्राच्या काठातील फुलांची एक वीण. ४. कुलूप. [क.;त.बोगडि]

**बुगडी** वि. तांदळाची एक जात.

**बुगा** पु. म्हातारा. (झाडी) [सं.वृद्ध]

**बुचकणे** उक्रि. १. ओरबाडणे; बुचाडणे. २. (ल.) लुटणे; नागवणे. ३. (धान्य, पीठ इ.) वरचेवर हात घालून बिघडवणे; चिवडणे. (कु.)

**बुचकणे** अक्रि.दचकणे. पहा : **बिचकणे**

**बुचक(कु)रणे, बुचक(कु)रा** पहा : **बोचकारणे** इ.

**बुचक(कु,को)ली, बचुकली, बुचकी** स्त्री. १. लहान बुचका. २. मांजराच्या पुढच्या पायाचा पंजा. ३. लहान मुलाचा पंजा.

**बुचक(कु)ळणे** उक्रि. १. पाण्यात वगैरे बुडवून बाहेर काढणे; बुडवणे. २. (ल.) गढून जाणे; निमग्न होणे (शास्त्र, अभ्यास इ. मध्ये). ३. (शास्त्र इ.चा) संस्कार झालेला असणे. ४. (ल.) गोंधळणे; भ्रमात पडणे; घुटमळणे; साशंक होणे. [सं.व्युत्+कल्; ध्व.बुच्]

**बुचक(कु)ळा** पु. १. संशयित स्थिती; गोंधळ. २. भ्रम; संशय.

**बुचक(कु)ळी** स्त्री. १. पाण्यात मारलेली बुडी. २. गटांगळी.

**बुचका** पु. १. (केस, तंतू, सूत इ.चा) पुंजका; जुमडा; गुंता : 'घेऊ गालगुचका उपटित शेंडीचा बुचका रे।'- सला ८३. २. (पाने, अंकुर इ.चा) झुपका. [सं.पुंज]

**बुचका** वि. चोंबडा, लुतरा या अर्थी चहाड या शब्दापुढे येतो.

**बुचटणे** न. बूच; बोळा; दट्ट्या; झाकण; गुडदी.
सक्रि. गुडदी मारून बंद करणे (तोंड इ.).

**बुचड** पु. दाढीवाला. (झाडी)

**बुचडा** पु. १. स्त्रियांच्या केशरचनेचा एक प्रकार; अंबाडा. २. गवत, भाताच्या काड्या इ.ची दोरीने बांधलेली पेंढी. [सं.वि+चूडा; त.मुडिच्चु]

**बुच(चे)डी** स्त्री. १. कांबळे इ.ला एका बाजूला चुणून त्याला दोरी बांधून डोक्यावर घेण्यासाठी करतात ती खोळ. २. अशा खोळीचा डोक्यावरचा भाग. ३. वाळवण्यासाठी शेतात उभ्या केलेल्या कणसासह कडब्याच्या पेंढ्यांचा जुडगा. (माण.) ४. पिशवीच्या वरच्या भागाला गोळा करून मारलेली गाठ. (अहि.)

**बुचडी** स्त्री. बी पेरण्याची एक पद्धत. (कु.)

**बुचबंगाली** स्त्री. फसवणूक.

**बुचबुच** स्त्री. १. (ढेकूण, पिसवा इ.चा) बुजबुजाट, विपुलता. २. (भिकारी, कर्जदार इ.ची) गर्दी, दाटी. [ध्व.]

**बुचबुच-चा, बुचुबुचु-चू** क्रिवि. १. ढेकूण, पिसवा इ.च्या बुजबुजाटाप्रमाणे हालचाल, आवाज करून. २. एखाद्या पदार्थात हात, बोटे वरचेवर घालून (चिवडणे); बचाबचा.

**बुचबुचाट** पु. १. पहा : **बुचबुच**. २. कामाची गर्दी. [ध्व.बुचबुच]

**बुचबुचाव(वि)णे** उक्रि. (वस्त्र, भांडे, शरीर इ.) हलक्या हाताने धुणे; घासणे; पाण्यात नुसते बुडवून काढणे. [ध्व.बुच]

**बुचबु(ची)चित** वि. भरपूर; गच्च; विपुल : 'एकें हिरवीं करकरीतें। येकें बहुबीजें बुचबुचितें।'- भारा किष्किंधा १५.६१.

**बुचा-च्चा** वि. १. (दागिना न घातल्याने) भुंडा, लांडा, उघडा, रिकामा (हात, कान). २. शिंगमोडका, कानतुटका, डोकेफुटका इ. प्रकारचा; व्यंगी; आखूड; अपूर्ण. ३. नागवा; निलाजरा: 'तुका म्हणे आतां लाजधरी बुच्या।'- तुगा २९५१. [हिं.बूचा]

**बुचा कारभार** अधिकार नसताना एखाद्या कामात हात घालणे.

**बुचाड** न. (मळणीपूर्वीचा) कणसांसह कडब्याच्या पेंढ्यांचा ढीग; उडवी.

**बुचाड(ट)णे** सक्रि. १. (अंगावरचे कपडे, अलंकार इ.) जोराने हिसकणे; ओढून काढणे. २. (ल.) लुटणे; लुबाडणे. ३. (पाने, पिसे इ.) ओरबाडून काढणे. [सं.व्युत्+सद्/छिद् /चट्]

**बुचाडणे गोबाडणे** पूर्णपणे लुटणे; सर्वस्वी नागवणे.

**बुचू-जू** पु. बूच; दट्ट्या; झाकण; गुडदी. (को.)

**बुच्ची, बोची** स्त्री. घोड्याच्या कपाळावरील शेंडी; चोटी. (व.)

**बुजकणे, बुजगावणे** न. १. पशुपक्ष्यांना भिववण्यासाठी शेतात उभे केलेले बाहुले किंवा काही आवाज करणारी वस्तू; बागुलबोवा. २. भीतिदायक गोष्ट, पदार्थ, व्यक्ती इ. ३. अत्यंत कुरूप व भीतिप्रद मनुष्य.

**बुजट, बुजरट, बुजरा, बुजा(जी)र** वि. १. सहज घाबरणारा; कारणाशिवाय दचकणारा; भित्रा. २. लाजरा.

**बुजणी** स्त्री. दचकणी; बिचकणे; भीती.

**बुजणे** अक्रि. दचकणे; एकदम भीती वाटणे; घाबरणे.

**बुजणे** अक्रि. छिद्र, मार्ग बंद होणे; भरले जाणे.

**बुजणे, बुजविणे** उक्रि. बंद करणे; (भोक, मार्ग, भांडे इ.) भरून टाकणे. [सं.वि+उब्ज्]

**बुजतेलोया अबलग** वि. घोड्याचा एक रंग. सर्व शरीर पांढरे असून त्यात काळसरपणा असलेला कान, आयाळ व दूम काळी व पोटाखाली काळे व चारी पायांवर काळी झाक असलेला (घोडा).- अश्वप १.३२. [फा.बोझ्+तेलिया+अबलख्]

**बुजबगोळी** स्त्री. वैपुल्य.

**बुजबुज-जा, बुजबुजाट** इ. पहा : **बुचबुच** इ.

**बुजरु(रू)क-ग** वि. १. पहा : **बुजुर्ग**. २. बुद्रूक. (व.) ३. (मुसलमानात रूढ) सर्वपित्री तिथी. [फा.बुझुर्ग]

**बुजली** स्त्री. गौर म्हणून वाटण्याचे गव्हाचे रोप. (झाडी)

**बुज(जा)वणी** स्त्री. बुजणी; दचकवणे; भिववणे.

**बुज(जा)वणे** उक्रि. दचकवणे; घाबरवणे; भिववणे; भीती दाखवणे.

**बुजाडणे** अक्रि. बुजणे. (व.)

**बुजुर्ग** वि. थोर; वृद्ध. [फा.बुझुर्ग]

**बुझ(ज)णे** अक्रि. १. समजणे : 'हा सहोदर बुझे अरुणाचा।'- किंगवि १२. २. जाणणे; आकलन होणे : 'पाठीं जें निषिद्ध म्हणिपे। तेंही बुझावें स्वरूपें।'- ज्ञा ४.९१. [ हिं.बुझना; सं.बुध्]

**बुझावण-णी** स्त्री. १. समजूत; एकवाक्यता : 'जेथ नानामतां बुझावणी जाहाली।'- ज्ञा ९.२७४. २. समजावणी.

**बुट** पु. कापडावरील नक्षी. पहा : **बुटा** : 'श्रीमंत मोत्याचे बुट सोन्याचे कट सजीवले हुट हत्ती घेतले।'- ऐपो ४३६.

**बुटकण-कन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. पाणी इ. मध्ये जड पदार्थ

पडत असता किंवा बाहेर निघाला असता होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; डुबकन. [ध्व.]

**बुट(टुं)क(ग)णा, बुटुंगा** वि. बुटका; ठेंगणा; ठेंगू.

**बुटका** वि. १. ठेंगणा; खुजा; गिड्डा; आखूड. २. ज्याचे टोक, शेंडा मोडला आहे असा. [क.पट्टु]

**बुटकी** स्त्री. मिरचीची एक जात. ही फार बारीक असते.– कृषि ५६८.

**बुटकुला** इ. पहा : **बुडकुला**

**बुटकुळी** पहा : **बुचक(कु)ळी**

**बुटटकी** स्त्री. १. रिकामी, फाजील बढाई; फुशारकी. २. पोकळ डौल, प्रतिष्ठा, ऐट. (क्रि. करणे, मांडणे, मिरवणे.)

**बुटणे** न. भाताची एक जात. (कु.)

**बुटणे** न. बूच; दट्ट्या; झाकण; गुडदी.

**बुटणेर** पु. युरोपियनांच्या घरचा आचारी; कोठवळा; बबर्जी : 'बुटणेरसाहेब यांचेच प्राबल्य जास्त चालत असतें.'– नि ६१. [इं.बटलर]

**बुटबु(बू)ट–टी** स्त्री. १. पुटपुट; कुजबुज. २. पावसाची पिरपिर. ३. कानात सांगितलेला मंत्र : 'मंत्र यंत्र कांहीं करिसी बुटबुटी। तेणें भूतसृष्टी पावशील।'– तुगा २५०१. [ध्व.]

**बुटबुट–टा** क्रिवि. १. टपटप, रिपरिप असा आवाज करून (पाऊस पडणे). २. पुटपुटत; कुजबुजंत. [ध्व.]

**बुटबुटणे** अक्रि. १. टपटप, रिपरिप पडणे. २. पुटपुटणे; कुजबुजणे.

**बुटबुटीत** वि. १. चांगला न शिजल्यामुळे टणक राहिलेला, टचटचीत (तांदूळ, डाळ इ.). (कु.) २. बुळबुळीत. (को.)

**बुटली** स्त्री. १. धातूचे लहान भांडे; तपेली. २. मोटेच्या चाकाचा आस किंवा चरख्याची सळई ज्या दोन खुंट्यांवर ठेवतात त्यांपैकी प्रत्येक. [क.बटलु]

**बुटली भट** बटु; ब्रह्मचारी. (व.)

**बुटारणा** वि. ठेंगणा; आखूड; खुजा; गिड्डा.

**बुटी–ट्टी** स्त्री. १. एक औषधी वनस्पती. २. (ल.) गुप्त व रामबाण औषध, मंत्र, तोडगा इ. ३. (ल.) अडचणीच्या वेळी उपयोगी पडणारा द्रव, विद्या इ. चा साठा. ४. भांगेचा घोटा. ५. माल; मिळकत. [हिं.] (वा.) **०देणे–** गुप्तपणे उत्तेजन देणे. **बुट्टी, बुट्टीस मारणे** – गुंगारा देणे; चुकवणे; सुट्टी घेणे; टाळणे.

**बुटी–ट्टी** स्त्री. पाटी; टोपली. [क.]

**बुटी लावणे** गुडघे टेकून खाली वाकून पाण्याला तोंड लावणे : 'पाणी बुटी लावून पिऊं।'– न्याहारी बाबामा ३.

**बुटे** न. गाडीच्या कण्यावरील फळी. (वा.) **०काढून, नेऊन, हरून ठेवणे–** एखाद्या कामाचे जरूर असे साधन काढून घेणे, नाहीसे करणे. **०गहाण ठेवणे–** अत्यावश्यक अशी वस्तू दुसऱ्याच्या अधीन करणे.

**बुटेएटक** न. गाडीचे बुटे न हलावे म्हणून बांधण्याची दोरी.

**बुटेखिळा–खीळ** स्त्री. पु. गाडीने बुटे व कणा यांना जोडणारा खिळा.

**बुट्टण** (व.) पहा : **बुटणे**

**बुट्टा** वि. ठेंगणा; बुटका; आखूड (माणूस, पदार्थ).

**बुट्टा–ट्टी** पु. स्त्री. कापडावर रंगाचे ठसे उठवून किंवा विणून काढलेली फुले, नक्षी.

**बुट्टाण** स्त्री. बकरा, वाघ इ. च्या अंगाची किंवा नासलेल्या दुधाची घाण. (गो.)

**बुट्टी** स्त्री. साधारण लहान कान असलेली मेंढी.

**बुट्टी** स्त्री. १. गाडीच्या साटीच्या पुढच्या भागाला असणाऱ्या दोन खुंटांपैकी प्रत्येक. २. पहा : **बुटली**

**बुट्या–ट्ट्या** स्त्री. अव. बैलगाडीच्या चौकटीच्या उभ्या गातांच्या दोन्ही बाजूंची गोल व जाड टोके. (खा.)

**बुड** न. पाणकोंबडा. (गो.)

**बुडकणे** अक्रि. पाण्यात बुड्या मारणे; डुंबणे. [ध्व.बुटक]

**बुडकली–ळी, बुडकी** स्त्री. बुडी. (क्रि. मारणे).

**बुडकी** स्त्री. नदी–ओढ्याच्या काठी किंवा तळ्यात पाणी साचण्यासाठी केलेली खाच; लहान विहीर. पहा : **भुडकी**

**बुडकुला–ली–ले** पु. स्त्री. न. १. सुमारे शेरभर पाणी मावेल एवढे मातीचे भांडे; लोटके. २. लहान तपेली; धातूचे लहान भांडे. ३. रहाटगाडग्याची लोटी. ४. बोळके.

**बुडकुले** न. लहान मुलांच्या खेळातील माती, लाकूड इ. चा कोणताही पदार्थ (घर, ताटली इ.).

**बुडखा** पु. १. झाडा इ.चा बुंधा; फांद्यांच्या खालचा मुळापर्यंतचा भाग. २. तळ; मूळ; पाया; उगम; आधार (पदार्थ, काम, व्यापार इ.चा). [सं.बुध्न; म.बूड]

**बुडगा** वि. म्हातारा. (ना.,व.) [सं.वृद्ध; हिं.बुड्ढा]

**बुडचा–ला** वि. तळचा; बुडाकडील.

**बुडण** स्त्री. १. (शब्दशः व ल.) बुडण्याची जागा (पाणी, काम इ.त). २. नुकसान; तोटा.

**बुडणूक** स्त्री. बुडण्याची क्रिया; बुडलेली अवस्था.

**बुडणे** अक्रि. १. पाण्यात वगैरे खोल जाणे. २. (ल.) (काम, अभ्यास, विचार इ.त) गढून जाणे; गर्क, निमग्न होणे. ३. (ल.) (दुःख, काळजी, चिंता, कर्ज इ.ने) व्याकूळ होणे. ४. (ल.) (मनुष्य, पीक, गाव, देश, व्यवहार, पैसा इ.) नष्ट, नाहीसे होणे; नाश पावणे. ५. निष्फळ होणे; फुकट जाणे; गमावणे. ६. (ल.) (ग्रंथ, नाणे, चाल, धर्म इ.) बंद पडणे; प्रचारात नसणे; अमलातून जाणे. ७. (दिवस) संपणे; शेवटाला जाणे. ८. (सूर्य इ.) मावळणे. [सं.ब्रुड्] (वा.) **बुडालेल्या घरचा मोड –** कुटुंबातील सर्व माणसे मरून जाऊन शिल्लक राहिलेला एकच मनुष्य.

**बुडतठाव** पु. माणूस बुडण्याइतकी पाण्याची खोली.

**बुडता** वि. १. बुडणारा; उतरता; ऱ्हास पावणारा. २. आत टाकलेला पदार्थ बुडेल इतके (पाणी, तूप, तेल).

**बुडता पाया** उतरत्या कळेचा, ऱ्हासाचा आरंभ. (क्रि. होणे, लागणे.)

**बुडती** १. कबूल केलेले द्रव्य. (तंजा.) २. पूर.– सह्या ३०५. ३. तोटा.

**बुडते कूळ** वसूल न देणारे, पैसे बुडवणारे कूळ.

**बुडबु(बू)ड** स्त्री. तोंडाची पुटपुट. पहा : **बुटबुट**

**बुडबुड–डा** क्रिवि. १. बुडबुड्याच्या आवाजाप्रमाणे, बुडबुड असा आवाज करून. २. पहा : **बुटबुट**

**बुडबुडगंगा** स्त्री. घाईघाईने केलेली अंघोळ; दंडस्नान; मुसळस्नान; धोपटस्नान.

**बुडबुडणे** अक्रि. १. बुडबुड्यांच्या आवाजासारखा आवाज होणे. २. हलक्या व अस्पष्ट आवाजात बोलणे; पुटपुटणे. ३. पाण्यात डुबणे.(गो.)

**बुडबुडा** पु. १. पाणी, दूध इ. मध्ये वारा गेल्याने उत्पन्न होणारा वाटोळा आकार; फुगा. २. भाजलेल्या त्वचेवर येणारा फोड. ३. (ल.) नश्वर, अल्पकाळ टिकणारी गोष्ट. ४. ठकबाजी; सोदेगिरी. ५. पूर्णपणे वाळलेले खोबरे. [ध्व.; सं. बुद्‌बुद्]

**बुडवणी, बुडवणूक** स्त्री. १. बुडवणे; बुडण्याची क्रिया. २. बूड; नाश; अध:पात.

**बुडवणी** वि. भांड्याला दोरी न लावता हातानेच भांडे बुडवून भरून घेता येईल इतके खोल (पाणी, विहीर, टाके इ.).

**बुडवती** स्त्री. झाडाच्या बुडाशी घालण्याचे खत : 'जया कस्तुरीएची बुडवती'– शिव ३०८. [सं.सुध्]

**बुडव्या, बुडवणा–ण्या** वि. नाशाला, ऱ्हासाला कारणीभूत; बुडवणारा (मनुष्य).

**बुडसळ** पु. न. पाने झडून वाळलेला वृक्ष; खोड : 'तेवींचि भोगक्षयें मागिले। पडती देहाची बुडसळे।'– ज्ञा १५.१६०.

**बुडस्थळ** न. १. नुकसान होण्याची शक्यता असलेला धंदा; व्यापार इ. धाडसाचे, धोक्याचे काम. २. बुडल्यामुळे झालेले नुकसान; नाश; हानी; दुरवस्था. ३. बुडीत व्यापार.

**बुडळणे** सक्रि. बुडवणे : 'तैसी अविद्येची उकळी। जया जीवजातांतें बुडळी।'– भाए ५५६.

**बुडा** पु. गोठा. – लोसाको.

**बुडाव** पु. अव. (नाविक) दुरमीणाला व वाकझाडीला ठोकलेले आखूड खिळे. (को.)

**बुडी** स्त्री. १. मुद्दाम ठरवून पाण्यात शिरणे; बुचकळी. (क्रि. देणे, मारणे.) २. (कुंभारी) कुंभारी चाक ज्यात फिरते तो दगडी खळगा. ३. ऐक्य; एकरूपता. (वा.) ० **देणे, मारणे**– १. काही काळासाठी पळून जाऊन भूमिगत होणे. २. काही मिळवण्यासाठी प्रयत्न करणे. **शंभर बुड्या मारून गांड कोरडी दाखवणे**– एखादी गोष्ट यथेच्छ करूनही लोकांत अलिप्तपणे वागणे.

**बुडी–ढी** स्त्री. भाला, बरची इ. चा दांडा; पात्याच्या उलट बाजूचे टोक.

**बुडी** स्त्री. मासे पकडण्यासाठी समुद्राच्या तळी लावलेले जाळे. (क्रि. मारणे) (कु.) [क.बुट्टी]

**बुडीत** न. १. बूड; नुकसान; हानी. २. जे परत मिळण्याची आशा नाही असे कर्ज; बुडाले अशा बुद्धीने देणे. ३. काहीही फायदा न होता धंद्यात बुडालेली रक्कम.
वि. बुडालेले; नुकसानीचे; गमावलेले.

**बुडीत खाते** बुडीत कुळांच्या नोंदणीचा वर्ग, यादी.

**बुडीद** पु. पाण्याची खोली मोजण्याचा ओळंबा.

**बुडूक** न. १. आखूड झालेले टोक. २. झिजलेला झाडू. ३. आखूड झालेला, खोडाकडील झाडाचा, रोपाचा भाग.
पु. वि. जख्खड, अनुभवी म्हातारा–री.

**बुडूख** न. १. झाड इ. चा बुंधा; बुडखा; मुळखंड. २. तळ; पाया; भुई. ३. एखाद्या कामाचा, प्रसंगाचा सुरुवातीचा भाग, आरंभ, उगम. ३.लहान मूळ. ४. आधार.

**बुड्डा** पु. कोहाळ्याच्या किसाचे गोड भजे. (झाडी)

**बुड्या** पु. विहिरीत मोट गेल्यावर ती पाण्यात बुडावी म्हणून मोटेच्या गोलाकार तोंडाच्या एका कडेवर बांधलेले वजन. (खा.)

**बुढ्ढा** वि. म्हातारा; वयस्क. [सं.वृद्ध]

**बुढ्ढा मंगळ** रंगपंचमी झाल्यावर प्रथम येणाऱ्या मंगळवारी होणारा होलिकोत्सव. हा उत्तर भारतात, विशेषत: काशीक्षेत्री फार मोठ्या प्रमाणावर होतो.– तीप्र १०२. [हिं.]

**बुढ्ढी के बाल** अपकेंद्री पद्धतीने तयार केलेला साखरेच्या बारीक कणांचा गोळा. [हिं.]

**बुढ्ढंग** पु. मोठा पतंग. (ना.)

**बुण(न)गा–गे** पु. न. १. सैन्याच्या सामग्रीचा तळ; खेलखाना : 'रोहिलीयाचें बुणगें व खजिना आहे, तो लुटून टाकावा.'– भाब ४८. २. सैन्याबरोबरचे बिनलढाऊ लोक. पहा : **बाजारबुणगे**[फा.बुन्गाह]

**बुणगा** वि. १. ठेंगणा; बुटका. २. लहान; छोटा; थोडा. [सं.बिंदु]

**बुणगी** स्त्री. बाजरीचे गोंड, टोपण; कचोळे.

**बुणगुले** न. धान्य साठवण्याची लहान कणंग, कणगुले.

**बुतकण–कन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. मऊ पदार्थ परस्परांवर आदळल्यामुळे होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज करून. [ध्व.]

**बुतका** पु. गुद्दा; बुक्का; ठोसा. [ध्व.बुत्–द्]

**बुतान** न. गर्द किरमिजी रंगाचे, भुतणीचे फूल. – लोसाको.(को.)

**बुतारा** पु. मोठी केरसुणी; झाडणी. (को.)

**बुतारी** स्त्री. लहान बुतारा,झाडू.

**बुताव** पु. १. लाल सुपारीच्या आकाराच्या फुलाचे झाड. (गो.) २. गुडी; भुतावे; बिरडे. [पोर्तु.बाताव]

**बुतिश** न. बाटलीच्या आकाराची चिनी मातीची बरणी. [पोर्तु.बोतिजा]

**बुत्** पु. मूर्ती. [फा.]

**बुत्ता–त्ती** पु. स्त्री. (विटीदांडूचा खेळ) विटीला टोला लगावण्यापूर्वी ती उंच उसळवणे. (ना.) [हिं.बुत्ता]

**बुत्ती–ती** स्त्री. मिरची, फोडणी इ. घालून कालवलेला, प्रवासाला नेण्यायोग्य दहीभात.

**बुत्ती** स्त्री. (बायकी) खेडेगावातील सासुरवाशीण अगर माहेरवाशीण गावाला जाताना तिच्याबरोबर दिलेले खाद्यपदार्थ. [हिं.]

**बुत्परस्ती** स्त्री. मूर्तिपूजा. [फा.]

**बुत्फरोशी** स्त्री. मूर्तींचा विक्रय; धर्माचा व्यापार. [फा.]

**बुत्शिकनी** वि. मूर्तिभंजन करणारा. [फा.]

**बुथडं** न. दोन बोटांत चामडी धरून काढलेला चिमटा. (अहि.)

**बुथडं** न. मांसाचा तुकडा. (वा.) ०**तुटनं**– अपत्याच्या मृत्यूमुळे दु:ख होणे. (अहि.)

**बुदकणे** उक्रि. बुक्क्या मारणे; बुकलणे; बदडणे. (को.) पहा : **बदकणे**
**बुदका** पु. १. गुद्दा; ठोसा; बुक्का. (को.) २. बत्ता. [ध्व.बुद]
**बुदके** न. पुंजी. (गो.)
**बुदगुली** वि. जाडजूड.
**बुदबळ** न. बुद्धिबळाच्या खेळातील सोंगटी.
**बुदबुद** स्त्री. बुडबुडे फुटणे; (पदार्थ नासल्यामुळे) बुडबुडे येऊ लागण्याची स्थिती. (क्रि. सुटणे)
पु. बुडबुडा. (वा.) **बुदबुदाबादचा नबाब–** ज्याचे स्थान, अस्तित्व बुडबुड्याप्रमाणे क्षणभंगुर आहे असा; ऐदी (मनुष्य); खुशालचेंडू.
**बुदबुद–दा** क्रिवि. बुडबुडे येऊन गदगदा; खदखदा.
**बुदबुदणे** अक्रि. (जखम, गळू इ.) कृमींनी व्याप्त होणे; बुजबुजाट होणे.
**बुद्दा** पु. अति कष्टांमुळे होणारा शक्तिपात; शीण; थकवा. (क्रि. पाडणे, पडणे, होणे.)
**बुद्दु–द्दू** वि. जड बुद्धीचा. [अर.बुद्दू=गावंढळ]
**बुद्ध** वि. १. ज्ञानी; विद्वान. २. जाणला, समजला गेलेला (अर्थ.) [सं.]
**बुद्ध** अ. शेळी किंवा मेंढी यांची संख्या लिहायची असताना संख्यावाचक विशेषणापूर्वी योजण्याचा शब्द; नग. हा शब्द विसाच्या आत योजतात व त्याच्यापुढे माच शब्द योजतात.
**बुद्धि–द्धी** स्त्री. १. पदार्थाच्या स्वरूपाचे ज्ञान करून देणारी, सारासार विचार करणारी व एखाद्या गोष्टीचे आकलन करणारी मानसिक शक्ती. २. ज्ञान; जाणीव; आकलन; शहाणपण; समज. ३. विचार; निश्चय; मन; मत; समजूत; अमुक गोष्ट अमुक स्वरूपाची किंवा गुणाची आहे असा ग्रह: 'जयास नाहीं दृढबुद्धि। तो एक मूर्ख।'– दास २.१.३७. ४. इच्छा; भावना; अंत:करणप्रवृत्ती. ५. बेत; संकल्प; युक्ती; उपाय; इलाज. ६. (समासात) भाव; दृष्टी; नजर. ७. मानणे; समजणे. [सं.] (वा.) ० **गहाण ठेवणे–** समजत असूनही अडाण्याप्रमाणे वागणे. ० **चोरणे–** गैरसमज करणे. ० **फाकणे–** १. गोंधळणे; आश्चर्यचकित होणे. २. ज्ञान; आकलन वाढणे. ०**सांगणे–** शहाणपणाच्या गोष्टी सांगणे; उपदेश करणे. **बुद्धीचा सागर–** अत्यंत मठ्ठ व मूर्ख मनुष्य. **बुद्धीने स्वर्गास जाणे–** नुसत्या ज्ञानाच्या जोरावर मोठी कृत्ये करणे व श्रेष्ठत्व मिळवणे. **बुद्धीशी वैर करणे–** स्वत:च्या अंत:करणाच्या सदिच्छेविरुद्ध प्रयत्न करणे; मनात येते त्याप्रमाणे न वागणे. **बुद्धीस लागणे–** एखाद्याच्या तंत्राने, इच्छेनुसार वागणे.
**बुद्धिचापल्य** न. बुद्धीची तीव्रता; बुद्धीचे कौशल्य; बुद्धीचे निरनिराळे गुण प्रकट करण्याच्या इच्छेची अवस्था.– हाविमी २१४.
**बुद्धितत्त्व** न. महत्तत्त्व : 'उभयसंगु पहिले। बुद्धितत्त्व प्रसवलें।'– ज्ञा १४.९१.
**बुद्धिनाश** पु. बुद्धी काम करेनाशी होणे, आठवण न राहणे व नित्याची कामे नीट करता न येणे, निर्णय घेता न येणे अशी बुद्धीची अवस्था.
**बुद्धिनिष्ठा** स्त्री. रूढी, परंपरा, दैवी शक्ती यांपेक्षा बुद्धी, विचार, प्रयोग, प्रत्यक्ष अनुभव यांवर भरवसा ठेवण्याची प्रवृत्ती.
**बुद्धिनीत** स्त्री. उपदेश, सल्ला, उपाय, मार्ग इ. विषयी सूचना.
**बुद्धिपुर:सर, बुद्धिपूर्वक** क्रिवि. मुद्दाम; जाणूनबुजून; बुद्ध्या.
**बुद्धिप्रामाण्यवाद** पु. मानवी बुद्धी हेच ज्ञानाचे प्रमाण व उगमस्थान आहे असे मानणारे मत; (इं.) रॅशनॅलिझम्.
**बुद्धिबळ** न. १. बुद्धीचे सामर्थ्य, शक्ती. २. ज्यात बुद्धीची शक्ती लागते असा खेळ. यात लष्करी डावपेचांची भाषा असून हा पटावर मोहरी मांडून खेळतात. याचे देशी व विदेशी/युरोपियन असे दोन प्रकार आहेत.
**बुद्धिबोध** पु. जीव आणि ईश्वर : 'भेदनदीचां दोहीं थडीं। आरडातें विरहवेडी। बुद्धिबोध।'– माज्ञा १६.५ [सं.]
**बुद्धिभेद** पु. १. हेतूचा, उद्देशाचा बदल. २. मनोवृत्तीतील बदल; मतपालट. ३. वैमनस्य; द्वेष; कलह. [सं.]
**बुद्धिभ्रंश** पु. १. विचारशक्तीचा नाश; मानसिक गोंधळ; भ्रम. २. पहा : **बुद्धिभेद** [सं.]
**बुद्धिमांद्य, बुद्धिदौर्बल्य** न. बुद्धीचा जडपणा, मंदत्व.
**बुद्धियोग** पु. १. निष्कामकर्मयोग : 'आतां बुद्धियोगु निश्चित। अवधारी पां।'– ज्ञा २.२३०.२. ज्ञानयोग. [सं.]
**बुद्धिवंत–मंत–मान–वान** वि. तीव्र बुद्धीचा; हुशार; तरतरीत; शहाणा; तैलबुद्धी.
**बुद्धिवाद** पु. १. उपदेश; सल्ला; शिफारस; सूचना : 'एके यतीने येवोनी। बुद्धिवाद सांगितला।'– गुच ३३.५. २. पहा : **बुद्धिनिष्ठा** [सं.]
**बुद्धिस्वातंत्र्य** न. स्वत:च्या बुद्धीला योग्य दिसेल असे बोलण्याची व करण्याची मोकळीक.
**बुद्ध्यंक** पु. बुद्धीचे आकड्यात निर्देशन; बुद्धिगुणांक; बुद्धिलब्धी.
**बुद्ध्या** क्रिवि. १. पहा : **बुद्धिपुर:सर**. २. मनाने; स्वेच्छेने; जाणीव असताना. समासात उपयोग.
**बुद्बुद** पु. बुडबुडा. [सं.]
**बुद्बुदाकार** वि. बुडबुड्याच्या आकाराचा. गर्भधारणेनंतर तिसऱ्या दिवसाचे गर्भाचे स्वरूप. [सं.]
**बुद्रुक–ख, बुजरूग** वि. १. पूज्य; सन्माननीय; थोर; वृद्ध (वय, ज्ञान इ.नी). २. एकाच नावाच्या दोन गावांपैकी मोठे. ३. एकाच नावाच्या दोन इसमांपैकी मोठा, वडील. ४. वृद्ध; दुबळा; असमर्थ. [फा.बुझुर्ग]
**बुध** पु. सूर्यमालेतील सर्वांत लहान अंतर्ग्रह; नवग्रहांपैकी चौथा. सूर्याच्या सर्वांत जास्त जवळ आहे. [सं.]
**बुध** वि. (व्यापारी, सांकेतिक) पाच (भाजीपाल्याच्या व्यवहारात वापरतात).
**बुध** वि. शहाणा; विद्वान; ज्ञानी; पंडित.
स्त्री. पहा : **बुद्धी** [सं.]
**बुधनाल** स्त्री. झाडाच्या बुंध्याशी नालाप्रमाणे वाकवून बांधून मारणे : 'टांगणे टिपऱ्या बिछोडे। बेडी बुधनाल कोलदंडे।'– दास ३.७.६७.
**बुधबृहस्पती** पु. अव. १. श्रावण महिन्यातील दर बुधवारी व गुरुवारी स्त्रिया पूजतात त्या बुध व बृहस्पती यांच्या प्रतिमा व चित्रे. २. (यावरून) बुधबृहस्पतीचे व्रत, पूजा. ३. (कहाणीतील भिक्षेला येणाऱ्या मामा-भाच्याच्या जोडीवरून) मामा व भाचा एकत्र आले असताना म्हणतात.
**बुधला** पु. १. तेल, तूप इ. ठेवण्याचे, लहान तोंडाचे चर्मपात्र; कातड्याची

बाटली. २. ज्याच्याभोवती आरे बसवलेले असतात तो चाकाचा मध्यभाग; तुंबा. (व.) ३. मुंडके; डोके. [हिं.बुदला; क.बुद्दणिगे]
**बुधली** स्त्री. १. सुगंधी तेले, अत्तरे इ. ठेवण्याचे चर्मपात्र; लहान बुधला. २. मशालीवर तेल ओतण्यासाठी तोटी असलेले चामड्याचे किंवा धातूचे भांडे. ३. (सामा.) लहान भांडे. ४. खाद्यतेल ठेवण्याचा वाळवलेला भोपळा. (अहि.) (वा.) ० **उताणी पडणे, भोवती येणे**– एखाद्याची लबाडी उघडकीस येणे.
**बुधले** न. पहा : **बुधला** १,२
**बुधलेमार** पु. १. दारूने भरलेले बुधले ओळीने मांडून बार उडवणे. २. दारू भरलेल्या बुधल्यांशी एखाद्याला बांधून त्या दारूला आग लावून मारणे : 'मोघरीमार बुधलेमार। चौखरून डंगारणे मार।'– दास ३.७.६५.
**बुधवंत** पु. १. पुढारी; महाजन.– खिपु. (को.) २. कर्नाटकातील बेडगू जातीचा जातपाटील.– गांगा. ३. बुद्धीने व अनुभवाने प्रौढ. (गो., कर्ना.)
**बुधाष्टमी** स्त्री. १.शुक्ल पक्षात बुधवारी येणारी अष्टमी. २.स्त्रियांचे एक व्रत. [सं.]
**बुनकर** पु. विणकर; कोष्टी. (व.)
**बुनणे** उक्रि. विणणे. [हिं.बुनना]
**बुनावट** स्त्री. वस्त्राची वीण; विणण्याची तऱ्हा.
**बुनियाद, बुना(न्या)द** स्त्री. १. जोर; शक्ती; जोम. २. (ल.) बिशाद; मजाल. ३. वजन; किंमत; प्रभाव; महत्त्व. ४. भांडवल; साधन; कोणत्याही कामाला लागणारी सामग्री. ५. पाया. ६. आरंभ; सुरुवात: 'त्यास आपण बुनादीपासून आपले वतनाचे वर्तमान व कागदपत्र तमाम दाखविले.'– मइसा ८.४४. ७. स्वभाव; शील : 'हलक्या गोष्टी आम्हांकडील नवाब व रूक्नुद्दौला हैदरखांच्या वकिलांशीं बोलत असल्यास त्याचा प्रकार, बुनियाद कशी आहे तें कळतच आहे.'– ऐलेसं १०७४. ८. हक्क; सीमा; मर्यादा. (व.) [फा.बुन्याद] (वा.) **बुन्याद होणे**– अखेर होणे. (व.)
वि. जुनाट; फार प्राचीन काळापासून चालत आलेला(मनुष्य, हुद्दा, मालमत्ता).
**बुनियादी, बुना(न्या)दी** स्त्री. मुळापासूनची सर्व हकिकत : 'आपले वडिलांनीही कुल बुनादी सांगितली होती.'– मइसा १५.७५.
वि. जुनाट; पूर्वापार चालत आलेले.
**बुबा** स्त्री. आत्या; बापाची बहीण. (व.) [हिं.बूबू]
**बुबु(बू)ळ** न. १. डोळ्यातील मांसगोलक; नेत्रपिंड. २. डोळ्यातील काळा भाग. [सं.बुद्–बुर–बुब्बुल– भाअ १८३२]
**बुभुक्कार** पु. वानराच्या ओरडण्याचा आवाज. पहा : **भुभु:कार** [ध्व.]
**बुभुक्षा** स्त्री. खाण्याची इच्छा; भूक; क्षुधा. [सं.]
**बुभुक्षित** वि. १. भुकेलेला; क्षुधित; ज्याला भूक लागली आहे असा. २. (ल.) गरीब; गरजू. ३.वखवखलेला. [सं.]
**बुभुक्षु–क्षू** वि. भुकेलेला. [सं.]
**बुयार्डी** स्त्री. मासळीची एक जात. (गो.)
**बुयांव** न. बरणी. (गो.) [पोर्तु.बाओ]
**बुर, बुराडी** पु. स्त्री. अळशीच्या रोप्याचा वाळलेला बुंधा. (व.)
**बुर** न. १. भुसा; कोंडा; भुगा : 'चोरीं तुझा काढिला बुर। वेगळें भावा घातला दूर।'– तुगा २९९७. २. गळून गेल्याची, थकल्याची स्थिती. पु. १. रुईच्या फळातील कापसासारखा पदार्थ. २. कूज; बुरशी. वि. घामट.– शर.
**बुरकणे** अक्रि. १. (म्हैस, बैल, डुकर इ.चे) ओरडणे; डरकणे. २. मूर्खपणाने, गैरसावधपणे (भलतीच, गुप्त गोष्ट) बोलून जाणे. [ध्व.]
**बुरकत** न. (नाविक) चौकोनी परंतु लांबट शीड. ही शिडाप्रमाणे उभी न करता आडवी हाकारतात. (को.)
**बुरका–खा** पु. १. मराठे, मुसलमान इ.च्या स्त्रिया तोंडावर घेतात तो पदर; पडदा. २. (पालखी, हत्ती इ.वरील) वस्त्राचे आच्छादन. ३. प्रवासी गाडीचा चवरडोल; चांदवा; घटाटोप. [अर.बर्कुअ]
**बुरकाम** न. वादळात लावावयाचे शीड. – आंघइ ३७९.
**बुरकूल** न. १. कापड फार धुतले गेल्यामुळे त्याचे निघालेले तंतू; वस्त्रावरचे फूल. २. डोक्यावरचे पिंजारलेले केस. ३. कच्चे सूत, दोरी इ. ची धसकट. ४. वाळलेला दोडका, घोसाळे इ.च्या सालीच्या आतील तंतुमय भाग.
**बुरकेत** न. लहान शीड.– आंघइ ३७९.
**बुरखुंड** न. जोंधळा इ.चे दाणे पाडून घेतलेले कणीस. पहा : **बिरखुंड** २ वि. गरीब; दरिद्री.
**बुरगुंडा–डी–डे** पु. स्त्री. न. मुलगा–गी; मूल. (खा.,वैदू, कैकाडी) [ते.;गो.बुरगे]
**बुरजा** पु. फजिती; बोजवारा : 'यांच्या चर्चेचा बुरजा वाजला.'– विवृ १.९.१९४०.
**बुरजात जाणे** राजा व हत्ती यांच्यामधील मोहरी निघालेली असून हत्तीच्या दिशेकडील राजाच्या दोन घरांवर मारा नसला म्हणजे राजाशेजारी हत्ती व त्याच्या पलीकडे राजा असा डाव टाकणे.
**बुरजी** स्त्री. (बुद्धिबळाचा खेळ) एका पक्षाची राजाशिवाय मोहरी, प्यादी मारून डाव अंगावर घेणे. [फा.बुर्ज]
**बुरजी** वि. कुत्र्याची एक जात.
**बुरजी तुरा** बुरुजाच्या आकारासारखा फुलांचा गुच्छ.
**बुर(रं)ट, बुरटे** न. दाट गवत व झाडेझुडपे असलेले गर्द स्थळ.
**बुर(रं)ट** वि. १. दाट; गहन (झाडी, अरण्य). २. खुरटलेले, वाढ खुंटलेले (झाड). ३. खुरटी; थोडे दूध देणारी, आटलेली (गाय) : 'जो बुरट गौतमी कांसे खालीं।'– नव १९.४६.
**बुर(रं)ट** वि. बुरसटलेला; बुरशी आलेला.
**बुरट(ड)णे** अक्रि. बुरसटणे; बुरशी येणे; बुरसणे : 'जें कां सांचुनि ठेविलीं बुरटलीं उष्टीं जुनीं आपुलीं।'– निमा १.५०.
**बुरटा** पु. रोगामुळे खुरटलेले, वेडेवाकडे वाढलेले झाड किंवा फळ. [सं.वृथा; हिं.ब्रथा]
**बुरडचे, बुरडुंक** उक्रि. ओरबाडणे; बुचाडणे. (गो.)
**बुरडी, बुरडीव** वि. बुरडाने बनवलेला (टोपली इ. पदार्थ).
**बुरडी** स्त्री. १. गुऱ्हाळघरात दिवा ठेवण्यासाठी असलेले तिकिटे, घोडी.

२. नारळ, बेलफळ इ. चा डहू; गर काढून केलेले पात्र.

**बुरणुसबुद्धी** स्त्री. मंद, जड, जीर्ण बुद्धी (बुरणुसात खिळा खुपसून वर काढला तरी भोक राहत नाही यावरून).

**बुरणूस** पु. १. न विणता खळ लावून, लाटून, दाबून केलेले पिंजलेल्या लोकरीचे वस्त्र. २. रग, कांबळी इ. लोकरीचे पांघरूण. [सं.ऊर्णायु]

**बुरना** सक्रि. १. खाजवणे. २. ओरबाडणे. ३. झाडाच्या शेंगा काढणे. (झाडी)

**बुरदरबारी** स्त्री. प्रौढता : 'लेंकूरपणाचा स्वभाव टाकून बुरदरबारी अंगी ठेवावीं.'– नागपूरकर भोसल्यांच्या संबंधाचे पत्र १२. [फा.]

**बुरदुल** न. लहान तोंडाची बुरडी.

**बुरबुर** स्त्री. १. तोंडातल्या तोंडात बोलणे; पुटपुटणे; कुरकुर. (क्रि. लावणे, करणे.) : 'जाणिवेच्या भारें चेंपला उर। सदा बुरबुर सरेचिना।'– तुगा ३०७०. २. बारीक पाऊस. [ध्व.]

**बुरबुर–रा** क्रिवि. बारीक पाऊस, मंद वाऱ्याची झुळूक, फार आवाज न करता व जोराने धावणे, पुटपुटणे इ. च्या आवाजाप्रमाणे आवाज करून. [ध्व.]

**बुरबुरणे** अक्रि. १. हलक्या आवाजात बोलणे; पुटपुटणे; कुरकुरणे. २. बारीक थेंबांच्या स्वरूपात पाऊस पडणे; पाण्याचे तुषार पडणे.

**बुरबुरा** पु. जखम, गळू इ. तील रक्तमिश्रित वाळलेला पू.

**बुरमुळा** पु. एक कंद. पहा : **बिरंबोळा**

**बुरयाँटा** पु. अतिशय लहान व स्वच्छ मासा. (कु.)

**बुरलही** स्त्री. हरळीसारखे एक गवत. (वाई)

**बुरलूक** न. मांसाचे वाढलेले टेंगूळ; अवाळू. (कु.)

**बुरशी** स्त्री. १. दमटपणामुळे पदार्थावर होणारी सूक्ष्म वनस्पतिरूप वाढ; बुरा; केनशी; भुरी. २. दातावरील किटण. [सं.बुरा; क.बुजू; त.पूशण]

**बुरशेला–ल** वि. १. बुरसलेला; ज्याला बुरशी आली आहे असा. २. (ल.) घाणेरडा; ओंगळ; गचाळ (मनुष्य).

**बुरस** स्त्री. वाईट वास.

**बुरसटणे** अक्रि. घाणेरडे, ओंगळ होणे (विशेषत: तोंड, शरीर).

**बुरस(शे)णे** अक्रि. १. बुरशीने युक्त होणे; बुरा येणे. २. साका चढल्यामुळे जीभ, कीट चढल्यामुळे दात घाणेरडे होणे, असणे.

**बुरसा** पु. १. बुरशी. २. बुरशीमुळे पडणारा डाग. ३. आरशावरील पारा गेल्यामुळे झालेला काचेचा उघडा भाग.
वि. घाणेरडा; ओंगळ; गचाळ.

**बुरसावणे** सक्रि. १. मळ, बुरशी, कीट, साका इ. नी (अंग, भांडे, जीभ, दात इ.) युक्त असणे. २. हिडीस, ओंगळ दिसेल असे करणे.

**बुरं(र)ग** न. शाहीर लोकांचे एक वाद्य : 'ढोल टिमक्या बुरंगे पाहीं।'– भारा किष्किंधा ९.३६.

**बुरंग(गू)ट–ळ, बुरगे** न. अत्यंत बारीक पाऊस; बुरबुर.

**बुरंग(गा)ळणे** अक्रि. १. स्वच्छंदाने, ताळतंत्र सोडून वागणे; उनाड, स्वेच्छाचारी बनणे. २. पहा : **बुरकणे १**

**बुरा** पु. साखरेचा एक प्रकार.

**बुरा** पु. १. बुरशी. २. केस; लव. ३. नारळाचे, कणसाचे तंतू. (झाडी)

**बुरा** पु. १. लोकर तयार करण्यापूर्वीचे मेंढ्यांचे केस. २. केसांचा झुपका.

**बुरा–रू** वि. १. वाईट. विशेषत: भला या शब्दासोबत योजतात. २. (चुकीने उपयोग) बुळा; नपुंसक. ३. कृतघ्न : 'नाना वसो घातला चारू। माथां तुरंबिला बुरू।'– ज्ञा १७.२८१. ४. बुरशी. [हिं.]

**बुराई, बुरेपणा** स्त्री. न. वाईटपणा.

**बुराक–ख** पु. १. भोक; वेज (मोती, हिरा इ.चे). २. (भांड्याला पडलेले) लहान छिद्र. ३. (सामा.) भोक; छिद्र : 'बुराख एक ठेऊन आपले टकल्येवर ऱ्हालों.'– लोक २.४८. ४. फजिती; अपकीर्ती; बदनामी. (क्रि. उडणे, होणे.) [फा.बुराख्; गु.बुराक; पोर्तु.बुरासो]

**बुराक(ख)खांच** स्त्री. (पाथरवट) वेशी अगर दरवाजे यांची दारे बसवण्यासाठी दगडाला ठेवलेले भोक.

**बुराणजी कापशा** वि. स्वत:ला फाजील महत्त्व देणारा, अहंमन्य. (व.)

**बुराना** वि. जुना. (व.) [हिं.बुरा,पुराना]

**बुरांगळ** स्त्री. किरकिर; चऱ्हाट; पाल्हाळ. (व.)

**बुरां(रू)ट, बुराड** न. वि. पहा : **बुरंट**

**बुरांटॉ–डॉ** पु. १. काटे असलेली माशाची एक जात. २. अशा लहान माशांचा थवा.

**बुरांड** पु.१.वाऱ्याने फुगलेले अंड. (तंजा.) २. अंडवृद्धी. [सं. बृहदंड]

**बुरांड्या** वि. बुरांडाचे दुखणे असलेला.

**बुरीचे जाळे** होड्या किंवा तराफे यांवर पसरलेले मासे पकडण्याचे जाळे; विलाची जाळे (हर्णे). (को.)

**बुरुपातरा** पु. पोपटाची एक जात.

**बुरू(रु)ज** पु. १. कोटाच्या तटबंदीत मजबुतीसाठी, बचावासाठी व माऱ्यासाठी जागोजाग केलेली वर्तुळाकार बंदिस्त जागा; हुडा. २. या आकाराची सैन्यातील शिपायांची रचना; व्यूह. ३. (सोंगट्या) पगड डावात एका रंगाच्या सोंगट्या जिंकणे. ४. बुद्धिबळाच्या खेळातील हत्ती. ५. बुद्धिबळातील एक डाव. पहा : **बुरजी.** ६. (ल.) संरक्षणाचे मजबूत साधन : 'तोफेचा बुरूज बांधिला गारपिरावर।'– ऐपो ४३६. [अर. बुर्ज]

**बुरूजबंदी** स्त्री. बंदूकवाल्या शिपायांच्या तुकड्यांची रचना.

**बुरूड** पु. १. कळक, वेत इ. च्या कांबीच्या सूप, टोपल्या इ. वस्तू करणाऱ्यांची जात व त्या जातीतील व्यक्ती. २. मांगांतील एक पोटजात.– अस्पृ ४७. (खा.)

**बुरूम–ब** पहा : **मुरूम**

**बुरूस** पु. डोळ्यातील मळ, चिपडे, गू.

**बुरेला** वि. १. स्नान न केलेला. (ना.) २. दुर्मुखलेला. ३. केसाळ. (झाडी)

**बुऱ्हे** पु. पत्त्यांच्या खेळाचा एक प्रकार. (गो.) [पोर्तु.ब्यूरों]

**बुल–ली** स्त्री. १. लहान शिशी. (गो.) २. किटली; चहापाणी. (कु.) [पोर्तु.ब्यूल; मूळ सिंहली शब्द]

**बुल–ले** स्त्री. न. १. धान्य साठवण्याची मातीची लहान कोठी. (ना., व.) २. लहान कणगी, उडवे.

**बुलकावणे** अक्रि. त्रासून सोडणे. (व.)

**बुलबुल, बुलबुलबोचा** पु. १. एक गाणारा पक्षी. २. (लहान मुलांची) बडबड; जीभ वळवळ करणे. (क्रि. करणे, मांडणे, लावणे.)

क्रिवि. एकसारखी बडबड करून; जिभेची टकळी लावून (लहान मुलांनी बोलणे). [फा.बुल्बुल्]
**बुलबुलचष्मी** वि. बुलबुल पक्ष्याच्या डोळ्यासारखे विशिष्ट प्रकारचे काठ ज्याला आहेत असे (वस्त्र). [फा.बुल्बुल+चष्मा]
**बुलबुलतरंग** न. एक वाद्य.
**बुलभट्टी** स्त्री. विटा भाजण्याची जमिनीत केलेली भट्टी.
**बुलंगा** पु. सैन्यसंभार.- राव्यको १०.१.
**बुलंद** वि. उंच; दुर्गम; बेलाग. [फा.]
**बुलंदी** स्त्री. उंची. [फा.]
**बुला** पु. १. उसाची चिपाडे. २. तासून किंवा रंधून झाल्यानंतरचा लाकडाचा चुरा. (झाडी) [सं.बुस]
**बुलाक-ख** पु. नाकपुड्यांमधील पडद्याला भोक पाडून त्यात घालण्याची मुसलमान स्त्रियांची एक मोत्याची नथ, लोलक. [फा.बुलाक]
**बुलाखा** पु. रागाने नाक व डोळे वर चढवून धरून केलेली चर्या. (व.)
**बुली-ल्ली** स्त्री. १. लहान मुलाचे जननेंद्रिय; चोटकुली; मिरची. २. त्या आकाराचा मुलांच्या कमरेला (साखळीला) असलेला चांदी-सोन्याचा दागिना. [क.बुल्ल-ल्ली]
**बुलीर** (नाविक) परभाण पुढे-मागे ओढण्यासाठी त्याच्या बुंध्याला बांधलेली दोरी. (को.)
**बुलूंबुलू** क्रिवि. बोबडे बोल काढणे : 'तानें गे लेकरूं । करतें हें बुलूबुलू ।'- वलो ८७. [ध्व.]
**बुलेती** स्त्री. (नाविक) वल्हे अडकवण्याची नावेवरील खुंटी. (को.)
**बुलेटिन बोर्ड** (संगणक.) एकमेकांशी गप्पा मारता येतील किंवा साठवलेल्या माहितीतून हवी ती माहिती मिळवता येईल किंवा इलेक्ट्रॉनिक संदेशपत्रे पाठवता येतील अशी संगणकयंत्रणा. [इं.]
**बुल्दा** पु. १. शहर. २. प्रांत : 'औरंगाबादचे बुल्द्याचे सुभेदारीचें काम.'- मइसा ७.२२१. [फा.बल्दा]
**बुवा** पु. १. बावा; मोठा व सन्मान्य मनुष्य; बोवा. २. साधू; संत; गुरू. ३. बागूल; बाऊ; मुलांना भीती दाखवण्यासाठी कल्पिलेला एक प्राणी. ४. एक आश्चर्यकारक उद्गार. ५. (थट्टेने) उंदीर; घूस. [सं.वप्]
**बुवाबाजी** स्त्री. (निंदाव्यंजक) बुवा, साधू बनून आपले प्रस्थ माजवण्याचा प्रकार.
**बुशे(से)त** न. लहान डबी; टिनच्या पत्र्याची पेटी. (गो.) पहा : **फोलीण** [पोर्तु.बोसेता]
**बुहारा** वि. एक बायकी शिवी; घाणेरडी; दुष्ट. (व.)
**बुळकट** वि. १. तेल, तूप इ. चोपडल्यामुळे बुळबुळीत, निसरडा झालेला. (कु.) २. वेडसर; दुर्बळ.- शर. ३. पहा : **बुळा**
**बुळकणे** अक्रि. १. अतिसार इ. विकारामुळे एकदम व पातळ शौचास होणे; पिळकणे. २. (फळ) नासणे व त्यातून चोथापाणी बाहेर पडणे. ३. (जखम, गळू इ.) वाहू लागणे. ४. (क.) (दोरीची गाठ, लाकडाचा सांधा इ.) सैल पडणे; एकदम सुटणे; निखळणे.
**बुळकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. सैलपणे गेल्याने एखाद्या वस्तूच्या बाहेर पडण्याच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन.
**बुळका** पु. एक जलचर प्राणी; गाधा, घड्याळ मासा.
**बुळका** वि. १. सैल; ढिला; खिळखिळीत झालेला (सांधा, गाठ, इमारत, यंत्र, मांडणी, सांगाडा). २. (ल.) निष्काळजी; ढिला; गबाळ; अव्यवस्थित (कारभार, व्यवहार, वचन, कर्ता इ.).
**बुळका-क-की, बुळकां(कं-कुं)डी** पु. स्त्री. १. अतिसारामुळे एकदम व आपोआप बाहेर पडणारा पातळ मळ; हगवण. २. फुटलेल्या किंवा फाटलेल्या पात्रातून, बारदानातून बाहेर पडत असलेल्या पदार्थाची धार. ३. गुरांचा एक स्पर्शजन्य रोग; पटकी; देवी इ.
**बुळगे** न. भेंडीचे रायते (बुळबुळीतपणावरून).
**बुळबु(बू)ळ** स्त्री. १. बुळबुळीतपणा; स्निग्धता; ओशटपणा; निसरडेपणा. २. गळती; टपटप पडणे; ठिबकणे; पाझरणे; थेंबथेंब पडणे. (क्रि. लावणे, मांडणे, सुटणे इ.).
**बुळबुळ-ळा** क्रिवि. १. पावसाची बुरबुर (छप्पर, भांडे, दाण्याचे पोते, नाक इ. च्या) सारख्या गळण्याने किंवा ठिबकण्याने, जखमेतील धाण वाहण्याने, ढेकूण, पिसवा यांच्या अंगावरील वस्त्रात होणाऱ्या हालचालीने होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. २. मुळुमुळु (रडणे).
**बुळबुळणे** अक्रि. १. पहा : **बुचबुचणे**. २. (जखम, फळ इ. मध्ये) अळ्या वळवळत असणे.
**बुळबुळपंचांग** पु. अजागळ, बावळट मनुष्य. (गो.)
**बुळबुळाट-ण** पु. बुळबुळीतपणा; तेलकटपणा; ओशटपणा. (कु.)
**बुळबुळावणे** सक्रि. १. तेल, तूप इ. नी बुळबुळीत करणे. २. कसेबसे धुणे, घासणे, विसळणे (वस्त्र, अंग, भांडे).
**बुळबुळीत** न. तुळतुळीतपणा; तेलकटपणा; निसरडेपणा.
वि. १. तेलकट; चिकट; तुळतुळीत. २. निसरडा; घसरडा. ३. गरीब; भित्रा; शेळपट. ४. कमजोर; नीरस; पाणचट (वर्तन, भाषण, लेख इ.).
**बुळबो** पु. दलदल. (गो.)
**बुळा** वि. १. नपुंसक; षंढ; नामर्द. २. (ल.) सैल; ढिला; निष्काळजी; अव्यवस्थित. [सं.प्लुष्]
**बुळी** स्त्री. गंजिफातील हलके पान. पहा : **नादर**
**बुळ्ळू** स्त्री. लहान मुलाची लघवी. [ध्व.]
**बुंगबुंग** क्रिवि. मृदंग, पखवाज इ. च्या आवाजाने. [ध्व.]
**बुंगरं** न. छिद्र; भोक. (अहि.)
**बुंगी** स्त्री. मुलाचे मूत्रेंद्रिय; बुल्ली; नुन्नी.
**बुंजरी** स्त्री. बुजणे; बुजणी : 'नभीं कुंजरीं बुंजरीं घेत आटी ।'- मुरामायण बाल ९९.
**बुंडी** वि. दुष्ट; कडवा : 'साठसहस्र पठाण बुंडी ।'- ऐपो २२५.
**बुंथ-थी, बुथी** पु. स्त्री. १. डोक्यावरून सर्व शरीरभर आच्छादनासाठी घेतलेले वस्त्र; ओढणी; खोळ. २. बुरखा; घुंगट : 'काळी कांबळी गुंतून बुंथी ।'- नव १३.१२३. ३. आश्रयस्थान; निवासघर : 'जैसी आभाळाची बुंथी । करूनि राहे गभस्ती ।'- ज्ञा ६.२५१. ४. रूप; वेश : 'होतों दाशरथी तुम्ही वसुमती घ्या वानराच्या बुथी ।'- निमा १.२. ५. गवसणी; आच्छादन. (ल.) बंधन : 'गगना घालूं शके बुंथीं ।'- कृमुरा ३९.५४. [सं.अवगुंठन]

**बुंथड** स्त्री. वस्त्रप्रावरण; पोशाख : 'गाढव गाढविसि बुंथड । न करी अलंकार मोथड ।'- एभा १३.४२१.

**बुंद** न. बूड; तळ; खालचा भाग. [फा.बुन्ना,बुन्याद]

**बुंद** पु. कॉफीचे बी.

**बुंद** वि. १. (सौंदर्य, श्रेष्ठत्व, अप्रतिमत्व दाखवण्यासाठी प्रमाण म्हणून योजतात.) सुरेख; गोंडस; सुंदर; अप्रतिम : 'नाजुक रुपडें बुंद मुखोटा नवतीची लाली ।'- होला १०१. २. लाल या विशेषणापुढे त्या रंगाचे आधिक्य दाखवण्यासाठी योजतात.

**बुंदका** पु. थेंब; ठिपका.- शर.
वि. पहा : **बुणगा**

**बुंदकी** स्त्री. (कापड, कागद इ.वरचा) लहान ठिपका; बुट्टी : 'बुंदकीचा गजभर चिरा जो तुटला ।'- ऐपो ५४.

**बुंदख(क)डा** वि. सुंदर व देखणा-णी.

**बुंदगा, बुं(बु)दगुला** वि. बुटका; पहा : **बुणगा** : 'मोदळी बुदगुली ठेंगणे ठाण ।'- एभा ११.११८५.

**बुंदगुले** न. लहान व विशिष्ट आकाराचे धातूचे भांडे.

**बुंद घेणे** (उष्णता सहन व्हावी म्हणून) चुलीवर ठेवण्याच्या (खापर इ.च्या) भांड्याच्या बुडाला माती, राख इ. चा लेप करणे.

**बुंदाचा चहा** कॉफीचे बी उकळून घेतलेले पेय; उकळलेल्या कॉफीचे पाणी, अर्क; कवा.

**बुंदाचे तेल** बतमतेल; कॉफीपासून केलेले तेल.- अश्वप २.१०८.

**बुंदाळा** पु. भांड्याला बुडाशी बाहेरून दिलेले राखेचे लेपण.

**बुंदिन** न. (शाप.) चहा, कॉफी, कोको ही उकळल्यानंतर त्यांत सापडणारा एक क्षार; (इं.) कॅफीन.

**बुंदी** स्त्री. हरभऱ्याचे पीठ भिजवून पातळ करून ते झाऱ्यातून तुपात,तेलात पाडून तळलेली कळी. [सं.बिंदु; हिं.बुंदिया]

**बुंदेला** वि. बुंदेलखंडासंबंधी. पहा : **बुंधेला**

**बुंध** न. १. (झाड, गवत, केरसुणी इ.चा) मुळाकडचा भाग; बुडखा. २. पायथा; तळ; बूड; खालचा भाग. पहा : **बुंधा** [सं.बुध्न]

**बुंधट** न. पेंढावर सारवण्यासाठी वापरतात ती जीर्ण व आखूड फड्यांची केरसुणी.

**बुंधा, बुंधारा** पु. १. पहा : **बुंध** १. २. (ल.) मूळ; पाया; उगम; आरंभ; उत्पत्तिकारण. [सं.बुध्न]

**बुंधाड** पहा : **बुडखा**

**बुंधारणे** उक्रि. केरसुणीच्या बुडख्याने मारणे.

**बुंधी** स्त्री. १. बुरखा. २. सोंग; वेश; पहा : **बुंथी** : 'ॐळखी जालेंयां बुंधी कांइसी । जाण राया ।'- शिव ७८.

**बुंधी** पु. कोवळे बांबू. (को.)

**बुंधेला** वि. १. बुंदेलखंडात राहणारा (मनुष्य). २. (ल.) मूर्ख; मठ्ठ; अडाणी. ३. रेंगाळणारा, सुस्ताईचा, ढिला (मनुष्य, कारभार).

**बुंधेला** वि. बुधले वगैरे तयार करणाऱ्या लोकांच्या जातीचा (मनुष्य).

**बू** पु. १. लहान मुलांना भीती दाखवण्यासाठी बुवा, बाऊ या अर्थी हा शब्द वापरतात. २. (बालभाषा) दूध. ३. पोकळ दिमाख; देखावा; बढाई.

**बूच-ज** पु. १. गुडदी; दट्ट्या; बुटणे. २. बुजवणी; भर; भरपाई : 'त्याची बूज करावया न अगदीं कोणी कसें राहिलें ।'- केका ५३.

**बूज** स्त्री. (गंजिफाचा खेळ) मागील डावात लागलेली व चालू डावातून देण्याची पाने.

**बूज** स्त्री. तूर, मसूर, वाटाणा वगैरेचा पाला व सड यांची बुकणी.- चित्रकृषि २.७.

**बूज** स्त्री. १. (गुण, शौर्य, विद्या इ. मुळे होणारी) मानमान्यता, सन्मान; आदर; पूज्यभाव. २. आठवण; जाणीव. ३. बुजण्याची, भिण्याची वृत्ती; भित्रेपणा.

**बूट** पु. १. भांगेचा पुष्पगुच्छ; फुलोरा. २. कापडावर काढलेली पानाफुलांची नक्षी; वेलबुट्टी : 'कांठ किनारी बूट जरी आधीं परीटघडीचें ।'- प्रला ९६. ३. नवीन व चमत्कारिक कल्पना; युक्ती; खुबी; टूम : 'असा एक बूट काढिला होता कीं, नवऱ्याकडे जाण्यास बायको नाखूष असल्यास....'- टि ४.४४.९८. ४. नवीन कविता, गाणे : 'प्रभाकरानें बूट प्रियकर गाइला ।'- प्रला ९८. ५. कारस्थान. (क्रि. कातरणे, रचणे.) ६.रहस्य, गुप्त योजना. [हिं.बूटा]

**बूट** पु. एक जलचर. याचे डोके हातोडीसारखे असते.

**बूट** पु. चटका; विस्तवाचा डाग. (गो.)

**बूट** स्त्री. नुकसान. (गो.) पहा : **बूड**

**बूट** न. गुरांना घालण्याचे पेंड, कोंडा इ. चे भिजवून केलेले मिश्रण;आंबोण.

**बूट** पु. परदेशी तऱ्हेचे पादत्राण; विशेषत: चढाऊ जोड. [इं.]

**बूटी** स्त्री. भांग. (काशी) पहा : **बुटी**

**बूड** स्त्री. १. (व्यापार इ.तील) तोटा. २. (व्याज, बट्टा इ. संबंधी) नुकसान. ३. बुडीत खर्च-कर्ज; बुडालेला पैसा. ४. तोटा; नुकसान; हानी.

**बूड** न. १. तळ; पाया; कोणत्याही वस्तूचा खालचा भाग. २. पहा : **बुंदाळा**. (क्रि. घेणे) ३. कुटुंबाचा, जातीचा, वंशाचा मूळपुरुष. ४. वतनात भागी असणारे अगदी पहिले व हयात असणारे कुटुंब. ५. अशा कुटुंबाकडील वतनाचा हिस्सा. [सं.बुध्न; क.बुड] (वा.) **०टेकणे**- थोडा वेळ बसणे. **जड बुडाचा, बूडजड** - १. श्रीमंत; संपन्न; समृद्ध. २. प्रतिष्ठित; वजनदार; सन्माननीय.

**बूड** पु. पाणकोंबडा. (गो.)

**बूथ** पहा : **बुंथ-थी**

**बूद** पु. धान्याची रास करून तिच्याजवळ बसवतात ते एक शेणाचे बाहुले (पांडव). (कर्ना.)

**बूमरँग** न.१. ऑस्ट्रेलियातील आदिवासी, शिकार करण्यासाठी वापरत ते वर्तुळाकार व फेकल्यावर फेकणाऱ्याकडेच परत येणारे लाकडी शस्त्र. २. (यावरून) आपल्याच अंगावर उलटणारा युक्तिवाद. ३. (मा.शा.) केलेल्या उपचाराने वर्तनातील बदल अनिष्ट, उलटेच घडून येणे.

**बूर** पहा : **बुर**

**बूर** न. वाढलेला अंडाशय. (गो.) पहा : **बुरांड**

**बूरबट** न. मांसाचे कालवण. (माण.) पहा : **बरबट**

**बूरा** पहा : **बुरा**

**बूस्टर** पु. मुख्य स्फोटक व साधा किंवा विद्युत स्फोटक यांना जोडणारा

दुवा (जळत जाणारी वात, विजेची तार). [इं.]
**बूंद** पु. १. थेंब; बिंदू. २. कॉफीचे बी. [हिं.]
**बृहती** स्त्री. १. रिंगणीचे झाड. २. डोरलीचे झाड.
**बृहती** स्त्री.१. ढुंगण. २. गुद; अपानद्वार.
**बृहत्** वि. मोठा; जाड; लठ्ठ; विस्तृत. (समासात) बृहच्छरीर; बृहत्कथा इ. [सं.]
**बृहत् पत्रक** एकाच बाजूला मजकूर छापलेला मोठा कागद.
**बृहत् पूरक** (छपाई.) छपाईसाठी जुळवलेला मजकूर छपाईला सुरुवात करण्यापूर्वी धातूच्या चौकटीत घट्ट बसवावा लागतो. असे करण्यासाठी जुळवलेला मजकूर व चौकट यांच्यामध्ये पोकळी राहत असेल तर ती भरून काढण्यासाठी वापरण्यात येणारे धातूचे ठोकळे.
**बृहत् योजना** विकसनशील उद्योगधंदा किंवा शहर यांच्यासाठी तयार केलेली योजना; (इं.) मास्टरप्लॅन.
**बृहदक्ष** पु. १. दीर्घवर्तुळाचा मध्य व दोन्ही केंद्रे यांतून जाणारा मोठा व्यास. २. (फ.ज्यो.) ग्रहांच्या सूर्याभोवतीच्या दीर्घवर्तुळाकार परिभ्रमणकक्षेचा व्यास.
**बृहन्महाराष्ट्र** पु. सलग मराठी भाषा प्रचलित असणाऱ्या प्रदेशापलीकडील, पण महाराष्ट्रीयांची वस्ती असलेला प्रदेश.
**बृहल्लुब्धक** पु. मृगनक्षत्राच्या दक्षिणेला असलेला सर्वांत मोठा तारा; मृगव्याध. [सं.]
**बृहस्पती** पु. १. देवांचा गुरू. २. नवग्रहांपैकी पाचवा, गुरू हा ग्रह. ३. (ल.) उत्तम वक्ता; विद्वान. ४. (ल.) मूर्ख. [सं.] (वा.) **बोलून बृहस्पती–** मूर्खपणाची व बाष्कळ बडबड करणारा.
**बे** वि. दोन. याचा उपयोग फक्त पाढ्यांत किंवा संख्यावाचक शब्दांना जोडून समासात होतो. [हिं.]
**बे** शअ. वाचून; विरहित; अभाव दाखवणारा उपसर्ग. याचा फार्शी किंवा हिंदी शब्दांशी समास होतो व हा शब्द नेहमी पूर्वपद असतो. [फा.बी; हिं.बिन; सं.विना]
**बे, अबे** संबोधन अरे ! हे ! ए ! (आज्ञार्थी किंवा बेपर्वाई दाखवताना योजतात.) [हिं.]
**बेअकली, बेअक्कल** वि. मूर्ख; बेवकूफ. [फा.बी+अक्ल]
**बेअदब–बी** स्त्री. १.अपमान; असभ्यपणा; अमर्यादा; अनादर.२. हरामखोरी; निष्ठा नसणे. [फा.बी+अदबी]
**बेअब्रू** स्त्री. दुर्लौकिक; अपकीर्ती; फजिती. [फा.बी+आब्रू]
**बेइज्जत–ती** स्त्री. अप्रतिष्ठा. [फा.]
**बेइमान–नी** वि. कृतघ्न; अप्रामाणिक; बेभरवशाचा. [फा.बी+ईमान]
**बेइमानी, बेईमानकी** स्त्री. खोटेपणा; अप्रामाणिकता; कृतघ्नपणा; विश्वासघातकीपणा.
**बेक** न. विरोध; निषेध. एक या शब्दावरून झालेला त्या शब्दाच्या उच्चाराला जुळता परंतु अर्थाने त्याविरुद्ध असा शब्द. आपण जे बोलतो त्याविरुद्ध, विसंगत असा दुसऱ्याने घेतलेला अर्थ. [सं.द्विक]
**बेकटा** पु. ओलावून टरफल काढलेला दाणा (गव्हाचा, जोंधळ्याचा).
**बेकदर** क्रिवि. निर्धास्तपणे. [हिं.]
**बेकनाट** पु. व्याजबट्टा करणारा. (को.) [वै.सं.]
**बेकरार** वि. व्याकूळ, बेचैन (झालेला). [हिं.]
**बेकरारी** स्त्री. १. अनिश्चिती; तहमोड : 'त्याजकडून बेकरारीच्या चाली सुरू होतात.'– मइसा ७.१९. २. व्याकुळता.
**बेकस** वि. नि:सत्त्व; कमजोर; बेचव; शुष्क.
**बेकानू** स्त्री. अन्याय; जुलूम.
**बेकानून** वि. बेकायदेशीर. [फा.]
**बेकायदा** पु. कायदेभंग; कायद्यासंबंधीचा अभाव.
**बेकायदा, बेकायदेशीर** वि. नियमबाह्य; गैरकायदेशीर; जुलमी; नियमांचे उल्लंघन करणारा; कायद्याचा भंग करून केलेले. [फा.बी+काइदा]
**बेकार** वि. १. निरुद्योगी; रिकामा. २. निरर्थक; व्यर्थ; उगाच. (व.) ३. (ल.) हैराण; निरुपयोगी. [फा.]
**बेकारचावडी** स्त्री. रिकामपणाच्या, निरर्थक गप्पागोष्टी. (को.)
**बेकारी** स्त्री. रिकामपणा; निरुद्योगिता. [फा.बीकारी]
**बेकारी भत्ता** काम करण्याची इच्छा असूनही ते मिळत नाही अशा वेळी दिला जाणारा भत्ता.
**बेकि(खि)लाफ** पु. मैत्री; सख्य; संशयनिवारण. [अर.खिलाफ]
**बेकी** स्त्री. १. समसंख्या; एकीबेकीच्या खेळातील एक शब्द. २. दुही; तंटा; भांडण. ३. शाळेतील लहान मुले शौचाला जाण्यासाठी परवानगी विचारताना हा शब्द योजीत.
**बेकैद** स्त्री. शिस्तीचा अभाव; स्वैर वर्तन; अव्यवस्थितपणा; कायदा, नियम व शिस्त यांचे उल्लंघन.
वि. बेशिस्त; स्वैर; अनियंत्रित.
क्रिवि. स्वैरपणाने; कोणताही कायदा, नियम न पाळता.
**बेखबर** क्रिवि. असावधपणे; गाफीलपणे. [फा.बी+खबर]
**बेखर्च–र्ची** वि. १. खर्च केल्याशिवाय झालेले, केलेले; फुकटफाकट. २. खर्ची जवळ नाही असा; निर्धन; कृपण. [फा.बी+खर्च]
**बेखल** वि. निर्धास्तपणे; विनाहरकत : 'चाकरीची सरबरा ठेवाल तों पावतों जहागीर बेखल चालेल.'– भाममंब १६.
**बेखातरी** स्त्री. अविचार : 'चार कोटींची मालियत जवळ असतां कंजूषपणाने सर्दारास बेखातरीनें निरोप दिल्हा'– जोरा १०९.
**बेखांद–दे** स्त्री. न. लहान मेढ. (कर.)
**बेग** स्त्री. १. लगाम. २. नियंत्रित सत्ता; अधिकार; हुकमत. (क्रि. धरणे, हाती राखणे, स्वाधीन असणे.) ३. (सोनारी) बिजागर. [सं.वागा; क.बिगी; हिं.बाग]
**बे(बें)गड** स्त्री. जस्ताचा अतिशय पातळ व रंगवलेला चकचकीत पत्रा; वर्ख. [क. बेगडे]
**बेगड** पु. चमकणारा, प्रकाशकिरण परावर्तित करणारा कागदाचा एक प्रकार. (अहि.)
**बेगडा** पु. सोबती.– शर.
**बेगडी** स्त्री. मातीची घागर : 'गुर्जर स्त्रिया डोक्यावरून हात न लावतां तीन तीन बेगडी घेऊन रस्त्यानें बोलत जात असतात.'– शिं आत्म ३२०.
**बेगडी** वि. १. बेगड लावलेला; बेगड लावून सुशोभित किंवा भपकेदार

केलेला. २. (ल.) दिसण्यात भपकेदार पण आतून हलका; पोकळ; नकली; दिखाऊ; तकलादी. ३. (ल.) खोटा; ढोंगी.(वा.) **० वळणे** – शक्तिहीन होणे.

**बेगनी** स्त्री. विरले (इरले) वगैरे उचलण्याकरिता लावण्याचे लाकूड. (व.)

**बेगम** स्त्री. १. अविवाहित स्त्री; वयात आलेली कुवार स्त्री. २. सरदारपत्नी; राणी; सन्मान्य गृहस्थाची पत्नी. [तुर्की]

**बेग(ज)मी** स्त्री. १. निश्चिती; लागणाऱ्या वस्तूंचा पुरवठा असल्याने होणारे समाधान. २. पुरवठा; संग्रह; साठा (विशेषत: धान्याचा).[हिं.]

**बेगवटा** पु. पोट : 'परिमळ गगणा चित्रें बेगवटे। माजि माझे ना।'– शिव ७६९.

**बेगार–री** पहा : **बिगार–री**

**बेगुमान–नी** वि. बेपर्वा; गर्विष्ठ; उन्मत्त; बेमुर्वत. [फा.बेगुमान्]

**बेगे** न. खिडकी; गवाक्ष; द्वार : 'तंव ब्रह्मस्थानीचें बेगें। फिटले सहजे।'– ज्ञा ६.२७९.

**बेगोंद** वि. गोंद न लावलेले; न चिकटवलेले; बंद न केलेले (पत्र).

**बेच** न. पानात फुटलेले पान : 'जिव्हे आर्तींची असोसें। निघती बेचें।'– ज्ञा १५.१०३.

**बेचक–की, बेचक(कु)ळी, बेचकुळे, बेचकूल–ळ, बेचके, बेचंगळ, बेचांगळे** न. स्त्री. १. झाडाच्या दोन फांद्यांच्या मधली जागा; दुबेळके; डेळके; बेळकी–के. २. हाताच्या किंवा पायाच्या दोन बोटांतील अंतर, जागा. ३. गुडघा, कंबर, हात, मान यांच्या बाकाच्या किंवा लवणीच्यामधील जागा, अंतर. ४. नदीमुखप्रदेश; नदीच्या मुखाजवळील त्रिकोणी प्रदेश; (इं.) डेल्टा. ५. (ल.) अडचणीची स्थिती. [क.बेळे]

**बेचण–णे–न** न. विक्री. (क्रि. करणे) [सं.विक्रय; हिं.]

**बेचणपत्र** न. विक्रीखत; विक्रीचा दस्तऐवज. [हिं.बेचन+सं.पत्र]

**बेचतुर** वि. मूर्ख.

**बेचनी** स्त्री. झाडांच्या फांद्या फळांच्या भाराने झुकून मोडू नयेत म्हणून दिलेला टेकू.

**बेचरक** क्रिवि. निर्भयपणे; धडाक्याने; निर्भीडपणे; बेधडक.

**बेचरणे** अक्रि. १. (खरूज, नायटा, इसब इ.) पसरणे. २. केस विस्कटणे. [सं.वि+चर्]

**बेचव** वि. रुचिहीन; कवकवीत; नीरस.

**बेचाड–ट, बेचळ** न. जुंबाड; झुबका : 'मग आणियांचें बेंचळ। अर्धी दावी।'– ज्ञा १५.९३.

**बेचावण–न, बेचन** स्त्री. विक्री योग्य रीतीने झाल्याबद्दलचा शेरा किंवा नोंद; नियमाला धरून खरेदी–विक्री झाल्याचा लेख. असा शेरा हुंडी, करारनामा, मक्तेपत्र, खत इ. वर मारतात. [हिं.बेचना]

**बेचाळीस, बेचाळ** वि. ४२ ही संख्या. [सं.द्विचत्वारिंशत्]

**बेचाळीस** पु. अव. बेचाळीस पिढ्या (मातृवंशाकडील एकवीस व पितृवंशाकडील एकवीस). (वा.) **०उद्धरणे–** एखाद्याच्या बेचाळीस पिढ्यांना उद्देशून शिव्या देणे. **(कागद, पत्र, लखोटा इ. वर) बेचाळीसचा अंक असणे –** पत्रात मृत्यूची बातमी असणे. **बेचाळीसचा अंक घालणे–** १. बेचाळीस पिढ्यांना शिव्या देणे. २. (पत्रावर इ.) बेचाळिसाचा आकडा लिहिणे (पत्र ज्याच्या नावाने असेल त्यानेच ते उघडावे हे सुचवण्यासाठी.

**बेचाळे–ळी–ळ** न. स्त्री. १. जबडा; तोंडाच्या चर्वण करण्याच्या दोन भागांपैकी खालचा भाग. २. हनुवटी व खालचा ओठ यांमधील खळगा.

**बेचिराख** वि. (जेथे एकही दिवा लागत नाही असे) ओसाड; उद्ध्वस्त; वस्तीरहित; उजाड. [फा.बे+चिराघ्]

**बेचूक** वि. बिनचूक; बरोबर; चुका केल्याशिवाय. [फा.बी+हिं.चूक]

**बेचैन** वि. अस्वस्थ; काहीही सुचत नाही असा. [फा.बी+हिं.चैन]

**बेछूट** वि. आळा, बंध नसणारा; स्वैर; स्वच्छंदी.
क्रिवि. १. विचार न करता; एकदम. २. सूट, मोकळीक न देता.

**बेजबाबदार** वि. स्वत:वरची जोखीम न ओळखणारा; स्वैर वागणारा.

**बेजबाबी** वि. १. उद्धट; उर्मट; बेमुर्वतखोर. २. तासाचे ठोके न देणारे (घड्याळ). [फा.बी+जबाब्]

**बेजवी** वि. व्यर्थ.

**बेजात** वि. (अशिष्ट) हलक्या किंवा निराळ्या जातीचा.

**बेजान** वि. निर्जीव; मृत. [फा.]

**बेजाब** वि. बेगुमान; बेमुलाहिजा; बेजबाबदार. [फा.]

**बेजाबता** पु. अन्याय; ठरावाविरुद्ध गोष्ट; अविचारी भाषा : 'आम्ही टोंचून घेणार नाहीं, असेना असे मरून जाऊं असे बेजाबता बोलत होते.'– टिळकचरित्र, खंड १.

**बेजार** वि. १. हैराण; त्रस्त; दमलेला; थकलेला. २. दुखण्याने हैराण झालेला; दुखणाईत. [फा. बीझार्]

**बेजारी** स्त्री. थकवा; हैराणी; त्रास.

**बेजे–झे** न. १. युक्ती; वर्म : 'चुकलयां त्यागाचें बेंझें।'– माज्ञा १८.१३४. २. दुबेळके; फाटक.

**बेजोर** क्रिवि. जोराने; जोरावारीने. [फा.बी+झोर्]

**बेज्या** वि. अनुचित; अयोग्य : 'कांहीं बेज्या हरकत त्यापासून अबलात आल्यावर श्रीमंत स्वामीस विनंती करू.'– पेद २०.९२.[फा.बेजाह]

**बेझोर** पु. हा दगड काही प्राण्यांच्या शरीरात (विशेषत: इराणी रानबकऱ्यांच्या शरीरात) सापडतो. हाडापासूनही कृत्रिम बेझोर तयार करतात. बकरा, उंट, मासा, साप यांपैकी ज्याच्या शरीरात सापडला असेल त्याप्रमाणे हा खडा विविध प्रकारचा असतो. सर्पाच्या शरीरात सापडलेल्या खड्याला सर्पमणी म्हणतात. खरा पौरस्त्य बेझोर अंडाकृती व अक्रोडाहून लहान असतो. हा गुळगुळीत व चकचकीत असून थरांचा बनलेला असतो. हा सर्व ओलावा आकर्षून घेतो. यावरून याच्या अंगी विष उतरण्याचा धर्म आहे अशी समजूत आहे.'– ज्ञाको (ब)१५९.

**बेट** न. १. सर्व बाजूंनी पाण्याने वेढलेली जमीन; द्वीप. २. एकाच प्रकारच्या झाडांचा समुदाय; जूट; जुंबाड. ३. ज्या झाडांच्या मुळ्यांना अंकुर फुटून अनेक झाडे होतात असा केळी, वेळू, दर्भ यांचा समुदाय. ४. (ल.) (मित्र किंवा नातलगांचा) समुदाय. [सं.द्वीप; क.ब्यट्ट; सिं.बेटु]

**बेटका** पु. बेकटा; ओलावलेला गहू, जोंधळा.

**बेटकुळी** स्त्री. १. (वयाने किंवा आकाराने) लहान बेडकी. २. दंड किंवा

पायाच्या पिंडरीतील स्नायूंच्या आकुंचनामुळे येणारा गोळा. ३. बेटकुळीप्रमाणे उड्या मारण्याचा मुलांचा एक खेळ.- मखेपु पृ. १३९.

**बेटणी** स्त्री. १. ठसा उमटवण्याची क्रिया. २. सोन्याची आवटी.

**बेटणे, बेटमोरा** न. पु. सोनाराची आवटी.

**बेटणे** उक्रि. दागिना, पत्रा यांवर शिक्का, ठसा, छाप उठवणे; आवटीवरील ठसा धातूच्या पत्र्यावर उमटवण्यासाठी तो आवटीवर ठोकणे.

**बेटवनी** स्त्री. (सांकेतिक) कुऱ्हाड. (कैकाडी)

**बेटव्याचे देणे** आंग्रे यांनी बांधून दिलेल्या गलबतावर बसवलेली भाड्यासारखी जकात.- आंघइ.

**बेटा-टी** पु. स्त्री. १. मुलगा-गी; पुत्र-त्री; छोकरा-री. २. पादपूरणार्थक शब्द. उदा. काय बेटा घोडा चांगला आहे ! [हिं.]

**बेटाड** न. १. बेट याचे तुच्छतादर्शक रूप. २. मुळ्यांचे जुंबाड; मुळे व तंतू यांचा गुंता. ३. (शेतातील किंवा मैदानावरील) तोडलेला, अलग ठेवलेला, उंचवट्याचा भाग. ४. (ल.) मोठे व लांबवर विस्तार पावलेले घराणे, टोळी, संघ; जमाव; गर्दी.

**बेटीव** वि. शिक्का, छाप मारलेला; ठसा उठवलेला; आवटीवर किंवा बेटणीवर ठोकलेला. याउलट थळीव.

**बेठण** न. कापडाच्या गाठीभोवती गुंडाळलेले वस्त्र; बस्ता. [सं.वेष्टन]

**बेठी** न. अर्धवट पिकलेले फळ.

**बेठे शीत, बेठे-ठा भात** पेज न काढता केलेला भात. (गोव्याकडे भाताचे तांदूळ शिजल्यावर सर्व पाणी काढून टाकतात.) (गो.)

**बेडका** पु. बडका; खाकरा; थुंकलेला कफ.

**बेडका** न. एकत्र बांधलेले दोन असोले नारळ; नारळांची सांगड. (कु.)

**बेडका बेडका पाय धर** मुलींचा एक खेळ.- मखेपु पृ. २८१.

**बेडकी** स्त्री. १. पहा : **बेटकुळी** १,२. २. दंड किंवा पाय यांमधील स्नायूच्या आकुंचनामुळे स्पष्ट दिसणारा गोळा; अंगठ्याच्या मुळाचा मांसल भाग. ४. घोड्याच्या पायाची गाठ.

**बेडकी** स्त्री. एक औषधी वनस्पती. हिचा पाला बहुमूत्रतेवर उपयुक्त.

**बेडकीचे कुलूप** एक प्रकारचे कुलूप. याउलट नळीचे कुलूप.

**बेडग-गे** न. लहान-लहान झुडपे तोडण्याचे हत्यार. (माण.)

**बेडगा** पु. दोन फाटे असलेले लाकूड पुरून केलेली शेताच्या कुंपणातील वाट; दुबेळके; बेडे. यातून फक्त माणसालाच जाता येते.

**बेडदोरी** स्त्री. (भरतकाम) वेणीप्रमाणे विणलेला जरतारी बंद.

**बेडनी** स्त्री. आंबे तोडण्याची खुडणी. (अहि.)

**बेडर** न. ड्रेडनॉट नावाचे जंगी लढाऊ जहाज.
वि. न भिणारा; न डरणारा. [हिं.डर]

**बेडा** पु. १. रोठा; पूर्ण तयार झालेली सुपारी; असोली सुपारी. २. बेडे; गोठा. (को.)[हिं.] (वा.) **०पार असणे, करणे, जाणे, होणे-** ध्येयप्राप्ती करून घेणे; स्वतःचे हेतू सिद्धीला नेणे.

**बेडा** पु. १. पहा : १ **बेहडा** : 'त्याचे जातवार बेडे असत.'- शिंआ ३००. २. लष्करी लोकांचे पथक.

**बेडा** पु. बांधकामात दोन दगडांमध्ये बसवलेला दगडाचा लहान तुकडा.

**बेडा** पु. अर्धवट राहिलेले काम. (अहि.)

**बेडा** पु. १. वर्षाची ठरावीक देणगी. (गो.) २. परिवार; समुदाय; गावांचा, जहाजांचा समूह. (ना.) [सं.]

**बेडी** स्त्री. सुकी सुपारी. (गो.)

**बेडी** स्त्री. नौका; जलयान : 'नावा होडी बेडिया जंगे विस्तीर्ण।'- नरुस्व ७२०.

**बेडी** स्त्री. १. शृंखला; साखळी; हातापायांतले बंधन. २. एक चांदीचा दागिना; पायात घालण्याचे चांदीचे कडे. ३. हातकडी; हातखोडा. ४. (ल.) बंधन; लोढणे; ओझे; ब्याद; लचांड.(लग्नानंतर पत्नीचे पतीवर जन्मभर ओझे राहते यावरून ल.) पत्नी; बायको. ५. फास; कैचीत अडकवल्याची अवस्था. (अहि.)[क.बेडि; हिं.] (वा.) रुपेरी बेडी - नोकरी.

**बेडीसुळी** स्त्री. घोड्याचे पुढील पायावर गुडघ्यावर गोम असणे. (माण.) [हिं.]

**बेडूक** पु. गोड्या पाण्यात राहणारा,उभयचर प्राणी. अंग गार व गिळगिळीत, आकाराने लहान, डोळे बटबटीत, जबडा मोठा, जीभ उलटी व ओठाच्या बाजूला चिकटलेली, रंग भोवतालच्या वस्तूंशी जमेल असा पालटणारा. डरांव डरांव असे ओरडतो. [सं.दर्दुर, मंडूक]

**बेडूकउड्या** स्त्री. अव. मुलांचा एक खेळ.- व्याज्ञा १.

**बेडे** न. १. गाईचा गोठा. (को.) २. बेळ-ळी; दुबेळके; कुंपणाच्या आत जाण्यासाठी केलेले दुबेळक्याचे दार; कुंपणातील वाट.

**बेडौल** वि. कुरूप; बेढब; घाट, आकार चांगला नसलेला.

**बेड्डा** पु. विविध धान्यांचे मिश्रण. (झाडी)

**बेड्डी** स्त्री. १. बैलाच्या गळ्यातला पट्टा. २. भातावरील एक रोग. (झाडी)

**बेड्या, बेरड्या** स्त्री. अव. जोत्या-ती; जुंपण्या (बैलांना जुवाला जोडण्याकरता). (व.,कुण.)

**बेढब** पहा : **बेडौल**

**बेढंग** पु. दुराचरण; स्वैराचार; बेताल वागणूक; सोदेगिरी. [हिं.]

**बेणका** पु. मोटवणाच्या दोन्ही बुटलीत, बाहुलीत बसवलेला लाकडी तुकडा, काटूक.

**बेणणी** स्त्री. तण काढण्याची, बेणण्याची क्रिया; शेतातील अगर अंगणातील गवत उपटून टाकण्याचे काम; निंदणी; भांगलणी.

**बेणणे** सक्रि. १. शेतातील निरुपयोगी गवत काढणे; भांगलणे. २. (द. भारत) बी पेरणे.

**बेणा-णी-णे** वि. उघडा; दिसू लागलेला; वरील आच्छादन दूर केल्यामुळे दिसणारा. (क्रि. पडणे) [फा.बीना]

**बेणारी** पु. पंढरीच्या विठोबाच्या पूजेच्या वेळी मंत्र म्हणून कलशपूजा घेणारा इसम.- शर.

**बेणावणे** अक्रि. अदृश्य झालेला, लपलेला मनुष्य पुन्हा दिसू लागणे.

**बेणे-णं** न. बियाणे; पेरण्याचे बी; बियाणे पेरण्यासाठी केलेले रताळे, आले, बटाटा, नागवेल यांचे करतात ते तुकडे.

**बेणे** न. दरवाजाच्या फळीला मजबुतीकरता मारलेली आडवी पट्टी. (खा.)

**बेत** पु. १. योजना; रचना; नमुना; युक्ती. २. कारण; उद्देश; हेतू; मसलत. ३. पद्धत; रीत; व्यवस्था; मांडणी; टापटीप. ४. रूप; आकार; रूपरेषा;

वळण; आराखडा. [सं.हेतु; हिं.]

**बेत** न. उन्माद; प्रेमातिरेक. [क.;मल्याळी बेट = कामेच्छा]

**बेत** पु.वेताची छडी; वेत. [सं.वेतस्]

**बेतणे** अक्रि. १. जवळ येऊन ठेपणे; अगदी जवळ येणे. २. गुदरणे, कोसळणे (संकट, धोका, कर्तव्य, पेच इ.). ३. (लढाई, भांडण, वाद इ.) सुरू होणे. ४. घडणे; होणे; घडून येणे (अनिष्ट गोष्ट, वृत्तांत इ.). ५. ठसणे; बिंबणे (मन, अंत:करण; भावना इ.वर). ६. गोट्या व कवड्या यांच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द. [सं.वृत्; हिं.बीतना]

**बेतणे** सक्रि. माप घेणे व कापणे (अंगात घालण्याच्या कपड्यांसाठी).

**बेतनीचा** वि. जमणारा; (मापाने, बनावटीने इ.) जुळणारा.

**बेतमा** स्त्री. १. निर्लोभी वृत्ती. २. बेफिकीरपणा; बेपर्वाई; उदासीनता.

वि. १. निर्लोभी; निरिच्छ. २. बेपर्वा; बेगुमान; गर्विष्ठ; बेसावध; काळजी, कळकळ न बाळगणारा.

क्रिवि. बेगुमानपणे. [फा.]

**बेतमीज** वि. उद्धट; असभ्य. (ना.) [फा.बे+तमीज]

**बेताब** वि. असमर्थ; क्षीण; हतधैर्य. [फा.बी+ताब्]

**बेताल** वि. १. तालाला सोडून असलेले (गाणे-बजावणे). २. ताल सोडून गाणारा, वाजवणारा. ३. (ल.) अमर्याद; अनियंत्रित; स्वैर; उधळ्या. [हिं.]

**बेताळ** पु. तामसी देवता; भुतांचा राजा; वेताळ. (को.)

**बेताळामण** पु. (व्यापार.) एक माप. या मणाचे वजन १५६८ सुर्ती रुपये असते. - मुंव्या १०२.

**बेती,बेतीन** स्त्री. सोंगट्यांच्या खेळातील एक दान. दुफाशी खेळात दोन्ही फाशांवर तीन-तीन (प्रत्यक्ष दोन-दोन) पडणे : 'बाई बे तीन बोलली।'- ऐपो ३३.

**बेतीन** न. कोकणी ख्रिश्चन लोक गळ्यात बांधतात तो कापडाचा चौकोनी तुकडा.

**बेतुम** पु. काचा घट्ट बसवण्यासाठी केलेला रांधा; लांबी. (गो.)[पोर्तु.]

**बेतो** पु. साधी पेटी. (गो.)

**बेथु-थू** वि. दांडगा; आडदांड; जवान; बळकट : 'वरी भीमसेन बेथु। तो जाहला असे सेनानाथु।'- ज्ञा १.१२०. [सं.वयस्य]

**बेथूड** वि. कुरूप; विद्रुप; वेडावाकडा; ओबडधोबड.

**बेदखल** वि. १. अधिकारच्युत. २. गैरमाहीत. [फा.बी+दख़्ल]

**बेदड-डा** पु. सैन्याबरोबर असलेली लुटारू जात; चोरीचा धंदा करणारी एक जात : 'बेदड घालिती छापे वाट चालेना तिळभर।'- ऐपो १२१.

**बेदम** वि. क्रिवि. १. दम कोंडला जाईपर्यंत, निपचित पडेपर्यंत दिलेला (मार). २.थकलेला; दमलेला. [फा.]

**बेदरी** वि. बेदर या गावी बनवलेली, त्या गावासंबंधीची (पिकदाणी, गुडगुडीचा पेला व लोखंडी वस्तू इ.).

**बेदर्द, बेदर्दी** वि. १. बेफिकीर; बेगुमान; मागेपुढे न पाहणारा; भय न बाळगता स्वच्छंदपणे वागणारा. २. बारीकसारीक विचार न करणारा. ३. निर्घृण; क्रूर; दया नसलेला. [फा.]

**बेदस्तूर** पु. अन्याय; नियमरहित गोष्ट. [फा.]

**बेदस्तूराई** स्त्री. उधळेपणा. (गो.) [फा.]

**बेदाडी** स्त्री. शौचासाठी राखीव पटांगण. (झाडी)

**बेदाणा-ना** पु. १. बिनबियांचे, लहान, गोल, गोड द्राक्ष. २. सुकवलेले द्राक्ष; किसमिस. [फा.बे+दान]

**बेदाद** स्त्री. बेबंदशाही; अन्याय; जुलूम. [फा.]

**बेदावा** पु. सोडचिठ्ठी; नामागणी; हक्क सोडणे.

**बेदावा पत्र, फारखती** हक्कसोडपत्र; हक्क नसल्याविषयी लिहून दिलेला कागद.

**बेदिली** स्त्री. १. असंतुष्टी; औदासीन्य; निरुत्साह. २. रुष्टता; मनाचा बेबनाव.

**बेदुवा** स्त्री. अवकृपा; शाप. [अर.]

**बेधडक** क्रिवि. बिनधोक; निर्धास्तपणे; निर्भय; बेलाशक. [हिं.]

**बेना** पु. बयाणा; सौदा.

वि. उघड; स्पष्ट.- शर.

**बेने-इस्रायल** पु. मुंबईतील ज्यूधर्मीय जात व व्यक्ती.

**बेपटी** स्त्री. बोळ. (व.)

**बेपडदा** वि. १. पडदा नसलेला; उघडपणे; कोणतीही गुप्तता न राखता. २. (ल.) मानखंडित; अपमानित. क्वचित् नामाप्रमाणे उपयोग.

पु. १. उघड गोष्ट. २. (ल.) मानखंडना. [फा.बेपर्दा]

**बेपरवा** पु. मोत्याचे सर एकत्र करून केलेला, डोक्याला एका बाजूला घालण्याचा बायकांचा दागिना.

**बेपर्वा** वि. निष्काळजी; निर्भय; बेगुमान. [फा.]

**बेपाया** वि. गैरकायदा; नियमाविरुद्ध.

**बेफाट** वि. १. अफाट; भयंकर; अतिशय मोठे; विस्तृत : 'भाऊजी लक्षुमना। पोटी तुमच्या कपट। नोहे माहेरची वाट। बघत घावडणें बेफाट।।'- वलो ११. २. अत्यंत चांगले; अवर्णनीय.

**बेफाटी** स्त्री. बेळी. (व.) पहा : **बेडे**

**बेफाम** वि. १. बेसावध; बेशुद्ध. २. गाफील; मस्त; तुफान; अनावर; बेभान. [फा.बे+फहम्]

**बेफांदी** वि. १. व्यसनी; दुराचारी; स्वैर. २. खट्याळ; उच्छृंखल; खोडकर (मूल).

**बेफिकीर-री** स्त्री. निष्काळजीपणा. [फा.बी+फिक्र]

**बेफिकीर** वि. १. पहा : **बेपर्वा**. २. पहा : **बेफाम** २

**बेबकांचा खेळ** भाकरीचा खेळ. (गो.)

**बेबकी** स्त्री. बेडकी. (गो.)

**बेबदो** पु. दारूबाज. (गो.)

**बेबनाव** पु. भांडण; तंटा; तेढ; बिघाड.

**बेबल** न. सुताराचे एक हत्यार. (कु.)

**बेबली** स्त्री. एक फळझाड.

**बेबले** न. बेबलीचे फळ.

**बेबहार** वि. बहारदार; बहारीचा; सुंदर : 'बेबहार गुलाबी तरू भोती सरू चंपक मोगरा।'- पला ४.२२. [फा.]

**बे(बें)ळ-ल-ळे** वि. १. ढिला; नि:शक्त; लुळा; निर्जीव. २. विव्हळ;

क्षीण : 'तेथ बेंबळ हातु गेला । गांडिवाचा ।'- ज्ञा १.१९७. [सं.विव्हल]

**बेबंदशाही-ई** स्त्री. १. अव्यवस्था; बंदोबस्त, कायदा, शिस्त इ. नसलेली अवस्था; अराजकता; अंदाधुंदी; गोंधळ; मोगलाई. २. जुलूम.

**बेबा** पु. एक प्रकारचे फुलपाखरू.

**बेबाक** वि. निर्भीड; बेडर. [फा.]

**बेबावचे** सक्रि. भिववणे; भीती दाखवणे. (गो.)

**बेबी** स्त्री. लहान मुलगी; कुकुबाळ; लेकरू. [इं.]

**बेबुदी** स्त्री. बेगमी; साठा; संग्रह. [फा.बिहबूद]

**बेबुदी-बूद** स्त्री. १. नाश; खराबी; अभाव. २. नाबूद. [फा.]

**बेबुनियाद** स्त्री. अन्याय; राखरांगोळी; नाश. [फा.बी+बुनियाद]

**बेबूज** वि. अज्ञानी; अडाणी; निर्बुद्ध : 'परंतु लौकिकीं शिवाजीचा नातू खिजमतगारी करितो, तुझी अप्रतिष्ठा, मी बेबूज असें होऊन दोघांचा दुर्लौकिक होईल.'- शामब भारतवर्ष १८.

**बेबे-बो** पु. बेडूक. (गो.)

**बेबेरी** स्त्री. (गंजिफांचा खेळ) डावाची पाने वाटून झाल्यावर एखाद्याला सुर्ख्या अथवा राजा आला नसेल (व कोणास पाने देणे नसेल) तर तो डाव न खेळता पुन्हा गल्लत करून पाने वाटणे.

**बेबेंवचे** सक्रि. झोपेत बरळणे. (गो.) [ध्व.]

**बेभरवसा, बेभरोसा** पु. अविश्वास; संशय; खात्री नसणे. [हिं.]

**बेभरोशी, बेभरवशी** वि. खात्री किंवा भरवसा अगर विश्वास ठेवता येणार नाही असा; फसव्या.

**बेभान** पहा : **बेफाम**

**बेमर्जी** स्त्री. इतराजी; अवकृपा; मर्जीविरुद्ध वर्तन. [फा.]

**बेमार** वि. १. मार किंवा हल्ला करता न येण्यासारखा (किल्ला). २. अतिशय; कमालीचा; जोरदार; विपुल; भरपूर; बेसुमार इ. ३. आजारी; दुखणाईत. ४. थकलेला; दमलेला; बिमार. ५. वस्ती नसलेले, उपयोगात नसलेले (घर, वास्तू). [फा.]

**बेमारी** स्त्री. १. आजार; आजारपण; दुखणे. २. शीणभाग; थकवा; अशक्तता.

**बेमालूम** वि. माहीत न होण्याजोगे; दिसणार नाही, शोधता येणार नाही असे; ओळखण्यास कठीण; हुबेहूब. [हिं.]

**बेमुर्वत** क्रिवि. असभ्यपणे; शिष्टाचाराला सोडून; भीड, पर्वा इ. न बाळगता. [फा.]

**बेमुलाहिजा** क्रिवि. काही न पाहता; दयामाया सोडून; निष्ठुरपणे; बेमुर्वतपणे. [फा.बी+अर.मुलाइझा]

**बेर** पु. एक प्रकारचे जाडेभरडे गवत. (आगरी, को.)

**बेर, बेरणी** स्त्री. दुसरी नांगरणी; उखळणी. (राजा.)

**बेर** न. पाभरीच्या नळीचे धान्य पडण्याचे जमिनीजवळचे भोक. (माण.)

**बेर** स्त्री. बांगडी. (व.)

**बेरकट** न. १. वाईट व बेरीमुळे घट्ट झालेले तेल किंवा तूप. २. बेरी. वि. बेरी, रेंदा, मळ असणारे (तेल, तूप).

**बेरकट** वि. बहिरट; कमी ऐकू येत असलेला.

**बेरकटणे** अक्रि. (समई, दिवा, तेलाचे भांडे इ.) तेला-तुपातील बेरीमुळे अस्वच्छ, चिकट होणे; भांडे, दिवा यांवर बेरी बसणे.

**बेरका-की** वि. १. लुच्चा; हुशार; चलाख; धूर्त. २. मिश्र बीजाचा. [क.बरिके]

**बेरकी** स्त्री. एक प्रकारचे गवत.

**बेरजून काढणे** वेचून काढणे. (बे.)

**बेरट** न. १. पहा : **बेरकट.** २. लोणचे. (खा.)

**बेरड** पु. धंदेवाईक लुटारू किंवा त्यांची जात; रामोशी; चोरी हा उपजीविकेचा धंदा असणारे लोक. यांची वस्ती कर्नाटकात अधिक आहे. [क.बेड्डु]

**बेरड** स्त्री. १. गोंधळ; मिश्रण. २. सबगोलंकार; पंचमेळ. ३. सटरफटर सामान.

**बेरडाई-व-वे, बेरडगिरी** स्त्री. न. बेरडांचा लुटारूपणा, पुंडाई.

**बेरडी** स्त्री. बैलाच्या गळ्यातील जोते, जुपणी.

**बेरडी** स्त्री. अलंकाररहित स्त्रीभक्त. - लोसाको. (ना.)

**बेरणे** अक्रि. १. पसरणे; फैलावणे; जिकडे-तिकडे होणे. २. आडवी नांगरट करणे.

**बेरसा** वि. दांडगा; विचारशून्य : 'बेरसा गाढव माय ना बहिण ।'- तुगा ४१२७.

**बेरहड्डी** स्त्री. घोड्याचा एक रोग; व्रण; हड्यावर्ण.- अश्वप २.२६१.

**बेरंग** न. तिकीट न लावलेले, नॉटपेड पत्र. (ना.)

**बेरंग** पु. (कार्यक्रमाचा) विचका; उत्साही वातावरणाचा विरस.

**बेरा** पु. पाभरीचे भोंक बुजणें. - चित्रकृषि २.७.

**बेरियम** न. आम्लारी मातीपासून मिळणारे धातुजन्य मूलद्रव्य. उपयोग : एक्सरे फिल्म तयार करण्यासाठी.

**बेरी** स्त्री. १. ओशट पदार्थातील, तेला-तुपातील मळ. २. गुळाची मळी.

**बेरीज** स्त्री. १. मिळवणी; निरनिराळ्या संख्या एकत्र करून झालेली संख्या; मिळवणूक; जमा. २. मिळवणी करण्याची क्रिया; दोन किंवा अधिक सजातीय संख्या एकत्र करणे. [फा.बरीज्; सं.भूरि; त.बूरी]

**बेरीजभरती** स्त्री. ठरावीक संख्या पूर्ण होण्यासाठी (भरण्यासाठी) केलेली भरती; इष्ट संख्या दाखवण्यासाठी लबाडीने घातलेली खोटी भर.

**बेरू** वि. खुनशी; मनात डाव धरणारा. (व.)

**बेरूख** पु. १. दुसरीकडे तोंड फिरवणे; दिशा बदलणे. २. प्रेमाचा अभाव. वि. अप्रसन्न; उदासीन; रुष्ट; विन्मुख. [फा.बी+रुख]

**बेरोजगार-री** वि. निरुद्योगी; बेकार; रिकामा. [फा.]

**बेरोजा** पु. एक औषधोपयोगी पदार्थ. [फा.फिरोजाह्]

**बेल** पु. १. एक वृक्ष. शंकराला हा प्रिय असल्याने पवित्र मानला जातो. याचे पान तीन दलांचे असून फळे, पाने, मुळ्या, साल औषधी आहेत. २. बेलाच्या झाडाचे पान. [सं.बिल्व] (वा.) ०**घालणे, वाटत फिरणे-** गावात विनाकारण भटकणे. (व.)
न. बेलफळ.

**बेल** पु. घोड्याला होणारा एक रोग.- अश्वप २.२९०.

**बेल** न. पिकाच्या दोन ओळी; रांगा. (व.)

**बेल(लं)** न. स्त्रियांच्या पायाच्या अंगठ्याजवळच्या बोटात असणारा

चांदीचा दागिना. (अहि.)

**बेलकडे** न. खेकडा; कर्कट. (को.)

**बेलका–के** पु. न. हळद, कुंकू इ. पदार्थ ठेवायला उपयोगी पडणारा पोखरलेला नारळ; बेले; बेला. (कु.)

**बेलकाचरी** स्त्री. कोवळ्या बेलफळाचे वाळवलेले कातळे, काप. (हे औषधी असते.)

**बेलखरूज** स्त्री. मोठे फोड येऊन चिखळते व मोठी चकंदळे पडतात अशी ओली खरूज.

**बेलगाम–मी** वि. १. लगाम नसलेला. २. लगामाला दाद न देणारा. ३. (ल.) अनियंत्रित; स्वैर; मोकाट; बेताल. (क्रि. पडणे, बनणे.) ४. आडवळणी; जाण्यायेण्यासाठी सोयीचे नसलेले; एकीकडे असलेले; गैरसोयीचे (शेत, घर).

क्रिवि. एकीकडे; एका बाजूला; आडरस्त्यावर. [फा.बे–लिगाम] (वा.) **०पडणे–** हयगय, आबाळ होणे.

**बेलचा** पु. पावड्यासारखे हत्यार, अवजार; विलायती पावडे; खोरे.

**बेलटे–टी** न. १. नारळ, बेलफळ यांतील गर काढून घेऊन केलेले पात्र; बेले; करटी; नरोटी. २. (ल. तुच्छतादर्शक) डोके. (को.)

**बेलणे** न. लाटणे. (व.) [हिं.बेलन]

**बेलतवस–से** स्त्री.–न. एक रानवेल व तिचे फळ.

**बेलतेल** न. जवसाचे उकळलेले तेल. [इं.बॉइल्ड+म.तेल]

**बेलदा** पु. समुद्रखेकडा. (कु.)

**बेलदार** पु. १. पाथरवट; खाणीतील दगड खणून काढणारा; खणत्या; दगड फोडणारा. कर्नाटकातील हा धंदा करणारी एक जात. २. मातीचे काम करणारा गवंडी. (व.) [फा.बेल्+दार]

**बेलपत्र** न. बेलाचे पान. (वा.) **(घरावर, मालावर इ.) ०ठेवणे–** (वस्तूवरचा) हक्क सोडणे.

**बेलपत्री रुपया** बेलाच्या पानाच्या छापाचा रुपया.

**बेलपानी टीक–टिका** स्त्रियांच्या गळ्यात घालण्याचा एक दागिना. या दागिन्यातील प्रत्येक पेटी बिल्वदलासारखी असते.

**बेलफळ** न. १. बेलाच्या झाडाचे फळ. २. बेलफळाच्या आकाराची किंवा फळाच्या कवचीची केलेली, तपकीर इ. ठेवण्याची पेटी, डबी इ.

**बेलफाटा** पु. लाकडाला फुटलेला दुसरा फाटा. (व.)

**बेल(लं)बडनं** काम खोळंबणे. (अहि.)

**बेलभंडार** पु. १. देवावरील बेल व भंडार हाताने उचलून करण्याचा शपथविधी. २. अशा रीतीने घेतलेली शपथ, देव साक्ष ठेवून घेतलेली आणभाक. (क्रि. काढणे, उचलणे.)

**बेलभाण** वि. दुरुस्त करता न येणारे. (गो.)

**बेलमांजर** न. स्त्री. रानमांजर. [सं. बृहत् मार्जार]

**बेलमेटल** न. तांबे व कथिल यांच्यापासून बनवलेला व घंटा, तास बनवण्यासाठी उपयोगी पडणारा संमिश्र धातू. [इं.]

**बेलवटी** स्त्री. कुंपण; बंधन; खीळ : 'आनंदे वोसंडिली सृष्टी। तेणें वाचेसि पडली बेलवटी।'– एभा ९.४२४.

**बेलवल** स्त्री. उंचवट्याची जमीन.

**बेलवात** स्त्री. तीन सुतांची पीळ घालून केलेली, चार बोटे लांबीची वात. ह्या एक लक्ष करून देवापुढे लावतात.

**बेलवांगे** न. टोमॅटोचे झाड व फळ.

**बेला** पु. डहू. पहा : २ **बेलटे** [हिं.] (वा.) **बेल्यात मडक्या भरणे–** गोंधळ, गडबड करणे; धुमाकूळ घालणे.

**बेला** पु. पैंजणासारखा पायातला दागिना.– लोसाको.

**बेला** पु. गोळा. उदा. चिंचेचे बेले.

**बे(बै–पे)ला** पु. १. ओझे उचलण्यासाठी एका काठीच्या मध्यावर बसवलेली एक लहान चौकट असलेले साधन. २. अशा साधनाने एका मनुष्याला पेलेल, वाहून नेता येईल इतके ओझे, (विशेषत:) कांटीचा भारा. ३. पोकळी.

**बेलाकसूर** वि. १. नि:शंक. २. अविचारी; साहसी.

क्रिवि. नि:शंकपणे; बेलाशक; बेधडक; अविचाराने. [अर.बिलाकुसूर]

**बेलाग** पु. निरुपायाची किंवा नाइलाजाची स्थिती.

वि. १. जिंकण्याला किंवा मारा करण्याला कठीण आहे असा; दु:साध्य; अवघड; बळकट; दुर्गम (किल्ला). २. दु:साध्य; दुराराध्य; अप्राप्य; आचरण्यास कठीण असा (विषय).३. सुधारण्याला कठीण.

क्रिवि. १. मदतीवाचून; उपायावाचून; निरुपायाने; नाइलाजाने. २. निराधार. ३. तडकाफडकी; ताबडतोब. [फा. बी + म. लागणे]

**बेलापुरी रुपया** बेलापूर येथे पाडलेल्या अंकुशी रुपयातील एक प्रकारचा रुपया.

**बेलाशक** क्रिवि. बेधडक; नि:शंकपणे; निष्काळजीपणे; निर्धास्तपणे; अविचाराने. [अर.]

**बेलिफ** पु. नाझरच्या हाताखालचा एक कामगार; समन्स लावणारा व बजावणारा शिपाई, कारकून. [इं.]

**बेलिया** पु. १. मोगऱ्याच्या जातीतील एक फुलझाड. २. त्या झाडाचे फूल. ३. त्या फुलापासून काढलेले तेल, अत्तर. [हिं.]

**बेली** स्त्री. १. करवंटी; नरोटी; नारळीपात्र. २. तांबड्या व काळसर सुताच्या चौकटी असलेले लुगडे. ३. चिकट गुळाची गुळपापडी, वडी.

**बेली–ल्या** वि. तांबड्या व काळ्या रंगाच्या सुताच्या चौकटी असलेले (लुगडे); तांबूस व काळसर तांबूस (रंग).

**बेली** पु. खेकड्याची जात. ही सर्वांत लहान असून डोंगरात अगर सपाटीवरही असते. ह्या जातीच्या खेकड्यांचा रंग पांढरा असतो.

**बेलुकांड** न. खेकडा; पहा : **बेलकडे** : 'तंव मार्गीं वन तें नवखंड। तेथोनि उसळलें बेलुकांड।'– भाराबाल १.७३.

**बेले** न. राजे इ. बडे लोक बाहेर निघाले म्हणजे धर्म करण्यासाठी सोबत घेत ती पैशाची पिशवी. [फा.बेला]

**बेले** न. पहा : **बेला**

**बेलेपटी** स्त्री. एक धर्मादाय स्वरूपाचा कर : 'त्यावरी तेच वख्ती बेलेपटीचे फर्मान सादर जाहाला.'– पेद ४९.३.

**बेलेबरदार** पु. पहा : १ **बेले**; अशी पिशवी जवळ बाळगणारा मनुष्य. [फा.]

**बेल्या** पु. एक वेल; म्हैसवेल.– मसाप ४५.४.

**बेल्ही** स्त्री. कोळपे; पिकातील गवत काढण्याचे हत्यार.

**बेल्ही** न. अव. नांगराचे तास; पाणी साचण्यासाठी नांगराने पाडलेले खोल चर.

**बेवकूफ–प** वि. मूर्ख; खुळसट; अजाण; अडाणी; अज्ञानी. [फा.बेवकूफ]

**बेवकूफी** स्त्री. मूर्खपणा; मूढता.

**बेवजे** स्त्री. गैरसोय; गैरव्यवस्था; विलक्षण प्रकार.

**बेवड** स्त्री. १. बीजांची भेसळ; मुख्य बियाण्याच्या बरोबर पेरलेले दुसरे बी; दुसऱ्या धान्यासोबत त्याच जागी पेरलेले उपधान्य. २. पीक चांगले येण्यासाठी वर्षाआड काढतात ते एक दुय्यम पीक. ३. ताग, उडीद, कारळे यांसारखे पीक करून ते जमिनीत गाडणे; जमिनीत सेंद्रिय द्रव्यांचा साठा वाढवणे.

**बेवडा** पु. देशी दारू.
वि. देशी दारूचे व्यसन असणारा.

**बेवतन** क्रिवि. हद्दपार; जलावतन. [अर.वतन]

**बेवतनं** सक्रि. १. माप, लांबी–रुंदी टिपणे. २. एकाचे दोन करून सांगणे. (अहि.)

**बेवत्** पु. कापड शिवण्याचे मोजमाप. (झाडी)

**बेवाट, बेवाटणे** न. ब्यें ब्यें असा आवाज करणे.– लोसाको.

**बेवाडे** न. रुंदीच्या बाजूला पोटमांडवणीपर्यंत भिंती चढवून काढलेला पोटमाळा; दुपाखी व चौपाखी यांच्या दरम्यानची छपराची रचना.

**बेवारशी–रीस** वि. ज्यावर कोणाचा हक्क, वारसा नाही असा; निवारशी; योग्य हक्कदार, मालक किंवा वारस नसलेला.

**बेवारसा** पु. वारसाहक्क, वारस नसणे.

**बेवारा** पु. कर्जफेड; कामकाज करून टाकणे; उलगडा; साठा, पैसा इ. चा निकाल लावणे. [हिं.]

**बेश** वि. चांगले; छान; योग्य; उत्तम; ठीक; युक्त.
क्रिवि. योग्य रीतीने; चुकीचे, वाईट नव्हे अशा रीतीने. [फा.]

**बेशक** वि. १. निर्धास्त; निःशंक; धीट. २. निर्लज्ज.
क्रिवि. निर्धास्तपणे; निर्लज्जपणे. [फा.बी+शक्]

**बेशखासा** वि. फार चांगले; उत्कृष्ट; अगदी योग्य. [फा.बेश+अर.खासा]

**बेशरम** वि. निर्लज्ज; पाजी; निलाजरा. [फा.बे+शर्म]

**बेशरम** न. पाश्चात्त्य देशातून आलेले एक झुडूप. कोणत्याही परिस्थितीत हे जगते व बेसुमार वाढते.(त्यावर हे नाव मिळाले.) फुले फिक्कट जांभळ्या रंगांची.

**बेशाक** न. स्त्री. शाकबेशाक (ह्या शब्दाबद्दल शब्द). (ग्रामीण)

**बेशिस्त** स्त्री. अव्यवस्था.
वि. गैरशिस्त; अव्यवस्थित; अनियमित. [फा.]

**बेशुद्ध** वि. बेसावध; (मूर्च्छा इ.मुळे) शुद्धीवर, भानावर नसणारा; अचेतन; जड. [फा.बी+सं.शुद्धी]

**बेष्ट** स्त्री. वाकुली. (ना.,व.)

**बेसक** न. स्थान; बैठक.

**बेसकट** न. (पावसाळ्यात केलेले तात्पुरते, काटेरी झुडपांचे) फाटक. (को.)

**बेसन** न. १. हरभऱ्याच्या डाळीचे पीठ. २. पिठले; झुणका. ३. हरभऱ्याच्या पिठाचे केलेले पक्वान्न, लाडू इ. [हिं.]

**बेसनतोरणे, बेसनसाखरवड्या** न. स्त्री. बेसनाची निरनिराळी पक्वान्ने.

**बेसनदी–द** वि. बेकायदेशीर; सनदरहित.

**बेसनेकड** न. रहाटगाड्याच्या सुळकुंब्याला मारलेले आडवे लाकूड.

**बेसबेरो** वि. अत्युत्तम. (गो.)

**बेसबॉल** पु. शंकरपाळ्यासारख्या आकाराचा चौरस जागेत बॅट व चेंडू यांनी खेळण्याचा खेळ. यात चेंडू मारणाऱ्याला चेंडू मारण्यासाठी चहूबाजूंना धावावे लागते.

**बेसमज** पु. गैरसमज. (ना.)
वि. अडाणी. [हिं.]

**बेसर** न. नाकातील एक अलंकार; नथ; चमकी; मोहरणी; बुलाख इ. : 'तेही बेसरयुक्त फार मिरवे त्या ओष्ठबिंबावरी।'– निमा १.२५. [हिं.]

**बेसराक** पु. तरुण उंट.

**बेसरे** न. बहिरी ससाणा.– सारुह ३.४७.

**बेसाल्ट** पु. गडद रंगाचा, घट्ट, वाळूचे प्रमाण कमी असलेला, लोह व मॅग्नेशिअमचे प्रमाण जास्त असणारा अग्निजन्य खडक.

**बेसावध** वि. १. लक्ष नसलेला; सज्ज, तयार नसलेला; गैरसावध; निष्काळजी. २. बेशुद्ध; बेभान. [हिं.]

**बेसुमार** वि. अमर्याद; अतिशय; अपरिमित; प्रमाणाबाहेर. [फा.बीशुमार]

**बेसूर** वि. बदसूर; सुरात नसलेला. [हिं.]

**बेह(डा)डणे** अक्रि. (फळ, कणीस इ.) झाडावर पिकून तयार होणे.

**बेह(हा,हे)डा** पु. एखाद्या खात्यातील नोकरचाकर, त्यांचा पगार, हुद्दा याबद्दलचे तपशीलवार पत्रक; अंदाजपत्रक; नेमणूक; सरकारी नियम इ.; सरकारी अधिकाऱ्यासाठी बनवलेले, सरकारी कामकाजाच्या वहिवाटीचे नियम.

**बेह(हे)डा** पु. अडचणीची, उंचसखल, खाचखळग्याची जागा : 'वेत्रवतीचे कांठी मोठमोठे बेहडे म्हणजे खांचा हजारों फौज राहील अशा पडलेल्या आहेत.'– माप्र ९४. [हिं.बीहड]

**बेह(हा,हे)डा** पु. एक औषधी झाड व त्याचे फळ. याचे झाड फार उंच वाढते व विस्तारही बराच होतो. फळांना हेळ्याची किंवा धटिंगाची फळे असेही म्हणतात. फळाच्या आत मगज असतो, त्याने गुंगी येते. याचा लेह खोकल्यावर गुणकारी. फळांचा उपयोग कातडी कमावण्यामध्ये होतो. झाडाला डिंक येतो. [सं.बिभीतक; हिं.बहेड्या]

**बेह(हा)डा** वि. १. टणक; निबर. २. पक्व झालेले.

**बेहत–त्त** वि. अधिक चांगले; श्रेयस्कर. [फा.बिहत्तर]

**बेहद्–द** स्त्री. पराकाष्ठा; अमर्यादपणा; अतिशयितता; बेसुमारता.
वि. अतिशय; अमर्याद; निःसीम. [फा. बी + हद्द]

**बेहया** वि. उद्धट; निर्लज्ज; बेशरम; निलाजरा. [फा.]

**बेहलावा** स्त्री. (संगीत) आलापाच्या धर्तीची तान.

**बेहळा** पु. १. सैल भारा; जुडी; पुंजका. २. झुबका; घोस; घड. ३. भेळा; एक रानटी झाड.

**बेहंगाम** पु. १. अवेळ; भलता काळवेळ. २. (ल.) दंगा : 'हे बेहंगाम करणार.'– लेसं १२०५. [फा.]

**बेहाय** क्रिवि. अतिशय; फार.

**बेहाल** पु. दुर्दशा.

वि. दुर्दशाग्रस्त; दु:खार्त. [फा.बी+हाल]
**बेहाळ** वि. १. (बायकी) शिवराळ; अश्लील; अभद्र; बीभत्स. २. वेडगळ. (व.)
**बेहिसा(शे)ब** वि. १. अयोग्य; अविचाराचे; अनुचित. २. अगणित; हिशेबाबाहेरील. [फा.]
**बेहुड** (माण.) पहा : **बेबड**
**बेहुदा** वि. उद्धट; असभ्य. (ना.) [हिं.]
**बेहेजारना** क्रि. भीतीमुळे किंचाळणे. (झाडी) [सं.भी]
**बेहेड** स्त्री. न. पाण्याच्या प्रवाहाने पडलेली खळगी, दरी.
**बेहेडा नेमणूक** अंजमास; मामलतदारास मामलत सांगितल्यावेळेस हुजुरचे मखलासीसुद्धा द्यावयाचा कागद. यात एकंदर महालाचा आकार त्यापैकी दुमाले गांव वगैरे वजा जातां बाकी निवळ जमेचा आकार यांतून मुशाहिरा शिबंदी खर्च देवस्थान, धर्मादाय वगैरे वजा करून निवळ रसद सरकारास किती यावयाची याचा तपशील असे.– भारतवर्ष मराठ्यांचे दप्तर १३.
**बेहोश** वि. बेशुद्ध; धुंद; तर्र; गाफील; मूर्ख. [फा.बीहोश्]
**बेह्या** वि. निलाजरा. (व.)
**बेळ** न. अर्धा आणा.
**बेळ, बेळसा** न. १. बांबूची काढलेली पातळ चिरफळी (टोपल्या, हातऱ्या इ. विणण्याची). २. बीळ.
**बेळ** स्त्री. समुद्राकाठची रेताड जागा. (कु.) [सं.वेला]
**बेळ** न. १. दुबेळके; बेळे; बेडे. २. पहा : **बेडगा** (व.)
**बेळ** न. तरंगापुढे (देवळातील देवतेच्या चिन्हांच्या खांबापुढे) शिंपडण्यात येणारे अन्न.
**बेळके** न. १. दुबेळके; दोन फाटे फुटलेले लाकूड; फांद्यांचा चिमटा; बेळफाटा. २. (विणकाम) आरसड ठेवण्याचे लाकडी साधन. [क.बेळे]
**बेळगी** स्त्री. बेडे; कुंपण : 'गाई झळकू लागल्या । बेळगीच्या पक्काला ।'– एहोरा भाग २ पृ. १४१.
**बेळफाटा–टी** पु. स्त्री. दुबेळके. (व.)
**बेळसटणे** अक्रि. आंबणे; कुजणे; वास येणे.
**बेळसुटाण** स्त्री. शिजवलेला पदार्थ कुजल्याची, आंबल्याची घाण. (गो.)
**बेळंकी** पु. बगळा : 'रंग बेळंकीगत पांढराशुभ्र दिसू लागला.'– भेटीगाठी ९५.
**बेळा** पु. तांदळाची एक जात.
**बेळा** पु. लाकूड साफ अगर गुळगुळीत करण्याचा लहान रंधा. (बे.)
**बेळूस** वि. १. बेचव. २. नासलेले; आंबलेले. (कु.)
**बेळे** न. एक पक्वान्न.
**बेळे** न. १. पहा : **बेळ** १. २. काकपद; पोथी, पत्र लिहिताना मध्यंतरी सुटलेले शब्द वर किंवा अन्यत्र लिहिलेले आहेत हे दाखवणारे चिन्ह. ३. हातमागाच्या ताण्याला खाली आधारभूत असलेला अडसर ज्या दोन खुंट्यांवर बसवलेला असतो त्यांपैकी एक. [क.]
**बेळेबोळे** न. गूळ व भात. (हे दोन्ही पदार्थ मेजवानीच्या वेळी प्रथम वाढण्याची लिंगायतांमध्ये चाल आहे.) [क.बेल्ल]
**बेळोत्थ** पु. अनेक रस्ते एकत्र मिळतात असे ठिकाण; चौक.– लोसाको. (अहि.)
**बें** न. शेळी, मेंढी, वासरू इ. चा ओरडण्याचा आवाज. [ध्व.](वा.) **बें बें करणे, म्हणणे–** हार खाणे; पराभवाने हताश होणे; अभिमान सोडून मी हरलो असे म्हणणे, दाखवणे.
**बेंगरूळ** वि. बावळा; खुळसट.
**बेंग्या** पु. १. टुमणे; ससेमिरा. २. गोट्यांच्या खेळातील प्रकार.
**बेंच** न. १. बसण्याचे बाक; घडवंची. २. न्यायाधीशांचे मंडळ; न्यायासन. (दोन किंवा अधिक मॅजिस्ट्रेट एकत्र बसून बनलेले फौजदारी कोर्ट.)[इं.]
**बेंचाड** न. झुबका : 'तेणें बेंचाड बळकावले । देहबुद्धीचें ।'– दास ५.२.४०.
**बेंड** न. १. उठाणू; गळू; सूज; स्फोट. २. मोठी बेंबी; उंच वाढलेली बेंबी. ३. काजू, बेंडभोवरा इ. चे मागील देठ, बोंड. ४. गुदभ्रंश होऊन पश्चिमद्वाराने बाहेर आलेला आतड्याचा भाग. ५. नाळेचे किंवा गर्भनाडीचे वेटोळे. ६. कडब्याच्या बुचड्या लावताना अगोदर बुचडीच्या पोटात कणसाळ असा उभा केलेला कडबा. (माण.) ७. विहिरीच्या तोंडाभोवती बांधलेला दगडी कठडा. [सं. वृन्त + वि +अंठ्; हिं.] (वा.) **०पडणे, फुटणे, बाहेर येणे–** गुप्त गोष्ट उघडकीला येणे.
**बें(भें)ड** न. जोंधळ्याच्या धाटाचा आतील पांढरा भाग. [क.बेंडु]
**बेंडणे** सक्रि. १. कोंडणे; बुजवणे; बंद करणे. (व.,ना.) २. (बैदुलांचा खेळ) एका गोटीचा दुसरीला स्पर्श होणे.
**बेंडनी** स्त्री. बैलगाडीवाला बसतो ती कठड्याशेजारची फळी. (अहि.)
**बेंडभोवरी–रा** स्त्री. पु. एक प्रकारची वेल व तिचे फळ.
**बेंडवा, बेंदा** पु. कोंबडी, बदके ठेवण्याचे खुराडे. (व.)
**बेंडा** पु. (आदरार्थी) दर्यावर्दी; खलाशी; तांडेल.
**बेंडा** पु. कामाचा खोळंबा, विचका, अडथळा. (अहि.)
**बेंडा–ड्या** वि. मोठी बेंबी असलेला.
**बेंडा** वि. बुटका. (अहि.)
**बेंडागुळी** पहा : **बांडगूळ**
**बेंडाळणे** अक्रि. फुगणे; फुगवटा येणे; फुगीर होणे; बेंड उठणे.
**बेंडू** वि. ठेंगणा पण धष्टपुष्ट (मनुष्य, पशू).
**बेंद, बेंदाड** स्त्री. दलदल; ओलाव्याची जागा.
**बेंदर–री** स्त्री. एक झुबकेदार गवत.
**बेंदर–लु** न. आंबा, फणस यांवरील बांडगूळ; वृक्षादनी. (गो.)
**बेंदरी** स्त्री. जोते बांधताना घातलेल्या बांधकामाच्या तीन थरांपैकी अगदी खालील किंवा पहिला थर. (त्यानंतरचे दोन थर– पेटी व पाटथर. बेंदरीतील दगडांना बेंदरी खाडकी असे म्हणतात.)
**बेंदा** वि. उतारावरच्या लहान ओढ्याला किंवा दऱ्यांना ताली घालून पाडलेले शेत.
**बेंदाड** न. मुळांचा झुंबडा; जुंबाड (हरळी, कुंदा, मोळ, दर्भ इ. दूरवर पसरणाऱ्या गवताच्या मुळ्यांचा).
वि. (जमीन, शेत, रान,जागा इ. शब्दांशी समास होऊन उपयोग) बारीक गवत असलेली; वनस्पतींचा मुळवा असलेली; बारीकसारीक झुडपांची; पाळे व मुळ्या असलेली.
**बेंदू** पु. १. मेंदू. २. मगज; गाभा; फळातील गीर. ३. बिलबिलीत झालेली

फळे, मांस इ. ४. (झुरळ, विंचू इ.चा) चेंदामेंदा; लद्दा; जखमेतून बाहेर येणारे मांस.

**बेंदूर** पु. पोळा; एक सण. निरनिराळ्या ठिकाणच्या चालींप्रमाणे आषाढ, श्रावण किंवा भाद्रपदातील अमावास्या. या दिवशी बैलांची पूजा करून त्यांना शृंगारून त्यांची मिरवणूक काढतात.

**बेंद्रल** न. दुसऱ्याच्या अन्नावर पोसला जाणारा; ऐतखाऊ. (गो.)

**बेंबट** न. १. पहा : **बेंड.** २. बेंबी शब्दाचे तुच्छतादर्शक रूप. ३. जनावरांची बेंबी.

**बेंबटणे, बेंबणे** अक्रि. वासरू, मेंढरू यांनी भीतीने बें बें असे ओरडणे; आक्रोशणे : 'मुकेपणी बेंबात।'– एभा २१.२२९. [ध्व.; सं.बिट्]

**बेंबारा** पु. बोभाटा; एखादी गोष्ट उघडकीला येणे.

**बेंबी** स्त्री. नाभी; पोटाला ज्या ठिकाणी गर्भनाळ जोडलेली असते तो पोटाचा अवयव. [सं.नाभि] (वा.) **बेंबीचा देठ पिळणे, पिळून दुखू लागणे; बेंबीच्या देठापासून माया, कळवळा येणे–** अतिशय कळवळा येणे. **बेंबीचे उखळ होणे–** चमचमीत खाण्याने व सुखाच्या राहणीने लठ्ठ होऊन दोंद सुटणे. **बेंबीच्या देठापासून–** अगदी अंत:करणापासून; खऱ्या भावाने.

**बॅकबोन** न. १.( संगणक.) सर्वत्र पसरलेल्या, संगणकांच्या जाळ्यात अफाट क्षमता असलेल्या व फार मोठ्या प्रमाणावर संदेशवहन करणाऱ्या तारा. २. पाठीचा कणा. [इं.]

**बॅकवॉटर** न. नदीच्या काठावर साचलेले संथ पाणी. [इं.]

**बॅकळ** न. शूद्रांच्या कानातील बाळा. (गो.)

**बॅक्टेरिया** पु. एकपेशीय सूक्ष्म जंतु; जीवाणू. [इं.]

**बॅग** स्त्री. १. थैला–ली; पोते. २. पिशवी; कसा. ३. (ल.) खलिता. [इं.]

**बॅट** स्त्री. क्रिकेट, बेसबॉल या खेळांमध्ये चेंडू मारण्याचे साधन. [इं.]

**बॅठँ** न. न वाळता, पेज न काढता तयार केलेला भात. (गो.) वि. निरर्थक. (गो.)

**बॅड** वि. वांशिक; परंपरेचे . (गो.)

**बॅडमिंटन** पु. मध्ये जाळी असलेल्या आखीव मैदानात रॅकेटने विशिष्ट प्रकारचे फूल फेकण्याचा व परतवण्याचा दोघांनी किंवा चौघांनी खेळण्याचा खेळ. उगमस्थान पुणे. जुने नाव 'पूना गेम.'

**बॅडॉ** पु. १. न सोललेली सुपारी. २. ठरलेली बिदागी. (गो.)

**बॅणखॅण** स्त्री. तुरुंग; कैदखाना. (गो.)

**बॅणॉ** पु. फणस लवकर पिकण्यासाठी त्याच्या देठाजवळ ठोकतात तो खुंटा. (गो.)

**बॅतकाठी** स्त्री. अंगात संचार झालेल्या माणसाने हातात घेतलेली काठी. (गो.)

**बॅताळवक्रो** पु. धटिंगण; लांबरुंद माणूस. (गो.)

**बॅर** स्त्री. भिंतीवर शेवटच्या थरात रचलेली नक्षी केलेल्या चिऱ्यांची, दगडांची रांग. (गो.)

**बॅरिस्टर** पु. इंग्लंडमध्ये वरच्या कोर्टात काम चालवणारा वकील. [इं.]

**बॅल** न. गूळ. (गो.)

**बॅष्टॉ** वि. निरर्थक. (गो.)

**बँक** स्त्री. लोकांकडून ठेवी स्वीकारून त्यातील पैसा प्रामुख्याने उद्योजकांना कर्ज म्हणून वापरण्यासाठी देणारी वित्तीय संस्था. [इं.]

**बँक उचलखर्च** काही अटींवर आणि काही मर्यादेपर्यंत खात्यात शिल्लक असलेल्या रकमेपेक्षा जास्त रकमेचा धनादेश काढण्याची सोय.

**बँकखाते** न. पैसे ठेवण्यासाठी, काढण्यासाठी बँकेत उघडलेले खाते.

**बँकविवरण** न. बँकांनी नियमितपणे पाठवण्याचे सांख्यिक निवेदन.

**बँकव्यवसाय** पु. मुख्यत: ठेवी स्वीकारण्याचा व कर्ज देण्याचा धंदा.

**बँग** स्त्री. कमीपणा. (गो.)

**बँगळ** वि. अजागळ; कुचकामी. (गो.)

**बँड** पु. समारंभाच्या ठिकाणी, मिरवणुकीत, कवायतीच्या वेळी असणारा वाद्यसमूह. [इं.]

**बँडविड्थ** स्त्री. संदेश पाठवण्यासाठी किती फ्रिक्वेन्सीज आहेत त्याचे मोजमाप. जितक्या फ्रिक्वेन्सीज जास्त तितकी माहिती जास्त व जलद पाठवता येते. [इं.]

**बँडेज** न. जखमेवर औषध बांधण्यासाठी वापरण्याची जाळीदार कापडी पट्टी. [इं.]

**बँड्स** पु. अव. (रेडिओ) ध्वनिलहरी किंवा प्रकाशलहरींच्या गतीवरून पाडलेले गट. [इं.]

**बैकार** पु. बहिष्कार : 'असंख्यातु कवी बैकार। वाणितांति निरतर।'– दाव २८. [सं.बहिष्कार]

**बैगी, बंगई** स्त्री. झोपाळा. (अहि.)

**बैजिक राशी** ज्या संख्येत अक्षरी व आकड्यांतील संख्या असतात अशी राशी.

**बैठक** स्त्री. १. बसण्याची क्रिया. २. ढुंगण टेकून बसणे. ३. (चर्चा, विचार, करमणूक इ. साठी) जमलेली सभा. ४. (परिषद, सभा इ.चे) काम करण्याचे दिवस. ५. काही कामासाठी अन्य कामे सोडून एके ठिकाणी ठाण मांडणे; एखाद्या कामाचा काही काळ बसून विचार करणे; काही कामासाठी एका जागी बसून काम संपवणे.(क्रि. मारणे) ६. बसण्याची पद्धत; आसन. ७. बसण्याच्या उपयोगाची कोणतीही वस्तू; बसण्यासाठी पसरलेले जाजम, सतरंजी, बिछाईत, मांडलेले पाट, खुर्ची, खोगीर इ. ८. एखाद्या वस्तूचे बूड, तळ, खालचा भाग. ९. बाजारात बसणाऱ्या दुकानदारावरचा कर. १०. दमल्या–भागल्यामुळे भीतीने, निरुपायाने एकदम मारलेली थबकल; बसकण. (क्रि. मारणे) ११. व्यायाम करण्याचा एक प्रकार. १२. गाण्याची मजलस; बसून गाणे. १३. प्रवासामध्ये काही कामानिमित्त झालेला मुक्काम, पडलेला खंड. १४. करमणुकीसाठी अनेकांनी जुळणे; जुळण्याची, भेटण्याची जागा. १५. दिवाणखाना. (व.) १६. खेडेगावात एकट्यादुकट्या इसमाला गावसभा भरवायची असल्यास त्या गावच्या रिवाजाप्रमाणे त्याने गावकऱ्यांना देण्याची रकम. [सं.उपविश्; हिं.बैठना]

**बैठक मारणे** अंगात देव आणून घुमणे. हा भगतांचा धंदा असतो.– संशोधन ऐलच २६०.

**बैठणे** अक्रि. बसणे. [हिं.बैठना]

**बैठा** वि. १. बसका; बसकट. २. बेकार; कामाशिवाय घरी बसून राहिलेला.

**बैठा** पु. लाकूड साफ करण्याचा रंधा; बेळा.
**बैठा गुणाकार** गुणाकाराचा एक प्रकार. गुणकातील प्रत्येक अंकाने येणारे गुणाकार एकाखाली एक असे मांडून त्यांची बेरीज न करता तोंडीच गुणून तोंडीच बेरीज घेऊन केलेला गुणाकार.
**बैठा ठेप, बैठी कैद, सजा** साध्या कैदेची शिक्षा; नुसता तुरुंगवास.
**बैठा पगार, मुशारा** चाकरीशिवाय मिळणारा पगार.
**बैठा भागाकार** भागाकाराचा एक प्रकार. भाजक व भागाकार यांचे गुणाकार न मांडता मनातल्या मनात ते भाज्यातून वजा करून फक्त बाकी तेवढी मांडून केलेला भागाकार.
**बैठा भांत** पेज न काढता, बेताचे पाणी घालून केलेला भात.
**बैठा रोजगार, बैठी चाकरी** घरदार किंवा गाव सोडावे लागणार नाही असा धंदा, चाकरी.
**बैठी कीर्द** मुदतीचा जमाखर्च लिहून शिल्लक काढतात ती कीर्द.
**बैठी वही** जिच्यात रोजच्या खर्चाची बाकी एकदम लिहून ठेवतात अशी रोजवही. हिच्यात व्यवस्थित शिल्लक-साखळी काढता येत नाही.
**बैठे खाते** एकदा दाखल करून विल्ह्यास लावलेले खाते अगर सदर.
**बैठे घडीचा** बसल्या घडीचा; बरेच दिवस दुकानात पडून राहिलेला.
**बैड** पु. बरड रान; माळरान.– लोसाको.
**बैत** स्त्री. दोहरा; सयमक दोन ओळी; फार्शी भाषेतील श्लोकासारखी कविता : 'या ग्रंथांच्या बैता तीस हजार आहेत.'– ऐस्फुले २.४५. [अर.]
**बैतण** न. सर्पण. (खा.) पहा : **बयतन**
**बैतन** वि. बेवारशी : 'जयपुरासारखे राज्य बैतन हातीं लागलें.'– होकै १३. [फा.बीतन्]
**बैता** पु. बलुतेदार, बलुत्यावर हक्क असणारा गावचा वतनदार.– लोसाको.
**बैतुलमल** पु. कोष; द्रव्यनिधी.
**बैते–त्या** (को.) पहा : **बलुते–त्या**
**बैद** पु. लुटारू. [सं.व्याधि; हिं.]
**बैदर** स्त्री. गोराडूची एक जात.
न. गोराडूचे फळ.
**बैदा** पु. १. दंगा, बुंडाळी, फितुरी इ. भानगड; तंटा; गोंधळ; घोटाळा; अंदाधुंदी. २. अडगळ. (खा.)
**बैंदा** पु. १. कोंबडीचे अंडे. २. घोड्याचा एक रोग; पुढील पायाचे मनगट सुजणे व गाठीप्रमाणे दिसणे. [हिं.बैद]
**बैदुल** पु. गोट्यांच्या खेळातील गोल, पांढरी, विशिष्ट काचेची गोटी.
**बैरक–ख** स्त्री. १. निशाण; झेंडा; (अप.) बैरागी. २. एका निशाणाखाली गोळा केलेले सैन्य; अरबांची लष्करी तुकडी. [अर.बैरक]
**बैरागी** पु. विरक्त पुरुष; गोसावी; संसार सोडून तपाचरण करणारा भक्त. [सं.विरागी]
**बैराट** वि. बहिरा : 'नणद ते बैराट कार्नी असें।'– अकक २ विम ३०.
**बैल** पु. १. बाल्यदशा संपलेला गाईच्या जातीतील नर; वृषभ; बलीवर्द; खोंड; वसू. २. (ल.) निरक्षर; निर्बुद्ध; मठ्ठ डोक्याचा मनुष्य. ३. पहा: **बैला** ३. [सं.बलीवर्द] (वा.) **०आत–बाहेर घालणे–** बैलांची अदलाबदल करणे. **०गाईस दाखवणे–** बैलाकडून गाईला फळवणे. **बैलास करंदफोड उठणे–** बैलाचे पोट दुखण्याने पाठ तणावणे.
**बैल** पु. (शेअर बाजार) वायद्याने रोखा विकत घेतल्यानंतर त्याबद्दल किंमत न देता नफ्याने तोच रोखा पुन्हा विकू इच्छिणारा इसम. [इं.बुल]
**बैलका–क्या** पु. १. बैल हाकणारा; गाडीवान. २. गुराखी; पशुपाल.
**बैलखांदा–दे** पु. न. (बैलाचा खांदा. गाडीवाल्याच्या हातातील कासरा जुंपलेल्या दोन्ही बैलांच्या खांद्यांवरून तिरका व सारख्या अंतरावर असा असतो त्यावरून) तिरकी दिशा; एखाद्या वस्तूपासून, इसमापासून किंवा स्थळापासून सारख्या अंतरावर व तिरक्या रेषेमध्ये असलेल्या वस्तूंची किंवा दोन खेड्यांची स्थिती; अशा रीतीचे खेडे, वस्तू.
**बैलखांद्या** वि. बैलाच्या खांद्याप्रमाणे खांदे व मान असलेला; बारीक व लहान खांद्यांचा (रेडा).
**बैलघाट** पु. ज्यावरून ओझेवाले बैल जाऊ-येऊ शकतात असा घाट; डोंगरातील चढण; साधारण चढणीचा रस्ता.
**बैलघाटा** स्त्री. एक वनस्पती. (वाई)
**बैलट** न. बैल शब्दाचे तुच्छतादर्शक रूप.
**बैलदाम** पु. बैलाच्या विक्रीवरील कर.
**बैलपाडा** पु. (समुच्चयार्थी) बैल व पाडे.
**बैलपाळणा** पु. (ल.) त्रासदायक, कंटाळवाणे, कष्टाचे, दगदगीचे काम. (क्रि. घालणे, लावणे, मांडणे, करणे, पडणे, होणे.)
**बैलबांडा** पु. गाईबैल; गुरेढोरे. [बैल द्वि.]
**बैलबेगारी** पु. सार्वजनिक कामासाठी वेठीला धरलेले बैल.
**बैलभिस्ती** पु. बैलाच्या पाठीवर माकण घालून पाणी वाहणारा मनुष्य.
**बैलमळणी** स्त्री. धान्याच्या कणसांवरून बैल फिरवून केलेली मळणी.
**बैलमाऱ्या** पु. आकाशातील गुरू ग्रह. (कारण या ग्रहाला शुक्र समजून व हा उगवलेला पाहून पहाट झाली असे वाटून प्रवासाला निघतात. पण पुष्कळ प्रवास केला तरी दिवस उगवत नाही आणि बैल वगैरेंना फार त्रास होतो यावरून). (वाणी, कु.)
**बैला–ली** पु.स्त्री. १. पहा : ४ **बेला** १. २.सुताच्या ताव्याला पाजण करताना सूत खळ लावणाऱ्याच्या छाती इतक्या उंचीवर ताणले जाण्यासाठी सुताच्या दोन्ही बाजूंना दोन उभ्या केलेल्या चौकटी; खळ लावलेली ताव्याची सुते ताणलेल्या स्थितीत ठेवण्याचे दोन घोडे प्रत्येकी. ३. तिफणीची दोरी.
**बैसक–का, बैसकार** स्त्री. १. पहा : **बैठक** ६,७. २. सत्कार; आदराने बसवून घेणे; बसवणे : 'भीमकें केला बैसकार।'– कथा १.८.१४८.
**बैसकासन** न. घोड्यावरील बैठक; जीन.
**बैसणा** वि. बसणारा : 'भजन थारोळा बैसणा। गुरुदारीं सुणा मी होईन।'– एभा १२.५८१.
**बैसणाइत** पु. राजा : 'तो राजूर रोहणखेडिचा बैसणाइत'– ऋ १३५.
**बैसणी–णे** स्त्री. न.बैठक; आसन.
**बैसणे** अक्रि. बसणे : 'कां तेजचि मूर्त बैसलें।'– ज्ञा ६.२५८.[सं.उपविश्]
**बैसतखेवो** क्रिवि. बसल्याबरोबर : 'आघवें अभ्यासूं सरे। बैसतखेवो।'– माज्ञा ६.१९१.
**बैसीनणे** अक्रि. बसणे : 'पाहुनेंरू सारौनि श्री अनंतू। बैसीनिलें चित्रशाळें आंतू।'– शिव १६७.

**बैंगण-न** न. वांगे; वांग्याची भाजी. [हिं. बैंगन]
**बैंगणी-नी** वि. वांग्याच्या रंगासारखे; सर्व उभार काळे व आडवण सुपारी रंगावर असलेले (लुगडे).
**बैंगूली** स्त्री. एक फुलझाड.
**बो** अ. बुवा. उदा. का बो ? = का बुवा ? (ना.)
**बो** अश्लील उद्गार. (झाडी) [सं.भो]
**बोअरवेल** स्त्री. खोलवरचे पाणी मिळण्यासाठी जमिनीत यांत्रिक पद्धतीने भोक पाडून केलेली विहीर. [इं.]
**बोआरा** वि. अशुभ. (झाडी)
**बोई** स्त्री. १. लसणाची पाकळी; लिंबाची फोड. (राजा., कु.) २. दह्याची कवडी.
**बोईन** स्त्री. संत स्त्री. (झाडी)
**बोईरूप** पु. रांपणीच्या मधल्या पाट्याच्या मध्यभागी बांधलेल्या दोरखंडाच्या शेवटाला बांधतात तो नारळ. [इं.बॉय रोप]
**बोउला** न. बोहले : 'आतां बोउलां करावा।'- वेसीस्व १०.८६.
**बोओ बोओ करनं** प्रतीक्षा करणे; चिंतेत वेळ घालवणे. (अहि.)
**बोकड** पु. बकरा.[सं.बुक्क] (वा.)**बोकडाइ जानं-** माजणे; धिंगामस्ती करणे. (अहि.)
**बोकडखाडी** स्त्री. अव्यवस्थित व बेशिस्त कारभार करणारी मंडळी, सभा अगर असा कारभार करण्याची जागा; धिंगामस्ती, टवाळकी इ. जेथे चालतात ती जागा.
**बोकडणे** अक्रि. १. (भाजी इ.ची) वाढ खूप होऊन फळे मात्र कमी धरणे. २. (मुले) जोराने वाढीला लागून सडपातळ व उंच बनणे.
**बोकडणे** अक्रि. ओरबाडणे. (ना.)
**बोकडखाडी** स्त्री.अव्यवस्थित व बेशिस्त कारभार करणारी मंडळी, सभा; असा कारभार करण्याची जागा.
**बोकडदाढी** स्त्री. १. (निंदार्थी) फार वाढलेली दाढी .२. गालांवर नसून फक्त हनुवटीवर येणारी दाढी.
**बोकडबीज** पु. आपल्या भावाबहिर्णीना आईवरून शिव्या देणारा मनुष्य.
**बोकड रासणे** अक्रि. पाठारेप्रभू जातीतील लग्नात कुलस्वामिनीला बोकड अर्पण करण्याचा विधी.
**बोकडे मारप** थापा, बढाया मारणे. (गो.)
**बोकणा-ना-णी** पु. स्त्री. १. बकाणा; तोंडात घातलेले पोहे, चुरमुरे इ. चा मोठा घास. २. तोंड, भोक बंद करण्यासाठी घातलेली किंवा भरलेली कोणतीही वस्तू; गुडदी. [क.बोक्कण]
**बोकणावणे** सक्रि. अधाशीपणाने खाणे. (कर.)
**बोकणे** अक्रि. लिंपणे : 'तोंडावर कणकेचा गोळा ठेऊन बोंकुन टाकणे.'- औसं.
**बोकमार** न. मोठे पिस्तुल; मोठ्या तोंडाची लहान बंदूक. [पोर्तु.]
**बोकल** न. विहिरीचे बांधकाम व वरील कलाकुसर. (को.)
**बोकलणे, बोक(का)ळणे** अक्रि. १. इकडेतिकडे भटकणे; आनंदाने उड्या मारणे; धिंगामस्ती करणे; खिदळणे, नाचणे इ. २. विशिष्ट पदार्थ, पद्धत, धर्म इ. चा प्रसार सपाटून होणे; प्रस्थ माजणे, वाढणे. ३. (रागाच्या बोलण्यात) सपाटून, खूप, ठासून खाणे.
**बोकला** पु. एक जातीचा लहान मासा. (गो.)
**बोकशी** स्त्री. नदीतील मासे धरण्यासाठी केलेली एक प्रकारची टोपली. (को.)
**बोकसा-से** पु. न. बोचके; गाठोडे.
**बोकंदळ** न. पु. धिंगाणा; धुडगूस; खिदळणे; धांगडधिंगा. वि. धष्टपुष्ट; अगडबंब; गलेलठ्ठ.
**बोका** पु. १. मांजरातील नर. २. (ल.) गलेलठ्ठ; खाऊन माजलेला धिप्पाड मनुष्य किंवा पशू; (कोणताही) राक्षसी पदार्थ. वि. पातकी. [सं.बिडाल]
**बोका** पु. मूत्रपिंड. [सं.वृक्क]
**बोका** पु. १. छाती; ऊर. २. पोट. ३. आतडी. (झाडी)
**बोकाणा, बोकांदा** पु. पोहे इ. चा तोंड भरून घेतलेला घास; मोठा घास; बोकणा. (क्रि. मारणे). [क.बोक्कण]
**बोकावना** अक्रि. १. थकणे. २. तृप्त होणे. (झाडी)
**बोकांडी-डे** स्त्री. न. मानगुटी; मान (वाघ, शत्रू, पिशाच इ. संबंधीचा उपद्रव असताना धरणे, बसणे इ. क्रियापदांशी जोडून प्रयोग). (वा.) **० धरणे-** एखाद्याला दुःखदायक कचाटीत धरणे; एखाद्याचा हात जखडून टाकणे; त्याला स्वेच्छेने वागू न देणे. **० बसणे-** १. मानगुटीवर बसणे. २. पिच्छा पुरवणे; एखाद्याने विशिष्ट गोष्ट केल्याशिवाय त्याला न सोडणे.
**बोकांदणे** उक्रि. बोकणे मारणे; अधाशीपणाने, दडपून खाणे; पहा : **बोकलणे** ३
**बोकू-तू** पु. शेळीचे पोर; करडू. (बालभाषा) (गो.)
**बोके** न. बगळा. (गो.) [सं.बक]
**बोकेजना** अक्रि. १. थकणे. २. कंटाळणे. (झाडी)
**बोकेफोड** स्त्री. १. काहीही फायदा नसताना जोरात ओरडणे; रिकामी उरस्फोड करणे. २. (ल.) निष्फळ शिकवणे, प्रयत्न.
**बोकेसंन्यास** पु.(बोका ज्याप्रमाणे मोठा साधुत्वाचा डौल घालून मुकाट्याने बसतो पण उंदीर नजरेला पडताच त्याचे साधुत्व लटपटून तो त्याच्यावर झडप घालतो, त्याप्रमाणे) लाभाची संधी येताच आपले खरे स्वरूप प्रगट करणे; संभावितपणाने आपले कपटी विचार झाकणे; साधुत्वाचे ढोंग.
**बोखडणे** अक्रि. अतिरिक्त खतामुळे झाड खुरटणे, त्याची वाढ न होणे.
**बोख(खा)डणे** सक्रि. झाडाची पाने व शेंडे तोडणे, ओरबाडणे; नखांनी किंवा इतर साधनांनी तोडून टाकणे.
**बोखरी** स्त्री. बोखरी या गवताच्या शेंड्याच्या भागाच्या काड्यांपासून तयार झालेला झाडू. (अहि.)
**बोखरी, बोखी** स्त्री. लहान कोंब; नवा अंकुर; कोवळी डिरी.
**बोखरू** पु. १. चांभार जोड्यांसाठी वापरतात तो विशिष्ट खिळा. २. जमिनीवर पसरणारे एक गवत. त्याचे काटेरी तोंड. (अहि.)
**बोखा(का-के-खे)डा** पु. एक झाड. खातेरीच्या झाडाप्रमाणे व बरीच मोठी झाडे. फळे खातेरीप्रमाणे, कोकणात आढळ, इतर नावे - काळा उंबर, भुईउंबर, गांड्या उंबर, भुईदोडी.- वगु ४.११०.
**बोखार-रे** पु. न. पोकळी; घळ; खोदरा. [सं.पुष्कर=आकाश]

**बोखारणे** सक्रि. झाकणे : 'वोढुनि वोलें चांबडें। बोखरिजे चहुंकडे।'- भाए ४०३.
अक्रि. रागावणे; चिडणे. (व.)

**बोखारा** पु. गुप्तांग; जांघेतील भाग. (अहि.)

**बोखारा** पु. १. डोक्यावरून व तोंडावरून घेता येईल अशा तऱ्हेने घडी घातलेले वस्त्र. सामान्यत: बुरखा. (क्रि. घेणे, ओढणे). २. आच्छादनाचे, आवरणाचे कापड (हत्ती, गाडी इ. वर घालण्याचे). ३. खोलीतील एका कोपऱ्यात दोन भिंती घालून त्याला दार लावून बनवलेले कपाट; फडताळ.

**बोख्या** पु.घरात उजेड व हवा यावी म्हणून छताला ठेवलेले छिद्र. (खा.)

**बोग(गा-घ)ण-णी-घ-णे** स्त्री. न. रुंद तोंडाचे भांडे; बगुणी; पातेली-ले. (तंजावर भागात लग्नात वधूमाय वधूच्या हाती बोगण देऊन 'बहुगुणी ऐस' असा आशीर्वाद देते.) [सं.बहुगुणी]

**बोगदा** पु. १. डोंगराच्या पोटातून आरपार नेलेला रस्ता. २. भिंतीतील खिंडार; भगदाड. ३. कैद्यांसाठी केलेले तळघर. ४. भिंत, जमीन यांतील भुयार, तळघर (दारू इ. ठेवण्यासाठीचे). [पोर्तु.आबोगदा; फा. बुघाझ; तुर्की बोघोझ]

**बोगा** पु. उंचवट पापुद्र्याखाली असणारे भोक. (कु.)

**बोगारणी** स्त्री. फोडणी. [प्रा.]

**बोगारदु:ख** न. वरपांगी दु:ख; दु:खाचे प्रदर्शन.

**बोच** न. काटा इ. बोचल्यामुळे पडलेले भोक किंवा झालेली इजा, जखम. स्त्री. १. काट्याचे टोक. (राजा.) २. पक्ष्याची चोच. (कु.)

**बोचक** वि. बडबड्या; वाचाळ; फार बोलका. [सं.वाचाट]

**बोचकणे** सक्रि. १. टोचणे; बोचणे; खुपसणे. २. बोचवणे; खुपसवणे; भोसकणे. ३. वारंवार पैशांचा तगादा लावणे. (अहि.)

**बोचक(का-कु)रणे, बोचक(का)डणे** सक्रि. १. नखाने, पंजाने ओरबाडणे; पंजात धरून ओरखडणे; फोडणे. २. धरणे; पकडणे.

**बोचक(का-कु)रा, बोचकाडा** पु. नखाने, पंजाने काढलेला ओरखडा; पाचही बोटांनी एकदम घेतलेला बिचकुरा.

**बोचका** पु. हाताने, तोंडाने काढलेला लचका, तुकडा.

**बोचका-के** पु. न. गाठोडे; चापचोप घड्या न घालता बांधलेले गाठोडे. [तुर्की बुक्चा](वा.) **बोचक्यातला उंदीर -** एखाद्या कामाविषयी गुप्त व बारीकसारीक गोष्टीसुद्धा जाणणारा.

**बोचकूल** न. पंजा. (गो.)

**बोचखिंड, बोचरखं(खिं)ड-डा-डी** स्त्री. दातातील खिंड, फट : 'दंतपाटी उखळली। तेणें बोचरखिंडी पाडली।'- दास ३.२.३९.

**बोचखिंड्या,बोच(य)रखिंड्या** वि. दातांत फट असलेला. [क.बोच्चु]

**बोचड्यान** वि. घामाची दुर्गंधी.

**बोचणी** स्त्री. १. खुपसणे; टोचणे; घुसवणे. २. टोचून बोलणे; जाचणी; मनाला लागेल असे बोलणे.

**बोचणे** उक्रि. १. टोचणे; भोक पाडणे; इजा करणे; आत घुसणे. (को.) २. (एखादे टोकदार हत्यार) खुपसणे; भोसकणे. ३.(ल.)टोमणा मारणे; मनाला लागेल असे बोलणे. [सं.ब्रुस्]

**बोचर** न. १. धार बसलेले हत्यार. (व.) २. दातपडका मनुष्य.

**बोचरडा, बोच(थ)रा, बोचिरे** वि. दातपडका; दातांत फटी असणारा : 'पाहें पां लोहाचे चणे। जै बोचरिया पडती खाणें।'- ज्ञा १२.७०.

**बोचरडे, बोचार्डा** न. एका पक्ष्याचे नाव. (कु.)

**बोचरणे** पहा : **बोचकरणे**

**बोचरी** स्त्री. फट; उणीव. (व.)

**बोचलणे** सक्रि. १. हलके टोचणे; बोचणे; चोचावणे; हळूच भोक पाडणे. २. चोच मारणे; टोकरणे.

**बोचा** पु. (अशिष्ट) ढुंगण; गुदद्वार. [सं.बुध्न]

**बो(बों)चावचे** सक्रि. कुदळीने जमीन टोचणे, वरवर खणणे, खणल्यासारखी करणे. (गो.)

**बोचाळू** पु. (अश्लील) गुदमैथुनासाठी बाळगलेला पोऱ्या; लवंडा.

**बोचांडणे** अक्रि. तृप्ती होणे; इच्छा पूर्ण होणे; वासना शमणे. (व.)

**बोची** स्त्री. मानेमागचा भाग. (अहि.) (वा.) **०पकडनं-** अडचणीत, कैचीत पकडणे.

**बोचू** पु. पहा : **बोचाळू**
वि. मूर्ख; वेडसर; नादान; घाणेरडा इ.

**बोचेबुलबुल** पहा : **बुलबुलबोचा**

**बोचेरा** वि. तीक्ष्ण अग्राचा; अणकुचीदार; टोकदार.

**बोचो** पु. १. पशूचे निमुळते तोंड. (गो.) २. हनुवटी.

**बोज** पु. १. वजन; महत्त्व; योग्यता; किंमत; जाणीव; मोठेपणा : 'हातीं घेतलेल्या कामाचा बोज त्यांस चांगला कळतो.'- नि ९. २. मान; प्रतिष्ठा; लौकिक; कीर्ती; वाखाणणी; पत; पहा : **बूज** : 'माझी कोण बोज जाला हा शेवट। देखोनियां वाट आणिकां लागे।'- तुगा १९७०. [हिं., म.बूज]

**बोजड** वि. १. मोठे; अवजड; न पेलण्यासारखे (शरीर, अवयव). २. सैल व मोठे; आटोपशीर नसलेले (ओझे, गाठोडे). सामान्यत: अवजड; बेताबाहेरच. ३. ओबडधोबड; चांगले, कलाकुसरीचे नसलेले. ४. फार जाडेभरडे (कापड, साल इ.).

**बोजवार** पु. भाजीत, लोणच्यात घालण्याचा हिंग, जिरे, मिरी, हळद इ. घालून केलेला मसाला. [सं.वेसवार]

**बोजवार** पु. दारू गाळणारे बाटलेले मुसलमान दलाल.

**बोजवारा** पु. दुर्दशा; गोंधळ; फजिती; वजन नाहीसे होणे.

**बोजा** पु. १. ओझे; वजन. २. कर्ज; गहाणवट; हक्कसंबंध. [हिं.;क.ओज्जे]

**बोजा-झा** पु. १. मद्य; एक अमली, मादक पदार्थ : 'कीं बोझां काढिला जैसा। आनंदरतीचा।'- भाए ७९७. २. अर्क; रस :'इंद्रनिळाचेनि रावणें। बोझा काढविती चांदिणे'- नरुस्व ६०३.

**बोजा-झा** पु. बंगाली चार मण वजनाचे ओझे.

**बोजार** न. आंब्याचे मोहरीचे लोणचे. (राजा.)

**बोजेदार** वि. भरदार; घोसदार : 'एखाद्या जंगली श्वापदाप्रमाणें खोल बोजेदार आवाजांतला...'- फडके शाकुंतल १०.

**बोझारा** पु. इनाम; बक्षीस.

**बोट** स्त्री. १. वाफेच्या किंवा तेलाच्या यंत्राने चालणारी मोठी होडी. २. लहान गलबत; नौका.[इं.] (वा.) ० **लागणे**– बोटीच्या प्रवासाने भोवळ येऊन ओकारी येणे, त्रास होणे.

**बोट** न. १. हाताची, पायाची अंगुली, अंगठा. २. बोटाच्या लांबी, रुंदी किंवा जाडीइतके परिमाण. ३. बोटभर, अगदी थोडे, बोटाला चिकटेल इतके परिमाण. उदा. मधाचे, तुपाचे बोट. ४. (ल.) डाग; काळिमा; अपकीर्ती; बोटाचा ठिपका उठेल एवढा डाग. उदा. गालबोट. [क.बोट्टु] (वा.) **(एखाद्याकडे) ० दाखवणे**– भलत्यालाच दोषी ठरवणे. ० **लावण्याने पोट येणे**– थोडक्या बोलण्याचा राग येणे; क्षुल्लक गोष्टीला अवास्तव महत्त्व, येणे. ०**शिरकणे**– एखाद्या कामात प्रवेश मिळणे; (पुढील फायद्याच्या दृष्टीने) चंचुप्रवेश होणे. **बोटावर नाचवणे**– आपणाला पाहिजे त्याप्रमाणे एखाद्याकडून सर्व गोष्टी करून घेणे. एखाद्याला पूर्णपणे ताब्यात ठेवणे, हवे तसे खेळवणे. **बोटे मोडणे**– जागच्या जागी चडफडणे; निर्भर्त्सना करणे; ठपका ठेवणे; शापणे. **दोन बोटे स्वर्ग उरणे**– अभिमानाने फुगून जाणे; गर्वाने ताठून जाणे; अतिशय श्रीमंत असणे. **ज्याची बोटे त्याच्याच डोळ्यात घालणे**– एखाद्याला सापळ्यात पकडणे, अडकवणे. **या बोटावरची थुंकी त्या बोटावर करणे**– (मुले पालथा हात करून मधल्या बोटाला थुंकी लावतात व मग अलीकडचे एक बोट एकदा व पलीकडचे एकदा अशी बोटे त्या मधल्या थुंकी लावलेल्या बोटाला जुळवून दाखवतात. त्यामुळे थुंकी एका अलीकडील बोटावर दिसते व दुसऱ्यांदा पलीकडील बोटावर दिसल्याचा भास होतो त्यावरून) लटपटपंचीने एखाद्या वस्तूचे स्वरूप निराळे भासवणे; फसवणे; बोलणे व कृतीत मेळ नसणे.

**बोटक** पु. एक मुलींचा खेळ.– मखेपु पृ. ३३४.

**बोटका** वि. १. बोथट; बुटका; ठेंगणा. २. बोटूक; आखूड व सरळ चिंच येणारे (झाड).

**बोटकाम** न. घरातील किंवा संसाराचे अगदी बारीकसे काम.

**बोटकी तांगडी** मासे पकडण्याचे एक साधन. (झाडी)

**बोटखत** न. हिशोबाच्या निरनिराळ्या बाबींचे किंवा खात्यांचे केलेले पत्रक, टाचण. या बाबी लिहिण्यासाठी आखलेला कागद.

**बोटघेवडा–डी** पु. स्त्री. एक प्रकारचा घेवडा आणि त्याचा वेल.

**बोटचेपा** वि. १. बोटाने दबला, चेपला जाईल इतका शिजलेला किंवा पिकलेला (भात, फळ, आंबा इ.). २. (ल.) थोड्याशा प्रयत्नाने साध्य होण्याच्या स्थितीला आलेले (काम). ३. (ल.) नरमाईचे (धोरण).

**बोटधरणी माप** धान्य मोजताना मापाच्या वर डाव्या बाजूने बोट धरून भरलेले माप. अशा रीतीने अधिक माप भरून घेणे हा एक हक्क असे; वरीलप्रमाणेच पण बोटाऐवजी आडवा हात धरणे. याउलट रास्ती माप.

**बोटधारी** वि. बोटाच्या रुंदीइतका रुंद व ज्यात काही नक्षी नाही असा काठ किंवा किनार असणारे (धोतर).

**बोटलणे** अक्रि. बोटाने उकरणे; बोटाने खळगी करून त्यात नाचणीचे रोप लावणे. याविरुद्ध आवटणे.

**बोटवडी–ढी** स्त्री. हाताच्या बोटांची पकड : 'गांजीवाचेनि टणत्कारें : बोटवडी सुटली एकसरें'– नरुस्व २०१२. [क.बोट्टु]

**बोटवा** पु. १. गव्हाच्या पिठाचा तांदळाच्या आकाराचा खिरीसाठी केलेला गव्हला. २. सुमारे करंगळीच्या टोकाइतके लांब व रुंद असे कपाळाला लावलेले कुंकू.

**बोटवात** स्त्री. बोटांवर पीळ देऊन वळलेली कापसाची वात.

**बोट(टा)ळ(ल)णे** उक्रि. १.(फळे) इ. बोटांनी दाबून टणक किंवा मऊ आहेत हे पाहणे; चिवडणे. २. दाबली गेल्याने बिघडणे, चिवडल्याने वाईट होणे.

**बोटाएवढे** वि.अगदी लहान वयाचे, आकाराचे इ.

**बोटावरील जोर** फक्त बोटे टेकून काढण्याचा दंडाचा प्रकार.

**बोटाळणी** स्त्री. खारवट जमिनीतील बेणणी.– कृषि २३१.

**बोटी** स्त्री. १. बोटवे किंवा शेवया करण्यासाठी गव्हाच्या पिठाची केलेली गोळी; पापडाची लाटी. २. सूत काढण्यासाठी घेतलेली कापसाची लडी. ३. सुकवून खारवलेला मासा. ४. (कोंबड्याचे इ.) शिजवलेले मांस. ५. मांसाचा तुकडा. ६. गोळी. [हिं.;फा.]

**बोटी** स्त्री. अव. (छाप.) छापील कागद दाबात ठेवताना त्याला मृदुता येण्यासाठी त्यांत मधून–मधून घातलेले काही जाड, गुळगुळीत, कोरे कागद.

**बोटूक** न. १. आखूड व सरळ चिंच; याउलट कोंगाळे. २. एक चिंचोका असलेला, एका पेराचा चिंचेचा तुकडा. ३. थोटूक; बुंठण; थोंटण; ठुंठण (वात, दोरी इ.चे). [क.गोटु, बोटु]

**बोटोळा** (व.) पहा : **बोटवा १**

**बोट्या** वि. तोंडात बोटे घालणारा. (झाडी)

**बोठण, बोठूक** न. बुंठण; थोटूक; खुटारा; खणपूस. [क.बोट्टण]

**बोड, बोडस** न. (कुत्सितार्थी) डोके; टकले; टाळके. [क.बोट्ट; ते.बोळी,बोडी; सं.बुध्न] (वा.) ० **करणे**– १. हजामत करणे. २. खोड मोडणे; नरम करणे.

**बोडका** वि. १. डोक्याला काही एक न घातलेला; उघड्या डोक्याचा. २. डोक्यावरील सर्व केस काढलेला. ३. ज्याच्यामुळे वस्तूच्या शिरोभागी शोभा येते ते नसलेले; शेंड्यावर, शिखरावर, डोक्यावर काही नसलेला. उदा. शेंड्यावाचून झाड, शिंगावाचून गाय, झाडावाचून टेकडी इ. ४. पाती नसलेला (कांदा).

**बोडकादेवी** स्त्री. विधवा स्त्री.

**बोडकावणे** सक्रि. झाडाच्या फांद्या तोडून नुसता खुंट उभा ठेवणे.

**बोडकी** स्त्री. १. करडई. (व.) २. घायपातासारखे एक झाड. (को.)

**बोडकी** स्त्री. पुढे टोक नसलेला जोडा; पूर्वी कुणब्यांच्या बायका हा घालत असत. (व.)

**बोडकी** स्त्री. विधवा (विशेषत: केशवपन केलेली) स्त्री.

**बोडकूल, बोडके** न. १. (निंदार्थी) डोचके. २. बोडकी.

**बोडके–का भात** एक प्रकारचे भात; कोथिंबिरे भात.

**बोडण** स्त्री. म्हसरांनी लोळण्याचे चिखलाचे डबके.

**बोडण** न. १. महालक्ष्मीच्या किंवा आराध्यदेवतेच्या नावाने पाच सुवासिनी व एक कुमारिका यांनी परातीत दूध, दही, वडे, भात, पोळ्या, मध इ. एकत्र कालवण्याचा नैमित्तिक विधी. २. (ल.) फजिती. [सं.मुट्]

**बोडणी** स्त्री. १. हजामत. २. लूट; नागवण. ३. खरडपट्टी; ताशेरा.

**बोडणे** सक्रि. १. (निंदेने) हजामत, वपन करणे; मुंडणे. २. शेंडा छाटणे; भुंडा करणे. ३. बुचाडणे; नागवणे; लुटणे. ४. खरडपट्टी काढणे; भोसडणे; फजिती करणे. [क.बोडिसु]

**बोडद** न. १. (नाविक) जहाजाची, बोटीची बाजू; अर्धे अंग. २. (ल.) कज्जा - तट यांतील प्रत्येक पक्ष. [इं.बोर्ड]

**बोडभद्र** न. भद्राकरण; हजामत. (गो.)

**बोडविसुळणी** स्त्री. बोडणी.

**बोडसा-से** पु. न. (निंदार्थी) डोचके.

**बोडसा-से** पु. न. लाकडे तोडण्याची मोठी कोयती.

**बोडंती** पहा.: **बोडणी**

**बोडा** पु. (अशिष्ट) पुरुषाचे जननेंद्रिय; शिश्न.

**बोडी** स्त्री. वीस कवड्यांचे एक नाणे : 'आळोंआळिआ चिंतामणी। बोडिअे बचकूं।'- शिव ३३०. [सं.वाटिका]

**बोडी** स्त्री. १. डबके; लहान तळे : 'तुम्हा बोडी गंगासमानचि होआवी।'- सूत्रपाठ ११५. २. ठेंगणा बैल. (झाडी)

**बोडू** पु. काजूचे रसभरीत फळ.

**बोडेफकीर** पु. १. निर्धन मनुष्य. २. (निंदार्थी) ज्याच्या मागे बायको, मुले इ. पसारा नाही असा मनुष्य.

**बोडेर** पु. १. पिवळ्या चोचीचा पोपट; याला कंठ (गळ्याभोवतीची काळी रेघ) नसतो. (गो.) २. (ल. ) व्यवहारशून्य, निर्बुद्ध, रिकामा मनुष्य.

**बोड्या-ड्यो-ढ्यो** पु. मुलगा. (को.)

**बोण** पु. १. गव्हाची भिजलेली कणीक : 'लावावे मांदळ्यासि। कां बोण।'- मोसभा ४.११७. २. खरकटे वगैरेचा ढीग; उकिरडा. (ना.)

**बोणक** स्त्री. केतकी. (गो.)

**बोणार** पु. तांबट. (गो.)

**बोणी** स्त्री. १. बोहनी; दुकान उघडल्यानंतरची पहिली विक्री. (गो.) २. सुरुवात; आरंभ. (गो.)

**बोणे** न. भोजन; प्रसाद; पक्वान्न; (सामान्यत:) बोने; नैवेद्य; बली : 'यालागीं ग्रंथसुवर्णाच्या ताटीं। रसाचीं बोणें वाटी।'- ज्ञाप्र ५३.

**बोतरी** स्त्री. वाकळ; गोधडी. (झाडी) [सं.बृहतिका]

**बोथट-रा, बो(बों)था** वि. धार नसलेला, गेलेला. [सं.बुंथी]

**बोथटणे, बोथणे** अक्रि. १. बोथट होणे; धार जाणे. २. कमी, शिथिल होणे; तीव्रता कमी होणे.

**बोथरखिंड-खेडे** इ. पहा : **बोचखिंड,बोचरखिंड** इ.

**बोथरणे** सक्रि. १. झोपेत बरळणे : 'नको बोथरों या भयाचेनि नावें।'- मुरामयुद्ध ५.१५८. २. गर्जणे.

**बो(बों)थ(था)रा** पु. बोंथ; डगला; कफनीप्रमाणे वापरण्याचे वस्त्र. (को.)

**बोथरी-र** स्त्री. गोधडी. (ना.)

**बोथले-ळे** न. सासरी जाण्यासाठी निघालेल्या मुलीबरोबर दिलेल्या वस्तूचे बोचके.

**बोथाटी** स्त्री. काठीच्या दोन्ही टोकांना चिंध्यांचे, लाकडाचे गोळे बांधून ती फिरवण्याचा खेळ; अशी गोळे बसवलेली काठी.

**बोथाटी बरदार** बोथाटी फिरवणारा मनुष्य; मिरवणुकीस बोथाटी घेऊन जाणारा इसम.

**बोद** स्त्री. १. चार कांबळी, आठ घोंगड्यांचा समुदाय. २. विवाहात नवरीच्या अंगावर पांघरलेली शाल. (अहि.) ३. दोन पोती एकत्र शिवून उभा केलेला लांबट थैला.

**बोद** पु. खांबाच्या वरील लाकडी उथळे व तुळई यांमध्ये बसवलेला लाकडी तुकडा; वंडकी, टिटवी. (माण.)

**बो(बों)द** न. मृदंग, पखवाज इ. ना लावण्याची भिजवलेली कणीक. ही बोद आवाज येण्यासाठी वापरतात.

**बोद** वि. १. बेचव; नीरस; मंद. २. कर्णकठोर; मंजुळ नसलेला; बदबदीत (आवाज). ३. खणखणीत नव्हे अशा आवाजाचा (रुपया, मृदंग इ.). ४. बोथट. [सं.बुंथी]

**बोदड** वि. पहा : **बोजड**

**बोद(ध)णे** अक्रि. तृप्त होणे; पोटभर खाणे. (ना.)

**बोदय** पु. तांबूस रंगाचा एक लहान मासा.

**बोदराई** स्त्री. १. रानहेल्यांचे जंगल. २. एक आदिवासी देवता. (झाडी)

**बोद(दे)रे** न. जास्ती शिजल्यामुळे झालेला भाताचा लगदा.

**बोदरेल** वि. खडबडीत; ओबडधोबड. (अहि.)

**बोदा** स्त्री. भिंत पुढे आल्यामुळे तिच्यावर काही वस्तू ठेवायला होणारी जागा.

**बोदा** पु. १. ओझे. २. रानहेल्या. (झाडी)

**बोदी-थी केळ** केळीची तीनधारी फळाची एक जात.

**बोद्धा** वि. जाणणारा; ज्ञाता. [सं.]

**बोद्या** वि. लठ्ठ. [क.बोदु]

**बोध** पु. १. ज्ञान; जाणीव; समजूत; बुद्धी; ग्रह; आत्मबोध. २. स्पष्टीकरण; समजावणी; माहिती सांगणे. ३. चित्स्वरूप; ब्रह्मज्ञान; पूर्ण माहिती. ४. उपदेश; मार्ग; सूचना; परिचित करणे. ५. जागेपणाची स्थिती; जागृतावस्था. ६. फुलांचे उमलणे. [सं.]

**बोधक** वि. १. समजावून सांगणारा; अर्थ स्पष्ट करणारा. २. उपदेशक; शिकवणारा. ३. जागे करणारा; जाग आणणारा.

**बोधगे** न. मूग, उडीद, मटकी यांचा कोंडा, भूस.

**बोधणे** सक्रि. बोध, स्पष्टीकरण, उपदेश करणे; समजावणे; माहिती, ज्ञान देणे : 'आतां ऐसियापरी बोधसी।'- ज्ञा ३.१३.
अक्रि. जाणणे; समजणे; ज्ञान देणे; जागे होणे : 'तो वीवेकु वेठला। किं प्रबोधु बोधला।'- भाए २५३. [सं.बुध्]

**बोधन-ना** न. स्त्री. १. बोध, उपदेश करणे; दिशा दाखवणे; सूचना; मसलत. २. जागृती; जागे करणे : 'अह्मी आदिलशहाचे बोधनेवरून त्याकडे आले.'- तंजावर येथील मराठी शिलालेख. [त.बोधनै]

**बोधभाषा** स्त्री. शिक्षणाची माध्यमभाषा; ज्या भाषेत शिक्षण देतात ती भाषा; (इं.) मीडियम.

**बोधलाबावा** पु. ढेरपोट्या, गबदुल मनुष्य.

**बोधलेपण** न. ज्ञानसंपन्नता : 'येणें थोर बोधलेपणें। तयासि गा देहीं असणें।'- ज्ञा १४.३१८.

**बोधवाक्य** न. संस्थेच्या मूळ उद्देशांचा बोध करून देणारे वाक्य किंवा शब्दसमूह.

**बोधा** पु. उपदेश; मार्ग; ज्ञान. [सं.बोध]

**बोधाभास** पु. १. ज्ञानाचा आभास. २. (ल.) जीव.- हंको.

**बोधावा** पु. शुभवर्तमान.- शर.

**बोधित** वि. बोध केलेला, केला गेलेला; शिक्षित; सांगितलेला. [सं.]

**बोधेबरगे** पु. अव. जाणते नेणते; लहानमोठे : 'या वलणांत लोक असतील ते बोधेबरगे.. अवकाशे पाठवावें.'- पेद २६.७६.[सं.बुध, बुजरुण]

**बोध्य** पु. ज्ञानाचा विषय; जाणण्याची गोष्ट : 'तैसा बोध्यजात गिळितु।.. अबोधु गेला।'- ज्ञा १८.११०६.

वि. स्पष्ट करण्यास, सांगण्यास, शिकवण्या शक्य, योग्य, आवश्यक; जाणण्याजोगे. [सं.]

**बोन-ने, बोनेवटी** न. १. पहा : **बोणे** २. २. पहा : **बोण १, बोद** १. ३. मंगळागौरीच्या पूजेच्या वेळी देवीला वाहिलेले कणकेचे आमले, खामले, हाराडेरा, नागोबा, पाटावरवंटा इ. पदार्थ. हे दुसऱ्या दिवशी निर्माल्यातून काढून गायीला घालतात किंवा खातात. ४. गाळसाळ; उष्टेखरकटे. ५. बोडण; दहीभात. (व.) [क.बोन]

**बोनचायना** स्त्री. केओलिअनमध्ये कॅल्शियम फॉस्फेट मिसळून तयार केली जाणारी माती.

**बोनमील** न. अव. जनावरांच्या हाडांपासून तयार केलेली खते.

**बोनस** पु. १. बक्षीस; बक्षीस म्हणून दिलेली जास्त रक्कम. २. (विमा) तोषिक; वर्धन; व्याजाशिवाय दिलेला नफा. [इं.]

**बोपला** पु. फार सुजलेला शरीराचा अवयव. (व.)

**बोपला** पु. छपरीच्या वगैरे खांबावरचा सुमारे एक फूट लांबीचा ठोकळा; आढे व खांब यांच्यामधील ओंडके. (व.)

**बोपा** पु. १. अति लाडावलेला मुलगा; बाब्या. २. जिच्यावर अति प्रेम आहे अशी वस्तू. (व.)

**बोपापाळणा** पु. तान्ह्या मुलाची प्रकृती ठीक राहण्यासाठी सटवाईला वाहण्याचा लहान लाकडी पाळणा व लाकडी बाहुली. (व.)

**बोबकणे** अक्रि. १. (तिरस्कारार्थी) तोंडात कोंबणे; बोकाणा भरणे. २. (यावरून सामान्यपणे) खाणे.

**बोबका-टा** पु. बोकाणा; मोठा घास.

**बोबडकांदा** वि. बोबडे बोलणारा.

**बोबडणे** सक्रि. बोबडे बोलणे.

**बोबडा** पु. हरळीच्या जातीचे गवत.

**बोबडा** वि. १. अस्पष्ट उच्चार करणारा, सर्व वर्ण स्पष्टपणे उच्चारता न येणारा (मनुष्य); स्पष्टोच्चाराला असमर्थ असणारे (वागिंद्रिय) ; अस्पष्ट उच्चार असणारे (बोलणे). २. अर्धवट शिजलेला (तांदूळ इ.).

**बोबडी** स्त्री. (भीतीने, गोंधळल्याने जीभ अडखळून होणारा) अस्पष्ट उच्चार, वाणी; बोलण्याची तारांबळ. (क्रि. वळणे, पडणे.) (वा.) **० वळणे-** फार घाबरणे.

**बोभा** स्त्री. हाक : 'तुका म्हणे झालों निराळा। आतां गोपाळा देऊं बोभा।'- तुगा २०२.

**बोभाइणे, बोभाणे** उक्रि. १. मोठ्याने हाक मारणे; बोलावणे. २. ओरडणे; ओरड, हाकाहाक करणे : 'आपले परावे कोणी नेणें भोवती। त्यांच्या नांवें बोभे बोभे हा हो श्रीपति।'- तुगा १३१.[सं.व्हे]

**बोभा(भ)टणे** अक्रि. १. वाजणे; गर्जणे; गाजणे : 'रुणझुणा वाजती नुपुरें। वांकी बोभाटती गजरें।'- दास १.२.२३. २. हाक मारणे; बोलावणे; ओरडणे. ३. बोभाटा, बोलवा, कुप्रसिद्धी होणे.

**बोभाट-टा** पु. १. प्रसिद्धी; गवगवा; बोलवा. २. गर्जना; घोष; गजर: 'आंगेंसीं बोभाटु। सांडिती मेघ।'- ज्ञा १८.७३४. ३. ओरड; हाकाहाक; हाकाटी. ४. गाऱ्हाणे; कागाळी; तक्रार : 'तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट ते।'- केका ८६. ५. गावगुंडकी.

**बोभावणे** अक्रि. १. घुबडाने, कोल्ह्याने आवाज करणे, ओरडणे, घुमणे; कोल्हेकुई करणे. २. पहा : **बोभाइणे १**

**बोम** पु. १. तोंड शिवलेल्या पोत्यातील धान्याचा नमुना पाहण्यासाठी आत खुपसता येण्यासारखे टोकदार व खोबण असलेले एक लोखंडी हत्यार. पहा : **बंब्या.** २. (नाविक) (को.) पहा : **बोंब**

**बोय** स्त्री. १. वास; गंध. २. (ल.) वासाचा दरवळ, रुची; छटा : 'इंग्रजांचे मगजांतील बोय येती कीं तुम्ही कुमकेस न आलां तरी काय गेलें?'- ऐलेसं ८.४३५२. ३. सार; अंश. [फा.]

**बोय** पु. उथळ पाण्यात राहणारी माशांची एक जात. पृष्ठभाग फिकट हिरवा, वजन ४-५ किलो, लांबी सुमारे ९० सेंमी, झपाट्याने वाढणारा व रुचकर.

**बोय** स्त्री. १.पहा : **बोई**. २. बी. (गो.)

**बोय** स्त्री. म्हातारी बाई. (खा.)

**बोयटा** पु. किनाऱ्यालगतचा लहान मासा. (को.)

**बोयरा, बोया** पु. समुद्रात खडकाची, धोक्याची जागा दाखवण्यासाठी ठेवलेली तरंगणारी वस्तू, पिंपे. [इं.बॉय]

**बोयराप** न. (नाविक) गलबताच्या नांगराबरोबर निशाणीसाठी पाण्यात सोडण्याचे लाकूड.

**बोयाचे जाळे** डोलीच्या जाळ्यासारखेच खुंटाला बांधण्याचे मोठे मासेमारीचे जाळे.

**बोये** न. (अव. बोई) शेताची सीमा बरोबर करताना उपयोगात आणण्याची काठी. अशा तीन काठ्या पुरून सरळ रेघ मारतात. (या मोजणीच्या बावट्यांसारख्याच असतात.)

**बोर** न. स्त्री. एका जातीचे गवत.

**बोर** स्त्री. १. एक काटेरी फळझाड. याचे फळ सुपारीएवढे, वाटोळे व रुचकर असते. झाडाला उत्तम डिंक येतो. लाकूड, नांगर, गाडे इ. साठी उपयुक्त. दांडेबोर, चणेबोर इ. जाती. २. काळसर, तांबूस रंग, बोरासारखा रंग (घोड्याचा). दोन प्रकार- तेल्या व तांबडा.

न. १. बोरीचे फळ. २. बोराएवढे भजे. ३. बोराच्या आकाराचा बायकांचा वेणीत घालण्याचा सोन्याचा दागिना. [सं. बदरि; हिं. बेर] (वा.) **० पिकनं-** संधी मिळणे; फायदा होणे; नशीब उघडणे. (अहि.) **बोरातील कीड, आळी-** १. नाजूक व फार सुंदर स्त्री. २. लठ्ठ व आत्मसंतुष्ट मनुष्य. **बोरीस बोरे आणणे-** १. (खोडकर मुलाला) बोराप्रमाणे झाडाला लटकवणे, टांगणे, बांधून ठेवणे. २. अशक्य वाटणारी गोष्ट शक्य करणे.

वि. काळसर तांबूस असा, बोराच्या रंगाचा (घोडा) : 'भाऊसाहेब बोर घोडीवर स्वार झालें'- भाव ११५.

**बोरकंडा–ठा** पु. एक कंठा; घोड्याच्या अंगावरील सामान.

**बोरकांटी, बोरा(रां)टी** स्त्री. बोरीची फांदी, काठी; बोरीचे शिरे.

**बोरकूट** न. बोरे वाळवून केलेली पूड.

**बोरखडा** पु. मुलींच्या सागरगोट्यांच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द.

**बोरड** न. नारळीचे जुनाट झाड. (कु.)

**बोरन्हाण** न. फाल्गुन शुद्ध पौर्णिमा किंवा रंगपंचमीच्या दिवशी वर्षाच्या आतील मुलांना बोरे, द्राक्षे, चुरमुरे व मिठाई एकत्र करून त्याने घातलेले स्नान.

**बोरबार–रा** पु. १. खटपट; शीण. २. सुख-दु:ख.- हंको.

**बोरमाळ** स्त्री. बोराच्या आकाराच्या सोन्याच्या मण्यांची माळ.

**बोरशा** पु. खानदेशातील एक प्रसिद्ध आंबा.

**बोरंगाळी** वि. थोडथोडा; अल्पसा; रिमझिम (पाऊस) : 'बोरंगाळी बोरंगाळी पाऊस येताय.'- पैठण, लीलाचरित्र ४७.

**बोरा** पु. हिरवे, कच्चे, टणक फळ; दोडा.

**बोरा** पु. लाल खडा : 'जैसा अंबाडापुरिचा बोरा। होय सगात्र सैदुरा।'- भाए ६४५.

**बोरा–ऱ्या, बोरिया** पु. १. पोती, गोणपाट इ. करण्याच्या उपयोगाचे कापड; या कापडाचे पोते, तरट, बिछाईत; जाजम; बारदान; गोणपाट. २. शिंदी, ताड इ: च्या पात्यांची चटई; अंथरी : 'काय महर्घ तृणाचा बोऱ्या।'- अमृत ११७. ३. लोकर इत्यादींची जाड बैठक; बुरणूस; सुताचा विणलेला झोऱ्या. ४. साळी, तांदूळ ठेवण्यासाठी तुराट्या इत्यादींची विणलेली कणंग; (सामान्यत:) बोहरा-री (बे.). ५. (ल.) फजिती; अप्रतिष्ठा; बोजवारा. (क्रि.उडणे, वाजणे.)
वि. १. दिवाळखोर;गरीब; कंगाल २. अनाथ; दुर्बळ. (मनुष्य). ३. भिकार (पदार्थ). [फा.बूरिया]

**बोराबागवान, बोराभाई** वि. कंगाल.

**बोरी** स्त्री. बोराचे झाड.

**बोरी** स्त्री. १.सराफ लोकांची पैसे ठेवण्याची लांब पिशवी. २. चटई.

**बोरू** पु. १. लेखणी करण्याच्या उपयोगाचे जाड कांडाचे गवत; बरू; बोरूंची कसईप्रमाणे बेटे नदीच्या, ओहोळाच्या किनाऱ्यास होतात. याचे ताट जोंधळ्यासारखे दिसते. काळा व पांढरा या दोन जाती. घरातील कूड, लेखणी, पत्रावळी लावण्याच्या चोयी वगैरे कामी उपयोग.- वगु ४.११२. २. तागाची एक जात; सोनताग. (व.)

**बोरोना** पु. मुलीची सासरी पहिली पाठवणी. (झाडी)

**बोर्ड** पु. १. फळा; तक्ता. २. जेवणखाण. ३. सभा; संघ; मंडळ. [इं.]

**बोर्डिंग** न. भोजनवसतिगृह.- शर. [इं.]

**बोऱ्या (खजुरी)** खजूर बांधून आलेले शिंदीचे बारदान. यावर निदान माशा तरी बसतात.

**बोऱ्या (बदाम)** बदाम बांधून आणलेले बारदान. यावर माशाही बसत नाहीत. यावरून हा अधिक कंगाल, दरिद्री समजतात.

**बोऱ्ये** न. बैलगाडीच्या गाताच्या खालची आडवी लाकडी फळी. (को.)

**बोर्स्टल पद्धती** अल्पवयीन गुन्हेगाराला एक प्रकारच्या शाळेत ठेवून सुधारण्याची पद्धत. लहान मुलांचा शिक्षणयुक्त तुरुंगवास.

**बोर्स्टल स्कूल** वरील प्रकारची शाळा, लहान मुलांचा तुरुंग.

**बोल** पु. आंब्याचा एक प्रकार. (गो.)

**बोल** पु. १. बोलणे; भाषणातील, बोलण्यातील काही शब्द, वाक्ये इ.; वाणी; भाषण. २. पूर्वी बोलून दाखवलेले मनोगत; मत; विचार; वचन. ३. दोष; आरोप; निंदा; ठपका. ४. वाद्यावर आघात करून काढलेला विशिष्ट ध्वनी. ५. वर्णन : 'असोत हे बोल। चालतां जालें नवल।'- शिव ५५५. ६. गाऱ्हाणे : 'आर्ताबोलाची सांठवण।'- ऋ ९६. [सं.ब्रू; म.बोलणे; दे.] (वा.) ० **ठेवणे, लावणे–** दोष देणे, लावणे; नावे ठेवणे. ०**बोलणे–** आपले म्हणणे काय आहे ते स्पष्टपणे सांगणे. ०**लागणे–** दोष, बट्टा, काळिमा लागणे. **बोलात बोल नसणे–** बोलण्यात मेळ नसणे, विसंगती असणे. **बोलाफुलाला गाठ पडणे–** सहज म्हटलेली, बोललेली गोष्ट घडून येणे.

**बोल आलाप** : 'आलापप्रक्रियेत थोडे नावीन्य ओतण्याचे कार्य हे बोल-आलाप... या पुढील गायनांगाचे होय.'- संसौ पृ. ९८.

**बोलका** वि. १. बोलणारा; चांगले बोलणारा. २. फार बोलणारा; वाचाळ; वटवट करणारा; बडबड्या; भाट. ३. बोलू शकणारा; बोलता येत असलेला (पोपट, मूल). ४. वक्ता; संभाषणात भाग घेणारा.

**बोलकाचालका** वि. बोलता व चालता येऊ लागलेले (मूल).

**बोलग(गा)डा** वि. (शब्दश: गाडीभर) अति बोलणारा. पहा : **बोलका** २

**बोलघडा** पु. साखरपुड्याला कोकणस्थ मंडळी बोलघडा म्हणत.- बलुतं १६१.

**बोलघेवडा–डी** पहा : **बोलका** २

**बोलणे** क्रि. १. शब्द उच्चारून मनोगत कळवणे. २. (पोपटाने) कानी पडलेले किंवा शिकवलेले शब्द उच्चारणे. ३. वाद्याने ध्वनी उत्पन्न करणे. ४. म्हणणे; नाव देणे. ५. रागे भरणे; दोष देणे; बोल लावणे. ६. व्याख्यान देणे; सांगणे; म्हणणे; कथन करणे. [सं.ब्रू,वल्ह] (वा.) ०**फिरवणे–** बोलता-बोलता आशय, अर्थ बदलणे. **बोलून घेणे–** दुसरा मनुष्य रागावेल असे वागणे. **बोलण्यावर जाणे–** (एखाद्याच्या) बोलण्यावर विश्वास ठेवणे. **बोलण्यावरून बोलणे येणे, वाढणे–** एखादी गोष्ट बोलत असताना इतर गोष्टी सुचून अधिक बोलणे. विशिष्ट गोष्टीचा संदर्भ, उल्लेख यामुळे बोलावे लागणे, वादविवाद होणे. **बोलून सुघड, भला, चांगला, मधुर–** बोलणे, वागणे, इ. मध्ये चांगला, सरळ; गोडबोल्या.

**बोलणेचालणे** न. व्यवहार; लोकांशी वागण्याची पद्धत.

**बोलता** वि. सांगणारा; बोलणारा.

**बोलतान** स्त्री. ज्या तानेमध्ये चीजेतील अक्षरे विवक्षित स्वराने म्हटली जातात ती तान.

**बोलती** स्त्री. वाणी. - शर.
वि. बोलण्याची : 'आतां बोलती ते नवाई। सांगिजेल।'- ज्ञा १६.२९२.

**बोलपट** पु. बोलती व हलती चित्रे असणारा सिनेमा.

**बोलपुतळी–माणकी** स्त्री. फार बोलणारी, डौलाने बोलणारी स्त्री.

**बोलबाला** पु. उत्कर्ष; वैभव; विजय; भरभराट; अभ्युदय; कीर्ती. [हिं.]

**बोलबाव्हलेपणा** पु. वाचाळपणा; बोलघेवडेपणा : 'काशीनाथ तूं

बोलबाव्हलेपणा करतां उपयोगी नाहीं.'- विजयजिगीषा २०१.
**बोलभाक** पु. वचन; शपथ; करार.
**बोलभास्या** स्त्री. अंतर्गत हेतू; कावा. (झाडी)
**बोलभांड** वि. १. आवेशाने बोलण्याच्या व भांडण्याच्या कामात पटाईत. २. क्षुल्लक कारणावरून भांडायला तयार होणारा.
**बोलवरी** क्रिवि. शब्दांनी : 'इतरासि हे न कळे कथा। अनुमानता बोलवरी।'- एभा १३.७४६.
**बोलवा, बोलवाय** स्त्री. वदंता; चारचौघांत पसरलेली बातमी.
**बोलशी** स्त्री. १. दारू भरून ठेवण्याचे शिंग. २. न्हाव्याची धोकटी. (कु.)
**बोलाऊ** न. आमंत्रण; पाचारण; बोलावणे : 'सर्वास बोलाऊ गेली, बहुधा सर्व येतील.'- पेद २१.५५.
**बोलाचाली-चाल-बोली** स्त्री. १. संभाषण; बोलणे-चालणे. २. वादविवाद; भांडण; बाचाबाची; रागारागाचे भाषण.
**बोलाडवाघळी** स्त्री. समुद्रातील वाघळी नावाच्या माशाची एक जात.
**बोलावणूक** न. बोलावणे; आमंत्रण.(साष्टी, कोळी)
**बोलाव(वि)णे** सक्रि. १. हाक मारणे. २. आमंत्रण देणे.
**बोलावणे** न. आमंत्रण ; निमंत्रण .
**बोलावणेकरी** पु. १. बोलावणारा, आमंत्रण देणारा माणूस. २. निमंत्रितांना जेवणाला बोलवणारा मनुष्य.
**बोलावा** पु. नागाच्या पूजेचा प्रकार.
**बोली** स्त्री. १. भाषा; भाषाभेद; पोटभाषा; एकाच भाषेतील विशिष्ट प्रकार. २. करार; वचन; ठराव; कंत्राट : 'जाबसाल घेऊन बोली ठीक झालीं'- पया १०. ३. शब्द; भाषण; बोलणे; म्हणणे : 'आतां असो हे सकळ बोली। मागील आशंका राहिली।'- दास ८.३.२५. ४. सोय; शक्यता. ५. किंमत. (क्रि.लावणे)(वा.) **०सोडवणे-** करारातून सुटण्याला वाट राखून ठेवणे; कराराला अपवाद ठेवणे.
**बोलीचाली** स्त्री. १. केलेल्या कराराच्या बाबतीत वाटाघाट; करारमदार करण्यासाठी केलेली चर्चा. २. संदिग्ध बाबींचा निकाल लावण्याच्या उद्देशाने केलेली चर्चा. [हिं.बोलणे-चालणे]
**बोलूकाका** पु. नुसती बडबड करणारा मनुष्य.
**बोले** न. बोहुले; बहुले : 'धडांचे बोलें करौनी।'- शिव ४५४.
**बोल्या** स्त्री. अव. १. टीका; आरोप. २. अपशब्द; शिव्या. (झाडी)
**बोवण-णे, बोह(हो)णे** न. मृदंगाला लावण्याचा कणकेचा गोळा.
**बोवले** न. १. कोनाडा. (राजा.) २. बोहले.
**बोवलो** पु. गवताची गंज. (गो.)
**बोवा** पहा : **बुवा**
**बोवा** पु. लसणाची पाकळी. (राजा.)
**बोवाळ, बोवाळणे** पहा : **बोंबाळ** इ.
**बोस** पु. मनातल्या मनात कुढणे; आकस; राग; द्वेष. (क्रि. धरणे, करणे.)
**बोसक** स्त्री. घाण. (खा.)
**बोसका** पु. तुकडा; कांडके. (व.)
**बोसका-के** पु. न. बोचके; गाठोडे.
**बोसकाडणे** सक्रि. १. बोचकारणे.(व.) २. (दह्याचे) चोथापाणी होणे.
**बोसकाडा** पु. ओरखडा.(व.)
**बोहचक** वि. १. वाचाळ; बडबड्या. २. दुसऱ्याच्या कामात लुडबुडणारा. [सं.बहुवाचक]
**बोहणी-नी, भवानी** स्त्री. १. दुकानदाराने सकाळी दुकान उघडल्यावर होणारी पहिली विक्री. ही बहुधा रोखीची करतात व तिच्यावरून लाभ-हानी समजते. २. (ल.) आरंभ; सुरुवात. ३. लाभ : 'पावे सद्गती बोहणीसचि तया ज्ञानामृतें बोहणी।'- मृगीचरित्र १. [सं.भवानी; क. बोणी]
**बोहणे** सक्रि. बोलावणे; हाक मारणे; बाहणे : 'बोहतां जवळि गाय ये गुरूं।'- अकक २ मुद्गलाचार्य विरचित रामार्यांचे श्लोकबद्ध भाषांतर ३९. (कुण.)
**बोहनड** न. (अहि.) पहा : **बोणे** : 'आसरांच्या या दहीभाताच्या नैवेद्याला बोहनड म्हणतात.'- अहिराणी भाषा व संस्कृती ४९.[क.बोनभात]
**बोहरणी** स्त्री. केरसुणी. (व.)
**बोहरणे** उक्रि. नाश पावणे; भस्म करणे.- शर.
**बोह(तो)रपी, बोहरी(रू)प, बोहोरीप** पहा : **भोरपी, भोरीप**
**बोहरा-री, बोहारी** पु. मुसलमानांतील एक जात व त्यातील व्यक्ती. हे लोक लोखंडी सामान, स्टेशनरी इ. चा व्यापार करतात.[सं.व्यवहारी]
**बोह(हा)रा** वि. अभद्र; कपाळकरंटा; सत्यानाश करणारा; त्रासदायक व अप्रिय व्यक्ती. (व.,ना.)
**बोह(हि)री** स्त्री. १. देशाबाहेर घालवणे; हद्दपारी; देशवटा : 'जाली तापासीं बोहरी। ते परिएसा पां।'- ऋ १२. २. नाश; चुराडा : 'नाचून केली बोहरी। त्या सर्पाचिया दर्पाची।'- रास ३.२१६. ३. वणवा; अग्नी : 'नाना वनामाजी बोहरी। कडसणी जेतीं न करी।'- ज्ञा १८.५५५. [क.पोरे;सं.बुन्ध्, भुर्]
**बोहला, बोह(हु)ले** न. लग्नात, मुंजीत घातलेली चतुष्कोण वेदी. यावर वधूवर, बटू बसतात व होम करतात. लांबी-रुंदी ५/४ हात व उंची एक हात असून ती मुंजीत मुलाच्या हाताने व लग्नात मुलीच्या हाताने मोजतात.
**बोह(हि)ली** स्त्री. बोली; शब्द : 'विकारांची संपिली बोहिली।'- माज्ञा ९.२१५.
**बोहळा** स्त्री. कालवड. (आदि.)
**बोहा(वा)रीण** स्त्री. जुने कपडे, मोड इ. घेऊन त्यावर सुया, गळेसर, बारीकसारीक भांडी इ. देणाऱ्या फेरीवाल्या स्त्रिया.
**बोहि(ह)ली** पहा : **बोली** ३.
**बोहेरी** स्त्री. पट्टी; कर : 'येथें सरकारच्या हवेल्यांस फाटक बंदीची बोहेरी रयतेत बरोबर लाविली.'- पेद ४३.६३.
**बोहोगणी-णे** पहा : **बोगण**
**बोहोरी** स्त्री. केरसुणी. (झाडी) [क.बोहरिगे]
**बोळ, बोळक** पु. अरुंद वाट; गल्ली (दुतर्फा घरांमधील, कुंपणांमधील); खेंडुकली. [सं.प्रतोली]
**बोळ** स्त्री. बागेच्या राखणीबद्दल नारळाच्या रूपात देण्याची मजुरी. (गो.)
**बोळ** पु. नाश : 'जैसा महाप्रळइं जगबोळु'- विसि १९.८६. [क.]

**बोळ** न. १. एक प्रकारचा औषधी चीक, डिंक. याचे पांढरा, काळा (कडू), रक्त्या, हिरा, भेसा, कात इ. प्रकार आहेत. २. दाट झालेले दही, शाई, रंग इ. ३. धान्य, फळे इ. मधील गाळ; टाकाऊ भाग; गदळ. ४. अंड्यातील बलक. ५. चिकणमातीचा एक प्रकार. ६. साखरेच्या आवरणाची लहान मुलांसाठी कडू गोळी. [सं.बोल] (वा.) **०घालणे, घालत बसणे–** फार फार बोलून, हुज्जत घालून छाती दुखवून घेणे (आणि छातीवर बोळ घालण्याचा प्रसंग येणे). **(एखाद्या कामात) ०घालणे, पाजणे, पाडणे–** काम बिघडवणे.

**बोळकुले, बोळके** न. १. (मातीचे, लाकडाचे, धातूचे) मुलींचे खेळण्याचे पात्र. २. (ल.) दात नसलेले तोंड. [क.बोक्क–च्च]

**बोळखिळा–खीळ** पु. स्त्री. गाडीच्या शिवाळीची बाहेरील खुंटी; आतील पोटखीळ.

**बोळणे** अक्रि. १. दाट होणे; गोठणे; साकळणे; गोळे बनणे; बुळबुळीत होणे (रक्त, दही, काजळ, अळत्याची शाई). २. (गहू, बाजरी, हरभरा इ.तील) सत्त्वांश पूर्ण पोसलेला असणे. ३. (ल.) (ओळख, माहिती) विसरली जाणे, मंद होणे, स्मृतिपटलावरून पुसली जाणे. ४. शांत होणे; तीव्रपणा नाहीसा होणे. ५. (शस्त्र इ.) बोथट होणे. ६. पाभरीतील बी चाड्यातून घसरून खाली पडणे. ७. फळ पिकून मऊ होणे. ८. विटणे; कंटाळणे. (व.)

सक्रि. १. तेल, तूप इ. नी (एखादा पदार्थ) चोपडणे; माखणे. २. शाई, दही, दूध इ. मध्ये लेखणी, भाकरी इ. बुचकळणे, बुडवणे. ३. भोकात खुंटी, खिळा इ. घालून ते मोठे करणे. [सं.पुल्]

**बोळणे** न. खराब व घाणेरडे झालेले वस्त्र; हलके व कमी किमतीचे वस्त्र; बोळा.

**बोळता** वि. विपुल; दाट : 'पाठी बोळता वासु दीजे : पारियातकांचा'– शिव ७७६.

**बोळवण–णी** स्त्री. १. रवानगी; पाठवणी; निरोप देणे. २. नववधूचे नवऱ्याच्या घरी थाटामाटाचे प्रथम गमन. ३. विवाहानंतर वरपक्षाच्या मंडळींची सन्मानपूर्वक केलेली पाठवणी. ४. गावात आलेल्या भुतांना अन्नादी बळी देऊन गावकऱ्यांनी त्यांची वाजतगाजत गावाबाहेर केलेली हकालपट्टी. ५. पाहुण्यांबरोबर थोडेसे जाऊन त्याची केलेली रवानगी. ६. पाठवणी; बिदागी; केलेल्या कामाबद्दल जाताना दिलेली रक्कम. ७. ब्राह्मणेतर जातीतील गर्भाधानाचा समारंभ. [क.बोळु]

**बोळवणे** सक्रि. १. आलेल्या पाहुण्यांबरोबर सत्कारासाठी थोडेसे चालून त्याला निरोप देणे; रवानगी करणे; विसर्जन करणे; घालवणे; पाठवणे; पोहोचवण्यास जाणे. २. (विनोदाने) नाहीसे करणे; गमावणे; (मित्र, आप्त, विद्या इ.) विसरून जाणे. ३. नथ, सुंकले इ. दागिन्यांचा फासा दुमडून घट्ट बसवणे; एकरूप करणे; फासा कशातही अडकणार नाही किंवा निघणार नाही असा बसवणे. ४. बुजवणे; बंद करणे. [क.बोळु]

**बोळा** पु. १. चिंध्यांची गुंडाळी; चुना देणे, भोक बुजवणे, भिंत सारवणे इ. साठी कापडाचा केलेला गोळा; पोतेरे; लहान मुलाच्या तोंडात दुधात बुडवून दिलेली चिंधी. २. कागद इ. वर शाईचा, रंगाचा पडलेला ठिपका, डाग. ३. जुने व घाणेरडे वस्त्र; व्यवस्थित घडी न करता कसा तरी गोळा केलेल्या वस्त्र, कागद, पाने, कापूस वगैरेचा लहानसा गोळा. (वा.) **०फासणे, फिरवणे–** नाहीसा करणे; बिघडवणे; पूर्वीचे रूप बदलून टाकणे. ३. नामंजूर करणे. **बोळ्याने दूध पिणे–** (अगदी लहान मुलाला स्वत: दूध पिता येत नसल्यामुळे त्याला बोळ्याने दूध पाजावे लागते. त्यावरून ल.) स्वत:ची अक्कल नसल्याने दुसऱ्याच्या सांगीप्रमाणे चालणे; बुद्धिहीन असणे.

**बोळी** स्त्री. बोळके. (माण.)

**बोळी** वि. शिंग नसलेला. (तंजा.)

**बोळी होण–न** होनाचा (नाण्याचा) एक प्रकार.

**बोळू** न. भाकरी, पोळी, थालीपीठ इ. खाताना कोरड्याला घेतात ते तूप, लोणी, दही इ.

**बोळे** वि. अव्यवस्थित आकाराचे; कातीव–कोरीव नसलेले; ओबडधोबड; कड नसलेले.

**बोंगडा** पु. पूर्णपणे न उमललेली फुलाची कळी; फुगीर झालेली व लवकरच उमलेल अशी कळी. (राजा.)

**बोंगर** वि. अडाणी; अनभिज्ञ. (व.)

**बोंगा** पु. १. पहा : **बोहगडा.** २. नाळ; गर्भनाडी (फुगलेली, बाहेर आलेली). ३. पोटाचा फुगीर भाग; पोटाचे डेरके ; गर्भारपणातील पोटाचा फुगीरपणा; गर्भिणीचे मोठे व अव्यवस्थित पोट. (क्रि. वाढणे, फुगणे.) ४. धोतराच्या, लुगड्याच्या निऱ्यांचा फुगीरपणा. ५. मोठे, बेढब पागोटे. ६. कापड विणताना शेवटी राहिलेले किंवा ताण्यातील खराब झालेले सुताचे तुकडे; गुंता.

**बोंगा, बोंगाडा** वि. १. धष्टपुष्ट; मोठा; स्थूल; गलेलठ्ठ. २. मोठा; बोजड; अवजड (अंगरखा, वस्तू).

**बोंगाड्या, बोंग्या** वि. मंदबुद्धी; वेडसर; मठ्ठ; मूर्ख; बावळट. (व.)

**बोंड** पु. न. १. कापूस, अफू इ. झाडाचे फूल; बीजकोश; अशा आकाराच्या निरनिराळ्या वस्तू. २. बिब्बा, काजू इ. च्या मागील फळ, अवयव. ३. वरील आकाराचे हरभरा इ.च्या पिठाचे तळून खाण्यासाठी केलेले खाद्य; भजे. ४. पळीचे टवळे; ठाणवईचे चाडे. ५. केळफूल. ६. मक्याचे कणीस. ७. शिस्नाची, स्तनाची बोंडी, अग्र, टोक. ८. लहान नारळ. (को.) ९. सुरुंगाच्या पहारीला भोक घेण्यासाठी भरतात ते पोलाद. १०. (नाविक) जहाजाच्या शिडाचे आखूड व जाडे टोक. (को.) ११. कर्णफुलाप्रमाणे कानात घालण्याचा स्त्रियांचा एक दागिना. [क.बोंडु] (वा.) **बोंडे वेचणे–** (अपराधाची जाणीव असल्याने) तोतरे बोलणे; बोलताना अडखळणे.

**बोंडग–गी** स्त्री. केतकीचे झाड.

**बोंडगहू** पु. खपल्या गहू.

**बोंडचोळी** स्त्री. एक वनस्पती.

**बोंडनिवडुंग** पु. न. फड्यानिवडुंग.

**बोंडफळ** पु. १. डावात मारलेली, मेलेली सोंगटी. २. (निंदार्थी) नारळ; ज्या ठिकाणी काही मूल्यवान वस्तू द्यायची त्या ठिकाणी त्याऐवजी दिलेला नारळ.

**बोंडबाहुले** न. (लाडिकपणे) लहान मूल.
**बोंडबाळी** स्त्री. पहा : **बोंड ११**
**बोंडयारी, बोंड्यारी** स्त्री. (नाविक) शिडाच्या कोपऱ्यांना ते ताणण्यासाठी बांधलेली दोरी; परभाणाचे बोंड घोसाखाली दबण्यासाठी बोंडाला अडकवलेली यारी.
**बोंडले** न. लहान मुलाला दूध पाजण्यासाठीचे गोकर्णासारखे भांडे, पात्र.
**बोंडवेल** स्त्री. हरळीसारखे तांबडे गवत. (वाई)
**बोंडशी** स्त्री. पहा : **बोंडी १**
**बोंडा, बोंडारा** पु. १.कोवळा नारळ; लहान नारळ. (को.) २.कोवळा गळलेला, खराब झालेला नारळ. (कु.)
**बोंडा** पु. बुडी; डुबकी. (क्रि. देणे, मारणे.)
**बोंडी, बोंडशी–सी, बोंडूक–स** स्त्री. न. १. नाक, स्तन, बोट, शिश्न, इ. चे वाटोळे टोक, अग्र. २. मोदक इ. पदार्थाचे टोक. ३. मागच्या पाऱ्या झडून पुढे लहान राहिलेले केळफूल; केळफुलातील अगदी आतील भाग. ४. कोणत्याही लांबट वस्तूचे वाटोळे टोक. ५. नारळीची पोय. (गो.) ६. तिळाचे दाणे ज्यात असतात ते बोंड.
**बोंडू** पहा : **बोंड २**
**बोंडूक** न. लहान बोंड–डी.
**बोंथ** स्त्री. १. पहा : **बुंथी १**. २. चित्रकाराचे पीस, कुंचली. ३. भोकात बसवण्याचा बोळा; गुडदी. ४. वस्त्राची लहान चामडी, गुंडाळी. (गो.) ५. बारीक कांदा. (गो.) [सं.बुंथी]
**बोंथ(था)रा** पु. (को.) पहा : **बुंथी १**; डगला किंवा कफनीप्रमाणे उपयोग करण्याचे वस्त्र.
**बोंथारणे** अक्रि. बुरखा घेणे; बोंथाने आच्छादिले जाणे.
**बोंथी** स्त्री. १. टोक; अणकुची. २. पहा : **बोंथ** २. ३. (कु.) पहा : **बोंथ** ३. ४. पहा : **बुंथी** १. ५. काथ्याचे पायपुसणे; तव्याला तेल लावण्यासाठी घेतलेली नारळाची शेंडी; पुसणी. ६. लहान बोळ. (गो.)
**बोंथी केळ** केळीची तीनधारी फळांची एक जात.
**बोंथी केळे** वरील केळीचे फळ. हे आखूड, गुटुंगळे, जाड सालीचे असते.
**बोंद** न. जुगारात पैशांच्या ठिकाणी मोजण्यासाठी घेतात तो हस्तिदंताचा कुडा; कवडी.
**बोंद(दा)र** न. जीर्ण वस्त्र; फाटके, जुनेपुराणे, फार वापरलेले व घाणेरडे कापड; जुनेर. (कु.)
**बोंदर–रा** वि. निष्काळजी; गचाळ; घामट; घाणेरडा; गैदी; गबाळा; अव्यवस्थित कपडे घालणारा.
**बोंदरी** स्त्री. १. तरटाची मोठी पिशवी; पोते; गोणपाट. २. गोणपाटात भरलेला कापूस. एका बोंदरीचे वजन अंदाजे दीड मण असते. (खा.)
**बोंदा** स्त्री. अव. शिंदीच्या झाडाच्या बिया. (व.)
**बोंब** पु. लहान मुलाला दूध पाजण्याचे काचेचे भांडे. (गो.)[पोर्तु.एंबिगो]
**बोंब** स्त्री. १. तोंडावर हात मारत मारत काढलेला मोठा आवाज (अतिदु:ख, महत्संकट, तक्रार किंवा शिमगा यावेळी केलेला). २. (ल.) हाकाटी; दुर्भिक्ष. (क्रि.पडणे, वाजणे, होणे.) ३. पुकारा; गलबला; ओरडा. [देप्रा.बुंबा;ध्व.बं] (वा.) **०उठणे–** १. पहा : **बोंब लागणे**. २. भुमका, अफवा उठणे; जाहीर होणे. **०पाडणे–** (उप.) मोठा पराक्रम करणे; दिवे लावणे. (ना.) **०लागणे–** कळ उठणे; वेदना होणे; वेदनेने ओरडण्याइतके दु:ख होणे. **(एखाद्याच्या नावाने) ०मारणे–** एखादी वाईट गोष्ट अमक्याने केली असे सांगत सुटणे.
**बोंब(बा)डा** न. बुडबुडा; फुगारा. [सं.बुद्बुद]
**बोंबणे** उक्रि. १. भांडे (जाळ मंद लागावा व ते काळे होऊ नये म्हणून) मातीने अगर राखेने माखणे; लिंपणे; सारवणे. २. तळण्यासाठी पिठात बुडवून काढणे (बटाट्याचे काप इ.). ३. शेण, माती, चिकी इ.ने भोक बुजवणे, बंद करणे. ४. भरणे; लिप्त होणे; माखले जाणे : 'मग दु:खाचेनि बरटेनि बोंबले'– ज्ञा ७.८५.
**बोंबति** न. वाद्य : 'दुमदुमितीं बोंबतिआं ।'– शिव ५२४. [ध्व.बोंब]
**बोंबलणे** अक्रि. १. बोंब मारणे, ठोकणे. २. (एखादे कार्य, मसलत) फसणे; पूर्ण न होणे; काहीही निष्पन्न न होणे. ३. टेंभलणे; मोठ्याने रडणे. (व.) [क.बोब्बेयिडु]
**बोंबलता** वि. बोंबलणारा; बोंब मारणारा.
**बोंबलपट्टी** स्त्री. १. मोठा आरडाओरडा; हाकाटी; गलका. २. स्वत:ची फुशारकी; आत्मस्तुती; आत्मश्लाघा.
**बोंबलबाराखडी** स्त्री. अंगी मुळीच विद्वत्ता नसताना पांडित्याची ऐट दाखवणे.
**बोंबलभिक्या** वि. कपाळकरंटा; कमनशिबी; दुर्दैवी.
**बोंबल्या** वि. १. नेहमी बोंबलण्याची किंवा आरडाओरडा करण्याची सवय असणारा. २. नेहमी फुरफुरणारा (घोडा).
**बोंबल्या गणेश, हणमंत** १. वाचाळ; बडबड्या; तोंडाळ. २. गुप्त गोष्ट मनात न ठेवणारा. ३. नेहमी अभद्र बोलणारा; रड्या.
**बोंबळी** स्त्री. बोंब.– शर.
**बोंबाबोंब** स्त्री. भयंकर हाकाटी; आरडाओरड (अनर्थामुळे झालेली).
**बोंबा(ब)ळ** पु. गोंधळ; धांदल; दंगल; धुमाकूळ; गडबड; धामधूम (मेजवानी इ. मध्ये).
**बोंबाळणे** उक्रि. १. गोंधळात सापडणे; त्रासात अडकणे; गोंधळून, गडबडून जाणे. २. गोंधळ करणे; त्रास देणे; गडबड उडवून देणे; गोंधळात पाडणे.
**बोंबी** स्त्री. बेंबी. [सं.नाभि]
**बोंबील** पु. लाकडाला भोके पाडणारा भुंगा. (गो.)
**बोंबील** पु. १. माशाची एक जात. (हे ऑक्टो–नोव्हें. मध्ये पकडतात.) २. वाळवलेला मासा. [पोर्तु.बॉमेल]
**बोंबो** वि. वेडा; मूर्ख. (गो.)
**बोंब्या** पु. १. गयेतील पंड्या. हा यात्रेकरू आले की त्यांच्यापुढे बोंबा मारीत जातो. २. हाकारा करणारा नोकर : 'त्यांत बोंब्या निघून गेला ।'– ऐपो ५२. ३. (थोड्याशा दुखापतीमुळे, भीतीमुळे) मोठी ओरड करणारा; बोंबलणारा. ४. एक शिवी काम फत्ते करून न येणारा मनुष्य.
**बॉयलर** पहा : **बाष्पित्र**
**बौढणे** अक्रि. लयास जाणे.– हंको.

**बौद्ध** पु. १. विष्णूचा नववा अवतार. २. बुद्धाने स्थापन केलेला धर्म. ३. बौद्ध धर्मातील मनुष्य. [सं.] (वा.) **बौद्धावतार घेणे, धरणे**- कोणी कितीही वाईट केले तरी न रागावता, उपेक्षेने मौन धरणे. वि. बुद्धीने कल्पिलेले; कल्पित.

**बौले** न. बहुले : 'पढियेसी यादवांसहितु। बौलां बैस तू द्वारकेराया।'- धवळे उत्तरार्ध १३.

**बौहडा** पु. वृष्टी : 'हे भेटी नव्हे बौहडा। मेघांचा केला।'- माज्ञा ११.६७०. [सं.बहु]

**बौहे-टे** वि. बहुत; पुष्कळ : 'आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहे। तुम्ही संत घेतले असा बौहे।'- माज्ञा ९.१७. [सं.बहु]

**ब्या** उद्गा. ओरडणे; अगतिकत्वाचा, दीनपणाचा आवाज. (क्रि. करणे, होणे.) [ध्व.]

**ब्याडगा** पु. कुदळ. (जुन्नरी)

**ब्याणा-ना** पु. बयाणा-ना; सचकार. [हिं.] (वा.) ० **बांधणे**- अमुक किंमत आल्यास दुसऱ्याला विकावा नाही तर तो माझा असा एखाद्या वस्तूविषयी त्याच्या मालकाशी करार करून त्यावर आपला शिक्का मारणे.

**ब्याण्णव** वि. ९२ ही संख्या.

**ब्याद-ध** स्त्री. १. रोग; आजार. २. (ल.) पीडा; त्रासदायक गोष्ट; व्रात्य माणूस.

**ब्यायशी** वि. ८२ ही संख्या.

**ब्याहडा-डी** वि. १. बहुतेक पिकलेला (झाडावरील आंबा, फळ). २. जास्त पिकलेला व कठीण, निबर (हुरडा, धान्याचे दाणे).

**ब्याळ** पु. अर्धा आणा.

**ब्याळ, बेहाळ** वि.१. निंदक; शिवीगाळ करणारा (व.); खोडकर; अवलक्षणी. २. (मुख्यत्वे स्त्रियांमध्ये) बीभत्स बोलणारा. ३. विचकट (भाषा).

**ब्याळु** स्त्री. तिसऱ्या प्रहरचा फराळ. (नगरी)

**ब्र** उद्गा. चकार शब्द; अवाक्षर. (क्रि. काढणे) [ध्व.]

**ब्रम** पु. (शाप.) एक रासायनिक मूलद्रव्य; 'ब्रोमीन' यास प्रतिशब्द.

**ब्रश** पु. कुंचला-ली. (क्रि. करणे) [इं.]

**ब्रह्म** न. १. उपनिषदांमध्ये जगाचे मूळ कारण म्हणून सांगितलेले तत्त्व; सद्वस्तू. २. चार वेद. ३. (समासात) ब्राह्मण. ४. नवल; गूढ; अद्भुत किंवा कळायला अवघड गोष्ट. ६. ईश्वर; परमात्मा; आत्मा.[सं.बृह] (वा.) ०**मिळणे, सापडणे, हाती लागणे, प्राप्त होणे**- पराकाष्ठेची आश्चर्यकारक, उत्कृष्ट गोष्ट सापडणे.

**ब्रह्मकप(पा)ट** न. १. त्रासदायक; संतापजनक काम; पेच. २. पिच्छा न सोडणारे दुर्दैव. [सं.]

**ब्रह्मकपाळ** न. फार मोठा आकार. (खा.)

**ब्रह्मकाष्ठ** न. मांदार : 'गंडक्यादि शिळामूर्ती। कां कां दारु ब्रह्मकाष्ठव्यक्ती।'- एभा २७.९९. [सं.]

**ब्रह्मगाठ** स्त्री. १. जानव्याला दिलेली गाठ. २. नेमानेम. ३. (ल.) घोटाळा. ४. न मोडणारा संबंध.

**ब्रह्मगिऱ्हा-ऱ्हो** पु. ब्रह्मराक्षस : 'वेताळ खंडाळ लागला। ब्रह्मगिऱ्हो संचरला।'- दास ३.२.२८.

**ब्रह्मग्रह** पु. १. पहा : **ब्रह्मगिऱ्हा**. २. (ल.) वर्णसंकर; अत्यंत घोटाळा. [सं.]

**ब्रह्मघातक-की** वि. १. ब्रह्महत्या करणारा. २. (ल.) ब्रह्मद्वेषी. [सं.]

**ब्रह्मघोटाळा, ब्रह्मघोळ** पु. १.आचारविचारांची अव्यवस्था; जातिभेद; शुद्धाशुद्धता न पाळल्याने झालेला गोंधळ. २. (ल.) पराकाष्ठेचा गोंधळ.

**ब्रह्मघोष** पु. १. वेदघोष; मोठ्याने वेद म्हणणे. २. ब्रह्ममताचा (जगदीश्वरवादाचा) घोष, उपदेश. [सं.]

**ब्रह्मचर्य** न. १. चार आश्रमांपैकी पहिला, मुंजीपासून लग्नापर्यंतचा, विद्याग्रहणाचा काळ. २. स्त्रीसंग न करण्याचे व्रत; एकपत्नीव्रत. [सं.]

**ब्रह्मचारी** पु. १. मुंजीपासून लग्नापर्यंतच्या काळात सांगितलेले नियम पाळून विद्याग्रहण करणारा बटू; विद्यार्थी. २. स्त्रीसंग न करण्याचे व्रत पाळणारा. ३. (उप.) पूर्णपणे विषयलंपट, व्यभिचारी असूनही पावित्र्याचा दिमाख दाखवणारा. [सं.]

**ब्रह्मचोटली** स्त्री. फारच लहान पेटी, दागिना, ताट, भांडे इ.

**ब्रह्मजीवी** पु. वेद शिकवून व याज्ञिकी करून उपजीविका करणारा. [सं.]

**ब्रह्मझाट** न. (अश्लील) शष्प याअर्थी क्वचित प्रयोग. क्रिवि. काहीदेखील; थोडेही.

**ब्रह्मटाळी** स्त्री. १. योगाचा एक प्रकार; टाळीत म्हणजे डोक्याच्या वरच्या भागात आत्मा नेणे. २. (ल.) रेंगाळणी; दीर्घसूत्रीपणा. (क्रि. देणे, लावणे, मांडणे.)

**ब्रह्मताल** पु. (संगीत) एक ताल. यात २८ मात्रा व १४ विभाग असतात.

**ब्रह्मदंड** पु. प्रायश्चित्त; श्राद्ध; तीर्थविधी इ. च्या अधिकारासाठी ब्राह्मणाला देण्याचे द्रव्य. [सं.]

**ब्रह्मदंड-डी** पु. स्त्री. एक औषधी; काटेचुंबक; उंटकटारी; अधःपुष्पी. ही पारदबंध करते.

**ब्रह्मदिन** पु. १. ब्रह्मदेवाचा दिवस. २. वर्षप्रतिपदेच्या दिवशी केलेले गत व भावी मन्वादिकांचे श्रवण; वर्षफलवाचन. [सं.]

**ब्रह्मदेव** पु. १. ब्रह्मा; सृष्टिकर्ता. २. गावच्या सोनार, सुतार इ. नी बसवलेला व ब्राह्मण पुजारी असलेला ग्रामदेव; ब्राह्मणदेव. [सं.] (वा.) ०**होणे**- विवाहित होणे. (कर.)

**ब्रह्मनिर्वाण** न. ब्रह्मांडलय होऊन मूलतत्त्वाशी एकरूप होणे; मोक्ष. [सं.]

**ब्रह्मनिष्ठ** वि. ब्रह्मचिंतनात मग्न. [सं.]

**ब्रह्मपद, ब्रह्मपदवी** न. स्त्री. १.ब्रह्मनिष्ठतेचा अधिकार; पद; अतिशय उच्च स्थान.२. 'मी ब्रह्म आहे' ही अनुभूती घेतलेली अवस्था. [सं.]

**ब्रह्मपिशाच** न. पु. ब्रह्मराक्षस. [सं.]

**ब्रह्मपिसा** वि. ब्रह्मराक्षसाने झपाटलेला.

**ब्रह्मपिसे** न. ब्रह्मराक्षसाने झपाटल्यामुळे लागलेले वेड.

**ब्रह्मपीडा** स्त्री. १. अतिशय दुःख. २.(ल.) अतिशय पीडा, त्रास देणारा, द्वाड मनुष्य.

**ब्रह्मपुरी** स्त्री. बहुतांशी ब्राह्मणांची वस्ती असणारा गाव; विद्वान व तपोनिष्ठ ब्राह्मणांनी वसलेली जागा, गल्ली. [सं.]

**ब्रह्मप्रलय** पु. १. ब्रह्माच्या प्रत्येक शंभर वर्षांच्या शेवटी होणारा ब्रह्मदेवासह सर्व विश्वाचा नाश. २. (ल.) मोठा अनर्थ; संकट. [सं.]

**ब्रह्मप्राप्ती** स्त्री. ब्रह्मात जीवात्म्याचा लय; जीवाला होणारा स्वरूपाचा, मी ब्रह्म आहे असा साक्षात्कार. [सं.]

**ब्रह्मबंधु-धू** पु. भ्रष्ट व बहिष्कृत ब्राह्मण. [सं.]

**ब्रह्मबिंदु-दू** पु. (ल.) वेदपठण करताना उडालेली ब्राह्मणांची थुंकी. [सं.]

**ब्रह्मबीज** न. ब्राह्मणवीर्यापासून उत्पन्न झालेला कोणीही माणूस. [सं.]

**ब्रह्मभावना** स्त्री. सर्व चराचर ब्रह्म आहे असे मत; अद्वैतमताचा स्वीकार. [सं.]

**ब्रह्मभुवन** न. ब्रह्मदेवाचा सत्यलोक. [सं.]

**ब्रह्मभूत** वि. ज्याला जीव व परमात्मा किंवा ब्रह्म हे एकच असल्याचा अनुभव आला आहे असा. [सं.]

**ब्रह्मयज्ञ** पु. १. वेदाध्ययन. २. पहा : **ऋषियज्ञ** [सं.]

**ब्रह्मयोनी** स्त्री. काशीतील एका खडकातील लांब व अरुंद असे भोक. यामधून प्रत्येक यात्रेकरूला जावे लागते. जाताना जर तो मध्येच अडकला तर तो पापी असे समजतात. तेथेच रुद्रयोनी नावाचे दुसरे भोक आहे. [सं.]

**ब्रह्मरंध्र** न. ज्यातून मृत्यूनंतर आत्मा निघून जातो असे टाळूवरील गुप्त छिद्र. योगसामर्थ्याने जेथून प्राण नेता येतो असे मस्तकावरील गुप्त छिद्र; दहावे इंद्रिय. [सं.]

**ब्रह्मरात्र** स्त्री. ब्रह्मदेवाची रात्र. ही देवांच्या सहस्र युगांबरोबर असते. [सं.]

**ब्रह्मराक्षस** पु. ब्राह्मणाचे, विशेषत: विद्वान पण अभिमानी ब्राह्मणाचे पिशाच. [सं.]

**ब्रह्मरेखा-षा, ब्रह्मलिखित** स्त्री. न. १. ब्रह्मदेवाने प्रत्येक प्राण्याच्या कपाळावर लिहिलेले त्याचे नशीब, दैव. २. (ल.) खात्रीचे, निश्चयाचे बोलणे, भाषण, वचन इ. ३. कधीही न टळणारी गोष्ट. [सं.]

**ब्रह्मर्षि-र्षी** पु. ब्राह्मण जातीचा ऋषी. प्राचीनकाळी हा शब्द त्याच्या विख्यात पावित्र्यामुळे ब्राह्मणाला लावत. [सं.]

**ब्रह्मलोक** पु. ब्रह्मदेवाचा सत्यलोक.

**ब्रह्मवर्चस(स्व)** न. १. वेदाभ्यासामुळे, व्रतपालनामुळे उत्पन्न होणारे तेज, पावित्र्य. २. ब्राह्मणाची श्रेष्ठता. [सं.]

**ब्रह्मवाक्य-वाचा-वाणी** न. स्त्री. (ल.)अटळ, वठणारी वाणी.

**ब्रह्मविद्या** स्त्री. आत्मज्ञान. [सं.]

**ब्रह्मवीणा** स्त्री. १. एक विशिष्ट प्रकारची वीणा; नारदाची महती वीणा. २. मस्तक. [सं.]

**ब्रह्मवृंद** पु. १. ब्राह्मणांची सभा, त्यांचा समुदाय. २. (ल.) धर्मशीलतेने, विद्वत्तेने श्रेष्ठ असणारा ब्राह्मण. [सं.]

**ब्रह्मवेत्ता** वि. आत्मज्ञानी. [सं.]

**ब्रह्मशाला-ळा** स्त्री. वेदशाळा : 'केली जैसी वदनी। ब्रह्मशाळा।' - ज्ञा १७.२२२.

**ब्रह्मसमंध** पु. ब्रह्मराक्षस. [सं.]

**ब्रह्मसंपदा** स्त्री. दैवी संपत्ती.

**ब्रह्मसाम्राज्य** न. विस्तृत, बलाढ्य अधिराज्य; सम्राटाची सत्ता.

**ब्रह्मसाक्षात्कार** पु. 'मी ब्रह्म (आत्मा) आहे' असे ज्ञान.

**ब्रह्मसूत्र** न. १. ब्रह्मदेवाने केलेली व्यवस्था; ईश्वरी नेमानेम. २. जानवे; यज्ञोपवीत. ३. लग्नाबद्दलचा योग. ४. नवरानवरीची उंची मोजण्याचे सूत्र; प्रमाणसूत्र. [सं.]

**ब्रह्मस्थान** न. १. ब्रह्मदेवाच्या उत्पत्तीची जागा. २. बेंबी. ३. सहस्रदळकमळ; ब्रह्मरंध्र. [सं.]

**ब्रह्मस्व** न. १. ब्राह्मणाची मालमत्ता. २. ब्राह्मणाचे घेतलेले कर्ज. ३. (सामा.) कर्ज : 'त्याचे कालक्षेप चालत नाही, कमी जाहल्यामुळे ब्रह्मस्वही बहुत जाहलें' - समारो १.३३. [सं.]

**ब्रह्महृदय** न. एक नक्षत्रपुंज. [सं.]

**ब्रह्महत्या** स्त्री. १. ब्राह्मणाचा वध व त्यामुळे लागणारे पाप; महापातकांपैकी एक. २. (ल.) एकसारखे पाठीला लागलेले दुर्दैव. [सं.]

**ब्रह्मज्ञान** न. १. जगाचे कारण व आधार असलेल्या ब्रह्माचे ज्ञान. २. दैविक, आध्यात्मिक, विशुद्ध ज्ञान. ३. (ल.) फुकट शहाणपणाच्या गोष्टी. [सं.]

**ब्रह्मज्ञानी, ब्रह्मज्ञ** वि. १. ब्रह्म, आत्मस्वरूप जाणणारा. २. (उप.) लोकांना फुकटचे शहाणपण सांगणारा. [सं.]

**ब्रह्मा** पु. १. ब्रह्मदेव. २. २७ योगांतील पंचविसावा योग. ३. यज्ञातील श्रौत-स्मार्त, यागातील सर्व कर्मे यथासांग पार पाडण्याविषयी जबाबदारी वाहणारा व त्यांतील चुकांबद्दल प्रायश्चित्तरूप याग करणारा ऋत्विज. ४. अघटित गोष्टीही घडवण्याचे सामर्थ्य अंगी असणारा मनुष्य. ५. एक पिशाच. (गो.) [सं.]

**ब्रह्मा ॐ** पु. स्तुतिपाठ ; हरि ॐ : 'तंवं भाटीं ब्रह्माॐ केला। तेआं चैद्यांचा देशू पसायां दीहला।' - शिव १०२९.

**ब्रह्माकार** पु. जग आणि सर्व वस्तू ब्रह्मरूप आहेत असे मानणे. [सं.]

**ब्रह्मानंद** पु. १. ब्रह्माचे सुख. २. जीवाचा ब्रह्माच्या ठिकाणी लय झाला असता होणारा आनंद. ३. अत्यानंद; परमानंद. [सं.] (वा.) **ब्रह्मानंदी टाळी लागणे** - तंद्री लागणे.

**ब्रह्मासन** न. १. ब्रह्मचिंतन करायला योग्य असे शरीराचे आसन किंवा बसण्याची पद्धत. २. अष्टाधिकाऱ्यांपैकी एक; वर्तकीपणाचा हक्क. [सं.]

**ब्रह्मास्त्र** न. १. ब्रह्मदेवाचे अस्त्र; त्याच्या मंत्राने भारलेले शस्त्र अगर वस्तू. २. ब्राह्मणाचा शाप. [सं.]

**ब्रह्मांड** न. १. जग; चौदा लोक; विश्व. २. डोक्यावरची टाळू; ब्रह्मरंध्र : 'ब्रह्मांडी बैसली गोळी।' - ऐपो ८६. [सं.] (वा.) **ब्रह्मांडात न माणे, न मावणे** - अतिशय, असंख्य, अफाट मोठा असणे. वि. प्रचंड; विस्तृत; अमर्याद.

**ब्रह्मिष्ठ-ष्ट** वि. ब्रह्मचिंतनात मग्न. [सं.]

**ब्रह्मी** स्त्री. १. खरसांबळी नावाची औषधी वनस्पती. हिच्या शेंगा खातात. (को.) २. ब्रह्माची शक्ती.

**ब्रह्मीभूत** वि. स्वत: ब्रह्म झालेला; ब्रह्माशी एकरूप झालेला; मृत

(संन्यासी). [सं.]
**ब्रह्मोपदेश** पु. ब्रह्माचा निर्गुणध्यानात्मक पूजेचा उपदेश. [सं.]
**ब्रह्मो(ह्म)समाज** पु. बंगालमधील केशवचंद्र सेन यांनी स्थापन केलेला धर्मसुधारक पंथ.
**ब्रा** स्त्री. स्त्रियांचे उरोवस्त्र; काचोळी. [इं.]
**ब्राकेट** पु. १. तुळई, खांब यांच्यामध्ये बसवलेला लोखंडी किंवा बीडाचा धीर. २. कंस. [इं.]
**ब्राहुई** स्त्री. बलुचिस्थानातील एक द्राविडी भाषा.
**ब्राह्म** वि. १. ब्रह्मदेव व ब्राह्मण यासंबंधी (शस्त्र, तेज, मंत्र इ.). २. बंगालमधील केशवचंद्र सेन यांनी स्थापन केलेल्या ब्रह्मोसमाज नावाच्या पंथातील मनुष्य. [सं.]
**ब्राह्मण** पु. १. आर्यांच्या चार वर्णांपैकी पहिला वर्ण; द्विज. काही शब्दांपूर्वी हा जोडला असता उज्ज्वल, तेजस्वी असा अर्थ दर्शविला जातो. उदा. ब्राह्मणहिरा = पहिल्या प्रतीचा तेजस्वी हिरा. २. ब्रह्मस्वरूप जाणणारा : 'करितों ब्रह्मनिरूपण। जाणती ब्रह्मसंपूर्ण। तेचि जाणावे ब्राह्मण। ब्रह्मविद।'– दास ६.४.७६. ३. दैव अथवा पितृकार्यात भोजनाला आमंत्रित ब्राह्मणजातीचा मनुष्य. ४. भिक्षुक. ५. (ज्यो.) अभिजित नक्षत्र. [सं.] (वा.) **०घालणे–** ब्राह्मणाला भोजन देणे.
**ब्राह्मणकासोटा** पु. इतर जातीच्या स्त्रियांनी ब्राह्मण स्त्रियांसारखे नेसलेले वस्त्र. (राजा.)
**ब्राह्मणकी, ब्राह्मणजनकी** स्त्री. ब्राह्मण लोकांचे कर्तव्य, पद.
**ब्राह्मणघेवडा** पु. (सांकेतिक) बोंबीलमासा.
**ब्राह्मणचांडाल** पु. जातिबाह्य ब्राह्मण (अन्य जातीची स्त्री असलेला किंवा आई ब्राह्मण व बाप शूद्र असलेला मनुष्य). [सं.]
**ब्राह्मणजन** पु. ब्राह्मणाच्या घरी शागीर्दपणा करणारा ब्राह्मण; पाणक्या; धोतरबडव्या. [सं.]
**ब्राह्मणजाई** पु. ब्राह्मणापासून हलक्या, शूद्र जातीच्या स्त्रीच्या पोटी जन्मलेल्याची जात; त्यातील व्यक्ती.
**ब्राह्मणथर** पु. ब्राह्मणाला योग्य (कपडे इ.).
**ब्राह्मणदिव्य** न. पवित्र ब्राह्मणाचे पाय धरून घेतलेली शपथ. [सं.]
**ब्राह्मणदेव** (राजा.) पहा : **ब्रह्मदेव २**
**ब्राह्मणदोक** वि. ब्राह्मणाने आणलेले; उपयोग केलेले, स्पर्श केलेले (पाणी, भांडे, कोणतीही वस्तू).
**ब्राह्मणाई** स्त्री. १. ब्राह्मणाचे वर्चस्व, प्राबल्य, प्राचुर्य. २. ब्राह्मणजातीचा गर्व.
**ब्राह्मणाऊ** वि. ब्राह्मणाला योग्य, उचित, शोभणारा.
**ब्राह्मणी** स्त्री. १. ब्राह्मण जातीची स्त्री. २. (ल.) उपाहारगृह; चहाचे दुकान. (गो.)
वि. ब्राह्मणासंबंधी (चाल, वेष, भाषा इ.).
**ब्राह्मण्य** न. १. ब्राह्मणांचा समुदाय. २. ब्राह्मणपणा. [सं.]
**ब्राह्ममुहूर्त** पु. चार घटका रात्रीपासून सूर्योदयापूर्वीच्या दोन घटकांपर्यंतचा काळ. [सं.]
**ब्राह्मविवाह** पु. वरापासून काही मोबदला न घेता त्याला सालंकृत कन्यादान करण्याची विवाहपद्धती. [सं.]
**ब्राह्मी** स्त्री. सम्राट अशोकाच्या काळातील एक लिपी.
**ब्राह्मी** स्त्री. १. एक औषधी वनस्पती. अपस्मार व रक्तशुद्धीवर उपयुक्त. २. कित्येक झुडपांचे सामान्य नाव. [सं.]
**ब्रिदाईत** वि. ब्रीद पाळणारा.
**ब्री** स्त्री. एक प्रकारचे कापड. (गो.) [पोर्तु.]
**ब्रीद** न. १. व्रत; प्रतिज्ञा; शील; बाणा. २. बाण्याचे दर्शक चिन्ह (पदक, कडे, बिल्ला इ.) : 'पदीं राघवाचे सदां ब्रीद गाजे।'– राम २९. [सं.बिरुद]
**ब्रीद** स्त्री. जम; बस्तान : 'पुढेंहि दिवसांदिवस आपली ब्रीद होईल ऐसेहि भाव आहे.'– मइसा १०.१०३.
**ब्रीदावळी** स्त्री. एखाद्याची गुणवैशिष्ट्ये सांगणारी ओळ. [म. ब्रीद + सं. आवली]
**ब्रूस** पु. कुंचा; कुंचली. [इं.ब्रश]
**ब्रेक** पु. १. गाडी थांबवण्याचे साधन; अडकण; खरडी. २. दूरदर्शन इ. वरील कार्यक्रमातील छोटी विश्रांती. [इं.]
**ब्रॉडबँड** वेगवान संदेशवहनासाठी उपयुक्त प्रणाली. [इं.]
**ब्राँझ** न. तांब्याचे संमिश्र धातू. तांब्यात प्रामुख्याने टीन, जस्त, शिसे व निकेल हे धातू मिसळले जातात. [इं.]
**ब्रेड** पु. स्त्री. भाकरी; पाव. [इं.]
**ब्रेल लिपी** अंधांच्या उपयोगाची, उठावाची लिपी.
**ब्रोकोली** स्त्री. पानकोबीसारखी एक भाजी. [इं.]
**ब्लाऊज** पु. न. एक प्रकारचे पोलके. [इं.]
**ब्लासफेमी** स्त्री. ईश्वरनिंदा : 'हा ब्लासफेमि बोले गुर्वनु।'– क्रिपु २६.७३.
**ब्लेड** न. धारदार पाते. [इं.]
**ब्लँकेट** न. गरम पांघरूण; घोंगडी. [इं.]
**ब्लॉक** पु. १. जागा; खण. २. लाकडाचा ओंडका; ठोकळा; टोणका. ३. कायम ठशाचा ठोकळा; (इं.) प्रिंट. ४. आगगाडीचा एक भाग. [इं.]





**भ** मराठी वर्णमालेतील अडतिसावा वर्ण आणि चोविसावे व्यंजन.

**भ** न.१ (ज्यो.) नक्षत्र. २. मेष इ. बारा राशी. ३. भवन. [सं.]

**भक – ग.** पु. न. १. पिशाच, ग्रामदेवता इत्यादींना दिलेले अन्न, भक्ष्य; बळी. २. (अशिष्ट) खाद्य; भक्ष्य; अन्न. ३. अधाशीपणा; खादाडपणा; आहार. (गो.)

**भक(क्)कण–कर–दिनी–दिशी, भकाका, भका(क)भक–का** क्रिवि. एकदम जाळ पेटताना, धुरळा उडताना, धूळ, फक्की दूरवर जात असताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन.

**भकचे** सक्रि. १. अति खाणे. (गो.) २. पिशाच बाधेने रोडावत जाणे.(को.)

**भकणी– णे,भकलणी–णे** पहा : **बहकणी–णे**

**भकणे** अक्रि. तोंडास येईल ते बडबडणे;बकणे. [क. बगुळ]

**भक(ग)भक–ग** स्त्री. १.(मिरच्या, मिरे इ. खाल्ल्याने, लावल्याने होणारी) आग; जळजळ. २. भूक; वखवख. ३. त्रास.
वि. भयाण. (व.)

**भक(का)ल** न. अर्धा नारळ; नारळाचे शकल. (बे.) [क. व्हकळ]

**भकलणे** उक्रि. १. ढकलणे; टाकणे : 'तिएं लाजे चां सावासीं भकलिलीं।' – शिव ६०७. २. मनाला वाटेल तेव्हा निघून जाणे. (तंजा.) ३. गप्पा ठोकणे; काहीतरी बोलणे. (व.)

**भकलणे** क्रि. खाणे. [सं. भक्ष्]

**भका घेणे** बहकणे.

**भकाट–टी–ळी** न. स्त्री. १.उपवासामुळे खोल गेलेला शरीराचा, पोटाचा भाग; (पोटाची) खळगी. (क्रि. बसणे, पडणे, पाडणे.) २.अडगळ ठेवण्यासाठी भिंतीत ठेवलेली पोकळ जागा. ३. कुशी. [क. बक्क]

**भका(कां)द – ध** स्त्री. बहकणे. [हिं. बहकना]

**भका(कां)द्या–ध्या** स्त्री. कुचेष्टा; निंदा.

**भकान्या** वि. गप्पिष्ट. (व.)

**भकाभका** क्रिवि. जोरात; धडाकून (पेटणे, बोलणे इ.).

**भकारी** स्त्री. १. (ल.) भाकरी. २. भांग.

**भकावणी** स्त्री. बहकावणी.

**भकाविणे** सक्रि. १. कुमार्गाकडे नेणे; भलतीकडे नेणे. २. घाबरविणे; गोंधळून टाकणे. [हिं. बहकना]

**भकाशा मारणे** अक्रि. भयाण वाटणे. (व.)

**भकास, भक्क** वि. १. ओसाड; उजाड; निर्जन; शून्य (गाव, घर इ.). (क्रि. पडणे). २.भयानक; कंटाळवाणा; निरस; उदास. [क.बक्क]

**भकाळ** स्त्री. डोंगर, खडक याची बाजू खोल गेल्याने झालेला खळगा.

**भकाळणे** अक्रि. १. उपवासाने पोट आत, खोल जाणे. (राजा.) २. बखल पोटाचा असणे (मनुष्य).

**भकांडा – डी** पु. स्त्री. झोकांडा – डी. (क्रि. जाणे).

**भकिले** न. व्यर्थ बडबड.

**भकी** स्त्री. तावडी; पेच. (गो.)

**भकील भोजन** अन्नवस्त्र.

**भकूट** न. लग्न कर्तव्य असता वधूवरांच्या राशी, त्यांचे शत्रुत्व, मित्रत्व इ. पाहणे; घटित. [सं. भ = नक्षत्र + कूट]

**भक्कड** वि. निरस; भिकार; क्षुद्र; भुक्कड.

**भक्कम** वि. १. बळकट; घटमूट; दांडगा; दृढ; जंगी; मोठा (मनुष्य, वस्तू, ओझे, दागिना इ.). २. पुष्कळ; प्रचुर; विपुल; रगड.
[अर. मुह्कम;क. बख्खळ; त.वीक्कम]

**भक्कळ – ल** वि. खपाटीस गेलेले (पोट). पहा : **भकाट १**

**भक्त** पु. भजनपूजन करणारा उपासक; निष्ठावंत पूजक, सेवक; चाहता.
वि. भजलेला; सेविलेला. [सं.]

**भक्ति–क्ती** स्त्री. १. ईश्वरप्राप्तीचे एक साधन.हिचे नऊ प्रकार आहेत. २. पूजा; भजन. ३. अंतःकरणाची प्रवृत्ती; तत्परता; श्रद्धा (धर्ममार्गात). ४. आवड; प्रीती; शौक; आसक्ती; निष्ठा. ५. ऐक्य. [सं.]

**भक्तिमता–त्ता** स्त्री. आवड; जवळीक.

**भक्तिमार्ग** पु. १. भक्तीने मुक्ती मिळवण्याचा मार्ग, संप्रदाय. २. भक्तित्व; भक्तीने देवत्व मिळवण्याचा प्रकार. ३. विधी, कर्मकांड याला फारसे महत्त्व न देता केलेली उपासना.

**भक्तीण** स्त्री. १. भक्ती करणारी स्त्री; विशेषतः देवी, भैरोबा यांच्या देवळातील झाडलोट करणारी बाई. (हिच्या अंगी रोग बरे करण्याची शक्ती असते असे मानतात.) २. कलावंतीण.

**भक्त्या** पु. १. देवभक्त. २. देवऋषी.

**भक्या** पु. मोठा, प्रमुख वानर. (झाडी)

**भक्स(ग्स)ण – णी** स्त्री. क्षमा; माफी. (गो.)

**भखलणे** सक्रि. अवहेलना करून घालवणे : 'प्रेत बाहिरे घालिजे। कां अंत्यु जैसा भखलिजे।' – ज्ञा १७.१०६.

**भग** न. पु. १. क्षत; व्रण (मुख्यत्वे उपदंशापासून झालेला). २. योनी; स्त्रीचे जननेंद्रिय. [सं.]

**भग** न. ऐश्वर्य, लक्ष्मी, यश, औदार्य, ज्ञान आणि वैराग्य या सहा गुणांचा समुच्चय. [सं.]

**भग(गा)टणे** अकर्तृक क्रिया. उजाडणे : 'बाहीर बघितलं तर चांगलं भगटत आलेलं.' – गोता ३२.

**भगण** न. पु. १. मेषादी बारा राशी. २. नक्षत्रसमूह. ३. राशिमार्ग; ग्रहांना राशिचक्र आक्रमण्यासाठी लागणारा काळ. [सं.]

**भगत** पु. १.भजक; अनुयायी; उपासक. २. देवऋषी; देवस्की करणारा; ज्याच्या अंगात येते तो. ३. तुळजापूरच्या देवीचे तेली समाजाचे भक्त. [सं. भक्त]

**भगतकी** स्त्री. भगताचे विधी, मंत्र इ. कामे.

**भगद(दा)ड, भगदळ** न. १. मोठे भोक; जमिनीत पडलेला मोठा खड्डा; खिंड. २. जखम; व्रण.

**भगदेव** वि. (ल.) बाहेरख्याली (माणूस).

**भगपाळ** वि. विषयासक्त : 'चेल्यांचा सुकाळ। पिंडदंड भगपाळ।' – तुगा २८१९.

**भगभग** स्त्री. १. (मिरची इ.) तिखट पदार्थांच्या सेवनाने, स्पर्शाने उत्पन्न होणारी आग, जळजळ. २. (ल.) त्रास; उपद्रव; पीडा; रखरख. (क्रि. लागणे, करणे). ३. प्रकाशाची, उन्हाची तीव्रता, रखरख. [सं. भ्रस्ज्]

**भगभगणे** अक्रि. १. आग, जळजळ होणे (मिरे वगैरे उगाळून लावण्याने हात, तोंड यांची). २. जळणे (दिवे).

**भगभगीत** वि. १. तिखटजाळ; चरचरीत; दाह करणारा (मसाल्याचा पदार्थ, अन्न). २. गडद; डोळ्याला त्रासदायक वाटणारा; तीव्र (रंग, प्रकाश).

**भगर** स्त्री.१. वरी, सावा, बरटी इ. धान्य; वऱ्याचे तांदूळ. २.त्याचा भात. वि. कणयुक्त. (व.)

**भगरा, भगराळ – ळा** पु. १. कुसकरलेली, भुगा झालेली कोरडी स्थिती (भाकरी, पीठ, मिरी इ. ची). २. कोरडा भुगा; चुरा; कुसकरा. ३. डाळीचे पीठ लावून, परतून केलेली मुळ्याची भाजी.
वि. साधारण दळलेला; कुटलेला; वाटलेला; कुसकरलेला; कणयुक्त.

**भगराय** वि. सहज चुरा होणारे; मऊ.

**भगल** स्त्री. न. ढोंग; लबाडी; ढोंगी वर्तन. (क्रि. उडणे) [हिं.]

**भगल** पु. गोट्या खेळण्यासाठी जमिनीत केलेला खळगा. (ना.)

**भग (ग) ल** स्त्री. उपहास; थट्टा; फजिती. (क्रि. करणे, मांडणे, उडवणे.)

**भगलवणी** वि. अतिशय तिखट (माल).

**भगली – ल्या** वि. १. ढोंगी; दांभिक; कपटी. २. खुषमस्कऱ्या. ३. थट्टेखोर. (गो.)

**भगलेपण** न. रतिविलास; इष्क.

**भगवती** स्त्री. १. पार्वती देवी. २. तांबड्या मिरच्यांची पूड. ३. मृदंगावर वाजविण्याचा एक ठेका.

**भगवत्** वि. भगवान् (ईश्वर) या शब्दाचे समासात होणारे रूप. उदा. भगवत्कृपा = ईश्वरी कृपा. [सं.]

**भगवंत, भगवान** पु. १. परमेश्वर; देव; ऐश्वर्यादी सहा गुणांनी युक्त ईश्वर. २. अलौकिक सामर्थ्यवान ऋषी, साधू.

**भगवा** वि. कावेच्या रंगाचा. [सं. भृगु] (वा.) **भगवा – वे करणे, घेणे** – संन्यास घेणे.

**भगसणे** अक्रि. नष्ट होणे : 'जेयाचेनि उतरें दोस भगसती। हा कवणु खैंचा म्हणती।' – क्रिपु २.११०.

**भगसुचे** सक्रि. क्षमा करणे. (गो.)

**भगळ–ळी** स्त्री. चीर; भेग; भगदळ (जमिनीतील, इमारतीतील).

**भगळ, भगाड–स** स्त्री. न. १. मोठे ओबडधोबड भोक; खिंडार (भिंत, ताल, बंधारा यातील). २. रुंद तोंडाची जखम; क्षत.

**भगवळणी** वि. तिखट. (कु.)

**भगंदर, भगेंद्र** न. भगंदर रोगाचे क्षत.

**भगाटा** पु. रखरखाट; फुफाटा; धुरळा.

**भगाभगा** क्रिवि. चकमकत; तेजाळत.

**भगाला** पु. ७ – ८ फूट लांबीच्या लाकडी गजाला टोकदार टोपण लावून केलेले अस्त्र.

**भगास** वि. १. ओसाड; निर्जन; वसती नसलेले. २. आटोपशीर नसलेले. (तंजा.) ३. खिंडार. ४. मोठा व्रण.

**भगिनी** स्त्री. बहीण. [सं.]

**भगीरथ प्रयत्न** (भगीरथ राजाने स्वर्गातील गंगा पृथ्वीवर आणली यावरून ल.) पराकाष्ठेचा व विस्मयकारक प्रयत्न.

**भगुला** पु. ढीग. (व.)

**भगुले – णे, भगोनं** न. पातेले. (व.); छोटे भांडे. (माल.) [क. बोगुणि; सं. बहुगुण]

**भगेल** स्त्री. उपहास; विटंबना.

**भगोडा** वि. पळपुट्या. [हिं.]

**भगोल** पु. खगोल; विश्व.

**भग्न** वि. १. भंगलेला. २. उधळलेला; फोडलेला; नष्ट; बिघडलेला; नासलेला.३. पराभूत. पहा : **भंग** [सं. भंज]

**भजकाय** न. उपासना.

**भज(जे)डवणे** सक्रि. १. विधवेचे वपन करणे. २. (ल.) एखाद्याची खोड मोडणे.

**भजणूक** स्त्री. भजणे; भक्ती करणे; आराधना; जोपासना : 'हत्यारमात्रांची भजणूक विद्या संपादून...करीत जावी.' – बावडा दप्तर १.९७.

**भजणे** सक्रि. १. आराधणे; पुजणे. २. सेवा करणे . ३. आचरणे; अनुष्ठान करणे. ४. आदर बाळगणे; सत्कार करणे; मान देणे. ५. अवलंबणे; आश्रय करणे : 'परी जे विचारूनि पुनरावृत्ति। भजतीचि ना।' – ज्ञा २.१७६. ६. घेणे; अनुसरणे; संमत होणे : 'भजे जसी वृषा कपिला।' – मोविराट ६.५८. ७. लग्न लावणे : 'गांधर्वेंचि वरातें भजल्या।' – मोआदि १२.४२. ८. भजनी लागणे. ९.मैथुन करणे : 'वंध्येतें भजतां जरि फळ तरि येईल यश कुनीतीतें।' – मोशल्य ३.५४. ९. कबूल, मान्य करणे (विवरण, अर्थ, इ.). [सं. भज् = पुजणे]

**भजता – क** वि. भक्त; भजन करणारा.

**भजती** स्त्री. भजनाचा मार्ग : 'परि ते भजती उजरी नव्हे।' – ज्ञा ९. ३४५.

**भजन** न. १. आराधना; पूजा; सेवा. २. स्थापना करणे : 'करिति जनमेजयाचें अभिषेकुनि सविधि पितृपदीं भजन।' – मोआदि ५.८९. ३. नामस्मरण करून देवाची भक्ती करणे. ४. देवाचे स्तोत्र, गीत. ५. आर्जव, खुशामत, मनधरणी करणे. ६. (गणित.) भागाकार. [सं.](वा.) **भजनी, भजनास लागणे** – नादी लागणे.

**भजनगती** स्त्री. भक्तीचे स्वरूप.

**भजनपखडी** स्त्री. वारंवार केले जाणारे भजन.

**भजनशील** वि.भक्तिमान; धर्मनिष्ठ; कर्तव्यपरायण.

**भजनी** वि. १. भक्तिमान; धर्मनिष्ठ. २. धर्मभोळा; दांभिकाकडून सहज फसला जाणारा.

**भजनी भारुड** भजनोपयोगी अनेक रूपकात्मक पद्यांचा संग्रह.

**भजिनणे** सक्रि. पहा : **भजणे** १, ८

**भजे** न. हरभऱ्याचे पीठ भिजवून त्यात तिखट-मीठ घालून त्याचे लहान लहान गोळे तेला-तुपात तळून केलेले खाद्य; बोंड. [क. भज्जि; सं. भ्रस्ज्]

**भट** पु. लाकूड इ.पोखरून त्याचा नाश करणारा किडा. (गो.)

**भट** पु. मुख्य पिकातील इतर जातीच्या पिकाचे रोप.

**भट** पु. १. विशेषत: भिक्षुकीवर उपजीविका करणारा ब्राह्मण. २. जोशी; ज्योतिषी; गणक. ३. भिक्षुक ब्राह्मणाच्या नावापुढे लावायचा प्रतिष्ठादर्शक शब्द. ४. सारस्वतेतर ब्राह्मण. (गो.) [सं.]

**भट** पु. योद्धा; लढवय्या. [सं.]

**भटई** स्त्री. उन्हाळ्यात होणारे लहान व काळ्या रंगाचे वांगे.

**भटकणे** अक्रि. १. उगीचच हिंडणे, फिरणे. २. वाट चुकणे.[हिं. भटकना]

**भटकंती** स्त्री. निरुद्देश हिंडणे, फिरणे.

**भटकी** स्त्री. भिक्षुकी; पुरोहिताचा व्यवसाय.

**भटकभवानी, भटकभैरव** स्त्री. पु. भटकण्याची आवड असणारी स्त्री किंवा तसा पुरुष.

**भटकळ,भडंगळ** वि. भयाण; ओसाडपणामुळे भयंकर (घर, गाव).

**भटकी जमात** १. गुरांचे कळप घेऊन चराऊ रानांच्या शोधात भटकणारी जमात. २. पोटापाण्यासाठी वेगवेगळ्या ठिकाणी हिंडणारी जमात.

**भटके - क्या** पु.स्त्री.अव. रिकामे हिंडणे. (क्रि. मारणे, मारीत फिरणे.) वि. निरुद्योगीपणे भटकत राहाणारा (माणूस); कळप सोडून भटकणारे (जनावर); चुकार.

**भटगोसावी** पु. संसाराचा त्याग करून धर्मनिष्ठ बनलेल्या ब्राह्मणास आदर दर्शविण्यासाठी दिलेली उपाधी.

**भटजी** पु. सामान्यत: ब्राह्मणाला आणि विशेषत: वैदिकाला संबोधण्याचा शब्द.

वि. मिळमिळीत : 'कॅन्टीनमधलं भटजी जेवण नको आम्हाला.' - अक्षर ८५. [सं. भट्ट]

**भटपण, भटकी** न. स्त्री. गावचे उपाध्येपण.

**भटमार्ग** पु. महानुभाव पंथ.

**भटा** पु. धुरळा : 'फळ्यांच्या भोकांतून मातीचा भटा खाली येई.' - असे हे.

**भटा(ट्या)रखाना** पु. १. स्वयंपाकघर. २. जेवणावळीत किंवा मेजवानीत पवित्र व अपवित्र, उच्च व नीच किंवा वेगळा स्वयंपाक करणाऱ्या लोकांच्या मिश्रणाने होणारी अव्यवस्था. पहा : **भंडारखाना.** ३. खानावळ. [हिं. भटियारखाना]

**भटा(ट्या)री, भटियारी** पु. भटारखाना, खाणावळ चालवणारा. [हिं.]

**भटियार** पु. (संगीत.) एक राग. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर.

**भटी गंध** आडवे गंध (बहुधा भिक्षुक आडवे व गृहस्थ उभे गंध लावतात यावरून).

**भटुरगा-डा, भटोरा-बा** पु. (निंदेने) गुणहीन भटजी, भट.

**भटू(टो)र - रे** न. १. तांबे, कथील, जस्त इ. चा कृत्रिम धातू. २. अशा धातूचे पात्र; कांस्यपात्र.

**भटोरखाना** पु. (निंदेने) ब्राह्मणांचा समुदाय; ब्राह्मणसमूह.

**भटो(टु)रा** पु. मैद्याची रोटी. [पं.]

**भटोरी** वि. भटोर धातूचा, कृत्रिम धातूचा केलेला.

**भट्ट** पु. भाट (क्षत्रिय पुरुष व ब्राह्मण स्त्री यांचे अपत्य).

**भट्ट** पु. १. विद्वान, विद्यावान मनुष्य. २. विद्वान ब्राह्मणाला लावायची पदवी. ३. भट; भिक्षेवर निर्वाह करणारा मनुष्य.

**भट्ट** न. मोठे संकट. (तंजा.) [सं.]

**भट्टा** पु. आत विस्तव असून बाहेरून झाकलेले मातीचे भांडे; मातीची शेगडी. [हिं. बहटा; सं.भृष्टि]

**भट्टा** पु. १. मुलांच्या खेळात, इतर लहान वस्तूला मारण्यासाठी घ्यायचा मोठा दगड. २.कोय, बी वगैरे. ३.गट्टा. [ध्व.]

**भट्टी - टी** स्त्री १. चुलाण. २. लोहाराची साळ; सामान्यत: विस्तवाच्या भोवती केलेले मातीचे आवार (हलवायाचे, भडभुंज्याचे); धोब्याच्या सतेल्याच्या चुली; औद्योगिक क्षेत्रात वापरली जाणारी, मोठ्या प्रमाणात उष्णतेचा पुरवठा करणारी प्रणाली. ३. भपकारा. ४. (ल.) भट्टीत तयार केलेले द्रव्य, एकदा तयार केलेले परिमाण, घाणा. ५. तयार करण्याची युक्ती, खुबी, पद्धती, रीती, रचना, घडण, ढब. ६. (केळी, विड्याची पाने इ.) पिकवण्यासाठी त्याभोवती गवत, केळीचे पान इ. गुंडाळून दाबून किंवा लिंपून ठेवण्याची क्रिया. ७. दारूचा कारखाना, गुत्ता. [सं. भृष्टि; हिं.](वा.) **० उतरणे, ०दुरुस्त उतरणे** - सिद्धीस जाणे; साधणे; समाप्त होणे.**० बिघडणे, बिनसणे** - एखाद्या गोष्टीत क्रमभंग, चूक इ. झाल्यामुळे ती जशी व्हायला हवी तशी न होणे. **० भरणे** - बनाव, कारस्थान करणे. **० साधणे** - १. स्वयंपाक, पदार्थ उत्तम साधणे. २. एखादे काम करण्याची खुबी, हातोटी साधणे.

**भट्टीकुंभार** पु. कुंभारावरील कर.

**भट्टीखुमार, भट्टीदारू** स्त्री. न. दारू, मद्य तयार करण्याऱ्यावरील कर.

**भट्टेभर** न. कडब्याच्या शंभर ते एकशेपन्नास पेंढ्या. (व.)

**भट्या** पु. स्वयंपाकी; आचारी.

**भट्या रंग** निळसर वांग्यासारखा एक रंग.(माळवी) [हिं. भटा = वांगे]

**भट्यारी** पु. भटारखान्याचा मालक.

**भड** न. कणीस काढून घेतलेले ज्वारीचे ताट; कडबा; कापसाच्या शेतातील ज्वारीचा धांडा. (व.)

स्त्री. हलके व जळताना तडतडणारे जळण. [ध्व.]

**भड** वि. इतरांहून वेगळा उठून दिसणारा, ओळखला जाणारा (पत्ता).

**भड-ड्ड** न. पत्त्यांच्या खेळातील गुलाम म्हणून ओळखला जाणारा पत्ता.

**भडक** स्त्री. १. चकाकी; झळाळी; चमक. (क्रि. मारणे) २. आग.

वि. १. चकचकीत; भबूक; झळकदार; घवघवीत; तेजस्वी चकाकणारे (सोने, रुपे इत्यादींनी)(तांबड्या व पिवळ्या रंगाची वस्तू, पदार्थ) अशा तऱ्हेचा, रंगाचा पोशाख घालणारा. २. विशेषकरून लाल ह्या शब्दास जोडतात. जसे : - लालभडक. विशेषकरून तिखट या शब्दास जोडतात. ३. उत्तान; असंस्कृत. [हिं.]

**भडक आग, भडकाग्न - ग्नि** पहा : **भडाग**

**भडकण-कन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. १. (कोंडा, पूड, विस्तव इ.) एकदम उधळताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. पहा : **भडभड** . २. झटकन; जलद; पटकन; फटकन.

**भडकणी** स्त्री. भडाडणे; उधळणे; आग पसरत जाणे.

**भडकणे** अक्रि. १. भडाडणे; भयंकर रीतीने वर जाणे व पसरणे; मोठ्या जोराने पेटणे (ज्वाळा); जोराने उठणे (वारा). २. चोहीकडे पसरणे (प्रकाश, वास). ३. भग्न होणे. [सं. अभि+दह् +अकच]

**भडकणे** अक्रि.१. पांगणे (सैन्य). २. बुजणे; बेबंद पळणे (पशू); बुजून दूध देईनासे होणे (दुभते जनावर ). ३. मोकळे,स्वैर वागणे; आज्ञाभंग करणे. ४. बावचळणे. ५. फार रागावणे. ६. भलतीकडे उडून जाणे (निरोप नेणारे कबुतर). ७. पहा : **सुटणे** ३. ८. भटकणे; हिंडणे; फिरणे; भटक्या मारणे. [सं. भटभटायते]

**भडकतेल** न. खरजेवर लावायचे एक तेल, मलम. पहा : **घायतेल**

**भडकदार** वि.चकचकीत; डोळ्यांत भरण्यासारखा (दागिना,पोशाख इ.).

**भडकळ** न. दबा धरून बसण्याची जागा.

**भडका** पु. १. भडाड; मोठी ज्वाळा; आगीचा पेट. २. भयंकर आग; दाह (तिखट पदार्थ खाल्ल्याने, ज्वर, पित्त, क्रोध वाढल्याने होणारा). ३. वाऱ्याचा सोसाटा. ४. जोराची चपराक. ५. आवाज होणारा भपका (भुसाचा, भुकण्याचा). [ध्व. भड] (वा.) **भडक्या मारनं** - १. दाह होणे; जखमेच्या आत दुखणे. २. मत्सर वाटणे. (अहि.)

**भडकावणी** स्त्री. १. फिरवणे; भटक्या मारावयास लावणे (चकवून, कावेबाजपणे). २. उत्तेजन; फूस.

**भडका(क)विणे** सक्रि. झकवणे; छकविणे; ठकविणे; भोंदणे.

**भडका(क)विणे** सक्रि. १.(आवाज होईल अशी) तोंडात मारणे; चपराक देण. २. फेकणे; झुगारणे : 'भरोनिया स्मरारिमित्रें। भडकाविलीं दुष्टांवरी।' - ह २६.१६. [ध्व. भड्; सं. बर्ह]

**भडकी** स्त्री. १. उत्तेजन; भर; चिथावणी. (क्रि. देणे) २. उडीवर उडी घालून बोलणे (विक्रीच्या पदार्थांकरिता). (क्रि. देणे, करणे.)

**भडकी** स्त्री. (करडीचे) तेल काढण्याची रीत.

**भडकीव** वि. १. भित्रा; बुजरा (पशू). २. बुजलेला; बिचकलेला.

**भडखळ-ळी** स्त्री. १. रणभूमी : 'भडखळीं राहुनि घे आदळु। विचारेंसीं।'- भाए ३६४. २. पहाऱ्याची जागा.

**भडखंबा-भा** १. रणभूमीवर शेंदूर लावून उभा केलेला खांब; विजयस्तंभ : 'तैसा प्रमदाचा भडखंबा। पुतळियेचेनि मिसें कीजे उभा।'- भाए ३६०. २. वीरगळ. [सं. भट+स्तम्भ?]

**भडडड** क्रिवि. तोफांच्या एकसारख्या होणाऱ्या बारांच्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.]

**भडबंबाणे** न.अव. हावभावयुक्त भाषणे, चर्चा इ.

**भडभड - डा** क्रिवि. १. (मोठ्याने ओकणे, जखमेतून रक्त घळघळा वाहणे, भळभळ पाणी ओतणे, निरर्थक निंदा, धमकावणी, बडबड करणे, वाटेल त्या बाजूने लोकांनी जलदीने घुसणे, जलद पेटणे, मोठ्याने धडकणे, अमर्याद खर्च करणे इ. क्रियांचे अनुकरण होऊन) झटकन; पटकन; फटकन. २. तोफेच्या आवाजाचे अनुकरण होऊन. (क्रि. वाजणे, उडणे). [ध्व.]

**भडभड (डा) णे** अक्रि. १. भडाडणे (विस्तव). २. मोठ्याने पेट घेणे (घर, जळण इ.). ३. पुष्कळ जोराने व आवाज करून वाहणे, फळफळणे; उफाळणे. ४. वाटेल ते बडबडणे. (वा.) **भडभडून येणे**- दु:खाने ऊर, अंत:करण भरून येणे.

**भडभडा** क्रिवि. १. गटागट : 'अन्नमीखें भडभडां। आगी चि खाए।' - ज्ञा १७.१४७. २. विचार न करता, मोकळेपणाने (बोलणे).

**भडभडा - ड्या** वि. मनास येईल ते विचार न करता बोलून टाकणारा.

**भडभडाट** पु. १. आगीचा अतिशय भडका, डोंबाळा. २. दणका; धडाका; तडाखा; गर्जना (तोफा, वादळ, शिवीगाळ, निंदा यांचा); मोठा, गंभीर व एकवटलेला गोंधळाचा आवाज, गोंधळ. ३. दंगलीची, मजलसीची मौज, आनंद करणे. ४. उसंत न घेता, न थांबता मारणे. (तंजा.)

**भडभडीत** वि. फटफटीत; चकचकीत; स्वच्छ.

**भडभसक** न. आडमाप. (व.)

**भडभुंजा** पु. चुरमुरे इ. भाजके पदार्थ तयार करणारा, विकणारा.[हिं.]

**भड(डि-डे)मार** पु. जोराचा व मोठा हल्ला; एकसारखा मारा (तोफा, बंदुका, दगड, निंदा, अपशब्द यांचा).

**भडवळ** स्त्री. जमिनीतील भेग, चीर.

**भड(डु)वा** पु. १. कलावंतीण नाचत गात असताना मृदंग वाजवून तिला साथ करणारा तिचा नोकर, साजिंदा. २. (ल.) कुंटण्या. ३. (अश्लील) स्त्री भाड्याने देणारा. ४. (ग्राम्य) एक शिवी; अपशब्द. [सं. भर्याट; हिं. भडुआ; बं. भेडुया]

**भडवेगिरी** स्त्री. (शिवी) भडव्याचे, कुंटणपणाचे काम.

**भडषबाणे** न. हावभावयुक्त भाषणे; कोटिक्रम; चर्चा : 'तार्किकांची भडषबाणें। तैसी बोलसी परपक्षदूषणें।' - उगी ५८४.

**भडस-सा** न. १. भडका; भडाड; लोट; पूर; आधिक्य. २. उदय; उत्कर्ष. ३. महत्त्व; थोरपणा : 'एऱ्हवी ब्रह्मेपणाचिये भडसें। न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे।' - ज्ञा ८.१५२. ४. उमाळा. [क.]

**भडस-सा** स्त्री. उत्कट इच्छा; हाव : 'परि माझी पुरवी भडस।'-उगी ६४३. वि. ओबडधोबड. [सं. भ्रष्ट]

**भडस** स्त्री. १. शेतजमीन भाजण्यासाठी तीवर पसरलेले जळण (काटक्या, पाने, गवत इ.). (क्रि. भरणे) २. भडभुंज्याने पोहे इ. भाजण्याकरता चुलीत घातलेले हलके, तडतडणारे जळण. (को.)

**भडस - शा** न. एक प्रकारचे जाड व कमी प्रतीचे भात; भाकरीच्या उपयोगी भात.

**भडसाची दाढ** झाडाच्या टहाळांची दाढ. हे टहाळ जमिनीवर पसरून शेणाच्या दाढीप्रमाणे यावरही गवत पसरावे लागते.

**भडंग** स्त्री. १.चुरमुऱ्याचा चिवडा, भत्ता. २.चुरमुरे.

**भडंग-गा** वि. दिलदार; उधळ्या. [हिं.]

**भडंग** पु. मोठा पतंग. (व.)

**भडाग-ग्न-ग्नी** पु. स्त्री. १. प्रेतास, चितेस मंत्र न म्हणता दिलेला अग्नी. २. तिखट, झोंबणाऱ्या पदार्थांच्या सेवनाने होणारा दाह.

**भडागी** स्त्री. अतिशय भूक.

**भडाड** पु. १. आगीचा भडका; डोंब : 'हो कां जे महाप्रलयींचा भडाडु।'- ज्ञा ११.३०४. २. तोफा, मेघ इ. चा गडगडाट.

**भडाडणे** अक्रि. १.भडकणे; धडधडा जळू लागणे. २. दणकणे; धडाडणे; मोठा आवाज करणे. ३.जोराने वाहणे; उफाळणे. (रक्त इ.)

**भडाडणे** अक्रि. गायब होणे : 'निवाऱ्यास आलेलें पुन्हां कोठें भडाडलें.'- गोघ.

**भडाडा, भडाभड-डा** क्रिवि. जलद, झपाट्याने व लागोपाठ पडणाऱ्या

वस्तूंच्या आवाजाचे, मोठ्याने पुन्हा पुन्हा ओकण्याच्या आवाजाचे, तोफ्यांच्या दणक्यांचे, निंदा, धमकावणी व शिव्यांचा वर्षाव, तुफानी वारा इ. आवाजाचे अनुकरण होऊन.

**भडाळ्या** वि. सैल हाताचा; उधळ्या.

**भडिमा** पु. दंभ.

**भडिमार** पु. वर्षाव.

**भडू** पु. मोठा वानर; वानरांच्या कळपातील नर. (व.) [हिं. बडा]

**भडेराक्षस** पु. राक्षसी, रानटी;(उप.) क्रूर हृदयाचा मांग माणूस.

**भडोची** वि. रुपयाचा एक प्रकार.

**भडोड – डू** पु. अन्न. [प्रा.]

**भडोळ – ळी** स्त्री.भडवळ; चीर; भेग (जमिनीतील). (को.)

**भडौनि** स्त्री. उखाण्यातील सांकेतिक अश्लिलता व शिवराळपणा : 'मध्य भारतात या प्रकाराला भडौनि म्हणतात.' – लोरू २६८.

**भड्की** स्त्री. दंडारीचा एक प्रकार. (झाडी)

**भड्डा** पु. सुपारीचा एक प्रकार. (झाडी)

**भड्डी** वि. माळजमीन. (गो.)

**भड्डूचे, भरडूंचे** क्रि. भरड दळणे; भरडणे. (गो.)

**भड्या** पु. लुटारू. (माळवी) [हिं.]

**भणकणे** अक्रि. बिघडणे; फिरणे. (व.)

**भणका** पु. १. घोळका (माश्या, मधमाश्यांचा). २. (ल.) गुणगुणणारा आवाज; (सामान्यत:) घुमणारा नाद. [सं. भण्]

**भणक्या** स्त्री. अव. निरर्थक हिंडणे, फिरणे; भटकी. (क्रि. मारणे)

**भणणे** क्रि. म्हणणे; बोलणे. [सं. भण्]

**भणदी – दे** स्त्री. न. १. विस्तव घालून डोक्यावर घेतलेले खापर; भदे : 'नाहीं जाळीत भणदीं। उदो म्हणोनि आनंदी।' – तुगा १८१६. २. पोत; मशाल.

**भण(न)भण(न)** स्त्री. १. गुणगुण आवाज. २. ओसाडी; भयाणपणा (जागेचा). ३. सोसाट्याचा वारा; अशा वाऱ्याचा आवाज. [ध्व.] (वा.) ० **करणे** – १. शून्य, भयाण, ओसाड दिसणे (घर, निर्जन अरण्य, गाव). २. घो घो करणे (माशा इ.). ० **फिरणे** – स्वैरपणे इतस्तत: हिंडणे; भटकणे.
वि. ओसाड.

**भणभण** स्त्री. लखलखाट.

**भणभण – णां** क्रिवि. गुणगुण आवाजाचे, वाऱ्याच्या सणसण आवाजाचे अनुकरण.

**भणभणणे** अक्रि. १. गुणगुणणे; घोंघावणे (मधमाश्या, माश्या यांचा थवा). २. (ल.) दाणादाण होणे; दशदिशा पळ काढणे (सैन्याने). ३. झणझणणे; सणसणणे (मार, रोग यामुळे कान इ.). ४. वाजणे; गरजणे (वारा, तोफ). ५. डोक्यात, कानात भणभण असा आवाज होणे. ५. गडबडणे; गोंधळणे.

**भणभणणे** अक्रि. चकचकीत, पूर्ण उजाडणे; दिशा उजळणे (सूर्य, चंद्र उगवताना).

**भणभणाट** पु. १. गुणगुणाट; कानठळ्या बसवणारे घोंघावणे. २. शून्यता; उदासपणा; भयाणपणा; ओसाडपणा (रिकामे घर, गाव, अफाट अरण्य यांचा).

**भणभणि(णी)त** वि. १. रिकामेपणामुळे, ओसाडपणामुळे उदास, शून्य दिसणारा (ओसाड गाव, इमारत). २. सूर्य, चंद्र यांच्या उगवण्याने प्रकाशित झालेली (दिशा).

**भणभण्या** वि. निरर्थक हिंडणारा; भणभण फिरणारा.

**भणंग(भिकारी)** वि. दरिद्री; भिकारी; क्षुद्र; हलका. [क. बणगु = क्षुद्र, हलका माणूस]

**भणाट(ण)णे** अक्रि. मोठ्याने गुणगुणणे; घोंगावणे, सणसणणे, वाजणे, गरजणे इ.

**भणाटा–ण–णा, भनाना** पु. १. भणभणाट.२. पळापळ; पांगापांग; दाणादाण. ३. (विरू. भणाटा) पराकाष्ठेची घालमेल; अव्यवस्था (कामाची, धंद्याची). ४. नाश; ओसाडी : 'पवन घनांचा तसा, करि भणाण।' – मोद्रोण १५.२७. ५. कानठळ्या बसवणारे घोंगावणे.

**भणाण** क्रिवि. भणभण शब्द करून; घो घो आवाज करून.

**भणाणणे** अक्रि. १. कलकलणे; गोंधळ होणे (डोक्यात). २. भणभण आवाज करून वारा वाहणे.

**भणिजणे** सक्रि. म्हणविणे : 'जें स्थान सेविती स्त्री पुरुखु। अद्यापि भणिजताति।' – ऋ २३.

**भणिति** स्त्री. छोटी कविता; चारोळी : 'सहज एखादी लहानशी भणिति (epigram) असो...त्याने...मनोवृत्ति उचंबळली पाहिजे.' – विवा १३.

**भणितु – त** न. बोललेली, उच्चारलेली गोष्ट.
वि. बोललेले; म्हटलेले.

**भणीये** न. सांगितलेले काम करणारा; सेवक : 'तुम्हां एकु भणीये गा।' – लीचक्र.

**भत(त्त,द)का** पु. १. हलक्या हाताने केलेला प्रहार; धपका; गुद्दा; ठोसा. (क्रि. मारणे, देणे). २. फेकलेला गोळा; बदका; लपका (शेणाचा). (क्रि. मारणे, घालणे). [ध्व.]

**भत्ता** पु. १. विशेष नोकरीसाठी ठरावीक पगारापेक्षा अधिक दिलेले वेतन; खेरीज मुशाहिरा (लढाईवरील सैन्याला, नोकराला, हमालाला). २. ज्याच्याकडे सरकारी कामगार पाठवलेला असतो त्याने त्या कामगाराला ठेवलेल्या दिवसाबद्दल द्यायची पोटगी, प्रवासखर्च. ३. सावकाराने दिवाणी तुरुंगात ठेवलेल्या माणसाला सावकाराकडून मिळणारा खर्च. ४. कैदी, कोर्टात साक्षीकरता येणारा साक्षीदार, समन्स बजावणारा पट्टेवाला यांचा पोटगी खर्च. ५. निकृष्ट प्रतीचे खाणे; डाळे, मुरमुरे असे एकत्र केलेले खाद्य. ६. देणगी. [क. भत्ते;हिं.]

**भद** न. मडके. (व.)
वि. १. बधीर. २. खोटा.

**भदकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. अनेक आकस्मिक आणि जलद क्रियांच्या, भडकणाऱ्या विस्तवाच्या, जोराने पडणाऱ्या जाड व मऊ गोळ्याच्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.]

**भदभद** स्त्री. फुटक्या भांड्याचा आवाज.

**भद(दा)भद–दा** क्रिवि. बदबदा; तीव्र, जलद आणि लागोपाठ होणाऱ्या

आवाजाच्या, तडा गेलेल्या, फुटलेल्या वाद्याच्या आवाजाचे, मऊ गोळा पडताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.]

**भदरपीडा** स्त्री. १. त्रास; दुःख. (व.) २. खरडपट्टी. (व.)

**भदरंचामी** स्त्री. बोडंती; खरडपट्टी. (ना.)

**भदाड** न. १. भगदाड; खिंडार. २. (सामा.) भोक.

**भदाड – डे** न. १.(सामा.) तोंड फुटलेले मडके. (व., कुण.) २. भगदाड; भोक. (वा.) ० **वासणे** – मोठ्याने रडणे.

**भदाड्या** वि. १. स्थूल; लठ्ठ. २. सैल. (झाडी)

**भदांड** न. १. भांडे. २. मोठा नाद. (व.)

**भदु(दा) ला** वि. फोपसा; लठ्ठ झालेला.

**भ(भं)दे** न. १. अर्धे मडके, खापर. २. आत विस्तव घातलेले खापर. गोसावी, गोंधळी लोक हे डोक्यावर घेऊन विशिष्ट प्रसंगी नाचतात. (क्रि. घेणे). ३. वाकलेले, फुटलेले भांडे, टिमकी, कर्कश कंठ, कठोर आवाज, नासलेले–बिघडलेले काम, धंदा यांना निंदेने म्हणतात. [सं. भद्रम्] (वा.) ० **उडणे, होणे** – वाटोळे होणे; सर्वथैव नुकसान होणे. ० **घेणे** – शेताच्या, गावाच्या वादग्रस्त सीमेवर जाऊन तेथे वरील प्रकारचे खापर हातात घेऊन शपथविधी करणे. **(तोंडाचे) भदे करणे** – शिवीगाळ करणे.

**भदेभर** वि. (निंदार्थी) पुष्कळ.

**भदैवी** स्त्री. कृपा; दया.

**भदो** वि. १. बावळट .२. एक शिवी. (झाडी)

**भद्या** वि. गलेलठ्ठ. (व.)

**भद्र** पु. हत्ती. [सं.]

**भद्र** न. १. भाग्य; शुभ; कल्याण. २. देवळाच्या सभामंडपाच्या दोन खांबांच्या मधील भाग. ३. मुख्य मंडपाच्या चारी बाजूस असलेले उतरत्या छपराचे सोपे प्रत्येक; सायवान. ४. सभागृह; दिवाणखाना; मंत्र्यांची कचेरी : 'भद्रासि दैत्यसुदनी एतां जाला।' – शिव २३०. ५. राज्य; सिंहासन : 'इकडे राव बैसला भद्रीं।' – कथा १.८.८०. वि.१. भाग्यवान; सुखी; भला. २. मंगल; प्रसन्न; अनुकूल. ३. (सामा.) हितावह; चांगला. [सं.]

**भद्रकरण** न. मौजीबंधन हा विधी. (व.)

**भद्रजाति–ती** पु. १. हत्ती; उत्तम जातीचा प्राणी. २. उत्तम घोडा. ३. उत्तम कुळातला माणूस.

**भद्रदंती** स्त्री. प्रवाळ वनस्पती.

**भद्रमुस्त, भद्रमोथा** पु. एक सुवासिक गवत; नागरमोथा. [सं.भद्र + मुस्ता = मस्तक]

**भद्रलोक** पु. महाजन; शिष्ट लोक.

**भद्रं(द्रा)करण** न. (मूळ संस्कृत शब्दाचा चांगले करणे असा अर्थ आहे. मराठीत उप.) १. भादरणे; कडक तासडपट्टी; हजामत. २. शिवीगाळ.

**भद्रा** स्त्री. १. (ज्यो.) सातवे करण (अनेकवचनी उपयोग). पहा : **करण** ४. २. शुक्ल पक्षातील द्वितीया, सप्तमी, द्वादशी या तिथी. या अशुभ मानल्या जातात. भद्राकुयोग. [सं.] (वा.) ० **नक्षत्रावर जन्मणे** – अभागी, दरिद्री असणे. (व.) **कपाळी भद्रा असणे** – लाभ होण्याची वेळ असता दुर्दैवाने हानी होणे.

**भद्रासन** न. व. १.सिंहासन; तख्त. २. भक्तांचे आसन; योगासन. [सं.]

**भद्राक्ष – क्षी** पु. एक वृक्षविशेष आणि त्याचे फळ. याच्या बीजाचे मणी करतात. हे बी रुद्राक्षासारखेच पण काहीसे हलके व जास्त ठिसूळ असते. [सं.]

**भद्र्या, भद्र्या कपाळाचा** वि. अभद्र लक्षणाचा; कपाळकरंटा; दुर्दैवी.

**भनक** स्त्री. १. सुगावा. २. अंदाज. ३. संशय.

**भनकं** न. अर्धवट काम; खदखद. (व.)

**भनाना** पु. हाहाकार.

**भन्नाट** वि. अनावर; अफाट.

**भन्नाविणे** क्रि. पिटणे; मारणे. (व.)

**भन्नी** स्त्री. मराठी लोकांची हिशेबाची एक पद्धत. (तंजा.)

**भन्भन्** स्त्री. अस्वच्छता. (झाडी)
क्रिवि. उदासवाणे. (व.)

**भप(ब)कन** क्रिवि. अकस्मात आणि मोठ्या आकारात (जाळ होणे, पेटणे).

**भप(ब)का, भप(ब)कारा** पु. १. आकस्मित आणि जोराची झळ (अग्नी, उष्ण वारा, वाफ यांची). २. वाऱ्याच्या झुळकीने, उधळण्याने मिरच्या, मसाला, वगैरेंच्या भुकणीचा, सुगंधाचा नाकातोंडात शिरणारा लोट. ३. थाटमाट; ऐट; दिखाऊपणा; श्रीमंतीचे प्रदर्शन.

**भपारी** स्त्री. गप्प; बात. (व.)

**भपुरा** पु. १.सूज (शरीरावर आलेली); सुजलेले अवयव; (सामा.) फुगीर वस्तू. २. मोठा आव; डौल. ३. पुरुषाचे जननेंद्रिय.
क्रिवि. जलद व मोठ्या फुगाऱ्याने. [ध्व. भप]

**भप्प–प** क्रिवि. सोसाट्याने; भपकाऱ्याने; झपाट्याने.

**भबकणी** स्त्री. १. भडकणी; फुगवण; सोसाट्याने (वाऱ्याचे) वाहणे; वाघ इ. नी टाकलेल्या धापा. २. एखादे वाईट काम करण्याबद्दल एखाद्यास दिलेले उत्तेजन. ३. उठावणी. (क्रि. देणे)

**भबकणे** अक्रि.१.उठाव होऊन जलद सर्वत्र पसरणे (आग, भुकणी, मिरे, वारा, धूळ, बातमी इ.). २. सोसाट्याने वाहणे (वारा). ३. धापा टाकणे; गर्जना करणे (उडी मारताना वाघाने, संतापलेल्या माणसाने). ४. संतापणे; तोंडाचा पट्टा सोडणे. [हिं. भबकना; सं. बह]

**भब(प)कारा** पु. मद्य किंवा अर्क काढण्याचे यंत्र; आसुतिपात्र; शुंडायंत्र.

**भब(प)की** स्त्री. १. झळ (अग्नी इत्यादींची); भपकारा; दरवळ (मिरपूड इत्यादींचा). २. (ल.) वदंता; भुमका. (क्रि. उठणे) ३. उठावणी; चिथावणी; उत्तेजन. (क्रि. देणे, दाखवणे.) ४. किंमत चढवणे, वाढवणे. (क्रि. करणे) ५. धमकी. ६. बढाई; ऐट. ७. फुंकारा; सुस्कारा.

**भबूक** वि. चकचकीत; भडक; झकपक; लकलकीत; घवघवीत (तांबड्या, पिवळ्या रंगाचा पदार्थ). लाल शब्दाला लावतात.

**भभकार** पु. गर्जना. (व.)

**भय** न. १. भीती; धास्ती; दहशत. २. भीतीचे निमित्त; धोका; जोखीम; संकट. ३. भंग; नाश; मरण. [सं.]

**भयकुडा** वि. भित्रट. (व.)

**भयगंड** पु. (मा. शा.)एक मानसिक विकृती; रोग्याच्या मनात एखाद्या विशिष्ट वस्तूची, जागेची किंवा परिस्थितीची बसलेली आत्यंतिक भीती.

**भयचकित,भयभीत–र–रू** वि. प्रचंड, अत्यंत भ्यालेला.

**भयप्रदर्शन** न. १. भीतिदायक वस्तू पुढे दाखविणे, ठेवणे. २. भिववण्यासाठी ठेवलेली कोणतीही वस्तू; बुजगावणे.

**भयरी** वि. शूर. – ऐपो.

**भयशील, भयाळू** वि. भीरू; शंकेखोर; भ्याड; भित्रट.

**भयसान** वि. भयंकर; भीतिप्रद.

**भयं(य)कर** वि. भय निर्माण करणारे; घोर; दारूण; जबरदस्त.

**भयाण** न. उदासवाणा, भीती उत्पन्न करणारा ओसाडपणा (ओस पडलेल्या घराचा, भयंकर अरण्याचा).

वि. ओसाड; उदास; उजाडीमुळे भयोत्पादक; घोर.

**भयानक** पु. नवरसांपैकी एक.

वि. भयंकर; घोर; दारूण; भयोत्पादक; भेसूर; भीतिदायक.

**भयानकदृष्टि–ष्टी** स्त्री. (नृत्य.) एखादी भयंकर गोष्ट किंवा एखादे भयंकर श्वापद दृष्टीस पडले असता पापण्या निश्चल करून बुबुळे वरच्या बाजूस घालवणे व बाहुल्या चंचल करणे. हिचा उपयोग भयानक रसात करतात.

**भयानथुतरा** वि. कुरूप; बावळट. (व.)

**भयाना–नी** वि. बावळट; वेडा; नादिष्ट.

**भयाभंग** वि. दाणादाण; अस्ताव्यस्तपणा; नाश. (वा.) **भयाभंगास जाणे** – उद्‌ध्वस्त नष्ट, भग्न होणे (राज्य, सैन्य, संपत्ती).

**भयाभया** क्रिवि. शूद्र वृत्तीने; दीनपणाने. (क्रि. करणे, फिरणे.)

**भयावह–सूर,भ्यासूर,भयांकृत** वि. पहा : **भयंकर, भयानक**

**भय्या, भय्यन** पु. भाऊ; पुरभय्या जात. पहा : **पुरभय्या** [हिं.]

**भर** पु. १. पूर्णता; प्राचुर्य; उत्कर्ष; सीमा; वैपुल्य; कळस; पर्व; ऊत; लोट; बहार; रंग (धान्य, तारुण्य, आरोग्य, मान, संपत्ती, खेळ, उद्योग यांचा). २. आवड; कल; मनोवृत्ती (उद्देश, इच्छा, प्रवृत्ती, आवड यांची). ३. बार (बंदुकीचा). ४. माज; मस्ती; कामुकावस्था (पशूंची). ५. भरते; उत्तेजन. ६. आवेश; उत्साह; डौल : 'उभे सडे फौजेंत भरानें।' – ऐपो २६७. ७. सपाटा : 'होतां द्विज भोजन भर दुंदुभिचा पळहि तो न रव राहे।' – मोअश्व ५.१३. ८. भार; ओझे. ९. (दुखण्याचा) जोर; (शोकाचा) आवेग. १०. नाद; फंद. (गो.)
स्त्री. १. भरती; भरताड (गलबताचे, गाडीचे); बुजलेली स्थिति; बूज (तालीची, जाड भिंतीची); पूरण; उणीव भरून काढणे (संख्येची, परिमाणाची). २. आधिक्य. ३. भरून काढण्यासाठी टाकलेली माती, दगड इ. (झाडांच्या मुळांवर, बांधाच्या, भिंतीच्या मध्ये). ४. पूरण; पूर्ण करण्यासाठी मिळवलेली वस्तू, संख्या, परिणाम, तुकडा इ. उदा. रकमेची भर. ५. बैलगाडीत उंच रचून मावणारा कडब्याचा, चाऱ्याचा ढीग. [सं. भृ = भरणे, पोसणे, भर] (वा.) **भरी घालणे, देणे**– एखादी गोष्ट करण्यासाठी उत्तेजन देणे; नादी लावणे. **भरी पडणे** – कोणतेही काम करण्यास एखाद्याच्या आग्रहाने साहाय्यक होणे, भुलून जाणे. **भरी भरणे** – १. पहा : **भरीस पडणे.** २. भिडेने येणे. **० होणे** – हावभरी, बेफाम होणे. **भरीस उतरणे** – समजूत करून घेणे; कल्पना होणे, वाटणे. **भरीस पडणे** – १. अतोनात नादी लागणे; (एखादी गोष्ट, काम, मनुष्य इ. च्या) अडचणी, कमीपणा भरून काढण्यासाठी आयुष्य वेचले जाणे; खर्च होणे; नष्ट होणे; गडप, ग्रस्त केले जाणे. २. विनाकारण हट्टाला पेटणे. **भरून येणे** – १. (शोक) विसरणे. २. (जखम) पूर्ण बरी होणे. **भरोन जाणे** – गर्विष्ठ होणे; फुलून जाणे.

क्रिवि. १. (शब्दाच्या पुढे जोडल्याने) पर्यंत; इतका; पूर्णपणे. उदा. तोळाभर, कोसभर. इ.; साद्यंत, इथून या अर्थी. उदा. तिथून पृथ्वीभर, गावभर इ. २. शब्दाच्या मागे जोडल्यास परममर्यादेपर्यंत; पूर्णतम, उच्चतम स्थितीत असा अर्थ होतो. उदा. भरअम्मल – आकार – हंगाम इ.

**भरअमली** वि. पूर्णत्वाने सरकारच्या अमलाखाली असणारा (गाव, जिल्हा, तालुका इ.).

**भरउभर** स्त्री. १. भरणे व उपसणे, ओतून टाकणे. २. भरणे, रिते करणे. उदा. एखादा पदार्थ घेताना मापणे व खात्रीकरता पुन्हा मापणे. ३. (ल.) (वाईट अर्थाने) उठावणी; मन वळवणे; (मत, विचार, उद्देश यांची) छाप बसवणे. ४. एखाद्या गोष्टीची चर्चा करणे.५. (ल.) मिळवणे व गमावणे, खर्च करणे.

**भरकट(ड)णी, भरकांडणी** स्त्री. झपाट्याने उरकणे; झपाटणे.

**भरकट(ड)णे, भरकांडणे** सक्रि. घाईने व कसेतरी करून टाकणे; झटक्यासरशी उरकणे; झपाटणे; रगडणे; खरडणे; कसेतरी लिहिणे, नांगरणे, रेखाटणे, सारवणे इ. [सं. भृ + कृष्]

**भरकटणे** अक्रि. १. वाहत जाणे; तर्क करत सुटणे. २. खरडणे.

**भरक(कं)डा** पु. लिहिण्यातील फरगडा, फाटा.

**भरकण–कन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. १. पक्षी बसल्या जागेवरून एकदम उडण्याच्या, गवत एकदम भडकताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. २. एका क्षणात, झटक्यात, पळात.

**भरकवळ्या** पु. (गुऱ्हाळ) चरकात प्रथम ऊस घालणारा मनुष्य.

**भरकस** वि. भरगच्च; वजनदार.

**भरका(कां)ड** न. १. जलद व आवाज करून जळणारे जळण. २. रुक्ष आणि भिकार जमीन; ओलावा न धरणारी जमीन.

**भरकांडा** पु. १. गिरकी; चक्कर. (क्रि. मारणे) २. फेरा, गिरका; भोवंडा. (क्रि. मारणे) ३. (ल.) गिरकांडा; भोवरा; घोटाळा; चक्रव्यूह (आत या शब्दासह. क्रि. सापडणे, पडणे, घालणे, पाडणे). ४. घेरा; वेढा (भिकारी, तगाददार यांचा). (क्रि. घालणे) ५. झोत; लोट (वाऱ्याच्या झटक्याचा). ६. रगडणी; झपाटणी (नांगर, लेखणी, केरसुणी, कुंचली झपाट्याने फिरवून होणारी); जलद, झपाट्याने वाचणे, बोलणे, म्हणणे; लिहिताना झपाट्याचे विरखुडणे. (क्रि. मारणे, ओढणे, घेणे.)

**भरकुंब–कू(खू)म** वि. १. स्थिर, गंभीर, शांत प्रकृतीचा. २. पुष्कळ. (राजा.)

**भरकोंडा** पु. कणकेतील तूस (कु.); डाळीचा चुरा. (व.)

**भरखुम** वि. भरभक्कम. (गो.)

**भरखुमी** स्त्री. स्वभावाची स्थिरता; विचारीपणा; गांभीर्य.

**भरगच्ची–च्च** वि.१. सोनेरी, रुपेरी, कलाबतू ज्यात फार विणली आहे असे (कापड, अशा कापडाच्या अंगरखा.) २. पूर्णपणे, ओतपोत भरलेले (भांडे इ.)

**भरग(गी)त** स्त्री. १. भरती; भरताड (गाडीचे, पोटाचे). २. भरून घेणे (धक्का, बंधारा, जाड भिंत). ३. पूरण; पूर्तता (संख्या, परिमाण यांची). न. १. बारदान; भरताड; ओझे; आतील जिन्नस (गलबत, गाडी इ. च्या). २. पूर्ण. (को.)

**भरगोळी** स्त्री. गोळीचा टप्पा (लांब पल्ल्याच्या बंदुका, तोफा यांच्या). क्रिवि. गोळीच्या अंतरावर, टप्प्यात.

**भरघोस** वि. भरगच्च; भरपूर.

**भरघोसाने** क्रिवि. प्रतिष्ठा न गमावता; ऐटीने : 'भरघोसानें श्रीमंत त्यावर पुण्यास येतां क्षणीं।' – ऐपो ३९६.

**भरचक्का** वि. चांगल्या वस्तूंची चंगळ असणारी (मेजवानी); तब्बल; ओकारी येण्याइतके; यथेच्छ (भोजन); चिकार; दाट भरलेला; गडगच्च; प्रचुर; विपुल (जेवण, अलंकार, वस्त्र, आंबे, पीक, पाऊस, हंगाम).

**भरचौक** स्त्री. घोड्याची भरधाव चाल.

**भरजणे** अक्रि. भाजून काढणे.

**भरजमा** स्त्री. सर्व जमाबंदी (देश, गाव यांची – सादिलवार; बूड इ. च्या वजावटीच्या पूर्वीची); वेगवेगळ्या खात्यांवर खर्च करायच्या रकमा बाजूस काढण्याच्या पूर्वीचा गावचा वसूल.

**भरजमीन** स्त्री. पूर्ण धारा असलेली जमीन; जिच्यावर पूर्ण धारा दिला किंवा घेतला जात आहे अशी जमीन.

**भरजरी** वि. पूर्णपणे सोन्यारुप्याच्या कलाबतूचा केलेला (कपडा, गोंडा).

**भरजवानी, भरजा(ज्वा)नी** स्त्री.१.ऐन उमेदीचे वय. २. तारुण्याचा भर.

**भरझ्याल** स्त्री. घोड्याची एक चाल; घोड्याचा परमावधीचा वेग.

**भरड** पु. स्त्री. १.सांजा; पिठाचे जाड कण; भरडा. २. भरडलेली डाळ, धान्य .

स्त्री. १. आखूड व जाड दोरी; ती बांधून ओझे ओढत नेण्याची क्रिया. (क्रि. भरणे, घालणे.) २. रवण; रांग; माळ (गुरे, सैन्य यांची). ३. पाल्हाळ; चऱ्हाट. (गो.)

न. डोंगराळ जमीन; टेकड्यांमधील नापीक प्रदेश; माळ जमीन. (राजा.) वि. १. जाड दळलेले (धान्य). २. जाडाभरडा (कपडा इ.).

**भरडकुमेर** स्त्री. डोंगराच्या उतरणीवरील रान तोडून तेथील जमिनीत वरकस धान्ये पिकवण्याची शेतीची पद्धत. – सह्याद्रीच्या पायथ्याशी ३०५. (गो.)

**भरडण–णी** न. स्त्री. १.भरडण्यास घेतलेले धान्य. २. जाड, कणीदार दळण.

**भरडणे** सक्रि. १. जाड दळणे. २. (ल.) सरासरी व ओबडधोबड रीतीने करणे; भरकटणे. ३. त्रास देणे; जुलूम करणे.

**भरडबुंजा** वि. गचाळ; घाणेरडा. (व.)

**भरडा** पु. १. कळणा; भरडलेले तांदूळ व उडीद, इतर डाळी यांचे मिश्रण. २. भरडलेली डाळ, धान्ये.३. भाद्रपदात पिकणारा कुळीथ. – कृषि ३२७.

**भरडाव** पु. १. ऐन रंगात आलेला डाव. २. वजीर इ. मूल्यवान बुद्धिबळे अद्याप मारली गेली नाहीत असा डाव; हुकमाची पाने अद्याप टाकली गेली नाहीत असा पत्ते, गंजिफा यांचा डाव.

**भरडी** वि. भरडलेली (डाळ, धान्य, औषधी मसाले, चुना); भरड्याची केलेली (थुली, भाकरी, पोळी, औषध).

**भरडी** स्त्री. १. भात भरडण्याचे जाते; घरट. २. कण्हेर; कण्यांचा पातळ भात; पेज.(को.)

**भरडीव** वि. भरडलेले (धान्य, डाळ).

**भरण** न. बाण : 'भाता भरणे भरिली होती' – उह १८७२.

**भरण** स्त्री. १. रांग; ओळ.(ना.) २. भरून काढण्याकरता आत घातलेले, मिळवलेले द्रव्य. (राजा., कु.)

न. १. भरणे; खांबाचा माथा आणि पिढे, तुळई या दोहोंमध्ये भरलेला लाकडाचा तुकडा.(खा.) २. पोषण; पालन : 'तया एक जाणैं फळ। देह भरण।' – ज्ञा १८.५६४. ३. वेतन; निर्वाहसाधन. ४. एका वेळी दिव्याचे टवळे, तळणाची कढई यात घातलेल्या (तेल, तूप इ.) द्रव्याचे परिमाण; (बायकी) समईत जाळण्याकरता वापरले जाणारे तेल. ५. भरणे या अर्थी विशिष्ट ठिकाणी वापरतात. उदा. घट, भांडे इ. भरणे; दिव्यास तेल, जात्यास दळण, बागेत पाणी इ. पुरवणे, झाडाच्या बुंध्याशी मातीचे ढीग घालणे. (क्रि. करणे, घालणे). ६. दूध काढण्याची चरवी; भांडे; कळशी; घागर : 'दुभली क्षीर संतोषोन। भरणें दोन तये वेळीं।' – गुच २२.४८.७. माप भरणे; मापणे. ८. भरलेली, पूर्ण केलेली स्थिती. ९. एखाद्या पदार्थाच्या पोटात भरण्याचे द्रव्य; पुरण; सारण (करंज्या, पोळ्या यांचे). १०. साठा. ११. आयुष्य : 'अगा या दोन्ही सैन्यासीचि भरण पुरलें।' – ज्ञा ११.४९९. १२. भरती; भरणे : 'वायुमेघांचे भरण भारी।' – हंको. १३. समुदाय : 'भोगिजती शब्दादिकें। विषयभरणें।' – ज्ञा १५.३६०. [सं. भृ = पोसणे](वा.)

० **उघडणे** – उत्कर्ष होणे.

**भरणदाज** वि. चांगले भरलेले आणि भक्कम (पीक, कणीस, दाणा, पेंढी इ.); धष्टपुष्ट; ऐवजदार (मनुष्य).

**भरणपत्र** न. बोटीने पाठवण्याच्या मालाची तपशीलवार यादी, माल ताब्यात घेतल्याची पावती व माल (आकस्मिक अडचणी सोडून) सांगितलेल्या तारखेला व ठिकाणी पोचविण्याची हमी दाखवणारा कागद.

**भरणपोषण** न. पालनपोषण; सांभाळ.

**भरणा** पु. १. पूर्ण करणे; भरणे; भरती; जमा करण्याकरता जमवाजमव. २. पूर्ण केलेली स्थिती, भरती. ३. पूर्णपणे भरणे; (तिजोरी, पेढी इ. ठिकाणी) भरलेले पैसे इ. ४. भरधारा. (क्रि. लावणे, बसवणे, ठरवणे). ५. जमाव; एकत्र मिळालेला समुदाय, संख्या. ६. पहा : **भरण** ६

**भरणावळ** स्त्री. १. माल, वस्तू भरण्याची मजुरी, मोल. २. माल भरणे.

**भरणिका, भरणुके** स्त्री. न. मातीचे लहान भांडे.

**भरणी** स्त्री. १. पहा : **भरणे** सक्रि. २. भरण्याच्या वस्तू (माती, धोंडे इ.); भर. ३. सामग्री. ४. वस्ती. – शर. ५. खारीच्या काठास दरवर्षी वाहून गेलेल्या ठिकाणी बाहेरील बाजूने मातीची भर देणे. – कृषि २४५. [सं. भृ]

**भरणी** स्त्री. निर्मिती.

**भरणी** स्त्री. १. सत्तावीस नक्षत्रांपैकी दुसरे नक्षत्र. २. भरणी श्राद्ध.

**भरणी चौथ** पहा : **चौथभरणी**

**भरणीश्राद्ध** न. मृततिथीपासून बारा महिन्यांच्या आत भाद्रपद महिन्यात भरणी नक्षत्रावर करायचे मृताचे श्राद्ध.

**भरणे** सक्रि. १. पूर्ण करणे. २. बुजवणे; भरून काढणे (खळगा, रिकामी जागा, व्यंग). ३. आत, वर घालणे, ठेवणे (भरीत, भरताड,पुरण); ठासणे (बार). ४. आत ओतणे (रस, भुकटी, धान्य, वाळू इ.). ५. सर्वत्र माखणे, लिंपणे (तेल, तूप, चिखल, काजळ इ. सामान्यतः अपवित्र, घाणेरड्या वस्तूंनी). ६. पूर्ण करणे (कच्चे आकार, आराखडे, रकाने, घरे, तक्ते, कोष्टके इ.). ७. भरणा करणे (देणे असलेले पैसे इ. चा). ८. तूट, तोटा पूर्ण करणे. ९. घालणे; लेणे (दागिना – गोट, बांगड्या इ.). १०. पुरा करणे (दिलेला वेळ, वायदा). ११. (सुतारी) तयार करणे (बाज, खुर्ची इ.). (खा.) १२. मारणे; भोसकणे : 'पळतां तदुर्री शर शीघ्र भरी।' – मोरा हररमणीय रामायण २०.

अक्रि. १. अंगाने जाड, दमदार, दळदार होणे (शरीर,फळे, दाणे); भरून जाणे (कणीस); बरोबर असणे; तंतोतंत होणे (ठरावीक संख्या, परिमाण यांच्याइतके). ३. पूर्ण, पुरा होणे (मुदत, काल). ४. जड आणि बधिर होणे (श्रमाने, बसण्याने गुडघे, पाय इ.). ५. भरून निघणे (विहीर, खाच); भरून येणे; मठारणे व भरून जाणे (बरी होत जाणारी जखम, क्षत). ६. लपून बसणे; शिरणे; घुसणे (काटा, बाण इ.) : 'व्यूहीं भीम, त्रिपुरीं जसा हरशर भरे।' – मोभीष्म ७.७. ७. संचरणे : 'दोघे पत्री पार्शी गुंतुनि भरले उडोनि गगनींच।' – मोउद्योग ५.५५. ८. भरती येणे : 'कां चंद्राचेनि पूर्णपणें। सिंधू भरती।' – ज्ञा १३.१३८. ९. जमणे; एकत्र होणे, मिळणे; केला जाणे (बाजार).

उक्रि. १. पात्रात समाविष्ट करणे; भांड्यात घालणे. २. गच्च करणे. ३. रंग देणे (चित्र, कोष्टक यांना). [सं. भृ = भरणे]

**भरणेकरी** पु. १. तिजोरीत, पेढीवर पैसे भरणारा मनुष्य. २. पुंजीवाला.

**भरणेपावती, भरणेयाद** स्त्री. भरलेल्या, पुरवलेल्या वस्तूंची (पैसे, द्रव्य, माल इ.ची) पावती.

**भरणेवाईक** वि. (पैसे, ज्ञान, गीते, गोष्टी, हिकमती, युक्ती इ.चा) भरणा, साठा असलेला.

**भरणेवाहिक** पु. भरताड; केवळ भरण्यासाठी परंतु प्रत्यक्ष नालायक असा माणूस.

**भरणँ** न. दमा. (गो.)

**भरण्याचा** वि.१. उपयुक्त अशा वस्तू, कला यांचा साठा असलेला.२. पहा : **भरतीचा**. ३. भरणेवाईक. ४. कमाली दराने, भर धाऱ्याने फाळलेली (जमीन).

**भरत** पु. १. नट. २.पगारी शिपाई.

**भरत–ती** न. तांबे, जस्त, कथील इ. धातू मिसळून केलेला कृत्रिम धातू. [सं.भृ]

**भरत–ती** न. १. पूर्णपणे भरलेले किंवा साठवलेले बारदान. २. एका माणसाला वाहून नेता येईल एवढ्या वजनाचे ओझे; एखाद्याने वाहून आणलेले ओझे.

**भरतक** न. १. पुरण; पुरे करणे (संख्या, परिमाण). २. भरतगत; बारदान; भरताड. ३. सामान लादणे; भरणे (गलबत, गाडी यात).

**भरतकाम** न. कापडावर नक्षी, कशिदा काढण्याची कला; आकृती काढून ती दोऱ्यांनी, तारांनी भरण्याचे काम; जिगाचे काम.

**भरतवाक्य** न. समाप्ती; शेवट; अखेरी (नाटकाच्या शेवटी भरतवाक्य म्हणतात यावरून).

**भरतशास्त्र** न. १. नाट्यशास्त्र; नाटक व अभिनय यावरील भरतमुनीकृत प्रमाणभूत ग्रंथ. २. नाटक व त्याचे प्रयोग यांचे नियम. [सं.]

**भरताचे भांडे** विशिष्ट मापाचे, परिमाणाचे भांडे.

**भरताड** स्त्री. १. सामान लादलेला तांडा (गलबते, गाड्या, पशू. इ. चा). २. वरीलप्रमाणे लादलेली, भरलेली स्थिती. ३. पाणरहाटाचे भरून वर येणारे लोटे. ४. निरुपयोगी वस्तू, सामान.

**भरती, भरिते** स्त्री. १. समुद्राच्या पाण्याचा चढ. हा विशेषतः चंद्राच्या आकर्षणाने दररोज दोनदा (सुमारे १२ तास १५ मिनिटे इतक्या अवकाशाने) होतो. २. चढाई : 'गिलचांची झाली भरती।'– संग्रामगीते ६९. ३. पुरण; भरण; लादणी. ४. पूर्ण भरल्याची, लादल्याची स्थिती (गलबत, गाडी). ५.नोंदणी (सैन्य, मजूर इ.). ६.(ल.) भरभराट; वृद्धी. [सं.भृ]

**भरतीचा** वि. १. पूर्ण करण्यास, भरण्यास लावलेला, पाहिजे असलेला. २. फक्त परिमाण, संख्या पूर्ण करण्याच्या, खळगा, जागा भरून काढण्याच्या लायक (वस्तू).

**भरतीर** पु. बाणाचा टप्पा.

क्रिवि. अमुक अंतरावर.

**भरतुंड** न. मातीचा ढीग. (व.)

**भरतूक** न. १. भरीत; बारदान; भरताड. २. ओझे वाहून नेण्याबद्दलचे भाडे.

**भर(रि)ते** न. १. पुरतेपणा; पूर्णता; पूर्ती (गुन्हा, पाप, अन्याय यांची); पराकाष्ठा (ताप, अव्यवस्था इत्यादिकांची); सीमा (शीण, आजार, दुःख यांची) ; सहनशक्तीपर्यंतची मर्यादा; दाहाची पूर्ण संवेदना (शैत्याची-मुख्यत्वे ज्वरापूर्वी होणारी); उमाळा; भरती (शोक, दुःख, आनंद इत्यादींची). (क्रि. येणे); पहा : **भर** १. २. समुद्राच्या पाण्याचा चढ. ३. वृद्धी :'इतरांच्या जाळाया भरतें सुकृताधनातमा येतें ।'– मोमंभा ३.१४.

**भरत्या** पु. वरण शिजवण्यासाठी काशे अथवा पितळ या धातूचा केलेला जाड लोटा.

**भरदपट** स्त्री. घोड्याची एक चाल.

**भरदार** वि. १.चांगला भरलेला; दळदार; गरभरू; ठसठशीत. २. पूर्ण वाढ झालेला; पिळदार (माणूस, घोडा, छाती, दंड इ.).

**भरदौड–धाव** क्रिवि. पूर्ण वेगाने.

**भरन** न. औत जमिनीत रुतावे म्हणून त्यावर वजन म्हणून ठेवलेला दगड.

**भरनं–णे** न. तांब्याची कळशी. (व.)

**भरनकशी, भरनक्षी** वि.१.पूर्ण नक्षीचा (काठ); अशा काठाचा (कपडा).

२. अतिशय कोरीव काम असलेला. (स्तंभ, छत, चौकट इ.).
**भरनवती** स्त्री. ऐन तारुण्य; हिमतीचा कळस.
**भरपल्ला** पु. माणूस, जनावर इ.चा पूर्ण वेग; पूर्ण वेगाची चाल.
**भरनाटा** पु. रट्टा; तडाखा.
**भरपाई-यी** स्त्री. १. परतफेड; पूर्णपणे देऊन टाकणे; पुरे, पूर्ण करणे. २. भरपावतीची रसीद; प्रायः भरपाई भरून पावलो (हे शब्द लिहून) केलेला करार. ३. भरपावती (येणे असलेल्या रकमेची, सालाची).
**भरपासनं** पूर्वीच्या वखराला लागून केलेली वखरण. (व.)
**भरपितळ** वि. पितळ, कलाबतू लावून शोभिवंत केलेले (पायताण, वहाण).
**भरपूड** न. वाहणाऱ्या फोडावर, उठाणूवर (हवेत उघडे पडल्याने) येणारी पातळ त्वचा. (क्रि. धरणे, फुटणे, वाहणे, निचरणे, गळणे.) अशा रीतीने बंद झालेला फोड.
**भरपूर** वि. १. पूर्ण भरलेले; भरून काढलेले; चोंदलेले. २. प्रचुर; मुबलक. ३. गंभीर; भरघोस (आवाज).
**भरपेट** वि.भरपूर.
**भरपोशाख** पु. विशिष्ट दिवशी किंवा प्रसंगी घालायचा पोशाख; खास पोशाख.
**भरबादली** वि. पूर्णपणे सोन्याच्या, रुप्याच्या कलाबतूचा केलेला (गोंडा, कपडा, कापड).
**भरबिंदु-दू** पु. आकाशातील क्रांतिवृत्ताचे विषुवापासून अतिदूरचे बिंदू. - सूर्य २१.
**भरभक्कम** वि. १. भरपूर; मुबलक. २. पूर्ण भरलेला; आकंठ. ३. मजबूत.
**भरभर** स्त्री. भरभराट; उत्कर्ष; बहर; कळस; भर. ( क्रि.होणे, चालणे) : 'हरिदासगृहींची उदंड भरभर ती ।'- मोसभा १.११.
**भरभर-रा** क्रिवि. १. जलदीने; झपाट्याने; गडबडीने. २. झपाट्याच्या व सपाट्याच्या आवाजाचे अनुकरण होऊन अथवा झपाट्याची क्रिया होऊन. [ध्व. भर]
**भरभरणे** अक्रि. १. कडकड आवाज करून जळणे (वाळलेले गवत, झुडपे, काटे); झपाट्याने जळून जाणे; चेतणे; पेटणे. २. चक्कर आल्यासारखे वाटणे; भणभणणे (डोके). [ध्व.भर]
**भरभरणे** अक्रि. (दैव, नशीब, विधी) इष्ट, अनुकूल होणे.
**भरभराट** स्त्री. पराकाष्ठेची भरभर अथवा उत्कर्ष.
पु. मोटारचा, इंजिनाचा आवाज.
क्रिवि. जोराने; वेगाने. [त. बर्बराट्ट; सं.बर्हृ]
**भरभरीत** वि. १. भरड; जाड; शुष्क; तेलाचा अंश नसलेले (पीठ, गवत, केस). २. भरड; जाड; खरखरीत (कापड).
क्रिवि. फरफरा. (गो.)
**भरम** वि. १. पहा : **भ्रम** ४,५. २. पत; अब्रू; नाव. ३. भ्रम; दबाव; दरारा : 'भरम राज्याचा या मोगलाजवली राहिला नाही.'- पदे १७.२७. ४. वहीम; तर्क; भावना; मत; अंदेशा. [सं.भ्रम; हिं.]
**भरमज(जा)लस** स्त्री. भरसभा; भरलेली कचेरी.
**भरमजला** पु. मोठा व उंच वरचा मजला (घराचा).
वि. मोठा व उंच असा वरचा मजला असलेले. (घर).
**भरमटे** वि. भक्कम; जाड; लठ्ठ.
**भरमसाठ** क्रिवि. विपुल प्रमाणात; आवश्यकतेपेक्षा कितीतरी अधिक.
**भरमाचे पोते, भरमाची मोट** ( विद्या, संपत्ती भक्ती इ. विषयी) बाह्य लौकिक असणारा परंतु खरोखर पोकळ मनुष्य.
**भरमाभरमी** क्रिवि. बाहेरील अनुकूल ग्रहाने; सामान्य समजाप्रमाणे; आभासावर (पैसा, विद्या आहे अशा).
**भरमार** स्त्री. गर्दी; खिचडी; कागदपत्रांची, तपशिलांची सरमिसळ.
**भररट्टा** वि. १. पहा : **भरचक्का**. २. भर; मोठा; भक्कम; भारी या अर्थीही योजतात. ३. तब्बल; पक्का; जबर.
**भररस्ता** पु. हमरस्ता.
**भररास** स्त्री. १. शेतात पिकलेल्या धान्याची एकत्र केलेली रास, ढीग (भागिदारांत वाटण्याच्या पूर्वीची). २. (सामा.) रास; ढीग.
**भरल-ळ** पु. १.माड, भेरला इ. झाडांच्या लाकडाचा, पाणी वाहून नेण्यासाठी कोरून केलेला पन्हळ. २. माडाचा बुंधा पोखरून केलेले बारदान.
**भरलाभरला** वि. चांगला भरलेला; समृद्ध; भरभरणारा (प्रजेने राज्य, उत्पन्नाने शेत, देश व सामान, भांडी यांनी घर).
**भरलाभारला-भादला** वि. पतदार; अब्रूदार; लायकीचा; वजनदार (व्यापारी, मनुष्य); भरभराटीचा (व्यापार, काम).
**भरलावणे** न. १. आवारात (नारळ इ.ची) पूर्ण अथवा ठरावीक संख्येइतकी लागवड करणे. २. आगरावर बसवलेला भरधारा.
**भरले धरणे** गडप करणे; देवाला कौल लावला असता त्याने उजवी - डावी न देणे.
**भरलेपण** न. अहंकार; गर्व :'एक वीतरागु वैराग्याचे नि भरलेपणे राहिला'- स्मृस्थ ४५.
**भरलेल्या अंगाची** वि. गरोदर.
**भरल्या ओटीने** क्रिवि. (बायकी) मुलाबाळांसह सुखरूप.
**भरवड** स्त्री. १. ओसाड जमिनीत भर टाकून तयार केलेली जमीन. २. खारवट जमिनीत रोहपेरा करतेवेळी ती जमीन पावसाच्या पाण्याने तुडुंब भरून काढणे.
**भरवण** न. १.पहा : **भरण** ४; एका वेळी जमलेल्या काजळाचे परिमाण इ. २. भूत काढण्याकरिता भुताने झपाटलेल्या माणसावरून ओवाळला जाणारा पदार्थ (कोंबडे, नारळ इ.).
**भरवण, भरीत** न. जहाजात भरतात ते भरताड.
**भरवशाचा** वि. विश्वासू; इमानी.
**भरवसा, भरोसा** पु. १.विश्वास; प्रत्यय; आश्वासन. २. खात्री; मनाचा निश्चितपणा. [सं.विश्रंभ; हिं.]
**भरवसूल** ( काही वजावट न होता) मिळालेला वसूल.
**भरवान** न. भरवण; माल; वजन : 'ती सातआठशे भरवान उठावणारी लहानशी महागिरी होती.'- किर्लो ऑगस्ट १९३७.
**भरवायकी** स्त्री. बढाई.(व.)
**भरविणे** सक्रि. १. भरणेचे प्रयोजक. पहा : **भरणे**. २. हाताने, चमच्याने खाऊ घालणे (लहान मुलाला, आजारी माणसाला); तोंडात घास

देणे. ३. (ल.) वारंवार सांगून शिकवणे.

**भरशाई** स्त्री. गंभीर आवाज निघण्याकरता पखवाजाच्या मध्यभागावर लावलेला शाईचा जाड थर.

**भरस** पु. मिसळ; भेसळ. (गो.)

**भरसरवा** पु. मालकाला वाटा देऊन सरवा वेचणे.

**भरसांड** वि. भरपूर; रगड.

**भरसु(भर्सु)चे** सक्रि. मिसळणे; एकत्र करणे. (गो.)

**भरहाक** स्त्री. भर आवाजाने मारलेल्या हाकेचे अंतर, टप्पा. क्रिवि. अशा अंतरावर, टप्प्यावर.

**भरहुबर(देनं)** भर घालणे; एकाचे दोन करणे; लावालावी करणे. -लोसाको.

**भरंगळणे** अक्रि. १. हेलकावणे : 'दोहोंकडे भरंगळावें । किती म्हणूनी ।'- दास ७.६.१०. २. घोटाळणे. ३. बडबडणे : 'मूर्ख मूर्खपणें भरंगळती ।'- दास १९.७.२६. (व.)

**भरा** पु. धान्याचे एक माप. मालवणकडे १६० पायल्यांचा किंवा १० मणांचा भरा होतो.

**भरा** पु. दाणादाण; पळापळ; मोड.

**भराई** स्त्री. १.भरण्याची किंमत, मजुरी. २. भरणे; खड्डा बुजवण्याचे काम.

**भराक** क्रिवि. दंडेलीने; दडपून.

**भराका** पु. १.पंखाची भरारी, झपाटा (उडणाऱ्या पक्ष्यांचा). (क्रि. मारणे, उडणे, चालणे). २. सणाणणारी गिरकी (गोफणीची, हाताची). ३. धाव; जोराने घुसणे (शब्दशः व ल.); जलद आणि जोराचा यत्न. ४. देवाचा, पिशाचाचा झटका, झपाटा; रागाचा, वाऱ्याचा, झटकारा, सनाटा; कामाचा, मारण्याचा, गाण्याचा धडाका इ. ५. घनदाट वृष्टी (दगड, बाण, भाले यांची). ६. झपाटा; गिरकांडा; झेप; धडका; कोणतीही आकस्मिक आणि वेगाची हालचाल. ७. अपानवायू सरणे; पादणे. (क्रि. सोडणे, सारणे.) ८. (सामा.) पहा : **झपाटा**. ९. भरती; भरभराट; चालता काळ.

**भराटणे** सक्रि. त्वरेने करणे; भरकटणे; झपाटणे (एखादे काम); खाऊन चट करणे; झटकन फडशा पाडणे (अन्नाचा); घाईघाईने कसबसे उरकणे, करणे.

**भराटा** पु. १. भर्र आवाज होईल असे उडणे (पक्ष्यांचे); इकडे-तिकडे झटकणे (हलका कचरा, जिन्नस); गोंगाटाने वाहणे, चालणे (वाऱ्याचे); आदळणे (पावसाच्या सरींचे); जलदीची, झपाट्याची, दणक्याची क्रिया (धावणे, जाणे, बोलणे, खाणे इ.); तातडी; निकड; झपाटा (काम करण्याचा); फडशा (लिहिण्याचा, कामाचा); गोंगाटाची, धडाक्याची हालचाल, क्रिया. (क्रि.होणे, चालणे, लागणे, उडणे, करणे, मांडणे, चालवणे, लावणे, उडवणे). २.अत्यंत वैपुल्य; वृद्धी (सुगीची, पिकाची).

वि. १. प्रचुर; विपुल; जोराचा. उदा. भराटा पीक - पाऊस. २. भक्कम.

**भराड** न. १.डौर वाजवून नाचून देवापुढे भराड्याने केलेले भजन; गोंधळ. २. कुणबी लोकांत बकरा वगैरे मारून केलेले नवसाचे जेवण. (व.) [सं.भरटक]

**भराड** न. ओलावा न धरणारी बरड, वरकस जमीन.

**भराडा** पु. दवंडी पिटणारा.

**भराडा** वि.१. भाबडा. २. खरखरीत (आवाज).

**भराडा** पु. दृष्ट काढण्याचा एक प्रकार. यात पेटवलेल्या चिंध्यांवर मीठ, मोहरी, मिरे इ. टाकून ते मोठ्या तोंडाच्या भांड्यात टाकतात. ते भांडे ओवाळून पिवळे पाणी असलेल्या ताम्हनात पालथे करतात.

**भराडी-डी** पु. गोसाव्यांचा एक पंथ; भराड गोंधळ घालणारा; कीर्तन करणारा गोसावी; पुजारी.

**भराडा** पु. खूप कापूस फुटल्याने वाढणारे नुकसानीचे प्रमाण. (अहि.)

**भराडी गौर** श्रावण महिन्यातील मुलींचा गौरीचा उत्सव, खेळ वगैरे.

**भराडी वोवसा** स्त्रियांचे एक व्रत.

**भरापुरा** वि. १. भरून चाललेला; चांगला भरलेला (गाव, विहीर, तळे, मळा इ.). २.(ल.) विद्वान; गुणसंपन्न.

**भराभर-रा** क्रिवि. भरभर; झपाट्याने; झरझर.

**भराभरी** क्रिवि. प्रमाणाइतके; पूर्ण माप भरून. (क्रि.उतरणे)

**भरायान** न. १. भरणी; भर. २. तेलवातीची भर.-लोसाको.

**भरार-रा, भरारून** क्रिवि. १. झपाट्याने जाण्याच्या, चालण्याच्या विशिष्ट ध्वनीचा, तसेच झपाट्याच्या विशिष्ट क्रियेच्या (भरारणे, झटकणे, सोसाट्याने वाहणे, फडफडवणे, थोपटणे इ.) आवाजाचे अनुकरण होऊन. (क्रि. उडणे, उठणे, पळणे, सुटणे, चालणे, सुजणे, फुगणे इ.). २. (ल.) जलदीने; झपाट्याने; सपाट्याने. [ध्व.भर]

**भरारणी** स्त्री. मोठ्याने कडकड आवाज करून जळणे इत्यादी. पहा : **भरारणे**

**भरारणे** अक्रि. १. झपाट्याने भरभरणे. २. जलद हालचाल करून, भर्र असा आवाज करून उडणे, भरारी मारणे. ३. (ल.) (एखादी गोष्ट मिळवण्यासाठी) उत्सुकतेने व आवेशाने मागे लागणे; नादी लागणे; हुरळणे. ४. भडाडणे; पेटणे (आग, गवत); जोराने वाहणे (वारा); रानोमाळ उडणे (धूळ, धूर, भुकणी); झपाट्याने व रगडावून उठणे (पुरळ); फुगणे; सुजणे (फोड, गाठ). ५. अतिशय तरारणे; भरभरणे (काम, धंदा, व्यापार); वाढणे; वृद्धिंगत होणे. भरारून या धातुसाधिताचा भरारच्या ऐवजी पुष्कळदा उपयोग करतात.

**भरारा** पु. १. वेगाने, झपाट्याने आणि उत्कंठेने धावणे, घुसणे; हल्ला; पाठलाग; चाल; अभिनिवेश. २. सोसाटा : 'शिरीं उष्ण पाऊस वायू भरारा'- कचेसुच २.

**भरारी** स्त्री. १. भरकन उडणे; उड्डाण (पक्ष्यांचे); अतित्वरेने उंच किंवा दूर जाणे. (क्रि. मारणे.). २. जलद प्रवास. ३. (एखाद्या गोष्टीचा) मधला भाग अजिबात गाळून किंवा त्याकडे लक्ष न देता एकदम पुढच्या भागावर जाणे; उड्या मारणे. (क्रि. मारणे).

**भराव** पु. खड्डा भरून काढण्यासाठी घातलेली माती, दगड इ.

**भरावण-ळ** स्त्री. जमीन भाजण्यासाठी पसरलेल्या काटक्या-कुटक्या, गवत इ.

**भरावणे** अक्रि. बधिर, जड, ताठर होणे (शरीर, अवयव).

**भरांत्र** तिखटमीठ घातलेले कबाब किंवा कुरल्मा यांसारखे पदार्थ.

**भरावरी** क्रिवि. वरचेवर; वारंवार.

**भरि–री** अवधी, प्रमाण दाखवणारा शब्द.

**भरित** वि. १. भरलेला; पूर्ण : 'अंत:करण भरितु ।'– ज्ञा २.२९२. २. पोसलेला. [सं.भृ]

**भरिभार** पु.१. पूर्ण विश्वास; भरवसा. (क्रि. ठेवणे). २. जोखीम; जबाबदारी; कार्याचा व्याप; कारभार.

**भरी** क्रिवि. बाजूने. उदा. अणीभरी = अणियाच्या बाजूने. (गो.)

**भरी** स्त्री. भुरळ; भ्रांती.(तंजा.)

**भरी** स्त्री. लाकडाची मोळी. (माल.)

**भरी(रि)त, भर्त** न. १.लादल्याची, भरल्याची स्थिती. २. भरलेला, भरण्याचा माल (पोते इ. त); ओझे; बोजा. ३. लादणी; ओझे; भरताड. ४. चिघळणाऱ्या जखमा, गाठी यांची पू झाल्यामुळे व नासलेली स्थिती. ५. वांगे वगैरे भाजून, किंवा भोपळा, बटाटा, गाजर इ. उकडून दही घालून केलेली कोशिंबीर, तोंडीलावणे. ६. (ल.) पदार्थ डिवचून, कुस्करून किंवा हाताळून त्यांची केलेली नासाडी. [सं.भर्व] (वा.) ० **पाडणे** – लाथाबुक्क्यांनी पोटात मार देणे.(अहि.)

**भरीतपत्र** न. गलबतावरील भरताची (बारदानाची) यादी.

**भरीव** वि. १. भरलेला; लादलेला. २. भरदार; घन; ऐवजदार; गाभा, रस, दळ इ. असलेला; घट्ट व लठ्ठ.

**भरु–रू** स्त्री. पु. १.भर; आवड; आसक्ती. २. विस्तार : 'आतां भणे कवी भास्करू । एथ कांइसा भरूं।'– शिव ३०९.

**भरे** न. माप.

वि. पुष्कळ; गाढ : 'अविद्याझोंप येते भरें ।'– दास ५.६.७०.

**भरेकरी** पु. कापडाचा फिरता व्यापारी; कापड तयार करून ते विकत फिरणारा व्यापारी.

**भरो** पु. १. चार खंडीचे माप. (कु.) २. लाकडाची मोळी. [सं.भृ = भारा]

**भरोभर** पहा : **भरउभर**

**भरोभरी** स्त्री. भरती; पूर्णता; पूर्ण पुरवठा केल्याची स्थिती.

**भरोभरी, भरोभरीने** क्रिवि. १. मापास माप; बरोबरीने. (क्रि. देणे, घेणे, उतरणे.) २. मापलेले; पुन्हा मापून (परीक्षेकरता).

**भरोवरी** स्त्री. १. सामग्री : 'सांगों ऐक प्रज्ञेचिया । भरोवरी ।'– ज्ञा १८.८५५. २. आवड. ३. गर्दी; दाटी. ४. श्रम. ५. रचना. (तंजा.)

वि. भरपूर; पूर्ण.

क्रिवि. श्रमाने; आयासाने : 'भरोवरी धन मेळवितों ।' – तुगा १९६५.

**भर्कावना** अक्रि. १. दुखापतीची वेदना होणे. २. हृदय भरून येणे. (झाडी)

**भर्कीव** वि. १. भरीव. २. घणसर.

**भर्ग** न. तेज. [सं.]

**भर्गत** वि. पूर्ण. (गो.)

**भर्गोदेव** वि. मूर्ख. (व.)

**भर्जणे** सक्रि. भाजणे.

**भर्जन** न. भाजणे; भाजण्याची क्रिया.

**भर्जिक** न. भजे.

**भर्णकुटॉ, भण्णकुटॉ** वि. दमेकरी. (गो.)

**भर्ता, भर्तार, भ्रतार** पु. १. पती; नवरा. २. पालन करणारा. [सं.भर्तृ]

**भर्तृत्व** न. भर्त्याची स्थिती, त्याचा अधिकार, संबंध; पतित्व.

**भर्त्सणे** सक्रि. निंदा; कुत्सा; दोष दाखवणे. [सं.भर्त्सन, भर्त्स्]

**भर्त्सन–ना** न. स्त्री. निंदा; तिरस्कार; हेटाळणी.

**भर्ना** पु. सडा टाकण्याचा मातीचा गडू. (झाडी)

**भर्भरी** स्त्री. आदळआपट.

**भर्बो** वि. आमांश झालेला, असलेला (मनुष्य). (गो.)

**भर्मार** स्त्री. १. विपुलता. २. बंदुकीचा एक प्रकार.

**भऱ्याचा** वि. १. भरणारा; पूर्ण करणारा; पूर्णपणे उपयोगात आणलेला (कालविभाग, दिवस, रात्र). मागे जोडलेल्या कालदर्शक नामासह समासात योजतात. उदा. महिन्याभऱ्याचा उपोषित. २. द्रव्यार्थी नामासह योजतात. उदा. रुपयाभऱ्याचा.

**भऱ्यौचे** उक्रि. बहिरे होणे. (गो.)

**भर्रभर्र** क्रिवि. कोणतेही (गाडीचे, पंप वगैरेचे) इंजिन सुरू झाल्यासारखा आवाज करून.

**भर्रर्कन** क्रिवि. वेग, पाखरांच्या पंखांचा उडताना होणारा आवाज यांचा दर्शक शब्द.

**भर्वण** वि. पसरलेली; सांडलेली; शिंपडलेली (वस्तू).

**भल** न. भाला, शूल, बाण इ. चे टोक; फाळ.

पु. शिलेदार. [सं.भल्ल]

**भल** वि. १. चांगला; नामी; उमदा. २. पक्का; अस्सल; अट्टल; बिलंदर. ३. मोठा; अफाट; अवाढव्य; विलक्षण. ४. प्रकर्षार्थी नामे व विशेषणे यांच्याबरोबर योजतात.

**भलकसा** वि. १. विचित्र; विलक्षण; भलतेच. २. खूप; फारच. (व.)

**भलकुबल** पु. कठीण प्रसंग. (माण.)

**भलकोठे** क्रिवि. कोठेतरी; कोणीकडेतरी.

**भलतसे** क्रिवि. कशाही प्रकारे; वेडेवाकडे; जसे येईल तसे.

**भलता** वि. १. कोणीही; कोणीतरी; कोणतातरी. २. चालू विषयाशी असंबद्ध; अप्रस्तुत; विसंगत; मन मानेल तसा. ३. काळ, स्थळ, परिमाण, साम्य इ. पुष्कळ विशेषणांसह समासात योजतात. उदा. भलतीकडे, भलतसा. ४. पुष्कळ; विलक्षण.

**भलतासलता** वि. कोणीतरी; बिनओळखीचा (मनुष्य); अपायकारक (वस्तू, खाणे).

**भलतीसवा** क्रिवि. अव्यवस्थित; कोणत्याही बाजूला : 'पडे दंडकाठी। देह भलतीसवा लोटी ।'– तुगा ५५५.

**भलते** वि. १. हवे ते; कोणतेही : 'हे वरी भलतें करितु।'– ज्ञा १.२२५. २. कोणीही : 'भलतया दु:ख देतु जाये ।'– ज्ञा १८.६५६. ३.(ल.) अगाध; अवघड: 'अथवा भलते गोष्टीस कच'– पेद ३.१८३.

**भलतेउते** अ. पाहिजे तेथे; पाहिजे तसे : 'जाळणें आगीचें भलतेउतें।'– ज्ञा १६.२८८.

**भलतेतुके** क्रिवि. पाहिजे तितके.
**भलतेसणा** वि. कोणताही; पाहिजे तेवढा.
**भलभलता** वि. अनेक प्रकारांनी भलता; वाटेल तो.
**भलपणे** अक्रि. हालणे.
**भल(ले)री** स्त्री. १.अनेक लोक समुदायाने एकच कष्टाचे काम करीत असता ते हलके वाटावे म्हणून परस्परांना उत्तेजन देण्यासाठी गीते म्हणताना या शब्दाचा उपयोग करतात. (क्रि.घालणे) २. एकसारखा नेट (क्रि.लावणे); जोरदार व चिकाटीचा प्रयत्न. ३. अवास्तव स्तुती.
**भलंगडी** उद्. शाळूची काढणी अगर गवताची कापणी करताना जे सामूहिक गीत म्हणतात त्यातील सर्वांनी एकदम उचलायचा एक शब्द.
**भलंड** पु. मोठा कुत्रा : 'काळिए डोइचा भलंड रिगाला होता:'- लीच ३१८.
**भला** वि. १. चांगला; सद्‌गुणी; योग्य; चांगल्या स्वभावाचा. २. सभ्य; पतवाला; अब्रूदार; चांगल्या मान्यतेचा, नावाचा. ३. बरा : 'घावु भला होये ।'- वैद्यक ७६. ४. जसा असावा तसा; योग्य गुणाचा, परिणामाचा; प्रशंसेस पात्र; नामी. उत्कृष्ट; उमदा; भव्य. ५. सपाटा. ६. (ल.) श्रीमंत. (व.) ७. मोठा; पुष्कळ. (व.) [सं.भद्रक] (वा.) **० घेणे** - सपाटून मारणे; निंदणे. **भले घेऊन फिरणे, पुसणे, विचारणे** - दुसऱ्याला चाड नसतानाही त्याची काळजी करणे; त्याच्या दुःखात सहभागी होणे; मायाळूपणा दाखवणे; लचाळपणे दुसऱ्याच्या कल्याणाबद्दल काळजी बाळगणे.
**भलाई** स्त्री. निरोप घेणे.- लोसाको.
**भलाई, भलाइ(य)की** स्त्री. १. चांगुलपणा; सुजनता; सात्त्विकता; स्वभावाचा कोमलपणा. २. मोठेपणा. ३. तरफदारी. [सं.भद्र]
**भलारी** पु. देवळात कथादी सांगणारे शूद्र.
**भलाव(म)ण** स्त्री. १. अब्रूपत्र; आपल्या ओळखीच्या, पत असलेल्या माणसावर एखाद्याला गरज असलेली रक्कम देण्याविषयी दिलेली चिठ्ठी; वरात. २. ओळखीचे पत्र; शिफारसपत्र. ३. आश्रय; मेहरबानी; शिफारस.
**भलावणपत्र-हुंडी** न. स्त्री. एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याला उधार देण्याविषयी अखत्यार देतो तो लेख.
**भलावणी** स्त्री. शिफारस. [गु.]
**भलांडे** न. आत विस्तव घालून गोसावी गोंधळी डोक्यावर घेतात ते मडक्याचे खापर; भदे.
**भलीभलाई-य, भलीभलायकी** स्त्री. १. चांगलेपणा; सद्‌गुण; सदाचरण; स्वभावाचा चांगुलपणा. २. कीर्ती; सामान्य प्रसिद्धी; लौकिक; प्रशंसा. ३. खुशालीची हकिकत; आरोग्य; चालू काम, परिस्थिती यांची बातमी.
**भले** उद्गा. खाशी ! नामी ! चांगले ! शाबास ! [त.बले]
**भले बाप** उद्गा. उत्तेजन, स्तुती याअर्थी उद्‌गार.
**भलेरभाई** पु. खर्चीक; उधळ्या; थोड्या स्तुतीने चढून जाणारा.
**भले लोक** राजे, सरदार वगैरेंच्या पदरी असणारे मानकरी, शिपाई, शिलेदार इ. उच्चपदस्थ व्यक्ती.
**भलोबा** पु. लडिवाळपणाचा शब्द; चांगला, भला माणूस.
**भल्ल** न. भाला, शूळ, बाण इ.कांचे टोक; एक प्रकारचा बाण, भाला : 'श्रुतकर्मा मग तद्धनु खंडुनि भल्लेंचि तच्छिर च्छेदी।'- मोकर्ण ९. २१. [सं.]
**भल्ला** उद्गा. बरे ! वाहवा !
वि. १. भला, चांगला या अर्थी योजतात. २. खूप; जास्त. : 'भल्ला माल भरला होता दुकानात.'- बाविबु ९४.(व.)
**भल्लातक** पु.न. बिब्ब्याचे झाड व त्याचे फळ. [सं.]
**भल्लातक क्षार** बिब्बे, सुंठ, मिरी, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी, सेंधेलोण, पादेलोण व बिडलोण हे प्रत्येकी आठ तोळे घेऊन अंतर्धूमाने राख करून चूर्ण केलेला क्षार.
**भल्लु(ल्लू)क** पु. अस्वल. [सं.]
**भव** न. १. भ्रमण. २. जन्ममरण. [सं.भ्रम]
**भव** पु. १. संसार. २. मृत्युलोक . ३. जन्म; उत्पत्ती. ४. सत्ता; अस्तित्व. ५. पासून उत्पन्न झालेला याअर्थी समासात प्राचुर्याने योजतात. उदा. देहभव ( शरीरापासून उत्पन्न झालेले दुःख इ.). [सं.]
**भवई-य्या** पु. नटाचा, नर्तकाचा व्यवसाय करणारी गुजराथमधील एक जात व त्यातील व्यक्ती.
**भवई** पहा : **भुवई**
**भवजनक-दायक** वि. (दुसऱ्या) जन्मास कारणीभूत (पापकृत्ये. ह्यांना जन्मांतराची शिक्षा व शुद्धी पाहिजे असते). [सं.]
**भवणे** अक्रि. १. (सामा.) भोवंडणे व भोवणे. २. गरगर फिरणे. ३. हिंडणे; भटकणे : 'घेतलें भोंवें पिसें । होऊनियां ।'- ज्ञा १८.५५१. ४. अंगावर येणे; भोगावे लागणे.
सक्रि. भोवंडणे; गरगर फिरवणे : 'पक्ष भवण्डितां भूगोळ । चक्रीं पडे गरगरां ।'- मुआदि ६.३६.
**भवणे** सक्रि. जन्मणे : 'अन्नोदकाचेनि आधारे भवी तव जननीचया जठरासिने'- विद २. [सं.भू]
**भवता-ती-ते, भवताला-ली** क्रिवि. सभोवार; भोवती.
**भवति न भवति** वादविवाद; वाटाघाट; चर्चा; खल. [सं.]
**भवदीय** (पत्रात शेवटी लिहायचा शब्द) आपला.
**भवन** न. १. घर; वसतिस्थान. २. राहण्याचे, असण्याचे ठिकाण. ३. होणे; असणे. ४. (फज्यो.) भुवन; घर; राशी. [सं.]
**भव(वा)न** न. वारूळ. (कुलाबा, को.)
**भवनी** स्त्री. फेरी; गस्त; पहारा. [सं.भ्रमण]
**भवनीय** वि. व्हायला पाहिजे असे; होण्याजोगे.
**भवभय** न. अन्य जन्माचे, संसाराचे भय.
**भवभव** स्त्री. उष्ण स्फुरण; भगभग; कंप (दुःखाने, भुकेने पोटात होणारा). (क्रि. उठणे, होणे, वाटणे.)
**भवभंग** पु. नाश.
**भवर** स्त्री. मजा.(व.)
**भवर-रा** पु. भ्रमर; भुंगा. [सं.भ्रमर]
**भवर** पु. भाऊजी; मेहुणा. [सं.भ्रातृ]

**भवर** स्त्री. गती.

**भवरकडी, भवरगाव, भवरपाशी, भवरा, भवरी, भवळ, भवाडा, भवार इ. शब्द भोवरकडी, भोवरगाव इ. मध्ये पहा.**

**भवरत, भवरतगडी** पु. १. भावार्थ; भाव; भक्ती. २.भक्तीच्या अधीन; भावार्थ पुरवणारा.- लोसाको.

**भवरपालक** पु. छप्परपलंग. [सं.भ्रमर]

**भवरी** स्त्री. १. भ्रमरी. २. भ्रमण; भोवरी; गिरकी; फेरा : 'एका पुढां भवरी दे ।'- एभा ८.१९४. ३.(ल.) कापणी केलेल्या पिकाच्या, कडब्याच्या पेंढ्या एकीशी एक उभ्या लावून वर्तुळाकार केलेला ढीग. ४. कानातील एक दागिना. ५. मुरका.
वि. पांढऱ्या रंगाची (म्हैस).

**भवर्** न. जातीचे संमेलन. (खा.)

**भवलय, भवृत्त** न. क्रांतिवृत्त. [सं.]

**भवले** न. बहुले; बोहले.

**भवंडा-डी** पु. स्त्री. गरका; चक्कर; भोवळ.

**भवंडिणे** सक्रि. १. गरगर फिरवणे. २. चक्कर येणे. [सं.भ्रमण]

**भवंडु** पु. एक अलंकार; फिरकीचे फूल.

**भवंदारी** स्त्री. गावाच्या शिवारातील एका भागाचे नाव.

**भवा** पु. फेरा; भ्रमण : 'मुंजीत जीवपणाचे भवे ।'- अमृ २.२.

**भवाडा** पु. बभ्रा.

**भवाडा** आदिवासींच्या नृत्याचा एक प्रकार : 'कामाडी... घोर... भवाडा सारी नृत्ये रात्रीला जाग आणतात.'- भाप्र ३३०.

**भवानी** स्त्री. १. दुकानदाराची सकाळची पहिली रोखीची विक्री; बोहणी. २. आरंभ; सुरुवात. ३. लाभ.

**भवानी कवडी** सामान्य कवडी. दहीकवडी, सगुणी कवडी व भवानी कवडी अशा कवडीच्या तीन जाती आहेत.

**भवाल, भवालीन** पु.स्त्री. महानुभाव पंथातील उपदेशक, शिष्य-शिष्या.

**भवितव्य** न. १. भावी आणि निश्चित गोष्ट; अटळ घडणारी गोष्ट. २.(ल.) दैव; प्रारब्ध; नशीब. [सं.]

**भवितव्यता** स्त्री. १. (तत्त्व.) सुप्त शक्ती.- ॲका. ११. २. (वैद्यक.) रोग्याचा आजार लवकर बरा होणारा आहे, वाढणारा आहे अथवा घातुक आहे याविषयीचा परिणामकारक अंदाज. - आआआ.

**भविता** वि. पुढे होणारा; भावी. (स्त्रीलिंगी रूप भवित्री). [सं.]

**भविन(न्न)णे** अक्रि. १. होणे. २. वाटोळे फिरणे : ' नलिका भविनली एरी मोहरे '।- ज्ञा ६.७६.

**भविष्य** न. १. भावी गोष्ट. २. भावी गोष्टीविषयी अगोदर केलेले कथन; भाकीत. ३. (व्या.) पुढे येणारा काळ. ४. (ल.) उत्पात.
वि. भावी. [सं.भू]

**भविष्यकाळ** पु. (व्या.) वर्तमान, चालू क्षणापुढे येणारा काळ. या काळासाठी वापरलेल्या क्रियापदावरून पुढल्या काळाचा बोध होतो. [सं.]

**भविष्यनिर्वाह निधी** सेवानिवृत्त झाल्यावर जीवन जगण्यासाठी साठवलेला निधी. [सं.]

**भविष्य भविष्य** पु. (व्या.) विवक्षित भविष्यकाळाच्या पुढच्या काळी एखादी क्रिया व्हायची असता योजण्याचा भविष्यकाळ. उदा. करणार असेन. [सं.]

**भविष्यभूत** पु. (व्या.)एखादी क्रिया भूतकाळी व्हायची होती, परंतु काही व्यत्ययामुळे ती सिद्धीस गेली नाही. अशा वेळी योजण्याचा काळ. उदा. करणार होतो. [सं.]

**भविष्यवादी** वि. (ख्रि.) १. संदेष्टा : 'भविष्यवादी स्वर्गी सारे लागति नाचाया ।'- उस ७६. २. आत्म्याच्या प्रेरणेने गाणारा, काव्य करणारा. ३. ईश्वरी प्रेरणेने पवित्र शास्त्रातील रहस्याचा उलगडा करणारा; प्रॉफेट. ४. अतिदूरदृष्टी असलेला (पुरुष). [सं.]

**भविष्या** वि. १. भविष्य सांगणारा. २.ढकलपट्टी करणारा; चेंगट. ३.मागचे पुढचे अवधान नसणारा; वारंवार भ्रांती पडावी अशा स्वभावाचा.

**भविष्योत्तर** न. भविष्यासंबंधी निवेदन, भाकीत केलेली गोष्ट.

**भवूक** वि. मोठ्या; भरपूर : 'छोटी शिवाय भवूक दाढीमिशा'- जोफु २३४.

**भवे** न. जन्म; मरण.

**भव्य** न. कल्याण; हित: 'आशिर्वाद मजकडे द्या देइल भव्यकोटि केशवसा । - मोमीष्म १.६९.
वि. १. प्रशस्त; टोलेजंग. २. ढबदार; धीट; दिखाऊ मुद्रेचा; सुरूप; देखणा. ३. भावी; होणारा. [सं.]

**भष्ट** पु. विटाळ; रजोदर्शनामुळे स्त्रियांना येणारी अस्पर्शता. (गो.)

**भष्टी** स्त्री. वि. विटाळशी. (गो.)

**भस** न. जेवण. (गो.)

**भसकचाटू, भसक्या** वि. दांडग्या; धसक्या; लाटण्या; अविचारी; रगड्या (माणूस).

**भसकटणे** अक्रि. बहकणे; वाट चुकणे; गहाळणे; गमावणे; सांडणे. सक्रि. भोसकणे; घुसडणे.

**भसकण-कन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. किंचित प्रतिबंध करणाऱ्या पदार्थात जोराने शिरताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.]

**भसकणी** स्त्री. १. खुपसणी; भोसकणी; भोसणी. २. बहकणी; वाट चुकणे.

**भसकणे** सक्रि. १. जोराने खुपसणे; भोसकणे; भोसणे. २. बहकणे; भसकटणे. पहा : **भसका** [सं.मस्क]

**भसकरणे** अक्रि. १. भोकसा पाडणे. २. दुखावणे : 'भसकरलेल्या मनानं पेंडीभर बाटुक काढलं.'- गोता ११५.

**भसका** पु. १.बहुधा भोसकून पाडलेले भोक. २.(सामा.) भोक (भिंत, कपडा, कागद इत्यादींतील). ३. बचका; बुचकुली; भारा. (व.)

**भसकापुरी** स्त्री. १. भरभरीत, नीरस तपकीर, तंबाखू. २. वाळलेल्या मिरच्यांची पूड; भगवती. ३. हलका व भुसभुशीत कवडीमोल जिन्नस (धान्य, कपडा सूत इ.). ४. भाजलेल्या धान्याचे पीठ.

**भसबोड्या** वि. १. धांदरट. २. म्हशीचे केस कापणारा. (झाडी)

**भसभशी(सी)त** वि. १. रूक्ष व हलका; भस आवाज करून

ओढण्यासारखी (तपकीर, भुकणी इ.). २. भुसभुशीत; विरणारा; भरभरीत; फुसफुशीत.

**भसभस-सा** क्रिवि. १. प्रचंड धूळ उडताना, रेती, चिखल यात पाय रुतताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन. २. धसधस-सा.

**भसभोंगळ** वि. शिथिल; ढिले; थलथलीत (ओझे, गाठोडे, मांस); गबाळ, बेपर्वा (काम करण्याची पद्धत).

**भसमणे** अक्रि. तोरा खाली उतरणे; निरुत्साही बनणे. (व.)

**भसरा, भस्त्रा, भस्त्रिका** पु.स्त्री. योगपद्धतीत शरीरातील वायू काही वेळ बंद करण्याची, त्याचा निग्रह करण्याची पद्धत. [ध्व.]

**भसरे, भस्रे** न. १. अपचनामुळे शौचाला होणारा त्रास; धेंडाळी. २. उष्णतेने होणारा आजार. यात गळा सुजतो, तोंड सडते. वि. खरखरीत : 'स्वर... अत्यंत बसका नि भसरा आहे'-आप्रदिद ४९५.

**भसळणे** क्रि. खाणे. (व.)

**भसाडा** वि. १. भरड व जाड (गवत, सूत इ.). २. बेढब व बोजड (अक्षर, आकृती, चिन्ह, दागिना, वस्तू). ३. भरड, राठ, ओबडधोबड (काम). ४. झोडकामी, धसवया, रगडचा (कारागीर). ५. खाण्यापिण्यात अशिष्ट आणि अर्वाच्य सवयीचा. ६. गव्हार, गावंढळ चालीचा, वागणुकीचा. ७. मोठा; कर्कश. [सं.भस]

**भसाभस-सा, भसासा** क्रिवि. कापीत, काटीत, खापीत असता - मऊ व दबणाऱ्या पिंडाच्या आवाजाचे, चिखलात इ. निसरणाऱ्या पायाच्या आवाजाचे अनुकरण होऊन. पहा : **धसाधस-सा** [ध्व.]

**भसाळ** वि. १. जंगी; अफाट; अवाढव्य; राक्षसी. २. ओबडधोबड; बेढब; भसाडी (इमारत, जिन्नस).

**भसित** न. भस्म; राख.

**भसूकी** पु. म्हशी राखणारा. (झाडी)

**भसूढोंड्या** पु. एक प्रकारचा साप. (झाडी)

**भस्म** न. १. राख; विभूती. २. (वैद्यक.) धातूची रक्षा. [सं.]

**भस्मकरोग, भस्मरोग, भस्म्या** पु. एक रोग; यात कफ क्षीण होऊन पित्त अतिशय वाढते. त्यामुळे जठराग्नी वाढून मनुष्य प्रमाणापेक्षा कितीतरी जास्त खातो. कितीही खाल्ले तरी क्षुधा शांत होत नाही, खाल्लेल्याचे भस्म होते. ते अंगी लागत नाही.

**भस्मकोथळा** पु.१.प्रचंड प्रमाणात, वाटेल तसले अन्न गडप करणारे पोट. २.(ल.) खादाड, अधाशी माणूस.

**भस्मरोगी** वि. १. भस्मरोगाने पिडलेला. २. (निंदेने) पुष्कळ खाऊनही किडकिडीत आणि रोगी राहणारा. ३. सदा रोगी असणारा.

**भस्मशेषालय** न. भट्टीत प्रेत जाळल्यानंतर राहिलेली राख ठेवण्याचा कक्ष.

**भस्मसात** क्रिवि. भस्माप्रमाणे; जाळून राख केलेल्या स्थितीत.

**भस्मस्नान** न. पाण्याच्या अभावी शरीराला भस्म चोळणे. वैद्यकशास्त्ररीतीने जेथे जलस्नान निषिद्ध केले आहे तेथे स्नानाचा गौण कल्प.

**भस्मारा** पु. १. कपड्यांचा अव्यवस्थित ढीग. (व.) २. चोळामोळा.(ना.)

**भस्मासुर** पु. जगाला जाळण्याची शक्ती असलेल्या एका दैत्याचे नाव. वि. १. विध्वंस करणारा. २. अतिशय खादाड.

**भस्मी** वि.१. भस्माच्या रंगाचा. २. सोनेरी कलाबतूच्या नक्षीने अलंकृत (शेला, पागोटे वगैरे पोशाख).

**भस्त्रा** पु. भाता. [सं.]

**भस्त्रिका** स्त्री. प्राणायामातील एक प्रकार. यामध्ये दोन्ही नाकपुड्यांतून पूरक करून कुंभक न करता एकदम रेचक करतात. [सं.]

**भस्त्री** स्त्री. लहान भाता.

**भळ** स्त्री. चीर; भेग; तडा; भगदाड.

**भळभळ-ळा** क्रिवि. धान्य, वाळू इ. गळताना, रक्त किंवा पातळ पदार्थ अरुंद तोंडातून वाहताना, अश्रुधारा वाहताना होणाऱ्या शब्दाचे अनुकरण होऊन; भरभर.

**भळभळणे, भळाळणे** अक्रि. १. जोराने वाहू लागणे; भळाभळा वाहणे. २. अनुकूल, प्रसन्न होणे (एखाद्याचे नशीब, दैव); उजाडणे.

**भळभळाट** पु. दिखाऊपणा; घवघवीतपणा; मोठेपणा; भडकपणा (गंध, कुंकू इ., मुख्यत्वे तांबडे नक्षीदार काठ यांचा).

**भळभळीत** वि. १. मोठा व भव्य; ऐटबाज; झळक; भडक; लकलकीत; घवघवीत (नक्षीदार काठ, गंध, कुंकू - विशेषत: पिवळी-तांबडी एखादी वस्तू). २. लखलखीत (सूर्योदयाच्या वेळची दिशा).

**भळशौंचे** अक्रि. शिजवलेला भात कालांतराने नासणे, खराब होणे. (गो.)

**भळ्ळो** पु. पहारेकऱ्याने घालायची साद.

**भळंद-दे** न. चिंध्या व तेल घालून पेटवतात ते खापर, मडक्याचे बदखल. (क्रि. घालणे).

**भळू** वि. वेडा; अर्धवट; भोळसर; नेभळा; सहज फसणारा.

**भक्ष-क्ष्य** न. पु. अन्न; भोज्य; खाद्य; आहार; खाद. [सं.भक्ष] (वा.) **भक्ष्यस्थानी पडणे, टाकणे, सोडणे, उतरणे** - १. नष्ट होणे. २. (विश्वासाने ठेवलेला पैसा, माल) खाणे; गडप करणे.

**भक्षक, भक्षी** वि. खाणारा.

**भक्षक पेशी** शरीरात शिरणारे रोगजंतू किंवा शरीरबाह्य घटक यांना वेढून त्यांना नष्ट करणाऱ्या पेशी.

**भक्षणे** क्रि. खाणे. [सं.भक्ष]

**भक्ष्य, भक्षणीय** वि. खाण्यास शक्य, जरूर, योग्य. [सं.]

**भंकस** स्त्री. १. नकली बाब. २. निरर्थक गोष्ट; वायफळ बोलणे, बडबड.

**भंकारी** स्त्री. गोमाशी; प्राण्यांच्या अंगावर बसणारी माशी.

**भंखार** पु. (संगीत.) एक राग. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर.

**भंग** पु. १.फुटणे; मोडणे; नाश पावणे. २. भेदणे; फोडणे; चिरडणे; विध्वंस होणे; नासणे; बिघाड (वस्तू, सैन्य, काम यांचा); मोडणे (वचन, कायदा, मंडळी, संघ इ.); कमी करणे; खचवणे (हिंमत). ३. असे करण्याने झालेली स्थिती. ४. नुकसानीची भीती; संभव; अपाय. ५. पराभव. ६. तरंग; लाट : 'गंगेसि भंग बहु पाणउतार होतो ।'- र२. (समासात) आज्ञाभंग (आज्ञेचे उल्लंघन); आशाभंग (आशेचा मोड). [सं.]

**भंगट-ड, भंगी, भंग्या** वि. १. भांग पिण्याचे व्यसन असलेला.

२. (ल.) अमर्याद उधळेपणा करणारा. ३. उधळ्या. (व.)

**भंगणी** स्त्री. १. मोड; नाश. २. त्रेधा; दाणादाण : 'पडतां पंचाननाची घाणी । होय मदगजा भंगणी ।'- एभा २९.७१.

**भंगणे** अक्रि. फुटणे; तुटणे; तुकडे होणे. [सं.भङ्ग]

**भंगत** ना. भरडून कोंडा काढलेले धान्य, कणी.

**भंगदेश** पु. रणांगण : 'चूर्ण करील तुम्हांला धर्मवता, भंगदेश हा खल हो!' - मोभीष्म १.२१.

**भंगबिंदू** पु. भार, ताण वाढवत गेल्यावर जेव्हा व्यक्तीचे मन किंवा वस्तू भंग पावते ती वेळ, स्थान.

**भंगराई** स्त्री. वाईट वातावरण. (व.)

**भंगशिर** वि. फुटण्यासारखे; भंगुर.

**भंगसाळ** स्त्री. १. मोठा पण भयाण वाडा. २. भगदाड; रुंद भेग. [सं.भंग + शाला]

**भंगळ** वि. भकाळ; सडपातळ : 'पोट भंगळ पातळ ।'- वसा ३८.

**भंगाड** वि. ओकेबोके. (झाडी)

**भंगाड्या** वि. प्रमाणापेक्षा मोठे. (झाडी)

**भंगार** पु. १. लाडिकपणाने हाक मारण्याचे संबोधन. (कु.) २. कुळाचाराच्या दिवशी देवाच्या नैवेद्यासाठी केलेले कणकेचे तळलेले मोदक, फळे इ. (व.)

**भंगार** स्त्री. चुरा; मोडतोडीची निरुपयोगी वस्तू.
वि. १. टाकाऊ. २. काळ्या रंगाचा अतिशय दाखवताना 'काळा' शब्दाबरोबर योजतात. [सं.भंग]

**भंगारशी** वि. गचाळ; घाणेरडा.

**भंगारा** पु. दुखणे; आजार. (व.)

**भंगी** पु. मेहतर; झाडूवाला; हलालखोर; शौचालय साफ करणारा. [हिं.]

**भंगी** स्त्री. १. वळण; झोक; डौल; धाटणी; रीत :'हेंचि पहावयालागीं। नावेक बोलिलों बाहेरिसवडिया भंगीं ।'- ज्ञा १०.३२६. २. एकाच अर्थी केलेले वाक्याचे भिन्न प्रकार : 'तो जाऊ व त्यानें जावें या भंग्या मात्र दोन परंतु अर्थ एकच.'- शास्त्रीको. ३. क्रम : 'श्लोकसंगतीची भंगी।' - एभा ११.६९०. ४. स्थिती व गती दाखवण्यासाठी काढलेली खगोलाची आकृती; नकाशा. [सं.]

**भंगुर** वि. १. भंगलेला; वाकलेला. २. (ल.) नश्वर; क्षणिक. ३. पळपुटा : 'रतिसंगरिं' भंगुर हा कचपाश हो यासि तो पाठिकडे दडणें।' - अकक राधावर्ण २.८. [सं.]

**भंगेरा-री** पु. भांग करणे, विकणे इ. व्यवसाय करणारा.

**भंजक** वि. (शब्दशः व ल.)मोडणारा; नाशकर्ता.
पु. उतारा (एखाद्या पदार्थाच्या दुष्परिणामावर). [सं.भंज]

**भंजणे** क्रि. मोडणे; तुकडे करणे.

**भंजन** न. १. मोडणे; फोडणे. २.(ल.) दाणादाण; मोड; विध्वंस; विघात; नाश. पहा : **भंग**. ३. तीव्रता, दोष नाहीसे करणारी वस्तू. [सं.भंज्]

**भंजन** न. तोंडीलावणे; पूरक पदार्थ. [सं.]

**भंजाडी** स्त्री. सरकारी जंगल.(व.)
न. त्रास; अडचण; लचांड. [सं.भवजाल]

**भंट, भंटोळे** न. त्रिकोणाकृती दांडा असलेले लाकूड; दुबेळके असलेले, दोन फाटे असलेले लाकूड. (बे.)

**भंड** पु. नट; कुशीलव; भांड; नटवा.

**भंड** न. पहा : **अभंड**

**भंड** न.पु. १. प्रायः कुभांड; तुफान; खोटा आरोप. २. त्रास. ३. लचांड. (गो.) ४. विटंबना; फजिती; उपहास; हसे : 'पाहतां वैभव दिसे उदंड । परी तें अवघें थोतांड। भंड पुढे।'- दास १०.८.२५. [सं.भांड] (वा.) **(तोंडाचे) भंड करणे** - शिव्या देणे. ० **खुलणे, फुटणे**- खरे ते बाहेर पडणे; गौप्यस्फोट होणे.

**भंड** वि. १. भांडखोर; हट्टी. २. थट्टेखोर. ३. लबाड. ४. अस्वस्थ. [सं.]

**भंडउभंड,भंडभंड** न. निरर्थक बडबड; पोकळ वल्गना.

**भंडपुराण** न. लांबलचक व कंटाळवाणी गोष्ट; चऱ्हाट; अर्वाच्य बडबड; आश्चर्यकारक व अविश्वसनीय गोष्ट.

**भंडमा-वा, भंडव(वा)डा, भंडिमा, भंडोडा** स्त्री. पु. विटंबना; फजिती; हंसे; धिंडवडे; ढोंग : 'व्यंग जालिया भंडमा कीजैल । देवदेवतांची ।'- स्वादि ५.३.५६.

**भंडवाणे** न. फजिती; फजीतवाणे.

**भं(भां)डाई** स्त्री. भांडण; फजिती; अपकीर्ती; कज्जेदलाली : 'बहिणी म्हणे आता करीन भंडाई।'- ब ४८८.

**भंडाडा-ळी** पु.स्त्री. फजिती; बोऱ्या.

**भंडाफोड** स्त्री. रहस्य उघड होणे; गुपित फुटणे-फोडणे.

**भंडार** न. जामदारखाना; खजिना; भांडार.

**भंडार-रा** पु. हळदीची भुकटी. हा मुख्यत्वे खंडोबाला वाहतात. (वा.) ० **उठणे** - बराच बोलबाला होणे. ० **उधळणे** - स्तुती करणे.

**भंडारखाना** पु.१. सोवळे-ओवळे, शिष्टपणा जेथे राहात नाही असा दंगलीचा, गोंधळाचा जेवण समारंभ. २. खजिना.

**भंडारगिरी** स्त्री. ताडी विकण्याचा धंदा.

**भंडारभरपूर** न. भरलेला आणि भरून वाहणारा खजिना, साठा. या शब्दाचा गोसावी, बैरागी आशीर्वाद देताना उपयोग करतात.

**भंडारमाड** पु. फळे येऊन दारू, माडीसाठी राखून ठेवलेला माड.

**भंडारा** पु. १.बैरागी, साधुसंत यांना दिलेले जेवण. २. भंडारखाना. ३. (ल.) धुळधाण. (वा.) ० **करणे** - (प्रसाद वाटून घेणे यावरून ल.) एखादा पदार्थ खाऊन संपवणे.

**भंडारा** पु. (बायकी) भोजनापूर्वी, तीर्थ घेण्यापूर्वी मंगळागौरीला थोडी हळद घालून वाहिलेली कणीक.

**भंडारा** पु. (जंबिया) चड्डीच्या नाडीजवळील पोटाखालील ओटीपोटाची जागा. [हिं.]

**भंडारा उलटा** (जंबिया) आपल्या हातातील जंबियाने आपल्या डावीकडच्या अर्थात जोडीदाराच्या भंडाऱ्याच्या उजव्या बाजूवर मारणे. [हिं.]

**भंडारी** स्त्री. १. भंडारा ठेवण्याची पिशवी (खंडोबाच्या भक्ताची). २. पैसे ठेवण्यासाठी कोनाड्यात केलेले लहान कपाट. (अहि.)

**भंडारी** पु. १. शूद्रातील एक वर्ग व त्यातील व्यक्ती. हे ताडा-माडापासून दारू काढतात. २. (नाविक) जहाजावरील जेवण तयार करणारा इसम; खलाशी.

**भंडाव(वि)णे** सक्रि. अतिशय त्रास देणे; छळणे; सळो की पळो करून सोडणे.

**भंडावा-ळी** पु. स्त्री. विटंबना; फजिती; उपहास. (क्रि. करणे)

**भंडाळ** वि. प्रचंड.
न. आगीचा भडका.

**भंडी** १. पहा : **भेंडी** (गाण्याची). २. फजिती; फसवणूक. [सं.]

**भंडी** स्त्री. गाडी. (तंजा.)

**भंडोरी** स्त्री. स्वयंपाकाची भांडी उतरविण्याची जागा.

**भंद** न. (प्र.) भणदी. पहा : **भ(भं)दे**

**भंदं** न. वि. ताटात उरलेले उष्टे अन्न.

**भंद्राज** वि. मध्यम. (व.)

**भंपक** पु. १. उचल्या; आगापिछा नसलेला मनुष्य. २. गावंढ्या; गावंढळ. (कर.) ३. खोटा मोठेपणा मिरवणारा.

**भंबरपट्टा** पु. मोठे कुंकू. (व.)

**भंबाकू** स्त्री. तंबाखूच्या, वांग्याच्या पिकात होणारे एक प्रकारचे तण.

**भंबा(भा)डा** पु. उधळपट्टी.

**भंबारने** अक्रि. सर्दी-पडसे होणे.

**भंबाळ** पहा : **बंबाळ** : 'महा पुच्छ तें ज्वाळ भंबाळ जाला ।'- राक १.८.८५.

**भंबेरी** स्त्री. १. फजिती; टर; उपहास; निंदा; बचेरी. २. गंजिफाच्या खेळातील एक शब्द.

**भंबो-ब्या** वि. १. बंब्या; मोठा आणि गलेलठ्ठ; अवजड बांध्याचा (मनुष्य). २. राक्षसी, अवाढव्य, जंगी (वस्तू).

**भंबोनाथ** पु. मोठा, टोणपा इसम; ठोंब्या; मूर्ख.

**भंबोरा** पु. पावऱ्या भिल्लांचा एक खेळ. (वा.) **भंबोरला खेन** - इतरांच्या कष्टाची दखल न घेता आनंदात जगणे.

**भंभराली** स्त्री. चिलट; घुंघरट.

**भंभाडे** वि. मोठे; मोठ्या आकाराचे.

**भंभाळ, भंभेरी, भंभ्या** पहा : **भंबाळ, भंबेरी, भंबो-ब्या**

**भंभाळा** वि. १. मोठा; प्रशस्त; अवजड; प्रचंड. २.अवाच्या सव्वा; उधळपट्टीचा : 'वाढता भंभाळा खर्च हुंडणावळीमुळेच होतो.'- टि १.६४१.

**भा** स्त्री. शोभा; तेज; प्रभा. [सं.]

**भाइज** वि. बाहेर जाईल असे; प्रगटः 'हें सांगितलें तुज गुज । होवों नेदावें भाइज।' - कथा ४.६.४७. [सं.बाह्यज]

**भाई** पु.१. भाऊ. २. (उद्योग, धंदा, जात इ. वैशिष्ट्य सांगताना) कोणीही माणूस. जसे : - कारकूनभाई, भटभाई इ. ३. आदरार्थी उपयोग (बहुधा हिंदी, गुजरातीत).उदा. नानाभाई. ४. (साम्यवादी) मित्र; समान दर्जाचा मनुष्य. इंग्लिश कॉम्रेड शब्दाला प्रतिशब्द. उदा. भाई डांगे.
स्त्री. मदत; साहाय्य; आधार. - लोसाको. [हिं.;गु.]

**भाईचारा-दारी-पणा, भाईबंदकी-बंदी** पु. स्त्री. १. भावाचे, भाऊपणाचे नाते. २. सलोख्याचा संबंध; मित्रत्व; स्नेह; बंधुत्व.

**भाईभाई** (विरू.) पहा : **भयाभया**

**भाउ(ऊ)क** पु. शृंगारचेष्टा : 'स्वामी केविं तुम्ही अधर्म करितां नेदी कदा भाउका ।'- कीर्तन १.८२. [सं. भावक]

**भाउरे** वि. भ्रमणारे.

**भाउळी** स्त्री. कीर्तन; भजन.

**भाऊ** पु. १. बंधू; भ्राता; स्वतःच्या आईच्या पोटी जन्मलेला मुलगा. २. काका, मामा, मावशी, आत्या यांचा मुलगा; जवळचा नातलग. ३. एकच धंदा, संस्था, व्यवसाय इ. तील माणसे; दोस्त; सहकारी. ४. एक बहुमानार्थी उपपद. जसे :- हरिभाऊ इ. [सं.भ्रातृ]

**भाऊगर्दी** स्त्री. १. (पानिपत येथे भाऊसाहेब पेशवे यांनी घनघोर युद्ध केले त्यावरून (ल.) निकराचे युद्ध. २.(ल.) अंदाधुंदी; धामधूम.

**भाऊ(ओ-वो)जी,भाऊ-ओ** पु. १. नवऱ्याचा भाऊ; दीर. २. बहिणीचा नवरा. ३. नवऱ्याचा मित्र; दिराप्रमाणे असणारा इसम. ४. बायकोचा भाऊ; मेहुणा. [सं. भ्रातृ]

**भाऊपण-णा, भाऊबंद-दी, भाऊबंदकी** पु.स्त्री. पहा : **भाईचारा**

**भाऊबल** स्त्री. भाऊबंदांच्या क्रमाने प्राप्त होणारा वतनाचा भोगवटा.

**भाऊबंदकी** स्त्री. कुटुंबातले भांडण, वैर.

**भाऊबीज** स्त्री. कार्तिक शुद्ध द्वितीया. या दिवशी बहीण भावास बोलावून त्याचा सन्मान करते व भाऊ तिला ओवाळणी घालतो.

**भाऊल** न. तरस. (गो.)

**भाक-ख-का-खा** स्त्री. १.वचन; खात्री; आश्वासन. (क्रि. देणे). २. परस्परांतील ठराव; करार; (आण शब्दाला जोडून येतो) कबुलायत. ३. पहा :**भाकबाहण** २. ४. भाषण; उक्ती. ५. विनवणी. (व.) [सं.भाष्]

**भाकड** वि. १. म्हातारपणामुळे, विऊन बरेच दिवस झाल्याने दूध देत नसलेली, आटलेली (गाय, म्हैस इ.). २. ज्या दिवशी काही धार्मिक व्रत, विधी नाहीत असा धोंड (दिवस). ३. ज्यात काही फायदा होत नाही असा (धंदा, जमीन, प्रयत्न इ.). ४. निरर्थक. ५. निःसत्त्व (अन्न इ.).

**भाकडकथा** स्त्री. १. एका कथेचे अनुसंधान चालले असता मध्ये निघणारी दुसरी कथा; आडकथा. २. रिकामटेकडे भाषण; बाष्कळ गप्पा; लांबलचक, नीरस, कंटाळवाणी हकिकत, गोष्ट इ. ३.देवादिकांच्या कथा सोडून इतर गोष्टी.

**भाकणूक** स्त्री. १. देवाकडून मिळालेले उत्तर. २. भविष्यकथन. ३. बोलणे; सांगणे. ४. कौल; शकुन. ५. विनवणी.

**भाक(ख)णे** उक्रि. १. भविष्य सांगणे. २. अभिवचन, आश्वासन म्हणून देवाजवळ काही वस्तू ठेवणे. ३.मागणे; इच्छिणे; दीनपणे विनंती करणे (करुणा, कीव, काकुळती या शब्दाबरोबर उपयोग). [सं.भाष्]

**भाकबाहण** स्त्री. १. प्रतिज्ञा; वचन; शपथ (देवापाशी घेतलेली). २. अभिवचन, आश्वासन म्हणून नवसाची फेड होईपर्यंत देवाजवळ अनामत ठेवलेली वस्तू.

**भाकर-री** स्त्री. १. जोंधळा, बाजरी इ.च्या पिठाचा चपटा आणि

वाटोळा थापून (जाड पोळीसारखा) भाजून केलेला खाद्यपदार्थ. देशावर भाकर (अनेकवचन भाकरी) व कोकणात भाकरी (अनेकवचन भाकऱ्या) अशी रूपे रूढ आहेत. २. पाण्यावर उडवण्याचा चपटा दगड किंवा खापर आणि हा खेळ. ३. बैलाच्या मानेवर घट्टा पडून बनलेले राठ कातडे : 'बैल तरी किती गुणी, त्याचे मानेवर भाकर होती.'- पाणकळा ३९. [सं.भक्ष्याहार, भ्रस्ज्] (वा.) ० **पायाने खाणे, मोडणे** - मूर्ख, वेडगळ असणे. **भाकरीला भूक लागणे**- जेवण वाट पाहात असणे. **लष्करच्या भाकऱ्या भाजणे** – नसत्या उठाठेवी करणे.

**भाकरखा(भा)ऊ** वि. (तुच्छातार्थी) भाकरी हे ज्याचे खाणे आहे असा (शेतकरी, कुणबी इ.).

**भाकरतुकडा** पु. (क्षुद्रतादर्शक) १. भाकरी. २. अन्न; जेवण.

**भाकरबडव्या** वि. (तिरस्कारार्थी) दुसऱ्याच्या घरी आचारीपणा करून उपजीविका करणारा; स्वयंपाकी.

**भाकस** पु. खाडीच्या पाण्यातील एक लहान मासा. (को.)

**भाकस** पु. तुरुंग; बंदिखाना.

**भाकार** न. (ल.) लहान झुडपे असलेले मोठे रान.

**भाकाळा** पु. खळगा. पहा : **भकाळी**

**भाकीत** न. भविष्य. [सं.भाषित]

**भाग** न. दैव; नशीब. पहा : **भाग्य** [सं.भाग्य]

**भाग** पु. १. शीण; भागवटा. २. खटपट : 'इतुलियाही भागु । अज्ञानाचा तरि तो भागु।' – अमृ ७.८०.

**भाग** पु. खच; पड; वाक. (क्रि. देणे) [क.बागु]

**भाग** पु. १.वाटा; हिस्सा; वाट्याला आलेला पदार्थ. २. देवाला अर्पण करण्याची वस्तू; देवतेसाठी द्यायचा अंश. ३. (गणित.) भागाकाराचे फळ. ४. वाटणी, विभागणी करणे. ५. मुद्दा; हेतू; उद्देश; तात्पर्य; धोरण (भाषण इ.चे). ६. अंश; विभाग इ. ७. कार्य; गोष्ट; प्रयोजन : 'आजच तें करायला पाहिजे होतें अशांतला कांहीं भाग नाहीं.'- कोरकि ४६. ८. एखाद्याचे ठरलेले काम, कर्तव्य, कार्यभाग : 'भाग्यें एकाकी जय सापडला साधिं आपुल्या भागा।'- मोकर्ण ४४.२४. ९. कर; सरकारी हिस्सा; टोल. १०. निवड; भेद: 'येथ वाच्य वाचकही। भागु न धरी।'- ज्ञा १८.१६८१. ११. प्रकार : 'येर माणुसपण तें भांब । लौकिक भागु।'- ज्ञा १०.७७. [सं.] (वा.) ० **असणे, पडणे** – उचित असणे; जरुरी पडणे. ० **तुटणे** – दुसऱ्याशी केलेला व्यवहार निकालात निघणे, संपणे. ० **तोडून देणे** - निश्चय करून देणे. ० **पाडणे** – हुकूम करणे; सक्तीने करायला लावणे. ० **फिटणे**- १. द्वैतभाव नाहीसा होणे. २. वाट्यास येणे. ० **होणे, भागास येणे, पडणे** – प्राप्त होणे; वाट्यास येणे : 'बा! गा! भागा तुझ्याचि यश आलें ।'- मोवन १२.११४. **भागाने लागण करणे** – विशिष्ट हिस्सा घेण्याचे ठरवून शेत लावणे. **भागास आणणे** - (एखादी गोष्ट) सिद्ध करणे; घडवून आणणे.

**भागगर्भ** पु. सारांश. - हंको.

**भागजाति, भागजातिअपूर्णांक** स्त्री. पु. अव. साधा अपूर्णांक.

**भागडा, भागडपाठ्या** वि. खोलगट पाठीचा; ज्याची पाठ मध्ये वाकलेली मध्ये वाकलेली आहे असा.

**भागणूक** स्त्री. परिपूर्ती; पूर्तता.

**भागणे** अक्रि. १. श्रमणे; दमणे; थकणे; शिणणे. २. (ल.) खचणे; वाकणे; दबणे (खांब, तुळई इ.). ३. (आजार, म्हातारपण इ.मुळे) कृश, शक्तिहीन होणे; मेटाकुटीस येणे ( शरीर, मनुष्य). ४. (ल.) चालणे; पुरे होणे, पडणे; निर्वाह होणे. ५. फिटणे; नाहीसे होणे. ६. सुखी, कृतकृत्य होणे :' तुवा दीधला वैकुंठपीठ । मम मानस भागावया।'- जै १४.२५. [सं.भंज् = मोडणे]

**भागणे** उक्रि. १. (गणित.) भाग देणे; एका संख्येतून दुसरी संख्या किती वेळा वजा जाईल हे संक्षिप्त रीतीने पाहणे. २. विश्लेषण करणे. [सं.भाज; क. भागिसु]

**भागणे** अक्रि. धावणे; जाणे; पळणे. [हिं. भागना]

**भागणे** उक्रि.१. फायदा होणे. २. जवळ येणे. [सं.अभ्यागम]

**भागतीभुगती** स्त्री. दैवाने दिलेले, नशिबात असलेले सुख-दुःख.

**भागदार** पु. जमिनीचे वतनदार; इनामदार; सरकारी वसुलातून आपल्या हिश्श्याची रक्कम काढून घेणारे वतनदार.

**भागधारक** पु. ज्याच्या नावे भागपत्र (शेअर) घेतले आहे ती व्यक्ती.

**भागन** पहा : **भगण** ३.

**भागपत्र** न. गुंतवणूकपत्र; शेअर सर्टिफिकेट.

**भागप्रभाग** पु. मिश्र अपूर्णांक.

**भागबटाई** स्त्री. जमिनीतील पिकाचा ऐनजिनसी भाग महसुलासाठी घ्यायची पद्धत.

**भागभूक** स्त्री. धाकधूक; बाकबूक. [ध्व.]

**भागलीक,भागवटा** स्त्री.पु. थकवा; शीण; दमणूक.

**भागवणी** स्त्री. १. थकवणे; दमवणे; श्रमवणे. २. कष्टाच्या व आवाक्याच्या बाहेर असलेल्या कामाने जर्जर करणे.

**भागवत** पु. १. विष्णुभक्त; वैष्णव. २. भगवद्भक्त; भक्त. ३.हरदास; कीर्तनकार. (तंजा.) ४. पौराणिक नाटकातील सूत्रधार,नट.
न. अठरा पुराणांपैकी एक. पहा : **पुराण**
वि. भगवद्विषयक; भगवानासंबंधी.

**भागवतधर्म** पु. निर्गुण व अचिंत्य अशा परब्रह्माचे सगुण रूप डोळ्यांपुढे ठेवून त्याची उपासना व भक्ती केल्याने मोक्षप्राप्ती होते अशा मताचा संप्रदाय.

**भागवती** स्त्री. ईश्वराची भक्ती.

**भागश:** क्रिवि. भाग करून; भाग, घटक यांच्याप्रमाणे.

**भागशीण** पु. अतिशय थकवा, शीण. (क्रि.होणे, येणे.)

**भागस्थळ** न. करवसुलीची जागा; टोलनाका.

**भागळी** स्त्री. घर, शेत इ. विभागून प्रत्येकाच्या वाट्याला आलेला भाग.

**भागा** पु. मित्र.

**भागाकार** पु. १. (गणित) संख्येचे काही नियमित प्रमाणाने भाग पाडण्याची क्रिया. २. भागून येते ती संख्या. ३. वजाबाकीच्या संक्षेपाचा एक प्रकार; एका संख्येतून दुसरी संख्या किती वेळा वजा

जाईल हे काढण्याची रीत. [सं.भज्]

**भागाड्या** वि. पळपुटा : 'शिंदे यांचे फौजेची हेटाळणी भागाडे म्हणून होळकरांचे लोक करीत होते.'- भाब (नवी प्रत) ९९.

**भागाभाग** स्त्री. १. वियोग; ताटातूट. २. पळापळ; धडपड; यातायात.

**भागाभाग** पु. ऋणानुबंध; दैवयोग. (ना.)

**भागावळ** स्त्री. परंपरागत देवकृत्य किंवा पिशाचकृत्य.(गो.)

**भागिक** वि. (शाप.) अपूर्ण; आंशिक; अंशत:.

**भागी,भागीन, भागीदार, भागीलदार** पु.१. पातीदार; सरकती. २. हिस्सेदार; वाटेकरी.

**भागी** अ. स्वत:, अंगे.

**भागी, भागीदारी, भागीन** स्त्री. १. अनेकांनी समाइकीचा केलेला व्यवहार; पाती; सरकत. २. अशा व्यवहारातील भाग. ३.(कायदा) काही माणसांनी आपला वेळ, जिंदगी, मेहनत, चातुर्य काही उद्योगांत एकत्र करून त्यापासून होणारा नफा वाटून घेण्याचा करार.

**भागील्लो** वि. १.भागलेला. २.कृश. (गो.)

**भागु(गू) बाई** स्त्री. (निंदार्थी) पळपुटा, भित्रा, पुचाट, नामर्द पुरुष. [हिं.भागना]

**भागेलभाग** पु. कुळाचा वाटा. (गो.)

**भागेला** पु. निजामराज्यात जमीन धारण करणारा एक वर्ग.

**भागेली** पु. १. भागीदार; पातीदार. (को.) २. वाटेकरी; समाइकीच्या व्यवहारात ज्याचा काही ठरावीक भाग आहे तो. ३. शेताचे अर्धे उत्पन्न मालकाला देण्याच्या शर्तीवर शेत करणारा; खंडकरी. ४. कूळ; शेत्या. ५. नारळाची बाग राखण्यासाठी मालकाने ठेवलेला माणूस. याला पिकाचा काही अंश मजुरी म्हणून देतात.

**भागोटा-डा** पु. १. (दैवज्ञ) लग्नातील गाववाल्या पक्षाने जानवसवाल्या पक्षास एक वेळ जेवणास पुरेल असा द्यायचा शिधा. २. एकवेळ घातलेले जेवण.- बदलापूर १११.

**भागोटी** पहा : **भागलीक, भागवटा**

**भागोळ** पु. शहराच्या किंवा गावाच्या शेवटाकडचा भाग. [गु.]

**भाग्य** न. १. नशीब; दैव. २. वैभव; ऐश्वर्य.[सं.] (वा.) **भाग्याचा भोपळा** - दुर्दैवी, हतभागी माणूस.

**भाग्य** वि. भाग देण्यास योग्य, शक्य; भागण्यालायक.

**भाग्य** न. तैनात : 'गंगाधर कुलकर्णी बाटल्यावर त्यात भाग्य अडीच सनदी मनसब देऊन चाकर करून ठेविला. '- ऐको.

**भाग्यदा** स्त्री. सोडत; लॉटरी.

**भाग्यवान-वंत-शाली** वि. १. दैववान; सुदैवी; नशीबवान. २. पुण्यात्मा; पद्महस्ती.

**भाग्यस्थान** न. (ज्यो.) कुंडलीतील नववे स्थान.

**भाग्येश,भाग्यधिपति-ती** पु. भाग्यस्थानचा, कुंडलीतील नवव्या स्थानाचा अधिपती, स्वामी.

**भाच,भाच(चा)र-रा** न.पु. पहा : **भाचा, भाची**

**भाचर-री** स्त्री. भट्टी; कुंभाराची भट्टी. [सं.]
वि. भाजलेले.

**भाचवंड** न.बहिणीचा किंवा भावाचा मुलगा.

**भाचा** पु. बहीण, नणंद, बायकोचा भाऊ मेव्हणा यांचा मुलगा.

**भाज-जा** स्त्री. बायको; पत्नी : 'दिव्यासनीं रघुराज । सव्यभागीं सीता भाज।'- वेसीस्व १०.९५. [सं.भार्या]

**भाजक** वि. १. विभागणारा. २. जिने भाज्याला भागायचे ती संख्या.

**भाजकट, भाजट** वि. १. किंचित भाजलेले. २. भाजल्याचा वास येत असलेले.

**भाजका-के** वि. १. तापवलेला; शेकलेला; भाजलेला. २. भाजलेली; तापवलेली (जमीन,शेत इ.). ३. परतलेला; पक्व केलेला (कोणताही पदार्थ).

**भाजखमीर** न. बेकरीत पदार्थ फुगण्यासाठी वापरायचे खमीर; आंब; फुगवण.

**भाजण-णे-प** न. १. भाजणे; शेकणे. २. खापर इ.त भाजण्यासाठी घेतलेले धान्य इ. ३. भाजण्यासाठी एकवेळ घालायच्या धान्य इ. चे परिमाण; घाणा. ४. एकदा भाजण्याची क्रिया. [सं.भृज्जति,भज्जन]

**भाजणावळ** स्त्री. भाजण्याची मजुरी.

**भाज(जा)णी-नी** स्त्री. १. चार-पाच तऱ्हेची धान्ये व डाळी भाजून एकत्र दळून केलेले पीठ. २. भाजणे; शेकणे; भाजण्याची क्रिया. ३. पेरणीच्या अगोदर जमीन भाजण्याची क्रिया. ४. किंचित उष्ण करणे, शेकणे; मिश्रित करणे: 'ब्रम्हविद्येचेनि कसें । कामतत्वा भाजनी दीसे।'- भाए ३४.

**भा(भां)जणी** स्त्री. १.(गणित.) विशिष्ट वजाबाकी किंवा भागाकार. हलक्या परिमाणाच्या अंकास हलके रूप देणे. २. वाटणी; वाटप. ३. कोळपणी; वखरणी. ४.(अशिष्ट) बिघडवणे;विचका करणे.(क्रि.मारणे) ५.वर्ग; भेद.

**भाजणूक** स्त्री.(ल.) छळणूक; पीडा; त्रास; गांजणूक.

**भाजणे** अक्रि. पोळणे; चटका बसणे; जळणे; होरपळणे.
सक्रि. १. चूल, शेगडी इ. च्या जाळावर तवा किंवा खापर ठेवून भाकरी, पोळी, धान्य इ. शेकणे, पक्व करणे; परतणे. २. पोळणे. ३. (ल.) गांजणे; छळणे; सतावणे; त्रास देणे. ४. (सामा.) जाळणे. (को.) ५. छकणे; खोडणे (हिशेब). (राजा.,कु.)

**भाजणे** उक्रि. १. भागणे; विभागणे; वाटणी, भाग करणे. २. (गणित.) भाजणी करणे. [सं.भ्रस्ज]

**भाजणे** न. धान्य भाजण्याचे खापर.

**भाजन** न. १. (सामा.) पात्र; भांडे. २. (ल.) स्थान; आधार; गृह. ३. भागाकार; भाजणे.

**भाजपी, भाजपीण** पु.स्त्री. पोहे,लाह्या इ. भाजणारा-भाजणारी.

**भाजपोळ** स्त्री. १. भातशेतीसाठी जमीन भाजणे इ. कामे. २.जाळपोळ; लूट करताना घराला आग लावणे, माणसांना भाजणे इ. कृत्ये.

**भाजभूज** स्त्री. १. भाजणे; शेकणे. २. भाजलेले धान्य.

**भाजवट, भाजावळ-ण** स्त्री. १. बी पेरण्यापूर्वी जमीन तयार करताना त्यात पालापाचोळा टाकून जाळण्याची,भाजण्याची क्रिया. २. अशा रीतीने भाजलेली जमीन.

वि. १. भाजलेली (जमीन). २. भाजावयास पाहिजे अशी (जमीन). ३. (क्व.) भाजलेले; शेकलेले (धान्य).

**भाजा** पु. एका वेळी भाजायला घेतलेल्या धान्याचे परिमाण; भाजण.

**भाजाकार** पु. छळवाद.

**भाजाणा** पु. भाजलेला हरभरा इ. चा दाणा.

**भाजिणे** क्रि. नष्ट करणे.

**भाजी** स्त्री. १. मुख्य अन्न खाताना फळे, फुले, पाला इ. शिजवून मसाला घालून तोंडी लावण्यासाठी तयार केलेला पदार्थ; शाक. २. शिजवून खाण्याच्या कामी उपयोगात आणतात ती फळे, मुळे, कंद, पाला इ. ३. नैसर्गिक रीतीने मेलेल्या जनावराचे मांस. ४. विटीदांडूच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द ५.(ल.) चोळामोळा. [सं.भर्जिका]

**भाजी** स्त्री. १. पत्नी. - लोसाको. २. साहाय्यक.-रावाको.

**भाजीकाची** वि. (भाजीकच्ची!) कोणताही मनुष्य, परिस्थिती, पदार्थ इ. विषयी नेहमी नाखुशी दाखवणारा (माणूस).

**भाजीदस्त** पु. बाजारात विकायला आलेल्या भाजीवरील कर.

**भाजीपाला** पु. १. शिजवून खाण्यास, तोंडी लावणे करण्यास योग्य अशी फळे, कंद, पाला, मुळे इ. समुच्चयाने. २.(ल.) निरर्थक, तथ्य नसलेली गोष्ट.

**भाजीभाकर** स्त्री. (ल.) साधे, गरिबांचे अन्न.

**भाजुक** वि. १. पक्के; भाजलेले. २.(ल.) चांगले : 'भाजुक साजुक नाजुक राजसवाणें ।'- अमृत ३५.

**भाज्य** न. (गणित.) भाजकाने जिला भागायचे ती संख्या.

वि. विभागण्यास योग्य, जरूर, शक्य; वाटणी करण्यायोग्य.

**भाट** पु.१. राजेरजवाडे, सरदार इत्यादींची स्तुती, स्तोत्रे गाणारांची एक जात व तीतील व्यक्ती. हा एक अलुतेदार असून घराण्यांच्या वंशावळी ठेवणे, लग्ने जमवणे, खालच्या वर्गाच्या लोकांस लग्नाचा मुहूर्त काढून देणे अशी याची कामे असत. २. स्तुतिपाठक. ३. वकील.- ऐकोपु. ३. महारांचे विधी करणारा मनुष्य.

वि. व्यर्थ, पोकळ बडबड करणारा. [सं. भट्ट]

**भाट** स्त्री. न. १. ओहोटीच्या वेळी समुद्रातील किंवा पाणी आटल्यामुळे नदीतील उघडी पडणारी उंचवट, सपाट जागा. लाग; खांडवा; दांड. २. उसाची लागवड. ३. त्यासाठी तयार केलेली जमीन. (को.) ४. बागाईत जमीन.

न. १. भाटले; शेतजमिनीच्या आसपासची उंचवट्याची जमीन; पडीत, बरड, उखर जमीन. ह्यात हलकी धान्ये होतात. (को.) २. नारळीची बाग. (गो.)

**भाटक** न. भाडे; मजुरी; पगार. [सं.]

**भाटकार** पु. भाटाचा मालक; जमीनदार.

**भाटकी** स्त्री. भाट पक्षी; कुक्कुटकुंभा. (कु.)

**भाटकोपजीवी** पु. वस्तू भाड्याने देऊन उपजीविका करणारा.

**भाटजांबू(भू)ळ** स्त्री. एक औषधी, जंगली झाड.

**भाटणे** सक्रि. वाजवणे. -शर.

**भाटले** न. पहा : **भाट** २, ४

**भाटवळ** वि. भाटजमीन मुबलक प्रमाणात असलेली (जागा).

**भाटवा,भाटो** पु. मोठ्या बहिणीचा नवरा; मेहुणा.

**भाट(ठ)वोळीपणा** पु. व्यर्थ बडबड: 'जळो ऐसी ब्रीदावळी। भाटवोळीपणाची ।'- तुगा ९७७.

**भाटाळि-ळे** स्त्री. न. भाट; भाटी.

**भाटि(टी)व** स्त्री. स्तुती; गुणवर्णन.

**भाटी** स्त्री. १.पहा : २ **भाट** १. २. नदी, खाडी इ. च्या काठची बागाईत, मळे इत्यादींसाठी उपयुक्त, सुपीक जमीन.

**भाटी** स्त्री. मांजरी.

**भाटी** स्त्री. १. दारू गाळण्याचा कारखाना, भट्टी. (गो.) २. दारू गाळण्याचे यंत्र इ. ३.घडाभर दारू.

**भाटीण-न** स्त्री. खाण्याच्या वस्तू विकणारी स्त्री:'आलं भाटीनीचं घर। तान्हा माझा रे हाटला '- बगा.

**भाटीय-व** न. ऐक्य. - मनको.

**भाटु** पु. भट; भिक्षुक :'नामे खवणा भाटु आला ।'- पंच १.४३. २.भाट.

**भाटेशाई** वि. एक प्रकारचे पागोटे.

**भाड** स्त्री. १. स्वत:ची बायको, बहीण यांना उपभोगार्थ देऊन, कुंटणपणाने मिळवलेला पैसा. २. दलाली. [सं.भाटक]

**भाड** न. १. धान्य इ. भाजण्याची भडभुंजाची भट्टी. २. या भट्टीखाली सरपण घालणे. ३.भट्टीत घातलेले सरपण, जळण. (क्रि. घालणे) पहा : **भडस स्त्री** [हिं.भाड]

**भाडकण-कन-कर-दिन-दिनी-दिशी** क्रिवि. एकदम; ताडकन; आवाज होईल असे (वृक्ष, फळ इ.पडणे) किंवा तडकाफडकी करणे, बोलणे इत्यादींच्या ध्वनीचे अनुकरण होऊन. [ध्व. भाड]

**भाडकल** (हैद्रा.) पहा : **डहळज**

**भाडखाऊ,भाड्या** वि. (अश्लील) घरच्या स्त्रियांच्या वेश्यापणावर निर्वाह करणारा; एक शिवी.

**भाडभवई** स्त्री. अनीतीचा व्यवहार; हरामखोरी.

**भाडभाड** क्रिवि. भराभर; भडाड (काम करणे, बोलणे).

**भाडभीड** स्त्री. मुरवत. पहा : **भीडभाड**

**भाडवी** वि. भाडोत्री.

**भाडळी** स्त्री. एक झाड. याच्या काड्या चुडीप्रमाणे पेटवतात.

**भाडळीमत** न. सहदेव आणि भाडळी यांनी काढलेले फलज्योतिषाचे मत, पद्धती.

**भाडि,भाडाऊ** पु. हीन धंद्यातील स्त्री-पुरुष.

**भाडी** क्रिवि. खूप; मोठा.

**भाडे** न.१. एखाद्याचे घर, जमीन इत्यादींच्या उपयोगाबद्दल त्याला द्यायचे पैसे. २. काही माल, मनुष्य इ.वाहून नेण्याबद्दल घोडे, बैल, मनुष्य इत्यादींसाठी घेतात ते पैसे; किराया. ३. माल, मनुष्य इ. ना पैसे घेऊन पोचवून देण्याचे काम.[सं.भाटक, भाट; क.बाडिग] (वा.) **जळते घर भाड्याने घेणे** - धोका प्रत्यक्ष दिसत असता त्यात पडणे.

**भाडेकरी, भाडेती** पु. १.(जनावर, घर, गाडी इ.) भाडे घेऊन वापरायला देणारा. २. दुसऱ्याचे घर इ. भाडे देऊन वापरणारा. ३.मजुरी घेऊन काम करणारा; मोलकरी; वेतन्या. ४.ज्याच्या नशिबी फक्त कष्ट असतात व त्या कष्टापासून झालेला फायदा त्याला न मिळता दुसऱ्याला मिळतो असा इसम; मजूर.

**भाडेचिठ्ठी** स्त्री. शेत, घर, जमीन इ. काही मुदतीपर्यंत वापरायला देऊन त्याबद्दल केलेला लेखी करार.

**भाडेतोडे** न. भाडे; वापरायला दिलेल्या वस्तूचा मोबदला इ. समुच्चयाने.

**भाडेपट्टा** पु. स्थावर मिळकतीच्या मालकाकडून ती मिळकत उपभोगायचा, वापरायचा हक्क घेताना त्याबद्दल त्या मालकाला ठरावीक रक्कम, पिकाचा भाग भाडे म्हणून देण्याचा केलेला करार.

**भाडेमूल्य** न. येणाऱ्या भाड्यावरून ठरणारी किंमत.

**भाडेल** स्त्री. ओझे वाहणारी स्त्री. (गो.)

**भाडेली** पु. ओझे वाहणारा मजूर.(गो.)

**भाडोतरी,भाडोत्री** वि. १. भाडे देऊन मालकाच्या घरी राहणारा. २.पैसे घेऊन काम करणारा; मोलकरी; दुसऱ्यासाठी पत्करलेला.

**भाण** पु. न. (नाट्य.) एक रूपकप्रकार. [सं.]

**भाण** पु. १. हंडा.(कारवारी) २. मोठी बरणी. (गो.)

**भाण** न. (कुंभारी) जेवण : 'पितरांच्या नांवीं लेका भाण भरावें.'– बदलापूर. पहा : **भाणे** २

**भाणजा** पु. बहिणीचा मुलगा. [हिं.भांजा]

**भाणवशी** स्त्री. दुभत्याची भांडी ठेवायची घडवंची, उतरंड.

**भाण(न)वस–सा** स्त्री. पु. १.चुलीच्या मागे दगड, माती, चुना इत्यादींचा करतात तो ओटा. २. उतरंडीचे भांडे नीट बसावे म्हणून जमिनीवर केलेले मातीचे कोंडाळे. ३. उतरंड लावण्याची जागा; उतरंडघर. ४.स्वयंपाकघर. [सं.महानस]

**भाणवसी** पु. आचारी; स्वयंपाकी.

**भाणशिरे** न. १.स्वयंपाकिणीने उपयोगात आणलेला मळकट कपडा. २. भाताची पेज काढण्याच्या वेळी भांड्याच्या तोंडास बांधतात ते फडके. ३.व्यभिचारी स्त्री. ४. एक शिवी.

**भाण(णू)स** पु. १. काही जातींत लग्नाच्या वेळी नवऱ्यामुलीच्या बापाकडून नवऱ्यामुलाकडे पाठवली जाणारी २०–२५ मडक्यांची उतरंड; गौरीहार; वही. (को.) २. दूधदुभत्यासाठी असलेले दीड–दोन शेराचे मातीचे भांडे. हे उभट असून वर अरुंद असते. ३.जेवण : 'नाना पकवानें तेयां वेळा । करविती भाणसा ।'– क्रिपु २.३१.६. (वा.) ० **उतरणे** – वधूवरांची वरात घरी आल्यावर, लक्ष्मीपूजन झाल्यावर एका उतरंडीत असलेले अलंकार वधूने उतरंड उतरून अंगावर घालण्याचा विधी.– लविसो १४३.

**भाणस** क्रिवि. व्यर्थ; वाया; बुडलेले. (क्रि. जाणे)

**भाणसाघर** न. स्वयंपाकघर. – ख्रिपु.

**भाणा–ण** स्त्री. बहीण: 'आक्षत भरली भाणा । दुजा ब्राह्मण मेहुणा।'– दास ३.३.१०. [सं.भगिनी]

**भाणे–ने** न. १. पात्र; भाजन. २. अन्नाने भरलेले ताट. ३. जेवण; भोजन. [सं.भाजनम्]

**भाणे** अक्रि. जेवणे.

**भात** न. एक तृणधान्य; टरफलासह तांदूळ; साळी.[सं.भक्त] ० **मारणे** – भात झोडणे; भाताच्या जुड्या घेऊन लाकडी ओंड्यावर आपटणे. (मालवणी) ० **मोडणे** – भात विकणे. (राजा.) ० **राबणे** – भाताचे भारे रचल्याबरोबर भात झोडले तर मोडते म्हणून काही दिवस उडवी तशीच ठेवणे. – कृषि २३९.

पु.१.तांदूळ किंवा जोंधळ्याच्या कण्या शिजवून केलेला पदार्थ. २.नवविवाहितेसोबत पाठवलेला भात व इतर खाद्यपदार्थ. ३. (ल.) नासलेले फळ. ४.(ल.)चिघळत चाललेली जखम. (अहि.)

**भात** स्त्री. १. चाल; रीत; तऱ्हा; पद्धत; ढब. २. प्रकार; तऱ्हा; जात. [सं.भक्त; हिं.]

**भात** स्त्री. लांब व दाट उगवलेले कुसळाचे गवत.

**भात** स्त्री. पत; नावलौकिक; कीर्ती; अब्रू.

**भातक(कु–कू)ण–कूट–गोटा** पु. न.टरफल असलेला तांदळाचा, साळीचा दाणा.

न. तांदळात मिसळलेली किंवा त्यातून निवडून काढलेली निवड.

**भातकरी, भातकार** पु. भाताची लागवड करणारा शेतकरी.

**भातकुले, भातुकले, भातकूल** न. भातुकलीच्या खेळातील पदार्थ. २. पहा : **भातके** १, ३

**भात(तु,न) के, भातूक** न. १. जेवणाशिवाय लहान मुलांना देतात ते खाणे, खाऊ : 'जे लोकत्रयाचें भातुकें। खेळतांचि खाय कवतिकें ।'– ज्ञा ३.२४८. २. मुख्य जेवण सोडून इतर पदार्थ, फराळाचे जिन्नस, उपहार (लाह्याचे पीठ, पोहे, लाडू इ.). ३. चांगले, चवदार, हलके अन्न, खाद्य. ४. भक्ष्य: 'देहा केंवि रिझे । हें काळाचें भातुकें ।'– तुगा. ५. अन्न; आहार : 'कृष्णदर्शनाचेनि भातुकें । ... माझे शरीर अजेय ।'– जै ५.५. ६. विवाहप्रसंगी वधूकडून वराकडे नेतात ते फराळाचे पदार्थ. [सं.भक्त]

**भातखाऊ–भट्टी–भरू–भों(बो)कण्या–भोक्या** वि. १. (उपहासार्थी) नुसता भात खाणारा. भाकरी हे मुख्य अन्न असणाऱ्यांनी फक्त भात खाणाऱ्या लोकांबद्दल उपहासार्थी वापरलेला शब्द. २. रिकामटेकडा; काही उद्योगधंदा न करता खाणारा.

**भातड–डा–डी,भाता** न. स्त्री. बाण ठेवण्याची पिशवी.

**भात(तो)डी, भात्या, भातोटा,भाता** स्त्री.पु. सोनाराची अग्नी प्रज्वलित करण्यासाठी वारा भरण्याची पिशवी. [सं. भस्त्रा]

**भात(ते)ण, भात्या(त्ये)ण** न. पेंढा; भाताच्या काड्या; भाताचे पीक काढून घेतल्यानंतर उरतात त्या काड्या, गवत इ.

**भातफूल** न. भाताची लाही.

**भातभातचा** वि. तऱ्हतऱ्हेचा; निरनिराळ्या प्रकारचा.

**भातवडा–डी** स्त्री. १. जोंधळ्याचे भरड पीठ उकळून त्यात मीठ,तीळ इ. घालून त्याची उन्हात वाळवून केलेली पापडी; जोंधळ्याच्या कण्यांची भाजीव सालपापडी. २. गव्हाचा चीक काढल्यावर उरलेल्या चोथ्यात तिखटमीठ घालून केलेल्या, थापलेल्या वड्या.

**भातवडी रुप(पा)या** अंकुशी रुपयाचे एक चलनी नाणे. पूर्वी भातवड गावी हे नाणे पाडीत असत.

**भातरणी-नी** स्त्री. पेज.

**भातसाण** स्त्री. कुजलेल्या भाताची, कोंड्याची घाण.

**भातळ** वि. ज्यात बरेच भातगोटे राहिले आहेत असे (तांदूळ).

**भाता** पु. १. प्रवासात स्वयंपाक करण्यासाठी लागणारी भांडीकुंडी ठेवण्यासाठी वापरतात ती चामड्याची पिशवी. ही सहसा प्रवासी, शिपाई वापरतात. २. शरीर भाजल्यामुळे पडणारे कातडे. [सं. भस्त्रा]

**भाताचा पिंड** केवळ भातावरच पोसलेला इसम.

**भाताणी गवत** पहा : **भात(ते)ण**

**भाती** स्त्री. १. दान. २. मोबदला. (झाडी)

**भा(भां)ती** स्त्री. प्रकार; तऱ्हा. पहा : **भात**

**भातीचा कुडो** मजुरीचे धान्य मोजण्याचा कुडव. (झाडी)

**भातु(त)कली** स्त्री. १. लहान मुली स्वयंपाक, जेवण या तऱ्हेच्या संसारातील गोष्टींचे अनुकरण करून खेळतात तो खेळ. २. भातुकलीच्या खेळातील पदार्थ, स्वयंपाक.

**भाते** न. १. कर्मचाऱ्यास त्याच्या वेतनाव्यतिरिक्त माल, वाटखर्च, भाडे यासाठी दिलेला जास्तीचा पैसा; भत्ता. २. सावकार, सरकार यांनी वसुलीसाठी पाठविलेल्या माणसाला, त्याला वेळेवर पैसा देता न आल्यास त्याच्या खोळंब्याबद्दल कुळाने, ऋणकोने द्यायचा पैसा. ३. पोटगी; खाद्य. ४. वतन. पहा : **भत्ता** [सं.भक्त; हिं.]

**भाते** न. समुद्राला येणारी भरती. [सं.भृत]

**भाते** न. वारे; संचार: 'प्रेमभाते भरले अंगीं । तेणे छंदे नाचे रंगीं ।' - नाम १९९८.

**भाते** न. १. उरी फुटलेल्या माणसाला किंवा जनावराला पाजण्याचे औषध. २. वाकेरी इ. औषधाचा कंद.

**भाते-ती** न.स्त्री. लहान भाता. (गो.)

**भाते** न. भाकरी ठेवण्याच्या टोपलीत घालण्याचे फडके.

**भाते-त्या** न. पु.भाताचा चपटा चमचा.

**भातेरी** स्त्री. खरडपट्टी. (गो.)

**भातेवाला** पु. बेलीफ.

**भातोडा** पु. भात.

**भातुकुली** स्त्री. पुटकुळी. (झाडी)

**भात्या** पु. डिंकाची एक जात. - मुंव्या ४६.

**भादरणी** स्त्री. १. (म्हैस, मेंढी यांच्या केसांची) कातरणी. २. हजामत.

**भादरणे** उक्रि. १. (म्हैस, मेंढी यांसारखे जनावर, कातडे, वस्त्र यावरील केस, लोकर, दशा, कापड विणताना शिल्लक राहिलेले दोरे) अंगाबरोबर कापणे; कातरणे; खरडून घासून काढणे; बोडणे. २. (निंदार्थी) हजामत करणे. ३.(ल.) तासडपट्टी, खरडपट्टी काढणे. [सं.भद्राकरण]

**भादरनं** अक्रि. इतरांना बोलू न देता आपणच बडबडणे.

**भादरभादर करणे** मध्ये मध्ये बोलणे. (अहि.)

**भादर(रे)ड** स्त्री. १. अफूच्या पिकासाठी तयार केलेली जमीन. २. पावसाळ्याचे पीक न घेता रब्बीसाठी पडीत ठेवतात अशी जमीन.

**भादऱ्या** वि. आगाऊपणाने बोलणारा.

**भादली** स्त्री. नाचणीसारखे एक हलके तृणधान्य; राळा.

**भादली** स्त्री. धान्य मोजण्याचे माप. (कृषि.)

**भादवड** स्त्री. भाद्रपद महिन्याचा काळ.

**भादवा** पु. भाद्रपद महिना. [सं.भाद्रपद] (वा.) ० **माजवणे** - कामक्रीडा करणे. (माण.)

**भादवा** पु. वाढलेल्या झाडाच्या बुडातून फुटणारी फांदी. (व.)

**भादवा** वि. उतारवय झालेला; म्हातारा.

**भादश्येणे** अक्रि. ओलसर होणे. (कु.)

**भादा-द्या** वि. खच्ची केलेला, अंड बडवलेला (बैल). (वाई)[सं.भ्रद]

**भादी** वि. १. पूर्वी दोन-तीन वेळा व्यालेली, पहिलटकरीण नव्हे अशी (गाय, म्हैस इ.). २. चांगली; नीटनेटकी : 'आघवाचि विषयीं भादी । परि सांजवणी टेंकों नेदी ।'- ज्ञा १३.६३७.
स्त्री. महारांचा भाद्रपदातील सण. (अहि.)

**भादेले** न. खापर.

**भाद्रपद** पु. मराठी वर्षातील सहावा महिना. [सं.]

**भान** न. १. शुद्धी; सावधपणा; अंत:करणाची जागृत स्थिती; वस्तू असण्याची जाणीव. २. लक्ष; ध्यान; अनुसंधान; काळजी. ३. आठवण; स्मरण : 'ज्ञात्यासि देहाचें बाधीना भान ।'- एभा १३.५८२. ४. कल्पना; प्रतीती; समजूत; भावना : 'कृष्णध्यानीं निमग्न । नाठवेंचि दुजें भान ।'- जै ९६.४१. ५. चैतन्य. ६. अधिष्ठान: 'मिथ्या कल्पनेचें भान । उडोन जाये ।'- दास ७.५.२७.७. भास; आविष्कार.

**भान** न. जेवणाचे ताट; पात्र.

**भानगड** स्त्री. १. गुंतागुंत; घोटाळा; अव्यवस्था; गोंधळ; चुथडा. २. घोटाळ्याचे किंवा भांडणाचे काम, प्रकरण. ३. वांधा; तंट्याचे कारण. [सं.भंगड]

**भानगडखोर, भानगड्या** वि. घोटाळे, गोंधळ करण्यात आनंद मानणारा; भानगडी करणारा.

**भानगडणे** उक्रि. घोटाळा, गुंतागुंत करणे; भानगडीत पडणे.

**भानगुळी** स्त्री. कणगुलीप्रमाणे कळकाच्या कांबीचे विणलेले, कोठीसारखे, धान्य साठविण्याचे साधन.

**भानवडा** पु.एक प्रकारचा डाळीचा वडा. -गृशि ४५५.

**भानसीण** स्त्री. १. मानकरीण: 'ते समयीं उभयतां बायांचा व भानसिणी यांचा कोल्हाळ झाला.'- भाब ९४. २. स्वयंपाकीण. ३. दासी.

**भानसुरे-शेरू** पहा : **भाणशिरे** १,२

**भाना** पु. घराच्या भिंतीत गुप्तपणे पुरून ठेवलेले पैशांचे भांडे.

**भानामती** स्त्री. १.तंत्रविद्येचा एक प्रकार. २. जादूगिरी; हातचलाखी; गारुड्याचे खेळ. ३. युक्ती; कपट. ४. स्त्री जादूगार. ५.चूल. [सं.भानुमती]

**भानार** पु. भंडारा; मेजवानी.

**भानिल** न. (शाप.) रंग तयार करण्यास उपयोगी असा सेंद्रिय पदार्थ; फेनाझाईन.

**भानु-नू** पु. १. सूर्य. २. (योग.) पिंगळा नाडीतून वाहणारा वारा. [सं.]
**भानुमती** स्त्री. एक ताल. यात अकरा मात्रा व पाच विभाग आहेत.
**भानुली** स्त्री. काशाचे लहान ताट. (झाडी)
**भानुवार, भानुवासर** पु. रविवार.
**भानुसप्तमी** स्त्री. शुद्ध किंवा वद्य पक्षातील रविवारी येणारी सप्तमी. हा दिवस फार शुभ मानतात.
**भाने** न. उरलेले अन्न.
**भानोले** न. एक खाद्यपदार्थ : 'सणासुदीला... हमखास केलं जायचं ते भानोलं.'- आयदान.
**भानो(न्व)सा-स** पहा : **भाणवसा** (वा.) **ससा भानोशी येणे** - हवी असलेली गोष्ट प्रयत्नाशिवाय बसल्याजागी मिळणे.
**भाप** स्त्री. थाप; हूल. (व.)
**भाप** स्त्री. बेसावधपणा; बेभरवसा.
**भाप** स्त्री. कुबट वास.
**भापझिरा** पु. नदीच्या वाळवंटात केलेला झिरा, झरा. (व.)
**भापना** अक्रि. ओळखणे. (झाडी)
**भापा** पु.प्रातर्विधी : 'सगळे भापे ढाळून ठेवलेत. घाण घाण करून ठेवली सगळी.'- अगो २७.
**भाबडा, भावडट** वि. भोळा; साधा; सरळ मनाचा; निष्कपटी. [सं.भाव; क.एबड]
**भाबी-भी** स्त्री. भावजय; भावाची बायको. (व.) [हिं.भाभी]
**भाभा** वि. ओकेबोके. (झाडी)
**भाभापाडळी** स्त्री. नपुंसक व्यक्ती.
**भाभी** स्त्री. आट्यापाट्याच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द.- मखेपु.
**भाम, भांब** स्त्री. आठवण; स्मरण. [सं.भान]
**भाम** स्त्री. चार मोटा चालतील एवढी मोठी विहीर.
**भाम** पु. मेहुणा.
**भामटा** पु. जुनाट, अर्धवट बुजलेली विहीर. (व.)
**भामटा-ट्या, भांबटा-ट्या** पु. न. १. गुन्हेगार लोकांची एक जात व त्यातील व्यक्ती. ह्या लोकांचा मुख्य धंदा चोरी करणे हा आहे. २. उचल्या; भुरटा चोर; नकळत चोरी करणारा. ३.(ल.) लबाड, कारस्थानी माणूस. ४. एका जातीचा खेकडा. (ठाकरी)
**भामर** न. पडसे.
**भामसाळे** न. नवरदेवाची लग्नात रात्री काढलेली मिरवणूक. [गु.]
**भामा** स्त्री. बायको. [सं.]
**भामिनी** स्त्री. रागीट, रागावलेली स्त्री. [सं.]
**भामँ** न. (बालभाषा) दागिना; अलंकार. (गो.)
**भाम्या** (निंदार्थी) पहा : **धाम्या**
**भाय** स्त्री.फांदी; शाखा. (को.)
**भाय** वि. पुष्कळ. (व.) [सं.बहु]
**भायकाळ** न. भोक. (बे.)
**भायजी** पु.मारवाडी. (व.)
**भायटी** स्त्री. 'भाय'चे अल्पत्वदर्शक रूप.
**भायणे** अक्रि. बोलावणे.
**भायभुरळा** वि. चैनबाज; ख्यालीखुशालीत रमणारा.
**भायताड** पु. खांद्या असणाऱ्या ताडाची एक जात; ज्याच्या रसापासून गूळ बनवतात असा माड.
**भायरी** स्त्री. जुलाबाचे औषध.
**भायली, भायली पीडा** १. उपदंश विकार. २. पिशाचाचा उपद्रव. (गो.,कु.)
**भायलो-लॉ** वि. बाहेरचा.(गो.,कु)
**भायलोक** पु.अव. शूद्र लोक.
**भाया, भायेस, भावसा, भासरा** पु. नवऱ्याचा मोठा भाऊ(व.); वडील दीर.
**भायोरनं-लं** वि. भूत, मंत्र, तंत्र इ. ची बाधा झालेले.
**भार** पु. ताप.(बे.)
**भार** पु. न. १. जडपणा; ज्यामुळे आधार न दिलेला पदार्थ वरून खाली येतो तो पदार्थाचा गुणधर्म. २. वजन तोलून काढलेले परिमाण. ३. कोणतीही वजनदार वस्तू; दाब; दडपण. ४. (ल.) (काम, उपकार, मेहरबानी इत्यादींचे) वजन; ओझे. ५.(ल.) ओझ्याप्रमाणे मानलेले काम; दयेचे कृत्य; उपकार. ६.(ल.) महत्त्व; गौरव; धन्यता. ७. सर्दी झाल्यामुळे डोक्याला भासणारा जडपणा. ८. एक रुपयाच्या वजनाइतके वजन; एक तोळा वजन. ९.(समासात पदलोप होऊन) विशिष्ट वजन. १०. (सैन्याचे एक अंग म्हणून) संख्याबल. जसे :- दळभार. ११. कळप; तांडा; समूह. १२. समूह; समुदाय; मेळा; गर्दी : 'आशीर्वचनी जयजयकार । करूनि बैसला ऋषींचा भार।'- मुआदि १६.११०. १३. सेना; समूह: 'दळव्याचा भार कुरडूंच्या मैदानीं गेला।'- ऐपो ६८. १४. भर; बहर : 'नानार्थ फळभारें फळा येईल।'- ज्ञा ११.२०. १५. ओझे; काळजी; जबाबदारी; आधार. १६. व्यूह; बेत : 'लष्कर पायदळ फौज करून भार रचिले.'- इमं९. १७. आठ हजार तोळे वजन. (४ तोळे = १ पल, १०० पल= १ तुला, २० तुला = १ भार.) १८. परवानगी. - लोसाको. १९. माणसाच्या अंगात होणारा संचार, अवसर.
वि. जड:'मत्प्रश्न भार का गमला?'- मोअश्व २.३०. [सं.भार]
**भारक** पु. १. भार वाहणारा. २. कारभारी; कार्यभागी.
**भारकस** न.पु. १.गाड्यावर किंवा उंट, हत्ती इ.च्या पाठीवर सामान कसून बांधण्याचा सोल, दोर. २. वादळात तंबू डळमळू नये म्हणून त्याच्यावरून टाकून जमिनीस खिळवलेली दोरी.
**भारकी-के** स्त्री. न. (काटक्या, गवत इ.चा) लहान भारा; ओझे.
**भारकुण, भारकूम** स्त्री. सर्दी; थंडीमुळे उद्भवणारा आजार.
**भारगीर** वि. फार जबाबदारीची किंवा जोखमीची (जागा, काम).
**भारजा** स्त्री. १. बायको; भार्या. २. भावजय.- लोसाको.
**भारण** न. वेधकता; वेधशक्ती.
**भारणशुद्ध, भार(रा)णसूद-त** वि. १. वजनदार; सन्मान्य; पूज्य; सभ्य चालीचा; भारदस्त (माणूस, वर्तन, भाषण, पोशाख). २. (शब्दश: व ल.)ओझे वाहून नेण्यास, जबाबदारीचे काम करण्यास

लायक (जनावर, मनुष्य).

**भारणी, भारांतर** स्त्री. ओकतीच्या आडव्या दांडीच्या दुसऱ्या बाजूस असलेला वजनाचा धोंडा.

**भारणी** स्त्री. अधिकता.

**भारणी** स्त्री. बी जमिनीत खोल जाण्याकरता माती भरून वजनासाठी तिफणीवर ठेवतात ते पोते.

**भारणी** स्त्री. १. (शब्दशः व ल.) भुरळ; भूल; मोहनी. २. भुरळ पाडणारा मंत्र; वशीकरणविद्या; भूल.(क्रि. घालणे, टाकणे.) ३. डोळ्यांनी एखादी वस्तू पाहिल्यामुळे मनाला होणारा आनंद, सुख.

**भारणे** उक्रि. १.मंतरणे; (अक्षता, पाणी, शस्त्र इ. मध्ये) मंत्राने अचाट सामर्थ्य उत्पन्न करणे. २.मोहून टाकणे; मंत्राने वश करून घेणे. ३.(ल.) भूलथापांनी एखाद्यास वश करणे, नादी लावणे.

**भारणे** अक्रि. जड होणे; भारावणे.

**भारत** न. १. संस्कृत भाषेतील एक ऐतिहासिक काव्यग्रंथ - महाभारत. २. (ल.) लांबलचक, कंटाळवाणी गोष्ट. ३. गुंतागुंतीचे, फार लांबलेले काम.

**भारती** स्त्री. १. सरस्वती . २. वाणी; वाचा. एक नाट्यग्रंथरचनाविशेष. पु. गोसाव्यांची एक जात किंवा तींतील व्यक्ती. [सं.] वि. १. भारतपुराणासंबंधी. २. जंगी; अरे तुरेची; भारतीय युद्धाच्या तोडीची.

**भारतीवीर** पु. लढाईत पाठ न दाखवणारा, पहिल्या प्रतीचा वीर (भारतातील वीरांप्रमाणे).

**भारदडीचा** वि. वजनदार; भारदस्त.

**भारदस्त-स्ती, भारदास्त-र** वि. १. वजनदार; महत्त्वाचा. २. बहुमोलाचा; मूल्यवान.

**भारदस्ती, भारदारी** स्त्री. १. वजन; महत्त्व. २.हुकमत चालवण्याचे सामर्थ्य, अधिकार, सत्ता.

**भारदायक** वि. १. अवजड; गैरसोयीचा. २. अकार्यक्षम; मंद.

**भारदार** वि. निष्णात; प्रवीण; वाकबगार; महत्त्वाचे काम करायला, जबाबदारी घेण्याला लायक, समर्थ. [हिं.]

**भारदारी** वि. ओझे वाहणारा; ओझ्याचा.

**भारदारी,भारभारदारी** स्त्री. १. लवाजमा; सरंजाम; जमाव; सैन्य; जड सामान : 'वर भारदारी बहादुर बिंडियात टाकावी.' - पेद २८.१३९.२.वाहतूक.

**भारदोरी** स्त्री. गर्भ पडू नये म्हणून काही स्त्रिया कमरेला बांधतात ती भारलेली दोरी; गंडा.

**भारद्वाज** पु. कुक्कुडकुंभा; एक पक्षी.

**भारध(धु)डी** स्त्री. १. जड वस्तू; भारी सामान. २. गैरलढाऊ - सैन्यात इतर कामे करणारे लोक.

**भारनियमन** न. (ठरावीक तास) विजेची कपात करून बचत करणे.

**भारनी** स्त्री. १. वजन; वस्तू. २. मंत्र; भुलावण. (व.)

**भारब(बा)रदारी** क्रिवि. लवाजम्यासह.

**भारभूत** वि. १. जड; भार झालेला. २. (ल.) निरुपयोगी; निरर्थक.

**भारमान** न. १. गुरुत्व; जडपणा. २. हवेचा दाब मोजण्याचे, भारमापक यंत्र.

**भारमुक्ति-क्ती** स्त्री. दोषमुक्ती; दोषातून पापातून सुटका.

**भारवट** स्त्री. बोदाच्या वर बसवतात तो लाकडी ओंडा. पहा : **भारोट**

**भारवाहक** वि. १. ओझे वाहणारा (मनुष्य, गाडी, जनावर इ.). २.(संसार, कामधंदा इ. चा) भार, जबाबदारी सहन करणारा. ३.अंगी असलेल्या गुणांचा व्यवहारात, पैसा मिळवण्यासाठी उपयोग न करणारा; ओझ्याचा बैल.

**भारशांखळ-ळा** स्त्री. शृंखला : 'तो जुझारा गडे । पाईं भारशांखळ काढे ।'- भाए ३५९.

**भारशिंग** न. १. सांबराचे शिंग. २. बाशिंग.

**भारसिंग** न. सांबर; चितळ : 'ते सडकि सींसा बळिये सैंग । भारसिंग कोंतेकार।' -नरुस्व ७४५. [सं. भारशृंग]

**भारसूद** वि. भारदस्त; प्रौढ; गंभीर; वजनदार. (व.)

**भारस्वामी** पु. दुसऱ्याच्या मालमत्तेवर कायदेशीर हक्क असलेला.

**भारंगी-ग** स्त्री. एक लहान झाड; एक औषधी वनस्पती.[सं.भार्ङ्गी]

**भारंदाज** वि. वजनदार; फायदेशीर; भरभराटीचा (माणूस, धंदा). [फा.भार + अंदाज]

**भारंदाजी** स्त्री. सार; महत्त्व; भरीवपणा; फायदेशीरपणा (मनुष्य, काम इ. चा).

**भारं(रो)भार** वि. सारख्या वजनाचे.

**भारा** पु. (गवत, पाने, काटक्या इ.चा) गठ्ठा, ओझे; (हिरवे गवत, पालेभाजी इ. ची) पेंढी; जुडी. [सं.भृ]

**भाराटी** स्त्री. एक काटेरी झुडूप. (झाडी)

**भारादिक** वि. भारदस्त. (गो.)

**भारानशुद्ध** वि. थोराड; दांडगा. (तंजा.)

**भाराभर** वि. भरपूर; जास्त.

**भारावचे** उक्रि. बहिष्कार टाकणे; अपांक्त, अस्पृश्य मानणे.

**भारावणी** स्त्री. १. जड होणे. २. बधिर होणे. ३. गहिवरणे.

**भारावणे** अक्रि. १. अधिक जड होणे (भिजून, जास्त ओझे पडून - गाठोडे इ.). २. (सर्दी, श्रम इ.मुळे) शरीर, शरीरावयव जड होणे; आखडणे. ३. गहिवरणे; दाटून येणे.

**भारावली** स्त्री. वजनांची प्रणाली, मालिका.

**भारिक** पु. हमाल.

**भारिवसु** वि. दुःखी :'निन्हां दासु । होतसे भारिवसु ।'- भाए १३४.

**भारिवा** वि. कठीण; दुर्गम: 'मग निगावा चक्रवीहु । भारिवा तो।' - ऋ २९.

**भारी** स्त्री. (गवत, काटक्या यांचा) गठ्ठा; ओझे; मोळी; भारा. (को.) वि. १. जड; वजनदार. २. (ल.) फार किमतीचा, महत्त्वाचा, योग्यतेचा. ३.(ल.) अधिक; मोठा (विद्या, शहाणपण, शौर्य, सामर्थ्य इ. नी); बलवान. ४. पुष्कळ; फार; अतिशय (क्रियाविशेषणासारखाही उपयोग होतो). ५.कठीण. ६.न झेपणारा. ७. उतारवयाचा (बैल). (झाडी) ८. उशिरा निघणारे (पीक). (झाडी)

**भारीट** न. (तारवांचा किंवा इतर निशाणे करण्याचा) पातळ व निरनिराळ्या रंगाचा विरविरीत कपडा.

**भारीपणा** पु. मोठेपणा; थोरपणा.

**भारूड** न. १. लांबच लांब, गुंतागुंतीची, कंटाळवाणी हकिकत, वृत्तांत, कथा. २. पंचाईत; संकट; विघ्न; ब्याद. (क्रि.येणे, येऊन पडणे.) ३. त्रासदायक, कंटाळवाणा वाद. ४. अवघड, कूट कविता, लेख, रूपक इ. उदा. एकनाथी भारूड. ५. (व्यापक) कुभांड; तोहमत. (क्रि. आणणे, टाकणे, रचणे, काढणे.) [सं.बहुरूढम्]

**भारेकरी** पु. फिरस्ता कापडव्यापारी.

**भारेजावणे** सक्रि. भारणे; मंत्राने मुग्ध करणे.

**भारेभार** वि. नव नवसाचा. (अहि.)

**भारैणे** क्रि. भारले जाणे : 'बुद्धितत्त्वें भारैलें । होय मन ।'- ज्ञा १४.९१.

**भारोट** स्त्री. खांबावरील आडवी चौकोनी मयाल; खांबावरील लाकडी उथळे व तुळई यामध्ये बसवलेला लाकडी तुकडा. पहा : **भारवट** पु. छप्पर. (झाडी)

**भार्गव** पु. १. शुक्र ग्रह. २. कुंभार : 'भार्गव शाळेचे भाजन ।'- मुह ३६१.

**भार्पन्** पु. वार्धक्य; म्हातारपण. (झाडी)

**भार्या** स्त्री. बायको; पत्नी. [सं.]

**भाल** स्त्री. काटेरी झाडाची फक्त काटे असणारी लहान फांदी.

**भाल** स्त्री. भाला, बर्ची, बाण इ. चे लोखंडी पाते, फाळ. [सं.भल्ल]

**भाल** पु. न. कपाळ. [सं.]

**भाल** स्त्री. शपथ :'श्री वैद्यनाथ देवाची भाल सकुटुंबीआ पडे ।'- परळचा शिलालेख शके ११०९.

**भाल** स्त्री. (विटीदांडूचा खेळ) दुसऱ्याने उंच परत फेकलेली विटी वरचेवरच परतवण्यासाठी दांडूने मारलेला टोला.

**भाल** स्त्री. (नाविक) डोलकाठीजवळच्या दोन आड्यातील भाग. (को.)

**भाल** स्त्री. तुळई; तुळवट. (को.) पहा : **बहाल**

**भाल** पु. १. मोठा चिकाचा पडदा. (कोळी)२. खोळ (घोंगड्याची) : 'पाटील घोंगड्याची भाल मारून... बसला होता.'- फकिरा १०८.

**भालकाटा** पु. फाळ लावलेला वेळू, बांबू. (तंजा.)

**भालकाठी** स्त्री. भाल्याच्या दांड्यासाठी उपयुक्त काठी; पाते नसलेला दांडा.

**भालगड, भालगडणे, भालगडखोर, भालगड्या इ. शब्द भानगड इ. शब्दाखाली पहा.**

**भालगांजा** पु. गांजाची एक जात.

**भालडे** न. लहान भाला.

**भालदार** पु. राजा, सरदार अशा बड्या व्यक्तीजवळ छडी घेऊन उभा असणारा सेवक. या सेवेकऱ्याचे काम ललकाऱ्या देणे, बोलावणे करणे, ताकीद देणे या प्रकारचे असते.

**भालदेव** पु. महालक्ष्मीच्या दिवशी पूजेकरता आणले जाणारे लव्हाळे. (वा.) ० **थापनं** - कचऱ्याचा ढीग करणे; घाण करणे.

**भालदोरी** स्त्री. पिशाचादिकांचा उपद्रव होऊ नये म्हणून हात, गळा यात बांधायचा अभिमंत्रित दोरा. पहा: **भारदोरी**

**भालपत्र** न. मनुष्यकृत पुराव्याने कज्जाचा निकाल लागला नाही म्हणजे दिव्य करण्याच्यावेळी वादी किंवा प्रतिवादी यांची शपथपूर्वक जबानी व राजीनामा लिहिलेला कागद. हा दिव्य करणाऱ्याच्या कपाळावर बांधतात. - पेशवेकालीन महाराष्ट्र ४९१.

**भाला** पु. अंदाधुंदी कारभार.

**भाला** पु. १. लांब काठीच्या टोकाला पोलादी पाते असलेले एक शस्त्र. २. भाल्याच्या लांबीइतके अंतर, टप्पा. ३. ज्यास कोळंबे बसवलेले असते असा लाटेला लावलेला तुकडा. (को.) [सं.भल्ल]

**भाला-ल्य** पु. गाईचे दूध काढताना तिने लाथ मारू नये म्हणून तिच्या मागील दोन्ही पायांस बांधायची दोरी.

**भालाईत, भालेकरी** पु. भाला घेतलेला शिपाई.

**भाली** स्त्री. एक प्रकारचे गवत.

**भाली** स्त्री. १. छत्रीची काडी. (गो.) २. तीराला- बाणाला असलेले पोलादाचे पाते. ३.(सामा.) तीर; बाण.

**भाली** पु. न्हावी. (झाडी) [सं.भल्लक]

**भालुंड** न. दुतोंडे. - शर.

**भालू-लु,भालूक,भालुवा** स्त्री. १.अस्वल. २. म्हातारी कोल्ही. ३. (यावरून) हिडीस म्हातारी स्त्री. [सं.भल्लूक]

**भालेराई** स्त्री. १. भालेरावाची सत्ता, अंमल. २.(ल.) कोणताही साहसी जुलूम; दरोडेखोरी; पुंडाई. ३. शिरजोरपणा व अंदाधुंदीचा कारभार; बेबंदशाही.

**भालेराव** पु. खांद्यावर भाला टाकून स्वच्छंदपणे जुलूम व लूट करणारा माणूस.

**भालो** पु. कोळंब्याची उभी दांडी. (गो.)

**भाव** पु. बाजारातील दर, दाम, किंमत. [सं.]

**भाव** पु. साठ संवत्सरांपैकी आठव्या संवत्सराचे नाव.

**भाव** पु. १.भक्ती; श्रद्धा; निष्ठा; खात्रीची भावना. २. हेतू; अर्थ. ३. मन; अंत:करणप्रवृत्ती. ४. अभिप्राय; आशय; धोरण; वळण; झोक; गर्भितार्थ; उद्देश. ५. मनोविकार; मनोवृत्ती; भावना. जसे :- मित्रभाव, भक्तिभाव. ६. अस्तित्व असणे. ७. प्रत्यय किंवा अनुबंध यामुळे होणाऱ्या फेरफाराशिवाय असणारा शुद्ध धात्वर्थ; धातूचा मूळ अर्थ. ८. भावकुंडलीतील बारा स्थानांपैकी प्रत्येक. ९. नैसर्गिक स्थिती, धर्म, स्वभाव, प्रकृती. जसे :- सत्त्वभाव, तमोभाव. १०. विकार, वृत्ती, राग, क्रिया, चित्तवृत्ती, हावभाव इ. चा वर्ग. ११. जीवाची स्थिती, दशा, अवस्था. जसे :-उत्पत्ती, स्थिती, लय इ.: 'ऐसे म्हणे त्यजुनि भाव अहो जिवाचे ।'- वामन भरतभाव ५८. १२. (शब्दाचा) धर्म, गुण, अस्तित्व, विषय, संबंध, अधिकार, अवस्था इ. ची स्थिती. संस्कृतातील ता आणि त्व प्रत्यय व प्राकृतातील पण, पणा, की हे प्रत्यय लागून झालेला शब्दांचा अर्थ. १३.जन्म; अस्तित्वात येणे; उत्पत्ती. १४. (तर्क.) पदार्थ. हे सहा आहेत (द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष आणि समवाय). १५.रती; प्रेम (काव्यातील वर्णनाचा किंवा नाट्यप्रयोगाचा विषय). १६. क्षमता; शक्ती; सामर्थ्य; पराक्रम (शारीरिक किंवा मानसिक). १७. माया;

मिष; कपट; आव : 'ध्यान केल्याचा भाव करितो।'- कमं १. १८. लक्षण; प्रकार. १९. इच्छा : 'हाची भाव माझिया जीवा । पुरवी देवा मनोरथ ।'- तुगा ६९९. २०. आवड. २१. (नृत्य.) पहा: **अभिनय**[सं.भू-भाव] (वा.) ० **पाहणे** - १. परीक्षा करणे. २. अनुभव घेणे. (ना.) ० **भाजणे** - १. दुष्ट हेतू तडीस नेणे. २. एखाद्याने केलेले दुष्ट भाकीत प्रत्ययाला येणे. ० **सोडणे** - १. (भुताने) पछाडलेल्या माणसास सोडणे. २. मरणे; गतप्राण होणे. ३. नाशाच्या मार्गावर असणे.

**भावई-यी** स्त्री. १. ज्येष्ठ महिन्यातील अमावास्या. २. सर्वांत कडक उन्हाळा असलेला महिना. (व.)

**भावई** पु. अमलतास वृक्ष.

**भावकर्तरी** वि. जेथे क्रियेचा केवलभाव तोच कर्ता असतो आणि क्रियापद नेहमी नपुंसकलिंगी एकवचनी असते असा (प्रयोग). उदा. मला कळमळते.

**भावकर्तृक** वि. (व्या.) भावकर्तरी प्रयोगाचे (क्रियापद).

**भावका, भावकादेवी, भावकाई** स्त्री. १. शूद्रांची एक देवता. २.(यावरून) एक बायकी शिवी. [सं.भावका]

**भावकी** स्त्री. १. भाऊपणा; बंधुता; स्नेह. २. समाइकात हिस्सा, भाग. ३. नात्यातले, एका घराण्यातले लोक.

**भावकुंडली** स्त्री. (ज्यो.) तनू, धन इ. ची १२ स्थाने दाखवण्यासाठी बारा राशींची घरे ज्यावर दाखविली आहेत असे वर्तुळ. पहा : **कुंडली**

**भावगर्भ** पु. १. ग्रंथातील सारांश. २. अंतस्थ हेतू.

**भावगर्भ-गर्भित** वि. ध्वनित अर्थ ज्यात आहे असे, दिसतो त्यापेक्षा अधिक अर्थ असलेले (भाषण, लेख इ.).

**भावगीत** न. मनातील भावना उत्कटतेने व्यक्त करणारे, आटोपशीर काव्य, गीत.

**भावचलित** वि. (ज्यो.) दुसऱ्या भावात - कुंडलीतील दुसऱ्या घरात गेलेला (सूर्य किंवा इतर ग्रह).

**भावजई-य** स्त्री. भावाची बायको; भावज (गो.). [सं.भ्रातृजाया]

**भावड** पु. कलाकाराची एक जात.

**भावणे** उक्रि. १. मानणे; समजणे; वाटणे; गणणे. २. कल्पिणे; मनात समजणे; चिंतन, विचार करणे : 'मनीं जें भावावें । बोलावें वाचें ।'- ज्ञा ८.७६९. ३. योजणे; बेत करणे; उद्देशणे. ४. इच्छा करणे.

अक्रि. १. (हवा, अन्न, पाणी) मानवणे; हितकर होणे. २. आवडणे; पसंत पडणे; मान्य होणे.

सक्रि. १. भाव धरणे : 'भाउनि ते पावती। तन्मयतेतें ।'- रास १.४७१. २. पुटे, लेप देणे : 'तेवीं जाले नि सुखलेशें । जीवु भाविलिया अभ्यासें ।'- ज्ञा १८.७७६. [सं.भाव]

**भावन** न. आधार; आश्रय.

**भावना** स्त्री. १. कल्पना; मनाचा ग्रह. २. शरीरप्रकृतीची अवस्था. ३. श्रद्धा; निष्ठा; भक्ती; पूज्यभाव; विश्वास. ४. रसायनांवर रसाची पुटे, अग्निपुटे इ.केले जाणारे जे संस्कार . ५. (बीजगणित) गुणाकाराची एक रीत. ६. जाती; प्रकृती; स्वभाव; स्वाभाविक धर्म. ७. लक्षणे दिसतात असा रोग. ८. स्मृती; आठवण. ९. विचार : 'भ्रमिष्ट भावना देहाचिया ।'- तुगा १०९. १०. अस्तित्व. [सं.भू]

**भावपणा** पु. जिव्हाळा; प्रेम : 'त्यांचा (शिक्र्यांचा) आणि महाराजांचा भावपणा आहे.'- स्वस्था ७५.

**भाव(वे)भक्ति-क्ती, भावभगत** स्त्री. १. मनःपूर्वक, श्रद्धा- प्रेमयुक्त, निष्कामपणे केलेली भक्ती. २. एखाद्याविषयी वाटणारे अत्यंत प्रेम; मनाची ओढ.

**भावभक्ती** स्त्री. १. बाजारातील दर, दाम इ. संबंधीची माहिती. २. बाजारगप्प.

**भावभगत** स्त्री. १. चलती, भरभराट, विपुलता इ. चा काळ (मनुष्य, कामधंदा, फळे इ. चा). २. बाजारातील दर, दाम इ. संबंधी माहिती.

**भावरी** पु. फिरता व्यापारी.

**भावमोचनोपचार** पु. (माशा.) (दुःख, चिंता, राग) यासारख्या साचलेल्या भावनांना वाट करून देऊन मन हलके करण्याची पद्धती.

**भावला-ली-ले, भावलभोरपी, भावलेभोरीप इ. शब्द 'बाहुला' खाली पहा.**

**भाववाचक नाम** (व्या.) प्राणी किंवा पदार्थ यांच्या गुणधर्माचा बोध करून देणारे नाम. [सं.]

**भाववाचक संख्या** जात नसणारी संख्या; संख्या किंवा परिमाणे यांचा हिस्सा, पट.

**भावविरेचन** न. एखाद्या भावनेचा प्रभाव कमी होणे किंवा करणे.

**भाववृत्ति-त्ती** स्त्री. निमिषात उत्पन्न होणारी भावना.

**भावशबल** न. १. भावनाविकारांचा गोंधळ; कालवाकालव. २. अनेक रसांचे मिश्रण.

वि. गोंधळलेल्या भावनांचा.

**भावस** पु. भाऊ; बंधू. (कु.)

**भावसदा** पु. आश्रय.- हंको.

**भावसंधी** पु. निरनिराळ्या परस्परविरुद्ध भावना असलेल्या मनाची धरसोड पणाची स्थिती; अंतःकरणातील मिश्र रसप्रकार.

**भावसून** स्त्री. धाकट्या भावाची बायको. (व.)

**भावळ** पु. भाऊ; बंधू. (बहुधा अनेकवचनी प्रयोग)

**भावळा,भावार्थी-ळ** वि. भांबडा; भोळा. पहा : **भाविक**

**भावंड-डे** न. १.एकाच आईबापाच्या संततीचे एकमेकांशी नाते, भाऊ किंवा बहीण यांचे सामान्य नाम. २. सावत्र भाऊ किंवा बहीण; चुलत-आते-मामे-मावस बहीण किंवा भाऊ. ३. जवळचे नातेवाईक.

**भावाभाव** पु. अस्तित्वनास्तित्व; खरेखोटे; चैतन्य आणि जड.[सं.]

**भावाभास** पु. १. कृत्रिम प्रेम. कवी किंवा नाटककार यांनी केलेले प्रेमाचे खोटे वर्णन किंवा प्रदर्शन. २.चुकीचा समज, ग्रह, कल्पना.

**भावार्थ** पु. १.तात्पर्यार्थ; सारांश. २. भक्तीचे सार : 'ग्रंथ वदावया निरूपणीं । भावार्थखाणी जयामाजी ।'-व्यं २. ३. श्रद्धा; विश्वास; भाव. ४. अंतःकरणाची निष्कपट वृत्ती; प्रामाणिकपणा.

क्रिवि. खरोखर; निःसंशय.

**भावांतर** न. अर्थातील फरक; विसंगतपणा.

**भावांसे** पु. अव. धरसोडीची व असंबद्ध उत्तरे; खोट्या व पोकळ सबबी; मुद्द्याला सोडून असलेले भाषण.

**भावि(वी)क** वि. १. श्रद्धावान; निष्ठावंत. २. संतुष्ट होणारा.

**भाविकणे** अक्रि. मोल पावणे.

**भावित** न. १. दोन किंवा अधिक परिमाणांचा गुणाकार. २. अशा तऱ्हेचा गुणाकार असलेले समीकरण.

**भावित** वि. १. कल्पिलेले; चिंतलेले. २. ज्यावर भावना किंवा संस्कार केले आहेत असे (औषध). [सं.]

**भाविला** वि. संस्कार केलेला.

**भावी-वि** स्त्री. भविष्य; भाकीत. (क्रि. सांगणे, बोलणे.)
वि. पुढे होणारे; भविष्यकाळासंबंधीचे.

**भावी-वे प्रयोग** (व्या.) जेथे कर्त्यावरून अथवा कर्मावरून क्रियापद बदलत नाही व सामान्यत: त्याचे रूप नपुंसकलिंगी एकवचनी असते असा प्रयोग. उदा. मी त्यास मारले.

**भावीण** स्त्री. १.देवाच्या, देवीच्या सेवेला स्वत:ला वाहून घेतलेली स्त्री; मुरळी; देवदासी. २. नायकीण; वेश्या. (वा.) **भाविणीचा कासोटा** - मालकाच्या परवानगीचा विचार न करता वाटेल त्याने वापरावी अशी कोणतीही वस्तू.

**भावुक** न. १.शृंगारिक बोलणे. २.कल्याण; हित; क्षेम.

**भावु(वू)क** वि. भक्तियुक्त; निष्ठावंत; भाविक.

**भावुका** स्त्री. वैशाख महिन्यातील अमावास्या.

**भावेचाड** स्त्री. अंत:करणपूर्वक प्रेम.

**भावै** स्त्री. चातुर्मास (ज्येष्ठ वद्य चतुर्दशीपासून दिवाळीपर्यंतचा चार महिन्यांचा व्रतवैकल्यांचा काळ) : 'भावैचां दिसीं गोंसावीं आबाइसातें म्हणीतलें:' - गोप्र ४२.

**भावो** पु. मेहुणा. (कु.,राजा.) पहा : **भावोजी**

**भाव्य** वि. उपासना करण्यास योग्य.

**भाव्य** न. भविष्य; भवितव्य.
वि. पुढे व्हावयाचे, होणारे.

**भाव्या** स्त्री. अव. जावा.

**भाव्या** पु. गोव्याकडील आंब्याची एक जात.

**भाष** स्त्री.१. वचन; आश्वासन; भाक; शपथ. २. परस्परांतील करार; एकमेकांना दिलेले वचन. ३.बोली; भाषा. ४. भाषण. ५.नाव : 'ते वेळीं कुंडलिनी हे भाष जाये । मग मारुत ऐसें नांव होये ।' - ज्ञा ६.३०१. [सं.]

**भाषण** न.१.बोलणे. २. व्याख्यान; तोंडी विवेचन. ३. संवाद. [सं]

**भाषणे** अक्रि. दीनवाणे, काकुळतीने बोलणे.

**भाषणस्वातंत्र्य** न. सार्वजनिक ठिकाणी भाषण करण्याची, विचार मांडण्याची कायद्याने दिलेली परवानगी.

**भाषा** स्त्री. १. मनातल्या कल्पना शब्दांच्याद्वारे बाहेर प्रकटवण्याचे साधन; बोली: 'मनुष्याच्या मनोवृत्तीस किंवा अंत:करणास क्षोभ होऊन जे तरंग उठतात ते ज्या रूपाने प्रकट होतात ते रूप भाषा होय.'- नि १४६. २. व्याख्या. ३. (कायदा) वहिवाटीत जी वादीची अर्जी घेतात, तिचा पर्यायवाचक शब्द: 'भाषा, प्रतिज्ञा, पक्ष हे अर्जीचे पर्यायवाचक शब्द जाणावे.'- मिताक्षरा व व्यवहारमयूख दायविभाग पृ.१३. ४.बोलणे : 'गिरणी विकून टाकण्याची भाषा निकडीने सुरू झाली आहे.'-गार ६८. [सं.] ० **करणे** - १.उलट ग्रह करून फसवणे.(कु.) २. बोलणे; उच्चार करणे.

**भाषानिश्चय** पु. वाङ्निश्चय.

**भाषाशास्त्र, भाषाविज्ञान,भाषिकी** न. भाषाविकास व भाषारचना यांचा अभ्यास करणारे शास्त्र; भाषेच्या व्युत्पत्ती व वाढीच्या नियमांचा अभ्यास व संग्रह.

**भाषाशुद्धी** स्त्री. भाषेमध्ये घुसलेले परभाषेतील अनावश्यक शब्द काढून त्याऐवजी स्वभाषेतील शब्द रूढ करणे.

**भाषांगराग** पु.(संगीत.) देशाच्या निरनिराळ्या भागातील प्रचारावरून बनवलेला राग.

**भाषांतर** न. एका भाषेतील मजकुराचा दुसऱ्या भाषेत केलेला अनुवाद.

**भाषित** न. भाषण; बोलणे; वचन; वाक्य.
वि. बोललेले. [सं.]

**भाषी** वि. (समासात) बोलणारा. उदा. सत्यभाषी, मितभाषी. [सं.]

**भाष्टाण** स्त्री. भाजलेल्या किंवा जळालेल्या पदार्थास येणारी घाण.

**भाष्य** न. १. सूत्रग्रंथावरील टीका, विवरण. सूत्रात सांगितलेला अर्थ विस्ताराने सांगणे. २. (सामा.) टीका; व्याख्या; विवरण; स्पष्टीकरण. ३. वचन; शपथ. [सं.]

**भाष्यकार** पु. १.भाष्य करणारा; शास्त्रीय ग्रंथांचे विशदीकरण करणारा. २. समालोचक.

**भाष्यदान** न. वचन; आश्वासन :'ऐसे दोघां मानलें मन । तयेस दीधलें भाष्यदान ।' - कथा २.५.८२.

**भास** पु. निळ्या रंगाचा पक्षी.

**भास** पु. १. मनावर उमटलेला ठसा; समज; कल्पना. २.भ्रांती; शंका. ३. सादृश्य; सारखेपणा; एकरूपता. ४. संभव. [सं.]

**भास-ष** स्त्री. १.भाषा. २. रीत;प्रथा; पद्धत; चाल. ३.छाप; प्रभाव. ४. शपथ. (वा.) **भासेस गुंतणे**- वचनात गुंतणे; वचनबद्ध होणे.

**भास** स्त्री. तांदूळ भरडले असता जात्यातून बाहेर पडणाऱ्या कण्या, कोंडा इ. चे मिश्रण.

**भासकटणे, भासकणे** अक्रि. गहाळ होणे; भलतीकडे, टाकले जाणे.

**भासकता** वि. प्रकाशकता : 'पाहे पा भास्य भासकता । आपुला ठाई दाविता ।' - अमृ १.५५.

**भासट** वि. भसभशीत; चिकण नव्हे अशी, भरड (माती).

**भासण(ल)णे** अक्रि. करड, तांदूळ इ. एकमेकांत मिसळले जाणे.
उक्रि. मिसळणे.

**भासणे** अक्रि. १.भास होणे; वाटणे; दिसणे; प्रतीत होणे.२. वास्तविक किंवा संभवनीय वाटणे. ३. चुकणे (रस्ता, मार्ग). [सं.भास]

**भासभूस** स्त्री. फोल; भूस; सटरफटर वस्तू. पहा : **फासफूस**

**भासमान** वि.१. प्रकाशणारा; चकाकणारा. २.जाणवू लागलेला; भासणारा.

**भासरे** वि. वेडा; अजाण; समज नसणारा. (तंजा.)
**भासळ** वि. ज्यात भरडलेल्या भाताचे कण, कोंडा, चुरा इ. आहेत असे (कांडलेले भात).
**भासळणे** अक्रि. १. लुप्तप्रभ होणे; दिपणे; तेजाने झाकोळणे : 'जयाचेया रूपाचेनि प्रकाशें । भासळोत चंद्र सूर्य।।' - नरुस्व ३३०. २. चकाकणे. ३. मिश्रित करणे, होणे. [सं.भा]
**भासिंगी** वि. तिकोनी. (तंजा.)
**भासुर** वि. तेजस्वी : 'ज्याची भासुरभा प्रभाकरनिभा व्यापून लंघी नभा।' - आकं २. [सं.]
**भास्कळणे** अक्रि. गोंधळणे. (को.)
**भास्य** वि. प्रकाशला जाणारा : 'पाहे पा भास्यभासकता ।' - अमृ १.५५.
**भास्वर** वि. तेजस्वी; प्रकाशणारा. [सं.]
**भाळ** स्त्री. अंगावर धोतर घेण्याची एक पद्धत; खांद्यावर धोतर घेणे.
**भाळ** न. १. कपाळ. २. नशीब; दैव. पहा : **भाल** [सं.भाल]
**भाळणे** अक्रि. भुलणे; मोहित, वश, फिदा होणे. पहा : **भारणे** [सं. बल]
**भाळणे** उक्रि.विकणे.
**भाळलोचन** वि. अयाळवळचण; ज्याची अयाळ दोन्हीकडे पडते असा (घोडा).- अश्वप १.९८.
**भाळवण(णी)पत्र-जबाब** न.पु. शिफारसपत्र. पहा: **भलावण**
**भाळा** न. नाचणीचे गवत.
**भाळी** स्त्री. १. बांबूच्या कामट्यांची चौकट (पदार्थ ठेवण्यासाठी टांगलेली, मोडलेल्या अवयवाला बांधायची). २. देवाच्या मूर्तीवर छताप्रमाणे टांगलेली बांबूच्या कामट्यांची चौकट.
**भाळी** स्त्री. गवत, भातेण वगैरेचा गठ्ठा, भारा. (को.)
**भाळू** गलबताचा एक प्रकार.
**भांग** पु.१.स्त्रिया, पुरुष डोक्यावरचे केस विभागून मधोमध पाडतात ती रेषा. २. डोक्यावर घालायचा एक मोत्यांचा दागिना. [सं.]
**भांग, भांगमोड** पु. १.ओहोटी; सुकती. २. भेग; चीर : 'भांग देत जमीन उकलत होती.' - ऊन १४२.
**भांग** प्रत्येक पंधरवड्याचे सप्तमीपासून नवमीपर्यंतचे दिवस.
**भांग** स्त्री. १. एक मादक वनस्पती. २. ह्या वनस्पतीपासून केलेले पेय; घोटा. ३. भांगेच्या झाडाची वाळलेली पाने, शेंडे कळ्या इ. ४. कैफ; मस्ती.
**भांग** पु. मुलींचा एक खेळ. - मखेपु ३३८.
**भांग(गी)ट-ड-ळ, भांगी- ग्या** वि. भांग पिणारे; भांग पिण्याचे व्यसन असणारे.
**भांगटणे** अक्रि. भंग पावणे.
**भांगटिळा, भांगपट्टी** पु. स्त्री. १. वेणीफणी इ. स्त्रियांचा प्रसाधनविधी; शृंगार; नट्टापट्टा. २. स्त्रियांचा एक दागिना (कपाळावरचा).
**भांगडा** पु. पंजाबमधील एक नृत्यप्रकार.
**भांगणी** स्त्री. १. विभागणी; भाग करणे. २. बी न पेरता जाण्यायेण्यासाठी वाट म्हणून ठेवलेली शेतातली पट्टी; बिनपेरणीची ओळ.
**भांगणे** अक्रि. उधानाचे दिवस जाऊन समुद्र ओहोटीस येणे.
**भांगणे** सक्रि. १. शेतात पायवाट करणे. २. (होडी, गलबत यांनी) आपल्या गतीमुळे समुद्र, नदी यांचे पाणी दुभागणे. ३. (उभे पीक) भांगलणे; कोळपणे; वखरणे; गवत काढणे. ४. भंगणे; फुटणे.
**भांगपाड्या** पु. काळ्या डोक्याचा मैना हा पक्षी.
**भांगभरू** वि.१.ओहोटीची. २. (ल.) सुकर; सुगम.
**भांगभुरका** पु. १. भांग, गांजा, तंबाखू वगैरे निव्वळ चैनीचे पदार्थ. २.उधळपट्टी; नासाडी. ३. संसारातील कमी महत्त्वाचा, किरकोळ बाबींचा खर्च.
**भांगमोड** स्त्री. ओहोटी.
**भांगय** स्त्री. कच्ची, सुकण्यास आलेली काजूची बी. (गो.)
**भांगर** पु. गुरांचा गोठा. (को.)
**भांगराळणे** अक्रि. गोंधळणे; सुचेनासे होणे. (व.)
**भांगलणी** स्त्री. १. शेत बेणणे; निंदणे. २.(शेताची) वाटणी; विभागणी. ३. (शेतातून) वाट करणे.
**भांगलणे** उक्रि. (शेत) निंदणे. पहा : **भांगणे**
**भांगलीला** स्त्री. मुंडावळ; ललामक. - राव्य २.२१२.
**भांगवळ, भांगोळी** स्त्री. १. पहा : १ **भांग** १. २. (स्त्रियांच्या) तोंडाच्या दोन्ही बाजूंकडील आखूड केसांची रेषा, कानाजवळील आखूड केस. ३. बाजूचा लहान भाग.
**भांगवाडा** वि. भांग विकणारा.
**भांगस, भांगुसी** स्त्री. १. अज्ञात, अडचणीची जागा; सांधकोंद. २. बंदीशाळा.
**भांगस** न. अज्ञान. (व.)
**भांगसळ, भांगसळई** स्त्री. कोरून भांग पाडण्यासाठी केसांमध्ये फिरवायची धातूची काडी. ही लग्नात वराकडून वधूला देतात.
**भांगळकवडी** पहा : **भोंगळकवडी**
**भांगा** पु.१. शेत.(राजा.) २. शेताचा तुकडा, भाग इ. वाटा; विभाग.(बे.) (वा.) ० **पाडणे** - शेतातून वाट काढणे, करणे.
**भांगाची भरती, भांगाचे पाणी** कमी भरती. पहा : **भांग** २
**भांगार-रे** न. १.सोने. २. द्रव्य; पैसा. [सं.]
**भांगाले** वि. १. सुवर्णाचे; सोनेरी. २.तांबड्या-पांढऱ्या ठिपक्यांचे.
**भांगुसी** स्त्री. धर्मशाळा : 'बाहीरबाहिरी : भांगुसीए चालविले:' - लीचउ २७७.
**भांगोरा-रे** पु.न. १. राखरांगोळी. २.दिवाळे. (क्रि. वाजणे, होणे.)
**भांगोरे** न. बनावट गोष्ट; बतावणी.
**भांचोद** वि. (अश्लील) एक शिवी.
**भांज** स्त्री. आवड; संतोष.
**भांजणीखांजणी** स्त्री.क्षयवृद्धी.
**भांजणे** अक्रि. विष उतरणे, नाहीसे होणे; शमणे : 'सवर्म हृदय कल्हारीं। तेथ कारुण्यवेळेच्या भरीं। लागला म्हणोनि लहरी । भांजेचि ना।' - ज्ञा २.७१. [सं. भजन]
**भांजिली** स्त्री. ओहोटी.
**भांड** न. १. भांडे; पात्र. २.मडके; मातीचा डेरा.

स्त्री. तोफ. (व.) पहा : **भांडे**

**भांड** पु.१.लोकरंजकाची एक जात. हा प्रामुख्याने अभद्र बोलतो. २. विदूषक; बहुरूपी. ३.कज्जेदलाल.
वि. निर्लज्ज.

**भांड-डी, भाण** न.स्त्री.न. वरच्या ओठास जन्मतः पडलेली भेग.

**भांड,भांडखोर, भांडगा-रा** वि. क्षुल्लक कारणावरून भांडण करणारा.

**भांडकुदळ, भांडके** वि. भांडखोर.

**भांडकोडबुळे,भांडकोडोळे** न. भांड्यात लावलेले थालीपीठ.

**भांडखार** स्त्री. भांडपाखड; भांडाभांडी. (तंजा.)

**भांडझगड** स्त्री. भांडण; भांडाभांडी.

**भांडण, भांडी** न. स्त्री. तंटा; कलह; बखेडा. [सं.भंड्] (वा.) ० **उकरून काढणे** – मागच्या गोष्टींचा उल्लेख करून एखाद्याला राग येईल अशा गोष्टी बोलून भांडण सुरू करणे.

**भांडणे** अक्रि. १.भांडण करणे. २. युद्ध करणे; लढणे. [सं.भंड]

**भांडदोरा** पु. भांड्याला फास लावलेली, विहिरीतून पाणी काढण्याची दोरी.

**भांडप्रतिभांडक** पु. मोबदला; अदलाबदल; एक वस्तू देऊन दुसरी वस्तू घेण्याचा एक गणितप्रकार; साटेलोटे. [सं.]

**भांड्यामांड्या** वि. जन्मतः ज्याचा वरचा ओठ चिरलेला आहे असा (मनुष्य); राखुंडा. (गो.)

**भांडभवई** स्त्री. खुषमस्करेपणा.

**भांडवणे** सक्रि. लढवणे : 'साहाचार महिने गडकोट भांडवणे.' – छशिव ३६.

**भांडवल** न. १.व्यापार, सावकारी इ. त घातलेला पैसा; जिचा विनियोग वस्तू-उत्पादनासाठी होणार आहे अशी संपत्ती. २.(ल.) (द्रव्य, बुद्धी, अक्कल इ.चा) साठा; ठेवा; पुंजी. [सं.भांड; हिं.](वा.) ० **बाहेर पडणे** – बेत, कट प्रगट होणे : 'आणि सर्व भांडवल बाहेर पडलं.'– चंद्र १३६.

**भांडवलदार** पु. ज्या संपत्तीचा विनियोग उत्पादनाकडे होतो अशा संपत्तीचा मालक.

**भांडवलशाही** स्त्री. भांडवलवाल्यांची, धनिकांची सत्ता.

**भांडविद्या** स्त्री. अश्लील बडबड.

**भांडागार,भांडारखाना, भांडारगृह, भांडार** न.पु.न. द्रव्यसंग्रहाचे स्थान. [सं.भांडार]

**भांडागारी, भांडागारिक, भांडारी** पु. खजिनदार; कोठारी; कोषाध्यक्ष.

**भांडारा** पु. नागपंचमीला करतात ते वाफवलेले बाजरीचे गोळे.

**भांडावणे** अक्रि. १.भग्न होणे.२. बंद होणे, पडणे : 'कां अंगहीन भांडावे। रथाची गती ।'– ज्ञा १७.३८९.

**भांडावा** पु. योद्धा.

**भांडाळ, भांडुका** वि. भांडखोर.

**भांडीकुंडी** न.अव.(समुच्चयार्थी) भांडी व इतर संसारोपयोगी सामानसुमान.

**भांडीर,भांडिक** पु. गीते म्हणणाऱ्या व वादनकुशल लोकांची जात.

**भांडीर-री, भांडिकी** स्त्री. कंबोज, मगध, गौड, महाराष्ट्र, कलिंग या देशांची संस्कृतमिश्र गीतभाषा. काहींच्या मते ही जुनी मराठी भाषा आहे.

**भांडु(ड)के** वि. भांडखोर : 'जैसे आपण नग्न भांडुके । जगाते ह्मणे ।।'– ज्ञा १८.१३४.

**भांडुल** न. खेळणे. (व.)

**भांडुली** स्त्री. लहान भांडे.

**भांडे** न. १. (धातू, माती, दगड, लाकूड इ.चे) पात्र; पातेले; तपेली; मडके इ. २.(ल.) तोफ. ३.नदीचे पात्र. ४. प्रसूतीनंतर किंवा काही रोगाने बाहेर येणारा जननेंद्रियाचा भाग (विशेषतः पशूचा). ५. नगारा, पडघम इ. चे गंगाळ; पडगा. ६.दागिना; अलंकार. (ना.,व.) ७. शेतीच्या कामातील वस्तू.(व.) ८.(ल.) विहीर. (व.) ९.गलबत; नाव; बोट; तारू. [सं.भांड] (वा.) ० **फुटणे** – १.गुह्य फुटणे, उघड होणे; अब्रू जाणे. २. पुष्कळ जुलाब होणे. (कु.) **भांड्यास भांडे लागणे** – शेजाऱ्यापाजाऱ्यात मतभेद होणे.

**भांडेपाणी** न. सामाइक विहीर व त्या विहिरीतून पाणी काढण्याचा अधिकार, हक्क : 'विहिरीतील भांडेपाण्यांतील भाऊहिश्यासुद्धा या जमिनी... आमच्या... वहिवाटीच्या आहेत.'– दै काळ ४.३.

**भांब** स्त्री. आभास; भ्रांती : 'त्यासि देहादिबंधन भांब । मिथ्या विटंब आभासे ।'– एभा ११.१३४.

**भांब** स्त्री.मोठी विहीर.

**भांबडभूत** न. नादिष्ट.

**भांबावणे** अक्रि. गोंधळणे; गडबडणे.

**भांभ** स्त्री. १. शोभा; सौंदर्य; तकतकी. २. हावभाव.

**भांबडे** वि. जुने; पडके; कुजके. (व.)

**भिकट-ड, भिकूट** वि. भित्रा; भेकड; भीरू.

**भिक(कु)टणे** सक्रि. झाडाच्या डहाळ्या, पाने ओरबाडणे.

**भिकण** न. गऱ्यातील बी. (गो.)

**भिकणा** उद्गा. (थट्टेने) नकारार्थी उद्गार.

**भिकणी** स्त्री. ढेकूण बसण्यासाठी लाकडी फळीस भोके पाडून करतात ते साधन; ढेकणी; ढेकूण पकडण्याची सच्छिद्र पट्टी.

**भिकणे** न. १. जकातीवरील पट्टी : 'भिकणे दोहीकडे देऊ नये म्हणून आज्ञा.'– पेद १३.४७. २.भिक्षा. ३. जोशी, भक्त, उपाध्याय यांना दिलेले इनाम. ४. धर्मादाय. ५.सरकारकडून घेण्यात येणारा धर्मादाय कर. ५. बलुते-अलुतेदारांस धान्य देणे. ६. दारिद्र्य.

**भिकनीशी** पु. भिकारी.

**भिकबाळी** स्त्री. १. नवस म्हणून भीक मागून आणलेल्या पैशातून आपल्या मुलांच्या कानांत घातलेले कर्णभूषण. हे पूर्वी नवस म्हणून केले जाई. २. पुरुष कानात घालतो ते कर्णभूषण.

**भिका** पहा : **भीक**
वि.हलका; हिणकस.

**भिका(के)बंद, भिके** पु. न. चिनी, पोर्तुगीज कागदाचा चतुर्थांश. पूर्वी कचेरीत हे कागद वापरत असत.

**भिकार, भिकारगंड** न. १. भिकाऱ्यांचा थवा, समुदाय. २. दारिद्र्य; गरिबी.

वि. दरिद्री; भिकारी; कंगाल; जीवनातील आवश्यक गरजाही पुऱ्या होत नाहीत असा (देश, गाव, खेडे); दरिद्री. [सं.भिक्षु]

**भिकारचेष्टा** स्त्री. हलकट, क्षुद्र, घाणेरडे, गदळ, अयोग्य काम, कृत्य; रिकामा कारभार; फायदा नसलेले काम.

**भिकारचोट** वि.१.(निंदार्थी) भिकारी; वाईट, भिकार वृत्तीचा; कृपण. २.दरिद्री; तुच्छ; पसंत नसलेला; (किंमत,बळकटी, पुष्टता इत्यादींमध्ये) कमी दर्जाचा; अपुरा.

**भिकारछंद** पु. वाईट नाद, सवय, खोड.

**भिकारटोकार** न. (व्यापक, सामा.) भिकारी लोक; भिकाऱ्यांचा व टोळभैरवांचा समुदाय.

**भिकारडा** पु. (तिरस्कारदर्शक) भिकारी.

**भिकारणे** अक्रि. भिकारी, दरिद्री होणे.

**भिकारभोपळा** वि. दुर्दैवी; कपाळकरंटा.

**भिकारलाड** पु. भिकारी करण्यासारखे लाड; अतिशय कौतुक आणि लालन (प्राय:) मुलांचे; मुलाला बिघडवण्यासारखे लाड.

**भिकारहट** पु. नीच, हलकट, अयोग्य खवखव, हाव, आग्रह.

**भिकार-री हाड** १. भिकारी किंवा गरीब कुळी. २. अत्यंत कष्टाचे आयुष्य; हाडीमाशी खिळलेले दारिद्र्य.

**भिकारी,भिकारीटाकारी** पु. १. भीक मागणारा मनुष्य. २. दरिद्री, कंगाल मनुष्य.
वि. १. कवडीमोल; तुच्छ (मनुष्य, स्थळ, वस्तू). २. हिताची गोष्ट न ऐकणारा; लाभदायक कामे न करता नुकसानकारक कामात आनंद घेणारा.

**भिकाळ** स्त्री. मुंजीतील भिक्षावळ.

**भिकुटणे** सक्रि. झाड, फांदी इत्यादींची पाने ओरबाडून काढणे.

**भिकूट** वि. भित्रा; भ्याड.

**भिकूण** पु. ढेकूण. [सं.मत्कुण]

**भिजक(ग)ट, भिजट, भिजका** वि. किंचित भिजलेला (भिजण्याने काही नुकसान होईल असे वाटते तेव्हा योजतात).

**भिजण** स्त्री. भिजत घातलेली डाळ, धान्य (भाजण्याकरता, भरडून डाळ करण्याकरता, उसळीकरता).

**भिजणूक** स्त्री. भिजणे; ओले होणे; भिजल्याची अवस्था. (क्रि.पडणे, होणे).

**भिजणे** अक्रि. १.ओले, दमट, सर्द, आर्द्र होणे. २. (ल.) भरभराटीचे, उत्कर्षाचे होणे (काम, स्थिती). पहा : **ओला** व **कोरडा**. ३. लाच घेणे. [सं.अभिषेचनम्] (वा.) **कांबळे भिजत पडणे** - (कांबळे लोकरीचे असल्यामुळे ते फार वेळ पाण्यात ठेवल्याशिवाय भिजत नाही यावरून ल.) (एखादे काम) लोंबत, अनिश्चित पडणे. **हात भिजणे**- जेवणाचा प्रसंग येणे. [सं.सिच्, अभि + अंज]

**भिजपाऊस** पु. जमिनीत पाणी चांगले मुरेल असा पडणारा पाऊस.

**भिजवण** न. १. ज्यात दुसरा कोणताही पदार्थ भिजवला जातो असा द्रव पदार्थ. २.भांड्यास चिकटलेले अन्न, खरकटे इ. ओले करून काढण्याकरता भांड्याला लावलेली भिजलेली राख, माती. ३.भाकरीसारखा कोरडा पदार्थ नीट खाता यावा यासाठी त्याबरोबर देतात ते दूध, ताक.

**भिजवण-णी, भिजवणूक** स्त्री. १. भिजवणे; भिजत ठेवणे. २. ओलेपणा; आर्द्रपणा. (व.)३. नांगरण्यासाठी जमीन. (कु.)

**भिजवाण** न. जमीन भिजवून भात पेरणे. (कु.)

**भिजविणे** सक्रि. १. ओले करणे. २.(ल.) लाच देणे.

**भिजाणा** पु. भिजलेला दाणा; पाण्यात घालून फुगवलेले कडधान्य.

**भिजूड** वि. भित्रा.(गो.)

**भिज्वण** स्त्री. तांदळाशिवाय स्वयंपाकास लागणारे सामान; शिधा.

**भिटीभिटी** क्रिवि. कावराबावरा होऊन; रिकामपणे.

**भिडकणे** अक्रि. तडफडणे : 'अन्नालागीं भिडकली।'- दास३.५.७.

**भिडणे-णे** न. अर्धे कबाड; अर्धे ओझे (लाकूड, कडबा यांचे).

**भिडणे, भिडिनणे** अक्रि. १. जवळ येणे, असणे (मनुष्य, गोष्ट, काळ). २. चिकटणे; गच्च धरणे; बिलगणे; भेटणे. ३. पोहोचणे; जाणे. ४. कुस्ती करणे; झुंजणे. ५. युद्ध करणे.

**भिडणे** उक्रि. १. जवळ आणणे; तुलनेकरता एकाजवळ एक मांडणे; एके ठिकाणी जोडणे, ठेवणे. २. अंगावर चालून जाणे, येणे; तोंड देणे; झगडणे; लढणे. ३.झोंबी, भांडण लावणे. ४. वेष्टणे; बांधणे; लपेटणे; झटकन लावणे (खोगिराने, काच्याने कमर, गाडी, माणूस इ.). ५. एक पत्र, कागद दुसऱ्यात रेटणे. [सं.आद्भिद]

**भिडती-तू-त्या** पहा: **भिडू**

**भिडन** न.१. जनावरांच्या पाठीवर लादलेल्या ओझ्याची अर्धी, एक बाजू. २. जेरबंद घट्ट ओढता यावा म्हणून त्याखालील पोकळीत भरण्याकरता खोगिरावर, मुठीवर ठेवलेल्या कापडाच्या अथवा इतर कसल्यातरी घड्या.

**भिडसणे, भिडसुडणे, भि(बि)रसुडणे** सक्रि. फांद्या, पाने धसफसा, नुकसान होईल अशा रीतीने छाटणे.

**भिडस्त-स्थ, भिडिस्त, भिडा** वि. न. १. दुसऱ्याच्या मताला, मर्जीला मान देणारा. २.लाजाळू; चारचौघात संकोचाने वावरणारा.

**भिडं** न. सुतारी काम करताना लाकडाला घट्ट फसवून ठेवणारा चिमटा.

**भिडा** स्त्री. इच्छा. [सं.अभिध्या]

**भिडाऊ** पु. जार; भडवा. (तंजा.)

**भिडाऊ** वि. भिडणारा.

**भिडावणे** अक्रि. दरारा, मान याने दडपला जाणे; पराकाष्ठेची भीड पडणे; संकोच करणे.

**भिडू** पु. १.खेळणारा जोडीदार; गडी; एका पक्षाचा मनुष्य, म्होरक्या; एखाद्याच्या वतीने खेळणारा मनुष्य. २. साहाय्यकर्ता. ३.दोस्त; यार. ४. जार.

**भिडे** न. (बांधकाम) दोन दगडांच्या फटीत घट्ट बसवायचा तुकडा. (राजा., कुण.) (वा.) **भिडी बांधणे**- चिरे, दगड एकमेकांवर ठेवून चुना लावणे. (कु.)

**भिडे** न. खापराचा, बिडाचा तवा; दगडी काहील; आंबोळी, घावन वगैरे करण्याचे दगडी, रुंदट पात्र : 'भिडेयासि तुपाचा बोळा दीधला'- गोप्रच ८८.(चि.)

**भिडे** न. मोठा जमाव.
**भिडोळी** स्त्री. भेग; चीर.(बे.)
**भिणभिण, भिणभिणणे, भिणभिणाट, भिणभिणीत, भिणाण, हे शब्द भणभणमध्ये पहा.**
**भिणे,भितरणे** अक्रि. भीती वाटणे; दहशत, भीती बाळगणे. [सं.भी]
**भिणेभिणे** क्रिवि. भीतीने व धास्तीने.
**भित** न. काष्ठ.
**भि(भी)तर-री** क्रिवि. आत; आतल्या बाजूस.
**भितरसवाई** स्त्री. नफ्याची अपेक्षा असताना आलेले नुकसान.
**भिते** न. जळते लाकूड.
**भितरा,भित्रा, भिता** वि. भिणारा; भेकड.
**भित्तिचित्र** न. भिंतीवर काढलेले खूप मोठे चित्र.
**भित्तिपत्रक-पत्रिका** न. स्त्री. भिंतीवर चिकटवलेला चित्र, जाहिरात किंवा मजकूर असणारा कागद.
**भिदा** स्त्री. आपपरभाव.
**भिते** न. लाकूड. -शर. [सं.भी]
**भिदुर** न. वज्र: 'ऐसें वदे वचन तें कविहृदयाशिच न कांपवी भिदुरा।'- मोसभा ३.५४.
वि. मोडणारे; ठिसूळ. [सं.भिद्]
**भिनणे, भिन(ना)रणे** अक्रि.१. शिरणे आणि व्यापणे; सर्वत्र मुरणे (तेल, दूध, पाणी इ. शोषक पदार्थांत). २. (अंगात) आत शिरणे (औषधे, विषे इ. त्यांच्या स्वशक्तीने, गुणाने)इ. ३. (ल.) मुरणे; ठसणे (शिकवण, बोलणे, उपदेश). [सं.भिद्]
**भिनभिनणे** अक्रि. पहाट होणे; उजाडणे.
**भिन्न-न** न. (गणित.) अपूर्णांक.
**भिन्न** वि. १.भागलेला; विभागलेला; वेगळा केलेला. २.निराळा; वेगळा. ३. मोडलेला; फोडलेला. [सं.]
**भिन्नअंधकार-काळोख** गाढ अंधार.
**भिन्नखुर** पु. घोड्याच्या पायाचा रोग. - अश्वप २.३८.
**भिन्नता** स्त्री. भेदभाव.
**भिन्नदुपार** स्त्री. ऐन दोनप्रहरची वेळ; टळटळीत दुपार.
**भिन्नपरिकर्माष्टक** न. अपूर्णांकाच्या गणिताचे मूलभूत नियम.
**भिन्नवणे** अक्रि. पतंग गरगर फिरू लागणे. - व्याज्ञा १.१६४.
**भिन्नाट** क्रिवि. भन्नाट; वेगात.
**भिन्नावणे** सक्रि. १.मारणे; जोराने लगावणे. २. रागास चढणे.
**भिभि(भी)स्त** वि. भीरू; भेकड; भित्रा. [सं.भीत]
**भिमफूल** न. बिब्ब्याचे फूल. (अहि.)
**भिमावळ** पु. (गया शहरात राहणाऱ्या गयावळाप्रमाणे) भीमेच्या तीरावर राहणारा पंड्या; क्षेत्रोपाध्याय.
**भियौनगुळी** स्त्री. भीतीने गाळण उडणे. (गो.)
**भिरकटणे** अक्रि. फेकणे; उड्डाण करणे.
**भिरकणे** अक्रि. (पाखरांनी) भराऱ्या मारणे, उडणे : 'विश्वाच्या बगिच्यात हा भिरकती, कालांबरी पाखरें'- मर्ढेक ११.
**भिरकं(कां)डा** पु. १. गिरकांडा; फेक (दगड, वारा, पाणी यांची); चक्कर; गिरकी; भोवंडा (मुलांनी अंगाभोवती घेतलेला). २.तिरमिरी; भिरभिरी (रागामुळे आलेली). ३. निष्फळ येरझार; फेरा; गिरका. ४.लहानशी फेरी; थोडे फिरून येणे. ५.(ल.) घोटाळा; अडचण; फेरा. ६.झोक; झोकांडी. ७. चिंधडी; धांधोटी. ८. फरकंड.९. फरपट (काटेरी झुडूप, मृत पशू, जड लाकूड, साप यांची); (ओरबडल्यामुळे उठलेला) अंगावरील ओरखडा; बिरखडा; भरकटा. (वा.) **भिरकंडचा उडवणे** - गोंधळात टाकणे; निरुत्तर करणे. **भिरकंड्यात पडणे** - गोंधळणे.
**भिरकं(कां)डी** स्त्री. १. भेलकंडा; झोकांडी. २. निष्कारण इकडे-तिकडे हिंडणे. ३. भ्रमण (भोवरा). ४. भर; आवेश.
**भिरका** पु. भिरकंडा (दगड इ.चा).
**भिरका** वि. तिरळा; काणा. (व.)
**भिरकावणे,भिरकणे** सक्रि. १. गोफणीने भोवडणे आणि झोकणे. २. झुगारणे; फेकणे; भिरकांडणे. ३.तिरस्काराने, बेपर्वाईने देणे; एखाद्याकडे झोकणे, फेकणे, टाकणे. [सं.अभि + ईर्]
**भिर(कं)कांडणे** सक्रि. १. भोवंडणे; भिरकावणे; गोफणीने फेकणे (दगड इ.). २. जोराने हाकणे (गाडी इ.).
**भिरकांडे** न. १. तिरमिरी; भिरभिरी; रागाच्या झटक्याने आलेली चक्कर; डोळे फिरणे. २.गोंधळ; कामाचा गरगरा, घायकूत. ३. तगादादारांची निकड आणि कटकट.
**भिरकुटी** स्त्री. भरकटा; लिहिण्यातील लपेटी.
**भिरकुडे,भिरकूट,भिरकुंड** न. बोरूतील गाभा, गीर, भेंड.
**भिरके** न. १.एक किंवा दोन माणसे बसण्याजोगी बैलांची, घोड्याची गाडी. हिला साटी नसते. आसावर एक-दोन फळ्या टाकतात व घोड्यावर बसतात तसे बसतात. २. झीट; चक्कर; तिरमिरी; भिरभिरी. ३. भूतबाधा.
**भि(बि)रखुडणे** सक्रि. पाने वगैरे ओरबाडणे.
**भिरगोरे** न. १. भिरभिरे. २.गिरकी खाणे इ. ३.(ल.) गांजणूक; ओढाताण (तगाददार, मूल यांच्याकडून); तोडतोडून खाल्ल्यासारखी, घोटाळ्यात पडल्यासारखी अवस्था.
**भिरड,भिरू(रूं)ड, भिरोड, भेरूड** पु. १.शेवगा, आंबा इ. वृक्षांना कीड लागून होणारा रोग. २. लाकूड कोरणारा एक किडा. (व.)
न. झाडाला कीड लागल्यास त्यातून पडणारा भुगा.
**भिरडणे** अक्रि. आंबा इ. वृक्षास भिरड (किडीचा रोग) लागणे.
**भिरडभुंगा** पु. कीड; वाळवी.
**भिरडी** स्त्री. रातंबीचे, भिरंडीचे बी.
**भिरडी** पु. वासुदेव; देवाची गाणी म्हणून भिक्षा मागणारा.
**भिरण** स्त्री. कोकंबाचे झाड. (कु.)
**भिरभि(भी)र-रा** क्रिवि. १. भिरभिऱ्यांनी, भोवऱ्यांनी केलेल्या भिर! भिर! आवाजासारखा आवाज करून. २. झपाट्याने; तडाख्याने; जलदीने; अचानक (गोफणीने धोंडे इ. टाकणे, फेकणे, मारणे). ३. कावरेबावरेपणाने इकडे-तिकडे पाहणे. ४. घाईने, जलदीने बोलणे. ५. रिकामेपणे (हिंडणे).

न. चक्कर.

**भिरभिरणे** अक्रि. १. झणझणणे; सणसणणे; भणभणणे; थरथर कापणे; (कान, हात इ. तडाखा बसल्यामुळे) हेलपाटणे; चक्कर येणे. २. थंडीमुळे शरीरास मुंग्या आल्यासारखे वाटणे. ३. तिरमिरी येणे. ४. इकडे-तिकडे चंचलपणे पाहणे.

**भिरभिरावणे** सक्रि. भिर्र असा आवाज होईल अशा रीतीने फेकणे.

**भिरभिरी** स्त्री. १. तीक्ष्ण वेदना; सणसण; तिडीक; अंगाला मुंग्या आल्यासारखे वाटणे. २. रागाचा उबाळा; घेरी, चक्कर यांचा झटका.

**भिरभिरे** न. वाऱ्याने गरगर फिरणारे, कागदाचे, मुलांचे खेळणे.

**भिरमिटणे** अक्रि. गरगरणे.

**भिररेवडी** स्त्री. फजिती; हुर्यो; विटंबना; उपहास; उपहास होणे.

**भिरसुडणे** सक्रि. ओरबाडणे (पाने इ.). पहा : **भिडसणे**

**भिरंगणे, भिरंबाटणे** अक्रि. भरणे; व्यापणे; भिरभिरणे.

**भिरंड** न. कोकम.

**भिरंडेल** न. कोकमतेल.

**भिरंवडेकऱ्याचे पुस्तक** अतिशय अव्यवस्थितपणे पडलेली पुस्तके, कागदपत्र वगैरे.

**भिराका** पु. धाव; सपाटा; झपाटा; झटका; दम; ताण. पहा: **भराका**

**भिराडी** स्त्री. रागाचा उबाळा, झटका.

**भिरिरी** स्त्री. १. रागाची लहर. २. घेरी.
क्रिवि. भिर ! अशा आवाजाने (गोफणीतून दगड फेकणे).

**भिरे** न. १. टोळधाड. २. पक्ष्यांचा, माश्यांचा समुदाय; थवा. (को., गो., कु.)

**भिर्भर** वि. वळण नसलेले (अक्षर). (गो.)

**भिर्मुट,भिर्बुटी** स्त्री. १. एक फुलपाखरू. २. दांडू मारण्याचा एक प्रकार.(गो.)

**भिर्मोळी** स्त्री. एका वेलीचे नाव. हिची मुळे खाण्यायोग्य असतात.

**भिर्लमाड, भिल्ल, भिल्लमाड** पु. माडाची एक जात; सुरमाड.

**भिलकवडे** न. एक पक्षी. हा ज्या पशूच्या पाठीवरून उडतो, त्याची पाठ मोडते अशी समजूत आहे.

**भिलटा** वि. भिल्लासारखा वागणारा; उद्याची फिकीर न करणारा.

**भिलभिलणे** अक्रि. दृष्टी, नजर थरथरणे. (गो.)

**भिलागर** न. ख्रिस्ती चर्च.(को.)

**भिलावा** वि. कडवट स्वभावाचा; इतरांशी वैर बाळगण्याचा स्वभाव असलेला. (अहि.)

**भिला(ल्ला)वा,भिल्लकु** पु.न. १. बिब्ब्याचे झाड. २. त्याचे फळ. [सं. भल्लातक] (वा.) ० **घालणे** - अडचण, आक्षेप काढणे.

**भिलोरी** वि. पैलूदार.

**भिल्ल** पु. डोंगर, जंगल, खिंड इ. ठिकाणी राहणाऱ्या व शिकार, लूट करून निर्वाह करणाऱ्या लोकांची एक जात व त्या जातीतील व्यक्ती. [सं.]

**भिल्लटा-टी-णी** स्त्री. भिल्ल जातीची स्त्री.

**भिल्लाण, भिल्लाची हट्टी, भिलवण** न. स्त्री. भिल्ल, कोळी इ. लुटारू लोकांची राहण्याची, वस्तीची जागा.

**भिल्लातक** पु. बिब्बी; बिबवा.

**भिल्लाव-वे** न.१. (व्यापक) भिल्लांनी केलेले खून, चोऱ्या, नासधूस इ. (क्रि.उठणे, सुटणे, माजणे, मातणे, होणे). २. भिल्लांची जमात, झुंड, टोळी. (क्रि. जमणे, मिळणे.)

**भिल्लावणे** सक्रि. भिजवणे.

**भिवई-री** स्त्री. भुवई.[सं.भ्रू + वर्तिका, भ्रुकुटी] (वा.) **०चढवणे** - रागाने पाहणे. **भिवया मोडणे** - डोळे मोडणे, मारणे; कटाक्ष फेकणे.

**भिवण** पु. एक जातीचा साप.

**भिवापुरी** स्त्री.वि. एका जातीची मिरची. (झाडी)

**भिशी** स्त्री. १. खाणावळ; जेवण्याचा क्लब. (गु.) २. संचय करण्याची पद्धत. ३. विशिष्ट मुदतीची पेढी. (कर.) पहा : **बिशी**

**भिषग, भिषग्वर्य** पु. वैद्य.

**भि(भी)स** स्त्री.माणसाच्या, मेंढीच्या अंगावरील केस.

**भिसटी** स्त्री. अव्यवस्थितपणे लोंबणारी, गुंता झालेली केसांची लांब बट; झिपरी.

**भि(भिं)साळ** वि. केसाळ.

**भिसी** स्त्री. पायाच्या बोटातील मुदी.(झाडी)

**भिसे** न. कमळाचा देठ, दांडा; कमळाचा तंतू. [सं.बिस]

**भिस्त** स्त्री. एखाद्या महत्त्वाच्या गोष्टीच्या पूर्ततेसंबंधी एखाद्यावर ठेवलेला विश्वास; अवलंबन; एखाद्यावर मनाने ठेवलेला दृढभाव. [फा.बेहेश्त]

**भिस्त** वीस.

**भिस्ती** पु. मसक, पखाल यांनी पाणी वाहणारा, मुसलमान धर्माचा पाणक्या. खांद्यावरून पखाल वाहणाऱ्यास मसकभिस्ती आणि बैलावरून मसक वाहणाऱ्यास बैलभिस्ती म्हणतात. [फा.बिहिश्ती]

**भिस्ती** पु. अनुचर.

**भिस्मिल्ला** पु. १. (मुसलमानी शब्दांच्या व समजुतींच्या गैरसमजामुळे हिंदूंनी दंगलीची व गोंधळाची भिसळाभिसळ दाखवण्यासाठी योजलेला शब्द) खिचडी; पंचभेळ; एकंकार; गोंधळ. २.चबढब बिघडल्याची स्थिती. [अर.बिसमिल्लाह]

**भिहूड** वि. भित्रा.

**भिळभिळ-ळा** क्रिवि.मंदपणे वाहणाऱ्या अश्रू इ. च्या शब्दाचे अनुकरणाने. [ध्व.]

**भिक्षणे** सक्रि. भिक्षा मागणे; याचना करणे. [सं.भिक्ष्]

**भिक्षा** स्त्री. १. भीक; धर्म; भिकाऱ्याला दिलेला पैसा, अन्न इ. २. धर्मातील योगी, संन्यासी यांना दिलेले जेवण. ३. करुणापूर्ण शब्दांनी केलेली मागणी; मागितलेली वस्तू. [सं.] (वा.) **० करणे** - संन्यासदीक्षा घेणे.

**भिक्षागृह** न. अनाथगृह; कंगालखाना.

**भिक्षार्थी** वि. भिक्षेची याचना करणारा; भिकारी.

**भिक्षाळ, भिक्षावळ** स्त्री. १.मुंजीत बटूने आईजवळ भिक्षा मागणे आणि तिने व इतर सुवासिनींनी त्याला भिक्षा (लाडू,फळे, द्रव्य इ.) घालणे. २. अशा रीतीने मागितलेली भिक्षा. ३. ही भिक्षा घालण्याचा समारंभ.

**भिक्षु-क्षू** पु. संन्यासी; विशेषत: बौद्ध संन्यासी. [सं.]

**भिक्षुक** पु. १. याजन, प्रतिग्रह व अध्यापन ही कर्मे करून निर्वाह करणारा

ब्राह्मण. २. (सामान्यत:) भिकारी.

**भिक्षुकी** स्त्री. भिक्षुक ब्राह्मणाचे काम, धंदा; भिक्षुकपणा.

**भिक्षुणी** स्त्री. संन्यास घेतलेली स्त्री; संन्यासिणी.

**भिक्षेश्वरी** स्त्री. भीक.

**भिंग** न. १. तावदान; सपाट काच; आरसा. २. काचेचा तुकडा. ३.अभ्रक. ४. एक पांढरा समुद्रमासा. [क.बिंगार, बिंगु] (वा.) **० देणे** – अभ्रकाचे पुट देणे : 'तरि तें मोतियांसी भिंग देणें । तैसें होईल।' – ज्ञा १०.१४.

**भिंग(गो)री** स्त्री. १. एक खेळणे; मध्ये अरी असणारे व कोकाटीप्रमाणे फिरवले जाणारे वाटोळे तकट; भोवरी. २. चाती. ३. भोवरी नावाची वेल व तिचे फळ. ४. एक किडा; भुंगा; भ्रमरी. [ध्व.; क.बुगुरी] (वा.) **पायास भिंगरी असणे** – सारखे भटकण्याचा स्वभाव असणे.

**भिंगरूट** स्त्री.झिल्ली; मुरकूट; रातकिडा. [सं.भृंग]

**भिंगार–रा** न.पु. कंदील; भिंगाचे घर; तावदान : 'कां भिंगारी दीपु ठेविला। बाहेरी फांके ।'– ज्ञा १३.१८२.

**भिंगारणे** सक्रि. झोकणे; फेकणे; भिरकावणे; झुगारणे.

**भिंगारा** पु. गिरीघोटी; गरगर फिरणे.

**भिंगारी–रे** वि. सर्वांगावर पांढरे ठिपके असलेली (मेंढी, वासरू).

**भिंगारे, गाडे भिंगारे** पु. अव. १. ओवळ्याभोवळ्या; स्वत:भोवती गरगर फिरण्याचा मुलींचा खेळ. २. मोठी भिंगरी, कोयाळ; भिंगरीचा गुंगाट; टंकार.

**भिंगांक** पु. भिंगाची शक्ती मोजण्याचे माप. भिंगाने निर्माण केलेल्या अभिसरणाच्या अपसरणाचे प्रमाण.

**भिंगी** स्त्री. पिंगट रंगाची जमीन.

**भिंगी** गलबताचा एक प्रकार.

**भिं(भीं)गु(गो)टा–रटी, भोंगा** पु. स्त्री. भुंगा.

**भिंगुले** न. लहान आरसा, काच.

**भिंगुळ, भिंगुळवाणे** वि. १. भयंकर; भयानक : 'तैसे अति भिंगुळवाणेंपण । वदनीं तुझिये।'– ज्ञा ११.३४६. २. उदासीन : 'ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें ।'– तुगा ११५६.३. विपरीत; विचित्र : 'जो जेथिचें गौरव नेणें । तयासि तें भिंगुळवाणें।' – ज्ञा १८.१६२६.

**भिंगूळसे** वि. पिंगट.

**भिंगोरी** स्त्री. १.अळीचा भुंगा करणारी.(तंजा.) २. भोवरा; भिंगरी.

**भिंगोळ** न. चिकणमातीची, लुकणमातीची एक जात. ही तापवून त्यापासून पांढरा रंग किंवा कपडे धुण्याचे द्रव्य काढतात.

**भिंज** क्रिवि. अफाट.

**भिं(भि)ड** न. टोळी; जमात; झुंड; थाटी. [सं.पिंड]

**भिंडिका, भिंडिमाळी,भिंडी** स्त्री. गोफण.

**भिंडिपा(मा)ल** पु. गोफणगुंडा.

**भिंडिमा(पा)ळा** स्त्री.अव. एक शस्त्र.

**भिंडेल** न. कोकंबांच्या बियांचे तेल; कोकंबेल; भिरंडेल.

**भिंडोळी** स्त्री. जारकर्म करणारी स्त्री. (गो.)

**भिंत** स्त्री. १. दिवाल; मातीची किंवा दगड, विटा वगैरेंची उभी व आडवी रचना. २. नेत्रास अंधत्व आणणारा विकार. [सं.भिद्]

**भिंतनागोरीपाणी** दोन गड्यांनी एक काठी व दोन चेंडू (नागोरी) घेऊन भिंतीस लागून असलेल्या मोकळ्या जागी खेळण्याचा खेळ.

**भिंतवड** स्त्री. भिंतीचा आधार. (गो.)

**भिंतसरी** स्त्री. भिंतीवरील लाकडाची पट्टी.

**भिंत(ता)ळा** पु. जळणाकरता फोडलेल्या लाकडाचा तुकडा; ढलपा.

**भिंताड,भिंतखंड** न.१. घराच्या भिंतीशिवाय दुसरी कोणतीही भिंत; अनाच्छादित भिंत (बाग, किल्ला, पडके घर यांची); लहान भिंत. २. (सामा.) (तिरस्कारार्थी) भिंत.

**भिंतीवरचे लिहिणे** काही विशेष प्रसंगासाठी स्त्रियांनी भिंतीवर काढलेली गोपुरे, आकृती.

**भिंबा** पु. नागरमोथा. (बे.)

**भिंबिरटे, भिंभिरकटे, भिभिरडे** न. पहाटेचा अंधूक प्रकाश; झुंजुमुंजू.

**भी** स्त्री. भीती; भय.

**भीऊस** न. शेतात ठेवलेले बुजगावणे.

**भीक** स्त्री. १. भिक्षा; दानधर्म. २. अभाव; कमताई; उणीव; वैगुण्य. उदा. सर्व गोष्टींची भीक आहे.[सं.भिक्षा] (वा.) **० काढणे** – अडचण सोसणे; दारिद्र्य अनुभवणे. **० घालणे** – १. वचकून असणे. २. मोजणे; मानणे; जुमानणे. ३. मागितलेली वस्तू देणे; एखाद्याची विनंती मान्य करणे. (हा प्रयोग नेहमी नकारार्थी असतो.) **० न घालणे** – अतिशय तुच्छ लेखणे. **० लागणे** – १. फार मागणी असणे; अतिशय चणचणीचा असणे. २. भिकेस मिळणे; कमताई असणे. **भिकेचे डोहाळे होणे**– (ज्या प्रकारची संतती होणार असेल, त्या प्रकारचे डोहाळे गर्भारपणी बायकांना होतात त्यावरून) दारिद्र्य किंवा दुर्दशा येण्यापूर्वी त्याप्रमाणे इच्छा होणे; पूर्वीच्या संपन्न स्थितीच्या विरुद्ध इच्छा होणे. **भिकेवर लक्ष्य ठेवणे** – भीक मागण्याचा प्रसंग येईल अशा रीतीने वर्तन करणे. **भिकेवर श्राद्ध** – दिलेल्या, उसन्या घेतलेल्या, तुटपुंज्या सामग्रीवर भिकारपणाने चालवलेला धंदा, काम.

**भीकपायली** स्त्री. गावकऱ्यांकडून महारास दिले जाणारे धान्य.

**भीकबरी** स्त्री. भिक्षा; धर्म.

**भीकबोहणी** स्त्री. इनामदाराचा एक हक्क.

**भीज** स्त्री. १. मसाला घालून खमंग करण्याकरता, भाजण्याकरता, उसळीकरता भिजवलेले हरभरे, वाटाणे इ. २. अशा दाण्यांची उसळ. ३. भिजणे.

**भीड** न. सांधे दाबून बसवण्याचे सुताराचे एक हत्यार.

**भीड** पु. आवाराच्या भिंतीला बांधलेला टेकू.

**भीड** स्त्री. १. दाटी; गर्दी; चेपाचेप; सैन्याची झुंड. २. (ल.) विरलता; टंचाई (महागाईमुळे होणारी).

**भीड** स्त्री. १.आदर; मान; मुरवत; चाड; मान्यतेचा, आदराचा भाव. (क्रि. धरणे, राखणे.) २. वशिला; वजन.(क्रि.खर्चणे) ३. आग्रह. ४. संकोच;लाज : 'राक्षस न धरील आमुची भीड ।'– मोभीष्म ५.५९. ५.भीती.(क्रि.चेपणे,मरणे.) [सं.अभ्यर्थ; क.भिडिय, भिडे](वा.) **० घेणे** – (शेती) खाचरा (खाजणा)स बाहेरून मातीची पुस्ती (भर) देणे. ही दिली असता पाणी झिरपत नाही.

**भीडकर–करी–खोर–सर–सरू–साळू–सारू–शील–सूळ** पहा : **भिडस्त**

**भीडभीड,भीडमर्यादा, भीडमुख(र्व)त,भीडभीक** स्त्री. १.पूज्यता; मानमान्यता. २. संकोच; मुर्वत; पर्वा.

**भीडस** वि. पहा : **भिडस्त**

**भीत** पु. खड्ग; तलवारीचे नाव.

**भीतर–रा–री** क्रिवि. आत; मध्ये. [सं.अभ्यंतर](वा.) **भीतरसवाईने विकणे** – तोटा खाऊन विकणे.

**भीतरपेठा** पु. अंतस्थ स्नेह.
वि. अंतस्थ; गुप्तपणे.

**भीतरभीतरा** वि.आतआतला.

**भीतरला** वि. आतील : 'भीतरले कृपेचेनि बळें ।' – ज्ञा १३.२७४.

**भीतळी** स्त्री. फोडीव लाकूड.

**भीति–ती–ण** स्त्री. १. भय; दहशत. २. वचक; धास्ती. ३. संदेह; शंका. ४. धोका किंवा वेदना यांच्या कल्पनेने उत्पन्न होणारी भावना.

**भीतिभंग** पु. निर्भयता : 'ते खांब नमस्करूनि आघवे । देखे भीतिभंगा ।' – ऋ ५७. [सं.]

**भीतिभीत** वि. भ्यायलेला; घाबरलेला.

**भीत्** स्त्री. १.भिंत. २. गाड्याचे चाक. ३. परसबाग. (झाडी) (वा.) **भीती कुदनं**– स्वैराचारी होणे. (अहि.)

**भीम** पु. १. पाच पांडवांपैकी दुसरा. हा फार शक्तिमान व खादाड होता. २.(ल.) धिप्पाड शरीराचा व अधाशी मनुष्य. ३. मारुती.
वि. प्रचंड; अजस्त्र; भय उत्पन्न करणारा (माणूस, गोष्ट). [सं.]

**भीमटोला** पु. १.झणझणीत टोमणा. २. मोठा दणका.

**भीमतुंबा** पु. एक गोंडी वाद्य. हे एकतारी असून याच्या दांडीच्या मध्यावर खालच्या बाजूस लहान भोपळा बसवलेला असून दांडीच्या वरील बाजूस उंच तिकोनी ५-६ पडदे असतात.

**भीमपलास** पु.(संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.

**भीमपाक** पु. (भीमाचा स्वयंपाक) खाण्याचे तामसी पदार्थ.

**भीमफूल** न. बिब्याला आलेले गोड फळ.

**भीमरात्र–त्रि–त्री** स्त्री. माणसाच्या वयाच्या सत्त्याहत्तराव्या वर्षाच्या सातव्या महिन्यातील सातवी रात्र.

**भीमसेनी एकादशी** ज्येष्ठ शुद्ध एकादशी. भीम फक्त हीच एकादशी करत असे.

**भीर** पु. संकोच.

**भीरकाहूर** न. भिरभिरा; बेजारी; त्रास. (क्रि. आणणे) (माण.)

**भीरु–रू** वि. १. भित्रा; शंकायुक्त. २. भीती वाटलेला; भ्यालेला. [सं.]

**भीरुता** स्त्री. भेकडपणा; भ्याडवृत्ती.

**भीरू** स्त्री. भित्री बाई. [सं.]

**भीरूक** पु. ससाणा; एक शिकारी पक्षी.

**भील** पहा: **भिल्ल**

**भीलकवडी** स्त्री. भील लोकांना देण्याचा एक कर. गोंड लोकांच्या हद्दीतून माल जात असता त्यावर बसवलेला कर. कदाचित हा पूर्वी कवड्यांच्या स्वरूपात देत असावेत.

**भीलवण** न. भिल्लांचा मुलूख.

**भीलंड** वि. दांडगा; क्रूर.

**भीश–स** वि. केसाळ: 'रिसें कर्कशें भीस भिंगोळवाणी ।'– राक १.१८.

**भीषण** वि. भयंकर; भयानक; घोर.

**भीष्म** पु. १. शौर्य, शहाणपणा, ब्रह्मचर्य व सत्यप्रतिज्ञा यांविषयी प्रसिद्ध, असणारा महाभारतातील क्षत्रिय योद्धा. २. (ल.) शूर, बुद्धिमान, इंद्रियनिग्रही, सत्यप्रतिज्ञ असा मनुष्य. ३. (संकेत) ढेकूण. (भीष्माच्या नेत्रांनी जसा हिरा भंग होई, तसा ढेकणाच्या रक्ताने भंगतो असे म्हणतात.) [सं.]

**भीष्मप्रतिज्ञा** स्त्री. १. (भीष्माने अविवाहित राहण्याची केलेली प्रतिज्ञा आमरण पाळली त्यावरून) (ल.) खात्रीचे वचन; कधी न मोडणारा निश्चय. २. घोर,अचाट प्रतिज्ञा.

**भी(भीं)स** स्त्री. १.लांब आणि राठ केस, लोकर (कुत्रा, बकरा, मेंढरू यांच्या अंगावरील); दाट केस; जटा. २.(निंदार्थी) माणसाच्या डोक्यावरील, दाढीचे प्रमाणेबाहेर वाढलेले केस; झुलपे.

**भीस** स्त्री. (राजा.) पहा : **भिशी**

**भीस्** पु. पिवळी माती.(झाडी) [सं.बुस]

**भुई** स्त्री. १. भूगोल. २. भूमी. ३.जमीन या शब्दाखाली दिलेल्या सर्व अर्थांत व वाक्प्रचारांत हाही योजतात. ४. शरीराची उंची; चण; बांधा; ठेवण. [सं.भूमि] (वा.) ० **बडवणे** – खोटा ठपका, आळ घेणे; तुफान घेणे. ० **बोम देऊन उठणे** – पापाला वाचा फुटणे; एखाद्याच्या पापाविरुद्ध लोकांनी मोठ्याने ओरडणे. **भुईचा सावरणे** – भयंकर दुखण्यातून बरे होणे; पुन्हा आपल्या पायावर उभे राहणे. **भु(भो)ईचे खडे खाणे** – १. उपासमार, आबाळ होणे. २. **भुईत जाणे** – खुजट, खुरटे होणे (प्राणी, वनस्पती). **पळता, रडता भुई थोडी होणे** – १. लांब पळून जाण्यासारखी परिस्थिती होणे. २. गर्वहरण होणे; अति दुःख झाल्यामुळे सतत रडू येणे.

**भुईआवळी** स्त्री. एक झाड. हिची पाने लाजाळूसारखी बारीक, उंची वीत–दोन वीत असते. फळे हिरवी, नाचणीएवढी व आंबट, कडवट चवीची असतात.

**भुईकाला** पु. जमीन सारवण्यासाठी एकत्र केलेले शेण व पाणी; सारवण.

**भुईकोट** पु. मैदानावरचा किल्ला.

**भुईकोह(हा–हो–व्हा)ळा–ळे** पु. भुईकोहळीचा कंद. याचा पाक शक्तिवर्धक आहे.

**भुईकोह(व्हा)ळी** स्त्री. भुईकोहळ्याचा वेल.

**भुईघर** न. भुईखालील खोली; तळघर.

**भुईघोळ** पु. एक प्रकारची पालेभाजी.

**भुईचणे,भोयचणे** पु.अव. भुईमूग. (तंजा.)

**भुईचापा–फा** पु. एक फुलझाड. याला पाने फुटण्यापूर्वी भुईतूनच दांडा येऊन यास फुले येतात.

**भुईचार** स्त्री. गुरांना खाण्यास योग्य असे हिरवे गवत, ओला चारा इ.

**भुईछत्री,भुईखोड** स्त्री. एक वनस्पती; कुत्र्याचे मूत; अळंबी.

**भुईठाकूर** पु. (निंदार्थी) खुजा, ठेंगू, वामनमूर्ती मनुष्य.
**भुईतरवड** पु. एक औषधी झाड; सोनामुखी.
**भुईनळा** पु. (उडवण्याच्या) दारूने भरलेला मातीचा नळा. हा जमिनीवर ठेवून पेटवला म्हणजे दारूच्या ठिणग्या कारंज्यासारख्या उडतात.
**भुईनिंब** पु. एक औषधी झाड.
**भुईनेत** न. १. एका औषधीचे नाव. २. मुंगळ्याचे घर.
**भुईपारणे** न. (पानाशिवाय, ताटाशिवाय) भुईवरच जेवण्याचे व्रत.
**भुईफुगडी** स्त्री. मुलींचा एक खेळ.
**भुईफोड** पु.१.जमिनीला येणारा पापुद्रा. २. अळंबे.
वि. जमीन फ़ोडून निघणाऱ्या रोपाप्रमाणे नाजूक, सुंदर, कोम इ.
**भुईबिब्बा** पु. एक प्रकारची वनस्पती. बिब्बा उतल्यास हिचा रस लावल्याने तो कमी होतो. (बे.)
**भुईभाग** पु. (सरकारने) पैशाच्या रूपाने धारा देण्याऐवजी जमिनीच्या उत्पन्नाचा घेतलेला भाग.
**भुईभाटले** न. १. ज्यामध्ये वरकस अथवा निकृष्ट धान्याची लागवड करतात अशी जमीन; वरकस जमीन. डोंगराळ आणि सखल जमीन. (को.) २. सर्व प्रकारच्या व सर्व उपयोगाच्या जमिनी.
**भुईभुई** स्त्री. गडबड; वर्दळ; आवाज; ये-जा; व्यापार.
**भुईमाडा** पु. आपोआप बीज पडून उगवलेला रोपा. (को.)
**भुईमीठ** न. डोकेदुखी, दंश इत्यादींवर वर लावण्यास करतात तो चिकणमाती, मीठ व पाणी यांच्या मिश्रणाचा लेप.
**भुईमूग** पु. १. एक कंद. याच्या वेलाचे ताणे जमिनीवर पसरतात व मुळ्यांना जमिनीखाली शेंगा येतात. २. वेलाची शेंग. याच्या दाण्यांचा खाण्यासाठी व तेल काढण्यासाठी उपयोग होतो.
**भुईरिंगणी** स्त्री. जमिनीवर पसरून वाढणारी वनस्पती.
**भुईरिंगणे** न. सामान्यतः लहान मुलाचे चोखणे.
**भुईलोन** न. जमिनीवर मीठ टाकून केलेला चिखल. (व.)
**भुईसपाट** क्रिवि. पराभूत; चीत; जमीनदोस्त.
**भुईसर,भुईसरपट-टां** क्रिवि. भुईस लागून; भुईबरोबर (वृक्षाची फांदी, घराचे पाखे इ. असणे); सरपट्या बाजूने पण पृष्ठभागापासून दूर (बाण, गोळी इ. जाणे).
**भुईसरपटा** पु. जमिनीवर पसरणाऱ्या एका वेलीचे नाव.
**भुईसरा** पु. जमिनीवर शेणाने एकसारखे दिसेल असे सारवणे.
**भुईसांड** क्रिवि. भुईपासून थोडे वर ओझे उचलणे; जमीनसांड.
**भुकटा-टी-णी, भुकी** पु.स्त्री. पूड; चूर्ण. [क.बुक्किटु]
**भु(भुं)क(क्क)ड** वि. १. भुकेलेला आणि गरजू; बुभुक्षित; अतिशय दरिद्री; उघडा. २.नापीक. ३. वाईट; भिकार; निरुपयोगी; नादान (जिन्नस, पदार्थ इ.). ४. रोड; वाळका; किडकिडीत.
**भुकंद,भुकं(कां)दा** पु. (सामा.) बुकांदा; मुठीने मारणे.
**भुका** पु.१. नागरमोथा, वाळा, कचोरा इ. चे सुवासिक चूर्ण; (विरू.) बुका. २. भुकटी; चूर्ण.
**भुका** पु. (गुरांच्या) केसांचा झुपका.
**भुकार** न. कुंभाराचे फिरते चाक.
**भुका(खा)ळ-ळू** वि. अन्नासाठी हपापलेला; ज्याला भूक वारंवार लागते व ती लागली असता वाट पाहता येत नाही तो.
पु. १. चिंच, माती, राख असे पदार्थ फार प्रमाणात खावेसे वाटण्याचा रोग. हा गर्भवती स्त्रियांत किंवा रोगट लहान मुलांत दिसून येतो. २. दुष्काळ.
**भुकिस्त** वि. १. अधाशी; फार भूक लागलेला, असलेला. २. (ल.) गरजवंत; गरजू. ३. कंगाल. ४. (ल.) भुक्कड; भरड; रुक्ष; नापीक (जमीन). ५. सुनका; वांझट; अल्प; चुटपुटा; मुळीच काही नसणारा (देश, गाव, बाजार, धंदा, श्रम,भाषण). ६. भिकार; क्षुद्र; लहान; कवडीमोल (प्राणी, वस्तू).
**भुकी** वि. थोडीशी भूक राखून जेवणारा.
स्त्री. चूर्ण.
**भुकेकं(बं)गाल, भुकेब(बा)ग** वि. खायला न मिळणारा; भुकेलेला व गरजू; दुकळलेला; हतभागी; गरीब. [हिं.]
**भुकेचा मोटला** अत्यंत भुकेने धाधावलेला माणूस; भूक निभत नाही असा माणूस.
**भुकेजणे, भुकेणे** अक्रि. १. क्षुधित होणे. २. (ल.) उत्कंठेने इच्छिणे; आशा करणे; धाधावणे; हाव सुटणे.
**भुकेमान** वि. खाबू; लाचखाऊ. (झाडी)
**भुकोहोरा** पु. एक रानटी वनस्पती. (झाडी)
**भुक्** वि. खाणारा; भोगणारा; उपयोग करणारा.(समासात) वायुभुक्.
**भुक्कड** वि. दरिद्री; निलाजरा.
**भुक्त** वि. १. भोगलेला; उपयोग केलेला. २. खाल्लेला.३. ओलांडलेला; उल्लंघन केलेला (तारे, ग्रह यांनी आकाशाचा प्रदेश). [सं.]
**भुक्तभोगी** पु. कष्ट, भोग भोगलेली; अनुभव घेतलेला; अनुभवी.
**भुक्ति-क्ती, भुगुती** स्त्री. १. भोजन. २.अन्न. ३. भोग; उपभोग; भोगवटा.
**भुगतीभागती** स्त्री. भोक्तृत्व; भोगण्याची अवस्था.
**भुगभूग** पु. (गो.) पहा : **भगभग**
**भुगराळा** पु. १. चुरलेला, भुगा केलेला, भरडलेला पदार्थ; पीठ. २. चुरलेले कागद, सुरकुतलेला कपडा; चुरल्याची, सुरकुतल्याची स्थिती, अवस्था. ३. तुकडे-तुकडे झाल्याची, फुटल्याची स्थिती (गाडी, भांडे, वस्तू इ. कांची). ४. मोडल्याची, सांधे उखळल्याची स्थिती (हिंदळणे, फार दपटणे, कुदळणे इत्यादींनी शरीराची). (क्रि. होणे)
**भुगा-गी** पु. स्त्री. १. चूर्ण; पूड. २. राख.(गो.) [सं.भुग्न]
**भुगाभागा** वि. पु. चूर्ण; बारीक द्रव्य; चुरलेला पदार्थ.
**भुगाळ** वि. भुसभुशीत; भुगा झालेला.
**भुगुली** स्त्री. एक बोराएवढे फळ.
**भुगूल** न. पु. खानदेशातील धाब्याच्या घरावर पावसाळ्यापूर्वी टाकतात ते खाऱ्या मातीचे ढीग प्रत्येकी.
**भुज** पु. १. (खांद्यापासून बोटांच्या टोकापर्यंत) संपूर्ण हात. २. भूमितीच्या बहुकोनी आकृतीची एक बाजू. ३. काटकोन त्रिकोणात कर्ण आणि कोटी यांच्याशिवाय राहिलेली तिसरी बाजू. ४. दोन किंवा चार काटकोनांची भरती; तीन काटकोनांची पुरवणी. ५. समवृत्ताच्या ध्रुवातून

जाणाऱ्या मंडलाच्या धनुष्याची ज्या; ग्रहाचे समवृत्तापासून अंतर. ६. वळण; बाक. ७. राशिचक्रात नव्वद अंश किंवा त्याहून कमी अंतर. ८. (सामा.) बाजू. [सं.] (वा.)**भुजा ठोकणे** – कुस्तीला आव्हान देण्यासाठी दंड थोपटणे.

**भुज** पु. (भूमिति.) (आलेखातील) पाया; अक्ष.

**भुजआढी** स्त्री. (मल्लखांब) वेताचा मल्लखांब हाताच्या लवणीत धरून केलेली आढी.– व्याज्ञा ३.३४५.

**भुजक्कड** पु.दांडगा, भव्य पुरुष; धिप्पाड माणूस. (व.)

**भुजज्या** स्त्री. धनूची ज्या.

**भुजणे** सक्रि. भाजणे: 'भुजे सोनार मडकं.'– बहिगा ८०.

**भुजणे** पहा : **बुजणे**

**भुजदंड** पु. वरचा अथवा सगळा बाहू.

**भुजप्रतिभुज** पु. चतुष्कोणाच्या दोन समोरासमोरच्या बाजू. [सं.]

**भुजबल–ळ** न. १. बाहूचे सामर्थ्य. २. शारीरिक बळ, शक्ती.

**भुजबंद–ध** पु. सिंहकड्यासारखा किंवा बाजूबंदासारखा बाहूवर घालायचा दागिना.

**भुजबंद उडी** (मल्लखांब) मानेच्या मागे फुलीसारखे हात बांधून मारायची उडी. – व्याज्ञा ३.१०५.

**भुजभोवरी** स्त्री. घोड्याच्या खांद्यावरील केसांचा भोवरा. वि. खांद्यावर भोवरा असलेला (घोडा); खोडिलखांद.

**भुजरी** स्त्री. ओलसर काळ्या मातीत उगवलेले साळी, गहू यांचे अंकूर.

**भुजऱ्या** स्त्री.अव. श्रावणी पौर्णिमेला, ज्यास अंकुर फुटले आहेत असे टोपले, पाटी इत्यादीत लावलेले शेत डोक्यावर घेऊन फिरायचा परप्रांतातील विधी.

**भुजली** स्त्री. गुरख्याचे एक विशेष प्रकारचे शस्त्र.

**भुजली** स्त्री. गौर म्हणून वाटायचे गव्हाचे रोप. (झाडी)

**भुजवट–टा, भुजोटा** न.पु. १. खांद्याचा सांधा. (क्रि.उखळणे, हिसकणे.) २. पाटणीच्या दोन कड्यांमध्ये बसवायची फळी.

**भुजंग** पु. १.सर्प; नाग; ज्याच्या डोक्यावर दहाच्या आकड्याचे चिन्ह असते असा मोठा साप. २. बटीक, रखेल बाळगणारा मनुष्य; जार. ३.योग्य, समर्थ, पात्र, हुशार मनुष्य. ४. तापट, क्रूर मनुष्य. [सं.]

**भुजंगत्रस्तरेचित(करण)** न. (नृत्य.) पायाचे भुजंगत्रासित करून दोन्ही हात डाव्या बाजूस रेचित करणे. [सं.]

**भुजंगत्रासिक(करण)** न.(नृत्य.)उजवे पाऊल कुंचित करून दुसऱ्या पायाच्या मांडीशी असे ठेवावे की, त्यामुळे पायांचा त्रिकोण व्हावा; नंतर मांडी, गुडघा व कटि बाजूस वळवणे. [सं.]

**भुजंगत्रासिस(आकाशी)** न. (नृत्य.) पाय कुंचित करून वर उचलून दुसऱ्या पायाच्या मांडीच्या पाठीमागे ठेवणे. नंतर मांडीकडील बाजूस असे वळावे की कोपर व गुडघा हीही वळल्यासारखी दिसतील. [सं.]

**भुजंगप्रयात** न. एक वृत्त. अक्षरे बारा. य, य, य, य असे चार गण.

**भुजंगललिता** स्त्री.एक वृत्त. अक्षरे १३. गण – भ न न स ग.

**भुजा** स्त्री. १. पहा : **भुज**. २. (नाट्य.)पौराणिक नाटकातील देव, राक्षस यांची सोंगे घेणाऱ्याच्या दंडावर बांधायच्या भूषणांपैकी एक.

**भुजाडी** स्त्री. भटारखाना.

**भुजाद्म** क्रिवि. घनदाट : 'बाण निगति जैसे चोर । माजि भुजाद्म अंधकार.'– उह २०१०.

**भुजान** न. अडगळ. (व.)

**भुजारी** पु. भडभुंजा.

**भुजांतर** न. दोन्ही बाहूंमधील भाग; छाती : 'शिरला भुजांतरी शर.'– मो.

**भुजोटा** पु. भुजसंधी.

**भुटा–ट्टा** पु. मक्याचे कणीस. [हिं.]

**भुटे(ट्टे)खाऊ** वि. (निंदार्थी) गरीब; मूर्ख; भित्रा (चाकर, शिपाई इ.)

**भुटे(ट्टे)चोर** पु.१. क्षुद्र चोर; भामटा; उचल्या. २. मालकाच्या जिवावर आपले पोट भरणारा, आपले कार्य साधून घेणारा; गोडबोल्या; आर्जव, खुशामत करून पोट भरणारा.

**भुट्टा** पु. (कुस्ती) आपल्या जोडीदाराच्या हाताचा पंजा आपल्या हाताच्या पंजाने दाबून पिरगळून जोडीदारास मारणे.

**भुट्ट्याची टांग** (कुस्ती) मक्याच्या कणसाला ज्याप्रमाणे आपण पिरगाळतो, त्याप्रमाणे कुस्ती करणाऱ्याच्या हाताचा पंजा आपल्या मानेवर आपल्याच हाताच्या पंजाने दाबून धरून पिळगटून टांग मारणे.

**भुडई–ळी** स्त्री. जमिनीला पडलेली भेग.(व.)

**भुडकी–के** स्त्री.न. १. नदी, ओढा यांच्या काठाशी खणलेली, न बांधलेली, खड्डेवजा लहान विहीर, खाच (विशेषत: जमिनीस पाणी देण्यासाठी).२. नाल्यात खणलेल्या झऱ्याचे पाणी काढून ते नाल्याच्या शेतात नेण्याचा पाट, कालवा. (व.)

**भुडत्या** पु. दांडगट मनुष्य. (व.)

**भुडभुड–डा** क्रिवि. १.बुडबुड. २. चुटपुटती, घाईघाईने केलेली (अंघोळ).

**भुडभुडगाडगा** पु. कसातरी घाईने उरकून घेतलेला संस्कार.(व.)

**भुडभुडगाडगे** न. १.घाईने केलेले स्नान. २. अत्यंत लहान प्रदेश, शेत, पीक, व्यापार, धंदा इ.

**भुणभुण** स्त्री. (भुंग्याच्या भू-भू अशा सतत येणाऱ्या आवाजावरून) त्रास; तगादा; टुरटुर. [ध्व.]

**भुणभुणणे** अक्रि. सारखी किरकोळ तक्रार करणे.

**भुणँ** न. बी काढून घेतल्यानंतर पिकलेले काजूचे बोंड, फळ. (गो.)

**भुणी** वि. भुंडी; मागे वळलेल्या शिंगांची: 'कान बाईचं जळालं । भुणी मेंढी झालीया ।' –एहोरा.

**भुतकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. बुदकन; जोराने आदळणाऱ्या मृदू पदार्थाच्या आवाजाचे अनुकरण होऊन. [ध्व.]

**भुत(तां)डा** पु. १. गांजणूक; कुतरओढ (खाष्ट धनी, तगाददार यांची). २. दबडगा; दगदग (कामाची).

**भुतणे** क्रि. १. भुलणे : 'जियें मूर्तिमंतें भुरुरीं। भूतलेयां ।।'– माज्ञा १७.२९६. २. घेरणे; व्यापणे : 'जैं भ्रांतिसेजे सुतला । तैं स्वप्नसुखें भुतला ।'– ज्ञा ५.४७. ३. होणे. ४. अनुभवणे. [सं.भू]

**भुतबेडी** स्त्री. मोठी, मजबूत बेडी. (तंजा.)

**भुतवा, भुताव** पु. कोकणात आढळणारे एक फुलझाड.

**भुताची दिवटी** दलदलीच्या जमिनीतून निघणारी दीप्तिमान हवा. ही पंख

असलेल्या सापाने आकाशात उडावे अशा प्रकारची दिसते. (इं.)ड्रॅगन.
**भुताटकी** स्त्री. १. एखाद्याचे वाईट, बरे करण्यासाठी भुतास काही देऊ करून त्यांना उठवण्याची, घालण्याची, काढण्याची विद्या; जादूगिरी; चेटूक. २. भुतांचा व्यवहार, चेष्टा. [सं.भूत+क. आटकी; क.भूताटिके]
**भुताट(र)णे** अक्रि. राग इ.मुळे भूत अंगात संचरल्यासारखे चाळे करणे.
**भुताड्या** पु. पाणकुत्रा.(झाडी)
**भुतारा–री** पु.स्त्री.खराटा; दांड्यापर्यंत झिजलेली माडाच्या हिरांची केरसुणी; सामान्यत: चिपाडांची, करबडांची केलेली केरसुणी.
**भुतारा–री,भुतेरा** पु.स्त्री.भुते काढणारा; पंचाक्षरी.
**भुतावळ, भुताळ–ळे** स्त्री.न. १.(समुच्चयाने) भुते आणि पिशाचे; त्यांचा सर्व गण, वर्ग. २. (ल.)लुच्चे, सोदे, शठ, भिकारी किंवा द्वाड आणि त्रासदायक मुले यांची गर्दी; हलकट लोकांची टोळी.
**भुतावळ–ळे** स्त्री. दारूकामाचा एकदम पेट; आतषबाजी.
**भुतावे** न. बटन; गुंडी. पहा : **बुतावे** २
**भुताळ्या–ळा** वि. दुसऱ्याचा नाश होण्याकरता त्यावर भुते घालणारा; पंचाक्षरी; चेटक्या.
**भुतांग्या–त्या,भुताचा खाजा** वि. बावळट. (झाडी)
**भुतांची घाई** १. अंगात आलेल्या भुताचे झपाट्याचे धापलणे आणि चलनवलन. २. मालमत्तेवर भुतांनी केलेली धामधूम व खोडसाळपणा.
**भुतांत** पु. काळ; यम.
**भुती** स्त्री. १.शिदोरी; परगावी जाताना बरोबर घ्यायचे खाण्यापिण्याचे सामान. (गो.) २. पहा : **बुंथी**
**भुतेखेते** न.अव. भुते, पिशाचे, हडळी, समंध इ.
**भु(भू)तोंडी** स्त्री. १.पंचमहाभूतांना दिलेला भाग, घास, फराळ, अल्पाहार. २. भुतांना द्यायचा बळी.
**भुत्या** पु. भवानी देवीच्या भगतांच्या वर्गातील एक व्यक्ती; भोप्या; देवीचे उपासक; कवड्यांच्या माळा घालणारा व हातात पोत घेऊन नाचणारा देवीचा भक्त.
**भुदगा** पु. १. करपलेले अन्न. २.अन्न शिजवताना जळालेले भांडे. ३. भुसभुशीतपणा; भुगा; नाश पावलेली स्थिती.
**भुनारा** पु. एक आतिषबाजी; भुईनळा.
**भुनास** पु. हत्तीला बांधण्याचा खांब.
**भुपकार, भुभु:कार** पु. १. वानरांची आरोळी. २.(ल.) भुमका; वदंता.
**भुभुसणे** अक्रि. उदयास येणे.–हंको.
**भुभुक्षा** स्त्री. भूक; क्षुधा. [सं.बुभुक्षा]
**भुभुक्षित** वि.भुकेलेला, क्षुधित. [सं.बुभुक्षित]
**भुभू** स्त्री. भाकरी.(कातोडी)
**भुमकणे** अक्रि. १. गाजणे. २. गरजणे (तोफ, वाघ इत्यादींनी). [ध्व.]
**भुमका–की** स्त्री. अफवा; लोकवार्ता; बातमी. (क्रि. उठणे) [इं.बूम]
**भुमका** स्त्री. १. संरक्षणदेवता; स्थानदेवता (गाव, जमीन, स्थळ यांची). (राजा.) २.भूमी. (गो.) [सं.भूमि]
**भुमखाना–न** न.पु.टोळ, मुंग्या, चिलटे, भिकारी इ. नाशकारक, त्रासदायक प्राण्यांचा थवा, समुदाय.
**भुमपुरुस** पु. घर, वाडा, गाव यांचा मूळपुरुष. (गो.)
**भुमरट** स्त्री. पिवळट रंगाची, खडकाची माती होऊन बनलेली जमीन. (व.,घाटी)
**भुमा,भूम्या** वि. १. स्थानिक : 'भुमेर जवाडे यांस पत्रें प्रविष्ट केलीं.'–भाब १४.२. एका जागेत फार दिवस राहिलेला (माणूस); जुना (रहिवासी). ३.(ल.) (स्थल, धंदा, गोष्ट यांचा) चांगला माहीतगार; मार्गदर्शक. ४. वाटाड्या. [सं.भूमिवान्]
**भुंयखांड** स्त्री. मोठे खंड. (गो.)
**भु(भुं)यार, भुयेर** न. १. डोंगराळ प्रदेशातील जमिनीखालचे विवर; गुहा; कपार. २.तळघर; जमिनीखालची खोली. ३. वारूळ. [सं.भूमिगृह]
**भु(भुं)यार** स्त्री. खर्चीसारखी व रेतीच्या रंगाची एक माशाची जात. (गो.)
**भुयारी मार्ग** जमिनीखाली केलेला रस्ता.
**भुयाळ** पु. स्थानिक रहिवासी. [सं.भू+आलू]
**भुरकट–ड,भुरका** वि. १.मळकट; धुळकट पांढरा; पांढुरका. २. नापीक; भुकिस्त; रुक्ष (जमीन).
पु. १.पूड; लाल मिरच्यांचे तिखट. २. रुपया. (नंदभाषा)
**भुरकण** न. १. वाघाची गर्जना. २.(ल.) जोराची ओरड; गर्जना; डरकी; आरोळी. (क्रि.फोडणे) ३. आवरून धरलेल्या रडण्याचा वेग अकस्मात बाहेर पडल्याने होणारा मोठा आवाज. [ध्व.भुर]
**भुरकणे** अक्रि. गर्जना करणे (वाघ इ. नी).
सक्रि. भुर्र असा आवाज करून पिणे; भुरका मारीत खाणे (कढी, खीर इ. पातळ पदार्थ). [सं.बृंह्]
**भुरकणे** न. अतिशय कोवळा नारळ.
**भुरकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. पक्षी एकदम उडताना, गवत एकदम पेटताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण करून होऊन. पहा : **भुरभुर**
**भुरकसणे** अक्रि. उपसणे; उकरणे.
**भुरका–की** पु.स्त्री. १. भुर्र असा आवाज करून पातळ पदार्थ तोंडाने आत ओढण्याची कृती. (क्रि.मारणे, घेणे.) २.झुरका (हुक्का वगैरेचा).
**भुरका** पु. एक वाद्य.
**भुरका** पु. १.पहा: **बुरखा**.२. गाडीवरील पडदा.
**भुरका(हरिणा)** वि. भुरकट, एका विशिष्ट रंगाचा; उदी, बदामी तपकिरी रंगाचा (घोडा). – अश्वप १.२७.
**भुरकाटणे** अक्रि. आनंदाने चढून, हुरळून जाणे. (कु.)
**भुरकाड** न. १. भुर्रकन जळणारे (काटक्या, ढलप्या, गवत, लाकूड इ.); हलके जळण २. रुक्ष आणि भुकिस्त जमीन; गुरांच्या खताने बनलेली विशिष्ट जमीन.
वि. निकस; भिकार (भुकिस्त जमिनीवरील गवत, पिक, उत्पन्न); रुक्ष; भुक्कड; भुरकन ओलावा नाहीसा होणारी (जमीन).
**भुरकाडी–ळी** स्त्री. हलकी व शुष्क काडी, ढलपी.
वि. टोण्या. (तंजा.)
**भुरकाळ** पु. एक प्रकारचे गवत.
**भुरकाळा** पु. तपकिरी उदी किंवा गडद पिवळट तपकिरी या दोन रंगांमधील

सर्व छटा.
**भुरकी** स्त्री. १. घोड्याचे डोळे व शरीर आच्छादणारा कपडा; झूल. २. पालखी, हौदा इ. कांवरील कापडी आच्छादन; गलेफ. ३. गाडीचा टप, पडदा.
**भुरकी** स्त्री. भुरभुर : 'पाऊस थांबला होता. परंतु कोंड्यासारखी बारीक भुरकी सुरूच होती.'- माणूस १४३.
**भुरकुडे** न. मक्याच्या कणसाचे दाणे काढल्यावर राहणारा दांडा.
**भुरकूट** न. शुष्क ढलपा, काटकीचा तुकडा; भुर्रकन जळून जाणारे लाकूड.
**भुरकूल** पहा : **बुरकूल**
**भुरके ढेकूण** कापसाच्या सरकीतील तेल शोषणारे किडे.
**भुरकोहल,भुरा** न. कोहळे.
**भुरगुळा** पु. एक प्रकारचा किडा.
**भुरगे,भुर्गो** न.पु. लहान मूल (मुलगा,मुलगी). (गो.) पहा : **बुरगे**
**भुरटा** वि. उडाणटप्पू; उचल्या.
**भुरडा** पु. (नाविक) नाळीच्या वर बसवलेले लाकडी टोपण. यास दोन भोके असतात. त्यातील एका कप्पीवरून नांगराचा दोर ओढला जातो.
**भुरडी** स्त्री. बगळ्याच्या जातीचा पक्षी; भोरडी.
**भुरदंड** पहा : **भुर्दंड**.
**भुरभु(भू)र-रा, भुरुभुरु** क्रिवि. १. गवत इ. हलके जळण जलदीने जळताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण. २. लोकांचे थवे उत्कंठेने व स्पर्धेने घुसताना, पक्षी एकदम उठताना, गवत इ. झटकताना, पोबारा करताना, हलक्या पावलाने धावताना होणाऱ्या आवाजाचे अनुकरण करून. [ध्व.;सं.भुरति]
**भुरभुरणे** अक्रि. १. भुरभुर जळणे (गवत इ.). २. भुरभुर उडणे; भरारणे (डोक्यावरचे, शरीरावरचे केस).
सक्रि. हलक्या हाताने थोडथोडी पसरून टाकणे (पूड इ.).
**भुरभुरळीत** वि. भुसभुशीत. (व.)
**भुरभुरा** स्त्री. भेसळ.-शर.
**भुरभुरा,भुरभुरीत** वि. हलके व शुष्क; भुरभुर जळणारे (जळण).
**भुरभुरी** स्त्री. तुरीतील कीड.
**भुरभुरे** न. भजे.
**भुरभुशीत** वि. फुसका; हलका (कपडा इ.).
**भुरभुसा** पु. बारीक भुकटा (करवतलेल्या, किडीने खाल्लेल्या लाकडाचा).
**भुर(रु)र-री-रे** पु.स्त्री.न. १. भूल; भ्रांती; भुरळ. २. गुंगी; ग्लानी. ३.पिसे; वेड; मद; उन्माद.
**भुररे** स्त्री. कौटाळ; चेटूक; चेडे.
**भुररेकरी** वि. भुरळ पाडणारा .
**भुरली** स्त्री. एक चिमणीसारखे परंतु तिच्यापेक्षा मोठे पाखरू. [ध्व.भुर्र]
**भुरले** न. एक पंख असलेला लहान किडा. हा जुन्या धान्यात उत्पन्न होतो.
**भुरवणी** स्त्री. गवंड्याची लहान करणी.
**भुरवणे** न. १. गवंड्याची मोठ्या आकाराची करणी. २. जमीन चोपण्याचे मोठे चोपणे.(को.)
**भुरसंडणे** सक्रि. पिटाळून लावणे; नष्ट करणे.
**भुरसी** स्त्री. दक्षिणा : 'भिक्षुकाचा मान भुरशीपुरता.'- वागीश्वरी ४.१०, पृ.७९१. [अप.सं.भूयसी]
**भुरळ-ळे** न. विरळ अभ्र; ढग; खार. (क्रि.येणे, निघणे, जमणे.) न.स्त्री. मोह; वेड; मोहिनी; भ्रम.
**भुरळणी** स्त्री. मोठे करणे; रुंद करणे; खोल करणे (खिळ्याने वगैरे छिद्र).
**भुरळणे** न. छिद्र मोठे करण्यासाठी उपयोगात आणण्याचे हत्यार, जिन्नस.
**भुरळणे** अक्रि. १. आभाळ, अभ्र, पाऊस नाहीसा होणे. २. मोह पडणे; मंत्रबद्ध होणे; ठकणे; फसणे; विरळ ढगांप्रमाणे जाणे.
सक्रि. १. (भोक,छिद्र) खुंटी, खिळा, जळते लोखंड इ. आत घालून व फिरवून मोठे करणे. २. वर लेखणी फिरफिरवून अधिक मोठे व जाड करणे (लेखातील अक्षर). ३. रंग देऊन ठसठशीत करणे; उजळणे; उजरणे; नवे करणे (चित्र).
**भुरंगुली-ले** स्त्री.न. भिजवलेल्या व भाजलेल्या भात वगैरे धान्याची लाही (प्राय: अनेकवचनी प्रयोग).
**भुरा** वि. फिक्या, तांबडसर, पिंगट रंगाचा. [हिं.]
**भुराडा-टा** पु. १.उडणाऱ्या पक्ष्यांचा, जळणाऱ्या गवताचा, हलक्या द्रव्याचा, झाडले असता उडणाऱ्या कोंड्याचा भुर, भर, भिर असा आवाज. २.(ल.) संपत्तीचा जलद नाश होणे. ३. कामाचा भरकाडा, सपाटा. [ध्व.भुर्र]
**भुराबासडा** पु. उसाची एक जात.
**भुरावणे** अक्रि. आनंदाने हुरळून जाणे; भुरकाटणे.
**भुरावळ** स्त्री. समुदाय; पोरासोरांचा, बाळगोपाळांचा जमाव.(गो.)
**भुरी** स्त्री. १. गोवरी इ. ची पांढरी राख, भस्म. २. डोळ्यांवरील अंधारी, भुरे पटल. ३. चंदनाची उटी. ४. पिठीसाखरेचा एक प्रकार. ५. बुरशी. ६. द्राक्षावरील एक कीड; पिकांवरील बुरशी रोग.
**भुरी** वि. टोकाचे; अगदी एका बाजूचे : 'भुरी दक्षिणे आस्वमेधाधिक यज्ञ करौनि।' - पंचो ४८.८.
**भुरुखाणे** क्रि. हुरळणे. (कु.)
**भुरुर** वि. उलट्या बाहुल्या असलेला.
**भुरुंपत्री** स्त्री. अव्यवस्थित कागदपत्र.(गो.)
**भुर्का** पु. चूर्ण; भुगा.(झाडी) [सिं.बुरो]
**भुर्कुटॉ, भुर्कुटावणी** पु.स्त्री. अत्यानंद; हर्षातिरेक. (गो.)
**भुर्दंड** पु.१. हरामखोरीने, लबाडीने मिळवलेल्या मिळकतीवर बसवलेला दंड. २. स्वत:च्या, दुसऱ्याच्या दुर्दैवाने, बळजबरीमुळे अविचारामुळे सोसलेला दंड; आपल्या हातून घडलेल्या नुकसानीची भरपाई. विनाकारण करावी लागणारी भरपाई, द्यावा लागणारा दंड.[सं.भूरिदंड]
**भुर्बस्या** स्त्री. अव. बारीक मासे.
**भुऱ्यावणे, भुऱ्योभुऱ्यो करणे** अक्रि. व्यर्थ उत्कंठेने, औत्सुक्याने भरणे; अविचारीपणा, उतावीळपणा करणे; हुरळणे.
**भुर्रकन** क्रिवि. जलद गतीने; वेगाने. [ध्व.]
**भुर्रभुस्स होणे** नासधूस होणे.
**भुलक्ना** क्रि. १. विसरणे. २. मार्ग चुकणे. (झाडी)
**भुलणे** अक्रि. १.स्वत:स विसरणे; वेडा होणे; बुद्धी गमावणे; मोहित,

लुब्ध होणे. २. बेभान होणे (दारू, संपत्ती, मान, प्रीती यांनी). उक्रि.विसरणे. [हिं.भूलना]

**भु(भू)लथा(ता)प** स्त्री. १.भरवसा वाटण्याकरता मारलेली गप्प. २. फसवणूक.

**भुलभुलाई** पहा : **भू(भु)लभुलैया**

**भुलवण-णी** स्त्री. १.भुलवण्याची, मोहवण्याची क्रिया. २. भुरळ; मोहित स्थिति (मंत्र, खुशामत इ.कांनी). ३.भूलथाप.

**भुलवणे** सक्रि. १.विसरण्यास लावणे. २.चुकवणे; हुलकावणी दाखवणे. ३. वेड लावणे; मोहवणे; छकवणे; भूल घालणे. [क.भुल्ल विसु.]

**भुलसावणी** स्त्री. भूल.

**भुलाई,भुलावणी-ण** स्त्री. फसवणूक; हुलकावणी; भुरळ.

**भुलाई** स्त्री. नटवी स्त्री.

**भुलाभटका** वि.१.बेबंद आणि भटक्या. २.गोंधळल्याने बहकणारा.

**भुलार** न. भूल.

**भुलावा** पु. फसवणूक; झुकांडी; हिसका; चकवा.

**भुली** स्त्री. गुंगी; भुरळ; मोह; भ्रम; विस्मरणशीलता.

**भुलीचे झाड** मोह, भ्रम उत्पन्न करणारे भूत; भुताची बाधा.

**भुलोबा** पु. १.शेतात पाखरे येऊ नयेत म्हणून उभे केलेले बुजगावणे. २. भीती.

**भुल्यो** उद्गा. खेळातील तात्पुरती तहकुबी; थुश्शो.

**भुल्ल(ल्लु)सचे** अक्रि. भ्रंश पावणे; वेड लागणे. (गो.)

**भुवई** स्त्री. भवई; डोळ्याच्या वरच्या भागी धनुष्याकार असलेली केशपंक्ती. [सं.भ्रू] (वा.) ० **उचलणे** – रागाने पाहणे. **भुवयास गाठी घालणे, भुवया चढवणे** – कपाळाला आठ्या घालणे; नतद्रष्टपणा करणे. २.(अभिनय) नाट्य व नृत्य यामधील भिवयांच्या अभिनयाचे प्रकार. हे सात आहेत.

**भुवईशलाका** स्त्री. भिवया रंगवण्याची काजळाची पेन्सिल.

**भुवन** न. १. लोक; जग; ब्रह्मांड; भूगोल. भुवने चौदा आहेत. २. जागा; ठिकाण : 'राजधानी भुवन । अमरावती ।'-ज्ञा ९.३२०. ३.घर; मंदिर. ४. नगर; पूर. ५. उदक; पाणी. ६. कुंडलीतील स्थान. [सं.]

**भुवनेश्वरी शांति-ती, भुवनेश्वरी** स्त्री. स्त्री प्रथम ऋतुस्नान होताना जर कुयोग असेल, तर त्याची भुवनेश्वरीप्रीत्यर्थ करायची शांती. ही गर्भाधान संस्कारास जोडून करतात.

**भुवर्लोक** पु. भूलोक व सूर्यलोक यामधील प्रदेश; पृथ्वीच्या वर व सूर्याच्या खाली असलेला सिद्ध व ऋषी यांचा राहण्याचा लोक. [सं.]

**भुवागळा** स्त्री. दाराचा अडसर : 'कवाडा घालिजे रात्रिवेळा । होती लोहाची भुवागळा '- उह ५९८. [सं.भू + अर्गला]

**भुविणे** अक्रि. व्यापणे : 'तुवां भुविले तिन्ही लोक'-उह २०४३. [सं.भू]

**भु(भुं)शी** स्त्री. बारीक तूस; धान्याच्या कुसांची, खपल्यांची टोके, तुकडे; भुसकट. (को.)

**भुसक(कू)ट, भुसकटा, भुसकुरा** न.पु.१.भूस; तूस.(को.) २. चूर्ण (किडीने खाल्लेल्या, करवतलेल्या इ.लाकडाचे). (वा.) ० **काढणे, पाडणे** - (काम, पाणरहाट फिरवणे, दामटणे, मारणे इ. खाली मनुष्य, पशू यांस) बेजार करणे; जेरीस आणणे .

**भुसकट, भुसका** वि. १.पुष्कळ भूस असणारे; तुषयुक्त (धान्य). २.किडींनी खाल्ल्यामुळे, जीर्ण झाल्यामुळे भुसभुशीत झालेले (लाकूड). ३. (शब्दश: व ल.) हलका; फुसका. [सं.बुस]

**भुसकट** न. भूषण; मोठेपणा. [सं.भूष्]

**भुसकण-कन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. १.कठीण व टोकदार वस्तू मृदू व किंचित प्रतिबंधक अशा पदार्थात जोराने शिरताना, त्यातून बाहेर निघताना होणाऱ्या आवाजाचा अनुकरणवाचक शब्द; झपकन. २.काही झपाट्याच्या क्रियांच्या शब्दाचे अनुकरण. पहा : **भसकण**

**भुसका** वि. पांढुरका; धुळीने भरलेला. (ना.)

**भुसकाटणे** अक्रि. बुजणे. (कु.)

**भुसकाड्या** पु. आट्यापाट्यासारख्या खेळात दोन्ही बाजूंनी खेळणारा गडी.

**भुसके लाडू** पु.अव. १. लाकडाच्या भुशाचे, दिसण्यास लाडवासारखे पण खाण्यास निरुपयोगी लाडू. २. (ल.) नकली भाषण किंवा कृत्य.

**भुस(सं)डा** पु. घासलेली, चोळवलेली, जीर्ण आणि झिजलेली, खोमलेली व चेचलेली, दमलेली, भागलेली अवस्था, स्थिति (दांडग्या व बेपर्वा वागणुकीखाली वस्तूंची, जबर श्रमाने प्राण्यांची, शरीराची); चुरडा; पीठ; पिट्टा.

**भुस(सं,सा)डा खेळ** १. भुसडा पाडणारी वागवणूक; नास, बिघाड होईल अशा तऱ्हेने कामास लावणे (प्राणी,वस्तू). २. दांडगाईने फेटाळणे; तिरस्कारणे (मुद्दा, मत).

**भुसदुकान** न. पूर्वीच्या काळातील एक कर. [सं.बुस]

**भुसभुशी(सी)त** वि. १.हलका आणि वाळलेला; ठिसूळ; चिकणपणा नसलेली (जमीन, माती, लाकूड, दगड). २.फुसका (कपडा).

**भुसभुस-सा** क्रिवि. गवत तोडणे, केस उपटणे, कुजका, हलका कपडा फाडणे, हलकी द्रव्ये इ. जळणे ह्या क्रियांच्या आवाजाचे अनुकरण; खडबडणाऱ्या, फडफडणाऱ्या, मृदू, उष्म वर्णाचे अनुकरण. [ध्व.भस]

**भुसळण्याचे शेवाळे** तंबाखूचे पान. (कर.)

**भुसंडे** न. एक शस्त्रविशेष.

**भुसा** पु.१.भूस; तूस. २. चूर्ण; भुसकट इ. (करवतलेल्या लाकडाचे). ३.पहा : **भुसडा** [हिं.] (वा.) **(कामाचा) ० पाडणे** -पुरे करून टाकणे; उरकणे.

**भु(भुं)सार** न. १.खरेदी-विक्रीला योग्य असे खाण्याच्या उपयोगी धान्य, गवत, कडबा इत्यादींना सामान्य शब्द. २.धान्याचा व्यापार. ३. धान्याचे व्यापारी; धान्याचे उदमी लोक. [सं.नुस]

**भुसारचे** क्रि. जेवणे.(गो.)

**भुसारपेठ** स्त्री. गावातील, बाजारातील धान्याच्या दुकानांचा भाग; धान्यबाजार.

**भुसारमाप** न. रगडपट्टीचे, सढळ हाताचे, झुकते माप.

**भुसारमाफी** स्त्री. धान्य, भुसारमाल यांवरील कराची माफी.

**भुसारी** पु. १.धान्याचा व्यापारी; गल्लेकरी; दाणेवाला; दुकान ठेवून किरकोळ विक्री करणारा, खेड्यात धान्य खरेदी करून शहरच्या पेठात नेऊन

विकणारा व्यापारी. २. भात, तूर इ. धान्य विकत घेऊन त्याचे तांदूळ,डाळ करून विकणारा उदमी. ३.भूस विकणारा.
**भुसारीपसरॉ** पु. धान्याचे दुकान.
**भुसारे** न. भुसाची गंजी, रास (सामान्यत: कडब्याच्या पेंढ्यांनी वेष्टिलेली व वरून आच्छादलेली).
**भुसावळ** स्त्री.१. भोजनभाऊ.(गो.) २. लोकसमुदाय; मंडळी.
**भुसाळणे** क्रि. जेवणे.(नंदभाषा.,कर.)
**भुसी** स्त्री. बारीक भूस; भुशी.
**भुसु–सू** वि. हीन दर्जाचा.
**भुसे** न. १.धुके. २.झिमझिम पाऊस.
**भुस्कट** न. भुसकट; मातेरे; नुकसान.
**भुळभुळ–ळा** क्रिवि. धान्य, वाळू इ. गळताना, रक्त, पाणी इ. अरुंद तोंडातून वाहताना, अश्रू पडताना, होणाऱ्या आवाजाचे अनुकरण होऊन.
**भुळभुळणे** अक्रि. शिवशिव उत्पन्न करीत त्वरेने (अंगावर) इतस्तत: चावण्याची, फिरण्याची पिसा, माशा, ढेकूण यांची हालचाल.
**भुळभुळीत** वि. शुष्क, रुक्ष व मऊ; भुसभुशीत; भुगाळ (माती इ.).
**भुंकण** न. कुत्रे: 'तो सप्तजन्म होऊनि भुंकण ।'– स्वादि २.४.५१.
**भुंकणे** अक्रि. कुत्र्याने भोकणे, ओरडणे. [ध्व.;सं.बुक्कन]
**भुंगवून देणे** जुळवून देणे.
**भुंगा** पु. १. लाकूड पोखरणारा एक किडा; भ्रमर. २. भुंग्याच्या आकाराचा, स्त्रियांचा डोक्यातील दागिना. ३. झेंगट; पीडा; भुणभुण. ४. भ्रमण. ५. वाई भागात प्रसिद्ध असलेली आंब्याची एक जात. याच्या फार गोडीमुळे फळात बारीक पाखरे होतात व ती फळ कापल्याबरोबर उडून जातात. – कृषि ६७९. [सं.भृंग]
**भुंगीर** न. भुंग्याने पाडलेले बारीक भोक.
**भुंगुरटे** न. लहान किडा; चिलट.
**भुंगेरी** वि. भुंग्यासारखे काळेभोर.
**भुंगेरे–रा** न.पु. (कृषि.) कीटकविशेष; रातकिडा.
**भुंजक** वि. उपभोग घेणारा; खाणारा.
**भुंजचे** अक्रि. घाबरणे; घाबरून सैरावैरा धावणे. (गो.)
**भुंजणे** सक्रि. १. भोगणे; अनुभव घेणे. २. उपयोग करणे.
**भुंजा** पु. भोग.
**भुंजाड** वि. भाजलेले. [सं.भ्रस्ज]
**भुंजारी** पु. धान्य भाजणारा; भडभुंज. [सं.भुंज्]
**भुंजीजणे** उक्रि. भाजणे.
**भुंजीजणे** सक्रि. १. भोगणे. २. उत्पन्न करणे. [सं.भुज्]
**भुंडा** पु. कंदमूळ : 'रताळांच्या परड्यातनी जातो... भुंडे उकरतो.'– पंवा १२४.
**भुंडा** वि. १. उघडा; नागडा; बुच्चा; नेहमीचे दागिने नसलेला (हात, गळा इ.). २. शिंगे मुरडलेली, मागे आणि खाली फिरलेली आहेत असा (बैल). ३. शिंगे, शेंडी, अग्र नसलेला. ४. फक्त; निव्वळ; नेहमीचा उरावा, आधिक्य नसलेला. [क.बोडुअ]
**भुंडी** स्त्री. स्त्रीची योनी. (झाडी)
**भुंडी** वि. काठ नसलेली किंवा बाह्या नसलेली : 'ती कापडाची तंग चोळी घालते आणि तीसुद्धा भुंडी हो!'– खेस्व ५५.
**भुंडी गाय** १. बिनशिंगी, मुरडलेल्या, मागे फिरलेल्या शिंगांची गाय. २.(ल.) गरीब, शांत, लीन मनुष्य.
**भुंड्रा** वि. कुरळा (केस). (झाडी)
**भुंबरट** वि. हलकी; निकस (जमीन). (व.)
**भुंयखांड** स्त्री. मोठे खंड.(गो.)
**भू** वि. (समासात उत्तरपदी)पासून उत्पन्न होणारा, झालेला. उदा. स्वयंभू= स्वत:पासून उत्पन्न होणारा. [सं.]
**भू** स्त्री. पृथ्वी; जलस्थलमय गोल. [सं.]
**भू–अभिलेख** पु. अव. जमिनीचे आणि तिच्या हस्तांतरणाचे लिहून ठेवलेले अधिकृत तपशील.
**भूअरी** स्त्री. उगाळण्याची क्रिया : 'अनुलेपनाचिया भूअरी । मीं अहंकारातें घोनारीं।' – भाए १५९.
**भूआगम** पु. जमीन महसूल; शेतसारा.
**भूक** स्त्री. १. क्षुधा; खाण्याची इच्छा. २. कामना; स्पृहा. ३.(ल.) इच्छा; तळमळ. [सं.बुभुक्षा] (वा.) **भुकेचा कोवळा असणे** – भूक रेटण्याचे सामर्थ्य नसणे.
**भूकबळी** पु. बरेच दिवस खायला न मिळाल्यामुळे मरण पावलेली व्यक्ती.
**भूकमळ** न. महाबळेश्वर येथे आढळणारे एका जातीचे फूल.
**भूकमोड** स्त्री. १. हलक्या व थोडक्याशा फराळाने भूक घालवणे. २. विलंबाने भूक भागवणे. ३. वासना तृप्त करून ती घालवणे. ४. भूक तृप्त होण्यापूर्वी आलेला अडथळा.
**भूकलाडू** पु. प्रवासाच्या उपयोगी फराळाचे पदार्थ, शिदोरी. पहा : **तान–तहानलाडू**
**भूकंप** पु. जमिनीत होणारी कंपने; धरणीकंप; जमिनीखालील अंतर्गत बदलामुळे पृष्ठभागाला बसणारे धक्के.
**भूकंपलेख** पु. यंत्राद्वारे भूकंपतरंगांच्या नोंदीचा आलेख.
**भूकंपांकनी** स्त्री. झालेला भूकंप दाखवणारे यंत्र.
**भूखंड** न. भूलोकाचा भाग, तुकडा.
**भूगर्भ** न. १. भुयार. २.पृथ्वीच्या आतील भाग, पोट.
**भूगर्भशास्त्र,भूस्तरशास्त्र** न. पृथ्वीच्या पोटात असणाऱ्या पदार्थासंबंधी शास्त्र.
**भूगर्भक्षितिज** न. मूळ, वास्तविक क्षितिज; खगोल क्षितिज. [सं.]
**भूगोल–ळ** पु. १. जलस्थलमय गोल. २. पृथ्वीरूप गोल; पृथ्वी. ३. पृथ्वीवरील देशांची माहिती; भूवर्णन.
**भूग्र(गृ)हादी** स्त्री. इमारतीच्या भोवतालची, मालकीची, मोकळी जागा.
**भूचंपक** पु. भुईचाफ्याचे झाड व त्याचे फूल.
**भूचर** वि. जमिनीवर फिरणारा, राहणारा; स्थलचर. [सं.]
**भूचरी मुद्रा** नासिकाग्रावरून भूमीकडे नजर लावणे अशी एक योगमुद्रा.
**भूचुंबकत्व** न. पदार्थ स्वत:कडे आकर्षण्याचा पृथ्वीचा गुणधर्म.
**भूछत्री** न. अळंबी; कवकवर्गातील, हरितद्रव्यविरहित, परपोषी वनस्पती.
**भूज** स्त्री. १. भुजा; सबंध बाहू. २.(क्षेत्रमापनात) एक बाजू (शेत, जागा

इ.ची). ३. (रसा.) लोहचुंबकाच्या ध्रुवांमधील आडवी लोखंडी पट्टी.

**भूज(र्ज)पत्र, भोजपत्र** न. १. भूर्ज नावाच्या वृक्षाची अंतर्साल. २.(ल.) अगदी झिरझिरीत वस्त्र. ३. अति पातळ कागद.

**भुज्या** स्त्री. भूमध्यापासून भूपृष्ठापर्यंतचे अंतर.

**भूत** वि. १.(व्या.) वर्तमान क्षणापासून गेलेला काळ; भूतकाळ. २.गेलेला; झालेला. ३. (समासात उत्तरपदी) झालेला; एखाद्याच्या स्थितीत शिरलेला आणि स्थित असणारा. [सं.] (वा.) **न भूतो न भविष्यति** – जे कधीही नव्हते व कधीही होणार नाही असे; विलक्षण (गोष्ट).

**भूत** न.१. राक्षस; पिशाच; स्मशानात संचार करणारी, झाडांवर वास्तव्य करणारी, प्रेतास सजीव करणारी, मनुष्ये खाणारी एक दुष्ट योनी. (क.ल.) देव, मूर्तीत वास करणारी चित्कला. २. मृताची छाया; पिशाच; संबंध. ३.(ल.) विटलेली, खराब झालेली वस्तू. ४.उपदेवतांचा एक विशिष्ट वर्ग; योनिविशेष. ५. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश या पंचतत्त्वांपैकी कोणतेही आदितत्त्व. ६.सृष्ट पदार्थ (सजीव, निर्जीव); कोणतेही द्रव्य, तत्त्व, कारण. ७. प्राणी. ८. (कायदा) खरी, जशी घडली तशी गोष्ट. ९. (सोंगट्यांचा खेळ) एकदा मारली गेली असून पुन्हा डावात बसलेली सोंगटी.[सं.भू] (वा.) **भुते नाचणे** – (एखाद्या स्थळाचा घर, गाव, रान इ. चा भणभणीतपणा, भकासपणा दाखवण्यासाठी उपयोग करतात.) एखादे स्थान ओसाड, भणभणीत पडणे, होणे.

**भूतके(खे)त–प्रेत** न. (व्यापक) भूत, प्रेत, पिशाच, राक्षस इ. दुष्ट योनीतील व्यक्ती.

**भूतकेश–स, भूतकूस** न. एक झुडूप.

**भूतकोटी** स्त्री. प्राणिमात्र.

**भूतखान** न.(ल.) जिचे केस मोकळे अस्ताव्यस्त सुटलेले आहेत, वस्त्रे घाणेरडी आणि स्वरूप भयंकर व हिडीस आहे अशी स्त्री, मुलगी; विद्रूप मूल.

**भूतखाना** पु. १. भुते, पिशाचे आणि वेताळ यांचा उपद्रव असलेली जागा. २. भुते, पिशाचे आणि वेताळ यांच्या खोड्या चेष्टा व दुष्ट कृत्ये; भूतचेष्टा. ३. भुतांचा समुदाय. ४. (ल.) एका ठिकाणी गोळा झालेल्या मुलांचा जमाव. ५. अडाणी लोकांची दंगल. ६. भयंकर व हिडीस माणूस. ७. (निंदेने) घाणेरडी व अव्यवस्थित जागा.

**भूतखीच** स्त्री. भुतांची खिचणी; प्राण्यांचा नाश.

**भूतग्राम** पु.१.स्थावर व जंगम वस्तू. २.पंचमहाभुतांचा समुदाय.

**भूतचेष्टा** स्त्री. भुतांचा खेळ, कृती, चमत्कार(शरीरबाधा, भास होणे इ.).

**भूतजात, भूतभाव** न. जीवमात्र; सर्व प्राणी.

**भूतणे** न. भूल; मोह.

**भूतणे** अक्रि. होणे; घडणे; अनुभवणे; भुलणे; व्याप्त होणे : 'हा लोकु कर्मे बांधला । जो परतंत्र असे भूतला ।'– ज्ञा ३.८४.

**भूतदया** स्त्री. प्राणिमात्रावर, सर्व सजीवांवर करायची दया.

**भूतधात्री** स्त्री. पृथ्वी : 'विंध्य राजा भेण भूतधात्री :'–रुस्व २२४.[सं.]

**भूतपीडा–भूतबाधा** स्त्री. भुतांची पीडा; भुतांनी उत्पन्न केलेला रोग किंवा एखादी अनिष्ट गोष्ट.

**भूतपूर्व** वि. मागील काळात झालेला; माजी.

**भूतप्रलय** पु. १.सर्व सजीव व निर्जीव वस्तूंचा नाश. २.भुतांच्या बेसुमार चेष्टा. [सं.]

**भूतभावन** वि. १.जग ह्या कल्पनेचे अधिष्ठान; सृष्टिनिर्मितीची कल्पना ज्यापासून उद्‌भवली तो : 'मी ये परीचा भूतभावनु । परि सर्व भूतांसि अभिन्नु ।'– ज्ञा ९.८६. २.जग उत्पन्न करणारा व त्याचे पालन करणारा.

**भूतयज्ञ** पु. १.पंचमहायज्ञांपैकी एक; वैश्वदेवातील बलिहरण. २. (विनोदाने) आपल्या देहातील पंचमहाभूतांना बलिदान, जेवण, भोजन देणे. [सं.]

**भूतल–ळ, भूपृष्ठ** न. १.पृथ्वीचा पृष्ठभाग. २.(सामा.) भूलोक; पृथ्वी. ३.सपाट जमीन; समथळ.

**भूतलविद्या** स्त्री. भूपृष्ठासंबंधी शास्त्र.

**भूतवेळ** स्त्री. भरदुपार, संध्याकाळ व मध्यरात्र. (या वेळी भुते बाहेर पडतात.)

**भूतवैद्य** वि. देवऋषी; पंचाक्षरी. [सं.]

**भूतशुद्धि–द्धी** स्त्री. पूजेच्या, एखाद्या संस्काराच्या पूर्वी करण्याचा विधी.

**भूतळणे** अक्रि. १.होणे; घडणे. २.अनुभवणे. ३.व्याप्त होणे : 'तरि भूतळलें आठवे । कां बोलें कानु झांकवे ।'– ज्ञा १३.१२२.

**भूतसृष्टि–ष्टी** स्त्री. १.भुतांच्या शक्तीने उत्पन्न झालेली माया; ऐंद्रजाल. २. मांत्रिक, जादूगार, गारुडी यांनी केलेली ठकवणूक, हातचलाखी, नजरबंदी. ३. भुतांचा समुदाय. ४.पंचमहाभूतात्मक जग; पंचमहाभूतांपासून ईश्वराने उत्पन्न केलेली शरीरे; संयुक्त पंचमहाभूते. ५. (ल.) अकस्मात उत्पन्न होऊन क्षणात नाश पावणारे, बुजबुजणारे कोट्यवधी प्राणी (माशा, अळ्या, कृमी इ. ). [सं.]

**भूतं(तां)डा** पु.१. कुतरओढ; गांजणूक. २. कामाची दगदग. (क्रि. लागणे).

**भूतात्मा** पु. १. शरीर; देह.२. जिवाचे व क्रियेचे उपादानकारण असे मूलभूत तत्त्व; प्राणिमात्रांचा आत्मा. ३. देव.

**भूताहिती** पु. देवऋण, पितृऋण, आत्मऋण न देणारा. [सं.]

**भूति** स्त्री. १. शिवाच्या ठिकाणी असलेली , तीव्र आणि मांत्रिक विधींच्या आचरणाने प्राप्त होणारी अलौकिक शक्ती. २. मोठेपणा; वैभव; ऐश्वर्य. ३. जन्म; उत्पत्ती. [सं.भू]

**भूतैल** न. पृथ्वीतून पाझरणारे तेल; शिलातैल; पेट्रोल, रॉकेल इ.

**भूतोंडी** पु. भूतबळी.

**भूदान चळवळ** भूधारकांनी आपल्या जमिनींपैकी काही जमीन भूमिहीनांसाठी द्यावी यासाठी विनोबा भावे यांनी सुरू केलेली चळवळ.

**भूदास** पु. १.शेतीत प्रत्यक्ष कष्ट करणारा; जमीनदाराचा नोकर; शेतीबरोबर विकला जाणारा. २. शेतीच्या कामात पूर्ण एकनिष्ठ असलेला – त्यात एकरूप झालेला.

**भूदिन** न.पु. पहा : **सावनदिन**

**भूदेव** पु. ब्राह्मण.

**भूदेवी** स्त्री. गाव, शेत, जागा यांची रक्षक देवता.

**भूधर** पु.१.पर्वत; डोंगर. २.भूगोल मस्तकी धारण करणारा शेष नावाचा

सर्प. ३. राजा. [सं.]

**भूधारक** पु. शेतजमिनीचा मालक.

**भूधारणापद्धती** स्त्री. जमीनमालकाने काही अटींवर दुसऱ्याला जमीन कसायला देणे.

**भूधृति-ती** स्त्री. १. आमदनी उपभोग - काल, नियत अवधी. २. धारणाधिकार.

**भूनिधी** पु. भूमिगत धन.

**भूप** पु. १. राजा. २. (संगीत.) एक राग.

**भूपकल्याण** पु. (संगीत.) गायनातील एक राग; भूप; कल्याण रागातील एक भेद.

**भूपति-ती, भूपाल-ळ** पु. राजा. [सं.]

**भूपरिघ** पु. भूपृष्ठावरून जाणारे मोठे वर्तुळ.

**भूपरीक्षक** पु. जमिनीची रासायनिक घडण तपासण्यासाठी मातीची चाचणी घेणारा तज्ज्ञ.

**भूपाळी** स्त्री. १. (संगीत.) एक राग. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर. २. भूप रागात पहाटे म्हणायची ईशस्तवनपर पद्ये; प्रात:स्तवन. ३. बंदिजनांनी, भाटांनी गायिलेली स्तुती. [सं.भूप + आली]

**भूपृष्ठ** न. १.पृथ्वीचा पृष्ठभाग. २. सपाट जमीन; समथळ.

**भूप्राधि** स्त्री. शेताचे तारण.

**भूभा** स्त्री. (ज्यो.) १.पृथ्वीची छाया. २. शंकुच्छाया. [सं.]

**भूभेदन** न. भूकंपाला कारण होणारी जमिनीची किंचित हालचाल.

**भूम** न. १.मुंग्याचे वारूळ (विशेषत: कसरीचे). २. सोन्याचा दागिना घडवताना सोनाराने त्यातील काही भाग काढून घेतल्याने ते वजन भरून काढण्यासाठी त्याने त्यात टाकलेली भर. [सं.भूमि]

**भूम** पु. कर्नाटक व द्रविड देशात विवाहामध्ये वधूवर पक्षाकडील सौभाग्यवती स्त्रिया यांची एक पंगत.

**भूम** वि. महान.

**भूमक** पु. ग्रामाधिकारी. हा गावाच्या सीमेच्या देवतेची पूजा करतो व सरकारी कामगार गावी आले असता त्यांची व्यवस्था ठेवतो.

**भूमका** स्त्री. गाव, शीव, जमीन, जागा यांची अधिष्ठात्री देवता.

**भूमंगल** वि. ज्याच्या उरावर किंवा कंठावर चार-पाच भोवरे असतात असा (घोडा).- अश्वप १.९२.

**भूमा** पु. (तत्त्व.) १. अभेद बुद्धीने सर्व पाहणे, ऐकणे व जाणणे. २.ज्याचा कधी शेवट नाही असे सुख.
वि.आदि-अंत-भेदरहित; सर्वव्यापी.

**भूमा** स्त्री. चंद्रग्रहणात चंद्रावर पडणारी पृथ्वीची छाया.

**भूमार्गभत्ता** पु. प्रवासाच्या अंतराप्रमाणे मिळणारा भत्ता.

**भूमि-मी** स्त्री. १. पृथ्वी. २. जमीन शब्दासाठी सर्व अर्थी. पहा : **भुई.** ३. (भूमिति.) बहुकोणाची बैठक, पाया; सामान्यत: पाया. ४. मूळ; मूळ आधार. ५. मजला; माळा. ६.स्थान. [सं.]

**भूमिका** स्त्री. १.पृथ्वी. २. नाटकातील वेष; रंगभूमीवर दाखवलेल्या सोंगाचा वेष; सोंग. ३. स्थळ (क्रियेचे); रंग; रंगभूमी; रणांगण. ४. आधार; जागा; थारा. ५. वेळ : 'अगा मावळलेनि अर्के । संध्येचिये भूमिके । ज्योतिदीप्ती कौतुकें । दिसे जैसी ।' - ज्ञा १८.४२५. ६. अवस्था : 'तो आघवीयाचि भूमिका- । सवें चाले।'-ज्ञा १८.१०४३. ७. पायरी; मजला : 'अभ्यासीं प्रथम भूमिका ।'- एभा १३.२५५. ८.स्थिती : 'तैसा आवडतिये भूमिके ।'-अमृ ७.२६०. [सं.]

**भूमिगत** वि.१. जमिनीत पुरलेले. २.फरारी झालेला; गुप्त झालेला; समाजातून नाहीसा झालेला. (क्रि. होणे)

**भूमिग्रस्त** वि.१.पृथ्वीने गडप केलेला. २. जमिनीत गडप झालेला; पुरलेला.

**भूमिति-ती** स्त्री. (गणित.) जमिनीची मापणी; रेखागणित; शास्त्रीय पद्धतीने चौरस, काटकोन, त्रिकोण वगैरे आकृती काढण्याचे नियम व सिद्धांत यांचे शास्त्र.

**भूमितिप्रमाण, भूमितिश्रेधी-ढी, भूमितिप्रमाणश्रेधी** स्त्री. (गणित.) जीत काही एका विवक्षित पटीने संख्या वाढतात किंवा कमी होतात ती पंक्ती. गुणोत्तराने सारख्या प्रमाणात संख्या वाढणे. जसे :- ४, ८, १६ इ. (४x२=८, ८ x२=१६).

**भूमिपाड** पु. जमिनीचा कस.

**भूमिभाग** पु. ठरावीक मापाचा जमिनीचा तुकडा; भूखंड.

**भूमिया, भूमा-म्या** पु.१.जमिनीचा मालक. २. गावचा मूळचा रहिवासी; फार दिवसांचा रहिवासी; गावचा मुख्य पाटील; पाटील वगैरे हक्कदार (गुजरातेत व राजपुतान्यात).३. भिल्ल जातीचा वाटाड्या.

**भूमिसंगम** पु. दोन मोठ्या भूप्रदेशांना जोडणारी भूप्रदेशाची छोटी पट्टी.

**भूमिसंपादन** न. खाजगी मालकीची जमीन सामाजिक उपयोगासाठी सरकारने आपल्या ताब्यात घेणे.

**भूमिहीन** पु. स्वत:ची शेतजमीन नसलेला.

**भूम्या** पु. लुटारू; लुगारू; पेंढारवजा.

**भूय** स्त्री. तळपट; नि:संतान; बिमोड.

**भूयसी-श्री** स्त्री. १.धार्मिक विधीच्या शेवटी जमलेल्या सर्व ब्राह्मणांना द्यायची दक्षिणा. २. मोठाल्या देणग्या (सर्वसाधारण आर्थिक अडचणीच्या वेळी वारंवार अनेकांना दिलेल्या).

**भूयोजन, भूसंपर्कन** न. विद्युत उपकरण आणि जमीन यामध्ये विद्युतधारा वाहून जाण्यासाठी उपलब्ध करून दिलेला मार्ग; (इं.) अर्थिंग.

**भूर-री** स्त्री. १. ज्यामुळे डोळ्यांना भुरकट अंधूक दिसते असा रोग. डोळ्यावरील अंधारी; बुबुळावरील सारा; पांढरा पातळ पडदा. २.शाडू.
वि. १.भुऱ्या रंगाचा; भुरा. २.क्षणभंगुर : 'दिसे तें तें भूर दादा सांगो काय अंतीं।'- भज ४१.

**भूर** वि. चिरडलेले : 'आशा मनशा पाही भूर होती'- सोयरा ४३.[सं.]

**भूरमलविद्या** स्त्री. जमिनीवर रेघा किंवा आकृती काढून शकुन पाहण्याची विद्या. [सं.]

**भूरी** वि. पुष्कळ.

**भूरेवडी** स्त्री. एक लहान झाड.

**भूर्ज** पु. हिमालयात आढळणारा वृक्ष. याची साल कागदापेक्षाही अधिक टिकाऊ असते. प्राचीन काळी या सालींचा लिहिण्यासाठी उपयोग करीत. [सं.]

**भूल-लि-ली** स्त्री. १. गुंगी; बेशुद्धी (मादक पदार्थांच्या सेवनाने उत्पन्न

झालेली). २. मतिमांद्य; मनाचा गोंधळ; घोटाळा; बुद्धिभ्रंश; भ्रम. ३. चूक; विस्मरण. ३.विशेषत: शस्त्रक्रियेच्यावेळी विशिष्ट औषधाद्वारे विशिष्ट कालावधीसाठी अधिकृत वैद्याकडून (डॉक्टरांकडून) शरीराला (वा त्याच्या भागाला) आणली जाणारी बधिरता. [हिं.]

**भूल** १. एक वनस्पती. (वाई) २. गुरांचा एक रोग.

**भूलथा(ता)प** स्त्री. फसवणूक; ठकवणूक; मन वळविण्यासाठी केलेली हिकमत. पहा : **थाप**

**भूलोपचार** पु. गुंगीचे किंवा मनाला भूल घालण्याचे औषध देऊन मानसिक रोगांवर उपचार करणे.

**भू(भु)लभूलैया** स्त्री. एक प्रकारची चतुष्कोणी किंवा वर्तुळाकार, व्यूहाप्रमाणे केलेली रचना. याची मख्खी माहीत नसेल तर आत सापडलेल्या माणसाला बाहेर पडणे कठीण जाते. पु.मोहजाल; माणसाच्या मनाला मोहवणाऱ्या गोष्टी.

**भूशलाका** स्त्री. समुद्रात घुसलेला जमिनीचा अरुंद चिंचोळा भाग.

**भूषण,भूषा,भूषावे** न. १. (शब्दश: व ल.) अलंकार भूषविणारी, मंडित करणारी, शोभविणारी कोणतीही वस्तू (रत्न, दागिना, सद्गुण, सुलक्षण, विद्या). २. अलंकृत, मंडित स्थिती. ३. (शब्दश: व ल.) मंडन; शोभन [सं.भूष्]

**भूषविणे** उक्रि. शोभविणे; अलंकृत, मंडित करणे. (शब्दश: व ल.) [सं.भूष्]

**भूषाप्रकार** पु. लोकप्रिय झालेला, अद्ययावत समजला जाणारा, शोभा वाढवणारा कोणताही प्रकार (चाल, कपडा, बोलण्याची तऱ्हा इ.); (इं.) फॅशन.

**भूषित** वि. अलंकृत; शोभविलेला. उदा. विद्याभूषित.

**भूस** पु. जेवण. (गो.) [सं.बुस]

**भू(भूं)स** न. १.भूसकट; तूस. २.(ल.) क्षुद्र पदार्थ. ३. चूर्ण; पीक (किडीने खाल्लेल्या लाकडाचे). ४. धान्यासाठी सामान्य संज्ञा. ५. पहा: **भुसडा** [सं.बुसम्] (वा.) ० **भरणे** – यथेच्छ कुटणे, मारणे, चोपणे. **भुसाने अंग भरणे** – १.गबर असणे (सावकारापुढे प्रतिष्ठा मिरवणाऱ्या, खळ्यातील भुसाने अंग भरलेल्या कुळाला किंवा कुणब्याला, त्याला भरपूर उत्पन्न झाले या अर्थाने म्हणतात). २. श्रीमंतीचा गर्व चढणे.

**भूसमाप, भूसकापणी** न. स्त्री. जेवण व हजामत. (गो.)

**भूसा** पु. १.काड वगैरेचे भुसकट. २. गुळाचा एक प्रकार.

**भूसेना** स्त्री. १. जमिनीवर लढणारे सैनिक. २.सकारात्मक कार्यासाठी उभारलेली स्वयंसेवकांची संघटना. [सं.]

**भूस्कार** पु. फूत्कार (सापाचा).

**भृकुटी** पहा : **भ्रुकुटी**

**भृकुटीभंग** पु. कपाळाला आठ्या घालणे; रागाची दृष्टी.

**भृगु** पु.१. शुक्र. २. पर्वतादिकांचा उंच तुटलेला कडा. [सं.]

**भृगुपतन** न. कड्यावरून पडणे.

**भृगुपात** पु. डोंगरावरून करून घेतलेला स्वत:चा कडेलोट.

**भृगुवार, भृगुवासर** पु. शुक्रवार. [सं.]

**भृति–त्या** स्त्री. १. मजुरी; पगार; भाडे. २. पोषण. [सं.]

**भृत्य** पु. १.मोलकरी; मजूर; वेतन घेऊन काम करणारा. २. (सामान्यत:) चाकर. ३. भक्त. [सं.भृ=पोसणे]

**भृंग, भृंगराज** पु. भुंगा.

**भृंग(गि)राज** पु. १. माका; औषधी वनस्पती. २. एक पक्षी; काकाकव्वा.

**भृंगराज होणे** थोड्या यशाने, स्तुतीने हुरळून जाणे.

**भृंगा–गी** स्त्री. भांग. [सं.भृंग]

**भे,भेउर–रे** न. १. भय; भीती. २. भयाचे कारण; धोका. [सं.भय]

**भेक** न. तुकडा; चीर; फाक; फोड.

**भेकट, भेक(का–कू)ड** वि. भितरा.

**भेकणा** वि. १.कुरूप. २. भेसूर.

**भेकणे** सक्रि.चिरणे; (पदार्थाची) फोड काढणे.

**भेकणे** अक्रि. (रडणे या शब्दाबरोबर प्रयोग. उदा. रडणेभेकणे) रडणे; रडून आकांत करणे. पहा : **भेकाड** [सं.भ्रेष्; ध्व.]

**भेकर–रे,भेकुरली** न. स्त्री. हरिणाची एक लहान जात; एक रानटी जनावर.

**भेग,भे(भें)गर,भेगळा–ळी** स्त्री. चीर; फट; तडा. [सं.भिद्]

**भेगडी** स्त्री. लोत झुडपाचा कांदा.

**भेगलणे** अक्रि. उलणे; चीर पडणे; तडकणे (जमीन, हात, पाय इ.).

**भेजणूक विद्या** हत्यार चालवण्याची किंवा फेकण्याची विद्या.

**भेजा** पु. मेंदू. [फा.]

**भेट–टी** स्त्री. १. गाठ; माणसांचा संयोग; मुलाखत. २. परस्परांची गाठ घेताना दिलेले आलिंगन; मिठी. ३. मोठ्या माणसाला भेटावयास गेले असता दिलेला नजराणा. ४.श्रेष्ठांना किंवा इष्ट मित्रांना दिलेली देणगी, उपायन; बक्षीस. [त.बेट्टि]

**भेटकलमबंदी** स्त्री. स्वतंत्र वाढणाऱ्या दोन झाडांची खोड व फांदी एकत्र बांधून केलेले कलम.

**भेटणे** अक्रि. १. एखाद्याकडे मुद्दाम काही कारणासाठी जाणे; मुलाखत घेणे; गाठ घेणे. २.आलिंगणे; कवटाळणे. ३. सहज कोणी कोणाला दिसणे; गाठ पडणे. ४.मिळणे; पावणे.(व.,खा.) [सं.(अ)भ्येति]

**भेटनोंदपुस्तक** न. उच्चपदस्थ अधिकाऱ्यांच्या कार्यालयात भेटायला येणारांनी सही करायचे पुस्तक.

**भेटबकरा** पु. १. (ल.) कोणी सरकारी अंमलदार, देशमुख आपल्या गावी आला असता त्याला गावकामगार, गावकरी देतात ती देणगी, भेट. २. लग्नात वधूची आई वराच्या आईला लग्नास नेताना किंवा रासनहाणाच्या वेळी देते तो नजराण्याचा मान. (वरील प्रसंगी प्राचीन काळी प्रत्यक्ष बकराच भेट देत.)

**भेटबिनी** एक प्रकारचा सक्तीने घेतलेला कर.

**भेटभलाई** स्त्री. भेटीगाठी; बोलणे. (ना.)

**भेटविणे** सक्रि. १. गाठ घालून देणे; संयोग करून देणे. २. कवटाळविणे. ३. अर्पण करणे : 'बोधोनि पांचाळ नरेश्वर । भेटवी उपायनें अपार ।'– मुआदि ४५.६६.

**भेटा** पु. भारा; गंजी : 'गवताचे भेटे व कवळाचे भारे दिसावयाचे.'– मशा जून १९३५.

**भेड** न. भय; भीती.

वि. भित्रा; भेकड; भ्याड. [सं.भी-भेकंड]
**भेडका,भेडा** वि. भित्रा; भ्याड.
**भेडकी** वि. ठेंगू व किडकिडीत बांध्याचा (मनुष्य).
**भेडकुले** न. शून्य.
**भेडकुळ** न. सुताचा, दोऱ्याचा गुंडाळा. (तंजा.)
**भेडचित** वि. धैर्यहीन.
**भेडणे** अक्रि. आट्यापाट्या, विटीदांडू इ. खेळांत खेळाडूंची वाटणी करताना दोन-दोन खेळाडूंनी त्यातील एका बाजूच्या नायकाकडे - भेडतूकडे जाणे.
**भेडतू-ती, भेडू** पु. १. आट्यापाट्या, विटीदांडू इ. खेळांतील गडी वाटून घेतेवेळचा एका पक्षाचा नायक. पहा : **भिडू.** २. (तिरस्कारार्थी किंवा विनोदाने) सभा, संमेलन इ.चा अध्यक्ष, मुख्य.
**भेडरणे** सक्रि. भीती दाखवणे; घाबरवणे: 'भेडरू नका मला. भिणाऱ्यापैकी मी नाही.'- पाचट.
**भेडशी** स्त्री. अडकित्ता.
**भेडस** स्त्री. जांभळाच्या झाडासारखे इमारतीच्या उपयोगी जंगली झाड.
**भेडस(सु)णे, भेरसुडणे** पहा : **भिडसणे, भिडसुडणे**
**भेडसावणे** न. पिकावर येणाऱ्या पशुपक्ष्यांना घाबरवण्यासाठी शेतात उभे केलेले मनुष्याकृती बाहुले; बुजगावणे.
**भेडसाविणे, भेड(डा)विणे** सक्रि. १.भिवविणे; भीती दाखविणे. २. धमकी देणे.
**भेडा** पु. ज्यातील दाणे परिपक्व झाले आहेत असे कणीस.
**भेडु(डू)का** वि. १. भयभीत. २. भेकड; भितरा.
**भेडुसान** पु. बहिरेपणा. (गो.)
**भेण** न. भय; भीती.
**भेणभेण** क्रिवि. भीतभीत : 'मग तैसाचि भेण भेण । पुढती जोहारूनि चरण ।'- ज्ञा ११.४९०.
**भेणीस** स्त्री. बहीण. (कु.)
**भेण** उक्रि. भिणे; भीती वाटणे.
**भेणेभक्ती, भेणेभाव** स्त्री. पु.भीतीने केलेली परमेश्वराची भक्ती.
**भेत,भेतूक, भेतकूल** न. स्त्री. फळ, लाकूड इ.चा तुकडा; चीर; फाक; फोड; चिरफाळी; ढलपा. पहा : **भेक**
न. १.बांबूचे चपटे पाते. (गो.)पहा : **बीळ.** २.मीठ वगैरे लावून सुकविलेली आंब्याची फोड. (कु.) [सं.]
**भेतणे** उक्रि. (पदार्थाच्या) उभ्या चिरफळ्या, फाकी काढणे. [सं.भिद्]
**भेतलणे** अक्रि. उभे फाटणे; चिरणे; भेगलणे. (राजा.)
**भेतळ-ळा, भेताळ** पु. जळणाकरता फोडलेले लाकूड; सरपण; लाकडाचा जाड, लांब ओंडा. पहा : **भिंतळा**
**भेताळा** पु. मोठी भेग, चीर, फट. (राजा., कु.)
**भेतूक** न. लाकडाचा तुकडा. (माल.)
**भेद** पु. १. फरक; अंतर; दुजाभाव. २. विभागणी; वेगळे करणे; गट्टी फोडणे; विभक्त करणे. ३. विभागलेली, वेगळेपणाची स्थिती. ४. अलग होणे; वेगळेपणा; भिन्नता. ५. वेगळेपणा करणे. ६. वर्ग; जाती; प्रकार; विभाग; तऱ्हा. ७. मतभिन्नतेमुळे आलेले वितुष्ट; बेबनाव; फाटाफूट; विरोध. ८. वैर; स्नेह नाहीसा करणे; शत्रूस जिंकण्याच्या चार प्रकारांपैकी एक. ९. एखाद्या गोष्टीपासून परावृत्त होणे; माघार घेणे; मनात झालेला बदल, पालट. १०. गुप्त बातमी; रहस्य; फितुरी. ११. (तत्त्व.) फरक; वेगळेपणा; भिन्नता. ह्याचे तीन प्रकार स्वगत, सजातीय व विजातीय. १२. (व्या.) कर्ता काही क्रिया स्वत: करतो किंवा दुसऱ्याकडून करवितो किंवा ती क्रिया करण्याचे कर्त्याला सामर्थ्य आहे हे अर्थ दाखवणारी क्रियापदाच्या रूपात केली जाते ती भिन्नता. ह्याचे मूळ रूप, प्रयोजक व शक्य असे तीन प्रकार आहेत. [सं.भिद्]
**भेदक** न. सुपारीचे खांड.(को.)
वि.१. भेद करणारा; पृथक, विभक्त करणारा. २. खुनशी (हसू); मनाचा ठाव घेणारी (नजर).
**भेदड** वि. भित्रा; भ्याड.
**भेदणे** सक्रि. १. (शब्दश: व ल.) विभागणे; विभक्त, वेगळे करणे. २. छेदणे; फोडणे; कोरणे. ३.फरक, दुजाभाव करणे. ४.(औषध, विष इ.) शरीरात भिनणे, मिसळणे. ५. आपल्या पक्षाकडे वळवणे; फितूर करणे. ६.मारणे. ७. टोचणे. [सं.भिद्]
**भेदन** न. भिन्न, वेगळे, पृथक करणे.
**भेदभाव** पु. भिन्नत्वाची बुद्धी; परकेपणाची भावना.
**भेदयुति-ती,भेदयोग** स्त्री.पु.(ज्यो.) योगात सूर्य व खस्थ पदार्थ ह्यांमधील दक्षिणोत्तर विवर त्यांच्या त्रिज्यांच्या बेरजेपेक्षा कमी असले म्हणजे त्या खस्ताचे बिंब सूर्यबिंबाच्या आड येते असा योग.- सूर्य २४.
**भेदर-रे-री** न.स्त्री. बिरवांगे; टोमाटो. (व.)
**भेदरणे** अक्रि.(एकाच स्थितीत राहिल्यामुळे) शरीराला बधिरता येणे.
**भेद(दा)रणे** अक्रि. भिणे; घाबरणे; भीतीने गांगरून जाणे; भयभीत होणे.
**भेद(दा)रा** पु. १. भय; भीती; काळजी. २. दहशत; वचक; दरारा. ३. धडकी; धास्ती.
**भेदवाद** पु. परमात्मा आणि विश्व भिन्न आहेत असे मत; द्वैतवाद.
**भेदाभेद** पु. भिन्नभाव; भेदभाव; फरक; भिन्नता.
**भेदि(दी)क** वि. हृदयापर्यंत खोल जाऊन पोचणारे (वेदान्तपर, गूढ अर्थाचे गाणे, पोवाडा, लावणी इ.).
**भेदिक स्वरमेलन** वेगवेगळे स्वर जुळवणे.
**भेदी-द्या** पु.१.गुह्य, मर्म, अंतस्थ गोष्टी जाणणारा (राज्य, स्थळ, कामधंदा इ.च्या). २. गुप्त गोष्टी फोडणारा.
**भेद्य** वि. फोडण्यास, विभागण्यास योग्य, शक्य. [सं.]
**भेनका** पु. पाण्यात तरंगणारी पाटी किंवा पोते; तराफा. (झाडी)
**भेबडणे** अक्रि. घाबरणे; भिणे; भीतीने मूर्च्छित पडणे.
**भेबा** पु. बेडूक. (झाडी)
**भेबेंवचे** अक्रि. मेंढराने ओरडणे. (गो.) [ध्व.]
**भेभि(भी)स्त** वि. भित्रा; भ्याड; भेकड.
**भेर** स्त्री. भेग; चीर; फट. (राजा.)
**भेर** स्त्री. बोरीचे झाड व फळ. [हिं.बेर;सं.बदर]
**भेर-री** स्त्री. १.मोठा नगारा; नौबत. २. कर्ण्यासारखे एक वाद्य. ३.(ल.)

ढेर; फुगीर पोट. ४. झाडाचे पुढे आलेले खोड. ५.अतिशय मोठा दगड. [सं.भेरी]

**भेरकट** वि. किंचित बहिरा; बहिरट.

**भेरका** वि. तिरळ्या नजरेचा.(व.)

**भेर(ल)गा** पु. वृषण सुजून ते खाली लोंबण्याचा विकार; अंडवृद्धी; अंतर्गळ.

**भेर(रू)ड** न. १.झाड,फळ इ. पोखरून नासाडी करणारा किडा. २. या किड्यामुळे झाडात निर्माण होणारा रोग. ३. (ल.) ज्यात शरीर झिजत जाते असा रोग. ४.(ल.) सावकार इ. चा पैशांसाठी लागलेला तगादा; (सामा.) कटकट. [सं.विरुज्-वीरुध् + चुट्]

**भेरड** न. डोळ्यातील मळ, चिकटा.

**भेरडणे** अक्रि. भेरड नावाच्या किड्यांनी झाड पोखरले जाणे.

**भेरडा** पहा : **बेहेडा**

**भेरला(ली-ळी)माड, भेलडामाड, भेरळ, भेल्लामाड** पु. सुरमाड.

**भेरंड** स्त्री. न. एक वृक्ष व त्याचे फळ. पहा : **भिरंड**

**भेरंडेल** न. भेरंडाच्या फळांचे तेल.

**भेरा** वि. १. बहिरा; बधिर कानाचा. २.जाणीव नसलेला; संवेदनाशून्य.

**भेरा** पु.१. आडवे-उभे लाकडाचे तुकडे एकत्र जुळवून आणि मध्यभागी भोक पाडून त्यात एक उभा दांडा लावलेले चक्रासारखे, दोरीस पीळ देण्याचे साधन. २.खांबावरचा उथळा. (व.) ३. फक्त तुंबा व आरे लावलेला चाकाचा भाग. [सं.भेरी]

**भेरी** स्त्री. १. नगारा. २.फुगीर पोट. (व.)

**भेरुता, भेरुवात** स्त्री.पु. स्थूलता आणणारा एक वातविकार.

**भेर्की** स्त्री. रानकोंबडी. (झाडी)

**भेल-ली** स्त्री. गुळाची ढेप, थापटी. [क.बेल्ल=गूळ]

**भेल** स्त्री.१. मिसळ; मिश्रण; भेळ. २. भरीला घातलेली वस्तू.

**भेलक-की** स्त्री. १. गवताची जुडी, पेंडी. २. एक शस्त्रविशेष.

**भेलकंड-डा-डी** न.पु.स्त्री. झोकांडी; झोक.

**भेलकं(कां)डणे** अक्रि. झोकांडी जाणे; अडखळत, हेलकावे खात चालणे; हादरणे.

**भेलण** पहा : **भेल २**

**भेलणविक्री** स्त्री. १.बेवारशी मालाची विक्री. २.(धर्मार्थ दिलेल्या) किरकोळ सामानाची विक्री.

**भेलणे** उक्रि. मिसळणे; एकत्र करणे; मिश्रण करणे.

**भेलवंडी** स्त्री. गोफणीने भिरकवण्याचा लहान दगड; गोफणीची फिरकी.

**भेला** पु. १.कडबा, सरम, गवत इ. चे लांबच लांब वेटोळे, गुंडाळा. ओलावा, लोणा यांपासून धान्याचे रक्षण व्हावे म्हणून हा पेवात धान्याभोवती घालतात. २.ढेप; रास; गोळा (गूळ, लोणी इ. चा).

**भेलाऊ** पु. भिलावा; बिब्बा.

**भेलांडा** पु. लहान मुलाला द्यायच्या बाळगुटीतील समुद्रफळ.(कु.)

**भेली** स्त्री. लुगडे.

**भेलोंड** न. जबरदस्त दुःख, संकट.

**भेव** न. भय; भीती.

**भेवडावणे** अक्रि. भीती दाखवणे.

**भेवाडणे** सक्रि. (व.) पहा : **भेडसावणे**

**भेश-ष-स** स्त्री. तुकडा; फाक; भाग.

**भेश-ष-स** पु.१.पोशाख; पेहराव; वेष. २.पोषाखाची तऱ्हा. ३. सोंग; रूप. [सं.वेष]

**भेषज** न. औषध. [सं.]

**भेषयाळे** वि. ज्याच्या भेशी, भेसी काढता येतील इतके जून झालेले (शहाळे).

**भेष्टावप** सक्रि. भिवविणे. (गो.)

**भेसक** वि. मिश्रित; मिसळलेले : 'रजचि तमभेसक । तेथ शूद्र ते गा ।' - ज्ञा १८.८२९.

**भेसर** वि. भित्रा; भ्याड; भेकड. [सं.भय]

**भेसळ** स्त्री. मिश्रण; मिसळ; भेळ. [सं.अभि, वि + मिश्र, मिश्र]

**भे(भें)सूड-र** वि.१.भित्रा; भ्याड. २. भयंकर; भीतिप्रद; भयाण; अक्राळविक्राळ. [सं.भी]

**भेळ** स्त्री. भेसळ; मिसळ; एक खाद्यपदार्थ. [सं.अभि, वि + मिश्र]

**भेळणे** उक्रि. मिसळणे; भेलणे.

**भेळा** पु. १. पहा : **भेला** १. २. एक जंगली वृक्ष.

**भेळाभेळ** स्त्री. मिसळलेली, मिश्रित स्थिती.

**भें(भे)जू(झू)ड** वि. १. लाजाळू; चारचौघांत बोलण्याचे, वावरण्याचे धैर्य नसलेला. २. भित्रा; भेकड.

**भेंड** पु.न. १. बोरू, जोंधळा इ. चे ताट; यातील भुसभुशीत, मऊ गाभा. २.(ल.) भुरुभुरु जळणारे, हलके लाकूड. ३. साबणीसारखा साखरेचा केलेला खाद्यपदार्थ.

न.१. डोळ्यातील घाण, चिपड. २. मासे धरण्याच्या जाळ्याच्या शेवटास लावलेला, तरंगणारा लाकूड इत्यादींचा तुकडा; बोयरा.

पु.१. कानाच्या पाळीत दागिना घालण्यासाठी पाडलेले भोक मोठे करण्यासाठी त्यात घातलेला बोरू इत्यादींचा तुकडा. २.चिवट व हलके असे गाड्या इत्यादी करण्यास उपयोगी एक लाकूड. (को.); पारसा पिंपळ.(गो.)

**भेंडबाजी** स्त्री. भेंडी, माठ इ.ची ठरावीक भाजी व बाजरीची भाकरी याचा तुळजाभवानीला दाखवतात तो नैवेद्य.

**भेंडवळी** स्त्री. 'लहवाळा' चिरून दिवाळीच्या पहिल्या दिव्याच्या दिवशी 'केंकरानी' ओवाळण्यासाठी केलेली आरती.

**भेंडा** पु.१. (इमारतीच्या उपयोगाची) मातीची कच्ची वीट; मातीचे ढेकूळ. २. घोड्याच्या गुडघ्यावर होणारी गाठ, भेंडी. ३. मुद्दल तुंबून फुगलेली रक्कम (व्याज, कर्ज इ.ची); ढीग. (वा.) ० **पलसा करणे** - देवघेव, तडजोड, कमी-अधिक करणे.

**भेंडा** पु.१. एक वनस्पतिविशेष; त्याचे फळ. २. लाकूड पोखरून खाणारा एक किडा.

**भेंडा** पु. कंबर. (गो.)

**भेंडावणे** अक्रि. भेंडा नावाच्या किड्याने लाकूड, झाड इ. खाणे.

**भेंडावप** अक्रि. संभोग करणे. (गो.)

**भेंडाळणे** अक्रि. १.लठ्ठ, फोपसे होणे. २.अशक्त, कमजोर होणे (अवयव).

**भेंडी** स्त्री. १.एक फळभाजीचे झाड व त्याचे फळ. २. पहा : **भेंडा** २, ३. ३.रातंबीचे एक झाड; भिरंड. ४.ज्याचे लाकूड तांबूस रंगाचे असते असा एक वृक्षविशेष. (वा.) **भेंडीनं राज येनं** – पोकळ डामडौल मिरवणे; काम नको वाटणे. (अहि.)

**भेंडी,भंडी** स्त्री. दोन मुलांपैकी एकाने कविता म्हटली असता तिच्या शेवटी येणारे अक्षर जिच्या आरंभी अशी कविता दुसऱ्या मुलाने म्हणायची. याप्रमाणे आलटून-पालटून कविता म्हणण्याचा प्रकार. अशाच तऱ्हेने कोणत्यातरी अटी ठेवून कविता म्हणणे. [क. बेंडे]

**भेंडो(डा)ळे–ळा** न. पु. गुंडाळी; सुरळी; वळकटी (कागद, दोरा इ.ची). पहा : **बिंडोळे** [क. बिंडा]

**भेंडोळे** न. जाड थालिपीठ. (है.,मराठवाडा)

**भैकेर** न. उभयचर प्राण्यातील (बेडूक) लारव्हा किंवा अळीची अवस्था.

**भैताड** वि. चक्रम; मूर्ख.

**भैम** वि. भयंकर; भीतिप्रद; भेसूर; दारुण. [सं.]

**भैमी** स्त्री. माघ शुद्ध एकादशी;जया एकादशी.

**भैय्या, भैय्यन** पहा : **पुरभय्या**

**भैय्याद** स्त्री. भाययाद; भाईबंद; नातेवाईक : 'ही सर्व घराण्याची भैय्याद आहे.'– के २८.६.१९३८.

**भैरव** पु. १.शंकराचा एक अवतार. २. शेंदूर लावून बनवलेला पाषाणाचा देव. ३. (सामा.) खंडेराव. ४. (संगीत.) एक राग. गानसमय प्रात:काल. ५. स्त्रियांचे एक कर्णभूषण.
वि. भयंकर; भीतिप्रद; भीषण : 'पापसि काळ आणि भैरव दुष्ट भावा ।'– नगंर १५४ (नवनीत पृ.४३३). (वा.) **भैरवाची सेवा असणे** – बहिरा असणे.

**भैरवगुंडा** पु. मोठा दगड : 'नक्षत्रांचा भैरवगुंडा । केवि पाडिजे गगनीचा हुंडा ।'– भाए ५९४.

**भैरवघाटी** स्त्री. एकीकडे उंच पर्वत व एकीकडे कडा तुटलेला असा पहाडातील रस्ता.

**भैरवचक्र** न. भीषण परिस्थिती.

**भैरवजंत्र** न. मोठी तोफ.

**भैरवजोगी** पु. कानफाट्या गोसावी. हे भैरवभक्त असतात.

**भैरवथाट** पु.(संगीत) एका थाटाचे नाव.

**भैरवपंथी** पु. दंडात पितळी मूर्ती, अंगाला राख व शेंदूर फासणारे बैरागी, भिकारी, भैरवाचे उपासक.

**भैरवफेरा–री** पु.स्त्री. कानफाट्या गोसाव्याची संध्याकाळची भिक्षेची फेरी.

**भैरवाष्टमी** स्त्री. कृष्णपक्षातील अष्टमी.

**भैरवी** स्त्री. १. संगीतातील एक राग, थाट. २. दुर्गादेवी.

**भैरवीचक्र** न.पु. तंत्रशास्त्रापैकी एक चक्र, यंत्र.

**भैरवीयातना** स्त्री. काशीमध्ये जो मरण पावतो त्याच्या पदरी जे पाप असते त्याच्या निरसनार्थ भैरवापासून सोसावी लागते ती यातना.

**भैरी,भैरट** पु. बहिरा माणूस. [सं. बधिर]

**भैरी वे(व्य)था** त्वचेची बधिरता; स्पर्शाची संवेदना नाहीशी होणारा रोग.(कु.)

**भैरो जळप** भलतीच बडबड; फाजील वागणूक.

**भैरोबा** पु. १. भैरव; एक देवता. २. बहिरा मनुष्य; बहिरोबा.

**भैऱ्या** पु. बहिरोबाचा कुणबी जातीचा भक्त. हे ज्योतिबाच्या नावाने भीक मागतात.

**भैसान** वि. फार मोठा; भयंकर.

**भैक्ष–क्ष्य** न.१.भिक्षा मागून मिळवलेले अन्न. २. भिक्षा मागण्याची वृत्ती; भिक्षेगिरी.

**भो** स्त्री. १.पृथ्वी. २.भोवरी.

**भो** पु.पाण्याचा पाट.

**भो** पु. खेळात अंतर ठरविण्यासाठी दोन्ही बाजूंनी निश्चित केलेली खूण; भोज्या. [सं.वह्]

**भोइरा** स्त्री. उसाच्या चुलाण्याची राख जिथे पडते ती जागा.

**भोई** स्त्री. जळणात, शेकोटीसाठी प्रत्येकाने आणायचा सरपणाचा वाटा : 'अवधी लेकरूवे आपुलाली भोइ आणीति.'– गोप्र १०.

**भोई** पु. १. पालखी, मेणा, डोली इ. वाहणाऱ्यांची जात व तीतील व्यक्ती; डोलकर; कोळी; ढिवर. २.(सामा.) पालखी, डोली इ. वाहणारा इसम. ३.(ल.) पाळण्याच्या आधाराच्या चार खुरांपैकी प्रत्येक. ४.मुलांच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द; भोग्या. [हिं.;क.भोयि] (वा.) **०बसविणे** – डांबून ठेवणे; हलू न देणे.

**भोईखाना,भोईमहाल** पु. पालख्या, मेणे इ. जेथे ठेवतात व ते वाहणारे भोई जेथे राहतात ती जागा.

**भोईनधाऱ्या** पु. हलक्या दर्जाचा मनुष्य.

**भोऊर्‍जार्** पु. मासे पकडतानाचे वेढलेले मोठे जाळे. (झाडी) [सं.भ्रमरजाल]

**भोक** न.१.छिद्र; बीळ; वेज; लहान पोकळी. २.(ल.) पोकळपणा; पोखरलेली स्थिती; उणीव; दोष. ३.(ल.) दरबार, संस्था इ. मध्ये प्रवेश, संधान, वशिला. [फा.बुघार; क. बोक्के; सं. बुबके]

**भोक** पु. १.कुत्र्याचे ओरडणे; भुंकणे.(राजा.) २. (लहान मुलाने) एकाएकी मोठ्याने रडणे; किंकाळी, टाहो फोडणे.

**भोकण** पहा : **भोक** २

**भोकणी** पहा : **भोक** १

**भोकणे** अक्रि. (कुत्र्याचे) ओरडणे; भुंकणे. [सं.बुक्क्]

**भोकना** वि. आंधळा. (व.)

**भोकभर** क्रिवि. कुत्र्याचे भुंकणे ऐकू जाईल तेथपर्यंत (अंतर).

**भो(भों)कर–री** स्त्री. एक फळझाड; शेलवट. याला पांढरा डिंक येतो.
न. १. भोकरीचे चिकट, रसाळ फळ. याचे लोणचे करतात. २. स्त्रियांचे एक कर्णभूषण.
वि. ठिसूळ; भुसभुशीत. (झाडी)

**भोकरडोळ्या** वि. बटबटीत मोठ्या डोळ्यांचा.

**भोकरबाळी, भोकरघाट** न. स्त्री. स्त्रियांचे एक कर्णभूषण; भोकर.

**भोकरू** मोठी गोणी. (तंजा.)

**भोकशी** स्त्री. तागाचे निमुळते जाळे. (ठाकरी)
**भोकसणे** पहा : **भोसकणे**
**भोकसा-से** पु.न. १. मेलेल्या जनावराच्या कातड्यातील मांस, हाडे इ. : 'जेणें सत्याचा भोकसा काढिला । मग असत्य तृणकुटा भरिला ।'- ज्ञा ३.२५०. २. गवसणी; खोळ : 'थवथविता मांसा । घातला चामाचा भोकसा ।'- भाए ७५८. ३. छिद्र; बीळ. ४. कोंडा.
**भो(भों)काड-र** न. रडणे, खाणे यासाठी वासलेले तोंड. [क.बोक्क = दंतविरहित तोंड]
**भोकाळणे** अक्रि. भोक, छिद्र पडणे.
**भो(भों)कू** पु. १.भोक; छिद्र. २.कुंपण, भिंत, वई इत्यादीमध्ये पडलेले भोक, खिंडार, वाट.
**भोक्तव्य** वि. भोगास आलेले; भोगायचे (सुख,दुःख इ.). [सं.]
**भोक्ता** वि. १. उपभोग घेणारा; भोगणारा. २. अनुभवणारा. ३. खाणे, पिणे इ. सुखाची आवड असलेला. ४. गुणज्ञ; मार्मिक; दर्दी. [सं.]
**भोक्तृत्व** न. १. प्रारब्धयोगाने भोगले पाहिजे असे जे आपल्या नशिबी ठरलेले असते ते. २.भोग सहन करणे, अनुभवणे. ३.दैव; नशीब.[सं.]
**भोखारणे** सक्रि. गुंडाळणे; झाकणे.
**भोग** पु. १.उपभोग; सुखदुःखाचा अनुभव. २.उपभोगलेले सुख किंवा दुःख; विषय. ३. उपयोग; वापर; ताबा असणे. ४. उपभोगण्याचा, अनुभवण्याचा कोणताही विषय. ५. दैवगतीने भोगावे लागणारे सुख-दुःख. ६.काळ, प्रदेश इ. चे आक्रमण, ओलांडा. उदा. सूर्य प्रायः तीस दिवसांत एका राशीचा भोग करतो. ७. आक्रमण केलेली स्थिती. (यावरून) आकाशातील रेखांश. ८. ताऱ्याचे शरवृत्त आणि उत्तरायणपातांतील शरवृत्त ह्या पातळ्यांमध्ये होणारा कोन. ९. कष्ट; त्रास. १०. सुखदुःखादी अनुभवाचे फळ; प्रारब्ध; दैव; नशीब. ११. नैवेद्य; बळी. १२. मैथुनसुख. १३.शिजत असताना भांड्याच्या वर आलेला भात. १४.नागाची फणा. [सं.] (वा.) ० **चढवणे, लावणे** - देवाला नैवेद्य दाखवणे.
**भोगणे** सक्रि. १. उपभोगणे (सुख-दुःख); सोसणे; सहन करणे. २. उपयोग करणे; वापरणे; ताबा असणे. ३. उपभोगले जाणे; प्राप्त होणे. अक्रि. संपणे; पूर्ण होणे.(ना.) [सं.भुज्]
**भोगपती** पु.(कायदा) एखादी वस्तू ज्याच्या ताब्यात आहे असा मनुष्य; वस्तूचा मालक. [सं.]
**भोगभरणि-णी** स्त्री. भोग भोगणे; दुःख सोसणे.
**भोगभूमी** स्त्री. स्वर्ग; इंद्रलोक.
**भोगभोगवटा** पु. पदार्थांचा उपभोग, ताबा, वापर.
**भोगमूर्ति-र्ती** स्त्री. १. उत्सवात मिरवायची मूर्ती; दिखाऊ शरीर. २. (ल.) काही एक न करता लोकांच्या श्रमाचे फळ उपभोगणारा इसम; मालक; धनी. ३. एखाद्या संस्थेत प्रत्यक्ष काम करणारा मालक.
**भोगयोनी** स्त्री. ज्यात कर्मस्वातंत्र्य नाही अशी योनी. उदा. पशुयोनी.
**भोगरा** पु. भोवरा.
**भोगरामाची मूर्ती** साजरागोजरा; दिखाऊ.
**भोगरी** स्त्री. मुळ्याची शेंग; डिंगरी.
**भोगल** पु. ढोल.
**भोगलाभ** पु. एखाद्याने आपल्याकडे ठेव म्हणून ठेवलेल्या वस्तूपासून झालेला फायदा. [सं.]
**भोगवट** स्त्री. वहिवाट : 'वतन भोगवटीस पडत नाही.'- आंपव्य ७.
**भोगवटा** पु. पदार्थाचा उपभोग; ताबा; वापर; उत्पन्न वापरण्याचे अधिकार.
**भोगवाद** पु. सर्व प्रकारचे भोग उपभोगणे हेच जीवनाचे ध्येय असे मानणारे मत.
**भोगविडा** पु.मकरसंक्रांतिदिवशी स्त्रिया ब्राह्मणांना किंवा सुवासिनींना देतात त्या नऊ विड्यांपैकी प्रत्येक.
**भोगक्षम** न. शरीर : 'आणि तयाचि स्थिति तर्मी । जे वाढोनि निमती भोगक्षर्मी।'- ज्ञा १४.२७४.
वि. भोगण्यास योग्य. [सं.]
**भोगा** पु. नाक.
**भोगायतन,भोगाइत** न. अंतःपूर; विलासगृह. [सं.भोग + आयतन]
**भोगावळ** न. पिशाचांना दाखवायचा वार्षिक नैवेद्य, देणे.
**भोगी** स्त्री. मकरसंक्रांतीच्या आधीचा दिवस; स्त्रियांचा एक सण.
**भोगी** स्त्री. १. वाण; देवीची ओटी. २. देवीचा नैवेद्य : 'सव्वा रुपयची भोगि वाहिली थल्लूबाईला।'-एहोरा १.८५.
**भोगी,भोगी(गि)या** पु. साप: 'भोगी तुम्ही उपजलां जरि नागलोकीं।'- २४१.
वि. १. भोक्ता; हौशी; विलासी; रंगेल. २. सुखदुःखादी अनुभवणारा, सहन करणारा.
**भोगी** स्त्री. १. नारळाचे दूध. २.ओल्या नारळाच्या दुधाचे उटणे.
**भोगोटा** पु. अनुभव.
**भोगोत्र,भोगोत्तर** न. व्यक्तिशः उपभोगण्यासाठी विशेषतः ब्राह्मणाला दिलेले इनाम (जमीन इ.).
**भोगोळ** वि. विशाल; अथांग.(गो.) [क.बखखल]
**भोग्य** न. उपभोग; वहिवाट; वापर; ताबा; कब्जा.
वि.१. भोगण्यास किंवा सोसण्यास योग्य, जरूर, शक्य; अनुभवनीय. २.उपयोगी; उपभोगण्यासारखे; वापरण्यासारखे. ३. ग्रहादिकांनी आक्रमावयाचा राहिलेला (मार्ग). [सं.]
**भोग्या-ज्या** पु.१.आंधळी कोशिंबीर, इरगीमिरगी इ. खेळांमध्ये सर्वांनी येऊन ज्याला शिवायचे असते असा मनुष्य, दगड, खांब इ. लपंडाव, डोळेझाकणी इ. खेळात दुसऱ्याचे डोळे झाकणारा. २.वेश्येचा उपभोग घेणारा. (वा.) ० **शिवणे** - एखाद्याकडून काही प्राप्त होत नाही असे समजले असतानाही त्यास वारंवार भेटणे, प्रयत्न करणे.
**भोग्याभोंवर** पु. निर्लज्जपणे वेश्येच्या नादी लागलेला मनुष्य.
**भोचक** वि. अवास्तव बडबड करणारा; नको ते प्रश्न विचारणारा; बहुचक.
**भोचणे** सक्रि. भोसकणे : 'शेलारमामा धांवत आला ह्याचा भोचुदेरे बोचा।'- ऐपो ५४.
**भोज** न. १. उल्हास; आनंद :'मग तया बोधाचेनि माजें । नाचती संवादसुखाचीं भोजें।'- ज्ञा १०.१२०. २.कर्तबगारी; करामत : 'जेणें जग आपुलेनि भोजें। नाचवीत असें।'- ज्ञा ३.२४९. ३.चित्र; मूर्ती;

सोंग : 'परि पुढें वालभाचें भोज। नाचत असे ।'-ज्ञा ६.१२३. ४. प्रेम; आवड; कौतुक : 'जयाचे वाचेपुडें भोजे । नाम नाचत असे माझें।' - ज्ञा ९.५०६. ५. वृद्धी; वाढ : 'तैसेंचि सत्व रज । लोपोनि तमाचें भोज ।'-ज्ञा १४.२००. ६.निधान; साठा; ठेव :'अथवा दाविलें भोज । आनंदाचें ।'-कथा १.६.१९३. ७.भोजन; जेवण. ८. राज्य :'व्हावें कीं सुखाचें भोज ।'- स्वादि १२.१. ९.भूषण; अलंकार : 'कवण वाईल मंत्रिपणाचें भोज'- भाए १३३.१०. मोठेपणा; महत्त्व; मोल. ११.सौंदर्य; शोभा. [सं.भुज, भुक्]

**भोजन** न. जेवण; खाणे. [सं.]

**भोजनगृह** न. १.जेवण्याची जागा. २.वसतिगृहातील किंवा हॉटेलमधील जेवणासाठी असलेली खोली, जागा.

**भोजनीय** वि. १. खाण्यास योग्य. २. उपभोगण्यास योग्य. ३. पोसण्यास योग्य (मुले, आईवडील).

**भोजन्नता** स्त्री. जेवायची जागा : 'त्या भैरवां उत्तरे भोजन्नता ।'- ऋद्धि ११६.

**भोजा** पु. पावशा पक्षी.

**भोजा** पु.आश्रित; पंक्तीस भोजन करणारा.

**भोजारा** पु. बक्षीस; इनाम.

**भोजिणे** सक्रि. भोजन करविणे; जेवायला घालणे.

**भोजी** पु. भोग देणारा भक्त.
वि. खाणारा.

**भोजे** न. भोजन; खाणेपिणे.

**भोज्य** न. खाण्याजोगी वस्तू; खाद्य; अन्न.
वि. १. खाण्यास योग्य, लायक. २. पहा : **भोजनीय** ३

**भोज्या** पहा : **भोग्या**

**भोट,भोटमामा** वि. बावळट; वेडसर. (कु.)

**भोट** वि. नंगा; गुंड. (व.)

**भोटो** स्त्री. काजूची मोठी बी. (गो.)

**भोड(ढ)भारूड** न. अडचण; संकट; घोटाळा; पेच; पंचाईत.

**भोडवॉ,भोडुवा** पु. १. पोर; छोकरा. (गो.) २.देवदूत : 'तंव भोडुवा बोलिला अंभरी । परमेश्वराचा ।'- क्रिपु ९.७८.

**भोत** पु.१.धान्य साठवण्याचा, गोणपाटाचा मोठा थैला, पिशवी, पोते. २.भाजल्यामुळे त्या जागेवरील निघून जाणारी त्वचा. ३. जनावराचे कातडे काढून त्यात भुसा भरून तयार केलेली आकृती. ४. अंगाची त्वचा काढल्याने बाहेर दिसणारा मांसपिंड; नखशिखान्त अंगाचे कातडे काढणे : 'भोत आणि बोटबोटी । अथवा गळ घालणें कंठीं ।' - दास. ३.७.७३. ५. अनेक चिंध्या गुंडाळून केलेला व तेलात बुडवून पेटवलेला भोप्याचा काकडा; मशाल. ६. दोरी वळेल असा घायाळाच्या पातीचा तंतू.

**भोतोड** न. मासे पकडण्याचे जाळे. (ठाकरी)

**भोद्रा, भोदरा** स्त्री. १.ओल्या जागेत बसल्याने अंगास येणारी बधिरता.(व.) २. डोक्यावर ओझ्याच्या खाली ठेवतात ती वळकटी, चुंबळ.

**भोनोशी** स्त्री. तूप वाढण्याची, तोटी असलेली झारी. (बे.)

**भोप(ब)शँ** न. एक प्रकारची बारीक मासळी. (गो.)

**भोपळदेवता** लहान मुलाप्रमाणे खोड्या करणारी, भटकणारी वयस्क स्त्री.

**भोपळसुती,भोंगळसुती-सूत्री** वि. १. जे चालविण्यात बंदोबस्त, व्यवस्थितपणा, बारकाई, कुशलता इ. नाही असे (राज्य, कारभार, सावकारी इ.). २. अव्यवस्थित; अजागळ; निष्काळजीपणाने केलेला (पोशाख, कामकाज). ३. जाडेभरडे; राकट; ओबडधोबड (सामानसुमान).

**भोप(ब)ळा** पु. १. एक फळभाजी. हिचे काळा, पांढरा व तांबडा असे तीन प्रकार आहेत. उंदराच्या विषावर काळ्या भोपळ्याचा देठ उगाळून लावतात. २. वीणा इ. चा डेरा. यासाठी कडू भोपळा वापरतात. ३.नाट व खांबाच्या वरचे टोक यामधील ठोकळा. ४. कमंडलू; तुंबा.[सं. बहुपली] (वा.) **भ्रमाचा भोपळा फुटणे** - एखाद्या गोष्टीत काही अर्थ असेल असे वाटत असेल तर त्याचे खरे स्वरूप उघडकीस आल्याने त्या कल्पनेचे निरसन होणे. **हाती भोपळा येणे** - दरिद्री होणे; भीक मागू लागणे.

**भोपळी** स्त्री. भोपळ्याचा वेल.

**भोपळी** स्त्री. सकाळचे कोवळे ऊन. (को.)

**भोपळी मिरची** एक प्रकारची जाड मिरची. ही कमी तिखट असते. हिची भाजी करतात.

**भोपळ्याएवढे शून्य** (ल.)अत्यंत अभाव.

**भोपळ्या रोग** अंगात मेदोवृद्धी करणारा एक रोग; फोपसेपणा.

**भोपी-प्या** पु. देवीच्या देवळातील शूद्र पुजारी; देवीचा भक्त; कवड्यांच्या माळा घालून हातात पोत नाचवणारा देवीचा उपासक.

**भोबडा** वि. ज्याचे दात पडले आहेत असा; बोथरा.

**भोबा-भा** पु. १.उंडीण, मोगली एरंड इ.चे कच्चे, हिरवे, साल नसलेले फळ. २.कोवळा, अपक्व भोपळा.

**भोबी** स्त्री. धना; कोथिंबिरीचे बी.

**भोभो** क्रिवि. कुत्र्याच्या भुंकण्याच्या आवाजाप्रमाणे आवाज करून. (वा.)
**० करणे** - एखाद्यावर मोठ्याने ओरडणे; शिव्यांचा वर्षाव करणे.

**भोम** पु. लग्नसमारंभात इष्ट मित्र व आप्त यांना दिलेली मेजवानी.

**भोम** पहा :१ **भूम**

**भोम** पु.चाचड; तांबड्या रंगाचा मुंगळ्यासारखा किडा.

**भोम** स्त्री. डोंगराच्या पठाराखाली असलेली दरी.

**भोमकणे** अक्रि. घाबरणे. (अहि.)

**भोमगति** पु. खंजीराचा एक पवित्रा.

**भोमणे** पहा : **बोंबणे**

**भोमा** पु. एक जंगली झाड.

**भोम्रागडी** स्त्री. १. फुशारकी; बडेजाव. २. अतिशयोक्ती.

**भोय** स्त्री. १.भुई; जमीन. २.घराची ओटी, ओसरी. ३. लुगड्याचे अंग; काठ व पदर वगळता लुगड्याचा अवशिष्ट भाग; तवा. (तंजा.)

**भोय** पु. (नाविक) अस्तमनाच्या पुढील भागावर गलबताच्या काठापेक्षा एक-दोन हात उंच, गोल किंवा चौरस असे लाकूड हे अस्तमनास दुसरी खाच पाडून उभे करतात. हे भोय तीन असतात. एक कलमीजवळ,

दुसरा काठीजवळ व तिसरा पुढील दाट्यामागे. (को.)

**भोय** स्त्री. भोवळ; चक्कर; घेरी.

**भोयरे** न. उसाच्या गुऱ्हाळात चुलवणाखाली राखेसाठी केलेली खाच.

**भोयलण, भोयलंग** न. हळद, मीठ व पाणी जमिनीवर घासून व गरम करून खरचटलेल्या जागेवर लावण्यासाठी केलेले औषध.

**भोयाळ** पु. १. वाटाड्या; वाट दाखवणारा. २. राहणारा; असणारा. (तंजा.)

**भोयो** स्त्री. थट्टा; निंदा. (गो.)

**भोर** पु. एक तांबूस भुरक्या रंगाचा पक्षी.

**भोर** वि. काळ्या रंगाचे आधिक्य दर्शवण्यासाठी वापरायचा शब्द.

**भोरकडी** स्त्री. छतांला वस्तू टांगण्यासाठी सोडलेली लोखंडी गोल पट्टी. (अहि.)

**भोरडी** स्त्री. क्रौंच पक्षी; पीक खाणारा एक पक्षी.

**भोरडी** स्त्री. जिच्याभोवती सोन्याची तार गुंडाळलेली आहे अशी अंगठी.

**भोरपी-पु** पु. बहुरूपी.

**भोरबंडी** स्त्री. काळसर, गाळवट जमीन.

**भोरभेंडी** स्त्री. मुलींचा एक खेळ.

**भोरंबी** स्त्री. इमारती लाकडाचे एक मोठे झाड.

**भोरा** वि. पांढुरक्या तांबूस रंगाचा. [हिं.]

**भोरा** पु. झोका.

**भोराया** पु. गारुडी.

**भोरी,भोवरी** स्त्री. उटी : 'सर्वांगीं भोरि केली ।'-धपू ६९.

**भोरी(रू)प,भोरी** न. १. तमाशा, नाटक इ. खेळ; बाहुल्यांचा नाच, कसरत, सोंगे इ. बहुरूपी लोकांचा खेळ. २. मुलांचे नाचणे-बागडणे.

**भोलानाथ** पु. नंदीबैल.

**भोलांग-ड** वि. निर्जन; ओसाड; भयाण. (व.,ना.)

**भोले-ळे,भोवले** न. भोक.

**भोव** स्त्री. पहा : **भोवंड**

**भोव,भोवटी** स्त्री. नदीस घातलेल्या बांधाला पडलेले भगदाड. (गो.)

**भोवई** पु. गुजराथी लोकांची एक जात किंवा तीतील व्यक्ती.

**भोवजाल** स्त्री. काळजी; फिकीर. (गो.)

**भोवडणे** सक्रि. फिरवणे; ओढणे : 'वडिलांनी तिच्या पाठीवरून हात भोवडला.' - सनई १६६.

**भोवड-डी** स्त्री. रान घेरणे; हाका मारणे; पारध करणे वगैरे.

**भोवणी-नी** स्त्री. फेरी; भ्रमण; चाल.

**भो(भों)वणे** अक्रि. १.वाटोळे फिरणे; गिरगिरणे; भ्रमण करणे. २. घेरी, चक्कर, भोवळ येणे; डोळ्याला अंधेरी येणे. ३. (ल.) उपद्रवकारक होणे; ग्रासणे; छळणे; त्रास होणे; सोसावे लागणे. ४. घिरट्या घालणे; घुटमळणे. [सं.भ्रमयति]

**भोवतड-ण** स्त्री. सभोवतालचा टापू; आजूबाजूचा प्रदेश. (गो.)

**भोवतणी,भोवता-ती-ते, भोवताला** क्रिवि. सभोवार; सर्व बाजूंनी.

**भोवताडा** स्त्री. जवळ व लांब असलेल्या वाटांपैकी लांबची वाट.(को.)

**भोवती** स्त्री. देवाच्या मूर्तीला प्रदक्षिणा घालण्यासाठी गाभाऱ्यास चिकटून असलेली वाट; तेथून घातलेली प्रदक्षिणा.

**भोवनी** स्त्री. १. आरंभ; सुरुवात. पहा : **बोहणी**. २. चिन्ह; शकुन : 'लाभ अथवा हानी । थोड्यामध्यें चि भोवनी ।' - तुगा ३३५३. ३. प्रदक्षिणा.

**भोवर-रा** पु. १. भुंगा; भ्रमर. २.भुंग्याच्या आकाराचा स्त्रियांच्या डोक्यातील एक दागिना. ३.कलावंतिणीचा कुंडलाकृती नाच. स्त्री.नारळीच्या कोवळ्या पानास लागलेली कीड. [सं.भ्रमर]

**भोवर** शअ.सभोवतालचे; आसपासचे; सभोवारचे. [सं.भ्रमण]

**भोवरकडी** स्त्री. १. गुरांच्या दाव्याला असते तशी फिरती कडी. २. घोड्याच्या गळ्यातील पट्ट्याचे कडे. - राजकोश.

**भोवरगाव, भोरगाव** पु.न.आसपासचे एखाद्या गावाच्या जवळचे गाव.

**भोवरजाळ** न. १.भोवरा. २. गुंतागुंत; जाळे.

**भोवरजाळी** स्त्री. भोवऱ्याची दोरी.

**भोवरपाग** न. एक वाटोळे जाळे.(गो.)

**भोवरपाशी,भोरपाशी** क्रिवि. जवळपास; सभोवतालच्या प्रदेशात.

**भोवरा,भोरा** पु. १. लहान मुलाचे, दोरी गुंडाळून गरगर फिरवण्याचे लाकडाचे एक खेळणे. २. मंडलाकार फिरणारे पाणी; आवर्त. ३.शरीरावरील केसांची मंडलाकार रचना. ४. भोवरीचे फळ. ५. मातीत खळी करून त्यात राहणारा एक क्षुद्र कीटक. ६.शेंडीच्या भोवती शोभेसाठी राखतात ते केशवलय; घेरा; संजाप. ७. गाय, म्हैस इ. च्या अंगाला स्पर्श झाला असता त्वचेवर उत्पन्न होते ते वर्तुळाकार स्फुरण. ८.(क्व.) गिरकी; चक्कर; फेरा; वळसा. ९.एक वनस्पती; तेड; पांढरे निशोत्तर. १०. चक्र; चक्राकार फिरणारी कोणतीही वस्तू. [सं.भ्रमरक] (वा.) **भोवऱ्यात सापडणे** - लवकर नाहीशा न होणाऱ्या संकटात, अडचणीत गुंतणे. **पायाला भोवरा असणे** - सारखे फिरत राहणे.

**भो(भों)वराजाळ** न. मासे पकडण्याचे जाळे.

**भोवराभाजी** स्त्री. एक पालेभाजी.

**भोवरी** स्त्री. १. एक प्रकारचा वेल. २. रानसालंमिश्री. ३.पायात काटा मोडल्यामुळे तेथे उत्पन्न होणारी वाटोळी गाठ; चकंदल. ४. कणेकडाचे टोक रुखाच्या ज्या पोकळ भागावर टेकते तो भाग. ५.मंडलाकार भ्रमण; गिरकी; प्रदक्षिणा; वळसा; फेरा (नाचणारा, भोवरा इ.चा). ६. घोड्यातील व्यंग (केसांचे वलय किंवा चकंदळ). ७. मोहरीचे बी. ८.झालर : 'तो विणला पाट सुतानें । मोत्यांची भोवरी ।' - वसा १५. ९. एक प्रकारचा दागिना; बुगडी. १०. एक लहान पाखरू. (ना.) ११. बैलगाडीचे चाक. १२. (को.) पहा : **भोवार**.१३. टकळी; चाती. (गो.)

**भोवरुल्ला** पु. फुगडीचा एक प्रकार. (कु.)

**भोवरे** न. उसाच्या गुऱ्हाळात चुलवणाखाली राखेसाठी केलेली खाच.

**भोवलणे** सक्रि. भुलवणे : 'कुचमर्दी गोपिका धारी भोवलुनि गोवळ्या पोरी ।'- राला ३८.

**भोवले** न. पहा : **बहुले**

**भोवस** पु. डुकराचा जमाव, झुंड, थवा.

**भोवळ,भोवंड-डी,भोळ** स्त्री. पित्तादी विकृतीमुळे येणारी घेरी; चक्कर. [सं.भ्रमण; क .बवळि] (वा.)० **जिरणे** - गर्व,नक्षा उतरणे.

**भोवंडणे** अक्रि. गरगर फिरणे; चक्कर येणे.

**भोवाडा** पु. १. चक्कर; फेरा; वळसा. २.एखाद्याचा सार्वजनिकरीत्या झालेला अपमान; फजितवाडा; धिंड; (विशेषत:) भोवाडापोवाडा. ३.पदार्थ फार चिवडला गेल्यामुळे त्याची होणारी नासाडी.४. होळीच्या प्रसंगी देवीच्या सोंगाची काढलेली मिरवणूक.

**भोवार** स्त्री. पाणरहाट, तेल्याचा घाणा यांच्याभोवती बैल फिरवण्यासाठी असलेली वर्तुळाकार वाट, मार्ग.

**भोवारा** पु. फुंकून वाजवण्याचे वाद्य.

**भोविन्नणे** अक्रि. फिरणे : 'जैसी ते शुकाचेचि आंगभारें । नळिका भोविन्नली एरी मोहरें ।'- ज्ञा ६.७६.

**भोशा** स्त्री. (नाविक)नांगर बांधलेली दुसरी लहान दोरी. (हेट.)

**भोस** पु. बोरूसारखे एक तृण.

**भोस** वि. पुष्कळ.

**भोसकट-टे, भोसकू** न.पु. १. (भिंतीतील) खिंड; खिंडार; भगदाड. (को.) २. (कापडा वगैरेला पडलेले) मोठे, ओबडधोबड भोक.

**भोसकणे,भोसकावणे** सक्रि. १. एखाद्या पदार्थात अणकुचीदार पदार्थ शिरकाविणे. २. तरवार, सुरी, सुई इ. दुसऱ्या पदार्थात जोराने खुपसणे. ३. झाडाची फांदी, शरीरावयव इ. त्याच्या मुळाचाही काही भाग निघेपर्यंत जोराने उपटणे, हिसकणे. ४. बिघडवणे; खराब करणे.

**भोस(सा)डणे** सक्रि. खरडपट्टी काढणे; शिव्या देणे. [सं.भर्त्सना]

**भोसडपट्टी** स्त्री. खरडपट्टी.

**भोसडी** स्त्री. (अश्लील) स्त्रियांचे जननेंद्रिय; योनी. [सं.भसद्]

**भोसडी** स्त्री. भोशा ऊस. निपाणी उसाची एक जात.

**भोसडीचा** वि. अपशब्द; शिवी.

**भोसणे** (विरू.) पहा : **भोसकणे**

**भोळव(स)ट, भोळसर,भोळा, भोळाभाळा, भोळाभाबडा** वि. १.साधा; सरळ मनाचा; निष्कपट अंत:करणाचा; दुसऱ्यावर विश्वास ठेवणारा. २. मूर्ख; वेडसर; अजागळ. [हिं.भोला]

**भोळा नंदी** मूर्ख, वेडगळ, बावळट मनुष्य.

**भोळाभासा** पु. १.चूक; चूकभूल; हयगय; दुर्लक्ष. २. नजरचुकीमुळे होणारा फायदा.

वि. विसराळू; निष्काळजी; दुर्लक्ष करणारा.

**भोळाविणे,भोळसावणे** सक्रि. फसविणे; ठकविणे.

**भोळे** न. १. पहा : **भोळाभासा** २. भ्रांती; भुरळ.

**भोळे भाग्य** मूर्ख, अजागळ मनुष्यास श्रीमंत करणारे नशीब.

**भो(भौ)क्ष्यमाण** वि. भोगायचे, सोसायचे (सुख, दु:ख इ.). [सं.]

**भोंग** न. भोक; छिद्र. (व.)

वि. मूर्ख; अक्कलहीन. (व.)

**भोंग-गा** पु.पंखाचा एक किडा; भुंगा. [ध्व.]

**भोंगळ** स्त्री. तुतारी; पिपाणी; कर्णा.

**भोंगळ-ळा,भोंगळट, भोंगळवार** वि. १. सैल; ढिले; न आवळलेले (गाठोडे, गट्ठा, पोशाख इ.). २. सैल कपडे घालणारा; अजागळ (मनुष्य). ३. अर्धवट; मूर्ख (मनुष्य). ४. अव्यवस्थित; ढिलाईचा (धंदा, काम). ५. पोकळ; कमजोर; भरीव नसलेला (वासा, खांब, दाणा इ.). ६. हलकी; पोकळ (कवडी). ७. ज्याचे भोक मोठे झाले आहे असा (मोती). ८. नागवा; वस्त्रहीन; उघडा. (व.)

**भोंगळकवडी** स्त्री. (ल.) अजागळ, वेडसर मनुष्य.

**भोंगळजमा- खर्च- रकम** पु. स्त्री. केवळ दाखवण्यापुरता, सरासरी, अव्यवस्थितपणे ठेवलेला जमाखर्च किंवा दर्शनी, निश्चित नसलेली रक्कम.

**भोंगळणे** सक्रि. ढिला, सैल, अव्यवस्थित होणे (गाठोडे, पोशाख इ.).

**भोंगळतारीख** स्त्री. कोणत्याही तारखेचा न जमलेला जमाखर्च.

**भोंगळी** स्त्री. १. नळीतील पोकळी. यावरून नळी; नळकांडे; सुरळी; वळी. २. पाणी वाहाण्यासाठी माड इ. झाडाचा पोखरलेला नळ. (को.) ३. पोकळी. ४. कौलारू घरावरील कौले पडू नयेत म्हणून वळचणीस ठोकलेली पट्टी. पहा : **गजभोंगळी**. ५. ढुंगण; कुल्ले. ६. उघडी, कपडे नसलेली व्यक्ती.

**भोंगळे** न. आंबवण.

**भोंगा** पु. कारखान्याची शिट्टी. [ध्व.]

**भोंगाड्या,भोंग्या** पु. बागुलबुवा; बाऊ. (व.)

**भोंगाळे** न. एका जातीचे जाडे भात.

**भोंगी** स्त्री. लहान ठेंगणे घर.

**भोंगीज** स्त्री. पानांची झोपडी: 'भिलभाऊनी भोंगीज घावली' – एहोरा ५.३०.

**भोंगीय** पु. वहिवाटदार.

**भोंगुळ** पु. भुंगा; भ्रमर. (व.)

**भोंड,भोंडणे, भो(भों)णे** (प्र.) भोवंड; भोवंडणे.

**भोंड** न. जोंधळा, बाजरी इ. च्या दाण्याचे टरफल; गोंड; जोंधळा.

**भोंडगा, भोंड्या** पु. (तिरस्कारार्थी) भंडारी. (को.)

**भोंडणी** स्त्री. भाद्रपद पौर्णिमा;प्रोष्ठपदी पौर्णिमा.

**भोंडला** पु. आश्विन महिन्यात मुली भिंतीवर, पाटावर देवांची, विशेषत: हत्तीची चित्रे काढून त्याच्यापुढे किंवा पाटाभोवती गोल फेर धरून समहाने गाणी म्हणतात तो कार्यक्रम; हादगा.

**भोंडा-डी-डे** वि. १.(अशिष्ट) म्हातारा; वृद्ध; जीर्ण. २. ओका; भुंडा इ. छप्परबंदाच्या टोळीतील खोटे नाणे चालवणारा (मनुष्य). ३.मोठे, पुढे आलेले (कपाळ).

**भोंडार** न. (तिरस्कारार्थी) म्हातारा; म्हातारडा. (को.)

**भोंदगिऱ्हा** पु. १. भूत; पिशाच; समंध. २.(ल.) एखाद्याच्या मागे लागलेले लचांड, त्रास, दु:ख, दुर्दैव. ३. अनिवार्य, कंटाळवाण्या कामाचा भर; कर्ज , संकट इ. चे वाटणारे ओझे; उपद्रवकारक तगादा. ३. भुलावण.

**भोंदणे,भोंदाडणे** सक्रि. भूलथापांनी, कपटाने गोड बोलून वश करणे, भुलवणे; फसवणे; फूस लावणे.

**भोंदू-द्या** वि. भोंदणारा; फसवणारा; दांभिक; ढोंगी.

**भोंब** स्त्री. १. तिवडा.२. तिवड्याजवळचे मळणीतील पहिले जनावर.

**भोंब, भोंबटी** स्त्री. नदीच्या बांधाला पडलेले भोक.

**भोंबा** पु. लहान मुलांना भीती दाखवण्यासाठी कल्पिलेले एक भूत; बागुलबोवा.

**भोंबाड-ळ,भोम, भोमाड, भोबाटा** न. पु.मुंगी, साप इ. चे वारूळ.

**भोंबारा-री** पु.स्त्री. १. एक पितळी वाद्य. २. बोभाटा.
**भोंबाळ** पु. रक्ताचा लोट. (तंजा.)
**भोंबी पुनव** आश्विन पौर्णिमा; कोजागिरी पौर्णिमा. या दिवशी काही शेतकरी गावातून आपल्या शेतावर राहायला जातात.
**भोंबी(बू)ल** पु. भुंगा; भोवरा.
**भोंबो** न. तळ्याला पाणी जाण्यासाठी असलेले मोठे दार. (गो.)
**भॉ, भॉबॉ** पु. (बालभाषा) खाऊ. (गो.)
**भॉकाव** न. चोळणा; पायजमा. (गो.)
**भॉगदा** पु. वाक नसलेला कोयता. (गो.)
**भॉटॉ** पु. धुळीवर काजूच्या बियांच्या रांगा रचून त्या तिरावून खेळतात. त्या रांगा अचूक तिरावण्यासाठी वापरतात ती जड व मोठी बी.
**भॉवस्ताळॉ** पु. १. बाऊ. २. विकल्प. (गो.)
**भॉवॉं** पु. तळ्याचे पाणी लवकर कमी होण्यासाठी बांधाला पाडतात ते भोक.(गो.)
**भॉंवडांवचे** अक्रि.फिरवणे; भोवंडणे. (गो.)
**भॉंवताडॉ** पु. फेरा; प्रदक्षिणा. (गो.)
**भॉंवरपागल** न. एक प्रकारचे वाटोळे जाळे. (गो.)
**भौ,भौव** वि. १. पुष्कळ; ज़ास्त; बहु. (गो.) २. (ल.) (स्त्रियांच्या भाषेत) कमी; जवळ जवळ नाही असे.
**भौगा** पु. रानमांजर.
**भौतिक** न. पंचमहाभूतांचे बनलेले शरीर.
वि. १.भुतासंबंधी; पिशाचासंबंधी. २. पंचमहाभूतांसंबंधी. ३. विश्वासंबंधी. [सं.]
**भौतिकोपचार** पु. निसर्गोपचार.
**भौतिकवाद** पु. पंचमहाभूतांखेरीज अन्य कसलीही, अतिमानवी शक्ती (ईश्वर वगैरे) अस्तित्वात नाही असे मत.
**भौपलवज्र** न. पोलादाची एक जात.
**भौम** पु. एक ग्रह; पृथ्वीचा पुत्र; मंगळ.
वि. भूमीसंबंधी; पृथ्वीसंबंधी. [सं.]
**भौमवार, भौमवासर** पु. मंगळवार. [सं.]
**भौमानेस्त** वि. माननीय; वंद्य. (गो.)
**भौमिकी** स्त्री. भूगर्भशास्त्र. [सं.]
**भौरी फिरणे** गवत, कडबा इ. ची गंजी आगीने वेढून जाणे; घरास इ. आग लागणे.
**भौवणी** स्त्री. गलबताचा एक प्रकार.
**भौस** पु. ग्रामसंस्थांतर्गत शेतकरी इ.चा संघ. (गो.) [सं.भू]
**भौसळ** स्त्री. डुकरांची फेरी.
**भौंडी** स्त्री. पारध. (माल.)
**भ्याट-ड** वि. भित्रा; भेकड. [सं.भी]
**भ्याडा** वि. पहा : **ब्याहडा**
**भ्रतार** पु. नवरा; पती. [सं.भर्तृ]
**भ्रम** पु. १.काही कारणाने वस्तूचे, विषयाचे इ. योग्य, जसे आहे तसे ज्ञान न होता भलताच समज होणे. २.पित्ताने वगैरे येणारी चक्कर; भोवळ. ३. भटकणे; हिंडणे; भ्रमण. ४. फेरा; प्रदक्षिणा; गरका. ५. विचारांचा घोटाळा, विसंगतपणा; मनाचा गोंधळ. ६. (ल.) योग्य मार्गापासून च्युत होणे; बहकणी. ७.वहीम; भ्रांती; अनुमान; अंदेशा. ८. संशय; शंका; साशंक वृत्ती.
**भ्रमक** वि. मोह, भुरळ पडलेला.
**भ्रमण** न. १. (शब्दशः व ल.) भटकणे; हिंडणे; फिरणे. २. मंडलाकार, गरगर फिरणे. ३. (ल.)भ्रांती पडणे; बहकणे; कुमार्गास लागणे. ४. अशुभ मुहूर्त, वेळ. [सं.]
**भ्रमणकक्षा** स्त्री. प्रत्येक ग्रहाचा सूर्याभोवती फिरण्याचा ठरावीक मार्ग.
**भ्रमणचक्र** न. १. हे जग सत्य आहे असा मनाचा (खोटा) ग्रह. २. गती असणाऱ्या ग्रहांचे चक्र.
**भ्रमणध्वनी** पु. कोणत्याही ठिकाणापासून जगातील दुसऱ्या ठिकाणी दूरध्वनीने संपर्क साधण्याचे, सोबत बाळगता येण्याजोगे अत्याधुनिक इलेक्ट्रॉनिक साधन.
**भ्रमणशील** वि. स्थलांतर करणारा; प्रवासी.
**भ्रमणे** अक्रि. १. चक्राकार फिरणे; गिरकी मारणे. २. भटकणे; हिंडणे. ३.(मनाने) धाव घेत सुटणे; भटकणे. ४. भलत्याच मार्गाने जाणे; चुकणे. ५. घाबरणे. ६. भुलणे; भुरळणे. ७. पाठ दाखविणे; माघार घेणे. [सं.भ्रम]
**भ्रमनिरास** पु. एखाद्या गोष्टीसंबंधी किंवा व्यक्तीसंबंधी असलेल्या कल्पनेचे, त्याचे खरे स्वरूप लक्षात आल्यामुळे निरसन होणे.
**भ्रमर** पु. १. भुंगा. २. केसांची मंडलाकृती, भोवरा. ३. भोवरा. [सं.]
**भ्रमरकीट** पु. कुंभारीण माशी.
**भ्रमरगुंफा** स्त्री. (योग.) १. गोल्हाटावरील योगशास्त्रोक्त स्थान. पहा: **गोल्हाट.** २. एक यौगिक चक्र.
**भ्रमरस** पु. १. सुरा; दारू; मद्य. २.(ल.) मोह.
**भ्रमर(हस्त)** पु. (नृत्य.) हाताचा अंगठा व मधले बोट त्यांची अग्रे एकमेकांना लावणे, तर्जनी वाकडी करणे, करंगळी आणि अनामिका उभ्या ठेवणे.
**भ्रमरमचक** पु. छपरपलंग. (राम. १४.६१).
**भ्रमंती** स्त्री. पहा : **भ्रमण १** [सं.]
**भ्रमिष्ट-स्त-त** वि. १. कैफ इत्यादींनी भ्रम झालेला. २. वेडसर; खुळा. ३. सदा गोंधळलेला, साशंक; ज्याचे विचार सुरळीत नसतात असा. ४. खोटे; न चालणारे. [सं.]
**भ्रमी** स्त्री. विशिष्ट सैन्यसंख्याव्यूह. एक भ्रमी = दहा हजार हत्ती, एक लाख रथ, एक कोटी घोडे, एक अब्ज पदाती.
**भ्रमी** वि. १. भटकणारा; भटक्या. २.बहकणारा; चुकीच्या मार्गाने जाणारा. ३.सदा गोंधळलेला; शंकित; डळमळीत मनाचा. [सं.]
**भ्रष्ट** वि. १. पडलेला; सुटलेला; पतन पावलेला (सद्गुण, आचार, विचार, दर्जा, सत्ता, महत्त्व, योग्यता, पावित्र्य इ. पासून). २. घोटाळ्यात, बुचकळ्यात पडलेला; गोंधळलेला. [सं.]
**भ्रष्टणे** अक्रि. १. पतित, च्युत होणे; खाली येणे. २. गोंधळणे; बुचकळ्यात पडणे.
**भ्रष्टाका(चा)र** पु.सोवळे-ओवळे; अस्वच्छता, व्यभिचारादी दोष इ. न

पाळल्यामुळे उत्पन्न झालेली अपवित्रता; अमंगलपणा.

**भ्रष्टाचार** पु. १. शास्त्रविहित आचारास सोडून असलेले वर्तन; अनाचार; नियमबाह्य, नीतिबाह्य आचरण. २. पहा : **भ्रष्टाकार**

**भ्रष्टाभ्रष्ट** स्त्री. सर्वसाधारण भ्रष्टाकार; अपवित्रता.

**भ्रंश** पु. १.पतन; पडणे; गळणे. २. (ल.) अपकर्ष; ऱ्हास; नाश; च्युत होणे (महत्त्व, दर्जा, जात, सत्ता इ. पासून). ३. चळ; वेड; खूळ. ४. दोष; प्रमाद. [सं.]

**भ्रंशणे** सक्रि. १. घोटाळ्यात पाडणे; गोंधळवणे; चुकवणे. २. एखाद्यास त्याच्या स्थानावरून च्युत करणे.

अक्रि. १. गोंधळणे; बुचकळ्यात पडणे. २. स्थानावरून च्युत होणे; भ्रष्ट होणे; चुकणे; भ्रम होणे. ३. नष्ट, नाहीसे होणे.

**भ्रामक** पु. लोहचुंबक.

वि. घोटाळ्यात पाडणारा; संशय उत्पन्न करणारा; भुलविणारा.

**भ्रांत-ति-ती** स्त्री. १. चूक; भूल; चुकीचा समज; भ्रम. २. गोंधळ; घोटाळा. ३. संशय; शंका; साशंकवृत्ती. [सं.भ्रांति]

वि.१. चुकलेला; घोटाळ्यात पडलेला; बहकलेला; गोंधळलेला; साशंक झालेला. २. गिरकी, वळसा घेतलेला; परिभ्रमण केलेला.

**भ्रांतिवट** पु. संशयित: 'तिचें सर्व वर्तन एखाद्या भ्रांतिवटाप्रमाणे झालें.'- भदि २४९.

**भ्रांतिष्ट, भ्रांत्या** वि. १. पहा : **भ्रमी**

**भ्रीडी** पु. वासुदेव; देवाची गाणी गाऊन भिक्षा मागणारा सेवेकरी : 'पाडीवयाचा दीवर्सी भ्रीडीचा अवस्वरू आइकीला:'- गोप्र ५१.

**भ्रू, भ्रूपल्लव, भ्रूलता** पु. भुवई.

**भ्रूकुटी** स्त्री. १. भुवईचे आकुंचन. २. (सामा.) भुवई. ३. (नृत्य.) भुवईचा एखादा भाग न उचलता सबंध भुवई एकदम उचलणे. [सं.] (वा.) ० **चढवणे** – उग्र मुद्रा धारण करणे; रागावणे.

**भ्रुकुटीभंग, भ्रूभंग** पु. रागाने भिवया चढवणे; कपाळास आठ्या घालणे.

**भ्रूण** पु. गर्भ; गर्भावस्थेतील बालक. [सं.]

**भ्रूणविज्ञान, भ्रूणशास्त्र** न. गर्भावस्थेतील जीवाचा अभ्यास करणारे शास्त्र.

**भ्रूणहत्या** स्त्री. गर्भातील जिवाची हिंसा; गर्भपात. [सं.]

**भ्रेष** कात्री.





**म** मराठी वर्णमालेतील चाळिसावा वर्ण व पंचविसावे व्यंजन.

**'मइ–ई, मउ–ऊ'ने प्रारंभ होणारे शब्द येथे न आढळल्यास 'मै' किंवा 'मौ'मध्ये पहा.**

**मऊ** वि.१.कोमल; मृदू; शिथिल; नाजूक. २.गुळगुळीत. ३. नरम; मुलायम; तलम; रेशमासारखा; सुळसुळीत; झुळझुळीत; मखमली. ४. लिबलिबीत; गिचगिचीत; गिळगिळीत; निसरडा. ५. लुसलुशीत; लोण्यासारखा; बोटचेपा. ६. (ल.) सौम्य; शांत; नम्र; सौजन्यशील; रागीट नसलेला; मवाळ (माणूस, भाषण).[सं. मृदु] (वा.)० **लागले म्हणून कोपराने खणणे–** चांगुलपणाचा फार फायदा घेणे.

**मऊ** पु. वाणी या जातीच्या ज्वारीचा हुरडा. (व.)

**मऊ पायांचा** वि. (स्त्रियांचे पाय मऊ असतात त्यावरून ल.) नपुंसक.

**मऊसर** वि. किंचित मऊ; साधारण मऊ.

**मऊसूत** वि.१.रेशमासारखा किंवा सुतासारखा, अतिशय मऊ.२. (ल.) अतिशय गरीब; दीन; नरम; शरणागत.

**मकई** स्त्री. मका. (ना., बडोदे) [हिं.; गु.]

**मकडी** स्त्री. माकडीण. (फक्त 'लकडीवाचून मकडी वळत नाही, वठणीस येत नाही' या म्हणीतच उपयोग). [सं. मर्कटी]

**मकणी** स्त्री. मोट.

**मकतल–ळ** न. मकतल या गावी तयार होणाऱ्या जाड्याभरड्या व विटणाऱ्या कापडाचा अंगरखा, बंडी इ.
वि. जाडेभरडे आणि विटके (कापड).

**मकतुब** न. पत्र.
पु. पत्र लिहिणारा.

**मक(ख)तूल** पु. रेशमाची लड; पीळ घातलेले किंवा वळीव रेशीम.

**मकदूर** पु. १. मगदूर; हिंमत; ताकत. २. शत्रू. – ऐको.

**म(मु)कबरा** पु. कबर; आत कबर असलेली इमारत; दफनभूमी.

**मकमकी** वि. मंद; मिणमिणा.

**मकर** पु. १.मगर; सुसर. २.(ज्यो.) बारा राशींपैकी दहावी रास.३. (नृत्य.) दोन्ही हातांची बोटे सरळ पसरून अंगठा ऊर्ध्व करणे व उजवा हात डाव्या हाताच्या पाठीवर ठेवणे व हात अधोमुख करणे. ४. मासा. [सं.]

**मकर** न.देवळातील यज्ञशाळेचा किंवा भोजनगृहाचा भाग:'सर्वमान्य मकर केले'– वेळापूर शिला III १.६. [सं.]

**मकर** न. १.कुटिलपणा; ढोंग; फसवणूक. २. कपट; फितुरी; दगा. ३. लबाडी; क्लृप्ती. [अर. मक्र]

**मकर–री** वि. १.कपटी; दांभिक; कुटिल. २. धूर्त; युक्तिबाज.

**मकरकुंडल** न. माशाच्या आकाराचा पुरुषांच्या कानातील अलंकार .

**मकरचेष्टा** स्त्री. बतावणी.(मगर हा भक्ष्यास प्रथम खेळवतो या समजुतीवरून किंवा मर्कटचेष्टा याचा अपभ्रंश.) [सं.]

**मकरतुं(तों)ड** न. मगराच्या तोंडासारखा केलेला रथाचा अग्रभाग; रथाची दांडी.

**मकरध्वज** पु. १. मदन; कामदेव. (याच्या ध्वजावर मकराचे चिन्ह असते.)२. एक शक्तिवर्धक रसायन. [सं.]

**मकरफरेब** पु. लुच्चेगिरी; फितुरी; कुटिलपणा.

**मकररेषा–वृत्त** स्त्री.न. विषुववृत्तापासून दक्षिणेस २३ ।। अंशावर असणारे वृत्त. याच्या पलीकडे दक्षिणेस सूर्याची गती नाही.

**मकरसंक्रमण, मकरसंक्रांत–ति** न.स्त्री.१. सूर्याचे धनू राशीतून मकर राशीत जाणे. २. हिंदूंचा एक सण; उत्तरायणाचा आरंभ. हा बहुधा १४ जानेवारीस येतो.

**मकरंद** पु.१. फुलातील मध. २. सुवास. ३. भिजवलेल्या रव्याच्या गोळ्या तुपात तळून नंतर साखरेच्या पाकात बुडवून केलेले पक्वान्न. [सं.]

**मकराई** स्त्री. लबाडी.

**मकरी** स्त्री. मासोळी :'हे पाणियावरि मकरी रेखिली जैसी'– अमृ ७८७. [सं.]

**मकरी–ऱ्या** वि. कुटिल; फंदी; लबाड; कपटी; ढोंगी; कामचुकार.

**मकर्** स्त्री. जंगलातील श्वापदांचे शौचस्थान. (झाडी)

**मकलक** स्त्री. गोता; हिसका.

**मकसुदी** पु. जबाबदार माणूस.

**मकळी** स्त्री. १.ज्वारी, बाजरी या पिकांवरील एक रोग. २. तिळाच्या झाडावरील किडा. हा ढेकूण खातो.

**मका** पु. एक पौष्टिक तृणधान्य. हे थंड व वातूळ असून चारा व अन्न म्हणून याचा उपयोग होतो.

**मका(क)ण** न. मक्याचा कडबा; मक्याची कणसे कापल्यावर राहिलेली ताटे.

**मकाण** पु. उतार. (ना.)

**मका(क)णा** पु.१.मक्याचा दाणा व त्याची लाही. ३. कमलबीज व त्याची लाही. ४. मक्यावर होणारा काजळी नावाचा रोग; भेरड.

**मकान–ण** न. १.राहण्याची जागा; घर; ठिकाण. २. मुक्कामाची जागा; वाटेत थांबण्याचे ठिकाण; ठाणे; पल्ला; टप्पा. ३. व्याप; पोच; विस्तार (मन, सामर्थ्य इ.चा); ओघ (भाषणाचा). [अर. मकान्]

**मकार** पु. प्रणवाची किंवा ॐकाराची तिसरी मात्रा.

**मका(क्का)र** पु. ठक; फसव्या.

**मकारपंचक** न. 'म'ने आरंभ होणाऱ्या पाच गोष्टी. मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा, मैथुन. शाक्त लोक या पाच गोष्टींना विशेष मान्यता देतात.

**मकारा** पु.घमघमाट. (तंजा.)

**मकूदाणा** पु. (अश्लील) योनिलिंग.

**मकेलकार** पु. शस्त्रविद्या शिकवणारा शिक्षक.

**मकोडा** वि. १. मुंगळा. २. (ल.) (ग्राम्य) फाकडू; मारू. [हिं.]

**मकोडा** पु. खिळ्याचा एक प्रकार.

**मक्कलशूळ** पु. वातप्रकोपाने रक्ताचा अवरोध झाल्यामुळे बाळंतिणीच्या हृदयात, मस्तकात व बस्तीत होणाऱ्या तीव्र वेदना, शूळ.

**मक्को** पु. मुंजफळ. – मुंव्या ११०.

**मक्ता–ख्ता** पु.१.विशिष्ट अटींवर काम करण्याचा किंवा काही पुरवण्याचा हक्क व जबाबदारी; उक्ते काम. २. ठेका; बोली; कंत्राट; इजारा; हमी.

(क्रि.घेणे) ३. खंड; उत्पन्नाचा ठरावीक अंश; जमिनीच्या मालकी हक्काबद्दल मालकाला द्यायचा मोबदला- धान्य अगर नक्त रक्कम.

**मक्तागुत्ता** पु.१. ठरावीक रकमेपेक्षा जास्त न देण्याच्या कराराने घेतलेले शेत. २. असा कायमधान्याचा करार.

**मक्तेकरी-दार-वाला** पु. १.ठेकेदार; कंत्राटदार. २. मक्ता घेणारा शेतकरी; खंडकरी.

**मक्तेदारी** स्त्री. इजारा; इजाऱ्याची पद्धत.

**मक्याण** न. १. मक्याची उसळ. २. मक्याचा कडबा, ताटे.

**मक्स(क्सू)द, मकसद** पु. अभिप्राय; हेतू; मतलब.

**मख** पु. यज्ञ. [सं.]

**मख** पु. मगज; गीर; गाभा; मोख.

**मखदुमी** स्त्री. ढेप.

**मखम(मा-मु)ल, मख्मल** स्त्री. एक प्रकारचे तलम व अतिशय मऊ कापड.

न. एक फुलझाड; त्या झाडाचे फूल. [फा. मख्मल्]

**मखर** न. १. देवाच्या मूर्ती, सन्माननीय व्यक्ती इ.साठी सभोवती कागदाच्या जाळ्या, महिरपी, उंची वस्त्रे इ. लावून प्रसंगविशेषी केली जाणारी सुशोभित जागा.२. न्हाणवलीस बसण्यासाठी केली जाणारी जाळीची ताटी; अशा ताट्या लावून केलेली जागा. ३. पोळ्याच्या दिवशी बैलाच्या कपाळावर बांधायचे लाकडी, कागदी बाशिंग.(वा.) **मखरात बसणे** – नहाण येणे (प्रथम ऋतू प्राप्त झालेल्या स्त्रीला तीन दिवस मखरात बसवण्याची चाल आहे यावरून).

**मखऱ्या** पु. डोक्यावर मखर बांधलेला बैल. (व.)

**मखलाशी-सी, मख्ल(ख्ला)शी** स्त्री. १.हिशेब, कागदपत्र इ. मंजूर करणे; तो बरोबर आहे असा, मान्यतेचा, पसंतीचा शेरा; मान्यता; मंजुरी. २. सनद, नेमणूक, इनाम, दस्तऐवज इ. मंजूर झाल्याबद्दलचा सरकारचा शिक्का, निशाणी, सही : 'यांचे यादींत मखलासी जाहली असे.'-वाडदुबा८४.३.एकाखाली एक रकमा मांडून केलेली बेरीज; तेरीज. ४. वादाचा निकाल; निर्णय. ५. फार देणे, घेणे असताना सरकार इ.कडून मिळवलेली हप्तेबंदीने फेडीची परवानगी. ६. (ल.) साफसुफी; सारवासारव; वरवरची बोळवण. ७. (ल.) टीका; समर्थन; मल्लिनाथी; भाष्य. [अर. मुखल्लस=शुद्ध, बिनचूक](वा.) ० **करणे** – सुधारणा करणे; नीटनेटके स्वरूप देणे.

**मखाश्री, मखासीर** पु. चंदनाचे झाड :'मखाश्रीयाची खुडुनि पालवी : विजणें केले सपल्लवी'- रुस्व ५५२.

**मख्ख-ख** वि. आपले विचार कोणाला न कळू देणारा; निर्विकार.

**मख्खम** वि. १.मजबूत; बळकट; भक्कम (इमारत, पदार्थ).२. मोठे; पुष्कळ; अवाढव्य; अवजड (ओझे इ.).

**मख्खा** पु. गोट्या खेळण्यासाठी जमिनीत केलेला खळगा; गल. (व.)

**मख्खी** स्त्री. १.बंदुकीच्या नळीच्या टोकाला नेम धरण्यास उपयोगी असणारे चिन्ह.२. माशी. ३. खोच; मर्म; गर्भितार्थ; आशय (भाषण, कविता इत्यादींचा). ४. युक्ती; रीत; खुबी; मर्म (एखाद्या कृतीचे, कोड्याचे). [हिं.; सं. मक्षिका] (वा.)० **उतरणे**- हुबेहूब, बिनचूक अनुकरण, नक्कल करणे.

**मख्खीचूस** वि. अत्यंत कंजूष; कवडीचुंबक. [हिं.]

**मख्दूम** वि. चाकरी केलेला. [अर.]

**मख्दू(ग्दू)म** पु. धनी; मालक : 'सत्यापा मग्दूम सल्गरेकर याची स्त्री.' - ऐलेसं ७.३७२१. [अर.]

**मग** स्त्री. मागणी; बोली; बोलणे.

**मग** क्रिवि. उभ.अ.१. त्यावर; नंतर; पुढे. २. लवकरच; अंमळशाने; थोड्या वेळात. ३. असे आहे त्याअर्थी. ४. पुष्कळदा पादपूरक म्हणून योजतात. ५. याखेरीज.

**मग** पु. पंचपात्रासारखे मूठ असलेले भांडे. [इं.]

**मगज** पु. १. गीर; गाभा; रसाळ पदार्थ. २. शेंगेच्या आतील दाणा; गर इ. पदार्थ. ३. भाकरीतील मऊ भाग. ४. हाडांतील मृदू अंश. ५. बोज; प्रतिष्ठा; महत्त्व :'आपला मगज राखणे। कांही तरी।'-दास ११. १०.२३. ६. मेंदू. ७. सार; तथ्य. ८. बुद्धी. ८. मनातला हेतू; गर्व; ताठा; गुर्मी. [फा. मघ्झ; सं. मज्ज]

**मगजी** स्त्री. १.कड; काठ. २. शोभेची, नक्षीची किनार, काठ; फीत; झालर. [फा. मघ्झी]

**मगज्मारी** स्त्री. व्यर्थ खटाटोप. (झाडी) [हिं.; गुज.]

**मगण** न. महिमा; गहनता :'चांग मगण वाढिनलें । शांतीचें पैं।'- उगी ४३. [सं. महार्घ]

**मगदुमी, मगदुमीसाखर** स्त्री. पिठीसाखरेचा एक प्रकार.

**मगदूर, मग्दूर** पु. १.शक्ती; सामर्थ्य; ताकद; जोर. २. योग्यता; किंमत : 'पूर्वी बंदरावर मालाच्या मगदुराप्रमाणें गलबतावर जकात पडे.'- कोरकि १४. [अर. मक्दूर]

**मगन** वि. १.(प्र.) मग्न. २. संतुष्ट; आनंदित; खूष. [हिं.; सं. मग्न]

**मगन(र)मस्त** वि. १.(ल.)धुंद झालेला; गर्विष्ठ; उन्मत्त; मगरूर (माणूस). २. अतिशय मस्त; बेफाम झालेले,न दमणारे (जनावर). ३. झिंगलेला.

**मगम** वि. १. पोटभर; पुरेसे. (व.) २. संतुष्ट.

**मगमगीत** वि. सुवासाने युक्त; घमघमीत : 'मधुरसें रसाळें। अति निर्मळें मगमगीतें।'- एभा १८.९०.

**मगर** पु.स्त्री. सुसर. उभयचर, आखूड पायांचा, चिंचोळे तोंड व लांब शेपटी असलेला, जाड कातडीचा, दणकट, हिंस्र प्राणी. [सं. मकर]

**मगर** उअ. परंतु; पण. [फा. मगर्]

**मगरगंड** पु. उन्मत्तपणा.

**मगरमिठी** स्त्री. (मगराची मिठी यावरून ल.) १. अतिशय घट्ट, न सुटणारी मिठी, पकड. २. एखाद्या लांबलचक व कंटाळवाण्या भाषणाने एखाद्याला गुंतवणे, हलू न देणे.

**मगरबिबी** स्त्री. मकराच्या आकाराची तोफ.

**मगरी** स्त्री.१. छपराचे आढे. (क्रि. बांधणे) २. वाफ्यातील रोपांची रांग, ओळ. ३. भिंतीची मुंढेरी, वरवंडी. ४. बागेत वाफ्यांना पाणी देण्यासाठी बांधलेला उंच पाट. ५. मिरचीचे रोप लावण्यासाठी केलेला बंधारा, वरवंडी. [हिं. मग्री]

**मगरुरी-बी,मग्रुरी** स्त्री. गर्व; उन्मत्तपणा; घमेंड. [अर.मघ्रूरी]

**मगरूर** वि. गर्विष्ठ; चढेल; उन्मत्त; प्रतिष्ठित. [अर.मघ्रूर]
**मगरेजाळ** न. कोळ्याचे जाळे. (गो.)
**मगस** पहा: **मगज**
**मगाळणे** क्रि. द्रव, पाझर फुटणे. (कु.)
**मगोळ** स्त्री. (सुतारधंदा) एक प्रकारची कानस.
**मग्न** स्त्री. (शाप. रसा.) चांदीसारखा पांढरा व फार तेजस्वी असलेला एक धातू. [इं. मॅग्नेशियम]
**मग्न** वि. १.(एखाद्या द्रवात, विषयचिंतनात, सुखोपभोगात) बुडालेला; गढलेला. २.(ल.) एखाद्या कामात तल्लीन, दंग, चूर, गर्क झालेला.[सं.]
**मघई** स्त्री. बनारसमध्ये होणारी, विड्याच्या पानांची सुवासिक व चवदार एक जात.
वि. मगध देशाचे; मागधी. [सं.मगध]
**मघा** स्त्री. अव.सत्तावीस नक्षत्रांपैकी दहावे नक्षत्र. [सं.]
**मघा,मघाशी–सी** क्रिवि. नुकताच; थोड्या वेळापूर्वी.
**मचकट** वि. काहीसे मचूळ.
**मचकमचक** क्रिवि. मचमच असा आवाज करून (खाणे). [ध्व.]
**मचणे** अक्रि.(क.) १. माजणे; बोकाळणे; अनियंत्रितपणे चालणे (दांडगाई, धिंगामस्ती इ.). २. फुगणे; वाढणे. ३. भांडाभांडीला सुरुवात होणे; एकेरीवर येणे. (ना.) [हिं. मचना]
**मचपत्री** स्त्री. शेवंतीप्रमाणे आकार व वाढ असलेली एक औषधी वनस्पती. हिचा रस जनावराच्या पोटदुखीवर उपयोगी आहे. [सं.]
**मचमच** स्त्री. १.खाताना होणारा तोंडाचा आवाज. २. (ल.) व्यर्थ, निरर्थक बडबड. [ध्व.]
**मचमच–चा** क्रिवि. खाणे, चुंबन घेणे इ. होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज करून.
**मचमचीत** वि. १. पचपचीत; बेचव; पाणचट. २. निःसत्त्व; नीरस. [ध्व.]
**मचवा** पु. एक प्रकारचे लहान गलबत; बलावापेक्षा मोठी होडी. [पोर्तु. मांचुआ]
**मचविणे** उक्रि. (निंदार्थी) (भांडण, लुच्चेगिरी, दंगाधोपा इ.) उपस्थित करणे, चेतवणे, माजवणे, करणे.
**मचाड** वि. गचाळ; शिळपट. (ना.)
**मचाण** वि. शेतात पाखरे हाकण्यासाठी केलेला माळा; माचा; उंच केलेली जागा.
**मचांग** पु. शिकार किंवा गवंडीकाम इत्यादीसाठी घातलेला माचा; माळा.
**मचूळ** वि. १. पूर्णपणे खारट नाही आणि गोड नाही असे (पाणी). २. बेचव; नीरस; पाणचट (पाणी, फळ इ.).
**मच्ची** स्त्री. (आट्यापाट्यांचा खेळ) कोंडी धरली असता पाटीवाल्याच्या समोरची पाटी.
**मच्चीस लागणे** (आटपाट्यांचा खेळ) कोंडीतून पाटीवाल्याच्या समोरच्या पाटीवर मृदंग्याची पाटी ओलांडून जाण्याचा प्रयत्न करणे.
**मच्छ** पु. १. मासा. २. (ल.) पाण्याच्या जोराच्या गतीस अटकाव करण्यासाठी बांधलेली भिंत, पूल इत्यादींचा कुऱ्हाडीच्या टोकाच्या आकाराचा भाग. [सं. मत्स्य]
**मच्छयंत्र** पु.न. खलाशाचे दिशा दाखवणारे यंत्र; होकायंत्र. [सं.]
**मच्छर** न.पु. डास. [हिं.; सं. मशक, मत्सरा]
**मच्छरदाणी–नी** स्त्री. निजल्यावर डास इ.चा उपद्रव होऊ नये म्हणून चहूबाजूंनी व वर लावलेले जाळीचे आच्छादन.
**मच्छलीचक्र** न.(व्या.) माशाप्रमाणे चक्राकार उड्या मारण्याची कसरत. –व्याज्ञा ३.४२६.
**मच्छार** न. मांस.
**मच्छिंद्री, मच्छींदी** पु. जोंधळ्याची एक हलकी जात. याचे टरफल लाल असून, कणीस व दांडा वाकडे असतात.
**मच्छीगोता** पु. (मल्लविद्या) कुस्तीतील एक डाव. जोडीदाराच्या चड्डीस–लंगोटा खोवतात त्या ठिकाणी – धरून जोडीदारास थोडा मागे हिसका देऊन आपण जोडीदाराच्या मागे बसून आपल्या दुसऱ्या हाताने त्याचा पाय घोट्याजवळ धरून त्याला आपल्या पुढे चीत पाडणे.
**मच्छीमार** पु. मासे मारणारा कोळी; धीवर.
**मछघ्न** पु. कोळी; भोई. (तंजा.)
**मछली पकड फिरकी** (मल्लखांब) मल्लखांबाच्या बोंडाजवळ पाय वर करून पुनः फिरवून खाली आणून मारावयाची अढी. – व्याज्ञा ३.१७२.
**मजकुरी** वि. काही मजकूर, माहिती असलेला (कागद, भाषण इ.).
**मजकूर, मज्कूर** पु. १.लेखी माहिती; हकिकत; पत्रातील वर्तमान. २. तोंडी सांगितलेली बातमी; माहिती; बोलणे. (क्रि. करणे) ३. हकिकत; गोष्ट. ४. उल्लेख; निवेदन; आढळ. (क्रि. निघणे, येणे, चालणे.) ५. किंमत; पाड; हिशेब :'इराणीचा मजकूर किती ? मारून धुडकावून देऊ !' – पाब ३२. ६. विचार; मसलत; बेत :'नबाब शास्ताखान याची रवानगी करावी असा मज्कूर करून...'– सभासद २६.७. युक्ती; उपाय; तजवीज :'याचा मजकूर काय करावा?' – भाब ४. ८. (ल.) दिरंगाई; बोलाचाली; केवळ वाटाघाट.[अर. मझ्कूर](वा.) **(एखाद्यावर)० टाकणे** –मदार, विश्वास ठेवणे.
वि. १. पूर्वी सांगितलेला; उपरिनिर्दिष्ट (कागदपत्रांत उपयोग). २. (चुकीने) चालू; सध्याचा; वर्तमान. जसे :– सालमजकूर; माहेमजकूर.
क्रिवि. यथातथा; बेताचा.
**मजगी** स्त्री. डोंगरउतारावर शेती करण्यासाठी मधूनमधून बांध, पायरी घालून तयार केलेली सपाट जमीन : '...तो खडकाच्या मजगीमजगीवरून हळूहळू व मंद आवाज करीत दरीत जाऊन पडतो.'– भाटेप्रवासपत्रे ५२. **० घालणे**– उंचवटा करणे.
**मजबुती, मज्बुती–दी** स्त्री. १. बळकटी; भक्कमपणा; दृढता; पक्केपणा (इमारत इत्यादींचा). २. बंदोबस्त : 'मोदी यास हस्तगत करून इकडे मज्बुतीनें पाठवून द्यावा.'– दिमरा १.३००. ३. (ल.)ठामपणा; निश्चितपणा (भाषण, वचन इत्यादींचा).
**मजबूत–द** वि. १. बळकट; भक्कम; दृढ; टिकाऊ; भरीव. २. (ल.) कायम; निश्चित; खंबीर (भाषण, वचन इ.). [अर. मझ्बूत्]
**मजबूर** वि.१. लाचार; निराश्रित. २. जुलमाला बळी पडलेला. [अर.]

**मजमुल** न.मुजुमदाराचे काम; मजमून.

**मजमुवा** पु. अत्तराचा एक प्रकार. हे गुलाब, केवडा, हिना यांच्या मिश्रणाने बनवतात.

**मजमू, मज्मुई** स्त्री. १.वसुली. २. वसुलीचे काम. [अर. मज्मूअ]

**मजमून, मज्मून** पु. १.पत्रातील मजकूर; वृत्तांत. २. विषय, आशय; सारांश. [अर. मझ्मून]

**मजरा-रे** पु.न. १. शेतीच्या सोयीसाठी शेताजवळ व गावापासून जरा लांब राहिलेल्या शेतकऱ्यांची दहा-पंधरा झोपड्यांची वसाहत; वाडी; गावचा परिसर. २. गवळ्यांची वसाहत. - राजकोश. [अर. माज्री]

**मजरा** पु. मोल; किंमत; गौरव; चीज :'आमचे सेवेचा मजरा होऊन आमचे उर्जित होये, ऐसे सविस्तर वर्तमान आपणास दाखल व्हावे.'- पेद १६.१६.

**मजरा** वि.कमी; वजा; उणे :'तेणेंप्रमाणे मजरा पडेल म्हणोन सनद.'- वाडबाबा २.१५८. [अर. मुज्रा]

**मज(जी)ल** स्त्री. १.एका दिवसात साधारणपणे आक्रमिले जाणारे अंतर; पल्ला; टप्पा. २. एका दमात, एकदम, न थांबता पार केलेला प्रवासाचा, एखाद्या कामाचा टप्पा. ३. कामाचा,प्रवासाचा शेवट, शेवटचा भाग. ४.उतरण्याची व विसाव्याची जागा. [अर.मन्झिल्]

**मजलदरमजल** क्रिविं. मजल करीत करीत(मध्ये न थांबता);कूच दरकूच.

**मज(जा)लस, मजालीस** स्त्री.१. दरबार; राजसभा. २. सदरेची जागा; बैठकीची जागा; दिवाणखाना.३. थोर, विद्वान, सन्माननीय लोकांची सभा. [अर.मज्लिस्]

**मजला** पु.१. इमारतीचा माळा, माडी. २. (वस्त्राचा काठ, लाकूड, दगड इ.वरच्या) नक्षीकामाचा निरनिराळा भाग. ३. नौकाफलक; गलबताचे पृष्ठ. ४. थर; पापुद्रा; पडदा. [अर.मन्झिला] (वा.) **सातव्या मजल्यावर बसणे**-उच्च पदावर स्थित होणे.

**मजली** वि.१.मजला असलेले (घर, जहाज). २. एकावर एक किनारी असलेले (वस्त्र).

**मजा** स्त्री. १.रुची; चव; स्वाद; गोडी; खुमारी. २. गंमत; मौज; करमणूक. [फा.मझा]

**मजाक-ख** स्त्री. थट्टा; मस्करी; चेष्टा; विनोद. [अर.]

**मजाना-नी** वि. चांगला, चांगली; श्रेष्ठ; उत्तम. (अहि.)

**मजाल** स्त्री. सामर्थ्य; ताकद; बिशाद; शक्ती. [अर. मजाल्]

**मजालसी** वि. शोभेचा; दिखाऊ :'मजालसी दारूचा मक्ता.'- के २६.३.१९३७.

पु. राजसभेचा सदस्य. - राको. [अर. मज्लीस]

**म(मं)जीट-ठ, मजीत-द** वि.१. मळकट; जुना; खराब झालेला. २. फिकट; मंद; निस्तेज; विटलेला (रंग, कपडा इ.). ३. (ल.) विसरलेली आहे अशी (विद्या, कला इ.).

पु. (सराफी) जुना, मळकट मोती. [अर. मजीद्]

**मजुरा** पहा : २ **मुजरा,मुज्रा** २

**मजुरा** १. मान्यता. २. दखल.

**मजुराजकात** स्त्री. आयात मालावरील घेतलेल्या जकातीपैकी तोच माल बाहेरदेशी पाठवल्यावर परत मिळणारा भाग.

**मजुरादास्त** स्त्री. शेतीवाडीसंबंधी सरकारला देण्याच्या रकमेतून सरकारला प्रत्यक्ष दिलेल्या धान्य इ. मालाच्या किमतीची वजा केलेली रक्कम.

**मजुरी** स्त्री. १.मजुराला त्याच्या कामाबद्दल दिलेला पैसा; रोजमुरा; वेतन. २. मोबदला घेऊन केलेली अंगमेहनत; मजुराचे काम. [फा. मझ्दूरी]

**मजूर** पु. दिवसाला ठरावीक रक्कम देण्याच्या कराराने कामावर लावलेला गडी; काबाडकष्ट करणारा; कुली. [फा.मझ्दूर]

**मजूरकर-करी-दार-वाला** पु. मजूर; भाडोत्री माणूस.

**मजे(जा)दार** वि.१.रुचकर; स्वादिष्ट; लज्जतदार; चवदार. २. गमतीचा; मौजेचा. ३. सुरेख; उत्कृष्ट; अप्रतिम; श्रेष्ठ. [फा.]

**मजेदारीचा शब्द** लाडीगोडीचे भाषण; गुलगुल (गोष्टी).

**मजणे** सक्रि. घासणे.

**मज्जन** न. १. बुडणे; बुडी मारणे; बुडविणे. २. स्नान : 'जों मज्जनें करिति त्या यमुनेंत नारी ।'- वाकाव्र ३२. [सं.]

**मज्जा** स्त्री.१.शरीरातील सप्तधातूंपैकी एक; हाडांतील मऊ पदार्थ; अस्थिसार. २. चरबी; मेद :'अस्तींचा पुंजा । गुंडाळिला मज्जा।'- उगी ७६१. ३. मेंदू; मगज :'भय चिंता रोगांनीं ग्रासिलें काळीज मज्जांला।'- ऐपो ३९७. ४. झाडातील पोषक रस; गीर; सत्त्व. [सं.]

**मज्जागत** वि. मांसात, हाडांतील धातूत भिनलेला (रोग).

**मज्जातंतु-तू** पु. मेंदू, पृष्ठवंशरज्जू इत्यादीस जोडलेल्या दोरांपैकी प्रत्येक.

**मज्जापेशी** स्त्री. आकाराने अत्यंत सूक्ष्म, आत पेशीद्रव्य असलेली, वर आवरण असलेली आणि जिच्यामध्ये कार्यानुसार बदल होतो अशी मज्जासंस्थेची आधारभूत पेशी.

**मज्जारज्जू** पु. मेंदूपासून निघून पाठीच्या कण्यातून जाणारा मज्जासंस्थेतील महत्त्वाचा भाग; पृष्ठवंशरज्जू.

**मज्जाव** पु. (जाण्यायेण्याला) प्रतिबंध; मनाई; बंदी; आडकाठी. [हिं.]

**मज्जावरणदाह** पु. मेंदू व मज्जातंतूच्या वरील आवरणांना सूज आल्याने होणारा आजार; (इं.) मॅनिन्जायटिस.

**मझाक** पु.गोडी, चव घेणे; चाखणे.

**मटकणे, मटकावणे** सक्रि. १. झडप घालून पकडणे; एकदम धरणे (धावणारा माणूस, चेंडू, वस्तू इ.).२. एकदम खाऊन टाकणे; मटामट खाणे. ३. हुशारीने चटकन पटकाविणे (पैसा, नफा इ.). ४. एकदम घट्ट मिटणे (तोंड, डोळे).

**मटकणे** सक्रि. मुरडणे; नखऱ्याने चालणे.

**मटकन-कर-दिनी-दिशी, मटक्कदिशी** क्रिवि.१.चटकन; पटकन; झटकन; चुटकीसरशी. २. स्तब्धपणे; मुकाट्याने; तोंड न उघडता; गुपचूप. [ध्व.]

**मटकमटक** क्रिवि. अधाशीपणाने खाताना तोंडाच्या, ओठांच्या होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज करून.

**मटका** पु. कंबर. (क्रि. बसणे, जिरणे.)

**मटका** पु. १.पाण्याचा डेरा. २. एक प्रकारचा जुगार; सट्टा.(वा.)० **लागणे** - अचानक लाभ होणे किंवा चांगली घटना घडणे.

**मटकावणे** अक्रि. एकदम खाऊन टाकणे; झडप घालून खाऊन टाकणे.
**मटकी** स्त्री. एक कडधान्य. [सं. मट्टक]
**मटगा** वि. आखूड; तोकडा; लांडा. [क. मट्ट =आखूडपणा]
**मटगोळा** पु. एका दमात खाल्लेला काही खाद्यपदार्थ.
**मटन** न. बकरा इत्यादीचे मांस; सागोती. [इं.]
**मटमट–टां** क्रिवि.भरभर खाणे, मुके घेणे, एकदम उठणे, बसणे किंवा काही वस्तू पकडणे इत्यादींच्या होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज करून.
**मटमटाविणे** पहा : **मटकावणे**
**मटमुट–मटां** क्रिवि. माटमुट; धागधूग; धसधस; धडधड होऊन.
**मटवालकी** स्त्री. गवंडी, सुतार यांचे एक हत्यार; गुण्या; काटकोन. [क. मट्ट=गुण्या]
**मटाट–टां, मटामट–मुटां** क्रिवि. (मटमटचा अतिशय) मटमट असा जोराचा आवाज करून.
**मटाटी** स्त्री. बैलाच्या कपाळावरील साज. (झाडी) [सं.मस्तक]
**मटा(ठा)र** पु. एक प्रकारचे कडधान्य; पांढरा वाटाणा. [हिं.मटर]
**मटाळू** न. एक प्रकारचा वेल; त्याचे फळ. हे उपासाला खातात. (व.)
**मट्** पु. शिकारीच्या वेळी लपण्यासाठी केलेला खड्डा. (झाडी)[सं. मठ]
**मट्की** स्त्री. १. माठ; दारू. २. मडके. (झाडी) [सं. मकुष्टक, मट्टक]
**मट्क्या** वि. १. नखरेल. २. पुढे-पुढे करणारा. (झाडी)
**मट्ट** क्रिवि. स्तब्ध; मुकाट्याने.
वि. १. जागच्या जागी एकदम थांबणारा; बसणारा (बुजलेला घोडा, जनावर इ.). २.नेटाने धरणे देऊन बसणारा (मनुष्य). ३. मंद; आळशी; मठ्ठ. [सं.मठ]
**मट्ट करणे** गट्ट करणे; खाऊन टाकणे.
**मट्टमाया होणे** नाहीसे होणे; गप्प, गार होणे. (क.)
**मट्टा** पु. झाडाची साल; वल्कल. (तंजा.) [त. मेट्टे]
**मट्टा** पु. (चट्टामट्टा या शब्दात विशेष उपयोग) खाणे; चट्टामट्टा करणे; खाऊन संपवणे; फन्ना करणे.
**मट्टी** स्त्री. माती. [सं.मृत्तिका](वा.)० **पलिद करणे** – शरीराची नासाडी करणे; सर्वनाश करणे. (ना.)
**मट्ट्यास येणे** फार चालण्याने, श्रम केल्याने थकणे; मेटाकुटीस येणे.
**मट्ना** क्रि. १. तृप्त होणे. २. चाकू बोथट होणे. ३.विटणे. (झाडी) [सं.मत्त]
**मट्यार** न. खडेमिश्रित धान्य. (अहि.)
**मठ** पु. (संगीत.) कर्नाटक संगीतपद्धतीतील एक ताल.
**मठ** पु. मटकी; एक प्रकारचे कडधान्य.
**मठ** पु. शिकारीकरिता बसण्यासाठी खणलेला खळगा.
**मठ** स्त्री. माथ्यावर घालायची झूल.
**मठ** पु. १. पाठशाळा; धार्मिक शिक्षणसंस्था. २. आश्रम; विहार; गुहा. ३. यती, गोसावी, ब्रह्मचारी इत्यादींचे राहण्याचे स्थान. ४. लहान देऊळ. ५. स्थान; जागा :'ना ते साठवण मठ । ब्रह्मविद्येचे ।'– ऋ २७. [सं.]
**मठळणे** अक्रि. लाटणे; गडप करणे; स्वतःच्या ताब्यात घेणे.
**मठा–ठ्ठा** पु. लोणी न काढता केलेले घट्ट ताक.
**मठाटी–डी** स्त्री. बैलाच्या डोक्यावरील सुताच्या दोरीचा साज.(व.) [सं.मस्त(क)+ताटी](वा.)० **झाडणे**– खरडपट्टी काढणे. (व.)
**मठाधिकार** पु. गोसावी, बैरागी, संन्यासी इत्यादींचा विवक्षित काळापर्यंत मठात राहण्याचा हक्क.
**मठाधीश, मठपति–ती** पु. १. मठाचा प्रमुख. २. मठात राहण्याचा हक्क असलेला गोसावी, यती, बैरागी इ.
**मठापथ्य** न. मठातील पोथीसंग्रह व इतर सामानसुमान : 'तयाचें मठापथ्य: पुस्तकभांडार तयाचे तयासि जालें'– लीचपू ७२. [सं.मठ + पथ्य ]
**मठार** न.(जरतारीचा धंदा)तार चपटी करण्याचे हत्यार.
**मठारणी, मठारणे** स्त्री. न. सोनार, तांबट इत्यादींचा साखळ्या इ. साफ करण्याचा, सफाई देण्याचा, पोचे काढण्याचा हातोडा.
**मठा(ठ)रणे, मठाळणे** सक्रि. (घडकाम)१. नव्या भांड्याला ठोके मारणे; सफाई, झिलई करणे. २. गोंजारणे; चुचकारणे. ३. मन वळविणे, अनुकूल करणे.
अक्रि. (जखम) बरी होत येणे, भरत येणे. [सं. मृष्ट]
**मठारणे** अक्रि.१. सुस्त, मंद होणे. (व.) २. माजणे; गर्विष्ठ, उन्मत्त होणे :'जो गर्वाहंकारे वाढे । दंभे मठारुनी चढे ।' – ज्ञाप्र २३०.
**मठारा** पु.१. ढोंगी साधू : 'सांडा सांडा रे मठारे । एकी गांठी सवें धुरें।'– तुगा ३२५५. २. पोकळ डौल.
**मठाळ** पु. त्रास. (क्रि. देणे)
**मठिका, मठी** स्त्री.१. लहान मठ. २. (विनयाने उल्लेख करताना) लहान घर; झोपडी. ३. चावडी. (व.)
**मठी** पु.वि. प्रमुख : 'श्रीलपुसण मठिया मालीआं प्रभू...'–कोशिला I.६. [सं. महत्]
**मठी** स्त्री. १. वस्तीपासून दूर असणारी एकान्त जागा. २. (उप.) व्यसनी लोकांचा अड्डा; चांडाळचौकडी बसण्याची जागा.
**मठ्ठ** वि.१. मंद; सुस्त; संथ (बैल इ.).२. मंदबुद्धी. [क. मड्ड]
**मठ्ठ, मठ्या, मठ्ठ्या** वि.क्रिवि. पहा : **मट्ट**
**मड** पु. लहान देऊळ : 'लान मडु ऐसी'– पांढर शिला I.१.९.
**मड–डे** न. १. (को.)पहा : **मढे** : 'चितेवरी शोभल मडा।' –दावि १४७. (को.) २. उपद्रवी; त्रासदायक माणूस; पीडा; लचांड. ३. देवादिकांचा अंगात होणारा संचार; अवसर; घुमारा. ४. असा संचार झालेला माणूस. ५.स्मशान : 'मडीची खापरी घेया'– लीचपू २०२. [सं.मृत; क. मडि]
**मड** पु. जलाशय : 'तो तृतीय नेत्राचा मडु । फुटला जैसा' – ज्ञा २.२९९. [क.मडु]
**मडकी–के, मड** स्त्री.न. मातीची घागर; डेरा; माठ. [क.मडके]
**मडकूल** न. गाडगे; लहान मडके.
**मडक्यातली वरू–वरव** (मडक्यातले शिलकी धान्य. यावरून ल.) अल्पस्वल्प संग्रह.
**मडखूळ** स्त्री. मळणीचे गवत वर-खाली करण्याची काठी. (कु.)

**मडगा–गे–घा** पु.न. १. नरडे; गळ्याचा पुढचा भाग. २. अंमल; सत्ता : 'आज तो रानटी व जुनाट मडघा मोडून दयाळु इंग्रजांचा सुधारणेचा...'– खेया२८. ३. स्थान; घर : 'भेदाभेदाचा मडघा मोडिला।'– दास ५.९.३९.

**मडगार्ड** न. गाडीच्या चाकावर असलेला चिखल उडू नये म्हणून चाकाच्या वरच्या बाजूला लावलेला गोलाकार पत्रा. [इं.]

**मडगे** न. एक धान्य. (व.)

**मडचणे** सक्रि. घडी घालणे; दुमडणे. (बे.) [क. मडचु]

**मड(डु)म** स्त्री. १. युरोपियन स्त्री. २. (उप.) सुधारलेली, फॅशनेबल स्त्री. ३. पत्नी; राणीसाहेब. ४. शिक्षिका. [इं.]

**मडमडणे** अक्रि. (ताप, दुखणे इ.ची पूर्वचिन्हे म्हणून) अंग मोडून येणे; कसकसणे.

**मड(ढ)वळ** पु. परीट; धोबी. (कु., बे.)

**मडवी** पु. कोळ्यातील गावदेवीचा पुजारी.–बदलापूर २५४.

**मडा** पु. प्रेत; मढे. (झाडी)
वि. अशक्त; रोड. (झाडी)

**मडाई** स्त्री. १.मढविणे. २. सुधारणे. (झाडी)

**मडी** स्त्री. वाफा; आळे. (बे.) [क.]

**मडौरा** पु. मातीच्या घड्याचे डमरूसारखे वाद्य : 'मडौराचां बंबाळी । योगिनीचक्राचां गोंदळीं।'– शिव ४४६. [सं. मृद्(= माती)+म.डौर (= डमरू )]

**मडौरे** न. प्रेतयात्रेपुढे वाजवण्याचे चर्मवाद्य : 'वादंत्रें तें मडौरें'–गरा २७. [सं.मृत]

**मडौल** वि. डौलदार : 'सीतेचें रूप कडौल : मडौल'– अली ७३. [सं.मंडित]

**मडौली, मडुली** स्त्री. लहान देऊळ : 'गोसावी...मडौलीयसि बीजें करिती' – गोप्रच २५४.

**मड्डा** पु. मिश्रण. (झाडी) [सं. मंड]

**मड्डा** वि. १. अतिशय आंबट (दही इ.). २. ओलसर. (झाडी)

**मड्डी** स्त्री. दारू. (झाडी) [सं. मंड]

**मड्डीमार** पु. दारुड्या. (झाडी)

**मड्डुक** पु. न. मडके : 'दृष्टांत दे शुकहि मड्डुकभाजनाचे ।'– वाह २५९.

**मढ** पु.१.कळी. २.अंकुर : 'तो तृतीय–नयनाचा मढु। फुटला जैसा।'ह्व ज्ञा ११.३०४. ३. आच्छादन. – ज्ञाशभां.

**मढ** पु.१.पहा: **मठ**. २. कोठडी : 'मग आघवींचि सडीं। धानाच्या आंतुल्या मढीं ।' – ज्ञा १८.७४२. [सं. मठ;प्रा.; हिं., पं.मढी]

**मढगा** पु. मठ; आश्रम; घर.

**मढणावळ, मढवाई** स्त्री. मढविण्याची मजुरी, किंमत.

**मढणे, मढविणे** क्रि. सोने, चांदी, वस्त्र, कातडे इत्यादींनी एखाद्या पदार्थाच्या आतल्या किंवा बाहेरच्या बाजूवर थर, आच्छादन देणे; लपेटणे; अस्तर घालणे; मुलामा देणे. [हिं.]

**मढवणी,मढवणूक** स्त्री. मुलामा देण्याची, मढविण्याची क्रिया.

**मढंगण** न. लेप किंवा पुट देणे : 'काश्मिरी न करावी । मढंगणें ' – ज्ञा १३.३१९. [सं. मंडन]

**मढी** स्त्री. १.पहा : **मठी**. २.डोंगर इत्यादींच्या पायथ्याशी पाण्यासाठी खणलेली खळी; झरा; टाके.

**मढीव** वि. मढविलेले; मुलामा दिलेले.

**मदू** वि. मधुर; गोड (फळझाड, फळे): 'कडू खातां मदू आलें मी गर्भीण झालें तर्धी ।'ह्व पला १०२. [सं. मधु]

**मढे** न. प्रेत; मुडदा; शव. [ क.मडि; सं. मृत](वा.)० **जाणे**–सर्वनाश होणे. **मढ्याच्या टा(ता)ळ्याचे, टा(ता)ळूवरचे लोणी खाणे**–नीच, लोभी वृत्ती दर्शविणे; अतिशय क्षुद्र कृत्य करणे. **मढ्यावर पाय देऊन जाणे** – मरणोन्मुख माणसाकडे दुर्लक्ष करणे.

**मढे(डे)कळा** स्त्री.१. मरणसमयी तोंडावर येणारा फिकटपणा, पांडुरता. २. (ल.) केलेल्या गुन्ह्याच्या भीतीमुळे चेहऱ्यावर दिसणारा निस्तेजपणा.

**मढे(डे)पंचक** न. वैशाख महिन्यातील धनिष्ठा नक्षत्रापासून पाच नक्षत्रांचा काल (धनिष्ठापंचक). या अवधीत फार मृत्यू होतात.

**मढेपीक** न. बेसुमार पीक; सुळसुळाट; अतिशयता : 'वरदक्षिणेचें मढेपीक.' – विविध २७.६.१९३७.

**मढे(डे)पेंड** न. मढ्याची जकात.

**मढेरून**. जिवंत मनुष्याची प्रेतयात्रा. पूर्वी मुरुड येथे ज्येष्ठ वद्य चतुर्दशीस काढीत असत.

**मण** पु. पदार्थ मोजण्याचे एक वजनी किंवा मापी परिमाण. हे निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळे असते. मापी मण बारोली किंवा सोळोली (१२, १६ पायल्यांचा) व वजनी ४० शेरांचा साधारणपणे असतो. २. मणाने मापलेले-मोजलेले धान्य, पदार्थ. ३. जमिनीचे सहा बिघ्यांचे एक परिमाण. [सं. माण; अर. मन]

**मणका–की** पु. स्त्री. १. सुमारे एक मणाचे माप किंवा वजन. २. एका मणाच्या मापाचे भांडे, पाटी; एक मण वजनाचा दगड इ.

**मणका** पु. १. मोठा मणी. २. गळ्याच्या पुढील भागावरील उंचवटा; कंठमणी; घाटी. ३. माकडहाड; गुदास्थी. ४. पृष्ठवंशरज्जूंतील दुव्यासारखा भाग प्रत्येकी. ५. गळ्यात बांधायचा मंत्रसिद्ध ताईत; तोडगा. ६. घोड्याच्या गळ्यात बांधण्यात येणारा मोठा मणी. ७. कप्पी; खोबणीचे चाक; (इं.) पुली. ८. छत्रीच्या ज्या भागात काड्या बसवितात तो चक्राकार अवयव. (वा.) ० **ढिला करणे**–१. बेदम मारणे. २.अतिशय कष्ट करणे.

**मणखाण** पु. सुमारे एक मण.

**मण(न)खुरा** पु. सोनाराची मणी इ. करण्याची ऐरण.

**मणगणे** क्रि. चणाडाळ व तांदळाचे पीठ व गूळ एकत्र करून कालवून शिजविणे. (को.)

**मणदोरा** पु.१. गाडीवानाचे ओझे बांधायची दोरी व ज्याच्या भोकातून दोरी ओवून खोचतात तो मणी, ठोकळा समुच्चयाने. २. नदी ओलांडणारी नाव इकडे-तिकडे वाहवत जाऊ नये म्हणून नदीच्या दोन्ही काठांवर पुरलेल्या दोन खांबांना बांधलेली दोरी व तिच्यावरून सरकणारा लाकडी मणी, ठोकळा. ३. पिशवी, बटवा इत्यादींचे तोंड उघडण्याची किंवा बंद करण्याची दोरी; ओढदोरी; धावदोरा. ४. लोंबत सोडलेला पडदा ज्या दोरीवरून सरकविला जातो ती दोरी. ५. स्त्रियांनी

कंबरेला बांधण्याचा दोरा. ६. वस्त्राच्या किंवा ताग्याच्या शेवटी ठासलेले आडवे जाड धागे.

**मणा** पु. खळ्यात चौथ्यांदा कणसे तुडवून निघालेला धान्याचा दाणा; (विरू.) मणी.

**मणि–णा** पु. १. हिरा; माणिक; रत्न; माळेत ओवण्याचा (रत्न इ. मौल्यवान किंवा काचेचा)गोलक, गोळी. २. दगड, लाकूड इत्यादींतून घडून तयार केलेली गोल वस्तू. ३. शिश्नाची बोंडी. ४. स्त्रीच्या जननेंद्रियातील भगोष्ठाचा अतिसंवेदनशील भाग; योनिलिंग; दाणा. ५. (ल.) कोणत्याही एखाद्या गुणाने श्रेष्ठ मनुष्य. ६. भोकात दोरी ओवून एखादी जड वस्तू वर उचलण्यासाठी, खेचण्यासाठी किंवा भारा, ओझे इ. आवळण्यासाठी वापरण्यात येणारी लाकडाची कप्पी; (इं.) पुली. ७. निकणातून पाखडून निघालेले पोचट दाणे; मदन. ८. सापाच्या किंवा हत्तीच्या डोक्यातील एक रत्न. ९. पुरुषाचे रेत. १०. लोखंडाच्या पत्र्याला भोक पाडताना पत्र्याखाली ठेवण्याचा छिद्रयुक्त ठोकळा.११.अंडे; गर्भ.[सं.मणि] (वा.) **सुतासाठी ० फोडणे**- अत्यंत अल्प लाभासाठी फार मोठी हानी करून घेणे.

**मणिक** न. मडके; डेरा : 'पावुनिहि अमरमणि कीं कारासदनांत । शिखिशिखां जसि मणिकीं ।' – मोकृष्ण २.२०. [वै.सं.]

**मणिकर्णिका** स्त्री.१.काशी येथील एक तीर्थ.२.विशिष्ट आकाराची पाणी पिण्याची लोटी, तपेली. ३. योगप्रक्रियेतील एक प्रकार; स्थान. [सं.]

**मणिकंठ** पु. एक पक्षिविशेष; तास; चाष.

**मणिकार** पु. जवाहिरी; जव्हेरी; मण्यार. [सं. ]

**मणिकुळ** न. पाठीच्या कण्यातील मणका : 'मणिकुळें येकवीस'-विद ८. [सं.मणि + कुल]

**मणिखंबा** पु. कातीव उभा खांब : 'पवळेयांचीया मणिखंबेया वऱ्हीया: रत्नांचीया बगाड-पाटीया'- शिव २५३. [सं.मणि + स्कंभ]

**मणिघोळणी** स्त्री. मणी तयार करण्याचे सोनाराचे एक उपकरण.

**मणिज** वि. अंड्यापासून उत्पन्न झालेला (पक्षी इ.); अंडज : 'परि आर्धी तंव स्वेदज । जारज उद्भिज मणिज ।'ह्रज्ञा १५.१४८. [सं. ]

**मणिनीभ** वि. सर्व शरीराचा रंग गौरवर्ण व फक्त टाळूच्या ठिकाणी तांबडा असा (घोडा).-अश्वप १.२२.

**मणिपु(पू)र** न. (योग.) नाभिस्थानाजवळील एक चक्र.

**मणिबंध** पु.१. मनगट. २. एक अक्षरगणवृत्त. चरणात अक्षरे नऊ, गण भ,म,स. ३. मनगटावर केलेला वार. [सं.]

**मणिबंधास्थी** स्त्री. मनगट व कोपर यांना जोडणाऱ्या दोन हाडांपैकी एक.

**मणिभूमिकाकर्म** न. ६४ कलांपैकी एक कला; त्रिकोण, चतुष्कोन इ. आकृतींत जमिनीवर मण्यांची रचना करणे. [सं.]

**मणिमंगळसूत्र** न. १.मुहूर्तमणी व मंगळसूत्र. २. मणी व मंगळसूत्र एकत्र ओवलेला स्त्रियांचा एक अलंकार.

**मणियार,मणेर-री, मण्यार** पु. १. लोखंडी सामानाचा व्यापारी. २. बांगड्या, काकणे तयार करून विकणारी एक जात; तीतील व्यक्ती. ३. लेखनसामग्री विकणारा दुकानदार. ४. जवाहिऱ्या; सराफ.

**मणेर, मण्यार** पु. विषारी सापाची जात.

**मणेरी, मण्यारी** वि. १. मण्यार लोकांसंबंधी. २. (स्टेशनरी) लेखनाच्या सामानासंबंधी.

**मत** न.१. अभिप्राय; मनातील विचार; निश्चय; कल्पना; भावना; बुद्धी. २. विशिष्ट विचारसरणी. ३. पंथ; मार्ग; पक्ष (धर्म, तत्त्वज्ञान यांतील). ४. पाखंड. ५. म्हणणे; सांगणे : 'चालों न देचि मत, करि मन तैशाचेंहि वश्य पाप तिचें ।'- मोमंभा ३.५२. ६. संमती; मान्यता; अनुमती. ७. कल; बुद्धी; विचार; सल्ला. ८. निवडीची नोंदणी, हक्क : 'पुरुषांना मतांचा कैवार तर बायकांना मुलाबाळांचा कैवार.' -नारुकु ३.६४. वि. मान्य; कबूल असलेले. [सं.]

**मतणे** अक्रि. मते, विचार इ.बाबतीत जुळणे; एकमत होणे : 'दोन आसामीची एक जोडी करून मतून येतां कीं नाहीं?'-सुकौ ७९.

**मतदान** न. निवडणुकीत पसंतीची नोंदणी.

**मतदार–दाता** वि. मत देण्याचा अधिकार असलेला.

**मतदारसंघ** पु. संसदेत/राज्य-विधिमंडळात मतदारांचे योग्य प्रमाणात प्रतिनिधित्व व्हावे म्हणून पाडलेला विभाग.

**मतपत्रिका** स्त्री.१.मताचा साक्षीभूत, आधारभूत लेख : 'पुराणें इयेविषीं । मतपत्रिका।'ह्रज्ञा १३.६६. २. मत नोंदवण्याचा कागद. ३. निवडणुकीला उभे असलेल्या उमेदवारांच्या नावनिशाणाची यादी असलेला अधिकृत कागद.

**मतपिसे** न. मुद्दाम पांघरलेले वेड. (को.)

**मतपेटी** स्त्री. मतदाराने मतपत्रिका टाकण्यासाठी ठेवलेली सीलबंद पेटी.

**मतप्रणाली** स्त्री. तत्त्वप्रणाली; मतपरंपरा; विचारधारा.

**मतभेद** पु. एखाद्या मुद्द्यावर दोन व्यक्ती किंवा गट, पंथ यांच्यात एकवाक्यता नसणे.

**मतमतांतर** न. मतभिन्नता; भिन्न भिन्न मते.

**मतमोजणी** न. मतदान झाल्यानंतर विजयी उमेदवार ठरवण्यासाठी केलेली मतांची मोजणी.

**मतलई** वि. (नाविक) जमिनीवरून समुद्राकडे, पूर्व किंवा ईशान्य दिशेकडून वाहणारा (वारा). [अर. मत्लअ = पूर्व दिशा]

**मतलब** पु. १.हेतू; उद्देश; प्रयोजन; इच्छा : 'मुन्शी बोलावून पत्र लिहावयाचा मतलब सांगितला.' – मइसा ५.१७९. २. आशय; सारांश; तात्पर्य (लेख, पत्र इ.चा). ३. मसलत; बेत. ४. स्वार्थ. [अर.]

**मतलबदार, मतलबी** वि. १. स्वार्थी; स्वार्थसाधू. २. कपटी; लुच्चा.

**मतवाद** पु. आग्रह :'एकाचा मतवाद निश्चिती। करितां श्रुतिवाक्य व्युत्पत्ती।'ह्र एभा २६.१८४.

**मतवादी** वि. स्वतःच्या मताविषयी दुराग्रही.

**मतवाला** वि. (लावणी) इष्कबाज; ख्याली; विलासी; रंगेल.[सं. मद]

**मतं(तां)ग, मतंगज** पु. हत्ती. [सं.]

**मति–ती** स्त्री. १. मत; बुद्धी; जाणण्याची शक्ती. २. मन; अंतःकरण. ३. विचार; हेतू. [सं.]

**मतित्रय** पु. अधमती, अधगती आणि अधरती या जीवस्वरूपाच्या तीन वृत्ती : 'मतित्रयाचां पालकीं निजे : परीये देउनि म्हणे मीमाझे ।' – मूप्र २०५२. [सं.]

**मतिप्रकाश** वि. ज्ञानवान; बुद्धिवान : 'विनायका अभयदाता । मतिप्रकाश करीं मज ।' -गुच १.११.

**मतिभ्रम, मतिविभ्रम** पु.चुकीचा समज; बुद्धिभ्रंश; विचारशक्ती नष्ट होणे.

**मतिमंद-हीन** वि. जड बुद्धीचा; मठ्ठ. [सं.]

**मतिमंदता** स्त्री. काही आनुवंशिक दोषांमध्ये गुणसूत्रांत असामान्य बदल होऊन त्यांच्या संख्येत घट किंवा वाढ झाल्यास बौद्धिक वाढ मंदावणे.

**मती, मतीत, मट्टी** स्त्री. (विणकाम) जिभई; कापड विणताना ते आकसू नये म्हणून त्याच्या दोन्ही काठांस ताण देण्यासाठी लावलेली पट्टी. हिच्या दोन्ही टोकांना अणकुचीदार व सुईसारखे बारीक खिळे असून ते कापडात गुंतवितात. कापडाला ताण देण्याचे एक उपकरण.

**मतेरी-ली** स्त्री.(नाविक) नाळेवरील शीड बांधण्याचा दोर. हा मोठ्या डोलकाठीस बांधतात आणि तिसरे शीड उभारल्यावर नाळेस बांधतात.

**मतेलांड** न. लचांड; ब्याद; कटकट. (कु.)

**मतैक्य** न. दोघांचे वा अनेकांचे एखाद्या गोष्टीबद्दल एकच मत असणे.

**मतोळा** पु. गोंधळ; घोटाळा; नुकसान : 'नव्हे मतोळ्याचा वाण नीच नवा नारायण ।' - तुगा ३३०७.

**मत्त** पु. (संगीत) एक ताल यात अठरा मात्रा व नऊ विभाग असतात.

**मत्त** वि.१. झिंगलेला; धुंद झालेला. २. माजलेला; उन्मत्त; गर्विष्ठ. ३. वेडापिसा. [सं.]

**मत्तमयूरी** स्त्री. एक समवृत्त. चार चरण प्रत्येक चरणात तेरा अक्षरे. गण म, त, य, स, ग.

**मत्तर** पु. जमीन मोजण्याचे एक परिमाण :'त्या मल्लानें आपल्या शेतापैकीं सहा मत्तर जमीन दुर्गा देवतेच्या रंगांगभोगासाठीं दिली.'-केसरी १०.७.३६.

**मत्तल्लि(करण)** न. (नृत्य.) पाय वाटोळे फिरवून पुन्हा जवळ आणणे व हात उद्वेष्टित करून अपविद्ध करणे.

**मत्ता** स्त्री. द्रव्य; संपत्ती; मिळकत; जिंदगी. [अर. मताअ]

**मत्सर** पु. दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणे; द्वेष; हेवा; असूया; स्पर्धा. [सं.]

**मत्सरी** वि. द्वेष, हेवा करणारा; द्वेष्टा.

**मत्स्य** पु. १. मासा. २. एकमेकांना छेदणाऱ्या दोन वर्तुळांचा समाईक भाग. ३. मनुष्याच्या तळहातावर किंवा तळपायावर रेषांची बनलेली विशिष्ट आकृती. हे भाग्यकारक चिन्ह मानतात. ४. शरीरावरील तीळ. ५. विष्णूचा पहिला अवतार. [सं.]

**मत्स्य** पु.१. नदीवर बांधलेल्या पुलाच्या कमानीच्या खांबाचा तळचा, दोन्ही बाजूंस निमुळता असलेला भाग. २. नदीच्या घाटावरील पाण्यात असणारे बुरुज. [सं.]

**मत्स्यदंड** पु. वज्रमुष्टीचा व्यायाम. एका जागेवर बसून एकदम दंड काढणे व तसेच पुढे किंवा वर उडणे व फिरणे. [सं.]

**मत्स्यन्याय** पु. मोठ्या, बलाढ्य व्यक्तीने लहान, दुर्बल व्यक्तींना त्रास देणे.

**मत्स्ययंत्र** न.१.पहा : **मच्छयंत्र**. २. मासा बसविलेले, वेध घेण्यासाठी फिरते केलेले यंत्र. याद्वारे नेमबाजीच्या नैपुण्याची परीक्षा केली जाते.

**मत्स्यशेती** स्त्री. दोन पिकांच्या मधल्या काळात, शेतात पाणी अडवून विशिष्ट जातींच्या, कमी मुदतीत वाढणाऱ्या माशांची पैदास करणे.

**मत्स्यसंवर्धनविद्या** स्त्री. माशांची कृत्रिम पद्धतीने वाढ करण्याचे शास्त्र.

**मत्स्यालय** न.१. प्रदर्शनासाठी किंवा अभ्यासासाठी जलवनस्पती किंवा जलचर (मासे, कासव इ.) ठेवण्याची काचेची टाकी, पेटी, तलाव इ. २. जिथे प्रदर्शनासाठी जलवनस्पती किंवा जलचर ठेवलेले असतात ती इमारत.

**मत्स्यासन** न. १.(योग.) पद्मासन घालून नंतर तसेच पाठीवर उताणे निजणे व हाताची कव घालून डाव्या हाताने उजव्या हाताचे व उजव्या हाताने डाव्या हाताचे बावखड धरणे आणि दोन्ही हातांच्या तिढ्यावर डोके ठेवणे. २. मल्लखांबाच्या बोंडावर ताजवा करून नंतर हात डोक्याखाली व पायांची मांडी करून राहणे. [सं.]

**मथक** न. मुख्य ठाणे; मुख्यालय : 'माल्टा (वेलेटा) बंदर भूमध्य समुद्रांतील अत्यंत महत्त्वाचे नौकाखात्याचें आणि वैमानिक खात्याचें मथक आहे.'- किर्लोस्कर मासिक, जून १९३६. [सं. मस्तक]

**मथणी-नी** स्त्री. ताक करण्याचा डेरा; माथणी.

**मथणे** सक्रि. १. संगनमत करणे; एकत्र होणे. २.निभावून नेणे.

**म(मं)थणे** उक्रि.१. घुसळणे; मंथन करणे. २. वादविवाद, चर्चा, वाटाघाट करणे. ३. छाननी, संशोधन, परीक्षण करणे. ४. एखाद्या गोष्टीविषयी मनात विचार, मनन, चिंतन करणे. ५. अनुकूल करून घेणे; वळविणे. ६. ठार मारणे :'श्वेतहयें अंबष्ठ श्रुतायुनामा रणांगणीं मथिला ।'- मोकर्ण ३.२५. ७. जिंकणे; पराभव करणे : 'तव बळ मथितो त्यातें मारुनि साधीं रणीं निज स्वार्था ।'- मोकर्ण १२.३. ८. घासणे; मंथन करणे : 'जैसें काष्ठें काष्ठ मथिजे । तेथ वन्हि एक उपजे ।'- ज्ञा १.२४३.[सं.]

**मथरावणी** स्त्री. हट्ट; दिरंगाई; रेंगाळणे. - सह्या पा ३०६. (गो.) [सं.मन्थर]

**मथव(वि)णे** सक्रि. वश करणे; मन वळविणे; अनुकूल करून घेणे.

**मथ(था)ळा** पु. १. हुंडी देणारा हुंडीवर श्रीकाराच्या खाली करतो ती सही. २. डोके; माथा. ३. लेखाच्या माथ्यावर लिहिलेले लेखाचे नाव; शीर्षक (लेख, पुस्तक इ.चे). ४. समईच्या खालचे बूड.

**मथाटी** स्त्री. बैलांच्या शिंगांभोवती बांधलेली दुहेरी जाड दोरी.

**मथाड-डी** न. मध्यभाग : 'कुंकुवाचे मथाडी शेंदराच्या रेगा.' - लोसाको.

**मथित** पहा : **मती, मतीत**

**मथित** न. १.वादविवाद; चर्चा; वाटाघाट. २. लोणी. ३. तत्त्व; सारांश : 'तेणें आनंदें बोलतु । भक्तीचें मथितु वासुदेवाप्रती ।'- एभा ५.४८८. वि. १. घुसळलेले, मंथन केलेले (दही इ.). २. (ल.) चर्चिलेला; वाटाघाट केलेला (विषय).

**मथितार्थ** पु. १.वादाचा निष्कर्ष; तात्पर्य; सारांश; रहस्य; सारभूत अर्थ. २. वाटाघाट.- ऐको.

**मद** पु. मध्य.- लोसाको. [सं. मध्य]

**मद** पु.१.धुंदी; कैफ; मत्तपणा; माज (दारू, धन, विद्या, कुलीनता, तारुण्य इ.मुळे आलेला). २. उत्कट कामेच्छा; कामवासना.३. माजलेल्या हत्तीच्या गंडस्थळातून निघणारा चिकट द्रव्याचा स्राव. ४.फळातील, फुलातील रस. ५. गर्व; ताठा; रग; अभिमान; अरेरावी. ६. वेड;

उन्माद. ७. आसव; मद्य; दारू. ८. रंगेलपणा; विलास. [सं.]
**मद** पु. मळलेले पण न कांडलेले भात. पहा : **मदन**
**मदकारी** वि. कैफ उत्पन्न करणारे; कैफी.
**मदणे** अक्रि. मत्त होणे; माजणे; झिंगणे.
**मदत-द** स्त्री. १. साहाय्य; हातभार; सहकार्य. २. योगदान; साथ; पाठबळ. ३. कुमक; रसद. ४. जोड; टेकू; आधार; दुजोरा; पुष्टी. ५. धीर; पाठिंबा; पाठराखणी; कैवार; तरफदारी.
वि. सहायक; जोडीदार; मदतनीस; पाठिंबा देणारा. [अर. मदद]
**मदत-द** स्त्री. (अफू, विड्याची पाने इत्यादींपासून केलेला) एक प्रकारचा ओढण्याचा मादक पदार्थ. [सं. मद]
**मदतखर्च** पु. खर्ची; मदत करण्याबद्दल दिलेली रक्कम.
**मदतगार-नीस, मदती** वि.१.उपकारकर्ता; मदत, आश्रय देणारा. २. सहायक; जोडीदार; दुय्यम (कारकून, लेखक इ.). ३. हाताखालचा; सेवक; चाकर. [फा. मदद्गार]
**मदतमाश** स्त्री. निर्वाहासाठी दिलेली मदत. [अर. मआश् = जीवन]
**मदन** न. कणसे एकत्र तुडवून काढलेले गोंडासहित धान्य; दाणे व भूस यांचे मिश्रण. [सं. मर्दन]
**मदन** पु. गुऱ्हाळात गूळ करताना आटत असलेला रस.
**मदन** पु. १. कामदेव. २. (लं.) अत्यंत सुंदर मनुष्य. ३.काम; संभोगाची इच्छा; विषयविकार.
**मदन** खाण.
**मदनखुस्की** स्त्री. गर्व; धुंदी. (झाडी)
**मदनगृह, मदनालय** न. योनी.
**मदनजर** न. लक्ष्य; ध्यान; कृपादृष्टी. [फा. मद्-इ-नझर = कृपावलोकन]
**मदनबाण** पु. जाईची एक जात.
**मदनमस्त** वि. कामविकाराने बेफाम, उन्मत्त झालेला.
**मदनवृक्ष** पु. गेळीचे, बांबूचे झाड.
**मदनाई(य)क** पु. माळेतील मधला मणी; हिरा. [सं.मध्यनायक]
**मदनाची** पु. खाण खणणारा.
**मदनिका** स्त्री. सुंदरी; रूपवती.
**मदनी** स्त्री.गेळीचे झाड.
**मदभर** वि. बहरलेला.
**मदभरणाचा** वि. मध्यम प्रतीचा: 'शंभरपासून सात-आठशें पर्यंतची खेडीं मदभरणाचीं म्हणजे मध्यम प्रतीचीं असत.'-भूभ्र ११. [सं.मध्य + भरण]
**मदमदीत** क्रिवि. उन्मादाने भरलेली.
**मदमा** वि. उंची रेशमी कापड.
**मदमुख** पु.(ल.)मदोन्मत्त हत्ती :'जैसा सिंहाचिया हांका। युगांतु होय मदमुखा।' - ज्ञा १.२१५.
**मदरसा** स्त्री. मुसलमानांची धार्मिक शिक्षण देणारी शाळा.
**मदरास** न. शेंगदाण्याचे तेल. (व.)
**मदलणे** सक्रि. चुरा करणे; मर्दणे; तुडविणे. [सं.म्रद्, मृद्]
**मदल(ळ)स-सा** पु. १.मांडव, छत इत्यादींचा मध्यभाग; चांदणी : 'हिरियांच्या मदलसा झळकती ।'- रावि ३६.५६.२.खांबावर नाट ठेवण्यासाठी चहूकडून पुतळ्यांची नक्षी केलेला दगड; दर्शनी खांबाचा मध्यभाग : 'गोसावी मदळसेसीं उभे असति'- लीचपू २३७. [सं.मदलसा]
**मदवी** स्त्री. उंची रेशमी वस्त्र; (सामा.) वस्त्र : 'आतां, अविद्येचियां गांवीं। मोहाची वेढूनि मदवी ।'- ज्ञा १८.६९०.
**मदंती** स्त्री. (संगीत.) अठराव्या श्रुतीचे नाव. [सं.]
**मदात्यय** पु. १. मदामुळे झालेला अतिशयित विकार; उन्माद. २. गर्व; ताठा इत्यादींचा नाश.
**मदार** स्त्री.पु. १. उंटाच्या पाठीवर असणारा उंच भाग; वशिंड. २. भिस्त; दृष्टी; लक्ष्य. ३. मुसलमानाचे थडगे. ४. मुख्य आधार; केंद्र; सत्ता : 'पादशाही मदार आपलें हातास आला असतां...'- इमं ९८. ५. जबाबदारी; भार. ६. भरवसा. पहा : **इतबार**. ७. ठराव; करार:'तेव्हां मदार झाला कीं अक्षय तृतियेस निरोप द्यावा.'- ऐलेसं ५.२५९३. ८. मशीद. [अर.]
**मदारी** पु. १. जादूगार. २. माकडाचे खेळ करणारा. ३. डोंबारी; गारुडी; बहुरूपी; नजरबंदीचे खेळ करणारा. ४. ज्याच्यावर सर्व खेळ अवलंबून आहे असा मनुष्य. [हिं.मदार]
**मदालसा** स्त्री. धुंद, सौंदर्यवती, रूपगर्विता स्त्री.
वि. विलासी (तरुणी).
**मदांध** वि. गर्वाने ज्याचा विवेक नष्ट झाला आहे असा.
**मदिणी** स्त्री. हत्तीण.
**मदिर** पु. घोड्याच्या खुराचा खालील भाग.
**मदिर** वि. धुंद; मत्त; गुंग; तर्र; बेहोश.
**मदिरा** पहा : **मद्य**
**मदोन्मत्त** वि. (श्रीमंती, विद्या इ.च्या गर्वाने) माजलेला; उन्मत्त.
**मद्द** पु. (सराफी) (हिऱ्याच्या खाणीतील) कठीण रेतीचा गठ्ठा.
**मद्द** स्त्री. वाढ. [अर.]
**मद्द** पु. (सराफी) (हिऱ्याच्या खाणीतील) कठीण रेतीचा गठ्ठा.
**मद्दड** वि. मठ्ठ; जड; मंदबुद्धी; सुस्त. [क.]
**मद्य** न. दारू; वारुणी; शराब. [सं.]
**मद्यपा-पी** वि. दारू पिणारा; दारुड्या. [सं. मद्यपी]
**मद्यपान** न. १. दारू पिणे. २. (अध्यात्म.) ब्रह्मरस; ब्रह्मानंद. [सं.]
**मद्यमंड** पु. सातूच्या दारूवरील फेसाळ साय.
**मद्यसार** न. (शाप.) अल्कोहोल.
**मद्यार्क** पु. रंगहीन, उडून जाणारा, ज्वालाग्राही द्रवपदार्थ.
**मद्रा** पु. कापडाचा एक प्रकार; अलवण. - मुंठ्या १२३.
**मध** पु.स्त्री.१. फुलांतील गोड, दाट रस; मकरंद. २. फणसातील गोड द्रव; गऱ्यांतील पाणी; गऱ्यांचे साठे वाळवून एकत्र रचून ठेवल्यास त्यातून निघणारा द्रव. [सं.मधु] (वा.) **मधा येणे** - गोड होणे : 'कीं ब्रह्मविद्या मधा आली : दशावधान होऊनिया'- मूप्र ६६८. **मधाचे बोट लावून ठेवणे, लावणे, दाखविणे** - लालूच, आशा दाखविणे.

**मध(द)गर्भ–र्भी** पु.स्त्री. मधला भाग; आतील भाग; अंतर्भूत प्रदेश.
**मध(द)घडी** वि. दौलताबादी मध्यम प्रतीचा कागद.
**मध(द)घर** न. घराचे मधले दालन; माजघर.
**मधपाळ** पु. मधमाशी पाळणारा; मधुमक्षिकापाल.
**मधमाशी** स्त्री. फुलांतील मध गोळा करणारी माशी.
**मधलंड** वि.१.मध्यम प्रतीचा; खूप चांगला वा खूप वाईट नसलेला. २. धड इकडे वा धड तिकडे नसलेला; अधांतरी असलेला.
**मधलाटी–ठी** स्त्री. वलाटी व खलाटी यांमधला प्रदेश; देश व कोकण यांच्या मधला प्रदेश.
**मधवणी** न. मध आणि पाणी यांचे मिश्रण.
**मधवले** न. तांदळाच्या पिठाचे गोड धिरडे.
**मधवा, मध(धि)वला** वि. सर्वांत मोठा व सर्वांत लहान यांच्या मधला (भाऊ, बहीण).
**मधशर्करा** स्त्री. फळे, मध इ. गोड पदार्थांत सापडणारी साखर; फलशर्करा; (इं.) ग्ल्युकोज.
**मधाळ** वि. मधाने किंवा मोड रसाने युक्त (फणस, खजूर इ.); गोड.
**मधिमा** वि. सर्वसामान्य (लोक).
**मधी** क्रिवि. मध्ये; आत.
**मधील** वि. मधला; आतला; मध्यावरचा.
**मधु, मधुरस** न.१.पहा : **मध**. २. मोहाच्या फुलापासून काढलेली दारू. (सामा.) मद्य. [सं.]
**मधु** पु.१. चैत्र (महिना). २. वसंत ऋतू.
वि. गोड; मधुर. [सं.]
**मधुआ** स्त्री. मधमाशी.
**मधुकर** पु. भ्रमर; भुंगा. [सं.]
**मधुकरी, मधुक्रिया** पहा : **माधुकरी**
**मधुकुल्या** स्त्री. (मधाचे पाट. यावरून) गोड पदार्थांची रेलचेल. (घृतकुल्या शब्दाबरोबर योजतात.) [सं.]
**मधुक्री** स्त्री. दान दिलेली जमीन.
**मधुचंद्र** पु. १. विवाह झाल्यानंतरचा पहिला महिना; आनंदमास. २. नवपरिणीत वधू-वरांनी लग्नानंतर लगेच आनंद लुटण्यासाठी एखाद्या दूरच्या, निसर्गरम्य ठिकाणी केलेला सहवास.
**मधुधारी** स्त्री. पावसाचा सुखकारक वर्षाव.
**मधुप** पु. १.भ्रमर; भुंगा. २. मद्यपी; दारुड्या. [सं.]
**मधुपका–खा** वि. १. भारी रेशमी खणाचा एक प्रकार. २. सुंदर.
**मधुपर्क** पु. १. लग्नाच्या वेळी वर विवाहस्थळी आल्यावर वधूच्या पित्याने त्याला दही, मध इ. देऊन त्याची वस्त्र इत्यादींनी पूजा, स्वागत करण्याचा विधी. २. यजमानाने ऋत्विजाचे करायचे आदरातिथ्य. ३. शिष्ट, साधू इत्यादींचा आदरातिथ्यविधी. [सं.]
**मधु(ध)पुळी** स्त्री. पाठीवर होणारी असाध्य पुळी; काळपुळी.
**मधुब(व)न** न. मध साठवण्यासाठी मधमाशा पाळण्याची जागा. [सं.]
**मधुमक्षिका–माशी** स्त्री. मधमाशी.
**मधुमक्षिकान्याय–व्रत** पु.न.कोणत्याही गोष्टीतील चांगले असेल तेवढे घेणे; चांगल्या गोष्टींचे संकलन, संग्रह करणे.
**मधुमादसारंग** पु. (संगीत) एक राग. गानसमय मध्यान्ह.
**मधुमेह** पु. स्वादुपिंडाचे कार्य बिघडल्यामुळे व इन्सुलीन कमी होण्याने रक्तातील साखरेच्या प्रमाणात वाढ झाल्याने होणारा रोग. यात लघवीतून शरीरातील साखर जाते. [सं.]
**मधुयष्टि–ष्टी, मधुयष्टिका** स्त्री. १.ऊस. २. ज्येष्ठमध. [सं.]
**मधुर** पु. १.षड्रसांपैकी एक रस. २. मद्य : 'दैत्यासी मधुर । घालितसे।' – कालिका १२.१८.
वि. १. गोड. २.मोहक; आकर्षक; आल्हाददायक. ३. मंजूळ. [सं.]
**मधुरसग्रंथि–थी** स्त्री. (वानस.) फुलातील मधुनिर्माण-पिशवी.
**मधुरा** पु.१. ज्यात गळ्याच्या आसपास बारीक पुळ्या येतात असा ताप, ज्वर. २. बारीक पुळ्या; पुरळ.
**मधुरा भक्ति–क्ती** देवाला पती किंवा प्रियकर मानून पत्नीभावाने किंवा प्रेयसीभावाने त्याची भक्ती करणे; भक्तीचा एक प्रकार.
**मधुरिमा** पु.स्त्री. माधुर्य; गोडी : 'सृष्टीला दहिंवरामुळें प्राप्त होणारी मोहक मधुरिमा विनोदानें येणें शक्य नाहीं.'ह्न साअप ६.
**मधुव–वा** पु.स्त्री. मधमाशी; मोहोळमाशी : 'सींधु पतंगु मधुकरू । गजु मधुवा कृष्णसारू ।' – भाए २६७. [सं.]
**मधुविद्या** स्त्री. १. उपनिषदातील एक विद्या. २. ब्रह्मविषयक ज्ञान. [सं. मधु (= ब्रह्म)+विद्या]
**मधुशाला** स्त्री. मद्यालय.
**मधून** क्रिवि. मध्यापासून; आतून.
**मधोमध** क्रिवि. मध्यभागी.
**मध्य** पु.१. केंद्र; मधला भाग. २.कंबर; कटिप्रदेश. ३. गर्भ; गाभा. ४. (गणित.) मध्यम; माध्य; सरासरी.
वि. १. मध्यभागचा; मधला. २. मध्यम. [सं.]
**मध्यकर्ण** पु. ध्वनिलहरी संक्रमित करणारा श्रवणेंद्रियाचा मधला भाग.
**मध्यकेंद्र** न. दीर्घवर्तुळातील केंद्रांपैकी प्रत्येक.
**मध्यगा** स्त्री. १. त्रिकोणाचा शिरोबिंदू आणि समोरील बाजूचा मध्यबिंदू सांधणारा रेषाखंड. २. चढत्या किंवा उतरत्या क्रमाने निरीक्षणे मांडल्यास मध्यभागी येणारे निरीक्षण.
**मध्यजन** पु. उत्पादक व गिऱ्हाईक यांच्यामध्ये असलेली दलालांची श्रेणी.
**मध्यनाडी** स्त्री. (फज्यो.) नक्षत्रांच्या तीन वर्गांपैकी दुसरा. पहा : **नाडी**
**मध्यपद** न. (गणित.) त्रैराशिकातील मधली संख्या; मध्यांक.
**मध्यपाती** वि. मध्येच पाडणारे, सोडणारे : 'माझा भक्तिमार्ग केवळ । ज्ञान तें विकळ मध्यपाती ।' –एभा ११.१५२९.
**मध्यबिंदु–दू** पु. (गणित.) ज्या बिंदूपासून परिघापर्यंत काढलेल्या सर्व सरळ रेषा समान असतात तो वर्तुळातील बिंदू; वर्तुलमध्य.
**मध्यम** पु.१.(संगीत.) सातस्वरांपैकी चौथ्या स्वराचे नाव; 'म'.२. रजोगुण: 'तेव्हां गुणचि गुणातें आटी । तमातें धोटी मध्यमू ।'– एभा १०.३५०.
वि. १. मधला. २. साधारण; सामान्य; मधल्या प्रतीचा. [सं.]
**मध्यमक्रम** पु. मधला मार्ग; तडजोडीचा, तारतम्याने काढलेला निर्णय. [सं.]

**मध्यमग्राम** पु. (संगीत.) सप्तस्वरांतील तीन अवधींपैकी एक अवधी.

**मध्यमपदलोपी समास** (व्या.) दोन शब्दांच्या मधल्या पदाचा ज्यात लोप होतो असा समास. जसे :- लाकूडकाम; साखरभात.

**मध्यमवती** स्त्री. (संगीत.) एक ताल. यात नऊ मात्रा व चार विभाग असतात.

**मध्यमा** स्त्री.१. मधले बोट. २.नुकतीच वयात आलेली मुलगी. ३. वाणीच्या चार प्रकारांपैकी(परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी) तिसरा प्रकार. ४. सुषुम्ना नाडी :'हृदयकमळीं केला थारा । मध्यमाद्वारा चालिले।'– एभा १२.६. ५. एक छंद. याचे चार चरण असून प्रत्येक चरणात तीन अक्षरे असतात. ६. अमावास्येची मध्यरात्र : 'तिये मध्यमेचेनि संगें : बोट लाविजे जगें'– सव ६४. [सं.]

**मध्यमान** न. सरासरी.

**मध्ययुग** न. भारतात नवव्या शतकाच्या प्रारंभापासून ते अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंतचा काळ व युरोपात इ.स. ५ वे शतक ते १८ व्या शतकापर्यंतचा काळ.

**मध्यलग्न** न. (ज्यो.) आकाशातील डोक्यावरचा बिंदू; खस्वस्तिक.

**मध्यवर्ती** वि.१. मधोमध असणारा; मधला; केंद्रस्थानी असलेला. २. मुख्य; सर्वश्रेष्ठ; सार्वभौम. ३. मध्यस्थ; दोघांमधील व्यवहार ज्याच्या मार्फत होतो तो. ४. मध्यस्थीचा; मध्यस्थविषयक. ५. केंद्रीय.

**मध्यसप्तक** न. (संगीत.) मध्यनादयुक्त सात स्वरांचा समुदाय.

**मध्यस्थ** वि. १. मध्यभागी असणारा; मध्यवर्ती. २. तिऱ्हाईतपणाने निर्णय करणारा; पंचाचे काम करणारा; लवाद. ३. दोघांमधले कार्य ज्याच्यामार्फत होते तो.

**मध्यंतरी** क्रिवि. १. मधल्या काळात, अवकाशात. २. मधल्या स्थळी. ३. मधल्या प्रतीत.

**म(मा)ध्यान्ह** पु.न. दिवसाचा मध्य; दुपार; सूर्य डोक्यावर येण्याची वेळ.

**मध्यावधी निवडणूक** नियोजित काळ संपण्यापूर्वी घेतली जाणारी निवडणूक.

**मध्यांतर** पु. नाटक, सिनेमा इ. कार्यक्रमांत मध्येच ठेवलेला मोकळा, विश्रांतीचा वेळ.

**मध्यांबर** पु. भूपृष्ठापासून सुमारे ५० ते ८० कि.मी.पर्यंत असलेला वायूचा थर.

**मध्ये–धे** क्रिवि. १. मध्यभागी.२. आत; गर्भात. ३. मध्यंतरी; मधल्या वेळात; काही वेळाने. ४. ठायी; अंगी; मधे.

**मध्रा** स्त्री. भाजलेल्या जागी तुंबडी लावल्याने तेथे उठणारे फोड.

**मध्व** पु.१.द्वैतमताचा प्रस्थापक आचार्य.२. त्यांनी सुरू केलेला एक वैष्णव संप्रदाय; त्यातील व्यक्ती.

**मध्वगु(गू)ळ** न. पांढऱ्या रंगाचे वाटोळे वांगे. ही वांग्याची जात मध्वाचार्यांनी उत्पन्न केली अशी समजूत आहे. (गो.)

**मन** न. १.चित्त; चिच्छक्ती; बुद्धी, विचार, तर्क, स्मृती इत्यादींचे अधिष्ठान. २.अंतःकरण; हृदय; भाव, रस, विकार इत्यादींचे अधिष्ठान; सुखदुःखादींचे ज्ञान करून देणारे इंद्रिय. (क्रि. तुटणे, दुखणे, भारावणे.) ३. बरे-वाईट समजण्याची शक्ती; सदसद्विवेकबुद्धी; अंतर्याम. (क्रि. खाणे, मारणे इ.) ४. चेतना; जाणीव; आत्मबोध; भान; सावधपणा; शुद्धी. ५. इच्छा; निश्चयशक्ती; संकल्पविकल्पात्मक अंतःकरणवृत्ती. (क्रि. जाणे, मोडणे, मारणे, मुंडणे,विटणे इ.) ६. आवड; अंतःकरणाची ओढ; प्रवृत्ती; खुशी; मर्जी. (क्रि. मिळणे, मनविणे.) ७. माया. ८. प्रेम. (क्रि. जडणे, बसणे.) ९. लक्ष; ध्यान. (क्रि. उठणे, उडणे, घालणे, देणे, लावणे.) १०. हिंमत. (क्रि. खचणे, कचरणे, चरकणे, गडबडणे, गांगरणे, गोंधळणे, घोटाळणे इ.) [सं.मनस्](वा.) ० **ओतणे, लावणे** – एकाग्र चित्ताने काम करणे. ० **खाणे** – आपण केलेल्या वाईट कृत्याबद्दल स्वतःलाच वाईट वाटणे; टोचणी लागणे; पश्चात्ताप होणे. ० **जळणे,नवमण जळणे** – मत्सर करणे. ० **जिंकून घेणे**–आपलासा करणे; वश करणे. ० **थोड्यासाठी निसरडे करणे**–क्षुल्लक फायद्यासाठी निश्चयापासून पराङ्मुख होणे. ० **धरणे** –१.एखाद्याच्या मनाप्रमाणे वागणे. २. हाजी हाजी करणे : 'आदर देखोनि मन धरी । कीर्तीविण स्तुती करी ।'–दास २.१०.२५. ० **पाहणे** –मनाची परीक्षा करणे; (एखाद्याच्या) मनाचा कल आजमावणे; एखाद्याचे भाषण, वागणूक इत्यादींवरून त्याचे विचार ठरविणे. ० **बसणे, लागणे,जडणे** –(काही गोष्ट करायला) अनुकूल होणे; अतिशय आवडणे; आसक्त होणे; प्रिय वाटू लागणे. ० **भिजून जाणे**–मन हेलावून जाणे. ० **मावळणे** –अहंकार नष्ट होणे. ० **मोठे करणे** –उदारपणा दाखविणे; थोरपणाने वागणे. ० **वाटणे** –मन गुंतविणे. **मनात आणणे** –संकल्प, निश्चय करणे; मनावर घेणे. **मनात,मनी कढविणे**–मनातल्या मनात रागाने चूर करणे; जळफळायला लावणे : 'निजतेजें भानुला मनीं कढवी ।' – मोविराट ३.१२०. **मनात,मनी कालवणे**– अतिशय दुःख होणे. **मनात गाठ ठेवणे** – मनात वैरभाव, द्वेषबुद्धी, सूड घेण्याची इच्छा जागृत ठेवणे; अढी धरणे. **मनात गाठ बांधणे, घालणे** –नीट ध्यानात धरून ठेवणे; मनात गोष्ट पक्की ठेवणे. **मनात चरचरणे** – १. मनास काळजी, भीती वाटणे. २. दुःख होणे. **मनात भरणे** –पसंत पडणे; आवडणे. **मनात,मनी मांडे खाणे**– व्यर्थ मनोरथ करणे; मनोराज्य करणे. **मनाने घेणे**– मनाचा ग्रह होणे; मत बनणे. **मनाला द्रव येणे** – मनात दया, प्रेम इ. कोमल भावना उत्पन्न होणे. **मनाला लावून घेणे**– अतिशय दुःख वाटणे . **मनावर घेणे, धरणे**–एखादी गोष्ट पत्करणे, तिच्यात लक्ष घालणे, सिद्धीस न्यायला झटणे. **मनावर लिहून, कोरून ठेवणे**–कायमची आठवण ठेवणे. **मनास,मना आणणे**– १. लक्ष देणे; मानून घेणे. २. समजून घेणे. ३. मनावर घेणे; महत्त्वाचे मानणे. **मनास येणे, वाटणे, आवडणे** – पसंत पडणे.

**मन आनुवंशिकी** मनाचा उद्गम व विकास याचा अभ्यास करणारी मानसशास्त्राची शाखा.

**मनउथळा** वि. मोकळ्या मनाचा; साधा; छक्केपंजे न जाणणारा.

**मनओळख** स्त्री. हाडवैर; मनापासून वैर.

**मनकर** वि. मनोहर; मन रमविणारा; रम्य; सुंदर :'मोतियांचा भांगु मनकरु । जैसा श्रृंघारगंगेचा अवतारु ।'– नरुस्व ९७. [सं. मनस् + कर]

**मनकरी** क्रिवि. मन घट्ट करून :'ऐसी देवाचेनि वेधें भीमकुमरी : कंठीं

प्राणु धरुनि मनकरीं : बोले प्रधानिकेसी :'-रुस्व ६३२.

**मनकवडा** पु. दुसऱ्याचे मन वेधून घेण्याची शक्ती :'मन माझें मोहिलेंस नकळे आहे तुझ्यापशीं मनकवडा ।' - प्रला १६१.

वि. दुसऱ्याच्या मनातील विचार ओळखणारा.

**मनका** पु. १.बैलांच्या डोक्यावरील साज. (व.) २. गाडीची मधली पाटी.

**मनखोडी** स्त्री. मनोविकार.

**मन(ण)गट, मनकट** न.१. हात आणि हाताचा पंजा यांना जोडणारा भाग; मणिबंध; पंज्याचा सांधा. २. पाऊल व पायाची नळी यांच्यामधील सांध्याचे हाड; घोटा; गोफा. ३. घोड्याच्या पायाचा सांधा. ४. (ल.) उपाय; मार्ग; योग्यता (शक्ती, पैसा, विद्या इ.ची).[सं. मणि+कट] (वा.)० **घेणे** - बोंब मारणे; बोंबलणे.० **चावून घेणे**-संताप करून घेणे; चडफडणे.० **धरणे** - एखाद्यास काही अपराधात पकडणे; आरोप ठेवणे. **मन(ण)गटात(स) जोर असणे**-(संपत्ती, अधिकार, योग्यता, शारीरिक शक्ती इ.बाबतींत) समर्थ असणे. **मनगटातील माशा मारणे**- स्वस्थ बसणे; दुबळे बनणे. **मन(ण)गटावर केस येणे** - हातातला जोर नाहीसा होणे; एखादे काम करायला असमर्थ असणे.. **मन(ण)गटावर गोणी पडणे** - एखादे कष्टाचे किंवा जबाबदारीचे काम लादले जाणे. **मन(ण)गटावर तेल,चुना घालणे, ओतणे**-बोंबा मारणे; बोंबलत सुटणे, एखादी विद्या, गोष्ट न आल्यामुळे शंख करावा लागणे. **मनगटाशी मनगट घासणे** - एखाद्याशी बरोबरी, स्पर्धा करणे.**मन(ण)गटासारखे मन(ण)गट पाहून कन्या देणे,मनगटासारखे मनगट पाहणे**-शरीर, पैसा, परिस्थिती इत्यादींबाबतीत जुळणारा वर पाहणे.

**मन(ण)गटी** स्त्री. लहान मुलांच्या मनगटात घालण्याचा एक अलंकार.

**मनगंड** वि. भरगच्च; मन भरेल इतके.

**मनगाडून** क्रिवि. मन लावून; अंतःकरणपूर्वक; एकाग्रतेने.

**मनगुर** न.पु. कुरकुर; कण्कण्. (व.)

**मनचव** वि. (जरतारी धंदा) मध्यम.

**मनजात** स्त्री. मुकी जात. (पाळीव जनावरांना उद्देशून कोकणात उपयोग.)

**मनणे** सक्रि.१. मानणे; पटणे; आवडणे :'जरी उतरला धराभार । हें शारंगधर न मनीच ।'- एभा १.२२०. २. ध्यानात, लक्षात घेणे : 'कां निंदेचे घाय तिखट। एकही न मनी ब्रह्मनिष्ठ।'-मुवन ४.१२६. ३. वाटणे; भासणे. [सं. मन्]

**मन(नो)देवता** स्त्री. मन; अंतःकरणातील तर्क, आशा इत्यादींची, बऱ्या-वाईट गोष्टी करण्याची प्रेरक शक्ती, देवता; सदसद्विवेकबुद्धी; न्यायबुद्धी. (क्रि. लवणे, वाहणे.)

**मनधरणी** स्त्री. मर्जी संपादन करणे; आर्जव; खुशामत.

**मनन** न. एखाद्या गोष्टीच्या खऱ्या स्वरूपाविषयी मनात सतत विवेकपूर्वक विचार करणे; चिंतन : 'श्रवण म्हणिजे ऐकावें । मनन म्हणिजे मनीं धरावें ।' - दास १८.१०८.

**मननशील** वि.मनन, चिंतन, विचार करण्याचा स्वभाव असलेला.

**मननीय** वि.विचार करण्यासारखे.

**मनपाकुळका, मनपिंगळा-ळी** पहा : **मनोदेवता**

**मनभूक** स्त्री. काल्पनिक, खोटी भूक; नेहमीच्या सरावामुळे वाटणारी भूक.

**मनमनं** स्त्री. मनधरणी; खुशामत; आर्जव. (व.)

**मनमाने-नी, मनरंगी** क्रिवि. मनसोक्त; मनाला वाटेल तसे, मनाजोगे.

**मनमान्य** वि. स्वेच्छाचारी; स्वच्छंदी; बेताल.

**मनमिळाऊ** वि. सर्वांशी मिळूनमिसळून राहणारा; गोड स्वभावाचा.

**मनमुराद, मनमुदा** वि. १.मनोहर; आल्हादकारक; आनंददायक. २. यथेच्छ; मनसोक्त; मनाची तृप्ती होईल इतके.

**मनमेळ** वि. १. आवडते; प्रिय; मनोहर. २. शास्त्र इ.चा फारसा विचार न करता दोन्ही पक्षांच्या संमतीने झालेले (लग्न).

**मनमोकळा** वि. खुल्या दिलाचा; सरळ; निष्कपट.

**मनमोल** वि. मनसोक्त; मनःपूत : 'रामचंद्र वाघ व मनभट हे (याही) मशारनिल्हेसी बाह्यात्कारे प्रेम ठेवून अंतरंगीं आपासाहेबाकडून मनमोल तैसे ख्याल करवीत असावे.' -ऐति ६४२.

**मनमोहतिर** न. मनाचा, मनाने ठरविलेला मुहूर्त.

**मनमौज** स्त्री. १. गमतीचा विचार, कल्पना. २. लहर; नाद; छंद.

**मनमौजी-ज्या** वि.१.लहरी; छांदिष्ट; चंचल.२. मिजासखोर; दिमाखी.

**मनवणे** अक्रि. मान्य होणे; मानले जाणे : 'तेथ शुद्धीचिया आशा। तो लेपु न मनवे जैसा ।' -ज्ञा १७.१०८.

**मनव(वि)णे** उक्रि. पहा : **मनावणे** अक्रि.सक्रि.

**मनविणे** सक्रि. जागृत करणे; उद्युक्त करणे :'चित्ता चेतविसी मना। मनविसी सर्वेंद्रिया चाळिसी ।'- निमा २.२.

**मनशा-सा-स्या, मनीषा** स्त्री. इच्छा; वासना; हेतू.

**मनशामोड** स्त्री. इच्छिलेली वस्तू मिळाल्यामुळे झालेले समाधान; अखंड तृप्तता.

**मनशी(सी,स)ळ** न.पु. एक तांबूस रंगाचा औषधी धातू. [सं. मनःशिल]

**मनश्चक्षू** पु. डोळे बंद असतानाही काही दृश्ये डोळ्यांनी पाहिल्यासारखी दिसणे याप्रकारची मनाची शक्ती.

**मनसब** पु.१.(मुसलमानी अमदानीत) घोडदळातील एक अधिकाराची जागा. २. अमुक इतक्या घोडेस्वारांचे पथक पदरी ठेवण्याचा अधिकार. ३. या हुद्द्याच्या दिमतीसाठी दिलेली जहागीर. [अर.]

**मनसबदार** पु. मनसब धारण करणारा अधिकारी; लष्करी हुद्देदार. [फा.]

**मनसबा** पु. १. काळजी. २. मसलत :'पुरंदरामुळे कार्यभागी यांस व त्यांचें पक्षीचे सर्वांस फारच मनसबा प्राप्त जाहला आहे.' - ऐति ६४२.

**मनसुत्र-त्री** (अप.) पहा : **मळसूत्र-त्री**

**मनसु(सो)बदार** पु.१.(न्याय.) कोर्टातील अधिकारी; मुनसफ; न्यायाधीश. २. पंचायतीचा सभासद; एक पंच.

**मनसुबदार, मन्सुबेबाज** वि. युक्तिवान; अक्कल लढविणारा; कल्पक; योजना तयार करणारा.

**मनसुबा-भा, मनसोबा** पु.१.उद्देश; हेतू; मनोगत. २. विचार; ठराव; मसलत :'परंतु मनसुबा कांही लांबणीवर पडला आहे.'- समारो १.१३९. ३. युक्ती; हिकमत. ४. अंगीकृत कार्य; मोहीम. ५. पहा : **मनसुबी** [अर.]

**मनसुबी-फी, मन्सोबी** स्त्री. १. किरकोळ दाव्यांची चौकशी; न्यायनिवाडा; निकाल. २. पंचायत; लवाद; मध्यस्थी. [अर.; फा.]
**मनसूत्र** न. इच्छानुरूप सत्ता चालविणारे, वागणारे मन.
**मनसूफ** स्त्री. १. अधिकार पद, जहागीर. २. स्वारी.
**मनसू(सु)र, मन्सूर** पु. १. राजाचे आज्ञापत्र; सनद. २. मोहोर; शिक्का: 'वरी मनसुर सद्गुरुकृपेचा ।'-भवि ४५.६२. [अर. मन्शूर]
**मनसोक्त** क्रिवि. यथेच्छ; स्वैर; स्वच्छंद; मनःपूत.
**मनसोटी** स्त्री. मसणवटी; स्मशान : 'तुम्ही तें प्रेत मनसोटीवर घेऊन जा.' - मसाप १.३.३१. (कातकरी)
**मनस्ताप** पु. १. (मनाला होणारा त्रास) दुःख; शोक. २. पश्चात्ताप. ३. हळहळ. ४. हुरहुर; खिन्नता. [सं. मनस् + ताप]
**मनस्वार** वि. (क.) पहा : **मनस्वी** ५
**मनस्वी** वि.१. मन स्वाधीन असलेला; मन जिंकणारा; संयमी. २.अवैध कृत्य करणारा; स्वैर वर्तनाचा; अमर्याद. ३. स्वच्छंदी; लहरी; छांदिष्ट (काम, वागणूक, स्वभाव, मनुष्य). ४. बेदरकार; निधड्या छातीचा :'स्वातंत्र्यासारख्या गोष्टी ज्यांना मिळवावयाच्या आहेत अशा जिगीषूंनी मनस्वी म्हणजे लोकमान्य टिळकांप्रमाणे निधड्या छातीचें झालें पाहिजे.' - धर्मशास्त्रविचार. ५. पुष्कळ; अतोनात; विपुल; अतिशय. उदा. मनस्वी पाऊस-ऊन-उंच इ.; क्रियाविशेषणाप्रमाणेही योजतात. जसे:- मनस्वी लिहितो-वाचतो.
**मनहलका** वि. १. दुर्बल. २. क्षुद्र मनाचा.
**मनहूस** वि. अपशकुनी. [अर. मन्हूस्]
**मनःपूत** क्रिवि. मनास येईल तसे; वाटेल तसे.
**मनःपूर्वक** क्रिवि. १. मनापासून. २. जाणूनबुजून; मुद्दाम.
**मना** स्त्री. १. मनाई; प्रतिबंध. २. निषेध; हरकत.
वि. बंद केलेले; प्रतिबंध केलेला; निवृत्त; निषिद्ध; जप्त. [अर. मन्अ]
**मनाई** स्त्री. १.बंदी; निषेध; प्रतिबंध. २. कुळाला तगादा न करण्याविषयीचा सावकाराचा हुकूम.
**मनाक** क्रिवि. १.क्षणभर. २. अल्प; किंचित. [सं.मनाक्]
**मनाकस्पर्शस्वर** पु. (संगीत.) पहा : **विवादी स्वर**
**मनाजोगा, मना(नो)योग-ग्य** वि. जसा हवा तसा; मनासारखा.
**मनापासून** क्रिवि. खरोखरी; अंतःकरणापासून; बेंबीच्या देठापासून; अतिशय; फार.
**मनामोबदला** पु. देण्याघेण्यासंबंधीचे संकट युक्त्याप्रयुक्त्या करून टाळणे. (क्रि. करणे, होणे.)
**मनारोखा** पु. मनाईहुकूम.
**मनावणी** स्त्री. मन वळविणे; समजावणे; आर्जव; मनधरणी.
**मनावणे** अक्रि. १. साजरा करणे. २. संपादणे. ३. पार पाडणे :' निःशस्त्र प्रतिकारकांचा सत्कारसमारंभ तारीख ३ रोजी मनावला.' -के ८.९.१९३९. [हिं. मनाना]
**मनाव(वि)णे** सक्रि. मिळवून घेणे; समजूत पाडणे; मन वळविणे; आर्जव करणे; वश करणे; अनुकूल करून घेणे. [हिं. मनाना]
**मना(न)वर** न. लढाऊ जहाज, गलबत. (मुंबई)
**मनि-नी** पु. राग:' म्या नेणत याचा मनिहि न धरावा ।'- शिगीता १.१५. [सं. मन्यु=राग]
**मनीषा** स्त्री. आकांक्षा; इच्छा; मनशा; हेतू. [सं.]
**मनु-नू** पु. १. ब्रह्मदेवाच्या एका दिवसात (कल्प) होणाऱ्या चौदा अधिकाऱ्यांपैकी प्रत्येक. प्रत्येक कल्पात चौदा मनू असतात. २. अनुकूल काळ; हंगाम. ३. मनुष्य; मानव. ४. (सांकेतिक) चौदा या संख्येबद्दल संज्ञा. [सं.](वा.) **०पालटणे** - परिस्थिती बदलणे; क्रांती होणे.
**मनुका** स्त्री. वाळलेली काळी द्राक्षे. [अर. मुनक्का]
**मनुज** पु. १. मनुष्य; मानव. २. मानवजात. [सं.]
**मनुरी** स्त्री. ऊद; काळे मांजर; कांडेचोर. (को.)
**मनुष्य** पु. न. १. माणूस. २.पराक्रमी; कर्तृत्ववान, समर्थ माणूस, पुरुष. [सं.](वा.)**मनुष्यात येणे**-जम बसणे; धंदा, व्यवहार यांची स्थिरस्थावर होणे. **मनुष्यातून उठणे**- १. लोकरीती, शिष्टाचार इ. सोडून, स्वैर वागणे. २. सर्वस्व गेल्यामुळे अत्यंत हीन, दीन, विपन्न अवस्था येणे. ३. मरणोन्मुख होणे; मरायला टेकणे; आजारामुळे व्यवहारात निरुपयोगी होणे. **(एखाद्या) मनुष्यास हाती धरणे** - १. एखाद्याला मदत करणे. २. एखाद्याला मदतीला घेणे.
**मनुष्यकला-ळा** स्त्री. १. माणसाचे चातुर्य, कौशल्य. २. माणसाची लुच्चेगिरी; आपण साक्षात्कारी आहोत किंवा आपल्यात ईश्वरांश आहे असा समज पसरविणे. ३. (चेहऱ्यावर दिसणारे) तेज; कांती.
**मनुष्यगण** पु. १.मानवजाती. २.(ज्यो.) नक्षत्रांवरून पडलेल्या तीन वर्गांपैकी एक; पूर्वात्रय, उत्तरात्रय, रोहिणी, भरणी आणि आर्द्रा ह्या नऊ नक्षत्रांवर जन्मलेल्या मनुष्यांचा वर्ग.
**मनुष्यपण-पणा** न.पु.१.समाजात सभ्यपणे वागण्याचा स्वभाव; माणुसकी; शिष्टाचारास धरून वागण्याची पद्धत. २. भलेपणा; दयाळूपणा; विनय इ. गुण; उत्तम स्वभाव. ३. मानवी रूप.
**मनुष्यबल-ळ** न. १. संख्याबल; संघबल; अनेक माणसांची मदत. २. मनुष्यामुळे प्राप्त होणारे सामर्थ्य (सैन्य, नोकर, चाकर इ.).
**मनुष्ययज्ञ** पु. १.पंचमहायज्ञांपैकी एक; अतिथिसंतर्पण. २. नरमेध. [सं.]
**मनुष्यलोक** पु. इहलोक; पृथ्वी.
**मनेरी** न.आश्रय; ठिकाण.
**मनेवार** पु. बंडखोर : 'आपण हरामखोर मनेवार चंजाउरकरास गोशमाल देऊनु सोडउनु घेउनु।' - इमं ६६. [फा.;अर.मन्अ?]
**मनोगत** न. मनीषा; हेतू; उद्देश; विचार; इच्छा.
वि. मनात असलेले; ठरलेले. [सं.]
**मनोगति-ती** स्त्री. १. मनाची वृत्ती, क्रिया, विचार. २. विचाराची पोच; मनाची धाव; आकलन. ३. इच्छेचा कल, प्रवृत्ती.
वि. १. मनाप्रमाणे वागणारा, चालणारा. २. चंचल विचाराचा (मनुष्य).
क्रिवि. मनाच्या गतीप्रमाणे; अतिशय, कल्पनातीत वेगाने. [सं.]
**मनोजव** वि. मनाच्या गतीने जाणारा; फार त्वरेने जाणारा. [सं.]
**मनोती** स्त्री. १.व्याजाखेरीज दिलेला जास्त मोबदला; मंडाई. २. रक्कम घेतानाच कापून घेतलेले व्याज. [हिं. मनौति]
**मनोदय** पु. १. हेतू; विचार; आशय. २. इच्छा; कल; प्रवृत्ती. [सं.]

**मनोदेवता** पहा : **मनदेवता**

**मनोधर्म** पु.१. (प्रेम, द्वेष, काम, क्रोध, मत्सर इ.) अंतःकरणाची भावना, विकार. २. मनाची शक्ती (विचार, कल्पना, सदसद्विवेकबुद्धी इ.). ३. (सामा.) चित्तवृत्ती. ४. मनाची चंचलता. ५. हेतू; बेत; विचार. वि. मनोगतीप्रमाणे वागणारा : 'सहचरु मनोधर्मु । देवाचा जो ।' – ज्ञा १७.३३. [सं.]

**मनोधारण–णा** न. स्त्री. १. मनाची समजूत; मनात आलेला विचार. २. मन राखणे; मनधरणी.

**मनोनाट्य** न. १. (मा.शा.) मानसिक उपचार करण्याची एक पद्धत. या पद्धतीमध्ये मनोरुग्ण जे–जे घडले ते–ते प्रत्यक्ष कृतीद्वारे व्यक्त करतात. २. मनोविकारांना प्राधान्य असणारे नाटक किंवा सिनेमा.

**मनोनीत** वि. मनाने पसंत केलेले; स्वीकारलेले.

**मनोन्यास** पु. १. मनाची घडण, ठेवण. २.(मा.शा.)विशिष्ट वेळी एखाद्या गोष्टीकडे असणारा व्यक्तीचा कल; मानसिक तत्परता.

**मनोभव** पु. १. मदन; काम. २. कामेच्छा; विषयेच्छा. [सं.]

**मनोभाव** पु. १. हेतू; विचार. २. भक्ती; श्रद्धा. ३. प्रीती. ४. उत्कटता.

**मनोभावे** क्रिवि. अंतःकरणपूर्वक; मनापासून; श्रद्धेने.

**मनोभौतिकी** स्त्री. शरीर आणि मन यांच्यातील परस्परसंबंधांचा अभ्यास करणारी मानसशास्त्राची एक शाखा.

**मनोमय** वि. काल्पनिक; अंतःकरणातील; मानसिक. [सं.]

**मनोमय कोश** (वेदान्त.) आत्म्यावरील,चैतन्यावरील पाच कोशांपैकी पंचज्ञानेंद्रिये व संकल्पविकल्पात्मक अंतःकरणवृत्ती रूप तिसरा कोश. पहा : **पंचकोश**

**मनोमय सत्यवाद** एकाच वस्तूविषयी निरनिराळ्या लोकांच्या मनात सारख्याच कल्पना असतात असे मत; सादृश्यवाद.

**मनोयोग** पु. मन लागणे; लक्ष्य; अवधान.

**मनोर** पु. जंगी; लढवाई; गलबत.

**मनोरथ** पु. इच्छा; बेत; हेतू; उद्देश; योजना. [सं.] (वा.) ० **दरिद्र होणे** – महत्त्वाकांक्षा, इच्छा निष्फळ ठरणे.

**मनोरम** वि. १.मनाला रमविणारे; मोहक. २. आनंददायक; संतोषकारक. [सं.]

**मनोरमा** स्त्री. १. सुंदर स्त्री. २. (संकेताने) बायको; पत्नी. [सं.]

**मनोरंजक** वि. मनाला रमविणारे; करमणूक करणारे; चित्ताकर्षक.

**मनोरंजकी** स्त्री. मनधरणी; खुषमस्करेपणा.

**मनोरंजन** न. १. करमणूक; मौज. २. मनाला वाटणारा आनंद. [सं.]

**मनोरा** पु. १.आतून पोकळ असा उंच स्तंभ (दगड, चुना इ.चा). २. विहीर इ.च्या बाजूस बांधलेला दगडी खांब; बुरूज. ३. दीपस्तंभ; दीपमाळ.पहा : **मिनार** [अर. मनारा]

**मनोरा** पु. बारीक तुकडा; चीप. (व.)

**मनोराज्य** न. भावी उत्कर्षाविषयीचे कल्पनातरंग. [सं.]

**मनोरुग्ण** पु. मानसिक आजार असलेली व्यक्ती.

**मनोरोगविज्ञान** न. मानसिक रोग व त्यावरील उपचार यांच्या शास्त्रीय पद्धतीने अभ्यास करणारी ज्ञानशाखा.

**मनोविश्लेषण** न. (मा.शा.) सुप्त मनातील जाणिवांचा शोध घेऊन त्यांची व्यक्तीच्या मनोविकारांमध्ये किंवा भावनिक अस्थैर्यामध्ये काय भूमिका आहे याची चिकित्सा करणे.

**मनोवृत्ति–त्ती** स्त्री.१. मनाची स्थिती; चित्तवृत्ती; स्वभाव. २. मनाचा व्यापार, विचार, भावना, विकार इ. [सं.]

**मनोवैद्यकतज्ज्ञ** पु. मनोविकारांचा विशेष अभ्यास केलेला आणि मनोरुग्णांवर औषधोपचार करणारा तज्ज्ञ वैद्य.

**मनोहत** वि. निराश; हताश.

**मनोहर** पु. व्यंकोबाचा प्रसाद (नैवेद्य). – तीप्र २५२.

**मनोहर,मनोहारी, मनोज्ञ** वि. चित्ताकर्षक; मोहक; रमणीय; सुंदर.

**मनोळी** स्त्री. खोदण्याचे एक हत्यार. (बे.)

**मनौतर** न. प्रतिनिधित्व : ' अनंतरस गोसांविया मनौतरें अधिकारी'– वेळूस शिला. II १.२.

**मनौनि** क्रिवि. मनापासून; मनातून : 'तैसें मनौनि धनवरी। विद्यमानें आल्या अवसरी ।' – ज्ञा १६.८७.

**मनौरे–रा** न.पु. मनाची इच्छा : 'कां जे लळेयाचे लळे सरती । मनोरथांचे मनौरे पुरती ।' –ज्ञा ९.३.

**मन्या** स्त्री. मानेची मागची शीर. [सं.]

**मन्यास्तंभ** पु. मान इकडेतिकडे वळविता न येण्याचा विकार; मान धरणे.

**मन्यु** पु.क्रोध. [सं.]

**मन्वंतर** न. १. मनूचा शक; देवांचे ७१ पर्याय (युगे) किंवा ३०,६७,२०,००० वर्षे.२. काळ पालटणे; बदल.३. (ल.) (एखाद्याच्या उत्कर्षाची, वैभवाची, सत्तेची) अमदानी; बदललेला काळ; अनुकूल काळ; हंगाम.४. क्रांती :'सर्वत्र मन्वंतर फिरून जिकडेतिकडे अस्वास्थ्य, क्षणभंगुरता आणि अशाश्वती मूर्तिमंत दिसू लागली.'– गुजराथचा इतिहास. [सं.]

**मन्सब** स्त्री. भाग; वाटा. [अर.]

**मप–म** अ. गाडी, नांगर हाकताना डावीकडील बैलाला जलद चालण्याचा इशारा देण्याचा शब्द.

**मपितला** वि. परिमित; मोजका :'मपितलां बोली बोलिजे।'– माज्ञा ६.३५०. [सं. मा=मापणे]

**मफलर** पु. थंडीची बाधा होऊ नये म्हणून गळ्याला गुंडाळायचा लोकरीचा लांब पट्टा. [इं.]

**मफलीस** वि. गरीब; कामकरी वर्गातील. (सडा शब्दास जोडून सरकारी कागदपत्रात उपयोग.) [अर. मुफ्लिस्]

**मफौरा** पु. तीन पीळ असलेला गळ्यात घालण्याचा एक अलंकार : 'माणीकीं खचीत मुडे मफौरे ।'– धउ ४२. [क. मुप्पुरि=तीन पीळ]

**मबनाल** स्त्री. तलवारीच्या म्यानाची साखळी. [फा.]

**मम** वि. (अस्मद्‌ची षष्ठी विभक्ती) माझा :'मम आत्मा गमला हा।' – स्वयंवर. [सं.] (वा.)० **म्हणणे** – १. आपला म्हणणे; स्वीकारणे. २. कबूल करणे, जाणे. ३. (पुरोहित यजमानाला मम म्हणायला सांगून आपण पुढे त्याची वचने उच्चारतो यावरून) दुसरा जे म्हणेल त्याला संमती देणे.

**मम करणे** (बालभाषा) जेवण करणे; भोजन करणे.

**ममता** स्त्री. १. आपलेपणाची, आत्मीयतेची भावना; माझेपणा. २. माया; प्रेम. ३. महत्त्वाकांक्षा; अभिमान. ४. (ल.) मत्ता; संपत्ती. [सं.]

**ममतालु-ळू, ममतेशील** वि. मायाळू; दयाळू; प्रेमळ.

**ममत्व** न.१. माझेपणा. २. माया; प्रेम; ममता.

**ममरेज** पु. मंब्रेज. पहा : **टांचखिळा**

**ममी** न. स्मृतिप्रीत्यर्थ जतन करून ठेवलेले मृत शरीर. विशेषत: इजिप्तमध्ये ही प्रथा होती.

**ममुला** पु. अतिशय जाडी भाकर; रोट; रोडगा. (व.)

**मय** स्त्री. एक रानटी जनावर.

**मय** अ. एक संस्कृत प्रत्यय.१. भरलेला; पूर्ण; व्याप्त. उदा. जलमय इ. २. एखाद्या वस्तूचा, पदार्थाचा केलेला; बनविलेला. उदा. सुवर्ण-धातु-मय. [सं.]

**मयझारा** पु. हेलपाटा; विनाकारण फेरी; त्रास.

**मयत** वि. १. मेलेला. २.निर्बीज झालेले (कूळ). ३. करपलेले (पीक).

**मयदा, मयदान, मयदालकडी,मयल, मयलखोर हे शब्द मैदा, मैदान, मैल, मैलखोर याखाली पहा.**

**मयंक** पु. चंद्र :'जैसा तारांमाजी मयंक शोभायमान।'- कथा ३.३.१९. [सं.मयु (= हरिण)+अंक (= चिन्ह)]

**मया** स्त्री. मातीचा चिकटपणा. (झाडी) [सं.माख]

**मयाल-ला** स्त्री. तुळई; खांब; स्तंभ. (ना.,व.)

**मयासुरी प्रकार** (ल.) नाटकी, खोटी, घटोत्कची गोष्ट.

**मयाळ** वि. १.मवाळ. २.मायाळू:'आर्तांसीं निन्हां मयाळु।'- दाव ३९४.

**मयूख** पु. सूर्यकिरण; प्रकाशकिरण; तेज; कांती. [सं.]

**मयू(यो)र** पु. १.मोर. २. मोराचा तुरा. ३. एक वनस्पती. [सं.]

**मयूरललित (करण)** न.(नृत्य.)पाय वृश्चिक करून व पाठीमागे पुष्कळ वळवून पाठीमागेच उंच करणे,हात रेचित करणे व त्रिक वाकडे करणे.

**मयूरशिखा-शिख-शिखर** स्त्री.न. १. एक फुलझाड. २. (ल.) करडई.

**मयूरासन** न. १.मयूर सिंहासन. २. (योग.)एक योगासन. हाताचे तळवे जमिनीवर ठेवून कोपरावर शरीराचा तोल सांभाळणे. ३. (मल्लखांब) बोंडावर कोपरे बेंबीस लावून केलेले आसन. [सं.]

**मयूरी** स्त्री. १. मोराची मादी; लांडोर. २. एक प्रकारची घोड्याची चाल.

**मर** स्त्री.न.१.(पीक, झाड, लाकूड, दगड, कापड इ.चा) सडलेला, किडलेला, नाश पावलेला भाग. २. पूर्णपणे जळून गेलेले पीक. ३. पिकावरील विशिष्ट कीड .
न. कुंभार इ.च्या भट्टीतील पूर्णतः जळून गेलेले जळण.
स्त्री. मरणोन्मुख अवस्था. (क्रि. येणे, लागणे, मरीस येणे-जाणे.) (वा.) **मरी मरणे** -जिवाकडे न पाहता अतिशय काबाडकष्ट करणे.

**मरक** न. अपस्मार; फेपरे; घुरे. [सं.]

**मरकत, मरगज-ळा, मर्गज** पु. एक प्रकारचे रत्न; पाचू :'जैसा परिमळ जाहला मरगजा ।'ज्ञा ११.६०१. [सं. मरकत]

**मरकब** पु.न. १. वाहन. २. (जकातखात्यात) गाढव. [अर.]

**मरक(कु)ळी** पहा : **मर**

**मरकाड** स्त्री. अवकृपा; संकट. (व.)

**मरकाड्या** वि. अत्यंत अशक्त माणूस; रोडका; मरतुकडा.

**मरकेपणा** पु. ढोंगीपणा. (व.)

**मरखट्** स्त्री. स्मशान. (झाडी) [सं. मर+स्थल; हिं. मरघट]

**मरग** पु. पहा : **मरगी**

**मरगट्ठा** पु. (तुच्छतादर्शक) मराठा.

**मरगड** स्त्री. मरणाची साथ; मरगळ. (ना.)

**मरगण-त, मरग(क)ळ** स्त्री. थकल्यामुळे येणारी ग्लानी; थकवा.
वि. अगदी दमल्याचा बहाणा करून बैठक मारून बसलेला (माणूस, जनावर).

**मरगळणे** अक्रि. दमून,थकून जाणे; शक्तिपात होणे; आळसावणे.

**मरगळा** पु. गुलाम : 'कापुराचें कळिवर, अनळाचा मरगळा'-ज्ञागा ६५९.

**मरगळा** वि. मूर्तिमंत पुतळा. (वा.) ० **घेणे** - जागा सोडून न हालणे.

**मरगी-की** स्त्री. १.महामारी; साथीचा रोग. २. भोवळ; चक्कर; घेरी. ३. फेपरे; अपस्मार. [सं. मरक]

**मरगूत** स्त्री. १. मृत्युगती; मरणावस्था; मृत्यू. २. दुर्दैवाची पराकाष्ठा. (क्रि. येणे, भरणे, घेणे.) ३. मरगळ.

**मरचला** पु. नरम सालाच्या शेंगेचा एक प्रकार.

**मरज** पु. पाचू; मरकत.

**मरजसत्ताक्रा** पु. घोड्याचा एक रोग. हा ठेंच लागल्यामुळें होतो. - अश्वप २.२९९. [अर.मरझ]

**मरझड** स्त्री. मरणे किंवा गळणे ही क्रिया; मरामर :'म्हणून मरझड बाद होऊन तेथें दोनतीन झाडें एकत्र वाढलेलीं आढळतात.'- के ४.४.१९३९.

**मरड** स्त्री. १. कमी पाण्याची भातशेती. २. माळजमीन. [क.मलर = खडे, वाळू]

**मरडादही** न. १. साय काढून घेतलेल्या दुधाचे दही. (व.) २.घट्ट ताक. (तंजा.)

**मरण** न.१.मृत्यू; प्राण जाणे. २. (ल.) हानी; तोटा; नुकसान. न्यूनता नाही असे बेधडक सांगताना वापरतात. उदा. सोन्याला कोठेही मरण नाही. ३. मोठा धोका; संकट. ४. जिवावरची गोष्ट; प्राणाशी गाठ; प्राणसंकट. ५. अत्यंत अप्रिय, कंटाळवाणी गोष्ट.[सं.] (वा.) **० नसणे**- खात्री असणे; हमखास मिळणे. **(कोणाच्या घरी) मरणाची वाजंत्री वाजणे**-कोणत्याही संकटाला तोंड देण्यास, मरण्यास तयार असणे. **मरणामाथां-माथेस येणे, पावणे**-मरायला लागल्याप्रमाणे होणे; पूर्णपणे थकून जाणे. **मरणाला रात्र आडवी करणे, आजचे मरण उद्यावर लोटणे**-एखादा, सध्याचा कठीण प्रसंग किंवा मरण काहीतरी युक्तीने लांबणीवर टाकणे. **मरणी मरणे**-१. एखाद्यासाठी जीव संकटात घालणे. २. एखाद्याच्या सेवेत तत्पर असणे.**आपल्या मरणाने मरणे**-(स्वतःच्या दुष्कर्माबद्दल शिक्षा म्हणून) स्वतःवर संकट ओढवून घेणे.

**मरणदशा** स्त्री. कठीण प्रसंग; जिवावरचे संकट.

**मरणप्राय** न. मरणासारखे संकट.

वि. मरणाइतके दुःसह, कठीण. [सं.]

**मरणमूळ** न.१.मरणाचे बोलावणे : 'मज न्यावया आला उतावीळ। तत्काळ झाला मरणमूळ।'- कथा १.६.९१. २. (ल.) अत्यंत त्रासाचे, कष्टाचे काम; जिवावरची गोष्ट; जीवघेणा प्रसंग.

**मरणा** वि. अगदी मरायला टेकलेला; अत्यंत अशक्त; मरतुकडा.

**मरणे** अक्रि. १. मरण पावणे; वारणे; गतप्राण होणे. २. शुष्क होणे; वाळणे; कोळपणे; कोमेजणे (झाड, रोप इ.). ३.(ल.) (दिलेले कर्ज, उद्योगधंद्यात घातलेले भांडवल इ.) बुडणे; नुकसान पावणे; किफायतशीर न होणे. ४. (खेळातील गडी, सोंगटी इ.) निरुपयोगी, बाद होणे; खेळातून निघणे. ५. थंडीने कडकून जाणे; नाश पावणे. ६. (पारा, सोने इ.चा) गुणधर्म नाहीसा होणे; भस्म होणे. ७. संवेदनाशून्य होणे; बधिर, मद्द होणे. ८. आटून जाणे; नाहीसे होणे (पाणी, रक्त, रस, ओलावा इ.). ९. बरे होणे; नाहीसे होणे (खरूज, नायटा इ.). १०. (पाणी खड्ड्यात)साठून राहणे, न वाहणे.११. कंटाळवाणा होणे; फुकट जाणे; निरुपयोगी होणे (वेळ). १२. (तहान, भूक, वासना इ. वेळेवर तृप्त न झाल्यामुळे)मोडणे; जाणे; नाहीशी होणे. १३. उडणे; नष्ट होणे; लुप्त होणे (आशा, प्रीती, इच्छा, मनोवृत्ती इ.). १४. ताजेपणा, सत्त्वांश नाहीसा होणे; बेचव होणे (पाणी इ.). १५. आजाराने खितपत पडणे. १६. पराकाष्ठेचा तोटा, नुकसान सोसणे. १७. अत्यंत कष्ट सोसणे; जिवापाड काम करणे; कामाने बेजार होणे. १८. अतिशय उत्सुक, उत्कंठित होणे; उतावीळ होणे. १९. खाली बसणे; कमी होणे (धूळ). २०.(दृष्टी, नजर) नेहमी पाहिल्याने एखाद्या वस्तूविषयीचे औत्सुक्य कमी होणे; उदासीनता येणे. (वा.) **मरण्या-जिण्यास उपयोगी,कामास पडणे**- ऐन अडचणीच्या प्रसंगी उपयोगी येणे. **मरता-मरता हातपाय झाडणे**- शेवटचा जोराचा प्रयत्न करून पाहणे. **मरमरून जाणे, पडणे** - अतिशय आसक्त, उत्कंठित, उत्सुक होणे; वेडा होणे. **मरी मरणे** - जिवाची पर्वा न करता कष्ट करणे. **मरून पडणे**-(झाडावर फळांचे)अतिशय मोठे घोस, झुबके येणे. **मरोपुरेसे,मरो(रे)मरो(रे)से करणे**-सतावणे; गांजणे; अत्यंत त्रास देणे. **मेल्याचा पाड जाणे, होणे**-१. हलका समजला जाणे; मान्यता कमी होणे. २. गोंधळणे; गर्भगळित होणे.

**मरत** वि. मेलेले; मृत.

**मरतडणे** अक्रि. मरण्याच्या बेतात असणे; मरायला टेकणे.

**मरतबा** पु. दर्जा; पदवी; योग्यता.

**मरतमडे-ढे** न. अतिशय अशक्त मनुष्य; मरतुकडा.

**मरतवड-डा, मरवड** स्त्री. पु. मरणाची साथ. (क्रि. येणे)

**मरतवांझ-ज** स्त्री. १.जिची मुले लहानपणी मरतात अशी स्त्री. २. मरताना एकही मूल जिवंत नसलेली स्त्री. (कऱ्हाडी)

**मरतसं(सां)भाळ** पु. १. मरायला टेकलेले माणूस, पशू इ.ची शुश्रूषा. २. प्रेमपूर्वक केलेले संगोपन; आस्था; काळजी. (क्रि. घेणे) ३. कोणत्याही गोष्टीचा केलेला अतिरेक (जेवणे, झोपणे, बसणे, लिहिणे इ.चा); शेवटपर्यंत पिच्छा पुरविणे. (क्रि. घेणे)

**मरताक** न. १.मृताची और्ध्वदेहिक क्रिया; दिवस. २. मरण; मृत्यू. ३. मृत मनुष्य; प्रेत; मुडदा. (कुण.) [सं.मृतक]

**मरती रात्र** ऐन रात्रीचा समय. (आपले म्हणणे खरे आहे हे दाखविण्याचे प्रमाण).

**मरतुकडा, मरतुं(तं)गडा** वि. अगदी अशक्त; रोडका; मरतमढे.

**मरतेली** स्त्री. पुढले अपत्य मरू नये म्हणून करायचा मांत्रिक उपाय. (झाडी)

**मरद, मरदगाजी, मरदमाणूस, मरदा, मरदाना, मरदाई, मरदानी इ. शब्द मर्द, मर्दगाजी इ.मध्ये पहा.**

**मरदणे, मरदळणे** सक्रि.१.पहा : **मर्दणे** १. २. (आकाश ढगांनी) आच्छादित होणे; व्यापणे. [सं. मर्दन]

**मरफा** पहा : **मर्फा**

**मरफेकरी, मर्फाची** पु. मरफा वाजविणारा.

**मरमत** पहा : **मरामत**

**मरमर** स्त्री. १. अविचाराने धोक्याच्या परिस्थितीत, प्राणावरच्या संकटात शिरणे; फाजील धाडसी वृत्ती (वेडा, कैदाशीण इ.ची). (क्रि. येणे, लागणे, घेणे.)२. उपहास; टवाळकी. ३. कुरकुर. ४. कटकट. (वा.) **० घेणे** -१. अत्यंत क्षीण, मरणासन्न होणे. २. मरणाची धास्ती घेणे.

**मरमरा, मरवडा** पु.१. पहा : **मरमर** १. २.(निंदार्थी)पराकाष्ठेचा अशक्तपणा; मरणप्राय स्थिती.

**मरल-ळ** पु. स्त्री. गोड्या पाण्यात राहणारा एक चांगल्या प्रतीचा, किमती मासा.

**मरवडा** पु. अपशब्द : 'ती सदूलाच मरवडे घालून त्यालाच बदाबद मारी.'- नादनि.

**मरशा, मरसिया** पु. शोकगीत. (विशेषतः हसन आणि हुसेन यांच्याविषयी मुसलमान लोक मोहरमात गातात ते गीत.) [अर. मर्सिय]

**मरस मरे** क्रिवि. अत्यंत श्रमाने; कष्टाने.

**मरहूम** वि. माजी; मृत; कैलासवासी. [अर.मर्हूम]

**मरळ** पहा : **मरगळ**

**मरळ** पु. गोड्या पाण्यातील, प्राणिभक्षी माशांची एक जात.

**मरळदंडी** स्त्री. गर्भाधानाचा दुसरा दिवस. (बे.) [क.]

**मरळा** वि. अतिशय थकलेला; अशक्त : 'पाहतां दिसतो गोठ्यांतिल पशु बैल तसा मरळा ।'ह्व देप ९९.

**मराठ** पहा : **मऱ्हाट-टा-टे**

**मराठमोळा** पु. १. मराठे लोकांतील चालीरीती; (समुच्चयाने) बाळबोध वळण. २. (विशेषतः) मराठ्यांतील बुरखा, पडद्याची चाल; कुलीनपणा; जुने वळण.

**मराठा** वि. १. मराठी राज्य, प्रांत, लोक इ.संबंधीचा; महाराष्ट्रीय. २. महाराष्ट्रातील क्षत्रिय वर्णातील जात.

**मराठी** वि. (नामासारखा उपयोग)१. महाराष्ट्रातील मुख्य प्रचलित भाषा. २. महाराष्ट्रीय; मराठे लोकांसंबंधीचा; मराठी माणसांचा.

**मराठे तीळ** तांबूस रंगाचे तीळ. यास पुरबय्या तीळ असेही म्हणतात.

**मराड** पु. पावसाळ्यात भिजल्यामुळे निरुपयोगी झालेला छपरावरचा पेंढा.

**मराडी** वि. केंबळी; पेंढ्याने शाकारलेली (घरे).

**मरात(ती)ब** पु. स्त्री. १. (विद्या, पराक्रम, इ.बद्दल) पदवी; सन्मानार्थ

योजण्याचा शब्द :'राजे असा मरातीब मेळविला.'- मइसा ४.२३. २. दर्जा; बहुमान :'त्यांचा मरातब दादासाहेबांनी वाढविला.'- मइसा १९.९१. ३. (अव). गोष्टी; मजकूर :'लिहावयाचे मरातब बोलण्यांत येतील त्याप्रमाणें तुम्ही लिहावें.' -मइसा ५.१५६. [अर. मरातिब्]

**मरामत, मरम(म्म)त** स्त्री. १. चांगल्या स्थितीत राखणे; दुरुस्त ठेवणे. २. दुरुस्ती; डागडुजी; निगा; सांभाळ. (क्रि. राखणे, करणे.) ३. नांगरणे, खत घालणे इ. (शेताच्या मशागतीतील); (कणीक) तिंबणे; घोळसावणे; (चिखल) तुडविणे; (रेशीम) कातणे; स्वच्छ करणे; (मिश्रण बनविताना) मिसळणे, मर्दणे, वाटणे इ. अनेक कामे (समुच्चयाने). ४. (चुकीने) करामत; खुबी; चातुर्य. ५. (चुकीने) मरातब. [अर. मरम्मत]

**मरार्** पु. माळी. (झाडी)

**मराल-ळ** पु. हंस पक्षी :'आले दैवें कदाचित मराळ ।'- मोकर्ण २८.१७. [सं. मराल]

**मराळिका-ळी** स्त्री. १.हंसी. २. देवी; देवता. ३. सुंदर, नाजूक स्त्री.

**मरांदा** पु. कोंब आलेल्या नारळात बनलेला मगज. (राजा., कु.)

**मरिगळ-ळा** स्त्री. आकार; आकृती; मूर्ती : 'सकल देखिलें रणमंडळ । परि न देखे दक्षमरिगळ।' -कथा ३.१४.२०५.

**मरी** स्त्री. १. साथ (पटकी इ.ची); महामारी; जरीमरी. २. आसन्नमरणाची स्थिती; मरणदशा. [सं. मरक]

**मरीआई** स्त्री. मृत्युदेवता; साथीची देवता. (वा.) **मरीआईचा गाडा येणे**- मोठे संकट येणे.

**मरीच** न. काळी मिरी :'जीरे, शुंठी मरीचे हळदि बहुतशी हिंगही दारचीनी।' - सारुह ३.४८. [सं.]

**मरीयल, मरेल** वि. निस्त्राण, मरतुकडा (मनुष्य). (ना.)

**मरु** पु. १. मारवाड देश.२.निर्जल, रेताड प्रदेश; वाळवंट.३. एक पर्वत. [सं.]

**मरुआ** स्त्री. एक प्रकारचे धान्य; नाचणी.

**मरुजलभूमि-मी, मरुशाद्वल** स्त्री. वाळवंटातील पाणथळ जागा; (इं.) ओॲसिस.

**मरुत्** पु. वायू; वारा. [सं.]

**मरुदेश-धन्व-भूमि-मी** पु. स्त्री. पहा **मरु** १,२

**मरूळ** वि. वाळूमिश्रित; पुळणवट; रेताड.

**मरूळफडाची** वि. दोन नद्यांच्या संगमाजवळच्या बेचक्यांतील सोंडाची-चिंचोळी (जमीन).

**मरोड** पहा : **मरवड**

**मरोड, मरोडकानवला,मरोडशेंग, मरोडणी, मरोडणे** पहा : **मुरुड** इ.

**मरोडा** पु. १.पोटदुखी; मुरडा. २. जनावरांना होणारा साथीचा रोग; मरी.

**मर्कट** पहा : **माकड**

**मर्क्युरी** न. पारा; पांढऱ्या रंगाचे, जड व तापमापकात वापरले जाणारे द्रवरूप मूलद्रव्य. (हे 'सिन्नाबार'मध्ये नैसर्गिकरीत्या आढळते.)[इं.]

**मर्कब** स्त्री. घोडी.

**मर्ग** पु. मृत्यू. - ऐको.

**मर्गळ** वि. अडाणी.

**मर्जी** स्त्री. १. संमती; इच्छा; आवड; पसंती. २. सुप्रसन्नता; कृपा; लोभ. ३. स्वभाव; तब्येत; अंतःकरणवृत्ती. ४.रक्षा; रखेली; ठेवलेली (स्त्री). पु. ज्याच्यावर विशेष लोभ आहे असा; ठेवणाईत; आश्रित. [अर. मर्झी]

**मर्तकी** स्त्री. माती. [सं.मृत्तिका]

**मर्तबत, मर्तबा** स्त्री.पु. मान्यता; दर्जा; पदवी; योग्यता.

**मर्त(र्द)बाण-न, मर्तवान** न. १. चिनी मातीचे भांडे. २. बरणी. ३. लढाईचे एक हत्यार.

**मर्तबान** न. ऊद किंवा धूप जाळण्याचे पात्र.

**मर्तिक** पु. अंत्यसंस्कार. [सं. मृतक]

**मर्त्य** पु. मनुष्य; मानव. वि. मरणशील; मरणारा; मरण ही प्रकृती असणारा. [सं.]

**मर्द** पु. १. पुरुष. २. शूर, पराक्रमी, हिंमतवान मनुष्य. ३. नवरा; यजमान; स्त्रियांकडून आपल्या नावापुढे व नवऱ्याच्या नावापूर्वी वापरण्यात येणारा शब्द. ४. रखेलीकडून (महारीण, कैकाडीण) आपल्या यजमानाच्या (विशेषतः मुसलमान) नावापूर्वी पत्रात वापरला जाणारा शब्द.[फा.]

**मर्दई,मर्दपणा** स्त्री.पु. १. धैर्य; धीटपणा; शौर्य; पराक्रम; पौरुष. २. शौर्याची, पराक्रमाची कृत्ये.

**मर्दगाजी** पु. शूर, मर्द गडी; पराक्रमी माणूस.

**मर्दजान** वि. गुडघ्यात दुसरे हाड असणारा (घोडा). असा घोडा खराब समजतात.-अश्वप १.१०४.

**मर्दणी** पु. अंगमर्दन करणारा : 'मग आफाविले मर्दणी'- उह ७६. [सं.मर्दन]

**मर्दणे** सक्रि. १.चोळणे; चेपणे; रगडणे इ.; मर्दन करणे (तेलाने अंग, वाळूने फळा इ.). २. ठार मारणे: 'तो करावया वेदोद्धार । म्यां मर्दिला शंखासुर ।'-एभा २१.३७३. [सं.मर्दन]

**मर्दन** न. १.चोळणे; तेल, औषधी लेप इ.ने शरीराला मसाज, संवाहन करणे. २. मऊ करण्याची, चूर्ण करण्याची क्रिया; चुरडणे, कुटणे, दळणे, रगडणे इ. ३. कत्तल; ठार मारणे; नाश. [सं.]

**मर्दना** स्त्री. स्नान; न्हाणे.

**मर्दन्या** पु. अंग रगडणारा.

**मर्दल-ळ** पु. एक वाद्य; तबला. [सं. मर्दल]

**मर्दवाण** न. लिप्तपात्र; उटीचे भांडे. पहा : **मर्दबान** [फा.]

**मर्दा, मर्दाना** वि.१. शूर; धैर्यवान. २. पुरुषी. [फा.]

**मर्दान** पु. अव. माणसे. [अर.]

**मर्दानगिरी, मर्दानगी, मर्दी, मर्दुमकी, मर्दुमी** स्त्री. शौर्य; पौरुष; साहस. [फा.]

**मर्दाना** पु. न्हावी. (तंजा.)

**मर्दानी-णी** वि.१.पुरुषांना योग्य, साजेसे(वस्त्र, पोशाख इ.). २. पुरुषी; पुरुषांचा (आवाज इ.). ३. पुरुषी आवाजाची जरुरी असलेले (गाणे इ.). ४. पुरुषासंबंधी. ५. अंगमेहनतीचा, पराक्रमाचा, ताकदीचा.

**मर्दामर्दी** स्त्री. पहा : **मर्दानगिरी, मर्दानगी**

क्रिवि.१. धिटाईने; शौर्याने. २. पुरुषी धडाडीने; उत्साहाने. ३. अतिशय श्रमाने, कष्टाने. ४. मोठ्या जुलमाने; संकटाने.
**मर्दुम** पु. मनुष्य; माणूस. [फा.]
**मर्फा** पु. लहान टिमकी, नगारा. यावर टिपरीने ठोका मारून ताशाच्या मेळामध्ये तालाची लय दाखवतात : 'तासे मर्फे ते अंबूर किती वाजती।'– ऐपो ११९. [फा.]
**मर्म** न. १. गूढ शक्ती; सुप्त गुणधर्म; कार्यसाधक गुण. २. (शरीरादिकाचा) नाजूक भाग; अवयव; जिव्हाळी; वर्म. ३. छिद्र; उणेपणा; व्यंग : 'मर्म उघडितां, मानी पुरुष बुडाले त्रपेंत, जड तरले।'– मोआदि २४.४७. ४. रहस्य; गूढार्थ; आतला हेतू (भाषण, लेख इ.चा); तात्पर्य. ५. मेख; मुद्दा; खोच; रोख. ६. कला; खुबी; गूढविद्या; युक्ती; गुरुकिल्ली (एखादे कोडे, रचना, क्रिया, धंदा इ.ची). ७. शत्रू; नाशक; भंजक; विरुद्ध आणि प्रतिक्रिया करणाऱ्या गुणांची वस्तू. [सं.]
**मर्मग्राही** वि. पारखी; चोखंदळ; चिकित्सक.
**मर्मदा** स्त्री. हळदकुंकू, अक्षता यांनी भरलेला मळवट.
**मर्मदृष्टी** स्त्री. विषयाचा गाभा समजण्याची नैसर्गिक क्षमता.
**मर्मबंध** न. प्राणतत्त्व.
**मर्मभेद** पु.१. नाजूक भागावर केलेला आघात; जिव्हाळी झालेली जखम. २. (ल.) जिव्हारी लागणे, झोंबणे. ३. कट, युक्ती, बेत शोधून काढणे; खुबी, रहस्य हुडकणे; बिंग बाहेर काढणे. ४. एखाद्याचा उणेपणा, व्यंग, दोष इ.चा स्फोट करणे; एखाद्याच्या मनाला झोंबेल अशा गोष्टी उघड करणे.
**मर्मभेदक–भेदी–वेधक–वेधी–स्पृक्** वि.१. जिव्हारी स्पर्श करणारा. २. नाजूक भागाला जखम करणारा. ३. (अक्षरशः व ल.)बिंगे उघडकीला आणणारा.
**मर्मर** पु. संगमरवरी दगड; आरसपान. [फा.;ग्रीक]
**मर्मस्थल–स्थान** न. १. नाजूक भाग; जिव्हाळी. २. (ल.) दोष, उणीव असलेले स्थान; व्यंग.
**मर्मज्ञ** वि. १. मर्म, गूढ, खुबी जाणणारा. २. अत्यंत कुशल, निपुण; पंडित.
**मर्मी** वि. पहा : **मर्मज्ञ**
क्रिवि. मर्मभेदी; भेदक; झोंबणारे; टीकात्मक (भाषण).
**मर्यत–ल, मऱ्या** वि. अत्यंत अशक्त; मरतुकडा. [हिं.]
**मर्याद** शअ. पावेतो; पर्यंत; अखेर.
**मर्याददृष्टी** स्त्री. नजरकैद; साधी अटक : 'रायें पाचारुनि तंत । मर्याददृष्टित ठेविलें ।'– ज्ञाप्र १०१७.
**मर्यादरेषा** स्त्री. हुतूतूच्या मैदानातील प्रत्येक अर्धभागात मारलेली रेषा.
**मर्याद(दा)वेल,मारवेल** स्त्री. समुद्रकाठची एक वेल : 'जैसी मर्यादावेल उल्लंघून। प्रवेश न करी समुद्रजीवन ।'– भवि.
**मर्यादशीर–ल–ळ** वि. सभ्यपणाने वागणारा; शिष्टाचार न मोडणारा; विनीत; अदबशीर.
**मर्यादा** स्त्री.१.(स्थल, काल, क्रिया इ.ची) सीमा; शेवट; हद्द. २. (ल.) संप्रदायसिद्ध किंवा शास्त्रसिद्ध रूढी; बंधन; नियम; अट. ३. शिष्टाचार; वर्तनाचा योग्यपणा; व्यवस्थित, सभ्य वागणूक .(क्रि. मोडणे, येणे, राखणे, सोडणे इ.)[सं.] (वा.) ० **खुंटणे**–आयुष्य संपणे.
**मर्यादित** वि. नियमित; सीमित; बंदिस्त.
**मऱ्यानी** वि. बागाईत. (झाडी) [ते. मर]
**मऱ्यान्** पु. झाडीयुक्त जमीन. (झाडी)
स्त्री. घरामागील लहान वाडी. (चंद्रपुरी)
**मऱ्हाट–टा–टे** वि. सरळ; सोपा; प्राकृत; सुगम.
**मऱ्हाटा** पहा : **मराठा** इ. [ते. मर]
**मऱ्हाटे** न. मराठ्यांचे राज्य; अमदानी.
**मल** पु.१.अयोग्य स्पर्श. २.निषिद्ध काम करण्याची इच्छा. पहा : **मळ** [सं.]
**मलई–यी, मलाई** स्त्री. साय; दूध इ. पदार्थांवरील पापुद्रा. [हिं.]
**मल(ल्ल)ई** स्त्री. १.दांडगाई; धिंगामस्ती; बखेडा; बंडावा; दंगा. (क्रि. करणे, मांडणे, माजविणे.): 'कोळ्यांनीं सन तिसांत मलई करून सरकारचा मुलुख खराब केला.'– थोमारो १.२४५. २. गोंधळ; आरडाओरड; दंगल; गडबड (जमाव, सभा इ.ची). ३. मनुष्यांचा अव्यवस्थित घोळका; संकर (सर्व जातींचा, सोवळे–ओवळे इ.चा); गर्दी : 'त्यास धर्माधिकारी ब्राह्मणास मिळून मलई करितात.'– वाडसमा ३.१२०. ४. (यावरून) खाणावळ; भटारखाना इ. [फा. मला=जमाव]
**मल(ळ)ईखोर** वि. दंगेखोर.
**मल(लि)कंबरी** वि. मलिकंबराच्या अमदानीत सुरू झालेली (मोजणी, दर, धारा, शिरस्ता, तनखा, कमाल इ.).
**मलकुंड–डी** न. स्त्री. जीवाणूंद्वारे मलशुद्धीकरण करण्यासाठी जमिनीखाली बांधलेली टाकी; सांडपाणी, मलमूत्र टाकण्यासाठी जमिनीत खणलेला खड्डा किंवा टाकी.
**मलगंडा** पु. अव्वल माल. (व.)
**मलगा** वि. १. कमी तिखट भाजी. २. निस्तेज चेहरा. (झाडी)
**मलजा** स्त्री. एक प्रकारचा दृष्टिक्षेप : 'सौम्या सवीया सीतळ : परी ध्यानस्ते तीयेचेंचि बळ : मलजे मिळौनि सीधी नेती सळ : रसराजाचें' – मूप्र २१६८.
**मलणी** न. कूट; कारस्थान : 'सामादिक मंडळीत व मुत्सद्दीयांत मातोश्रीचे मलणीत कोण व राजश्रीकडे कोण हे तपसीलवार लिहीणें.'–ऐको६४९.
**मलतंडी** स्त्री. जोंधळ्याचे हलके पीक.
**मलद्वार** न. ज्या वाटेने विष्ठा पडते तो शरीराचा भाग; गुद.
**मल:निस्सारण** न. सांडपाणी शहराबाहेर वाहून नेण्याची क्रिया.
**मलपणे** अक्रि.१. डुलत चालणे (विशेषतः मूल). २. (सामा.) लोळणे; इकडून तिकडे हालणे; डोलणे. ३. थलथलणे; हालणे :'लवथवित मलपे दोंद । वेष्टित कट्ट नागबंद ।' – दास १.२.१६.
**मलपी** स्त्री. डोळ्याची पापणी. (कु., हेट.)
**मलपृष्ठ** न.१. पुस्तकावरील आवरणाचे मागचे पान. २. पुस्तकाचे पहिले कोरे पान.
**मलम** न.पु.जखम, खरूज इ.वर लावण्याचे स्निग्ध औषध; अंजन; लेप.
**मलमपट्टी** स्त्री. १. जखम इ.वर मलम लावण्यासाठी वापरण्यात येणारी कापड, कागद, पान इत्यादीची पट्टी. २.(ल.) तात्पुरता उपाय.

**मलमल-ली** स्त्री. तलम पोताचे कापड. [हिं.]

**मलमा** पु.१. पडक्या घराचे दगड, विटा, चुना इ. अव्यवस्थित पडलेले सामान. २. विहिरीतील गाळ (दगड, माती इ.). ३. (मलमाला उपयोगी असे) वाशेरे, वासकट तूप.

**मलमास** पु. अधिक महिना; धोंडा महिना. [सं.]

**मलयाग(गी)र** पु. मलय पर्वतावरील चंदनाची एक उंची जात . [सं. मलय+अगरु]

**मलयातल** क्रिवि. भव्य.

**मलवस्त्र** न. केरकचऱ्यापासून रक्षण करण्यासाठी घातलेले वस्त्र (देवाची मूर्ती इ.वर); गवसणी; खोळ.

**मलशुद्धि-द्धी** स्त्री. पोटातील मळाचा उत्सर्ग झाल्यामुळे होणारी आतड्याची शुद्धता; शौच.

**मलस्नान, मलापकर्षस्नान** न. केवळ शरीर स्वच्छ करण्यासाठीच केलेले स्नान.

**मलंग** पु. फकिरांचा एक पंथ; दरवेशी. [हिं.]

**मलाऊ** पु. बंडखोर; मलई करणारा.

**मलाड** न. मावळ प्रांत.

**म(ब)लामत** स्त्री. ब्याद :'आम्ही पाटील बावाकडे सांगून पाठविलें कीं ही मलामत आमचे डेऱ्यांतून घेऊन जावी.'- ऐको ६४९.

**मलार** स्त्री. १. शिसारी. २. मळमळ. (झाडी) [सं. मल]

**मलावरोध, मलावष्टंभ** पु. शौचास साफ न होणे; बद्धकोष्ठता.

**मलाशय, मलाचा कोठा** पु. आतड्यातील मलाची पिशवी; मलमार्ग.

**मला(ल्ला)ह** पु. नावाडी; खलाशी. [अर. मल्लाह]

**मलि(ली)क** पु. राजा; मालक. [अर.]

**मलिदा** पु. १. दूध, साखर, लोणी इ. पदार्थ कणकेमध्ये घालून पिरासाठी केले जाणारे पक्वान्न. २. (ल.) तिंबलेली, मळलेली, ठेचलेली वस्तू. ३. खुराक; पौष्टिक अन्न. (क्रि. करणे इ.).[फा. मलिदा] (वा.) ० **चारणे** - लाच देणे.

**मलि(ली)न** वि. १.घाणेरडा; मळलेला; खराब. २. पातकी; आचारहीन :'मलिन कुटिल नीरस जडअजड पुनर्भवपणें हि कच साच।'- मोआदि ३.६४.३. अपवित्र; अमंगल; आत्मशुद्धतेकडे दुर्लक्ष करणारा.४. अस्पष्ट; निस्तेज; स्मरणात नसलेली (उजळणी न केल्याने विद्या इ.).

**मलुहाकेदार** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर.

**मलूल-र** वि.१. क्लांत; निस्तेज; कोमेजलेला; उदास. २. खिन्न; शोकग्रस्त. ३. अशक्त; कमजोर; गरीब; निर्वीर्य(प्राणी, मनुष्य). ४. नादुरुस्त (अवयव). ५. मऊ; नरम; निर्जीव (कातडे). [अर.]

**मलेथी** स्त्री. ज्येष्ठमधाचे मूळ.

**मलेरिया** पु. डास चावून येणारा हिवताप. [इं.]

**मल्गा** वि. १. कमी तिखट (भाजी). २. निस्तेज (चेहरा) [सं. मध्यम]

**मल्या** पु. गोड पाण्यात राहणारा एक मासा.

**मल्ल** पु. १. पहिलवान; जेठी. २. मुष्टियुद्ध करणारा. ३. (ल.)धडधाकट; धट्टाकट्टा, मजबूत, जोमदार मनुष्य. [सं.]

**मल्ल** पु. नावाडी. [अर. मल्लाह]

**मल्लक्रीडा-युद्ध** स्त्री. आखाड्यातील कुस्ती; डावपेच; मुष्टियुद्ध.

**मल्ल(ल)खांब** पु. शारीरिक कसरतीसाठी जमिनीत पुरलेला वाटोळा, उंच, गुळगुळीत खांब.

**मल्लगिरी** स्त्री. पहिलवानाचा पेशा, धंदा.

**मल्लप** पु. बाहू; भुजा :' तांबोळांचे उगाळ पडिले : मल्लपांवरी' - शिव ७१६.

**मल्लभू** स्त्री.१. कुस्ती इ. खेळण्यासाठी केलेली जागा; आखाडा. २. (ल.) युद्धक्षेत्र; रणभूमी.

**मल्ला** पु. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. - अश्वप २.२८२.

**मल्लारा(शा)ई** वि.१. मल्हारराव रास्ते यांनी पाडलेली (नाणी-रुपया इ.). २. मल्हारराव रास्ते यांच्या राज्यासंबंधी.

**मल्लिका** स्त्री. १.पाय व चोच पिंगट असणारा हंस.२. पांढरी जाई; मोगरा.

**मल्लिकार** पु. सैन्याचे ठाणे : 'मकरंदाचे मल्लिकार : तैसे आळले रतिकेशर'- रुस्व ८१०.

**मल्लिकाक्ष** वि. ज्याच्या डोळ्यातील बाहुली काही काळी व काही पांढरी अशा रेषेने वेष्टिली आहे असा (घोडा).- अश्वप १.२१.

**मल्लिनाथी** स्त्री. ( मल्लिनाथ नावाच्या प्रसिद्ध संस्कृत टीकाकाराने अनेक उत्तम टीका लिहिल्या आहेत, यावरून) टीका; स्पष्टीकरण; विस्तार.

**मल्ली** वि. समर्थ.

**मल्लु-ल्लू** पु. वानर; माकड. (ना.,व.)

**मल्लू** वि. मळकट. (व.) [सं.]

**मल्हार** पु. (संगीत) एक राग. पावसाची आराधना करण्यासाठी गातात. याचे सात प्रकार आहेत.

**मवणी** स्त्री. १. गणना; मोजणी; माप: 'सूनि मांस घे मवणियां । जीवितेंसि'- ज्ञा १७.४२२. २. घोकणी. [सं.मापन]

**मवणे** सक्रि. १. लिहून ठेवणे; दाखल करणे :'सिसे वेंचि तया मविली। वही जेवीं।'- ज्ञा १८.९१२. २. मोजणे :'साउली वरी न मववे ।'- अमृ ५.२६. [सं. मा-मापय]

**मवल** क्रिवि. मोजके : 'मितलां बोलीं बोलिजे । मवलां पाउलीं चालिजे' - ज्ञा ६.३५०. [सं.मा,मित]

**मवळिणे** क्रि. मऊ, मृदू करणे.

**मवाई-ळी** वि. मऊपणा; मृदुता.

**मवाग-गी-ग्नी** स्त्री. पु. मंदाग्नी; सौम्य आच. (क्रि. टाकणे इ.)

**मवागी-री** स्त्री. १. लोणी इ. स्निग्ध पदार्थ. २. तुपावरचा कणीचा पापुद्रा. ३. (चर्म.)कातडे कमावण्याच्या क्रियेत लावण्याची दही, हळद इ. द्रव्ये समुच्चयाने. पहा : **गोरसन**

**मवागीत** वि.क्रिवि. सौम्य; मंद (विस्तव, आच); शेक लागेल असे.

**मवाज(जी)न** पु. मशिदीत बांग पुकारणारा; मोआजीन. [अर. मुअझ्झिन]

**मवाजनी** स्त्री. मवाजनाची वृत्ती; काम.

**मवाजने, मवाजनवीस** पु. मूळ लेखावरून ताडून पाहून प्रत दप्तरी लावून ठेवणारा. [अर. मुवाझना]

**मवाजा-ज्या** पु. चर्चा; ऊहापोह : 'तुम्हीं आम्हीं बसून तहनाम्याचा

मवाज्या करूं.'- मइसा ५.७. [अर. मुवाझआ]
**मवाफा** पु. चांदोबा; चंद्र; चांदवा.- भाषाप्रकाश.
**मवाली** वि. गुंड; उडाणटप्पू; पुंड. [सिं.; अर. मौला]
**मवाशी-सी** स्त्री. लुटारूपणा; लुटारूंची राहणी, सरणी. - पया ८३. पु. पहा : **मवास** २ [अर. मुआसी]
**मवास** पु. १. लुटारूंच्या टोळीचा नायक; स्वतंत्र अधिपती, राजा इ. : 'परंतु जमीनदार मवास मोठमोठे आहेत.'-इमं २६१. २. लुटारू; बंडखोर; चोर : 'संपत्तिस तो मवास येउनि ।...'- अमृत २७. ३. अनिर्बद्ध वागणारे, आडदांड, बदमाश लोक, भटकणारी गुरेढोरे इ. ४.लुटारूंची टोळी. [अर. मुआसी]
**मवासा** पु. बंड; पुंडाई.
**मवाळ** वि.१. तेल इ. स्निग्ध पदार्थ लावल्याने नरम पडलेले. २. (ल.) आकर्षक; हळुवार; मृदू (भाषण, वागणूक, स्वभाव इ.). ३. मऊ; मृदू; नरम. ४. समुद्रकाठची , खारे पाणी आत येऊ नये म्हणून बांध घातलेली, खार जमिनीतील मऊ असलेली (जमीन). ५. राजकारणात सरकारच्या धोरणास विशेष विरोध न करणारा; प्रागतिक; शासनाजवळ नम्रपणे न्याय, दाद मागणारा (पक्ष). [सं. मृदुल]
**मवाळी** स्त्री. १. तेल, लोणी इ. त्वचा मऊ करणारा पदार्थ; मवागी. २. ( ल.) मऊपणा; सौम्यपणा; मार्दव; नरमाई.
**मवाळे** न. हत्तीच्या दातांना घातलेले कडे; कट; वेढे; शेंबी.
**मविता** वि.मोजणारा : 'साउलीवरी न मववे । मविते जैसें।'- अमृ ५.२६.
**मवेशी** स्त्री. १. हक्काचा माल; मालमत्ता :'आपण मवेशी नेली असेल ती देवावी.'- मइसा २२.३९. २. गुरेढोरे. [अर.]
**मव्रसी** वि.वडिलोपार्जित. (झाडी) [हिं.]
**मव्हर** पु. पुढारी; अग्रणी; म्होरक्या. (व.) [सं. मुखर]
**मव्हरे, मवरे** वि. पुढे; समोर; भविष्यात. (अहि.)
**मश(स-श्य)क** पु.१. चिलट; डास; मच्छर. २. (ल.) कःपदार्थ :'द्वारका पाहतां वाडे कोडें...। मशक त्यापुढें सत्य लोक।'- एरुस्व ३.१४. [सं. मशक]
**मश(स)क** न. १.पाणी ठेवण्याची चामड्याची पिशवी; मेंढ्याच्या कातड्याची पखाल. २. एक वाद्य. ३. पोट [अर. मश्क्]
**मशगूल,मश्गूल** वि. तत्पर; गढलेला दंग; चूर. [अर. मश्घूल]
**मशहूर, मश्हूर** वि. प्रख्यात; प्रसिद्ध. [अर. मश्हूर]
**मशाग(क)त** स्त्री. १.मेहनत; परिश्रम; श्रम. २. सेवा; चाकरी :'तैसेच अण्णाजीपंत यांणीं मोठी मशागत केली...'- चित्रगुप्त ५. ३. मजुरी; वेतन. ४. काबाडकष्ट करून, अत्यंत परिश्रमाने (शेत इ.) तयार करणे. ५. निगा; काळजी. [अर. मशक्कत]
**मशागती** वि. १. मशागत करणारा; कष्टाची कामे करून पोट भरणारा; मजूर. २. कष्टाळू; उद्योगी; कामसू; मेहनती.
**मशारनिले-ल्हे, मशार्निले-ल्हे** वि. वर सांगितलेला; उपरिनिर्दिष्ट (मजकूर); पूर्वोक्त : 'सालगुदस्तांपासून मशारनिलेचा अमल मोगलाकडे दिला.'- थोमारो १.१३. [अर. मशारून्-इलैह्]
**मशाल** स्त्री. काठीच्या टोकाला चिंध्या गुंडाळून केलेली दिवटी; टेंभा; हिलाल. [अर. मश्अल्] (वा.) **० पाजळणे, दिवसा लावणे** - प्रसिद्धी पावणे; विशेषतः आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करणे.
**मशालची-जी** पु. मशाल, दिवटी धरणारा; दिवट्या. [अर. मश्अल्ची]
**मशिंग** पु. शेवग्याचे झाड. (गो.)
**मशी** स्त्री. पाने खाऊन काड कमजोर करणारी बाजरीवरील कीड. (गुज.) [सं. मषी]
**मशी-षी** स्त्री. १. काळी शाई. २.काजळी. ३. चुलीवर ठेवलेल्या भांड्याच्या बुडावर जमणारा थर. ४. जळलेले चिरगूट, कागद इ.ची राख. [सं.मषी]
**मशी(सी)द** स्त्री. १. मुसलमानांचे प्रार्थनामंदिर. २. (ल.) ज्यात कोणी राहत नाही असे रिकामे मोठे घर, वाडा इ. भयाण जागा. ३. चुन्याने नुसती पांढरी केलेली जागा. [अर. मस्जिद्]
**मशीन** न.१.यंत्र; उत्पादन वाढवणारे, ऊर्जेवर किंवा साध्या बळावर चालणारे उपकरण. २. शिलाईकामासाठी वापरण्याचे यंत्र. [इं.]
**मशीनगन** स्त्री. गोळ्यांचा मारा करणारी स्वयंचलित बंदूक. [इं.]
**मशी(शे)री** स्त्री. १.पहा: **मशी.** २.तंबाखू जाळून केलेले दातवण. (कु.)
**मश्रू** न.नमाज पढताना निषिद्ध गणले जात नाही असे गभरेशमी कापड. [अर. मश्रूअ]
**मश्वरा** पु. सल्लामसलत. [अर.]
**मस** पु. शरीरावरचा लहान काळा ठिपका; तीळ; चामखीळ. [सं. माष]
**मस** स्त्री.१. काजळ; पहा : **मशी** ३ :'कां अंधारासि मसीं माखिलें।'- एभा २१.१८६. २.(ल.)डाग; कलंक. [सं. मषी]
**मसक** क्रिवि. (संगीत) गाताना किंवा वाजविताना एकदम जलदीने वरील तिसऱ्या स्वरावर जाणे.
**मसक** पु. चिलट.
**मसकणे** अक्रि. तुकडे-तुकडे, चुरा होणे (पोळी इ.चा). (सामा.) जाणे या क्रियापदाबरोबर उपयोग.
**मसकणे** (विरू.) पहा : **मुसकणे, मुसकटणे**
**मसकना** सक्रि. दाबणे; मळणे; खाणे. (झाडी)
**मसकभिस्ती** पु. खांद्यावरून पखाल वाहणारा भिस्ती.
**मसका, मस्का** पु. १. लोणी. २. मिश्रण. [हिं. मस्का; फा. मस्क]
**मसकूट** क्रिवि. अत्यंत, अतिशय, फार ह्या अर्थी काळा या शब्दास जोडून येणारा शब्द.
**मस(सा)ण-न, मसणवट-टा-टी-कुटी** न.स्त्री.पु. प्रेते जाळण्याची किंवा पुरण्याची जागा; स्मशान. [सं. स्मशान](वा.)**० उठणे** - युद्ध, दंगल, आग इ.प्रसंगी असंख्य लोक मारले जाणे. **० जागविणे**- स्मशानातील पिशाचांना उठवून त्यांना काही अद्भुत करायला सांगणे. **० माजणे**-(शेत, गवत इ.) अतिशय दाट वाढणे. **मसणात गोवऱ्या, हाडे जाणे**-मरायला टेकणे. **मसणात,मसणी दिवा लावणे** - अयोग्य, अशास्त्रीय व निरर्थक कृत्य करणे.
**मसणखाई** स्त्री. १. मसण. २. (ल.) खूप मोठे (स्मशानाप्रमाणे भयाण, ओसाड) घर.
**मस(सा)णखुंट** पु. आईबाप, बायकामुले इ. नसून विद्या व संपत्ती बेताचेच

असलेला अगडबंब, धष्टपुष्ट माणूस.

**मसणफट्टे** न. १. स्मशानात पिंड देण्यासाठी शिजवले जाणारे अन्न. २. (ल.) चव नसलेले जेवण.

**मसणा** वि. १.फलाणा; कोणीतरी; नाव माहीत नसलेल्या किंवा सांगणे इष्ट नसलेल्या माणसाबद्दल योजतात.२. एक (बायकी) शिवी.

**मसणे** सक्रि. चोळणे; घासणे : 'तेयांकरवि दोन्ही हात मसवीले'– लीचपू ४८३. [सं. मृश्]

**मसनत–द, मस्नद** स्त्री. बैठक; गादी; सिंहासन; तख्त; सत्कार-समारंभासाठी बैठक :[अर.मस्नद्] (वा.) **मसनदीचे बटे होऊन राहणे** – बैठकीवरील किंवा सतरंजीवरील बुट्ट्यांप्रमाणे केवळ शोभेचे असणे.

**मसनदनशी** स्त्री. १. सिंहासनारोहण. २. राजधानी. [फा. मस्नदनिशिनी]

**मसब जमीन** लाल पांढुरकी अशी जमीन.

**मसमसित** वि. काळेभोर:'चंचुपुटें मसमसित.'–भारा ६.१०.

**मसमू** वि. पक्का; कायम; स्थिर केलेला; ठरविलेला. [फा. मुसम्मम्]

**मसरे** न.अव. १. रेडकू. २. म्हशी व रेडे यांचा घोळका.

**मसलत, मस्लत** स्त्री. १.विचारविनिमय करणे; योजना, बेत, निश्चय करणे. २. युक्ती; बेत; कट; डाव. ३. सल्ला; योग्य विचार; उपदेश. ४. हुशारीने केलेली योजना, प्रयत्न. ५. मोहीम; स्वारी :'भागानगर व विजापूर दोनी मसलती तरून हस्तगत जाली.'– मराचिसं १९. ६. अंगीकृत कार्य :'सर्वांनी एक जागा राहून मसलत बुडवावी हें ठीक नाहीं.'– भाब ८. ७. युद्धाची तयारी; फौजफाटा : 'करवीरकरांची मसलत म्हणजे थोडी असा समज हुजूर आहे.'– ऐलेसं ११.५७६४. ८. संकट; अडचण; विचार. [अर. मस्लहत्] (वा.) **० काबूस येणे** – मसलत नडणे; अडचणीत येणे.

वि. योग्य; इष्ट; उचित :'याउपर इकडे येणें मसलत नाहीं, माळव्यांत रहावें.'– ऐच १७.

**मसलतदार–गार** वि. सल्लागार; मंत्री; मनसुबदार.

**मसलतबाज,मसलती** वि.१.धूर्त; चतुर; कावेबाज; धोरणी. २. मसलतदार.

**मसलतशीर** पु. १. सल्लागार. २. सल्ला विचारण्यास योग्य, जबाबदार; शहाणे :'निखालस तुम्हीच मस्लतशीर सोबतीस दुसरें कोणही नाहीं.'– ऐलेसं ८४५.

वि. मोहिमेवर असलेला : 'खावंद मसलतशीर असल्यास तुम्ही एक दोन सालचा अगाऊ ऐवज सरकारांत द्यावा.'–मइसा १.३३६.

**मसलंद** स्त्री.अंबारीचा मध्यभाग. (ह्यावर घुमटी असते.) माहूत आणि खवासखाना यांच्यामधील मालकाची बसण्याची जागा. [अर.मसनद्]

**मसला** दहशत बसविण्यासाठी जाहीर रीतीने देण्यात येणारी शिक्षा.

**मसंद** मोठा वृक्ष.

**मसंदणे, मसंदळणे** सक्रि. जास्त कुस्करणे; चुरगळणे; दाबणे; फार हाताळणे; खराब करणे (खाद्यपदार्थ, कणीक, फुले इ. मृदू पदार्थ).

**मसा** पु. १. मांसवृद्धी; चामखीळ; मस. २. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. [हिं.; सं. माष]

**मसाज** पु. मालिश; शरीरमर्दन.

**मसाडी** वि. गलेलठ्ठ. (व.)

**मसाद** स्त्री. १.जमिनीची मोजणी. २. मातीच्या भिंतींचे तीन हात उंचीचे बांधकाम. (व.) [अर. मसाहत्]

**मसाद–दा** पु. मदत; त्यासाठी दिलेला पैसा :'लोकांस जमियत आणावयाकरितां मसादा दिला आहे.'– मइसा ५.१००.[अर. मुसाअदा]

**म(मु)सादत, मस्तुती** स्त्री. आगाऊ घेतलेली खर्ची; लढाईसाठी लागणारी खर्ची :'संगांत कुंजर मस्त हत्ती। घेतली झगड्याची मस्तुती।'– ऐको.

**मसादी** वि. जमिनीच्या मापणीचा (खरडा, हिशेब, बेरीज, अटकळ).

**मसान्या ऊद** कलिंदर; कांडेचोर; काळमांजर. (व.)

**मसार** वि. विशेष सुपीक नसलेली, वाळूमिश्रित (जमीन). [क.मसारे = तांबडी जमीन]

**मसाला** पु.१. काही खाद्य, पेय, औषध इ. अधिक रुचकर व गुणकारी करण्यासाठी घालण्याचे पदार्थ समुच्चयाने (भाजीत हिंग,जिरे, लवंग, दालचिनी इ.; खिरीत, लाडूत वेलदोडे, जायफळ इ.; जनावरांच्या पौष्टिक औषधात गूळ, मैदा, भांग इ.). २. तोंडीलावणे; खार; लोणचे. ३. (सामा.) मिश्रणातील द्रव्ये. जसेः- चुन्याचा मसाला, रंगाचा मसाला. ४. सरकारने जबानीसाठी बोलावलेल्या आरोपीकडून न्याय देण्यापूर्वी घेतलेला पैसा, खर्च :'त्याजवरून सरकारांतून राजश्री बाळाजी महादेव याजकडे मनसबविशीं पत्र दिल्हें त्यांनीं आपल्यास मसाला करून आणिलें.'– थोमारो २.१५२. ५. वसुलीसाठी गेलेल्या शिपायाला द्यावी लागणारी, सरकारी चिठ्ठीत लिहिलेली रक्कम किंवा वस्तू.:'त्याजवर कोपायमान होऊन ढालाईत व दहा हजार रुपये मसाला करून पाठविले.'– भाब १०१. ६. निरनिराळ्या निमित्ताने बसविलेले दंड, दस्त :'त्यावरून तुम्हीं लोहवाडीच्या पाटलास वीस रुपये मसाला घेतला.'–वाडबाबा २.७८.७. सामान; सामग्री; साहित्य. ८.(ओतकाम) डांबर आणि विटकर एकजीव करून केलेली माती.९.खर्च. [अर.मसालिह]

**मसाला** पु. मसलत; योजना :'दत्ताचा मसाला कोणासहि बरा दिसत नाही. बायका देखील शर्मी आहेत असे सांगतात.'– ऐको ६५५.

**मसालेदार** वि. मसाल्याने युक्त; मसाला घालून स्वादिष्ट केलेला (खाद्य, पेय इ. पदार्थ); चमचमीत; चविष्ट.

**मसी** स्त्री. देह. – नागाको.

**मसी** स्त्री. पहा : **मशी–षी**

**मसीघसी** स्त्री. काजळी आणि धूळ.

**मसीपत्र** न.१. शाईने लिहिलेला कागद. २.लिखित दानपत्र: 'मसीपत्र तें केवढें'– ज्ञागा ४२०.

**मसीपात्र** न. दौत.

**मसी(सि)हा** पु.१. तारणारा. २. ख्रिस्त.

वि. इसवी; ख्रिस्ती :'सन १७९६ मसीहा.'– पदभव ८५.[अर. मसीह]

**मसुदरेघ–ओळ** स्त्री. आपल्यापेक्षा कमी दर्जाच्या लोकांना लिहिलेल्या

पत्राच्या चार रकान्यांपैकी पहिल्या तीन रकान्यांत ओढलेली रेघ. [हिं. मस्तर+म. रेघ]

**मसु(सो)दा** पु. कच्चा खर्डा; पक्के करण्यापूर्वीचे लिखाण; आराखडा. [अर. मुस्वद]

**मसुदी** वि. धोरणी; तार्किक.

**मसुरा** पु. धान्य साठविण्यासाठी भिंतीत ठेवलेली पोकळ जागा.

**मसुरी** स्त्री. तलवारीच्या धारेचा प्रकार.

**मसूर** स्त्री. एक प्रकारचे द्विदल धान्य. [सं.]

**मसूरिका, मसूरी, मसूऱ्या देवी** स्त्री. अंगावर मसुरीच्या आकाराचे फोड येणारा देवीच्या रोगाचा एक प्रकार.

**मसैरे** न. १.अंधार; काळोख :'तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं भ्रांतीचें मसैरें फिटे ।'-ज्ञा ५.८३. २. काजळ.

**मसोटी** स्त्री. स्मशान; मसणवट. (बे.)

**मसोनी** स्त्री.१. तांदूळ धुतलेले पाणी. २. स्वयंपाकातील विसळलेले पाणी. (झाडी)

**मसौडा** पु. हिरडी. (व.) [हिं. मसुडा]

**मस्क** पु. कस्तुरी. [फा. मुश्क्]

**मस्करी** पु. संन्यासी. [सं. मस्करिन्]

**मस्करी** स्त्री. थट्टा; चेष्टा; विनोद; टवाळी; कुचाळी.[अर.मस्खरा= गमत्या] (वा.)० **ची कुस्करी होणे**-चेष्टेचा शेवट भांडणात होणे.

**मस्कऱ्या** पु. विदूषक; गमत्या. [अर.मस्खरा]

**मस्त** वि.१. छान; सुंदर.२. धुंद; उन्मत्त; गर्विष्ठ. ३. धष्टपुष्ट; लठ्ठ; मोठा. ४. विपुल; पुष्कळ; भरपूर; खूप :'सुर समस्त इच्यावर निश्चयें। सुरस मस्त असें वदले स्वयें।'- र ४७. (कु.) ५. मनाजोगा; चांगला. (व.)

**मस्तक** पु. न.१. डोके; शिर. २. कोणत्याही पदार्थाचा वरचा भाग; शिरोभाग.(क्रि. ठेवणे, नमविणे.) [सं.](वा.)० **ठेंगणे करणे**- नम्रतेने वागणे; गर्व, ताठा, अभिमान सोडून देणे. ० **डोलाविणे**- मान्यता, स्वीकार, अनुमोदन, समाधान इ. दर्शविण्यासाठी मान डोलावणे. **मस्तकावर अक्षता पडणे**- विवाह होणे. **मस्तकी मारणे** - माथी मारणे; एखाद्यावर जबरदस्तीने सोपविणे.

**मस्तकद्वार** न. टाळू.

**मस्तकपटी-ट्टी** स्त्री. खिडकीच्या किंवा दाराच्या चौकटीची वरची पट्टी.

**मस्तकविज्ञान** न. माणसाच्या स्वभावाचे व बौद्धिक शक्तीचे ज्ञान करून देणारा मानसशास्त्रातील एक विभाग.

**मस्तराळ** पु.न. (ग्रामीण) हजेरीपुस्तक; नावनिशी; इसमवारी. [इं.मस्टररोल अप.]

**मस्तवाल-खोर** वि. मस्तीखोर; उन्मत्त; माजलेला; माजोरी.

**मस्ता-स्त्या** वि.१. अमली पदार्थाच्या सेवनाने तर्र झालेला; झिंगलेला. २.(ल.)उन्मत्त; उर्मट; चढेल. ३. उधळलेला; बेफाम सुटलेला (घोडा).

**मस्तान** वि.पु.स्वानंदी; मग्न किंवा धुंद असलेला साधू, फकीर.

**मस्तावणे** अक्रि. माजणे; गर्वाने फुगून जाणे; मस्त, उन्मत्त होणे.

**मस्तिष्क** न. १. माथे; डोके. २. मेंदू. [सं.]

**मस्ती** स्त्री.१.(शब्दशः व ल.)अंमल; कैफ; धुंदी; झिंगलेपणाची स्थिती. २. ताठा; गर्व; अभिमान; माज; गुर्मी. ३. कैफ चढून किंवा आनंदाच्या भरात केलेल्या चेष्टा; दांडगाईचे खेळ; खोड्या. ४.हत्ती, उंट इ.च्या गंडस्थळातून गळणारा मदाचा स्राव; उन्माद. [फा.]

**मस्तु** न. दह्यावरचे पाणी. - योर १.१५५. [सं.]

**मस्तुती** स्त्री. बराच अरुंद व लांबच लांब असा जमिनीचा पट्टा.- मसाप १.२.९. [क. मस्तुदीर=वर्तुळाकार]

**मस्तुरे, मस्तोरा-श** न. पु. तोड्यासारखा हातात घालण्याचा एक दागिना. (व.,ना.)

**मस्तुलुंग** न. मस्तकातील मेंदू, मगज. [सं.]

**मस्तूर** स्त्री.(नाविक) एक टोक (पाचर)बारीक व दुसरे जाड असणारी (गलबतास उपयोगी पडणारी)तागाची दोरी.(को.) [पो.मस्तूल=डोलकाठी]

**महक, मह(हे)कार** स्त्री. सुगंध; सुवास; खमंग वास. (व.,ना., झाडी)

**महकूब-फ** वि. तहकूब; रहित. [अर.मौकूफ्]

**महज(जी)द** स्त्री. मशीद : 'महजदी बांधोन पुजारे। ठाईं ठाईं स्थापिले।'- नव २३.१७८. [फा. मस्जिद]

**महजर** पु. १.बादशहाने दिलेली सनद; सनदपत्र :'गोत महजर करून घेतला होता तो माघारा घेतला असे.'- समारो १.६८. २. हुकूमनामा; करारपत्र; निकाल; निवाडापत्र :'ग्वाही भक्तांची घालूनियां वरि। महजर करीं आहे माझ्या।'- तुगा १२२३. ३. दाव्याचे कागदपत्र; पुरावा; कैफियत.

**महजूद** वि. जिवंत; विद्यमान; उपस्थित; हजर. [अर. मौजूद्]

**महडणे, महडवणी, महडविणे** (प्र.) पहा : **मढणे**

**महत** पहा : **महत्**

**मह(हा)ताप-ब** स्त्री. १.चंद्रज्योत; शोभेच्या दारूचा एक प्रकार. २. दिवटी; हिलाल :'महताबा लावून रात्रीं परस्परें गोळागोळी जाली.'- ऐलेसंह८.४१३०.ह३. चंद्र; चांदणे. ४. (ल.) सुंदर स्त्री. [फा. महताब्]

**महतापी** स्त्री. वर चांदणी घातलेला मंडप, मांडव.

**महती** स्त्री. मोठेपणा; महत्त्व.

**महत्** वि. १. मोठा; विस्तृत. २.(ल.) थोर; वरच्या दर्जाचा; उत्कृष्ट; कोणत्याही गुणात श्रेष्ठ. महत् हा शब्द कर्मधारय आणि बहुव्रीही समासात महा असा होतो आणि तत्पुरुष समासात तसाच राहतो. जसेः- महादेव; महाबाहू व महत्पूजा; महत्सेवा. ३.अतिशय; फार; अत्यंत. जसे :- महाप्रचंड; महातीक्ष्ण इ.

**महत्तत्त्व** न. सत्त्व, रज, तम या तीन गुणांची साम्यावस्था; मूळमाया.

**महत्त्व** न. मोठेपणा; योग्यता; लौकिक; प्रतिष्ठा; किंमत; प्रस्थ; स्तोम; प्राबल्य; वर्चस्व; पर्वा; महती.

**महत्त्वमापन** न. १.गणितशास्त्राचा एक विभाग; आकारमान मोजण्याची विद्या; मापनशास्त्र. २.काही निकष ठरवून व शक्य तर त्यांना संख्यात्मक रूप देऊन अनुक्रम ठरविणे.

**महत्त्वाकांक्षा** स्त्री. मोठेपणाची हाव; यश मिळविण्याची तीव्र इच्छा; जिगीषा.

**महदर, महदररेघ-ओळ** स्त्री. पहा : **मसुदररेघ**

**महद्‌ब्रह्म** न. मूळ ब्रह्म : 'तया महद्‌ब्रह्मातें व्याली । दैविकी इच्छा।' – ज्ञा ११.५११.
**महद्वर्त** न. खगोलीय वृत्त. [सं.]
**महनीय** वि. मोठा; श्रेष्ठ; आदरणीय; प्रतिष्ठित; योग्यतेचा.
**महबालग** वि. पुष्कळ; फार; मुलबक : 'त्यास दोन वर्षाचे हिशेब व लोकांचे देणें महबालग. यैवज थोडका.' –पेद ५६०. [अर.मुबलग]
**महमुदी** स्त्री.१. एक फुलझाड. २. तलम पण घट्ट विणीचे सुती कापड; मखमल. [फा.]
**महर्ग–र्घ** वि. महाग; भार किमतीचे; मौल्यवान. [सं. महार्घ]
**महर्ग(र्घ)ता** स्त्री. १. महागाई. २. उणीव; कमतरता.
**महर्लोक** पु. सूर्य आणि आकाशस्थ ज्योतींचे वसतिस्थान. पहा : **सप्तलोक** [सं.]
**महर्षि–र्षी** पु. महान ऋषी; तपस्वी. [सं.]
**महल** पु.१. राजवाडा; प्रासाद; महाल. २. खाते. [फा.]
**महला** पु. १. जमाव; समूह.२. परेड; मार्चपास्ट. ३. सैन्याची पाहणी.[फा.]
**महसरा** पु. १.वेढा. २. उपद्रव : 'रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांनी मसलत करून संस्थानास महसरा दिल्हा.'– वाडदुबा ८१. ३. जमाव. ४. जनाना; अंतःपूर. [अर.मह्सूर]
**महसली** पु.१. बेलीफ. २. कर वसूल करणारा अधिकारी. ३. कर्ज वसूल करण्यासाठी ऋणकोच्या दारी तगादा करण्यासाठी बसविलेला माणूस. (क्रि. लावणे, करणे इ.)
**महसली करणे** पाठविणे; धाडणे.
**महसुली** वि. ज्यापासून वसूल यायचा असे (गाव, कूळ, शेत इ.).
**महसूफ** वि. उपरिनिर्दिष्ट (मजकूर). [अर.मौसूफ]
**महसूल** पु. धारा; जमाबंदी; वसूल; जकात; शेतसारा. [अर.]
**महसूल मुद्रांक** वेगवेगळ्या दस्त–ऐवजांवर, कोर्ट फी इ.वर कर देण्यासाठी वापरली जाणारी तिकिटे; महसूल तिकीट;(इं.)रेव्हेन्यू स्टॅम्प.
**महंत** पु. १.बैरागी, गोसावी इ.च्या आखाड्याचा मुख्य नायक. २.(कायदा) पारमार्थिक शिक्षण संस्थेतील आचार्य. ३. (सामा.) ऋषी; साधू. ४. पंडितांत श्रेष्ठ; पुढारी; श्रेष्ठ दर्जाचा मनुष्य. ५. (शीख धर्मातील) सेवादार. ६. (उप.) शठ; लबाड मनुष्य.
वि. थोर; श्रेष्ठ. [सं.महत्; हिं.]
**महंतपण, महंता–ती, महंतडी** न.स्त्री.१. महंताचा दर्जा, अधिकार, गुण, थोरपणा इ. २. (ल.) मोठेपणा; योग्यता; प्रौढी; थोरवी : 'लोकप्रतिष्ठा महंती । बैसावें अश्वीं गजीं रथी ।'– एरुस्व ६.६५.
**महा** पु. महिना; मास; माहे. [अर.माह्]
**महा** वि. पहा : **महत्**
**महाअर्बुद** न. एक हजार दशकोटी ही संख्या.
**महाएकादशी** स्त्री. आषाढ व कार्तिक महिन्यांतील शुद्ध एकादशी.
**महाकल्प** पु. १. ब्रह्मदेवाचा शंभर वर्षांचा काळ; ब्रह्मदेवाचे आयुष्य. २. महाप्रलय.
**महाकंद** पु. लसूण.
**महाकाव्य** न. अनेक रस व अनेक प्रसंगवर्णने यांनी युक्त, मोठे, अभिजात काव्य.
**महाखळी** स्त्री. मोकळी जागा : 'तैसें स्वज्ञानाचिये पौळी–पौळी–बाहिरी बाहिरी मिथ्याचा महाखळीं ।'– ज्ञा १८.५३८. [सं. महाखल]
**महाग** वि. १.वाजवीपेक्षा जास्त किंमत असणारा. २. आवश्यक व मिळण्यास कठीण असलेले; दुर्मीळ. [सं.महार्घ]
**महागडा** वि. १. अतिशय महाग. २. महागरा.
**महागणे** अक्रि. महाग होणे.
**महागरा–ऱ्या** वि.महाग दराने विकणारा (वाणी).
**महागाई** स्त्री. १.बाजारात जिन्नस नेहमीपेक्षा अधिक किमतीने विकला जाण्याची स्थिती; महर्गता. २. कमतरता; उणीव. ३. महागाईच्या दिवसांत नोकरांना देण्याचा विशेष भत्ता.
**महागाणी–नी** वि. गानकुशल : 'उत्तर देशीच्या महागाणी। गुर्जरिणी अतिगौरा ।'– मुरंशु १२२.
**महागिरी** पु. मोठा पर्वत; हिमालय.
स्त्री. १. तीनशे खंडीपर्यंत वजन नेणारे जहाज, गलबत; मालाचे तारू : 'सबब त्यांजकडे दोन महागिऱ्या भरून गवत व एक महागिरीभर लांकडे देविलीं असे.'– समारो ३.१६. २. मोठे तारू; बतेला.
**महाजन** पु. १.एखाद्या गुणविशेषाने थोर गणला गेलेला मनुष्य. २. व्यापारी; उदमी. ३. सावकार. ४. गाव, कसबा इ.तील व्यापाराला नियम, शिस्त घालून देणारा, त्यावर देखरेख करणारा व कर वसूल करणारा सरकारी अधिकारी; महाजनी. ५. पंच. ६. प्रतिष्ठित व्यक्ती. ७. मध्यस्थ.
**महाजनपद** न. इ. स. पूर्व ६ व्या शतकात आर्यांच्या राज्यांना दिलेली संज्ञा.
**महाजनवाडी** स्त्री.(सामान्यतः) महाजनांच्या ताब्यात असणारी विशिष्ट जातीची सार्वजनिक कार्ये करण्याची जागा.
**महाडी** स्त्री. तांबडा दाणा असणारी भाताची एक जात. (कुलाबा)
**महात–द, माहूत, महाव(वं)त** पु. हत्तीला हाकणारा; महावत; माहामात्र. [सं.महामात्र]
**महातल** न. सप्तपातालांपैकी एक; नाग व असुर यांचे स्थान.
**महातेज** न. १.ब्रह्म. २. सूर्य : 'हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें।'– ज्ञा १.७४.
**महात्मा** पु.१. महानुभाव पंथातील व्यक्ती. २. मोठा धैर्यवान, पराक्रमी मनुष्य : 'तैसें महात्मा वृक्षमुळीं । असावें खांड देउळीं ।'–भाए ४९.
वि. थोर मनाचा; उदार; महानुभाव.
**महादकांदा** पु. महाबळेश्वरकडे होणारे भुईकमळ; कंदाळू.
**महादशा** स्त्री. (ज्यो.) कुंडलीतील मुख्य ग्रहांची बाधा.
**महादेव** पु. (विणकाम) हातमागाच्या फणीचा वरचा अवयव, दांडा फळी.
**महादेवाचे देणे** (ल.) कंटाळवाणे व दीर्घकाल टिकणारे काम.
**महादेवापुढचा** वि. (नंदी) (ल.) मूर्ख; निर्बुद्ध.
**महादेवी** स्त्री. पिंडीच्या आकाराप्रमाणे बी असणारी एक वनस्पती.
**महादेवी सहादेवी** चैत्री पौर्णिमेला तिन्हीसांजेच्या वेळी भिंतीवर गंधाने चित्र काढून पुजली जाणारी बाहुली. – मसाप ४.४.२५९.(माण.)
**महादैव** न. सर्व जातींचे लोक. (माण.)

**महाद्वार** न. मंदिराच्या किंवा राजवाड्याच्या बाहेरचा किंवा मुख्य दरवाजा.

**महाधमनी** स्त्री. डाव्या निलयापासून निघणारी एक मोठी धमनी; ओरोटा.

**महाधिवक्ता** पु. सुप्रीम कोर्टात सरकारी दावे चालविणारा वकील.

**महान** वि. १. थोर, मोठा. २. विस्तृत. ३. दोन किंवा अनेक वर्षे टिकणारे (झाड, मिरची, कापूस, पांढरी तूर इ.). [सं.]

**महान** न. गरवे; उशिरा होणारे भात,धान्य, पीक इ.- चित्रकृषि २०७. [सं. महत्]

**महानगर** न. तीस लाखांच्यावर लोकवस्ती असलेले शहर.

**महानदी** स्त्री. मोठी, उगमापासून शंभर योजनांवर वाहत जाणारी नदी.

**महानवमी**-स्त्री. १. अश्विन शुद्ध नवमी; नवरात्राचा शेवटचा दिवस. २.रामनवमी. - शास्त्रीको.

**महानवरात्र** न. अश्विन शुद्ध प्रतिपदेपासून विजयादशमीपर्यंतचा कालावधी.

**महानस** पु. स्वयंपाकघर. [सं.]

**महानाड** पु. महाजनासारखा एक वतनदार : 'महाजन व महानाड पेठ मजकूर याचें नावें सनद कीं,...'- थोमारो १.५४.

**महानिद्रा** स्त्री. मरण; मृत्यू.

**महानिबंधक** पु. लोकसंख्यागणना आणि विवाहाची नोंद करणारा प्रमुख सरकारी अधिकारी.

**महानियंत्रक** पु. सरकारी हिशेबांची तपासणी करणारा आणि त्यावर नियंत्रण ठेवणारा सर्वात उच्चपदस्थ अधिकारी.

**महानिर्वाण** न. महापुरुषाचा मृत्यू.

**महानीळ** पु. काळवीट : 'महिकावतियेचा हैहयराजु : नांवें महानीळ'- रुस्व २२९.

**महानुभाव, मानुभ(भा)व** पु. श्रीचक्रधराने स्थापिलेला एक द्वैतवादी पंथ. या पंथात श्रीकृष्ण व दत्त यांची भक्ती प्रमुख आहे.
वि. १. कामक्रोधादी विकार जिंकलेला; महात्मा. २. उदार, थोर पुरुष. ३. प्रशस्त, विस्तृत अनुभवाचा; ब्रह्मानुभवी : 'ऐसें जे महानुभाव। जे दैवियें प्रकृतीचे दैव।'-ज्ञा ९.१९४. ४. विद्या, बुद्धी, पराक्रम इ. गुणांनी श्रेष्ठ मनुष्य; महाप्रतापी; मोठे सामर्थ्यवान.

**महान्यायवादी** पु. विधिविषयक बाबींवर सल्ले देण्यासाठी राष्ट्रपतींनी आपल्या अधिकारात नियुक्त केलेला भारताचा न्यायवादी; महान्यायप्रतिनिधी; (इं.) अटोर्नी जनरल.

**महान्यास** पहा : **न्यास** ३

**महापट-ड** पु. ध्वज; हत्तीच्या अंबारीवरील निशाण :'आहो जी देवा । पैलु देखिला महापडांचा मेळावा।'- शिव १०३३.

**महाप(पं)थ** पु. १.मृत्यू; मरण; मृत्यूची वाट :'न देशील सत्यवंत । तरी करीन हाचि महापंथ।'- वसा ६.८. २. निर्याणाचा मार्ग : 'लागले महापंथी तत्काळचि।'- एभा ३१२९८.

**महापद्म** न.१.एकावर बारा शून्ये दिल्यावर होणारी संख्या. २. कुबेराच्या नवनिधींपैकी एक.

**महापा** पु. एक प्रकारचा मेणा, पालखी (स्त्रियांसाठी). [अर.मुहाफ]

**महापात** पु. (फज्यो.) रवी-चंद्राची युती झाल्यास दोन्ही ग्रहांची क्रांती समान असेल व दोन्ही ग्रह एकाच दिशेला असतील तेव्हा असल्यास होणारा योग.

**महापातक,महापाप** न. ब्रह्महत्या, दारू पिणे, सुवर्णाची चोरी, गुरुपत्नीबरोबर किंवा मातेबरोबर संभोग आणि यांपैकी एखादे पातक करणाराशी मैत्री अशा पाच मोठ्या पातकांपैकी प्रत्येक.

**महापीठ** न. देवीच्या साडेतीन पवित्र स्थानांपैकी प्रत्येक (तुळजापूर, माहूर, कोल्हापूर व अर्धे सप्तशृंग).

**महापुरुष** पु.१. ईश्वर. २. साधुपुरुष; सत्पुरुष; ब्रह्मनिष्ठ मनुष्य. ३. मेलेल्या ब्राह्मणाचे पिशाच.

**महापू(पु)जा** स्त्री. व्रतसमाप्ती इ. विशेष प्रसंगी करण्याची मोठी पूजा.

**महापौर** पु. महानगरपालिकेचा प्रमुख पदाधिकारी. हा शहराचा पहिला नागरिक असतो.

**महाप्रलय** पु. जगाचा अंत; जगबुडी; दर ४,३२,००,००,००० वर्षांनी होणारा सर्व जगाचा नाश.

**महाप्रसाद** पु. १.धार्मिक किंवा देवाच्या उत्सवानंतर वाटला जाणारा फुले, मिठाई, जेवण इ.रूप प्रसाद. २. देव, गुरू इत्यादींनी प्रसाद म्हणून दिलेली वस्तू. ३.(शब्दशः व ल.) मोठी कृपा, अनुग्रह.

**महाप्रस्थान** न.१. (मोठा, दूरचा) प्रवास. २. (ल.) मरण; मृत्यू. ३.यथार्थ ब्रह्मज्ञानानंतर येणारा मृत्यू.

**महाप्राण** पु.१. मोठ्या जोराने व प्रयासाने केलेला उच्चार; हकारयुक्त उच्चार. २. जोराने व प्रयासाने उच्चारण्याचा वर्ण. जसे :- ख, घ, छ, झ, ठ, ढ इ.

**महाफल-ळ** न. नारळ, फणस यांसारखे मोठे, उत्कृष्ट फळ.

**महाबलि-ळी** पु. पिशाच इत्यादींना संतुष्ट करण्यासाठी मांस, अन्न इ.चा अर्पण करायचा पदार्थ.

**महाबळी-बुटी** स्त्री. रुंदट पानाचे आले.

**महाभाग** वि.१. अतिशय भाग्यवान. २. सद्गुणी; सदाचरणी.

**महाभारत** न. १. व्यासप्रणीत कौरवपांडवांच्या युद्धांचे भारतीयांचे पवित्र महाकाव्य; महापुराण. २. (ल.) युद्ध; लढाई; रणकंदन.

**महाभियोग** पु. राष्ट्रपतीला पदावरून काढून टाकण्यासाठी संसदेने करण्याची चौकशी.

**महाभूत** न. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या पंचमहाभूतांपैकी प्रत्येक.

**महामहोपाध्याय** पु. मोठ्या शास्त्र्याला दिली जाणारी एक सन्मानाची सरकारी पदवी.

**महामंत्री** पु. मुख्य प्रधान; मुख्यमंत्री; सल्लागार.

**महामात्र** पु. हत्ती हाकणारा; महात.

**महामाया, महंमाय** स्त्री. १.जगदुत्पादक शक्ती; सर्व संसाराला, प्रपंचाला कारणीभूत अशी देवता; आदिमाया; मूलप्रकृती. २.जहांबाज, कजाग बायको. ३. ईश्वर, ब्रह्म आणि माया ही तीन स्वरूपे जेथे एकत्रित आलेली असतात त्या त्र्यंशातील मायास्वरूप. [सं. महामाया]

**महामारी** स्त्री.१. मोठा मृत्यू : 'तेथ अचेतना झुंजारीं । न मरत्या महामारीं।'- एभा २८.२५०. २.(ल.)प्राणसंकट. ३. पटकी हा साथीचा रोग. ४. या

रोगाची अधिष्ठात्री देवी. ५. जिवापाड श्रम; शिकस्तीचे प्रयत्न. ६. हाणामारी; मारामारी; मोठे युद्ध .

**महामुदी** स्त्री. तलम पण घट्ट विणीचे कापड; मखमल. [अर. महमूदी]

**महामुरी** स्त्री. १.विपुलता; समृद्धी. २. (शेत, पीक इ.ची) पूर्णावस्था; लागवड. ३. (दार, खिडकी इ.ची) बंद असण्याची स्थिती.

**महामूर** स्त्री. धान्य इत्यादीची विपुलता, समृद्धी; भरपूरपणा.

वि. १.पुष्कळ; विपुल; भरपूर; अतिशय. २. बंद केलेले; लावलेले (किल्ला इ.चे दार, दरवाजा, खिडकी). (क्रि. करणे, होणे.): 'दरवाजे किल्ल्याचे रायगड याचे महामूर राखावे, दिंड्या मात्र उघड्या असाव्यात.'-मराचिसं २. ३. सर्व कामे पूर्ण झालेले (शेत); पूर्णत्वास आलेले धान्य.४. गाढ; स्वस्थ व भरपूर(झोप,निजणे). ५. आकंठ; भरपूर; भरगच्च (जेवणे, खाणे, भोजन). [अर. मअमुर]

**महायज्ञ-याग** पु. मोठा यज्ञ; ब्रह्मयज्ञ (वेदाध्ययन), पितृयज्ञ (तर्पण), देवयज्ञ (होम, वैश्वदेव), भूतयज्ञ (बलि), मनुष्ययज्ञ (अतिथिसंतर्पण) या पंचमहायज्ञांपैकी प्रत्येक.

**महायंत्र** न. तोफ.

**महायात्रा** स्त्री. १. काशीयात्रा.२. (ल.) प्रेतयात्रा; अंत्ययात्रा. [सं.]

**महार, महारडा** पु. हिंदू धर्मातील शूद्र वर्णातील एक जात. पहा : **परवारी** [सं.महा+अरि किंवा आर्य; महा+अर (पर्वताच्या गुहेत राहणारा); मृत+हर=मेलेले जनावर ओढणारा] (वा.)० **हंडीत निघणे**-पोटासाठी सोवळे-ओवळे, विधिनिषेध सोडणे.

**महारकचका** पु. जोराजोराचे, आरडाओरड्याचे भांडण.

**महारकावळा** पु. डोंबकावळा.

**महारकी-खी** स्त्री.१.गावच्या महाराचे काम, हक्क, वतन, अधिकार. २. (ल.) कोणतेही हलके, नीच, कष्टाचे काम; फुकटचे काम.

**महारकी** स्त्री. चांगले, तलम कापड (धोतरजोड्याच्या उपयोगी). [सं.महार्घ]

**महारगजाल** स्त्री. गडबड; गोंगाट; दंगल; आरडाओरड.

**महारगुंज** स्त्री. ढोरगुंज; अश्वगंधी.

**महारथ-थी** पु.१.शस्त्रास्त्रांत प्रवीण असून दहा हजार धनुर्धारी योद्ध्यांशी एकटाच लढणारा. २. (ल.) अत्यंत शूर, कर्तबगार पुरुष; मोठा वक्ता.

**महारपुंज** पु. महाराचा हक्क म्हणून शेतकऱ्यांनी आपल्या उत्पन्नातील सरकारात भरावयाचा भाग.

**महारपोरगा** पु. पागेत घोड्याची व्यवस्था पाहण्यासाठी नेमलेला महारजातीचा मनुष्य.

**महारभादवी** स्त्री. भाद्रपद महिन्यात देवीच्या यात्रेकरिता येणारा खर्च भागावा म्हणून महाराला जमिनीच्या उत्पन्नापैकी द्यायचा भाग किंवा काही देणगी.

**महारमहारकी** स्त्री. महाराच्या इनामजमिनीवरील कर.

**महाररहाटी** पु.स्त्री. गावातील मेलेली गुरे टाकण्यासाठी महाराला नेमून दिलेली जागा.

**महारव(वा)डा-वण** पु.न.१.महार लोकांची राहण्याची जागा. २. (ल.) सोवळ्याओवळ्यासंबंधी, स्वच्छतेसंबंधी अतिशय अव्यवस्था.

**महारवी** वि. महार लोकांनी तयार केलेली (टोपली, केरसुणी, सूत इ.).

**महारशिसोळा** पु. पहा : **महाररहाटी**

**महारस** न. १. ब्रह्म. २. पक्वान्न. - मनको.

**महारहडोळा-हडकी** पु.स्त्री. पहा : **महाररहाटी**

**महाराज** पु.१. सार्वभौम राजा; सम्राट. २. (आदरार्थी) श्रेष्ठ माणूस. ३. जैन, गुजराथी, वैष्णव लोकांचा गुरू. [सं.]

**महाराणी** स्त्री. महाराजाची पट्टराणी; मुख्य राणी. [सं.]

**महारात्रि-त्री** स्त्री. महाशिवरात्र; माघ वद्य चतुर्दशी.

**महाराष्ट्र** न. पु. मराठी भाषा बोलणाऱ्यांचे राज्य, प्रांत. [सं.]

**महाराष्ट्रभाषा** स्त्री. मराठी भाषेचे जुने नाव.

**महाराष्ट्री** स्त्री. एक प्राकृत भाषा.

**महाराष्ट्रीय** वि.महाराष्ट्र राज्यासंबंधीचे(लोक, भाषा,रिवाज, संस्कृती इ.).

**महारुद्र** पु. १. रुद्राभिषेकाचा एक प्रकार; अकरा लघुरुद्र. २. मारुती.

**महारुद्रो** पु. बाजरीची मोठी जात. हिचे काड फार उंच होते.-कृषि २७७. (गुज.)

**महारोग** पु.१. अत्यंत दुःखदायक रोग. वातव्याधी, अश्मरी, कृच्छ्र, मेह, उदर, भगंदर, अर्श आणि संग्रहणी, राजयक्ष्मा असे याचे नऊ प्रकार आहेत. २. रक्तपिती; गलितकुष्ठ.

**महारोगी** पु. रक्तपिती, कुष्ठरोग झालेला मनुष्य.

**महार्घ** वि. महाग; दुष्प्राप्य : 'महार्घ येथे परमार्थ जाला।'- सारुह १.२१.

**महार्णव** पु. महासागर.

न. १. (ल.) मोठे, दीर्घकाळ चाललेले भांडण; युद्ध; लढाई :'दोघां मांडले महार्णव । दाविती बळ प्रौढीगौरव ।'- निगा २४. २. प्रसिद्धी; डांगोरा. ३. लहान काम, प्रकरण, गोष्ट इत्यादीला मोठे रूप देऊन सांगणे. [सं.]

**महाल** पु. १.तालुक्याचा पोटभाग; पेटा :'सारांश उभयतां महालचें अती प्राबल्य जहालें आहे.'- पया ६१. पहा : **देश.** २. पेट्याची कामे करण्याची जागा; कोर्टकचेरी. ३. यात चालणारी कामे. ४. खाते : 'पाकाशय, जलस्थान, फलस्थान, वसनागार आदिकरून हे नाजूक महाल...'- मराआ १०. ५. घरातील स्त्रियांची बसण्याउठण्याची जागा; अंतःपूर; गोषा; राणीवसा : 'श्रींच्या दर्शनास महालसह वर्तमान गेले.'- ब्रच ९४. ६. मोठा, भव्य वाडा; प्रासाद; राजवाडा; मंदिर. ७. क्रीडागृह. ८. सावकार, पेढीवाला इत्यादींचा व्याप, विस्तार, पसारा. ९. खंडोबा, जोतिबा इ.च्या भेटीला पाल इ. गावांहून जेजुरीकडे जायला निघालेली पालखी, काठी इत्यादीची मिरवणूक. १०. राजस्त्री; बेगमांच्या नावापुढे लावण्याचा बहुमानार्थक शब्द. [अर.](वा.) ० **मजकुरावर खाली घालणे, लोटणे, टाकणे, नेणे, देणे,** ० **मजकुरावर पडणे, येणे**- (एखादी गोष्ट) योग्य वेळी न करता लांबणीवर टाकणे, टाळणे, पुढे ढकलणे; उडवाउडवी करणे.

**महाल-ला-ली-ल्या, महालया** पु.१. न्हावी. २. (लग्न जुळविण्याच्या कामातील) मध्यस्थ.

**महालकरी-दार** पु. महालासंबंधीची जमाबंदी, बंदोबस्त इ. कामे पाहणारा सरकारी अधिकारी.

**महालकरी** पु. रत्नागिरीकडील चांभारांतील जातपाटील.

**महालझडती** स्त्री. महालाच्या जमाबंदीचे कच्चे वार्षिक पत्रक.

**महालदफ्तर** न. पेशवे दफ्तराचा एक भाग. यातील कागद महालातील असत.– इनाम ४६.

**महालदार** पु. (चुकीने) भालदार; रक्षक; पहारेकरी.

**महालपेटा** पु. महालाचा पोटभाग. यावर महालकरी असतो.

**महालमजकूर** पु. १. ज्याचा नुकताच उल्लेख केला आहे असा महाल; वर उल्लेखिलेला महाल, प्रदेश. २. सर्व महालाचा एकूण खर्च; देशव्यय. – राव्यको ९.१७.

**महालमवेशी–सां** स्त्री.पु.१. गुरेढोरे :'महालमवेशी मागों लागलें.'– इए ५.१००. २. (ल.) चीजवस्तू.

**महालय** पु. १.आश्रयस्थान; आश्रम; धर्मशाळा. २. देऊळ. ३. परमात्मा. ४. पितृपंधरवडा; भाद्रपद वद्य पक्ष. ५. या पक्षात केलेले पितृश्राद्ध. [सं.]

**महालक्ष्मी** स्त्री. १. विष्णुपत्नी. २. अश्विन शुद्ध अष्टमीस पूजण्याची एक देवता, त्या देवतेचे व्रत. ३. भगवती; कोल्हापूरची देवी. ४. ज्येष्ठा गौरी; भाद्रपद शुद्ध नवमीस ज्यांची पूजा करतात त्या देवता.

**महालिंग** न. बारा ज्योतिर्लिंगांपैकी प्रत्येक.

**महाली** वि. तात्पुरता·(नोकर); खोजा; स्त्रियांच्या अंतःपुरातील नोकर. [अर. महल]

**म(मा)हावटी** स्त्री. राजमार्ग :'हे कपटाची कस(व)टी। अनृत्याची माहावटी।'– उगी ७५५.

**महावस्त्र** न. उंची, सुंदर वस्त्र; प्रतिष्ठित वस्त्र; शालजोडी इ.

**महावळुंग–गी** (प्र.) पहा : **महाळुंग–गी**

**महावाक्य** न.१. जीवब्रह्माचे ऐक्य दाखविणारे उपनिषदांमधील तत्त्वमसि आदी वाक्य. ही चार वेदांची चार आहेत. २. गायत्री मंत्र. ३. महानुभाव संप्रदायाच्या सूत्रपाठातील बारा प्रकरणांचे सूत्र : 'बारा प्रकरणांचें सूत्र तें महावाक्य बोलीजे'– पंचवा पृ. ८९. [सं.]

**महावात** पु. सोसाट्याचा वारा; झंझावात; तुफान – सौभद्र.

**महावार** स्त्री. १. महिन्याचा पगार, वेतन. २. मासिक हप्ता. (व.) क्रिवि. महिन्याच्या महिन्यास; दरमहा; माहेवार.

**महाविद्यालय** न. दहावीच्या नंतरचे शिक्षण देणारी संस्था; (इं.) कॉलेज.

**महावोजा** वि. मोठ्या थाटाची; तेजस्वी :'संतोषोनी महाराजा। सभा रचित महावोजा । '– गुच ३४.९७.

**महाव्याधी** पु. महारोग; रक्तपिती.

**महाशब्द** पु. बोंब; शंखध्वनी.

**महाशय** पु.१. थोर पुरुष; महात्मा. २. मोठ्या माणसाला संबोधण्याचा शब्द. [सं. महा+आशय, बं.मॉशे, फ्रें. मुस्ये(मॉसिय)]

**महाशिवरात्र–त्री** स्त्री. माघ वद्य चतुर्दशी.

**महाष्टमी** स्त्री. अश्विन शुद्ध अष्टमी.

**महासचिव** पु. (न.श.) शासनाच्या सर्व खात्यांच्या सचिवांच्या कार्यांत समन्वय राखणारा सरकारी अधिकारी, मुख्य सचिव.

**महासरणी** स्त्री. स्वर्गमार्ग : 'होउनि सुयोधनाचा शोकार्त वरो पिता महासरणी।'– मोभीष्म ११.१५.

**महासरा** पु. वेढा; परीघ (क्रि. देणे, उठवणे इ.) :'कुमक करून महासरा उठविला.'– मइसा १०.३३१. [अर. मह्सूर, मुहासरा]

**महाळ–ल** पु. पहा : **महालय** ४,५

**महाळ(ल)वस–सा** पु. भाद्रपद वद्य पक्ष. (राजा.)

**महाळुंग–गी** न. स्त्री. कागदी लिंबाच्या जातीचे एक प्रकारचे झाड; त्याचे फळ. [सं. मातुलुंग]

**महिनखत** न. दर महिन्याला ठरावीक रक्कम फेडण्याच्या कराराने केलेले कर्जखत. (ना.)

**महिनदारीण** स्त्री. मोलकरीण. (व.)

**महिना** पु. १. साधारणपणे तीस दिवसांचा काल; मास. २. मासिक वेतन; ह्या अवधीचा पगार.

**महिनेकरू, महिने(न)दार** पु. १. मासिक वेतनाच्या कराराने लावलेला नोकर. २. आळीपाळीने महिनाभर काम करणाऱ्यांपैकी ज्याची पाळी असेल तो माणूस.

**महिनेभरू** पु. कामाकडे लक्ष न देता महिना भरण्याच्या विचाराने काम करणारा नोकर; भाडोत्री नोकर.

**महिने(न)माल–महाल** वि. मासिक; महिन्याच्या बोलीने लावलेला, ठरविलेला (चाकर, चाकरी, पगार, रोजमुरा, खर्च, जमावसूल,हिशेब).

**महिनेवाला** पु. देवळाच्या उत्पन्नातून ज्याला दर महिन्याला ठरावीक धर्मादाय मिळतो तो मनुष्य. (कु.)

**महिपति–ती** पु. राजा. [सं. महि (= पृथ्वी)+पति = (स्वामी)]

**महिमहि जाणे** नवल, कौतुक वाटणे. (व.)

**महिमा** पु.स्त्री. १.मोठेपणा; वैभव; प्रभाव; ख्याती. २. अष्टमहासिद्धींपैकी एक; हवे तितके मोठे होण्याचे सामर्थ्य. [सं.]

**महिमान** न.१.पहा : **महिमा** १.२. महत्त्व; सामर्थ्य.

**महिमान** पु. १. पाहुणा; अतिथी; तिऱ्हाईत. २. फिरस्ता शेतकरी. [फा.मिहमान]

**महिर(रा)प–ब** स्त्री. कमान; देवळी. [अर.मिह्राब्]

**महिला** स्त्री. १. स्त्री. २. बायको; पत्नी. ३. मादी. [सं.]

**महिष–ख** पु.१. रेडा; टोणगा; म्हैसा. २. महिषासुर. [सं. महिष]

**महिषी** स्त्री. १. पट्टराणी. २. मुख्य स्त्री. ३. म्हैस. [सं.]

**मही** स्त्री. १. पृथ्वी. २. एक नदी. ३. सखी; मैत्रीण . [सं.]

**महीग** न. नांगरलेली जमीन साफ करण्याचे हत्यार.

**महीतपण** न. १. मोठेपणा; महत्त्व. २. अहंकार.

**महीतल** न. पाताळ.

**महीधर–ध्र** पु.१. पर्वत; डोंगर. २. शेष नावाचा सर्प.

**महीन** वि. मोठा; थोर ४९.

**महीपाल–ळ** पु. राजा.

**महीसुत** पु. १.मंगळ नावाचा ग्रह. २. (ल.) बोरू :'महीसुत सरसाविला। सरसाऊन द्विधा केला ।'–दास १५.६.३.

**महु** पु. शिसवाचे लाकूड.

**महुडा** पु. ढग; मेघ.

**महु(हू)र-रे** वि. मधुर; गोड : 'जैसें महूर कां म्हणिजे । विषकंदातें।'-ज्ञा ५.११५. [सं. मधुर]

**महुरणे** अक्रि. १. मोर्चा वळविणे. २. मिरविणे.

**महुरी** स्त्री. मोहरी; राई.

**महुरे** न. नागाचे विष : 'महुरें घाली दाढे। ऐसे केवि होय।' – उगी ७३७.

**महुवा** पु. मोहाचे झाड.

**महूंचळ** वि. मचूळ; मोहाच्या फुलाच्या वासासारखे : 'नंदनवनीचें खडुळ। मानससरोवरीचे महूंचळ।' – शिव ६४४.

**महैसवाथर** पु.मूर्ती घडवण्यासाठी वापरण्यात येणारा काळ्या रंगाचा मृदू पाषाण.

**महैळी, म्हे-म्हैळी, म्हैळारु** स्त्री. बायको; स्त्री. [सं.महिला]

**महोत्सव, महोत्साह** पु. मोठा उत्सव; आनंददायक प्रसंग. [सं.]

**महोदय** पु. पौष किंवा माघ महिन्यात सोमवारी सूर्योदयी अमावास्यारंभ; श्रवण नक्षत्राचा मध्य आणि व्यतिपाताचा शेवट यांचा योग; एक मोठे पर्व. [सं.]

**महोदय** पु.१. महाराज. २. नावापुढे योजण्याचा बहुमानार्थी शब्द. [सं.]

**महोरग** पु. मोठा सर्प.

**महौजा** वि. तेजस्वी; ज्याचे तेज मोठे आहे असा; सामर्थ्यवान :'पुरुष श्याम महौजा ओढित होता बळेंचि मजला जो ।'- मोवन १३.८८.

**मळ** पु. १. घाण; चिखल; गाळ; केरकचरा; रेंदा. २. अन्न पचल्यानंतर शरीराबाहेर टाकला जाणारा निरुपयोगी अवशेष; विष्ठा. ३. पाप; पापवासना. ४. कमीपणा : 'म्हणे कर्मनिष्ठां मळु। ठेविला देखों ।'-ज्ञा १८.६२. ५. दोष. ६. महानुभावांच्या मते देवतांना जीव दिसावा म्हणून सृष्टिरचनेच्या वेळी जीवाने आपल्या स्वरूपावर धारण केलेला प्रापंचिक लेप : 'कर्मशब्दें मळही बोलिजेति'– लीजउ ३७२.

स्त्री. अंगावरच्या मळाची वळी; मळी. (राजा.) [सं. मल]

**मळई** स्त्री.१. पावसाने किंवा नदीच्या प्रवाहाने वाहत आलेली माती, कचरा, पाने इ. २. असा गाळ साठून झालेली जमीन. २. अशा जागेवर केलेले बागाईत.

**मळई** स्त्री. मासे धरण्याचे जाळे.– बदलापूर.

**मळक** पु. वि. पापी : 'हा धर्मु जो नासी लोपि तो मळकु' – पांढर शिला III.I.10.

**मळक-की** स्त्री.मळमळ; वांतीची भावना. (ना., व.)

**मळकट-टा** न. १.पाप :'जें त्रिविधीं मळकटां । तूं सांडिलासि सुभटा।'– माज्ञा १५.५८१. २. मळाचे पुट; थर :'तै कळिमळांची मळकटें । नामोद्घाटें नासती ।'– एभा ४.२५३.

वि. मळलेला; घाणेरडा; मलिन.

**मळकटणे** अक्रि. मळणे; घाणेरडे, मलिन होणे.

**मळकटा** पु. जमीन न भाजता रोप करण्याची जागा.-चित्रकृषि २.७.

**मळका** वि. मळकट.

**मळकी** (बे.) पहा : १ **मळई**

**मळको(खो)रा** वि. मळकट रंगाचे; नवीनपणाचा तजेला कमी झालेले (नाणे, कापड इ.).

**मळखा(घा)ऊ-घाव** वि.१. मळलेला असूनही तसा न दिसणारा (रंग). २.(ल.) कष्ट, आजार, व्याधी इ.चे दुःख न कुरकुरता सोसणारा. ३. बाहेरून सुंदर पण आतून घाणेरडा दिसणारा (मनुष्य, पदार्थ).

**मळगा(घा)वणे** अक्रि.१. (रस्ता इ.) फार रहदारीमुळे झिजणे, तुडविला जाणे, खचणे. २. फार वापरामुळे गुळगुळीत होणे; झिजणे, जीर्ण होणे. ३. अंगवळणी पडणे; रुळणे; सवय, परिपाठ असणे (कला, कृती, धंदा इ.मध्ये).

सक्रि. खराब, घाण करणे; मळविणे; मलिन करणे.

**मळगी-घी** स्त्री. बाजारातील कायमची बांधलेली दुकाने (समुच्चयार्थी); टाम बाजार. याउलट मेणबाजार. (बे.) [क. मळगिसु=ठाम असणे]

**मळण** न. १. उसाचा रस गुळासाठी कढविणे. (राजा.) २. गूळघर; गूळ तयार करण्याची जागा.

**मळणकर** पु. मळणी करणारा; धान्य मळणारा.

**मळणी** स्त्री. १. कणसे झोडपून, बैलाकडून तुडवून धान्य काढणे. २. उसाचा रस काढण्याची क्रिया. ३. (ल.) मळणीचा हंगाम. [हिं. मलना; सं. मर्दन] (वा.) ० **घालणे**- धिंगामस्ती; धावाधाव करणे; धुळीत खेळणे (लहान मुलांनी). **मळणीवर येणे**- काहीएक पदार्थ तयार झाल्यावर, आयत्या वेळी येणे.

**मळणे** सक्रि. १. धान्य कणसातून तुडवून, झोडपून बाहेर काढणे; तुडविणे (धान्य). २. ऊस चरकात घालून रस काढणे, पिळणे. ३. (गुऱ्हाळघर) गूळ मळणे; गूळ तयार करणे.४. तिंबणे; मऊ करणे (कणीक). ५. चेपणे; रगडणे; चोळणे (हात, पाय इ.). ६.(घोड्याला) खरारा, मालीश करणे.७. (ल.) रहदारीने वाट पाडणे; रस्ता रुळविणे. ८. अंगाला उटणे लावणे. [सं. मर्दन]

**मळणे** अक्रि. १. मलिन, घाण होणे. २. मोहाने व्याप्त होणे :'मळले होते मन, परि केले त्वां शुद्ध, तुजकडे वळलें।'– मोकर्ण ४३.२३.

**मळनमाती, मळनी** स्त्री. मर्दन; चुराडा : 'करावी जंव मळनमाती । तंव देखिलें गोपीनाथें – उह १०९९. [सं.मृर्दन + मुत्तिका]

**मळने** न. उटणे : 'एकी मळनें उधळिती'– उह १६२७. [सं.मृद्]

**मळफ** स्त्री. जमीन न भाजता केलेले रोप. –चित्रकृषि २.७.

**मळ(ळा)भ-ब, मळब(भ)ट** न. १. अभ्र; आभाळ; ढगांचा समुदाय. २. आकाशाची अभ्राच्छादित स्थिती. ३. आकाश. (बे., कु.) [सं.मल + अभ्र]

**मळभभर** क्रिवि. पुष्कळ; अतिशय; बेसुमार (बोलणे, खाणे).

**मळभी** स्त्री. (समुदायातून) निराळा झालेला ढग; लहान ढग.

**मळमळ** स्त्री.१.पित्तामुळे, कळकट पदार्थ खाल्ल्यामुळे वांती होईलसे वाटणे; उमासा. २. (ल.) संशय आल्यामुळे मनाला वाटणारी अस्वस्थता. ३. कुरकुर; तक्रार. (क्रि. फेडणे, घालणे, जाणे, फिटणे.) [ध्व.]

**मळमळणे** अकर्तृक क्रि. वांती होईल असे वाटणे; उमदळणे; उमसणे.

**मळमळी** स्त्री. वीट; तिटकारा; उमासा.

**मळमळीत** वि.१.बेचव; योग्य प्रमाणापेक्षा कमी मालमसाला घातलेला (खाद्यपदार्थ). २. पाणचट; कवकवीत (फळ). ३. बेंगरूळ; सौम्य, बेडौल (मनुष्य). ४. नीरस; तडफ नसलेले (गाणे, भाषण, वागणूक).

५. ओंगळ; तेजहीन; घाणेरडे दिसणारे; बोजड (शस्त्र, धातूचे भांडे, हत्यार). ६. ढिला; सैल; अव्यवस्थित; नीटनेटका नसलेला (पदार्थ, कामाची पद्धत).

**मळय(यें)पांचौर** न. पाच सुगंधांचे वस्त्र :'सर्व सुखाचें मळयेंपाचौर । जाण माझें स्वरूप ।'- भाए ६६२. [सं.मलय+पंच]

**मळयो, मळ्या** पु. गोड्या पाण्यातील एक मासा; खवळी मासा.

**मळव** अंगावर घालणे; धारण करणे (वस्त्रादी).

**मळ(ळि)वट** पु. स्त्री-पुरुषांनी कपाळभर लावलेले कुंकू किंवा गंध. न. (कुंभारी धंदा) चाकावर तयार केलेले व थोपटण्यापूर्वीचे मडके. - बदलापूर ६६.

वि. फार मळी साचून तयार झालेली (पांढरी जमीन).- कृषि १५.

**मळवटा** पु. मर्दन्या; अभ्यंग घालणारा; अंगाला उटणे लावून तेलमर्दन करून स्नान घालणारा. [सं.मर्दन; म.मळणे]

**मळवटी** स्त्री. अंगावरच्या मळाची वळवटी; मळी.

**मळवंड्या** पु. काळा तीळ (गळिताचे धान्य). - कृषि ३४९.

**मळवा** पु. खडकावरचा मळ खाणारा मासा. (कु.) पहा : **मळयो**

**मळवाचे** न. (ढोराचा धंदा) गाई-म्हशीचे टांगलेले चामडे.

**मळवाट** स्त्री. माणसे, गुरे इ.च्या येण्याजाण्यामुळे तयार झालेली वाट.

**मळविणे** सक्रि.१. मळाने युक्त करणे; घाणेरडे, मलिन करणे. २. (पराभव इ.नी तोंड) उतरविणे; निस्तेज करणे.

**मळसु(सू)त्र** न. पेच, आटे असलेली खिळ्यासारखी वस्तू; फिरकीचा खिळा; (इं.) स्क्रू. (वा.) ० **फिरविणे, दाबणे, चापणे**- एखाद्याचा मूळ हेतू बदलून त्याला अन्य गोष्टीकडे प्रवृत्त करणे; मनाविरुद्ध गोष्ट करायला लावणे; मन वळविणे.

**मळसूत्री** वि. मळसूत्राने बसविलेला (पदार्थ).

**मळसूत्री प्रदक्षिणा** शंकराच्या भोवती घातली जाणारी विशिष्ट (दिडकी) प्रकारची प्रदक्षिणा.

**मळहीर** वि. घोड्याचा एक रंग. - अश्वप १.२८.

**मळा** पु. १.फळफळावळ, भाजीपाला इ.ची लागवड; बागाईत. २.बागायती जमीन. ३. दुपिकी जमीन.४. तिळाची एक जात. [सं. माला]

**मळाटळा** पु. मळा वगैरे जमीन; शेत इ.

**मळाव** कोमेजणे. [सं. म्लै]

**मळी** स्त्री.१. अंगावरच्या मळाची वळी. २. पहा : १ **मळई.** ३. साखर, गूळ इ. शुद्ध करताना निघणारा मळ. ४. कोणत्याही पदार्थावर येणारी मळकट साय. ५. मोठ्या शेतात बांध घालून पाडले जाणारे लहान खोचे, भाग प्रत्येकी. (राजा.) ६. नदीकाठची पडीक जमीन. (व.) ७. (न्हावी धंदा) डोक्यातील मळ काढण्यासाठी केलेले कोईचे साधन. ८. वाळलेल्या गंधाची खरवड : 'चंदनाचा आडा होता : तेयाची मळी काढिली'- लीचउ १२९.

वि. मळकट, धुरकट रंग असलेली (मेंढी). (जुन्नरी)

**मळी(ळि)ण** वि. १.पहा: **मलिन**.२. तयार नसलेली; विसरलेली (विद्या, कला इ.). ३. म्लान; मलूल : 'कुंथाच्या ढेंकरें न दवेल पुष्टी। रूप दावी कष्टी मळिण वरी।'- तुगा २८७६. [सं.मलिन]

**मळीत** न. मळणी.

**मळीपा** वि. अमंगल.- नागाको.

**मळीव** वि. १.मळलेले; झोडपलेले; तुडविलेले (धान्य). २. तिंबलेले; चेपलेले; पिळलेले इ.

**मळेवाफ्याची पेरणी** पाऊस पडल्यानंतर केलेली पेरणी. जी जमीन पावसापूर्वी नांगरता येत नाही अशा जमिनीत या प्रकारची पेरणी होते. - कृषि २२४.

**मळ्या** पु. तांबूस, तेलकट रंग.

वि. तांबूस, पिंगट रंगाचा; भुरा (बैल, गाय इ.).

**मक्षिका** स्त्री. माशी. [सं.]

**मक्षिकापात** पु.अपशकून; विघ्न; अडचण.

**मंगल-ळ** न. १.भाग्य; सुदैव; कल्याण. २. लग्न, मुंज इ. शुभकार्य. ३. शुभकार्य, ग्रंथपठण इत्यादींच्या आरंभी म्हटले जाणारे ईश्वरस्तुतिपर श्लोक. पहा : **मंगलाचरण**

पु. मंगळ नावाचा एक ग्रह.

वि.शुभ; सुलक्षणी; कल्याणकारक. [सं.]

**मंगल** स्त्री. सोनाराकडील पकड. (झाडी)

**मंगलकार्य** न. लग्न, मुंज इ. शुभ विधी.

**मंगल(ळ)दायक** न. विवाह इ. कार्य :'लटिकें करिती मंगळदायकें। लटिकींच एकें एकां व्याही।' - तुगा २५.

वि. शुभदायक. [सं.]

**मंगलभवानी** स्त्री. (निंदा, उपहास याअर्थी) आचरट, मूर्ख स्त्री.

**मंगलस्नान** न. १. अंगाला तेल, उटणे लावून गरम पाण्याने केलेले स्नान; अभ्यंगस्नान. २. न्हाणे.

**मंगलाचरण** न. १. ग्रंथ, कथा, पुराण इ.च्या आरंभी केलेली ईश्वराची स्तुती. २. कुलदेवतेचे नामस्मरण. ३. कोणत्याही कार्याचा आरंभ, सुरुवात. (क्रि. करणे)

**मंगला(ळा)रती** स्त्री.१.देवपूजेच्या अखेरीस तबकात निरांजने ठेवून तोंडाने आरती म्हणत देवाला ओवाळणे. २. आरतीचे तबक.

**मंगलाष्टक** न. लग्न, मुंज या कार्यांच्या वेळी म्हणण्याची आशीर्वादार्थी शुभदायक पद्ये, गाणी. (वा.)० **गात बसणे**- रडत, चरफडत बसणे.

**मंगलाक्षता** स्त्री. अव. मंगलप्रसंगी आशीर्वाद देताना मस्तकावर टाकलेले कुंकुमयुक्त तांदूळ; मंत्राक्षता.

**मंगळ** पु. सूर्यमालेतील पृथ्वीच्या अगदी जवळ असणारा एक तांबूस रंगाचा ग्रह. फलज्योतिषात हा ग्रह क्रूर मानला जातो. [सं.]

**मंगळ** न.पु. पहा : **मंगल** [सं.](वा.)० **गात बसणे**- पहा : **मंगलाष्टक.** ० **मातणे, माजणे**-१. अव्यवस्थितपणे कसेतरी केले जाणे (लग्न). २. (मंगलकार्यात) सोवळ्याओवळ्याचा विचार न राहणे.

**मंगळकूळ** पु. कल्याण करणारा.

**मंगळणे** उक्रि.१. चकविणे; ठकविणे; भोंदणे; फसविणे.२. (ल.) चळविणे; वश करणे; गोड बोलून हेतू साध्य करणे. ३. (अश्लील) भोगणे; हेपलणे.

**मंगळतुरे** पहा : **मंगलवाद्य**
**मंगळधाम** न.१.चांगल्या, शुभ वस्तूंनी भरलेले घर. २. (ल.) देव; साधुपुरुष इ.
**मंगळभ(भा)रणी** स्त्री. परस्परांनी परस्परांच्या पायात पाय घालून चेपणे.
**मंगळमाठ्या** वि. मठ्ठ, अडाणी (शिवी).
**मंगळसूत्र–सरी** न. लग्नात वराने वधूच्या गळ्यामध्ये घालण्याचे दोऱ्यात काळे मणी, सोन्याचे वाट्यामणी इ. ओवलेले सौभाग्यचिन्ह.
**मंगळागौरी व्रत** लग्नानंतर पहिली पाच वर्षे श्रावणातील दर मंगळवारी सौभाग्यवतीने करण्याचे मंगळागौरी पूजेचे व्रत.
**मंगळी** वि. सोंगाडी (स्त्री). (बे.)
**मंगळीचा** पु. (एक शिवी) विवाहबाह्य संबंधापासून झालेला; अनौरस.
**मंगी** वि. आठ संख्या. (नंदभाषा).
**मंगेरा–ग्यारो** पु. पाचोळा, केरकचरा इ. एकत्र करण्याचे लाकडी पावडे. (कु.; गो.)
**मंगोडे** न. (बालभाषा) मांजर.
**मंच, मंचक** पु.१. पलंग; माचा; कोच; बाज. २. सिंहासनविशेष. ३. व्यासपीठ; सभाध्यक्षासाठी किंवा व्याख्यात्यासाठी केलेले उच्च स्थान, ओटा. [सं.]
**मंचकारोहण** न. १. सिंहासनारोहणापेक्षा कमी दर्जाचा असणारा राज्याभिषेकाचा एक प्रकार.२. बाळंत झाल्यावर बाळंतिणीला प्रथमच बाजेवर निजविण्याचा विधी.
**मंची–जी** स्त्री. माती, विटा वाहून नेण्याचे कुंभाराचे साधन; कोळंबे. [सं. मञ्च]
**मंज** न. दव; दहिवर; धुके. (बे.) [क. मंजु]
**मंजन** न.१. दात, हिरड्या इ. घासण्याच्या उपयोगी असणारे चूर्ण, औषध. २. पदार्थ घासून स्वच्छ करण्याचे साधन. [सं.]
**मंजनीक** एक प्रकारची तोफ.
**मंजर** देखावा.
**मंज(द)रा** पु. धार्मिक ग्रंथ बांधण्याचे तांबड्या रंगाचे वस्त्र. (अहि.)
**मंज(जि)री** स्त्री. अनेक फुले लागलेला तुळस, सबजा इ.चा दांडा; मोहोर; तुरा; केसर. [सं.मंजरी]
**मंज(जि)री** स्त्री. नृत्याच्या वेळी ताल धरण्यासाठी वापरला जाणारा लहान टाळ: 'सुरताल पखवाज खंजिरींत मंजरींत बासरीं।'– राला ३१. [सं.मजीर]
**मंजा** पु. स्त्रीची आर्जवे पुरुष करीत आहे अशा मजकुराची लावणी; कलगी.(वा.) ० **उतरणे**– एखाद्याच्या तोंडावरून हात खाली आणून दाबणे; हात ओवाळणे.
**मंजावणे** माजवणे; तेल, शेंदूर चोपडणे (देवाच्या मूर्ती).
**मंजिरा** न. टाळ. – व्याज्ञा १.४१७.
**मंजिरीचा गरबा** गुजराथेतील गरबा नृत्याचा एक प्रकार.–व्याज्ञा १.४१७.
**मंजिष्ठ** न.पु. एक प्रकारचा औषधी वेल, वनस्पती. याच्या मुळ्यांपासून तांबडा रंग करतात. [हिं.; सं.मंजिष्ठा]
**मंजी** स्त्री. (नाविक) (प्र.) मंची; गलबताचा एक प्रकार. (को.)
**मंजु–जू** वि.१. सुंदर; सुरेख; मोहक; रमणीय.२. मंजूळ; कोमल; मधुर (आवाज).
**मंजु–जू** स्त्री. करदोडा; कमरेची साखळी.– मसाप ४५.६.
**मंजुरी** स्त्री. स्वीकृती; कबुली; मान्यता.
**मंजुल–ळ, मंजूळ, मंजुळवाणा** वि. १. कानाला गोड लागणारा; मधुर (आवाज, ध्वनी). २. सौम्य; झुळझुळु वाहणारा; मंद (वारा). [सं.मंजुल]
**मंजूर** वि.१. कबूल; पसंत; मान्य; इष्ट.२. कायम करणे; मान्य करणे (खालच्या कोर्टाचा निकाल इ.). ४. पाहिलेले. [अर. मन्झूर]
**मंजूषा** स्त्री. पेटी. [सं.]
**मंजेवाला** वि. (कलगीतुऱ्यातील) मंजा गाणारा.
**मंज्या** न. खेळण्याची गोटी; बैदूल.
**मंड** वि.१.हट्टी; काम न ऐकणारा. २. बोथट; मंद धारेची (सुरी, चाकू इ.). [सं.मंद; क. भड्ड]
**मंड(डा)ई** स्त्री. भाजीपाल्याचा मोठा बाजार. [हिं. मंडी]
**मंडक** पु. गव्हाच्या पिठापासून केलेले एक पक्वान्न. पहा : **मांडा** [सं.]
**मंडण** न. मनुष्यांचा समुदाय; मंडळी. (कु.) [सं. मड्, मंड]
**मंडन–ण** न.१. शोभा; थाटमाट; सुशोभितपणा. २. भूषण; अलंकार; दागिना : 'राम योग्यांचे मंडन ।'– भूपाळी. ३. सजविणे; शोभविणे; थाटमाट करणे. ४.(वादविवादात मुद्द्याचे) समर्थन; स्थापन; सिद्ध करणे. ५. उत्सवप्रसंग; समारंभ. ६. मेघमंडल; मेघांचे आकाशात गोळा झालेले पटल. (क्रि. घालणे) [सं. मंडन]
**मंड(ट)प** पु.१. लग्न, मुंज इ.प्रसंगी खांब पुरून वर वेल, झाडाच्या फांद्या, वस्त्रादींनी आच्छादलेली जागा; मांडव. २. वेल इत्यादी चढून चढविण्यासाठी केलेला कामट्यांचा मांडव; लताकुंज. ३. सभामंडप; देवळातील श्रोते, भाविक लोक इत्यादींना बसण्यासाठी गाभाऱ्यापुढे असलेली जागा. ४. (ल.) मेघांचे आकाशात गोळा झालेले पटल; मेघपटल. ५. धाबे; माळवद :'मढ मंडप चौबारी। देखे धर्मसाळां।'– ऋ २०. [सं.]
**मंडपघ(घु)सणी** स्त्री. (गर्दीत अंगाला अंग घासले जाते यावरून) मंडपात होणारी चेंगरण्याइतकी गर्दी; खेचाखेच : 'तों मंडपघसणी होतसे देख। मार्ग न दिसे जावया।' – ह ३४.९२.
**मंडपदेवता** स्त्री. लग्न इ.प्रसंगी घातलेल्या मंडपाची प्रत्येक खांबाच्या ठिकाणी पुजली जाणारी अधिष्ठात्री देवता.
**मंडपप्रतिष्ठा** स्त्री. मंडपदेवतेची विधिपूर्वक स्थापना.
**मंडपशोभा** स्त्री. १. मांडवाची सजावट; हंड्या, झुंबरे, सुंदर वस्त्रे इत्यादींनी केलेली विवाह इ. प्रसंगीच्या मंडपाची शोभा. २. थोर, विद्वान लोकांच्या आगमनाने मंडपास आलेली शोभा; मांडवशोभा.
**मंडपी** स्त्री. १.देवाच्या मूर्तीवर टांगलेला कामट्यांचा फुलवरा. २. लहान मांडव.
**मंडपोद्वासन** न. लग्न इ. शुभप्रसंगी मंडपात आवाहन करून स्थापिलेल्या देवतेचे विसर्जन.
**मंडल–ळ** न.१. वर्तुळ; वलय; घेर; परिघ; चक्र. २. चंद्र, सूर्य इत्यादींचे

बिंब. ३. प्रांत; क्षेत्र; भोवतालचा प्रदेश. ४. बारा चक्रवर्ती राजांनी राज्य केले असे राष्ट्र, प्रांत. ५.(यावरून) प्रांत; देश; राज्य. जसे :- कुरुमंडल. ६. समुदाय; समूह; सभा; समाज; टोळी. ७. वर्तुळाकार ठिपके असलेले कोड. ८. व्रताच्या उद्यापनप्रसंगी देवतास्थापनेसाठी काढलेली एक गूढ वर्तुळाकार आकृती; अशाप्रसंगी विशिष्ट रंगाने रंगविलेली सर्वतोभद्र, लिंगतोभद्र इ. मंडळे प्रत्येकी. ९. एक निरुपद्रवी साप. १०. देवाला नैवेद्य दाखविताना पात्राखाली पाण्याची (चौकोनी, वर्तुळाकार, त्रिकोणी इ.) काढलेली आकृती. ११. सैन्याची वर्तुळाकार रचना. १२. चुन्याच्या घाण्याची वर्तुळाकार चाकोरी. १३. बेचाळीस दिवसांचा काल : 'त्यासि एक मंडळ सांग। पठणें करूनि कार्यसिद्धी।'- व्यं ९४.१४. (समासात) शरीराचा तो तो भाग. जसेः- मस्तक-कुच-कर्ण-मंडल. १५. समुद्राच्या तळाशी असलेले खडक. (कु.) १६. राजमंडल. [सं. मंडल]

**मंडलदेवता** स्त्री. १. एखाद्या व्रताच्या आरंभी सर्वतोभद्र, लिंगतोभद्र इ. मंडलांवर पुजल्या जाणाऱ्या देवता. २. (ल.) राजाच्या बरोबरचे सरदार, प्रधान. ३. राजसभा; दरबार. ४. कोणत्याही सरदाराचा, थोर माणसांचा लवाजमा.

**मंडलनिरीक्षक** पु. चार-पाच तलाठी मिळून त्यांच्यावर असणारा आणि त्यांनी केलेल्या नोंदी मंजूर करणारा महसूल अधिकारी.

**मंडलवत** न. अनेक पाने चोयांनी टोचून जेवणासाठी केलेले जेवणाचे पान; पत्रावळ.

**मंडलस्वस्तिक(करण)** न. (नृत्य.) ऐंद्र स्थानात उभे राहून हातांचे स्वस्तिक करून आपल्या समोर बसलेल्या मनुष्याला अभिमुख दिसतील असे तळहात वर ठेवणे.

**मंडली** पु. रत्नाच्या दलालाचे पूर्वीचे नाव.

**मंडली(ळी)क** पु. १. मंडल, पथक इत्यादीचा नायक. २. मांडलिक : 'उखरडा धाधाविलें । मंडळीकु निघालें ।'- शिव ५०४.

**मंडलेश्वर** पु. १. सार्वभौम राजा. २. मांडलिक राजा.

**मंडवारी** पु. (परदेशी तेली) लग्नसमारंभात मांडवात मधला खांब पुरणाऱ्या मेहुण्यास त्याबद्दलचा मान म्हणून जो सवा आणा मिळतो तो. - बदलापूर २७१.

**मंडवारीसाण्या** पु. तेली जातीचे पंच येऊन त्यांनी विवाहमंडप स्थापणे. - बदलापूर २७.

**मंडळ** न. १.आवर्त. २. (वानस.) वलय (बुंधा, पाने, पाकळ्या यांतील). ३. वर्तुळ. [सं.]

**मंडळ** न. काही उद्दिष्टे साध्य करण्यासाठी समविचारी लोकांनी एकत्र येऊन स्थापलेली संस्था.

**मंडळी-ली** स्त्री. १. मनुष्यांचा जमाव; समुदाय; संघ. २. (कायदा) एकमेकांशी भागीदारी असणाऱ्या माणसांचा समुदाय, मंडळ; (इं.) फर्म. ३. स्पर्श केल्याबरोबर वेटोळे करणारा अनेक पायांचा एक किडा; वाणी. ४. (ख्रि.) सार्वत्रिक मंडळी; पिता, पुत्र व पवित्र आत्मा असा जो एकच सनातन देव त्याच्यावर भाव ठेवून स्वतःला ख्रिस्ती म्हणवणाऱ्या जगभरातील सर्व लोकांचा संघ. (इं.) इक्लेशिया : 'आणखी मी तुला सांगतों कीं तूं पेत्र (खडक) आणि या खडकावर मीं आपली मंडळी रचीन.'- मत्त १६.१८. ५. (ख्रि.) ईश्वरोपासना, शुद्धाचरण व ख्रिस्ताच्या राज्याचा विस्तार हे हेतू पुढे व सार्वजनिक उपासनेसाठी लोकांचा संघ (इं.) काँग्रिगेशन. ६. (गहू, बाजरी, भात इ.) पिकांच्या पेंढ्यांची वर्तुळाकार गंजी. ७. पती किंवा पत्नी परस्परांविषयी बोलताना वापरतात. ८. जातभाई; नातलग : 'चाणुर कंसाची मंडळी' - नाम २८७. [सं. मंडल]

**मंडाई, मंडाईवण** स्त्री. न. सावकाराकडून घेतलेले कर्ज फेडताना ठरलेल्या व्याजापेक्षा जास्त दिलेली रक्कम.

**मंडाण-न** न. १. आकाशातील मेघांचे पटल; मेघाच्छादन. (क्रि. घालणे) २. (ल.) शोभा; अलंकार; दागिना. [सं. मंडन]

**मंडा(ड)वळ-ळी, मंडोळी** स्त्री. (विरू.) पहा : **मुंडावळी**

**मंडा(डो)ळी** पहा : **मंडली** ३

**मंडित** वि.१.सुशोभित; अलंकृत. २.(ल.) भूषित; शोभिवंत. [सं.]

**मंडी** स्त्री. दगडाचे पसरट तोंडाचे भांडे; दगडी. (तंजा.)

**मंडीअढी** स्त्री. मल्लखांबावर उडी मारताना मांडी घालून पकडीत धरण्याचा डाव. - व्याज्ञा ३.७९.

**मंडूक** पु. बेडूक. [सं.]

**मंडूकता** स्त्री. घोड्याच्या पायाचा एक रोग. - अश्वप २.३८.

**मंडूकप्लुतिन्याय** पु. बेडकाप्रमाणे उड्या मारीत-मारीत-मधला भाग गाळून भराभर केलेले काम.

**मंडूकानुवृत्ति-त्ती** स्त्री. टाळाटाळी; वगळणे; गाळणे. [सं.]

**मंडूकासन** न. १.(योग.) एक योगासन. प्रथम मांडी घालून बसणे. नंतर दोन्ही पायांचे तळवे उताणे करून मांड्या ढोपरासह रुंद करून उताणे तळव्यावर कुल्ले टेकणे. नंतर दोन्ही हात ढोपरावर टेकणे.-संयोग ३३७. २. (मल्लखांब) घोड्याचा फरारा करून दोन्ही पाय मल्लखांबाच्या मागे लावून केलेले आसन. - व्याज्ञा ३.२९९.

**मंडूकी** स्त्री. घोड्याच्या खुराचा शेवटचा भाग. - अश्वप १.६४.

**मंडू(डु)र** पु.१. लोखंडाचे कीट; जंग. २. त्यापासून केलेले औषध; एक रसायन. [सं.]

**मंडो(दो)सरी** स्त्री. फोडणीचे वरण; आमटी. (व.)

**मंडोळ** पु. अंड्यातील पिवळा बलक. (कु.)

**मंत** प्रत्यय. नामांची विशेषणे करण्यासाठी युक्त ह्या अर्थी त्याला जोडलेला अनुबंध. जसेः- बुद्धिमंत; शक्तिमंत. पहा : **मान** [सं. मत्]

**मंतरणे** उक्रि.१. अभिमंत्रित करणे; मंत्र घालणे; भारणे; मंत्राने युक्त करणे (अक्षता इ.). २. (ल.) एखाद्याला काही सांगून, गोड बोलून वश करून घेणे.

**मंतव्य** वि. मनन करण्यास, चिंतण्यास योग्य: 'तेणेंचि कळे मनासि मंतव्य।'- एभा ३.६४०.

न. मनन; मनोव्यापार; विचार : 'प्रस्तुत पुस्तकांत दयानंदाचें चरित्र व मंतव्य हें मुख्यतः सांगावयाचें असल्यामुळें....'- ससं २.१२८. [सं.]

**मंता** वि. मनन करणारा :'मन, मंता आणि मनन। यांचें समूळ भान उच्छेदी।'- एभा १४.५२४. [सं.]

**मंतु** पु. अपराध; गुन्हा; अन्याय : 'तुझ्या जिरविलें बहु प्रणतमंतु पोटेंपण।'- केका १८.

**मंत्र** पु. १.गूढशक्तियुक्त अक्षरे किंवा वाक्ये. मंत्राचा उपयोग मारण, मोहन, वशीकरण, स्तंभन, उच्चाटन, आकर्षण ह्यासाठी करतात; इष्टसाधक आणि अनिष्टनिवारक वर्णसमूह. २. देवतास्तुतिपर पवित्र वचन. (क्रि. जपणे) ३. वेदभागविशेष; वेदसंहिता. ४. मसलत; गुप्त सल्ला; उपदेश; विचार. (क्रि. सांगणे, देणे.) ५. युक्ती; क्लृप्ती : 'रसु होआवा अतिमात्रु। हा घेतासि कविमंत्रु ।'- ज्ञा १३.६२५. ६. गुप्त गोष्ट; गुह्य : 'झांकुनि मंत्र पृथेनें अति दुःसह दुःख मज दिल्हें बा हें ।'- मोशांति १.८. ७. गुरूपदेश. ८. (उप.)चहाडी. [सं.]

**मंत्रकौटाल** न. चेटुकविद्या.

**मंत्रगूढ** न.हेर; गुप्तचर.

**मंत्रचळ** पु. १.मंत्रप्रयोगात चूक होऊन लागणारे वेड : 'मंत्रचळ नाना खेद। नामनिष्ठें नासती ।'- दास ४.३.१२. २. (ल.) वेड लागल्यासारखी, बावचळल्यासारखी होणारी स्थिती (क्रि. लागणे); एकच गोष्ट परत परत करणे.

**मंत्रचळ्या** वि. १. मंत्रप्रयोगात चूक झाल्यामुळे वेड लागलेला.२. लहरी; बेफाम. ३. भ्रमिष्ट; बावचळलेला; एकच गोष्ट अनेकदा करणारा.

**मंत्रजागर, मंत्रावसर** पु. अनेक ब्राह्मणांनी एकमेकांसमोर बसून एका पक्षाने एक वाक्य म्हटल्यावर दुसऱ्या पक्षाने त्यापुढील वाक्य म्हणावे असे वेदमंत्र म्हणणे; वेदघोष करणे.

**मंत्रणा** स्त्री. सल्लागार मंडळ; (इं.) काउन्सिल.

**मंत्रणागृह** न. सल्लागारांच्या सभेची जागा.

**मंत्रणे** क्रि. (विरू.) पहा : **मंतरणे**

**मंत्रतंत्र** पु. अव. १.जादूटोणे; तोडगे; जपजाप्य; छाछू इ. २. डावपेच; युक्त्याप्रयुक्त्या. (क्रि. कोसळणे, डगमगणे, डळमळणे, ढासळणे, लटपटणे, हरणे.) ३. एखाद्या गोष्टीचे सामान्यज्ञान आणि प्रत्यक्ष व्यावहारिक शिक्षण.

**मंत्रपुष्प** पु. देवाची आरती झाल्यावर विशिष्ट वेदमंत्र मोठमोठ्याने म्हणून देवाला फुले अर्पण करणे.

**मंत्रपुष्पांजलि–ली** स्त्री. १.पहा : **मंत्रपुष्प**. २.(ल.) शिव्यांचा वर्षाव, लाखोली, भडिमार. (क्रि. अर्पिणे, करणे, वाहणे.)

**मंत्रप्रयोग** पु. १. मंत्राचा प्रत्यक्ष प्रयोग, अनुभव पाहणे. २. मंत्र घालणे; जादूटोणा करणे.

**मंत्रभेद** पु. गुप्त गोष्टीची वाच्यता (करणे, होणे).

**मंत्रमुख** पु. आपल्या उपयोगापुरतेच मंत्र येणारा ब्राह्मण.

**मंत्रमुग्ध** वि. १.तल्लीन. २. प्रभावित, भारावून गेलेला.

**मंत्रवादी** वि. मंत्र व त्यांचा उपयोग जाणणारा; मंत्री; मांत्रिक.

**मंत्रविद्या** स्त्री.१.वेदविद्या. २. जादूटोणा करण्याची कला.

**मंत्रशक्ति–क्ती** स्त्री. १. युद्धाच्या प्रभू, मंत्र व उत्साह या तीन शक्तींपैकी दुसरी. २. मंत्राचे सामर्थ्य, प्रभाव.

**मंत्रशास्त्र** न. देवतामंत्रांचे विवेचन करणारे शास्त्र; मंत्रविद्या.

**मंत्रशैली** स्त्री. तामसी मंत्राची योजना.

**मंत्रसंहिता** स्त्री. निरनिराळ्या विधींत लागणारे मंत्र एकत्र देणारी संहिता, संग्रह; मंत्रसंग्रह. [सं.]

**मंत्रसाधन** न. मंत्रशास्त्रांत सांगितलेले विधी व नियम पाळून मंत्राचा उपयोग करण्याची शक्ती मिळविणे.

**मंत्रसिद्धि–द्धी** स्त्री. मानवी सामर्थ्याच्या आटोक्याबाहेरच्या आठ शक्तींपैकी एक.

**मंत्रस्नान** न. प्रत्यक्ष स्नान न करता काही मंत्र म्हणून स्नानाचे श्रेय मिळविण्याचा गौण प्रकार, विधी.

**मंत्रज्ञ** वि. मंत्र जाणणारा व त्याचा उपयोग करणारा; मांत्रिक.

**मंत्राग्नि–ग्नी** पु. उत्तरक्रियेचे मंत्र म्हणून प्रेताचे केलेले दहन; सशास्त्र दहन.

**मंत्रालय** न. मंत्र्यांची काम करण्याची नित्याची जागा.

**मंत्राक्षता–त** स्त्री. अव. १. मंत्राने संस्कारलेले तांदूळ. २. (ल.) आशीर्वाद : 'त्यास व्यासवाल्मिकादि देति मंत्र अक्षता।' – मध्व १९. ३. (वि.ल.) शिव्यांचा भडिमार. (क्रि. देणे, मारणे.)

**मंत्रित** वि. मंतरलेले.

**मंत्रिमंडळ** न. पंतप्रधान/मुख्यमंत्री, राज्यमंत्री, उपमंत्री या सर्वांचे मिळून बनलेले मंडळ.

**मंत्री** पु.१. प्रधान; अमात्य; राजाचा सल्लागार. २. (सामा.) सल्ला देणारा; उपदेश करणारा. ३. राजाच्या अष्टप्रधानांपैकी एक; न्यायाधीश. ४. मांत्रिक; मंत्रज्ञ. ५. मंत्रिमंडळाचा सदस्य.

**मंत्रोपदेश** पु. १.मंत्र देणे (गुरूने शिष्यास). २. सल्लामसलत; उपदेश.

**मंथणी–नी** स्त्री. १.रवी; घुसळणी. २. घुसळण्याची क्रिया. ३. सोनाराचे मणी तयार करण्याचे हत्यार; मणिघोळणी.

**मं(म)थन** न.१. (दही इ.) घुसळण्याची क्रिया. २. अग्निहोत्र्याने अग्नी उत्पन्न करण्यासाठी अरणीच्या खळगीत लाकडाचा शंकू सामत्याप्रमाणे फिरविण्याची क्रिया. ३. (ल.) वादविवाद; चर्चा; वाटाघाट; ऊहापोह. ४. वध; जखमी करणे. [सं.]

**मं(म)नसार** पु. चंद्र.

**मं(म)थनसाराचे बीज** १. अशक्य किंवा अविद्यमान वस्तू. २. लोणी.

**मंथर** वि. प्रचुर; युक्त : 'प्रौढ अलंकार मंथर भाषाशैलीचा केलेला उपयोग उचितच वाटेल.'- नकुमं ५.

**मंथर** क्रिवि. स्थिर; संथ : 'कां कामिनी कंथापासी। मंथर होए।'- ज्ञा १८.१०७५. [सं.]

**मंथरकवच** न. (मा.शा.) मध्य-कानाचा एक अवयव. याचा आकार शंखासारखा असतो. [सं.]

**मंथरी** स्त्री. घुसळताना रवीभोवती गुंडाळलेली दोरी.

**मंथा** पु. १.(कुंभारी) मडक्यांना झिलई देण्यासाठी वापरण्याचा काचेचा मणी. २. अशा मण्यांची माळ. या माळेने मातीचे भांडे तेल लावून घासतात. [सं. मंथ]

**मंथान, मंथा** पु. १. मंथन करण्याचा दंड; रवी. २. (अरणीवर) घासून अग्नी उत्पन्न करण्याचा लाकडी शंकू.

**मंद** पु. शनि हा ग्रह.

वि.१. फारसा वेग, चलाखी नसलेला; संथ; धिमा. २. (ल.) मूर्ख;

मठ्ठ; निर्बुद्ध. ३. जड; आळशी; सुस्त. ४. अस्पष्ट; किंचित अंध (दृष्टी). ५. अंधूक; प्रभाहीन; निस्तेज (प्रकाश). ६. सौम्य; गालातल्या गालात केलेले (हास्य). ७. हळूहळू वाहणारी, सौम्य (वाऱ्याची झुळूक). ८. नक्षत्रांच्या अंधमंदादी प्रकारांपैकी एक वर्ग. यात मृग, आश्लेषा, हस्त, अनुराधा, उत्तराषाढा, शततारका व अश्विनी ही नक्षत्रे येतात. हे नक्षत्र असताना हरविलेली वस्तू लवकर सापडत नाही. ९. बारीक; हलका (आवाज, ध्वनी). १०. सामर्थ्यहीन; असमर्थ; कमजोर. [सं.] (वा.)० **पडणे**-१.संथपणाने , सुस्ताईने चालणे (काम, धंदा).२. कमजोर होणे (साथ, आजार). ३. वीट येणे.

**मंदक** पु. (उ.यं.शा.) गतिरोध करणारा जोर.

**मंदकर्ण** (ज्यो.) ग्रह आपल्या कक्षेत परिभ्रमण करीत असता सूर्य व चंद्र यांना सांधणारी कल्पित रेषा; चलत्रिज्या. [सं.]

**मंदज्वलन** न. (आ.शा.) पेशीअंतर्गत होणारी अन्नघटकांची फक्त ऊर्जा देण्याची क्रिया. [सं.]

**मंदणे** अक्रि. १. कमी होणे. २. थांबणे. ३. थकणे; मंद होणे.

**मंदन** न. (उ.यं.शा.) गती कमी होणे.

**मंदमधुर** वि.१. गोड; आल्हाददायक (फळ, वास, आवाज, वाद्य, काव्य इ.). २. सौम्य; मोहक; रम्य (वारा, हास्य, गाणे, बोलणे).

**मंदरूप** न. १.सूक्ष्म रूप. २. स्थिरपणा; अचलपणा.

**मंदवा** पु. (प्रां.) पहा : **मंदाई**

**मंदवाणी** स्त्री. वक्तृत्व कौशल्याचा अभाव; भाषणात ओघ किंवा आकर्षकता नसणे.

वि. सावकाश, छाप न पडण्यासारखे बोलणारा; बोलण्यात अकुशल. [सं.]

**मंदवार-वासर** पु. शनिवार. [सं.]

**मंदविसर्जक** वि.(शाप.) उष्णता लवकर बाहेर न टाकणारा (पदार्थ). उदा. लाकूड, लोकर इ.

**मंदवीर्य** वि. सौम्य प्रभावाचे (औषध).

**मंदवेळ-ळा** स्त्री. (ज्यो.) ज्यावेळी आरंभिलेले कार्य लवकर पार पडत नाही तो समय; प्रतिकूल वेळ. (क्रि. लागणे)

**मंदा** पु. पहा : **मंदी, मंदाई**

वि. १. स्वस्त. २. चलती, मोसम, हंगाम नसलेला.

**मंदा** स्त्री. (संगीत) तिसऱ्या श्रुतीचे नाव.

**मंदा** पु. घोड्याच्या लगामाचा प्रकार. - अश्वप १.१८५.

**मंदाइ-ई** स्त्री. १. सुस्तपणा; धीमेपणा; स्वस्थपणा; ढिलाई (काम, धंदा, इ.मध्ये).२. कमजोरपणा; जोर कमी होणे (साथ, रोग इ.चा). ३.स्वस्ताई; उतार (भाव इ.मध्ये).

**मंदाक्रांता** स्त्री. एक वृत्त. याच्या चरणात सतरा अक्षरे आणि म, भ, न, त, त, ग, ग हे गण असतात.

**मंदाकिनी** स्त्री. १. आकाशगंगा; आकाशातील चांदण्यांचा शुभ्र पट्टा. २. भागीरथी नदी. [सं.]

**मंदागी-गीं** क्रिवि. १. सौम्य अग्नीवर (शिजविणे, भाजणे). २. सौम्य; बारीक ज्योतीने (दिवा जळणे).

**मंदाग्नि-ग्नी** पु. १. प्रखर नसलेला विस्तव. २. (ल.) मंद जठराग्नी; क्षीण पचनशक्ती.

वि. पचनशक्ती तीव्र नसलेला (मनुष्य).

**मं(मां)दार** पु.१. पांढरी रुई. २. एक पुष्पवृक्ष. ३. एक कल्पवृक्ष. [सं.]

**मंदारमाला** स्त्री. एक वृत्त; अश्वघाटी. याच्या चरणात बावीस अक्षरे आणि त, त, त, त, त, त, त, ग हे आठ गण असतात. [सं.]

**मंदावणे** अक्रि.(शब्दशः व ल.) मंद होणे; कमी होणे; रेंगाळणे; आळसावणे.

**मंदावा** पु. (शब्दशः व ल.) मंदपणा; सुस्तपणा; आळस.

**मंदि(दी)र** न. १.गृह; घर. २. देवालय; देऊळ. [सं.]

**मंदिली** वि. जरीच्या काडीचे (कापड).

**मंदी** स्त्री. बाजारभाव घसरण्याची क्रिया; एकूण आर्थिक व्यवहारांची गती कमी होणे.

**मंदील** पु.न. सोन्याचांदीच्या तंतूंनी तयार केलेले पागोटे, फेटा इ. [अर. मिन्दील]

**मंदीवाला** पु. वायद्याची विक्री करून वायद्याच्या मुदतीत उतरलेल्या भावात खरेदी करून मधला फायदा मिळवू पाहणारा.-उद्यम सप्टें१९४१.

**मंदुरा** स्त्री. घोड्याची पागा.

**मंदोच्च** न.पु. ग्रहाच्या कक्षेतील सूर्यापासून अति दूरचा बिंदू; सूर्योच्च.[सं.]

**मंदोदरी** स्त्री. बेडकी. [सं.मंद + उदरी]

**मंदोसा** पु. दाराच्या दोन चौकटींना काटकोनात सांधणारा चौरस तुकडा.

**मंद्र** पु. नाभिस्थानचा गंभीर नाद; एक स्वर; ध्वनी. [सं.]

**मंद्रनाद** पु.(संगीत) हृदयातून निघणारा नाद. ह्या नादाचा उपयोग जवळच्याशी बोलताना करतात.

**मंद्रसप्तक** न. (संगीत) मंद्रनादयुक्त सात स्वरांचा समुदाय.

**मंद्रस्वर** पु. (संगीत) रागालाप सुरू असता तो मंद्रसप्तकांतील अमुक स्वरापर्यंत जावा अशी मर्यादा दाखविणारा त्या सप्तकांतील स्वर.

**मंबरेज** पु. टाचखिळा; आर. [हिं. मम्रीझ; फा. मिह्मीझ]

**मंमं** न. (लहान मुलांत) १. जेवण. २. भात; अन्न. [ध्व.]

**मा, मां** क्रिवि.१. नको; नाही : 'तेह वेळीं मा-भणौणि न घसरें चालतां।' - शिव ५६२. २. नकार :'न यावया मा जिभ लाज ना दे।' -आविश्वा २३. ३. (प्रश्नार्थक अव्यय) ना; होय ना?:'तुम्हीं बकाकरवीं चांदिणें। चरऊं पहा मा।'- ज्ञा ११.१५६. ४. मग; नंतर : 'मा एक जन्म येथें दीजोका । मा काई होइल तें पाहिजे ।'- चक्रधर सिसू. ५. जरी; यद्यपि : 'तान्हेलया मृगतृष्णा । न भल्या सीण जे सणा। मा भेटलया कोणा । काय भेटलें।'-अमृ ७.२१०. ६. तरीपण : 'मा चंद्रासि उणें स्फुरतें कां।'- अमृ ७.१७२. ७. तर मग :'तेवीं हरिभक्तां देहाचा अभावा । मा काळ कणवा घालील घावो ।' -एभा २.६८३. [सं.]

**मा** स्त्री. माता; आई. [सं. मातृ; हिं.]

**मा(मां)ई** स्त्री. १. आई, बहीण किंवा एखाद्या वडीलधाऱ्या बाईला हाक मारण्याचा शब्द. २. (बालभाषा) मांजर. [सं. मातृका]

**माई(इ)क** पहा : **मायिक.**

**माई(इ)क** पु. मायक्रोफोन. [इं.]

**माई(इ)ण, माइणी-नी** पहा : **मायणी**
**माईण-न** स्त्री. लहान पाने असणारे ओव्याच्या झाडासारखे एक झाड. [सं. मायिनी]
**माईण(न)मूळ** न. माईण या औषधी वनस्पतीचे मूळ. या मुळाचे लोणचे घालतात.
**माई(य)फळ** न. माजूफल; मायफळ. [हिं.]
**माई(यं)दळ** क्रिवि. (अशिष्ट) पुष्कळ; भरपूर.
**माउथ ऑर्गन** तोंडाने वाजविले जाणारे एक वाद्य. [इं.]
**माउ(ऊ)ली** स्त्री.१.आई. २. आईसारखी कोणतीही भली स्त्री. ३. जलदेवता.
**माऊलपण-णा** न. पु. १. आईची माया; दयाळूपणा. २. (सामा.) माणुसकी.
**माऊ** स्त्री. खाटेस ताण देण्यासाठी पायगतच्या दोरात पिळवटलेली लांब काठी. (व.)
**माऊ** स्त्री. जखम, क्षत बरे झाल्यावर त्या जागी राहणारी खूण; चट्टा; वण. (को.)
**मा(मां)ऊ** न.१.(बालभाषा) मांजर. २. आईचे थान, स्तन. (व.)
**माऊत-द** पु. महात; माहूत. [सं. महामात्र]
**माकड** न. पु.१. मर्कट; तांबड्या तोंडाचे वानर. लांब शेपटी असलेला सस्तन वर्गातील द्विहस्त प्राणी. २. कवड्यांच्या खेळात न उजविता राहिलेला- अंगावर डाव आलेला - चौथा गडी. [सं. मर्कट]
**माकडखोकला** पु. डांग्या खोकला.
**माकडचेष्टा** स्त्री. द्वाड, पोरकट चाळे; खोड्या.
**माकडटोपी** स्त्री. कानटोपी.
**माकडनारिंगी** स्त्री. एक औषधी वनस्पती; डांग्या खोकल्यावर हिचा पाला उपयोगी आहे.
**माकडनिंबोणी-बूण** स्त्री. नेहमी हिरवे असणारे एक काटेरी झाड. पहा : **माकडी** ४
**माकडफुगडी** स्त्री. मुलींचा एक खेळ.
**माकडमिठी** स्त्री. घट्ट, सहजासहजी न सुटणारी मिठी; मगरमिठी.
**माकडमेवा** पु. हलकी, निःसत्त्व, भूक तृप्त न करणारी फळे, अन्न, विड्याची पाने, ऊस, भुईमुगाच्या शेंगा, हरभरे इ.
**माकडवस्ती** स्त्री. भरपूर झाडे असलेला, जंगली, डोंगराळ प्रदेश.
**माकडहाड** न. पाठीच्या कण्याच्या शेवटी असलेले गुदद्वारावरचे हाड. [सं. मर्कटास्थि]
**माकडी** स्त्री.१. वल्हे अडकविण्याच्या खुंटीचे भोक. (को.) २. तुळई. (गो.) ३. पकड. ४. (दाराची)कडी. (कु.)
**माकडी** स्त्री.१.एक वेल व तिची शेंग; कुइरी. ४. लिंबुणीच्या जातीचे तैलयुक्त लाकूड असणारे एक रानटी झाड. प्रवासी याचा मशालीसारखा उपयोग करतात.
**माकडी** स्त्री. १.गोफाचे हूक. २. एक खेळ. ३. नांगर जुंपण्याची लोखंडी कडी. (झाडी)
**मा(मां)क(ख)ण** न. बैल, घोडा, रेडा इ.च्या पाठीवर पाण्याच्या घागरी ठेवण्यासाठी केलेली लाकडी, लोखंडी चौकट; सांगड. [क. मंकणि[
**माकण** स्त्री. (मल्लविद्या) कुस्तीतील एक पेच.
**माक(ख)ण्या** वि.१. माकण वाहणारा (रेडा, बैल, घोडा इ.). २. पाठीवर माकण घातलेल्या जनावराला हाकणारा, नेणारा.
**माकन** स्त्री. केरमिश्रित ज्वारी. (व.)
**माकनी** स्त्री. जात्याच्या वरच्या तळीच्या छिद्रात असणारा लाकडाचा आडवा तुकडा. (अहि.)
**माकवन** पु. वंगण. (झाडी) [सं. मक्षण]
**माकंद** पु. आम्रवृक्ष. [सं.]
**माका** पु. भृंगिराज; एक औषधी वनस्पती; ओलसर जमिनीत वर्षभर होते; वातहारक; श्राद्धात पितरांच्या पूजेसाठी वापरतात.[सं.मार्कव]
**माकुल** वि. औचित्यपूर्ण; योग्य. [अर.]
**माकुलवाणा, माकुला** वि. देखणा; सुंदर; रम्य; नेटका; सुबक; चिमुकला; चिमणा (मनुष्य, वस्तू). (राजा.)
**माकूल** पु. लष्करी लोकांच्या खांद्यावरील फितीचा आडवा पट्टा. (को.)
**माकूल** वि.१. प्रौढ; सभ्य; जाणता. २. पसंत; रास्त; न्यायाचे. ३. उदार; सन्मान्य; पूज्य; योग्य. ४. शहाणा; अक्कलवान. - पाब१८. : 'याजकरितां तुम्ही राजास माकूल करून परस्परें...'- वाडबाबा १.१५५. ५. मुबलक; पुष्कळ : 'सरन्जामही माकूल दिधला जाईल.'- मइसा ८.२०७. [अर. मअकूल]
**माकोडा** पु. मुंगळा; डोंगळा. (झाडी) [गुज. मंकोडा]
**माख** पु. उडीद. [सं. माष]
**माखटणी** स्त्री. माखणी. (राजा.)
**माखटणे** सक्रि. भाकरी इ.ला तूप इ. चोपडणे. (राजा.) [सं. म्रक्षण=चोपडणे]
**माखण-न, माखटण** न. १. लोणी, तेल चोपडणे; लेपणे. २. लोणी. ३. तेल. (व.) ४. (सामा.) ओशट व चोपडण्याचा पदार्थ. ५.अभ्यंगस्नान. (को. कशेळी)
**माखणी** स्त्री. पहा : **माक(ख)ण**
**माखणे** सक्रि. १.चोपडणे; भरणे; लेपणे (ओशट द्रव्याने शरीर इ.). २.चिखल इ.नी शरीर भरणे. ३. बैलगाडीला वंगण लावणे. (ना.) [गुज. माखण; सं.म्रक्षण]
**माखनी** स्त्री. जात्याच्या वरच्या पाळूच्या मधला, लाकडी भाग. ही वरच्या पाळूच्या मोठ्या छिद्राला वरची पाळू खुंट्याबोवतीच फिरावी म्हणून मर्यादित करते. (खा.)
**माग** पु. १. कोष्ट्याचे कापड विणण्याचे साधन, यंत्र. २. विणताना पावडा खाली जाण्यासाठी केलेली खळी. [सं. मार्ग]
**माग** पु. १. रस्ता; वाट. २. पायरव; चाहूल; चिन्ह. (क्रि. उरणे) ३. पत्ता; शोध; तपास; थांग; छडा. (क्रि. काढणे, लागणे, लावणे.) ४. मळा, बाग यांतील झाडांना पाणी देण्यासाठी केलेला मार्ग; पाट; पाणी जाण्याचा मार्ग.(राजा.) ५. पाटाच्या एका भागाने पाणी दिलेली झाडांची रांग. [सं. मार्ग] (वा.)० **चोरणे**-खाणाखुणा बुजवणे; फसवून झुकांडी देणे. ० **लागणे**- अवशेष राहणे.

**माग** स्त्री. मासे धरण्याचे मोठे जाळे. (को.)

**मागचा-ला, मागील** वि.१. पूर्वीचा; पूर्वकालीन. २. पाठीमागचा; पश्चातभागी असणाऱ्या जागचा; पलीकडे असलेला. ३. नंतर येणारा.

**मागणा-णु** पु. नेहमी काहीतरी मागणारा : 'करंटा पोरटा । मागणु ।'- कला ८. [सं.मृग्]

**मागचा पाय** (आजार, रोग इ.) कमी होणे, उतरणे.

**मागणी** स्त्री.१. लग्नासाठी वरपक्षाने वधूसाठी केलेले मागणे; वाङ्‌निश्चय. (क्रि. घालणे) २. याचना; मागणे.

**मागणी** स्त्री.१. एखादी वस्तू कोणत्या दराने व किती हवी आहे ते सांगणे. २. हव्या असलेल्या गोष्टींची माल मागवण्यासाठी यादी तयार करणे.

**मागणे** न.१. एखादा पदार्थ स्वतःला देण्याविषयी विनंती करणे. २. मागायला आलेला किंवा गेलेला मनुष्य.

**मागणे** सक्रि. याचना करणे; विचारणे.

**मागणे** अक्रि. १. किमतीची चौकशी, विचारपूस करणे; अमुक किमतीला पाहिजे असे म्हणणे. २. लिलावात बोली बोलणे.

**मागणे, मागणेकरी, मागता, मागतेकरी** पु. मागणारा; याचक.

**मागता** पु. याचक; मागणारा : 'मागतेयाचें संतोषलें मन' - रुस्व १३५. [सं. मृग्]

**मागती** स्त्री. माघार; माघार घेणे :'मागोनि मागती सति घे ।'- मोवन १३.७५.

**मागती** स्त्री. इच्छा; मागणी : 'मागती खुंटलीसे मनीं'- ज्ञागा २४८. [सं.मृग्]

**मागती, मागतेन, मागुतमागुतां, माघरेन, मागत्यान** क्रिवि. लागलीच; पुन:पुन्हा; वरचेवर.

**मागत्ये** मागतेकरी; भिक्षेकरी.

**मागध** पु.१. वंशावळी गाणारा भाट; कवी; बंदी. २. क्षत्रिय स्त्रीला वैश्यापासून झालेला मुलगा; एक संकरित जात.

**मागधी** स्त्री. (साहित्य.)एक विशिष्ट प्रकारची पदरचना; रीती. ही कोमल, कठोर व मध्यम अशी तीन प्रकारची आहे. २. एक प्राकृत भाषा.

**मागप, मागपणे** पहा : **मागस, मागसणे**

**मागमू(मो)स-मुद्दा** पु. छडा; पत्ता; ठावठिकाणा; थांग.

**मागमोरा-मोहरा** वि. पाठमोरा.

**मा(मां)गर** पु. शेतकामाच्या हंगामात राहण्यासाठी, शेतात तात्पुरती बांधलेली झोपडी. (राजा., कु.)

न. १. (गवत, सरपण इ.चे) कोठार. २. प्रवासी बैलगाड्यांचे बैल बांधण्याची जागा. येथे त्यांना जकात पडते.

**मा(मां)गरघर** न. मागराप्रमाणे असलेले लांबट, उघडे घर. (राजा.,कु.)

**मागरा** वि. दिसली वस्तू मागणारा; मागण्याची वाईट सवय असलेला.

**मागलट, मागासणी** स्त्री. १. (संकट, ठराव इ.पासून) मागे सरणे; फिरणे; परतणे. (क्रि. पडणे, टाकणे.) २. तपास; छडा; माग. (कु.) ३. दिरंगाई; दिवसगत.(वा.)**मागलटीस, मागासणीस येणे**- फिक्का पडणे; वाईट स्थिती येणे.

**मागलटणे, मागसावणे** अक्रि. एखादे काम लांबणीवर पडणे.

**मागवणे** सक्रि. १.मुद्दाम मागणी करून माल मागवून घेणे. २. सूचना, मत इ. देण्यास जाहीरपणे आवाहन करणे.

**मागस** वि. १.उशिराचे (पीक इ.). २. योग्य काळानंतरचे (देणे). क्रिवि. मागाहून; उशिरा.

**मागसणे** अक्रि. १. विलंब लागणे; दिवसगत होणे; लांबणे. २. (मनुष्य, काम इ.) मागे राहणे; मागसणीत पडणे.

**मागसांडणे** सक्रि. अंतरणे; मागे टाकणे. (को.)

**मागा-गां** क्रिवि. १. मागे; माघारे. २. पूर्वी.

**मागा(घा)ऊन-हून** क्रिवि. १. नंतर; पश्चात; मागोमाग. २. पाठीमागच्या बाजूने.

**मागाडा** क्रिवि. मागे. - शर.

**मागाडा-ड्या** वि. १. वाटाड्या. २. चोर इ.चा माग काढणारा; तपास लावणारा.

**मागातली** स्त्री. चुलीच्या मागची, चुलीच्या उंचीइतकी भिंतीपर्यंतची सपाट जागा.

**मागारी** पु.१. सोबती. (कु.) २. पती; नवरा; पाहुणा.(कु.) ३. मूळ आलेला मनुष्य.(कु.)

**मागारीण** स्त्री. बायको. (कु.)

**मागास** वि. तुलनेने मागे पडलेले, राहिलेले (पीक, मूल इ.).

**मागिलवट** पहा : **मागलट** २

**मागिलीकडे** क्रिवि. अंतर्मुख (वृत्ती, दृष्टी फिरवणे).

**मागिल्ल्यो** न. (विटीदांडूचा खेळ) विटीच्या मागच्या टोकापासून मोजणे. (कर.)

**मागी** स्त्री. १. पहा : **मागणी** १. २. शोध. ३. संबंध; संदर्भ :'दूर ठेली कथेची मागी।'- एभा ११.६९०. ४. आचरण; मार्ग :'आमची मागी अति शुद्ध।'- एभा २९.८९. ५.विचारसरणी :'हें अतर्क्य तर्केना मागी।'- एभा २२.४११. ६. मार्ग; पत्ता; मागमूस. ७. खूण; चिन्ह. [सं. मार्ग्]

**मागीर** स्त्री. मगर; सुसर.(को.)

**मागील** वि. मागचा.

**मागील पायाचा टाळ** अशक्त घोड्याचे मागील दोन्ही पाय एकमेकांवर आपटणे.

**मागीव** वि. १.उसनवार.२. उशिरा येणारे, गरवे; महान (धान्याचे पीक). (को.)

**मागुत-ता-ती-ते, मागुतेन, मागौता, माघुता** क्रिवि. १. पुन्हा; फिरून. २. लगेच. ३. मागे.

**मागू(घू)न, मागाहून** क्रिवि. पहा : **मागा(घा)ऊन-हून**

**मागे-घे** क्रिवि. १. गतकाली; पूर्वी; अगोदर. २. पाठीकडे; पार्श्वभागी. ३. नंतर; पश्चात. ४. (ल.) वर अवलंबून. [सं. मार्ग्] (वा.)**० घेणे, फिरणे, सरणे, हटणे, होणे**-उलट खाणे; परावृत्त होणे; सोडून देणे.**० टाकणे**-१. (पैसा इ.) शिल्लक ठेवणे. २. भीतिग्रस्ताला पाठीशी घालणे. **० पडणे**- १.खर्च न होता शिलकेस राहणे, गाठी पडणे (द्रव्य).२. (आजार) पूर्ण बरा होणे. ३. आठवणीतून जाणे. ४. रद्द

होणे; मोडणे.५. प्रगती कमी होणे. ६. फिक्के पडणे; महत्त्व कमी होणे. ० **पाडणे**-(प्राप्तीतून) शिलकेस, संग्रही टाकणे.० **राहणे**- प्रसिद्धीस न येणे. ० **लागणे**- (एखाद्याचा)पिच्छा पुरवणे; तगादा करणे.० **वळून बघणे**- मागील कार्यावर नजर टाकणे.

**मागे(घे) पाय** वि. पिशाचयोनी :'तुका म्हणे मागें पाय । तया जाय स्थळाशीं ।' - तुगा ६५८.

**मागेपुढे** क्रिवि. १. आजूबाजूस. २. (शब्दशः व ल.) दोन्ही दिशांकडे, गोष्टींकडे; दोन्हीपक्षी. ३. लवकर किंवा उशिरा; आगेमागे; केव्हा ना केव्हा. ४. अस्ताव्यस्तपणे (पडलेल्या वस्तू, बोललेल्या, केलेल्या गोष्टी). ५. कांकू, टंगळमंगळ करून. (क्रि. करणे) ६. केव्हातरी; कधीतरी; आणखी एखाद्या वेळेस; पुढच्या किंवा मागच्या बाजूस. (वा.)० **करणे**- माघार घेऊ लागणे.० **कोणी नसणे**- वडील माणूस किंवा बायकापोरे नसणे. ० **न पाहणे**- मुळीच न कचरणे. ० **पाहून वागणे**- दूरचा विचार करून वागणे.

**मागेला-ल्या** पु. कोकणातील एक जात; तीतील व्यक्ती.

**मागो(घो)टा-टी-ठा** पु.स्त्री. घोडा, बैल इ. पशूंच्या शेपटीच्या खालून नेलेला खोगिराचा बंद, पट्टा.

**मागो(गौ-घौ)ता, मागौतिआं** क्रिवि. १. पुन्हा. २. माघारी; परत.

**मागोदर** क्रिवि. नंतर; शेवटी.

**मागोमाग** क्रिवि. लागलीच; पाठोपाठ. [मागे द्वि.]

**मागोवा-वे** पु.न. १.मार्ग; वाट; दीक्षा; कित्ता. २. अनुकरण; अनुसरणे. ३. तपास; शोध; आधार.

**मागोसा** पु. पत्ता; मागमूस; चाहूल.

**माग्या** पु. विणकर; कोष्टी; माग चालवणारा.

**माघ** पु. चैत्रादी मासगणनेतला अकरावा महिना. [सं.]

**माघड** स्त्री. सरकी पेरण्यासाठी नळ्याच्या वर लावलेली एक प्रकारची लाकडी वाटी, टवळे; वाडे. (व., घाटी)

**माघवटा-स्नान, माघोटा** पु.न. श्रीकृष्णाप्रीत्यर्थ पौषी पौर्णिमेपासून माघी पौर्णिमेपर्यंत नित्य नियमाने सूर्योदयापूर्वी स्नान करण्याचे व्रत.

**माघा** क्रिवि. मागे.

**माघाड** स्त्री. मागील बाजू; पृष्ठस्थान.

**माघार** स्त्री. १.(शब्दशः व ल.) मागे घेणे; उलट मारणे; कचरणे. २.उतरती कळा लागणे; (काम, नशीब इ.) मागे पडणे. ३. मागे हटणे, फिरणे. ४. परत येणे. ५. उलटणे; परतणे (ताप इ.).

**माघारणे** अक्रि. १. मागे, माघार घेणे; परत फिरणे. २. ऱ्हास पावणे. ३.मूळ पदावर येणे. ४. मागे हटणे; मुरडणे. ५. परतणे; उलटणे. सक्रि. मागे सांडणे, टाकणे, पडणे; अतिक्रम करणे.

**माघारपण** न. १. माहेरपण. २. नुकतेच लग्न झालेल्या मुलीचे माहेरून सासरी परत येणे. (क्रि. करणे)

**माघारा-री-रे, माघारिआ** क्रिवि. १. परत; उलट. २. मागे; पश्चात.

**माघारी** वि. पु. १. नुकतेच लग्न झालेल्या मुलाच्या किंवा मुलीच्या बरोबर माहेरी किंवा सासरी जाणारा मनुष्य. (को.)२. सासरच्या मुलीला माहेरी आणण्यासाठी गेलेला, पाठवलेला मनुष्य.

**माघारीण** स्त्री.१. सासरहून माहेरी किंवा माहेरून सासरी काही दिवस राहण्यास जाणारी, नुकतेच लग्न झालेली मुलगी. (को.) २. तरुण पत्नी; मालकीण; गृहिणी.

**माघोडा** क्रिवि. मागोमाग.

**माच** पु. १. गच्ची, पाया इ.चा फोडलेल्या अथवा लहान दगडांनी भरण्याचा मधला भाग. २. गच्ची इ. करताना जमिनीत घातलेले भरण.

**माच** अ. शेळ्या, मेंढ्या मोजताना विसावरील संख्येला लावण्याचा प्रत्यय. उदा. शेळी माच एकवीस. मेंढी माच बावीस.

**माच** पु. १. माचा; माळोचा. २. माळा; मांडव; जिना. ३. आश्रय. ४. ठिकाण. ५. माकण (पाणी आणण्याची).(व.) ६. आंबे इ. पिकवण्यासाठी घातलेली आढी. (व.) ७. खाट; पलंग. [सं. मच्= धारण करणे; मंच] (वा.)० **देणे**- वेढा देणे; मोर्चा देणे.

**माचकणा** पु. पाठीचा कणा.

**माचण** स्त्री. लहान माचा.

**माचण** स्त्री.(नाविक) गलबताची गती बदलताना शीड पालटण्याची क्रिया. ० **घेणे** - नागमोडी मार्गाने जहाज हाकारून वाऱ्याच्या विरुद्ध नेणे.

**माचण** स्त्री. भरणी; भर. (क्रि. भरणे)

**माचणे** सक्रि. १.(आंबे इ.) दाबून नरम करणे. (व.) २. (गच्ची, पाया इ.) दगड इ.नी भरणे. ३. भेगा, चिरा भरणे. या क्रियापदाचे कर्म भरलेली जागा किंवा भरण्यासाठी वापरलेले द्रव्य हे असते. उदा. जमीन माचली, विहीर माचली, गार माचली, खडे माचले इ.

**माचयाल-वेल, माची(चे)ल** स्त्री.न. मिरवणुकीच्या वेळी नवरदेवाला बसवण्यासाठी वापरण्यात येणारी पालखी, मेणा इ. [सं. मंच]

**माचवा** पु. भद्र; क्षोभ; माळा; मांडव.

**माचवा** पु. खाटेचा खूर : '(सर्पु) माचांचि चहु माचवा धरीला'- गोप्रच १२०. [सं. मंचक]

**माचळ** पु. १. कोरळ वृक्ष. याच्या पानांची भाजी करतात. २. एक खाण्यायोग्य गवत.

**माचळी** स्त्री. लहान खाट, बाजले. [सं. मंचक]

**माचंग** पहा : **मोरचंग**

**माचा, माचवा, माचो** पु. १. काथ्याने दोऱ्यांनी विणलेला विशिष्ट आकाराचा पलंग; चोपाळा. (कु.) २. पहा : **मचाण**. ३. पलंगाचा पाय; खूर. ४. पाण्याचा पाट ओलांडून पलीकडे जाण्यासाठी केलेली वाट. [सं. मंचक, मंच]

**माचाड** पु. मोटेच्या तोंडावरील लाकडी चौकट. हिला नाडा बांधतात.

**माचाळ** न. शेतात उभारलेला माळा.

**माची** स्त्री. १.पर्वताच्या पायथ्याजवळची किंवा मध्यभागावरील सपाट २. खुंट व फळ्या पुरून वासरांसाठी केलेला कोंडवाडा.

**माची, माचील** पु. मेणा. (गो.)

**माचुं(चों-चो)डा** पु. (भात, नाचणी इ.च्या) पेंढ्यांचा बिटा; पेंढी. (को.)

**माचूळ** वि. बेचव; मचूळ.

**माचेमार** पु. खेटरांचा, जोड्यांचा मार.

**माचोळा** माळा; माळवद. (तंजा.)
**माचो(चु)ळी** स्त्री. १.पेटी, धान्याचे गोण इ. ठेवण्याची घडवंची. २. लहानसा माच.
**माज** पु.१. स्वयंपाकाचे भांडे जळू नये म्हणून त्याला बाहेरून लावण्याची राख व माती. २. भांड्याला राख व माती फासण्याची क्रिया. ३. राख, माती यांचा केलेला लेप. (राजा.)
**माज** पु. माचा. (माण.)
**माज** पु.१.(शरीर, टेकडी, घर इ.चा) मध्य; मधला भाग. २. कंबर. (क्रि. बांधणे, सोडणे.) ३. हृदय. [सं. मध्य]
**माज** पु.१. अनावर विषयवासना; मस्ती. (क्रि. करणे, येणे, मोडणे.) २. अहंभाव; गर्व; धुंदी; मद. ३. रेलचेल; वृद्धी; आधिक्य. ४. औषधातील मादक गुण , कैफ. ५. खळबळ : 'तरि सिंधूचेनि माजे । जळचरा भय नुपजे ।'– ज्ञा १२.१६५. ६. (विणकाम) हातमागाच्या सुतास पाजण करतेवेळी सूत ताणण्याची बैलीची दोरी. ७. (संगीत) गाण्यातील एक राग. [सं. मद]
**माजक** वि. (मद्य, औषध इ.ने) धुंद झालेला; मत्त. [सं. मादक]
**माजगेला** वि. सहज शेफारणारा; मगरूर; मस्तवाल.
**माजघर** न. पु.१. घराचा मध्य भाग; पडशाळेच्या आतील मुख्य खोली. २. अंतःकरण. [सं. मध्यगृह]
**मा(मां)जण** न.१. देवाच्या मूर्तीला तेल, शेंदूर इ. लावणे, लेपणे. २. असा लेप लावण्याचे द्रव्य. ३. पहा : **१ माज१** [सं. मार्जन]
**मा(मां)जणे** सक्रि. १.मूर्तीला तेल, शेंदराचा लेप लावणे. २. भांड्याला राख व माती लावणे. ३. माखणे; फासणे.
**माजणे** अक्रि. १.मादक पदार्थ, औषधे यांचा अंमल, कैफ चढणे; झिंगणे; धुंद होणे. २. फुगणे; शेफारणे; उन्मत्त होणे; चढून जाऊन गर्विष्ठ, दांडगा होणे. ३. (पौष्टिक खुराकाने) अतिशय पुष्ट, मस्त, धुंद होणे. ४. पुष्कळ, पूर्णपणे, उफाड्याने वाढणे; फोफावणे (पीक). ५. (बातमी, गोष्ट) दूरवर, मुलूखभर पसरणे. ६. वाढणे; वृद्धी पावणे; सर्व बाजूंनी विस्तार होणे (धंदा, गाव, रान यांचा). ७. अमर्याद वाढणे; फुगणे. ८. सवकणे (जीभ, हात इ.). [सं.मद्, माद्य]
**माजपट–पट्टा** पु. कमरपट्टा (विशेषतः बायकांचा) :'अचाट दळ अबळांचें कैसें प्रबळ माजलें । माजपट्यानें माज बांधलें ।'– अमृत २३.
**माजमोड** पु. (विशेषतः म्हैस, घोडी यांची) कामेच्छा शमवणे.
**माजरत** स्त्री. खातरजमा; खात्री. [फा.]
**माज(जि)रा** वि. १. मादक. विशिष्ट धान्यांसंबधी वनस्पतींसंबंधी योजतात. उदा. माजरा हरीक – गोवल इ. २. बेहोष; उन्मत्त; शेफारलेला. ३. चोखंदळ; चवचाल.
**माजरी** स्त्री. गवताबरोबर उगवणारे एक तण.
**माजरु–रू** वि. १.मस्तवाल. २. माजलेला. (व.)
**माजरे** न. मादक धान्य, वनस्पती खाल्ल्याने उत्पन्न झालेला कैफ, धुंदी. वि. कैफ उत्पन्न करणारे.
**माजवण** न. १. उन्मत्तपण. २. मादक पदार्थ : 'कां माजवण दीजे मर्कटा ।'– ज्ञा ३.९. ३. अधिकता : 'चंचळपणाचें माजवण । घेतलें जेणें ।'– स्वादि १.५.१८.
**माजवळ** वि. मध्यम. (गो.)
**माजविणे** सक्रि. उन्माद आणणे; जास्त, अधिक करणे.
**माजवी** स्त्री. टेकडीच्या उतरणीवर केलेला चौथरा; माची. (राजा.)
**माजा** पु. मायफळ. [फा. माजू]
**माजाड** न. १. पाठीचा कणा व कंबर यांचा सांधा. २. कटिप्रदेश; माज (निंदेने, तिरस्काराने).
**माजिटा** पु. उत्कर्ष.– हंको.
**माजिम** न. भांगेसारख्या अमली पदार्थाचे चाटण. पहा : **माजू(जु)म**
**माजिला** वि. मधला. [सं. मध्य]
**माजिवटा** पु. मध्यभाग; मध्य :'शांतीचा माजिवटा । हाकिला जेणें ।'– ज्ञा १८.११८७. [सं. मध्य]
**माजिवटा** पु. १. उन्माद; गुंगी; भर; मरताना होणारा स्मृतिनाश : 'पातलिया मरणाचा माजिवटा ।'– ज्ञा ८.२०८. २. मरणाची वेळ.
**माजिवटे–डा–डे** क्रिवि. मध्ये; आत.
**माजिवडे** वि. मस्त.
**माजी** वि. १.पूर्वीचे; भूतकालीन; गत. २. रद्द; गैरचालू; अनुपस्थित.
**माजी** क्रिवि. आत; मध्ये; मधे.
**माजुमी** वि. १. माणूस खाण्याची सवय असलेला. २. माजूम मिसळलेला.
**माजूफल** न. मायफळ. [सं.]
**माजू(जु)म** स्त्री. साखर, बदाम, पिस्ते इ. मसाला घालून बनवलेल्या भांगेच्या वड्या; कैफी पदार्थ. [अर. मअजून]
**माजूर** वि. (अशिष्ट) माहीत. [अर. मआजूर]
**माजूर** वि. दुबळा. [अर. मअजूर]
**माजूर–माजोरा–री** वि. चढेल; उन्मत्त; गर्विष्ठ; मस्तवाल; माजलेला.
**माजूस** पु. १. जादूगार. २. अग्निपूजक पार्शी इसम.
**माज्या** पु. मोटेच्या वरच्या बाजूचा तुकडा.
**माझा–झे** वि. स्वतःचा; मम. मी या सर्वनामाचे षष्ठीचे रूप. [सं. अस्मत्] (वा.) **माझे तुझे म्हणणे**– पक्षपात करणे.
**माझारी** शअ. आत; मधे; मध्ये :'पै ध्यातां आपणचि परी । ध्यानरूप वृत्तिमाझारी ।'– ज्ञा १८.१०३३.
क्रिवि. मध्यभागी : 'दिसती उचित पदें माझारीं।'– ज्ञा १.८.[सं. मध्य]
**माट** पु. अति गोड खाल्ल्यामुळे तोंडास बसलेली मिठ्ठी. (गो.)
**मा(मां)ट** क्रिवि. दाट; निबिड : 'पाउलें दोनि माट झाडी'– स्मृस्थ ५.
**माट** पु. घाट; जडणघडण. (ना.)
**माटकुला** वि. लहान आकाराचा; चिमुकला.
**माटमु(मू)ट** स्त्री. भयामुळे उद्भवलेली चिंता. (क्रि. करणे) क्रिवि. धागधुग होऊन; भयभीत होऊन. [ध्व.]
**माटन्या, माट्या** पु. सोसाट्याचा वारा; वावटळ. (व.)
**माट(ठ)ली** स्त्री. पाटली; बिंदली. (ना.)
**माटव** पु. मांडव. (कु.) [सं. मंडप]
**माटवी** स्त्री. मूर्तीवर फळे वगैरे बांधण्यासाठी केलेली लाकडी मंडपी; भाळी. (क्रि. बांधणे) [सं.मंडप]

**मा(मां)टु(टू)ळणे** अक्रि. खुंटणे; वाढ संपणे :'नाना फळातिये वेळे । केळीची वाढी मांटुळे।'- ज्ञा १८.१०८२.

**माठ** पु.स्त्री. एक पालेभाजी. तांबडा व पांढरा असे दोन प्रकार. [सं.मारिश]

**माठ** पु. पसरट असा मातीचा घडा; रांजण.
स्त्री. चिकणमाती असलेली जागा. (कु.) [सं.मृद्+घर; मृत्तिका+घर]

**माठ** वि. १. चापटसर; खालपट; किंचित उतरते (छप्पर इ.). २. टिल्लू; खुजट (मनुष्य, पशू). ३. मतिमंद; जडबुद्धी.

**माठणे** अक्रि. १.(जखम, क्षत इ.) भरणे; बरे होणे. २. झिजणे; बोथटणे (धार, टोक). ३. उग्रता कमी होणे. ४. जडवणे; ठोकून बसविणे.
सक्रि.१. टाकीने सारखा व गुळगुळीत करणे; साफ करणे (गुंडे, चिरे इ.).२. हलके-हलके ठोकून गुळगुळीत करणे (दागिने इ.). ३. (धातूच्या नव्या भांड्याचे) पोचे काढणे; साफ करणे. ४. (ल.) एखाद्याला रागावून किंवा मार देऊन वठणीवर आणणे.

**माठरणे** अक्रि. १. जड, सुस्त, मठ्ठ होणे. २. डागळणे; सुकणे; कोमेजणे; टवटवी नाहीशी होणे (वनस्पती इ.ची). ३. भरून येणे; बरे होणे (जखम इ.); मठारणे.
सक्रि. १. घडणे; आकार, रूप देणे. २. (ल.) आपल्या इच्छेप्रमाणे घडवणे, वळवणे.

**माठले** न.१.(पळी, चमचा इ.चे)तोंड.२. समईचे टवळे. ३. ताक करण्याच्या रवीचा माथा, बोंड. ४. लहान मुलाचे चापट व पातळ करभूषण.

**माठवण** न. १.जखम भरून येण्यासाठी लावलेले औषध, माठणारे मलम. २. मठारणारा, माठणारा व्रण.

**माठ(ठा)ळणे** सक्रि. १.(हलके ठोकून) नव्या भांड्याचे पोचे साफ करणे. २. भांडे घडणे, उतरणे. ३. एखादी वस्तू त्यावर हलका हात फिरवून साफ गुळगुळीत करणे - तिला आकार आणणे; हलके चोपून सारखी करणे (जमीन). ३.(ल.) आज्ञाधारक करणे; आपल्या इच्छेप्रमाणे वळवणे.
अक्रि. १. बरी होणे; भरणे; मठारणे (जखम). २. मंद, जड होणे (बुद्धि, मन); मठ्ठ होणे; जड, सुस्त होणे (शरीर, मनुष्य). ३. वाढ खुंटणे; झकाकी, तेज, दम गमावणे (झाड, वनस्पती यांचे).

**माठा-ठ्या** वि. जड; ठोंब्या; जडबुद्धी; मंदमती.

**माठी** स्त्री. बायकांच्या हातातील धातूची पोकळ बांगडी.

**माठीव** वि. टाकीने सारखा व गुळगुळीत केलेला; उत्तम घडवलेला (इमारतीचा दगड).

**माठे** न. १. प्रेत जाळलेल्या जागेवरील बांधकाम (मशीद, थडगे, छत्री, वृंदावन इ.).२. दोन्ही टोकांना उघडी असलेली, पडदी नसलेली शेतातील पडवी, सोपा इ.; दुपाखी ढेलच; पडसाळ.

**माठोडी** स्त्री. बैलगाडीच्या दोन्ही चाकांच्या तुंबड्यांवरील गोल लोखंडी मांडोळ्या. (अहि.)

**माड** पु. (चाडे पितळी व खाली लाकडी दांडा अशा) समईच्या चाड्याचा खालचा भाग. (कु.)

**माड** पु. १. नारळाचे झाड. २. मळा; डोंगर; बाग. (व.)

**माडकुली** स्त्री. मातीचे पसरट भांडे.

**माडगे, माडे** न.१. डाळ, तांदूळ एकत्र शिजवून केलेली खिचडी. २.हुलग्याच्या पिठाचे पातळसर पिठले.

**माडपीर** पु. ताडी पिण्याचे व्यसन असणारा.

**माडवप, माडौचे** सक्रि. तुडवणे. (गो.)

**माडा** पु. लहान माशाची एक जात. (गो.)

**माडा** पु. मंदिर; प्रासाद : 'आंबिकाचिआं माडा जवळीं।'- शिव ४४५.

**माडा-डी** स्त्री. माता : 'माडांचीं सप्रेमळें चित्तें ।'- दाव ३१९. [सं.माता; गु. माडी=आई]

**माडा-डे** स्त्री. लहान झाड; रोपटा; रोपा(उपटून दुसरीकडे लावता येण्याजोगा).
वि. रब्बीच्या पिकाकरता दमदार होण्यासाठी तयार केलेली व खरिपाच्या पेरणीच्या वेळी न पेरता पड टाकलेली जमीन; माढा.

**माडी, माडीपुणे(ने)व** स्त्री. कोजागिरी; आश्विन शुद्ध पौर्णिमा. (व.)

**माडी** स्त्री. माडाच्या पोईपासून स्रवलेला रस; मादक रस.

**माडी** स्त्री. घराचा वरचा मजला.

**माडी-ड्या** स्त्री.पु. अळवाचे लांब मूळ. (आखूड व वाटोळ्या मुळास मुडळी म्हणतात.)

**माडु** पु. स्तन; थान. (ना., व.)

**माडु-डू** पु. हरणाच्या दोन जोडलेल्या शिंगांना पोलादी पाती बसवलेले हत्यार.

**मा(मां)डू(दू)ळ** न.१. सापाची एक जात. २. दोन डोकी किंवा दोन तोंडे असलेला एक प्राणी; दुतोंडे.

**माडे** न. आभास; मिथ्या रचना; गंधर्वनगर : 'अष्टधातूचें दळवाडें । यें तंव गंधर्वादि माडें ।'- ऋम ४९५.

**मांडे** न. लहान मूल : 'माडे पोहवणे।'- स्थपो ८०.

**माडोकी-ळी** स्त्री. अळूची मुडळी; मुळी.

**माडौचे** सक्रि. तुडविणे. (गो.)

**माढ(ढा)ण** न. मीठ, मसाला ठेवण्याचे लाकडी पाळे; हे ताड-माड इ.च्या खोडाचे कोरून केलेले असते. (को.)

**माण** स्त्री. १. (गुरांच्या) मानेला होणारा दाह, सूज; जोंधळ्याचे कोवळे मोड खाल्ल्यामुळे गुरांना होणारा रोग. (गुज.) २. चिकणमाती. ३.निकस, हलकी, भरभरीत माती. ४. पाणी ठेवण्याचे रुंद तोंडाचे मडके. ५. जात्याची वर्तुळाकार मढण; माईण. ६. उसाच्या चरकाच्या तळाशी रस साठविण्यासाठी ठेवलेले भांडे :'जैसा गुळउसाचा घाणा। रसु जाये बाहेरी माणा ।' -एभा १५.१७. ७. मोठ्या जातीचा बांबू; ताज. ८. थर (खडकाचा, मातीचा).

**माणकी** स्त्री. माशाची एक लहान जात. (गो.)

**माणकी, माणकुली** स्त्री. लहान माणीक:'हिरकणी माणकुली।'- स्वादि ९.५.६७.

**माणकुला** वि. लहान व सुंदर; चिमुकला. (राजा.)

**माणकूळे, माणुकुले** न. लहान माणिक : 'प्रकट समशुद्धा मंदिरा माणकूळीं।- गोप्रच १८०.

**माणगा, माणगारा, माणा** पु. १. लांब जातीचा चिवा; बांबू. २. एक वृक्ष.

**माणगे** पहा : **माण** १, ५

**माणवक** न. एक समवृत्त. चरणात आठ अक्षरे व गण भ, त, ल, ग.

**माणस(सा)ळणे** अक्रि. १. माणसाच्या सवयीचा होणे (पशू, पक्षी); क्रूरपणा टाकून गरीब होणे. २. मनुष्य खाण्यास वखवखणे.

**माणसाई** स्त्री. सुज्ञपणा; माणुसकी.

**माणसामाणशी** क्रिवि. १. आपल्या नोकराचाकरांमार्फत. २. माणसाकडून..

**माणिकदंड** पु. एक प्रकारचा हत्ती : 'सिंगळदीपीचे माणिकदंडु विश्याद्रीचे स्वेतखंड.'– शिव ९९.

**माणिका** पु. खोडा : 'गोसावीं माणिकां श्रीचरणु घातला'– लीचपू ५७.

**माणिव** स्त्री. मृदुता; मऊपणा :'ताठा सरला माणिव आली, सहज झाली लीनता ।'– दत्तपदें ६८. [सं. मृदु]

**माणी** स्त्री. मायणी; वसू; वर्तुळाकार मढण; काठीला खाली बसविलेली शेंबी, कडे.

**माणी(णि)क–क्य** न. एक तांबडे रत्न; हे कुरुंदाचे असून हिऱ्याच्या खालोखाल कठीण असते. गुलाबी, काळसर रंगाचेही असते. [सं. माणिक्य]

**माणीकचौक** पु. लवाजम्याचे लोक रांगेने उभे राहण्याचे, खेळ खेळण्याचे असे मोठ्या लोकांच्या घरापुढील कुंपण घातलेले मैदान.

**माणीकपैंजण** न. गव्हाच्या रव्याचा, उकडीचा एक पदार्थ; फळ.

**माणीकवात** स्त्री.१.हाताने पाच धाग्यांची मिळून वळलेली, दिव्यात घालण्याची वात.२. पुढे माणकासारखी गोळी व मागे लांब धागा असणारी कापसाची वात.

**माणीकविंदान्या** वि. अति नाजूक (माणूस).

**माणुसकी** स्त्री.१. दुसऱ्याची दुःखे, वेदना यांची जाणीव, त्यांना मदत करण्याची इच्छा, सहनशीलता असणे; सभ्यता; सुजनता; थोरपणा; मनुष्यातील सात्त्विक गुण. २. मानव्य; मानवी धर्माची जाणीव; मानुषी दयाधर्म; मनुष्यपण. ३. व्यवस्थित वर्तन; मनमिळाऊपणा; नियमितपणा.

**माणूस** पु.स्त्री.न. १. मानव; मनुष्य; मानवी प्राणी. २. रखेली; अंगवस्त्र. (कु.) ३. मनुष्यजाती.
पु.स्त्री. रोजंदारीने कामावर लावलेला मजूर; गडी. [सं. मनुष्य](वा.)० **सोडविणे**– कैद करणे. **माणसाचे काणूस होणे**–आजार, दुःख, काळजी यांमुळे मनुष्य किडकिडीत, कृश होणे; दरिद्री व दुःखी होणे. **माणसाचे खत घालणे**–माणुसकीचा बळी देणे. **माणसातून उठणे**–सर्वस्व गेल्यामुळे अत्यंत हीन, दीन अवस्था येणे. **(भरल्या) माणसातून उठविणे, काढणे,घालविणे**–समाजातून बाहेर टाकणे.

**माणे** न. गुंगी. (गो.)

**माणे, मावणे** अक्रि. राहणे, सामावणे (भांडे, जागा इ.त काही वस्तू). [सं.मा = मापणे]

**माण्या** पु. माणगा; लहान जातीचा बांबू.

**मात** स्त्री. १.गोष्ट; वृत्तांत. २. नावलौकिक; बातमी; कीर्ती; वार्ता.

**मात** पु. चारा : 'वरच्या रानचा शिंगनी मात ।'– मसाप ४.२६४. (को.)

**मात** स्त्री.१.(बुद्धिबळ) प्रतिपक्षाच्या राजाला मोहऱ्याच्या माऱ्यात बिनतोड धरणे; कोंडमारा करणे. २. मोठे, मर्दुमकीचे काम; अद्भुत कृत्य. ३. शर्थ. [अर. मात्] (वा.) ० **करणे**– १.(बुद्धिबळ) प्रतिपक्षाच्या राजाची अडवणूक करणे. २. आपल्या बुद्धिकौशल्याने विरोधकाला हरवणे. ३. अघटित लोकोत्तर कृत्य करणे. ० **खाणे**– पराजित होणे.

**मात** १. थाट; वैभव; ऐश्वर्य; झगझगाट; शानदार समारंभ; दिव्य देखावा. २. प्राचुर्य; वैपुल्य; स्वस्ताई; सुलभता.

**मात** स्त्री. विषावर उपाय; प्रतिकार. (तंजा.) [सं. मात्रा]

**मात–तु** स्त्री. १. बोलणे; भाषण : 'ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात'– ज्ञाहरि ५. २. खबर; गोष्ट. (क्रि. उठणे, उडणे, उठवणे, उडवणे.) ३. वर्णन; स्तुतिपर बोलणे : 'विरक्तीची मात असे कोण्या गुणें ।'– नाम ८४७. ४. नवल; अपूर्वाई : 'जनी म्हणे केली मात ।'– जना १११. ५. नाममंत्र: 'श्रवणीं सांगितली मात, मस्तकी ठेवियला हात'– नाम १३५९. [क.मातु]

**मातकट** वि. माती असलेला (पदार्थ); मातीसारखा रंग असलेला (पदार्थ, वस्तू); गढूळ.

**मातकर** वि. तापदायक; वाईट : 'विरह तुझा अत्यंत मातकर कंठिं प्राण उरले।' – देप २७.

**मातकरी** पु. शेतजमीन भाजण्यासाठी पसरलेल्या राबावर माती घालणारे मजूर; पैरागडी.

**मातगा** वि. १. सहज शेफारणारा; स्वतःचा उत्कर्ष होताच पूर्वीची परिचित माणसे, वस्तू इ.चा तिरस्कार व अनादर करणारा. २. अहंमन्य; गर्विष्ठ. ३. खरमस्त; तापट (घोडा). [सं. मद्]

**मातण–न** स्त्री. माचण.(वा.)० **करणे** –(नाविक) शीड फिरवणे. (हेट.)

**मातणे** अक्रि. १. शेफारणे; गर्वाने फुगणे. २. चांगले चांगले खायला घातल्यामुळे पुंड व अहिवाळ होणे; उन्मत्त होणे. ३. जोराने फैलावणे (वनस्पती). ४. भरून वाहू लागणे; ओथंबणे; भरून येणे. [सं. मद्]

**मातपोख्ती (करणे)** बोली किंवा करार पक्का करणे.

**मातब(ब्ब)र** वि.१.आदर देण्यासारखे; अब्रूदार; सन्मान्य; योग्य. २. थोर; श्रीमान; प्रतिष्ठित. ३. मोठा; स्थूल. ४. महत्त्वाचा; मौल्यवान : 'तहनाम्यासारखे मातबर कागदपत्र अर्थ लावण्याकरितां पुढें यावयाचे होते.'– सासं २.१९३. [अर. मुअतबर]

**मातब(ब्ब)री** स्त्री. १. मान्यता; थोरवी; श्रेष्ठता.२.पत; प्रतिष्ठा.३. महत्त्व; किंमत.

**मातम–मी** न.स्त्री. १. शोक; दुःख. २. दुखवटा. [फा. मातम्]

**मातमपुरशी–सी, मातमपुर्शी** स्त्री. दुखवटा; दुखवट्याची वस्त्रे; दुखवट्यासंबंधी विचारपूस :'हमसिरा बेगमेस एक दुशाला पल्लेदार मातमपुर्सीचा.'– दिमरा. [फा. मातम्पुर्सी]

**मातंग** पु. १. हत्ती. [सं.]

**मातंग** पु. मांग.

**माता** स्त्री.१. आई. २. देवाची शक्ती, त्याची पत्नी. ३. देवी (रोग).[सं.]

**माताइ-ई** स्त्री. मस्ती; मताचा आग्रह; उन्मत्तपणा; वेड : 'माताई ते वादी दिग्गजु सकळा । भूमंडळीचें ।'- शिव २५. [मत्ताई = माताई]
**मातामह** पु. आईचे वडील. [सं.]
**मातायते** वि. माजलेले; मातलेले : 'दैत्य रगडा मातायते पाउडा।'- गस्तो ८२. [सं.मद्]
**मातावळा-ळे** वि. १. वेडा : 'काव्यें जाहलीं मातावळीं।'- शिव ८५. २. मस्त; गुंग : 'प्रबंधें होती मातावळें । कविजनांचें ।'- शिव १५. [सं. मत्त+आवलि]
**माताहेड्या** पु. देवीडॉक्टर. (झाडी)
**मातियेडे** न. मातकाम करणारा.
**माती** स्त्री. १.पृथ्वी; दगडावाचून पृथ्वीचा अंश; धूळ. २. (ल.) स्थूल, जड शरीर : 'कीर्तनासी जाता तुझी जड झाली माती।'-तुगा २९८७. ३. (ल.) नाश; नासाडी; दुर्दशा. ४. अगदी काही नाही या अर्थी. ५. निरुपयोगी, बिनकिमतीचा पदार्थ. ६. (ल.) मृत शरीर. ७. नैसर्गिक रीतीने मेलेल्या जनावराचे मांस; मढे. ८. शाडू. [सं.मृत्तिका] (वा.) **० आड करणे, घालणे, टाकणे, ठेवणे** - १. (शब्दशः व ल.) मातीखाली ठेवणे; पुरणे; आच्छादणे; झाकणे (प्रेत, धन, ठेवा). २. विसरून जाणे; (कलह, अपराध इ.वर) पांघरूण घालणे; पुनःपुन्हा त्याच गोष्टीचा उल्लेख न करणे. **०मातेरा करणे**-(एखाद्या वस्तूची) नासाडी करणे; तिचा सुखावहपणा हिरावून घेणे. **० (मोत) करणे**- प्रेतदहन करणे; मूठमाती देणे; पुरणे. (व.)**० खाणे**- पराभूत होणे. **० डोईवर घेणे**- शरण जाणे; शिरसावंद्य मानणे. **मातीचा माल होणे, राहणे**-अप्रतिष्ठा होणे किंवा महत्त्व कमी होणे. **मातीत माती मिसळणे, मातीला देणे** -प्रेत पुरणे; और्ध्वदेहिक, उत्तरक्रिया करणे. **मातीला जाणे, येणे**-प्रेतयात्रेला जाणे. **० अन्नात कालवणे**- एखाद्याच्या उपजीविकेचे साधन नाहीसे करणे; पोटावर पाय आणणे. **तोंडात माती पडणे**-प्राप्ती बुडणे.
**माती** मेलेल्या जनावरांचे मांस खाणाऱ्या जाती.
**मातीचा मैराळ** वि. जंगी व स्थूल, गलेलठ्ठ (माणूस).
**मातीचे कुल्ले** प्रेमाचा देखावा; एकोपा नसल्यामुळे संकटाच्या वेळी उपयोगी न पडणारे नातेवाईक, संबंधी; बळेच लावलेला नातेसंबंध.
**मातुल** पु. मामा; आईचा भाऊ. [सं.]
**मातुलंगी-लिंग-लिंगी** स्त्री.पहा: **महाळुंग**
**मातु(तो)श्री** स्त्री. आई; माता. [सं. मातृश्री, मातृःश्री]
**मातृ** स्त्री. आई. सहसा समासात वापरतात. उदा. मातृकुल, मातृगोत्र. [सं.]
**मातृका** स्त्री. १. वर्णमालेतील एक वर्ण; अ ते ह पर्यंतची अक्षरे. :'ओंकार मातृकांसकट । तोचि जाणावा कंबुकंठ । - एरुस्व १.४२. २. आई अथवा दाई. ३. देवता. या आठ आहेत. ४. मूर्च्छना; सूर; स्वर. ५. (नृत्य.) दोन करणांचा समुदाय. [सं.]
**मातृका** स्त्री. औषधी मात्रेचा वळसा
**मातृकी** वि. वर्णानुक्रमाने प्रारंभ होणाऱ्या ओव्यांनी रचलेले (काव्य) : 'जालें हें संपूर्ण रुक्मिणीसैंवर : मातृकी नागर : वोवीबंधीं' - मारुस्व १०७. [सं.मातृका]
**मातृगया** स्त्री. १.सिद्धपूर नावाचे क्षेत्र. २. गयेस केलेले आईचे श्राद्ध.[सं.]
**मातृदिन** पु. आईला मान देऊन तिचे कौतुक करण्यासाठी साजरा केला जाणारा मे महिन्यातील दुसरा रविवार.
**मातृभाषा** स्त्री. लहानपणापासून कानावर पडणारी, घरात व आसपास बोलली जाणारी, सामान्यतः जेथे जन्म जाला तेथे बोलली जाणारी भाषा.
**मातृभूमी** स्त्री. जेथे जन्म झाला ते ठिकाण.
**मातृभोजन** न. मुंजीच्या दिवशी बटूने वपनाच्यापूर्वी मातेसह करायचे भोजन; बटू व आईचा एकत्रित भोजन समारंभ. [सं.]
**मातेर** न. जखमेतील पू. (को.)
**मातेरा** गळा कापणे.
**माते(त्ये)रा-रे, मातेराकोतेरा** पु.न. १. धान्यातून वेचून काढलेला कचरा. २.(ल.) पूर्ण नाश. ३. खराबी; दुर्दशा; धूळधाण. ४. अप्रतिष्ठा. ५. गोदामात वा दुकानात सांडलेल्या व एकत्रित झालेल्या अनेक प्रकारच्या धान्यांचे मिश्रण.
**मातेरे** वि. मळके; मळलेले.
**मातोळी** स्त्री. शेणवी ब्राह्मणातील काही घराण्यांत दरवर्षी शूद्र स्त्रीला नारळ, तेल, फुले देऊन भोजन घालण्याचा एक कुळाचार.
**मात्कर** पु. मातीच्या भिंती घालणारा; मातकाम करणारा. (व.)
**मात्मसाद** पु. साधू; महात्मा : 'त्रिदंडी संन्यासी जटिल गोसावी बैरागी भात्मसाद असे पाखंडी आहेत.'- पेशवेकालीन महाराष्ट्र ४३२.
**मात्र** न. १.दृश्य तात्त्विक द्रव्याचे प्राथमिक सूक्ष्म, अदृश्य चिन्ह. २. समुदाय; संपूर्ण जात-वर्ग; साकल्य; वस्तुजात. उदा. मनुष्यमात्र. क्रिवि. १. केवळ; फक्त; नुसता; च; बरीक. २. यत्किंचित्; थोडेसे.
**मात्र** स्त्री. अक्षरातील मात्रा. पहा : **मात्रा १**
**मात्रा** स्त्री. १.एकार, ओकार दाखवण्यासाठी अक्षराच्या डोक्यावर दिलेली एक तिरकस रेघ. २. प्रणवाचे तीन अवयव, भाग प्रत्येकी; अकार, उकार, मकार. ३. ऱ्हस्व स्वर अथवा कोणताही वर्ण उच्चारण्यास लागणारा काल; वर्ण. ४.(छंदशास्त्र)परिमाण; गणाक्षर; गायनातील किंवा दुसरे कोणतेही स्वरांचे कालमान. ५. इयत्ता; एक लहान परिमाण. ६. रसायन (गोळीच्या, चूर्णाच्या रूपाने असलेले); रोगनाशक औषधी पदार्थ; औषध. ७. (ल.) औषधांचे मिश्रणप्रमाण (खनिज पदार्थांचे किंवा वनस्पतींचे केलेले). ८. कालमर्यादा; चुटकी वाजवण्यास किंवा पापणीची उघडझाप होण्यास लागणारा काळ; सशक्त, निरोगी मनुष्याच्या नाडीच्या दोन ठोक्यांतील काळ. ९. संपत्ती; ऐवज; पैसा; माल. १०. सामानसुमान; गाठोडे; वस्त्रपात्र : 'आपुली अवघी मात्रा घेतली'- लीचउ १७२. ११. भोजनसामग्री; फराळाचे साहित्य.१२. भिक्षेची झोळी : 'तें धन तेणें मात्रेमध्यें घातलें असे।'-पंच १.२७. १३. आहार. १४. वासनांचा विषय; इंद्रिय विषय; वृत्तिविषय. १५.हिंमत; धैर्य. १६. नियंत्रण; संयमन : 'विहित मात्रेचा उघडा : थोर दंड केला'- सव ३४४. [सं.] (वा.) **० चालू न देणे**- विरुद्ध पक्षाचे बेत हाणून पाडणे.**० न चालणे**-इलाज न चालणे;

सामर्थ्याची प्रौढी कुचकामी ठरणे. ० **लागू पडणे**- इलाज यशस्वी होणे. ० **वर असणे**- वर्चस्व असणे.

**मात्रापद्धती** स्त्री. (गणित) दशांशमापन पद्धती; (इं.) मेट्रिक सिस्टीम.

**मात्रास्नान** न. विधियुक्त मंत्रस्नान : 'आवघां लोकीं पेर्णीं मात्रास्नानें केलीं'- लीचपू २. [सं.]

**मात्सर्य** न. हेवा; दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणे. [सं.]

**मात्सो** क्रिवि. थोडासा.

**माथण-णी** पु. स्त्री. रुंद तोंडाचा मातीचा डेरा, रांजण (ताक घुसळण्याचा अथवा पाणी साठवण्याचा). [सं. मथ्]

**माथण** पहा : **माचण**. (वा.) ० **करणे**- एका बाजूला असलेले शीड गुंडाळून दुसऱ्या बाजूला ताणणे.

**माथफळी** स्त्री.गोसावी, बैरागी यांच्या हातातील कुबडीवजा आडवी फळी.

**माथरणे** उक्रि. भारणे (मंत्राने). [सं.मंत्र्, मंत्रय]

**माथ(थु)ला-ळा** पु. १. पळीचे टवळे, तोंड. २. घुसळण्याच्या रवीचा फुगीर भाग, फूल.

**माथवणे** न. चांभारांच्या लग्नात दुसऱ्या दिवशी वधूकडील वऱ्हाड्यांच्या डोक्याला खोबरे लावून त्यांना घालण्यात येणारे स्नान.

**माथवी** स्त्री. ताक घुसळण्याचा डेरा.

**माथवीय** न. डेऱ्यातील पाणी.

**माथा-थे** पु. न. १. डोक्याचा अग्रभाग; टाळू. २. कपाळ. ३. डोके. ४.घुसळण्याच्या रवीचा फुगीर भाग. ५. शिखर; टेंबा; शेंडा (पर्वत, झाड इ.चा). ६. पहा : **डोके**. [सं.मस्तक] (वा.)० **उजळ होणे**- आलेला अपवाद, दोष इ. दूर होणे.० **तुकविणे**- आनंदाने मस्तक डोलवणे. **माथा-थी मारणे**-एखाद्यावर सोपवणे; विश्वासणे; अंगावर टाकणे(काम, धंदा इ.).० **वाहणे**- फुले इ. डोक्यावर समर्पण करणे. **माथी बसणे**-एखाद्यावर लादले जाणे. **माथ्यावर चढविणे**- लाडाने वाटेल तसे वागू देणे. **माथ्यावरचा पदर टाकणे, उतरणे, पडणे**- वेश्या बनणे.

**माथाकूट** स्त्री.न. १.(मूर्खास शिकवणे, हटवाद्याशी वाद करणे इ.) कंटाळा आणणारा, त्रासदायक व काही लाभ नसलेला धंदा, काम. २. एखाद्या गोष्टीबद्दल चीड व शीण आणणारा हट्ट धरून बसणे; एकसारखी बडबड; त्राग्याची मागणी.

**माथाडी** वि. कष्टकरी; मजूर; हमाल; श्रमिक; पाथरवट; श्रमजीवी.

**माथाशूळ** पु. १. भयंकर डोकेदुखी. २.एक सरळ वाढणारी वनस्पती.

**माथे** न. शिर; मस्तक : 'संकटांत तीच म्हणोनी उंच करी माथें।'- विक ६. (वा.) ० **करणे**- (विधवांनी) केशवपन करणे. (कु.)० **पिकवणे**- त्रास देणे; डोके उठवणे. ० **फिरणे**- १. अतिशय रागावणे.२. वेडा होणे. ० **बोथविणे**- हजामत करविणे.

**माथेकळी** स्त्री. अंगरख्याची एक कळी, भाग.

**माथेफळी** स्त्री. उसाच्या चरकातील नवरानवरीचे माथे ज्यात बसवले जातात अशी फळी.

**माथेफिरू** पु. वि. संतापी; अविचाराने भलतीच कृत्ये करणारा; भ्रमिष्ट.

**माथेफोड** स्त्री. पहा : **माथाकूट**
वि. कठीण व त्रासदायक; चीड व शीण आणणारे (काम).

**माथोट-टी** न.स्त्री.१.बैलाच्या शिंगाच्या मुळाशी बांधलेली दोरी. २. अशी दोरी जेथे बांधतात तो बैलाच्या डोक्याचा भाग. ३. शिंगाभोवतालचे गोंडे . ३. गोंडे ज्यास बांधले जातात असे बंधन. ४. डोंगराचा माथा.

**माथ्या-थ्यो** पु. १. रवी इ.चा माथा, बोंड. २. रवी. (चि.)

**माथ्याचा** वि. हेकेखोर; हट्टी. [गुज.]

**माद** पु. धुंदी; माज (गर्व, आनंद इ.चा). [सं. मद]

**माद** न. पगोडाच्या अर्ध्या किमतीचे एक नाणे.

**मादक** वि. (शब्दशः व ल.) मत्त करणारा; कैफी; अमली (मद्य, औषधी, संपत्ती, विद्या, शक्ती).

**मादगा-गी** वि. लवकर गर्वाने ताठणारा; सहज उद्धट व तोरेबाज होणारा; मातगा.

**मादने** न. मर्दनयुक्त, गरम पाण्याने केलेले स्नान; अंघोळ : 'तै गोसावी मादनें वर्जिलें।'- भाए १३९.

**मादर** स्त्री. आई. [फा.]

**मादरपाट** पहा : **मांजरपाट** [ता. मद्रपल्लम]

**मादल** पु. ढोल.

**मादव** स्त्री. गाय, म्हैस इत्यादींनी कास आत ओढून घेणे व विण्याचे चिन्ह दाखविण्याचे थांबणे. (क्रि. करणे) [सं.मद = माज]

**मादव** स्त्री.वस्त्र; मदवी.

**माद(र)वान, मादवत** स्त्री. मोठी व उमदी घोडी. [फा. मादवान]

**मादळ** पु. ढोलासारखे रणवाद्य : 'भेरीं तुरीं मादळीं।'- गरा १०२. [सं. मार्दल]

**मादा-दी, मादिका** स्त्री.१. स्त्री जाती. २. नर-मादी या जोडीपैकी एक अवयव. पहा : **नरमादी**. ३. दोन अवयवांच्या, वस्तूंच्या दोन अवयवांपैकी लहान अवयव किंवा एकमेकीत अडकविण्याच्या दोन वस्तूंपैकी जीत दुसरी वस्तू अडकवतात अशी वस्तू. ४.(उसाचा चरक) दोन लाटांच्या चरकांतील डावी लाट; तीन लाटांच्या चरकातील बाजूच्या दोन लाटांपैकी प्रत्येक. [फा. माद]

**मादाण** मोठ्या रुंद तोंडाचे भांडे; मांदण.

**मादीचा आंख** उसाच्या चरकाच्या बाजूंच्या वृत्तचिती बसण्यासाठी त्याच्या मधोमध पाडलेल्या भोकात बसवलेले खिळे.

**मादुरी** पु. वार्ता, बातमी सांगणारा.

**मा(मां)दुरी** पु.१. चाबुकस्वार. २. तबेला ठेवणारा : 'कां मांदुरी लोकांचा घोडा । गजपतिही मानी थोडा ।' -ज्ञा १६.२२५.

**मादुळणे** क्रि. खुंटणे; खुरटणे.

**माद्री, मादरी** स्त्री. प्रकार; तऱ्हा. (तंजा.) [सं. मात्र]

**माद्री** स्त्री. जोगीण.

**माधवगिरी** पु. (अप.) माधुकरी. (को.)

**माधवी** स्त्री. मधापासून गाळलेले मद्य. गौडी, माधवी, पैष्टी अशी तीन प्रकारची मद्ये आहेत. [सं. मधु = मध]

**माधवी** पु. १. नाटकातील विदूषक; दशावताराच्या खेळातील सोंगासारखे हास्यरसोत्पादक सोंग.

स्त्री. १. पांढरी व सुवासिक फुले येणारी एक वेल; कस्तुरमोगरा; मधुमालती. २. चंद्राची सतरावी कळा.

**माधळ** पु. मृदंग.

**माधु(धो)करी** स्त्री. ब्राह्मणाला भिक्षा म्हणून दिलेले अन्न.

पु. मधुकरवृत्तीने (भुंगा जसा फुलातून थोडा-थोडा मध आणतो त्याप्रमाणे) दारोदार भिक्षा मागून आणलेल्या अन्नावर उपजीविका करणारा; शिजल्या अन्नाची भिक्षा मागणारा. [सं. मधुकर]

**माधुरी** स्त्री.१. वाचा; वाणी : 'तैसी बोली साचारी। अवतरो माझी माधुरी।'- ज्ञा १४.३१. २. मधुर ध्वनी; गोड आवाज.

**माधुर्य** न. १.मधुरपणा; अत्यंत गोडी. २. मंजुळता; सुगंधितता; मनोरमता इ. :'श्राव्यात्वें तरी माधुर्य । पायीं घाली।'- ज्ञा १६.११८. ३. मृदुता; सौम्यता; सात्त्विकपणा (स्वभावाच्या, चालीरीतींचा). [सं. मधुर]

**माध्यम** न. द्वार; साधन. [सं.मध्यम]

**माध्यमिक** वि. शालेय शिक्षणातील इयत्ता पाचवी ते दहावीपर्यंतच्या शिक्षणाचा कालावधी.

पु. आत्मा अणू नाही, महान नाही, मध्यम परिमाणाचा आहे असे मत; या मताचे लोक. [सं.मध्यम]

**माध्यस्थ** न. (प्र.) माध्यस्थ्य; मध्यस्थाचे काम.

वि. मध्यस्थपणा करणारा; मध्यस्थ. [सं.]

**माध्यान्ह** स्त्री. दुपार; भर दोन प्रहर.[सं.] (वा.)०**मारणे**- पुख्खा झोडणे; स्वतः श्रम न करता मिळालेल्या अन्नावर यथेच्छ हात मारणे. (ना.)

**माध्यान्ही येणे** - निश्चयास येणे.

**माध्यान्हवृत्त** न. खस्वस्तिक व ध्रुव यांमधून जाणारे याम्योत्तर वृत्त.[सं.]

**माध्वी** स्त्री. १. मोहाच्या फुलाचे मद्य. २. (सामा.) मद्य. ३.खजुराच्या झाडाचा एक प्रकार.

**मान** अ.१. मर्यादा; अंतर. २. मध्ये; आत. (अहि.)

**मान-ण** स्त्री. १.चिकणमाती. २. तांबूस रंगाची टणक जमीन; मुरुम. (व.) ३. कोकण व देश यांच्या सरहद्दीतील काळे काटे. (बे.)

**मान** स्त्री. १. ग्रीवा; गळ्याचा मागचा भाग. २. गळ्याला होणारा रोग. ३. (अशुद्ध) गळा.४. (नृत्य.) नृत्यातील मानेच्या चलनवलनाचे प्रकार (सम, नत, अंचित, कुंचित, रोचित वगैरे नऊ प्रकार). [सं. मन्या] (वा.)० **अडकणे**- पेचात, संकटात सापडणे. ० **कंबर एक करणे**- १. मान खाली वाकवून कामाला लागणे. (गो.) २. सर्व शरीर ताठून जाणे. ० **काट्यावर नसणे**-(एखाद्याने)अति गर्विष्ठ, उद्दाम किंवा मगरूर असणे.० **कापणे**-१.एखाद्याच्या उपजीविकेच्या साधनाचा नाश करणे. २. विश्वासघात करणे; फसवणे. ३. मोठी हानी होणे. ० **खाली घालणे**- अपमान सहन करण्याचा प्रसंग येणे. ० **चोळणे**- का-कू करणे. (व.)० **टाकणे**-१.थकणे; शक्तिहीन, निर्बल होणे. २. मृत्यू पावणे. ० **डोलवणे, हालविणे**- १.रुकार, पसंती, प्रशंसा करण्यासाठी मान हालवणे; पसंती दर्शवणे; वाहवा-कौतुक करणे. २. कबूल करण्यास भाग पाडणे. ० **ताठ ठेवणे**- स्वाभिमान राखणे. ० **तुकविणे**- १. शरणागती पत्करणे. २. वाहवा, कौतुक करणे. ० **धरणे**- ऐन आणीबाणीच्या प्रसंगी एखाद्यास अडवणे. ० **मागणे**- दिवस निश्चित करणे.० **मुंडी मुरगाळणे**-१. (एखाद्याचा) आशाभंग करणे; नाश करणे.२. पूर्णपणे लुटणे. ० **मोडणे**-१. (राखून ठेवलेला पैसा इ.) नाइलाजास्तव किंवा नाखुशीने खर्च करणे. २. थोड्या खर्चासाठी मोठ्या रकमेला हात लावणे. ० **वर करणे**- १. गरिबीतून वैभवास चढणे; दिमाख दाखवणे. २. दुखण्यातून उठणे; डोके वर करणे. ० **वर न करणे**-लाजून, संकोचाने किंवा नम्रतेने वागणे. ० **वाकडी करणे**-१.संमती अथवा रुकार दाखवण्यासाठी डोके एका बाजूस वळवणे. २. असंमती दर्शवणे. ०**वाकविणे**-कबूल करणे; मान्यता दाखवणे; अनुसरणे. ० **सोडविणे** -एखाद्याला अडचणीतून, पेच-प्रसंगातून मुक्त करणे. **(खालच्या)मानेने चालणे, पाहणे**- नम्रतेने, विनयाने, सलज्जतेने चालणे. **मानेवर सुरी ठेवणे**- एखाद्यास धमकी देणे, भिवविणे, नाश करण्यास सिद्ध होणे. **मानेवर, मानेस, मानगुटीस बसणे**-१. गळी लागणे; खनपटीस बसणे. २. (भूत, पिशाच इ.नी) झपाटणे, पछाडणे. ३. इच्छा नसतानाही कर्तव्य म्हणून करावे लागणे.

**मान** पु. १. आदर; मुरवत; पूज्यबुद्धी; सत्कार; गणती. २. तोरा; दिमाख; डौल; स्वतःचा किंवा स्वतःसंबंधी माणसे, वस्तू, देह इत्यादींचा अभिमान; अहंता. ३. अधिकार; हक्क; सत्ता. ४. कामगिरी; प्रतिष्ठा. ५. रीत; रिवाज; चाल. [सं. मन्](वा.) ० **काढणे**- योग्यतेनुसार आदर-सत्कार करणे.

**मान** न. १. (औषधाचा) गुण; आराम; प्रमाण. २. परिमिती; परिमाण; इयत्ता; माप (पदार्थाची लांबी, रुंदी, महत्त्व, संख्या यांचे अथवा काल, देश, गुण यांचे). ३. ज्याच्या योगाने एखादे परिमाण निश्चित करतात ते वजन, लांबी, अवकाश, वेळ इत्यादींचे कोणतेही माप. ४. आधार; प्रमाण; गमक. ५. प्रमाण; तुल्यता :'अव्हेरिलें कवणे मानें।'- ज्ञा १.९२. ६. परिस्थिती. ७. वयोमर्यादा; जगण्याची सीमा. उदा. आयुर्मान. ८. वृत्तांत :'ऐसे मान आइकौनि।'- धवळे पू २३. ९. नेम; टीप; निश्चय (काल, स्थल, कर्ता, सुमार यासंबंधी). १०. युक्तता; वाजवीपणा; औचित्य. ११. मोठेपणाची, महत्त्वाची पदवी; उंची; सुमार; मजल; पायरी. १२. दर; योग्यता; उच्चता; किंमत. [सं. मा = मापणे] (वा.) **मानावर जाणे** - इष्ट देवतेचा नवस फेडणे. (खा.)

**मान** स्त्री. संधी; वाट; सवड; योग्य वेळ.

**मानइ-ई-या** पु. मनुष्य; तरुण मुलगा; पुरुष. [सं. मानव]

**मानक** न. प्रमाण म्हणून मानलेली गोष्ट; मानदंड.

**मानकरी** पु. (अधिकार, नाते, गुण इ.मुळे) दरबार, सभा, लग्न, उत्सव, ग्रामसभा इ. ठिकाणी विशिष्ट मान, नजराणा घेण्याचा हक्क असलेला मनुष्य; आदरणीय, माननीय मनुष्य; सन्मानाचा अधिकारी.

**मानकांड** न. चुनखडीमिश्रित काळी जमीन.

**मानकीन-धनी** पु. मानाचा मनुष्य. (व., घाटी)

**मानकुल** न. माणिक :'परि उद्धातया रंगाचे हीर । ते मानकुलांचि आति।'- भाए ६४५.

**मानखंडना** स्त्री.अनादर;अपमान; अवमान.(क्रि. करणे) [सं.]
**मानखुंट-खोडा** न.पु. ओढाळ जनावराची मान व पुढचा एक पाय यांना बांधण्याची दोरी.
**मानगी** स्त्री. शीण; थकवा. (ना.)
**मानगुटी** स्त्री. (तिरस्कारार्थी) मान; बोकांडी; उपहास, निग्रह इ. दाखवणाऱ्या क्रियापदाशी जोडून योजतात.
**मानगे** न. मगर. (गो.)
**मानगो-गी** स्त्री. आजार; दुखणे. (व.) [सं.मंद]
**मानचित्र** न. नियोजित इमारत, बांधकाम इ.चे काढलेले प्रमाणबद्ध चित्र.
**मानचिन्ह** न. व्यक्तीचे पद, अधिकार वा दर्जा दर्शविणारे चिन्ह.
**मानचुंग** न. रेशमाची एक जात.
**मानट** वि. चिकट; लापण (जमीन).
**मानणूक** स्त्री.१.नवस; देव, पिशाच यांच्यापुढे घेतलेली शपथ. २. मानपान.
**मानणे** सक्रि.१. आज्ञा पाळणे; पूज्य समजणे. २. विश्वास ठेवणे; भरवसा धरणे; मान्य, कबूल करणे; खरे, बरोबर आहे असे धरणे. ३. गृहीत धरणे; लेखणे; भावणे; गणणे. ४. किंमत बाळगणे; मोजणे; विचारणे; महत्त्वाचे गणणे. ५. मानवणे; सुखावह होणे; आरोग्यदायक, पथ्यकारक असणे(हवा, पाणी इ.). ६. मर्जीस येणे; पसंत पडणे; रुचणे. ७. वाटणे; आवडणे. ८. नवस करणे. [सं.मन् = विचार करणे]
**मानत-ता, मानतूक** स्त्री. देवादिकाला केलेला नवस; नवसाचा बळी : 'पाटलानें पुत्राकरितां नबाबास मानत केली होती, त्यास पुत्र झाला.'- मइसा ७.१३९. (कु.) [अर. मआनत्]
**मानता** पु. नवरा. (अहि.)
**मानद** वि. सन्माननीय.
**मानदंड** पु.१. मान्यतेचा निकष; श्रेष्ठतेची कसोटी. २. मूल्यमापनाचा आधार.
**मानपत्र** न. एखाद्या व्यक्तीला त्याच्या गुणाबद्दल किंवा केलेल्या कार्याबद्दल त्याचा गौरव करणारे, त्याच्या सत्कारप्रसंगी दिलेले लेखी पत्र.
**मानपान** पु. १. मानकऱ्याचे हक्क; लग्न, मुंज इ. प्रसंगी मानकऱ्यास दिलेले मान व नजराणे; आदरसत्कार. २. गावच्या पिढीजात अधिकाऱ्याचे हक्क. ३. एखाद्या कामाच्या संबंधी अधिकार व हक्क.
**मानपुळी** स्त्री. कांकररोग. (को.)
**मानबरळी** स्त्री. मनाला येईल ते बरळणारी स्त्री. :'आवो आवो मानबरळे'- शिव २०८. [सं.मानस + प्र + लप्]
**मानबिंदु-दू** पु. अभिमानाचा, अस्मितेचा विषय.
**मानभंग** पु. १. अपमानाने वागविणे; मानहानी. २. पराभव. [सं.]
**मानभाव** पहा : **महानुभाव**
**मानभावी** वि. १. महानुभावांच्या पंथासंबंधी (भाषण, आचार इ.). २.(ल.)मनात कपट ठेवून बाहेरून गोड बोलणारा; लुच्चा; कपटी; दांभिक.
**मानमरातब** पु. आदरसत्कार.
**मानमर्यादा** स्त्री. आदर; मान्यता; भीड; मुरवत. (क्रि. ठेवणे, राखणे.)
**मानमान्यता** स्त्री. १.(पदवी, विद्या इ. असलेल्या मनुष्याचा) योग्य मानसन्मान, आदरातिथ्य. २. मान देण्याची, वंदन करण्याची पात्रता.
**मानमोड** स्त्री. १. मान दुखावणे. २. लिहिणे, शिवणे इ.साठी एकसारखी मान वाकवून करायचे परिश्रम,यातायात, दगदग. ३. अपमान; मानहानी; मानभंग. ४. उभी उतरण.
**मानमोडा** पु. माशाची एक लहान जात. (गो.)
**मानमोडी** स्त्री. १. अतिशय उभ्या चढणीची जागा. २. गुरांचा एक रोग (नेमाड). ३. एन्फ्लुएन्झा रोग. (व.)
वि. अतिशय उभ्या चढाचा (रस्ता, डोंगर).
**मानमोडे** न.(नुकताच संसार करू लागणारा तरुण, गरिबीतून बाहेर निघालेला, दुखण्यातून उठलेला मनुष्य, झपाट्याने पक्व दशेस येणारी वनस्पती इ.बाबत) घडलेली नाशक, विघातक, विध्वंसक गोष्ट : 'या वांग्या काही टवटवीत दिसूं लागल्या होत्या. इतक्यात काय मानमोडे आलें तें कळेना.'-शास्त्रीको.
**मानम्हातारी** स्त्री. १.प्रौढ स्त्री. २. तिच्या वागणुकीचे व गांभीर्याचे अनुकरण करणारी लहान मुलगी.
**मानला** वि. मान्यवर : 'मानलेआ आचार्याची वासनांतरें'- इप्र १७.१४. [सं.मान्य]
**मानव** पु.१. सजीवांच्या जातीमधील ताठ कण्याचा, द्विपाद, अति प्रगत मेंदू असलेला, वाचाशक्ती, कल्पनाशक्ती आणि तर्कशक्ती असणारा प्राणी; मनुष्यजाती. २. मनुष्य.
न. क्षुद्र, पामर मनुष्य :'मनीं मानव वेर्थचिंता वाहातें ।'-राम १७. [सं.]
**मानवणी, मानवीण** स्त्री. १.(लग्न, श्राद्ध इ.प्रसंगी) मृत सुवासिनी स्त्रीची प्रतिनिधीभूत मानलेली सुवासिनी. २. मृत सवतीच्या नावाने देव्हाऱ्यात बसवलेली प्रतिमा, टाक. ३. एक क्षुद्र देवता.
**मानवणे** अक्रि. १.कबुली, परवानगी, रुकार ह्याकरिता मान हालवणे; पटणे; कबूल होणे. २. संतुष्ट होणे :'म्हणौनि मानवले सारंगपाणी।'- धवळे पू ४९. ३. अनुभवास येणे :'ऐसें एकत्वें मानवे ।'- ज्ञा ९.२४७. ४. मान देणे. ५. सोसणे (हवा, पाणी इ.).
**मानवती** स्त्री. १. स्त्री. २. पहा : **मानिनी**
वि. 'मानवत' या पेठेत तयार झालेले (पागोटे इ.). [सं.]
**मानवली** स्त्री. देवीच्या नवसाची सुवासिनी. (व.)
**मानववंश** पु. विशिष्ट शारीरिक लक्षणे असणारे लोक. जसे :- द्रविडी, मंगोलियन, चिनी इ.
**मानववंशशास्त्र** न. निरनिराळ्या वंशांचा व संस्कृतींचा तुलनात्मक व वर्णनात्मक अभ्यास करणारे शास्त्र.
**मानवशास्त्र** न. माणसाच्या शारीरिक विशेषांचा व सांस्कृतिक, सामाजिक परिसराच्या विकासाचा अभ्यास करणारे शास्त्र.
**मानवस्त्र** न. सन्मानार्थ दिलेले वस्त्र.
**मानवळण** न. १. वेढा :'उठवी मानवळणें इंद्रियांची ।'- भाए १६१. २.किल्ल्यावरील पहारेकरी. ३. चोरवस्ती :'मुसीजति मानवळें : मनोधर्माचीं'- मूप्र १०.१४.
**मानवळा-ळी** पु. स्त्री. मानेवरील आखूड केसांची रेषा.
**मानवंदना** स्त्री. विशेष सन्माननीय व्यक्तीला लष्करी थाटात दिली जाणारी सलामी.

**मानविणे** सक्रि. मन वळवणे(मान्य करण्यास, आवडण्यास).

**मानवी** स्त्री. मानुषी; स्त्री.
वि. मनुष्याने केलेले.

**मानवी अधिकार** अव. माणसांना विकसनशील आणि प्रगल्भ जीवन जगण्यासाठी लागणाऱ्या गरजा आणि सुविधा मागण्याचे आणि पुरवून घेण्याचे हक्क; मानवी हक्क.

**मानवेल** स्त्री. अतिशय चिवट अशा बांबूची एक जात. ही तिरकामट्यासाठी अधिक उपयोगी पडते.

**मानव्यविद्या** स्त्री. मनुष्य व त्याचे वर्तन यांविषयी निर्माण झालेले तत्त्वज्ञान; इतिहास, सामाजिक शास्त्रे, साहित्य, कला इ.चा अभ्यास विषय.

**मानस** न.पु. १. मन; चित्त; बुद्धीचे स्थान; बुद्धिशक्ती. २. अंतःकरण; मनोविकाराचे स्थान. ३. इच्छा; प्रवृत्ती; ४. हेतू; उद्देश. ५. (कायदा) ध्वनित, गर्भित मान्यता.
वि. मनासंबंधी; मनाचा. [सं.]

**मानस** स्त्री. १. घूस पकडण्याचा लाकडी सापळा. (कु.) २. खाजणाच्या तोंडाचे लाकडी दार. यातून भरतीचे नदीचे पाणी शेतात घातले जाते. (गो.)

**मानसशास्त्र** न. मनुष्याच्या मनाचा अभ्यास करणारे शास्त्र.

**मानसिक** न.१.पराकाष्ठेचे अल्पत्व; निव्वळ कल्पना.२. एखाद्या गोष्टीविषयी होणारा संदेह : 'त्याचें येण्याचें असल्या पावसात मानसिकच दिसतें नांहीं.'– शाको.
पु. कल्पनारंजन; विचार : 'मनीं मानसिक न करावा कधीं'– नाम ७८९.
वि. १. मनाचा; बुद्धीचा; मनात असणारा; मनासंबंधी. २. काल्पनिक. ३. संशयित; अनिश्चित; निवळ कल्पनीय. [सं.]

**मानसिक** न. देव, भुते यांना केलेला नवस.

**मानसिकता–त्व** स्त्री.१. मनोवस्था; मानसिक स्थिती. २. मनोभूमिका. ३. दृष्टिकोन; वृत्ती.

**मानस्ती** मानपान.

**माना, मायना** पु. १.आशय; अर्थ; अभिप्राय; धोरण. २. पत्रातील आरंभी मान, आदर, पदवी इ.चा दर्शक मजकूर लिहिण्याचा औपचारिक रिवाज, प्रघात. जसे :– वेदशास्त्रसंपन्न, श्रीमंत राजश्री, राजश्रिया विरजित इ. ३. पत्रादितील मजकूर, हकिकत. ४. योग्यता; औचित्य; वाजवीपणा; अर्थ; उपयोग. ५. गोष्ट : 'चोरांनी घाला घालून हार घेऊन गेले.... हे काय माना ते मना आणून तलास करून देवणे.'– भाअ १८३४. ६. संधी; वेळ : 'या प्रसंगी गनीम कापून काढावयाचा माना आहे.'– वसईची मोहीम. ७. वर्चस्व; ताबा; अंमल. [अर. माना]

**मानाचा** वि. मान घेण्याचा, मिळण्याचा हक्क असणारा. जसे :– मानाचा धनी.

**मानाचे पान** कमी किमतीची असूनही जिच्या योगे मान दिला जातो अशी कोणतीही देणगी, सत्ता अथवा मालमत्तेची बाब.

**मानाटी** स्त्री. आडवी नाट, लाट : 'कल्पतरूचिया मानाटीया : हेलावताति' – शिव २५३.

**मानाय** पु. १.(वयात आलेला) चाकर; मजूर; गडी. (कु., को.) २. अंगाने मोठा, धिप्पाड मनुष्य. [सं. मानव]

**मानाविणे** सक्रि. मान देणे; आदर करणे; सन्मान राखणे.

**मानि(नी)जणे** सक्रि. १.पर्वा करणे : 'दुर्वार वाडवशिखेस न मानिजेले.'– र ३९. २. मानिले जाणे : 'मानीजेसी थोर थोरी नाहीं ।'– तुगा १०८.

**मानिणे** अक्रि. धावत येणे.

**मानिनी** स्त्री.१. आपल्या मानाला जपणारी, स्वाभिमानी स्त्री. २. (नाट्य.)आपल्या प्रियकरावर रागावलेली, मानी स्त्री.

**मानिया** पु. मानी पुरुष : 'कां मानिया निस्तेजा । निकृष्टास्तव'– ज्ञा १६.१७४. [सं.मानिन्]

**मानी** वि. १. गर्विष्ठ; ताठ; चढेल. २. दुराग्रही; हट्टी. ३ . तेजस्वी; उदार; थोर मनाचा. [सं.]

**मानी** स्त्री. १. जात्याच्या वरच्या तळीच्या भोकात बसविलेली लोखंडी वाटोळी चकती; मायणी. २. जाते इ.च्या वरच्या पेढीला पाटी बसवण्यासाठी पाडलेली खाचणी. (को.)

**मानी** क्रिवि. मानाने; अंतरावर.

**मानीव** वि. मानलेला.

**मानुष** पु. नर; मनुष्य. [सं.]

**मानुष–षी** वि. मनुष्याचा; मनुष्यासंबंधी; मानवी.

**मानुषी** स्त्री. नारी; मानव स्त्री. [सं. मनुष्य]

**मानुष्य** न. मनुष्यपणा; मनुष्यत्व; मनुष्याची अवस्था, स्थिती, धर्म.

**मानुस** पु. न. १. माणूस. २. (सांके.) वेश्या : 'मानुसें ऐसी एताति : (मानुसें) हे भाक वानरेस जाणति'– लीचउ ३७४. [सं. मनुष्य]

**माने** क्रि. वाटणे; दिसणे; आवडणे. (तंजा.)

**माने** क्रिवि. समान; बरोबर.

**मानेपाप्टी, मानेच्छु** वि. मान, आदर इ. इच्छिणारा; योग्य मानाविषयी आग्रह धरणारा; मानासाठी हपापलेला. [सं.]

**मान्तूफ** स्त्री. पिशाचादींना (कोंबडे, बकरे इ.चा) बळी देण्याचे कबूल करून त्यांना स्थिरावणे, शांत करणे.

**मान्ने** न. न्हाणीघर. (कु., गो.)

**मान्य** वि. १.आदरार्ह; पूज्य; मानमान्यतेला, योग्यतेला योग्य. २. प्रशस्त; अभिमत; अनुमत; पसंत. ३. तयार; कबूल; राजी. ४. करमुक्त : 'कुंभैपर्ली भूमि ग ५ तलिं मान्य'– आंबे शिला १.८ [सं.]

**मान्यता** स्त्री. १. आज्ञा पाळणे. २. विश्वास ठेवणे. ३. मान; आदर; मुरवत : 'ज्यासि अग्रपूजेची मान्यता ।' – एभा १०.६१३. ४. भारदस्तपणा; पत; योग्यता (मान, आदर, समाचार यांविषयीचा). ५. कबुली; अनुमती; संमती. [सं.]

**मान्यताप्राप्त** वि. प्रमाणित; मान्य.

**मान्या** (राजा., को.) पहा : **माण्या**

**माप** न. १. प्रमाणाने मोजून निश्चित करण्याचे साधन; (वजन, साठा, लांबी, वेळ इ.) मोजण्याची, गणण्याची क्रिया. (क्रि. करणे, चालवणे, घेणे, मांडणे , लावणे.) २. गणना; गणनेने निश्चित करणे. ३. मापलेला, परिमित भाग. ४. बारा डोळे किंवा चार पायली. (खा.) पहा : **डोळा**

१०. ५. रहाटगाड्यातील घट : 'गगनाचां राहाटी माप : सुधाकराचें'- रुस्व ४९७. [सं.मा = मोजणे] (वा.)० **कुत्र्याने नेणे**- एखादी गोष्ट भूतकाळात जमा होणे.० **(पदरी) घालणे**- एखादी गोष्ट अमान्य करणाऱ्याला ती अनेक प्रमाणांनी खरी करून पटवून देणे. ० **चालणे**- कीर्ती पसरणे. ० **लागणे, मापी लागणे**-१. कमी कमी होणे :'मापीं लागले शरीर।'- दास ३.९.१. २. आयुष्य संपत आल्याची जाणीव होणे.

**माप** न. १. निमित्त. २. स्मरण.

**मा(मो)प** न. उन्हात वाळवलेली मोठी वीट; कच्ची वीट.
वि. रगड; पुष्कळ; उमाप.

**मापटे** न. साठप्याचे माप; अर्धा शेर; निठवे.

**मापणे** सक्रि. १.(वजन, साठवा, लांबी, वेळ यांच्या) मापाने निश्चित करणे; मोजणे; तोल करणे; मेज घेणे. २. पारखणे. [सं.मा = मोजणे]

**मापदंड** पु.अव. लांबी, वजन, घनफळ, क्षेत्रफळ इ. मोजण्यासाठी निश्चित केलेली एकके.

**मापन** न. मापणे; मोजणे; माप घेणे.

**मापनफीत** स्त्री. गुंडाळून ठेवता येण्यासारखी मापायची फीत; (इं.) मेजरटेप.

**मापपट्टी** ऐनजिनसी सारा घेताना धान्य मापण्याबाबत शेतकऱ्यावर बसवलेला कर.

**मापवरताळा-वर्ताळा** पु. १. धान्याच्या साऱ्याच्या खंडीमागे सरकारने हक्काने मागितलेला वरतावळा.२. कुळाकडून धान्य घेताना माप घेण्यासाठी हक्क म्हणून ठरीव खंडापेक्षा एक चौसष्टांश किंवा एक अष्टमांश जास्त घेतलेला माल, रक्कम.

**मापाड्या, मापारी, मापेली, मापदारी** वि.१. (सरकारी कोठ्या, बाजार, माल यांतील) सरकारी धान्य मापणारा. २. (सामा.) मापणारा.

**मापारी** स्त्री. धान्य इ. मोजण्याचे फरा नावाचे माप.

**मापीव** वि.१. साठप्याच्या मापाने निश्चित केलेला. २. मापाने मोजण्यासारखे; साठप्याचे; वजनीच्या उलट.

**माप(पू)ल-ले** न. बोळके. (व.)

**माफ** वि. क्षमा केलेला; सोडलेला (अपराध, अपराधी, कर्ज, एखादे येणे). (क्रि. करणे, होणे.) [अर. मुआफ्]

**माफक, मवाफीक** वि. १.अनुकूल; यथायोग्य. २. बेताचा; मध्यम; जितक्यास तितके; नेमस्त. ३.सदृश; प्रमाणे :'यांस जनेली तमामी फौजेची माफक-हुकुम-विलायत मुक्रर जाली आहे.'- पदमव ११५. [अर. मुआफिक्]

**माफकत** स्त्री. १. पसंती. २. सोय.
वि. १. पसंत: 'यांची अधर्माची वर्तणूक आमचे राजास माफकत पडत नाही.'- दिमरा १.२३६. २. माफक; योग्य.[अर. मुवाफकत्]

**माफ(ब)जत** स्त्री.१.दक्षता; बंदोबस्त. (क्रि. करणे) २.जपणूक : 'दक्षिणावर्त शंख आज्ञा झाल्यास माफजतीनें पाठवून देणे.'- ऐलेसं ४.१८३२. ३. (वस्तू, प्राणी इ.ची आस्थेने वा हयगयीने होणारी) व्यवस्था; स्थिती; अवस्था. ४. संरक्षण :'पाचशें लोक किल्ल्याचे माफजतीस व दोन तोफा आणिक पाठविल्या.'- दिमरा २.९५. [अर. मुहाफजत्]

**माफलात** स्त्री.१.कार्य; काम. २. बजावणी :'आज्ञेप्रमाणें माफलात करून...'- दिमरा १.६७. [अर. मुफ़अलत्]

**माफव्या** वि. बापडा. (व.)

**माफा** पु. स्त्रियांच्या प्रवासाचा मेणा. [अर. महाफ]

**माफिया** पु. मादक पदार्थांचा अवैध पद्धतीने व्यापार करणारा.

**माफी** स्त्री. १.क्षमा; सूट. २. दानरूपाने दिलेली जमीन अगर पैसा. (माळवी) [अर. मुआफी]

**माफीचा साक्षीदार** (कायदा) गुन्हा माफ करून इतर आरोपींविरुद्ध साक्षीदार केलेली आरोपी व्यक्ती.

**माफीचिट्ठी** स्त्री. जकात माफ असल्याबद्दलचा दाखला, चिठ्ठी, पत्र.

**माफोडा** पु.माप फोडण्याची गणेशमूर्ती (गोविंदप्रभूंनी गणेशाच्या मूर्तीवर आघात करून तिची चुकीची मापे बदलली त्यावरून) : 'माफोडेया (गणेशा) दक्षिणे तिव्हाळा प्रकासदर्शन'-स्थापो ८१. [सं. मापन + स्फोट]

**माभळभट-ट्ट** पु. (एक राक्षस महाबळभटाचे सोंग घेऊन कृष्णास मारण्यासाठी गोकुळात आला होता, त्यावरून) १. नेभळा, अव्यवस्थित मनुष्य (विशेषतः मुलगा); पोकळ धोतर नेसणारा; बावळट मनुष्य. २. वेगळा वेश केलेला वा सोंग घेतलेला ब्राह्मण :'तेव्हां माभळभट्ट गर्जुनि तया शास्त्रार्थ सांगे विधी।'- आमहाबळ २२. ३. (ल.) दुसऱ्याची मालमत्ता उडविण्यात उदार असलेला मनुष्य.

**माभळभटी-ट्टी** स्त्री. ढोंगीपणा; बाह्यतः साधुत्वाचा डौल व मनातून कपटी वर्तन.
वि. बावळटासारखे.

**माम-मू** पु. (बालभाषा) आईचा स्तन.
न. भोजन.

**मामरमुंडा** पु. हिजड्यांचा नोकर. पहा : **मुंडा**

**मामलत, मामलीयत** स्त्री. पु. १.सरकारी काम, चाकरी (विशेषतः तहसीलची व अधिकाराची).२. तालुक्याच्या वसुलीचे काम. ३. हाती घेतलेले काम; जोखीम; महत्त्वाचे कार्य, गोष्ट:'सोन्धेकरांचीही मामलीयत चुकवून बिदनूरकरांकडे जावें.'- पया ६९. ४. महत्त्व; वजन; योग्यता; गणना. (बिशाद, किंमत, पाड, कथा, लेख इ. शब्दांप्रमाणे योजतात.) ५. जाबसाल. ६. खंडणी. [अर. मुआमलत]

**मामलतदार, मामलेदार** पु. तालुक्याचा कारभार चालवून जमाबंदीचा वसूल घेणारा अधिकारी. [फा. मआमिलतदार]

**मामला** पु. १.पहा : **मामलत, मामलीयत**. २. (ल.) काम; कृत्य. ३. बाब; बाजू :'तव ते व्यापार बुडाले । मामले आंगीं सेकले ।'- स्वादि २.२. [अर. मुआमलत](वा.)० **होणे**- प्रसार होणे.

**मामलूत** स्त्री. १. मायाळूपणाने (अपराध) माफ करणे; शिक्षा करण्याचे सामर्थ्य असून बाबापुता इ. आर्जव करणे. २. पर्वा; मुलाहिजा.

**मामंजी** पु. सासरा; पतीचे वडील; मामाजी.

**मामा** पु. १. आईचा भाऊ.२. (आदराने) बायकोचे वडील; सासरा. ३. कोणीही पुरुष मनुष्य; गावमामा. ४. (निंदार्थी) निरक्षर व कामात ढिसाळ, अकुशल मनुष्य. ५. (थट्टेने) उंदीर. (रात्री उंदीर शब्दाचा उच्चार करणे अशुभ मानतात. म्हणून उंदरास मामा म्हणतात.) ६. (अश्लील) लहान मुलाची बुल्ली. [सं. मामक] (वा.)० **बनविणे**- खूळ लावणे; चेष्टा करणे; फसविणे.

**मामी** स्त्री. १. मामाची बायको. २. पत्नीची आई; सासू.

**मामुरी-ली** पु.स्त्री. आबादी; संपन्नता; समृद्धता. [फा. मअमूरी]

**मामुलती** स्त्री.१. काकळूत; विनंती. (क्रि. करणे)२. दयेने दुर्लक्ष करणे; हेळसांड करणे. [फा.]

**मामुली-री** वि. रोजच्या व्यवहारातील; सामान्य; किरकोळ; जुजबी.

**मा(महा)मूर** वि. संपन्न; समृद्ध; आबाद :'मुलुक मामूर होत नाहीं.'- मइसा १६.४४. [अर. मुअमूर] (वा.)० **करणे**- वस्ती, वसाहत करणे.

**मामूर** खलास; बंद.- ऐको

**मामूल** पु.१. वहिवाट; साधारण रीत; चाल; दस्तूर :'नजरा माफक-मामूल गुजराणल्या.'- दिमरा २.९६. २. उमेदवार; उत्तेजित मनुष्य. वि.१. रूढ; सामान्य; नेहमीचा.२. प्राचीन; जुना :'तेथे मामूल वहिवाट कशी आहे याची योग्य चौकशी करून...'-टि १.२३८. [अर. मुअमूल]

**माय** स्त्री. १. आई. २. सासू. (को.) ३. स्त्री : 'चौघी माया शृंगार करिती'- ज्ञागा २५९. [सं. मातृका]

**मायचा** पु. पहा : **मचाण**

**माय(ये)चा पूत** १.(खऱ्या आईचा पुत्र) पराक्रमी, प्रतापवान, महत्कृत्य करणारा मनुष्य. २. निंदा, उपहास इ. दर्शवतानाही याचा उपयोग करतात.

**मायची** स्त्री. माळोचा, काहीशी अरुंद पण उंच पायाची बाज किंवा खाट.

**मायझवो** उद्गा. एक शिवी; आईशी वाईट कर्म करणारा. (हेट.)

**मायणी** स्त्री. मुसळ, ठोकणे, जात्याचे पाळे, जात्याच्या आतील खुंटा इ.ना बसवलेले लोखंडी कडे.

**मायते** न. दोन प्रहरचे जेवण. (कर.)

**मायतो** पु. अर्धा दिवस. (गो.)

**मायदळ** पु. मृदंग. पहा : **मांदळ**

**मायना** पु. १.भावार्थ; अभिप्राय; आशय. २. पत्रातील आरंभी लिहिण्याचे औपचारिक संप्रदाय. पहा : **माना** २. ३. दर्जा. [अर. मअना]

**मायना, माना** पु. फायदा; नफा. (को.)

**मायपत्री** स्त्री. हलक्या प्रतीची जायपत्री.

**मायपोट** न. अतिशय शांत व सुरक्षित असलेली जागा; आसरा; थारा; आश्रय; लपण्याची जागा.
वि. १.आश्रय देणारा; रक्षक; पालक (देव, राजा, धनी, लोक, राज्य, देश, गाव, ठिकाण इ.) : 'जें अचिंतां अनाथांचे मायपोट ।'- ज्ञा ८.१९५. २. गरीब; निरुपद्रवी (प्राणी). ३. सर्वसमावेशक. (अहि.)

**मायफळ** न. एक औषधी फळ; माजूफळ. [सं. मायाफल]

**मायमूर्ती** वि. दिसण्यात संभावित परंतु महालुच्चा माणूस.

**मायल** वि. व्यग्र.

**मायलो** पु. तांबडा जोंधळा; मिलो.

**माय(ये)वणी** स्त्री. १. कुलीन स्त्री. २. गर्भार स्त्री. [सं. महावर्णिनी]

**मायवाण** न. नवऱ्या मुलाच्या आईस द्यायचे वाण.(व.)

**माया** स्त्री. १. सृष्टी निर्माण करण्यास साधनीभूत अशी ईश्वरशक्ती. २. सृष्टिप्रपंच; नामरूपात्मक जगत. ३. कपट; कृत्रिम गारुड; ऐंद्रजाल; मोह घालणारी ईश्वराची शक्ती. ४. (तत्त्व.) अवस्तूच्या ठिकाणी वस्तुत्वबुद्धी; मिथ्या कल्पना; भास; खोटा भ्रम : 'पैल जळ हें माया।'- ज्ञा १३.१०३०. ५. नाशवंत रूप. ६. अविद्या; अज्ञान. ७. स्नेह; प्रेम; ममता. ८. दया; करुणा; अनुकंपा. ९. भांग. १०. मोह. [सं.] (वा.) ० **साखळणे**- अति प्रेम करणे; अपूर्वाई करणे.

**माया** स्त्री. १. पुंजी; ऐवज; मालमत्ता; पैसा; डबोले; निधी; द्रव्य. २. वस्त्र इ. शिवताना दोरा निसटू नये म्हणून शिवणीच्या बाहेर सोडलेला वस्त्रादीचा भाग; लिहिताना सोडलेली कोरी जागा, समास. ३. अंतर; फट; वाढलेले अंतर. (अहि.) ४. ओलावा; स्नेह; जिव्हाळा; आपुलकी.

**मायाजाल-ळ, मायापाश** न. पु.१. जग हे पांचभौतिक असून ब्रह्माहून भिन्न आहे असा विश्वास उत्पन्न करणारे, बुद्धी व इंद्रिये यांवर टाकलेले मायेचे जाळे. २. मोह. [सं.]

**मायापुर** न. (ल.) शरीर.

**मायाभान** न. मायेचा भ्रम, झापड :'निरोपिलें ब्रह्मज्ञान। जेणें तुटे मायाभान।'- दास ७.१.६१. [सं.]

**मायालाघव** न. जगत हे ब्रह्मविस्तार नव्हे तर द्रव्यात्मक सृष्टी आहे अशी मनुष्याची वंचना करून देण्याचे मायेचे कौशल्य; अवस्तूच्या ठिकाणी वस्तुत्वबुद्धी उत्पन्न करणारे मायेचे कौशल्य. [सं.]

**मायावी** वि.१. मांत्रिक; गारुडी. २. मायेचा नियंता. ३. खोटा; वरपांगी; कपटी; लबाड (भाषण, मनुष्य, वर्तन) [सं.]

**मायाळी** स्त्री. प्रेमळ स्त्री : 'तंव कोणी मायाळी रुंदतीसी।'-दावि ११५.

**मायाळू-लु** वि. १. ममताळू; प्रेमळ. २. (ल.) जादूगार. [सं.]

**मायांग** न.१. शरीराचा अतिशय कोमल, नाजूक भाग. २. गुदभ्रंशातील बाहेर आलेले आतडे; गुदभ्रंश. ३. बाहेर आलेला गर्भाशय आणि गर्भाशयभ्रंश. ४. योनी; स्त्रियांच्या किंवा मादीच्या जननेंद्रियाच्या आतील जननविषयक अंग, इंद्रिय.

**मायि(यी)क** वि. १. ऐंद्रजालिक; मायेने रचलेला. २. जगत हे वस्तुतः अमूर्त आणि ब्रह्मस्वरूप असता ते पांचभौतिक व सृष्ट आहे असे भासवून वंचना करणारा; अज्ञानी. ३. खोटा; लटका; असत्य; पोकळ : 'आणिक नलगे मायिक पदार्थ ।'- तुगा १०७०. ४. माया करणारा : 'यापरी महीते मायिक । कोणी नसे मज लागी ।'- नव २४.१६६. [सं.]

**मार** पु. मदन :'मानी अहंकृति शिवे असि मार-माते।'- वारुवि २. [सं. मृ]

**मार** पु.१. ठोक; चोप; ताडण. (क्रि. देणे, बसणे, मिळणे.) २. बंदूक, तोफ इ.च्या गोळ्यांचा प्रक्षेप; हल्ला; भडिमार. (क्रि. पडणे) ३. (ल.) गर्दी; बहर. ४. प्राण घेणे; उच्छेद; नाश. ५. निग्रह करणे : 'मनाचा हनमारु ।'- ज्ञा ६.२८९. ६. विपुलता; रेलचेल. ७. एखाद्या गोष्टीचा धबडगा, भारी प्रमाण. ८. क्रियेचा झपाटा, अतिरेक; निष्काळजीपणा

दाखवणाऱ्या भाषणसंप्रदायात प्रकर्षार्थी व पादपूरणार्थी योजतात. ९. कमी-अधिक असणारे जमिनीचे माप. १०. कोंडमारा : 'म्हणौनि कल्पनेसि मारु । करावा इंद्रियांसि संहारु ।'- विसिं २.६२. ११. ठेचा : 'मारु केला मोतियांचा : नक्षेत्राचेया'- रुस्व ५६३. १२. दुष्परिणाम : 'कां आपुलेया मारातें नेणे । विख जैसें ।' ज्ञा ११.४३४. [सं.] (वा.)० **देणे**-एखाद्याला जिंकणे. ० **मारणे**-निश्चयाने व नेटाने हल्ला करणे (अभ्यास, काम इ.वर). **मार मार, मारे मारे करणे, फिरणे, हिंडणे, करीत फिरणे**- आपले दुःख सांगत फिरणे.

**मार** पु. साप. [उर्दू]

**मारई** स्त्री. मोठी शिंप. हिच्यातील माशाला मारवी म्हणतात.

**मारक** पु. १. साथीचा रोग; मरी; साथ. २. मारेकरी; यम.
वि.१. मारणारे; नाश करणारे. २. (ल.) प्रतिकारक; भंजक; दोष काढून टाकणारा (औषध इ.).

**मारकट-णा, मारका-सा** वि.१. हुंदडण्याची, लाथा मारण्याची सवय असलेला, सोकावलेला. २. मारण्याची सवय, खोड असलेला.

**मारका** पु. दबडगा व ओझे; जीव दमवणारा, टेकीला आणणारा कामाचा दबडगा. (क्रि. लावणे, पडणे, असणे, बसणे.)

**मारका** पु. पिशाचांचा एक प्रकार; सर्व भुतांचा राजा. (कु., कशेळी)

**मारका-खा** पु. भयंकर मारामारी; युद्ध; मुकाबला; चकमक. (ना.)

**मारकूट-पीट** स्त्री. मारणे व धबकणे; बुकलणे व कुटणे; मारझोड.

**मारकों(खुं)डा** वि. मारका; अंगावर धावून येणारा (बैल इ.).

**मारग** पु.१. रस्ता; मार्ग. २. रानात जाऊन तेथे स्वयंपाक करून देवीला नैवेद्य समर्पण करणे व देवीचा नवस फेडणे. (क्रि. मळणे) (माण.)

**मारगिरी** स्त्री.१. तोफेच्या किंवा बंदुकीच्या गोळ्यांचा हल्ला; मारा; भडिमार. २. लक्ष्य वेधण्याचे कौशल्य. ३. नेमक्या ठिकाणी गोळा इ. जाण्याजोगी किल्ला इ.वर केलेली सोय. ४. माराचा प्रयोग; मारा.

**मारजांभळ** न. इमारतीच्या उपयोगी पडणारे लाकूड.

**मारण** न. १.मारणे; वध; हिंसा. २. शत्रूच्या नाशार्थ योजिलेला मंत्र, जादू इ. उदा. 'जारण-मारण'. [सं.]

**मारणी** स्त्री. १.प्रहार; मार. २. हल्ला; चाल. ३. वेग. ४. (बंदूक, तोफा रोखून उडविण्याकरिता किल्ल्याच्या तटबंदीत राखलेले) तिरकस उतरते भोक; जंगी.

**मारणे** अक्रि.१. लागणे, परिणाम होणे. २. शरीरात एकदम (चमक, धमक, लचक, शूळ, कळ, उसण इ.) उत्पन्न होणे.
सक्रि.१. ठार करणे; जीव घेणे; व्युत्पत्तिदृष्ट्या 'मृ' ह्या धातूस अनुसरून जरी हा अर्थ प्राथमिक आहे, तथापि तो मारणे ह्या क्रियापदाच्या ऊन-प्रत्ययान्त रूपाशी टाकणे हे क्रियापद योजिले असता अथवा मारणे क्रियापद काही विशिष्ट क्रियाविशेषणांशी किंवा क्रियाविशेषण असलेल्या जीव ह्या शब्दाशी योजिले असता मात्र होतो. उदा. मारून टाकणे; ठार मारणे; जिवानिशी- जिवे मारणे इ. २. ताडण करणे; ठोकणे; पिटणे; हाणणे(कोणत्याही साधनाने). ३. जिंकणे; पराभव करणे. ४. (पारा, कथील इ.च्या) तीव्रतेचा नाश करणे. ५.हल्ला करणे (घर, गाव, प्रवासी इ.वर). ६. लुबाडणे; अंगावर तुटून पडून (ठार मारून, ठोकून, जुलूम करून) हिरावणे, हिसकावून घेणे. ७. काबीज करणे; वश करणे; दमन करणे (मनोविकार, इच्छा, वासना). ८. ठोकणे (खिळे, खुंट्या, मेखा). ९. लावणे; बसवणे; न हालेसा करणे. १०. (सोनारधंदा) कोणत्याही वस्तूला पैलू पाडणे किंवा विशिष्ट आकार देणे; ठसा उमटवणे इ. उदा. वटंगावर बिल्ला मारणे. ११. सांभाळणे; निभावणे; निभावून नेणे; पार पाडणे. १२. लिहिणे. १३. करणे ह्या क्रियापदाच्या विस्तृत अर्थी (जोर, जलदी, झटपट, चटपट इ. क्रिया दाखवायच्या असतील तर) उपयोग करतात. उदा. एवढे काम मारतो आणि येतो. 'करणे' याच्या अनेक अर्थी योजलेल्या 'मारणे' या क्रियापदाचे काही अर्थ असे-उडवणे (बंदूक); लढणे (लढाई); लगावणे (तलवार, चाबूक, छडी); फेकणे, झुगारणे (अस्त्र); ठोकणे (तंबू), शाळा, महाविद्यालयात अनुपस्थित राहणे (तासांना दांडी) इ. झटकन केलेले कृत्य दाखवण्याकरिता योजलेल्या 'मारणे' या क्रियापदाची असंख्य उदाहरणे आहेत. उदा. जोर, दम, चलाखी, उचल ह्या अर्थाच्या द्योतक अशा घालणे, टाकणे, लावणे, पाडणे, हाणणे ही क्रियापदे असलेली दिसून येतात. [सं. मृ = मरणे] (वा.) **मारून उरता न ठेवणे, मारून पीठ-पीठार करणे, मारून भूस भरणे, मारून मारता मोत भरणे**- बेदम मारणे; मरे मरेतो ठोकणे; मारून नरम आणणे; मारून बेशुद्ध करणे इ.

**मारता पीर** वि. १. वस्ताद; जबरदस्त; उतारा; वरकडी. २. तडखपणाने मारणारा (माणूस). [मारणे + फा. पीर]

**मारती** स्त्री.१. लढाऊ फौज :'मारती तीस हजार.'-ऐपो २३२. २. (पत्त्यांचा खेळ) आपणाजवळ ज्या रंगाचे पान नाही व जी आपण हुकमाने मारतो अशी बाजू; कटाप.

**मार(रं)द, मारांदी** स्त्री. खारवटात उगवणारी एक काटेरी वनस्पती.

**मारपाचो** पु. चौकोनी दगड. (गो.)

**मारपी** पु. खाणीतून चिरे काढणारा मनुष्य. (कु.)

**मारपेच** पु. डावपेच; छक्केपंजे; कावा; लबाडीची हिकमत; व्यूह.

**मारफा** स्त्री. लाकूड घासून साफ करण्याची पोलादी मोठी कानस.

**मारबत-द** स्त्री.१. धिंड. २. मिरवणूक. ३. पोळ्याच्या दुसऱ्या दिवशी गावातील इडापिडा, रोगराई बाहेर नेऊन घालविण्यासाठी सोंगे वगैरे काढून काढली जाणारी मिरवणूक; छबिना. ४. पावसाळ्यात रोगराई निर्माण करणारी देवता. ५. हिच्या प्रीत्यर्थ मिरवणूक काढतात तेव्हा गावाबाहेर बांबू-कागद यांच्या साहाय्याने जाळण्यासाठी तयार केलेली अक्राळ-विक्राळ अशी प्रचंड स्त्री प्रतिमा. (वा.)० **खेदणे**- १.एखाद्याची हुर्यो उडविणे.२. (एखाद्यास) हाकलून लावणे. (ना.)

**मारबल, मार्बल** पु. चुनखडकाच्या रूपांतरित स्फटिकासारखा शोभेच्या बांधकामात, शिल्पासाठी वापरण्यात येणारा गुळगुळीत, चकचकीत दगड; संगमरवर.

**मारवा** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा चौथा प्रहर.

**मारवाडी** पु. मारवाड देशातील व्यापारधंदा करणारी एक जात; तीमधील व्यक्ती.
वि. १. मारवाड देशासंबंधी. २. तद्देशीय (व्यापार करणारे लोक). ३.

(ल.) धूर्त; शठ; कृपण; कावेबाज; व्यवहारदक्ष. [सं.मरु]

**मारवाथाट** पु. (संगीत) संगीतातील एक थाट.

**मारवी** स्त्री. मोठ्या जातीचा शिंपमासा; याच्या शिंपेला मारई म्हणतात.

**मारवेल–ळ** पु. स्त्री.१. प्रायः समुद्रकिनाऱ्यावर उगवणारा वेल.२. हरळीसारखे एक प्रकारचे गवत : 'कन्हवेलु मारवेलु गोंडाळी।'– गीता २.५२८६.

**मारंडी** साथीचा आजार. हा देवतेच्या कोपामुळे होतो असे मानले जाते. (राजा.)

**मारंदा** पु. नारळ, ताडाचे फळ इ.त येणारा कोवळा मोड.

**मारा** पु.१. किल्ला इ.वर केलेला हल्ला; तोफांच्या गोळ्यांचा वर्षाव; मार; भडिमार. २. तोफांची रांग. ३. नेमक्या ठिकाणी गोळा लागू होण्याजोगे संधान. ४. तोफेचा, बंदुकीचा आटोका, पोच; टप्पा. ५. एखाद्या साथीच्या रोगाने, महापुराने घेतलेला बळी. ६. माराचा विषय होणे; मार बसणे. ७. चंगळ; विपुलता (बऱ्या किंवा वाईट गोष्टींची). ८. बुद्धिबळादी खेळांत एका किंवा अनेक घरांवर चालू शकणारी मोहऱ्याची मारक शक्ती. ९. वेढा; लोंढा; जोर; सपाटा :'पंधरा खेडीं पुराच्या माऱ्यांत सापडली.'– के २६.७.३०. १०. शेतराखणीचा माळा. (झाडी)

**मारा घेणे** फरेमरे या खेळात आपले फरे झाल्यावर विरुद्ध पक्षाचा खडा उचलणे.

**मारामार–री** स्त्री.१.परस्पर लढणे, मारणे; युद्ध; लढाई. २. (ल.) अतिशय श्रम (उपजीविकेची साधने इ. मिळविण्याकरिता केलेले). ३. (अशिष्ट) पराकाष्ठेचा झपाटा व गडबड; गर्दी (रोजच्या कामाची). ४. पराकाष्ठेची विपुलता (पदार्थांची). ५. पंचाईत; अडचण. ६. (क़ायदा) दोन किंवा अधिक माणसांनी सार्वजनिक जागी केलेली झुंज. (वा.)० **पडणे, होणे**-पंचाईत, वानवा पडणे, होणे; अडचण पडणे.

**मारांक** पु. न. शस्त्र; बाण.

**मारांडी** स्त्री. कुचंबणा. (कु.)

**मारि–री** स्त्री. मरी; महामारी. [सं.मृ = मारणे]

**मारुत** पु.१. वायू; वारा; हवा. २. ज्या वेळी प्राणवायू आतून निघून गगनाला मिळतो त्या स्थितीतील कुंडलिनीचे नाव. [सं.]

**मारुतीचे शेपूट** (ल.) लांबत जाणारे काम; कंटाळवाणी गोष्ट; पाल्हाळ.

**मारुली** स्त्री. शेतराखणीचा लहान माळा. (झाडी)

**मारू** वि.१. मारणारा. २. मोहक; नखरेबाज; चित्ताकर्षक; मनोहर (डोळे, अलंकार इ.).३.भेदक; बोचणारे; झोंबणारे (भाषण).४. लबाड. (गो.)

**मारू** पु. विणकर; कारागीर.

**मारून** क्रिवि. आवेश, पूर्णपणा, विपुलता इ. दाखवणारे वाक्यालंकारभूत क्रियाविशेषण. उदा. 'आज मारून हजारों रुपये धर्म केला.'

**मारून मुटकून** क्रिवि. नाना प्रकारच्या युक्त्या व प्रयत्न करून; जबरदस्तीने; जुलमाने; मोठ्या कष्टाने; वारंवार प्रयत्न केल्यावर.

**मारून** मिरगी; झिट (फीट). (गो.)

**मारूमिती** स्त्री. एका महिन्याच्या पौर्णिमेपासून दुसऱ्या महिन्याच्या पौर्णिमेपर्यंत महिना मोजण्याची उत्तर हिंदुस्थानातील रीत, पद्धत. या पद्धतीने केलेले मारवाड्यांचे हिशेब.

**मारेकरी** पु. खुनी; हल्लेखोर.

**मारोंव** स्त्री. तुमान. (गो.)

**मार्क** पु. गुण. परीक्षेमध्ये प्रश्नाच्या उत्तराला मिळालेले गुणांक. स्त्री.चिन्ह; खूण. [इं.]

**मार्का** पु. १. लक्ष्य. २. उपसर्ग; उपद्रव. ३. महत्त्वाची जागा. (झाडी)

**मार्क्सवाद** पु. क्रांती होऊन त्यात भांडवलशाही नष्ट होऊन, वर्गहीन समाजव्यवस्था अमलात येईल अशी मार्क्सप्रणीत विचारसरणी.

**मार्ग** पु.१. रस्ता; पथ; वाट. २. पंथ; संप्रदाय. ३. (ल.) रीती; पद्धती; मोड; सरणी; धाटी; वहिवाट; चाल; परिपाठ. ४. मोक्ष, स्वर्ग अथवा एखादा सुखप्रद लोक गाठण्याचा रस्ता. (कर्ममार्ग, उपासनामार्ग, ज्ञानमार्ग. यात काही लोक सिद्धान्तमार्ग, योगमार्ग व वैराग्यमार्ग याचाही समावेश करतात.) ५. (संगीत) ताल देण्याची एक पद्धती. ध्रुव, चित्र, वार्तिक व दक्षिण असे चार मार्ग आहेत. ६. महानुभाव पंथाचा अनुयायी: 'लिहिलें तरि मार्गासि उपेगा जाइल'– इप्र १०.५. ७. ब्रह्मविद्या : 'सुपें हाणितलेयां तेयां विद्या होति : खरांटेनि हाणितलेयां मार्ग प्रगटति'– लीचपू १५. [सं. मृग्=शोध करणे] (वा.)० **मळणे**– १. पहा : **मारग**. २. वनभोजनासाठी सहल काढणे. **मार्गावर येणे**-(वर्तनात) सुधारणा होणे. **मार्गी लागणे**– १. (आपल्या उद्दिष्ट प्रवासाचा) मार्ग धरणे; निघणे. २. मरणाच्या पंथात असणे. ३. (एखादे कार्य करण्याच्या किंवा ते कसे करावे हे समजण्याच्या) पंथास लागणे. ४. सुरू होणे. **मार्गी लावणे**– १. पुन्हा सुरू होणे; वाटेला लागणे. २. नोकरी किंवा उद्योग व्यवसायाला लागणे.

**मार्गक्रमण** न. रस्ता, वाट चालणे. [सं.]

**मार्गगीत** न. (संगीत) गांधर्वगीताचा एक प्रकार. [सं.]

**मार्गण** पु. शर; बाण : 'मग असंख्य सोडोनि मार्गण।'– जै २०.११७. [सं. मृग]

**मार्गदर्शन** न. १.एखादी गोष्ट कशी करावी याविषयी सल्ला देणे; उपदेश करणे. २.(मा.शा.) आयुष्यातील समस्या सोडवण्यासाठी वैयक्तिक पातळीवर माहिती पुरवणे; सल्ला देणे वा मदत करणे.

**मार्गपरिवहन** न. प्रामुख्याने रस्त्याने प्रवास करणाऱ्यांची ने–आण करणारी शासकीय यंत्रणा.

**मार्गपालीबंधन** न.१. दर्भ किंवा मोळ यांचा दोर वळून तो गावाबाहेर पूर्व दिशेकडे दोन झाडांना किंवा खांबांना बांधून त्याखालून गावात गावकऱ्यांनी प्रवेश करण्याचा विधी. २. मोळाचा दोर करून एका टोकाला हीनवर्णीय व दुसऱ्या टोकाला श्रेष्ठवर्णीय यांनी धरून ताणून ओढण्याचा विधी; मांगोळी. [सं.]

**मार्गरूढि–ढी** स्त्री. महानुभाव पंथाच्या चार प्रमाणांपैकी चौथा कालखंड.

**मार्गस्थ** वि. यात्रेकरू; प्रवासी.

**मार्गारीन** न. प्रामुख्याने वनस्पतितेले, काही जीवनसत्त्वे व मलई काढलेले दूध यांच्यापासून बनवलेला व लोण्याऐवजी वापरला जाणारा पदार्थ.

**मार्गिक** पु. महानुभाव पंथातील ज्ञानी भक्त : 'अनुसरलेयां मार्गिकां : सुबोधा नामधारका'– ज्ञाप्र १७. [सं.मार्ग]

**मार्गिका** स्त्री. सिनेमा-नाट्यगृह, बस, रेल्वे इ.तील दुतर्फा असलेल्या खुर्च्यांमधून ठेवलेली वाट.
स्त्री. अव. वाहतूक सुरळीत आणि जलद व्हावी म्हणून मोठ्या रस्त्यावर लांब पट्टे काढून केलेले विभाग.
**मार्गीक्रमण** न. (ज्यो.) नक्षत्रांच्या क्रमाने अंतर्ग्रहाचे पूर्वेला जाणे. [सं.]
**मार्च** पु. १. इंग्रजी वर्षाचा तिसरा महिना. २. सैन्याचे कूच. [इं.]
**मार्चुली** स्त्री. स्वयंपाकघरातील भांडी ठेवण्याची उंच घडवंची. (झाडी)
**मार्जन** न. १. सिंचन; शिंपडणे. २. दर्भाग्रांनी अथवा विशिष्ट मंत्र म्हणून उजव्या हाताच्या बोटांच्या अग्रांनी हृदय व शीर यांवर पाणी शिंपडणे. ३. स्नानाने, धुण्याने, पुसण्याने, सुवासिक उटण्याने इ. शरीर स्वच्छ करणे. ४. (सामा.) धुणे, घासणे, स्वच्छ करणे. ५. सडा; संमार्जन. ६. मुखमार्जन; तोंड धुणे. [सं. मृज् = पवित्र करणे]
**मार्जनी** स्त्री. १. केरसुणी; झाडणी; कुंचली; झाडण्याचे-पुसण्याचे कोणतेही साधन. २. (संगीत.) तेराव्या श्रुतीचे नाव. [सं.]
**मार्ज(र्जा)र** पु.न. गावातील किंवा रानातील मांजर :'सुगंधमृगे आणि माजरी।'- दास ४.५.२८. [सं.मार्ज् = ध्वनी करणे]
**मार्तंड** पु. १. सूर्य. २. खंडेराव किंवा खंडोबा.
**मार्तु(र्तृ)ल** पु. डिसपीस; चावी. (कर.); (इं.) स्क्रू-ड्रायव्हर.
**मार्दव** वि. १. मृदुपणा. २. सौम्यता; कोमलता; शांती. [सं.]
**मार्फत-ती** स्त्री. (विशेषतः देण्याघेण्याच्या व्यवहारात) गुजारत; मध्यस्थी; ओळख; मुखत्यारी.
वि. संबंधाने; कडून; तर्फेने. [अर. मुआरफत]
**मार्मिक** वि.१. रहस्य, मर्म जाणणारा; अंतर्गत खुब्या, भावार्थ भेदणारा. २. भेदक; वेधक; बारीक; खोल; सूक्ष्म (तर्क, अनुमान, कल्पना). ३. भेदणारे; टोचणारे; खोचणारे; दंशक (भाषण). [सं.]
**मार्वोत** पु. पोळ्याच्या सणातील दुसरा दिवस. (व.) पहा : **मारबत**
**मार्सो** स्त्री. लीख; ऊ. (गो.)
**माल** पु. १. मल्ल :'माल मर्दुनि मालखडा ।'-एभा ३१.३४१. २. मर्दन करणारा मनुष्य; मर्दन्या : 'तेव्हळी माल आले वोलनी घेऊनी'- रुस्व १८८८. [सं.मल्ल]
**माल** पु. परिणाम; शेवट. [अर. मआल्]
**माल** पु. १. मत्ता; द्रव्य; संपत्ती. २. वस्तू; सौदा; विक्रीचा पदार्थ. ३. किमतीची वस्तू. ४. (कायदा) प्रत्येक जातीची जंगम जिंदगी. ५. जमाबंदी.६. सारा किंवा जमीन महसूल. [अर.माल्] (वा.)० **खाणे**- १. मेवा, मिठाई इ. गोड पदार्थ खाणे. २. लाच खाणे. (व.) ० **वथरणे**- पीक चांगले येणे. (व.)
**मालक** पु.१. धनी; स्वामी.२. नवरा; पती. ३. अधिपती; शास्ता; अधिकारी. ४. हक्कदार. ५. एखाद्या कंपनीचा, मंडळाचा प्रतिनिधी, कारभारी. ६. टोळीचा नायक.(पुश्तु) ७. शेतकरी. ८.जमीनदार. [अर्. मलिक, मालक]
**मालकई, मालकै** स्त्री. १. गोष्ट :'न पातां आपुलें बळ। मियां मालकै केली नवल ।'- शिव ७२६. २. दांडगाई; हट्टीपणा.
**मालकटनी-काटणी, काटी** स्त्री.१.शेताच्या कापणीसाठीच्या परवानगीसाठी सरकारकडे भरण्याची रक्कम, फी. २. पिकाची कापणी.
**मालकंटी** वि. मोठी वात असलेला (दिवा).
**मालकंस** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर.
**मालकाळी-डी** स्त्री. शेतजमिनीचा सरकारी सारा. (व., ना.)
**मालकांगु(गो)णी** स्त्री. कांगोणीची एक जात, एक वनस्पती; तिचे बीज. [सं.कुंगुनी]
**मालकी** स्त्री. १. धनीपणा; स्वामित्व; सत्ता. २. गलबताच्या पठाणीवरील तीन-चार फळ्यांच्या रांगा. (को.)
**मालखडा** पु. १. अजिंक्य मल्ल. २. खेळाचा एक प्रकार. ३. कुस्तीचा आखाडा.
**मालखडी** स्त्री. माल नावाच्या मातीची, खडूची एक जात. ही लिहिण्याच्या पाट्या घासण्यासाठी वापरतात.
**मालखरा** वि. पूर्ण किमतीचा (चेचलेले, ठोकलेले किंवा विरूप झालेले असले तरी ते चांगल्या धातूचे असते असे नाणे इ.).
**मालखंड** पु. १. युद्धभूमी :'मालखंडां जें केलें क्षात्र ।'- एभा ३१.३८१. २. कुस्तीची जागा : 'आन मालखंडां ओखटें करावें'- श्रीकृच ३१.
**मालखंड** पु. न. खडीसाखर : 'मालखंड - वरिया साखर घालुं ये - वैवसं ९५. [म. मल्लक + सं. खंड]
**मालखाना** पु. कोठी.
**मालगण** पु. माळ्यांचा रहाळ, पेठ, आळी. (व.)
**मालगंठी** स्त्री. मल्ल बांधतात त्याप्रमाणे कास बांधण्याचा प्रकार. [सं.मल्ल + ग्रंथि]
**मालगा** पु. द्राक्षाची एक जात. ह्यांस सफेद विलायती असेही म्हणतात.
**मालगुजा(झा)र** पु.१.जमीन खंडाने देणारा; जमीनदार. २. सरकारी वसूल करून देणारा. ३. पाटील. [फा. माल्गुझार]
**मालगोवा** पु. म्हैसूरकडील आंब्याची एक जात.
**मालगोंडा** पु. वरीची एक जात; हिचे कणीस मोठे व तांबूससर असते.
**मालचाटी-ट्या** पु. शाळेतील वर्गप्रमुख; (इं.) मॉनिटर.
**मालचा(के) माल, मालाचे माल** १. वाढ, सुधारणा होणाऱ्या किंवा घट, अपकार होणाऱ्या कामी लावल्यावरही ज्याच्यामध्ये बरावाईट असा काहीच बदल होत नाही असा पदार्थ (पैसा, माल इ.). २.कवडीमोल; प्रतिष्ठाहीन. (क्रि. होणे)
**मालजा** स्त्री. व्यवस्था; दुरुस्ती. (माळवी)
**मालजादी** स्त्री. वेश्या; रांड; कसबीण. [फा. माल्झादा= रंडीपुत्र]
**मालजेठी** पु. मल्ल.
**मालटाल** पु. चीजवस्तू; माल आणि इतर सामान.
**मालटी** स्त्री. एक प्रकारचे मातीचे लहान भांडे, परळ. (हेट., गो., कु.)
**मालण-न** स्त्री. अतिशय सुंदर स्त्री : 'मालणी कैक प्राशिती विषाचा प्याला।'- अफला ५३. [सं. मालिनी]
**मालणे** उक्रि. मालवणे; विझवला जाणे (दिवा). [सं. म्लै]
**मालणे** सक्रि. माल मातीने पाटी इ. घासणे.
**मालत, माल(लि)यात, मालीयत, मालिस्त** स्त्री. जिंदगी; उत्पन्न; वसूल; मालमत्ता :'त्यांची मालायत फारच गेली.'- ऐलेसं ११.५९५५. [अर. मालीयत]

**मालती** स्त्री. गाडग्यावर(सुगडावर) ठेवण्याची, मातीची मोठी पणती. (को.)

**मालती** स्त्री. १. बाजरीच्या आकाराचा गव्हला; खिरीत घालण्यासाठी गव्हाच्या सपीठाचा फुलासारखा केलेला एक पदार्थ . २. एक सुवासिक फुलझाड. ३. एक वृत्त.

**मालतीकुंज** पु. धुळीने माखलेला हत्ती.

**मालदाघुंगरु** पु. रेशमाची एक जात.

**मालदांडी** स्त्री. जोंधळ्याची एक हलकी जात.

**मालदी** पु. चुर्म्याचे लाडू.

**मालप(पु-पो)वा-हा** पु. पीठ भिजवून ते चांगले फुगल्यावर कढईत तूप टाकून त्यावर ते ओतून दोन्ही बाजू तांबूस रंगाच्या झाल्यावर साखरेच्या पाकात टाकून केले जाणारे मसालेदार व हलके धिरड्यासारखे एक पक्वान्न.

**मालपिसे** न. मालाच्या नाशामुळे किंवा नाशाच्या भयामुळे लागलेले वेड.

**मालबंदी** वि.१. ऐवजदार; किंमतवान; मौल्यवान. २. घणसर द्रव्याचा; भक्कम.

**मालबिसात** स्त्री. मालमत्ता.

**माल(लि)म** पु.गलबताचा हिशेब व व्यवस्था पाहणारा अधिकारी; नाखवा.

**मालमत्ता** स्त्री. (व्यापक) सर्व धनदौलत, जिंदगी, रोकड माल, चीजवस्तू इ. इस्टेट. [अर. माल+मताअ]

**मालमवेश-शी** स्त्री. चीजवस्तू; गुरेढोरे; मालमत्ता. [अर.माल् + मवेशी]

**मालमसाला** पु. (व्यापक) १. मिश्रणाची द्रव्ये. २. इमारतीच्या कामासाठी लागणारे दगड, विटा, चुना, लाकूडफाटा इ. सामान. ३. उपयुक्त वस्तू, सामग्री.

**मालमस्त** वि. संपत्तीने चढलेला, उन्मत्त, गर्विष्ठ (झालेला). [अर.माल+फा. मस्त]

**मालमी** स्त्री. मराठ्यांच्या आरमारावरील दिशा दाखवणारे होकायंत्र.

**मालमुद्दल** न. झालेल्या खर्चाच्या किंवा आगाऊ दिलेल्या पैशाच्या बरोबरीचा जिन्नस.

क्रिवि. १. बरोबर किमतीला (क्रि. विकणे, खरेदी करणे इ.).२. मूळ किमतीला.

**मालव** पु.१. (संगीत) मारवा राग. २. माळवा प्रांत.

**माल(ल्ह)वण** न. फुंकर; विझवणे.

**माल(ल्ह)वणे** अक्रि. १. जाणे; विझणे (दिवा इ.). २. (ल.) संपणे; खालावणे; नाहीसे होणे (आजार, देवीच्या पुटकुळ्या, भरभराट इ.). ३. (वंश, कुल) नाहीसा करणे. [सं. म्लै]

**मालवाडी** पु. कुलवाडी; कूळ; शेतकरी. (को.)

**मालवी** पु. (संगीत) एक राग. गानसमय सायंकाळ.

**मालश्री** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा चौथा प्रहर. [सं.]

**मालसाईर** न. मालावरील जकात. (व.)

**मालहराऊ** वि. तोटा, नुकसान, खराबी करणारा.

**माला** पु. काकवी. पहा : **माले-लूं** ४

**माला** स्त्री. १. फुलांची, मण्यांची माळ; हार; स्मरणी. २. ओळ; पंक्ती. [सं.]

**माला-लू** पु. स्त्री. पहा : **मालखडी**

**मालाति(थ-थि)णे** सक्रि. मल्लविद्येने वेढणे, मोहित करणे : 'येणें अहंकारें मालाथिल ।'- ज्ञाप्र ६.३२.

**मालाति(थ-थि)णे** उक्रि. १. निस्तेज होणे, करणे. २. निःशेष होणे : 'भीतरीं मालाथिलें । साभिलासे।'- कालिका २६.४०. ३. वेधणे; आकृष्ट करणे : 'श्रीकृष्ण हा दादुलेयांचा दादुला : मालाथी मुनेश्वरांते' - रुख ३८३.

**मालादंड** पु. पुष्पहार :'कंठी रुळताति अलौकिक माळादंड।'- ज्ञा ११.२२०.

**मालामाल** वि. संपन्न; सर्व गोष्टींचे वैपुल्य असलेला.

**मालावणे** अक्रि. घट्ट, घन होणे : 'तेथ क्षीर ना तूप, स्वयंभ नवनीत । ब्रह्म सदोदित मालावलें' - चांगा ४७ [सं.मल्लक]

**मालावरचा नाग** वि. १.पैशाचा उपयोग न करता त्याचे केवळ रक्षण करणारा (कृपण माणूस). २. कष्ट न करता आयती संपत्ती मिळालेला (माणूस).

**मालि-ली** स्त्री. १. डहाळी; फांदी. २. माळजमीन.

पु. १. माळी. २. भक्त मालिकेचा, फडाचा प्रमुख : 'नाना भक्तिमालिआं'- पांढर शिला II १.१ [सं.माला]

**मालिनी** स्त्री. १. स्त्रियांच्या पद्मिनी, हस्तिणी, चित्रिणी, शंखिनी या चार स्थूल वर्गांपैकी एक उपवर्ग. २. एक गणवृत्त. पंधरा अक्षरे आणि न न म य य हे गण असणारे. ३. शाक्तांची एक प्रमुख देवता.

**मालिनी वसंत** एक औषधी मात्रा, रसायन; सुवर्णमालिनी.

**मालियत** पहा : **मालत**

**मालिन्य** न. मळकेपणा; मलिनता; घामटपणा. [सं. मलिन]

**मालिस्त** न.१. कुटणे; ठेचणे. २. तयार माल. ३. चंदी. ४. मर्दन; चंपी.

**माली** स्त्री. पाच नावाची वनस्पती. (कु.)

**माली** वि. वसुलासंबंधी : 'माली व मुल्की.'- वाडसमा ३.२४. [फा.]

**माली, महाला-ली-ल्या** पु. न्हावी; न्हाव्याची जात : 'नखे चोखाळाया माल्या बोलाविती.'- वसा ८.

**माली(ले)तुळस** स्त्री. एक वनस्पती; रानतुळस.

**मालीम** १. शिक्षक. २. सुकाणू धरणारा; जहाजाधिकारी.

**माली मामला** १. किमती माल; विकल्यास पैसा मिळवून देईल असा माल; सर्व खर्च सोसण्याजोगा माल. २. जकातीचे काम.

**मालु** स्त्री. पांढरी चिकण माती.

**मालुण, मालुंड** पु.न. सापाची एक जात. दुतोंडे; महांडुळ. पहा: **मांडूळ**

**मालु(लू)म** वि. ज्ञात; माहीत; ठाऊक. [अर. मअलूम्]

**मालु(लू)म(मा)त-माती** स्त्री. १. घडलेल्या गोष्टीतील सर्व मुद्दे; कलमे; यच्चयावत परिस्थिती (एखाद्या कृत्याची); कच्ची हकिकत. २. माहिती; माहितीचा कागद. ३. पत्रातील मजकूर. ४. (भाषण, लेख इ.चा) खोटेपणा. ५. मालूम केलेली, सांगितलेली सर्व हकिकत; अर्ज.

वि. खोटा; बनावट (दस्त ऐवज).

**माले** न. दंडाच्या फेडीकरिता (तुरुंगात पडलेल्या नातेवाइकांच्या सुटकेसाठी किंवा जप्त झालेली जमीन, वतन पुन्हा मिळविण्यासाठी) गळ्यात नांगर अडकवून दारोदार भिक्षा मागून धन मिळवणे; भीक.(क्रि. मागणे)

**माले–लू** न. १. एक प्रकारचा मऊ दगड; खडी. पहा : **मालखडी.** २. (माल्याचे गोळे केलेले असतात यावरून) कणीक, लोणी, खवा इ.चा गोळा; पुरणाची पोळी लाटण्यापूर्वी आत पुरण भरण्याकरिता टवळ्याच्या आकाराचा केलेला कणकेचा गोळा; उंडा. ३. गुळाची ढेप. ४. राब; काकवी : 'अहो गूळासाखरे मालेयाचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे।'– ज्ञा १०.३३. ५. गांधीलमाशी, मधमाशी इ.चे घर, पोळे. (गो.)

**मालोणी–नी** वि. बेचव, मचूळ (पाणी). (ना., व.)

**मालोमाल** वि. किमतीच्या योग्यतेचा; दिलेल्या पैशांइतक्या किमतीचा (विकत घेतलेली वस्तू).

**मालोवाली** प्रा.अ. चहूकडून.

**माल्य** न. १. फूल. २. हार; माळ; पुष्पमाला. [सं.]

**माल्यग्रथन** न. चौसष्ट कलांपैकी एक कला. हार गुंफण्याची कला.[सं.]

**माल्हाडी** स्त्री. हातातील काकडे वाजवीत करण्याचे एक नृत्य : 'आंगीं रत्नांचीं अळंकरणें : कळावियांसीं माल्हाडी वाति कांकणें'– रुस्व ८४.

**माल्हात(थि)णे** क्रि.१.अंगीकार, आश्रय करणे; जवळ करणे:'माल्हाती दार्ढ्य। आलस्याचे।'– ज्ञा १४.१७९. २. आहारी जाणे; प्रभाव पडणे : 'ऐसें माल्हातिजे मोहें।'– ज्ञा १४.२५३. [सं. मुल्ल = युक्त होणे, जवळ असणे]

**माव** स्त्री. १. कपट; कृत्रिमता; लबाडी. २. गारूड; गौडबंगाल; माया; चमत्कार. ३. खोटेपणा; पोकळपणा; मायिकपणा : 'बाह्यभक्ति मावेचि करी ।'– एभा २.४९०. ४. भ्रम. ५. जखम बरी झाल्यानंतर राहणारा वण, चिन्ह.(गो.) [सं. माया]

**माव** स्त्री. मोजणी : 'न कळति प्रद्युम्नाचीं मतें । मावा एकोत्र शतें ।' – उह १५२२. [सं.मा]

**माव** स्त्री. आधार; त्राण; तत्त्व; तथ्य; हिंमत : 'महिपतराव बाबर व लिंबाजी बाबर सतर असामी जागाचवरी राहिली. परंतु ईश्वरें माव राखिली नाहीं.'– पेद ३७.२१.

**माव** मसलत. ऐको.

**माव** स्त्री. कोणत्याही फळाचा दळदार भाग. (गो.)

**माव–वो** पु. सासरा (मामा). (गो., कु.)

**मावची** स्त्री. मळा. (व.)

**मावठी** स्त्री. ओसरीच्या बाहेरील पाणी ओसरीत वा घरात येऊ नये म्हणून समोर लावलेले तिरकस पत्रे; झांजी. (अहि.)

**मावडा** पु. फिकट निळा रंग.

**मावडां** स्त्री. सासुरवाड (मामाचा वाडा–घर). (कु.)

**मावडी** स्त्री. काइलीतील उसाचा रस ढवळण्याचा लाकडी पळा.

**मावडी सुरळी** (विणकाम) फणीच्या एका घरात काळा धागा व एका घरात मावडा असे उभार व आडवण सर्व काळे, किनार कोणत्याही प्रकारची, अशा प्रकारचे लुगडे.

**मावणे** अक्रि. साठणे (भांड्यात, जागेत).पहा: **माणे** [सं. मा = मोजणे]

**मावद** न. माळवद; माडी : 'मावद मोठें घरापुढें वसरी तारांची। आंत बैठक सख्याची ।'– वलो २. (व.)

**मावलपन** न. आश्चर्य; चमत्कार. (ना.)

**मावली** पु. कोळिष्टके करणारा, तंतूचे जाळे पसरणारा कोळी. (को.)

**मावशी–सी** स्त्री.१.आईची बहीण. २.(अश्लील) लहान मुलींचे जननेंद्रिय. [सं. मातृष्वसृका]

**मावस** वि. मावशीकडील नात्यातील माणसे.

**मावसा** पु. मावशीचा नवरा.

**मांवसाळे** न. मिरवणूक(मुंजा मुलगा, नवरदेव, देव इ.ची).

**मावळचीर** लग्नात आल्याला (मावळणीला) द्यायचा लुगड्याचा आहेर.

**मावळण** पु. पश्चिमेकडील वारा. (राजा.)

**मावळण** स्त्री. १. आत; आत्या; वडिलांची बहीण. २. मामी. (को.) [सं. मातुलानी]

**मावळणे** अक्रि.१. अस्तास जाणे (सूर्य, चंद्र, आकाशस्थ तारे).२. (ल.) ओसरणे; नाहीसा होणे; मरणे; अदृश्य होणे (देवी, खरुज, फोड, पुटकुळ्या इ.). ३. (फुलांच्या) पाकळ्या मिटणे. ४. (ल.) बुडणे; नाहीसे होणे; मालवणे (कीर्ती, वैभव, थोरवी, जीव इ.). ५. विसरणे. ६. निष्क्रिय होणे. [सं. म्लै]

**मावळत–ती** स्त्री. पश्चिम दिशा; ग्रह, तारे इ. मावळण्याची जागा.

**मावळा** पु. मामा; आईचा भाऊ.

**मावंडोळ** पु. आग्या घणस; घोणस. (गो.)

**मावंदे–धे** न. काशी यात्रा करून घरी आल्यावर करायचे गंगापूजन, देवाला नैवेद्यसमर्पण व ब्राह्मणभोजन इ. करण्याचा विधी; समारंभ. पहा : **माऊंदे** [सं. मा + वद]

**मावा** पु. आटवून घट्ट केलेले दूध; खवा.

**मा(म)वा** पु. पिकावरील जंतू प्रत्येकी. हे संघ करून राहतात. हे पानातील रस शोषून घेतात. बहुतेक पिकांवर मावा पडतो.
वि. पिवळसर हिरव्या रंगाचा.

**मावा** पु. चित्ताकर्षकता; मोहिनी.

**माविक–य, मावी** वि. मायावी; लाघवी :'परि तो मावियांचा राऊॅ।'– शिव ३९४.

**मावूंद** न. माजघर. (ना.)

**माशावळण** पहा : **मासेवळण**

**माशी, मासकी** स्त्री. १. सर्वपरिचित, पंख असलेला, सहा पाय असलेला समशीतोष्ण हवामान व घाण असलेल्या ठिकाणी अंडी घालणारा कीटक. २. नेम धरण्यास उपयोगी असे बंदुकीच्या तोंडावर बसविलेले माशीसारखे चिन्ह; मासकी; मखी. [सं. मक्षिका] (वा.) ० **लागणे**– १. दागिना इ.च्या वरील मुलामा, पातळ पत्रा झिजून आतील लाख दिसू लागणे. २. एखादे काम चालू असता ते मध्येच थांबणे, अडणे. ३. मळमळू लागून वांती होणे. ० **शिंकणे**–१.(हानिकारक किंवा अनर्थकारक गोष्ट घडून येण्यास क्षुल्लक कारण दाखवणाऱ्या माणसाचा

उपहास करण्यासाठी वापरतात) हरकत येणे; अडथळा येणे. २. अपशकुन होणे. ० **हागणे**–जनावराच्या अंगावरील व्रणावर कीड होण्याची चिन्हे दिसणे. **माशीला माशी**–(नक्कल करताना मूळच्या लेखात शाईवर माशी बसून डाग पडला असल्यास नकलेतही तसाच डाग दाखवणे– यावरून) हुबेहूब, बिनचूक पण अर्थ न समजता नक्कल करणे. **माशा खाणे, गिळणे**–१. गोंधळलेला, बावरा झालेला दिसणे. २. रेंगाळणे; चाचपडणे. **माशा मारणे, मारीत बसणे, उडविणे**– काम नसणे; रिकामे, निरुद्योगी बसणे; स्वस्थ बसणे. **नाका–तोंडावरची माशी न हालणे**–गरीब स्वभावामुळे काही न बोलणे.

**माशी** वि. मासा नामक वजनासंबंधी समासात संख्यावाचकांसह योजतात. जसे :– एकमाशी, दुमाशी, तिमाशी, चौमाशी इ.

**माशी, माशीचे झाड** स्त्री. अतिशय लहान, माशीसारखे फूल येणारे एक प्रकारचे झुडूप. याच्या पानांचा पलिस्तरसाठी उपयोग केला जातो.

**माशुक** सोनाराकडील एक वजन.

**माशू(षू)क** स्त्री. १. प्रिय; प्यारी; रमणी. २. रंडी; रखेली. वि. प्रिय; कमनीय; रमणीय; सुंदर. [अर. मअशूक]

**माष** पु.१.उडीद. २. (जवाहिरी धंदा) पाच, आठ किंवा दहा रतींचे वजन. [सं.]

**माषतैल** न. अर्धांगवायूवरील उपचारासाठी उपयोगी पडणारे उडदाचे औषधी तेल. पिंपळमूळ, चित्रकमूळ, पिंपळी, रास्ना, कोष्ट, सुंठ, सैंधव यांचा कल्क व उडदाचा काढा – यांच्या माध्यमातून तयार केले जाणारे तेल.

**माषपर्णी** स्त्री. मुसाकानी; एक वनस्पती.

**मास** न. स्त्री. अनेक माश्यांचा समुदाय, थवा. (राजा.)

**मास** पु. मध्य; मधील भाग.

**मास** पु. महिना. साधारण तीस दिवसांचा कालावधी. [सं.]

**मासडभात** न. तांबड्या रंगाचे तांदूळ असलेले परंतु हलक्या प्रतीचे भात.

**मासदवाडा** पु. खाटिकवाडा : 'ते मासद्वाडेयाहुनि जात होते'– लीचपू २०२. [सं. मांस + वाटक]

**मासदी** पु. १. खाटीक : 'लुइपाइ महात्मे ते मासदीयांचां घरीं असति'– लीचपू २०२. २. मासे पकडणारा कोळी : 'ते आपआप गुंतौनि पडिले : जैसे मासदीयाचां जाळां'– रुस्व २०७७. [सं.मांस]

**मासनहाण** न. लग्नाला एक महिना पूर्ण होतो त्या दिवशी जोडप्याला समारंभपूर्वक स्नान घालण्याचा विधी.

**मासर** न. मिश्रण : 'तीळ बोरे गाजरे ऐसे मासरी घालौनि देवविणे'– स्थापो ९८. [सं. मिश्र]

**मासरू** पु. तुकडा. (अहि.)

**मासला** पु.१. नमुना; वानगी. २. डौल; आकार; घडण; घाट; कित्ता; तऱ्हा. ३. रुची; अनुभव. ४. उदाहरण.

**मासलेदार–वाईक** वि. १.चांगल्या जातीचा; सुरेख; डौलदार; उत्तम घाटाचा; तोडीचा; नमुनेदार. २. विचित्र; तऱ्हेदार.

**मासवडा** पु. ग्रामदेवतेसंबंधी केले जाणारे मासकृत्य; प्रत्येक महिन्यात करण्याचे कार्य. (को.)

**मासवडा** पु. महिना : 'मागिला मासेवडेयाचे (द्रव्य) आले नाही.'– लीचपू ५४.

**मासवा** पु. मांसाचा किंवा झाडाच्या सालीचा अनुक्रमे माणसाच्या किंवा झाडाच्या जखमेवर वाढणारा भाग.

**मासवाचव्या** वि. आळशी. (झाडी)

**मासळी** स्त्री. १.विकण्यासाठी मांडलेला माशांचा ढीग. २. लहान मासा.

**मासा** पु. पृष्ठवंशीय प्राण्यांपैकी कल्लेदार, खवल्याची कातडी असणारा जलचर प्राणी. [सं. मत्स्य]

**मासा** पु.१. आठ गुंजांचे वजन. २.(सोनारी) माशाच्या आकाराचा सोन्याचा दागिना; पानडी. ३. (व्यापार) चार आणे.

**मासार्बुद** पु. कर्करोग.

**मासिक** न.१. महिन्याचे वेतन. २. दरमहिन्याला प्रकाशित होणारे नियतकालिक. ३. वर्षसमाप्तीपर्यंत, दर महिन्याला मृत मनुष्याचे करायचे श्राद्ध.
वि. महिन्यासंबंधी; महिन्याचा; दर महिन्याचे. [सं.]

**मासीपोफळ** पु. पोफळांनी खेळावयाचा खेळ.

**मासु(सो)रडा–डे** पु.न. (निंदार्थी) पहा : **मांसकंड**

**मासुरवाडु** सुमारे महिनाभर.

**मासूम** वि. निरागस. [हिं.]

**मासेगाळणा–णे** वि. (विणकाम) अतिशय विरळ विणीचा (ज्यातून मासा गळेल असा)कपडा.

**मासेवळण** न. १. बावरलेल्या माशांच्या थव्याचे एकदम मागे फिरणे. २. माशांची त्रेधा; व्यग्रता, धांदल (जोराचा पाऊस, गढूळ पाणी इ. कारणाने). ३. (ल.) (सामा.) त्रेधा होऊन लगबगीने मागे फिरणे व पळणे; गाळण; गडबड. ४. (समुदायाचा, व्यक्तीचा) मोठा क्षोभ.

**मासोळी** स्त्री. १. लहान मासा. २. माशाच्या आकाराचा पायाच्या बोटात घालण्याचा स्त्रियांचा चांदीचा एक दागिना; मासो. (कु.) ३. अतिशय मांसल कास.

**मासोळी कोथिंबिरी** स्त्रियांचा कानात घालण्याचा एक अलंकार :'खुंटा टोप असे विशाल झुबका मासोळि कोथिंबिरी ।'– अकक २.

**मासोंडणे** अक्रि. अंगावर मांस वाढणे; लठ्ठ होणे. (व.)

**मास्क** पु. १. मुखवटा. २. संसर्ग टाळण्यासाठी तोंडावर घेतलेले आवरण.

**मास्तर** पु. १. शिक्षक; विद्यागुरू. २. मालक; धनी. [इं. मास्टर]

**माह** पु. महिना; मास. [फा. माह]

**माहनि** वि. खोडकर. (झाडी)

**माहमारी** छळ; मारहाण.

**माहसरा** पु. वेढा. [अर. महसूर = वेष्टित]

**माहाघड** पु. मोठा समुदाय : 'फेकारिती कुचे दंड : दळवैयाचे माहाघड प्रचंड'– रुस्व ९२६. [सं.महा]

**माहाट** क्रिवि. महान; मोठा.

**माहात्म्य** न.१. महिमा; मोठेपणा; थोरवी; प्रभाव; तेज. २. शौर्याचे, अद्‌भुत कृत्याचे वर्णन; दंतकथा; वीरचरित्र. ३. चैत्रादी महिन्यांत करण्याची पुण्यकर्मे व त्यापासून मिळणारे पुण्य यांचे वर्णन ज्यात आहे असे बारा महिन्यांतील प्रत्येक महिन्यासंबंधी वर्णनपर ग्रंथ. उदा. वैशाख, ज्येष्ठ माहात्म्य. ४. पुराण; वर्णनपर ग्रंथ. [सं.]

**माहाभोटी** स्त्री. मोठा पराक्रम.

**माहाम** मुखत्यार.

**माहाराय** पु. एक राजपदवी.

**माहालदार** पु. न्हावी :'हाडपे चोर माहालदार ।'– दावि ६९.

**माहावटी** स्त्री. राजमार्ग.

**माहास्तपन** न. स्तुती; स्तोत्रगायक.

**माहि–ही** स्त्री. छत्र; राजाच्या मस्तकावरील उंच छत्री : 'माहि मेघडंब्रे सूर्यापानें ।'– दास ४.५.२०.

पु. मत्स्य वगैरे सन्मानदर्शक चिन्ह; मकरध्वज.

**माहिती, माहितगा(गि)री** स्त्री. १. ज्ञान; उद्‌बोधन. २. ओळख; परिचय. ३. वर्णन; वेध; बातमी. ४. विशिष्ट हेतूने गोळा केलेले व निष्कर्ष काढण्यास आधारभूत असे संदर्भ. [अर. माहीयत]

**माहि(ही)दार** वि. १. माशाचे चिन्ह असलेले निशाण धारण करणारा; मकरध्वजी. २. छत्रधर. [फा.]

**माहि(ही)म(मु)रातब, माहीमोर्तब** पु.१. मत्स्यचिन्ह व सोन्याचे दोन गोल मिळून होणारे व हत्तीवरून मिरवण्याचे बहुमानाचे चिन्ह. हा मान फक्त राजांना व मातब्बर सरदारांना मिळत असे. २. मोगल बादशहाकडून महादजी शिंद्यांनी पेशव्यांसाठी आणलेली सन्मानचिन्हे, दोन मुखवटे व दोन अब्दागिऱ्या मिळून मिरवायचे एक राजचिन्ह. [फा. माही मरातिब]

**माहियेरे** वि. मायेचे; माहेरचे.

**माहिरू** वि. कपाळावर तिकोनी पट्टा असलेला (घोडा).

**माहिष** न. म्हशीपासून मिळणारी कोणतीही वस्तू (दूध, लोणी, शेण इ.).

**माही** पु.स्त्री. (बायकी) माघ महिना.

वि. माघ महिन्यातील. [सं. माघ]

**माही** मरातब; बहुमान.

**माहीत** स्त्री. परिचय; परिज्ञान (विद्या, गोष्टी, स्थळे इ.चे).

वि.१. ज्ञात; परिचित. २. जाणता; माहीतगार.

**माहीतगार** वि. १. परिचित; माहिती असलेला. २. वाकबगार; एखाद्या गोष्टीची माहिती असलेला. [फा.]

**माहुटी, माहुटीचे पान** स्त्री. घराच्या छपराच्या शेवटी बसवलेली किंवा पागोळीच्या खाली वाशाला मारलेली आडवी लाकडाची फळी.

**माहुर** वि. १. मधुर; गोड. २. संपन्न; चांगला; भरभराटलेला. [सं. मधुर]

**माहु(हो)रा** पु. सराव; सवय; राबता. (ना.)

**माहुरा–री** वि. माहूर या गावासंबंधी (म्हैस इ.).

**माहुरी** स्त्री. विष : 'तिएची बहिणी दुसरी : ते ममतावेली माहुरी' – सव ३५४. [सं. माधुरी]

**माहु(व्ह)रे** न. अव. नदी इ.तील धरून, विक्रीस आणलेले मासे.

**माहुली** स्त्री. ज्याची पाने पत्रावळी करण्यास उपयोगी पडतात असे झाड.

**माहुळंगणे** सक्रि. पिकणे : 'कैसा बरवा माहुळंगला चणा उळेयाजोगा आहे' – लीचउ १५.

**माहूत–द** पु. हत्ती हाकणारा; राखणारा; महात. [सं. महामात्र]

**माहे** क्रिवि. मध्ये. [सं. मध्य]

**माहेर, माहेरघर** न. १. लग्न झालेल्या मुलीला आपल्या आई–वडिलांचे घर. २. (ल.) आसरा; विश्रांतिस्थान; सुखाच्या आश्रयाची जागा. ३. उत्पत्तिस्थान; जन्मस्थान :'ना तरी सकळ धर्मांचे माहेर।'– ज्ञा १.३१. ४. मायबाप :'जरी माहेरें श्रीमंतें होतीं । तुम्हा ऐसीं।'– ज्ञा ९.३. [सं. मातृगृह]

**माहेरवाट** स्त्री. १. माहेरघर. २. स्त्रियांच्या केसांचा उजवीकडे काढलेला भांग.

**माहेवणी** स्त्री. १. गरोदर स्त्री :'माहेवणी प्रयत्नेंसी। चुकवीजे सेजे जैसी।'– ज्ञा १८.८६६. २. रजस्वला स्त्री :'कीं माहेवणी पापिये । उघडी केली विपायें ।'ह्र ज्ञा १६.१४४. [सं. मास]

**माहेवारी** मासिक पगार.

**माहेश्वरधूप** पु. सरक्या, मोराची पिसे, रिंगणीची फळे, शिलारस, दालचिनी, जरामांसी, मांजराची विष्ठा, नखला, वेखंड, केस, सापाची कात, हस्तिदंत, शिंग, हिंग व मिरी – या सर्व वस्तू समभाग घेऊन त्याची केलेली धुरी. ती स्कंदोन्माद, पिशाच, देवग्रह यांचे आवेश व तज्जन्य ज्वर यांच्या नाशासाठी उत्तम असते. – योर १.३५९. [सं.]

**माहुंडळ** पु. सापाची एक जात.

**माहोरी** स्त्री. म्हैस. (तंजा.)

**माळ** स्त्री.१. फुलांचा हार, माला. २. फुलातील पाकळ्यांचा घेर. ३. रत्ने, मणी यांची माला; हार; स्मरणी. ४.(सामा.) वस्तूंची परंपरा, साखळी (रहाटगाडग्यातील लोट्यांची, वस्तू हातोहात देणाऱ्या मजुरांची, हरिदासांची, आळीपाळीने काम चालविणाऱ्या याज्ञिकांची) : 'म्हणोनि वैष्णव कुळमाळ । वंदिली सकळ ग्रंथार्थी ।'–एभा १.१३८. ५. विहीर इ.तील पाणी वर काढण्यासाठी खापेकडांच्या दोन बाजूंना वळलेली, लोटे बांधलेली रहाटगाडग्याची दोरी. ६. (ल.) नवरात्रातील प्रत्येक दिवस. ७. (विणकाम) गती देण्याकरिता रहाटाला व कांडी भरण्याच्या चातीला जोडणारा सुताचा पट्टा, सुतळी. ८. दोराची शिडी : 'दिल्लीचा किल्ला अपेशी, पांच सात रोजात हल्ला करून माळा लावून हस्तगत केला.'– भाब ९१.[सं. माला] (वा.) ० **आखडणे**– रहाटगाडग्यास एक दांडके लावून त्यावर माळ अडकवून ठेवणे. (रहाट चालवण्याची आवश्यकता नसताना माळ पाण्यात राहून कुजू नये – यासाठी). (को) ० **घालणे**–१. लग्नात वरल्याची खूण म्हणून वराने व वधूने एकमेकांच्या गळ्यात माळ (हार) घालणे. २. पंढरीचा वारकरी होणे. ० **घेवन बसप**– एकसारखी वाट पाहणे; धोसरा काढणे. (गो.)

**माळ** पु. १.खडकाळ किंवा नापीक असा भूमीचा उंच व विस्तृत प्रदेश; मैदान; डोंगरमाथा; सपाटी; पठार. २. पहा : **माळा** [सं. मालम् = पठार]

**माळ** पु. बोगदा.(बागलाणी)

**माळका** स्त्री. १. माळ; ओळ; रांग; परंपरा (वस्तू, सजीव प्राणी यांची). २. गप्पागोष्टी. (कुणबाऊ) [सं. मालिका]

**माळकाठी** स्त्री. रहाटगाडग्याची माळ इकडेतिकडे न सरकता ठरलेल्या जागेतून जावी म्हणून विहिरीत आडवा बसवलेला लाकडी दांडा.

**माळखंड** न. १. जुन्या झालेल्या माळेतून खापेकडे काढून टाकल्यावर तिच्या राहिलेल्या दोऱ्या; तुकडे. २. रहाटगाडग्याच्या भोवतालची काहीशी मोठी माळ. (को.)

**माळगंड** पु. (निंदार्थी) माळी.

**माळगी** स्त्री. कोनाडा. (व.)

**माळ गौळ्याची** (ढोबर म्हैस खेळ) मेलेल्या (बाद झालेल्या) दोन दोन गड्यांनी एकमेकांचा हात धरून बाकीच्यांना शिवण्यास जाणे.

**माळढोक** पु. माळावर आढळणारा गिधाडासारखा मोठ्या आकाराचा पक्षी.

**माळणे** सक्रि.१. डोक्यात फुले, फुलांची माळ घालणे. २. माळेत ओवणे; माळ गुंफणे.

**माळथोंब** पु. नदीकाठच्या उंचवट्यावरील झुडूप :'माळथोंबावरौनि आंजुळी उदकपान करूं बैसले: थोंब खचलें'- लीचपू २६

**माळधर** पु. श्रेष्ठ लोक; नेतृत्व करणारा :'हा संवादु माळधराचिया लेंकी।' - रुस्व ८२५.

**माळप** सक्रि. डोक्यात घालणे (फुले). (गो.)

**माळमुर(रू)ड-मुरडाण** पु.न. माळ व त्यातील ओढ्याच्या वळणाखालील वाकडी-तिकडी जमीन.

**माळरान** न. १. माळजमीन; खडकाळ; नापीक असे मैदान; सपाटी. २. (जमाबंदीसंबंधी) डोंगराच्या चढणीवरील भरड, रुक्ष पण लागवडीची जमीन.

**माळवट-द-दी** वि.१. माळजमीन फार असलेला (प्रांत, प्रदेश). २. माळ किंवा माळजमीन यांच्यासारखा-संबंधी (भूमी, जमीन). ३. पोटमाळा. ४. धाब्याचे घर :'तण्हारें : धवळारें : माळवधें' - श्रीकृच १४. [सं. माल्]

**माळवंचा, माळोंचा** पु. १. शेतात पाखरे राखण्यासाठी केलेला माळा. २. घरात सामान ठेवण्यासाठी उंच बांधलेली फळी. [सं. माल्]

**माळवान** स्त्री. (नाविक) पश्चिम दिशा; बाहेरची बाजू. (हेट.)

**माळवे** न. बागायती वस्तू; मळ्यात तयार झालेला भाजीपाला; फळभाज्या.

**माळसात** स्त्री. १. भाजीपाला विकण्याची शहरातील जागा; मंडई. २. (बाजारातील, शहरातील) माळ्यांची आळी. ३. माळ्यांची जात.

**माळा** पु. १. घराच्या तुळयांवर लाकडी कड्या आडव्या पसरून किंवा बांबूचे तुकडे आडवे बसवून केलेली जागा; मजला; छपराखाली काढलेली ठेंगणी, बसकट माडी. २. शेत राखणाऱ्या मनुष्याला बसण्यासाठी केलेली उंच माचोळी. ३. टेहळणीची माचोळी; शिकारीसाठी झाडावर केलेली जागा. ४. पहाड; पायाड.

**माळादंड** पु. फुलांचा हार : 'कंठीं रुळताति अलौकिक । माळादंड ।'- ज्ञा ११.२२०.

**माळिकाघटी** स्त्री. रहाटगाडगे; घटीयंत्र : 'संसारकुपाचां पोटीं । कर्म माळिका घटीं ।'- ऋ ३०.

**माळिया** झाडाच्या आडव्या फांद्या.

**माळिवरा** पु. माडी : 'ओवर ओसरी माळिवरा ।'- वसा १४.

**माळिहाट** पु. माळ्याचे फुलांचे दुकान : 'माळिहाटु : गाडेहाटु'- गोप्रच १४३. [सं.मालिका + हट्ट]

**माळी** स्त्री. १. खाण :'उपनिषदर्थाची माळी -। मार्जी खंडिली।'- ज्ञा १८.३५. २. डोंगरपठारावरील लागवडीची जमीन; पठार.

**माळी** स्त्री. माळा; वरचा मजला; माळ्यावरची खोली; माडी.

**माळी** स्त्री.झाडाची आडवी फांदी : 'आड फुटती माळिया ।'- ज्ञा १५.१५०.

**माळी** पु.१. बागेची, मळ्याची निगा राखणारा फुलारी; माळाकार; बागाइत्या; बागवान; खंडाने अगर अर्धेलीने शेती करणारा शेतकरी. २. माळी जातीतील व्यक्ती.

**माळीक** वि. सारखा.(बे.)

**माळीण** स्त्री.१. माळी जातीतील स्त्री. २. नाकात उद्‌भवणारी दुःखदायक पुटकुळी; फुलांच्या वासाने जाणारी पुटकुळी.

**माळीम्हेतर** पु. (व्यापक) माळी किंवा त्याच्या वर्गातील इतर लोक.

**माळुंगा-गी** स्त्री. न. पहा : **महाळुंग**

**माळू** पु. मृदंगाच्या तोंडावरचे कातड्याचे कडे किंवा वादी.

**माळेवोळ** स्त्री. भाजी विकणाऱ्या माळ्यांचा बाजार : 'मोतियांची गोणी माळेवोळी नेली ।'- तुगा ३०६८.

**माळोत्रे** न. माळ्यावर जाण्याचे दार. (को.)

**माळोवाळी** क्रिवि.चोहोकडून: 'एवं माळोवाळीं उत्तरोत्तरु ।'- ज्ञा १५.१९८.

**माळ्या** स्त्री. राब; काकवी.

**माक्षिक** न. शक्ती वाढण्यासाठी अशक्त मनुष्यास देण्यात येणारा एक विशिष्ट खनिज पदार्थ. याचे सुवर्ण व रौप्य असे भेद आहेत. [सं.]

**माक्षिक** न. मध.
वि. मधमाशा किंवा मधमाशांसंबंधी. [सं.]

**मांगर** पु. शेतीच्या हंगामात शेतात राहण्यासाठी तात्पुरती बांधलेली झोपडी.

**मांगर** न. शेतातील गवत, सरपण ठेवण्याचे कोठार.

**मांगल** न. खापरी; मातीचे भाजलेले भांडे : 'तोचि (घट) अग्निसंगें। सिविजे । तरि मांगल होये '- ज्ञा ७.६४. [सं.मृद्]

**मांगवेलि-ली, मांगळी** स्त्री. मुंजीत बटूच्या कमरेस बांधण्याची दोरी.

**मांगहलगी** स्त्री. छोटी हलगी.

**मांगेरी** स्त्री. गलबत. (कु.)

**मांगोरा** पु. गवत, झाडाचा पातेरा ओढण्याचे लाकडी दाताळे.

**मांगोळी** पहा : **मार्गपाली- बंधन** २

**मांचणे** सक्रि. दाबून मऊ करणे. पहा : **माचणे**

**मांचळी** स्त्री. अडणी; तिवई.

**मांजर** न. पाळीव, लहान आकाराचा, घाऱ्या डोळ्यांचा, मऊ केसांचा, चतुष्पाद, मांसाहारी, प्राणी. [सं.मार्जार] (वा.)० **आडवे येणे**- एखाद्या कामाला अडथळा होणे, येणे. ० **मारणे**- मोठे पाप, अपराध, गुन्हा करणे.

**मांजर** न. गाजराचा गाभा, सुळा. [सं.मार्जार]

**मांजरझाक–प** संधिप्रकाश व रात्र यांच्या दरम्यानची वेळ (या वेळी मांजरे दृष्टीस पडत नाहीत यावरून.).

**मांजरपाट** पु. मद्रीपोलम येथे होणारे एक प्रकारचे जाडेभरडे कापड.

**मांजरमुतवणी** न. कोमट पाणी, द्रव.

**मांजरी** स्त्री.१. खाकेत होणारी गाठ. (या गाठीवर उपाय म्हणून तीवर लोणी लावून ते मांजराकडून चाटवितात यावरून). २. मांजरांना प्रिय असलेली एक वनस्पती. ३. मांजराची मादी; भाटी.

**मांजरी** स्त्री. किसणी; विळी. (को.)

**मांजरी** स्त्री. चटई (लव्हाळ्याची). (गो.)

**मांजरी** स्त्री. डफासारखे एक वाद्य.

**मांज(द)री–रे** न. घुसळखांबाच्या, रवीच्या फासाच्या दोऱ्या प्रत्येकी.

**मांजा–ज्या–झा** पु.१. मेण, तेल, अंड्याचा बलक आणि काचेची पूड यांचे दाट मिश्रण, खळ. २. हे मिश्रण लावलेला पतंगाचा दोर. [हिं.; सं. मंड]

**मांजा** पु. एक प्रकारचे गलबत.

**मांजा** पु. मासे मारण्यासाठी केलेला गराडीच्या फळांचा लगदा. (झाडी)

**मांजिठे** न.१. मंजिष्ट -:'ऐसी भीतभंगा नेहटी । सपोतें मांजिठीं ।'– ऋ ६९. २. तांबडे वस्त्र :'प्रणवाचिये पेठे । जाहलें शब्द ब्रह्म मांजिठें।'– ज्ञा ६.१०९. [सं. मंजिष्ट]

**मांजिरी** क्रिवि. मध्ये :'गुरु उपदेशे रवि धरी अर्ध–उर्ध्व मांजिरी ।'– ज्ञागा २५५.

**मांजी** वि. (सांके.) आठ ही संख्या.

**मांजुळणी** स्त्री. रांजणवाडी. (ना.)

**मां(मा)टु(टू)ळणे** अक्रि. खुंटणे; वाढ संपणे :'नाना फळतिये वेळे । केळीची वाढी मांटुळे ।'– ज्ञा १८.१०८२.

**मांड** पु. १. रचणे; व्यवस्थित ठेवणे (हत्यारे, उपकरणे, साहित्य इ.). २. केलेली रचना; मांडणी. (क्रि. मांडणे.)३. देखावा; व्यवस्था. ४. विस्तार; पसारा. ५. वैभव :'काळीं संहारीना मांड त्यांचा सारा मी हरी।'– मोरामायण १.२५२. ६. दुकान. (गो.) ७. पिशाचादींना बली देताना भगताने देवदेवतांची स्थापना करण्याचा विधी. (को., राजा., कु.) ८. होळीच्या सणामध्ये ग्रामदेवतेस कौल लावणे. ९. (संगीत) एक राग. गानसमय सार्वकालिक. १०. झोडलेल्या भाताची रास. (को.)

**मांड** स्त्री. १. मांडीला होणारा रोग. २. योग्य बैठक (घोड्यावरची, लिहिताना घातलेली). (क्रि. मांडणे, जमविणे.) ३. स्वारांच्या टोळीचा हल्ला. (क्रि. करणे.) ४. घोडेस्वारांची टोळी.

**मांड** स्त्री. भाज्या, मीठ इ. ठेवण्याचे दांड्याचे लाकडी पडगे, वाडगा.

**मांड** स्त्री. एक शाक भाजी; माठ.

**मांडकाडप** दुकान उघडणे. (गो.)

**मांडकी** स्त्री. बेडकी. (कु.) [सं. मंडूक]

**मांडगा** पु. कळकाची एक जात; लाठीच्या उपयोगी बांबू; कळक. पहा : **माणगा**

**मांडगादी** स्त्री. घोड्यावर बसणाऱ्याच्या मांड्या गच्च व सोयीस्कर बसण्याकरिता खोगिराच्या पुढील भागी केलेली गादी.

**मांड(डी)चोळणा–चेपणी–चेपणे** पु. न. स्त्री. निव्वळ मांड्या झाकणारी, लांडी विजार.

**मांडण** स्त्री.(कासारधंदा) एखाद्या पत्र्याला भोक पाडताना तो पत्रा ठेवण्यासाठी वापरण्यात येणारे साधन.

**मांडण** स्त्री. नाचणीच्या रोपांची पुन्हा केलेली लावणी; आवटणी.

**मांडणावळ** स्त्री. १. मांडणे; व्यवस्थित लावणे, ठेवणे याबद्दल द्यायचे मोल. २. मांडणी; मांडणूक.

**मांडणी, मांडणूक** स्त्री.१. मांडणे; प्रत्येक गोष्ट वेगळी करून व व्यवस्थित रीतीने पसरणे; थाटणे; लावणे; रचणे. २.व्यवस्थित रचना. ३. सांगाडा; नुसती बांधणी; बंदिस्ती (इमारतीची).

**मांडणे** सक्रि.१. सुटे–सुटे व व्यवस्थितपणे पसरणे, ठेवणे, रचणे (साहित्य, सामान, जरुरीच्या गोष्टी इ.).२. स्थापन करणे; उघडणे (दुकान, व्यापार). ३. लिहिणे; वहीत दाखल करणे (खर्चाच्या बाबी, टाचण). ४. तयार केलेल्या चिखलात रोपामागून रोप याप्रमाणे लावणे; आवटणे. ५. प्रतिपादणे. ६. व्यापणे :'जी भूतीं भूतळ मांडिले।'– ज्ञा ११.२८६. ७. पाळणे :'देह सांडावा ना मांडावा ।'– एभा २०.१४९. ८. प्रवर्तणे; चालवणे; दाखवणे; प्रदर्शित करणे इ. ९. कडाक्याने आणि यथेच्छ चालू करणे (भांडण, दंगा, गोंधळ इ.).
अक्रि. १.इच्छेप्रमाणे वागण्यास संधी मिळणे; फावणे. २. बनणे; तयार होणे; निघणे. ३. आरंभ होणे :'जैसा प्रलयकाळ मांडला।'–ज्ञा १.१५८. [सं. मंड् = शोभविणे]

**मांडते** वि.न. व्यवस्थित; ठाकठीक : 'आमुचें घर मांडतें करी'– पंचो १२२.६ [सं.मंड्]

**मांडपत्र** न. (मांडीवर घेऊन दत्तकविधान केले जाते. यावरून) दत्तकपत्र; दत्तक घेण्याविषयीचा करार, लेख.

**मांडपुत्र** पु. दत्तकपुत्र.

**मांडपूस** स्त्री. मांडणे; नोंद करणे व पुसणे; लिहिणे व तपासणे.

**मांडलिक** पु. मंडलावर राज्य करणारा राजा; सार्वभौमाच्या ताब्यातला राजा; संस्थानिक. [सं. मंडल]

**मांडली** स्त्री. मंडण; रचना : 'म्हणौनि निवृत्तीचि मांडली । सूनि प्रवृत्ति तळीं ।'– ज्ञा १८.७०४.

**मांडव** पु.१. पहा : **मंडप** १, २. २.देवास अर्पण केलेला इमला. ३. झाल; ऐरणीदान करण्याचे वंशपात्र. [सं. मंडप]

**मांडवखंडणी** स्त्री. शूद्र लोकांत होणाऱ्या लग्न व इतर विशिष्ट धार्मिक प्रसंगी जोशी, उपाध्याय यांचा असलेला दक्षिणेचा हक्क.

**मांडवपरतणी–णे** स्त्री. न. लग्नसमाप्तीनंतर वधूपक्षाने वरपक्षाला दिलेली मेजवानी; जेवणावळ.

**मांडवमेड–ढ** स्त्री. मांडवाची सर्वप्रथम पुरलेली, मुख्य मेढ. (वा.)० **रोवणे**– १. मनापासून काम करण्यास लागणे, २.आरंभ करणे.

**मांडवस, मांडव आवस** स्त्री. फाल्गुन वद्य अमावास्या. या दिवशी शेतकरी लोक सालदार ठेवतात.

**मांडवी** स्त्री. १. देवावर टांगण्याची लाकडी जाळीदार चौकट; मंडपी;

भाळी. २. देवळातील मूर्ती जेथे स्थापन केलेली असते तो गाभारा. (राजा.) ३. लहान मांडव. ४. बंदरातील आयात-निर्यात मालाकरिता केलेली वखार, कोठी, जकातघर; बाजार उभारण्यासाठीची जागा. ५. विड्याच्या पानांची एक जात. (ना.)

**मांडसढोनस** न. एक पक्वान्नविशेष.

**मांडळ** स्त्री. ठोकणी, मुसळ, मोगर इ.च्या टोकाला घातलेली कडी, वसू, मायणी. [सं. मंडल]

**मांडळी** स्त्री. गाडीच्या चाकाची धाव.

**मांडा** पु. गव्हाच्या पिठाचे केलेले अतिशय पातळ पापुद्र्याचे एक पक्वान्न. [सं. मंडक] (वा.) **मांडे करणारीचा शेंबूड काढणे**-काम करून घेण्यासाठी एखाद्याची मनधरणी करणे, त्याला खूश ठेवणे, करणे.

**मांडावळ** स्त्री.१. पहा : **मांडणी, मांडणूक**. २. कौल व दस्तके देऊन करण्याचा वसूल व त्याचा हिशोब.

**मांडी** स्त्री. १.गुडघ्यापासून कमरेपर्यंतचा पायाचा भाग; जांघ. २. बसण्याचा एक प्रकार; बैठक. ३.लगामाच्या बाहेरील बाजूच्या दोन कांबी, कड्या. (माण.) ४. रचना; मांडणी : 'सांडी ते सांडी, मांडी ते मांडी' - चांगा ६३. [सं. मांड्] (वा.) ० **ठोकणे**-बैठक मारणे.० **ठो(टे)कून उभे राहणे**- लढणे इ.साठी सज्ज होऊन उभे राहणे.० **ठो(टो)कून बसणे**- (गायन, लेखन इ.विषयी)आपली उत्कंठा, तयारी दर्शविणे.० **देणे**- मरणोन्मुख मनुष्याच्या मानेखाली मांडी ठेवणे.० **पालटणे**- संततीविषयी नवऱ्याकडून निराश झालेल्या स्त्रीने संततीसाठी परपुरुषागमन करणे. ० **बांधणे**- निश्चय करणे. ० **मोडणे**-१. लेखनव्यवसायास योग्य असे दृढ आसन घालणे. २. लिहिण्यासाठी घातलेली मांडी बदलणे. **मांडीचे उसे करणे, मांडीवर मान ठेवणे**- दुसऱ्यावर बिनदिक्कत विश्वास ठेवणे. **मांडीवर उसे ठेवणे**- संपूर्ण विश्वास टाकणे. **मांडीवर घेणे, देणे**- दत्तक घेणे, देणे. **मांडीवर मांडी टाकून, घालून बसणे**- निरुद्योगी, स्वस्थ बसणे. **मांडीस मांडी टेकून बसणे**- एखाद्याशी स्पर्धा करणे; टक्कर देणे; बरोबरी करणे. **(आपली) मांडी उघडता आपणासच लाज वाटणे**- स्वतःची दुष्कृत्ये उघड करताना स्वतःस लाज वाटणे; स्वतःची व्यंगे उघडकीस आणण्याचे कर्म कठीण असणे, वाटणे, होणे.

**मांडीखालचा** वि. नेहमीचा बसायचा, संपूर्ण सवयीचा (घोडा).

**मांडीचेपणे-णी** न. स्त्री. लग्नसमारंभात सुनमुखाच्या वेळी वरमातेला वधूच्या आईने द्यायची साडी किंवा इतर वस्त्र.

**मांडीमोड** स्त्री. १. लेखनाचा दृढ व्यासंग. २. मेहनत; कसालत; शीण; परिश्रम; प्रयास.

**मांडी(ड)वली, मांडीवाळ** स्त्री. दोन पक्षातील (विशेषतः लग्नासारख्या बाबतीत) विवाद्य विषयासंबंधी केलेली बोलाचाली, तडजोड.

**मांडुक** पु. बेडूक. [सं. मण्डूक]

**मांडुकली** स्त्री. १. लहान मांडव; हलका व जुजबी मांडव. २. लहान मांडी.

**मांडुल-लो** न. एक लाकडी पात्र. (कु.)

**मांडुळणे** अक्रि. खुंटणे; बंद होणे : 'फळतिये वेळे । केळीची वाढी मांडुळे।'- ज्ञा १८.१०७६.

**मांडे** न. मांडणी; विस्तार; उत्कर्ष. (क्रि. होणे.)

**मांडेबांध** पु. प्रभाव; तेज.

**मांडो** पु. किरस्ताव लोकांतील एक घरगुती समारंभ. (गो.)

**मांडोयी** स्त्री. गाडीच्या चाकावरील धाव. (अहि.)

**मांडौसणे** सक्रि. मांडव उभारणे : 'मांडा मांडौसेयावा म्हणे'- गोप्रच १२५. [सं.मंडप]

**मांत्रिक** वि.१. मंत्रज्ञ; जादूगार. २. मंत्रापासून उत्पन्न होणारा; मंत्राने उत्पन्न केलेला; मंत्रासंबंधी. [सं.]

**मांत्रिकात्मा** पु. मंत्रशक्तीने दुसरे शरीर, प्रेत इ.त प्रवेश करावयास लावलेला आत्मा, जीव.

**मांद** स्त्री.१. मळणीच्या वेळी खळ्यात होणारी धान्याची रास. २. (को.) पहा : **मांदण** १.

**मांदगी** स्त्री. १. आजार. (बडोदे) २. शीण; सुस्ती; थकवा. [सं.मंद]

**मांदण** न. स्त्री. १. पाणी, उसाचा रस, विस्तव इ. ठेवण्याचे रुंद तोंडाचे, सामान्यतः मातीचे भांडे. २. विस्तव ठेवण्याचे पात्र, शेगडी.

**मांदणे** सक्रि. फासणे; लेपणे; चोपडणे; माजण करणे. [सं. मर्दन]

**मांदरवड** पु. जागरणाचा शीण; निद्रानाश. (झाडी)

**मांदरी** स्त्री. शिंदीची किंवा मोळाची चटई.

**मांदस** स्त्री. सापळा. (गो.)

**मां(मा)दळ-ळा** पु.१. मोठा मृदंग.२.गाडीच्या चाकाचा तुंबा. [सं. मंडल]

**मांदळमामा** पु. दैवज्ञ जातीतील लग्न, मुंज इ. कार्यांत करण्याचा एक समारंभ.

**मांदळवारे** न. पराकाष्ठेचा शीण, थकवा. (क्रि. येणे, लागणे, भरणे.). [सं. मंद]

**मांदळा** पु. मृदंग.

**मांदळी** पु. मादक किंवा ढोल वाजवणारा.

**मांदा-दी** वि. सुस्त; जड; श्रान्त; आजारी; मंद. [सं. मंद]

**मांदाडा** पु. समूह. [सं. मंडल]

**मांदाण्या** पु. (गुऱ्हाळ) एकवार चरकातून काढलेली पेरी (चिपाड) पुन्हा चरकाला लावणारा; लेंडकवळ्या.

**मांदार** पु. रानात उगवणारे एक पांढरे, भुरकट फुलझाड. [सं. मंदार]

**मांदि, मांदियाळी-ळे** स्त्री.न. मंडळ; गर्दी; समुदाय; टोळी. [सं. मंडल]

**मांदिरे, मांदेरी** न. स्त्री. पहा : **मांज(द)री-रे** [सं. मंद]

**मांदी** स्त्री.१. वलय; चक्र. २.(ल.) पहा : **मांदियाळी** [सं. मंद]

**मांदुरी** पु. १. चाबूकस्वार. २. तबेला ठेवणारा.

**मांदू(दु)स-सी-से** स्त्री.न. तिजोरी; संदूक; मोठी पेटी. सामान्यतः पेटी : 'ज्ञानरत्नांची मांदुस।'- विपू १.६४.
पु. १.पिंजरा. २.(चर्म.) मांदे व एरंड्या ठेवण्याचा लाकडी ठोकळा. [सं. मंजूषा]

**मांदे** न. एकत्रपणा.

**मांदे** पु. अव. कारिंदा फळाच्या तळलेल्या चकत्या.

**मांदे** न. प्राण्यांची चरबी. [सं. मंद]
**मांदेली** स्त्री. मांजाळी; माशाची एक जात.
**मांदोडा-डी-ळी** पु.१. मांडव :'किरीटी कामधेनूचा पाडा। वरी कल्पतरूचा आहे मांदोडा ।'- ज्ञा ८.८. २. अनेक फांद्यांचा समुदाय; जुंबाड : 'तरी ऊर्ध्वाहीकडे । शाखांचे मांदोडे ।'- ज्ञा १५.६०. ३. फळांचा घड. ४. समुदाय. [सं. मंडप]
**मांद्य** न.१. मंदपणा; चेंगटपणा; गतीची, क्रियेची शिथिलता. २. मंदाई; जाड्य; अशक्तता. ३. मांदगी; मांदपणा; सुस्ती.४. अंधुकता; सौम्यता; मृदुता (दृष्टी, उष्णता, प्रकाश, आवाज, झुळूक इ.ची). [सं.]
**मांधणे** सक्रि. बांधणे: 'मांधिजे धुइयें : मासु येकु' - रकौ २२४. २. आनंदणे : 'तेथ पातकें मांदति थाओ ।'- ज्ञा १८.८००.
**मांधा** पु. समुदाय :'त्वरें चालती धांवती लोक - मांधा ।'- मुराअ ४४.
**मांधाण** न. रांजण; मोठे मडके : 'मांधाणीं विडा धुतला' - लीचपू २५०.
**मां(मा)सान्न** न. माषान्न; उडदाचे पदार्थ.
**मांसाहारी** वि. मांस खाणारा; मांसावर निर्वाह करणारा.
**मांसूट** न. गर.
**मिअत** शंभर. - ऐको.
**मिखणी** स्त्री. बांधणी; रचना.
**मिचकट** वि.१. घाणेरडे; शिडबिडीत (भांडे इ.).२. काळाकभिन्न; काळा कुळकुळीत ('काळा' या रंगाचा अतिरेक दाखवण्यासाठी काळा या शब्दास जोडून योजतात.) (क्रि. मिचकटणे.) [सं. मषी]
**मिचकणे, मिचका(क)व(वि)णे** सक्रि.१. (डोळे, तोंड इ.) त्वरेने मिटणे आणि उघडणे;(डोळ्यांची)उघडझाप करणे; एखाद्याला एखादी खूण करण्याकरता डोळे झाकून उघडणे; नेत्रसंकेत करणे. २. अति श्रमामुळे, दुःखामुळे डोळ्यांची एकसारखी उघडझाप करणे. [सं. श्मीलनम्]
**मिचका-क्या, मिचमिच्या** वि. मिचमिचीत डोळ्यांचा (मनुष्य); एकसारखी उघडझाप होणारा (डोळा); डोळे मिचकवण्याची सवय असलेला; डोळे मिचकवणारा.
**मिचकूट** न. लोणचे. (गो.)
**मिचमिच** स्त्री. १. जलद खाताना होणारा आवाज. जबड्याची त्वरित उघडझाप.(क्रि. करणे, वाजणे.) २. सवयीने जलद उघडझाप. [ध्व.]
**मिचमिचीत** वि.१. बिलबिलीत; बेचव; चांगल्या तऱ्हेने न शिजवलेले (अन्न). २. मिचका (डोळा); मिचक्या डोळ्यांचा (माणूस).
**मिजरफी, मिजराफ** स्त्री. तंतुवाद्य वाजवण्यासाठी बोटात घालण्याची एक प्रकारची तारेची अंगठी; नखी. [फा.]
**मिजाज-स** स्त्री.१. दिमाख; ताठा; ऐट; डौल; अभिमान. २. तब्येत; प्रकृती. (क्रि. ठेवणे, राखणे.) ३. बुद्धी :'तस्मात् त्याची मिजाज कायम नाही.'- ऐलेसं ८.३९१५. [अर्. मिझाझ] (वा.) **० जाणे**- इतराजी होणे. **मिजाशीत येणे, चढणे**- गर्वाने फुगणे; डौलात असणे.
**मिजाज(स)खोर-दार, मिजाजी-शी-सी** वि. १.मिजासीने वागणारा; चढेलपणाने किंवा प्रतिष्ठितपणे वागणारा, गर्विष्ठ. २. नाजूक प्रकृतीचा; तब्येती; लहरी. ३. डामडौलाचे; थाटामाटाचे.
**मिजान** स्त्री.१. तुला; प्रमाण.२. एकंदर, एकूण बेरीज. (व.) [अर्. मीझान्]
**मिजार** स्त्री. ऐट. (व.)
**मिजार** न. थडगे; समाधी.
**मिजिगिति** स्त्री. मशीद.
**मिजाशी-सी** वि. लहरी; डामडौलाचे व नाजूक.
**मिझीकम, मिद्रीकांव** स्त्री. सब्जा; एक वनस्पती. (गो.)
**मिटका** पु.१.ओठांची मिटलेली स्थिती; (डोळे, फुले, कागद, पाने इ.ची) चिकटलेली, मिटलेली, दाबून बसलेली स्थिती; चिकटणे. (क्रि. बसणे, पडणे.) २. मिठी.
**मिटकावणे** सक्रि. १. घट्ट बंद करणे; दाबून धरणे (डोळे इ.). २. कान टवकारणे, उभारणे.
**मिटकी** स्त्री. १. एकमेकांस चिकटलेले ओठ उघडताना होणारा आवाज. २. चवीने खाताना होणारा आवाज. (वा.) **मिटक्या मारणे**-१. प्रेमाने गोडी चाखणे. २. आशा धरून बसणे; जिभल्या चाटणे.
**मिटणे** सक्रि. १. (ओठ, हाताची मूठ, पापण्या, दाराची झडपे, फुलांच्या पाकळ्या इ.) बंद होणे; एकत्र होणे. २. (ल.) बंद करणे; शेवटास नेणे; संपवणे; संपणे (भांडण, तंटा). ३. पुसून टाकणे; घालविणे. अक्रि. (रोग किंवा आजारीपणा) संपणे; नाहीसे होणे.
**मिटमिटीत** वि. १. क्षुल्लक; अत्यल्प; तुटपुंजे (देणगी, खर्च). २. नीरस; बेचव; कवकवीत (भाषण, खाद्यपदार्थ, काम इ.).
**मिटमिट्या** वि. कृपण; कवडीचुंबक.
**मिटीमिटी** वि.टुकटुक, टकमक (पाहणे) : 'मीटिमीटि स्वर्ग देवा । पाताळी पीयूषाचा ठेवा ।' - ऋव ८१.
**मिटुका** पु. नांगराचे रुमणे धरण्याकरिता त्यास बसवलेला लाकडी दांडा.
**मिटू-टू** कापडाचा एक प्रकार.
**मिटे** न. गोडे पाणी. (गो.) [सं. मिष्ट]
**मिट्टी** स्त्री.(विटीदांडूचा खेळ) डाव्या किंवा उजव्या मुठीवरून विटी उडवून दांडूने तिला टोला मारण्याची क्रिया; मुंड.(क्रि. मारणे)[सं. मुष्टि] (वा.)**० लावणे**- घाई करणे; लवकर आवरण्यासाठी मागे लागणे.
**मिठ(ठा)ण** न. गर्दी; समुदाय; माणसांचे एकत्रित येणे; चिक्कार गर्दी. (क्रि. घालणे, पडणे, होणे.)
**मिठपाणा, मिठाणा** पु. खारवून शिजवलेले कडधान्य.
**मिठवणी** न. मिठाचे पाणी.
स्त्री. स्वयंपाकाला लागणारी मीठ ठेवण्याची परडी, पाळे. (राजा.)
**मिठा, मिठडा** वि. गोड; मिष्ट; रुचकर; मिष्ठास. [सं. मिष्ट]
**मिठाई** स्त्री. खाऊ; पेढे, बर्फी यांसारखे साखर घालून केलेले पदार्थ.
**मिठागर** न. समुद्राच्या पाण्यापासून मीठ तयार करण्याची जागा;मिठाची शेती.
**मिठागीर** मीठ बनविण्याचा धंदा करणारी आगरी जात.
**मिठाबार** पु. पहिला बार, बहर; पहिले पीक.
**मिठाभोवो** न. १. मिठाचे पक्वान्न. (गो.) २. (ल.) निरुपयोगी वस्तू.
**मिठास** स्त्री. स्वादिष्टपणा; माधुरी; मिष्टता; गोडी.

**मिठा(ठ्ठा)स, मिठ्ठा** वि. गोड.

**मिठी** स्त्री. १. (गोड पदार्थ फार खाल्ल्याने उत्पन्न झालेली) अरुची; वीट; तिटकारा; शिसारी. (क्रि. बसणे). २. आवड; छंद; उत्कट इच्छा. (वा.) **० पडणे** - १. गोडी लागणे. २. ऐक्य पावणे. [सं. मिष्ट]

**मिठी** स्त्री. १. दृढालिंगन; पकड. २. ऐक्य; लीनता; लय :'ते उभय बोधांची मिठी । अक्षरु पुरुषु।'- ज्ञा १५.५१४. ३. संकोच; बंदी : 'कानाची नुघडी निमटली मिठी ।'- एभा १५.१४. ४. आठी : 'भ्रूकुटीस घालून मिठी ।'- दास ३.१०.१८. ५. (अव. वापर) पकड; झडप; उड्यावर उड्या. (वा.)**० बसविणे**-एखाद्यावर गर्दी करणे, त्यास घेरून कोंडणे.

**मिठीसात्रकी** स्त्री. घोड्याची एक चाल.

**मिठोड** पु. माळेत ओवण्याचा सोन्याचा अंडाकृती जाळीदार मणी.

**मिठ्या, मुठ्या** पहा : **मिटुका**

**मिडकणे** अक्रि. आशाळभूत होणे; धाधावणे; जीव टाकणे; भुणभुण लावणे; तळतळणे :'अन्नासाठी मिडकली। झटा टाकिती ।'-दास ३.५.७.

**मिड(डो)गण-णी** स्त्री. स्तुती : 'काश्मीरीं न करावी । मिडगणें जें ।' - ज्ञा १३.३१९.

**मिडगणे** न. फराळ; उपाहार.

**मिडमिडा** वि. मिणमिणा; अंधुकपणे जळणारा (दिवा). [ध्व.]

**मिडी** स्त्री. वांगी, पडवळ, दोडका, वाळूक इ.चे कोवळे फळ.

**मिण(न)धा** वि. कपटी.

**मिणमिण-णा** क्रिवि. मंदपणे; अंधुकपणे.

**मिणमिणणे** अक्रि. १. मंद जळणे; अंधुकपणाने जळणे. २. (ल.) हलक्या आवाजाने किंवा खोल स्वराने, जड बोलणे.

**मिणमिण्या-णा, मेंगलगाड्या** वि.१. सुस्त; मंद; धिमा; रेंगाळणारा. २.(ल.)मनात कुढणारा; आतल्या आत जळफळणारा. ३. हळू बोलणारा; बारीक आवाजाचा. ४. मंद, क्षीण, अंधूक, बारीक (प्रकाश).

**मिणवा** वि. मिंधा; ओशाळा.

**मित** वि. १. मोजलेला; मोजका. २.(ल.) मध्यम; माफक; योग्य प्रमाणात असलेला; जितक्यास तितका; थोडका. [सं. मा=मोजणे]

**मितल-ला** वि. परिमित; थोडे; अल्प; मोजके; माफक; नियमित.

**मिताक्षरी** स्त्री. एक सांकेतिक भाषा. अ-आ च्या जागी क-का अशी अक्षरे योजून बोलली जाणारी भाषा.

**मिति-ती** स्त्री. १. माप; परिमाण; वजनमाप; संख्या; गणती; गणना. २. परिमितता; माफकपणा; प्रमाण; ठरावीक रक्कम; प्रमाणशीर गोष्ट; निश्चित संख्या. ३. तिथी; दिवस. ४. काळ; मर्यादा. ५. कर्जाऊ रकमेवरील व्याज.
क्रिवि. हळू. [सं.]

**मित्र** पु.१. स्नेही; दोस्त; सखा. २. सूर्य.
वि. मित्रत्वाचा; दोस्तीचा; सलोख्याचा; स्नेहाचा. [सं.]

**मित्रत्व** न. प्रेम; मैत्री; स्नेह.

**मित्रपत्र, मित्रातपत्र** न. अबदागीर; सूर्यपान:'झळकती चामरें मित्रातपत्रें।' - रावि २६.५५. [सं.मित्र+पत्र, मित्र+ आतप+त्र]

**मित्राचार** पु. स्नेह; मैत्री .

**मिथक** न. आख्यायिका; दंतकथा.

**मिथणे** अक्रि. १. एकमत, संगनमत करणे. २. एकत्र मिळणे, जुळणे.

**मिथुन** न. १.जोडी. २. युग्म; जोडपे; स्त्री आणि पुरुष. ३. समागम; स्त्रीपुरुषांचा संग. ४. एकी. ५. बारा राशीतील तिसरी रास. [सं.]

**मिथ्या-थ्य** वि. खोटे; असार; नश्वर; अवास्तविक.
न. खोटी माया : 'मना सर्वथा मिथ्य मांडू नको रे ।'- राम १९. [सं.]

**मिथ्यात्मा** पु. देह.

**मिथ्यादृष्टि-ष्टी** स्त्री. १. मिथ्या ज्ञान. २. नास्तिकता.

**मिनणे** क्रि. पहा : **मीनणे**

**मिन(न्न)त, मिनतमाना, मिनतवारी, मिनत्वारी, मिनती** स्त्री. पु. विनंती; अर्ज; मनधरणी; विनवणी; आर्जव. [अर. मिन्नत=कृपा]

**मिनतीने, मिनतवारीने, मिनत(ती)वार** क्रिवि. काकुळतीस येऊन केलेल्या विनंतीने; मनात नसताना केवळ अजिजीस व भिडेस बळी पडून, मेहेरबानी म्हणून.

**मिनमेख** क्रिवि. (कागदोपत्री) बिनशर्त; अटीशिवाय; मर्यादा न घालता; पूर्णपणे; सर्वस्वी (हुकूमनामा, फैसल्ला, जाब इ.).

**मिनवार** तपशीलवार.**मिनवार** तपशीलवार.

**मिना** पु. काचेचा मुलामा; चांदीच्या दागिन्यावर बसविण्यात येणाऱ्या हिरव्या दगडाचा पातळ रांधा. [फा. मीना]

**मिना(ने)कार-गार** पु. मिन्याचे काम करणारा.
वि. मिना केलेले. [फा. मीनाकार]

**मिनि(नी)ट** न.१. तासाचा साठावा भाग; क्षण. २. टिपण; टाचण; लेख : 'केकावलीवर रावबहादुरांनी तें मिनिट लिहिलें आहे त्याच्या शेवटच्या वाक्यांत गुणसर्वस्व दाखल केलें.'- नि ७९४. ३. (डिग्रीचा, अंशाचा) साठावा भाग. ४. दाव्यांचा, खटल्यांचा निकाल. [इं.]

**मिनिस्टर** पु. दिवाण; मंत्री. [इं.]

**मिनी-मी** स्त्री. स्त्रीचा स्तन.

**मिया** पु. मुसलमान गृहस्थ.

**मियाद** स्त्री. मुदत. [अर. मीआद]

**मियादी** वि. मुदतीची; काही शर्तीवर दिलेली.

**मियामल्लार** पु. (संगीत) एक राग. गानसमय मध्यरात्र.

**मियासारंग** पु. (संगीत) एक राग. गानसमय मध्यान्ह.

**मिरका धनगर** फक्त शेळ्यामेंढ्यांचा कळप बाळगणारा धनगर.

**मिरकूट** न. एक क्षुद्र जंतू; डास; मच्छर.

**मिरग** पु. मृगनक्षत्राचे दिवस. (कु.) [सं. मृगचे अप.]

**मिरगिटाण** स्त्री. तेल, तूप इ. स्निग्ध पदार्थ जळल्या-करपल्यामुळे सुटणारी घाण.

**मिरगी, मिर्गी, मिरघी** स्त्री. १.फेपरे; अपस्मार; घुरे. २. घेरी; भोवळ; झीट. [हिं.] (वा.) **० वर येणे**- क्रुद्ध होणे; रागात येणे; संतापणे.

**मिरगुंड-डे** न.१. बटाट्याच्या किंवा तांदळाच्या पिठाचे छोटे पापड. २. चटणी; मिरपूड.

**मिरगोंड** न. १. मिरवेलीस आलेला मिऱ्यांचा घड, झुबका. २. मिरबोंड; मिरघाटा.
स्त्री. लहान हिरवी मिरची; कोवळी मिरची.

**मिरग्या** पु. मृगनक्षत्रात उत्पन्न होणारा सपक्ष तांबडा किडा; मृगकिडा. (व.)

**मिरची** स्त्री. एक झाड; त्याचे फळ. चव तिखट. स्वयंपाकात उपयोग. हिचे लवंगी, भोपळी, बुटकी, बुगडी, मिरबोंडी, भाजीची, धारवाडी, पांढरी इ. प्रकार आहेत. २. मुलींचा एक खेळ. (वा.) **अंगाला, नाकाला मिरच्या लागणे, झोंबणे** – चडफडाट होणे. [सं. मरिच]

**मिरजाई** स्त्री. गुन्हेगार जातींत स्त्रियांचा चोळीवरून घातला जाणारा अंगरखा.

**मिरजोळी** स्त्री. एक औषधी वेल; मोठ्या पानाची, उग्र वासाची, मिरवेलीच्या पानासारखी पाने असणारी व वृक्षाच्या ढोलीत उगवणारी वेल.

**मिरधा–ध्या, मिर्धा** पु. १.खेडेगावचा एक अधिकारी; चौगुला. २. दहा शिपायांचा, भालेकरांचा, जासुदांचा नाईक; सरचोपदार. ३. गोंड लोकांतील धार्मिक कृत्ये करणारा मुख्य; धर्माधिकारी. [फा. मीर्दह]

**मिरपु(मु)टणे** अक्रि. १. वाढ खुंटणे; खुरटणे. २. थांबविले जाणे; उत्साह मावळणे; खुंटणे; रुसणे.

**मिरमिटा** पु. १. शोपा आंबा. २. शोप्या आंब्याचा वास.
वि. शोपा (वास); बडीशोपेसारखा वास असलेला.

**मिरमिर** स्त्री. तिखट पदार्थ खाल्ल्याने जिभेस होणारी जळजळ; चुरचूर. [ध्व.]

**मिरमिरणे** अक्रि. तिखट लागणे; झोंबणे; मिरमिर वाटणे; (अक्कलकारा, पिंपळी इ. खाल्ल्याने) चुरचुरणे.

**मिरमिराट** पु. मोठी मिरमिर; जळजळ.

**मिरमिरी** स्त्री. तिरीमिरी. (को.)

**मिरमीट** न. डोळ्यात शिरून झोंबणारा लहान कीटक; चिलट.

**मिरमुटला** पु. लहान, खोडकर मुलगा.

**मिरवण–णी, मिरवणूक** स्त्री. थाटाने पुष्कळशा जमावानिशी सावकाश जाणे; छबिना; दिंडी; वरात; स्वारी. (क्रि. निघणे.) [क. मेरवणगे]

**मिरवणी** स्त्री. १. अलंकार; सुशोभित करण्याची वस्तू. २. प्रसिद्धी.

**मिरवणूक** स्त्री. मोर्चा; ग्रंथदिंडी; दिंडीपताका; छबिना; वरात.

**मिरवणे** अक्रि. १. वाद्यासहित शहरातून समारंभपूर्वक सावकाश जाणे; भपका दाखवत जाणे. २. छानछोकीने फिरणे; डौलाने जाणे.३. (ल.) धिंड काढली जाणे. ४. शोभणे :'तेंचि कृष्णाचें श्रीमुख। नित्य निर्दोष मिरवत।'– एरुस्व १.५४. ५. बोलणे. ६. क्रीडा करणे; खेळणे. ७. डौल दाखवणे; डौलाने फिरणे.

**मिरशांग–षेंग, मिर्शेंग** स्त्री. मिरची, (गो., कु.); मिरसांग (राजा.)

**मिराखोर** पु. अश्वरक्षक.– ऐको.

**मिराणी** स्त्री. जाडेभरडे वस्त्र, लुगडे, बांड, सुताडा.

**मिरात** पु.आरसा.

**मिरामल्लार** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**मिराशी** स्त्री. स्वामित्व.

**मिराशी** पु. मुसलमानांतील एक अस्पृश्य जात. – के १७.४.३६.

**मिराशी** वि. १. मिरासदार; वतनदार. २. भंडारी.

**मिरास** स्त्री.न. १. वडिलोपार्जित वतन; दायभाग; वंशपरंपरागत संपत्ती; स्थावर मालमत्ता (विशेषतः शेत, जमीन इ.); वतनदारी; परंपरागत हक्क. जमिनीवरील कर. [अर. मीरास्] (वा.)० **पुरणे** – महत्त्वाची गोष्ट एखाद्या ठिकाणी ठेवलेली असणे.

**मिरासझाडा** पु. मिराशीची आणि मिरासदारीची कलमबंदी.

**मिरासदार, मिरास्दार, मिराशी–सी** पु. वि. १. मिराशीचा उपभोग घेणारा; वतनदार; थळकरी; सरकारसारा नियमाने भरून आपले स्वामित्व कायम ठेवणारा शेतमालक. २. महार; महारकीचे वंशपरंपरागत वतन भोगणारा महार. ३. भंडारी. [फा.मीरासीदार]

**मिरी** पु. १. पहिल्याने खेळण्याची पाळी असलेला गडी. २. खेळताना उताणी पडलेली कवडी. [फा. मीर]

**मिरी** स्त्री. निरी; चुणी (धोतर इ.ची).

**मिरे** न. १. मिऱ्यांचा वेल. २. एका झाडाचे नाव.
न. मिऱ्याचा दाणा; मसाल्यातील एक तिखट पदार्थ. [सं. मरिच]

**मिरीतल्फ** पु. गंजिफातील राजेरी देणी; राजा खाली टाकणे, उतरणे. [फा. मीर+तलफ]

**मिलमिशा** वि. बावळट; भित्रा.

**मिलागार** स्त्री. ख्रिस्ती मंदिर; (इं.) चर्च.

**मिलाप–फ** पु. स्त्री. १. ऐक्य; मिश्रण; मिळणे; जुळणे; मेळ. २. भेट; संयोग; एकत्र येणे. [हिं.]

**मिलापी–फी** वि. सलगीचा; सोबतीचा; संगतीचा; जुळता; जुळणारा.

**मिलाव, मिलेर** पु. पैसे ठेवण्यासाठी भोक असलेला मातीचा गडू. (गो.)

**मिलाव** न. पोलाद.

**मिलांड** न. बीड.

**मिलिखा** पु. वि. मिचमिचे डोळे असणारा (मनुष्य): 'एक मिलिखे भुरुरे पिंगळे'– वह २८५. [सं.मीलित + अक्ष]

**मिलिंद** पु. भुंगा; भ्रमर.

**मिल्हा** पु. १. बगळ्याच्या जातीचा एक पक्षी. २. (ल.) साधुत्वाचे ढोंग करणारा माणूस.

**मिशन** न. १. कोणत्याही धर्माचा अगर संप्रदायाचा प्रसार करणारी संस्था. २. धार्मिक अगर राजकीय प्रचार. ३. आयुष्याचे ध्येय; जीवितकार्य, हेतू. ४. कामगिरी. [इं.]

**मिशनरी** पु. प्रचारक; पाद्री; ख्रिस्ती धर्मप्रचारक.

**मिशाळ** वि. मोठ्या मिशा असलेला.

**मिशि–शी–सि** स्त्री. दंतमंजन; मस; राखुंडी.

**मिशी** स्त्री.१. पुरुषांच्या वरच्या ओठावर व नाकाच्या खालील जागेत येणारे केस. २. मांजर, वाघ इ.च्या तोंडावरील लांब केस. [सं. श्मश्रु] (वा.)० **उतरून देणे**– एखाद्या गोष्टीची निश्चिती सांगणे. **मिशा खाली होणे, उतरणे, खालावणे**– मानखंडना होणे; फजिती होणे; नक्षा उतरणे. **मिशा–शी पाजविणे,पिळणे,**

**मिशांना पीळ भरणे**- १. एखाद्याचा सूड घेण्याच्या विचाराचे निदर्शक म्हणून मिशांवरून हात फिरवणे; तिरस्काराने, रागाने मिशा वळवणे.२. गर्व वाहणे; ऐट मिरवणे; धमक दाखवणे. **मिशा-शी भादरणे**- फजिती करणे; अपमान करणे. **मिशांना तूप लावणे, मिशी(शा)वर शीत ठेवणे**- श्रीमंती दाखवणे; पोकळ, बाह्यात्कारी श्रीमंतीचा डामडौल करणे. **मिशीवर तांदूळ ठेवून संसार करणे**- गरिबीने संसार करणे.

**मिशी** स्त्री. वेश्याव्यवसायाच्या सुरुवातीस करण्याचा समारंभ. (क्रि. लावणे.)

**मिश्र, मिश्रित** वि. मिसळलेला; एकत्र झालेला; मिळवलेला.[सं. मिश्र]

**मिश्रण** न.१.मिसळ; भेसळ; मिश्र झालेला पदार्थ. २. बेरीज. ३. (रसा.) संयोगी नसता मिसळून झालेला पदार्थ.

**मिश्री** स्त्री. खडीसाखर; मिसर देशातील साखर. [अर. मिस्री]

**मिश्री** स्त्री. तंबाकू जाळून केलेले दातवण.

**मिष-स** न. १. निमित्त; ढोंग; बतावणी; सोंग. २. फसवणूक; फसवेगिरी; लबाडी. [सं.]

**मिषा** वि. ढोंगी; बतावणी करणारा; खोटे कारण दाखवणारा; सबबी सांगणारा.

**मिष्ट** वि. गोड; चवदार; स्वादिष्ट; रुचकर; लज्जतदार. [सं.]

**मिष्टाई** स्त्री. १. गोडी; माधुरी. २. रुचकरपणा; स्वादिष्टता; लज्जत.

**मिष्टान्न** न. पक्वान्न; गोडधोड; सुग्रास, रुचकर अन्न.

**मिस, मिसक, मिसकट-टे** न. १. निमित्त. २. रूप; आकार : 'पै अष्टधा भिन्न ऐसें। जें दाखविलें प्रकृतिमिसें ।'- ज्ञा १५.४८४.

**मिसकरा-खोर** वि. ढोंगी; तोतया; बतावणी करणारा.

**मिसकीन-ल** वि.१. गरीब; अशक्त.२. निरुपद्रवी; शांत (गाय, म्हैस). २. (ल.) बाहेरून दिसण्यात गरीब पण आतून लबाड. [अर. मिस्कीन् = गरीब]

**मिसकीन बगळा, मात्रागमनी, मादरचोद, मारवाडी** वि. बाहेरून सौम्य, गरीब परंतु आतून हरामखोर; पक्का लबाड असा (माणूस).

**मिसमार, मिस्मार** १. हातापायांना खुंट्या ठोकणे. २. उद्ध्वस्त, नष्ट (होणे).

**मिसमिशी(सी)त** वि. मऊ; नरम (माणूस इ.); विसविशीत; चिवट, मजबूत नसलेले; घट्ट वीण नसलेले (वस्त्र).

**मिसरगंड** पु. मिशीवर पीळ देऊन आव्हान देणारा : 'तुं मठारयां देवा मिसरगंडु'- मूप्र २५७६. [सं.श्मश्रु]

**मिसरना** स्त्री. १. संबंध जोडणे. २. मिसळणे. ३. नवविवाहितांचे मीलन. (झाडी)

**मिसरूड, मिसरू** स्त्री. नुकत्याच येऊ लागलेल्या, बारीक मिशा. [सं. श्मश्रु]

**मिसल-ळ-ळा** स्त्री. १. हुकूम; व्यवस्था; दर्जाप्रमाणे कोणी कोणत्या ठिकाणी बसायचे ही व्यवस्था; दर्जेबंदी, प्रकार; अनुक्रम; समाजातील योग्य जागा : 'निमंत्रित मंडळी दरबारास आल्यावर त्यांस दर्जाप्रमाणें मिसलवार बसविणें.' -ऐरा ७. २. वकिलाचे दाव्यासंबंधीचे टिपण, टाचण. (व.) [अर. मिसाल]

**मिसलदा(ल्दा)री** स्त्री. योग्यतेनुरूप व्यवस्था; दर्जेबंदी :'कोरबंदीनें उभे मानकरी थटून मिसल्दारीत ।'- प्रला २२६.

**मिसल्बंदी, मिसळबंदी** स्त्री. कामाची वाटणी आणि व्यवस्था; दर्जेबंदी.

**मिसळ-ळा** स्त्री.पु. १. मिश्रण; मिसळलेली स्थिती. २. एकत्र मिसळलेला समूह. ३. मंडळी; संघ. ४. सख्य; मैत्री. [सं. मिश्रण]

**मिसळ** स्त्री. एक खाद्यपदार्थ.कडधान्याच्या उसळीमध्ये पोहे, कांदा, फरसाण इ. घालून होणारा चटकदार पदार्थ.

**मिसळ** वि. मिसळलेला; एकत्र झालेला. [सं. मिश्रित]

**मिसळण** स्त्री. पहा : **मिसळ** १

न. १. मिश्रण करण्याकरिता मिसळलेली वस्तू; मिश्रणातील निरनिराळे पदार्थ. २. मिश्रण; भेसळ. ३. फोडणीत घालण्यासाठी एकत्र केलेले धने, मोहरी, कारळे इ. पदार्थ.

**मिसळणे** अक्रि. मिश्रण, एकत्र होणे.

सक्रि. १. एकत्र करणे. २. (ल.) (काम किंवा लढाई) जोराने, त्वेषाने करणे.

**मिसळवणी** न. कोकंबसारात मिसळून वाढविलेले ताक.

**मिसाल** स्त्री. हुकूमनामा; आज्ञापत्र :'तालीक लिहून घेऊन असल मिसाल परतून दीजे ।'- मइसा १२. [अर.]

**मिसी** स्त्री. पायातील मुदी. (झाडी)

**मिस्तरी, मिस्त्री** पु. रेषालेखनपटू; मुकादम; कुशल कारागीर. (विशेषतः सुतार, गवंडी इ.).

**मिळक(ख,ग)त** स्त्री. १. प्राप्ती; नियमित मिळणारे उत्पन्न. २. फायदा; नफा. ३. मालमत्ता; जिंदगी. [अर्. मिल्कत्]

**मिळण, मिळवण** न. आमटी, भाजी मिळून येण्यासाठी, घट्ट होण्यासाठी लावले जाणारे पीठ. [सं. मेलन्]

**मिळण-णी** न. स्त्री. १. एकत्र होणे; मिलाफ; संबंध; मिश्रण; एकी. २. संगम :'सागरसरिता जीवन एक । परी मिळणीं भजन दिसे अधिक।' - एभा १.९५. ३. संसर्ग; भेट; स्पर्श; संयोग; संबंध; मेळ : 'सत्संगसूर्याचे मिळणीं निर्विकल्पकमळणी। विकासे ।'- एभा २६.४३८. ४. एकरूपता. ५. मीलन; एकत्र जुळणे; जमणे. [सं. मेलन]

**मिळणी** स्त्री. कट, फितुरी करण्याच्या उद्देशाने झालेली एकी; कूट.

**मिळणे** अक्रि. १. (संपत्ती, लाभ, नोकरी, पदवी इ.) प्राप्त होणे; हस्तगत होणे. २. एकत्रित होणे; मिसळणे. ३. एकरूप होणे; एकत्रित, एकजीव होणे; एकमत होणे. ४. जुळणे; अनुरूप किंवा अनुकूल होणे; बरोबरीचे होणे; एखाद्या विशिष्ट पक्षाचा, मताचा, धोरणांचा होणे :'पार्थासी नमुनियां अजा मिळ रे।'- मोभीष्म १२.५२. ६. भेटणे; भिडणे; टेकणे; गाठ पडणे; समोरासमोर येणे. ७. सापडणे; आढळणे; दृष्टोत्पत्तीस येणे; दिसणे; पाहिले जाणे. ८. पकडीत, हातात येणे. ९. शक्य होणे, असणे. १०. रतिभावनेने अंगीकार करणे. (गो.) ११. गुरफटला जाणे; अडकणे. १२. नफा, फायदा होणे; उत्पन्न होणे. [सं. मिल्=भेटणे]

**मिळता** वि. १. मिळताजुळता; जुळता; मिळणारा. २. भरभराटीचा.

**मिळताऊ** वि. १. बरोबरीच्या लोकांशी लवकर मिसळून जाणारा;

दुसऱ्याशी आपले पटवून घेणारा. २. जिंकणारा; मिळवणारा.

**मिळताव** पु. १. प्राप्ती; मिळकत; फायदा. २. सामील होणे.

**मिळमि(मी)ळ** स्त्री. (स्निग्ध पदार्थांच्या संयोगाने आलेला) बुळबुळीतपणा, मिळमिळाट.
क्रिवि. गुळमुळ; आवाज न करता (रडणे).

**मिळमिळाट** पु. अतिशय बुळबुळीतपणा.

**मिळमिळीत** वि.१. बुळबुळीत व तेलकट दिसणारे, असणारे. २. बेचव; नीरस; मळमळीत (भाषण इ.).

**मिळवण** न.१. मिश्रण.२. गुरांना खाण्यास घालण्याचे आंबोण.

**मिळवणी** स्त्री. १. बेरीज; एकाच जातीच्या अनेक रकमा एके ठिकाणी आणण्याची कृती.२. अनेक संख्या एकत्र करून आलेले फल; बेरीज; एकूण संख्या. ३. जमवणी; जुळणी; सफाईची जोडणी. ४. दुसऱ्यात मिळवलेला पदार्थ.
न. १. मिश्रण करताना घातलेले पाणी. २. पाणी घालून केलेले मिश्रण.

**मिळव(वि)णे** सक्रि.१. प्राप्त करून घेणे; संपादणे. २. मिसळणे; एकात दुसरे घालणे. ३. संचय करणे; एकत्र आणणे. ४. जुळण्यास, भेटण्यास, मिळण्यास लावणे; ताळा घेणे; जमवून पाहणे. ५. गाठणे; जिंकून घेणे; पाडाव करणे :'लगट करुनि फौजांनी मिळविले।'- ऐपो २०९. ६. मन वळवणे; सरशी करणे; वश करणे. ७. कृतकृत्य होणे :'ही मागासलेली ईश्वरी विद्या चांगली नावारूपाला आली कीं मिळविली.' - सु ११.

**मिळाऊ** वि. १. मिळवणारा; कमाई करणारा. २. जिंकणारा. ३. जुळणारा.

**मिळी** स्त्री. उंच गळ्याचा चंबू. (कर.)

**मिळून** क्रिवि. १. सहित; सोबतीने; सह; एकत्र. २. एकंदरीत; एकूण. ३. जुळून.

**मिंधा** वि. १. ओशाळा; दबेल; उपकारामुळे दबला किंवा बांधला गेलेला. २. लज्जित; लाजलेला. ३. आधीच्या बाळंतपणानंतर पाळी न येता पुन्हा गर्भार राहून झालेले (मूल); अशा तऱ्हेची गर्भवती (स्त्री). (वा.) **मिंधे होणे**-उपकारबद्ध होणे; ओशाळा होणे.

**मी** सना. बोलणारा स्वतः.[सं. अस्मत्] (वा.)० **म्हणणे**- जोरात असणे; स्वतःचा प्रभाव दाखवणे. ० **मी म्हणणे,बोलणे**-स्वतःच्या कर्तृत्वाची बढाई मारणे; ऐट मिरवणे, गर्व वाहणे, अहंपणा दाखवणे.० **तू करणे**, ० **तू वर येणे**-हमरीतुमरीवर येणे; भांडणावर येणे.

**मीट** स्त्री. मिटलेली स्थिती; डोळ्यातून पू आल्यामुळे, चिपडामुळे डोळ्याची चिकटून राहिलेली स्थिती; झाकलेली स्थिती.

**मीटफळ्यो** स्त्री.अव. आट्यापाट्यांचा खेळ. (गो.)

**मीटर** पु.१.(पाणी, वीज इ.) मोजण्याचे यंत्र; मापन यंत्र. २. अंतर मोजण्याचे परिमाण (कापड, जमीन इ.). [इं.]

**मीटरगेज** ज्या रेल्वेगाडीच्या दोन रुळांतील अंतर एक मीटर असते असा लोहमार्ग.

**मीठ** पु.(ढोरधंदा) निवडुंगावर वाढणारा एक प्रकारचा वेल. याने चामड्यावरील केस जातात.

**मीठ** न. १. लवण; पांढऱ्या रंगाचा, खारट चवीचा ज्यात प्रामुख्याने सोडियम क्लोराईड असतो असा पदार्थ. हा बहुधा समुद्राच्या पाण्यापासून मिळतो. कधी कधी खनिजस्वरूपातही असतो. याचा उपयोग पदार्थाला चव येण्यासाठी, खाद्यपदार्थ टिकवण्यासाठी करतात. २. (आट्यापाट्यांचा खेळ) लोण. (कर.) ३. (ल.) चव. [सं. मिष्ट=रुचकर] (वा.) ० **घालणे** - १. पुष्कळशा मोठ्या साठ्यात थोडीशी भर घालणे. २. महत्त्व देणे; पर्वा करणे. ० **चारणे**- छळ करणे. ० **तोडणे, कमी करणे**- खाण्यास कमी घालणे. ० **देणे**-चामडे कठीण करण्याकरिता त्यास मीठ लावणे. ० **मोठे खारट असणे**-कठोर, कडक किंवा करडा धनी असणे. **अंगास मीठ- मोहऱ्या लागणे**- रागावणे; क्रुद्ध होणे; संतप्त होणे.

**मीठकणी** स्त्री. लांबून घरी आल्यानंतर दृष्ट काढण्याचे मीठ; मिठाने काढलेली दृष्ट.

**मीठगावडा** पु. मीठ तयार करणारा.

**मीठभाकर-भात** स्त्री.पु.(ल.) गरिबाचे जेवण.

**मीठा रंग** मोत्याचा पिवळट गुलाबी रंग.

**मीण** पु. जार. (गो.)

**मी-तू** अ. द्वैतभाव; दुजाभाव; आपुलकी नसणे :'नाहीं तें नोंदविलें जेणें । मी तूं जगीं ।'- ज्ञा १५.२८०.

**मीपण-णा** न.पु. १. अहंता; गर्व; मगरुरी; अहंपणा २. (वेदान्त) ब्रह्मापासून मी निराळा असल्याची जाणीव.

**मीन** पु. १. मासा; मत्स्य. २.(ज्यो.) बारा राशींपैकी बारावी रास. [सं.]

**मी(मि)नणे** अक्रि. १. एकत्र होणे. २. प्राप्त होणे; मिळणे :'कां वृक्षाची साउली । वाटे जाता मीनली ।'- ज्ञा १३.५९४. ३. भेटणे; गाठ पडणे.

**मीना** पु. १. निळा रंग. २. दातावरील लुकण. ३. नीलमणी. ४. स्वर्ग. [फा.]

**मीना** पु. दुय्यम दर्जाचे रत्न. [फा.]

**मीनाबाजार** पु. वस्तूंचे प्रदर्शन.

**मीमांसा** स्त्री. १.षड्दर्शनांपैकी पाचवे दर्शन. याचे पूर्व व उत्तर असे दोन भाग आहेत. पहिल्यात कर्मकांड तर दुसऱ्यात ज्ञानकांड विवेचिले आहे.२. चर्चापूर्वक जाणण्याची इच्छा; खोल विचार; चिकित्सा. [सं. मान् = विचार, चिकित्सा]

**मीमांसक** पु. कर्मकांडवादी जैमिनीचे अनुयायी.

**मीमांसक मार्ग** कर्मकांड.

**मीर** पु. रुई, कपाशी मोजण्याचा काटा. (व.)

**मीर** पु.१. (गंजिफा) दशावतारी गंजिफातील प्रत्येक बाजूचा, रंगाचा राजा. २. उमराव; अमीर; सरदार; राजा. [फा. मीर; अर.अमीर]

**मीरज्या** पु. सर्व मेंढक्यांचा पुढारी. (माण.)

**मीरपीर** पु. थोर, अनुभवी, स्वतंत्र अधिकारी; बडा मनुष्य. [फा.]

**मीलन** न. १.मिश्रण; मिसळण; एकत्रीकरण. २. भेट; भेटाभेट. ३. एकत्र जमणे, येणे; मिळणी; संबद्ध होणे. ४. एकत्र मिळून जाणे; ऐक्य; एकी. ५. उघडझाप. ६. खग्रास ग्रहण. [सं. मील् = मिटणे, झाकण]

**मीलित** वि. १. पहा : **मिश्रित**. २. भेटलेला. ३. एकत्र जमलेला, मिळालेला. ४. विशिष्ट बाजूस मिळवून घेतलेला; वळवलेला. [सं.]

**मीस** न. पहा : **मिष**
**मीळ** स्त्री.१. प्राप्ती; नफा; फायदा; मिळकत. २. मिळणी.
**मीळजोड** स्त्री. लाभ; तडजोड :'सारांश मीळजोड स्वामींच्या आशीर्वादें होईल.' - पया १०.
**मुकटा** पु. सोवळे म्हणून नेसण्याचे रेशमी किंवा तागी वस्त्र. [क. मुट्टु =शिवणे]
**मुकटी** स्त्री. बंदुकीचे तोंड. (गो.)
**मुकण-णा** न. पु. १. निःसत्त्व व हलका असलेला कडधान्याचा दाणा; अशा दाण्यांची रास. २. (क.) शिजवल्यानंतर किंवा भिजवल्यानंतर टणक राहणारा दाणा; चाड.
वि. उदास; उदासीन वृत्तीचा.
**मुकणा हत्ती** १. बिनसुळ्यांचा, दंतहीन हत्ती. २. (ल.) ठेंगू व ढेरपोट्या माणूस.
**मुकणे** सक्रि. गमावणे; न मिळणे; अंतरणे; हानी पावणे.[सं. मुंच्=सोडणे]
**मुक(का)द(द्द)म, मोकदम** पु. १. पुढारी; म्होरक्या; मजुरांवर देखरेख करणारा. २. गावपाटील; गावकऱ्यांचा मुख्य; वतनदार. ३. देशमुखांच्या खालच्या हुद्द्याचा गावकामगार. [अर. मुकद्दमा]
**मुकद्दम** पु. (निंदार्थी) मुका मनुष्य.
**मुकद्दमी** स्त्री. मुकादमाचे हक्क किंवा हुद्दा.
**मुकद्दर** वि. नियुक्त; नियोजित; कायम केलेले; नामजाद :'आबाजी कृष्ण या कामावर मुकद्दर असोन...'- ऐलेसं ५.१९७. [अर. मुकद्दर =ईश्वरनियोजित]
**मुकरणे** न. वाचाळता; बडबड : 'जाती प्राणें प्रमाणें करिति मुकरणें पै न देतील नाणें ।'- अकक २, सुदामचरित्र ७०.
**मुकरना** क्रि. माघार घेणे; शब्द फिरवणे, बदलणे. (झाडी)
**मुकरर, मुक्रर** वि. १. निश्चित; नेमलेला; ठरवलेला. २. नक्की; नियोजित.
क्रिवि. खात्रीने; निश्चयाने; पुनः पुन्हा. [अर. मुकर्रर]
**मुकलस्त** वि. मन मानेल इतका; मुबलक; वाटेल तितका. (व.)
**मुकलस्ती** स्त्री. १. मुबलकता. २. मोकळीक; स्वैर वर्तन. (व.)
**मुकशी** स्त्री.१.टोक; अखेरचा भाग.२.तीक्ष्ण अग्रभाग. (राजा.) [सं. मुख]
**मुकसणी** स्त्री. संपादणी. (गो.)
**मुकसी, मुकेस-सी** वि. सोनेरी बुट्ट्या किंवा ठिपके असलेले.
**मुकसुचे** अक्रि. लाच घेणे, खाणे. (गो.)
**मुक(कु)ळित** वि.१. स्पष्ट. २. संक्षिप्त. [सं. मुकलित]
**मुकळी** पु. सुळे नसणारा हत्ती. (तंजा.)
**मुकं(कुं)दणे** अक्रि. १. गुदमरणे. २. आंबणे. (ना.)
**मुका** पु. चुंबन.
**मुका** वि.१. बोलता येत नसलेला; न बोलणारा; वाचा नसलेला. २. रागाने किंवा हिरवटपणाने बोलत नाही असा; स्तब्ध. ३. शांत बसलेला. ४. तोंड नसलेले (गळू, फोड); डोळे किंवा तोंड नसलेला (नारू). ५. न वाजणारा; अगदी कोवळा; आत गर नसून पाणी भरलेला (नारळ). ६.चाड; न भिजले जाणारे; मोड न येणारे (कडधान्य). ७. न उमललेली, न फुललेली (कळी).८. आवाज न करता चालणारे (रहाटगाडगे, चरक, यंत्र इ.).९. जखम न होता लागलेला, न दिसणारा (मार). १०. गुप्त (द्वेष, दावा). [सं. मूक; क. मुत्तु] (वा.)० **मुलगा होणे**- प्रथम न्हाण येणे.
**मुका गोवर** ज्यात अंगावर पुटकुळ्या, पुरळ येत नाही असा गोवर.
**मुकाट-ट्या, मुकाट्याने-नी** क्रिवि. न बोलता; स्तब्धपणे; शांतपणे.
**मुकाब(बि)ला, मोकाबला** पु. १. पडताळा; मासला. २. तुलना; शर्यत.(क्रि. करणे.) ३. गाठ; लढाई; विरोध; झुंज; तोंड देणे. [अर.]
**मुका(क्का)म** पु.१. थोडा काळ राहण्याची, उतरण्याची, तळ देण्याची जागा; आश्रयस्थान; आसरा; विश्रांतिस्थान. २. राहणे; तळ देणे. ३. वास्तव्याचे ठिकाण; वस्ती; बिऱ्हाड; राहण्याचे गाव. ४. (ल.) विश्रांती; टप्पा; पायरी; मध्यंतरीचे थांबणे. [अर. मुकाम्]
**मुका(क्का)मात** स्त्री. वस्ती; राहणूक. [अर. मुकामत्]
**मुका मार-रा** १. वैरामुळे किंवा दुष्टपणाने जादूटोण्याच्या योगाने किंवा शापांनी केलेला गुप्त नाश, हानी. २.जखम, ओरखडा न होता, पुराव्याला काही खुणा इ. न ठेवता दिलेला, बसलेला मार.
**मुका मैंद-म्हसोबा, मुकी मण्यार** (निंदार्थी) हिरवट, तिरसट मनुष्य.
**मुकावणे** अक्रि. मुके होणे : 'सोहं तेंही अस्तवलें । तेथ सांघणेंचि मुकावलें'-ज्ञा १५.५०८.
**मुकासा, मुकासाई** पु. मोकासा. पहा : **मोकाशी**
**मुकी** स्त्री. १. देठ. २. एक खेळ. (झाडी)
**मुकी अर्जी** एखाद्याची नालस्ती करण्यासाठी बिनसहीचा किंवा खोट्या सहीचा केलेला अर्ज.
**मुकुट** पु. राजाचे किंवा देवाचे शिरोभूषण; किरीट; टोप; शिरताज. [सं.]
**मुकुटमणि-णी** पु. १. मुकुटातील रत्न. २. (ल.) नायक; पुढारी; नेता; अग्रगण्य; अग्रेसर; मुख्य माणूस.
**मुकुटाभरण** न. राज्याभिषेक.
**मुकुर** पु. आरसा; दर्पण. [सं.]
**मुकुल** पु. न. १. मोठा कळा; कळी (उमलणारी).२. कमळ. ३. घोड्याच्या कपाळावर जाईच्या कळीप्रमाणे असलेला भोवरा.- अश्वप १.८५. ४. दिव्याची ज्योत. [सं.]
**मुकुलदृष्टी** स्त्री. (नृत्य.) पापण्या स्फुरण पावण्यास लावणे. असा अभिनय झोप, स्वप्न व सुख दर्शविताना करतात.
**मुकुलित** वि. १. पूर्ण न उमललेले (फूल); अर्धवट मिटलेले (डोळे). २. (ल.) संक्षिप्त; थोडक्यात.
**मुकुळणे** १. अक्रि. बंद ठेवणे, करणे. २. आवरते घेणे :'परि तो रसातिशयो मुकुळी । मग ग्रंथार्थदीपु उजळी ।'- ज्ञा ५.१४२. [सं. मुकुलित]
**मुकुळमुद्रा** स्त्री. कळीत फूल सामावलेले असते त्याप्रमाणे साररूप; संक्षिप्त : 'तेंचि प्रमेय येकोळ ।... सांधिजतसे मुकुळ । मुद्रा आतां।'- ज्ञा १८.१२३२. [सं.मुकुल + मुद्रा]
**मुके भिजाणे** अव. भिजवलेले परंतु मोड न फुटलेले कडधान्य.
**मुकेस** पु. सोन्या-चांदीची बारीक तार; सोनेरी -रुपेरी वर्ख इ.चा चुरा.
**मुकेस-सी** वि. जरतारी; भर्जरी; सोनेरी बुट्ट्याचे : 'तिवट चुनडी सभेत

बतनाव तुरा मुकेसी.' – वाडसमा १.११९. [अर. मुकय्यस्]

**मुक्की** स्त्री. बुक्की; मुष्टियुद्ध. [सं. मुष्टि]

**मुक्त** स्त्री. १. मुक्ती; मोक्ष. २. मृत्यू. (क्रि. पावणे.): 'मुक्त पावले साहेबनाना कशा केल्या देवा तडातोडी ।' – ऐपो १३२.
वि. १.मोकळा; सुटलेला; सोडून दिलेला. २. परब्रह्मात मिळून गेलेला; मोक्षाप्रत गेलेला; प्रपंचादी बंधनापासून सुटलेला. ३. फेकलेले; सोडलेले (अन्न इ.). [सं.]

**मुक्त–क्ता** न. मोती. [सं. मुक्ता]

**मुक्तकैवल्य** न. ज्ञानाची ऐक्यस्थिती : 'किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्य सुदिक्सें ।'– ज्ञा १६.१३.

**मुक्तक्रिया** स्त्री. वेदाच्या आधाराशिवाय केलेली गोष्ट; धर्मबाह्य वर्तन; स्वैराचार.

**मुक्तछंद** पु. तालाखेरीज छंदाच्या इतर नियमांनी बद्ध नसलेला छंद.

**मुक्तदा** पु. पुढारी.

**मुक्तमुदी** स्त्री. १. सर्वत्र चालणारे नाणे. २. मोत्याची अंगठी; त्या अंगठीचा ठसा, शिक्का.

**मुक्तलग** पु. मोत्यांचा सर.
वि. मोती लावलेला; मोत्यांनी गुंफलेला.

**मु(म)क्तसर** पु. हक्कदार किंवा कामदार नव्हे अशा वतनदारांची पदवी.

**मुक्ता** वि. पुष्कळ.

**मुक्तागर्भ** पु. मोत्यातील मध्यवर्ती पदार्थ; ज्याच्या भोवती मौक्तिक रसाचे थर बसून मोती तयार होतो तो पदार्थ.

**मुक्ताजाल** न. १. मोत्यांची जाळी; डोक्यात घालण्याचा स्त्रियांचा एक दागिना; बिंदी. २. मोत्यांचा झुबका.

**मुक्ताफळ–ल** न. १. मोती. २. (ल.) मोत्यासारखे सुंदर अक्षर. ३. सीताफळ. ४. (ल.) मूर्खासारखे, हास्यास्पद भाषण.

**मुक्ताफळी** स्त्री. नाकातील मोत्याचा दागिना; नथ; मुगवट : 'नासिकीं मिरवे मुक्ताफळी ।' –कथा २.११.९५.

**मुक्ताभरण** न. एक विधी, संस्कार. पहा (प्र.) : **अमुक्ताभरण**

**मुक्ति–क्ती** स्त्री. १. मोक्ष; जीव आपल्या मूळच्या परमात्मस्वरूपास पावून त्या जिवाची जन्ममरणापासून सुटका होणे. सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता अशा चार मुक्ती होत. २. मोकळीक; स्वातंत्र्य; सुटवणूक; मोकळे सोडणे. ३. (ल.) मृत्यू : 'मुक्तीनें वोढिलें काळाचें घर ।'– ऐपो ३३१. [सं.]

**मुक्तिपद** न. मुक्तीचे स्थान; विदेही स्थिती.

**मुक्ती, मुक्तीकल** स्त्री. ज्यामध्ये रहाटाच्या खांबण्या उभ्या बसवतात असे विहिरीजवळचे दगड–प्रत्येकी. (बे.) [क.]

**मुक्करा** पु. ठरावीक रक्कम; सारा. [अर. मुकर्ररा]

**मुक्री** स्त्री.१. काजूच्या खेळातील एक विशिष्ट संज्ञा. मुक्रर, कायम केलेला नियम, अट. (गो.) २. नाकातील लहान बाळी. (झाडी)

**मुक्सी** पु. घोड्यांचा रंग; पांढऱ्यात काळे ठिपके असलेला रंग. अशा रंगाचा घोडा चांगला समजतात. – अश्वप १.३१.

**मुख** न. १. तोंड; ओठ, दातांची मुळे, दात, जीभ, टाळा, गाल व गळा या सात अंगांचा समुदाय. २. चेहरा; मुद्रा; तोंडवळा. ३. (ल.) द्वार; मार्ग; वाट; एखाद्या इमारतीचे दार. ४. एखाद्या कामाची सुरुवात. इतर लाक्षणिक अर्थांसाठी पहा : **तोंड**. ५. साधन; करण; उपाय; हत्यार : 'ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्मे अशेखें।'– ज्ञा ४.१०५. ६. (सामासिक शब्दात) अग्रभाग; मूळचा भाग; मूळ वस्तू; मुख्य मनुष्य; पुढारी; अग्रेसर. ७. नदी समुद्राला जिथे मिळते तो भाग, स्थल. ८.(कासार धंदा, सोनारधंदा) पोचे काढण्यासाठी लोखंडी पहारेचे टोक वळवून त्याच्या शेवटी केलेला मुखाकृती भाग.९. (गणित) श्रेणीतील पहिली संख्या. १०. चतुष्कोनाच्या पायाच्या विरुद्ध बाजू. [सं.] (वा.)० **सरणे**–शब्द अपुरे पडणे. **मुखी चोरपान्हा लावणे**– तोंडातून लाळ गळणे.

**मुखई** वि. १. मोखा बंदरातून आलेला (माल, वस्तू इ.). २. निस्तेज, दुधासारख्या पांढऱ्या रंगाचे, मोखा बंदरातून आलेले किंवा तेथे सापडलेले (मोती).

**मुखचालन** न. (गायन) रागोचित गमक व अलंकार यांचा यथोक्त प्रयोग करून गायन करणे.

**मुखछिद्र** न. ज्वालामुखीचे तोंड. हे कढईसारखे असते.

**मुखटा** कुलूप. (अहि.)

**मुखटी** स्त्री. मुख; तोंड : 'पहिली ब्रह्म्याची मुखटी ।' – कथा ७.११.५५.

**मुखटोप** पु. शिरस्त्राणाचा तोंडाकडील भाग.

**मुखडा** पु. चेहरा; तोंडवळा. (वा.)० **लावणे**– चेहऱ्याच्या साहाय्याने हावभाव करणे.

**मुखडा** पु. (संगीत) गीताच्या सुरुवातीच्या ओळी.

**मुखण–णी** स्त्री. १. सुंदर स्त्री. २. मुख्य राणी.

**मुखत्यार, मुखत्या(खता)र** पु. १. राजाच्या हाताखालील अधिकाऱ्यांवरील अंमलदार; सर्वाधिकारी. २. वंशपरंपरेने चालत आलेला अधिकारी; नियोजित मुनीम; वतनदारांनी वतनदारीची कामे चालवण्याकरिता नेमलेला मनुष्य.
वि. संपूर्ण अधिकार दिलेला; नियोजित; अधिकृत (प्रतिनिधी); स्वतंत्रपणे वागण्यास मोकळीक असलेला. [अर. मुख्तार]

**मुखतारनामा, मुखत्यारपत्र** पु.न. अधिकारपत्र; एखादा मनुष्य ज्या लेखाने स्वतःऐवजी, स्वतःतर्फे काम करण्याचा अधिकार दुसऱ्याला देतो तो अधिकारलेख; वकीलपत्र. [फा. मुखत्यार+सं. पत्र]

**मुखत्यारी, मुख्तारी** स्त्री. अखत्यार; अधिकार; स्वतंत्रता; दुसऱ्याने दिलेला अधिकार; वकिलीचा अधिकार.

**मुखदाक्षिण्य** न. १. भाषणशैली; वक्तृत्व; वाक्पाटव; शब्दचातुर्य. २. एखाद्याच्या आदरार्थ किंवा भावनाविष्काराकरिता बोलण्यास घातलेला आळा.

**मुखदुर्बल–ळ** वि. ज्याला वेळेवर विशेष बोलता येत नाही असा; बोलण्याचा कंटाळा असलेला; मितभाषी; बोलण्यास भित्रा.

**मुखदूषिका** स्त्री. अव. मुरूम; तारुण्यामुळे तोंडावर उठणाऱ्या पुटकळ्या.

**मुखपट्टा** पु. १. घोड्याच्या तोंडावरील पांढरा पट्टा. २. घोडा जिन घालून बसण्याकरिता सज्ज केला असता त्याच्या तोंडावर येणारा चामड्याचा

पट्टा; म्होरकीचा भाग.

**मुखपरीक्षा** स्त्री. (वैद्यक.) तोंडात उत्पन्न होणाऱ्या चवीवरून करावयाची त्रिदोष परीक्षा. वातदोषाने तोंड गुळमट होते, पित्ताने तिखट किंवा कडू होते तर कफ दोषाने आंबट, मधुर असे होते.

**मुखपाक** पु. तोंड उतणे. या रोगात तोंडात, गालफडात, जिभेवर लहान लहान फोड येऊन, ते फुटल्याने त्याचे पिवळे-पांढरे चट्टे पडतात.

**मुखपृष्ठ** न. ग्रंथाचे नाव व पुष्कळदा लेखकाचे व प्रकाशकाचे नाव असा मजकूर असलेले, पुस्तकाच्या प्रारंभी छापलेले, सचित्र वा सुशोभित पान; संज्ञापन.

**मुखप्रिय** वि.१. शरीरपोषक नसताना फक्त जिभेला गोड लागणारा (पदार्थ). २. साधे व पोषक असे तोंडास वीट न आणणारे, चवदार (अन्न).

**मुखबीर** पु. हेर; गुप्तपणे बातमी काढणारा, पुरवणारा मनुष्य.

**मुखभंजन** न. एखाद्याचा नक्षा उतरणे, उतरवणे; लाजवणे; रग जिरवणे; खोड मोडणे; घाबरवणे. [सं.भञ्ज् = मोडणे]

**मुखमाधुर्य** न. ज्यामध्ये फार बडबडण्याची व पुष्कळ खाण्याची इच्छा उत्पन्न होते असा एक वातविकार.

**मुखमार्जन** न. १. तोंड धुणे. २. (ल.) रागावलेल्या माणसाची गोड व प्रेमाच्या शब्दांनी केलेली मनधरणी. ३. एखाद्याची त्याच्या तोंडावर खरडपट्टी काढणे;शिवीगाळ. ४. मुखमाधुर्य.

**मुखर** वि. १. बोलका; बडबड्या; तोंडाळ; फटकळ. २. आवाज काढणारा; सनाद; वाजणारा. ३. पुढारी; म्होरक्या.

**मुखरण, मुखरीण-रणी** वि. मुख्य; प्रमुख; पुढारी :'हरें तोषें केले मुखरण तुला की रणतरी ।' - वामन, विराट ७.१६१.

**मुखरत्व** न. बडबड; वाचाळता.

**मुखरस** पु.१. लाळ; थुंकी. २. (ल.) अनिष्ट भाषण; दुर्भाषण. (क्रि. पाघळणे, गळणे.)

**मुखरा** पु. मोत्यांचा घेरा असलेली, सरजा असलेली नथ.(ना.)

**मुखराग** पु. १. तोंडावरील तेज; तजेला; कांती. २. (नृत्य.) निरनिराळ्या भावांच्या वेळी दाखवले जाणारे तोंडावरील तेज. याचे स्वाभाविक, प्रसभ, रक्त व श्याम असे चार प्रकार आहेत.

**मुखरी, मुखी** स्त्री. मडके, कापड इ.ला पडलेले बारीक भोक, छिद्र.

**मुखरोग** वि. १. मुखरोगाने पछाडलेला. २. (ल.) दुर्मुखलेला; खिन्नवदन; खाणे-पिणे व चारचौघांत बसणे याची आवड नसलेला.

**मुखलासी** स्त्री. मखलाशी; खुबी; हातचलाखी; युक्ती. (को.)

**मुखलेप** पु. (ल.) वाच्यता न करण्यासाठी दिलेला पैसा.

**मुखवट-टा-टी, मुखोटा** पु. १. तोंडवळा; चेहरा; तोंड. २. चांदी, सोने इ.ची देवाच्या मूर्तीवर लावण्यासाठी केलेली फक्त तोंडाचीच प्रतिमा. ३. पौराणिक नाटकातील गणपती, रावण, नरसिंह इ.ची सोंगे बनविण्याकरिता त्यांच्या चेहऱ्याच्या कागदाचा लगदा वगैरेच्या केल्या जाणाऱ्या आकृती. (व.)४. बुरखा; सोंग. ५. शरीराचा छातीपासून वरील भाग. ६. कागदावर काढलेले तोंडाचे चित्र. ७. तोंडाची ढब, चेहरेपट्टी.

**मुखवटी** स्त्री. तोंडात मावेल एवढे प्रमाण.

**मुखवस्त्र** न. १. देवाची पूजा, नैवेद्य वगैरे झाल्यावर देव वामकुक्षी करतात तेव्हा त्यांच्या (मूर्तीच्या) तोंडावर घातले जाणारे वस्त्र. २. तोंड पुसण्याचे वस्त्र. ३. ग्रंथ किंवा पोथी बांधून ठेवण्याचे वस्त्र. ४. मलपृष्ठ; ग्रंथाच्या बाहेरील अखेरचे पान; (इं.)कव्हर. ५. कागदाच्या पुडक्यातील अगदी वरचे पान.

**मुखवाद्य** न. १. तोंडाने वाजविण्याचे वाद्य. २. (ल.) बोंब.

**मुखवास-वासन** पु. १. तोंडाला सुवास देणारा पदार्थ (पानसुपारी इ.). २. चुकीने मुखवस्त्राबद्दल उपयोग करतात.

**मुखशाळा** स्त्री. १. स्वयंपाकघर. २. देवळात स्त्रियांना बसण्यासाठी केलेली विशिष्ट जागा. (कु.)

**मुखशुद्धी** स्त्री. जेवणानंतर तोंड स्वच्छ करण्यासाठी खाण्याचे सुपारी, लवंग इ. पदार्थ; भोजनोत्तर सुपारी इ.खाणे.

**मुखसेक** पु. चूळ भरून टाकलेले पाणी; गुळणा.

**मुखस्तंभ** पु. १. न बोलता स्तब्ध बसणे. २. ज्यामध्ये वाचा बंद होते असा एक रोग.
वि. घुम्या; न बोलणारा.

**मुखंड** पु. मुख्य; प्रमुख.
वि. वरचढ. (तंजा.)

**मुखा** पु. हातोड्याचे पसरट तोंड.

**मुखाची खरवाई** चांदीची भांडी घडवताना उपयोगात आणण्याची, टोकास गोल असलेली खरवई. पहा : **मुख** ८

**मुखान** न. विरजणाचे दही.

**मुखी** पहा : **नखी** (ना.)

**मुख्य** वि. प्रमुख; श्रेष्ठ; प्रधान; अग्रेसर. [सं.]

**मुख्लीस** वि. प्रामाणिक. [फा.]

**मुगट** वि. पेवात पुष्कळ दिवस राहिल्यामुळे मुगासारखा उग्र वास येणारे. (धान्य); भिजून कुजलेले.

**मुगडा** वि.केसांचा झुबका, झुंबडा; केरसुणीचा बुडखा.(राजा.)

**मुगडी** स्त्री. बुगडी; कानात घालण्याचा स्त्रियांचा दागिना. [क. बुगडी; त. बोगडि]

**मुगद(दु)मी साखर** हलक्या प्रकारची पिठी साखर.

**मुगदळ** स्त्री. मूग पेरण्यास योग्य असलेली जमीन.
न. १. मूग भाजून त्याचे केलेले पीठ. २. या पिठाचे केलेले लाडू.

**मुगदाण** न. वेसण; बैल, रेडा इ. पशूंच्या नाकात घातलेली दोरी. (बे.) [क. मूग = नाक+दावणी = दावे; सं. मुख+दामन्]

**मुगदुरी** स्त्री. पोह्याच्या कण्या (समुच्चयाने). (बे.)

**मुगली** स्त्री. परटाची लाकडी घासण.

**मुगवण-न** न. मुगाचे भूस; मुगाचा कोंडा; मुगाचे गुळी.

**मुगवणी** न. मुगाचे पाणी.

**मुगव(वि)णे** सक्रि. मारणे : 'हाथी हाथीचि वेन्ही मुगवित'- गरा ४६.

**मुगवत** न. १. कौलारू छपराची, खपरेलाची पानपट्टी. २. चौथऱ्याचा पाटथरा.

**मुगवा** पु.१. बायकांचे एक प्रकारचे, मुगाएवढ्या चौकटी असलेले वस्त्र;

लुगड्याचा एक वाण, प्रकार. २. दुध्या भोपळा.
वि. मुगाएवढ्या चौकटी असलेले (लुगडे).

**मुगळ** पु. शाकारलेल्या छपराचे आढे.

**मुगाची मोगरा** मुगाची एकदली डाळ. (इंदूर)

**मुगाण** न. जोंधळा किंवा बाजरी यामध्ये पेरलेले मूग किंवा अशा तऱ्हेचे दुसरे धान्यय मोघड-ण.

**मुगा(का)णा** पु. १. चाड; मोड न आलेला दाणा; न भिजलेला किंवा न शिजलेला दाणा; चुकार. २. अर्धवट कोंब आलेले भात. (गो.)

**मुगा(ग)णा** मोत्याचे दागिने.

**मुगारा** पु. नुकता फुटलेला कोंब. (क्रि. येणे, निघणे, फुटणे इ.).

**मु(मुं)गारी** स्त्री. खरिपाचे पीक; पावसाळी पीक. (सोलापुरी) [क.]

**मुगाळ** स्त्री. १. गवताचा किंवा झाडाचा कोवळा अंकुर; फूट. (क्रि. येणे, फुटणे, निघणे, होणे.) २. मुलांच्या अंगावरील लव.

**मुगीमुग** स्त्री. स्तब्धता.

**मुगुटी काच** ही गारेच्या काचेपेक्षा कठीण असून फुंकून तयार करताना महाळुंगाच्या किंवा मुगुटाच्या आकाराची बनते.

**मुगुते** न. मुक्ती.

**मुग्ध** वि. १. मूर्ख; मूढ; मतिमंद; भोळा; अज्ञानी. २. अस्पष्ट; संदिग्ध; घोटाळ्याचे; अनिश्चित (भाषण, काम, उद्योग). ३. सुंदर; गोजिरवाणे (मूल). ४. लहान (मूल): 'ताताला जेविं बोल मुग्धाचा।'ह्व मोअनु ४.५७. [सं.]

**मुग्धा** स्त्री. १. सोळा वर्षांच्या आतील वयाची मुलगी; तारुण्यावस्था प्राप्त न झालेली मुलगी. २. तरुण व सुंदर स्त्री. ३. नायिकेच्या अवस्थेचा एक भेद. ४. दुग्धा किंवा संशय.

**मुग्याण** न. १. मळणी करण्यासाठी काढलेले मुगाचे वेल. २. मुगाचे गुळी; भूस.

**मुघोसी** स्त्री. एक प्रकारचे लढाऊ तारू. [तु.]

**मुच(चु)कुंद** पु.१. एक सूर्यवंशी राजा.(याला देवांनी त्याने केलेल्या साहाय्याच्या बदल्यात पुष्कळ झोप येण्याचा व ती मोडणाऱ्याचे जागीच भस्म होण्याचा वर दिला होता.) २. (यावरून ल.) नेहमी झोपून राहणारा; झोपाळू मनुष्य. ३. पळसासारखी पाने असणारा एक वृक्ष. याचे फूल पिवळ्या रंगाचे, सुवासिक, वीतभर लांबीचे असून फळाचा उपयोग गुरांना होणाऱ्या 'कुंद' नावाच्या रोगावर उपचार म्हणून करतात.

**मुचलका, मुचल्का, मुच्लका** पु. १. गुन्हेगार वगैरेंकडून सरकारने 'मी अशा तऱ्हेने वागेन' अशा कराराचे लिहून घेतलेले वचनपत्र; हमीपत्र; जामीनपत्र; कबूलपत्र. २.करारनामा; कतबा; वचनपत्र. ३. पंचायतीच्या पुढे लिहून दिलेले करारपत्र; वादी-प्रतिवादींची जबानी. [तुर्की मुचल्का]

**मुच्छी** स्त्री. मिशी. (व.) [हिं. मूंछ; सं. श्मश्रु]

**मुजत** स्त्री. १. वायदा. २. कारकीर्द. ३. मुदत; मुदतीचा ताप; विषमज्वर. (गो.) [सं. मुदत; अर्. मुद्दत]

**मुजफ्फर** वि. विजयी.

**मुजम, मुजमूदार, मुजमूदारी** पहा : **मुजुमदार**

**मुजरा, मुज्रा** पु.१. वंदन; नमस्कार; राम राम; सलाम. २. धन्याची भेट झाल्याबरोबर किंवा त्याची रजा घेताना नोकरांनी म्हणण्याचे गीत. ३. तमाशातील समाप्तीचे गाणे; लावणी. ४. नेम; नेम धरणे. (राजा.) ५. मोबदला; भत्ता. ६. वजा, कमी केलेली, काढून टाकलेली रक्कम. [अर. मुज्रा = रूढ]

**मुजाई(ही)क-म** न.पु. अडथळा; आडकाठी; अटकाव : 'तरी मार्गी मुजाईम न होतां सुखरूप जाऊं देणें.'- वाडबाबा २.१४५.
वि. प्रतिबंध करणारा; हरकत करणारा; अडथळा आणणारा; थांबविणारा. [अर. मुझइक्-म]

**मुजाफत** वि.१. दुसऱ्या ठिकाणचा; परस्थ. २. अधिक. ३. देणगी, बक्षिसे इ.साठीचा (खर्च). [फा.]

**मुजामा** पु. घोड्याच्या पायाचा चर्मबंद. यास पायबंद अडकवतात. [फा. मुईजामा]

**मुजावर** पु. मशिदीतील झाडलोट करणारा; सेवेकरी; मुसलमान पुजारी. [अर्. मुजाविर्]

**मुजाहिद** पु. लढवय्या.

**मुजाहिरा** पु. प्रकटन.

**मुजुमदार** पु. १. वसुली अधिकारी. २. मुख्य हिशेबतपासनीस. सर्व महत्त्वाच्या कागदपत्रांवर मंजूर म्हणून शिक्कामोर्तब करणारा अधिकारी.

**मुजोर** वि. हेकेखोर; भांडखोर; वाचाळ. [फा.]

**मुजोरी** स्त्री. बडबड; उद्धटपणाची उत्तरे.

**मुटकण-कर** क्रिवि. १. पटकन; झटकन; चुटकीसरशी. २. अवयव आखडून; मुरगुशी मारून. (क्रि. निजणे, पडणे.) [ध्व.]

**मुटकणे** सक्रि. १. बुक्क्या मारणे; अंग दुखत असल्यास हळूहळू मुठीने मारणे. २. तिंबणे, मळणे, मऊ करणे (कणीक). ३. मऊ भात किंवा भिजवलेले पीठ मुठीत दाबून मुटकुळी करणे.४. कापड मोजताना प्रत्येक हातागणीक मुठीच्या आकाराइतकी जागा (कापड) अधिक व्यापून कापड अधिक देणे.

**मुटक(कु)ळा-ळे, मुटका** पु.न. मुठीत दाबून केलेला कणीक इ.चा लांबट गोळा. मुठीत मावणारा पिठाचा गोळा.

**मुटका-के** पु. १. बुक्की; चंपी करताना, अंग रगडताना हळूहळू मुठीने मारणे. २. ठोसा; गुद्दा; तडाखा; घाव; प्रहार; हबका. (क्रि. मारणे, देणे.) ३. मारण्यासाठी हात वळून उगारलेली मूठ. ४. पेटका; वातविकाराने अवयव आखडणे. ५. नांगर इ. धरण्याची मूठ. ६. हातपाय पोटाशी धरून पाणी उंच उडेल अशी पाण्यात मारलेली उडी. [सं. मुष्टि; क. मुटगी]

**मुटमर्द** वि. भयंकर; बलिष्ठ.

**मुटमुट-टू** क्रिवि. १. घाईघाईने पदार्थ खाताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज करून; मटामटा; मचमचा. (क्रि. खाणे, जेवणे.) २. माटमुट; टकमका; न बोलता; स्तब्धपणे; गुपचूप; निमूटपणे (क्रि. पाहणे.). ३. केविलवाण्या दृष्टीने; आशाळभूत नजरेने. (ना.) [ध्व.]

**मुटला** पु. साधारणपणे सहा शेराची गुळाची ढेप. (बे.)

**मुटा** पु. इस्लाम कायद्यातील सुनी पंथाच्या कायद्याप्रमाणे तात्पुरता लग्नसंबंध; मुदतीचे लग्न. याची मुदत एक दिवस, एक महिना, एक वर्ष

किंवा अनेक वर्षेही असू शकते.

**मुटा** पु. पिठात मोहाची फुले मिसळून उकडलेला गोळा. [सं. मुष्टि]

**मुट्ट** क्रिवि. मुकाट्याने; स्तब्धपणे. (क्रि. बसणे, राहणे.)

**मुट्टा** पु. (भरतकाम)दहा वळ्या किंवा रहाटाचे ५२५० फेरे होतील इतका दोरा; पाच चिवट्यांची एक गुंडी.(कर.)

**मुट्टा** पु. काजू. (गो.)

**मुट्या–ठ्या** पु.१. एक बाजू वजनदार असलेला लोहाराचा घण. २. कातडे बडवण्याचे वा त्यावर खिळे मारण्याचे लोखंडी हत्यार; हस्ती.

**मु(मू)ठ, मुठवळी, मुठी, मुट्ट** स्त्री. बैलाचे खोगीर.

**मुठला–ले** न. १. कोकंबतेल; रातांबतेल; या तेलाचे थिजल्यावर बांधलेले गोळे. २. लहान लाडू.

**मुठवा** पु. (नाविक) मुरड्याच्या थोडे मागे दोन बोडतास ठोकलेले दोन लाकडी जाड खुंट. पागर बांधणीसाठी त्यांचा उपयोग केला जातो.

**मुठळी** स्त्री. १. मूठ. २. मुठीत धरून हलवणे.

**मुठा** पु. १. पाणी भरण्याचे पखालीचे तोंड. २. चुलीतील विस्तव विझू नये म्हणून तीत पुरून ठेवलेला शेणाचा गोळा. ३. वातविकाराने किंवा भयाने पोटात उठणारा गोळा. ४. रेशीम, सूत इ.चा गुंडा; लड.

**मुठाण** न. १. एकजूट; संघ; टोळी. २. चांडाळचौकडी.

**मुठाळणे** सक्रि. हाती धरणे; मुठीत धरणे.

**मुठा(ठे)ळे** न. गोल असून कडा किंवा कोरा नसलेले केळे; मुठेळ जातीच्या केळीचे केळे.

**मुठियो** पु. १. तांदळाच्या पिठाचे गूळमिश्रित पिंडाकृती पक्वान्न. २. सोनाराचे एक हत्यार.

**मुठी** स्त्री. खोबऱ्याची गोणी; खोबरे भरलेले पोते. (राजा.)

**मुठीचा खेळ** मंत्राने भारलेले धान्य मुठीत घेऊन ते एखाद्या पदार्थावर टाकून केलेला जादूचा खेळ. पहा : **मांगगारुड**

**मुठेल** न. खोबऱ्याचा कीस उन्हात वाळवून किंवा विस्तवावर परतून तो मुठीने दाबून पिळून काढलेले तेल.

**मुठ्ठा** वि. रेशीम; कलाबतू इ. पुष्कळ प्रकारचे धागे एकत्र बांधून केलेला बिंडा.

**मुठ्या** पु. १. नांगराचे रुमणे. २. नांगराच्या रुमण्यात बसवलेली, हातात धरण्याची मूठ, खुंटी. [सं.मुष्टि]

**मुठ्या** पु. समुद्राकाठच्या खडकातील काळसर तांबडा खेकडा.

**मुठ्याल** न. (हेट.) पहा : **मुठेल**

**मुठ्यो** पु. १. काथ्या ठोकण्याचे लाकूड. २. लाह्या करण्यासाठी भिजवलेले भात, जोंधळे इ. भाजताना ते ढवळण्यासाठी काठीच्या टोकाला फडकी गुंडाळून केलेले चेंडूच्या आकाराचे साधन; घाटणा.

**मुडकर** न. लिफाफा; पत्र बंद करण्याचे लांबट पाकीट. (व.)

**मुडकी** स्त्री. कानातील चाप्यामध्ये घालण्याचा सोन्याचा दागिना.

**मु(मुं)डकी** स्त्री. काळे अळू किंवा राजाळू याचा कांदा, गड्डा.

**मुडगा** पु. १. धान्याची मूठ. २. खराटा, झाडणी, केरसुणी यांची मूठ. ३. चोळण्याचा पुढील भाग.

**मुडगुशी** स्त्री. १. हातपाय, डोके इ. सर्व अवयव आखडून घेऊन डोक्यावरून पांघरूण घेऊन निजणे किंवा कोठे अडचणीत, कोपऱ्यात पडून राहणे. २. मुडदूस. (कु.)

**मुडत** न. (नाविक) पाण्याची खोली मोजण्याचा किंवा पाण्याच्या तळाशी गाळ, रेती अथवा खडक यांपैकी काय आहे हे पाहण्याचा शिशाचा किंवा लोखंडी लांबट गोळा; बुडीत.

**मुडतर** न. दैन्य; दुःख : 'फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ।'– तुगा ६१२.

**मुडताळणे** अक्रि. मुरडणे; मागे वळणे; वाकणे; लवणे :'परपीडे ज्याची जिव्हा मुडताळे । '– तुगा ३६१८.

**मुडदा, मुड्दा, मुर्दा** पु. प्रेत. [फा. मुर्दा = मृत; सं. मृत]

**मुडदार** वि.१. मरून कुजत पडलेले; शिळे (मांस, प्रेत). २. (ल.) घाणेरडे; ओंगळ; खराब; तिटकारा आणणारे; अपवित्र; हलके. (मुसलमानी धर्मशास्त्रात या शब्दाचा अर्थ आपोआप मेलेल्या किंवा यथाशास्त्र न कापलेल्या जनावराचे अतएव अपवित्र व खाण्यास अयोग्य–असा आहे.). ३. (ल.) गैरवाजवी वागणारा; हट्टी; मूढ. [फा. मुर्दार्]

**मुडदार तेल–तूप** बरेचसे खपल्यानंतर किंवा दिव्यात जळल्यानंतर शिल्लक राहिलेले तेल, तूप.

**मुडदार शिंग–सिंग–सेंग** एक औषध; शिशाचे प्राणिद. [फा.]

**मुडदूस** पु. डी जीवनसत्त्वाच्या कमतरतेमुळे लहान मुलांना होणारा एक रोग.

**मुडदेफरास** पु. १. प्रेतवाहकांची एक जात. २. अंत्यविधीला लागणारे लाकूड, गोवऱ्या इ. सामान विकणारा. [फा. मुर्दाफरोश]

**मुडदेफरासी–शी** स्त्री. मुडदेफरासाचे काम.

**मु(मुं)डप** पु.न. १. मुकुट; शिरताज; पागोटे; डोक्याचे रक्षण करणारी कोणतीही वस्तू : 'मुडपें जैसीं कुंभस्थळें । दिग्गजांची ।'– ज्ञाप्र ४६०. २. गजरा; पुष्पमाला. [सं. मुंड + प]

**मुडपघसणी** स्त्री. प्रचंड, चेंगरण्याएवढी गर्दी :'कृष्ण पहावया नरनारी। मुडपघसणी होतसे भारी।'– एरुस्व ६.१७. [सं. मुंड + घर्षण]

**मुडपणे** अक्रि. १. मुरडणे; पाय वाकडा पडल्याने दुखणे. २. दुमडणे; घडी घालणे. [क. मडपु]

**मुडपा** पु. तेंदुपानाची पेंडी. (झाडी)

**मुडपा–पी** पु.स्त्री. घडी; दुमड.

**मुडा** पु.१. भात किंवा इतर धान्य आत घालून बाहेरून पेंढा अगर गवत यांचे आवरण घालून सुंभाने अगर दोरीने बांधून केलेले गोलाकार किंवा अंडाकृती गाठोडे, कणगा; बीजाचे साठवण; साठा :'तुका म्हणे बीज मुडा। जैशा चाडा पिकाच्या।' – तुगा २७४४.२. वरील गठ्ठ्याइतक्या प्रमाणाचे धान्य. पंचवीस मण हे एका मुड्याचे परिमाण मानतात. ३. गुळाच्या ढेपीचा निघालेला तुकडा. ४. ठरावीक वजनाइतके खोबरे. [क. मुडि]

**मुडा** वि.१. तोंड किंवा गळा फुटलेले (मडके). २. चोंबडा (मनुष्य).

**मुडा–डे** न. आखूड बाह्याचे आंगडे; आखूड हाताचे खमीस. (कु.)

**मुडापा** पु. (कृषि.) कणसे काढण्याचे काम. (कर.)

**मुडापाक** न. फडशा; समूळ नाश.

**मु(मुं)डा हौद** खुला हौद.

**मुडी** स्त्री. १. लहान मुडा; भात किंवा इतर धान्ये पेंढ्यात वेष्टून बांधलेली, कळीदार, वाटोळी मोटळी. २. पुंजी; भांडवल.(वा.)० **मारून बसणे**- भयाने दबकून, हातपाय आखडून बसणे; उकिडवे बसणे.

**मुडुप** न. खांद्याखाली असलेली गोटी; स्कंध : 'मनीगट : कोपर : मुडुपें : तीथडें तीन' - विद ८. [क. मुडु]

**मुडूप** न.१. देवास अर्पण केलेली, करण्याची वस्तू (मुकुट, दागिना, रक्कम इ.); नवसाकरिता देवाला देतात तो अंगावरील किंवा इतर कोणताही दागिना. २. दक्षिणा. ३. दंड. (तंजा.)

**मुडे** पु. डोक्यात घालण्याचा मोत्याचा एक अलंकार :'माणीकीं खचित मुडे-मफौरे ।'- धवळे ३.४२. [क. मुडि]

**मुडो** पु. जांगीच्या मागच्या बाजूस वजनदार दगड स्थिर राहण्याकरता भोवताली खुंटे उभे करून, ते बाहेर सरकू-कलू नयेत म्हणून भोवताली दोरीचे वेढे दिलेला सर्व भाग. (याच्या पोकळीत पाच मणांचे वजन ठेवतात.) (राजा.)

**मुड्डन** (व.) पहा : **मुरडण**

**मुड्डो** पु. रानटी लोकांचे एक पक्वान्न. (गो.)

**मुढा** पु. दुमडलेला व विकृत झालेला (कान इ.). (व.)

**मुढामाकोजी** वि. पोकळ अभिमानी; बढाईखोर; ठक.

**मुढी** स्त्री. मूर्ख स्त्री. (व.)

**मुढोजी मुका** चढेल; मिजासखोर.

**मुण, मुंड** पु. झाडाचा बुंधा. (गो.)

**मुतपाक, मुत्पाक, मुतबक-ख, मुतबखखाना** पहा : **मुदपाकखाना**

**मुतलक** स्त्री. खाऱ्या जमिनीचा एक प्रकार. (को.)

**मुतवली** पु. १. मशिदीची देखरेख करणारा. २. खजिनदार.

**मुताबि(बी)क** वि. प्रमाणे; सारखा; जुळता; जुळणारा; अनुसरून असलेला. [अर.]

**मुतालका-की, मुतलकी** पु.स्त्री. मुतालिकाचे काम, अधिकार; नायबत.

**मुतालीक** पु. उपमंत्री; आठ दरकदारांपैकी एक; नायब; कारभारी. [अर्. मुतअल्लिक]

**मुती** स्त्री. रूढी; चाल.

**मुत्स(त्सु)दी-द्दी** पु. १. कारभारी; राजकारणी; राजकार्यधुरंधर. २.(ल.) धोरणी; धूर्त; कारस्थानी. [अर. मुतसद्दी= कार्यकारी]

**मुत्सद्दी(द्दे)गिरी** स्त्री. १. राजकारणपटुता; राजकारणचातुर्य; मुत्सद्दीपणा. २. धूर्तता; चातुर्य.

**मुद(द्द)ई** वि. १. फिर्यादी; दावेदार; हक्क सांगणारा; वादी; विरोधक. २. बंडखोर. ३. आरोप करणारा. [अर. मुद्दई]

**मुदक** पु. आच्छादन.

**मुदगल** पु. व्यायामासाठी फिरवण्यास घेतली जाणारी लाकडी जोडी; करेला. [सं. मुद्गल]

**मुदडणे** उक्रि. दुमडणे; घडी घालणे; मुडपणे. (तंजा.)

**मुद(द्द)त** स्त्री. वेळ; अवधी; कालमर्यादा; कालखंड; ठरलेला अवधी. [अर. मुद्दत]

**मुदतठेव** स्त्री. ठरावीक मुदतीसाठी ठेवलेली रक्कम.

**मुदतवटाव** पु. भागभांडवलाच्या व्यवहारात शेअर विकत घेणाऱ्याला शेअर्स मिळण्यासाठी विलंब होणार असेल तर तोपर्यंत थांबण्यासाठी देण्याचा पैसा.

**मुदतवाढ** स्त्री. ठरलेल्या मुदतीत व्यवहार पुरा न झाल्यास तो पुरा करण्यासाठी वाढवून देण्याचा कालावधी.

**मुदतीची हुंडी** १. जिची रक्कम काही काळाने मिळायची आहे अशी हुंडी. २. जमाखर्चाचा मेळ बसवण्यासाठी सरकारने काढलेले तात्पुरते कर्ज.

**मुदन-नी** स्त्री. १.बिरडे; गुंडी लावण्यासाठी किंवा अडकवण्यासाठी केलेले भोक; काजे. २. सलिता किंवा गोणी यांच्या कडेला असलेली भोकांची किंवा बिरड्यांची रांग, मालिका; गुळरव्यांची ओळ. ३.फासा; अडकविण्याचे साधन; पेटी, डबी इ. बंद करण्याचा खटका. ४.घोड्याच्या पायबंदाची चामड्याची गुळखी. ५. खिरीसाठी तयार केलेली कणीक; गव्हले तयार करण्यासाठी केलेली भिजवलेल्या सपीटाची वळवटी. ६. असुडाच्या टोकाला असलेला फासा; बटव्याची गुळखी किंवा फासा. ७. आखाचे किंवा चाकाच्या कण्याचे टोक (ज्यात कुणी बसविली जाते.). [सं. मुद्रा]

**मुदनवळणे** कोमेजणे. (व.)

**मुदनाग** पु. केसातील एक अलंकार.

**मुदपाकखाना** पु. स्वयंपाकघर. [अर. मुदबख]

**मुदफाळ** स्त्री. भाताची मूद. (गो.)

**मुदबखा-खी, मुद्बख्या** पु. आचारी.

**मुदबख्या** वि.१.मुखदुर्बळ; कमी बोलणारा.२.योग्य प्रसंगी बोलणारा.(व.)

**मुदराखडी** स्त्री. वेणीत घालण्याचा एक दागिना.

**मुदली** क्रिवि. मुळीच; मुळातच; किंचितही : 'मोक्षप्राप्तीच्या मार्गाचे भगवत्गीतेत मुदलीच विवेचन नाही.'- गीर ७. [मुदल द्वि.]

**मुदव** पु. अंड्यातील पिवळा बलक. (गो.)

**मुदा(द)ई, मुद्दईदार** वि.१.पहा: **मुद(द्द)ई** १.२. साक्षीदार.[अर. मुद्दई]

**मुदाईगिरी** स्त्री. हक्कसांगणी; दावेदारी.

**मुदाईम** पु. खटला, वाद इ.मध्ये मुद्दे किंवा पुरावे गोळा करणारा. [अर. मुद्दई]

**मुदाईम** वि. १.कायमचा; टिकाऊ; सतत चालणारा.२. पुरातन; प्राचीन; फार दिवसांपूर्वीच प्रस्थापित झालेला. [अर.]

**मुदाम** क्रिवि. सतत; एकसारखे :'मुदाम चौदा रोज शहरामध्ये सोदासोदी केले.'- इमं. [अर. मुदाम]

**मुदामी** वि. नेहमीचा; जुना.

**मुदार(रा)त, मुजारत** स्त्री. संभावना; आदरसत्कार; बर्दास्त : 'केवळ सांगण्यावरूनच मुदारत फलाण्याचा नातु म्हणोन करावयाची नाहीं.'- ऐलेसं ९.४७६६. [अर. मुदारत्]

**मुदाळे** न. मूद पाडण्याचे साधन; ओगराळे.

**मुदित** वि. हर्षभरित; आनंदित; उल्हासित; सुखी; प्रसन्न. [सं. मुद् = हर्ष होणे]

**मुदी** स्त्री. १.अंगठी; मुद्रिका. २. कानातील किंवा नाकातील सुंकले; वळे. ३. मुद्रा; शिक्का :'जे विश्वप्रामाण्याची मुदी । आजि तुझ्या हातीं असे सुबुद्धि ।'- ज्ञा १६.४६८. [सं. मुद्रा, मुद्रिका]

**मुदीपुनव** स्त्री. पौषी पौर्णिमा. या दिवशी घरोघर भाताच्या मुदी करून पाच प्रती गावी वाटण्याची प्रथा आहे.

**मुद्ग** पु. मूग धान्य.

**मुद्ग** पु. आच्छादन. [सं.]

**मुद्दई** पहा : **मुद्देदार**

**मुद्द(द)ल** न. १. भांडवल; कर्जाऊ दिलेली रक्कम; मूळ रक्कम; आरंभीचा साठा. २. मूळचे पुण्य.
वि. मूळचा; मुख्य; सुरवातीचा; मुळातील.
क्रिवि. १. मुख्यत्वेकरून; मुख्यतः. २. मुळीच; किमपीही. [सं. मूलद] (वा.) **मुदलात मुरकुंडी**–भांडवलात तूट येणे; नफा न होता भांडवलच खर्ची पडणे. **मुदलावर येणे** – मूळ स्वभावावर येणे; एखाद्याने पुन्हा आपले दुर्गुण दाखवणे.

**मुद्दा** पु. मऊ; गिच्च भात; खिमट. (तंजा.)

**मुद्दा–दा** पु. १. काही विधान, गोष्ट इ. स्थापित करण्यास आधारभूत असलेले प्रमाण; पुरावा. २. बाब; बाबत. ३. मतलब; तात्पर्य; हेतू; मुख्य गोष्ट. ४. ज्यावर भाषण करायचे किंवा लिहायचे तो विषयविभाग. ५. बोलण्याचा किंवा लिहिण्याचा रोख, दिशा. ६. अट; शर्त; मानस; मंतव्य; हेतू :'जे काय दीलचे मुदा असेल ते कबूल.'- भाद्विसवृ १७९१. ७. मार्गदर्शक चिन्ह; खूण; साधन; आरोप :'याजकडे खुनाचा मुद्दा लागला.'- वाडबाबा २.५०. [अर. मुअदा] (वा.)० **पुरविणे** – भांडण चिघळविणे.

**मुद्दा(दा)पत्ता** पु. पुरावा; साक्ष; आधार; मागमूस; धागादोरा; थांगपत्ता.

**मुद्दाम** क्रिवि. जाणूनबुजून; हेतुतः; हेतुपुरस्सर; बळेच; हट्टाने; खास; उघडपणे; बुद्ध्या. [अर.अम्दन्]

**मुद्दी** स्त्री. रेशीम उकलण्यासाठी लागणारी, लाकडी फळीवर बसवलेली खुंटी. (बे.) [क. मुद्दे = गोळा]

**मुद्देदार** वि. १. मुद्दे असलेला. २. वादी; फिर्यादी.

**मुद्देनजर** स्त्री. लक्ष्य. [फा. मुद्द+नजर]

**मुद्देमाफ(फी)क** क्रिवि. इच्छेनुसार; इच्छेप्रमाणे.

**मुद्देवार** क्रिवि. मागणीवार.

**मुद्देसूद** वि. मुद्द्यास धरून असलेले; प्रमाणशुद्ध; संगतवार; सुसंगत.

**मुद्द्याचा मनुष्य** वि. मुख्य मनुष्य; सूत्रधार; सूत्रचालक.

**मुद्याळ** वि. कुरळे; कुरळ (केस).

**मुद्रक** पु. १. अक्षरजुळवणी करून घेऊन छापणारा. २. छाप मारणारा. [सं.]

**मुद्रण** न. छापण्याची क्रिया. [सं.]

**मुद्रणतंत्रशास्त्र** न. अक्षरजुळवणी, योग्य फाँट निवडणे, छापण्याच्या यंत्राची–शाईची– कागदाची निवड इ. छपाईविषयक गोष्टींचा अभ्यास करणारे शास्त्र.

**मुद्रणदोष** पु. चुकीचे छापले जाणे.

**मुद्रणपट्ट** पु. सबंध पानाचा किंवा जास्त मजकूर ज्याच्यावर मुद्रित केलेला असतो असा धातूचा जाड पत्रा.

**मुद्रणप्रत** स्त्री. छपाईसाठी तयार केलेली मजकुराची प्रत; (इं.) प्रेसकॉपी. (या प्रतीनुसार छपाई करायची असते.)

**मुद्रणयंत्र** न. १. छपाई करण्याचे यंत्र. २. संगणकाला जोडलेले छपाई यंत्र; (इं.) प्रिंटर.

**मुद्रणादेश** पु. किती प्रती छापायच्या यासंबंधी दिलेला आदेश.

**मुद्रणे** सक्रि. संक्षेप करणे; सारांशरूपाने सांगणे : 'याकारणें बोलैन सर्वथा । मुद्रुनिया'- ज्ञाप्र २०९. [सं.मुद्र]

**मुद्रबडा** पु. मुद्रिका; अंगठी; अंगठीतील रत्न.

**मुद्रस** पु.१. आनंदरस; आनंद. २. अन्नरस : 'मुद्रस कैचा त्याला भलत्याला भाकर मागति मुख पसरुनी ।'- ऐपो ३७०. [सं. मुद् + रस]

**मुद्रा** स्त्री. १. ठसा किंवा शिक्का उठविण्याचे साधन; छाप; शिक्का. २. शिक्क्याची अंगठी; ठसा उमटवण्याची अंगठी; (सामा.) अंगठी. ३. गोसावी लोकांचे लाकडाचे किंवा कासवाच्या पाठीचे कर्णभूषण : 'कान फाडूनिया मुद्रा ते घालिती । नाथ म्हणविती जगामाजीं ।'- तुगा २८२९. ४. वैष्णव लोक आपल्या अंगावर गोपीचंदनाचे शंख, चक्र, रामनाम इ.चे उठवतात ते ठसे. ५. नाणे; विशेषतः रुपया. उदा. नाममुद्रा (पैसा), रौप्यमुद्रा (रुपया), सुवर्णमुद्रा (मोहोर) इ. ६. चेहऱ्याची ठेवण; चर्या; तोंडवळा. ७. पूजेच्या वेळी धेनु, शंख इ. रूप करतात ती हाताच्या बोटांची रचना. ८. कर्तृत्वाच्या दृष्टीने रूप, आकार इ. ९. पदार्थ ओळखता यावा म्हणून त्याच्यावर केलेले चिन्ह, खूण. १०. कासली नावाच्या झाडाचे फळ. ११. योगविद्येत अथवा धार्मिक विधीत सांगितलेली कमरेच्या वरील भागाची, हातांच्या बोटांची ठेवण किंवा विशिष्ट मुखचर्या (गोचरी, अगोचरी, चाचरी व ज्ञान). १२. चेहऱ्यावरील देवीच्या रोगाचे वण. १३. गाठोडी. [सं.] (वा.)० **देणे** – १. दीक्षा देणे (विशेषतः वैष्णव संप्रदायाची). २. वर्म सांगणे; गूढ ज्ञान सांगणे.० **पडणे**–वळण येणे; चेहऱ्यावर आविष्कार होणे : 'बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तंव आंत सुख वाढे ।'- ज्ञा ६.३५. ० **लावणे** – समाप्तीसूचक शिक्का देणे; खूण करणे.

**मुद्राचिरी** स्त्री. दानपत्र; बक्षीसपत्र : 'तो द्रोण द्रुपदा विनवी नम्रोत्तरी । कीं मज द्यावी मुद्राचिरी ।' – कथा ५.११.६९.

**मुद्रादोष** पु. १. प्रसन्नतेचा अभाव. २. लज्जा वगैरेसारखा भाव.

**मुद्राधारी** पु. १. सरकारी कागदावर शिक्के मारणारा; सरकारी शिक्का ज्याच्याजवळ असतो असा (मनुष्य); शिक्क्यावरील अधिकारी. २.बाहू, कपाळ, छाती इ.वर गोपीचंदनाच्या मुद्रा धारण करणारा. ३.वैष्णव. ४. मुद्रा लावणारा किंवा करणारा आणि आपल्या धार्मिकतेचा, दांभिक भक्तीचा गाजावाजा करणारा. ५. पूजा अथवा ध्यान करण्यास योग्य अशी मुद्रा किंवा आव दाखविणारा.

**मुद्राक्षर** न. छापखान्यातील टाईप.

**मुद्राविनिमय** पु. एका चलनातील पैसे दुसऱ्या चलनात करून देण्याचा व्यवहार.

**मुद्राक्षर ओतशाळा** छापण्याचे खिळे तयार करण्याचा कारखाना; फाऊंड्री.

**मुद्रांक** पु. तिकीट.

**मुद्रांकशुल्क** न. तिकिटें लावून देण्याचा कर.

**मुद्रांकित करारपत्र** महसूल मुद्रांकाचे तिकिट लावून केलेला लेखी करार; (इं.) स्टॅम्प पेपर.

**मुद्रांकित** वि. शिक्का असलेला; चिन्हयुक्त.

**मुद्रिका** स्त्री. पहा : **मुद्रा** १ ते ३, ५ व ६

**मुद्रित** न. अक्षरजुळवणी झाल्यानंतर तपासणीसाठी काढलेली प्रत; छापलेला कच्चा खर्डा; (इं.) प्रूफ.

वि. १. ज्यावर ठसा किंवा शिक्का मारलेला आहे असा. २. खूण केलेला; चिन्हांकित. ३. मिटलेले; बंद केलेले (फूल, डोळा इ.).

**मुद्रितशोधक** पु. मुद्रिते वाचून ती दुरुस्त करणारा; (इं.) प्रूफरीडर.

**मुर्दाड** वि. १. ओंगळ, घाणेरडे, कुजके (मांस). २. कोडगा; संवेदनहीन.

**मुधटी** वि. उंच; उन्नत.

**मुधनी** स्त्री. ज्यामध्ये दांडा बसविला जातो असे कुऱ्हाडीचे गोलाकार भोक.

**मुधा** क्रिवि. व्यर्थ; फुकट; निरुपयोगी; वृथा : 'सोडुनि वेडा छंद मनातील खेद करावा मी न मुधा ।' – मंमं ५२. [सं. मिथ्या]

**मुधा(ध्या)ळ** वि. कुरळे (केस). पहा : **मुद्याळ**

**मुनकता** स्त्री. मिळवणी; जुळणी; मेळ. [अर. मुनक्का]

**मुनका** पु. निवाडा; ठराव; निश्चय; करार; निकाल; फैसला : 'एक महिन्याचा करार की जाबसालाचा मुनका करून यावें.' – मइसा २२.६३.

क्रिवि. साफ; संपूर्ण.

**मुनमुन** स्त्री. हांजीहांजी. (पुणे)

**मुनवा** पहा : **मोनवा, मोना**

**मुनशी, मुन्शी** पु.१. फारशी भाषा जाणणारा, फार्शी भाषेत पत्रव्यवहार करणारा; चिटणीस; पारसनीस. २. अरबी, फारशी इ. भाषांचा शिक्षक. [फा. मुन्शी]

**मुनशीगिरी** स्त्री. पारसनिशी; मुन्शीचे काम, हुद्दा, कौशल्य.

**मुनसफ, मुन्सफ, मुनसि(सी)फ, मुनसूफ** पु. खालच्या दिवाणी कोर्टातील न्यायाधीश; (सामा.) न्यायाधीश.

वि. न्यायी : 'इंग्रजी इन्साफी, त्यांचे येख्त्यारी हे ही मुन्सफ असतील.' – ऐलेसं ७.३५७०. [अर. मुन्सिफ्]

**मुनस(सि)फी–बी, मुन्सफी–सिफी** स्त्री. १. न्यायनिवाडा; चौकशी. २. मुनसफाचा हुद्दा, काम. ३. न्यायनिवाड्याचे प्रकरण.

**मुना** पु. मुकाबला; नजरानजर : 'ऐन लढाईच्या मुन्यास सर्कार कामावर नीळकंठराव दिवंगत झाले.' – ऐलेसं ४.१७९८. [अर. मुआयना]

**मुना** पु. मोहरा; संबंध : 'त्या उपरी प्रहररात्री मजला बोलाऊन विचारले, राघोजीचा व त्यांचा मुना कसा आहे ?' – इएम्पी १३०.

**मुनाफा** पु.१. नफा; फायदा; लाभ. २. हित; कल्याण. ३. शेत विकल्यावर कुळाने मालगुजारास द्यावयाचा पैसा. (व.) [अर. मुनाफआ, मन्फआ]

**मुनासब** वि. उचित; योग्य; रास्त; बरोबर; युक्त; न्यायाचे. [अर. मुनासिब्]

**मुनि–नी** पु.१. यती; तपस्वी. २. मनन करणारा. ३. सात ही संख्या. ४. खुबी. [सं. मुनि]

**मुनिखिचडी** स्त्री. केशर, लवंगा, वेलदोडे, जायफळ इ. घालून केलेली श्रीमंती थाटाची खिचडी.

**मुनिश्राद्ध** न. १. मुनीने केलेले श्राद्ध. यात ब्राह्मणांना दक्षिणेच्या मानाने फार अधिक श्रम करावे लागतात (यावरून). २. (ल.) फार मेहनत आणि अतिशय काळजी घेऊनसुद्धा अगदी थोडी मिळकत होणारे काम.

**मुनीम** पु. एखादे काम, धंदा चालविण्यास नेमलेला माणूस; गुमास्ता; व्यवस्थापक; व्यापाऱ्याचा प्रतिनिधी; अडत्या. [अर. मुनीब्]

**मुनीमी** स्त्री. मुनिमाचा हुद्दा, काम.

**मुनीर** वि. प्रकाशमान.

**मुनै** न. शस्त्राचे कोचाळे, तीक्ष्ण टोक; शस्त्राची अणी.

**मुफसल** न. अव. लहान शहरे व खेडी.

**मुफ्त** क्रिवि. १.फुकट; विनामूल्य. २.धर्मार्थ.

**मुफ्ती** पु. न्याय, फतवा देणारा; न्यायाधीश; बडा काजी. [अर्. मुफ्ती]

**मुफ्तीगिरी, मुफतगिरी** स्त्री. न्यायाधिशी; ठराव करणे वा निकाल देणे इ. कामगिरी.

**मुफ्ती पोशाख** साधा पोषाख (विशिष्ट – खास नसलेला पोशाख).

**मुबलक–ख–ग, मुब्लक–ग** न.पु. (हिशोबातील किंवा मिळवणीची) एकंदर रक्कम; एकूण बेरीज.

वि. विपुल; पुष्कळ; मनमुराद; अघळपघळ. [अर्. मब्लघ]

**मुबारक** पु. संतोष; इनाम; बक्षीस.

वि. शुभ; मंगलदायी; शाल; सुखी. [अर्.]

**मुबारकबाद–वादी, मुबरक् बादी, मुबारकी–खी** स्त्री. अभिनंदन; खुशाली; आशीर्वाद; संतोष. [फा. मुबारक्बाद = मंगलदायक असे]

**मुबारत** स्त्री. परस्परसंमत घटस्फोट; पातीदारीची वाटणी. [अर. मुबारात्]

**मुबाहिस** वि. वाद घालणारा.

**मुभा–बा** स्त्री.१. मोकळीक; सदर परवानगी; कायदेशीर माफी; काहीही करण्याची कोणेकाला असलेली बिनशर्त परवानगी. २. बक्षीस; देणगी : 'तरी तुमची वस्तभाव सुतळीचा तोडा आदिकरून जी स्वामीनी दिली आहे ती मुबा केली असे.' – ब्रच १२५. [अर. मुबाह् =विहित]

**मुमडा** पु. विशिष्ट तऱ्हेचे मोठे व्यापारी गलबत.

**मुमुर्लो** पु. जाड व लहान भाकरी. (गो.)

**मुमुक्षा** स्त्री. मोक्षप्राप्तीची इच्छा. [सं.]

**मुमू** न. पाणी. (कातकरी)

**मुमूर्षा** स्त्री. १. मरणाची इच्छा. २. मरणांतिक अवस्था; मरणाच्या वेळची स्थिति. [सं. मृ = मरणे]

**मुमुर्षु–र्षू, मुमूर्षित** वि. १. मरू इच्छिणारा. २. ज्याचे मरण जवळ येऊन ठेपले आहे असा; आसन्नमरण; मरणोन्मुख.

**मुम्ताझ** वि.१.विभूषित.२. प्रख्यात. [अर.]

**मुयदंड** पु. आट्यापाट्यांच्या खेळातील सूरपाटी; सर्व पाट्यांना मधोमध छेदणारी पाटी.

**मुयदंड्या** पु. सूर धरणारा, सुराच्या पाटीवरील माणूस.

**मुयधोंडा** पु. गावाची हद्द दाखवण्यासाठी पुरलेला दगड.

**मुय(य्या)र** वि.१. निःसत्त्व; कमजोर. २. मुर्दाड; बेहिमती; निर्बळ; नालायक; कुचकामाचा. [सं. मृत]

**मुयाल** न. १. बैल. २. साटेलोटे. (बे.)

**मुयेद** न. (२८ रु. किमतीचे) नाणे. (गो.)

**मुयौचे** कि. (पायांना) मुंग्या येणे; शरीराचा एखादा भाग विरविरणे. (गो.)

**मु(मू)रकट** न. १. चिलट; डास; केमरे. २. (ल.) (तिरस्कारार्थी) क्षुद्र मनुष्य; कःपदार्थ.

**मुरकणे** अक्रि. १. एखाद्या गोष्टीस मनातून संमती असून, मात्र बाहेरून लज्जेने नापसंती दर्शविणे. २. मुशीमध्ये सोने इ. वळू लागणे; वेटाळू लागणे. ३. वळणे; विशिष्ट बाजूस फिरणे. (मावळी) [क मुरु.= नाखुशी दाखविणे]

**मुरका** पु. नखरा; अंग मुरडणे; लज्जेने किंवा विनयशीलतेने तोंड फिरवणे.

**मुरका, मुरकट्ये** पु. मुरकुटासारख्या बारीक माश्यांनी मध साठविण्यासाठी झाडाच्या ढोलीत केलेले लहान पोळे.

**मुरकी** स्त्री. गोसावी, बैरागी, वाणी, परदेशी इ. लोकांचा कानात घालण्याचा एक अलंकार; बाळी; डूल. [क.मुरि=अंगठी]

**मुरकी** स्त्री. (संगीत.) तंतुवाद्यावर कोणताही स्वर वाजवत असता त्याच्या मागच्या व पुढच्या स्वरास झटका देऊन त्या तीन स्वरांतून उत्पन्न केलेला मिश्रस्वर.

**मुरकुंड-डी** स्त्री. १.(उत्सुकता, फार हसणे, असह्य थंडी-ताप-अशक्तपणा, भीती, आनंद इ. कारणांमुळे होणारी) शरीराची संकुचित स्थिती; मान खाली घालणे. २. भीड; दाटी; खेचाखेच. ३. झुंड; उड्यावर उड्या. (क्रि. पडणे.) ३. पाय मानेवर ठेवून बसण्याचे एक आसन; मान गुडघ्यात घालून व हात पायाभोवती वेढून बसण्याचा प्रकार. (क्रि. मारणे, घेणे, वळणे.) [क.मुरि=वळणे] (वा.)० **वळणे**- १. देहभान नाहीसे होऊन पडणे; भयाने भेदरून जाणे; गर्भगळित होणे.

**मुरक्का** पु. चित्रांचे किंवा नकाशांचे बांधलेले पुस्तक; बांधीव चित्रपुस्तक; (इं.) अल्बम : 'तस्बिरांचे मुरक्के दोनचार आले.'- ऐटि ३.५९. [अर. मुरक्कअ]

**मुरखंडी** स्त्री. मूर्च्छा; घेरी.

**मुरग(गा)ळणे** उक्रि. पिरगळणे; पिळवटणे; एकदम किंवा हिसका देऊन वळवणे; पिळवटून वाकडे करणे, होणे. [क.मुरि=वळणे] (वा.) **(एखाद्याची) मान, मुंडी मुरगाळणे**-एखाद्याचा सर्वतोपरी नाश करणे; त्यास ठार मारणे.

**मुरगाळा** पु. १. पीळ देऊन वाकडा केलेला भाग; पिरगळा; चोळामोळा. २. वक्रता; वळण; कोपरा.

**मुरगुमी** स्त्री.(सोनारी) (सरी, वाकी इ. तयार करण्याकरिता) पीळ घालून एकत्र केलेल्या दोन सुतांची जोडी.

**मुरगुशी** पहा : **मुरमुशी**

**मुरंगी** स्त्री. १. लाल तोंडाचा चवदार मासा. (कु.) २. बारीक ऊ. (कु.)

**मुरघास-चारा** स्त्री. पु. चारा फुलोऱ्यात असताना कापून त्याचे एक ते दोन इंचाचे तुकडे करून त्यात युरिया २% व मिठाचे द्रावण १% हे मिश्रण टाकून मुद्दाम खणलेल्या खड्ड्यात हवा राहणार नाही अशा पद्धतीने दाबून ठेवलेला चारा.

**मुरट** न. झाडावर पडणाऱ्या रोगामुळे मुरडून वाकडे झालेले पान, फळ इ. (को.)

**मुरटणे** उक्रि. १. (पान, फळ इ.) रोगामुळे वाकडे होणे; मुरडणे; सुरकुतणे. २. एकदम वळणे, वळसा घेणे. ३. पिळवटणे; एकदम पिळणे.

**मुरटा** पु. मुरटलेले, खुरटलेले फळ.
वि. मुरटलेले; खुरटलेले; वाकडे झालेले.

**मुरटी** (को.) पहा : **मुरड**

**मुरटे** न. काजूचे बोंड.

**मुरड** स्त्री. १. वस्त्र, कागद, भाकरी, करंजी, कानवला इ.चा दुमडलेला काठ. २. रस्ता, नदी इ.चे वळण; वाक. ३. शरीर, गात्र, दोरा इ.स दिलेला वळसा.४. वस्तूचा घाट, आकार, ठेवण, घडण, ढब, धाटणी. ५. एखाद्या कामातील कौशल्य. ६. मिशांना दिलेले अक्कडबाज वळण.७. जमिनीची वक्रता.८. अक्षराचे वळण. ९. भाषण संपवण्याकरिता, त्याचा ओघ बदलण्याकरिता भाषणास दिलेले वळण, दिलेली निराळी गती. १०. एक प्रकारची वस्त्राची शिवण. [क.मुरि=वाकणे]

**मुरड** वि. प्रौढ; अनुभवी. (झाडी)

**मुरडण-न** स्त्री. (कृषि.) पिकाची एक पात काढून झाल्यावर दुसरी काढण्यासाठी परत फिरणे; बांधाच्या एका टोकास जाऊन औत परत फिरणे; सामान्यतः वळण; परती.

**मुरडणी** स्त्री. मुरडण्याची, दुमडण्याची क्रिया.

**मुरडणे** उक्रि. १. मागे वळणे, फिरणे; माघारे उलटणे; परतणे. २. मान मागे वळवून पाहणे. ३. पिरगाळणे; वाकडे करणे; मागे वळवणे. ४.दुमडणे; चुरगाळणे; घड्या घालणे. ५. सुरकुतणे; खुरटणे; आकसणे. ६. (करंजी, कानवला इ.स) नक्षीदार मुरड घालणे; काठ वळवणे. ७.कागदाला घड्या घालून रकाने पाडणे. ८. पराजय करणे. ९. वाहणे. १०. नटणे; नखरे करणे. [क.मुरि=वळणे] (वा.) **अंग, नाक, तोंड मुरडणे**- नापसंती दर्शवणे.

**मुर(रु)डशेंग** स्त्री. एक औषधी शेंग; असल्या शेंगेचे झाड.

**मुरडा-ड-डी** पु. १.दुमड; पीळ; पिरगळा; वेठ. २. आमांशादी विकाराने आतडी पिळवटल्यासारखी होऊन पोटात होणारी व्यथा; पोटशूळ. ३. पाने, फुले इ. खुरटून टाकणारा, झाडास होणारा एक रोग; मरटी.

**मुरडि(डी)व** वि. मुरडलेला; नागमोडी; पीळदार; फिरलेला; दुमडलेला; वाकडा.

**मुरडु(डूं)गा** वि. नखरेबाज; मुरडत चालणारा; ऐटबाज चालीचा; नटूनथटून जाणारा. (राजा.)

**मुरणे** अक्रि.१.(पाणी, दूध, तेल, तूप, रंग इ.) पातळ पदार्थ वस्त्र, भाकरी, लाकूड, जमीन इ.मध्ये शिरून त्यात राहणे, जिरणे. २. शोषून घेतला जाणे; पाकात घातलेल्या आंब्यात, लोणच्याच्या फोडींत पाक किंवा क्षार भरला जाणे किंवा जिरून सर्व भागात पसरला जाणे. ३. पिकणे;

पूर्णत्वास येणे; पक्व होणे. ४. दुधाला चांगल्या तऱ्हेने विरजण लागणे. ५. गंभीर, स्थिरमनस्क, शांत होणे; विचारी होणे; निवळणे. ६. अभ्यासाने, सवयीने तरबेज, मुरब्बी होणे; पूर्ण परिचित असणे. ७. (राग, इच्छा, वासना इ.) दबणे; कमी होणे; नाहीसा होणे; दडणे. ८. घाम आल्याशिवाय ताप कमी होणे; अंगात बारीक ताप राहणे. ९. (गळू, फोड, उठाणू इ.) न फुटता बसणे; आतल्या आत दबून जाणे; जिरणे. १०. (चिंतनात) मग्न होणे; गढून जाणे. ११. एखाद्या कामी अंदाजापेक्षा (मनुष्य, पैसा, पदार्थ) जास्त लागणे; अधिक खप होणे. १२. (ल.) तृप्त होणे. [सं. मूर्व] (वा.) **मुरून बसणे**– हातपाय आखडून आणि गुडघ्यात डोके घालून बसणे; मुरमुशी मारून बसणे. **मुरी मारणे** – काही काळपर्यंत स्वतः लपून राहणे; दडणे; दडी मारून बसणे.

**मुरदई** वि. गलेलठ्ठ. (व.)

**मुरदाडणे** सक्रि. मुरदाडाप्रमाणे वागविणे; उपहास करणे; निर्भर्त्सना करणे; कमी लेखणे; हसून तिरस्कार करणे.

**मुरदाड(र)शिं(शें)ग, मोदारशृंग** न. एक औषध; शिशाचे प्राणिद. [फा.]

**मुरन** न. विरजण. (अहि.)

**मुरब्बा, मु(मो)रंबा** पु. साखरेच्या पाकात मुरविलेला आंबा इ.; आम्रपाक. [अर. मुरब्बा]

**मुरब्बी–बी** वि.१. कैवारी; आश्रयदाता; पक्ष घेऊन बोलणारा. २. पोक्त; अनुभवी ; माहीतगार; हितेच्छू. ३. मुख्य अधिकारी; दिग्दर्शक; संरक्षक; पालक; वस्ताद : 'दौलतींत मुरबी अमीर कोणी राहिला नाहीं.' ह्र पाब ८. [अर. मुरब्बी]

**मुरमाड** न. मुरामाचा खडक; मऊ झालेला; ठिसूळ खडक; जीर्ण कार.

**मुरमाड–डी** स्त्री. मुरुम असलेली जमीन; बारीक, ठिसूळ खडी असलेली जमीन; मुरमाटी.

**मुरमु(मू)र** स्त्री.१. कुरबुर; कुरकुर; पुटपुट. २. धुसफुस.

**मुरमुरणे** अक्रि. १. कुरबुर करणे; पुटपुटणे. २. कुसमुसणे; धुसफुसणे.

**मुरमुरा** पु.१.चुरमुरा. २. सडलेला व भिजत घालून नंतर भाजलेला तांदूळ. ३. भाजका पोह्याचा दाणा. [सं. मुर्मुरक]

**मुरमुरीत** वि. कुरकुरीत.

**मुरमुशी** स्त्री.१. ताप येण्याच्या अगोदर किंवा येऊन गेल्यावर वाटणारी ग्लानी. (क्रि. येणे.) २. अंगाचा संकोच करून बसणे.

**मुरमुसणे, मुरमुसून पडणे, निजणे, बसणे** अक्रि. १.मुरमुशी मारून बसणे; अंग आखडून बसणे. २. तापामुळे ग्लानी येणे; मूर्च्छित होणे. ३. मुखचर्या पालटणे; म्लान व उदासीन दिसणे; चेहरा फिकट पडणे.

**मुरली–ळी** स्त्री. नदीकाठचे एक प्रकारचे गवत.

**मुरली–ळी** स्त्री. तोंडाने वाजवण्याचे बांबूचे, सुषिर वाद्य; बासरी. [सं.]

**मुरवण** न. १. विरजण; दुधाचे घट्ट दही होण्यासाठी दुधात मिसळण्याचे थोडेसे ताक. २. (ल.) एखाद्याचा गर्व उतरवण्यासारखी गोष्ट. ३. पैशाची केलेली अफरातफर लपवण्यासाठी सांगितलेली खोटी सबब किंवा केलेले ढोंग. ४. अफरातफर; गिळंकृत केलेले द्रव्य. ५. ज्यामध्ये बारीकसारीक दोष किंवा गोष्टी सहज लपवता, जिरवता येतात असे मोठ्या घडामोडीचे काम. ६. बूड, खोट आलेली रक्कम. ७. रोगट, अपरिपक्व धान्य. ८. आंब्याच्या अढीतील गवताचे थर; तंबाखू मुरण्याकरता केलेली व्यवस्था; पिकवण्यासाठी, मुरण्यासाठी किंवा उग्रता कमी करण्यासाठी घातलेले द्रव्य.

**मुरवणा–ण** न. पु. पहा : **मुराग**

**मुरवत** स्त्री. भीड; संकोच; पर्वा; भय; आदर. (क्रि. बाळगणे, धरणे, राखणे.) [अर. मुरूवत]

**मुरवन** न. १. कणसे न झालेला कडबा. (माण.) पहा : **मुराण**

**मुरवन** न. १. कोवळ्या भाजीपाल्याचा समुदाय. २. मरवा. (को.)

**मुरवा** पु. गुरांच्या खुराच्या मागचा नखासारखा भाग; नख्या. (व.)

**मुरवा** पु. मांसरस. (कु.)

**मुरविणे** सक्रि. १. मुरत घालणे; धान्य, तंबाखू इ. पदार्थ दडपून ठेवणे. २.(ल.) जिरवणे; गिळंकृत करणे; मोठ्या खर्चाच्या बाबीत बारीकसारीक खर्च घुसडून लबाडीने पैसा खाणे. ३. फसवेगिरीने पैसा खर्चणे, खाणे.

**मुरसडा** पु. पठाराचा रस्ता. –लोसाको.

**मुरसंड–डी** स्त्री. मूर्च्छा; झीट. (क्रि. येणे) [सं. मूर्च्छा]

**मुरसा–स्सा** वि. रत्नजडित. [अर. मुरस्सा]

**मुरळी** स्त्री. खंडोबाला वाहिलेली स्त्री; भक्तीण; देवदासी. [सं. मैराल = मल्लारी – मैराली (स्त्री) = मुरळी; क. मरळी]

**मुरळीमहार** पु. खंडोबाला वाहिलेल्या महार स्त्रीपासून झालेला महार.

**मुरा, मुरामासा** पु. गोड्या पाण्यातील एका जातीचा मासा.

**मुराड** न. वळण. (ना.)

**मुराण** न. अगदी कोवळेपणी रोगाने जळलेले शेत,

**मुराद** स्त्री. (अशिष्ट) इच्छा.
वि. विपुल; पुष्कळ; इच्छेप्रमाणे; भरपूर. पहा : **मनमुराद** [अर. मुराद्]

**मुरानी** स्त्री. उंची, भारी किमतीचे लुगडे.

**मुरापा** वि. ज्याचे मागील पाय कोंबड्याच्या पायाप्रमाणे नीट असतात असा (घोडा). असा घोडा चांगला समजतात. – अश्वप १.१०३.

**मुराबट्टी** स्त्री. १. मातेरे; घाण. २. नाश.

**मुरास** पु. सह्याद्रीच्या पूर्वेकडील दऱ्याखोऱ्यांचा प्रदेश. पहा : **मुऱ्हे**

**मुराळकी** स्त्री. पाटलाच्या घरातील सुना, लेकी इ.ना सासरी, माहेरी आणण्या–नेण्याचे काम.

**मुरी** स्त्री. अंगावर खवले नसलेला मासा.

**मुरी** स्त्री. हातपाय आखडून व डोके गुडघ्यात घालून बसणे; मुरगुशी.

**मुरीद** पु. शिष्य; चेला; मौलवीचा चेला. [अर.]

**मुरीन** पु. कोंब येण्यापूर्वीची नारळाची स्थिती. पहा : **मुरूंज**

**मुरूम** पु. १. घट्ट मातीचे खडे; बुरुंब; काळ्या फत्तराचे रूपांतर होऊन झालेली टणक माती किंवा खडे. कोंड्या, उडद्या, काळा, तांबडा, दगडी, लोखंडी इ. मुरुमाचे प्रकार आहेत. २. तारुण्यात तोंडावर उठणाऱ्या पुटकुळ्या; तारुण्यपिटिका.

**मुरूंज, मारांद** पु. आतल्या आत वाढलेला नारळाचा कोंब. नारळातील

पाणी संपल्यावर तो वाढतो.

**मुरेली–ळी, मुरळी** स्त्री. विळी; लाकडी ठोकळ्यात किंवा पाटाला उभे पाते बसवून तयार केलेली, भाजी इ. चिरण्यासाठी तयार केलेले लोखंडी पात्याचे साधन. (को.)

**मुर्गी** स्त्री. कोंबडी; मुरगी. [फा. मुर्घ=पक्षी]

**मुर्तोळी, मुहुर्तवळी** पु. जावयाचा भाऊ; पाणजावई; टोणका : 'उष्टावणाच्या वेळी मुर्तोळी उर्फ मुहुर्तवळी आणि वर एका पानावर जेवतात.'– मसाप ४.२५४. (को.)

**मुर्दाड** वि. १. ओंगळ; घाणेरडे. २. कुजके (मांस). ३. (ल.) कोडगा. ४. संवेदना नसलेला. [फा. मुर्दार्]

**मुर्दाडी** स्त्री. मेलेल्या जनावराचे कातडे.

**मुर्मुशी जाणे** क्रि. रागावणे. (कर.)

**मुर्वत** स्त्री. माणुसकी; सभ्यता. पहा : **मुरवत**

**मुर्शीद** पु. गुरू. [फा.]

**मुऱ्हा, मुसकी, मुंगसे** स्त्री.न. शेतात काम करीत असताना बैलाने पिकास तोंड लावू नये म्हणून त्याच्या तोंडाला घालण्याची जाळी;म्होरकी.

**मुऱ्हाळी–री** पु. १. नवऱ्या मुलीचा भाऊ. २. नवीन लग्न झालेल्या मुलीच्या बरोबर पाठराखण गेलेली व्यक्ती. ३. माघारी; नवरीला सासरी अगर माहेरी नेण्यासाठी आलेली व्यक्ती. ४. पाचारण; बोलावणे. [सं. मूळहारी]

**मुऱ्हे** न.१. धुके. २. सह्याद्रीच्या लगतचा प्रदेश.

**मुलकण्–न्–कर** क्रिवि. सौम्यपणाने; मंदपणे; गालातल्या गालात (हसणे). [ध्व.]

**मुलकणे** अक्रि. मंदस्मित करणे.

**मुलकी–खी** वि. १. स्वतःच्या मुलखातील; स्थानिक; देशी. २. गैरफौजदारी; वसुलासंबंधीचा; जमाबंदीबाबत.

**मुलकी लाट** (इं.) गव्हर्नर जनरल; व्हॉईसरॉय; राज्यप्रतिनिधी; हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल (पारतंत्र्याच्या काळात).

**मुल्क** पु. देश. [अर.]

**मुलगा** पु.१. पुत्र; लेक; छोकरा. २. साधारणपणे सोळा वर्षांखालील पुरुष व्यक्ती. ३. गुलाम स्त्रीचा पुत्र. [सं. मूलकः]

**मुलगी** स्त्री. १. कन्या. २. साधारणपणे सोळा वर्षांखालील अविवाहित; तरुण स्त्री. ३. सून.

**मुलतानी** स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा चौथा प्रहर. वि. मुलतानी देशासंबंधी.

**मुलतानी माती** एक प्रकारची चिकणमाती.

**मुल(ला)णा–ना** पहा : **मुल्ला**

**मुलाख(क–का)त** स्त्री.१. भेट; बोलाचाली; विचारपूस. २. एखाद्याची पात्रता, विशिष्ट कामासाठी, पदासाठी आवश्यक योग्यता जोखण्यासाठी साधलेला संवाद. ३. प्रसिद्ध,विशेष व्यक्तीची प्रसिद्धीसाठी घेतलेली माहिती.

**मुलाजम(मा)त** स्त्री. १. भेट. २. सरकारी नोकरी; कर्तव्य; काम; तत्परता. ३. सलामी. ४. दिवाळे काढलेल्या कर्जदारावर सावकाराची (मिळकतीसंबंधात) असणारी सारखी नजर. [अर. मुलाझमत्=तत्पर सेवा]

**मुलाजा, मुलाइ(हि)जा** पु. १.पर्वा; मान; विचार; आदर. २. क्षमा; गय. ३. दुर्लक्ष; उपेक्षा. [अर. मुलाहझा]

**मुलाणी–णा** पु. मुसलमान खाटीक. [फा. मुलाणा]

**मुलाम** वि. पहा : **मुलाईम**

**मुलामगिरी** स्त्री. मुलाम्याची कृती. वि. मुलाम्याचा.

**मुलाय(ई)म** वि. १. मृदू; मऊ; नरम; दबणारा. २. नाजूक; उत्कृष्ट; सुरेख; कोमल. [अर. मुलायिम्]

**मुलारत** वि. पुढील एक पाय पांढरा असलेला (घोडा).

**मुलाहिजा** पु.१.तपास; चौकशी; प्रेक्षण.२. पहा : **मुलाजा**

**मुलूक–ख** पु. १. प्रांत; देश; राज्य. २. स्वदेश; स्वतःचा प्रांत. [अर. मुल्क्] (वा.)० **उठणे** –मुलुख ओसाड पडणे. **मुलखात दिवा लावणे**–ओसाड प्रदेशात वस्ती करणे; निर्जन प्रदेश वसविणे.

**मुलूख(क)गिरी** स्त्री. १. परदेश जिंकणे. २. सैन्याचे कूच; मोहीम; स्वारी. ३. सारावसुलीसाठी सरकारने पाठविलेल्या तुकडीचा प्रवास. ४. व्यापारी, यात्रेकरू इ.चा प्रवास; देशाटन. (सामा.) प्रवास. [फा. मुल्क् + गिरी]

**मुलूख(क)दार** पु. दौलतवंत; सरदार; जहागीरदार.

**मुलुख(क)दारी** स्त्री. राज्यव्यवस्था.

**मुलूख(क)परखा** वि. हद्दपार केलेला.

**मुलुख(क)मैदान, मलिकमैदान** स्त्री. १. या नावाची विजापूर येथील सुप्रसिद्ध तोफ. हिच्या तोंडाचा व्यास चार फूट आठ इंच तर पोकळीचा (किंवा गर्भाचा) व्यास दोन फूट चार इंच. २. (ल.) मोठमोठ्याने बोलणारी, भांडखोर स्त्री; जहांबाज स्त्री; तोंडाळ बायको–बाई. [अर. मलिक–इ–मैदान = देशाचा राजा]

**मुलूख(क)मैदान** न. १. प्रदीर्घ सपाट भूप्रदेश; सपाट प्रांत; पटांगण. २. झाडी नसलेला भूभाग, ओसाड प्रदेश. [अर. मुल्क + मैदान]

**मुल्ला** पु. १. मुसलमान जातीचा धर्मगुरू किंवा शास्त्रवेत्ता. २. मुसलमान पंतोजी; शिक्षक. ३. बारा बलुतेदारांपैकी एक. ४. गावातील मशिदी, पीर यांचा व्यवस्थापक, मुस्लीम समाजातील धर्मकृत्ये, विवाह इ. ज्याच्या देखरेखीखाली होतात असा (मनुष्य). [अर. मौलाना]

**मुल्लागिरी** स्त्री. मुलाण्याला मिळणारे वतन.

**मुल्हन** न. पोकळ, बारीक, निःसत्त्व असा तुरीतील दाणा; मुकणा. (व.)

**मुवाफिक** वि. योग्य; जुळता; उचित; समर्थ; जुळण्यासारखा. [फा.]

**मुश(स)कील, मुश्कील** स्त्री.अडचण; पंचाईत; संकट; अवघड गोष्ट. वि. कठीण; दुर्घट; अवघड; अडचणीचा. [अर. मुश्किल]

**मुशजर** न. वेलबुट्टीचे काम केलेले रेशमी वस्त्र. [फा. मुशज्जर]

**मुशाफि(फ)र** पु. प्रवासी; वाटसरू; फिरस्ता; सफर करणारा. [अर. मुसाफिर]

**मुशाफि(फ)रखाना** पु. १. धर्मशाळा; सराई; वाटसरूंना उतरण्याची जागा. २. खाणावळ. ३. डाकबंगला.

**मुशाफि(फ)री** स्त्री. १.प्रवास; देशाटन. २. प्रवासीपण.
वि. प्रवासासंबंधीचा; प्रवाशांसंबंधीचा. [फा. मुसाफिरी]
**मुशारखोर** पु. नोकर; चाकर; पगार देऊन ठेवलेला मनुष्य.
**मुशारा, मुशाहिरा** पु.१. मासिक वेतन; पगार. २. मजुरी; रोजमुरा; मेहेनताना. ३. वर्षासन.
**मुशांड** न. ढोंग. (गो.)
**मुश्क–ष्क** पु. कस्तुरी. [फा. मुश्क; सं. मुष्क = अंड]
**मुश्क–ष्क हीन** एक प्रकारचे अत्तर.
**मुश्रि(श्री)फ** पु.१. तपासनीस. २. फाजील खर्च. [अर.]
**मुषकी** वि. आयाळ दूमसहित सर्व काळ्या रंगाचा (घोडा).–अश्वप १.३०.
**मुषकी अबलक–ख** वि. कमीजास्त काळा-पांढरा असलेला (घोडा). अशा रंगाचा घोडा कार्यसिद्धी करणारा असतो. – अश्वप १.३०.
**मुषकी पंचकल्याण** वि. दूम–आयाळसुद्धा काळा असून डोळे मनुष्यासारखे आणि चारी पाय पांढरे व कपाळावर पांढरा ठिपका असलेला (घोडा).– अश्वप १.३०.
**मुषादिरदार** पु. (जरतारी विणकाम) शालू वगैरेवर बुट्टे वगैरे उठवताना निरनिराळे चाळे वर–खाली करण्यासाठी चाळ्यांचे वजन कमी–जास्त करणारा मुलगा; (इं.) ड्रॉबॉय.
**मुष्कर** पु. मोठ्या अंडाचा; लठ्ठ; स्थूल (मनुष्य). [सं. मुष्क=आंड, अंडकोष]
**मुष्टि–ष्टी** स्त्री.पु. १. मूठ; हाताची बोटे मिटली असता होणारी रचना. २. मूठभर धान्य इ. पदार्थ; भरलेली मूठ. ३. शस्त्र इ.चा हातात धरण्याचा भाग; मूठ; कबजा; परज; दांडा; थरू; मुठ्या. ४. बुक्की. [सं.]
**मुष्टिप्रयोग** पु. १.मुठीचा रट्टा. २. जारणमारणातील एक क्रिया. पहा : **मूठ मारणे** (वा.)
**मुष्टिमैथुन** न.मुठळ्या मारणे.
**मुष्टियुद्ध** न. आतून मऊ अस्तर घातलेले विशिष्ट प्रकारचे हातमोजे घालून एकमेकांवर प्रहार करण्याचा खेळ; (इं.) बॉक्सिंग.
**मुष्टिस्वस्तिक(संयुक्त हस्त)** न. (नृत्य.) खटकाख्य हात थोडेसे आखडून व वाकडे करून मनगटावर ठेवणे.
**मुष्टिहस्त** पु. (नृत्य.) हाताची सर्व बोटे मिटून तळहातास चिकटवून ठेवणे व त्यावर अंगठा ठेवणे.
**मुसकट–ड–ल, मुसकाड–डी मुसकुरी** पहा: **मुस्कट**
**मुसक(का–कु)टणे** सक्रि. तोंडात मारणे; मुसकाड फोडणे; कानशिलात मारणे.
अक्रि. (वस्त्राने) तोंड झाकून घेणे; मुसकणे; मुस्कट घेणे. (माण.)
**मुसकणे** अक्रि. १. वस्त्राने तोंड झाकून घेणे; तोंड आच्छादणे. २. रागाने किंवा तिरस्काराने तोंड एकदम वळवणे; तिटकाऱ्याने एकदम परत फिरणे; माघारी जाणे.
**मुसके, मुस्के, मुसकी** न.स्त्री. १. शेतातील उभे पीक जनावरांनी खाऊ नये म्हणून त्यांच्या तोंडास बांधली जाणारी जाळी; म्होरकी. २. तोंड (गुरा–माणसांचे). [सं. मुख]
**मुसक्या** स्त्री. अव. कैद करताना पाठीमागे वळवून बांधलेले हात. (क्रि. आवळणे, बांधणे.)
**मुसडा** पु. १. पाण्याचा जोराचा लोंढा, प्रवाह. २. (ल.) गर्दीतून जोराने घुसणे. ३. डोक्याने मारलेला ठोसा. ४. प्रतिकारास टक्कर देण्यासाठी जमलेला समुदाय.
**मुसणे** उक्रि. मूर्च्छित होणे, करणे : 'जेही मुसिजती शौरें'– शिव ८९९; 'मुसीजति मानवळणें : मनोधर्माची'– मूप्र १०१४.
अक्रि. फसणे : 'यज्ञमूढ मुसिले यागीं'– ज्ञा १६.२९६.
सक्रि. आटणी होणे; एकवटणे: 'स्मर्ण मननाते लुसी : बोध बुधीतें मुसी' – ऋव १५१. [सं.मुर्च्]
**मुसदर** वि. नवीन तऱ्हेचा, विशेष सुंदर.
**मुसना–न्ना** पु. १.दुहेरी नक्कल.२. सारांश; संक्षिप्त हकिकत. [अर. मुसन्ना]
**मुसमारणे** अक्रि. ताप–थंडीमुळे गुडघे पोटाशी घेऊन, पांघरूण घेऊन निजणे.
**मुसमार्ग** पु. १. थांगपत्ता; ठावठिकाणा. २. चिन्ह; खूण.
**मुसमुशी–स** स्त्री. तारुण्याचा भर; तारुण्याने, तालीमबाजीने अंगात संचारणारी रग–शक्ती.
**मुसमुशीत, मुसमुसलेला** वि. तारुण्याचे तेज असलेला.
**मुसमुस** स्त्री. १. स्फुंदन; मुळुमुळु रडणे. २. बारीक बारीक पुटपुट; गुणगुण.
**मुसमुसणे** अक्रि. १. तारुण्याच्या ऐन भरात, ज्वानीच्या जोमात असणे. २. जोरात, भरात असणे :'काम खवळे धनापाशीं। अहर्निशी मुसमुसित।'– एभा २३.२५०. ३. रागाने संतप्त होणे; क्रोधाने जळणे. ४. स्फुंदणे; मुळुमुळु रडणे. ५. अस्पष्ट पुटपुटणे, गुणगुणणे.
**मुसरे** न. खरकटे. [क. मुसरी]
**मुसलमान** पु. इस्लामी धर्माचा अनुयायी.[फा. मुसुल्मान] (वा.)**(एखाद्याला मारून, मुटकून, हाणून) मुसलमान करणे**– एखाद्याची इच्छा नसतानाही त्यास एखाद्या कृत्याकडे बळजबरीने वळवणे; संमती देण्यास भाग पाडणे.
**मुस(सं)वर–व्वर** पु. चित्रकार; चितारी.
**मुसव्वरी** स्त्री. चित्रकाम. [फा. मुसव्विरी]
**मुसळ** न.१. तांदूळ इ. सडण्याकरिता गोल, लांब, टोकाला वसवी किंवा मांडळ बसविलेले लाकूड; कांडणी. २. गदा; सोटा.३. उसाच्या चरकातील नवरा किंवा नवरी. [सं. मुसल्, मुस् = तोडणे] (वा.)० **नेसणे, पांघरणे, डोक्याला बांधणे**– निर्लज्जपणाने वागणे; सभ्यतेला सोडून वागणे. **मुसळाचे धनुष्य (धनु) करणे**–अशक्य गोष्ट शक्य करणे. **मुसळाने टिऱ्या बडविणे**–हुरळून जाणे; अतिशय आनंद होणे. **मुसळास अंकुर फुटणे**–१. अत्यंत असंभवनीय गोष्ट घडणे. २. असाध्य आजार इ.मधून बरे होऊन पूर्वीप्रमाणे व्यवहार करू लागणे. **मुसळा–मुसळाशी गाठ न पडणे, मुसळा–मुसळाची गाठ न बांधता येणे**– दोन सारख्या हेकट आणि दांडग्या माणसात सलोखा किंवा एकी घडविता न येणे.
**मुसळकंद** पु. १. एक कंद; एक प्रकारचा कांदा. २. (ल.) धटिंगण; दांडगा. ३. ठोंब्या; मूर्ख; बैलोबा.
**मुसळकांड** स्त्री. मुसळाने तांदूळ सडण्याची क्रिया.

**मुसळकांड-डा-ड्या, मुसळसड्या** वि.१. मुसळाने कांडलेला, सडलेला (तांदूळ). २. निमसडा; कमी सडीचा.
**मुसळझुड्या-झोंब्या** वि. मुसळाने कांडताना न मोडणारा, कण्या न होणारा.
**मुसळणे** अक्रि. १. फळे, नासणे, सडणे. २. अतिशय श्रमाने थकणे.
**मुसळदेवता** स्त्री. (ल.) धीट, आडदांड स्त्री.
**मुसळधार** वि. फार मोठा, जोराचा (पाऊस).
**मुसळवादा** पु. हगवण किंवा आमांश यांची जोराची साथ.
**मुसळसळ-सळई** स्त्री. मुसळ करण्याला योग्य असे लाकूड.
**मुसळस्नान** न.-१. संकल्प, पुरुषसूक्त इ. मंत्र न म्हणता केलेले स्नान. २. नुसते अंग धुणे; अंग न चोळता नुसते अंगावर पाणी ओतून घेऊन केलेले स्नान.
**मुसळा** पु. (ओतकाम)रुंद बुडाचा, एक-दीड फूट लांबीचा, सुळकेदार दगड.
**मुसळी** स्त्री. १.(लोखंडकाम) गोल नळ्या करण्याकरिता उपयोगात येणारी पोलादी पहार. २. लहान मुसळ. (राजा.)
**मुसळी** स्त्री. घोड्याच्या मागील पायास होणारा एक रोग.- अश्वप २.१६.
**मुसळी** स्त्री. एक औषधी वनस्पती किंवा तिचा कांदा.
**मुसंडा** पु. (निंदार्थी) मुसलमान.
**मुसंडि-डी** स्त्री. पंचरसी छोटे घमेले. (को.)
**मुसंडी, मुसळी** स्त्री. गर्दीतून पुढे जाण्यासाठी डोके पुढे करून व शरीर वाकवून जोराने दिलेला धक्का; धडक. [फा.]
**मुसंब** न. तोंड : '(भीक्षान्न) घेइजे ऐसें मुसंब खोउनि' - लीचउ ५३९. [क.मुसुंड]
**मुसाकानी-कर्णी** एक वनस्पती. उंदीरकानी.
**मुसाड टकली** १. माशीचे डोके. २. (ल.) अगदी लहान अंश; अत्यल्प भाग. (गो.)
**मुसाफर** पु. पांथस्थ; वाटसरू. पहा : **मुशाफर**
**मुसाफरी** स्त्री. प्रवास; देशाटन. [अर. मुसाफिरी]
**मुसावणे** अक्रि. १. पूर्णपणे भरणे; भरून जाणे; भरून फुगणे; नसातून रक्त, रस इ. २. वाढणे; फुगणे. ३. मग्न होणे; साकार होणे; एकत्र होऊन जाणे :'घृत थिजलें कीं विघुरलें । परी घृतपणा नाहीं मुकलें । तेवीं अमूर्त मूर्ती मुसावलें । परी तें संचलें परब्रह्म ।'- एभा १.२४६. ४. निमग्न होणे; रमणे. ५. व्यापणे; आत पूर्णपणे भिनणे; भरून असणे. ६. मुशीमध्ये घातला जाणे; मुशीत आटून तयार होणे; मुशीत ओतून मुशीच्या आकाराची वस्तू करणे : 'गाळोनियां मोक्षसुख । तेथींचा मुसावोनि हरिख ।' -एरुस्व १.५४.
**मुसावणे** अक्रि. मूर्च्छित होणे : 'रसभावाचेनि तुषारें । मुसावे तो।'- एभा १७४.
**मुसांडा** पु. चिळकांडी.
**मुसी** स्त्री. मूर्च्छा; भोवळ : 'एकांचे उभआंचि प्राण मुर्सी गेले'- श्रीकृच १६. [सं.मूर्च्छा]
**मुसीबत** स्त्री.१. दुर्दैव. २. अनिवार्य म्हणून करावा लागणारा खर्च.
**मुसूम** न. टेकडीचे, डोंगराचे टोक. [अर. मूसम]
**मुस्कट** न. स्त्री. १. जनावराचे तोंड; जनावराचा डोक्यापासून तोंडापर्यंतचा भाग. २. (तुच्छतेने) मनुष्याचे तोंड किंवा गाल; गालफड.[सं. मुख; क. मुसुकु](वा.) **मुस्कटातली वासकटं बाहेर पाडणे**-(निंदार्थी) आपले म्हणणे दुसऱ्याला कळवणे.
**मुस्कटदाबी** स्त्री. १. एखाद्याचे बोलणे बंद करण्यासाठी बळजबरीने तोंडावर हात ठेवणे. २. भाषण, प्रसिद्धी यावर घातलेली बंदी; जुलूम; गांजवणूक .
**मुस्तकबल** पु. मक्त्याच्या रकमेचा चतुर्थांश (सरकारात ठेवलेला). (गो.)
**मुस्तकबा(बी)ल** पु. भावी, पुढे मिळणारी रक्कम; भविष्यकाळात मिळणारी रक्कम. [अर.]
**मुस्ता** स्त्री. नागरमोथा नावाचे सुगंधी गवत; त्याचा गड्डा. [सं.]
**मुस्ता** पु. (पिंजारी) कापूस पिंजताना पिंजण्याच्या हत्याराच्या तांतीवर आपटण्याचे मुठीसारखे साधन. ते डंबेल्ससारखे असते.
**मुस्ताकी** स्त्री. शिदोरी वगैरे सामान. (गो.)
**मुस्सयी** खलबत्त्यापैकी बत्ता. (खान.)
**मुहळी** स्त्री. मनगटाची पट्टी.
**मुहजोरी** स्त्री. कडक, कठोर बोलणे; उद्धट भाषा. पहा : **मुजोरी**
**मुहटी** स्त्री. ओसरीचे छप्पर.
**मुहुरणे** अक्रि. १. मोहोर येणे. २. प्रफुल्लित होणे.
**मुहुर्तार्ध** पु. अल्प काळ.
**मुहूर्त** पु. १. दोन घटकांचा काळ. २.(ल.) शुभ वेळ; योग्य समय; उपनयन; विवाह; गृहप्रवेश इ. कार्यांस इच्छित ठरवलेली शुभ वेळ. ३. कार्याचा प्रारंभ. ४. समय; ठरलेली वेळ. ५. (ल.) क्षण; अल्प काळ. ६. पुनर्विवाह; म्होतूर; पाट; न्हावेर. [सं.] (वा.)० **करणे**- १. आरंभ करणे (शुभ दिनी, शुभ कार्याचा). २. चेतविणे.
**मुहूर्त** स्त्री. मूर्त; मूर्ती. [सं.मूर्ति]
**मुहूर्तपूजन-पूजा** न.स्त्री.(लग्नादी विधींत) पत्रिकापूजन; लग्नमुहूर्त लिहिलेल्या पत्रिकेची पूजा.
**मुहूर्तमणि-णी** पु. वधूच्या गळ्यात(शुभ मुहूर्तावर) घातला जाणारा सर.
**मुळ** न. कुला.- नागाको.
**मुळका** पु. १. तगादा. (क्रि. करणे, लावणे.) २. घाई. (क्रि. सुटणे) ३. उत्सुकता लागणे.
**मुळगेणे** अक्रि. करपणे; शिजताना खाली चांगला जाळ न लागल्यामुळे बिघडणे. (कु.)
**मुळणे** क्रि. मोडणे.- लोसाको.
**मुळमु(मू)ळ** स्त्री. १. दुसऱ्यास समजण्यास कठीण व पाल्हाळीक भाषण; अस्पष्ट बोलणे. २. रिमझिम पाऊस; पिरपिर; बारीक थेंबांचा, दीर्घकाळ पडणारा पाऊस. ३. भिक्षेकऱ्याने लावलेली पिरपिर. ४. कामाची घाई, निकड. (क्रि. असणे, लागणे, लावणे.) [ध्व.]
**मुळमुळ-ळा** क्रिवि. १.हळूहळू; स्फंदून स्फुंदून (रडणे). २. रिमझिम, पिरपिर (पाऊस पडणे).
**मुळमुळणे** अक्रि.१. गुळमुळणे; पिळपिळीत बोलणे; अस्पष्ट किंवा तोंडातल्या तोंडात बोलणे. २.(पाऊस) रिमझिम पडणे; पावसाची

पिरपिर सुरू असणे. ३. कण्हणे; कुंथणे.

**मुळमुळीत** वि. १. बेचव; नीरस (खाद्य, पेय).२. संदिग्ध; अनिश्चित (विधान, जबाब). ३. पुळपुळीत; परिणामरहित (भाषण).

**मुळवणी** स्त्री. १. बोळवण. २. मुळापासून उचकटणे : 'हे माझेयां कंथडीकारां मुळवणी कीं'-स्मृस्थ ९५. [सं. मूल]

**मु(मू)ळवणे** सक्रि. समूळ उपटणे : 'संसार दुःख मूळवणें । विकृतीविणें' - ज्ञा १४.२२२. [सं. मूल]

**मुळवशी** स्त्री. खेडे, बाग, शेत इ.चा सर्वांत खालचा भाग, बाजू; सखल प्रदेश. (राजा.)

**मुळवा** पु. एका शेतातून दुसऱ्या शेतात जेथून पाणी जाते ती जागा; मूस.

**मु(मू)ळव्याध-धि-धी** स्त्री.अर्श; गुदाला होणारा एक उष्णतेचा रोग. तिचे रक्ती, मोडाची, लसणी व चुंबळी असे प्रकार आहेत. [सं.मूळव्याधि]

**मुळस** पु. मूळ; पायथा (डोंगराचा). (गो.)

**मुळसी** स्त्री. पिळा; पिळणे: 'घेउनि चिमुटे मुळसी पळसी' – नाम २६८.

**मुळस्ता** पु. फिरकी; मळसूत्र. (गो.)

**मुळहारी, मुळारी** पु. पहा : **मुऱ्हाळी**

**मुळा** पु.१. सर्वपरिचित एक पालेभाजी. मूळ व पाने भाजीला उपयोगी. रंग पांढरा, पाने मोठी, हिरवी, जाड शिरा असलेली. २. शिंपेत राहणारा एक जलचर प्राणी. याच्या शिंपल्यांचा चुना करतात. (को.)[सं. मूलक]

**मुळाऱ्या** पु. (शिंपी) लग्नाला वऱ्हाड आणणारा माणूस.

**मुळिया** पु. ज्योतिषी.

**मुळी** स्त्री. लहान मूळ; पाळ; जडी; मुळाचा तुकडा; मुळखंडी; पाळखंडी. [सं. मूल] (वा.)**मुळ्या पाताळी गाडल्या जाणे**-(एखाद्या ठिकाणी, समाजात, स्वभावात) पक्केपणे किंवा दृढपणे जाऊन बसणे; दृढ होणे.

**मुळीद** न. समुद्राच्या पाण्याची खोली मोजण्याचे साधन; बुडीद.

**मुळी** क्रिवि. १. अगदी; अजिबात; बिलकूल. २. प्रथमत; सुरवातीला; मुळात :'मुळीं देह त्रिगुणांचा । सत्त्वरजतमांचा।'- दास २.५.१.

**मुळु-ळू** वि. पाच. (नंदभाषा)

**मुळे** पु.अव. (मूळचे या अर्थी) मानकरी ब्राह्मण (देशस्थ, कोकणस्थ, देवरुखे, कऱ्हाडे); ज्योतिषी.

**मुळे** क्रिवि. कारणाने; योगाने; च्याकरिता; म्हणून.

**मुळेमाठ** पु. माठाच्या भाजीचा एक प्रकार.

**मुळो** पु. शेणवी ब्राह्मण जातीच्या काही घराण्यातील प्रतिवर्षी शूद्र पुरुषाला नारळ, तेल आणि फुले देऊन भोजन घालण्याचा कुलाचार.

**मुळ्या** पु. १. काष्ठौषधी विकणारा मनुष्य. २. गावजोशी; ज्योतिषी. ३. वतन, अधिकार इ.चा मूळचा भोक्ता. (राजा.) ४. वयोवृद्ध गृहस्थ; जुन्या पिढीचा म्हातारा. ५. मूळ नक्षत्रावर जन्मलेला; द्वाड, खोडकर, दुष्ट, उपद्रवी मनुष्य. [मूळ]

**मुक्षद, मुक्षु(क्षू)द** पहा : **मुखशुद्धी**

**मुंगणा-णी** पु.स्त्री. शेवगा. (ना., व.)

**मुंगफली-ल्ली** वि. भुईमूग.

**मुंगरचे** क्रि. शिरकणे; शिरणे. (गो.)

**मुंगसे** न. बैलाच्या तोंडाला बांधण्याची मुसकी. (व.)

**मुंगळा-ळी** पु.स्त्री. डोंगळा; मोठी मुंगी. (वा.)० **लागणे**- उतावीळ होणे; चेव येणे; अतिशय घाई करणे.

**मुंगा** पु. प्रवाल; पोवळे.

**मुंगा** पु. १. घोड्याला होणारा एक रोग. २. घोड्याच्या वरचा ओठ, नाकाचा शेंडा; घोड्याला आवरून धरण्यासाठी त्याचा वरचा ओठ दाबून धरणे, पिरगाळणे. (क्रि. दाबणे, घालणे, धरणे.) ३. मुंगा पिळण्याकरिता घेतलेली दोरी किंवा इतर साधन. ४. गर्विष्ठपणाचे वर्तन रग; उद्धटपणाची वागणूक; गर्व; खुमखुमी. (क्रि. करणे, लावणे, चालवणे, जिरवणे, मोडणे.) ५. चेव; उत्कट इच्छा; काही एका कामाबद्दल उत्सुकता. (क्रि. आणणे) ६. मुंगळा; काळी किंवा तांबडी मोठी मुंगी; डोंगळा. ७. नागपंचमीच्या दिवशी स्त्रियांचा फेर धरून गाणे म्हणण्याचा प्रकार. (क्रि. घालणे) ८. बैलगाडीच्या मागील बाजूस सामान पडू नये म्हणून दोन्ही बाखडांना मिळून बांधलेला दोरी विणून केलेला कठडा.

**मुंगारा** पु. खरिपात होणारी जोंधळ्याची एक जात.

**मुंगी** स्त्री. १. एक सर्वपरिचित, वारुळात राहणारा, सहा पायांचा, काळ्या-तांबड्या रंगाचा, चावणारा बारीक कीटक. २. एखादा झणझणीत पदार्थ खाल्ल्यामुळे जिभेला होणारी खवखव. ३. चेतना; चेव; एखादी गोष्ट करण्याविषयी एकदम उत्पन्न झालेली उत्सुकता; तीव्र इच्छा. (क्रि. येणे, आणणे.) ४. पुरुषांच्या ठिकाणी उत्पन्न होणारा कामविकाराचा प्रक्षोभ. (क्रि. येणे) ५. शरीरास आलेली बधिरता.(क्रि. येणे)(वा.) **मुंग्या येणे, चढणे** - वातविकारामुळे किंवा रक्ताभिसरण रुद्ध झाल्यामुळे शरीरावयव जड होऊन त्यास बधिरता येणे; **मुंगीच्या पावलाने**- अत्यंत संथ गतीने; अगदी हळूहळू.

**मुंगुऱ्या** वि. काळसर लाल रंगाचे लुगडे. (झाडी)

**मुंगूस** न. एक सस्तन, चार आखूड पायांचे, मांसाहारी, भुरक्या रंगाचे, लांब व केसाळ शेपटीचे जनावर; नकुल. [क. मुंगुरी]

**मुंगूसकांदा** पु. एक झाड; कंदविशेष. याचे मोठा व लहान असे दोन भेद आहेत.

**मुंगूसतोंडा-ड्या** वि.१.मुंगुसाच्या तोंडासारखे तोंड असलेला. २. रागातिरेकामुळे ज्याचा चेहरा मुंगसासारखा लाल झाला आहे असा. ३. ज्याची हनुवटी आत दबलेली असून ओठ मोठे व पुढे आलेले आहेत अशा चेहऱ्याचा. ४. लाजाळू; घाबरट.

**मुंचणे** उक्रि. १. मुक्त होणे; मुकणे :'इतुलेन मुंचसि । भव बंधासि तुं ।' – उगी ६६०. २. सोडणे; टाकून देणे :'जें आइकौनि जीवें मुंचती ।'– दाव २७९. [सं. मुंच्]

**मुंज** स्त्री. १. उपनयनसंस्कार. २. एक प्रकारचे गवत; मोळ. ३. उपनयन संस्कारात बटूच्या कमरेस बांधण्याकरिता मोळ, कुश, लव्हाळा यांची केली जाणारी दोरी; मोळाचे कटिसूत्र; मौजीबंधन. [सं. मौंजी]

**मुंजनाल** पु. घोड्याचा एक रोग.

**मुंजा-ज्या** पु.१. मुंजीला योग्य झालेला मुलगा. २. नुकतीच मुंज झालेला

मुलगा; ब्रह्मचारी; लग्न न झालेला माणूस. ३. एखादा मुंज झालेला मुलगा सोडमुंजीपूर्वी अपघाताने दगावल्यास त्याचे होणारे भूत; एक ब्रह्मचारी देवता. ४. (मुंज्याचे भूत पिंपळावर राहते, या समजुतीवरून) पिंपळाचे झाड.

**मुंजाटवी** स्त्री. गवताचे रान :'दूजा मुंजाटवीये ग्रासित'- गरा १२.

**मुंजिका** पु. घोड्याचा एक रंग.

**मुंजी** वि. पोटाखाली पांढरा पट्टा असलेली, तांबडे-काळे केस असलेली (मेंढी).

**मुंड** न. १. (विटीदांडू) अंतर मोजताना तीन या संख्येबद्दल वापरण्याची संज्ञा. २. या खेळात डाव्या हाताच्या आडव्या अगर उभ्या मुठीवर विटी ठेवून जरा उडवून तिला दिलेला टोला. ३. साडेचार हाताचे मद्रासी पद्धतीचे धोतर; धोतर गुंडाळण्याची मद्रासी पद्धत. [ते. मुडू = तीन]

**मुंड** पु.न. १. सारा, भाडे किंवा व्याज म्हणून दिलेले धान्य किंवा पैसा. २. वतनदारीचे एकमेकांशी संबंध नसलेले स्वतंत्र भाग.(व.)
वि. व्याज द्यावे लागत नाही अशी बिनव्याजी (रक्कम, कर्ज). [सं. मुंड]

**मुंड** न. स्त्री.१. डोके; शिर.२. डोक्याला बांधण्याचे तीन-चार हात लांबीचे वस्त्र; मुंडासे; रुमाल.३. हजामत केलेला किंवा डोक्यावर केस नसलेला (मनुष्य). ४. पाने झडून गेलेले झाड; बोडका वृक्ष. ५. न्हावी. ६. कुल; घराणे.(व.)[सं. मुंड](वा.) ० **मुंडावणे**-एखाद्या कार्याला वाहून घेणे.
वि.१.केस नसलेला; बोडका; हजामत केलेला; मुंडित.२. सुस्त.(व.)

**मुंडकं** न. भात्याचे पुढील तोंड. त्याच्या पुढे विस्तव असतो. (खान.)

**मुंडकारी** स्त्री. नारळाच्या बागेभोवतालचे कुंपण; कुंपणाची भिंत.

**मुंडकी** वि. बारीक; हलके (सागवान). (कर.)

**मुंडण-न** न.१. हजामत; क्षौर; चौल; उपनयन वा तीर्थयात्रा अशा प्रसंगी करावी लागणारी हजामत. २. (ल.) खरडपट्टी; तासडपट्टी; शिव्या हासडणे; हजामपट्टी. [सं.]

**मुंडणे** क्रि. १. हजामत, मुंडन करणे. २. मंत्रोपदेश, गुरुपदेश देणे; शिष्य बनवणे. ३. (अशिष्ट) लुबाडणे; ठकवून द्रव्य काढणे. ४. संन्यास देणे, घेणे :'नलगे हिंडणें मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी।'- तुगा २५८०.

**मुंडताळणे** क्रि. मुरडणे; मागे वळणे; वाकणे; लवणे.

**मुंडप, मुडप** पु.१. मुकुट; शिरताज; पागोटे; डोक्याचे रक्षण करणारी कोणतीही वस्तू :'मुंडपें जैसीं कुंभस्थळें। दिग्गजांचीं ।'- ज्ञाप्र ४६०. २. गजरा; पुष्पमाला. [सं. मुंड + प]

**मुंडपर्वणी** स्त्री.१. हजामत करण्यास योग्य दिवस. २. (ल.) सुट्टीचा दिवस.

**मुंडपी** पु. वि. जटाधारी.

**मुंडबंदी** पहा : **कासबंदीपद्धत**

**मुंड(डी)मोचन** न.१. चोरांनी केलेला शिरच्छेद. २. दुर्दशा; शिव्या-शाप, द्रव्यहरण इ.नी केलेली दुर्दशा.

**मुंडमुंड** पु. हलकट लोक.

**मुंडलावा** पु. भिंतीवरील मुंडेरी; वरंडी.

**मुंडवचे** सक्रि. शस्त्राची धार बोथट करणे. (गो.)

**मुंडवण** स्त्री. १. फसवणूक; नागवणूक; मोहिनी. (क्रि. घालणे, पडणे.) २. (ल.) शिव्यांचा भडिमार; खरडपट्टी.

**मुंडशेबाजू** स्त्री. (नाविक) उलांडीच्या विरुद्ध असलेली होडीची बाजू. (कु.)

**मुंडळी** स्त्री. बुबूळ. (गो.)

**मुंडंती** स्त्री. चांगली खरडपट्टी; बोडंती; तासडपट्टी; खरमरीत कानउघाडणी.

**मुंडा** पु. १. मातीचे भांडे; डेरा; रांजण. (को.) २. पखालीचे तोंड, भोक. ३. लाकडी खांब; स्तंभ. (ना.)
वि. पेंढा भरलेला.

**मुंडा-ढा** पु. १. हिजड्याचा सोबती; खरखरमुंडा; भिक्षा मागताना हिजड्याबरोबर फिरणारा व भिक्षा मागणारा मनुष्य. २. नायकिणीचा भाऊ. (गो.)

**मुंडाचे शेत** बिघ्याचे दर न ठरविता ठोक अगर एकदम विकलेली जमीन.

**मुंडारणे** उक्रि.१.मागे वळणे-वळविणे; तोंड फिरवून चालू लागणे; पालट खाणे; परत फिरणे. २. खाण्याचा एखादा पदार्थ नकोसा होणे; त्याबद्दल अरुची उत्पन्न होणे.

**मुंडाल** स्त्री. वरंडी; वरवंडी; मुंडेरी; मुंडलावा. (ना.)

**मुंडाला** पु. तेल साठविण्याचा रांजण; बुधला.

**मुंडित** वि. हजामत केलेला; मुंडण केलेला; तासलेला.

**मुंडि(डो)हात** (गो.) पहा : **मुंढाहात**

**मुंडी-ढी** पु. (निंदार्थी) (शेंडी न ठेवता सर्व हजामत करतात म्हणून) संन्यासी; गोसावी. [सं. मुण्डी]

**मुंडी** स्त्री. १. शिर; डोके; मुंडके. २. (मल्लविद्या) दोन खांदे व कमरेचे दोन खवाटे मिळून चार मुंड्या होतात, त्यांपैकी प्रत्येक भाग. (वा.) ० **फिरवणे**- नापसंती, नावड दाखवणे. ० **मुरगाळणे, पिळणे, पिरगाळणे**- (एखाद्याचा) सर्वतोपरी नाश करणे; त्रास देणे; छळणे; एखाद्याच्या उपजीविकेचे साधन नाहीसे करणे.० **हालविणे, डोलविणे**- १. विषय न समजता समजला असे डोके हालवून सांगणे. वरिष्ठांच्या २. होला हो करणे. **चारी मुंड्या चीत होणे** - २. पूर्ण पराभव होणे.

**मुंढरा** वि. शिंगे आतल्या बाजूस वळलेली असणारा; लहान, आखूड शिंगांचा (बैल).

**मुंढवणे** सक्रि. बोथट करणे; धार बसवणे.

**मुंढा-डा** पु. खांद्याचा गोल भाग; खांदा. (वा.) **मुंढे फिरणे** - खांदे गोलाकार होणे; खांदे भरणे.
वि. १.डोके; माथा; टोक; शेंडी, शिंगे किंवा अग्र नसलेला (प्राणी, झाड, बोट, चाकू, नारळ इ.).२. कडा, गळा, काठ इ. नसलेले (भांडे). ३. निव्वळ, केवळ, फक्त शंभरच असा पंचोतरी व सळी नसलेला (शेकडा). ४. विरहित; साधा; ओका; दागिने नसलेला; मुंडा. ५. शिंगे मागे वळलेला. ६. छत्र नसलेले (सिंहासन); सिंहासनाला छत्र असण्याचा अधिकार नसलेला (मांडलिक). [सं. मुंड]

**मुंढा** पु. केळीच्या पानातील मोठे पान; डांगा.

**मुंढावळ** स्त्री. १.कमळ, पोशेरे इ.चे अंकुर किंवा कोंब. २. मुंडावळ.

**मुंढाहात** पु. कोपरापासून वळलेल्या मुठीपर्यंत लांबीचा हात (लांबी मोजण्याचे एक प्रमाण); साधारण पाऊण हात.

**मुंढीवसात** स्त्री. गावच्या पाटलाचा एक शिकारीसंबंधी हक्क :'मुंढीवसात व शिकार उभयतांनी वांटून घ्यावी.'- वाडशाछ १.१४९.

**मुंढे फिरणे** गलीत कवडी फेकून खेळण्याच्या कवड्यांच्या खेळातील एक डाव.

**मुंढे(ढ-ढा)री** स्त्री. पावसाचे पाणी भिंतीत न मुरता वाहून जाण्यासाठी म्हणून भिंतीवरील उतरता केलेला भाग; वरवंडी; वरंडी; भिंत बांधून झाल्यावर शेवटी बांधलेला निमुळता, पायऱ्यावजा भाग.

**मुंढ्या** पु. मुसलमान हिजड्यांचा गुरू.

**मुंद(दा)विणे, मुंद(ध)णे** सक्रि. बंद करणे; भरून काढणे; बुजवून टाकणे (भोक, मार्ग, बीळ, फट इ.).

**मुंब** पु. १. विशिष्ट घाटाचे मोठे मडके. २. विशिष्ट प्रकारचे गलबत. पहा: **मुमडा**

**मुंबई** स्त्री.१.(वि.ना.)एक शहर; या शहराची अधिष्ठात्री देवी मुंबा ही आहे. २.(ल.) माणूस, पशू किंवा पदार्थ इ.बेपत्ता होणे. ३. सत्यानाश; पूर्ण विध्वंस.४. धपके मारणे; खरडपट्टी काढणे. ५. माणसाच्या चरबीपासून मलम तयार करणे. ६. मृत शरीराचे इजिप्तमधील ममीप्रमाणे संरक्षण करणे. (वा.)**(जिवाची) मुंबई करणे**-चैन करणे; मजा मारणे.

**मुंबर** न. तरुणपणी तोंडावर उठणारे पुरळ; तारुण्यपीटिका; मुरुम.

**मुंबर** पु. फुफाटा; जळजळीत तापलेली राख. पहा : **मूमर**

**मुंबरो** पु. डासासारखी चावणारी लहान माशी.

**मूक** वि. मुका; वाचा नसलेला. [सं.]

**मूकगायन** (ल.) अशक्य गोष्ट; अविद्यमान वस्तू. उदा. खपुष्प.

**मूकनाट्य** न. संवाद नसलेले व केवळ चेहरा, डोळे व शरीराच्या हालचाली यांच्याद्वारे केलेले नाटक.

**मू(मु)ग** न. मौन; स्तब्धता; मुकेपणा. [प्रा. सं. मूक] (वा.)० **आरोगणे, खाणे, गिळणे, गिळून बसणे**-(कोणी अपमान केला असता, आपणास उत्तर द्यावयास येत नसता किंवा उत्तर दिल्यास अनर्थ होईल म्हणून) न बोलता, स्वस्थपणे, मुकाट्याने बसणे.

**मूग** पु. एक द्विदल धान्य. याचे हिरवा, पिवळा, काळसर (मूग) असे प्रकार आहेत. [सं. मुद्ग]

**मूठ** स्त्री. १. पहा : **मुष्टि**. २. मुठीत राहतील इतक्या भाताच्या रोपांची जुडी; भाताची लावणी करण्यापूर्वी रोपे उपटून त्यांची केली जाणारी जुडी. ३. मुठीने पेरलेले भात. ४. हत्ती, घोडा वगैरे जनावरांच्या रोजच्या अन्नातून त्यांच्या रखवालदाराला देण्याचा मुठीच्या परिमाणाचा (पगाराहून अधिक) भाग. ५. घोड्याच्या खुराला लागून असलेला सांधा. ६. मुलींचा एक खेळ. ७. गर्भ (हाताने चाचपून पाहिल्यास गर्भाचा आकार मुठीसारखा लागतो, यावरून). ८. शेतातील पीक कापण्याच्या वेळी करण्याचे कुणबी लोकांचे देवकृत्य. ९. बैलाचे खोगीर. १०. फैर. [सं. मुष्टि] (वा.)० **आवळणे**- दुसऱ्यास देण्याचे थांबणे; चिक्कूपणा करणे, करू लागणे. ० **चेपणे, गार करणे, दाबणे, भरणे**-लाच देणे. ० **जिंकणे**-भ्रमनिरास करणे.० **मारणे** -(मंत्राने भारून मुठीत घेतलेले उडीद तांदूळ इ. दुसऱ्याच्या नाशासाठी फेकताता यावरून) मंत्रसामर्थ्याने दुसऱ्याचा नाश करणे, प्राण घेणे. **मूठभर मांस चढणे,वाढणे**-१. लठ्ठ होणे. २. गर्विष्ठ होणे. ३. फायदा झाल्याने अत्यानंद होणे. **मुठीत असणे**-(एखाद्याच्या) पूर्णपणे किंवा सर्वथैव ताब्यात, कह्यात अधिकारात असणे. **मुठी, मुठेळ्या, मुठ्या मारणे**- मुष्टिमैथुन करणे. **मुठ्या मारीत बसणे** - निरुद्योगी राहणे; आळसाने वेळ घालवणे.

**मूठदाबी** स्त्री. लाच. (क्रि. देणे)

**मूठभेड** वि. विसकळीत; अस्ताव्यस्त.

**मूठमर्द** वि. आडदांड; रगेल; दंगेखोर; दांडगे - ऐको.

**मूठमर्दाई** स्त्री. १. अन्यायाने व दांडगाईने किंवा पाशवी सामर्थ्याने दुसऱ्याचा पैसा इ. लुबाडणे. २. दांडगाई; जुलूम जबरदस्ती. ३. चोर, भामटे इ.नी एकजुटीने हल्ला करून लुबाडणे.

**मूठमाती** स्त्री. (प्रेत इ.) पुरणे; पुरण्याचा अंत्यसंस्कार. (क्रि. देणे)

**मूड** पेरणीसाठी दिलेले बीज, धान्य.- ऐको.

**मूड** पु. चित्त; लक्ष; मनाची स्थिती, अवस्था. [इं.]

**मूढ** वि. १. मूर्ख; अज्ञानी; मतिमंद; अडाणी. २. मूर्च्छित पडलेला. ३. गोंधळलेला; संभ्रमित झालेला. ४. सूर्यप्रकाशात असल्यामुळे डोळ्यांस न दिसणारा; ज्याचा अंत झालेला आहे असा (ग्रह). [सं.]

**मूढगर्भ** पु. १. मेलेला गर्भ. २. जन्मताना आडवे असलेले मूल.

**मूत-त्र** न. मूत्र; लघवी; मूत्रमार्गाद्वारे बाहेर येणारे शरीरातील क्षारयुक्त पाणी. [सं. मूत्र](वा.)० **आणणे, येणे, होणे**-१. (एखाद्यास) अत्यंत त्रास देणे; सतावणे; अत्यंत कष्टी, त्रस्त होणे. २. भीती घालणे; भिवविणे.

**मू(मु)तखडा** पु. किडनीत, मूत्रनलिकेत क्षारांचा साठा तयार होऊन तयार होणारा खडा.

**मूत्रकाम्ल** न. एक प्रकारचे आम्ल; (इं.)यूरिक ॲसिड.

**मूत्रकृच्छ** न. १. थेंब थेंब लघवी होऊन वेदना होणारा रोग; उन्हाळी. २. मूतखडा; अश्मरी.

**मूत्रपात्र** न. रुग्णांना लघवी करण्यासाठी देण्याचे भांडे.

**मूत्रपिंड** पु. ज्यामध्ये मूत्र तयार होते असा पिंड; (इं.) किडनी.

**मूत्रशोधन, मूत्रढाळ-रेच** न. पु.१. लघवी साफ होणे. २. लघवी साफ होण्यासाठीचे औषध.

**मूत्रावरोध-वष्टंभ, मूत्रस्तंभ, मूत्रा(त्र)घात** पु. लघवी कोंडणे: लघवीला न होणे.

**मूत्राष्टक** न. गाय, म्हैस, शेळी, मेंढी, घोडी, गाढव, उंट व हत्ती या आठ जनावरांच्या मूत्राला मूत्राष्टक म्हणतात. - थोर २.६७३.

**मूद** स्त्री. १. ओगराळ्यात चोपून, ठोकून पाडलेला विशिष्ट आकाराचा भाताचा, अन्नाचा गोळा. २. स्त्रियांच्या वेणीत घालण्याचा एक सोन्याचा, अलंकार; कलशाच्या आकाराचा अलंकार. ३. तंग किंवा

पट्टा ज्यावरून आवळला जातो असा झुलीचा, खोगीराचा, चामड्याचा किंवा कापडाचा तुकडा. ४. खोगिराच्या मध्यावरील मुदनी किंवा फासा. [क. मुद्द]

**मूम(मी-मू)र** पु. मुंबर; कढत, गरम, उष्ण राख.

**मूय** स्त्री. मुंगी. (गो.)

**मूय** पु. पहा : **मुयदंड**

**मूर** न. दव; दहिवर; मुऱ्हे. (कु.)

**मूर** स्त्री.१. न दिसणारे भोक; शेताचा बांध इ.मधून पाणी झिरपून जाण्यासारखी बारीक-बारीक भोके (प्रत्येकी). २. सच्छिद्रता; जिरण्याचा, मुरण्याचा अगर शोषून घेण्याचा एखाद्या पदार्थाच्या अंगी असणारा गुणधर्म, पात्रता. ३. पाझरणे; गळून जाणे; गळती. ४. धंद्यातील, व्यापारातील बूड; नुकसान; ठोकर; तूट. (क्रि. येणे, बसणे.) ५. गळतीमुळे होणारे नुकसान; मुरल्यामुळे, जिरल्यामुळे आलेली तूट. ६. तुपाची बेरी; तेलाचा तळाला राहणारा सांका; बेरी. ७. अवकाश; जागा; समावेशशक्ती; धर. ८. (दगडातील, लाकडातील) तडा; भेग; नरमपणा; शुष्कता; सामान्यतः कोणताही दोष. ९. भातशेतातील एक किडा; खार. १०. टरफलाचा किंचित भाग. ११. झाडाच्या खोडाला लागणारी खोड पोखरणारी कीड.

**मूर्ख** वि. अशिक्षित; अज्ञानी; मूढ; निर्बुद्ध; बेअकली. [सं.]

**मूर्च्छना** स्त्री. १. घेरी; बेशुद्धी; भोवळ; मूर्च्छा. २. गायनातील प्रत्येक दोन स्वरांमधील तीन सूक्ष्म स्वरांश. एकंदर एकवीस मूर्च्छना तीन ग्रामांच्या धोरणाने होतात. [सं.]

**मूर्च्छा** स्त्री. घेरी; चक्कर; बेशुद्धी. [सं.]

**मूर्च्छित** वि. बेशुद्ध झालेला; मूर्च्छा आलेला.

**मूर्त, मूर्ति-र्ती** स्त्री. १. प्रतिमा; पुतळा; निश्चित आकारयुक्त आकृती. २. देह; शरीर. ३. मनुष्य; माणूस; व्यक्ती.

**मूर्त, मूर्तिमान-मंत-वंत** वि. १. रूपाने किंवा आकाराने युक्त; देहधारी; साकार; काहीतरी निश्चित आकार, आकृती असलेला. २. खरोखर; साक्षात; प्रत्यक्ष प्रत्ययास येणारे. [सं.]

**मूर्धा, मूर्धान** स्त्री.न. १. डोके; शिर. २.(भूमिति.) पाया; पायाची रेषा. [सं. मूर्धन]

**मूर्धाभिषिक्त** वि.१. राज्याभिषेक केला गेलेला; सिंहासनाधिष्ठित; पट्टाभिषिक्त. २. (ल.) मुख्य; पुढाकार घेणारा.

**मूर्धाभिषेक** पु. राज्यावर बसताना करण्याचा अभिषेक; राज्याभिषेक.

**मूर्धावसिक्त** वि. ब्राह्मणापासून क्षत्रिय स्त्रीच्या ठिकाणी झालेला. [सं.]

**मूल** पु.स्त्री.न. १. बालक; लहान मुलगा किंवा मुलगी. २. सवंगडी.

**मूल** न. १. झाडाचे पाळ. २. (ल.) उत्पत्तिस्थान; उगम; पाया; मूलकारण. ३. पहा : **मूळ**

**मूलक** पु. पहा : **मुळा** [सं.]

**मूलक** वि. (कारणवाचक प्रत्यय) त्यामुळे झालेले.

**मूलतत्त्ववाद** पु. आपल्या धर्मग्रंथातील वचनांवर विश्वास ठेवून त्याचे पालन करणे, त्यातील अलौकिक घटना, दैवी चमत्कार यांवर श्रद्धा ठेवणे व याविरोधी कोणतीही गोष्ट अमान्य करणे अशी विचारसरणी.

**मूलद्रव्य** न.१.(रसा.) रासायनिक द्रव्याचे अंतिम घटक प्रत्येकी; ज्याचे आणखी विभाजन होत नाही असे रासायनिक मूलघटक. २. (अर्थ.) मूळ भांडवल.

**मूलपादी** पु. बिनतोंडाचा एक प्राणी.

**मूलप्रकृति** स्त्री. मूळमाया; आदिमाया.

**मूलबंध** वज्रासन योगशास्त्रातील एक बंध; आसन; योगाभ्यासी साधक योनिस्थान दाबून आणि गुदद्वार संकुचित करून अपानवायूची अधोगती मोडून ती उर्ध्व करतात. त्या योगे प्राण आणि अपान यांचा संयोग घडवतात. इथे मूलस्थानाचे बंधन होते.

**मूलभूत** वि. सर्वांस कारण असलेला; आदिकारण.

**मूलसंधी** स्त्री. प्रत्येक अवयवाचा शेवटचा, तळाचा भाग.

**मूलाधार** पु. मूळ आधार; पाया; मूळ कारण.

**मूलाज्ञान** न. मूळमाया; त्रिपुटी.

**मूलांकुर** पु. मोड.

**मूल्य** न. १. मोल; किंमत. २. वस्तूच्या सेवनाने, उपभोगाने मिळणारे सुख, समाधान. ३. वस्तूच्या मोबदल्यत मिळणारी अन्य वस्तू. [सं.]

**मूल्यदेय डाक** पोस्टाच्या मार्फत वस्तूची विक्री करण्याची पद्धत. या पद्धतीत पोस्टाने वस्तू पाठवली जाते व वस्तूची किंमत अधिक डाक हशील व पैसे पाठवण्याचे कमिशन एवढे दिल्यावर ती वस्तू खरेदी करणाऱ्याला देण्यात येते.

**मूल्यन** न. कर आकारण्यासाठी किंवा अन्य कारणासाठी वस्तूची किंमत ठरवणे.

**मूल्यनियंत्रण** न. काही कारणाने वस्तू गिऱ्हाइकाला योग्य भावात मिळावी म्हणून सरकारने विक्रीदरावर घातलेली बंधने.

**मूल्यनिर्णेता** पु. आयात वस्तूंवर कर आकारण्यासाठी त्यांचे मूल्य ठरवणारा अधिकारी.

**मूल्यनिर्देशांक** पु. वस्तूंच्या किंमतीत आधारवर्षाच्या तुलनेत होणारे बदल जाणण्यासाठी तयार केलेला निर्देशांक.

**मूल्यनिर्धारण** न. कर-आकारणीसाठी, जप्त केलेल्या वस्तू विकण्यासाठी वस्तूंची किंमत ठरवण्याची क्रिया.

**मूल्यमापन** न. १. वस्तूच्या गुणधर्मांचे वा व्यक्तीच्या गुणदोषांचे तुलनेने किंवा परिमाण लावून मूल्यांकन करणे. २.(अर्थ.) नित्याच्या विनिमय व्यवहाराच्या बाहेर वस्तूची खरेदी-विक्री करावयाची असेल तर त्यासाठी वस्तूची किंमत ठरवणे.

**मूल्यवान-वंत** वि. जास्त किमतीचा; महाग; किमती. [सं.]

**मूल्यत्व** न. (रसा.) परमाणूंची संयोगशक्ती; संयोजकता; (इं.) व्हॅलन्सी.

**मूल्यानुवर्ती** वि. किमतीवर अवलंबून असलेली; किमतीच्या प्रमाणात असलेली.

**मूल्यांकन** न. १.(अर्थ.) एखाद्या वस्तूच्या उपयोगितेचे पैशात केलेले मोजमाप. २.गुणांचे, वस्तूचे, साहित्याचे वगैरे दर्जाच्या दृष्टीने केलेले मोजमाप.

**मूल्यीकरण** न. मूल्य ठरविण्याची क्रिया.

**मूष, मूषक** पु.१. उंदीर. २. घूस. [सं. मूष = चोरणे]

**मूषकर्णी** स्त्री. १. उंदिरकानी - एक वनस्पती. २. पहा : **मुसाकर्णी**

**मूस** स्त्री. १. सोने, चांदी आटवण्याचे पात्र; धातूचा रस करण्याचे पात्र; आटणी. २. साचा. ३.(शरीर, यंत्र, काम, योजना, बेत इ.ची) घडण; रूप; आकार; रचना; घाट; ठेवण; घडी; जम. ४. (ल.) योजना; मसलत; युक्ती. ५. खाजणाच्या शेताच्या बांधाच्या आत साचणारे पाणी बाहेर जाण्यासाठी बांधात केलेले दार; मोरी. (राजा., कु.) ६. माशी. (गो.) [सं.] (वा.)० **उतरणे, ओतणे, काढणे, बनणे**- शरीराचा आकार सुंदर व घाटदार असणे. ० **धरणे**- गाठ बसणे, येणे. (व.) ० **मारून निजणे** -(ताप आला असता) मुडगुशी मारून निजणे; गुडघे पोटाशी घेऊन व डोके खाली करून निजणे. **मुसे येणे**- रूपाला येणे :'कां नादब्रह्मचि मुसं आलं ।'- ज्ञा १३.२६८.

पु. १. माग; शोध; मार्ग; पत्ता. (क्रि. काढणे, लावणे, लागणे, निघणे.) (राजा.)(वा.) **(गोष्टीची, बोलण्याची)० फुटणे**- एखादी गुप्त गोष्ट फुटणे; तिचा बभ्रा होणे, लोकांत पसरणे.

**मूळ** न. १. ईश्वर; परब्रह्म. २. संबंध. (क्रि. तुटणे)

**मूळ** न. १. झाडाचे पाळ.२. पहा : **मूल** १. ३. मूळ पुरुष; आदिपुरुष; वंशसंस्थापक. ४. आरंभ; सुरुवात; उगम; उत्पत्ती. ५. ज्यावर टीका लिहिलेली असते तो ग्रंथ. ६. मुख्य, प्रधान वस्तू, गोष्ट. ७. (ज्यो.) १९वे नक्षत्र. ८. (गणित.) एखाद्या वर्ग किंवा घन संख्येची मूळ संख्या. उदा. वर्गमूळ. ९. बोलावणे; आमंत्रण. १०. एखाद्या माणसाला घेऊन येण्याकरिता गेलेला मनुष्य; पहा: **माघारी**. [सं.मूल](वा.)० **काढणे, खणणे, झाडणे, पुसणे, मोडणे, मारणे, निर्मूळ करणे**- सर्वस्वी नाश करणे; पूर्णपणे बिघाड, नाश, उच्छेद, विध्वंस, संहार करणे. **मुळावर येणे, बसणे**- एखाद्याच्या नाशाला कारण होणे, असणे. **मुळाशी हात घालणे**-तत्त्व न सोडणे. **मूळावर जन्मणे**- मूळ नक्षत्रावर जन्म होणे; दुसऱ्याचा नाश होईल अशा अशुभ नक्षत्रावर जन्म होणे.

**मूळ(ळि)क, मुळिक** वि. पहिले; मूळचे.

**मूळकिडा** पु. बैलाच्या शिंगात उत्पन्न होणारा किडा. (व.)

**मूळकं(खं)ड** न. १. मुळी; मुळाचा तुकडा. २. झाडाची जाड मुळी. (व.)

**मूळचिठी** स्त्री. आमंत्रणपत्रिका; कुंकुमपत्रिका.

**मूळतंत** वि. सखोल विचार करणारा.

**मूळपत्र** न. १. अस्सल पत्र; मूळ दस्त ऐवज. २. परवानगीचा दाखला; परवाना : 'ते घेती नरकभूमी । मूळपत्र ।' -ज्ञा १४.२७४.

**मूळपाटी** स्त्री. ठाकर लोकांत विवाहप्रसंगी वरपित्याकडून वधूकडे जाताना सामान भरण्यासाठी उपयोगात आणली जाणारी टोपली.

**मूळपीठ** न. १. मूळस्थान; देवता ज्या ठिकाणी प्रथम प्रकट झाली असे स्थान; उगमस्थान. २. एखाद्याच्या पूर्वजांचे स्थान.

**मूळपीठिका** स्त्री.१. आदिकारण; प्रारंभ; उगम; (एखाद्या देशाची, राष्ट्राची, कामा-प्रसंगाची) सुरुवातीची स्थिती. २. समूळ हकिकत; (एखाद्या कामाचे, कृतीचे, प्रसंगाचे) सर्व मुद्दे; सर्व गोष्टी.

**मूळपुरुष** पु.१. एखाद्या वंशाचा किंवा घराण्याचा संस्थापक; आद्यपूर्वज. २. कुलाध्यक्ष; टोळीचा नायक; घराण्यातील मुख्य पुरुष.

**मूळबांध -द** पु. शेतात पाणी अडवण्यासाठी घातलेला बंधारा. (क.)

**मूळवणे** न. समूळ; उच्चाटन : 'तैसे कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासि होये पारणें । आणि संसारदुःखा मूळवणें। विकृतीविणें ।'- ज्ञा ४.२१९. क्रि. घालविणे; समूळ उच्चाटन होणे, करणे.

**मूळवैरी** पु. हाडवैरी.

**मूळव्याध** पहा : **मुळव्याध**

**मूळसाडा** पु. नवऱ्या मुलीला मूळ धाडून व तिच्या सासूला साडीचोळी देऊन तिला परत घरी नेणे; नवरी ववसून नेणे. (माण.)

**मूळस्तंभ** पु. मुहूर्तमेढ; घर बांधताना जोत्यावर प्रथम उभा केलेला खांब.

**मूळू** वि. पाच. (नंदभाषा)

**मृग** पु. १. हरिण; काळवीट. २. सत्तावीस नक्षत्रांपैकी पाचवे नक्षत्र. ३. मृग नक्षत्राचा पाऊस. ४. सामान्यपणे चतुष्पाद प्राणी; पशू; जनावर.[सं.]

**मृगजल-ळ** न. अतिउन्हाने जमीन किंवा वाळवंट तापल्याने त्यालगतच्या हवेचे थरही तापून हलके होतात. ते वर जाऊ लागले म्हणजे हवा पाण्याच्या लाटांप्रमाणे हलू लागते व ते थर पाण्याप्रमाणे भासतात. अशा रीतीने होणारा पाण्याचा भास.

**मृगजलस्नान** न. (ल.) अशक्य गोष्ट.

**मृगतृषा-तृष्णिका** स्त्री. मृगजळ पिऊन शांत होणारी तृष्णा; अशक्य गोष्ट.

**मृगनाभि-मद** पु. कस्तुरी.

**मृगबहार-बार** पु. आगोटीच्या सुमारास किंवा मृगनक्षत्राचे वेळी येणारा, बहर; पहिला बहर. पहा : **आंबेबार,हत्तीबार**

**मृगया** स्त्री. शिकार; पारध. [सं. मृग = शोधणे]

**मृगलांछन, मृगांक** पु.१. मृगाच्या आकाराचा डाग (कलंक) (चंद्रावरील). २. मृगाची आकृती धारण करणारा; चंद्र.

**मृगशिर-शीर्ष** न. मृगनक्षत्र.

**मृगशीर्षक (हस्त)** पु. (नृत्य.) मूठ मिटून नंतर अंगठा व करंगळी उभी करणे.

**मृगसेवडी** स्त्री. कृष्णाजिन; हरिणाचे कातडे : 'वरी चोखट मृगसेवडी । माजी धूतवस्त्राची घडी ।' - ज्ञा ६.१८२.

**मृगासन** न.१. बसण्याचे हरिणाचे कातडे. २. देवडीच्या दोन्ही बाजूंस असणाऱ्या ओट्यापैकी प्रत्येक ओटा. ३. रांगोळीची एक आकृती.

**मृणाल** न.पु. कमळाचा देठ. [सं. मृण् = इजा देणे]

**मृणी** बसण्याचा पाट. (हेट.)

**मृण्मय** वि. मातीचे बनवलेले. [सं. मृत् + मय]

**मृत** वि.१. मेलेला; प्राण गेलेला; जीवनशक्ती नाहीशी झालेला (प्राणी, वनस्पती). २. (ल.) निष्फळ. ३. पहा : **मेला** २. ४. (वैद्यक.) भस्म केलेला (धातू). [सं. मृ = मरणे]

**मृतक** न. १. सुतक. २. अन्त्यविधी; मृताची क्रिया. ३. प्रेत.

**मृतगोदान** न. पहा : **मृत्युगोदान**

**मृतवत्सा** स्त्री. जिची मुले जन्मताच किंवा लहानपणी मरतात अशी (स्त्री, गाय, म्हैस इ.).

**मृताशौच** न. सुतक.

**मृताह** पु. मृत्युदिन; पुण्यतिथी. [सं. मृत् + अहन्]

**मृति-ती** स्त्री. मरण; मृत्यू.

**मृत्तिका** स्त्री. माती; अनुष्ठानासाठी किंवा शांतिकर्मात वापरली जाणारी एखाद्या विवक्षित जागेची माती. [सं.]

**मृत्यंग** न. शरीराच्या ज्या भागावर आघात केला असता तत्काळ मरण येते असा शरीराचा भाग; मर्मस्थान.

**मृत्यु-त्य-त्यू** वि. १. मरण; अंत. २. यम; अंतक. [सं. मृ=मरणे](वा.) **मृत्यूचा फासा पडणे**- मरणोन्मुख होणे; मरणे.

**मृत्युगंडान्त** न. पु. जीवावरचे संकट, प्रसंग; मरणप्राय संकट; मरण.

**मृत्युगोदान** न.१.(प्र.)मृतगोदान; मेलेल्या गाईचे दान. (एका कंजूष माणसाने मेलेल्या गाईले, नेऊन टाकण्याचा खर्च वाचावा म्हणून तिचे मरणप्राय स्थितीत दान केले . अशा दंतकथेवरून रूढ.) २. (ल.) मरतुकडा; अत्यंत कृश व अशक्त असलेला मनुष्य किंवा पशू. ३. (ल.) निर्वीर्य मनुष्य; पुचाट माणूस; मेमलतोंड्या.

**मृत्युदर** पु. लोकसंख्येच्या दर हजारी एका वर्षात मृत्यू पावलेल्या व्यक्तींचे प्रमाण.

**मृत्युपत्र** न. मृत्यूनंतर आपल्या सर्व प्रकारच्या मालमत्तेची व्यवस्था कशी करावी याविषयी केलेले लेखी निवेदन.

**मृत्युपंचक** न.(ज्यो.) एक अशुभ योग. या योगावर जन्म झाल्यास मरणाची भीती असते.

**मृत्युप्रतिवेदन** न. अनैसर्गिक मृत्यूच्या संदर्भात तो कसा, केव्हा झाला इ. माहिती देणारे निवेदन.

**मृत्युयोग** पु.(ज्यो.)एक कुयोग. रविवारी अनुराधा, सोमवारी उत्तराषाढा, मंगळवारी शततारका, बुधवारी आश्विनी, गुरुवारी मृगशीर्ष, शुक्रवारी आश्लेषा व शनिवारी हस्त याप्रमाणे त्या-त्या वारी नक्षत्रे आली असता मृत्युयोग मानला जातो.

**मृत्युलेख-वार्ता** पु. स्त्री. एखाद्याचा मृत्यू झाल्याची वर्तमानपत्रातील वार्ता किंवा लेख; सर्व संबंधितांना कळवण्यासाठी वर्तमानपत्रात दिलेली एखाद्याच्या निधनाची जाहिरात; (इं.) ऑबिच्युएरी.

**मृत्युशुल्क-कर** न. पु. मरण पावलेल्या व्यक्तीच्या मालमत्तेवर देण्याचा कर.

**मृत्युषडाष्टक** न.(ज्यो.) मेष-कन्या, तूळ - मीन, मिथुन- वृश्चिक, सिंह- मकर, कर्क-कुंभ, वृषभ-धनू. या प्रत्येकी दोन राशींतील अंतर सहा व आठ आहे. म्हणून त्यास षडाष्टक म्हणतात. हे योग विवाहकार्यास वर्ज्य मानले जातात.

**मृत्युंजय** पु.१. शिव; शंकर. २. (वैद्यक.) एक मात्रा; औषध. बचनाग, गंधक, मिरी, टाकणखार, पिंपळी ही औषधे एकेक मात्रा व हिंगुळ दोन भाग घेऊन आल्याच्या रसात खलून त्याच्या केल्या जाणाऱ्या गोळ्या. त्या सर्व प्रकारचा ज्वर नाहीसा करण्यासाठी उपयोगात येतात. [सं. मृत्यु+जि =जिंकणे]

**मृदंग** पु. १. पखवाज; एक वाद्य. २. (संगीत) एक गती. गायनारंभी विलंबित, मध्ये मध्य व अंती द्रुत किंवा उलट अशी लयीची गती.

**मृदंगी-ग्या** पु. १. मृदंग वाजविणारा; पखवाजा-जी. २. आट्या-पाट्यांच्या खेळातील मुर्दुग्या; सूरपाटी धरणारा.

**मृदु-द, मृदुल** वि.१. मऊ; नरम; खरखरीत नसलेला. २. कोमल; नाजूक; लवचीक; नम्र. ३. (ल.) सौम्य; सोपे; साधे; शांत; नम्र; गोड, कठोर नसलेले (भाषण).

**मृदुकाय** पु. अपृष्ठवंशीय प्राण्यांमधील एक वर्ग. यात गोगलगाय, पिकूळ, कवडी, कालवे, शिंप इ. प्राणी येतात.

**मृदुली, मृदोली-ळी** स्त्री. मऊ गिरदी.

**मृदुवल्या** स्त्री. अव. एक कोकणी पक्वान्न; सांधणाचा एक प्रकार.

**मृदूच्च** (ज्यो.) ग्रहांच्या कक्षेतील सूर्यापासून अतिदूरचा बिंदू; मंदोच्च.

**मृषा** वि. खोटे; मिथ्या; नकली.
क्रिवि.१. खोटेपणाने; लुच्चेगिरीने; फसवून. २. निष्फळ; फुकट.

**मे** पु. इंग्रजी वर्षाचा पाचवा महिना.

**मे** पु. संगम; मीलन; एकत्रीकरण; मेळ. (अहि.)

**मेक(कु-कू)ड** न.पु. नाकास चिकटलेला वाळलेला शेंबूड; नाकातील मळाच्या खरपुड्या.

**मे(में)कण** न. कानातील मळ. (राजा.)

**मेकलणे** सक्रि. घट्ट बांधणे. पहा : **मेखलणे**

**मेका(क)ड-डा** न.पु. भाजीपाला, पिके यांवरील रोगरूप क्षुद्र जंतू; विशाखा नक्षत्राच्या पावसाने पिकांवर पडणारा रोग.

**मेकुन्या** स्त्री. द्विदल धान्यातील बारीक, काळपट, किडलेले दाणे.

**मेख** स्त्री. १. खुंटा; खुंटी. २. खोच; रहस्य; गूढ गोष्ट. ३. लोखंड इ. धातूचा खिळा; अडकण. ४. अलंकार म्हणून दातात बसविलेली सोन्याची चूक. ५.(ल.)धष्टपुष्ट व बळकट मनुष्य, पशू. [फा. मेख्] (वा.)० **ठेवणे**- एखादा करार, कबुलायत करताना त्यात विशिष्ट खोच, अट घालणे, ठेवणे.० **बसणे**- अडवणूक, अटकाव होणे; मेखलले जाणे. ०**मारणे**-१. जोराने, पुरतेपणी थांबविणे, बंद करणे; अडकवून ठेवणे. (चालू व्यापार, धंदा, काम इ.). २. प्रतिपक्षाचे काही न चालेल अशी तजवीज करून ठेवणे, विघ्न आणणे. ० **सोसणे, (हातावर) घेणे** -(वाईट कृत्ये करण्यात किंवा त्याबद्दल दुःख भोगण्यात) अतिशय धैर्य, राकटपणा, सोशिकपणा असणे. **मेखा उचटणे, उपटणे, खांद्यावर घालणे, देणे**- ताबडतोब पाठवणी करणे; काढून देणे; घालवणे, निखळणे. **मेखा घेणे**- १. (आपल्या तंबूकरता गावच्या सुताराकडून) फुकट व जुलमाने काम (मेखा) करून घेणे. २. बळजबरी करणे; जुलमाने घेणे; सूड घेणे; जुलमाने हानी भरून काढणे. **मेखाटीस, मेखाटणीस बसणे** - हट्ट धरून बसणे; पाठीस लागणे. **मेखेवर बसविणे**-सरळ, नम्रपणे न वागता वाकडी गोष्ट सांगणे.

**मेख(क)चू-सू** पु. मेख ठोकण्याची मोगरी; तंबूच्या मेखा ठोकण्याचा ठोकळा.

**मेखल(ळ)णे** उक्रि. १. (घोडा, बैल इ.) मेखेस, खुंट्यास बांधणे, गुंतविणे. २. (ल.)चालते काम थांबवणे, बंद पाडणे. [सं.मेखला]

**मेखला** स्त्री. बैलगाडीच्या जोखडाच्या खुंट्या (प्रत्येकी).

**मेखला-ळा** स्त्री. १. उपनयनसंस्कारात त्रैवर्णिकांनी कमरेला बांधण्याचे तिहेरी कटिसूत्र. हे कटिसूत्र वर्णपरत्वे भिन्न असते. २. स्त्रियांचा कमरपट्टा; कटिबंध; सांध्यावर, फाश्यावर सिंहाचे मुख वगैरे चित्र असलेला कमरपट्टा. ३. तलवारीच्या मुठीस बांधलेली दोरी; साखळी. ४. कफनीसारखा झगा(तंजा.); कमरेस गुंडाळण्याचे वस्त्रविशेष :'समर्थे कंथा मेखळा देऊन स्थळासी आणिले।' -सप्र २१.५५. [सं.]

**मेखलाबंधन** न. मेखला बांधण्याचा विधी; उपनयनविधी. [सं.]

**मेखलामुख** वि. नेवराच्या (तंगडीच्या) पुढच्या भागाच्या उजव्या बाजूस वळलेला भोवरा असलेला (घोडा). हे अशुभ लक्षण आहे.

**मेखाटणे** सक्रि. १. मेख, खुंटी मारून बसणे; खिळून टाकणे.२. (ल.) ठोकणे; चोपणे; तासडणे; सतावून त्रास देणे. (वा.) **मेखाटणीस, मेखाटीस बसणे**-पुरता पिच्छा पुरवणे; पाठीस लागणे; हट्ट धरणे, धरून बसणे.

**मेखाटी** स्त्री. मेख; खुंटी. (बहुधा मेखाट्या असा अनेकवचनी उपयोग करतात.)(वा.)० **खांदाडास देणे**- एकदम काढून देणे, घालवणे; वाटेला लावणे.० **घेणे**-१. वेठीस धरून काम करून घेणे. २. ठोकणे; तासडणे; अतिशय गांजणे.

**मेख्या** वि. खमक्या; शारीरिक किंवा मानसिक शक्तीने इतरांना दडपून टाकणारा; वस्ताद; पुरून उरणारा; खंबीर.

**मेघ** पु. १. ढग; घन; जलद. २. हिम. [सं.]

**मेघडंबर-री** स्त्री.१.छत; मंडपी; उंच छत्री. २.घुमट; हत्तीवरील अंबारी. वि. मंडपी; छत असणारा.

**मेघ(घा)डंबर** न. पु. १. मेघांनी भरून आलेले आभाळ; ढगांचे छत. २.(ल.)पोकळ धमकावणी; व्यर्थ वल्गना; भयंकर पण निष्फळ देखावा.

**मेघतडित** स्त्री.(शाप.) ढगातील वीज; (इं.) लाइटनिंग.

**मेघतडिद्वाहक** पु. ढगात उत्पन्न होणाऱ्या विजेपासून संरक्षण होण्यासाठी इमारतीच्या उंच भागावर बसवून जमिनीत पुरलेल्या धातूच्या पट्ट्या (प्रत्येकी); (इं.) लायटनिंगकंडक्टर. [सं. मेघ+तडित्+वाहक]

**मेघमल्हार** पु. (संगीत) एक राग. गानसमय मध्यरात्र. परंतु वर्षाऋतूत सार्वकालिक.

**मेघमाला-ळा** स्त्री.१. ढग; ढगांची ओळ. २. रहाटगाडग्यावरील गाडग्यांची माळ.

**मेघमाळ** स्त्री. कागद कातरून केलेली माळ; नक्षत्रमाळ. पहा : **रंगमाळ**

**मेघरंजनी** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर.

**मेघवर्णी** वि. ढगासारख्या भुरकट रंगाचे. [सं.मेघ + वर्ण]

**मेघश्याम** वि. ढगासारखा काळासावळा; घनश्याम.

**मेघळ** वि. ज्यात वीज चमकते अशा ढगासारखा काळा.

**मेघुडा** पु. प्रलयकाळचा मेघ :'मग मेघुडे विराले ।'- विउ ५.४५.

**मेघौडे** न. मेघांचा समुदाय; वादळ :'तेथ मनाचें मेघौडें विरे ।'- ज्ञा ६.४६६.

**मेच-चु** स्त्री. प्रीती; आवड.'तैं माधुरीं रसीं वाढे । मेचु तया ।'- ज्ञा १७.१२५.

**मेच** पु. कळकाची, बांबूची एक जात. (को.)

**मेचक** न. एक उपरत्न. हे दृष्टी निर्मल करणारे, सौभाग्यदायक व वशीकरण करणारे असते.
वि. काळा.
पु. मोराच्या पिसावरील डोळा.

**मेचकाड** न. गुडघे दुमडतात ती पोटरीच्या वरची जागा.

**मेचके** न. सांध्याच्या आतील वळण; वाकण; बेचकी.

**मे(में)चणे** उक्रि. १. मोजणे; मानणे; ऐकणे; जमेत घेणे; जुमानणे; (निषेधार्थी प्रयोग) मानणे; खिजगणतीस धरणे :'बुद्धि मेंचवेना धोंडी।'- ज्ञा १४.२४६. २. कचरणे; कचणे; भिऊन माघार घेणे :'मरण जवळि आलें काळ कोणास मेचे।'- सारुह ४.९०.३. आटोपणे. ४. इच्छिणे. ५. ताब्यात येणे; मऊ होणे; हार खाणे.

**मेचणे** सक्रि. स्तुती करणे, मानणे. [क.मेच्चु; सं. मिच्छ्]

**मेचला** वि. बोलण्यास लाजणारा, बुजरा; भिणारा; मेमलतोंड्या.

**मेचाड** वि. अशक्त; दुर्बळ. (व.)

**मेचुवणे** क्रि. मोजता येणे; अनुमान करता येणे.

**मेज** न. लिहिण्यासाठीचे लाकडी घडवंचीसारखे साधन; (इं.) टेबल. [फा. मेझ्]

**मेजणे** सक्रि. १. अंक किंवा प्रमाण मोजणे. २. (ल.) गणणे. (गो.) [सं. मा]

**मेजमंडळी** स्त्री. कार्यकारी मंडळ. (गो.)

**मेजमांडप** पु. सोडावॉटर इ. विकण्याचे दुकान. (गो.)

**मेज(झ)र** न. (छाप.)जुळलेल्या मजकुराचे एका पृष्ठाच्या लांबीचे प्रमाण.(इं.)

**मेजल** क्रिवि. मर्यादित शक्तीचे :'मेजलयां देवा मेळावा'- मूप्र २६०५. [सं.मा]

**मेजवा(मा-बा)न** वि. १. मेजवानीस, भोजनास बोलवलेला (मनुष्य, पाहुणा). २. कुटुंबातील आळशी व निरुपयोगी माणूस. ३. (क्व.) मेजवानी देणारा (यजमान).४. (मेसमन या इंग्रजी शब्दाशी साम्य जोडून चुकीने) खानावळवाला; खानसामा. [फा. मेझबान् - मान्]

**मेजवा(मा-बा)नकी-गी, मेजवा(मा-बा)नी** स्त्री.१. आप्तेष्टांना मिष्टान्नभोजन घालणे. २. थाटाचे जेवण; आतिथ्य; मेहमानी. ३. नजराणा.४. स्वागत-खर्च. [फा. मेझ्बानी]

**मेजोटी** स्त्री. (गोफ, कड्या, मणी इ.) दागिन्यांचे माप घेण्याचे सोनारी हत्यार.

**मेझर** न. पु. लोखंडाची वा पत्र्याची मोठी टाकी. (अहि.)

**मेट** अ. आधिक्य, प्रकर्ष दाखविण्यासाठी 'काळोख' शब्दाबरोबर योजतात. उदा. काळोखमेट = अंधारगुडूप. [क. मेटी=उच्चता]

**मेट-टे** न. १. गुडघ्याचा सांधा. २. चौकी; पहारा; गस्त; पहाऱ्याची जागा; ठाणे. ३. दार धरणे; विवाहसोहळ्यातील एक भाग. (विवाहानंतर वर वधूस घरी आणतो त्या वेळी वराची बहीण दार अडवून भावास, आपल्या मुलासाठी त्याची मुलगी देण्याविषयीचे वचन मागते, तो विधी). ४. अवसान; हिंमत. (क्रि.बसणे)[सं. मिथ्] (वा.)**मेटा असणे** - मुडा असणे (माण.)० **पडणे**- हातपाय गळणे, गाळणे.

**० मारणे, मारून पडणे**- (बैल इ.च्या) शरीराचा लोळागोळा होऊन पडणे. **० मारणे, मारून बसणे**-पाय दुमडून गुडघ्यावर हनुवटी टेकून बसणे.**मेटे घालणे**-१. गुडघे टेकणे. २. वार्धक्यामुळे, अशक्ततेमुळे गुडघे मोडणे; खचणे. **मेटे धरणे**- संधिवाताने गुडघे आखडणे, दुखणे.**० बसणे**- १. वार्धक्यामुळे अवसान खचणे. २. कचरणे; कचणे; धीर खचणे. **मेटे वळणे**- गुडघे हनुवटीला टेकून गुडघ्याभोवती दोन्ही हातांचा विळखा देऊन बसणे.

**मेट(टे)करी** पु. मेट्यावरील, माळ्यावरील चौकीदार.

**मेटका** स्त्री. १.पहा : **पेटका**. २. पहा : **मेंडका-की**

**मेटचे** अक्रि. जुळणे. (गो.)

**मेटण** न. शिवणे; शिवण. (गो.)

**मेटणे** क्रि. दगडाला टाकी देणे.

**मेटा(टे)कुटी-खुटी-खुंटी** स्त्री.१.ढोपर टेकून बसण्याची रीत, ढोपरखुंटी. २. महत्प्रयास; निकर. (वा.)**मेटाकुटीस, मेटेखुंटीस, मेटाखुटी येणे**- १. घातलेली मांडी काढून गुडघ्यावर उभे राहणे (एखाद्यास मारण्याकरिता वादात वरचष्मा होण्याकरिता). २. नेटाने खेचण्याकरिता, ओढण्याकरिता गुडघे टेकून उभे राहणे (मनुष्य, पशू यांनी). म्हातारपणामुळे गुडघे खचणे. ४. हट्टास पेटणे :'हमामा घालिती कडोकडी । मेटाखुंटी येऊनिया।'- ह १०.९५. ५. शिकस्त करून कंटाळणे; अगदी दमणे, त्रासणे. **मेटेखुंटीस बसणे**- गुडघे टेकणे.

**मेटाणणे** अक्रि. तेलकट घाण येणे. (ना.)

**मेटी** स्त्री. मळणीनंतर रास खळ्यात ओतल्यावर त्यामध्ये पुरलेला खांब; मेढ. (बे.) [सं. मेथि-ठी; क. मेटि]

**मेटी-ठ्या** पु. मुख्य; म्होरक्या; पुढारी.

**मेटी रयत** गावचा मुख्य शेतकरी.

**मेटीव** वि. ओबडधोबड; कसातरी बनवलेला (दगड इ.).

**मेटे** न. लाकडी किंवा दगडी कामात राहिलेली खाच, फट, चढ. एका दोरीत नसलेला भाग.

**मेठ** स्त्री. संघ; समुदाय; जूट. (व.)

**मेठकर** पु. मजुरांच्या मेठाचा मुख्य. (व.)

**मेड** १. प्रकार; नियम. २. न्याय. -ऐको.

**मेड** स्त्री. १. पहा : **मेढ**. २. आधारस्तंभ. ३. मेख. ४. भिंत; भिंताड. ५. पाणी नसलेला खोल ओहळ किंवा ओढा.

**मेडका** पु. मेढ; खुंट (विशेषतः दुबेळके असलेला).

**मेडभूक** स्त्री. मरताना लागणारी जोराची भूक. (कु.)

**मे(में)डा** स्त्री. हद्द; सरहद्द; सीमा.

**मे(में)ढ-ढी** स्त्री.१.वरच्या टोकास दुबळके असलेले; छपरासाठी, मांडवासाठी जमिनीत पुरून जे उंच उभे करतात असे लाकूड. (को.) २. आखूड खांब. ३. गुरे बांधण्याचा खुंटा. (को.) ४. ध्रुवतारा. ५. आधारस्तंभ. ६. दोरीचा पीळ. [सं. मेठि-थि-धि]

**मे(में)ढकी-के** स्त्री.न. लहान मेढ.

**मेढशिंगी** स्त्री. मेंढ्याच्या शिंगाच्या आकाराची फळे असलेली दुधाळ व काटेरी वनस्पती; काकडशिंगी. [सं. मेषशृंगी]

**मेढा** पु. १. दुबेळके असलेला खुंट, खांब; डांग. २. खुंटांची दाट उभारणी; कुंपण; लाकडी कोट, कठडा. ३. पाठीराखा; पाठिंबा देणारा.४. दोऱ्यातील तेढ, अढी. ५. त्रिशूळ. ६. धनुष्य; धनुष्याची कांबीट : 'मेढा निगुती वाहिला ।' -एरुस्व १०.२५. (वा.) **० वाहणे**-प्रतिज्ञा करणे.

**मेढाव(वि)णे** उक्रि. एखाद्या जागेच्या भोवती मेढी पुरून कुंपण करणे; आवार घालणे.

**मेढिंगमत-ती, मेढिंग्या** पहा : **मेढेमत, मेढेजोशी**

**मेढी-ढे** स्त्री.न. १.पहा : **मेढ-ढी**. २. लहान मेढ. ३. आडव्या फळीस, तुळईस धीर देण्यासाठी खांबासारखा उभा केलेला दुबेळका किंवा बिन दुबेळका लहान खुंट. ४. खळ्यात मधोमध पुरलेला खांब; तिवडा.

**मेढीचे केल-ळ** मेढीच्या वरच्या बाजूस लाकूड ठेवण्यासाठी राखलेले सुमारे हातभर लांबीचे दोन फाटे; दुबेळके; मेढीचा शेंडा. (को.)

**मेढेकरी** पु. आधारस्तंभ; आधार.

**मेढेकोट-बंदी** पु. मेढा; लकडकोट; लाकडाचे दाट, मजबूत कुंपण.

**मेढेजोशी** पु. १.जमिनीत खुंटे पुरून तिथी इ.ची गणना करणारा जोशी. २. भविष्यकथन, शकुन पाहणे, शुभाशुभ काल सांगणे, पंचांग करणे इ. कामे करणाऱ्यांचा एक वर्ग किंवा त्यातील एक व्यक्ती. हे शूद्र असून मेढेमताचे अनुयायी असतात. पहा : **मेढेमत**. ३. (उप.) गावचा पिढीजाद, वतनदार जोशी. ४. महारांचा धर्मगुरू. पहा : **दाकोता**

**मेढेदाई, मेढेदाईक** वि. शेजाऱ्याच्या आवारापासून आपले आवार वेगळे करण्यासाठी आपल्या हद्दीवर कुंपण घालणारा शेतजमिनीचा मालक.

**मेढेमत** न. उत्तर ध्रुवाच्या ताऱ्यावरून बसवलेले एक ज्योतिषमत. शूद्रांत हे मत प्रचलित आहे. यावरूनच मेढेजोशी किंवा डौरीजोशी यांचा वर्ग निघाला.

**मेढ्या** वि.१. (कुटुंब, सैन्य, मंडळी इत्यादींचा) आधारस्तंभ असलेला; पुढारी; मुख्य. २. लबाडीच्या, लुच्चेगिरीच्या कामात तरबेज असलेला. ३. पहा : **मेढेजोशी**

**मेढ्र** पु. १. मेंढा. २. शिश्न. [सं.]

**मेण** न. पहा : **म्यान** :'मेण शिकल केली.'- ऐपो ४३०. [फा. मियान]

**मेण** न.१. मधाच्या पोळ्यातून निघणारा चिकट, घट्ट, चरबीसारखा पदार्थ. २.जनावरांच्या शरीरातून किंवा वनस्पतीपासून काढण्यात येणारा वरीलसारखा पदार्थ; तेलाची बेरी. ३. मासे मारण्याकरिता त्रिफळे, गेळफळ, निवळकांडे इ. कुटून तयार केले जाणारे विषारी औषध. (कु.) .[फा. मोम] (वा.)**० काढणे**- खूप चोपणे, झोडणे, मारणे.**० स्वस्त होणे**-(मनुष्य) लठ्ठ व गुलगुलीत होणे. **० होणे**-१. नरमावून सौम्य, शांत होणे. २. शिजून मेणाप्रमाणे होणे (भात, डाळ इ.). **मेणाची चोटली कढयता**- ओढून चंद्रबळ आणणे.

वि. (ल.) मऊ व चांगला शिजलेला पदार्थ (तांदूळ, डाळ इ.)

**मेणकट** न. (समई, तेलातुपाच्या भांड्याला चिकटून असणारी) तेलाची घाण, मळ, चिकटा, बेरी.

वि. घाण तेलाने, तुपाने माखलेला; मेणचट; तेलकट; ओशट (वास).

**मेणक(कु)टणे** अक्रि. मेणकट लागणे; घाण तेलातुपाने माखले जाणे (भांडे).

**मेणकापड** न. मेण लावून बनवलेले जलरोधक कापड.

**मेणगट, मेणकुटला** वि.अतिशय शिजवल्याने मऊ व मेणासारखा झालेला (भात).

**मेणगोळी** स्त्री. १. मेणाची गोळी. २. (ल.) मऊ, नरम, सौम्य मनुष्य.

**मेणघुणा–ण्या** वि. १. सौम्य, शांत, गंभीर मुद्रेचा पण मनाचा कुढा. २. लबाड मनुष्य; न बोलणारा, आतल्या गाठीचा माणूस.

**मेणचट** वि. १. मेणगट; कण्या न पडलेले (तूप). २. गिच्च व पचपचीत (शिजवण्यात बिघडलेले अन्न). ३. मंद; ढील; गयाळ; सुस्त; निर्जीव; उत्साह, धैर्य, पाणी नसणारा. ४. कृपण; कंजूष.

**मेणचोट–ट्या** वि.१.नपुंसक; निर्बल; नामर्द. २. जड; रेंगाळणारा; मेंग्या मारवाडी. ३. भोळसट. ४. निष्क्रिय.

**मेणजोगी** पु. भैरवाच्या उपासकांची एक जात.

**मेणतेल** न. तेलात शिजवलेले मेण.(स्त्रिया कुंकू लावताना हे मेणतेल कपाळास लावून त्यावर पिंजर लावतात.) (गो.)

**मेणबत्ती** स्त्री. मेणाने मढवलेली वात; मेणाचा दिवा. [फा. मोम, मूम+बत्ती]

**मेणबाजार** पु. दररोज दुकानासाठी पाले द्यायची व ती रात्री काढायची – अशी दुकाने असलेला बाजार; जुना बाजार. हा मुख्य रस्त्यात नेहमीच्या दुकानाशी समांतर ओळीत भरवला जातो.

**मेणबाजारी** पु. १. मेणबाजारातील दुकानदार, माल विकणारा. २. (ल.) पत नसलेला, बेअब्रूचा माणूस.

**मेणबावली** स्त्री.१.(ल.)लहान, सुबक, नेटकी व चपल स्त्री. २. गरीब, दुसऱ्याच्या तंत्राने चालणारी बायको.

**मेणवला** वि. (प्र.) मेणोला. पहा : **मेणा**

**मेण(णा)वणे** १. मेण, तेलाच्या तळची बेरी, तेलात भिजवलेली चिंध्यांची राख इ.नी सूप, टोपली मढवणे; लेप देणे. २.(ल.) गोंडस, लठ्ठ बनणे.

**मेणा–ना** पु. झाकलेली पालखी; डोलीसारखे परंतु चारही बाजूंनी बंद, पेटीवजा, खांद्यावर वाहून नेण्याजोगे वाहन. पहा : **पालखी** [फा. मियाना]

**मेणा–ण्या** वि. मेण, तेला–तुपाचा गाळ, जाळलेल्या चिंध्या, शेण्यांची राख इ.च्या मिश्रणाने लेपलेला (हारा, टोपले, सूप, पाटी इ.).

**मेणाचा, मेण्या** वि. १.मऊ; अशक्त; कमकुवत. २. नरम; निर्जीव. ३. अयोग्य; नामर्द; अक्षम. ४. धिक्कार, तिरस्कार दाखविण्यासाठी नेहमी योजना. ५. मंद; धारिष्ट नसलेला.

**मेणाळ** स्त्री. (जरतारधंदा) मेण असलेली, लावलेली तार.

**मेणी** स्त्री. १.तेलकट काजळ; मस; घाण. २. केसांच्या वळलेल्या जटा. ३. काकडीची एक जात.–कृषि ४८२. (ठाणे) ४. दगडात असणारे हिरव्या रंगाचे पडदे वा डाग. – शिल्पकला विज्ञान १.३.१२.

**मेणी मोडशी** जुनाट, फार दिवसांची मोडशी.

**मेणे** न.१. जिच्या चिकाने मासे आंधळे होऊन सहज सापडतात (अशी नदी इ.च्या प्रवाहात टाकली जाणारी) वनस्पती; कांड्या हुरा. (को.)२. माशांना मारण्याकरिता, गुंगी आणण्याकरिता नदीत टाकलेला चिकचिकीत पदार्थ.

**मेणेकरी** पु. मेणा वाहून नेणारा माणूस; भोई.

**मेणे डोळे** डोळे आले असता त्यातून अतिशय पू वाहणारे, फार बरबरणारे डोळे; बरबरीत, पुवाचे डोळे; शेणे डोळे.

**मेणे वावर** (रब्बीच्या पेरणीकरिता) नांगरून, खत घालून, राखून ठेवलेले शेत.

**मेणोल–ला** वि. पहा : **मेणा**

**मेण्या मारवाडी** पहा : **मेंग्या मारवाडी**

**मेण्या साप** पु.१. सापाची एक जात. २. (ल.) गुप्तपणे आकस धरून नाश करणारा मनुष्य.

**मेत(थ)कूट** न. १. तांदूळ, निरनिराळ्या डाळी, मोहरी, मेथी इ. भाजून एकत्र दळून केलेले पीठ. एक तोंडी लावण्याचा पदार्थ. यात दही घालून तयार करण्यात येणारे तोंडीलावणे. २. (ल.) मेळ; एकी; दृढ मैत्री. (क्रि. जमणे, मिळणे.) [सं.मिथः कूट; सं. मित्र–प्रा. मित+ कूट]

**मेथवणी** न. मेथीच्या काड्या घालून केलेली आमटी.

**मेथा** पु. १. शिक्षक. २. शिष्ट. [सं. महत्तर]

**मेथा, मेहेता** पु. गुजराथी लिहिणारा कारकून; हिशेबनवीस.

**मेथी** स्त्री. मेंदी. (को.)

**मेथी** स्त्री. १. एक पालेभाजी. हिच्या जून झाडावर शेंगा येतात, त्यात मेथ्या असतात. २. या भाजीचे बीज; एक उपधान्य. [सं. मेथिका]

**मेथोडा** पु. (बाळंतीण इ.साठी केलेला) मेथ्यांचा लाडू.

**मेद** स्त्री. आल्यासारखे एक मूळ. आठ मुख्य औषधी द्रव्यांपैकी एक. [सं. मेदा]

**मेद** पु.१.चरबी; शरीरातील सप्तधातूंपैकी एक. २. स्थौल्य; पुष्टता; लठ्ठपणा. [सं.]

**मे(में)दगी** स्त्री.१.नवा गिलावा केलेल्या भिंती सारवण्यासाठी बकऱ्या –मेंढ्यांच्या लेंड्यांमध्ये माती–मसाला घालून, पाण्याने भिजवून व दगडावर चांगले मळून तयार केलेले मिश्रण. २. अशा मिश्रणाने भिंत इ. सारवण्याची क्रिया.

**मेदन** न.पु. माती. (व.) [सं. मेदिनी]

**मेद(दा)र** पु. बुरुड; बुरुड जात. (बे., ना.)

**मेदिनी** स्त्री. भूमी; पृथ्वी. [सं.]

**मेदुर** वि. १. घट्ट व चिकट. २. गच्च; जड. [सं.मिद्–मेद]

**मेदुवडा** पु. उडीद डाळ भिजवून त्यात मीठ, मिरची घालून वाटून तळलेला वडा.

**मेदोग्रंथी** पु. शरीरावर होणारी चरबीची गाठ; आवाळू. [सं.]

**मेदोधरा** स्त्री. चरबी राहण्याचे उदरातील स्थान.

**मेध** पु. १. यज्ञ. (समासात) अश्वमेध, नरमेध इ. २. आहुती; बळी; यज्ञीय पशू. [सं.मेध् = मारणे]

**मेध्य** वि. १. बळी देण्यास योजलेला, योग्य. २. (हवनीय) पवित्र; शुद्ध.

**मेधा** स्त्री.१. बुद्धीची तीक्ष्णता; कुशाग्र मती; तीव्र बुद्धी; धारणायुक्त बुद्धी. २. (श्रद्धा या अर्थी चुकीने उपयोग) आवड; चाड; प्रीती : 'तयां बहुत करूनि मेधा । स्वर्गी आथी ।' –ज्ञा १७.७६. ३. मर्यादा. [सं.]

**मेधावी, मेधाविनी** वि. बुद्धिमान; कुशाग्रबुद्धी. [सं.]

**मेपटे** न.(कार किंवा कटकी उडविण्याची वेळूची)फुंकणी; उडवणी. (क.)
**मेपोल** 'मे' दिनाची गुढी; वासंतिक मेळ्यात फुलांनी सजविलेला खांब. [इं.]
**मेमसाहेब** स्त्री. बाईसाहेब; (इं.) मॅडम.
**मेमटमाऱ्या-चोट्या** वि. (निंदार्थी, अश्लील) मेणचोट्या.
**मेमटा-ट्या, मेम(मु)टमाऱ्या, मेंवटा-ट्या** वि. गंभीर पण आकसखोर; दिसण्यात साळसूद पण आतून दुष्ट; धूर्त व कावेबाज.
**मेमण** पु. मुसलमान कोष्टी; विणकर जात.
**मेम(मा)णे** अक्रि. मेमे करीत ओरडणे : 'दोनी एडके चोर नेती । मध्यरातीं मेमात ।' -एभा २६.६८. [ध्व.]
**मेमुलगाढा-तोंडा-ड्या** वि. गयाळ; मेंगळट; गायतोंड्या; मूर्ख.
**मेमे** स्त्री. मासळी. (गो.)
**मेर** स्त्री. १. (शेतवाडी, टेकडी इ.ची) कड; काठ. २. शेताचा बांध; हद्द. (को., गो.) ३. जमीन उंच-सखल असल्यामुळे शेतीचे खत व पाणी राहण्याकरिता लहान-लहान तुकडे पाडून मध्ये टाकलेला मातीचा वरंबा; बांध; बांधोळी. (हेट.) ४. पेरा; लागण. (व.) ५. समय; वेळ. ६. पानाचा, उसाचा मळा. (अहि.) [क. मेर = टेकडी]
**मेर-री** स्त्री. १. उसाचा रस उकळताना येणारा तवंग. २. गुळातील मळी, बेरी. (झाडी). [सं. मीर]
**मेरधार** स्त्री. शेताचे कुणगे (वाफे) करण्यासाठी मिठागराप्रमाणे रचलेली चिखलाची लहान भिंत; मेर.
**मेरी** लाभकाळ.(तंजा.)
**मेरु-रू** पु. १.हिमालयाच्या उत्तरेकडील तार्तरीचा डोंगरी प्रदेश म्हणून समजलेला, सप्तखंडांच्या मध्यभागी असलेला, श्रेष्ठ मानलेला पर्वत; स्वर्ग, मृत्यू, पाताळ यास आधारभूत असा सोन्याचा पर्वत. २. (ल.) जपाच्या माळेतील मध्यवर्ती असलेला मोठा मणी. ३. जिच्यावर चिलीम बसवलेली असते ती गुडगुडीची नळी. ४. सांबर, हरीण यांची एक जात. ५. खरबुजासारखे असणारे एक फळ. [सं.]
**मेरुदंड** पु. पाठीचा कणा.
**मेरुली-ल्या** स्त्री. मेरेवर, शेताच्या कडेला पेरले जाणारे पावट्यासारखे द्विदल धान्य.
**मेरोता** पु. बाजूची जमीन, जागा.- लोसाको.
**मेल** पु. (संगीत) थाट. पहा : **शब्द** [सं.]
**मेल** पहा : **मेळ**
**मेल** पु. न. टपाल. [इं.]
**मेलकार** पु. शस्त्रविद्येचा शिक्षक.
**मेलगाडी** स्त्री. जिच्यातून टपाल पाठवले जाते अशी रेलगाडी.
**मेलतोंड्या** वि. मुखदुर्बळ; लाजाळू.
**मेलन** न.१. मीलन; एकीकरण. २. मिश्रण. [सं.]
**मेलवणे** न. शेवट; अंत; मरण : 'जाणतां दिधलें मेलवणें : या संसारासि'- उगी २४८. [सं. म्लै]
**मेला** स्त्री.पु. मेळा; यात्रा. पहा : **मेळा** [सं. मिल्]
**मेला** शस्त्रास्त्रादिकांचे शिक्षण.- ऐको.

**मेला** वि.१. मृत; मेलेला (मनुष्य); स्त्रियांकडून त्यांची खोडी काढणाऱ्या, त्यांना दुखावणाऱ्या पुरुषासंबंधी तिरस्कारार्थी वापरला जाणारा शब्द. २. मुरदाड; निकामी, वापरात नसलेले, बंद पडलेले (हत्यार, वस्तू इ.); निकस; बेचव; शिळा; निर्जीव; नीरस इ. अर्थी अनेक नामांशी जोडला जाणारा शब्द. जसेः- मेला चुना, मेली माती, मेले अन्न इ. [सं.मृत + ल] (वा.)० **मुर्दा, मुडदा उकरणे**- उखाळ्यापाखाळ्या काढणे; विसरलेले जुने, भांडण, वैर उकरून काढणे. **मेल्या आईचे दूध प्यालेला असणे**-निर्बळ, निर्जीव, नेभळा असणे. **मेल्याचा पाड चढणे, जाणे**- प्रेताच्या किमतीचे होणे; सर्व किंमत गमावणे. **मेल्यापेक्षा मेला होणे**- अतिशय खजिल होणे.
**मेलिकार** पु. जमाव. पहा : **मैल्यकार** [सं. मेलुं]
**मेलि माती** (ल.) शांत प्रकृती. (तंजा.)
**मेली भाकर, मेले अन्न** श्रम न करता, निंद्य मार्गाने मिळवलेले अन्न.
**मेलेला** वि. १.मृत; निर्जीव. २. बुडालेले, डुबलेले (कर्ज).
**मेलॅ(ला)निन** न. माणसाच्या त्वचेत असणारे व त्वचेचा रंग ठरवणारे रंगद्रव्य.
**मेलो** पु. शिरसावरील एक रोग. (गु.) [सं. मेलुं]
**मेल्ह(ल)वन** न. १. मालवणे : 'तरि सभावीं होईल मेल्हवनें । या कळेवरासी ।'- भाए ८०. २. नाहीसे होणे; अस्त : 'जाणतां दिधल मेलवणें । या संसारासि ।'- उगी २४८. [सं. म्लै]
**मेल्हवनी** स्त्री. रात्र : 'तरि सभावी फिटैल मेल्हवनी । अज्ञानतमाची।'- उगी १६६. [सं. म्लै; प्रा. मिलाणि]
**मेल्हरे, मेळेरे** न. संयोग; भेट : 'तया दोहों परस्परें होय ना जंव मेळेरें'- अमृ २५२. [सं. मिल्]
**मेवळी** स्त्री. मिश्र, एकत्रित पदार्थ; मेळ.- मसाप ४५.८.
**मेवा** पु. १. द्राक्ष, अंजीर इ. मिष्ट फळे; फळफळावळ. २. मिठाई, मुरंबा इ. मिष्ट पदार्थ.[फा. मेवा] (वा.)० **खाणे, चाखणे**- लाच घेणे.
**मेवाडी** वि. मेवाड देशातील (मनुष्य, वस्तू).
**मेवाती** वि. १. मेवात प्रांतात राहणारा (एका जातीचा मनुष्य).२. लुटारू; बंडखोर. ३. पुरभय्या. [हिं. मेवाती]
**मेवाद** देणे बाकी; शिल्लक राहिलेले देणे.- राको.
**मेवेखोरी** स्त्री. लहान मुलाकडून होणारी आगळीक; हट्ट; दांडगाई.
**मेवेजात** पु. मेवा; फळफळावळ. [फा. मेवजात्]
**मेशा-शी** वि. दुर्बल; भित्रा; मेषपात्र.
**मेशी** वि. आळशी. (गो., कु.)
**मेशी** मेंढराचे रंगवलेले कातडे. (तंजा.)
**मेष** पु. १. मेंढा. २. बारा राशींपैकी पहिली रास. [सं. फा. मेष]
**मेष(शी-श)पात्र** न. भित्रा, मुखदुर्बळ, भोळा, दूधखुळा, मूर्ख मनुष्य.
**मेषसंपात** पु. मेष राशीत सूर्याचा प्रवेश. २१ किंवा २२ मार्च या दिवशी सूर्य विषुववृत्तावर येऊन दिवस व रात्र यांचे मान सारखे होते तो काळ. [सं.]
**मेषी-शी-सी** वि. मेंढरांच्या कातड्याचा केलेला.
**मेषोन्मेष** पु. मिटणे व उघडणे; उघडझाप (डोळ्यांची, फुलांची). [सं.]

**मेस** पु. मेच; एक जातीचा बांबू. पेऱ्याजवळ बाक असणारा बांबू.
**मेस** स्त्री. खानावळ. [इं.]
**मेसको** स्त्री. जलदेवता; क्षुद्र देवता.
**मेसमार** नष्ट; नाश; जमीनदोस्त.- ऐको.
**मेसीरी** पहा : **मिश्री**
**मेस्त** पु. सुतार. (गो.) [पोर्तु. मेस्तर]
**मेस्तक** न.१.अंकगणिताचे पुस्तक; उदाहरणे सोडवण्याची कोष्टके; हिशेबाची कोष्टके लिहिलेली वही; नियमांचे व बेरजांचे पुस्तक; मायने वगैरे लिहिण्यासंबंधी व नमुन्याचे पुस्तक; लेखनपद्धती. २. कामाच्या नियमांचे व हुकमांचे पुस्तक; व्यवहारचोपडी.
**मेस्तर** न. गिलावा घोटण्याचे गवंड्याचे एक हत्यार.
**मेस्तरी, मेस्त्री, मेस्त** पु.१. मुख्य लोहार, सुतार, शिकलगार; इतर कामगारांवर देखरेख करणारा कामगार. २.बेकरीमधील पोर्तुगीज जातीचा रोटीवाला. ३. (आदरार्थी) पोर्तुगीज जातीचा चाकर; विशेषतः स्वयंपाकी. [पोर्तु. मेस्तर; इं. मास्टर]
**मेह** पु. १.मूत्रासंबंधी रोग. हा एकवीस प्रकारचा आहे. पहा : **प्रमेह**. २. मूत्रोत्सर्ग; लघवी करणे. ३. मेंढा. [सं. मिह् = शिंपडणे]
**मेह(हे)तर** पु. १. भंगी; झाडूवाला. २. खेडेगावच्या वंशपरंपरागत वतनदार महाराबद्दल योजला जाणारा शब्द. ३. गवंडी, सुतार, लोहार, साळी, कोष्टी, तेली, तांबोळी, माळी, चांभार यांच्यातील नायकाबद्दल किंवा मुख्याबद्दल मोठेपणाने योजण्याचा शब्द. ४. पाटील, कुलकर्णी, चौघुला इ. वतनदार लोकांबद्दल प्रतिष्ठितपणे योजण्याचा शब्द. [सं. महत्तर; फा. मिहतर]
**मेहतराणी** स्त्री.१. भंगी स्त्री. २. मेहतराची स्त्री; चांभार जातीची स्त्री.
**मेहदी** स्त्री. मिरवणूक.
**मेहन** न. १. मूत्रोत्सर्ग करणे. २. शिश्न.
**मेहनत** स्त्री. १. कष्ट; श्रम; आयास. २. मजुरी; कामधंदा. [अर. मिहनत]
**मेहनत मजुरी** भाड्याने किंवा पैसा घेऊन केलेले शारीरिक श्रम.
**मेहनत मशागत** १.(व्यापक) कष्ट, श्रम, निगा. २. शेत वगैरेची नांगरणी, बेणणी, खुरपणी इ. कामे. [अर. मिहनत् + मशक्कत]
**मेहनताना** पु. श्रमाचा मोबदला; मजुरी; पगार. [अर.]
**मेहनती-त्या** वि. मेहनत करणारा; मेहनत करण्याचा स्वभाव असलेला; श्रमी; उद्योगी; कष्टाळू; खटपटी.
**मेहनाम** वि. श्रेष्ठ माणूस.- राको. [फा.]
**मेहम(मा)न** पु.१. अतिथी; सत्कारार्थी किंवा अवचित आलेला माणूस. २. ज्याची वंशपरंपरागत जमीन, घरदार, हक्कसंबंध इ. नसलेला उपरा गावकरी.३. सरकारी निवृत्तिवेतन घेणारा.(कु.) [फा. मेहमान]
**मेहम(मा)नकी** स्त्री. मेहमानचा गुण किंवा स्थिती.
**मेहमानगी** स्त्री. १. आदरसत्कार; मैत्री; आतिथ्य; पाहुणचार. २. मेजवानी; नजराणा. [फा. मिहमानी]
**मेह(हे)र** स्त्री. १. कृपा; दया; दयादृष्टीः 'इलाहीचे हुकुमें व बडेखान यांचे मेहेर आमचे जागा होती.'- ब्रप ३०८. २. कीव.
पु. भर्तृदत्त विधवावेतन; घटस्फोट देताना पतीने पत्नीस देण्याची कराराची रक्कम. [फा. मिह्र]

**मेहर-रा** पु. तेली.
**मेहरणे** अक्रि. १. बधिर होणे. २. गारा किंवा दव पडून थंडगार होणे.
**मेहरबान, मेहर्बान** वि.१.कृपाळू; उपकारी; अनुग्रही; बहाल. २.अर्जात अधिकाऱ्याच्या नावामागे जोडण्याचे उपपद. [फा. मेहर्बान]
**मेह(हे)रबा(वा)नी-बानगी** स्त्री. कृपा; दया;अनुग्रह; उपकार; बहाली. [फा. मेहरबानगी]
**मेहरा(र)ब-प-पी-व** स्त्री. १. (भिंतीत केलेला) लहानसा कोनाडा; कोनाडा, भिंत, मखर इ.स शोभेकरिता केलेली कमान. २. मशिदीत पश्चिम दिशेस असणारी पवित्र देवळी. [अर. मिहराब]
**मेहरी** स्त्री. सभ्य स्त्री. [फा.]
**मेहरी** स्त्री. बधिरता; जडपणा (अंगातील, अवयवातील).
**मेहलनी** स्त्री. अंधारी रात्र. पहा : **मेल्हवनी**
**मेहु-हू-हो** पु.१. पर्जन्य. २. मेघ. [सं. मेघ]
**मेहुडा-ल-ला** पु. मेघ; ढग. [सं. मेघ]
**मेहु(हू)ण** न. भोजनादीस बोलावलेले, लग्न झालेले जोडपे, दाम्पत्य. [सं. मिथुन]
**मेहुणचार** पु. (पाहुणा शब्दापासून पाहुणचार याप्रमाणे मेहुणा शब्दापासून साधित) १. मेहुण्यांचे आदरातिथ्य. २. थट्टेचे नाते. (ना.)
**मेहुणा, मेव्हणा** पु.१. बायकोचा भाऊ. २. बहिणीचा नवरा. ३. आत्याचा किंवा मामाचा मुलगा. (व.) [सं. मैथुनिक]
**मेहुणिआ** स्त्री. मेहुणी. (दे.)
**मेहुणी** स्त्री.१. मामाची मुलगी. २. आत्याची मुलगी. ३. बायकोची बहीण.
**मेहेता** पु. गुजराथी लिहिणारा कारकून. [गुज.; सं. महत्]
**मेहेदर** स्त्री. १. मोठी गोम. २. एक साप. (झाडी)
**मेहेनत, मेहेरबान, मेहेराब-प, मेहेरणे, मेहेरी** पहा :**मेहनत** इ.
**मेहेंदळ** वि. पुष्कळ; विपुल; मायंदळ.
**मेहें(हं)दी** स्त्री. एक झाड. पहा : **मेंदी**
**मेळ** पु. १. मिलाफ; जम; संगती; संयोग. २. पटणे :'मलतेणेंसि मेळु ।'- ज्ञा १३.३५८. ३. जमणे; मिळणे; समतोल करणे (हिशेब इ.). ४. समूह; मेळा; समुदाय. ५. ताफा (गायक, वादकांचा). ६. संगत; योग; संबंध. ७. घसट. ८. गाण्यातील एक चाल. ९. मैथुनासक्त सापाचे जोडपे. १०. कळक, वेळू इ.स येणारे बीज. [सं. मिल्] (वा.)
**मेळे करणे** - एकत्र जमून गप्पा मारणे.
**मेळप** क्रि. व्यभिचाराने अंगीकार करणे. (गो.)
**मेळवण** न. १. समूह. २. मिळवण; जनावरास खाऊ घालण्याचे आंबवण. (व.) ३. (सामा.) मिश्रण. [सं. मीलन]
**मेळवणी** स्त्री. १. मिश्रण; मिळवणी. २. अतिशयोक्ती. [गुज.]
**मेळव(वि)णे** सक्रि. १.एकत्र जुळणी करणे. २. मिसळणे.
**मेळा** पु.१. माणसांचा समुदाय; जमाव; जमात (विशेषतः धार्मिक किंवा व्यापारी उद्देशाने विशिष्ट काळी जमलेला); जत्रा. २. संगम (नदीचा). ३. गणपती, दिवाळीच्या काळात पदे म्हणणाऱ्या, टिपऱ्या खेळणाऱ्या मुलामुलींचा संघ, समुदाय. ४. पंच; संघ. [सं. मिल, मेल = भेटणे]
**मेळापाक, मेळपकु** पु.१. मिलाफ; मिश्रण. २. समेट; मनजुळणी.

३. जमवाजमव; जुळणी; समुदाय. ४. वियोगितांची पुनर्भेट. [सं. मिल्]

**मेळावा-प** पु.१. जमाव; समुदाय. २. मेळ; संयोग; मिलाफ. ३. समारंभ. ४. सैन्य विभाग; सैनिक समूह; तुकडी. [सं. मिल्]

**मेळावो** पु. द्वेषभाव. (गो.)

**मेळि(ळी)कार** पु. भेट : 'कृष्णें केला मेळिकार ।' - एरुस्व ६.२७.

**मेळेकरी** पु. एखाद्या गावचा पिढीजाद गावकामगार.

**मेळेदार** पु. पंचायतीपैकी एक जण; पंच.

**मेक्षण** न. यज्ञकर्मात वापरले जाणारे उलथण्यासारखे एक लाकडी पात्र.

**मेक्षापक्ष** पु. मेळावा.

**में(मे)कण** न. कानातील मळ.

**मेंग** स्त्री. सापाची कात; कवच. (क्रि. टाकण.) [सं. मृतांग]

**मेंगचोट, मेंगा-ग्या** पहा : **मेणचोट-ट्या**

**मेंगटा** वि. अजागळ; निर्बल. (कु.)

**मेंगणे** सक्रि. माघार घेणे.

**मेंगसमाऱ्या** वि. नेभळट; मेंगळट.

**मेंगळ, मेंगेमीठ** न. खातेरा व केरकचरा यांपासून तयार केलेले मीठ; क्षारमृत्तिका.

**मेंगाळणे, मेंगणे, मेंगेस येणे** अक्रि.१.(सापाने) आपली कात टाकणे. २.(ल.) भिऊन माघार घेणे; कचरणे; कचणे; कचकणे. (राजा.)

**मेंगे** न. गचाळ; मूर्ख; नामर्द; मेंग्या मनुष्य.

**मेंग्या मारवाडी** बाहेरून दिसण्यात भोळवट पण आतून कावेबाज असलेला मनुष्य.

**मेंग्या साप** (ल.) खुनशी, आडगाठ्या मनुष्य.

**मेंच(द)ट** पहा : **मेणचट**

**मेंड** स्त्री. १. तरंग; लहर. २. (तंतुवाद्य) एका स्वरावरून दुसऱ्या स्वरावर घर्षणाने जाणे; नाजूक रीतीने उत्पन्न केलेली स्वराची वक्रता.

**मेंड** पु. मध्य. (व.)

**मेंड-डा** पु.१. शेताची उंच कड, काठ, बांध; सीमा; मर्यादा. २. (सामा.) कणा; दांडा; कड.

**मेंडका-की** पु.स्त्री. १. शरीर कमावल्यामुळे भरदार व फुगीर झालेले हातापायाचे स्नायू, शिरा. २. प्रहाराने, चिमटा घेतल्याने हाताच्या स्नायूत दिसणारा उंचवटा, बेडकी; मांसल गाठ. ३. पेटका; बळ (हातापायातील). [सं. मंडूक]

**मेंड(ढ)का-क्या** पहा : **मेंढ(ड)पा, मेंढपाळ**

**मेंडकी** स्त्री. १.बेडूक-की. (व.) २.गळ्यातील गाठ. [सं. मंडूक]

**मेंडकु(को)ळी** स्त्री. बेडकी; बेटकुळी. (ना.)

**मेंडगु(गू)ळ** न.१. बांडगूळ; झाडावर फुटलेले दुसरे झाड. २. परोपजीवी वनस्पती किंवा प्राणी.

**मेंडग्या** पु. आकाशातील नक्षत्राकडे पाहून भविष्य सांगणारा.

**मेंडजोगी** पु.१. शूद्र जातीचा, अडाणी व रानटी जोगी; दाणगट, रानवट भिक्षेकरी. २. खणपट्या, डोईफोड्या माणूस.

**मेंडणे** न. निरनिराळ्या दोऱ्या एकत्र वळून एक मोठा दोर तयार करण्याची क्रिया. (राजा.)

**मेंडल** स्त्री. (खा. सुतारकाम) दरवाजाच्या बाहेरील बाजूस लंगरी खिळे मारून बसवलेल्या आडव्या लाकडी पट्ट्या प्रत्येकी. पहा : **बेणी**

**मेंडा** पु. पीळ देऊन मुरडलेली, नरम केलेली कडब्याची ताटे. याचा पेंढ्या बांधण्यास उपयोग करतात.

**मेंडी** स्त्री. बायबलचा उपदेश करणारी ख्रिस्ती बाई. (गो.)

**मेंडूकमुख** वि. बेडकासारखे तोंड असलेला (घोडा). हे घोड्याचे अशुभ चिन्ह मानतात.

**मेंढ** स्त्री. पहा : **मेंड-डा**

**मेंढ** पु. भाताचे रोप तयार करण्याकरिता माळावर केलेला राब.

**मेंढ(ड)पा, मेंढपाळ, मेंढरपाळ** पु. १. धनगर. २. (ल.) निरक्षर मनुष्य; ठोंब्या.

**मेंढरी** पहा : **मेंधला** पु.

**मेंढरू, मेंढे** न. मेंढीचे पिलू.

**मेंढवाडा** पु. १. मेंढ्यांना कोंडून ठेवण्याची जागा. २. (ल.) मेंढरांचा कळप; जमाव.

**मेंढसर** पु. सोन्याच्या तारेचे कंकण.

**मेंढा** पु. १. एडका; मेष, पोकळ शिंगे असलेला, समखुरी, चतुष्पाद प्राणी. याच्या अंगावर दाट लोकर असते. लोकर व मांस या दोन वस्तूंसाठी हा प्राणी पाळतात. २.(काठी, शिंग इ.चे). वाकलेले टोक. वि. वाकलेली, टोक असलेली (काठी, शिंग).[सं. मेंढ्र] (वा.)० **येणे**- मस्ती येणे.

**मेंढीगरव्हार-गव्हार** स्त्री. प्रसूतीनंतर पाळी न येता गर्भ राहिलेली स्त्री. पहा : **मिंधी**

**मेंढ्र** स्त्री. शिस्न.

**मेंद** वि. लबाड.

**मेंदगिरी** पहा : **मे(में)दगी** २

**मेंदगी** स्त्री. स्थूलता; गुबगुबीतपणा.

**मेंदगी** स्त्री. थकवा; भागवटा; शीण. (क्रि.येणे) [फा. मांदगी]

**मेंदट** वि.पळपळीत; कण्या मोडलेले (तूप, मध). पहा : **मेणचट**

**मेंदा** पु. मेंदीतील नर जाती.

**मेंदी** स्त्री. एक झाड. याच्या पाल्यात कात, चुना, चिमणीची विष्ठा इ. घालून, ते वाटून त्याने हातापायाची बोटे व नखे रंगविण्यासाठी तयार केले जाणारे मिश्रण; मुलांची दृष्ट काढण्यास उपयोगी पाला. मेंदीच्या फुलाचे अत्तर काढतात, त्यास हीना म्हणतात. [सं. मेंधी, मेंधिका]

**मेंदू** पु. १.(अस्थी, मांस यांतील) सारभूत अंश; मज्जा; डोक्याच्या कवटीत असणारा मांसासारखा अंश. २. मगज; ज्ञानतंतुजाल. ३. (ल.) बुद्धी; अक्कल. ४. (ल.) नासल्यामुळे मऊ व स्रवणाऱ्या स्थितीप्रत पोचलेले फळ, मांस इ.; बागुरडा, विंचू, खेकडा इ. प्राणी चिरडल्याने त्याचा होणारा लगदा. ५. रक्त व पू यांचे मिश्रण (फोड, गळू इ.तून स्रवणारे).[सं. मेद] (वा.)० **निघणे, वासणे, बाहेर पडणे**- (श्रमामुळे) टेकीस येणे.

**मेंधला** पु. (वास्तुशास्त्र) दरवाजास मागे-पुढे दोन चौकटी असल्यास त्या

एकमेकींस जोडणाऱ्या वरील बाजूच्या दोन भुजा प्रत्येकी; मेंढरी.
**मैडुक** पु. बेडूक. [सं. मंडुक]
**मैडोळे** न. गोव्यातील मैंडे नावाच्या गावी होणारे उंची, रुचकर, महाग असे केळे.
**मैत्र** पु. १. मित्र; स्नेही; दोस्त. २. सूर्य.
वि. दोस्तीचा; मैत्रीचा. [सं. मित्र]
**मैत्रायणी** स्त्री. कृष्ण यजुर्वेदाची एक शाखा.
**मैत्री, मैत्रकी** स्त्री. दोस्ती; स्नेह; मैत्री.
**मैत्री(त्रि)ण, मैत्रणी** स्त्री. स्त्रीमित्र; सखी.
**मैथुन** न.१. संयोग; स्त्रीपुरुषसमागम; संभोग. २. एकी; समेट; संघ.[सं.]
**मैदा** पु. ओलविलेले गहू वाळवून त्याचे अगदी बारीक दळलेले पीठ; सपीट. [फा.]
**मैदान** न. १. उघडी, सपाट व विस्तीर्ण अशी जागा. २. अंग किंवा मधला भाग (वस्त्राचा). [फा. माइदान] (वा.)० **बसणे** – १. सृष्टिशोभेचे सुख घेण्यासाठी मैदानात बसणे. २. शौचास बसणे.
**मैदालकडी** स्त्री. एक औषधी झाड; उदबत्त्या करण्यासाठी त्याचे लाकूड वापरतात. [हिं.]
**मैना** स्त्री.१. पोपटाची, राघूची मादी. २. साळुंकी; एक गाणारा पक्षी. [तुर्की; सं. मदना > मअना> मैना]
**मैफल** स्त्री. मजलस; मंडळी; सभा. (व.) [फा. मह्फल]
**मैराळभाऊ** पु. (ह्या नावाच्या माणसावरून) काटक व बलवान माणूस.
**मैल** पु. रस्त्याची लांबी, अंतर मोजण्याचे एक प्रमाण; अर्धा कोस; आठ फर्लांग; १.६०९३ कि.मी. अंतर. [इं. माईल]
**मैल** पु. संशय; किल्मिष.
**मैल–ळ** पु. घाण; खळमळ. [सं. मल]
**मैलखोर** वि. मळकट रंगाचा; घाण दडवणारा; मळखाऊ (रंग).
**मैलणे** क्रि. १. भ्रष्ट करणे. २. मलिन होणे; मळणे :'तरि तें पंधरेपण न मैळे ।'– ज्ञा ८.३९. [सं. मलिन्]
**मैला** पु.१. नरक. २. घाण. [सं. मल]
**मैलागर** पु. १. एक प्रकारचे चंदनाचे लाकूड; उत्कृष्ट चंदन. २. मलयगिरी पर्वताचे नाव. [सं. मैलृगिरी]
**मैल्यकार** पु. चतुरंग सैन्यासह मुक्काम; निवासस्थान : 'भीमकें मूळ महादेवीं मैल्यकारु दीन्हला'– श्रीकृच ५५. [सं. मिल् =एकत्रित होणे]
**मै(मैं)स** स्त्री. काजळ; मस; शाई. [सं. मषी]
**मैळा** वि. दुष्ट.
**मैळे** न. वस्त्र :'तया अनुरागाचेया चोळे । रापे इंद्रियांचे मैळें ।'– उगी ७९६. [सं. मल् = धारण करणे]
**मैंडोळी** गोड केळी. (गो.)
**मैंद** न.ढेकळे फोडून शेतजमीन सपाट करण्याचे, एक शेतातील सरी बुजवण्याचे अवजार.
**मैंद** पु. एक लुटारू, चोरटी जात.
वि.१. बुद्धिमंद; जड; सुस्त. २. घातकी; ढोंगी; दांभिक. [सं. मंद, महेंद्र]
**मैंदाव–वे** न.१. मैंद नावाच्या लोकांचा दरोडा, अत्याचार. २. मैंदपणा; घातकीपणा. ३. भुलावणी; मोह :'येकलें जाववेना संसार मैंदावें ।'– दावि २३५.
**मैं(मे)दाव(वि)णे** क्रि. मैंदपणा करणे; मैंदासारखी कृती करणे.
**मो** पु. खाद्यपदार्थाचा मधला मऊ भाग; गर.
**मोआ** स्त्री. ऑक्टोबर–नोव्हेंबर या काळात पकडला जाणारा मासा; माशाची एक जात.
**मोआजीन** पु. मशिदीत बांग पुकारणारा मनुष्य; मवाजीन.
**मोई(इ)न** स्त्री. वर्षाची नेमणूक; ठराव; नियम. पगार; तैनात; कायम नेमणूक :'इतकियावर मोईनप्रमाणे चौकीपहारा न राखेच तर परिछिन्न दूर करावा.'– मराआ १४. [अर. मुअय्यन्]
**मोईनदार** पु. संस्थानातून नेमणूक किंवा वेतन घेणारा.
**मोईनमाप** न. ठरावीक किंवा निश्चित मोजमाप.
क्रिवि. खचित; कराराने; कायमपणे; ठरावीकपणे; खरोखर.
**मोईना** मानपान.
**मोईर** पु. मुसलमान. (गो.)
**मोऊळ** पु. गवताची केलेली लहान केरसुणी. (कु.)
**मोक–ख** पु.१. अंकुर; मोड; कोंब; गर्भ :'केळीचा मोक हरभऱ्याएवढा घेऊन... त्यांत हें औषध संध्याकाळीं घालावें.'– अश्वप २.१८०. २. फळे, गळू, काही खाद्यपदार्थ यांतील मऊ भाग. [सं.मुख]
**मोकट** वि. पहा: **मोकाट**
**मोकदमा** पु. प्रसंग.
**मोकल** वि. स्वाधीन.
पु. संरक्षक; बदरका :'आम्हास पन्नास तोपची मोकल देऊन गडावरी नेऊन...'– मइसा १८.६४. [अर. मुवक्कल्]
**मोकलणे** क्रि. १. पाठवणे; धाडणे :'ब्रह्मघ्ना शिष्यांची भीड धरुनि साधु शिष्य मोकलिला.'– मोआदि ९.३४. २. मोकळा सोडणे; दाब किंवा बंधन न ठेवणे. ३. गमावणे. ४. ओक्साबोक्शी, मोठ्याने (हेल काढून, ओरडून) रडणे. ५. सोडणे; त्याग करणे; टाकून देणे. [सं. मुक्त + ल]
**मोकळ** स्त्री.१. विसकटलेली, अस्ताव्यस्त स्थिती. २. फेड (कर्जाची). ३. खुले किंवा विसकळीत स्थितीतील भारे, गठ्ठे इ. ४. मोकळीक; सोडवणूक; सुटका; मुक्तता. ५. अनलंकृत.(क्रि. मोकलणे.)[सं. मुक्त]
क्रिवि. १. मोकळेपणाने; स्वैरपणे; स्वतंत्रतेने; दाब किंवा प्रतिबंध नसता. (क्रि. सोडणे, सुटणे, फिरणे, हिंडणे, चरणे.) २.(खुल्या किंवा उघड्या स्थितीत, कायम मुक्रर किंवा निश्चित न केलेल्या स्थितीतील) पत्र, हिशोब, दस्तऐवज; स्मरणार्थ टिपण.[सं. मुक्त] (वा.) **मोकळ्या दरवाजाने असणे**–निःशंक असणे.
**मोकळचरणी** वि.१. भटक्या; उनाडक्या करणारा. २. अस्थिर किंवा खात्रीचा, निश्चित नसलेला (पगार, उत्पन्न इ.).
**मोकळचिठ्ठी** स्त्री. मोकळीक देण्यासंबंधीचे पत्र.
**मोकळदार** पु. तगादेदार; वसुलीसाठी पाठवलेला शिपाई.
**मोकळवट** क्रिवि. १. खुलेपणे (पेंढ्या किंवा भारे न बांधता).२. बंद न करता; उघडे ठेवून. ३. ऐसपैस; अघळपघळ; प्रशस्त (मैदान किंवा

विस्तीर्ण पटांगण). ४. स्वैरपणे; स्वतंत्रपणाने (भटकणे इ.).

**मोकळवाडी–वादी** स्त्री. १.(प्रां.) मोकळीक. २. स्थलत्याग. ३. निराश स्थिती : 'सृष्टि गेली रे गेली । देवा मोकळवादी जाहली। ऐशी एक टाळी पिटिली । सत्यलोकीं ।'– ज्ञा १.१५७.

**मोकळाचा(ढा)कळा** वि.१. स्वतंत्र; बंधमुक्त; अनियंत्रित. २. खुले; उघडे; बंद नसलेले (दार, दरवाजा किंवा पेटी). ३. वेगवेगळे; एकत्र न झालेले; एकत्र न गुरफटलेले. ४. न व्यापलेले; रिकामे. ५. (भयंकर रोगापासून, दुःखातून) सुटका झालेला; मोकळा झालेला; मुक्त. ६. ऐसपैस; अघळपघळ; लांबरुंद इ. [सं. मुक्त]

**मोकळी** स्त्री. स्वातंत्र्य; स्वच्छंदीपणा.

**मोकळीक** स्त्री. १.सुटणूक; मुक्तता; स्वतंत्र किंवा मोकळे होणे. २. सुटका; रजा.

**मोकळे मैदान** (ल.) पूर्ण स्वातंत्र्य; सदर परवानगी.

**मोका** पु. १. संधी; प्रसंग. २. नाके; प्रमुख ठिकाण. [अर. मौक़्आ]

**मोकाट** वि.१.उद्धट; द्वाड; दांडगा; स्वच्छंदी. (माण.) २. स्वैर; अनिर्बंध; मोकळा. [सं. मुक्त + म.ट]

**मोकाडकी** स्त्री. एक प्रकारचे दावे.

**मोकार** पु. ऐन खर्च.

**मोकार** क्रिवि.१. मोकळेपणाने; निर्बंध नसता. २. स्वतंत्रपणे; फाजीलपणे. ३. कारणाशिवाय; फायदा नसताना.

**मोकारा** पहा : **मोगरसूल** : 'केला परसुखाचा मोकारा। जीवपशुवा।'–ऋ ५१.

**मोकाशी–सी, मोकासदार** पु. मोकासपणाचा हक्क असलेली व्यक्ती; संस्थांचा अगर अशा माणसाच्या मार्फतीचा वसूल जमा करणारा शेतकरी; ज्यास इनाम किंवा चाकरीबद्दल गाव इ. दिले आहेत असा माणूस.

**मोकास** पु. इनाम म्हणून दिली जाणारी जमीन, गाव इ.; सरकारी चाकरीबद्दल मिळणारा गाव.
स्त्री. वसुलापैकी काही हिस्सा मिळण्याचा हक्क.

**मोकासा** पु.१. लष्करातील नोकरीची अट घालून त्यासंबंधी किंवा इनाम म्हणून दिलेली गावे, जमिनी वगैरे. २. गावच्या वसुलामध्ये व अंमलामध्ये हिस्सा. ३. चौथाईचा चतुर्थांश वजा करून राहिलेला भाग. ४. गावखोती वगैरेस लावला जाणारा शब्द. ५. मुशाफरांची मालमत्ता सुरक्षित राखण्याच्या अटीवर दिलेले इनाम. ६. वतनदार.[अर. मुकासा]

**मोकाळ** वि. मोकळा. पहा : **मोकळचरणी**
क्रिवि. मोकळेपणाने; स्वतंत्रतेने. पहा : **मोकळ**

**मोकील** पु. (मोगलाई) पक्षकार; अशील (व.) [अर. मुअक्कील]

**मोकील** वि. अश्लील; घाण. (वै.) [अर. मुक्कील]

**मो(मों)ख** पु. १. धान्याच्या आत असणारा बीजभूत अंश. २. सुपारीच्या मध्य भागातील मऊ पदार्थ; नारळातील अंकुर; मोड किंवा बीजाचा खाण्यामध्ये येणारा भाग.

**मोखणे** क्रि. १. बिनचूक तीर मारणे. २. झोकून देणे.(गो.)

**मोख(खा)र** वि.१. मऊ; कठीण नसलेला; सहज मोडणारा किंवा फुटणारा; ठिसूळ (दगड इ.). २. भरभराटीचे; जोमाने वाढणारे. ३. वयाच्या मानाने अधिक बुद्धिमान, बाळसेदार व सुरेख असलेले (मूल).४. एरंडीच्या बियांतील गर; मोख.

**मोखरा** पु. उपायन; नजर; भेट. [सं. मुख]

**मोखंडी** वि. उत्तम. (व.)

**मोखा** पु.१. दांडा; खुंटा.२.लवचीक किंवा हिरवा कोवळा फोक (झाडाचा); काही भागांत डांबा शब्दाऐवजी वापरला जाणारा शब्द.

**मोग** पु. मोड; अंकुर; कोंब; मोख.

**मोग** पु. लोभ; मोह. (गो.)

**मोगड–ण** न. पेरणी करताना पाभरीच्या दर चौथ्या तासात मुख्य धान्याशिवाय पेरले जाणारे वेगळे धान्य.

**मोगडा–णा–णी** पु. स्त्री. एकाच वेळी दोन प्रकारची धान्ये पेरण्यासाठी पाभरीला जोडलेला स्वतंत्र नळा.

**मोगणी** उशिरा होणारे (मागास) पीक.

**मोगर–रा** पु.१. टापरणे; ठोकणी; ठोकणे; मेखसू.२. लहान गाठ. (ओवलेले मोती सोन्या-चांदीच्या तारेतून पडू नयेत म्हणून तारेच्या टोकाला मारलेली, बसलेली गाठ.) २. फरसबंदी करणाऱ्यांची ठोकणी; ठासणी; परटाचे कपडे बडवण्याचे साधन; लाकडी हातोडा. ४. (ल.) पायदळातील सैनिक; पायदळ : 'चालती पायांचे मोगर । पातले कौंडिण्यपुर नगर।'– एरुस्व ५.२६. [सं. मुद्गर]

**मोगर** न. चिंचेचे फूल; नवीन फुटलेली कोवळी पाने.– लोकासो.)

**मोगर** वि. मुख्य. [सं. मुखर]

**मोगरशिंग** न. एक प्रकारचे वाद्य. [सं. मुखर + शृंग]

**मोगरसूल, मोंगरसुल** न. धान्य, धन, इतर पदार्थांचा ढीग दानधर्म म्हणून जनतेकडून लुटविण्याची क्रिया; लूट; संक्रांतीला स्त्रियांकडून उसाची वगैरे केली जाणारी लूट; वोवसादान.

**मोगरा** पु.१.एक फुलवेल; तिचे फूल. २. तरवारीच्या मुठीच्या अग्रावर असणारा वाटोळा भाग. ३. घुम्यासारखा बसून राहणारा माणूस. ४. दिव्याच्या वातीचा कोळी- जळून मुरदाड झालेला. ५. अडकित्याच्या पायाची गोटीच्या आकाराची टोके.

**मोगरी** स्त्री. १. कणसे बडवण्याचे लाकडी अवजार; लाकडी मोठा हातोडा; शेतातील ढेकळे फोडणारे लाकडी औत. २. विलायती मुळ्याची शेंग. ही रंगाने तांबूस असते. ३. भोवऱ्याच्या डोक्यावरील बोंड.

**मोगल** पु. काजूगर; काजूच्या फळाचा लठ्ठ देठ.

**मो(मों)गल** पु. मध्य आशियातून किंवा तार्तरीहून हिंदुस्थानात आलेली मुसलमानांची एक जात; त्या जातीतील व्यक्ती. [फा. मुघोल्]

**मोगलाई** स्त्री. १. मोगल लोकांचे राज्य, सत्ता, अंमल. २. कोणत्याही मुसलमान राजाची सत्ता, राज्य. ३. (ल.) बेबंदशाही. ४. मोगलांनी बसविलेला कर; गावच्या वसुलापैकी एक विशिष्ट वसूल. ५. (ल.) कपट.

**मोगलाण** न. १. मोगलांचा देश.२. मोगलांच्या सत्तेखालील देश. ३. मोगल लोकांच्यामधील मोगल लोकांनी सरकारविरुद्ध केलेले बंड,

दंगा, उठाव.

**मोगली** वि. १. मोगल लोकांसंबंधीचे. २. कपटी.

**मोगली बाजार** जोराची दंगल; आरडाओरड.

**मोगली मिरची** वांग्यासारखी मोठी मिरची; भाजीची, भोपळी मिरची.

**मोग(घ)ळ** पु. चौपाखीपैकी बाजूची छपरे. (कर.) पहा : **मोळ**

**मोगा** वि. सखा; जिवलग (मित्र). (गो.)

**मोगा-घा** पु.१. रहाटगाडग्याचे मडके; मातीचा लोटा. २. नारळाचा सुयरा; पोगी;(क्वचित) नारळात उद्भवणारा कोंब. (हेट.) ३. लांब गळ्याचे (उंच तोंडाचे) सुगड. (तंजा.)

**मोगा, मोगारा** पु. कोंब; कोंभ; अंकुर. (क्रि. येणे, फुटणे.)

**मोघ** वि. व्यर्थ; फुकट; विनाकारण; निरुपयोगी. [सं.]

**मोघड-ण** स्त्री.पु. १. पहा : **मुगाण** २. (हेट.) पहा : **मोगडा-णा**

**मोघड्या** स्त्री. दोनफणी पाभर; दुफण. (खा.)

**मोघणे** क्रि. मोघणाच्या साधनाने शेतात तास पाडून त्यात बी पेरणे.

**मोघम, मोहगम** वि.सर्वसाधारण; अनिश्चित; अस्पष्ट रूपरेषेचे; खुलासेवार नव्हे असे (भाषण, काम, व्यवहार, खर्च); संदिग्ध. [अर. मुरहम, मुग्हम]

**मोघल** न. तंबूचे, डेऱ्याचे मागील दार. [अर.]

**मोघळ** पु. गटार; पाट.

**मोघा** पु. (कृषि.) रासायनिक खते पेरण्याच्या पत्र्याच्या नळ्या.

**मोघारणे** न. नकसगाराचे हत्यार.

**मोच** पु. १. मऊ कापूस येणारे झाड; सावरी; शेवरी. २. केळ. ३. शेवगा. ४. साळई.

**मोचक** वि. मोकळा करणारा; सोडविणारा; मुक्त करणारा; सुटका करणारा. (समासात) भावमोचक, पापमोचक, संकटमोचक. [सं.]

**मोचखाणे** लचकणे; दुखवणे. (तंजा.)

**मोचड** पु. जोडा.

**मोचणे** सक्रि. मोकळा, मुक्त करणे; सोडणे; सुटका करणे. [सं. मुच्]

**मोचन** न. मोकळे, मुक्त, स्वतंत्र होणे; स्वतंत्रता; मोकळीक. [सं.]

**मोचरस** पु. १. मोच नावाच्या झाडाचा, सावरीचा चीक, डिंक; एक औषधी पदार्थ. २. सुपारीचे फूल.

**मोचळ** वि. खारे. (तंजा.)

**मोचा** पु.१. मोजा. २. जोडा; एक प्रकारचा बूट. (वा.) **मोचे खाणे** - (जोडे बसणे) शाब्दिक मार खाणे. **मोचे फेडणे** - तुच्छ मानणे.

**मोचामोची** स्त्री. एकमेकांमधील तोंडातोंडी; भांडण.

**मोची** पु. चांभार. [फा. मोझे; सिं.,गु. मोची]

**मोज** न.१. मापन; परिमाण किंवा संख्या निश्चित करणे. २. मापणे; मोजणे; मापाने मोजून निश्चित करणे. ३. मोजून निश्चित केलेली संख्या. ४. (लांबी, वजन किंवा क्षेत्र यांचे) मापन किंवा माप. ५. मोजण्यासाठी घेतलेले कोणतेही परिमाण. [सं. मा = मोजणे]

**मोजका-ला** वि.१. मोजलेला; मर्यादित किंवा प्रमाण ठरविलेला. २. माफक; साधारण.

**मोजजा** पु. मोजणी.

**मोज(च)डी** स्त्री. पायात घालायचा नाजूक, नक्षीदार जोडा.

**मोजणी** स्त्री. १.मोजण्याची क्रिया; संख्या ठरवणे; मोजणे. २. जमिनीचे मापन किंवा क्षेत्र मोजणे.

**मोजणे** क्रि. १. मेजणे; मापणे; गणित करणे. २.(ल.) भिणे; पर्वा करणे; जुमानणे; अभिमान धरणे; प्रतिष्ठा राखणे; महत्त्व देणे; मानणे; गणणे. [सं.मा, मी(मेय > मेज)]

**मोजदार** पु. जमिनीचे क्षेत्रफळ काढणारा; मोजणी करणारा.

**मोजप** न. गणती; मोजून ठरलेली संख्या; परिमाण; माप; मोजणी.

**मोजबा, मोजबेदार** पु. पहा : **मोसबा, मोसबेदार**

**मोजला** वि.१. मोजलेला; मापन केलेला; गणलेला. २. विवक्षित रक्कम किंवा परिमाण ठरवलेला; मर्यादित केलेला; मोजका.(वा.)**मोजी करणे** - काटकसर करणे.

**मोजवटी, मोजोटी** स्त्री.(सोनारी)१. मोजपट्टी. २. एक प्रकारचा शिक्का.

**मोजा** पु. हातापायांचे थंडी वगैरेपासून रक्षण करण्यासाठी घातले जाणारे विशिष्ट आकाराचे कापडी, लोकरी वा कातड्याचे आच्छादन. [फा.मूझा]

**मोझा-झ्या** पु. पुरावा; साक्षी; चौकशी; तपास; चर्चा. [अर. मुवाझअ्]

**मोट** स्त्री.१.मोठी पिशवी; पोते; मोठे ओझे (धान्य, शेण इ.चे); गाठोडे; एकत्र जखडून बांधलेल्या पुष्कळ वस्तूंचा समूह, ढीग, रास.(व.)२. बैल किंवा रेड्यांकडून विहीर वगैरेतील पाणी वर काढण्याचे साधन. ३. पाणमोट; पोटातील पाण्याची पिशवी. ४. (ल.) पशूला खाली जमिनीवर पाडून त्याच्या पायांचे चारी खूर एकत्र बांधलेली त्याची स्थिती. ५. भूतपिशाचबाधा झाली असता माणसाची गठडी वळून त्यास बांधले जाणे किंवा त्याचे हातपाय जखडले जाणे. ६. शिदोरी :'मग आपुलालिआ मोटां घेऔनि। सकळें एतें जालें।'-दाव २०१. ७. दहा हजार ही संख्या. ८. वाट. (वा.) **आवळ्या-भोपळ्याची मोट बांधणे**- दोन विरुद्ध प्रकृतीच्या व्यक्तींना, वस्तूंना एकत्र आणणे. **वाऱ्याची० बांधणे** - असंभाव्य गोष्ट करू पाहणे.

**मोट** स्त्री. १. मूठ. २. बैलाचे खोगीर. [सं. मुद्]

**मोट** स्त्री. मठ; एक धान्यविशेष; मटक्या.

**मोटक-का** वि. निपुण; निष्णात; नेटका; प्रत्यक्ष; चांगला : 'मोंटका देओ वागारां हातु घालीं । सवेंचि बैसे मागिली पांसाळी।'- शिव १०११. [सं. मुद्]

**मोटक(कु)ळे** न. कसेतरी बांधलेले किंवा नीट न बांधलेले गाठोडे.

**मोटका** पु. फडकरी.

**मोटका** व्यापक.

**मोटका-को** वि. खुजा; ठेंगू; क्षुद्र. (गो, कु.)

**मोटकी** पु. (संगीत) गायनशास्त्रातील एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.

**मोटके** वि. १. थोडे. २. सूक्ष्म.

**मोटकेपण** वि. कृतज्ञता.

**मोटगार** पु. हमाल.

**मोटडी** स्त्री. गठडी; मोटळी; गाठोडे.

**मोटला–ली–ले–ळा–ळी–ळे** पु.स्त्री.न. १. मोटकुळे. २. पुरचुंडी; गाठोडे.

**मोटवण** स्त्री. न. १. मोटेतील पाणी जेथे ओतले जाते ती जागा. २. मोटेचे वडप; मोटेकरिता उभारलेली जागा.(कर.)

**मोटवी** स्त्री. जाड, आखूड अशी एक प्रकारची मिरची.

**मोटवे** न. लहान. (को.)

**मोटसुती** वि. जाड धाग्याचे किंवा जाडेभरडे (कापड).

**मोटस्थळ** न. मोटेच्या पाण्याने भिजणारी जमीन.

**मोटाई** स्त्री.१.मोठेपणा; जाडपणा.२. (ल.) श्रेष्ठत्व; थोरपणा. (क्रि. करणे, धरणे, लावणे, मिरवणे, दाखवणे, भोगणे, बाळगणे, वाढवणे इ.).

**मोटाधाटा** वि.१. मोठा व धारदार. २. जाड आणि धिप्पाड (मनुष्य, जनावर); बळकट; जाड्या अंगाचा. ३. जाडेभरडे (कापड, धागा, वस्तू इ.). [मोठा द्वि.]

**मोटार** स्त्री. इंधनावर चालणारी गाडी. [इं.]

**मोटारसायकल** स्त्री. फटफटी. इंधनावर चालणारे सायकलसारखे दुचाकी वाहन.

**मोटाळणे** क्रि. मोडणे. [सं. मोटन]

**मोट्या** वि. मोटा वाहण्याचे काम करून उपजीविका करणारा; ओझी किंवा गठ्ठे वाहून नेणारा; हमाल.

**मोठळणे** रास करणे. [सं. मुस्त्]

**मोठा–टा, मोठा(टा)ड** वि.१. थोर; जाडा. २.(शब्दशः व ल.) अतिशय; जास्त; फार; अधिक (चांगल्या किंवा वाईट अर्थी).
क्रिवि. (थोर, परम इ. शब्दांप्रमाणे उपयोग) फार; अतिशय. [सं.महत्तर]

**मोठाई** स्त्री. मोठेपणा. (को.) पहा : **मोटाई**

**मोठा पूक** पु. पुष्यनक्षत्र. (व.) [सं. पुष्य]

**मोठा बाप** वडील चुलता. (खा.)

**मोठाब्बा** पु. साप.

**मोठी** वि. थोरली. (वा.) ० **होणे**– वयात येणे.

**मोठी घोळ** रस्त्याचे वाकण.

**मोठी माय** आजी.(व.)

**मोठे पोट** (ल.) अंतःकरणाचे औदार्य; दया; क्षमा (करणे).

**मोड** पु. १. पराजय; मोडलेली, फाटाफूट किंवा विसकळीत झालेली स्थिती; (सैन्याचा) बखेडा. २. पाणीच पाणी करणारा पाऊस; मोठा पूर.
स्त्री. १. जुनी पुराणी, फुटकीतुटकी, हरकामी न येणारी अशी (विकून टाकण्याजोगी) धातूची भांडी वा दागिने इ. २. भाषेची मांडणी. ३. दूण; दुमड; सळ; केसामध्ये काढलेला भांग; उभ्या पिकाच्या शेतामधून पडलेली रेषा, ओळ, अशाच तऱ्हेची पडलेली सामान्य रेषा, ओळ. ४. (नदीचे, रस्त्याचे) वळण किंवा वाकण. ५. दिशा; रोख; वळण; मोडणी; सर्वसाधारण गती किंवा मार्ग. ६. पद्धत; वळण; प्रघात; सरणी; रोख (भाषण, निबंध वा कृतीचा):'घोषाच्या कुंडीं। नाद चित्रांची रूपडी । प्रणवाचिया मोडी । रेखिली ऐसीं ।' –ज्ञा ६.२७६. ७. हिशेब, गुणांक, मेळवणी, पोहणे, झोपणे इ.ची असलेली रीत, पद्धत. ८. तुकडा. ९. खुर्दा; लहान धातूचे नाणे; सुटे पैसे; नाणी.(वा.)० **लागणे**– घबाड सापडणे; दैव फळणे.
स्त्री. पु. आळस; मंदपणा; जडावणे; ओझे, कामाचा ताण, एखादा अवयव दबणे इ. मुळे शरीराला येणारे जडत्व. [सं. मुट-मुड् = मोडणे]

**मोड** पु.१. बीजापासून उत्पन्न होणारा मूलभूत अंश; अंकुर; मुगारा. २. मूळव्याध झाली असता गुदद्वारी होणारी मांसवृद्धी; एक प्रकारचा रोग. [क. मोडु = सूज, गाठ]

**मोडक** पु. एक जातीचा डोंगळा, मुंगळा किंवा माकोडा.

**मोडकळ–ळी** स्त्री. दमून जाणे; थकवा; दमणूक; ग्लानी (म्हातारपणामुळे किंवा जास्त परिश्रमामुळे).
वि. १. मोडलेला; ऱ्हास, नाश पावलेला; बिघडलेला, (उद्योग, इमारत, व्यापार इ.); नाश झालेली (स्थिती). २. अव्यवस्थित; अस्ताव्यस्त; नादुरुस्त (सरंजाम, सैन्य इ.). ३. तुकडे पडणारा, ठिसूळ, मोडणारा, फुसका, चुरा होणारा (तांदूळ इ.).

**मोडकळणे, मोडकळीस येणे** क्रि. १. थकणे; दमणे (वृद्धत्वामुळे इ.). २. नाश होणे; ऱ्हास पावणे. ३. नादुरुस्त होणे, असणे; बिघडून जाणे.

**मोडका** वि. मोडलेला; दुखवल्याने अगर भंगल्यामुळे, मोडल्यामुळे निरुपयोगी किंवा अधू झालेला.

**मोडकावाणी** तुटपुंज्या भांडवलावर धंदा करणारा, लहान प्रमाणात व्यापार करणारा वाणी वा व्यापारी; घेवारी; हिंगमिऱ्या वाणी; डाळपिठ्या.

**मोडकी** स्त्री. १.(सामा.) मोडलेली स्थिती, मोड; पराभव; मोडल्याबद्दलचे अपयश. २. अडथळा; प्रतिबंध; हरकत; अडचणीचे कारण. (क्रि. आणणे, ठेवणे, घालणे, येणे.) ३. बिघाड (कामाचा, उद्योगाचा, मताचा). ४. खंडन; मोड; वितंड; खोटे करून दाखवणे; निरुत्तर, कुंठित करणे. (क्रि. येणे, आणणे.)

**मोडकी काठी** १.(ल.) हातची सत्ता, अधिकार नाहीसा झालेल्या मनुष्यास उद्देशून शब्द. २. मोडून पडलेले काटेरी झाड, काठी.

**मोडकु(कू)ल–ळ** न. भात मळल्यावर, तुडवल्यावर भात्याण खाली–वर करण्यासाठी व निराळे काढण्यासाठी तयार केलेली, टोकास ८–१० बोटे वाकडी असलेली काठी.

**मोड जोहार** जोर नसलेली किंवा कमजोर भरती भांग; ऐन भर निघून गेल्यानंतरची पक्षमध्यातली भरती.

**मोडणी** स्त्री. १. शेतातील कापणी केलेल्या धारांची किंवा पिकांची कणसे मोडण्याची, खुडण्याची क्रिया; कापणी; मोडण्याची क्रिया. २. मार्ग; पद्धत; वागण्याची रीत; ओळ; मोड. ३.मांडणी. ४. देवाला कौल लावले म्हणजे अमकी गोष्ट करायची तर उजवी कळी दे, नको करू असे म्हणायचे असल्यास डावी कळी (प्रसाद) दे – अशाप्रकारे कौल लावण्याची क्रिया. ५. अडचण; पेच; अडथळा.

**मोडणे** सक्रि.१. तोडून खाली टाकणे, पाडणे; नाश करणे; बिघाड करणे (इमारत इ.); विसकळीत करणे; भग्न करणे; नाहीसे करणे. २. तुकडे करणे; भाग किंवा अवयव वेगवेगळे करणे (यंत्राचे इ.).३. वाकवून तुकडा करणे (काठी, वेत, लाकूड इ.चे); खुडणे (धान्याची, मक्याची कणसे इ.). ४. तोडणे; नाहीसा करणे (मैत्री, संगत, दुकानदारी, व्यवहार

इ.). ५. विसकळीत होणे; विसकट होणे; पांगापांग होणे (बाजार, मंडळी, सभा, कौन्सिल इ.).६. खुर्दा किंवा नाणे करून आणणे (नोट, मोहरा, रुपया इ.); विक्री करून पैसे घेणे. ७. भंग करणे; अडथळा करणे; बिघाड करणे (झोप, शांतता, चालू काम-उद्योग इ.चा). ८. बिघडवणे; नाखूश करणे; अवमानणे (मन, मर्जी, इच्छा, हेतू इ.). ९.बिघाड करणे; रचना, जुळणी नाहीशी करणे; विसकटणे (पागोटे, निऱ्या इ.).१०. नाहीशी करणे; ओसाड पाडणे (वस्ती, गाव, वसाहत). ११. खंडण करणे; पाडाव करणे (पक्ष, मत, वाद इ.चा). १२. खर्च करणे; नाश करणे; गमावणे; घालवणे; बुडवणे (वेळ, काळ, दिवस). १३. जोर हटवणे; नाहीसा करणे; शमवणे; दाबून टाकणे; घालवणे (तहान, भूक, काळजी, संशय, भय इ.). १४. जिरवणे; कमी करणे; घालवणे (खोड, व्यसन, गर्व इ.). १५. स्थिरस्थावर करणे; सांत्वन करणे; नाहीसे करणे (भांडण, दंगा, झगडा इ.). १६. भंग करणे; अतिक्रमण करणे; उल्लंघन करणे (कायदा, नियम, आज्ञा, वचन, करार इ.).१७. रद्द करणे; बंद करणे; काढून टाकणे (कायदा, नियम, संस्कार, विधी, समारंभ). १८. दिवाळे काढणे; नाश करणे; मोडतोड करणे.१९. पुसून टाकणे; नाहीशी करणे; खरडून टाकणे; मागमूस दिसू न देणे. २०. संपणे; पूर्ण होणे (तमाशा, नाटक, कुस्त्यांचा फड इ.). २१. (बोटे) वाकवून ओढून त्यांचे सांधे ढिले करणे, त्यातून आवाज काढणे. [सं. मुट्, मुड् = मोडणे ]

**मोडणे** सक्रि. उकरणे : 'जैसा न मोडिलिया विहिरा। मग आपलिया उगमीं झरा। भरोनि ठाके।'- ज्ञा १५.२६९. [सं. मुट्, मुड् = मोडणे] 'मोडणे' हा शब्द वाक्प्रचारात अनेक ठिकाणी उत्तरपदी आलेला दिसतो. उदा. मन मोडणे, घर मोडणे, नोट मोडणे, दिवस मोडणे, भय मोडणे.

**मोडणे** अक्रि. १.भग्न होणे; छिन्नविछिन्न होणे; विसकळीत होणे. २. ऱ्हास पावणे; अपकर्ष पावणे; कमी होणे. ३. (कोणताही उपवास) निष्फळ होणे. ४. मोडून जाणे; भाराखाली, दबावाखाली नमणे. ५. प्रकृती खालावणे; ऱ्हास होणे. ६. ओसाड, निर्जन होणे; लोकांची वस्ती नाहीशी होणे. ७. दिवाळे वाजणे; मोडतोड होणे. ८. बंद पडणे; चालू नसणे (उद्योग, कारखाना, धंदा इ.). ९. नावाखाली येणे; मध्ये अंतर्भाव होणे; जाणीव होणे; पोटात, सदरात येणे; अंतर्भूत होणे. १०. स्मृतीतून नष्ट होणे; विस्मरण पडणे(आचार, रूढी, पद्धत इ.चे). ११. (अशक्तपणामुळे, अधिक श्रमामुळे) ढिले पडणे; हतबल होणे; त्राण नाहीसा होणे; कसकसणे. १२. तुटणे. [सं. मुट्=चूर्ण करणे, ठार करणे] (वा.) **मोडते घेणे**-नाकबूल करणे; नाकारणे; माघार घेणे. **मोडीस येणे** - संपुष्टात येणे; मोडकळीस येणे. **मोडून येणे**- दाटून येणे; भरून येणे. **अंग मोडून येणे**-कसकस येणे; तापाची कसर येणे.

**मोडता काळ** अपकर्षाचा काळ; मंदाईचा काळ.

**मोडती** स्त्री. १. काहीएक कार्य होऊ न देण्याविषयी केलेला भाषणादी व्यापार; बंदी; मनाई; अडचण; अडथळा; अटकाव. (क्रि. घालणे) २. मनाईची, अटकाव केल्याची, हरकत घेतलेली स्थिती.

**मोडतोड** स्त्री. १. मोडलेले, तुटलेले सामान, त्याची दुरुस्ती. २. एखादा व्यवहार, वस्तू वगैरे बदलून घेणे, विक्री करणे (जुने दागिने, धातूची भांडी इ.ची).३. मिटवणे; तडजोड करणे; एकी घडवून आणणे (भांडण, कर्ज इ.संबंधी).४. भाग किंवा अवयव वेगवेगळे करणे व ते पुन्हा एकत्र जोडणे; दुरुस्त करणे; नीट करणे.

**मोडभांग** पु. भांग आणि जोरगत ह्यांच्या दरम्यानची समुद्राची स्थिती. भरती आणि ओहोटी ह्यांच्यामधली अवस्था; समा.

**मोडमाड** स्त्री. मोडतोड; विध्वंस; सत्यानाश.

**मोडवा** न. तुफान; वादळ.

**मोडवाक** स्त्री. स्त्रियांचा दंडात घालण्याचा सोन्याचा, रुप्याचा एक दागिना.

**मोडशी-सी, मोडवशी** स्त्री. रेच; थंडी होऊन लागलेली हगवण; अजीर्ण; अपचन. (वा.)० **उतरणे**- नक्षा उतरणे :'शिंदे यांचे फौजेस हांसत होते त्यांची मोडशी उतरली.' - भाब ८१. **एखाद्याची मोडशी जिरवणे** - एखाद्याची खोड जिरवणे; खूप चोप, मार देणे.

**मोडा** पु. १. हरकत; विघ्न; अडथळा; नकार; मनाई; एखादे कार्य होऊ न देण्यासाठी केलेली प्रतिबंधात्मक कृती.२. या कृतीमुळे कार्याची झालेली कुंठितावस्था, खोळंबा; केलेली हरकत; मोडा घातलेली स्थिती. ३. घोडी; स्टूल. ४. गुरांचा व शेतकामाचा सुटीचा दिवस. ५. (मल्लविद्या) आपल्या मानेवर जोडीदाराने हात ठेवला असता आपल्या बाहेरच्या हाताने मानेवर ठेवलेल्या जोडीदाराच्या हाताचा पंजा धरून तो मुरगळून जोडीदारास चीत करणे. ६. घडवंची.

**मोडाकुंद** पु. एक प्रकारचा रोग; आळस.

**मोडाखा** पु. दोन रस्ते जेथे फुटतात ती जागा. (कु.)

**मोडाभाज** स्त्री. चर्चा; वाटाघाट. (वा.)० **करणे**- दागदागिने मोडून (विकून) पैसा करणे.

**मोडामोडी** स्त्री. आळोखेपिळोखे.

**मोडावणी** स्त्री. गळाठून जाणे; हतबल होणे; कमजोर होणे; अंग मोडून येणे; कसकसणे.

**मोडावणे** अक्रि. (धान्यादींना) मोड येणे; अंकुर फुटणे.

**मोडावणे** क्रि. देहभान विसरणे : 'हें बोलतां कां राओ होए। तेणेंचि मोडवला ठाए'- ज्ञा १८.१५९४. [सं. मुग्ध]

**मोडावळ** स्त्री. १. मोडतोड; दुरुस्ती. २. डोंगर फोडून केलेली शेतजमीन; जमिनीत डागडुजी करून ती झाडे लावण्यासाठी व्यवस्थित करणे; पडीक जमीन उपयोगात आणणे.

**मोडिक** वि. कुत्सित.

**मोडिव** वि. नवा कोरा(नव्याने मोडलेला = वापरात आणलेला).- लोसाको.

**मोडी** स्त्री. तळ्याची पाळी; बांध : 'नीळेयाची मोडी बांधली : ब्रह्मरसाची खेडकुळी'- शिव ३९३.

**मोडी** स्त्री. नटणे; सजणे; शृंगार.

**मोडी** स्त्री. मुरमाची पुटकुळी; तारुण्यपीटिका. - लोसाको.

**मोडी** स्त्री. १. मराठी लेखन जलद गतीने करता यावे म्हणून हेमाडपंतांनी सिद्ध केलेली सोयीच्या मोडणीची देवनागरीचीच भिन्न स्वरूपातील लेखनपद्धती. २. प्रकार; सरणी; पद्धत. ३. आकार; आकृती : 'नादचित्रांचीं रूपडीं। प्रणवाचिया मोडी। रेखिलीं जैसीं।'-ज्ञा ६.२७६.

**मोडी** स्त्री. ऐंद्रजाल विद्या. (बे.)
**मोडीगर** पु. जादूगार.
**मोडीव** वि.१.घडी करता येण्याजोगा; आटोपशीर आकारात ठेवता येण्याजोगा; ज्याचे अवयव सुटे करता येतात आणि पुन्हा जोडता येतात असा (पलंग, टेबल इ. वस्तू किंवा यंत्र). २. मोडतोड झाल्याकारणाने विकून टाकले पाहिजे असे, विक्री करून मोडण्याजोगे; विक्री करून किंवा बदलून घेण्याजोगे; मोडीला घालण्याजोगे (सामान, दागिने, भांडी इ.). ३. फुटकी, तुटकी भांडी, दागिने इ. आटवून किंवा पुन्हा सांधून नवीन केलेली (भांडी, दागिने इ.); मोडलेल्या दागिन्यांने किंवा धातूच्या भांड्यांचे केलेले. ४. नादुरुस्त; फुटका; मोडका (कोणताही पदार्थ); तुकडे तुकडे झालेले.(वा.) **मोडून घेणे**-पाडाव करणे; काबीज करणे.
**मोडे** न. अंग मोडून येणारा ताप. (कु.)
**मोडोर** पु. लहान दगडी पात्र.(तंजा.)
**मोढ** पु. अंकुर; मुगारा; मोड.
**मोढा** पु.१. नदीत घुसलेला आणि पाण्याने बहुतेक वेढलेला असा जमिनीचा पट्टा. २. खोल ओढा, ओघळ किंवा ओहळ. ३. शत्रूच्या खांद्यावर केलेला वार.
**मोत** स्त्री. १. पहा : **मौत**. २. स्मशान यात्रा. [सं. मृत्यु]
**मोतड** वि. मुक्तलग; मोतलग.
**मोत(थ)ड** न. खटाटोप.
**मोतद्दार, मोतादादार** पु. घोड्याला खरारा करणारा, त्याला दाणापाणी देऊन त्याची निगा राखणारा नोकर; सईस; खासदार. [अर. मुत अहिहद्]
**मोतसबी** स्त्री. फडणिशी; हिशेबनिशी. पहा : **मोहतसबी**
**मोताद** स्त्री.१.ठरावीक किंवा परिमित प्रमाण किंवा परिमाण (अन्न, औषध, पैसा इ.चे); ठरावीक भत्ता किंवा मिळकत.२. प्रमाण, इयत्ता, मर्यादित रक्कम. [अर. मुअ‌ताद=ठरावीक]
**मोताद** स्त्री. १. अगदी तुटपुंजा पदार्थ. २. दुर्भिक्ष्य; अभाव. ३. मध्यमपणा. वि. नादार; दरिद्री; प्राप्तीचा अभाव दर्शविणारा (शब्द). [अर. मुहताजी= कंगाली, गरिबी]
**मोताना** पु.१. लढाईत मरण पावलेल्यांच्या मुलाबाळांस दिलेली देणगी. २. बालपरवेष. [अर. मौत्]
**मोतिया** पु.१. मोगऱ्यातील एक भेद. २. मोत्याचा रंग.
**मोती** न. १. समुद्रात शिंपीच्या पोटी उत्पन्न होणारे रत्न; मौक्तिक; मुक्ता; मुक्ताफळ; मुक्तिका. २.वरील पदार्थासारखा केला जाणारा कृत्रिम पदार्थ; नकली मोती.३. सोन्याच्या तारेत मोती ओवून त्याचा नाकात घालण्यासाठी केला जाणारा दागिना; नथ. [सं. मौक्तिक; क. मुत्तु] (वा.)**मोती फुटणे**- मुख्य महत्त्वाची गोष्ट किंवा व्यक्ती इजा पावणे.
**मोतीचूर** पु.१. बारीक कळ्यांची बुंदी. लाडूचा एक प्रकार. २. धोतर, लुगडे इत्यादींना असलेला जरीचा किंवा शोभिवंत काठ, किनार.
**मोतीण** स्त्री. पांढऱ्या फुलांची एक वेल.
**मोतीदाणा** पु. हिरे व मोती जडवलेली नथ. (तंजा.) वि. मोत्याच्या दाण्यासारखा सुंदर (मनुष्य, अक्षर).
**मोतीबिंदू** पु. डोळ्यातील पडद्यावर अपारदर्शक पडदा निर्माण झाल्याने होणारा नेत्ररोग.
**मोतीफुल** न. नाकात घालण्याचा एक अलंकार. - राको.
**मोतीयाळे** न. लहान माशांची एक जात. (गो.)
**मोतीलग** वि. मोती लावलेला; मोत्याचा (हार, सर).
**मोतूर** पु. पाट. पहा : **मोहतर-तूर**
**मोत्या** पु.१. कुत्रा. २. (ल.) लहान मुलाची बुल्ली. ३. (ल.) पिकदाणी.
**मोत्रा** पु. घोड्याचा एक रोग. - अश्वप २.१४०.
**मोथ-था** स्त्री.पु. नागरमोथा; एक सुवासिक गवत व त्याचा कंद. [सं.मुस्त]
**मोथड** पु. मोती.
**मोथळा** पु. भारा; गाठोडे.
**मोद** पु. आनंद ; आल्हाद; उल्हास. [सं.मुद् = संतोष पावणे]
**मोदक** पु.१. एक पक्वान्न विशेष. २. (ल.)खरपूस मार. वि. सुखदायक; आनंददायक. [सं.मुद् = एकत्र करणे]
**मोदणे** क्रि. नष्ट होणे; भंग होणे; खुंटणे; निष्फळ होणे; नियंत्रणात ठेवणे.
**मोदणे** अक्रि. आनंद मानणे; आनंदित; उल्हासित होणे. [सं.मुद्]
**मोदल** द्रव्य.
**मोदला** १. तोट्टी; टाकी; कुंडी. (तंजा.) २. बादली; पोहरा. ३. रांजण.
**मोदळा** पु. १. बुडाला छिद्र असलेले घटिकापात्र. २. मातीचा गोळा. ३. गवताचा भारा.
**मोद(ध)ळा** पु. १. मातीचा गोळा, डिखला; चिखलाचा गोळा. २. गाठोडे; ओझे : 'देह नश्वरत्वें देखिला । विष्ठामूत्रांचा मोदळा।'- एभा १०.१८९. ३. चिटाचे सूत उकलण्यासाठी ते ज्या रहाटावर घालतात, त्या रहाटावर खांबण्या ज्या मातीच्या गोळ्यांमध्ये उभ्या करतात, बसवतात त्या गोळ्यांपैकी प्रत्येक. ४.(ल.) अगडबंब, जड किंवा स्वतःचे शरीरही पेलता न येणारा माणूस, पशू किंवा वस्तू. ५. (सामा. मोधळा) सैल बांधलेला गवत, काटक्या इ.चा भारा; गुरांनी खाऊन उरलेल्या कडब्याचा भारा.६. मोहोळे; धार काढण्याच्या वेळेशिवाय इतर वेळी दूध पिऊ नये म्हणून वासराच्या तोंडावर काटे असलेले बांधले जाणारे तरट. ७. मुद्गल. ८. शिररहित देह. [सं.मुद्+गोलक, मुस्त् - व्युको.]
**मोदाड** न. थोबाड.
**मोदित** वि. आनंदित; प्रमुदित; उल्हसित. [सं.]
**मोदी** पु.१. मोठ्या किंवा थोर माणसाच्या पदरचा दिवाणजी किंवा कारभारी; सरकारी खाणेपिणे इ.चा सर्व सरंजाम ज्याच्या स्वाधीन असतो तो. २. धान्याचा दुकानदार; सर्व संग्रह जवळ बाळगतो असा वाणी; धान्याच्या खरेदी-विक्रीचा धंदा करणारा. [अर. मुदाई = विश्वस्त]
**मोदी(धी)खाना** पु. लष्कर, सैन्य इ.ची धान्यादी सामग्री ठेवण्याची जागा किंवा यासंबंधीचे खाते; सैन्याच्या पुरवठ्याच्या वस्तू ज्यात भरून ठेवल्या आहेत अशी इमारत.
**मोधळा** वि. अत्यंत काळा.

**मोधा** वि. मुग्ध; स्तब्ध.

**मोधागोळा** पु.१. शरीर थकल्यामुळे वाकलेला व अंगाची आणि जो सदा जुडी करून बसणारा, परस्वाधीन झालेला रोगी किंवा म्हातारा माणूस; लंगडा, थोटा किंवा बोजड अंगाचा माणूस; मोठा, अवजड माणूस. २. जड गोळा.

**मोधाड** वि. कुजलेला; जुनाट झाल्यामुळे कमजोर झालेला.

**मोधाड** न. तोंड; मुसकट; मुंडके. (व.)

**मोधाडणे** अक्रि. मारणे.

**मोनई, मोनवत** स्त्री. केळीच्या पानाच्या शेंड्याकडचा भाग; पानाचे जे तीन भाग करतात, त्यांपैकी शेवटचा-तिसरा भाग; आगोतली. [सं.मौन]

**मोनजात** स्त्री. मुके जनावर, पशू, प्राणी.

**मोनवा, मोना** पु. १. ताड, माड इ.च्या मध्यातून नवीन (सुरळीसारखे) निघणारे पान; सुयरा; कोंब. २. केळीच्या खुंटांच्या मुळाशी नवीन फुटणारा कोंब एका हा ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी लावला जातो. वि. १. मुका; न बोलणारा. २. तोतरा; बोबडा. ३. असंतोष इ. कारणामुळे मुद्दाम न बोलणारा. ४. बागुलबोवा. (कु.) [सं.मौन]

**मोनाभक्ष्य** न. अंडे. (कु.)

**मोनाल** स्त्री. तरवारीचे अग्र; नोक.

**मोने** वि. थोर.

**मोप** न. १. चिखलाची, मातीची वीट; कच्ची वीट; भेंडा. २. पेटी; रास; भंडार : 'उघडिलें माणिकांचें मोप ।'- दाव १३७. ३. ठसा : 'सृष्टीचिये टांकसाळें । शरीराचें मोप पडिले ।'- भाए २४७. [सं.मा]

**मोप, मोपाड, मोप(पा)र** न. (पर्वताचे, टेकडीचे, पर्वतांच्या रांगेचे) पुढे आलेले टोक किंवा शिखर; जमिनीचा चिंचोळा भाग किंवा भूशिर; तुळईचे पुढे आलेले टोक किंवा इमारती लाकडाचा तुकडा.

**मोप** वि. पुष्कळ; बहुत; विपुल; अमाप.

**मोपणे** सक्रि. मोजणे. :'(घोंगडें) मोपितां न मोववे' -ज्ञागा १०३४. [सं. मा]

**मोपाळे** न. विटा घालण्याचा साचा; विटाळे.

**मोपे** न. मोठी, कच्ची वीट.

**मोफत** वि. फुकट; विनामूल्य. [अर. माफी]

**मोब** पु. रास. (बे.) [क.]

**मोब(बा)दला, मुबादला** पु. १.एक वस्तू देऊन तिच्या बदल्यात दुसरी घ्यावी अशा तऱ्हेचा व्यापार; अदलाबदल. २. जमाखर्चातील एका सदरातून दुसऱ्या सदरात घालणे. ३. वसूल. [अर. मुबादला]

**मो(मों)बा** पु. मुगावर पडणारा रोग; मुगास शेंग धरण्याच्या वेळी पाऊस जास्त पडला असता होणारा रोग.

**मोबाईल फोन** पहा : **भ्रमणध्वनी** [इं.]

**मोबार-री** न.१. नदी व समुद्र यांच्या संगमाजवळचे स्थान; खाडी ओलांडण्याची जागा; खाडीचे तोंड :'कदाचित् वखारीस जागा देणे झाली तर खाडीचे मोबारी समुद्रतीरीं न द्यावी.' - मराआ २१. २. मोठे बंदर. [अर. मअबर]

**मोबेद** पु. पारशी धर्मगुरू. [फा. मूबिद्]

**मोम्-म** पु. मेण. [फा. मोम]

**मोमद्या पीर** वि. फुकट खाऊ व मिजासी. (व.)

**मोमना** पु. थंड पाण्याची जाड भाकर. (व.) [फा. मोम]

**मोमनाऊ, मोम(मि)नी** वि. मोमीन जातीच्या विणकरी लोकांनी तयार केलेले.

**मोमा** पु. मुका; चुंबन :'नमस्कारिति मोमे देति ।'- पूजावसर. [ध्व.]

**मोमीन** पु. मुसलमान विणकर. [अर. मूमीन]

**मोमुर** पु. गरम राख; फुपाटा. पहा : **मुंबर**

**मोमो** पु. स्तन. (गो.)

**मोयदर** पु. इंगळी. (व.)

**मोयाळी** स्त्री. १. मृदुता. २. कोवळा आवाज.

**मोर** पु.न.१.निळ्या डोळ्यांचा डोक्यावर तुरा असणारा, पंखांचा पिसारा असलेला, भारतात सर्वत्र आढळणारा सुंदर पक्षी; भारताचा राष्ट्रीय पक्षी; मयूर. २. (ल.) मोरणी, मयूराकृती नथ; नथीचा एक प्रकार. ३. मुलींचा एक खेळ. [सं. मयूर]

**मोरई** स्त्री. पाठ काळी व पोट पांढरे असलेला समुद्रातील मोठा मासा.

**मो(म्हो)रकी** स्त्री. पहा : **मोहरकी**

**मोरकुंभा** पहा : **मोरच(चे)ल**

**मोरखी** स्त्री. मोरकी; दोरी; बंध.

**मोरघार** स्त्री. भारद्वाज पक्षी.

**मोरचंग** पु. चंग; मुखवाद्य. हे वाद्य हातात धरून उजव्या हाताच्या बोटांनी त्या तारेच्या उभ्या टोकाशी पोटाचा आघात करून वाजवतात.

**मोरचा, मोरचा(र्चा)ल** पहा : **मोर्चा**

**मोरचुती डांख** सोने आणि मोरचूद यांच्या मिश्रणाचा बसविलेला डांख.

**मोरचूत-द** पु. तांबे आणि गंधक यांचे पृथ्वीच्या पोटात मिश्रण होऊन तयार होणारा पदार्थ. एक विषारी औषधी पदार्थ. [हिं. मोरथुथिया]

**मोरचे(मोर्चे)बंदी** स्त्री. तटबंदी; कोटबंदीची उभारणी, रचना; त्याची ओळ. (वा.)**मोर्चे लावणे** - तोफा डागणे.

**मोरच(चे)ल** पु. न. मोरांच्या पिसांचा केलेला जुंबडा, झुपका.

**मोरचेला** वि.तोंडावर देवीचे वण असलेला; फोडेल तोंडाचा.

**मोरछठ** पु. तेली लोकांतील बाशिंगाचे गाठोडे नदीत टाकण्याचा समारंभ.

**मोरट्ट** वि. धसमुसळ्या; दांडगाई करणारा; धटिंगण. (तंजा.) [त. मोरडु = खरखरीत, मोरटु = दांडखोर ]

**मोरणी-नी** स्त्री. स्त्रियांच्या नाकात घालण्याचा सोन्याच्या तारेचा केलेला एक दागिना; स्त्रियांच्या नाकातील मोती.

**मोरणी-ली-ळी** स्त्री. विळी. (को.)

**मोरणे** क्रि. ऐकणे.

**मोर पडणे** विकारवश होणे.

**मोरब** स्त्री. आघाडी; आघाडीची टोळी; म्होरप.

**मोरबे** न. पु. वाढण्याचे मडके. (व.)

**मोरव** पु. चाटण.

**मोरवंड-डी** स्त्री. चुनखडीची (जमीन). (व.)

**मोरवणे** सक्रि. सांत्वन करणे : 'गाईस मोरविली कुर्वाळोनीं ।'-ब २८.

**मोरवा** पु. १. पाणरहाटाच्या माळेचा मातीचा मोघा. २. (सामा.) मातीचा, धातूचा लोटा. ३. घराच्या आढ्याला अथवा तिराला आधारभूत असा तुळईवर असलेला आखूड खांब, खांबणी, कैची. ४. खांबाखालील दिलेला तळखडा किंवा खांबावरील आडवा लाकडाचा ठोकळा.

**मोरवीस-सा-से** न. १. मोराचे पीस. २. मोराच्या पिसांचा मुकुट.'माथां मोरवीसा वेढी ।' - दाव ७८. [सं. मयूर + पिच्छ]

**मोरवे** न. (शिजलेले पातळ पदार्थ)वाढण्याचे मडके. (व.)

**मोरवेल,मोरवल्ली** पु. स्त्री. १. एक फळवेल. २. एक प्रकारच्या फुलांचा वेल; गोकर्णी; पीबुपर्णी; सुरहान वेल.

**मोरवो** पु. वीत-दीड वीत पाय खोल जाईल इतका भातशेतात चिखल करणे, त्यात बी पेरून पाणी सुकवून पुन्हा पाणी देणे यासाठी केले जाणारे पाट वा त्यांपैकी एक. (कु.)

**मोरशिंग-गी** न. एक प्रकारची पितळेची तुतारी.

**मोरशेंडे** पु. एक झुडूप; कारवी; खराश्वा; दीप्य.

**मोरस** न. आकाराने लहान व जमिनीवर पसरणारे एक झुडूप. याच्या पानांची भाजी करतात. हे समुद्राच्या आसपास वाळवंटात वाढते.

**मोरस(साखर)** स्त्री. मॉरिशस बेटात तयार होणाऱ्या साखरेचा एक प्रकार.

**मोरं(रां)बा** पु. साखरेच्या पाकात आंब्याच्या फोडी शिजवून तयार केला जाणारा पदार्थ; मुरांबा. [अर.मुरब्बा]

**मोरा** पु.१. कांबीची विणलेली घोंगडी. २. पांढऱ्यावर काळे पट्टे असलेला बैल :'आपुला मंत्र नव्हे बरा । माझा बैल चुकला मोरा ।'- तुगा ४४४०. (व.)

**मोरा** वि. १. चित्रविचित्र रंगांचा. २. कबरा; करड्या रंगाचा.

**मोरावा-वो** पहा : **मोरवा** ३

**मोरांगी** घारीची एक जात.

**मोरी** स्त्री. १. एक मासा. मुंबईत यास मुशी म्हणतात. २. मोळी. (व.) ३. पाकोळीची एक जात.

**मोरी** स्त्री. १. नाहणी; स्नानगृह; सांडपाण्यासाठी बांधलेली जागा, नाली वगैरे. २. पाण्याची भांडी ठेवण्यासाठी केलेली जागा. [क. मोरवु = तळ्यातील वाहून जाणारे अधिक पाणी; फा. मूरी]

**मोरुग, मोरू** न. शेताच्या सांडव्याच्या ठिकाणी असलेले झापड, फाटक किंवा दरवाजा. [क. मोरवु]

**मो(मौ)रुषी** वि. कायमच्या हक्काची, वंशपरंपरा (जमीन).(व.) [अर. मोरुषी = वंशपरंपरा]

**मोर्चा** पु. रणभूमीवर तोफा ठेवण्याची जागा.

**मोर्चा** पु. १. तोफ ठेवण्यासाठी केलेली मातीची, लाकडाची उंच रचना; धमधमा; टप्पा. २. अशाप्रकारे अनेक तोफांची केलेली मांडणी. ३. तोफांचा मारा. ४. चौकी; पहारा. ५. कोटबंदी; तटबंदी. ६. तरवार इ.वर चढणारा गंज; कलंक. ७. आरशाचा पारा मधून मधून निघून गेल्यामुळे उघडा पडणारा आरशाचा भाग. [फा. मूर्चा, मूर्चाल्]

**मोर्ची** स्त्री. पहा : **मोरकी**

**मोर्त मारप** क्रि. खून करणे. (गो.)

**मोर्तब, मोरतब** न. १. संस्थानचा, सरकारचा शिक्का; राजचिन्ह. २. पत्रावर वठविलेला अनुमतिदर्शक शिक्क्याचा ठसा; छाप; चिन्ह. [अर. मुरत्तब = तयार]

**मोर्तबर्दार-बारदार** पु. राजमुद्राधर; शिक्कामोर्तब सांभाळणारा.

**मोऱ्याची टिकली** (तांबड्या रंगाच्या खोंडाच्या कपाळावर पांढऱ्या रंगाच्या असणाऱ्या ठिपक्यावरून) (ल.) विद्वान, हुशार माणसाचा मठ्ठ, अडाणी मुलगा.

**मोरांडणे** क्रि. भरून येणे; भारावणे; गळणे.

**मोरांडे** न. मुरलेले हाड.

**मोऱ्हांटा** पु. जनावराच्या पाठीच्या कण्याचे मानेकडचे टोक; काटा; दांडा.

**मोल** न. १.किंमत; दर; मूल्य; द्रव्य. २. बिदागी; केलेल्या कामाबद्दल दिलेली मजुरी. ३. तपस्या. [सं. मूल्य](वा.) **मोलाने धुणी धुणे** - लोकांची निंदा करणे.

**मोलकरी, मोलारी, मोलकै** पु. मजूर; कामकरी; पैसे घेऊन लोकांची कामे करणारा माणूस.

**मोलतोल** न. किंमत; मजुरी; खर्च.

**मोलमजु(जू)री** स्त्री. मजुरी घेऊन लोकांची कामे समुच्चयाने किंवा अशी कामे करून मिळवलेले द्रव्य; नोकरी; काबाडकष्ट.

**मोलवान** वि. १.उपयुक्त; किमतीचे; महत्त्वाचे. २. गुणग्राही; किंमत करणारा.

**मोला आगळा** वि. योग्य किमतीच्या बाहेर किंवा जास्त मौल्यवान; बहुमोल; भारी किमतीचे.

**मोलारी** पु. सामान्यपणे मोलकरी; पुरुष मजूर.

**मोलाव(वि)णे** क्रि. १. किमतीत वाढ होणे; किंमत काढणे. २. नुसती किंमत विचारणे; मोल-किंमत, दर लावणे, ठरवणे, करणे.

**मोलिकता** स्त्री. नवीन निर्मिती. - शर.

**मोलीन** स्त्री. सुतारीकामातील एक हत्यार. (कु.)

**मोलांडणे** क्रि. एका स्थितीत फार वेळ राहिल्याने शरीरास रग लागणे. (व.)

**मोव** वि. मृदु; मऊ.

**मोवई** स्त्री. पहा : **मोतवा, मोना** १

**मोवई, मोवट** स्त्री. रपणाच्या उपयोगी एक वृक्ष.

**मोवणे** क्रि. १. मापणे. २. मऊ करणे. [सं. मृदु]

**मोवरे** न. खाण्यास योग्य असणारी एक मासळी; म्हावरे; हलवान. (कु.)

**मोवला** पु. काजूगर. (मालवणी) पहा : **मोगल**

**मोवळा** न.अव. कानावरील केसांची झुलपे. (गो.)

**मोवळी** स्त्री. पानांची मोळी, गुंडाळी.(को.)

**मोवा** पु. शेतातील पीक, भाजीपाला यांची नासाडी करणारा एक कीटकविशेष; वेलावर किंवा भाजीपाला, पीक यांवर पडणारी बारीक कीड.

**मोवागी-री, मोवागीत** स्त्री. मंद मंद असा जाळ.

**मोवाज्वर** पु. तापाची एक जात, प्रकार; जीर्णज्वर.

**मोवाण, मोंवण** न. लोणी; मार्दव आणणारा पदार्थ.

**मोवार** पु. गोव्यात नदीलगत राहणारा पांढऱ्या शुभ्र रंगाचा एक पक्षी.

**मोवार(ळ)णे** क्रि. तिंबून मऊ होणे (कणीक वगैरे);(ल.) मवाळ होणे.

**मो(म)वारी, मोवाळी** स्त्री. लोणी इ. स्निग्ध पदार्थ. (वा.) **मोवारीचें वंगण घालणे** - ममतेने वागवणे.

**मोवाळ-ळी** वि. मृदु; मवाळ.

**मोवाळणे** क्रि. १. मृदू होणे; वठणीस येणे. २. मलूल होणे.

**मोवाळे** न. पहा : **मोद(ध)ळा** ६

**मोस** पु. १. मार्ग; पत्ता; मूस; शोध; सुगावा; माग. २. कुंपणाला लावण्यासाठी झाडाच्या तोडलेल्या लहान-लहान फांद्या. ३. चोरीचा माल. ४. घात.(बे.)

**मोसबा** पु. १. हिशोब; हिशोबपत्रक; खर्चाच्या हिशोबाचे टिपण. २. मुक्ततेची किंवा सुटका झालेली स्थिती; सुटणूक; मोकळीक. ३. (निंदार्थी) पराक्रम. [अर. मुहासबा]

**मोसबा** पु. नमुना. (बे.)

**मोसबेकरी-दार** पु. फडणीस; हिशेबनीस.

**मोसंबी** स्त्री. नारिंगीच्या जातीचे एक फळ; त्याचे झाड. [मोझांबिक]

**मोसम** पु.न. काही गोष्टींचा योग्य, अनुरूप काळ, समय, ऋतू, सुगी; हंगाम. [अर.मौसिम, मूसम्]

**मोसमी** वि. १.काही काळपर्यंत टिकणारा. २. विशिष्ट ऋतूत, काळात होणारे (फळे, भाजी इ.).

**मोसवो** पु. शेत, जमीन जाळल्यानंतरची राख. (कु.)

**मोस्तार** न. महिना. (कु.)

**मोह** पु.स्त्री. चेहरा; हजामत. - बदलापूर ३७.१०५.

**मोह-हो** पु. एक वृक्ष; याच्या फुलाची दारू काढतात.[सं. मधु, मधुक]

**मोह** पु. १. मूर्च्छा; बेशुद्धी; चित्तभ्रम; भुरळ; भारणी; मोहन; भुलावण; भूल.२. प्रेम, माया, दया, कीव, सहानुभूती इत्यादींना चेतविणाऱ्या विषयांचा क्षुब्ध लोभ. ३. सदसद्विवेक बुद्धीचा, जाणिवेचा लोप; विस्मरण; घोटाळा; मतिभ्रम; भुलावण. ४. अज्ञान; मूर्खपणा; आत्मज्ञानाचा अभाव असल्यामुळे जगातील सर्व विषय, सर्व दृश्य जगत खरे आहे असा भास होऊन त्याचा उपभोग व वैषयिक सुख घेण्याकडे प्रवृत्ती होणे. ५. आवड; शोक; प्रीती; प्रेमाचे वेड; प्रेमाचा अतिरेक. ६. चूक. [सं. मुह्]

**मोहक** वि. १. भुरळ पाडणारे; भ्रम उत्पन्न करणारे; गुंतवणारे; गुंगवणारे. २. आकर्षक; रमवणारे; चित्तहरण करणारे. [सं.]

**मोहका** पु. चौक; घराच्या छपरापुढील भाग; संधी. (व.)

**मोहचळ** वि. १. गरम; कोमट (पाणी, इतर द्रव पदार्थ). २. मचूळ.

**मोहचूळ-चळे** वि. घोटभर; चूळभर; थोडेसे :'तुज अभिषेक होणें जेणें जळें । ऐसें हे मोहचळें तरी देई ।'- मध्व ५८३.

**मोहजबा, मोहजबेदार** पु. पहा : **मोसबा, मोसबेदार**

**मोहजाल-ळ** न. मायेच्या योगाने संसारात उत्पन्न होणारा मायेचा पाश; संसार; जगातील पसाऱ्याचे जाळे; कुटुंब, इष्टमित्र, मालमत्ता व इतर भ्रामक विषयांची भूल, भुरळ.

**मोहटक-ळ** न. गुरांना चरण्याचे कुरण; गुराढोरांचे सार्वजनिक चराऊ रान; गायरान.

**मोहटी-टे** स्त्री. मोहाच्या झाडाचे फळ.

**मोहटी** स्त्री.१. छपराचे अग्र. २. कठडा नसलेला घराचा गॅलरीवजा लहानसा भाग; ओसरीचे छप्पर. [सं. मुखपट्टी]

**मोहटीचे पान** वाश्यांची टोके दिसू नयेत म्हणून छपराच्या अखेरीस मारलेली नक्षीदार फळी वगैरे; पानपट्टी.

**मोहड** न. तोंड; मस्तक : 'ऐसेया गजाचे श्रुंधार : पाखरा मोहड आतिसुंदर' - रुस्व ९१६.

**मोहडा** पु. १. मोहोरा; मुख्य; म्होरप्या :'हातींचिआं मोहडा । सिंहो करी रगडा ।'- शिव ४८६. २. मुख; तोंड :'सौंदर्यवान दिग्गजाचिया मोहडा तरी उपमा दीजे भुजादंडा ।'- नरुस्व ११२२. [सं.मुख]

**मोहडा चांदोचा** घोड्याच्या तोंडावरील भूषण, दागिना.

**मोहणे** उक्रि.भुलणे; भुलावणे; वश करून घेणे; वश होणे; मोह पडेल असे करणे; भारणे; मोह उत्पन्न होणे-करणे; चित्त भ्रमणे.

**मोहत(ती-तू)र** पु. १. मुहूर्त; अठ्ठेचाळीस मिनिटांचा काळ, वेळ. २. (ल.) योग्य काल; शुभ काल, ऋतू, क्षण. ३. शूद्र स्त्रीचे, पुरुषाचे दुसरे लग्न; विधवाविवाह; पाट. (क्रि. लावणे, लागणे.)

**मोहतदी** वि. मोताद; कंगाल; दरिद्री. [अर. मुह्ताज]

**मोहतरफा-तर्फी** पु. खेड्यातील दुकानदार व कारागीर यांच्यावरील कर; गवंडी, सुतार वगैरेंना त्यांच्या कसबासंबंधी सरकारास द्यावा लागणारा कर . [फा. मुहतरिफा]

**मोहतरफी** वि. मोहतर्फा ज्या कुळास द्यावा लागतो असे कूळ, माणूस.

**मोहतसदी-बी** स्त्री. वजनमापांची तपासनिशी.

**मोहतसीब** पु. निषिद्ध कामांची चौकशी आणि निवाडा करणारा; धर्मशास्त्री; पंडितराव. [अर. मुहतसिब्]

**मोहते(टे)ल** न. मोहटीपासून, मोहाच्या बियांपासून काढलेले तेल; मोहाळ.

**मोहतोपदार** पु. मशालजी :'एसाजी गुंजाल मोहतोपदार.' - वाडबाबा १.१६. [फा. महताबदार्]

**मोहदाद** वि. माफक.

**मोह(व)न** वि. कणीक किंवा कोणतेही पीठ मळताना त्यास मऊपणा आणण्यासाठी त्यात घातले जाणारे तेल, तूप.

**मोहन** न. (प्र.) मौन. स्तब्धता; स्थिरता; शांतता; निःशब्दता : 'काय सेवू नव शीत उष्ण तहान । साहो की मोहन धरूनी बैसों ।'- तुगा १११८.

**मोहन** न. गूळ, खोबरे आणि वेलची वगैरे एकत्र करून मोदक, करंज्या इ.साठी केले जाणारे पुरण.

**मोहन** वि. १. मोहविणारे; आकर्षक.२. भुलवणारे; भूल पाडणारे; भ्रामक. न. १. (वैद्यक.) गुंगी आणणे; भूल देणे; बेहोश पाडणे. २. भुरळ; मूर्च्छा; भ्रम; गुंगी आणणारे औषध.

**मोहनजाबता** न. सरकारी सर्व धर्मदायांचा नामनिशीवार तक्ता वा यादी.

**मोहनभूत** न. भूताचा एक प्रकार; पिशाच.

**मोहनभोग** पु.१. तांदळाची एक जात. (व.) २. आंब्याचा रस आटवून केला जाणारा पदार्थ, खाद्यविशेष. ३. गव्हाचा शिरा.

**मोहनाद** वि. मोजके; प्रमाणात. [अर.]

**मोहनास्त्र** न. एखाद्या इसमावर मोहिनी टाकण्याचे अस्त्र; शत्रूवर सोडले

असता त्यास मूर्च्छा आणणारे अस्त्र.

**मोहनी** पहा : **मोहिनी**

**मोहपाश** पु. संसाराचे जाळे; भ्रामक विषयांचे बंधन; मोहरूप पाश; मोहजाल.

**मोह(हो)बत,मोबत–द** स्त्री. १. कृपा; प्रेम; दयाळूपणा. २. मेहेरबानी. ३. भीड; मुरवत. [अर. महब्बत्]

**मोहमदी–मुदी** स्त्री. उंची, सुती कापड. [अर. महामुदी]

**मोहयंत्र** न. नळा (शोभेच्या दारूचा); फुलबाजी.

**मोह(हो)र** स्त्री. १. एक सोन्याचे नाणे. २. शिक्का. ३. आपल्या नावाचा अक्षरांकित ठसा. ४. रुपया, पैसा, नाणी इत्यादींवरील जे चिन्ह किंवा आकृती. ५. काही पदार्थांवर खुणेसाठी केलेले चिन्ह. [फा. मुहर]

**मोह(हो)र** पु. आंबा, कडुलिंब इत्यादीसारख्या झाडांना येणारा फुलांचा गुच्छ; झुपका. [सं. मुख]

**मोहर** स्त्री. १.अग्रभाग; पुढचा भाग; पुढची जागा. २. फौजेचे पुढील तोंड, पुढे असलेले किंवा गेलेले लोक; बिनी; आघाडीची फौज; पुढील तुकडी. ३. अग्रभागीची निशाणी; खूण,चिन्ह, ध्वज : 'तंव बाणाचे वहनासमोर । तो चालिला गरुड मोहर ।'– कथा १.७. ४. बोलणे, चालणे, काही काम करणे इ.ची पद्धत, रीत.५. गमनाची दिशा; जाण्याचे ठिकाण; मार्ग; रस्ता. ६. बाजू : 'ईश्वराची मोहर धरी।'– महानु ९०. ७. प्रकार : 'आणि एकसारें आहारा। कैसोनि तिनि मोहरा । जालिया तेहावीरा। रोकडे दाऊं।'– ज्ञा १७.१२०.८. मनोरथ; इच्छा; वांछा. [सं. मुख](वा.)० **धरणे**– आघाडीस जाणे; पुढारीपण घेणे; पुढे निघणे.

**मोहर** वि. श्रेष्ठ; पूज्य.

**मोहरकंद** पु. मोहरेवर ठसा मारणारा; मोहरेचा ठसा खोदणारा.

**मोहरकाडा** पु. अग्रेसर.

**मोहरकाढ्या, म्होरक्या, मोहरकडा–डी,मोहरपी–प्या** वि. पुढाकार घेणारा; पुढे होणारा; (कोणत्याही मंडळ, संघ, संच, सभा यांचा) मुख्य किंवा पुढारी; समारंभाचा संयोजक.

**मोह(हो)रकी** स्त्री. (बैलाच्या किंवा घोड्याच्या तोंडाभोवतालून मानेवरून दुहेरी किंवा तिहेरी विळखे घेऊन बांधलेले) कातड्याचे किंवा दोरीचे बंधन; घोड्याच्या तोंडास बांधलेली पट्टी; बैलाच्या तोंडास बांधलेली जाळी.

**मोहरकी गाठ** मोहरकी तयार करण्याची शेतकरी लोकांना अवगत असलेली गाठ.

**मोहरचा–ला** वि.१. पुढचा–ला, आघाडीचा; पुढे जाणारा. २. भविष्य काळाचा.

**मोहरणे** क्रि. पुढे होणे; वळणे; फिरणे.

सक्रि. १. वाजवणे (पोवा, मोहरी).२. गोंजारणे. ३. आकर्षणे; मोहून टाकणे : 'गोपी स्त्रियांचे मन मोहरी हा ।' – नदा ५२.

**मोहरणे** अक्रि.१. केसरणे; कळ्यांचे तुरे येणे; मोहर येणे (आंबा, कडुलिंब इत्यादीला). २. (शेत, धान्य) परिपक्व दशेस येणे. ३.(लोणी, उसाचा रस, तूप यांची) कढविण्याची क्रिया पूर्ण होणे. ४. (गुरे, ढोरे, मेंढरे यांनी) कळपाच्या पुढे चालत असणे. ५. पुढे असणे किंवा जाणे, होणे; पुढारणे; मार्गात प्रगती करून घेणे. ६.(चंद्र) उगवण्याच्या बेतात असणे, वर येणे, उगवणे, क्षितिजावर येणे; चंद्रोदय जवळ येऊन ठेपलेला असणे.

**मोहरणे** क्रि. मोर्चा वळवणे : 'नाना पुनिवेचे आंधारें । दिशा येणे रार्ती मोहरें ।'– अमृ ७.४०.

**मोहरप** वि. पुढला; वडील.

**मोहरप** धास्ती; दबाव; दरारा; छाप.

**मोहरबंद** वि.मोहोर किंवा शिक्का मारून बंद केलेले; पक्के बंद; वर मोहोर केलेले.

**मोहरम** पु. १. अरबी वर्षाचा पहिला महिना. ३. ताबुताचा सण. [अर.]

**मोहरम** पु. पराभव; धुव्वा. [अर. महरूम]

**मोहरमखाना** पु. ताबूत ठेवण्याची जागा; अशुरखाना. [फा.]

**मोहरवणी** न. तोंडी लावण्यासाठी आंब्याच्या कैऱ्यांच्या फोडी, हिंग, मोहऱ्या, मीठ इत्यादींचे केलेले मिश्रण.

**मोहरा** पु. १. बुद्धिबळाच्या खेळात राजा व प्यादा यांखेरीज बाकीची बुद्धिबळ प्रत्येक. २. नेता; मुख्य; पुढारी. ३. मृदंग वाजवण्याचा एक प्रकार. ४. चेहरा; मुद्रा; तोंडवळा; तोंड; चेहरेपट्टी; मुखाची रूपरेषा. ५. देखणा व आश्वासक व्यक्तिमत्त्वाचा मनुष्य; पराक्रमी किंवा साधनसंपन्न माणूस. ६. एखाद्या गुणाने उत्कृष्ट मनुष्य. ७. कागद, दागिना, सोने, चांदी इत्यादीचे पात्र गुळगुळीत व चकचकीत करण्यासाठी घोटण्याचा मणी किंवा दगड; अशा घोटण्याने आलेली चकाकी, तजेला, गुळगुळीतपणा. ८. सर्पाच्या डोक्यातील कल्पित मणी. हा विषाला मारक असतो, असे समजतात. ९. आघाडी; अग्रभाग; पुढील भाग; पुढची किंवा आघाडीची जागा; बिनी; फौजेचा पुढचा भाग. १०. कोऱ्या कागदामधील शिक्का किंवा आकृती. ११. हल्ला.

**मोहरा** क्रिवि. सामोरा; आघाडीवर; बाजूला; पुढे; समोर; नीट.

**मोहरिरी** स्त्री. मोहरीराचा उद्योग, पगार किंवा वेतन; मोहरीराचे कर्तव्य, अधिकार किंवा पगार.

**मोहरी** वि. सही–शिक्केदार; मोहोर केलेले; सहीशिक्क्यानिशी.

**मोहरी** वि. पुढचा; अग्रभागाचा; पुढील आघाडीचा.

**मोहरी** स्त्री. पाळ; सज्जा; (इं.) गॅलरी. (व.)

**मोहरी** स्त्री. फोडणीत घालतात ती वाटोळ्या आकाराची, करड्या रंगाची राई. हिच्या दोन जाती–शिरसू किंवा सरसू (याचे तेल काढतात), राई (शरीरविलेपनासाठी) वापरतात.

**मोहरी** स्त्री. नाश : 'मीच राम येउनी करीन शत्रु मोहरी ।'– आ यज्ञरक्षण.

**मोहरी** स्त्री. १. तोंडाने वाजवण्याचे वाद्य; मुरली; पुंगी : 'टाळ मृदंग मोहरिया । पावे शृंगें घुमरिया।'– ह १०.१४०. २. कपाळावरील बिंदीसारखा दागिना.

**मोहरी** स्त्री.१. पाणी वाहून नेण्यासाठी केलेला लहान पाट. २. स्नान वगैरे करण्यासाठी केलेली चुनेगच्ची मोरी. ३. तोफेचा मणी किंवा डोळा. ४. चुन्याच्या भट्टीचे भोक.

**मोहरीफेस** मोहऱ्यांच्या बारीक कुटात पाणी टाकून फेणवून साल काढून त्यात आंब्याच्या बारीक फोडी, तिखट, मीठ, हिंग इ. घालून केलेले एक प्रकारचे लोणचे. (व.)

**मोहरीर-ल** पु. लेखनिक; देशपांड्यांचा गुमास्ता; सार्वजनिक अधिकारी. [अर.मुहर्रिर]

**मोहरे** न. वि. मोहरीच्या रंगाचे.

**मोहरे** क्रिवि. माघारी.

**मोहरे** न. १. फुंकून वाजविण्याचे एक वाद्य; रणमोहरे; रणशिंग. २. (बुद्धिबळाच्या, सारीपाटाच्या खेळातील) सोंगटी.

**मोह(हो)रेदार** वि. तुळतुळीत; घोटीव; गुळगुळीत; चकचकीत व उजळ; नितळ.

**मोहर्क** स्त्री.(व.) पहा : **मोहरकी**

**मोहल** न.बाहीचें तोंड. [फा.]

**मोहला** वि. आरेखित; सुबद्ध.

**मोहली** पु. सामना. [सं. मुख]

**मोहल्ला** पु. १. व्यूह; चढाई; मोर्चा :'फौजेचा मोहल्ला करून मोंगलाचे गोटावर चालले.'ह्व खरे २०९६.२. शहराचा भाग; गल्ली. [अर. महल्ला]

**मोहसबा, मोहसबेदार** पहा : **मोसबा, मोसबेदार**

**मोहसल्ली** पु. महसूल वसूल करणारा शिपाई; महसुलाबद्दल तगादा करणारा शिपाई. [अर. मुहस्सिल]

**मोहळ-ळे, मोह(हा)ळा** न.पु. वासराला मातेचे दूध पिता येऊ नये म्हणून त्याच्या तोंडाला बांधलेले मुसके. [सं. मुखम्]

**मोह(हा-हो)ळ, मोहोळे** न. मधमाशीचे मधाचे पोळे किंवा टाळे.

**मोहळणे** अक्रि. मोहित होणे : 'वांचूनि मूर्खांची गोठी काइसी । एथ मोहळले क्रांतदर्शी ।'- ज्ञा ४.८७. [सं.मोह्]

**मोहळी** स्त्री. घोड्याचा लगाम; मोहोरकी; मोहरकी.

**मोहा, मोहाचा** वि. मोहक किंवा उत्कृष्ट गुणाचा.

**मोहाड** न. चेहरा; तोंड :'दिग्गजा चिआं मोहाडा। जरि आनंदाचिआ होंति दोनि सोंडा ।' - शिव ४००. [सं. मुख]

**मोहाडणे** सक्रि. तोंड वासणे : 'मोहाडी थोर कांडी'- गरा ४९. [सं.मुख]

**मोहाथिणे** उक्रि. मोहनी पाडणे; भुरळ किंवा भुलवण पडणे; भुलून जाणे; मोहित होणे.

**मोहाली** न. हत्तीचे डोळे उघडे ठेवून कपाळाचा बाकी भाग झाकणारे वस्त्र.

**मोहाळ** वि.व्यर्थ; निरुपयोगी : 'नातरी वांझ स्त्री मोहाळ।'- कथा ७.१.१२.

**मोहाळ-ळू** वि. प्रेमळ; वत्सल.

**मोहाळी** स्त्री. १. घोड्याचा लगाम.२. आघाडीवरील घोडे.

**मोहाळे** न. बैलासाठी (डोळ्याचा भाग उघडा ठेवून) तरटाचे शोभिवंत बनविलेले झापड किंवा झाकण; सकलादीचे आच्छादन. [सं. मुख + आलि =मुहाळ]

**मोहित** वि. मोह पावलेला; भुललेला; भुरळ पडलेला; लुब्ध. [सं.]

**मोहिनी** स्त्री.१. मोहन; प्रलोभन; भुलवण; भुरळणे; चित्तभ्रम; बुद्धिभ्रम. २. समुद्रमंथनप्रसंगी विष्णूने घेतलेले मोहिनीचे रूप. ३. मोह घालण्याची, वश करण्याची, भूल घालण्याची कृत्ये.

**मोहि(ही)म** स्त्री. १. महत्त्वाचे कार्य; अंगीकृत कार्य. २. काही देश जिंकण्यासाठी राजे लोकांकडून केली जाणारी स्वारी; सैन्याची चाल मुलुखगिरी; (सैन्याची) सफर. ३. गोसावी लोकांचे पर्यटन, फेरफटका. [अर.मुहिम्म]

**मोहिमी** वि. मोहिमेसंबंधी; मोहिमेचा. [हिं.]

**मोहिरे** न. सन्मुखता : 'परतले अविद्येचें मोहिरें ।'- अमृ २.१४. पहा : **मोहाड**

**मोहिरे** न. १. साहित्य; सामग्री. २. मोहक, मोहवणारी वस्तू; :'तो दाउनि माया वेषाचे मोहिरे । जेथ चरित्रें करी ।'- ऋ ४२. ३. सोंग; मुखवटा.

**मोहीम** वि. महत्त्वाचे; उत्कृष्ट. [फा.]

**मोहुर** मोहरलेली स्थिति; फुललेली किंवा केसरलेली अवस्था.

**मोहुरणे** क्रि. फुलणे; केसरणे.

**मोहोटी, मोहोटेल, मोहोणे, मोहोतरफा, मोहोती, मोहोबद, मोहोर, मोहोरकी, मोहोरणे, मोहोळ, मोहोळे** पहा :**मोहटी, मोहटेल** इ.

**मोहोर** पहा : **मोहर** स्त्री.

**मोहोरा** पु. उदय.

**मोहोरे** क्रिवि. पुढे : 'तोंडें काढूनी येरी मोहोरे।'- उषा १६९९.

**मोहोळ** स्त्री. अस्तनीचे मनगटाकडील तोंड अथवा विजारीचा घोट्याकडील भाग.

**मोहोळ** न. पर्वताचे खोरे. [सं. मौलि किंवा मलय]

**मोहोळी** स्त्री. तोंड.

**मोळ** पु. १. छपराची तिकोनी बाजू किंवा उतार. २. वळचणीच्या बाजूचा छपराचा पुढे आलेला भाग. ३. डोके :'जैसा लवे सज्जनांचा मोळ । गुणधन वैभवें करूनी ।'- जै ३.७१. [सं. मौलि = शिर]

**मोळ** न. लहान मुलांच्या पोटरीवर होणारा एक रोग.

**मोळ** न. एक प्रकारचे वास नसलेले गवत. याच्या केरसुण्या, कुंचे करतात. पु.न. १. पीठ वगैरे गोळा करण्याचा एक प्रकारचा राठ गवताचा कुंचा. २. कानातील मळ. [सं. मृदुल = मऊ]

**मोळका** पु. कोंब. (बे.) [सं. मौलि]

**मोळताई** स्त्री. नम्रता.

**मोळसूद** (गो.) पहा : **मळसूत्र**

**मोळा** पु. १. वळण; रीत; पद्धत; परिपाठी; वागण्याची पद्धत; चालरीत. २. रूढ झालेली पद्धत; प्रघात; सवय. [सं. मूल = मौलिक]

**मोळा** पु. १. ठसा. २. खिळा; खुंटी; लोखंडी किंवा लाकडी मोठी चूक; लहान मेख. [सं. मौलि]

**मोळा** पहा : **मोहाळे**

**मोळांडणे** क्रि. रग लागणे; पायास मुंग्या येणे अथवा पाय दुखणे. (व.)

**मोळी** स्त्री. १. जळणाच्या लाकडाचा भारा, ओझे, गठ्ठा; लाकडे, ऊस, गवत इ.चा मोठा भारा. २. शरीराबद्दल तुच्छतादर्शक शब्द. ३. सुकलेली वेलीची काठी. (वा.)० **उचलणे**- १. (मनुष्याला) उभे करणे, उंच करणे, उत्थापन देणे. २. (मनुष्याची) तळी उचलणे. २. (होळीच्या खेळात) मनुष्याची गठडी करून त्याला वर उचलणे.

**मोळीकार** पु. मोळी विकणारा; मोळीविक्या.

**मोळे** न. पहा : **मोळा**

**मोक्ष** पु.१. मुक्ती; शरीरातून आत्मा निघून जन्ममरणाच्या फेऱ्यात न सापडता कायमचा ब्रह्मामध्ये विलीन होणे; चार पुरुषार्थपैकी अखेरचा पुरुषार्थ; दुःखाची अत्यंत निवृत्ती व परमानंदाची प्राप्ती.२. सोडविणे; (जन्ममरणातून) सुटका. ३. मृत्यू. ४. कर्ज फेडणे. ५. मुक्त अवस्था; आध्यात्मिक पूर्णावस्था. [सं. मुच् = सोडणे]

**मोक्षण** न. मोकळे होणे; स्वतंत्र होणे; सुटका.

**मोक्षपद** न. मोक्षाचे स्थान, स्थिती, श्रेष्ठपद; ब्रह्मत्व.

**मोंड** वि. खाष्ट. (कर.)

**मोंढा** वि. डोक्यावर मुकुट नसलेला उघड्या डोक्याचा (रुपया).

**मॉडेल** न. १. आदर्श. २. प्रतिमान. ३. नमुना. [इं.]
वि. नमुनेदार.

**मॉनिटर** पु. वर्गनेता, प्रमुख; वर्गावर देखरेख ठेवणारा विद्यार्थी. [इं.]

**मौक्तिक** न. मोती. [सं.]

**मौज** स्त्री. १. मजा; गम्मत; चैन;क्रीडा; खेळ; करमणूक; आनंद देणारी कृत्ये किंवा देखावे. २. सुख; आनंद; मनोरंजन. ३. एकदम उद्भवणारी लहर; तब्येत; विनोद; आश्चर्य; नवल. [अर. मौज]

**मौज–जा** वि. नाना प्रकारच्या मौजा करण्याचा स्वभाव; रंगेलपणात काळ घालवणारा.

**मौज–जा** स्त्री.पु. लहर; लाट; तरंग; हेलकावा; उर्मी. [अर. मौज=तरंग]

**मौजाळा** वि. गमती, मजा करणारा; खेळकर; करमणूक करण्याचा शौक असणारा.

**मौजूद** वि. जिवंत; विद्यमान; हजर; तयार. [अर. मव्जूद]

**मौजे–जा** न. पु. खेडे; गाव. [अर. मौझा]
वि. च्या खेडेगावात किंवा ला; खेडगावाच्या नावाच्या मागे हा शब्द योजला जातो.

**मौढ्य** न. १. अज्ञान. २. मूर्खपणा; मठ्ठपणा; बुद्धिमांद्य. [सं.]

**मौत** स्त्री. १. मृत्यू; मरण. २. संकट. [हिं.] (वा.) **(कुत्र्याच्या)मौतीने मरणे** १– हाल होऊन अथवा समाजाने अवमानिलेल्या स्थितीत मरणे.

**मौन** न.१. गप्प किंवा स्तब्ध बसणे; न बोलणे; गुपचूप बसणे; मुकेपणा; ठरावीक काळापर्यंत भाषण न करता राहणे. २. अबोलपणा; स्तब्धता.
वि. मुका; न बोलणारा; स्तब्ध किंवा गुपचूप बसणारा.[सं.](वा.)० **वाचणे**– दिव्य दृष्टीने पाहणे.

**मौनी** वि.१. स्तब्ध; मौनव्रत घेतलेला; अबोल; अल्पभाषी. २. जगापासून पराङ्मुख होऊन ज्याने आपले सर्व विकार (कामक्रोधादी) जिंकले आहेत असा; वनवासी; अरण्यवासी; वानप्रस्थी; ऋषी.

**मौरुषी कूळ** वहिवाटदार कूळ.

**मौर्ख्य** न. १. मूढपणा; मूर्खपणा. २. अज्ञान; निरक्षरता. [सं.]

**मौर्वी** स्त्री. धनुष्याची दोरी. [सं.]

**मौल** स्त्री. मौली; मस्तक.

**मौल** न.१. कपट; इंद्रजाल. २. शिखर.

**मौलवी, मौलाना** पु. इस्लाम धर्मशास्त्री; मुस्लीम धर्माधिकारी; मुल्ला; न्यायालयात मुसलमानी कायद्याचा अर्थ सांगणारा; मुलाना; मुसलमानी धर्म सांगणारा. [अर. मव्लवी]

**मौला** पु. १. प्रभू; ईश्वर. २. मालक; धनी. [अर. मव्लवी]

**मौलि–ली** स्त्री. १. शीर्ष; डोके; शिर. २. डोक्यावरील केसांचा झुबका.
पु. मस्तक.

**मौलिक** वि.१. मुळाशी असलेला.२. अगदी नवीन; मूळ; प्रथमच शोधून काढलेला. [सं. मूल]

**मौलेकाजी** पु. मुसलमान धर्मगुरू; न्यायाधीश.

**मौल्य** न. १. मूल्य; मोल; किंमत. २. महत्त्व. [सं. मूल्य]

**मौल्यता** स्त्री. गोडवा.

**मौहु** न. शिसवीचे लाकूड.

**मौहुटी** स्त्री. छपरापुढील भाग; वळचणीचे लाकूड.

**मौळ–ळा** न.पु. १. शिर; डोके. २. शिखर.
पु. फणस इ.वरील काटे.

**मौळला** वि. मऊ : 'मी मदनु मौळला सापु ।'– उषा १२६. [सं. मृदुल]

**मौळा** पु.१. काटा; फळावरील काटा :'कनकाचिया फळा । आंतुमाज बाहेरी मौळा ।'– ज्ञा १८.६५८. २. मुसके.

**मौळीमंडळी** स्त्री. मस्तक.

**मौंज** वि. मोळ नावाच्या गवताचे; मुंज तृणाचे. [सं.]

**मौंजी** स्त्री. मुंज नावाचे कटिसूत्र (मुंज गवताची केलेली असते म्हणून); ब्राह्मणाचे कटिसूत्र.

**मौंजीबंधन** न. उपनयन; मुंज; यज्ञोपवीत धारण करण्याचा विधी. [सं.]

**म्याऊ** उद्गा. मांजरीचा ओरडण्याचा आवाज. [ध्व.]

**म्यान** न. तरवार इ.चे मेण; तरवारीचे घर; कोष.[फा. मियाना] (वा.)० **करणे**–(तरवार म्यानात घालणे) तोंड बंद करणे; बोलण्याला आवर घालणे.
स्त्री. सापाची कात.

**म्यान** पहा : **मेण** ३; त्रिफळ, गेळफळ, निवळकांडे एकत्र कुटून मासे मारण्यासाठी उपयोगी असे केलेले विषारी मिश्रण.

**म्याना** पु. १. पहा : **मेणा**. २. इराणहून येणारे एक औषध; तुरंजबीन; शिरखैस्त. साधारण सारक असणारे हे औषध एक प्रकारच्या झाडाच्या बुंध्यापासून मिळते. [फा. मीयान]

**म्यार** स्त्री. खाचराभोवतालच्या बंधारा; मेर; शेताची सीमा दाखवणारा बंधारा. [म. मेर]

**म्यालेट** पु. लाकडी हातोडा; फर्मा ठोकण्याचे साधन.

**म्युनिसिपा(पॅ)लिटी** स्त्री. पहा : **नगरपालिका** [इं.]

**म्लान** वि. १. थकलेला; गळलेला; मलूल.२. कोमेजलेला; फिकट; निस्तेज; सुस्त; जड; गलित. ३. खिन्न; विषण्ण दिसणारा. [सं. म्लै = कोमेजणे]

**म्हटले** (पादपूरणार्थक – मराठी बायकी) १. लक्षात असू द्या. २. सिद्ध गोष्ट. (आर्जव शक्तीने व अदबीने व केव्हा केव्हा किंचित थट्टेच्या सुरात उपयोगात आणलेला शब्द.).

**म्हण** स्त्री.१. लोकपरंपरेने आलेले नीतिबोधक, लोकमान्य झालेले सुटसुटीत व चटकदार असे दृष्टांतभूत वाक्य; रूढ वचन; लोकोक्ती. २. बोलण्याची रीत. ३. बातमी; खबर; वार्ता.

**म्हणगत** स्त्री.न. म्हणणे; बोलणे; भाषण.

**म्हणजे** उअ. १. त्याचा अर्थ की; अन्य शब्दांनी तेच सांगावयाचे तर; किंवा; अथवा. २. त्याच्या योगाने; तेणेकरून; त्याचा परिणाम असा होतो की; अशी स्थिती असल्यामुळे; पूर्वोत्तर क्रियांचा कार्यकारणभाव असता कारण क्रियावाचकांपुढे या अव्ययाचा योग होतो. उदा. पाऊस पडला म्हणजे पीक चांगले येईल.

**म्हणणे** सक्रि. १. बोलणे; उच्चारणे; वदणे. २. पठण करणे; पाठ म्हणणे. ३. वाचणे; अभ्यास करणे; पढणे; सर्व म्हणून टाकणे; मुखोद्गत करणे. ४. नाव घेणे; आव्हान करणे; बोलणे; नामोच्चार करणे. [सं. भण्]

**म्हणणी** स्त्री.१. म्हणणे; पाठ म्हणणे. २. म्हणण्याची किंवा पठण करण्याची रीत अथवा मार्ग; म्हणण्याची तऱ्हा; धाटणी. ३. एक किंवा एकदा म्हणावयाचा पाठ (वेद वगैरेचा). ४. म्हण; लोकोक्ती.

**म्हणता** वि. म्हणणारा.

**म्हणपणे** क्रि. म्हटले जाणे.

**म्हणिया, म्हणियागत, म्हणियारा–रे** वि. आज्ञाधारक; आज्ञेप्रमाणे वागणारा. [प्रा.]
वि. चाकर; दास.

**म्हणिये–ए** न. १. आज्ञा; सेवकाचे कर्तव्य; सांगितलेले काम : 'आणी कांवो तूं दिससीं दुश्चित्ती । म्हणिये काम नलगे तुझ्या चित्तीं ।'– तुगा १११. २. काम.

**म्हणिये–पे** अ. म्हणजे; नावाचा–ची–चे :'भक्ति तेंचि पैं आर्ति । आणि जिज्ञासु म्हणिपै ज्ञानस्फूर्ति ।' –सिसं ४.८८.

**म्हणी** स्त्री. पाट (बसण्याचा). (कु.)

**म्हणू(णो)न, म्हणऊ(वू)न** क्रिवि.१.त्यामुळे; त्याकारणास्तव; त्यासाठी; यावरून; तस्मात्; सबब; त्याअर्थी. २. असे; इत्यादी; याप्रकारचे, अर्थाचे.
वि. १. म्हटले जाते ते; या नावाचे. २. अर्थशून्य; पादपूरक.

**म्हणीया** पु. निरोप्या; दूत : 'म्हणियाचेनि दासपणें । साजा होए ' – ज्ञा १३.४.४३७.

**म्हनेरा** पु. तगादा.

**म्ह(म्है)शा** पु. रेडा; हल्या; जड, दांडग्या व कुरूप रेड्याबद्दल किंवा इतर पशूंबद्दल तुच्छतेने योजण्याचा शब्द.
वि. १.(ल.) रेड्यासारखा धष्टपुष्ट, मतिमंद; म्हशीसारखा जड प्रकृतीचा. २. सुस्त; दांडग्या आणि घाणेरड्या माणसाबद्दल तुच्छतादर्शक शब्द; मूर्ख; अचरट मनुष्य.

**म्हशागुग(ग्गु)ळ** पु. १. एक प्रकारचा गुग्गुळ. २. धिप्पाड, गलेलठ्ठ व ठोंब्या माणसाबद्दल निर्भर्त्सनापूर्वक योजण्याचा शब्द.

**म्हशा बोळ** एक औषधी वनस्पती. एका झाडाच्या चिकापासून तयार होणारा बोळ.

**म्हशीचे मेळवण** (विनोदाने) अव्यवस्थित जेवण; ताटात, थाळीत खाद्यपदार्थांची अव्यवस्थित रेलचेल.

**म्हशेळी, म्हशळे, म्हसकेळे** न. मोठ्या, जाड जातीची केळ्यांची एक जात.

**म्हसक** स्त्री. म्हैस; महिषी; म्हसरू; म्हसरूड.

**म्हसकी–क्या** वि. म्हैस राखणारा, चारणारा.

**म्हसडी–डे** वि. म्हशीचे कातडे.

**म्हसड्या** वि. म्हशीसारखा अवजड. (व.)

**म्हसर** न.१. ढोर. २.(म्हशीच्या पाठीप्रमाणे) लांब व सपाट ह्या अर्थी सामासिक शब्दात म्हैस किंवा म्हस शब्दाचे तुच्छतादर्शक रूप. कंटाळवाणे आणि न संपणारे, लांबलचक. जसेः– म्हसरमाळ–रान इ.

**म्हसरे** म्हैस; टोणगे.

**म्हाकूळ** पु. न. समुद्रकफ; समुद्रफेन– फेस; सुफेन.

**म्हाजूर** माहिती.

**म्हातन** न. कुणबी लोकांचे देवकृत्य. (को.)

**म्हातापी** स्त्री. आतषबाजी; शोभेच्या दारूकामातील एक प्रकार; महताब.

**म्हातारचळ** पु. म्हातारपणी बुद्धीस होणारी विकृती, बुद्धिभ्रंश; म्हातारपणीचे पिसे, चाळे, तारे.

**म्हातारा** वि. १. वृद्ध; वयोवृद्ध; वयस्क. २. पुनर्वसू नक्षत्रास शेतकरी लोकांनी दिलेली संज्ञा; पुनर्वसु नक्षत्रातला पाऊस. ३. एक प्रकारचे गवत. [सं. महत्तर]

**म्हातारी** स्त्री.१. वय झालेली स्त्री; जरठ स्त्री. २. बोडकी; केशवपन केलेली विधवा स्त्री. ३. कापसाचा हलका पुंजा किंवा हलके पीस (हवेत उडणारे).४. विद्वान स्त्री;विदुषी. (वा.)**म्हातारी मेलीसे होणे**– अतिशय दुःख होणे.

**म्हादवी** पु. विदूषक. [सं. माधव्यें

**म्हान, म्हांद** न. कणगरासारखा कंद. हे औषधी असून विषावर उतारा म्हणून खाण्यास दिला जातो. (गो.)

**म्हामूर** पहा : **महामूर**

**म्हार** पहा : **महार**

**म्हारवत** महारांनी तयार केलेल्या टोपल्या इ. वस्तू. (को.)

**म्हारटोपी** स्त्री. पहा : **बगाड**

**म्हारकाव** स्त्री. गेरूचा, कावेचा एक प्रकार; तांबडी माती. पहा : **गेरू**

**म्हारकांडो** पु. नेता.

**म्हारग** वि. महाग. (गो.)

**म्हसा** स्त्री. मस; चामखीळ. (व.)

**म्हारगाय** वि. महागरा–डा. (गो.)

**म्हारडे** न. पावसाळ्यात उत्पन्न होऊन पावसाळा संपताच मरणारा खेकडा.

**म्हारू** न. टारपोला नावाच्या वनस्पतीचा दुपडदी फुलाचा कवचीवजा भाग. (गो.)

**म्हाल** वि. माडाच्या पेंडीपैकी पूर्वीच्या पेंडीचे नारळ. (कु.)

**म्हालगडा** पु. मुख्य विद्यार्थी. (को.)

**म्हालतंगडी** नायक; म्होरक्या.

**म्हालपंचायती** स्त्री. अव. चांभारचौकशा; नसत्या पंचायती, उठाठेवी.

**म्हाला–ली–लो** पु. १. न्हावी; हजाम. (व.) २. मशाली किंवा मशालजी; मशाल (टेंभा) धरणारा.

**म्हावदे, म्हामना** न. मावंदे. (कु.)

**म्हावरा–रे** न. १. मासा; मच्छी; मासळी. २. घबाड. (गो.)
**म्हावेलो** पु. (फळातील) गर. (को.)
**म्हास(सा)ड, म्हासाळ** पु. एका जातीचे तांदूळ; पटणी.
**म्हासरा** पु. वेडा; महासरा. पहा : **महसरा**
**म्हाळ, म्हाळवस–सा, म्हाळुंग–गी** पु. महालय; श्राद्ध; पक्ष.
**म्हाळका** पु. मागणी घालणारा. (भंडारी)
**म्हाळसा** स्त्री. १. खंडोबाची पत्नी. २. कुंकवाचा मोठा टिळा लावणारी, धष्टपुष्ट आणि अव्यवस्थित राहणारी भांडकुदळ स्त्री. ३. पूज्य देवता.
**म्हाळुंड** न. दुतोंडे; मांडूळ. (वा.)० **चावप**– (माळुंड चावलेल्या माणसाला मीठ खारट लागते यावरून) अळणी पदार्थ करणे. (को.)
**म्हेतर–ऱ्या** पहा : **मेह(हे)तर**
**म्हेतर** पु. घडा; रांजण. [फा. मिहतर]
**म्हेतरकी** स्त्री. म्हेतराचा उद्योग किंवा कर्तव्य; गावासंबंधी एक वतनदारी.
**म्हेर, मेहरे** स्त्री. मातीचा बांध. पहा : **मेर**
**म्हेळ** स्त्री. उसाचा रस कढवताना वर येणारी मळी; मलई; मळी.
**म्हेळचे** क्रि. गळणे. (को.)
**म्हेळी, म्हैराळु** स्त्री. बायको; पत्नी. [सं. महिला]
**म्हैस** स्त्री. १. महिषी; रेड्याची मादी; म्हसरू; म्हस. २. सहा पायांचा माशीपेक्षा मोठ्या आकाराचा व वरचा पृष्ठभाग कठीण असणारा एक प्रकारचा किडा. ३. केळफुलावरील निबर, काळसर रंगाची पारी. (पांढऱ्या रंगाच्या पारीस गाय म्हणतात.) [सं. महिष]
**म्हैसभादऱ्या** वि. १. आपल्या कामात निपुण नसलेला न्हावी. २.(उपहासार्थी) लेखक.
**म्हैसमंगळ** वि. मऊ.
**म्हैसमाळ** पु. प्रवासात न संपणारा दीर्घ लांबीचा माळ; ओसाड, नापीक प्रदेश.
**म्हैसवल** स्त्री. एक प्रकारचे झुडूप.
**म्हैसवा** पु. एक प्रकारचा पाषाण : 'कीं आव्हाटी म्हैसवा थर। नव्हतां दृष्टी गोचरु ।' – ऋ ४८.
**म्हैसवेल** स्त्री. बेल्याचा वेल; ऋक्षगंधा; छागलांछा.
**म्हैसा** पु. १. रेडा; टोणगा. २. म्हशागुग्गुळ : 'जैसा म्हैसा उगाचि नुठी कापुरा ।'– प्रज्ञा ९.५१७.
**म्हैसिक** वि. म्हशीचा.
**म्होडवामुस** मधमाशी. (गो.)
**म्होतरफा–फी, म्होती(तु)र** पहा : **मोहतरफा–फी**
**म्होर** न. बाशिंग; ताडाच्या व शिंदीच्या पाती, केळीचे सोपे इ. वस्तूंचे केलेले बाशिंग. हे भिंगाचे व काचेचे गोळे बसवून मुकुटाप्रमाणे तयार केले जाते. [सं. मुखर]
**म्होरं** क्रिवि. पुढे.
**म्होरकाढ्या, म्होरकी, म्होरक्या, म्होरचा, म्होरणे, म्होरपी, म्होरला, म्होरून, म्होरे, म्होरकाडी, म्होरको, म्होरळा, म्होरे** यांसाठी पहा : **मोहरकाढ्या** इ. शब्द.
**म्होरप** स्त्री. सैन्याची आघाडी; बिनी; बिंदी.
**म्होरो** पु. विष उतरवण्यासाठी लावलेला दगड. पहा : **मोहरा**
**म्होव–वँ** पु. १. मोहाचे झाड. २. मध; मधमाशीचे मोहो किंवा मोहोळ. ३. बसण्यासाठी कायमची जागा हुडकणाऱ्या किंवा शोधणाऱ्या मधमाशांचा थवा, घोळका. ४. गोडा. (गो.)
**म्होवलो** पु. काजूची भाजलेली बी. (गो.)
**म्होवाळ** न. मधुर फळ; मध, रस निघणारे फळ.
**म्होवळप, म्होवाळचे** क्रि. मधुर होणे. (को.)
**म्हौ–महू, म्हांव, म्हां** पु. न. मोहोळ; मधमाशांनी तयार केलेले मधाचे पोळे.



# महाराष्ट्र राष्ट्र मराठी साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
## प्रकाशित कोश वाङ्मय

| | |
|---|---|
| १. गुजराती - मराठी शब्दकोश | श्री. भाऊ धर्माधिकारी |
| २. उर्दू - मराठी शब्दकोश | श्री. श्रीपाद जोशी, प्रा. एन. एस. गोरेकर |
| ३. कन्नड - मराठी शब्दकोश | श्री. पुंडलिकजी कातगडे |
| ४. तमीळ - मराठी शब्दकोश | सौ. रमाबाई जोशी आणि श्री. पु. वि. जोशी |
| ५. मराठी - कन्नड शब्दकोश | श्री. गुरुनाथ दिवेकर |
| ६. मराठी - सिंधी शब्दकोश | श्री. प्रा. लछमन हर्दवाणी |
| ७. मराठी - गुजराती शब्दकोश | श्री. भाऊ धर्माधिकारी |
| ८. पाली - मराठी शब्दकोश | श्री. बाबा भारती |
| ९. मराठी वाङ्मय कोश : खंड - १ | श्री. गं. दे. खानोलकर |
| १०. मराठी वाङ्मय कोश : खंड - २ भाग १ | डॉ. गो. म. कुलकर्णी |
| ११. मराठी वाङ्मय कोश : खंड - ४ | डॉ. विजया राजाध्यक्ष |
| १२. आयुर्वेदीय शब्दकोश भाग १ व २ (संस्कृत-संस्कृत) | पं. वेणीमाधव शास्त्री जोशी, पं. ना. ह. जोशी |
| १४. आयुर्वेदीय शब्दकोश भाग १ व २ (संस्कृत-संस्कृत-मराठी) | श्री. वेणीमाधव शास्त्री जोशी आणि पं. ना. ह. जोशी |
| १५. इंग्रजी - मराठी स्थापत्य शिल्पकोश | श्री. रा. वि. मराठे |
| १६. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड - १ भाग १ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, प्रा. पद्मा मोरजे |
| १७. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड - १ भाग २ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, डॉ. स. वा. मुळे |
| १८. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड - २ भाग १ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, डॉ. स. वा. मुळे |
| १९. डॉ. माधवराव पटवर्धन - वाङ्मय सूची | श्री. सु. रा. चुनेकर |
| २०. वैज्ञानिक पारिभाषिक संज्ञा गणित शास्त्र, वास्तवशास्त्र, रसायन शास्त्र | डॉ. गो. रा. परांजपे |
| २१. साहित्य संहिता समीक्षा आणि पारिभाषिक संज्ञा | श्री. वसंत दावतर |
| २२. मराठी अनुवाद ग्रंथ सूची | डॉ. वीणा मुळे |
| २३. मराठी शब्दकोश : खंड १, २, ३, ४ | प्राचार्य रामदास डांगे |
| २४. विज्ञान आणि तंत्रज्ञान कोश | डॉ. अ. पां. देशपांडे, डॉ. बाळ फोंडके |

**आह्मां घरीं धन शब्दांचीं च रत्नें । शब्दांचीं च शस्त्रें यत्न करूं ।**
**शब्द चि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ।**
**तुका म्हणे पाहा शब्द चि हा देव । शब्दें चि गौरव पूजा करूं ।।**

शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे - १